# प्रस्तावना

## भाषाशास्त्र व जगांतील भाषा

ब्रह्मायं वाचः परमं व्योम । ऋ १ १६४ ३५.

**भाषेचा अभ्यास**—प्रत्येक मनुष्यास व्यवहाराकरितां भाषेचा अभ्यास हा करावाच लागतो व शिक्षणामध्यें भाषेच्या अभ्यासासहि बरेंच महत्त्व दिलें जातें बालपणांत प्रत्येक व्यक्ति आपली मातृभाषा आपोआपच शिकते परंतु पुढें त्याच भाषेचा विशेष अभ्यास करण्यांत येतो, व केव्हां केव्हां त्या बरोबर दुसऱ्याहि प्रचलित अथवा मृत भाषांचा अभ्यास आपणास करावा लागतो भाषेचा व्यवहारापुरता अभ्यास करावयाचा म्हणजे आपल्या दैनिक आयुष्यक्रमांत तिचा आपणास उपयोग करतां येण्यापुरेसा करावयाचा असतो आपली भाषा बोलतां, वाचतां व लिहितां आली म्हणजे आपली व्यावहारिक गरज भागते या दृष्टीनें प्रत्यक विद्यार्थी कमीजास्त प्रमाणांत आपल्या भाषेची उच्चारपद्धति, शब्दव्युत्पत्ति व रचना ह्यांचा अभ्यास करतो व क्वचित् इतरहि भाषांचा याच पद्धतीनें अभ्यास करतो यावेळीं तो भाषेची घटना, शब्दांची निरनिराळीं रूपें तयार करणें व त्यांची वाक्यांमध्यें मांडणी करणें हें शिकतो या दृष्टीनें ज्या भाषेचें तो अध्ययन करतो ती भाषा त्यास एका स्थिर स्वरूपामध्येंच कांहीं व्याकरणाचे नियम व अपवाद यांनीं बद्ध अशी आढळते तिच्या स्वरूपामध्ये पूर्वी कधीं बदल झाला असेल ही कल्पना त्यास नसते, किंवा पुढें कांहीं बदल होतील हीहि भावना त्यास नसते बहुधा तो वाङ्मयीन अथवा अभिजात भाषेच्या अभ्यासाकडेच विशेष लक्ष पुरवितो व त्यामुळें भाषा ही स्थिर व अविकारी आहे अशीच त्याची समजूत होते भाषेंतील नियमांचीं कारणें त्यास त्यावेळीं विचारतां येत नाहींत, व अध्यापकानें दिलेल्या स्पष्टीकरणावर त्यास विश्वासून रहावें लागतें विशिष्ट नियमास विशिष्ट अपवाद कां करण्यांत येतो ह्याचें कारण जाणण्याची जिज्ञासा त्याच्या ठिकाणीं जागृत होऊं देण्यांत येत नाहीं व संस्कृत भाषेंतील विशिष्ट संधिनियम हा वेदकालीन किंवा तदुत्तर संस्कृत बोलणाऱ्या लोकांनीं उच्चारसुलभतेकरितां केला होता ह्या किंवा अशा गोष्टींचा त्यास सुगावाहि लागू देण्यांत येत नाहीं यामध्यें आपणास सध्याच्या भाषाशिक्षणपद्धतीवर टीका करावयाची नाहीं, तर आम्हांस मुख्यतः ही गोष्ट नजरेस आणून द्यावयाची आहे कीं, कोणत्याहि भाषेचा व्यावहारिक अभ्यास व ऐतिहासिक अभ्यास यामध्यें अगदीं दोन भिन्न दृष्टी असतात व व्यावहारिक अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांस ऐतिहासिक दृष्टि व पद्धति भाषाशिक्षणाच्या आद्यावस्थेमध्यें परिचित करून देणें अतिशय अवघड असतें आतां भाषेचा ऐतिहासिक अभ्यास करणाऱ्याची दृष्टि व व्यावहारिक अभ्यास करणाऱ्याची दृष्टि यामध्यें महदंतर असतें एकास जी आपण लेखांत वापरतों व वाङ्मयांत पाहतों तीच वास्तविक व शुद्ध भाषा होय असें वाटतें तर दुसऱ्यास भाषा ही मुख्यतः बोलण्याची व ऐकण्याची आहे ही गोष्ट जास्त महत्त्वाची वाटते व लेखनकला जणूं कांहीं अस्तित्वांतच नाहीं असें धरून चालावयाचें असतें तसेंच एकास व्याकरणाचे नियम वेदवाक्याप्रमाणें मानून आपल्या भाषेची रचना करावयास शिकावयाचें असतें तर दुसरा म्हणतो कीं व्याकरणकारास अमुक शुद्ध अगर अमुक अशुद्ध असें म्हणण्याचा मुळींच अधिकार नाहीं त्यानें फक्त लोकांच्या भाषेसंबंधींचा व्यवहार नमूद करावयाचा आहे व ही गोष्ट तो जितक्या सत्यतेनें करील तितका तो चांगला किंवा वाईट व्याकरणकार ठरेल तसेंच प्रत्येक अपवादास कांहीं तरी कारण असतें या गोष्टीस ऐतिहासिक अभ्यासक अतिशय महत्त्व देतो व तें शोधण्याचा तो प्रयत्न करतो

**भाषेचा इतिहास**—भाषेचा इतिहास म्हणजे विशिष्ट भाषेची वाढ कशकशी होत गेली तिच्या पोटभाषा कशकशा बनत व वाढत गेल्या व त्यामध्ये प्रारंभापासून कसकसे फरक पडत गेले याचें ज्ञान करून घेऊन त्याची सुसंगत करून ठेवलेली नोंद होय ह्या दृष्टीनें कोणत्याहि भाषेचें संशोधन करावयाचें म्हणजे विशिष्ट भाषेमध्यें निरनिराळ्या कालांत फरक कसकसे होत जातात व या प्रवृत्तीला कोणतीं कारणें असतात याची माहिती करून घेणें अवश्य आहे अर्थात् आपणास भाषेच्या प्रचलित स्वरूपाच्या पूर्वीच्या स्वरूपाचा अभ्यास करावयाचा झाल्यास तो त्या भाषेंतील लेखांवरूनच करतां येईल परंतु वास्तविक आपला अभ्यासाचा विषय विशिष्ट भाषा कशी लिहिली जात असे हा नसून लोक ती कशी बोलत असत व ती बोलतांना त्यांची मनःस्थिति व कल्पना कोणत्या असत हा आहे आपले उद्गार हे आपल्या कांहीं विशिष्ट संवेदनांचे द्योतक आहेत आपल्या मनांतील

भाव अथवा संवेदना आपणांस कांहीं हावभाव, खुणा, चित्रें किंवा मूर्ति यांवरूनहि व्यक्त करतां येणें शक्य आहे. व भाषा हाहि भावव्यक्तीचा एक प्रकार आहे. मात्र खुणा, चित्रें वगैरे यांस जसा स्वत:च कांहीं विशिष्ट अर्थ असतो तसा भाषेंतील चिन्हें जे शब्द त्यांस स्वत:चा अर्थ नसून एकाच कल्पनेशीं विशिष्ट ध्वनीची सांगड घालण्याची संवय ज्या एका जनसमूहामध्यें झालेली असते त्या जनसमूहांतील व्यक्तींसच फक्त त्या चिन्हांचा अर्थ समजतो व लिखितभाषा ही पुन्हां या उच्चारित चिन्हांचीं ठराविक चिन्हें कल्पून त्यांवर बसविलेली असते. तेव्हां लिहिलेलीं अक्षरें उच्चारल्याखेरीज म्हणजे त्यांचें शब्दांत रूपांतर केल्याखेरीज त्यांचा अर्थबोध होत नाहीं व त्यास भाषेचें स्वरूप येत नाहीं. भाषा हा शब्दहि भाष्=बोलणें या धातूपासून निघाला आहे. जरी आपणांस एखाद्या भाषेंतील अक्षरें म्हणजे लिपी वाचतां आली तरी त्या भाषेंतील त्या विशिष्ट अक्षरांचा जो ठराविक अर्थ त्या समाजास होतो तो माहीत असल्याखेरीज आपणांस त्या अक्षरांपासून कांहींहि बोध व्हावयाचा नाहीं. उदा. आपण देवनागरी लिपीमध्यें जर अरबी किंवा तुर्की भाषेंतील कांहीं शब्द लिहिले तर जरी ते आपणांस नागरी लिपीच्या ज्ञानामुळें वाचतां आले तरी त्यांपासून आपणांस कांहींहि अर्थबोध व्हावयाचा नाहीं. तर विशिष्ट अक्षरसमुच्चयापासून विशिष्ट गोष्टीचा अथवा कल्पनेचा बोध होतो असा जो संकेत तो. विशिष्ट भाषा बोलणाऱ्या लोकांमध्यें असतो तो ज्यास ठाऊक असेल त्यासच त्या लेखनाचें भाषा म्हणून महत्त्व वाटेल. इतरांस तीं अक्षरें माहीत असूनहि त्याच्या दृष्टीनें त्यांस भाषेचें स्वरूप येत नाहीं याच गोष्टीचें वर्णन ऋग्वेदांत पुढील ऋचेंत केलें आहे. ‘ उतत्वः पश्यन्न ददर्शवाचमुतत्व शृण्वन्न शृणोत्येनाम्।’ (ऋ १०. ७१, ४.) ‘तो वाणीला पहात असूनहि ती त्याला दिसत नाहीं व ऐकूं येत असूनहि ऐकत नाहीं ’ हें अज्ञानी मनुष्याचें वर्णन आहे म्हणजे आपणांस अभ्यास करावयाचा म्हणजे कोणत्याहि समाजामध्यें जे विशिष्ट ध्वनी उच्चारले जाऊन त्यांपासून विशिष्ट अर्थ किंवा मनांतील भाव व्यक्त करावयाची प्रथा पडलेली असते तिचा अभ्यास केला पाहिजे व कालांतरानें या प्रथेमध्येंहि जो फरक पडत गेला असेल त्याचाहि आपणास अभ्यास केला पाहिजे. यामुळें अलीकडे भाषाशास्त्रीय अभ्यासांत ध्वनीच्या उच्चारणपद्धतीकडे फार लक्ष दिलें जातें व आधुनिक भाषाशास्त्री या ध्वनींचा अथवा शब्दोच्चारांचा अतिशय सूक्ष्म रीतीनें अभ्यास करीत असतात.

**भावना व त्यांचें व्यक्तीकरण**––भाषेच्या अभ्यासामध्यें किंवा तिच्या स्वरूपामध्यें आपणांस दोन बाजू असलेल्या दिसून येतात–एक मनुष्याचे भाषेच्या द्वारें व्यक्त करावयाचे विशिष्ट भाव अथवा त्याच्या मानसिक क्रिया या होत. ह्या बाजूचा अभ्यास मानसशास्त्रीय दृष्ट्या केला पाहिजे व हे भाव व्यक्त करण्याचें साधन जें शब्दोच्चार अथवा ध्वनींचें उच्चारण व तदनुषंगिक त्याच्या वागिंद्रियाचें चलनवलन या गोष्टी इंद्रियशास्त्रदृष्ट्या व ध्वनिशास्त्रदृष्ट्या अभ्यासिल्या पाहिजेत. अर्थात् हा अभ्यास करावयाचा म्हणजे निरनिराळ्या ध्वनींचें, सूक्ष्म पृथक्करण करून प्रत्येक ध्वनीचें आपणांस बिनचूक श्रवण करतां येईल व . तो पुन्हां उच्चारतां येईल अशा तऱ्हेचें, शिक्षण घेणें होय. अलीकडच्या भाषाशास्त्रीय अभ्यासांत या शिक्षणास फार महत्त्व दिलें जातें.

**भाषाशास्त्राचा उगम**––भाषाशास्त्रविषयक अभ्यासाची सुरवात प्रथमतः मनुष्याच्या मनांत जेव्हां सर्वत्र लोक एकच भाषा कां बोलत नाहींत ? आपण जे शब्द बोलतों ते प्रथम कसे उत्पन्न झाले असावे ? वस्तु व तिचें नांव यांचा परस्पर संबंध काय ? अमुक पदार्थाला किंवा अमुक व्यक्तीला विशिष्ट शब्दानेंच कां संबोधावें ? अशा तऱ्हेचे प्रश्न उत्पन्न झाले असतील तेव्हां झाली असावी. या प्रश्नांचीं प्राथमिक अवस्थेंतील उत्तरें जगांतील इतर गूढ प्रश्नांच्या उत्तरांप्रमाणेंच असावीं. ईश्वरानें प्रथम भाषा उत्पन्न केल्या, ईश्वरानें निरनिराळ्या वस्तूंना नांवें दिलीं वगैरे उत्तरें संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेंतील लोक अशा प्रश्नांस देत असत. ख्रिस्ती लोकांच्या जुन्या करारामध्यें भाषांच्या विविधतेचें असें स्पष्टीकरण दिलें आहे कीं, ईश्वरानें मनुष्याच्या पापाबद्दल व औद्धत्याबद्दल त्यास प्रायश्चित्त म्हणून भाषामध्यें असें वैचित्र्य उत्पन्न केलें (उ. ११.७) भाषेसंबंधीं निरनिराळे महत्त्वाचे प्रश्न त्यां वेळच्या लोकांच्या मनांत येत असत. उदा. निरनिराळ्या वस्तूंच्या नावांची व्युत्पत्ति जेव्हां सहज उलगडण्यासारखी नसेल तेव्हां त्या वेळचे यहुदी तत्त्ववेत्ते कांहीं तरी काल्पनिक स्पष्टीकरण देत असत. त्यानंतरच्या ग्रीक व लॅटिन ग्रंथकारांच्या ग्रंथांतहि केवळ ध्वनिसादृश्यावरून कल्पिलेल्या अनेक चमत्कारिक व्युत्पत्ती आपणाला पहावयास सांपडतात. तथापि ग्रीक तत्त्ववेत्त्यांनीं व्युत्पत्तीखेरीज आणखीहि कांहीं गोष्टींचा विचार केलेला आपणास आढळून येतो. विशिष्ट शब्दानें व्यक्त होणारी कल्पना हाच त्याचा स्वाभाविक अर्थ आहे काय ? किंवा हा केवळ सांकेतिक व कल्पनेनें बसविलेला आहे ? दुसऱ्या कोणत्याहि ध्वनिसमुच्चयानें तो अर्थ स्पष्टपणें व्यक्त होऊं शकला असता कीं नाहीं ? याबद्दल त्यांच्यांत मोठमोठे वादविवाद चाललेले आपणांस आढळून येतात. परंतु या वादविवादापासून कांहींच फलनिष्पत्ति होत नसे हें आपणांस प्लेटोच्या क्रॅटिलस नांवाच्या संवादावरून दिसून येतें. भारतीय तत्त्ववेत्त्यांतहि शब्द व त्याचा अर्थ यांचा संबंध, शब्दाचें नित्यत्व, त्याचें अर्थव्यक्त करण्याचें सामर्थ्य इत्यादि विषयांबद्दल दर्शनग्रंथांत, पातंजल भाष्यांत व साहित्य ग्रंथांत चर्चा केलेली आढळते. स्फोटवाद हा या चर्चेचेंच फल आहे. पण त्यावेळीं केवळ एकाच भाषेचा अभ्यास करणें शक्य असल्यामुळें यापेक्षा अधिक फलनिष्पत्ति

होणें शक्य नव्हतें. आज एक शतकभर तौलनिक व्युत्पत्तिशास्त्राचा अभ्यास चालू असूनहि हा प्रश्न सुटला नाहीं. शब्द व अर्थ यांतील संबंध नैसर्गिक आहे किंवा सांकेतिक आहे असें मानणारे दोन पक्ष तत्कालीन तत्त्वज्ञान्यांत व वैय्याकरणांत पडलेले दिसुन येतात. व सॉक्रेटिससारखा तत्त्ववेत्तादि शब्द व त्याचा अर्थ यांमध्यें नैसर्गिक संबंध कांहींहि नाहीं असें म्हणत असतांहि अशी एखादी उत्कृष्ट भाषा आपणांस बनवितां येणें शक्य आहे कीं जीमध्यें शब्द व अर्थ यांचा संबंध नैसर्गिक राहील असें प्रतिपादित असे व हेंच मत आपणांला पुढें बिशप विल्किन्ससारखे अर्वाचीन तात्त्विक भाषेचे पुरस्कर्ते प्रतिपादितांना आढळतात.

**वेदाभ्यास**--वरील प्रकारच्या कल्पनेला शास्त्र असें म्हणतां येणार नाहीं. कारण शास्त्र म्हटलें म्हणजे त्याला पद्धतशीर निरीक्षण व वर्गीकरण आवश्यक असतें व तसें ग्रीक ग्रंथकारांमध्यें आढळून येत नाहीं. मात्र अशा तऱ्हेचा पद्धतशीर अभ्यास आपणांस भारतीय वैय्याकरणांमध्यें आढळून येतो. भारतीयांची पवित्र वेदभाषा ही बहुतेक लुप्त झाली होती; परंतु तिच्या धार्मिक वर्चस्वामुळें त्यांतील प्रत्येक अक्षरास महत्त्व येऊन धार्मिक सूक्तांचें पठण व उच्चारण, त्यांत अल्पहि फरक न होतां झालें पाहिजे असा दंडक असल्यामुळें प्रत्येक ध्वनीचें व उच्चाराचें सूक्ष्म पृथक्करण करून त्यांस निरनिराळीं पारिभाषिक नावें देऊन त्यांची व्यवस्थित व्याकरणविषयक व भाषाविषयक मांडणी करण्यांत आली होती. त्यांची पद्धत पाश्चात्यांहून अगदीं भिन्न होती. व त्यामुळें पाणिनीचें व्याकरण जेव्हां प्रथम युरोपीय अभ्यासकांच्या नजरेस पडलें तेव्हां त्याचा पाश्चात्य अभ्यासकांवर अतिशय परिणाम होऊन त्यांतील अनेक संज्ञा आजहि भाषाशास्त्रांत रूढ होऊन बसल्या आहेत.

**शीक्षा**—वेदसंहितेचें पठण शुद्ध व्हावें याकरितां प्रत्येक शाखेस उपग्रंथ जोडलेले असत. त्यापैकीं शब्दाभ्यासाच्या दृष्टीनें महत्त्वाचे ग्रंथ म्हणजे प्रातिशाख्यें हीं होत तथापि संहितांचें पठण योग्य प्रकारें कसें करावें हें सांगणारें शीक्षा म्हणूनहि एक वेदांग आहे. यामध्यें वर्णांची उत्पत्ति कशी होते हें सांगितलें असुन मुख्यतः उदात्तानुदात्तादि स्वरांचें उच्चारण कसें करावें याकडे लक्ष दिलेलें आढळतें. ( पा.शी. ६–१४ ) यामध्यें स्वर व्यंजनाचा क्रम व ध्वनीची उत्पत्ति कशी होते व त्यांचें शुद्ध व स्पष्ट उच्चार कसे करावे हें सांगितलेलें आहे व शब्दोच्चार करतांना दोष घडल्यास त्याचा विपरीत अर्थ कसा होतो हेंहि इंद्रशत्रु यांतील स्वराघात चुकल्यामुळें तत्पुरुष समासा ऐवजीं बहुव्रीहि समास होऊन इंद्रास मारणारा असा अर्थ होण्याच्या ऐवजीं 'इंद्राकडून मारला जाणारा असा अर्थ कसा झाला व वृत्र हा इंद्रास मारण्याऐवजीं इंद्राकडून कसा मृत्यु पावला ही प्रसिद्ध कथा देऊन दाखविलें आहे. त्याबद्दलचा श्लोक पुढीलप्रमाणें आहे–मंत्रो हीनः स्वरतो वर्णतो वा मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह । स वाग् वज्रो यजमानं हिनस्ति यथेंद्रशत्रुः स्वरतोपराधात् ( पा.शी. ५२ ). तसेंच शब्दांचा उच्चार किती काळजीपूर्वक करावा हें पुढील श्लोकांत ध्वनित केलें आहेः–व्याघ्री यथा हरेत्पुत्रान्दंष्ट्राभ्यां नच पीडयेत । भीता पतनभेदाभ्यां तद्वद्वर्णान् प्रयोजयेत् । ( पा.शी. २५. ) तसेंच 'यथा सौराष्ट्रिका नारी तक्रँ इत्यभिभाषते । एवं रंगाः प्रयोक्तव्याः खेअराँ इव खेदया ।' ( पा.शी. २६. ). हे शीक्षाग्रंथ प्रत्येक शाखेस जोडले असुन त्यांमध्यें बहुधा हेंच विवेचन बहुतेक त्याच श्लोकांत आलें आहे. सामवेदाच्या शीक्षाग्रंथामध्यें सामवेद हा गेय असल्यामुळें त्यांतील स्वरांचें अधिक विवेचन संगीताच्या दृष्टीनें केलें आहे उदा. नारदीय शिक्षेमध्यें आपणांस पुढील श्लोक आढळतातः– ' यः सामगानां प्रथमो स वेणोर्मध्यमः स्वरः । यो द्वितीयः स गांधारस्तृतीयस्त्वृषभःस्मृतः ॥ चतुर्थः षड्ज इत्याहुः पंचमो धैवतो भवेत् । षष्ठो निषादो विज्ञेयः सप्तमः पंचमः स्मृतः ॥ ' ( ना.शी. ४.१.२. ) याप्रमाणें लौकिक गायनांतील सात स्वर व सामांतील सात स्वर यांचा मेळ घातला आहे. तसेंच षड्ज वदति मयूरो गावो रंभंतिचर्षभः अजाविकं तु गांधारं क्रौंचो वदति मध्यमं । पुष्प साधारणे काले कोकिला वदति पंचमं अश्वस्तु धैवतं वक्ति निषादो वदति कुंजरः । ( ना.शी. ४.२४. ) याप्रमाणें निरनिराळ्या सामगायनांतील स्वरांचें निरनिराळ्या प्राण्यांच्या आवाजाशीं तुलनात्मक साम्य दाखविलें आहे. तथापि शीक्षाग्रंथाच्या स्वरूपाकडे पाहतां जरी तैत्तिरीय आरण्यकामध्यें शिक्षाप्रकरणाचा उल्लेखच आढळतो. [ ' ॐ शीक्षां व्याख्यास्यामः । वर्णः स्वर । मात्रा बलम् । सामसंतानः । इत्युक्तः शीक्षाध्याय. ।' ( तै.उप. १.२ ) ] तरी ऋग्वेदीय शीक्षाग्रंथ पाणिनीच्या नांवावर मोडतो यावरून हे बरेच अर्वाचीन असुन भाषाशास्त्रीयदृष्ट्या शीक्षाग्रंथापेक्षा प्रातिशाख्यें अधिक महत्त्वाचीं आहेत.

**प्रातिशाख्यें**—हीं प्रातिशाख्यें वेदाच्या चारहि संहितांस जोडलेलीं आढळतात. त्यांतील ऋग्वेद व अथर्ववेद संहितांचीं प्रातिशाख्यें शौनकप्रणीत म्हणून मानलीं जातात; पण तैत्तिरीय संहितेच्या व वाजसनेयी संहितेच्या प्रातिशाख्यास विशिष्ट आचार्यांचीं नांवें जोडलेलीं आढळत नाहींत. तथापि आपणांस जीं प्रातिशाख्यें आढळतात त्यांमध्यें त्यांच्याहि पूर्वीच्या आचार्यांचीं नांवें व त्यांचीं भिन्न मतें नमूद केलेलीं आढळतात. यावरून यापूर्वीहि भिन्न आचार्यांचे प्रातिशाख्यग्रंथ उपलब्ध होते असें दिसतें. ऋक्संहितेच्या प्रातिशाख्यांत व्याडि, अथवा व्यालि, शाकल्य, शाकल्यपिता, मांडूक्य, शाकटायन, गार्ग्य, बाभ्रव्य इ. आचार्यांचीं नांवें उल्लिखित आहेत. तसेंच तैत्तिरीयप्रातिशाख्यांत आग्निवेश्य ( ९.४ ), आग्निवेश्यायन ( १४.३२ ), आत्रेय

(५ ३१), उख्य (८ २२), उत्तमोत्तरीय (८ २०), काण्वमाता (९ १), कौण्डिन्य (५ ३८), कौहलीपुत्र (५.४०), गौतम (५ ३८), पौष्करसादि (५ ३७), प्लाक्षायण (९ ६) प्लाक्षि (५ ३८) बाडभीकार (१४ १२) भारद्वाज (१७ ३), माचाकीय (माचिकाय) (१० २२) वात्सप्र (१० २३) वाल्मीकि (५ ३६) शाङ्खायन (१५ ७), शैत्यायन (५.४०), शाकल्य (८ २१) आणि हरीत (१४ १८) इ नांवाचा उल्लेख असून या खेरीज आचार्या म्हणून सामान्यत्वें कांहीं ठिकाणीं उल्लेख केला आहे या प्रातिशाख्यांत आपणास वर्णराशिक्रम, त्यांतील ह्रस्व–दीर्घ, स्वरव्यंजनादि भेद, त्यांचीं उच्चारस्थानें व व्यंजनाचे स्पर्श अघोष घोष, जिह्वामूलीय इ वर्गीकरण दिलेलें आढळतें तसेंच स्वर व व्यंजन यांच्या संधींचे नियम व त्यांचे अपवाद नमूद केलेले आढळतात तसेंच उदात्तानुदात्तादि स्वराघात व त्यासंबंधीं नियम, संहितेचीं पदें पाडण्यासंबंधीं व पदांचे क्रम वगैरे व्यवस्थेनें पठण करण्यासंबंधीं अनेक नियम दिलेले आढळतात तसेंच शब्दांचे वर्गीकरण पुढें दिल्याप्रमाणें केलेलें आढळतें 'नामाख्यातमुपसर्गो निपातश्चत्वार्याहुः पदजातानि शाब्दाः ॥ १७॥ तन्नामयेनाभिदधाति सत्त्वं ॥ १८॥ तदाख्यातं येन भावं स धातुः ॥ १९॥ प्राभ्यापरानिर्दुरन्व्युपाप समरिप्रतिन्यत्यधिसूदवापि । उपसर्गाविंशतिरर्थवाचका सहेतराभ्या ॥ २०॥ इतरे निपाताः ॥ २१॥ (ऋ प्रा १२ १७–२१) हेंच वर्गीकरण पुढें निरुक्तामध्यें आपल्याला त्याच स्वरूपांत आढळतें त्याचप्रमाणें निरनिराळ्या वर्णांचा उच्चार कसा होतो यासंबंधींहि विवेचन केलेलें आढळतें उदा 'वायु प्राण कोष्ठ्यमनुप्रदानं कण्ठस्य खे विवृते संवृते वा। आपद्यते श्वासतां नादतां वा वक्त्रीहायाम्।' याप्रमाणें उदरांतील प्राणवायु कंठाच्या पोकळींत येऊन त्याच्यावर कमजास्त पडणाऱ्या दाबामुळें तो संकुचित किंवा प्रसृत होऊन त्याप्रमाणें निरनिराळे श्वास नाद वगैरे आवाज कसे उत्पन्न करतो व त्याला त्याच्या उच्चनीचतेवरून व निरनिराळ्या स्थानांपासून निरनिराळीं नांवें कशीं प्राप्त होतात याचें वर्णन केलें आहे व त्याप्रमाणें अक्षरांच्या मात्रा ठरविलेल्या आहेत यानंतर वेदांतील निरनिराळ्या छंदांचीं लक्षणें व त्यांतील अक्षरसंख्या यांचें विवेचन केलें आहे याप्रमाणें वेदाच्या शुद्ध अध्ययनास अवश्य तेवढीं अंगें तत्कालीन भाषाशास्त्रज्ञांनीं अभ्यासिलीं होतीं

वाजसनेयी प्रातिशाख्यावरील भाष्यांत उवट म्हणतो, 'वृद्धमिदं शास्त्रमन्यानि शास्त्राण्यपेक्ष्य । शिक्षाविहितं व्याकरणविहितं चास्मिन् शास्त्रे उभयं यत प्रक्रियते।' (वा प्रा उवटभाष्य १ १६९)

प्रातिशाख्यें हीं व्याकरणाचीं पूर्वगामी म्हणतां येतील या प्रातिशाख्याची वाढ व विकास हळू हळू होत असावा हें वरील अनेक आचार्यांच्या परंपरेवरून दिसून येईल तसेंच सर्व शाखांचीं प्रातिशाख्यें एकाच वेळीं रचलीं गेलीं असेंहि दिसत नाहीं व त्यांतील विषयहि सर्व प्रातिशाख्यांत एकाच स्वरूपाचे नाहींत उत्तरकालीन प्रातिशाख्यांत व्याकरणविषयक भाग अधिक अधिक येत गेला आहे अथर्वप्रातिशाख्य हें आपणास सर्वांत अर्वाचीन म्हणतां येईल यामध्यें प्रारंभींचा उपोद्घातात्मक भाग नाहीं वर्णांचीं स्थानं, वर्णोत्पत्ति वर्णराशी, ध्वनि संधि वगैरे नियम नाहींत, तसेंच इतर आचार्यांचा उल्लेखहि आढळत नाहीं यांत व्याकरणविषयक भाग बराच आला आहे

**प्रातिशाख्यें व व्याकरण**—प्रग्रह संधि व स्वर यांचा विचार हा प्रातिशाख्यें व व्याकरण यांस जोडणारा दुवा आहे उदाहरणार्थ प्रग्रहाचें विवेचन पाहिलें असतां निरनिराळ्या प्रातिशाख्यांत व पुढें व्याकरणांत या विचाराचा विकास कसा होत गेला हें स्पष्ट दिसतें ऋक्प्रातिशाख्यांत 'ओकार आमन्त्रितजः प्रगृह्य' असें एका सूत्रांत थोडक्यांत विवेचन केलेलं आहे तर तैत्तिरीय प्रातिशाख्यांत चवथं एक संपूर्ण प्रकरण या विवेचनास खर्च केलं आहे वाजसनेयी प्रातिशाख्यांत याचें वर्गवार विवेचन आढळतें (वा प्रा १ ९२–९८) तर अथर्वप्रातिशाख्यांत अथवा शौनकीय चतुराध्यायींत यापेक्षा अधिक निश्चित स्वरूपाचें विवेचन आपणास पहावयास सापडतें तसेंच पुढें दिलेलीं प्रातिशाख्यांत आढळणारीं सूत्रें जशींच्या तशींच पाणिनीय अष्टाध्यायींत आढळतात १ उच्चैरुदात्त । नीचैरनुदात्त (पा १ २ २९–३० तै प्रा १ ३८ ३९ वा प्रा १ १०८–९ च अ १ १४–१५) २ समाहार स्वरित (पा १ २ ३१ तै प्रा १ ४० वा प्रा १ ११० ) ३ तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य । (पा १ १ ६६ वा प्रा १ १३४) ४ षष्ठीस्थानेयोगा । (पा १ १ ४९ वा प्रा १ १३६ ) ५ आद्यन्तवच्च । (तै प्रा १ ५५ आद्यन्तवदेकस्मिन् । पा १ १ २१ ) ६ ईकारौकारौ च सप्तम्यर्थे (च अ १ ७४ अ प्रा २ १ ६ ईदूतौ च सप्तम्यर्थे पा १ १ १९) ७ तस्मादित्युत्तरस्यादेः (वा प्रा १ १३५ आदेः परस्य । पा १ १ ५४ ) ८ स्वरितवर्जमेकोदात्तं पदम्" (वा प्रा २ १ अनुदात्तं पदमेकवर्जम् । पा ६ १ १५८ ) तसेंच कांहीं परिभाषाविषयक विशेषावरूनहि आपणास प्रातिशाख्यापासून व्याकरणाकडे भाषाविषयक अभ्यासाची प्रगति कशी होत होती हें दिसून येतें उदाहरणार्थ (१) कांहीं पारिभाषिक संज्ञा प्रातिशाख्यें व पाणिनी या दोहोंतहि वापरलेल्या असून त्यांच्या व्याख्या दोहोंतहि आढळत नाहींत म्हणजे या संज्ञा दोघांनाहि पूर्ण परिचित

व पूर्वी रूढ असलेल्या असल्या पाहिजेत– व्यवाय ( Intervention ) उपसर्ग ( Preposition ) समास (Compound), बहुलम् ( Optionally ) आमन्त्रित ( Vocative ) निपात ( Indeclinable ), मतु (प्) ( Possession ) ( २ ) कांहीं संज्ञा प्रातिशाख्य व पाणिनी या दोहोंतहि आढळतात पण त्यांच्या व्याख्या प्रातिशाख्यें मात्र देतात– आम्रेडित ( Repetition ), द्विरुक्तमाम्रेडितम् पदम् ( वा प्रा १४६ ) यावरून ही संज्ञा पाणिनीकालीं सामान्य झाली होती व तिच्या व्याख्येची त्या काळीं जरूर नव्हती ( ३ ) कांहीं संज्ञा प्रातिशाख्य व पाणिनी दोहोंतहि वापरल्या असून त्यांच्या व्याख्याहि दोहोंत आढळतात–उपधा (Penultimate ), अपृक्त ( Monosyllabic एकाक्षरपद ) प्रगृह्य ( Uncombinable final ) म्हणजे या संज्ञा रूढ होत्या पण अभ्यासकांस त्यांच्या व्याख्यांची जरूर होती ( ४ ) कांहीं संज्ञा दोहोंतहि आढळतात पण फक्त पाणिनी व्याख्या करतो ( सार्वधातुक [ अ प्रा २ ४ २ ] अभ्यास च अ २ ९१) म्हणजे या संज्ञा जरी प्रातिशाख्यकारांस परिचित होत्या तरी स्वत च्या पद्धतींत वापरावयाच्या असल्यामुळें पाणिनीला त्यांच्या व्याख्या देण्याची पुन्हां जरूर वाटली ( ५ ) कांहीं संज्ञा फक्त पाणिनी वापरतो व त्यांच्या व्याख्याहि देतो– सम्बुद्धि ( Vocative singular ), प्रातिपदिक ( Nominal base ) या संज्ञा प्रातिशाख्यांस परिचित नाहींत त्यांनीं आमन्त्रित, पद नाम इत्यादि जुनीच परिभाषा यांचेऐवजीं वापरतात म्हणजे सदरहू संज्ञा पाणिनीकालीं नवीन प्रचारात आल्या ( ६ ) कांहीं संज्ञा फक्त प्रातिशाख्यांत आढळतात पण त्यांच्या व्याख्या मात्र आढळत नाहींत–परोक्षा (Perfect च अ ४ ८४), नैगमी लेट ( Vedic subjunctive अ प्रा २ ३ २१ ) प्रेषणी (Imperative or Potential mood अ प्रा २ १ ११ ) यावरून या संज्ञा प्रातिशाख्यकालीं सामान्य व रूढ होत्या परंतु पुढें त्या मागें पडल्या यावरून प्रातिशाख्यें व पाणिनी यांतील संबंध आपल्या लक्षात येईल या बद्दल बर्नेल्नें आपल्या स्वतंत्र व्याकरणात असें म्हटलें आहे कीं, पाणिनीनें आपली पद्धति प्रचारात आणण्यापूर्वी जी पद्धति प्रचलित होती तीमध्यें या सर्व प्रातिशाख्यांचा अंतर्भाव होतो

ज्याप्रमाणें प्रातिशाख्यांत वेदपठणास महत्त्व देऊन पाठशुद्धीकडे लक्ष पुरविलेलें आढळतें त्याप्रमाणें निरुक्तामध्यें वेदाच्या अर्थज्ञानास महत्त्व देऊन त्याचें साधें अध्ययन व्हावें यासंबंधीं आवश्यक तेवढी मदत अभ्यासकांस देण्याची प्रवृत्ति दिसते प्रातिशाख्यामध्यें ध्वनि अथवा शब्दोच्चारास विशेष महत्त्व दिलेलें आहे तर निरुक्तामध्यें व्युत्पत्ति व अर्थ यांस अधिक महत्त्व दिलेलें आहे तथापि वेदास धार्मिक महत्त्व अतिशय असल्यामुळें या अभ्यासामध्यें आपणास चिकित्सा अथवा ऐतिहासिक विकास यापेक्षा पूर्वपरंपरेसच अधिक महत्त्व दिलेलें आढळतें आणि त्यामुळें अभ्यासाचें स्वरूप एकदेशीय झालें आहे

**निरुक्त**––आज आपणास निरुक्तावरील जो ग्रंथ उपलब्ध आहे तो यास्काचार्यांचा होय यास्कासंबंधीं कांहीं विवेचन पहिल्या भागाच्या प्रस्तावनेमध्यें केलेंच आहे त्यानें शब्दाचा अर्थ जाणण्याच्या कामीं व्युत्पत्तीस किती महत्त्व दिलें पाहिजे यासंबंधीं जें विवेचन केलें आहे त्याचा उल्लेख त्या ठिकाणीं केलेलाच आहे त्यानें लिहिलेलें वैदिक निघण्टुवरील भाष्य अथवा निरुक्त हा आपणास उपलब्ध असलेल्या ग्रंथांतील अगदीं प्राचीन पद्धतशीर प्रयत्न होय यानें अनेक पूर्वीच्या ग्रंथकारांचा उल्लेख आपल्या ग्रंथात केला आहे तसेंच त्यानें तत्कालीन व्युत्पत्तिशास्त्रज्ञ वैय्याकरण याज्ञिक, ऐतिहासिक नैदानें वगैरे अनेक विचारप्रवर्तक पंथांचा उल्लेख केला असून पूर्वीच्या निरुक्तकारांच्या मताचाहि परामर्ष घेतला आहे यावरून यास्कापूर्वीहि भाषाशास्त्रीय अभ्यासास किती महत्त्व मिळाले होतें व त्याचा किती अनेक अंगांनीं अभ्यास होत होता हें दिसून येतें तसेंच त्यानें उल्लेखिलेल्या प्रातिशाख्यांवरून ध्वनि किंवा शब्दोच्चारशास्त्रासहि त्या कालीं किती महत्त्व दिलें जात होतें हें आपण वर पाहिलेंच आहे प्रातिशाख्य रचलीं जाण्यापूर्वीहि संहिताच पदपाठ तयार झाले होते व यास्कानेंहि व्युत्पत्तिशास्त्राचा चांगला अभ्यास केला होता ही गोष्ट आपणांस त्याच्या ग्रंथावरूनहि दृग्गोचर पडते

**शब्दाच्या जाती**––यास्क सर्व शब्दांचे चार विभाग पाडतो ( नि १ १ ) ते म्हणजे ( १ ) नाम ( २ ) आख्यात ( ३ ) उपसर्ग ( ४ ) निपात हे होत नामाची व्याख्या तो सत्त्वप्रधान व आख्याताची भावप्रधान अशी करतो तसेंच यास्क हा शब्द हे केवळ इंद्रियनित्य आहेत म्हणजे ते क्षणिक असून उच्चारल्याबरोबर ते नाश पावतात हें औदुंबरायणाचें म्हणणें खोडून काढतो कारण तसें असतें तर शब्दांची चार प्रकारांत विभागणी होऊं शकणार नाहीं व एकामागून एक उच्चारलेल्या शब्दांचा परस्पर संबंध राहणार नाहीं व शब्द हे तर निरनिराळे पदार्थ व जगांतील निरनिराळे व्यापार दाखविण्याकरिता त्यांच्या व्यापकत्वावरून व लघुत्वामुळें योजले जातात भावाचे वार्ष्यायणीनें आठ प्रकार वर्णिले आहेत उत्पत्ति, स्थिति वृद्धि, उपक्षय आणि विनाश व हे यास्कानें मान्य केले असून इतर विकार यापासून होतात असें म्हटलें आहे ( नि १ २ ) हीच गोष्ट आपणांस बृहद्देवतेंत आढळते 'भावप्रधानमाख्यातं षड्विकारा भवन्तिते । जन्मास्तित्वं परीमाणो वृध्दिर्हानं विनाशनम् ।' बृ दे २ १२१

उपसर्ग हे स्वतन्त्रतः निरर्थक असून नाम व आख्यात याचे कर्मोपसंयोग दाखवितात, असे शाकटायनाचें मत यास्कानें नमूद केलें आहे ( नि १ ३ ) गार्ग्य यानें उपसर्गास अर्थ असतात असें जें विधान केलें आहे त्याचा अर्थ आपल्या अर्थानीं ते नाम व आख्यात यांच्या अर्थामध्ये विकार करतात असें सांगून त्याची संगति यास्कानें लावली आहे. व कांहीं उपसर्गांचे प्रातिलोम्य, आभिमुख्य इ० अर्थ दिले आहेत निपात हे उपमा, कर्मोपसंग्रह, पदपूरण इ० अर्थानीं योजलेले असतात असें म्हणून त्यानें कांहीं उदाहरणेंहि दिलीं आहेत ( नि १ ४ ) यास्कानें उपसर्ग अथवा शब्दयोगी अव्ययें यांची स्वतन्त्र जात कल्पिली आहे परंतु क्रियाविशेषणास त्यानें स्वतन्त्र स्थान दिलें नाहीं हें पाहून आश्चर्य वाटतें परंतु संस्कृत भाषेमध्यें उपसर्गांचा उपयोग विभक्तीचें कार्य करण्याकरितां क्वचित्च करण्यांत येतो व बहुतेक सीं क्रियाविशेषणांचें कार्य करतात यामुळें वरील विसंगति दूर होते यास्काच्या वरील शब्दविभागणीशीं इंग्लिशनेंसस येथील डायोनिसियस याचे विचार तुलना करून पाहण्यासारखे आहेत त्यानें ॲरिस्टॉटलनें अशीच शब्दांची विभागणी केली होती असें म्हटलें आहे थिओडेक्टसनें व ॲरिस्टॉटलनें शब्दांची तीन विभागांत प्रथमतः विभागणी केली होती ते म्हणजे (१) नाम (२) क्रियापद (३) संयोजक त्यानंतरच्या स्टोईक तत्त्वज्ञानीं संयोजक व उपपद यांची विभागणी करून चार विभाग कल्पिले ( Literary Composition, Cha iii, Roberts Ed. P. 71) ॲरिस्टॉटलच्या मताप्रमाणें एकंदर लेखनाचे विभाग पुढील प्रमाणें करता येतील –(१) वर्ण (२) अक्षर (३) संयोजक अथवा उभयान्वयी अव्यय (४) उपपद (५) नाम (६) क्रियापद (७) विभक्ति (८) भाषण (Poetics—Bywater P 57) तसेंच क्रियापदाची व्याख्या करताना ॲरिस्टॉटल क्रियेकडे दुर्लक्ष करून कालावर अधिक जोर देतो उलट यास्क हा भाव अथवा क्रिया यास अधिक महत्त्व देतो

व्युत्पत्तिमहत्त्व—यास्क व्युत्पत्तीस अतिशय महत्त्व देतो, सर्व शब्द अखेरीस धातूपासून व्युत्पादिता येतील असें म्हणतो व याप्रमाणें ज्या ज्या ठिकाणीं स्वरसंस्कार व प्रादेशिक विकार स्पष्ट असतील तेथें सरळ व्युत्पत्ति द्यावी असें म्हणतो तसें नसेल तेथें अर्थावरून व्युत्पत्ति द्यावी व ध्वनिसामान्यावरून म्हणजे सादृश्यावरून व्युत्पत्ति देण्याचा प्रयत्न करावा जेथें असें सामान्य नसेल तेथें अक्षरवर्ण सामान्यावरून व्युत्पत्ति द्यावी परंतु व्युत्पत्ति दिल्याशिवाय कधींहि राहू नये व्याकरण किंवा संस्कार यास फारसें महत्त्व देऊ नये कारण व्याकरणनियम हे अपवादयुक्त असतात अर्थाप्रमाणें विभक्तीस वळण द्यावें कारण शब्दांच्या मूळधातूमध्यें व अखेरच्या रूपामध्यें अनेकदां आपणास विसादृश्य आढळतें उदा कांहीं ठिकाणीं आदिलोप होतो ( अस्–स्त , सन्ति ), कांहीं ठिकाणीं अंतलोप होतो ( गम्–गत्वा, गतम् ), कोठें कोठें उपधालोप ( Syncope ) होतो (गम् जग्मतु , जग्मु ), कित्येकदा उपधाविकार होतो ( राजन्–राजा, दण्डिन्–दण्डी ), क्वचित् वर्णलोप होतो ( तत्वायामि–तत्वा- यामि ), क्वचित् द्विवर्णलोपहि (Haplology) होतो (नि+ऋच्=तृच्), केव्हा केव्हां आदिविपर्ययहि होतो ( द्यु–ज्योति ), क्वचित् आद्यन्तविपर्ययहि ( Metathesis ) होतो ( श्चुत्–स्तोक, सृज्–रज्जु, कृत्–तर्कु ) (नि २ १) केव्हां केव्हा अंतव्यापत्ति होते ( वह्–ओघ, मिह्–मेघ, गाह्–गाध, वह्–वधू ), कांहीं ठिकाणीं वर्णोपजन ( Anaptyxis ) होतो ( अस्=[ फेकणें ] आस्यत्, द्व=[झाकणें ] द्वार) जेथें धातूमध्यें स्वराजवळ अर्धस्वर अथवा अंतस्थ असतो तेथें दोन निरनिराळ्या तऱ्हेचे धातू बनतात अशा ठिकाणीं जर आपणांस विशिष्ट रूप एका धातूपासून व्युत्पादिता येत नसेल तर दुसऱ्या धातूपासून व्युत्पादण्याचा प्रयत्न करावा ( अव्–ऊति , मृद्–मृदु, प्रथ्–पृथु इ० ) कांहीं वैदिक नामें लौकिक संस्कृत भाषेतील धातूपासून व्युत्पादिलेलीं आढळतात ( यमुना , क्षेत्रसाधा ) उलट कांहीं लौकिक भाषेतील नामें वैदिक धातूपासून व्युत्पादलेलीं आढळतात ( उष्–उष्ण,घृ–घृत ) कांहीं लोकामध्यें प्रकृतिरूप शब्द रूढ असतात, तर कांहीं लोकामध्यें त्याच्या केवळ विकृतीच रूढ असतात उदा. शवति हें गत्यर्थक क्रियापद कंबोज लोकांतच रूढ आहे तर त्याचा विकार शव हा आर्य लोकांत आढळतो कापणें या अर्थी 'दा' हा धातु किंवा 'दाति' पद प्राच्य लोकांत रूढ आहे तर उत्तरीय लोकांत त्यापासून झालेला 'दात्र म्हणजे विळा हा शब्द रूढ आहे अशा तऱ्हेनें कांहीं कांहीं शब्दांची व्युत्पत्ति लावावी तद्धित सामासिक शब्दांमध्यें जे निरनिराळे अवयव असतील त्यांची पृथक् पृथक् व्युत्पत्ति लावावी ( नि २ २ ) एकाकी पदाची व्युत्पत्ति लावू नये तसेंच व्यास व्याकरण माहीत नाहीं जो शिष्य आपल्या जवळ नित्य रहात नाहीं व जो समजण्यास असमर्थ आहे अशा मनुष्यास व्युत्पत्ति सांगू नये पर जो मेधावी, तपस्वी किंवा नित्य जवळ राहणारा असेल त्यासच व्युत्पत्तीचा बोध करावा ( नि २.३ )

वरील यास्कांनीं घालून दिलेल्या नियमांचा आपणांस तौलनिक व्युत्पत्तिशास्त्राच्या अभ्यासास फार उपयोग होतो मूळ धातू व प्रचलित रूप यांमध्यें कधीं कधीं अतिशय विसादृश्य असतें ही गोष्ट आपणास अनेक ठिकाणीं आढळून येते उदा १ इंग्रेयुरो पेक, स पच, झेंद पच, ग्री पेंटे, लॅ विंक, फ्रॅं सँक रिशु पेके, गॉ फिफ, जर्मन फुफ, प्रा इ पिफ, इ फाइव्ह

२ ह यु, लॅ ओब्दिस्, ३ इं फोर, जर्मन व्हिभर, ग्री तेसरेस ४ इंडोयु पथ, स दश, ग्री फसीन, लॅ अन्सेर, ज गन्स, प्रा इं. गॉज़्, "६. गूर् परतु अशा तऱ्हेनें व्युत्पत्ति लावण्यात पुष्कळदां चुका होण्याचा संभव आहे ही गोष्ट ओळखून यास्कानें सदर्गाशिवाय एकाकी शब्दाची व्युत्पत्ति लावू नये असा निर्बंध घातला आहे, व अर्थाकडे लक्ष देऊन त्याप्रमाणें व्युत्पत्ति लावण्याचा प्रयत्न करावा या गोष्टीस त्यानें विशेष महत्त्व दिलें आहे यास्कानें सारख्या अर्थाच्या शब्दाची व्युत्पत्ति एकच असते व निरनिराळ्या अर्थाच्या शब्दांची व्युत्पत्ति निरनिराळी असते त्याअर्थी अर्थाप्रमाणें व्युत्पत्ति करावी असें म्हटलें आहे।( तानिचेत् समान कर्माणि समाननिर्वचनानि नाना कर्माणिचे नाना निर्वचनानि यथार्थं निर्वक्तव्यानि। नि. २ ७ ) हें अगदीं यथार्थ आहे कारण कांहीं शब्दांचीं रूपें निरनिराळ्या धातूपासून उत्पन्न होऊनहि अगदीं सारखीं असतात उदा १ स अज्–अक्त=हांकलेलें, अञ्–अक्त=लेप केलेलें. २ अज्–अज=हांकणारा, अ+जन् न जन्मलेला, ३ अनिष्ट–अन्+इष्ट(–इष्)=न इच्छिलेलें, (–यज्)=यज्ञ न केलेलें ४ अनुदार–अन्+उदार=कृपण, अनु+दार=पत्नीनें अनुसरलेला अशा शब्दांची व्युत्पत्ति अर्थाप्रमाणें लावल्यासच बरोबर होईल परतु कांहीं कांहीं ठिकाणीं एकाच धातूपासून व्युत्पादिलेल्या शब्दास पुढें निरनिराळे अर्थ प्राप्त होतात उदा लॅ क्युपिडो=इच्छा व स कुप्=रागावणें या दोहोंचीहि व्युत्पत्ति एकच आहे यास्कानें वैदिक व लौकिक या संस्कृत भाषेच्या दोन्ही स्वरूपामध्यें असलेला भेद लक्षात ठेवला होता व लौकिक भाषा ही वैदिक भाषेचेंच कालांतरानें बनलेलें रूप होय ही गोष्ट आळखली होती हेंहि महत्त्वाचें आहे यासारखाच प्रकार ग्रीकमधल्या आयॉनिक व लॅटिन या भाषांचा होता परतु लॅटिन भाषा ही आयॉनिक भाषेचेंच उत्तरकालीन स्वरूप आहे ही गोष्ट प्लेटोच्या लक्षात आली नव्हती असें त्याच्या क्रॅटिलस या संवादावरून दिसतें ( जोवेट डायलॉग्ज ऑफ प्लेटो, १ पृ ३५८ )

**नामांची धातूपासून व्युत्पत्ति**—यास्क हा नामें धातूपासून बनलीं आहेत असें नैरुक्तांचें व शाकटायनाचें मत नमूद करतो व त्याला येणारे आक्षेप खोडून काढण्याचा प्रयत्न करतो ( नि १ १२–१४ ) उदा गार्ग्य व वैय्याकरण हे सर्व नामें धातूपासून बनलीं आहेत असें म्हणण्यास तयार नाहींत तर जेव्हां नामें स्वरसंस्कार व प्रादेशिक विकार त्यांच्या रूपामध्यें स्पष्ट दिसतात तेवढींच धातूपासून बनलीं आहेत असें मानतात उलट गौ, अश्व, पुरुष, हस्ती इ० शब्द अव्युत्पन्न असून केवळ संकेतानें बनलेले आहेत असें त्यांचें म्हणणें आहे एवढेंच नव्हे तर महाभाष्यात ' नामच धातुज माहनिरुक्ते व्याकरणे शकटस्यच तोकम् ' असें म्हणून व्याकरणकार कोणी तसें मनीत नाहीं असें पतंजलीनें म्हटलें आहे ( ३ ३,१ ) यासबधीं यास्काचे पूर्व–उत्तर पक्ष असे आहेत–जर सर्व नामें धातूपासून बनलेलीं असतीं तर एक विशिष्ट क्रिया जी जी व्यक्ति करील त्या त्या विशिष्ट व्यक्तीस तेंच नाव प्राप्त होईल, उदा जो जो रस्त्यावरून धावण्याचें काम करील त्यास अश्व ही संज्ञा मिळेल व ती केवळ विशिष्ट प्राण्याशींच संबद्ध राहणार नाहीं तसेंच जें जें टोंचेल त्यास तृण ही संज्ञा प्राप्त होईल तसेंच एखाद्या वस्तूकडून जर अनेक क्रिया होत असतील तर तितकीं नावें त्या वस्तूस अथवा नामास प्राप्त होतील उदा एखाद्या खांबास सरळ उभें राहण्यावरून ' स्थूणा ' असें नाव मिळेल तर खड्ड्यात पुरलेला म्हणून 'दरशया' असें नाव मिळेल, किंवा तुळयास जोडलेला म्हणून ' सज्जनी ' असेंहि नाव मिळेल याप्रमाणें एकाच वस्तूस तीन नावें प्राप्त होतील वस्तूंना तर असंदिग्ध व बिनचूक नावें व व्याकरणविषयक रूपें प्राप्त होणें अवश्य आहे. तसेंच कांहीं लोक कांहीं शब्दांच्या प्रचलित अर्थाबद्दल ज्या शंका काढतात तशाहि काढण्यास जागा राहू नये उदा० प्रथ्=पसरणें यापासून जर पृथ्वी हें नांव प्राप्त होतें तर या पृथ्वीला कोणी पसरली किंवा तिला आधार काय अशी शंका विचारण्यात येते तसेंच शाकटायन शब्दातील निरनिराळ्या अवयवावरून निरनिराळ्या व्युत्पत्ती त्यामध्यें अन्वय नसताहि करताना आढळतो तसेंच क्रिया ही कर्त्यावर अवलंबून असते तेव्हां आधीं अस्तित्वात असणाऱ्या कर्त्यास क्रियेपासून नाव मिळणें संभवनीय वाटत नाहीं यास्कानें असें उत्तर दिलें आहे कीं, जेथें स्वरसंस्कार व व्याकरणविकार स्पष्ट व नियमबद्ध असतील व मूळ धातु स्पष्ट दिसत असेल तेथें त्या धातूपासून तें नाव निघालें आहे ही गोष्ट स्पष्टच आहे आता एकच क्रिया जेव्हां निरनिराळे लोक करतात तेव्हां सर्वांनाच आपण तेंच नाव देतों असें नाहीं उदा सर्वच लाकूड तासणाऱ्या लोकांस आपण 'तक्षा' म्हणतों असें नाहीं तसेंच सर्वच भटकणाऱ्या लोकांना आपण 'परिव्राजक' असें न म्हणता फक्त संन्याशालाच तो शब्द लावतो यामध्यें आपण ती क्रिया ज्या व्यक्तीमध्यें अनेक क्रियामध्यें विशेषरूपानें आढळते त्यावरूनच त्या व्यक्तीस आपण तें नाव देतों, हें स्पष्ट आहे तसेंच वर्तति, जागरूक इ शब्द व्युत्पत्तिदृष्ट्या व अर्थदृष्ट्याहि एकच पदार्थ दाखवितात व ते सर्वच नियमबद्ध आहेत तिसरें अनेक क्रियाकारक पदार्थांना उत्तरकालीं होणाऱ्या क्रियेवरून नावें प्राप्त झालेलीं आपणास आढळतात तसेंच पसरल्यामुळें पृथ्वी हें नाव मिळण्याबद्दल जी शंका काढण्यात येते त्यास एवढेंच उत्तर सांगण्यात येईल कीं पृथ्वी ही पसरलेली दिसते म्हणून तीस पृथ्वी असें सयुक्तिकपणें म्हणता येईल आता जो शब्दाची अवयवावरून अनियमित रीतीनें व्युत्पत्ति लावतो त्यात शास्त्राचा दोष नसून त्या व्यक्तीचा दोष आहे तथापि सर्वच नामें धातूपासून झालीं आहेत असें आतां कोणी मानीत नाहीं

अनुकरणात्मक शब्द—यास्कानें अनुकरणात्मक शब्दांसंबंधींहि चर्चा केली आहे ( नि. ३ १८ ). काक हा शब्द शब्दानुकृतीनें उत्पन्न झाला आहे व असे पक्ष्यांच्या नांवांत पुष्कळ शब्द आहेत. औपमन्यव अशी शब्दानुकृति मान्य करीत नाहीं, तर काक हा हांकून घालवयाचा ( अपकालयितव्य ), तित्तिर हा तरतो म्हणून किंवा चित्रविचित्र असतो म्हणून ( तरणात् तिलमात्र चित्र ), कपिंजल ( कपिरिव जीर्णे किंवा कपिरिव जवते किंवा ईषत् पिंगलो वा कमनीयं शब्दं पिंजयति वा ); अशा प्रकारें श्वा, सिंह, व्याघ्र, इ. शब्दांची व्युत्पत्ति निराळ्या प्रकारेंहि लावता येते असें त्यानें म्हटलें आहे. तथापि यास्क कितव ( किं तव अस्तीति शब्दानुकृतिः ५ २२ ), दुंदुभि ( दुंदुभि रिति शब्दानुकरणम् ९.१२ ), बिल्वा, कृकवाकु इ. शब्द शब्दानुकरणानें झाले आहेत असेंच विवेचन करतो. तथापि एकंदर भाषेंतील शब्द बनविण्याच्या कामीं शब्दानुकृतीस तो फारसें महत्त्व देत नाहीं.

यास्क उपमा शब्दाची व्याख्या देतो ( ३.१३ ) आणि तिचे कर्मोपमा, भूतोपमा, रूपोपमा, सिद्धोपमा, लुप्तोपमा, अथवा अर्थोपमा इ० भेद दाखवितो ( ३.१५–१८. ) तथापि मूळ निरुक्तामध्यें वारंवार पडलेली विशेषतः वैकल्पिक व्युत्पत्तींची भर व सर्व शब्दांची कांहीं तरी करून व्युत्पत्ति लावावयाची हा आग्रह यामुळें विज्ञानदृष्टीनें त्यांत कांहीं दोष आढळतात. यानंतर आपणांस भाषाशास्त्रविषयक सामान्यकल्पना दर्शनें व व्याकरणग्रंथ यामध्यें शब्दनित्यत्व, शब्द शब्दार्थसंबंध इत्यादि बाबतींत व साहित्यग्रंथांत स्फोट, अभिधा, लक्षणा, व्यंजना वगैरेचें विवेचन करतांना व्यक्त केलेल्या आढळतात. त्याचें विस्तृत विवेचन करण्यास येथें अवकाश नाहीं.

**भाषाशास्त्राचा पश्चिमेंत उदय**—युरोपमध्यें ग्रीस आणि रोम येथें हळू हळू व्याकरणशास्त्राची परिणति होत होती. ॲरिस्टॉटल यानें शब्दांच्या जाती आणि विभक्तींची कल्पना प्रथम प्रचारांत आणली. त्यानंतर स्टोइक तत्त्ववेत्त्यांनीं त्याची परंपरा पुढें चालविली व त्यांनीं योजिलेल्या कांहीं व्याकरणविषयक पारिभाषिक संज्ञा आजहि प्रचलित आहेत. अर्थात् त्यांतील कांहींचें लॅटिनमध्यें येतांना विचित्र रूपांतर झालेलें आहे. यानंतर अलेक्झांड्रा हें संस्कृतीचें व, तसेंच भाषाशास्त्रविषयक अभ्यासाचें केंद्र होतें. येथील अभ्यासकांनीं मुख्यतः जुन्या काव्याचा अभ्यास चालविला होता. तथापि त्यांच्या अभ्यासानें भाषेच्या स्वरूपाचें ज्ञान किंवा व्युत्पत्तिशास्त्र या विषयांत फारशी प्रगति झाली नाहीं व त्यानंतर येणाऱ्यांनीं या बाबतींत फारसें कार्य केलें नाहीं.

मध्ययुगांतहि आपणांस हीच स्थिति आढळून येते. त्यावेळीं धार्मिक भाषा म्हणून लॅटिन भाषेचा अभ्यास करण्यांत येत असे परंतु तोहि शास्त्रीय पद्धतीनें होत नसे आणि त्यावेळच्या लोकभाषा—ज्यांतून पुढें आजकालच्या वाङ्मयीन भाषा निघाल्या—त्यांचाहि अभ्यास यथातथाच चालत असे.

विद्येच्या पुनरुज्जीवनाच्या काळांत विशेषतः ग्रीक भाषेच्या अभ्यासाला महत्त्व येऊन त्यावेळच्या लोकांची दृष्टि विकसित झाली. तसेंच लॅटिन भाषा ही तिच्या अभिजात व शुद्ध स्वरूपांत लिहिली व अभ्यासली जावी या गोष्टीला महत्त्व आल्यामुळें व्याकरणाच्या अभ्यासाकडे जास्त लक्ष जाऊं लागलें. त्यावेळीं सिसरोसारखें लॅटिन लिहिणें हेंच विद्वानांचें ध्येय असे. यावेळीं दळणवळणाचीं साधनें व आंतरराष्ट्रीय व्यवहार जास्त वाढल्यामुळें व देशी भाषेंतील वाङ्मयासहि जास्त महत्त्व आल्यामुळें देशी भाषेच्या अभ्यासाकडेहि अधिकाधिक लक्ष जाऊं लागल्याचें पुढील शतकांत आपणांस आढळून येतें. त्या अभ्यासाला प्रवर्तक अशी विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे छापण्याच्या कलेचा शोध ही होय. या मुद्रणकलेच्या साहाय्यामुळें परकीय भाषेचें अध्ययन करणें अधिक सुलभ झालें तसेंच यावेळीं जुन्या कराराची भाषा म्हणून हिब्रू भाषेला धार्मिक भाषेंत महत्त्वाचें स्थान मिळाल्यामुळें त्या भाषेचें ज्ञानहि विद्वान मनुष्यास आवश्यक होऊन बसलें

युरोपमध्यें प्रचलित असलेल्या भाषाहून सर्वंत भिन्न असलेल्या या भाषेशीं झालेल्या परिचयामुळें भाषाशास्त्रीय अभ्यासाला चालना मिळाली परंतु त्यामुळ त्यांत अनेक दोष शिरण्यालाहि वाव मिळाला. कारण सेमिटिक वंशाचें भाषाशास्त्रांतील स्थान त्यावेळीं निश्चितपणें माहीत नसल्यामुळें व हिब्रू ही पॅरेडाइज मधील भाषा अशी समजूत असल्यामुळें हीच सर्व भाषांची मूळ प्रकृतिरूप भाषा अशी समजूत झाली आणि त्यामुळें हिब्रू व तत्कालिन युरोपीय भाषा यांमध्यें आढळणारीं अनेक विचित्र व काल्पनिक साम्यें या वरील समजुतीस आधार म्हणून देण्यांत येऊं लागलीं. विशेषतः हिब्रू भाषा ही उजवीकडून डावीकडे लिहिली जात असल्यामुळें ज्या दोन शब्दांच्या अर्थांत कांहीं साम्य दिसेल त्या दोन शब्दांतील अक्षरें त्यांतील सादृश्य दाखविण्याकरितां वाटेल तशीं फिरविण्याकडे प्रवृत्ति होऊं लागली, तथापि यामुळें जरी अनेक चुकीच्या व्युत्पत्ती पुढें करण्यांत आल्या तथापि यातूनच चिकित्सक वृत्तीच्या अभ्यासकांना अधिक व्यवस्थित व पद्धतशीर अभ्यास करण्यास साधन मिळालें.

गॉथॉलिक भाषेंत प्रसिद्ध झालेल्या कांहीं पुस्तकांमध्यें व विशेषतः वुल्फिलाचें ' बायबल 'चें गॉथिक भाषेंतील भाषांतर प्रसिद्ध झाल्यामुळें या भाषांच्या सतराव्या व अठराव्या शतकांतील स्वरूपाचा ऐतिहासिक अभ्यास करण्यास साधन मिळालें.

तथापि या वेळच्या भाषाशास्त्राच्या अभ्यासाची एका भाषेच्या निरनिराळया शतकांतील स्वरूपाचा अभ्यास करून तिचा इतिहास शोधण्यापेक्षां तत्कालीन अनेक प्रचलित भाषांची तुलना करण्याकडे अधिक प्रवृत्ति दिसून येते. उदा. लिब्निट्झ या तत्त्वेत्त्यानें 'पीटर दि ग्रेट' यास आपल्या साम्राज्यांतील निरनिराळया भाषांचे नमुने व शब्दसंग्रह जमविण्यासाठीं प्रवृत्त केलें. या लिब्निट्झच्या प्रयत्नामुळें व दुसरी कॅथेराइन या राणीनें या बाबतींत दाखविलेल्या उत्साहामुळें आपणांस तत्कालीन भाषांतील पॅलॅस, हर्वास व ॲडेलुंग यांचे शब्दसंग्रह उपलब्ध झाले आहेत. या संग्रहांत जरी कांहीं उणीवा असल्या व व्याकरणापेक्षां कोशाच्या दृष्टीनेंच त्यांचें महत्त्व अधिक असलें तरी एकोणिसाव्या शतकांतील भाषाशास्त्रीय अभ्यासाचा पाया या ग्रंथांनींच घातला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं व तसेंच दोन भाषांतील नातें शोधावयाचें असल्यास त्यांतील शब्दसंग्रहापेक्षां व्याकरणविषयक साम्यच अधिक महत्त्वाचें आहे ही गोष्ट हर्वास यानेंच प्रथम निदर्शनास आणली.

**लॅटिन भाषेचा अभ्यास**--तौलनिक भाषाशास्त्राच्या अभ्यासास सुरवात होण्यापूर्वी तत्कालीन भाषाशिक्षणासंबंधींच्या कल्पनांचें व पद्धतींचें थोडेंसें निरीक्षण केलें असतां आपणांस असें आढळून येतें कीं, त्यावेळीं मुख्यतः लॅटिन भाषा शिकविली जात असे व व्याकरणाचा अभ्यासहि फक्त लॅटिन भाषेवरूनच केला जात असे. त्यामुळें लॅटिन व्याकरणास विशेष महत्त्व आलें होतें; एवढेंच नव्हे तर सामान्यत. दुय्यम शाळेला व्याकरणशाळा (इंग्लंड) किंवा लॅटिनशाळा (डेन्मार्क) असें संबोधित असत त्यामुळें तत्कालीन लोकभाषांतून जे व्याकरणविशेष वास्तविक आढळत नसत ते सुद्धां लॅटिन भाषेच्या वर्चस्वामुळें त्यांवर लादले जात असत व ही प्रवृत्ति अजूनहि आपणास दृष्टीस पडते. आजहि आपणांला लॅटिन भाषेचा ज्यावर परिणाम झालेला नाहीं असें कोणत्याहि भाषेचें एकहि व्याकरण आढळणार नाहीं.

लॅटिन भाषा ही निरनिराळया देशांत कशी बोलली जात असे इकडे लक्ष न देतां ती लिहिली कशी जात असे व कशी लिहिली पाहिजे याच गोष्टीकडे लक्ष देऊन तिचा अभ्यास होत असे. त्यामुळें ध्वनीपेक्षां अक्षरांसच अधिक महत्त्व दिलें जात असे. भाषा ही प्रथम बोलली जाते व नंतर लिहिली जाते या गोष्टीकडे दुर्लक्ष केलें जात असे आणि यामुळें अनेक व्युत्पत्तिशास्त्रीय नियमांकडे दुर्लक्ष होत असे. याचा एकंदर भाषाशास्त्रीय अभ्यासावर बराच परिणाम झालेला आपणांस दिसून येतो. त्याचप्रमाणें लॅटिन भाषेचा अभ्यास हा विद्वान लोकांस एकमेकांशीं दळणवळण ठेवण्याचा मार्ग म्हणून केला जात असे आणि त्यामुळें लॅटिन भाषेच्या व्याकरणाचा अभ्यास वर्णनात्मक असण्यापेक्षा विधानात्मक स्वरूपाचा असे, म्हणजे, अमुक अमुक पद्धतीनें लिहिलें असतां तें शुद्ध व इतर अशुद्ध अशा तऱ्हेचे आदेश व्याकरणापासून मिळत असत. त्यामुळें तत्कालीन व्याकरणाची व्याख्या म्हणजे शुद्ध कसें बोलावें व शुद्ध कसें लिहावें हें समजण्याची कला, ही होती. जे. सी. स्कॅलिगर यानें व्याकरण शिकण्याचा उद्देश, शुद्ध लिहिता यावें व अशुद्ध लेखन टाळता यावें असा दिला आहे व हीच पद्धति पुढें इतर लोकभाषांचें व्याकरण शिकतानाहि अनुसरली गेली. शब्दसंग्रहाकडेहि पाहण्याची दृष्टि अशीच होती हें आपणांस त्यावेळच्या फ्रेंच व इटालियन विद्यापीठांनीं प्रसिद्ध केलेल्या कोशावरून दिसून येतें हे कोश सर्वशब्दसंग्राहकस्वरूपाचे नसून अभिजात शब्ददर्शकस्वरूपाचे होते ही गोष्ट पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत दाखविलीच आहे

त्याप्रमाणेंच भाषेंतील वाक्प्रचार अथवा शब्दांचीं रूपें जेथें भिन्न भिन्न स्वरूपाचीं आढळतील तेथें कोणत्या तरी एकास महत्त्व देऊन बाकीचीं अशुद्ध ठरविण्याकडे प्रवृत्ति असून या बाबतींत कांहीं कांहीं वेळीं बुद्धीस न पटणारे किचकट नियम देण्यांत येत असत यामुळें एखाद्या प्रयोगाची व्याकरणशुद्धता ठरविणें झाल्यास अनेकदां त्यातील तर्कशुद्धता ही लॅटिन शब्दप्रयोगाशीं साम्याच्या आधारावरच अवलंबून ठेविलेली आपल्या दृष्टीस पडते आणि त्यामुळें जिवंत भाषाच्या वाढीस अडथळा झालेला दिसून येतो.

**भाषेच्या उत्पत्तीविषयीं कल्पना**--अठराव्या शतकात भाषेची नैसर्गिक उत्पत्ति कशी झाली असावी यासंबंधीं कांहीं तत्त्ववेत्त्यांनीं विचार केलेला आपणास आढळतो रूसो याची अशी कल्पना होती कीं, आरंभीच्या मनुष्यांनीं मुद्दाम एकत्र बसून आपसांत संकेत ठरवून त्याप्रमाणें एखादी भाषा बनविली असावी, परंतु यामध्यें प्रथम संकेत ठरविण्याकरतां तरी एकमेकांचे मनोगत या मनुष्यांनीं एकमेकांस कसें कळविलें असावें हा प्रश्न उत्पन्न होतोच. कॉंडिलॅकच्या मतें, प्रथम भाषा अवगत नसलेल्या स्त्रीपुरुषांनीं कांहीं स्वाभाविक उद्गार काढून किंवा खुणांनीं आपल्या तीव्र भावना व्यक्त केल्या असाव्या व विशिष्ट वस्तु कांहीं आवाज व खुणा यांच्या द्वारें दिग्दर्शित करून विशिष्ट अर्थ त्याच त्याच खुणेची पुनरुक्ति करून तीस जोडला असावा व या व्यक्तींची मनोगत व्यक्त करण्याची शक्ति जरी मर्यादित असली तरी त्यांच्या मुलांच्या बाबतींत तिची वाढ झाली असावी व याप्रमाणें भाषेची प्रगति झाली असावी. जोहान गॉटफ्रेड हर्डर यानें आपल्या 'भाषेची उत्पत्ति' या निबंधात प्रथम भाषा ही ईश्वरप्राप्त देणगी आहे हें सुस्मिल्च वगैरे जुन्या लोकांचें मत खोडून काढून भाषा ही मनुष्यप्रणीतच आहे असें प्रतिपादन केलें. याचें एक कारण त्यानें

असें दिलें आहे कीं, भाषा ही जर ईश्वरप्रणीत असेल तर ती पूर्णपणें तर्कशुद्ध असली पाहिजे परंतु सध्यांच्या भाषेंत इतकी अव्यवस्था व घोटाळा आढळतो कीं, ती ईश्वरप्रणीत मानणें शक्यच नाहीं त्याप्रमाणेंच भाषा ही मनुष्यानें एखाद्या शास्त्रीय सिद्धांताप्रमाणें शोधून काढली हेंहि मत हर्डरनें त्याज्य ठरविलें आहे भाषा ही हेतुपुरस्सर बनविलेली नसून ती मनुष्याच्या गरजेप्रमाणेंच वाढत गेली आहे व मनुष्याच्या गर्भाची जन्मापर्यंत धडपड चाललेली असते त्याप्रमाणेंच भाषा ही मनुष्याच्या स्वाभाविक प्रेरणेनें उत्पन्न झाली असली पाहिजे व तिचें मूळ मनुष्याच्या निरनिराळ्या भावनांचें व विकारांचें व्यक्तीकरण हेंच होय परंतु एवढ्यानेंच केवळ भाषेंतील सर्व शब्दांची व प्रयोगांची उपपत्ति लागत नाहीं स्वाभाविक भावना व्यक्त करणें एवढाच व्यापार मानव करीत नसून पशुपक्षी। त्याचे व्यापार अनेकविध प्रकारचे असतात व त्यांचें निरीक्षणहि विविध असतें व कांहीं गोष्टी पाहून त्यांचा तो सूक्ष्म विचार करतांना आढळतो उदा बेंबें करणारें बकरें त्यानें ऐकलं म्हणजे त्याचा आवाज त्याच्या लक्षांत राहून पुन्हां जेव्हां तो प्राणी त्याच्या नजरेस पडतो तेव्हां हा बेंबें करणारा प्राणी आहे हें ओळखून कांहीं दिवसांनीं तो त्यास बकरें हें नाव देतो याप्रमाणें क्रियापदांची उत्पत्ति होऊन पुढें त्याप्रमाणेंच नामांची उत्पत्ति होते याचे उलट जर भाषा ही ईश्वरनिर्मित असती तर याच्या उलट पद्धतीनें म्हणजे नामापासून ती तयार झाली असती, कारण तीच पद्धति अधिक तर्कशुद्ध आहे तसेंच प्राथमिक अवस्थेंतील मनुष्यास आपल्या मनांतील निरनिराळ्या भावनांचे सूक्ष्म भेद वर्णन करण्यास फार कठिण पडतें व, तें अप्रत्यक्ष रीतीनें व कांहीं उपमा किंवा रूपक देऊन करावें लागतें याप्रमाणें एका बाजूस शब्दांचें दुर्भिक्ष आढळतें तर उलट एकच पदार्थांस अनेक समानार्थक शब्द किंवा नांवें प्रचलित असल्यामुळें कांहीं बाबतींत शब्दांचें वैपुल्य आढळतें इ स १७९४ मध्यें बर्लिन ॲकॅडमीनें पूर्ण परिपक्व भाषेचें ध्येय व त्याप्रमाणें युरोपांतील मुख्य भाषांची तुलना या विषयावर निबंध मागविले होते या पंधरापैकीं डी जेनिश याच्या निबंधास बक्षीस मिळालें या निबंधांत जेनिश यानें मुख्यतः असें दाखविलें कीं, भाषेच्या स्वरूपाबद्दल मनुष्याच्या स्वभावाचें बौद्धिक व नैतिक ज्ञान होतें व पूर्ण भाषेमध्यें विशेषतः पुढील गोष्टी असणें आवश्यक आहे-(१) शब्दवैपुल्य, (२) सामर्थ्य किंवा जोर, (३) स्पष्टता व (४) गौरव जेनिश यानें त्यावेळच्या भाषांची तुलना मोठ्या विद्वत्त्वपूर्ण दृष्टीनें केली आहे या निबंधाचा त्यावेळच्या विद्वानांनीं फारसा परामर्श घेतलेला आढळत नाहीं व लेमन यानें तर हा निबंध लिहिणारा किंवा ता लिहिण्यास सांगणारा यांपैकीं अधिक मूर्ख कोण हें ठरविणेंच अधिक कठिण आहे असा त्यावर शेरा मारला आहे तथापि निरनिराळ्या भाषांच्या तौलनिक अभ्यासाच्या दृष्टीनें हा निबंध महत्त्वाचा आहे

**संस्कृत भाषेशीं परिचय**.--एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं आपणास अभ्यासामध्यें ऐतिहासिक दृष्टि प्रथमच उत्पन्न झालेली दिसते यामुळें भाषाशास्त्राच्या अभ्यासांतहि फरक पडलेला आपणांस दिसून येतो आणि भाषेचा ऐतिहासिक दृष्टीनें अभ्यास सुरू झाल्याबरोबर मानवशास्त्र व मनुष्येतिहास याकडेहि अभ्यासकांचें लक्ष वळल्याचें आपल्या दृष्टीस पडतें याच वेळेस युरोपीय लोकांना संस्कृत भाषेचें प्रथम ज्ञान झाल्यामुळें भाषाशास्त्रीय अभ्यासाला नवीन चालना व दृष्टि प्राप्त झाली कुर्डो नावाच्या एका फ्रेंच जेसुइट मिशनरीनें १७६७ मध्यें फ्रेंच इन्स्टिट्यूटला एक निबंध पाठवून त्यांत अनेक संस्कृत व लॅटिन शब्दांतील साम्य नजरेस आणलें परंतु त्याकडे त्यावेळच्या अभ्यासकांचें फारसें लक्ष गेलें नाहीं इ० स १७९६ मध्यें सर विल्यम जोन्स यानें असें प्रसिद्ध केलें कीं संस्कृत भाषेची रचना अत्यंत आश्चर्यकारक असून ती ग्रीक भाषेपेक्षां अधिक पूर्ण व लॅटिन भाषेपेक्षा अधिक समृद्ध आणि दोहोंपेक्षांहि अधिक सुसंस्कृत अशी असून त्या दोन्ही भाषांशीं तिचें धातु व व्याकरणविशेष यामध्यें अतिशय साम्य दृष्टीस पडतें व तें इतकें स्पष्ट आहे कीं, तें आपातत आलेलें नसून कोणाहि व्युत्पत्तिशास्त्र्यास या तीनहि भाषा मूळ एकाच परंतु सध्यां अस्तित्वांत नसलेल्या भाषेपासून निघाल्या असाव्या असें वाटल्यावाचून राहणार नाहीं तसेंच गाथिक व केल्टिक भाषा यांचाहि संबंध संस्कृत भाषेशींच निकटचा असून जुनी फारसी भाषाहि त्याच वर्गात मोडते तथापि सर विल्यम जोन्स यानें या भाषांची तुलना करून पुढें अधिक निष्कर्ष काढण्याचें काम फारसें केलें नाहीं व ही गोष्ट पुढील तरुण अभ्यासकांच्या वांट्यास आली

**तौलनिक व्याकरण**.--यानंतर आपणांस फ्रेडरिक श्लेगेल यानें प्रसिद्ध केलेल्या पुस्तकामध्यें संस्कृत व जर्मन, ग्रीक आणि लॅटिन या भाषांतील शब्दांची तुलना केलेली आढळते यानें संस्कृत भाषेचा पॅरिसमध्यें अभ्यास केला होता व संस्कृत भाषेच्या व भारतीय धर्माच्या अभ्यासापासून युरोपीय विचारपरंपरेवर विद्यापुनरुज्जीवनापेक्षांहि अधिक परिणाम होईल असें त्याचें म्हणणें होतें यानें वरील भाषांमध्यें केवळ शाब्दिक साम्य नसून व्याकरणरचनेमध्येंहि या भाषांत बरेंच साम्य आहे ही गोष्ट निदर्शनास आणली व तौलनिक व्याकरणाचा पाया घातला यानें जगांतील भाषांचे मुख्य दोन वर्ग केले-एक संस्कृत व तत्संबद्ध भाषा आणि दुसरा इतर सर्व भाषा भाषेच्या उत्पत्तीसंबंधानें श्लेगल याचें असें मत होतें कीं, निरनिराळ्या भाषांच्या

रचनेमध्यें जो फरक आढळून येतो तेथें त्या भाषांची उत्पत्ति भिन्न असली पाहिजे. उदा. मांचू भाषेसारख्या भाषांमध्यें अनुकरणात्मक शब्द इतके आढळतात कीं, ती भाषा बनवितांना निसर्गांतील निरनिराळ्या ध्वनींचें अनुकरण यास महत्त्व दिलें गेलें असावें. उलट संस्कृतसारख्या प्रत्यययुक्त भाषांमध्यें ध्वनींच्या अनुकरणास तितकें महत्त्व नसावें. यानें केलेल्या द्विवर्गीय वर्गीकरणानंतरच पुढच्या त्रिवर्गात्मक वर्गीकरणाचें मूळ आपणांस सांपडतें व याचा भाऊ ए. डब्ल्यु. श्लेगेल यानें या त्रिवर्गात्मक वर्गीकरणास स्पष्ट स्वरूप दिलें, तें असें–(१) एकाक्षरी शब्दांच्या भाषा, (२) प्रत्ययी भाषा, व (३) विकरणात्मक भाषा. यांतील विकरणात्मक भाषा तो सर्वांत श्रेष्ठ समजतो.

यानंतर रासमस रास्क यानें आइस्लंडिक भाषेचा अभ्यास करून व प्राचीन नॉर्स भाषांच्या उत्पत्तीवर निबंध लिहून भाषाशास्त्रीय अभ्यासास चालना दिली. या निबंधांत त्यानें गॉथॉनिक, स्लॅव्होनिक, लिथुॲनिअन, लॅटिन व ग्रीक या भाषांतील अनेक शब्दांच्या साम्यावरून या भाषांचें एक तुलनात्मक व्याकरण दिलें आहे. यास आशियांतील भाषांचें विशेषसें ज्ञान नसल्यामुळें यानें फक्त फारसी व भारतीय भाषा यांचा संबंध ग्रीक भाषेमार्फत आइस्लंडिक भाषांशीं आला असावा एवढेंच ध्वनित केलें आहे. यानें गॉथॉनिक भाषांची पूर्वज ग्रीक भाषा असावी असें म्हटलें आहे. परंतु त्या बाबतींत किंचित अनिश्चितता दाखवून या सर्वच भाषा एखाद्या अज्ञात व सध्यां मृतावस्थेंत असलेल्या भाषेपासून निघाल्या असाव्या असें सुचित केलें आहे. यानें आपल्या एका पत्रांत या भाषावंशाचें पुढीलप्रमाणें वर्गीकरण दिलें आहे: भारतीय (दख्खनी, हिंदुस्थानी); इराणी (फारसी, आर्मीनियन, ऑसेटिक); थ्रेशिअन (ग्रीक, लॅटिन), सरमॅशिअन (लेटिक, स्लॅव्होनिक); गॉथिक (जर्मानिक, स्कॅंडिनेव्हियन); केल्टिक (ब्रिटॅनिक, गेलिक). याच वेळीं त्यानें फिनोउग्रिअन भाषावंशाचेंहि वर्गीकरण दिलें आहे व तें आजहि कांहीं अर्वाचीन वर्गीकरणापेक्षां अधिक चांगलें आहे असें युइल्हेम थॉमसेन आणि एमिल सेटाला यांसारख्या भाषाशास्त्रज्ञांनीं म्हटलें आहे. यानें झेंद भाषेचें नक्की स्थान ओळखून भारतीय व फारसी भाषांचें निरीक्षण करून त्यावर एक निबंध लिहिला होता; तसेंच द्राविड भाषा या संस्कृत भाषेपासून सर्वतः भिन्न आहेत ही गोष्टहि यानेंच प्रथम निदर्शनास आणली. यानें स्वीडन, फिनलंड, रशिया, कॉकेशस, इराण व हिंदुस्थान यांमधून प्रवास करून अनेक भाषांचें ज्ञान प्रत्यक्ष मिळविलें होतें व अनेक भाषांचीं व्याकरणें लिहिलीं होतीं. तीं पद्धतशीर व सुंदर असून त्या त्या भाषांचें स्वरूप समजण्यास फार उपयुक्त आहेत.

ग्रिमबंधू—जेकब ग्रिम यानें लोककथा व लोकगीतें यांचा संग्रह करून लोककथाशास्त्राचा पाया घातला. प्रथम भाषाशास्त्राकडे याचें विशेष लक्ष नव्हतें. तथापि श्लेगेल याच्या टीकांमुळें व रास्क याचें उदाहरण समोर असल्यामुळें यानें भाषाशास्त्राचा–विशेषतः प्राचीन जर्मन भाषा व तत्संबद्ध भाषांचा–पद्धतशीर अभ्यास सुरू केला. त्याचें मत असें होतें कीं, प्रत्येक लहानसहान पोटभाषांना व बोलींना सुद्धां स्वतंत्र स्थान देऊन त्यांचा पृथक्‌पणें अभ्यास करणें इष्ट असून सारखेंच महत्त्वाचें आहे. यामुळें उपभाषांसहि आजपर्यंत जें महत्त्व मिळत नव्हतें तें यापुढें मिळूं लागलें. श्लेगेल यानें असें म्हटलें आहे कीं, ग्रिम बंधूंनीं जुनें राष्ट्रीय वाङ्मय व लौकिक परंपरागत कथावाङ्मय यांसहि व्युत्पत्तिशास्त्रदृष्ट्या ग्रीक, लॅटिन किंवा बायबल यांच्या भाषांइतकेंच महत्त्व दिलें व त्यामुळें त्यांनीं व्युत्पत्तिशास्त्राचें क्षेत्र बरेंच विस्तृत केलें. आजपर्यंत व्युत्पत्तिशास्त्रज्ञ अलिखित लोककथा, गीतें, दंतकथा यांना जो कमीपणा देत असत तो काढून टाकून त्यानें व्युत्पत्तिशास्त्राच्या अभ्यासास राष्ट्रीय व लोकप्रिय असें स्वरूप देऊन पृथ्वीवरील सर्व राष्ट्रें व मनुष्यजातीचा मानसिक आयुष्यक्रम यांचा तौलनिक व शास्त्रीयदृष्ट्या अभ्यास करणें किती इष्ट आहे व त्या मानानें लिखित वाङ्मय हा या क्षेत्राचा किती अल्प अंश आहे हें दाखवून दिलें. यानें ऐतिहासिक व तौलनिक व्यापक स्वरूपाचें जर्मन व्याकरण लिहून जर्मन भाषेची वाढ कसकशी होत गेली याचें स्पष्टीकरण केलें. यानें आपल्या व्याकरणांत कोणतेंहि निर्बंध घालण्याच्या ऐवजीं भाषेचें स्वरूप स्वाभाविकपणें कसें बदलत गेलें आहे हें दाखविलें. त्यानें असें प्रतिपादिलें आहे कीं, 'व्याकरणामध्यें केवळ तर्कपद्धति अनुसरणें याच्या मी विरुद्ध आहें कारण त्यामुळें जरी निरनिराळ्या संज्ञांच्या व्याख्या निश्चित करतां आल्या तरी त्यामुळें निरीक्षणाचें क्षेत्र मर्यादित होतें आणि ऐतिहासिक स्वरूपनिरीक्षण हाच वास्तविक भाषाशास्त्राचा आत्मा होय माझी दृष्टि आपल्या भाषेचें स्वरूप व स्थल कालमानाप्रमाणें कसें बदलत गेलें आहे हें पाहण्याची असल्यामुळें निरनिराळ्या पोटभाषांकडे व आपल्या भाषेशीं संबद्ध असलेल्या परकीय भाषांकडेहि मला क्रमाक्रमानें दृष्टि देणें जरूर पडतें.' याप्रमाणें आपणांस भाषाशास्त्राच्या ऐतिहासिक अभ्यासाचें स्पष्ट स्वरूप या ठिकाणीं दृष्टीस पडतें व याच दृष्टीस भाषाशास्त्रांत यापुढें विशेष महत्त्व प्राप्त झालें. ग्रिमच्या अभ्यासावर रास्क याच्या लेखनाचाहि विशेष परिणाम झालेला आढळतो. ग्रिमचें सूत्र म्हणून पुढें प्रसिद्धीस आलेला भाषाविषयक सिद्धांत यानेंच प्रथम पुढें मांडला. त्याच्या व्याकरणाच्या चौथ्या भागामध्यें त्याची विद्वत्ता, सूक्ष्म निरीक्षणशक्ति आणि ऐतिहासिकपद्धति आपणांस स्पष्टपणें दिसून येते.

**फ्रांझ बॉप**—अर्वाचीन भाषाशास्त्राचा पाया घालणाऱ्यांपैकीं तिसरा महत्त्वाचा मनुष्य फ्रँन्झ बॉप हा होय. यानें संस्कृत, ग्रीक, लॅटिन व ट्युटॉनिक भाषांचा तौलनिक अभ्यास करून ग्रंथरचना केली. याची दृष्टि व्याकरणांतील निरनिराळ्या रूपांचा उगम शोधण्याकडे होती. यानें असें म्हटलें आहे कीं ग्रीक, लॅटिन किंवा युरोपीय भाषा, आज ज्या स्वरूपांत आपणांस संस्कृत भाषा ग्रंथांतून लिहिलेली आढळते त्या स्वरूपांतील संस्कृत भाषेपासून निघालेल्या नसून या सर्व एका मूळ भाषेच्या विकृती असाव्या. मात्र त्या मूळ भाषेचें स्वरूप संस्कृत भाषेमध्यें अधिक स्पष्टपणें कायम राहिलें असावें, व ज्याप्रमाणें आपणांस ग्रीक व लॅटिन भाषेंतील शब्दांचीं मूळ रूपें शोधून काढण्यास संस्कृत भाषेचा उपयोग होतो त्याप्रमाणें संस्कृत व्याकरण स्पष्ट करण्यासहि या भाषांचा उपयोग होतो. यानें संस्कृत, ग्रीक वगैरे भाषांतील शब्दांचीं सारखीं दिसणारीं रूपें एकत्र करून त्यांपैकीं सर्वांत जुनीं रूपें कोणतीं असावीं हें पाहून त्यावरून या सर्व रूपांचें मूळ शोधून काढण्याचा प्रयत्न केला. परंतु या प्रयत्नांत त्यानें प्रचलित व्याकरणापेक्षां तात्त्विक व्याकरणावरच अधिक भर दिला होता. गॉटफ्रेड हर्मन यानें तार्किक पद्धतीस अनुसरून 'प्रत्येक वाक्याचे तीन मूलभाग असतात असें म्हटलें ते असे-१ उद्देश्य, २ विधेय व ३ संयोजक ज्या अर्थी क्रियापद हेंच उद्देश्य व विधेय यांस जोडण्याचें कार्य करतें, त्याअर्थी वास्तविक फक्त 'असणें' हें एकच क्रियापद असूं शकतें. बॉपचा अध्यापक सिल्व्हेस्त्र रॅसी याचेंहि असेंच म्हणणें होतें व बॉपनेंहि त्याचाच पुनरुच्चार केला. तो म्हणतो क्रियापद याचा वास्तविक अर्थ कर्त्यास तत्संबद्ध विधानाशीं जोडण्याचें कार्य करणारा शब्द हा होय. आणि त्यामुळें एकाच क्रियापदाचें अस्तित्व शक्य आहे आणि तें म्हणजे 'असणें' हें होय. ग्रीक, लॅटिन वगैरे सारखी रचना असलेल्या भाषा एकाच क्रियापदानें कोणतेंहि तर्कशुद्ध विधान करूं शकतात व त्यामुळें संस्कृत भाषेंतील 'अस्' आणि 'भू' हे अस्तित्ववाचक धातू प्रत्येक क्रियापदाच्या रूपाच्या मुळाशीं आहेत असें त्याचें म्हणणें आहे. तसेंच आज जे आपणांस प्रत्यय म्हणून दिसतात ते पूर्वी स्वतंत्र शब्द होते ही गोष्टहि त्यानें पुढें मांडली आहे. अर्थात हॉर्ने टूक यानें ही गोष्ट पूर्वीच दिग्दर्शित केली होती. तसेंच त्यानें संस्कृत व तत्संबद्ध भाषांतील धातु आणि सेमिटिक धातु यांतील फरक दाखवून दिला आहे. क्रियापदांच्या शेवटीं असलेले पुरुषवाचक प्रत्यय हे पूर्वींचीं सर्वनामें असावीं ही गोष्ट शिडिअस आणि रास्क यांनींच प्रथम नजरेस आणली होती बॉपनेंहि तेंच मत ग्राह्य धरलें आहे. बॉपनें निरनिराळ्या भाषांतील नात्यांचा अभ्यास रास्कच्या इतका सूक्ष्मपणानें केलेला आढळत नाहीं, त्यामुळें त्यानें फारसी भाषा ही संस्कृत भाषेपेक्षां जर्मन भाषेस अधिक जवळची आहे असें विधान केलें आहे व त्यानें मलायो–पॉलिनेशियन भाषा व इंडो–युरोपीय भाषा यांचा संबंध जोडण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि एकंदरींत त्यानें व्युत्पत्तिशास्त्र व तौलनिक व्याकरण यांच्या अभ्यासांत फारच मोठी भर टाकली व आपल्या पद्धतींतहि पुढें पुष्कळ सुधारणा केल्या ही गोष्ट स्पष्ट आहे. त्यानें नवीन नवीन समस्वरूपी भाषा विचारांत घेऊन आपलें निरीक्षणक्षेत्र पुष्कळच विस्तृत केलें व केल्टिक भाषांचें स्थान निश्चित केलें व एकंदरींत तौलनिक व्याकरणाच्या अभ्यासाची पुष्कळांस गोडी लावली. यानें भाषांचें तीन वर्गांमध्यें मुख्यत वर्गीकरण केलें आहे–(१) अधातुभाषा. उदा. चिनी वगैरे. (२) एकाक्षरधातुभाषा. उदा. इंडो–युरोपीय वगैरे. (३) द्व्यक्षरधातुभाषा. उदा. सेमिटिक बॉपचें असें मत होतें कीं, भाषांच्या स्वरूपाची वाढ पूर्णपणें होऊन गेली असून अर्वाचीन काळीं त्यांची अवनती होत चालली आहे. जरी रचनेच्या दृष्टीनें त्यांची प्रगति होत असली तरी व्याकरणदृष्ट्या त्यांची अवनतीच होत आहे व पूर्वी व्याकरणदृष्ट्या भाषेची रचना पूर्ण स्वरूपाची असून वाक्यांतील प्रत्येक शब्दाचा इतर शब्दांशीं संबंध निश्चित स्वरूपाचा असून निरनिराळ्या शब्दांच्या रूपांचा मूळच्या रूपांशीं संबंध स्पष्ट असे. हंबोल्ट व श्लेगेल यांनीं हे असेच विचार प्रदर्शित केले आहेत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे बॉपनें शब्दांच्या रूपविकृतींचा अभ्यास सुरू केला व तौलनिक व्याकरणाची स्थापना व वाढ केली आणि हें त्यानें संस्कृत भाषेच्या अभ्यासाच्या साहाय्यानें केलें. रास्क यानें हीच गोष्ट संस्कृत भाषेच्या अभ्यासाशिवाय साध्य केली होती. पण तितक्या स्पष्ट स्वरूपांत ती मांडली गेली नव्हती तें काम बॉपनें केलें.

**भाषेची अस्थिरता**—यानंतरचा भाषाशास्त्रीय अभ्यासक वुइल्हेल्म हंम्बोल्ट हा होय. यानें जावांतील कवि भाषेवर ग्रंथ लिहिला आहे. याचें म्हणणें असें कीं, भाषेची पूर्ण वाढ अशी कधींच होत नसून तिच्याकडे एखादी पूर्णपणें तयार झालेली वस्तु अशा दृष्टीनें न पाहतां एक सतत चालू राहणारी क्रिया या दृष्टीनें पाहिलें पाहिजे. भाषेमध्यें कोणतीहि गोष्ट स्थिर नसून प्रत्येक क्षणीं तिचें स्वरूप बदलत असतें व लेखनांतहि तिला स्थिरता कधींहि प्राप्त होत नाहीं व ती जिवंत राहण्याकरितां ती बोलली व समजली गेली पाहिजे. यानें भाषाकडे पूर्ण व कमी पूर्ण याच दृष्टीनें पाहण्याची दृष्टि ठेविली. याच्या मतें एखाद्या रानटी टोळीच्याहि भाषेस कमी महत्त्व देऊन तिच्याकडे दुर्लक्ष करूं नये कारण असंस्कृत भाषेवरून आपणास भाषा तयार करावयाच्या मूळ प्रवृत्तीचे चित्र किंवा स्वरूप पहावयास सांपडेल चिनी भाषा ही त्यांतील कल्पनांस प्राधान्य दिल्यामुळें व इतर आनुषंगिक

गोष्टींचा त्याग केल्यामुळें महत्त्वाची आहे, तर मलयु या भाषेचें साधेपणा व सरळ रचनेमुळें महत्त्व आहे. पण सेमिटिक भाषांना, त्यांतील निरनिराळ्या स्वरभेदांवरून अर्थामध्यें जो फरक दाखविण्यांत येतो त्यांतील कौशल्यामुळें महत्त्व आहे. बास्क भाषेला त्यांतील संक्षिप्तता व जोरदारपणा यामुळें महत्त्व आहे, तर दिलावेअर वगैरे अमेरिकन इंडियन लोकांच्या भाषेंत ज्या गोष्टीकरितां आपण अनेक शब्द वापरतों त्या गोष्टी एकाच शब्दानें व्यक्त करण्याचें सामर्थ्य आहे. याप्रमाणें हंबोल्ट यानें निरनिराळ्या भाषांचें महत्त्व दिग्दर्शित केलें आहे व ल्हानमोठ्या पोटभाषांचेंहि—त्या जणूं कांहीं इतरांपासून स्वतंत्र असून पूर्ण घटक आहेत या दृष्टीनें व निरनिराळ्या राष्ट्रांच्या मनोव्यापारांचें दिग्दर्शन करण्याचें साधन म्हणून त्यांकडे पाहिलें पाहिजे व राष्ट्रस्वभावदर्शक म्हणून त्यांस मानलें पाहिजे असें त्यानें प्रतिपादिलें आहे. यानें भाषेच्या वाढीचें आणि स्वरूपाचें वर्णन असें केलें आहे कीं, प्रथम भाषेमध्यें फक्त निरनिराळ्या वस्तूंचें दिग्दर्शन केलें जातें व त्यांतील संबंध समजावून घेण्याचें काम ऐकणाराचें असतें. कालांतरानें वाक्यांतील शब्दांचा क्रम निश्चित ठरून कांहीं शब्दांचें स्वतंत्रतेनें अस्तित्व नाहींसें होऊन त्यांच्याकडे या शब्दांच्या क्रमाप्रमाणें संबंधदिग्दर्शनाचें काम येतें व यांचेच पुढें प्रत्यय बनतात. तथापि प्राथमिक स्वरूपांत हे संबंधदर्शक दुवे स्पष्टपणें दृष्टीस पडतात. यानंतरच्या स्थितीमध्यें निरनिराळ्या शब्दांतील संबंध व्यक्त करण्याचें काम त्या शब्दांतील विकारांवरून व प्रत्ययांवरून होतें आणि शब्दांचे निरनिराळे वर्ग पडून प्रत्येक शब्द विशिष्ट वर्गामध्यें अंतर्भूत होऊन संबंधदर्शक शब्दांचा स्वतंत्र अर्थ नाहींसा होतो. यानें भाषांचें वर्गीकरण चार प्रकारांत केलें आहे—१ चिनीसारख्या व्याकरणविषयक रूपभेद नसलेल्या भाषा; (२) रूपविकारी भाषा; ३ चिकटणा अथवा संश्लिष्ट भाषा; ४ समावेशक भाषा. या शेवटच्या भाषांत तो मेक्सिकन वगैरे ज्या अमेरिकन भाषांत कर्माचा-क्रियापदाच्या रूपांतच समावेश होतो त्या भाषांचा अंतर्भाव करतो. तथापि या निरनिराळ्या प्रकारांत तितका वेगळेपणा नसून आपण संस्कृत व चिनी या दोन भाषांस विरुद्ध टोकांस बसविलें तर बाकीच्या सर्व भाषा यांच्या दरम्यान कोठेंतरी बसूं शकतात असें त्यानें म्हटलें आहे.

**प्रगति कीं परागति**—ग्रिमनें भाषा ही परमेश्वरानें उत्पन्न केलेली असणें शक्य नाहीं असें म्हटलें आहे. कारण भाषेंतील अनेक अपूर्णता व वरचेवर तिच्या स्वरूपांत होणारा फरक या गोष्टीच तिच्या दैवी संभवाच्या विरुद्ध आहेत. भाषेची वाढ हळू हळू होत जात असून ती मनुष्यानेंच घडवून आणलेली आहे आणि या बाबतींत मनुष्य आणि इतर प्राण्यांचे आवाज व वाणी यांत आपणांस स्पष्ट फरक दिसून येतो. परमेश्वरानें प्रथम स्त्री व पुरुष यांस निर्माण केलें व तेंहि एकच दंपत्य निर्माण न करतां अनेक दंपत्यें निर्माण केलीं असावीं. कारण एकाच दंपत्यास कदाचित सर्व पुत्रच किंवा केवळ कन्याच होण्याचा संभव होता. या दंपत्यांच्या मुलांपासून पुढील मानवसृष्टि निर्माण झाली असली पाहिजे हीं प्रथम उत्पन्न केलेलीं मनुष्यें भाषा प्रचारांत येण्यापूर्वी एकमेकांस आपले विचार कसे व्यक्त करीत असावीं यासंबंधीं ग्रिमनें कांहीं सांगितलें नाहीं. परंतु शब्द व त्यांचे अर्थ यांतील संबंध हा प्रथम केवळ स्वैर असला पाहिजे. भाषेच्या प्राथमिक अवस्थेचें वर्णन त्यानें असें केलें आहे कीं प्रथम केवळ अ, इ, उ हे तीनच स्वर अस्तित्वांत असून कांहीं व्यंजनांचे पुंज असावे. पहिले सर्व शब्द एकाक्षरी असून अमूर्त कल्पनावाचक शब्द प्रथम अस्तित्वांत नव्हते. शब्दांच्या स्वरूपांत पुल्लिंग व स्त्रीलिंगदर्शक जो भेद आढळतो तो समाजांतील स्त्रियांच्या प्रभावामुळें असावा व सर्व नामें हीं धातूंपासून उत्पन्न झालीं असावीं भाषेच्या वाढीमध्यें तो तीन अवस्थांची कल्पना करतो. प्रथमावस्थेंत फक्त धातु आणि शब्द उत्पन्न झाले असावे. दुसऱ्या अवस्थेंत या शब्दांच्या स्वरूपांत अर्थानुसार विकार होत गेले असावे व तिसऱ्या अवस्थेमध्यें विचारांची वाढ होऊन शब्दांतील विकारांस पुन्हा त्याज्य ठरविलें असावें; परंतु ही अवस्था अजून पूर्णत्वास पोंचली नाहीं. भाषेचें सौंदर्य तिच्या प्राथमिक अवस्थेंत नसून आपणांस दुसऱ्या अवस्थेंत आढळतें व तिसऱ्या अवस्थेंत आपणांस तिचें फळ प्राप्त होणार आहे प्राथमिक अवस्थेमध्यें भाषा कर्णमधुर परंतु विस्कळित स्वरूपाची असावी. मध्यावस्थेंत ती काव्यमय व जोरदार असून सांप्रत अवस्थेंत तिचें जरी सौंदर्य कमी झालें असलें तरी तिच्यामध्यें सुसंगतपणा व परिणामकारकता अधिक उत्पन्न झाली आहे. ग्रिमनें भाषांची दिवसानुदिवस अवनतीच होत चालली आहे असें प्रतिपादिलें आहे. सभ्यांच्या भाषांच्या जुन्या स्वरूपांत आपणांस संपन्नता व पूर्णता अधिक दिसत असून त्यांचें भौतिक व आध्यात्मिक स्वरूप त्यावेळीं पूर्णपणें एकमेकांत मिसळलेलें होतें व ती सुसंगति आतां हळूहळू नष्ट झाली आहे व शब्दांतील स्वरूपविकारांचें स्थान आतां कांहीं अंशीं साहाय्यक शब्दांनीं घेतलें आहे एकंदरींत भाषेच्या इतिहासावरून पूर्णतेपासून तिची परागतीच होत आहे हीच गोष्ट आपणांस इतरहि भाषाशास्त्रज्ञांनीं व्यक्त केलेली आढळतें. परंतु ग्रिमनें एका ठिकाणीं असेंहि म्हटलें आहे कीं, 'जरी मानवी भाषेची आपणांस बाह्यतः कांहीं बाबतींत परागति होत असलेली दिसते तथापि सर्व बाजूंनीं विचार केला असता तिची प्रगतीच होत असून तिच्यांतील अंतर्गत शक्ति सारखी वाढत आहे.' या बाबतींत त्यानें इंग्रजी भाषेचें उदाहरण दिलें आहे या भाषेनें शब्दांतील रूपविकारांचा

त्याग करून सर्व ध्वनिशास्त्रांचे नियम झुगारून दिले आहेत. तथापि इतर कोणत्याहि भाषेपेक्षा या भाषेमध्यें सामर्थ्य व जोर अधिक वाढलेला आहे. तिची रचना युरोपमधील दोन मोठमोठ्या भाषांच्या संयोगापासून झाली असून अर्वाचीन काळांतील महान् कवींचे विचार व्यक्त करण्यास तिला योग्य असें स्वरूप प्राप्त झालें आहे व जागतिक भाषेचें स्थान तिला प्राप्त होणें असून इतर लोकांप्रमाणेंच जगांतील अनेक भागांवर तिचें वर्चस्व चालू राहील असा अदाज दिसत आहे. परंतु स्लेगर या जर्मन पंडितानें अगदीं त्याच्या उलट अभिप्राय व्यक्त केला आहे. त्यानें इतिहास व वाङ्मय या दोन्हीहि दृष्टींनीं महत्त्वाच्या अशा राष्ट्राची भाषा ही किती त्वरित अवनति पावूं शकते याचें उदाहरण म्हणून इंग्रजी भाषेकडे बोट दाखविलें आहे.

**भाषेंच्या वांशिक संबंधें**—बॉप व ग्रिम यांनीं भाषाशास्त्रीय अभ्यासावर व संशोधनावर बराच परिणाम केला आहे. त्यांनीं घालून दिलेल्या दिशेनें पुढील अभ्यासकांनीं संशोधन चालू ठेवून या शास्त्राची पुष्कळ वाढ केली. भाषाशास्त्रीय प्रश्नांवर त्यांनीं बराच प्रकाश पाडला व व्युत्पत्तिशास्त्र जें पूर्वी अनिर्बंध रीतीनें विकास पावत होतें त्याची स्थिर पायावर उभारणी होऊन त्यास नियमबद्धता प्राप्त झाली याचें मुख्यत कारण युरोपांतील बऱ्याचशा भाषा व आशियांतील कांहीं महत्त्वाच्या भाषा या मूळ एकाच वंशांतील आहेत ही गोष्ट स्पष्ट होऊन पूर्वीची लॅटिन व ग्रीक भाषांतील शब्दांचा हिब्र्यू भाषेंतील शब्दांशीं संबंध जोडण्याची प्रवृत्ति मागें पडली. या भाषावर्गास रास्क यानें प्रथम ' युरोपीय ' व नंतर ' सारमॅटिक ' आणि शाउरीत ' जॅफेटिक ' (सेमिटिक आणि हॅमिटिक यांच्याशीं प्रतियोगी म्हणून) असें नांव दिलें आहे. बॉप यानें ' इंडोयुरोपीय ' या नांवास प्राधान्य दिलें आहे व हेंच नांव फ्रान्स, इंग्लंड व स्कँडिनेव्हिया या देशांत मान्यता पावलें आहे. तथापि जर्मनीमध्यें हंबोल्ट यानें ' सांस्कृतिक ' व नंतर ' इंडो-जर्मानिक ' हें नांव पसंत केलें आहे. या भाषावर्गांतील पूर्व व पश्चिम या दोन विरुद्ध दिशांच्या टोंकास असलेल्या भाषांवरून ' इंडो-केल्टिक ' हें नांव कांहींनीं सुचविलें आहे. तथापि हीं संयुक्त नांवें क्लिष्ट वाटतात. त्यापेक्षां ' आर्यन् ' भाषा हें नांव अधिक सुसुटित आहे व हेंच नांव सर्वांत विशेषत प्राच्य भाषांमध्यें जुनें आहे. या काळच्या भाषाशास्त्रीय अभ्यासामध्यें संस्कृत भाषेस विशेष महत्त्व दिलें जात असे. मॅक्समुल्लरनें तुलनात्मक भाषाशास्त्राचा संस्कृत हाच स्थिर असा पाया असून हीच भाषा आपणांस मार्गदर्शक आहे व संस्कृत भाषेचें ज्ञान नसलेला तौलनिक भाषाशास्त्रज्ञ हा गणिताचें ज्ञान नसलेल्या ज्योतिषशास्त्रज्ञाप्रमाणें होय असें म्हटलें आहे. परंतु पुढेंपुढें संस्कृत भाषेचें महत्त्व त्या मानानें कमी झालें व अर्वाचीन भाषाशास्त्रज्ञाची प्रवृत्ति एल्सिच्या शब्दांत सांगावयाची म्हणजे अशी आहे कीं, ' भाषाशास्त्राचा अभ्यास संस्कृत भाषेच्या अभ्यासापासून सुरू करावयाचा म्हणजे उलट टोंकास सुरवात करण्यासारखें आहे. अर्थात संस्कृत भाषेचें ज्ञान युरोपांत झालें नसतें तर आपलें भाषाशास्त्राचें ज्ञान अगदींच बाल्यावस्थेंत राहिलें असतें व ज्यांनीं या भाषेचा संबंध युरोपीय भाषांशीं आहे हें दाखवून दिलें त्यांचे भाषाशास्त्रावर फार उपकार झाले. तथापि संस्कृत भाषेच्या अभ्यासापासून भाषाशास्त्राचा अभ्यास सुरू करणें म्हणजे प्राणिशास्त्राचा अभ्यास प्रस्तरावशेषशास्त्रापासून सुरू करण्यासारखें आहे किंवा जिवंत मनुष्याचा अभ्यास त्याच्या अस्थीपासून सुरू करण्यासारखें आहे.' त्याप्रमाणेंच या काळांत निरनिराळ्या भाषांतील साम्य शोधून काढण्याकडे अधिक प्रवृत्ति असल्यामुळें अभ्यासास एकदेशीपणा प्राप्त झाला होता व प्रत्येक भाषेच्या वैशिष्ट्याकडे दुर्लक्ष होत होतें. ही गोष्ट विशेषत पॉट यानें नजरेस आणली व त्यानें तौलनिक भाषाशास्त्राबरोबर विशिष्ट भाषांचाहि अभ्यास करणें जरूर आहे असें प्रतिपादिलें व सध्या याच गोष्टीकडे विशेष लक्ष्य दिलें जातें. तसेंच या काळीं भाषाशास्त्रज्ञाचें लक्ष मृत भाषांकडेच विशेष असे. उदा. ग्रिमच्या व्याकरणांत गॉथिक, प्राचीन उच्च जर्मन, प्राचीन नॉर्स इ. भाषांचें विवेचन विस्तृततेनें केलें असून त्यांच्या अर्वाचीन वाढीकडे त्या मानानें कमी लक्ष्य दिलें आहे. तसेंच बॉपच्या तौलनिक व्याकरणांत अभिजात ग्रीक व लॅटिन भाषांचें विवेचन काळजीपूर्वक केलें असून अर्वाचीन ग्रीक किंवा रोमॅंटिक भाषांचा निर्देशहि केला नाहीं. भाषांच्या अर्वाचीन स्वरूपाचा अभ्यास हा तौलनिक भाषाशास्त्राच्या कक्षेबाहेरचा समजला जात असून त्याचा अभ्यास केवळ या विशिष्ट भाषांच्या अभ्यासकांनीं करावा अशी त्या वेळची समजूत दिसते. अर्थात् भाषांच्या जुन्या स्वरूपाचें ज्ञान केवळ लिखित वाङ्मयापासून होत असल्यामुळें या भाषाशास्त्रज्ञांचें लक्ष ध्वनीपेक्षा अक्षराकडे अधिक असे, परंतु यामुळें त्यांच्या अभ्यासास वैगुण्य प्राप्त होत असे. तसेंच बॉप, ग्रिम, पॉट किंवा बेन्फे यांच्या ग्रथांत आपणास त्या भाषांचा केवळ वाङ्मयिक अभ्यास केलेला असून प्रत्यक्ष अभ्यास केलेला दिसत नाहीं. परंतु रास्क यानें या भाषांचा अभ्यास त्यांच्या जिवंत व प्रत्यक्ष स्वरूपांत केला असल्यामुळें त्याच्या अभ्यासामध्यें आपणांस अधिक गाढपणा दिसून येतो. तसेंच जेव्हा पोटभाषांचा किंवा बोलींचा अभ्यास करतांना त्यांतील आर्षस्वरूपाच्या वैशिष्ट्याकडे अधिक लक्ष दिलें जात असे व प्रचलित बोलल्या जाणाऱ्या भाषेंतील जुनीं रूपें, जुने ध्वनी, निवडून काढून त्यांकडेच अधिक उत्साहपूर्वक लक्ष देण्यात येत असे व सामान्यत अशी समजूत असे कीं लौकिकभाषा या सुशिक्षित लोकांच्या

भाषेपेक्षां अधिक प्राचीन स्वरूपाच्या असतात. वस्तुस्थिति याच्या अगदीं विरुद्ध आहे व लोकभाषांमध्यें जरी कांहीं प्राचीन काळचे अवशेष असले तरी त्यांची वाढ अभिजात भाषेपेक्षां अधिक झालेली असते. कारण अभिजात भाषेस परंपरा व वाङ्मय यांमुळें अधिक स्थैर्य आलेलें असतें.

**बोलींच्या अभ्यासाचें महत्त्व**—ग्रिमनें निरनिराळ्या बोलींच्या अभ्यासास जें महत्त्व दिलें होतें तें भाषांच्या प्राचीन स्वरूपाचें ज्ञान व्हावें या दृष्टीनेंच होतें व त्यांतील ध्वनींच्या फरकांकडे तिकडे लक्ष देऊं नये असें त्याचें म्हणणें होतें. कारण भाषेच्या इतिहासावर त्याचा विशेष परिणाम होत नसे. या दृष्टीनें के. एम्. रॅप यानें ग्रीक, लॅटिन, गॉथिक या भाषांतील शब्दोच्चारांचा अभ्यास करून त्यावरून पुढें या उच्चारपद्धतींत मध्ययुगांत बायझन्टाइन ग्रीक, प्राचीन प्रॉव्हेन्सल, प्राचीन फ्रेंच, प्राचीन नॉर्स, प्राचीन उच्च जर्मन वगैरे भाषांत कसा फरक होत गेला व अर्वाचीन ग्रीक, इटॅलीयन, स्पॅनिश भाषांतील शब्दोच्चार कसे बनत गेले व आजच्या नीच व उच्च जर्मन भाषेत व निरनिराळ्या बोलींत ते कोणत्या स्वरूपांत आढळतात याचें दिग्दर्शन करणारा एक ग्रंथ लिहिला. या ग्रंथाकरिता त्यानें निरनिराळ्या भाषांचें अध्ययन व प्रचलित भाषांचें सूक्ष्म निरीक्षणहि पुष्कळ केलें होतें. त्यानें असें म्हटलें आहे कीं 'भाषेच्या ऐतिहासिक स्वरूपाच्या अभ्यासावरून आपणांस तिच्या एका अंगाचें ज्ञान होतें तर तिच्या निरनिराळ्या शाखांच्या प्रचलित व केव्हांहि लेखनिविष्ट न झालेल्या बोलींतील स्वरूपावरून तितक्याच महत्त्वाच्या दुसऱ्या अंगाचें ज्ञान होतें, व त्यांचेंहि संशोधन अत्यंत आवश्यक आहे.' परंतु त्यावेळीं लेखनिविष्ट भाषांच्याच अभ्यासाकडे जास्त प्रवृत्ति असल्यामुळें त्याच्या लेखनांतील अनेक दोष दाखवून जर्मन भाषाशास्त्रज्ञांनीं त्यांतील महत्त्वाच्या व सत्यांशाकडे कानाडोळा केला आहे. तथापि त्यानें उच्चारविषयक व ध्वनिविषयक काढलेलीं अनुमानें महत्त्वाचीं असून उच्चार व लेखन यांमधील संबंधाचें ग्रहण करण्यास उपयुक्त आहेत, व याच दृष्टीनें त्यानें प्रचलित व मृत दोनहि भाषांतील साम्यस्थलें दिग्दर्शित करतांना उच्चारानुसार लेखनपद्धति अवलंबिली आहे व याच पद्धतीनें वास्तविक कोणत्याहि भाषेच्या उच्चार किंवा ध्वनिपद्धतीचें स्पष्ट ज्ञान होणें शक्य आहे. ही गोष्ट त्यावेळीं तितकीशी मान्य झाली नव्हती. रॅपची कल्पना सामान्यतः जरी मान्य झाली असती तरी भाषाशास्त्राची वाढ यापेक्षां अधिक झपाट्यानें झाली असती.

**भाषेत होत जाणारे फरक**—याचवेळीं जे. एच्. ब्रेड्सडॉर्फ या डॅनिश विद्वानानें एक ग्रंथ लिहून भाषेमध्यें फरक कसा व कां पडत जातो याचें विवेचन केलें आहे. बॉप किंवा ग्रीम यांनीं भाषेच्या स्वरूपांत फरक कां होतो या प्रश्नाकडे केव्हांच लक्ष दिलें नाहीं. संस्कृत व लॅटिन किंवा लॅटिन व फ्रेंच या भाषामध्यें एवढें अंतर कसें पडत गेलें हें वास्तविक भाषाशास्त्रज्ञांनीं पाहणें अवश्य होतें ब्रेड्सडॉर्फनें या फरकांस पुढील कारणें दिलीं आहेत व त्यांचीं निवडक उदाहरणेंहि दाखल केलीं आहेत—१ ऐकण्यामध्यें किंवा समजण्यामध्यें होणारी चूक, २ स्मृतिदोष, ३ अंगदोष, ४ आळस किंवा सुलभता; या कारणामुळें नऊ दशांस फरक होतात असें त्याचें म्हणणें आहे. ५ साम्य किंवा सादृश्य, ६ स्पष्ट उच्चार करण्याची इच्छा, ७ नवीन कल्पना व्यक्त करण्याची आवश्यकता. या खेरीज परकीय भाषा व परकीय राष्ट्राचा संसर्ग यांमुळेंहि भाषेमध्यें बदल होत जातात असें त्यानें दाखविलें आहे. रॅप व ब्रेड्सडॉर्फ यांच्या कल्पना तत्कालिन भाषाशास्त्रज्ञांच्या मानानें पुष्कळच पुढें गेलेल्या होत्या परंतु इतर त्या वेळचे विद्वान् अद्यापि ग्रिम व बॉप यांच्याच कल्पनास अनुसरत होते.

**श्लेषेर**—यानंतरचा या कालांतील भाषाशास्त्रीय अभ्यासांत भर टाकणारा पंडित ऑगस्ट श्लेषेर हा होय. यानें स्वतःच्या जर्मन भाषेखेरीज स्लॅव्होनिक, लिथुॲनियन, प्रशियन व चेक या भाषांचा अभ्यास प्रत्यक्षतः केला होता, व जर्मन भाषेंतील निरनिराळ्या बोलींचाहि अभ्यास करून त्यातील गाण्यांचाहि संग्रह केला होता. लहानपणीं दोन भाषा बोलण्याची सवय असल्यास परकीय भाषा शिकणें अधिक सुलभ जातें असें त्यानें आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. हा हेगेलच्या तत्त्वज्ञानपद्धतीचा अनुयायी होता. याचें म्हणणें असें होतें कीं भाषा ही मनुष्याच्या मेंदूची रचना व वागिंद्रियाची घटना यावर अवलंबून असते. आणि त्यामुळें भाषाशास्त्राचा अभ्यास हि इतर भौतिक शास्त्राच्या अभ्यासाप्रमाणेंच करणें अवश्य आहे. कारण भाषा ही मेंदूच्या रचनेंतील द्रव्याची व नाक व तोंड यांतील अस्थि, स्नायु व मज्जातंतु यावर जी क्रिया होते तिचेंच आपणांस श्रवणद्वारा प्रतीत होणारें स्वरूप होय. परंतु भिन्न भिन्न भाषा, उदा. फ्रेंच किंवा जर्मन बोलणाऱ्या लोकांच्या मेंदूमध्यें किंवा इंद्रियरचनेमध्यें कांहीं फरक असतो असें शारीरशास्त्रज्ञांनीं अद्यापपर्यंत दाखविलेलें नाहीं. तसेंच एकच मनुष्य सर्वतः भिन्न असणाऱ्या दोन भाषा पूर्णपणें अवगत करूं शकतो ही गोष्टहि वरील श्लेषेरच्या विधानास अपवादक आढळते. परंतु श्लेषेर या अपवादाचें असें खंडन करतो कीं एका मनुष्याला सर्वतः भिन्न अशा दोन भाषा पूर्णपणें आत्मसात करणेंच शक्य नाहीं. परकीय भाषा पूर्णपणें शिकणें केवळ बालपणांतच मातृभाषा सोडून तिचें अध्ययन केलें असतां शक्य होतें व तसें झाल्यास ती व्यक्ति अर्थातच निराळी बनते. आणि तिच्या मेंदूची व वाचेची वाढ

निराळ्या तऱ्हेनें होते एखादा मनुष्य जर्मन, इंग्रजी व फ्रेंच या तिन्ही भाषांत सारखाच निपुण आहे असें कोणी म्हटल्यास श्लेपर यास प्रथम या विधानाच्या सत्यतेबद्दल संशय वाटतो, व वास्तविक तसें असल्यास तो मनुष्य एकाच वेळीं या तिन्ही राष्ट्रांचाहि घटक म्हणून मानता येईल कारण या तिन्ही भाषा एकाच वंशांतील असून एकाच मूळ भाषेपासून उत्पन्न झालेल्या आहेत परंतु एखाद्या मनुष्याला चिनी आणि जर्मन किंवा अरबी आणि हॉटेन्टॉट या भिन्न भाषा एकाचवेळीं अवगत होणें शक्य नाहीं असें त्यानें म्हटलें आहे परंतु आपणास याचे उलट फिनलंडमध्यें स्वीडिश व फिनिश भाषा बोलणारे किंवा जावामध्यें डच व मलाई भाषा दोन्ही उत्तम तऱ्हेनें जाणणारे लोक आढळतात त्याची वाट काय? अर्थात श्लेपर यास ही गोष्ट कबूल आहे कीं आपलीं इंद्रियें हीं परिस्थित्यनुरूप संस्कारक्षम असून जे व्यापार त्यांस प्रथम करता येत नाहींत तेहि कालांतरानें त्यांस साध्य होऊं शकतात तथापि कांहीं विशिष्ट भाषारचना फक्त स्वाभाविक असू शकतात, व त्यामुळें एखाद्या मनुष्यास परकीय भाषा चांगली अवगत होऊं शकली म्हणून भाषा ही मेंदूच्या व वागिंद्रियाच्या रचनेवर अवलंबून आहे या विधानास बाध येत नाहीं असें त्यानें प्रतिपादिलें आहे जरी आपणास श्लेपरचें विधान मान्य झालें कीं दोन भाषा जाणणाऱ्या मनुष्यासहि एक भाषा दुसरीपेक्षां अधिक स्वाभाविकपणें अवगत असते तरी या दोन भाषांसंबंधीं त्याच्या ज्ञानामध्यें किंवा प्राविण्यामध्यें फक्त कांहीं प्रमाणाचा फरक असेल त्यास तात्त्विक फरक म्हणणें ही वास्तविक अतिशयोक्ति करण्यासारखें आहे व एकदा एका भाषेची सवय झाल्यावर दुसरी भाषा तितक्या पूर्णतेनें शिकणेंच अशक्य आहे हें त्याचें अनुमान तर अगदींच चुकीचें दिसतें, कारण एखाद्यास सतार चांगली वाजवितां येऊं लागल्यावर त्यास सारंगी तितक्या चांगल्या रीतीनें वाजवितांच येणार नाहीं, कारण त्याच्या मेंदूची रचना एका गोष्टीस पूर्णपणें अनुकूलतेनें बनून गेलेली असते असें म्हणणें आपणास प्राप्त होईल परंतु या बाबतींत केवळ सवयीनें प्राप्त होणारें कौशल्य हेंच अभिप्रेत असून एका गोष्टींत तें स्वाभाविक असेल तर दुसऱ्या गोष्टींत प्रयत्नानें मिळालेलें असेल एवढेंच? किंवा एका बाबतींत मनुष्याची अधिक स्वाभाविक प्रवृत्ति असेल एवढेंच

**श्लेपरचें भाषावर्गीकरण**--श्लेपरचें आणखी एक असें म्हणणें होतें कीं, मनुष्यजातीचें वर्गीकरण त्याच्या डोक्याची कवटी किंवा केंस अशा बाह्य लक्षणांवरून करण्याच्या ऐवजीं तिच्या भाषेवरून करण्यांत यावें, व ही वर्गीकरण पद्धति अधिक स्वाभाविक होय, कारण या पद्धतीनें सर्व तुर्क लोक एकाच वर्गांत मोडतील व सध्याच्या पद्धतीप्रमाणें उस्मानअल्ली तुर्क कॉकेशन वंशांत व तातेर तुर्क मंगोलियन वंशांत याप्रमाणें होणार नाही परंतु ही गोष्ट दिसते तितकी पटण्यासारखी नाही, कारण एखाद्या मनुष्याचा मुलगा जर अगदीं परकीय भाषा बोलूं लागला, उदा एखादा बास्क मनुष्याचा मुलगा जर फ्रेंच किंवा स्पॅनिश भाषाच बोलूं लागला तर त्या बापलेकांचें वर्गीकरण भिन्न वंशांत करावयाचें की काय? असो तथापि आपणांस या विषयासंबंधी येथें यापेक्षां जास्त विवेचन करावयाचें नाही श्लेपरनें भाषांचें वर्गीकरण त्रिवर्गात्मक पद्धतीनें केलें आहे: १ एकाकी भाषा, यामध्यें शब्दांतील फक्त ध्वनीनेंच अर्थ व्यक्त होऊन त्या शब्दाचा इतर शब्दांशी संबंध त्या त्या स्थानावरून निश्चित होतो २ चिकटण्या भाषा, यामध्यें शब्दाच्या ध्वनीनें त्याचा अर्थ व इतर शब्दांशी संबंध ही दोन्हीहि व्यक्त होतात परंतु संबंधदर्शक शब्द केवळ शेजारी ठेवलेले असतात ३ विकरणात्मक किंवा रूपविकारी भाषा, यामध्यें शब्दाचा अर्थ व इतर शब्दांशी संबंध हा त्याच्या स्वरूपावरून व त्यांत होणाऱ्या विकारांवरून जाणला जातो व त्यांतील मूळ शब्द त्याच्या स्वरूपांतील विकारावरून किंवा लागणाऱ्या प्रत्ययांवरून ओळखतां येण्यासारखा असतो श्लेपरचें असें म्हणणें होतें की, आपणास हे तीनहि भाषाप्रकार आज प्रचलित स्थितींत आढळतात एवढेंच नव्हे तर भाषेच्या वाढींतील या तीन अवस्था होत व त्यांतील रूपविकारी अवस्था ही सर्वांत पूर्ण अवस्था होय व त्यापूर्वी प्रत्येक भाषा या पूर्वीच्या दोन अवस्थांमधून जात असते श्लेपरनें जी वर वर्गीकरणपद्धति दिली आहे तिला मॅक्सम्युल्लर व व्हिटने यांसारखे अनुयायी मिळून ती बरीच लोकप्रिय झाली व तिचें वर्चस्व भाषाशास्त्रामध्यें विशेष स्थापन झालें कारण ती सुलभ असून नियमित व सुदैवानें पटण्यासारखी दिसत तसेंच त्यावेळच्या सुसंस्कृत राष्ट्रांच्या ज्या आर्य भाषा व सेमाइट भाषा त्यांना या वर्गीकरणांत उच्चस्थान दिलेलें आहे आणि यामुळें अमेरिकेंतील समावेशक भाषा यामध्यें विकरणात्मक भाषांचें वैशिष्ट्य अधिक स्पष्टपणें व अधिक परिणतरूपांत दिसून येतें असें जरी पॉटनें विवेचन केलें आहे तरी त्यास या वर्गीकरणामध्यें मुळींच थारा दिलेला नाहीं कारण अमेरिकन इंडियन लोकांच्या भाषांना संस्कृत किंवा ग्रीक भाषेपेक्षां महत्त्वाचें स्थान मिळणें शक्य नाहीं तसेंच आजच्या प्रचलित भाषांचें स्वरूप पाहिलें म्हणजे पूर्वीच्या अविज्ञात भाषांपेक्षां त्या अवनत स्वरूपांत आहेत ही गोष्टहि स्पष्ट होते कारण अर्वाचीन युरोपमधील कोणत्याहि भाषेंत हल्लीं पूर्वीप्रमाणें विकरणात्मक स्वरूप राहिलेलें नाहीं फक्त लिथुॲनियन भाषेमध्यें हें विकरणात्मक स्वरूप व संस्कृत भाषेची व्याकरणपद्धति जवळजवळ त्याच स्वरूपांत आपणांस दिसून येते परंतु याबद्दल आपणास असें म्हणतां यावयाचें नाहीं कीं आजचा लिथुॲनियन देतकरी हा देमॉस्थिनसपेक्षां अधिक सुसंस्कृत आहे

संस्कृति व भाषा यांचें मापन निरनिराळ्या मापांनीं केलें पाहिजे व त्यांचें महत्त्वहि निरनिराळ्या दृष्टीनें आपणास प्रतीत होतें. या वर दिलेल्या वर्गीकरणपद्धतीवरहि कांहीं आक्षेप घेतां येण्यासारखे आहेत कारण या पद्धतीमध्यें पहिल्या वर्गांत फक्त चिनी व इतर पूर्वेकडील भाषांचा समावेश होतो तर तिसऱ्या वर्गांत दोनच भाषावंशांचा अंतर्भाव होतो परंतु दुसऱ्या वर्गांत शेंकडों भिन्न भिन्न स्वरूपाच्या व एकमेकांशीं कोणताहि संबंध नसलेल्या भाषास घुसडून देण्यांत आलें आहे या वर्गांतील भाषांस कोणताहि सामान्य तत्त्व लावतां येत नाहीं. उदा फिनिश या भाषेला नेहमीं चिकटी किंवा संश्लिष्ट भाषा म्हणण्यांत येतें. परंतु त्या भाषेंतीलहि कांहीं शब्दांच्या बाबतींत आपणांस रूपविकार झालेले आढळतात आफ्रिकेंतील कांगो भाषांपैकीं कीयोंबे भाषेमध्यें करणें, आणणें इत्यादि वाचक क्रियापदांचे भूतकाल इंग्रजी भाषेंतल्याप्रमाणें धातूंतील स्वरांत विकार करून साधलेले आढळतात अशा तऱ्हेच्या उदाहरणांवरून रूपविकरण हें फक्त आर्यन व सेमाइट भाषांतच आढळतें असें नव्हे तर तें इतरहि भाषांत आपणास आढळून येतें असें स्पष्ट होतें तसेंच कांहीं भाषाशास्त्रज्ञांनीं जेव्हां अनेक भाषांचीं वर्णनें दिलेलीं आढळतात तेव्हां त्यांनीं या त्रिवर्गात्मक पद्धतीचा अवलंब केल्याचें आपणांस आढळत नाहीं उदा० स्टन्थॉल यानें कोणतीच विशिष्ट वर्गीकरणपद्धति न अनुसरतां क्वचित् भौगोलिक व क्वचित् रचनात्मक पद्धतीस अनुसरून भाषांचें वर्णन आपल्या ग्रंथांत केलें आहे फ्रेडरिक मुल्लर यानें तर मानववंशीय किंवा रचनात्मक वर्गीकरणपद्धति बाजूस टेवून मानववंशाप्रमाणें सुमारें शंभराहून अधिक भाषांचें बारा जातींमध्यें वर्गीकरण केलें आहे मिस्टरगी यानें भाषांचे सहा प्रकार वर्णिले आहेत–१ समावेशक २ धातुप्रधान, ३ मूलशब्दप्रधान, ४ प्रत्ययी, ५ चिकटी, व ६ विकरणात्मक, व यांचें पुन्हां त्यानें चार वर्गांत वर्गीकरण केलें आहे पहिल्या वर्गांत तो वाक्यरूपी शब्दांच्या भाषांस म्हणजे वरील पहिल्या वर्गाच्या भाषांस स्थान देतो दुसऱ्या वर्गांत शब्द नसणाऱ्या भाषा म्हणजे वरील दोन, तीन, चार या वर्गांतील भाषांस स्थान देतो तिसऱ्या वर्गांत वरील ५ व्या वर्गांतील म्हणजे बाह्यतः शब्द असणाऱ्या भाषांची तो गणना करतो व चौथ्या वर्गांत वरील ६ व्या वर्गांतील म्हणजे वास्तविक शब्द असलेल्या भाषांची गणना करतो. परंतु ही दुसरी वर्गीकरणपद्धति प्रथम शब्द कशास म्हणावें हें निश्चितपणें ठरल्याशिवाय स्वीकारतां येण्यासारखी नाहीं म्हणून ती जरी बाजूला टेवली तरी वरीलप्रमाणें अनेक वर्गीकरणपद्धति आपणास निरनिराळ्या भाषाशास्त्रज्ञांनीं अनुसरलेल्या दिसून येतात तसेंच श्लेपेरनें दिलेलें वर्गीकरण हें खरोखर प्रत्येक भाषेच्या विकासांतील निरनिराळ्या तीन अवस्था दाखवितें आणि आज हें वर्गीकरण सर्वमान्य झालें आहे असें नाहीं

**मूळ आर्यन् भाषा**—श्लेपेरनें वास्तविक भाषाशास्त्रीय अभ्यासामध्यें टाकलेली महत्त्वाची भर म्हणजे त्यानें मूळ आर्यन भाषेची रचना कशी असावी यासंबंधीं संशोधन व दिग्दर्शन करण्याचा केलेला प्रयत्न हें होय ही मूळ आर्यन भाषा संस्कृत, ग्रीक, लॅटिन, गॉथिक या सर्व भाषांच्या मुळाशीं असलेली भाषा होय व आजचा इटॅलियन, स्पॅनिश, फ्रेंच इ० भाषांचा जो मूळ लॅटिन भाषेशीं संबंध आहे तोच या वरील भाषांचा मूळच्या आर्यन भाषेशीं होता व या दृष्टीनें प्रयत्न करून त्यानें मूळच्या आर्यन भाषेचें स्वरूप कसें असावें यासंबंधीं सोदाहरण विवेचन केलें आहे व या विवेचनामध्यें निरनिराळ्या भाषांचा विकास कसकसा होत गेला याचा इतिहास आपणांस पहावयास सांपडतो अशा रीतीनें श्लेपेरनें मूळ आर्यन भाषेचा नमुना म्हणून एका कथेचें त्या भाषेंत रूपांतरहि दिलें आहे आतां अशा तऱ्हेनें मूळ भाषेचें स्वरूप आपणास खरोखर शोधून काढतां येईल काय हा प्रश्न आहे व याचें उत्तर ही गोष्ट केवळ कांहीं अंशानेच संभवनीय आहे असेंच आपणांस द्यावें लागेल

**तौलनिक अभ्यास**—प्राग युनिव्हर्सिटींतील ग्रीकचा सहाध्यापक जॉर्ज कर्टिअस हाहि त्या वेळचा एक महत्त्वाचा भाषाशास्त्रज्ञ होऊन गेला यानें ग्रीक भाषेचा अभ्यास केला होता व ग्रीक व्युत्पत्तिशास्त्रांत यानें बरीचशी सुधारणा केली अभिजात भाषा व जर्मन भाषा यांच्या व्युत्पत्तींमधील दुवा जोडण्यासहि यानें बरेंच साहाय्य केलें याच सुमारास होऊन गेलेला जोहान निकोलाय मॅडविग यानें युरोपियन अभिजात भाषांचा विशेषतः चांगला अभ्यास केला होता यानें भाषाशास्त्रांतील संदिग्धता व गूढपणा या गोष्टींस विरोध करून त्यांतील तत्त्व-सामान्य तर्कशुद्धतेस पटतील अशा तऱ्हेनें विशद करण्याचा प्रयत्न केला विशेषतः त्यानें असें प्रतिपादिलें कीं, आजकालच्या लोकांप्रमाणेंच प्राचीन काळच्या लोकांचाहि उद्देश भाषेस पद्धतशीर स्वरूप देण्याचा किंवा तिची रचना विशेष पद्धतशीर बनविण्याचा नसून केवळ आपल्या मनांतील विचार दुसऱ्यास समजतील अशा रीतीनें मांडणें एवढाच होता व त्यामुळें सर्व भाषांतून आपणास पद्धतशीरपणाचा अभाव आढळून येतो परंतु भाषा तयार करण्याची कला आजच्याप्रमाणें पूर्वीच्याहि लोकांना सर्वकाळीं अवगत होती मॅडविग यानें ध्वनिविषयक व व्युत्पत्तिविषयक संशोधनाला महत्त्व बाजवी पेक्षां कमी दिलें होतें तथापि एकंदरींत त्याचे सिद्धांत इतर तत्कालीन कांहीं विद्वानांपेक्षां अधिक पायाशुद्ध होते परंतु त्यानें आपले निबंध डॅनिश भाषेंत लिहिल्यामुळें त्याकडे तत्कालीन लोकांचें फारसें लक्ष गेलें नाहीं व त्यानें प्रतिपादिलेल्या धर्म्याचा

गोष्टी व्हिटने वगैरेसारख्या ग्रंथांत लिहिणाऱ्या भाषाशास्त्रज्ञांनी स्वतंत्रपणे पुढें मांडल्या मुळें त्यांस अधिक महत्त्व मिळालें. याच-वेळीं तौलनिक व ऐतिहासिक भाषाशास्त्राची वाढ बरीच झाली. निरनिराळ्या भाषांचा तौलनिक अभ्यास करणारे बरेच पंडित पुढें आले. उदा० संस्कृत भाषेमध्ये वेस्टरगार्ड आणि बेन्फे; स्लॅव्हॉनिक भाषांत मिक्लॉसिश आणि श्लेषर; व केल्टिक भाषेत झूस वगैरे. ट्यूटॉनिक अथवा जर्मानिक भाषांचा अभ्यास करणारे ग्रिमचे बरेच अनुयायी होते व फ्रेडरिक डिस व त्याचे शिष्य हे रोमॅनिक व्युत्पत्तिशास्त्रामध्ये प्रगति करीत होते व याच वेळीं भाषाशास्त्राच्या पद्धतीप्रमाणे ध्वनि, रूपें, शब्दरचना व वाक्य-रचना या सर्व अंगांनी अभ्यास चालला होता व त्यांचा एकमेकांशीं संबंधहि ध्यानांत येत होता.

**मॅक्समुलर व व्हिटने**—याच सुमारास १८६१ सालीं मॅक्समुलरनें भाषाशास्त्रावर व्याख्यानें दिलीं; त्यांत त्यानें विशेषतः श्लेषरच्या प्रमुख कल्पनांचा पुरस्कार केला व भाषाशास्त्र हें एक भौतिकशास्त्र असून ऐतिहासिक पद्धतीवर रचलेल्या व्युत्पत्तिशास्त्राचा याशीं कांहीं संबंध नाहीं असें त्यानें प्रतिपादन केलें; परंतु त्यानें प्रत्यक्ष ज्या गोष्टींचें विवेचन आपल्या व्याख्यानांत केलें त्यांवरून भाषाशास्त्राच्या भौतिकत्वाच्या विरुद्ध अनुमान निघत व अर्थातच भौतिकशास्त्राची जी आपण व्याख्या ठरवूं त्यावर ही गोष्ट अवलंबून आहे असें म्हणून त्यानें आपली सोडवणूक करून घेतली आहे. तथापि श्लेषर किंवा मॅक्समुलर यांच्या भाषा हें एक भौतिकशास्त्र आहे या उपपत्तीस विशेष अनुयायी मिळाले नाहींत व उलट ह्विटनि, मॅडविग व व्हिटने यांनीं या गोष्टीस विरोधच केला तथापि या भौतिकतत्त्वाचा भाषाशास्त्राच्या वाढीवर व इतिहासावर बराच परिणाम झाला. विशेषतः तत्कालीन भाषाशास्त्रज्ञांनी जे प्रश्न संशोधनाकरितां आपल्यापुढें घेतले व त्यांचें ज्या पद्धतीनें संशोधन केलें त्यांमध्यें आपणांस ही दृष्टि आढळून येते. ग्रिमपासून पॉट, श्लेषर व त्यांचे अनुयायी या मंडळींनीं ध्वनिमूलक अथवा उच्चारमूलक सादृश्यावरून निरनिराळ्या भाषांची तुलना केली व निरनिराळे ध्वनिशास्त्रीय नियम बनविले व ते लावून व्युत्पत्तिशास्त्रीय संशोधनास अधिक निश्चित स्वरूप दिलें. परंतु या ध्वनिशास्त्रीय अभ्यासास प्रत्यक्ष उच्चारांच्या संशोधनाचें पाठबळ नसल्यामुळें हें व्युत्पत्तिशास्त्रीय संशोधन केवळ निर्जीव व यांत्रिक स्वरूपाचें झालें. त्याला आधिभौतिक पाठबळ नव्हतें. कोठले तरी शब्द, स्वर किंवा व्यंजनें किंवा शब्दांची रूपें घेऊन त्यांची कोठल्या तरी रूपाशीं तुलना करण्यांत येत असे व त्यामुळें प्रत्यक्ष ती भाषा बोलणारे लोक अथवा व्यक्ति यांचा विसर पडल्यासारखा दिसत असे व विद्वत्तेचा हा भाग शास्त्रज्ञांस अनेक भाषांतील ध्वनिविषयक अथवा उच्चारविषयक नियमांचें किंवा व्याकरणांतील रूपांचें ज्ञान असे परंतु प्रत्यक्ष त्या भाषांचें विशेषसें ज्ञान नसे; निदान फारसा प्रत्यक्ष परिचय त्यांचा त्या भाषांशीं झालेला नसे. श्लेषर यास ही गोष्ट कळून चुकली होती व त्यानें मरणापूर्वी लिहिलेल्या आपल्या शेवटच्या पुस्तकांत असें म्हटलें आहे कीं, निरनिराळ्या भाषांच्या व्याकरणाबरोबर त्या भाषांचें प्रत्यक्ष ज्ञान असणें ही गोष्ट अतिशय महत्त्वाची आहे. त्यामुळें तौलनिक व्याकरणास निरनिराळ्या भाषांच्या प्रत्यक्ष नमुन्यांची अत्यंत आवश्यकता आहे. नाहीं तर तौलनिक व्याकरणांत निरनिराळ्या एकभाषाभव भाषांमध्यें असलेल्या सादृश्या-वरच विशेष भर देण्यांत येतो व त्यांतील प्रत्येक भाषेच्या वैशिष्ट्याकडे दुर्लक्ष होतें. दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी कीं व्याकरणा-मध्यें आपणांस फक्त विशिष्ट बाजूचें ज्ञान होतें, परंतु त्या भाषेच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान व्हावयास त्या भाषेतील कांहीं तरी लिखाणाचा अभ्यास करणें अवश्य असून त्यांतील निरनिराळीं रूपें इतर संबद्ध भाषांशीं कशीं सदृश असतात किंवा त्यांचा काय संबंध असतो हें पाहिलें पाहिजे. त्यावेळीं जरी ऐतिहासिक व तौलनिक ध्वनिसादृश्यावरच विशेष भर दिला जात होता तरी कांहीं भाषा-शास्त्रज्ञ निराळ्या दृष्टीनें अभ्यास करीत असलेले आपणांस आढळतात. उदा० हेमन स्टेन्थॉल यानें भाषेच्या मानसशास्त्रीय विवे-चनावर ग्रंथरचना केली परंतु त्याच्या ग्रंथाच्या दुर्बोधतेमुळें त्याकडे फारसें कोणाचें लक्ष गेलें नाहीं. भाषाशास्त्राचें सर्वसामान्य विवेचन करणारा श्लेषरनंतरचा महत्त्वाचा ग्रंथकार म्हटला म्हणजे वुइल्यम ड्वाइट व्हिटने हा अमेरिकन ग्रंथकार होय याच्या ग्रंथांचीं ( भाषेचा अभ्यास, भाषेचें आयुष्य व वृद्धि ) अनेक भाषांत भाषांतरें झालीं व त्याचा प्रतिस्पर्धी मॅक्समुल्लर याच्या इतकेच ते लोकप्रियहि झाले मॅक्समुल्लर व याच्यामध्यें मुख्य मतभेद म्हटला म्हणजे हा होता कीं, व्हिटनेच्या मतानें भाषा ही मनु-ष्यानें एकमेकांचे विचार समजण्याकरितां उत्पन्न केली असून शब्द हीं केवळ सांकेतिक चिन्हें आहेत व त्यांत कोणत्याहि तऱ्हेचा गूढपणा नाहीं. अर्थात् विशिष्ट शब्दांना जो विशिष्ट अर्थ प्राप्त झाला तो कोणाहि मनुष्यांनीं एके ठिकाणीं जमून चर्चा करून ठर-विला असें नव्हे तर एकमेकांच्या समजुतीवरून व संवयीवरून तो निश्चित झालेला असला पाहिजे या दोन भाषाशास्त्रज्ञांतील किर-कोळ मतभेद बाजूला ठेवले तर हे दोघेहि विसाव्या शतकांतील महत्त्वाचे भाषाशास्त्रज्ञ होत व त्यांनीं गेल्या पन्नास वर्षांत झालेल्या भाषाशास्त्रीय प्रगतीचें आपल्या ग्रंथांत उत्कृष्ट दिग्दर्शन केलें व विशेषतः आर्यन भाषेतील शब्द व रूप यांचें अधिक स्पष्टीकरण करून तत्कालीन भाषाशास्त्रीय उपपत्तींचें स्पष्टपणें आविष्करण केलें. अर्थात आज त्यांच्या सर्वच उपपत्ती मान्य मानल्या जातात असें नव्हे तर त्यांतील कांहीं केव्हांच सोडून देण्यांत आलेल्या आहेत.

**संस्कृत व इतर भाषा**--परंतु वरील भाषाशास्त्रज्ञांनीं, मूळ आर्यन भाषेंतील शब्दांचीं रूपें संस्कृतभाषेंत कायम राहिलीं असून ग्रीक, लॅटिन वगैरे युरोपीय भाषा ह्या संस्कृत भाषेपेक्षां मूळ भाषेपासून अधिक दूरच्या आहेत असें जें तत्त्व प्रतिपादन केलें होतें तें तितक्या पूर्णतेनें पुढें टिकाव धरीत नाहींसें झालें. तालव्य नियमावरून संस्कृतपेक्षा ग्रीक भाषेमध्यें कांहीं बाबतींत शब्दांचीं रूपें मूळच्या भाषेशीं अधिक जवळचीं आहेत असें दिसून आल्यामुळें या भाषावंशातील भाषांच्या परस्पर संबंधाबद्दलच्या पूर्वीच्या उपपत्तीस बराच धक्का मिळाला व कर्टिअसनें म्हटल्याप्रमाणें संस्कृत भाषा म्हणजे भाषाशास्त्राची जी अगदीं देवता म्हणून मानण्यांत येत असे व तिच्यावर जी अंधश्रद्धा ठेवण्यांत येत असे ती आतां मागें पडत आहे. याच सुमारास कार्ल व्हर्नर यानें प्राचीन गॉथॉनिक भाषामध्यें जी व्यंजनप्रक्रिया होत असे ती त्यांतील स्वराघातावर अवलंबून असे व या स्वराघाताचें स्वरूप आपणांस संस्कृत भाषेच्या प्राचीन स्वरूपांतच अवशिष्ट राहिलेलें आढळतें आणि अर्वाचीन गॉथॉनिक भाषामध्यें तें अगदीं बदलून गेलें आहे ही गोष्ट निदर्शनास आणली व यामुळें शब्दाच्या एकवचनांतल्या एका व्यंजनाबद्दल अनेकवचनांत दुसरेंच व्यंजन जें येतें तें त्यांतील स्वराघात बदलल्यामुळें होय ही गोष्ट स्पष्ट झाली (उदा. इंग्रजींतील एकवचनी वॉज याचें अनेकवचन वेअर होतें याचें कारण पहिल्या शब्दांत स्वराघात आरंभीं असतो तर दुसऱ्या शब्दांत तो अखेरीस असतो.) अशा तऱ्हेच्या शोधामुळें भाषाशास्त्रीय नियम इतर शास्त्रीय नियमांप्रमाणें अबाधित आहेत ही गोष्ट अधिक निदर्शनास आली.

**नवीन व्याकरणशास्त्रज्ञ**--यानंतर येणाऱ्या नवीन तरुण व्याकरणशास्त्रज्ञांनीं ध्वनिविषयक नियमास पुष्कळच महत्त्व देऊन त्यास मुळींच अपवाद असणें शक्य नाहीं असें प्रतिपादन करण्यास सुरवात केली. यामध्यें प्रथम आपणांस लेस्किन याचें नांव आढळतें. त्यानंतर ब्रुगमन, डेलब्रुक, ऑस्थॉफ, पॉल वगैरे येतात. ऑस्थॉफ असें प्रतिपादीत असे कीं ध्वनिविषयक फरक हे [illegible] असून सादृश्यविषयक फरक हे मानसिक क्रियेचे द्योतक होत. अर्थात् हें त्याचें म्हणणें खरें नव्हतें. तथापि ध्वनिविषयक व सादृश्यमूलक अशा तऱ्हेचे दोन विकार शब्दांच्या रूपामध्यें होतात ही महत्त्वाची गोष्ट यानें निदर्शनास आणली. जे फरक ध्वनिविषयक नियमाप्रमाणें होत नसत त्याचें कारण शोधून काढणें या शास्त्रज्ञांना भागच होतें, व त्यामुळें हे फरक सादृश्यमूलक होत ही गोष्ट त्यांनी पुढें मांडली. परंतु प्रारंभीं अशा तऱ्हेचे फरक हे भ्रामक सादृश्यामुळें होतात अशी समजूत होती. परंतु सादृश्यमूलक विकार हे भाषेमध्यें उत्तरकाळीं आले नसून भाषेच्या वाढीमध्यें तें एक महत्त्वाचें अंग आहे ही गोष्ट या नवीन तरुण शास्त्रज्ञांनीं पुढें मांडली. या नवीन दृष्टीनें विचार करण्यास प्रथम हरमन पॉल यानें सुरवात केली. त्याचें म्हणणें असें होतें कीं अगदीं मूळची इंडो-जर्मानिक भाषेची तिच्या शाखा पडण्यापूर्वीची स्थिति घेतली तरीसुद्धां तीमध्यें आपणांस धातु प्रत्यय वगैरे न आढळतां प्रत्यक्ष शब्दच दृग्गोचर पडतील ही गोष्ट विसरतां कामा नये, व अशा शब्दांच्या संग्रहावरच प्रत्येक मनुष्याला बोलण्याकरितां अवलंबून राहावें लागतें. प्रत्येक वेळीं मूळ शब्द घेऊन त्यास प्रत्यय लावून त्याचें योग्य तें रूप बनविण्याची क्रिया बोलणारा मनुष्य करीत असेल हें शक्य नाहीं. अथवा प्रत्येक शब्दाचीं सर्व रूपें त्याला तोंडपाठ येत असणेंहि शक्य नाहीं कारण अशीं सर्व रूपें ध्यानांत ठेवणें अशक्य आहे. परंतु प्रत्येक नामाचें किंवा क्रियापदाचें पूर्वीं कधीं न ऐकिलेलेंहि रूप योग्य प्रसंगीं बनविण्याचें मनुष्याला ज्ञान असतें. अर्थात् हें रूप बनवितांना दुसऱ्या शब्दांचीं तशीं निरनिराळीं रूपें त्याला ठाऊक असतात त्यावरून तो बनवीत असतो. अशीं निरनिराळीं रूपें वरचेवर बनत असतात व त्यांचे व्याकरणांतील प्रकारांप्रमाणें निरनिराळे वर्गहि तयार होतात. परंतु त्याचें व्याकरणमूलक ज्ञान अथवा स्थान व्याकरणाचें शिक्षण मिळाल्याशिवाय निश्चित होत नाहीं. परंतु अशा तऱ्हेचे निरनिराळे वर्ग बनल्यामुळें ते लक्षांत ठेवण्यास व योग्य प्रसंगीं त्यांचा उपयोग करण्यास मदत होते आणि याचेंच नांव सादृश्य. यावरून प्रत्येक मनुष्य बोलतांना शब्दांचीं सादृश्यमूलक निरनिराळीं रूपें बनवीत असतो ही गोष्ट स्पष्ट होते. या क्रियेचीं स्मरणपूर्वक उपस्थिति व सादृश्यमूलक नवीन उत्पत्ति हीं दोन मुख्य अंगें आहेत. एखाद्या व्याकरणामध्यें किंवा कोशामध्यें भाषेंतील सर्व शक्य तितके शब्द अथवा रूपें आलेलीं आहेत असें मानणें चुकीचें होईल. प्रत्यक्ष भाषा ही व्यक्तिगत असते व शास्त्रीय संशोधनामध्येंहि भाषेची व्यक्तीपासून फारकत करतां येणार नाहीं. आपणांपुढें एखाद्या शब्दाचें विशिष्ट रूप आलें असतां तें प्रचलित भाषेमध्यें आढळतें किंवा नाहीं किंवा त्या भाषेच्या व्याकरणाच्या नियमांप्रमाणें तें बनतें किंवा नाहीं या प्रश्नापेक्षां तें विशिष्ट रूप त्या बोलणाऱ्या व्यक्तीनें आपल्या स्मरणशक्तीमुळें उच्चारलें असेल काय किंवा तें स्वतःच बनवून त्यानें त्याचा प्रथमच उपयोग केला असेल काय व तसें असेल तर कोणत्या सादृश्यामुळें? हे प्रश्न विचारणेंच प्रत्येक शब्दाच्या निरनिराळ्या रूपांचें वास्तविक ज्ञान होण्यास आवश्यक आहे. जेव्हां एखादा मनुष्य मेंढरें असा शब्द उच्चारतो तेव्हां तो शब्द त्यानें दुसऱ्या कोणापासून ऐकलेला असणें शक्य आहे किंवा त्यास मेंढरू हा एकवचनी शब्द ठाऊक असून कोंबडू, वासरू इ० शब्दांच्या अनेकवचनाप्रमाणें त्यास त्याचें मेंढरें असें अनेकवचन सुचलें असण्याचा संभव आहे. परंतु त्याची स्मृति

अर्धवट असतां घर व दार, धोंडे या शब्दांशी गोंडें या शब्दाचें त्याच्या मनांत साहचर्य नसतें तर तो विसरूनहि जाण्याचा संभव होता व वरील साहचर्य हें त्यास शब्दाचें स्मरण करण्यास उपयोगी पडतें तेव्हां प्रत्येक शब्दाच्या बाबतींत स्मरणशक्ति व साहचर्य यांचें कार्य किती अंशांनी असतें हें ठरविणें कठीण आहे

अर्वाचीन दृष्टि—याप्रमाणें भाषाशास्त्राचा मुख्य विषय ती भाषा बोलणारा व्यक्तिसमूह हा बनला व भाषाशास्त्रज्ञांचें विशेष लक्ष भाषेमध्यें फरक पडण्याची कारणें कोणतीं व ते कसकसे होत जातात व त्यांचें वर्गीकरण कसें करावें या प्रश्नाकडे वळलें या प्रश्नावर अनेक भाषाशास्त्रज्ञांनी आपले विचार प्रकट केले परंतु यामध्यें हरमन पॉल यानें या प्रश्नाचें विवेचन अधिक पूर्णतेनें केलेलें आढळतें यानें लिहिलेल्या ग्रंथाच्या अनेक सुधारून वाढलेल्या आवृत्ती निघाल्या व या ग्रंथाचा भाषाशास्त्रीय विचारावर फार महत्त्वाचा परिणाम घडला तसेच यानें बॉप व श्लायर यांनी दुर्लक्ष केलेला व्याकरणांतील वाक्यरचना या भागाकडे विशेष लक्ष दिलें व त्यावेळच्या भाषाशास्त्रज्ञांना भाषेच्या ऐतिहासिक व तौलनिक पद्धतीच्या अभ्यासानें भाषेच्या बाह्यस्वरूपाप्रमाणें तिच्यांतील वाक्यरचनेवरहि बराच प्रकाश पडतो असें दाखवून दिलें या कालचे भाषाशास्त्रज्ञ या शास्त्रांतील नव्या नव्या महत्त्वाच्या प्रश्नांकडे जसें लक्ष देत होते तसेंच पूर्वींच्या भाषाशास्त्रज्ञांनी विशेष महत्त्वाच्या मानलेल्या कांही प्रश्नांकडे त्यांनी अगदी दुर्लक्ष केलें होतें असें आपणांस आढळून येतें उदा० व्याकरणांतील निरनिराळ्या प्रत्ययांचें मूळ काय किंवा भाषेची प्रथम उत्पत्ति कशी झाली असेल इ० प्रश्नांचा उत्तरकालीन भाषाशास्त्रज्ञांनीं विचारच करण्याचें सोडून दिलें असल्याचें आपणांस दिसून येतें या काळीं भाषाशास्त्रीय संशोधन विशेष जागेनें चालू असलेलें आढळतें त्यामध्यें ध्वनिशास्त्रीय संशोधनास विशेष प्राधान्य दिलेलें आढळतें त्यांतहि ध्वनि किंवा उच्चार पद्धतीचा अथवा शारीरिक पद्धतीचा विचार अधिक केलेला आपणांस आढळून येतो तसेंच भाषेच्या बाह्यस्वरूपाच्या त्यांतील वाक्यरचना पद्धतीच्या व शब्दार्थशास्त्र यांच्या अभ्यासाकडेहि विशेष लक्ष दिल्याचें दिसतें व *शब्दाचा एकाकी स्वरूपांत अभ्यास न करतां ते वाक्याचे अथवा संबद्ध भाषणाचे अवयव आहेत अशा दृष्टीनें* त्याचें संशोधन करण्याची प्रवृत्ति अधिक दिसून येते ध्वनिविषयक अभ्यासांतहि स्वरनियम व एकंदर वाक्याचा उच्चार यांस महत्त्व दिल्याचें आढळतें तसेंच स्वराघात यांच्याहि योग्य महत्त्व मानण्यांत आल्याचें दिसून येतें तसेच शब्दांचीं निरनिराळीं रूपें व वाक्यांतील त्यांचा उपयोग व त्याचें कार्य म्हणजे एकंदरीत वाक्यरचना या गोष्टींसहि या अभ्यासांत योग्य स्थान दिलेलें दिसून येतें व शब्दांच्या परस्परांशीं असलेला संबंध निश्चित करण्याच्या पद्धतीमधूनच अलीकडील शब्दार्थशास्त्राची उत्पत्ति झालेली आपणांस आढळते अर्थात् या सर्व गोष्टी निरनिराळ्या भाषांतील प्रयोगांचें प्रत्यक्ष ज्ञान प्राप्त करून घेतल्याशिवाय साध्य होणें शक्य नव्हतें यामुळें सामान्य भाषाशास्त्रज्ञ व विशिष्ट भाषेच्या व्युत्पत्तीचा अभ्यासक यांमध्यें पूर्वी जो आपणांस विरोध आढळून येत होता तो हळूहळू नष्ट झाला व अनेक विद्वानांनीं भाषाशास्त्राच्या विशेष शाखेवर व तत्संबद्ध व्युत्पत्तिशास्त्र यांवर एकाच वेळीं ग्रंथरचना केलेली आपणांस आढळून येते व यामुळें या दोन्हीहि शास्त्रांस याचा फायदा घडलेला आहे तसेच अलीकडे जिवंत भाषांचा अभ्यास करण्याकडेहि अधिक प्रवृत्ति होत असल्याचें दिसून येत आहे ध्वनिशास्त्र व भाषाविषयक मानसशास्त्र यांचा अभ्यास करण्यास प्रचलित भाषांचें निरीक्षण व अभ्यास यांची आवश्यकता आहे ही गोष्ट अधिक स्पष्टपणें निदर्शनास आणली गेली. विशेषतः हेन्री स्वीट यानें ही गोष्ट प्रामुख्यानें पुढें मांडली व आतां कोणताहि भाषाशास्त्रीय सिद्धांत मांडावयाचा झाल्यास त्याला प्रचलित भाषेचा आधार असला पाहिजे ही गोष्ट स्पष्ट झाली असून त्यामुळें प्रचलित भाषांचें प्रामहि अधिक वाढत आहे. गेल्या चाळीस वर्षांत अनेक विद्वानांनीं भाषाशास्त्राच्या क्षेत्रामध्यें परिश्रम केले आहेत त्यांतील नांवें द्यावयाचीं झाल्यास पुढील देतां येतील—जॉर्ज व्हॉन डेर गॅबेलेंट्स्, सुइट्सेन्स, गुर्ट, बॅली, फाटेने, ब्लूमफिल्ड, डेल्ब्रुक, ऑस्टॉफ, गिलवल, हेल, हर्मन हर्ट, ऑस्पेक्स, बॉक, मेल्ट, मेरिंगेर, नारिन, ओमर्टेल, पेडरसन, सँडफिल्ड, ग्रुरार्ड, सेकेहाये, स्ट्रीटबर्ग, स्टर्टेव्हॉन, शर्लिन, स्वीट, व्हेलेनबेक, वॉसलर, वेबस्टर इ०

वरील विवेचनावरून आपणांस असें दिसून येईल कीं प्रारंभीच्या भाषाशास्त्रज्ञांनीं भाषांचें वर्गीकरण वगैरेसारख्या मोठमोठ्या प्रश्नांचा विचार करून सामान्य सिद्धांत शोधून काढण्याकडे दृष्टि ठेवली होती परंतु अर्वाचीन भाषाशास्त्रज्ञांची दृष्टि निरनिराळे शब्द त्यांचीं रूपें व ध्वनि यांची विस्तृत प्रमाणावर तुलना करून त्यांचें स्पष्टीकरण करण्याकडे असते व त्यांची उत्पत्ति किंवा भाषापद्धतीचा विकास किंवा भाषेची रचना अशासारख्या प्रश्नांस ते बाजूला सारतात तेव्हां यांपैकीं अधिक महत्त्वाची गोष्ट कोणती असा प्रश्न आपल्यापुढें उभा राहतो अर्वाचीन शास्त्रज्ञ भाषाविषयक सर्वसामान्य सिद्धांत प्रतिपादन करणे धोक्याचें आहे असें म्हणतात परंतु शास्त्राचें ध्येय स्पेन्सरच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे ज्ञानाचें एकीकरण करणें हें आहे आणि त्यामुळें मोठमोठ्या प्रश्नांचा विचार करून सामान्य सिद्धांत शोधणें आवश्यक होय व अर्वाचीन अभ्यासांत या गोष्टीकडे दुर्लक्ष झाल्यामुळें

त्यास रूक्षता प्राप्त झाला आहे. तसेच त्यामध्ये व्यापक दृष्टीहि आढळत नाही व त्यांनी भाषांचे तौलनिक महत्त्वमापन करण्याकडेहि लक्ष दिले नाही. तसेच विशिष्ट शब्द किंवा त्याचे विशिष्ट रूप यांस प्राधान्य देण्याचे कारण काय? किंवा भाषेतील शुद्ध-अशुद्ध कशास म्हणावे, तसेच भाषेत होत जाणारे फरक इष्ट आहेत की अनिष्ट आहेत, तसेच एखादी सर्व राष्ट्रास बोलतां व समजतां येईल अशी सार्वराष्ट्रीय भाषा बनवितां येणे शक्य आहे काय इ. प्रश्नहि खरोखर महत्त्वाचे आहेत व त्यांचे शास्त्रीय दृष्टीने संशोधन झाले पाहिजे. परंतु अर्वाचीन शास्त्रज्ञ अशा कल्पनांना वेडगळ ठरवितात किंवा त्याची टवाळीहि करितात. परंतु या प्रश्नांकडे वळण्यापूर्वी आपण भाषेची वाढ प्रथम कशी होत जाते हे पाहू.

भाषेची उत्पत्ति--भाषेची उत्पत्ति प्रथम कशी झाली असावी यासंबंधी आतांपर्यंत अनेक अभ्यासकांनी अनेक मतें व्यक्त केलेली आढळतात. यासंबंधीची प्राथमिक कल्पना म्हणजे ईश्वराने भाषा निर्माण केली ही होय. ईश्वराने सर्व वस्तु निर्माण केल्या व त्यांस नांव ठेविली. हीच कल्पना ऋग्वेदांत 'बृहस्पते प्रथमं वाचो अग्रं यत् प्रैरत नामधेयं दधानाः।' (ऋ. १०.७१.१) या ऋचेत व्यक्त केलेली आढळते बायबलातहि हीच कल्पना आढळते. परंतु चिकित्सक अभ्यासकास ही कल्पना मान्य होणे शक्य नाही. तेव्हां तो भाषेचे आधिभौतिक कारण शोधूं लागतो. सृष्टीमध्ये भाषा असणारा म्हणजे शब्दोच्चार करणारा एकटा मनुष्यप्राणीच आहे असे नाही, तर इतरहि कांही प्राणी शब्द करतांना आढळतात. पक्षी, माकडासारखे संस्तन प्राणी हे शब्दांनी व मुंग्यांसारखे प्राणी कांही विशिष्ट अवयवाचे चलनवलन करून आपल्या मनांतील इंगित व्यक्त करण्यास समर्थ असतात. पण या बाबतींत मनुष्यप्राण्याची रचना अधिक सोईस्कर आहे. त्यास दोन पायांवर चालता येत असल्यामुळे त्याचे हात मोकळे राहतात व हातांनी अन्न घेऊन खाव करावयास त्याचे तोंड मोकळे राहते त्याला भारवाहनास केवळ कुत्र्यासारखे तोंडाने धरून करावयाचे नसते. तसेच त्यास उदरभरणासहि गाईसारखा पुष्कळ चारा खावा लागत नाही. त्यामुळे त्यास तोंडाने गाणे किंवा शब्द करणे अधिक सुलभ असते. पण या शब्द करण्यापासून भाषा कशी उत्पन्न होते हा प्रश्न आहे. याची उत्तरे निरनिराळ्या अभ्यासकांनी निरनिराळी दिली आहेत.

अनुकरणमूलकता--भाषा इतर प्राण्यांच्या शब्दांच्या अनुकरणाने उत्पन्न झाली असे एक मत आहे. पक्ष्यांची व कांही प्राण्यांची नावे त्यांच्या शब्दावरून पडली आहेत ही गोष्ट स्पष्ट आहे. कोकिल हा शब्द अनेक भाषांत जवळ जवळ याच रूपांत आढळतो. उदा. सं. कोकिला; ग्री. कोक्कुक्स; लॅ. कुकुलस; फ्रॅ. कुकु; इंग्रं. कुक्कू, कुकुलो; प्र. जुनी फ्रें. कोगुल; प्रा. नी. जर्म. कुक्कु; उ. नी. जर्म. कुक्कु; डच कोएकोएक; अँ. सॅ. गीक; हॅ. गिओंग; स्वी. गीक; आइसलँडिक गीक; प्रा. उ. जर्म. कौच; ई. कुकु; प्रा. कोइल; हिं. कोएल; बा. कोगिले. इ. यास्कानेंहि परिनामे शब्दानुकरणावरून पडलीं आहेत ही गोष्ट निरुक्तांत नमूद केली आहे. तसेच नादाचा संबंध असणारे वायवाचक शब्द किंवा फडफडणे, धडधडणे हे शब्द असलेल्या नादमय क्रियादर्शक शब्दांच्या अनुकरणावरून तयार झाले आहेत ही गोष्ट खरी. तथापि सर्व शब्दांची उपपत्ति अनुकरणाने लागत नाही हीहि गोष्ट खरी. या मताची 'भौभौ मत' म्हणून मॅक्समुल्लरने चेष्टा केली आहे.

उद्गारमूलकता--मनुष्य निरनिराळे विकार व्यक्त करण्याकरितां आहा! छी! बा! अगाई! अबब! असले जे उद्गार काढतो त्यांवरून भाषेची उत्पत्ति झाली असे एक मत आहे. आतां आश्चर्य, भय वगैरे प्रसंगी मनुष्याच्या तोंडून आं! सारखे ध्वनी निघतात हे खरे. पण बहुतेक उद्गारवाचक शब्द एकाकी व तुरळक स्वरूपाचे असून भाषेतील अनेक प्रकारचे शब्द बनविण्याच्या किंवा त्यांतील संबंध जोडण्याच्या कामी ते समर्थ होणे शक्य नाही. या मतास 'फु! फु! मत' असे म्हणतात.

नादमूलकता--प्रत्येक वस्तूस आघात झाला असतां नाद उत्पन्न होतो व प्रत्येक वस्तूस एक विशिष्ट नाद असतो. यावरून शब्दाचा विशिष्ट नाद व त्याचा अर्थ यांचा कांही तरी मूल संबंध असावा व त्यामुळे मनुष्याच्या विशिष्ट भावनांचे व्यक्तीकरण विशिष्ट नादाने होत असते असे हे मत आहे. यासच 'डिंगडाँग मत' असे नांव असून हे मॅक्समुल्लरने पुढे मांडले होते पण लवकरच ते टाकून दिले.

निःश्वासमूलकता--जेव्हां मनुष्य एखादे श्रमाचे काम करीत असतो तेव्हां तो विशिष्ट तऱ्हेने श्वास बाहेर टाकतो व मधून मधून तो श्वास विशिष्ट आवाजयुक्त अथवा शब्दयुक्त असतो. ओझे उचलणारे लोक किंवा श्रमाचे काम करणारे लोक ते काम करीत असतांना कांही तालबद्ध उद्गार काढतांना अथवा गाणे म्हणतांना आपणांला आढळतात. त्या विशिष्ट उद्गारांवरून साहचर्यामुळे तत्क्रियाबोधक शब्द निघाले असावे असे एक मत आहे. यास 'यो हे हो' असे नांव असून याचा पुरस्कर्ता नॉयर हा आहे.

**प्रेमोद्गारमूलकता**—तथापि या वरील कोणत्याहि एका विशिष्ट मताचा अंगीकार केला असता भाषेतील सर्व प्रकारच्या शब्दांची उपपत्ति लागत नाहीं तर या सर्वांचा थोडाफार आश्रय घेऊनच प्रत्येक भाषेचा इतिहास अभ्यासून भाषेच्या उत्पत्तीची मीमांसा लाविली पाहिजे अशा तऱ्हेनें विचार करून जस्पर्सन यानें भाषा ही प्राथमिक अवस्थेतील मनुष्यप्राणी आपल्या उत्कट भावना व विशेषत प्रेमविषयक भावना व्यक्त करण्याकरितां जीं गाणीं वगैरे म्हणत असे किंवा अन्य सस्वर नादयुक्त शब्द उच्चारीत असे त्यावरून बनली असावी असें मत नमूद केलें आहे

**भावनाव्यक्तिमूलकता**– तथापि वरील मताचा परामर्ष घेतां असें दिसतें कीं मनुष्याच्या मनामध्यें कांहीं कल्पना उत्पन्न झाली त्यानें एखादी आश्चर्यकारक गोष्ट पाहिली त्यास अतिशय आनंददायक अशी गोष्ट घडली किंवा त्यानें एखादें पराक्रमाचें कृत्य केलें किंवा पाहिलें म्हणजे त्याच्या मनात जे विचार उत्पन्न होतात–ज्या भावना उसळतात–त्या व्यक्त करण्याची त्यास उत्कट इच्छा उत्पन्न होते एखादा सुंदर देखावा पाहिला कीं आपल्या सहचराचें त्याकडे लक्ष वेधावें असें त्यास वाटतें सुंदर गाणें एकलें कीं त्याचें अनुकरण करावें असें वाटतें पराक्रमाचें कृत्य पाहिल्यास त्यास शाबासकी द्यावीशी वाटते याप्रमाणें भावनांची एकरूपता उद्गाररूपानें बाहेर पडते या भावना प्रेमविषयक वात्सल्यात्मक हर्षात्मक शोकपूर्ण वगैरे अनेक प्रकारच्या असू शकतील व त्या प्रमाणें निरनिराळे उद्गार मनुष्याच्या तोंडून बाहेर पडतील व मनःसामर्थ्यानें त्या उद्गारांत निरनिराळे अर्थ उत्पन्न होतील याप्रमाणें अनुकरण, भावनिदर्शन वगैरेपासून शब्दांचा व नंतर भाषेची उत्पत्ति झाली असली पाहिजे

**प्राथमिक व प्रगत भाषा**--आतां या प्राथमिक भाषेचें प्राथमिक अवस्थेतील स्वरूप कसें असावें हें आपणांस ऐतिहासिकदृष्ट्या भाषांचा अभ्यास करीत मागें मागें गेलें असतां कळण्यासारखें आहे असें तर हल्ली ऐतिहासिक दृष्टीनें भाषेचा अभ्यास करूं लागल्यास आपणास असें दिसून येतें कीं मनुष्याची प्रवृत्ति भाषेतील शब्दांचे उच्चार अधिकाधिक सुलभ व साधे करण्याकडे असते मूळ आर्यन् भाषेतील शब्द, उच्चारावयास फार अवघड असून संस्कृत नंतर प्राकृतामध्यें ते अधिक सुलभ तर आज त्याहूनहि सुलभ झाले आहेत तसेंच शब्दांतील स्वराघात नाहीसा होत चालला आहे आपण आपले विचार प्रदर्शित करण्याच्या कामीं अलीकडे पुष्कळच संयम वापरतों परंतु असंस्कृत लोक तेच विचार फार उच्च स्वरानें प्रकट करतात तसेंच दिवसेंदिवस शब्द आखूड करण्याकडे प्रवृत्ति आढळते प्राथमिक भाषेंतील शब्द लांब, उच्चारावयास अवघड जोडाक्षरयुक्त व नादयुक्त असावेत अर्वाचीन भाषांपेक्षां प्राचीन भाषांत व्याकरणविषयक रूपेंहि अधिक आढळतात उदाहरणार्थ ऋग्वेदामध्यें सुबन्त अथवा हेत्वर्थक रूप करण्याचे १६ प्रकार आढळतात [ अर्नोल्ड ऐतिहासिक वैदिक व्याकरण पृ ३१० ] तसेंच शब्दाच्या रूपांत विकार करण्याऐवजीं अलीकडे सहायक शब्द, अथवा अव्ययें वापरण्याची प्रवृत्ति अधिक आढळते पूर्वीच्या भाषा अधिक क्लिष्ट तर अलीकडील सुटसुटीत दिसतात भाषेची प्रगति अधिक अधिक पृथक्करणात्मक होण्याकडे आढळते पूर्वीच्या भाषांत व्याकरणविषयक अपवाद अनियमितपणा वगैरे गोष्टी अधिक आढळतात तर अलीकडे साधारणत सर्वसामान्य नियमांकडे प्रवृत्ति आढळते आज असंस्कृत अथवा प्राथमिक अवस्थेतील लोकांच्या भाषा जर पाहिल्या असतां वरील गोष्टींची सत्यता पटते ही गोष्ट दिसेल यानें अदमानी भाषा मॅगाफ यानें आफ्रिकेतील भाषा थॉम्सन यानें सताळ भाषा, कर यानें आस्ट्रेलियन भाषा, यासंबंधीं केलेल्या विधानांवरून स्पष्ट होते

या बद्दल हिर्ट्झन याच्या मताप्रमाणें प्राचीन भाषा अधिक साध्या व सुटसुटीत असण्याऐवजीं त्याच्या अगदीं उलट स्थिति आढळते पूर्वीच्या भाषांत तर वाक्य व पद,रचना अधिक क्लिष्ट व अवघड असून अनेक अपवाद ' अनियमितपणा वगैरे आनवाडी त्यांमध्ये असत तसेंच प्राचीन भाषांमध्यें अमूर्तकल्पनावाचक शब्द कमी असून मूर्तकल्पनावाचक शब्द फार असत. उदाहरणार्थ टॅस्मानिया मधील भाषेंत आंबा वगैरे फळवृक्षांच्या निरनिराळ्या जातींच्या आहेत म्हणून, आहेत पण सर्वसामान्य वृक्षवाचक शब्दच नाहीं तसेंच मृदु कठोर शीत दीर्घ इत्यादि कल्पना त्यांस व्यक्त करतां येत नाहींत शुभ्र पण निरनिराळ्या रंगाच्या गाई दर्शविणारे स्वतंत्र शब्द आहेत पण गाय अथवा असा सामान्य शब्द आढळत नाहीं ब्राझिलमधील बकैरी भाषेंत कमेंच निरनिराळ्या रंगाच्या पोपटांस स्वतंत्र शब्द आहेत पण पोपट असा जातिवाचक शब्द नाहीं परंतु याच प्राथमिक भाषेंत एकच पदार्थास अनेक शब्द व पर्याय आपणांस आढळतात उदाहरणार्थ निघंटुमध्यें पृथ्वीवाचक २१ शब्द दिले आहेत कदाचित पूर्वी या प्रत्येक शब्दाचा स्वतंत्र अर्थ असेल पण आज त्यांतील फरक नाहीसा होऊन ते सर्वसामान्यार्थानेंच वापरले जातात अथवा एकाच वस्तूमधील थोडाफार फरक दाखविण्यास स्वतंत्र शब्द असणें चांगलें व आजकालहि भाषेंत असे शब्द समुच्चय आढळतात, उदाहरणार्थ बैल या शब्दास सांड, खोंड, गोऱ्हा, पाळ, वळू, पाडा, वद्द इत्यादि निरनिराळे शब्द आहेत

पण त्यांच्या अर्थांत आपणास थोडाफार भेद करतां येतो व भेद करण्याची प्रवृत्ति व प्रत्येक शब्दास स्वतंत्र अर्थच्छटा निश्चित करण्याची प्रवृत्ति अर्वाचीन भाषेत दिसून येते परंतु वर्षाचा ताडा, लाकडांचा टाळी, माशाचा थवा, हरणांचा किंवा मेंढ्यांचा कळप, माणसांची झुंड इत्यादि समूह या एकाच कल्पनेचे वाचक अनेक शब्द भाषेत आढळतात ही गोष्ट प्राचीन भाषांत अधिक आढळते पण मनुष्याच्या सामान्य व्यवहारावाहेरच्या अनेक कल्पना व्यक्त करण्यास त्या भाषेत शब्दच आढळत नाहीत.

तसेंच पूर्वीच्या भाषा अधिक काव्यमय असून शास्त्रापेक्षां काव्याची उत्पत्ति अधिक जुनी असून भाषेची प्रवृत्ति अधिक अधिक वस्तुनिदर्शक व गद्यमय होण्याकडे आढळते. तसेंच विचारापेक्षा विकाराचा प्रादुर्भाव लवकर होतो त्यामुळे पूर्वीची भाषा मानवी विकार दर्शविण्यास अधिक समर्थ असून निरनिराळ्या विचाराची वाढ कमी झाली असल्यामुळे ते व्यक्त करण्यास कमी समर्थ होती. भाषेचा उगम गद्य वाक्यें अथवा विचारयुक्त कल्पनांपेक्षां मनांतील निरनिराळ्या भावनांचा उद्रेक, उत्कट विकार व त्यांचें प्रदर्शन करणारें काव्य यांमध्येंच आपणास शोधला पाहिजे. मनुष्य आपले विचार गद्यामध्यें व्यक्त करण्यापूर्वींच आपल्या कल्पना अथवा विकाराचें काव्यांत अथवा गाण्यांत निर्गमन करीत असे अर्थात् हें त्याचें काव्य अथवा गाणें म्हणजे आधुनिक संगीताच्या स्वरूपाचें नसून गुणगुणण्याच्या किंवा लावण्या-पोवाड्यांच्या रूपाचें असे.

मनुष्यास जेव्हां आपले विचार दुसऱ्यास कळवावे व ते त्यास समजावे अशी इच्छा झाली असेल त्या वेळीं त्याच्या उद्गारांस भाषेचें स्वरूप प्राप्त झालें असलें पाहिजे व येथें पद्याऐवजीं गद्याचा त्याने उपयोग केला असला पाहिजे. अशा वेळीं विशिष्ट ध्वनींची विशिष्ट अर्थाशी सांगड घालण्यांत आली असली पाहिजे व या बाबतींत प्रथम अनुकरणात्मक शब्दांस प्राधान्य मिळालें असलें पाहिजे. यावेळीं चिवचिव करणारी ती चिमणी, कावकाव करणारा तो कावळा असे शब्द तावडतोब विशिष्ट पदार्थवाचक बनले असले पाहिजेत; पण सर्वच शब्द अशा रीतानें बनणें शक्य नाहीं. बाकीचे शब्द हे बऱ्याच क्रिया होऊन वळणावळणानें सध्याचें स्वरूप पावले असले पाहिजेत.

तसेंच प्राथमिक भाषेंतील शब्द बहुतेक मूर्त कल्पना अथवा पदार्थ किंवा वस्तुवाचक असले पाहिजेत. या प्रकारचे प्रथमचे शब्द म्हणजे विशेषनामें होत व हीहि विशिष्ट मनुष्याच्या काहीं धर्मविषयक लकबी, किंवा विशिष्ट ध्वनी -अनेकदां उच्चारण्याचा संबंध वगैरेवरून पडलीं असावीं त्यानंतर सामान्यनामें बनलीं असावीं काहीं विशेषनामांची सामान्यनामें बनण्याची क्रिया आपल्या भाषेंत आजहि चालू असलेली आपणास दिसते जमदग्नि (रागीट मनुष्य), धृतराष्ट्र (आंधळा), विदुर (मकरंज) इत्यादि नांवें सामान्यनामांचें स्वरूप पावलीं आहेत तसेंच प्रथम काहीं तरी एकामागून एक अशा प्रकारें उच्चारलेल्या ध्वनींस ऐकणाराकडून अनुरूप प्रतिक्रियेचें उत्तर मिळाल्यास त्याच ध्वनींच्या पुनरुच्चारामुळें तीच क्रिया पुन्हां पुन्हां उत्पादित होऊं लागल्यास त्या ध्वनिसमुच्चयास उच्चारणारा व ऐकणारा यांच्या मनांत विशिष्ट अर्थ प्राप्त होतो अशा तऱ्हेनें प्रथम विशिष्ट क्रियाबोधक अगर वाक्यस्वरूपी ध्वनींस अर्थ प्राप्त झाला असावा व त्यानंतर त्याच पृथक्करण होऊन निरनिराळे शब्द बनले असावे असें एक मत आहे.

एकंदरींत भाषा प्रथम अर्धवट नादबद्ध ध्वनींच्या वैयक्तिक व विशिष्ट प्रसंगींच्या उच्चारापासून उदय पावून अर्धवट वाक्यखंड अथवा शब्दांच्या रूपानें प्रगट होत गेली असावी. आरंभींचें तिचें स्वरूप क्लिष्ट व चाचक असून मनुष्याच्या वैयक्तिक लहरीवर अवलंबून असावें परंतु प्रथमपासून तीमध्यें हळूहळू कमी अधिक गतीनें पण सारखी प्रगति होत असून तिचें स्वरूप अधिकाधिक स्पष्ट, नियमबद्ध, सुलभ व मार्मिक होत चाललें आहे अजूनहि कोणतीहि भाषा पूर्णस्थितीस पोंचली नाहीं परिपूर्ण भाषेंत प्रत्येक बाब एकाच शब्दानें, व सारख्या बाबी सारख्या शब्दांनीं व्यक्त होत जाऊन सर्व विकल्प वगैरे नाहींसे होतील, ध्वनि व अर्थ यांचा पूर्ण मिलाफ असेल व अर्थांतील निरनिराळ्या छटा स्पष्टपणें व्यक्त करतां येतील, तसेंच गद्य व पद्य, सौंदर्य व सत्य, विचार व भावना, यांस व्यक्त करण्यास योग्य शब्द असून व्यक्तीस आपले विचार व्यक्त करण्यास स्वातंत्र्य, सुलभता व चारुता यांची कधीं वाण पडणार नाहीं.

मुलांची भाषा—ही भाषेमध्यें प्रगति कशाची होत गेली असेल हें पाहण्यास आपण आतां लहान मुलांच्या भाषेपासून आरंभ करूं. लहान मुलांच्या भाषेच्या वाढीमध्यें तीन काल असतात. ( १ ) ओरडण्याचा काल, ( २ ) बोबडें बोलण्याचा काल व ( ३ ) व्यावहारिक भाषा बोलण्याचा काल हा शेवटचा काळ बराच दीर्घ असून त्याचे पुन्हां दोन भाग पाडतां येतील—( १ ) बालभाषेचा काल, व ( २ ) जनभाषेचा काल. पहिल्या काळामध्यें तो आपली वैयक्तिक भाषा बोलत असतो व दुसऱ्या काळांत सामान्य समाजाची भाषा बोलूं लागतो. सामान्यतः म, ब, प हीं अक्षरें त्यास प्रथम येऊं लागतात, असें अनेकांचें मत आहे. व यानंतर हळु हळू इतर अक्षरें तें मूल बोलूं लागतें व र वगैरेसारखीं अक्षरें यावयास त्यास दीर्घकाल लागतो प्रथम प्रथम मुलें एका वेळीं एक एकच अक्षराचा उच्चार करतात व अनेक अक्षरांचें पुनरुच्चारण करतात. त्यामुळें त्यांच्या भाषेंत दादा,

मनुष्यांपासून शिकतात तीं त्याचे शिक्षक नसतांहि शिक्षकाचें कार्य करितात त्यामुळें शिक्षकाबद्दल वाटणारा संकोच त्या व्यक्तीच्या बाबतींत त्या मुलांस बाधक होत नाहीं. तसेंच हीं माणसें म्हणजे त्याची आई, बहीण वगैरे अगदीं निकटचे आप्त असल्यामुळें तीं हें शिकविण्याचें काम अतिशय सहानुभूतिपूर्वक करतात व त्याच्या स्वाभाविक चुकांकडे दुर्लक्ष करून व त्यास उत्तेजन देऊन त्याची भाषा शुद्ध होण्याचा प्रयत्न करतात. बोलावयास शिकण्याच्या बाबतींत मुलांपेक्षां मुली अधिक पुढें असतात व त्या अधिक शुद्ध बोलतात आणि त्यांच्या उच्चारामध्यें मुलांपेक्षां कमी दोष असतात असें दिसतें,

येथें मातृभाषा म्हणजे आईची भाषा नसून बालपणांतील सभोंवारच्या समाजाची भाषा असें समजलें पाहिजे. भाषेच्या बाबतींत मातेपेक्षां पित्याच्या भाषेचा परिणाम मुलांवर त्यापेक्षांहि कमी होतो. जर कोणाचा विशेष परिणाम मुलांच्या भाषेवर होत असेल तर ज्या व्यक्तींशीं त्या मुलाचा त्याच्या वयाच्या तिसऱ्या वर्षानंतर संबंध येतो त्यांचा होय. आपणांस कांहीं मुलें आपल्या घरच्या नोकरांच्या बोलण्यांतील कांहीं लकबी उचलतांना आढळतात व त्या त्यांना कायमच्या जडलेल्यांहि दृष्टीस पडतात. परंतु मुलाच्या भाषेवर विशेष परिणाम त्याच्या समवयस्क किंवा थोडया वयानें मोठया अशा सवंगडयांचा होतो. कारण त्यांच्या संगतींत तें मूल वारंवार असतें व त्यांचे शब्द–ज्यावेळीं त्याची बुद्धि अत्यंत संस्कारक्षम असते अशा वेळीं–त्याच्या कानांत सारखे गुणगुणत राहतात. ग्रीनलंडमधील डॅनिश आईबापांचीं मुलें डॅनिश भाषेपेक्षां एस्किमो भाषा अधिक लवकर शिकतात ही गोष्ट प्रख्यात आहे. तसेंच जर्मनीच्या आफ्रिकेंतील वसाहतींतील जर्मन मुलें जर्मन भाषेपेक्षां आफ्रिकन भाषा लवकर शिकतात असें मिनहॉफनें म्हटलें आहे.

**मुलांच्या स्वतंत्र भाषा**—आपणांस लहान मुलें केव्हां केव्हां कांहीं विचित्र शब्द किंवा आपल्या लहानशा स्वतंत्र भाषाहि तयार करतांना आढळतात. परंतु त्यांची फारशी वाढ होत नाहीं व त्यांस तितकें महत्त्वहि राहात नाहीं. मुलांच्या खेळांतील कांहीं गुप्त भाषाहि आपणांस आढळतात. त्यांतील सकारी किंवा चकारी भाषा आपल्या इकडे दृष्टीस पडतात. या भाषांत प्रत्येक शब्दास आरंभीं किंवा मध्यें सकार किंवा चकार जोडलेले आढळतात. तसेंच प्रत्येक शब्दाचें स्वरूप विकृत करूनहि एक नवीनच भाषा मुलें तयार करतांना आढळतात; किंवा वर्णव्यत्यास करून नवीन शब्द बनविलेलेहि आपणांस दृष्टीस पडतात. उदा. ‘ धावरोबा बामणला ’ किंवा ‘ स्वाराजांची म्हारी आली पसरंजी सतरा. ’ असे प्रकार लहान मुलें खेळत असतां करतांना आपणांस आढळतात. प्रौढपणामध्येंहि मिताक्षरा किंवा महानुभावांच्या सांकेतिक लिपि हीं अशा तऱ्हेच्या भाषांचीं उदाहरणें म्हणून देतां येतील. कित्येकदां लहान मुलें जर बराच काल निराश्रित राहिलीं तर आपली एक नवीनच भाषा बनवितात. अशा तऱ्हेच्या भाषांचीं उदाहरणें होरेशिओ हेल या अमेरिकन मानवशास्त्रज्ञानें आपल्या एका अहवालांत नमूद केलीं आहेत. अशा तऱ्हेची भाषा उत्पन्न करण्यास दोन किंवा अधिक मुलें अशा परिस्थितींत राहिलीं पाहिजेत कीं, त्यांचा प्रौढ माणसांशीं बिलकुल संपर्क येतां कामा नये, व हीच स्थिति त्यांची पूर्ण वाढ होऊन त्यांचीं स्वतंत्र कुटुंबें होऊन त्यांस आपली भाषा पुढच्या पिढीस देण्याकरितां प्रजाहि उत्पन्न होण्यापर्यंत कायम राहिली पाहिजे. अशा तऱ्हेची परिस्थिति त्यास कांहीं अमेरिकेंतील इंडियन लोकांत आढळली. ऑस्ट्रेलियामध्येंहि तशी असणें संभवनीय आहे. त्यानें अशा पांच नवीन भाषांचीं उदाहरणें दिलीं आहेत. अशा तऱ्हेचीं आइसलंड व स्वीडनमध्येंहि कांहीं उदाहरणें नमूद केलेलीं आढळतात. परंतु अशा तऱ्हेची बनविलेली भाषा फारच तुटपुंजी असते. ब्राझिलमध्येंहि आपणांस अशा तऱ्हेच्या कांहीं केवळ कांहीं कुटुंबातच प्रचलित असलेल्या स्वतंत्र भाषा आढळतात.

**बालभाषेंतील विशिष्ट शब्द**—लहान मुलें अगदीं बाल्यावस्थेंत जे तोंडातून निरर्थक ध्वनी काढतात त्यांसच त्यांच्या माता अथवा दाई किंवा भोंवतालची मंडळी कांहीं तरी अर्थ जोडून शब्दाचें स्वरूप देतांना आपणांस आढळतात. अशा तऱ्हेचे शब्द म्हटले म्हणजे मा, अम्मा, बाबा, दादा, तात्या, आवा इ० होत. वास्तविक मूल हे वर्ण केवळ चाळा म्हणून तोंडांतून उच्चारतें व पूर्वीं सांगितल्याप्रमाणें म, ब, प हे ओष्ठ्य वर्ण लहान मुलांस प्रथमतः उच्चारावयास येऊं लागल्यामुळें तोंडांतून वरील ध्वनी निघूं लागतात व त्यांस विशिष्ट अर्थ प्राप्त होऊन मातृपितृवाचक व निकटचे आप्तवाचक शब्द तयार होतात ही गोष्ट आपणांस जगांतील सर्व भाषांमध्यें जे मातृपितृवाचक मा, ममा, बाबा, अबा, पपा वगैरे शब्द आहेत त्यांवरून स्पष्ट दिसून येते.

**भाषा व स्त्रिया**—भाषेच्या वाढीमध्यें व तिच्या स्वरूपांत निरनिराळ्या काळीं पडणाऱ्या बदलामध्यें स्त्रियांचेंहि अंग प्रामुख्यानें असतें. कित्येक समाजांत आपणांस पुरुष व स्त्रिया अगदीं स्वतंत्र निरनिराळ्या बोलीमध्यें बोलतांना आढळतात. अशा तऱ्हेचें उदाहरण कॅरिबियन लोकांबद्दल रॉशफर्ट यानें दिलें आहे. या लोकांत पुरुष कॅरिबियन तर स्त्रिया अरावॉकन भाषा बोलतात. व पुरुषांनींच स्त्रियांच्या भाषेचें अनुकरण केलें आहे. आपणांकडे इश्श ! मेल्या ! यासारखे उद्गार पुरुष काढणार नाहीं. परंतु

या लोकांच्या भाषेचीहि कसून तपासणी केल्यास आपणांस असें आढळतें कीं, वास्तविक ह्या समाजातील पुरुष व स्त्रिया अगदीं पृथक् अशा भाषा किंवा बोली बोलतात असें नसून त्या समाजामध्यें कांहीं विशिष्ट शब्द केवळ स्त्रियांतच व कांहीं विशिष्ट शब्द केवळ पुरुषांतच वापरले जातात एवढेंच दिसून येतें. व त्या भाषेचें व्याकरणहि सर्व लोकांस सामान्य असेंच आहे. परंतु ही गोष्ट आपणांस सुसंस्कृत समाजांतहि आढळून येते. उदा. कांहीं समाजामध्यें स्त्रिया नवऱ्याचें नांव उच्चारीत नाहींत व विशिष्ट शब्द विशिष्ट परिस्थितीमध्यें योजणें स्त्रियांस योग्य मानलें जात नाहीं. अशा ठिकाणीं त्या शब्दाचें कार्य दुसरे शब्द योजून अप्रत्यक्षपणें करून घ्यावें लागतें (न्हाण्याबद्दल 'बाहेरचा' तसेंच बाहेर बसणें, चूळ भरून येणें इ०). अशा वेळीं आपणांस स्त्री व पुरुष हीं स्वतंत्र भाषा बोलतात असें म्हणतां यावयाचें नाहीं. परंतु कांहीं ठिकाणीं उदा. संस्कृत भाषेंतील नाटकामध्यें आपणांस असें आढळतें कीं, पुरुषवर्ग सामान्यतः शुद्ध संस्कृत भाषा वापरतो व स्त्रिया प्राकृत भाषेमध्यें संभाषण करतांना आढळतात. परंतु या ठिकाणीं या दोन भाषा बोलणाऱ्या वर्गांमध्यें वास्तविक स्त्री–पुरुष हा भेद नसून वर्गभेद किंवा सांस्कृतिक भेद आहे. कारण संस्कृत भाषा ही राजे, मंत्री, ब्राह्मण, वगैरे उच्चवर्गीय लोकांची असून कनिष्ठ वर्गांतील उदा० वाणी, उदमी, कोळी, शिपाई वगैरे वर्गांतील पुरुषहि प्राकृत भाषाच बोलतात. या ठिकाणीं या दोन भाषांतील फरक एकाच भाषेच्या दोन निरनिराळ्या अवस्था दाखवितो. एक सुलभ, स्वाभाविक व परिचित असून दुसरी अधिक आर्ष, कठिण व प्रौढ अशी आहे. व आजहि आपणांस एखाद्या न्यायाधीशाच्या व सामान्य मनुष्याच्या भाषेमध्यें हा फरक आढळून येईल. आजहि आपणांस शहरांतील सुसंस्कृत वर्गाची भाषा व खेडवळवर्गाची ग्राम्य भाषा यामध्यें बराच फरक आढळतो. परंतु या दोन स्वतंत्र भाषा नसून हा भेद एका भाषेवरील उच्च संस्कार मात्र दाखवितो. वास्तविक स्त्रिया आपली परंपरागत भाषा कायम ठेवण्याच्या बाबतींत पुरुषांपेक्षां अधिक स्थिर स्वरूपाच्या असतात; त्यांस घराबाहेरील वातावरणाचा व व्यवहाराचा तितका संपर्क होत नसल्यामुळें पुरुषांइतक्या अनेक बाह्य गोष्टींचा त्यांच्या बोलण्यावर परिणाम होत नाहीं. त्यामुळें पुरुषवर्गाची भाषा जितकी चंचल असते तितकी स्त्रियांची असत नाहीं. तंजावराकडील महाराष्ट्रीय लोकांत आज आपणांस स्त्रियांमध्येंच मराठीची परंपरा अधिक स्थिर राहिलेली दृष्टीस पडते. आतां स्त्रियांच्या बोलण्यामुळें भाषेमध्यें कांहीं ध्वनिविषयक फरक होतात ही गोष्ट खरी आहे. परंतु एकंदर भाषेंतील फरकांच्या मानानें ते तितकेसे महत्त्वाचे नाहींत. परंतु शब्दांच्या बाबतींत मात्र स्त्रियांकडून कांहीं विशिष्ट शब्द भाषेमध्यें विशेष रूढ झाल्याचें किंवा विशिष्ट शब्दांस विशिष्ट अर्थ प्राप्त झाल्याचें आढळून येतें. उदा. स्त्रिया शरीराच्या विशिष्ट अवयववाचक शब्दांचा उच्चार करण्यास लाजतात, आणि त्यामुळें अशा शब्दांबद्दल त्या इतर समानार्थक अथवा अप्रत्यक्ष अर्थबोधक शब्द वापरतात, व अशा शब्दांसहि कांहीं काळानें पुन्हां तेच विशिष्ट शरीरावयववाचक अर्थ प्राप्त होऊन पुन्हां त्याबद्दल दुसरे अप्रत्यक्ष शब्द योजावे लागतात. तसेंच स्त्रिया असभ्य व ग्राम्य शब्द सहसा उच्चारीत नसल्यामुळें त्या बाबतींत भाषेच्या स्वरूपामध्यें त्या बराच बदल घडवून आणितात. तसेंच अपशब्द टाळण्याचेहि स्त्रिया प्रयत्न करतात, व शपथेचे प्रकारहि त्यांस वर्ज्य असतात.

**स्त्रियांची शब्दसंपत्ति**—स्त्रियांची शब्दसंपत्तीहि मर्यादित असते. कारण त्यांचें कार्यक्षेत्र मर्यादित असल्यामुळें त्यांस कांहीं विशिष्ट व्यापारांतीलच शब्द परिचित होतात. उलट पुरुषाचें कार्यक्षेत्र व संचार अधिक विस्तृत असल्यामुळें तो नव्या नव्या कल्पना व विषय वाचक शब्द नेहमीं तयार करीत असतो. सामान्यतः स्त्रियांच्या मनांत कोणत्या कल्पना विशेष वागत असतात व पुरुषांच्या मनांत कोणते विचार चाललेले असतात यासंबंधानें अनुमान काढावयाचें झाल्यास पुढील उदाहरण बोधप्रद होईलः–जास्त्रो या अमेरिकन प्रोफेसरानें केलेला एक प्रयोग आपणांस मनोरंजक वाटेल. त्यानें एकाच विश्वविद्यालयांतील एकाच वर्गांतील २५ विद्यार्थ्यांस व विद्यार्थिनींस त्यांस वाटतील ते शंभर शब्द शक्य तितक्या कमी वेळांत लिहून आणावयास सांगितलें. अशा तऱ्हेनें त्याच्या जवळ ५००० शब्द लिहून आले. त्यांतील बरेचसे शब्द अर्थात् पुनरुक्त होते. परंतु स्त्रियांनीं लिहिलेल्या शब्दांत विचाराचें क्षेत्र अधिक मर्यादित व समव्याप्त होतें. पुरुषविद्यार्थ्यांनीं १३७५ निरनिराळे शब्द लिहिले तर स्त्रियांनीं फक्त ११२३ च लिहिले. एकदांच लिहिल्या गेलेल्या १२६६ शब्दांपैकीं शेकडा २९ पुरुषांनीं लिहिले होते व शेकडा २० स्त्रियांनीं लिहिले होते. पुरुषांनीं प्राणिवाचक शब्द अधिक लिहिले होते तर स्त्रियांनीं पोषाखविषयक शब्द अधिक लिहिले होते. अन्नवाचक शब्द पुरुषांनीं फक्त ५३ लिहिले तर स्त्रियांनीं १७९ लिहिले. स्त्रियांनीं लिहिलेल्या शब्दांत सामान्यतः सभोंवतालची परिस्थिति, पूर्ण वस्तुबोधक, अलंकारिक, वैयक्तिक व मूर्तस्वरूप शब्द अधिक होते तर पुरुषांनीं लिहिलेल्या शब्दांत अधिक दूरचे, विधायक, उपयुक्त व सामान्य स्वरूपाचे व भाववाचक शब्द अधिक होते. अनुप्रासयुक्त शब्द स्त्रियांपेक्षां पुरुषांनीं अधिक लिहिले. यावरून पुरुषांचें शब्दांतील ध्वनीकडे अधिक लक्ष असतें ही गोष्ट स्पष्ट होते व त्याप्रमाणेंच पुरुषांमध्यें शब्दांवर कोट्या करण्याची

प्रवृत्ति अधिक असते असें आपणांस आढळतें व आपणांत स्त्रियांमध्यें भाषाशास्त्राचा अभ्यास केलेल्या स्त्रिया कमी कां आढळतात हें यावरून स्पष्ट होतें. वास्तविक स्त्रिया कोणतीहि गोष्ट पुरुषांपेक्षां अधिक लवकर शिकतात, अधिक लवकर ऐकतात व अधिक लवकर प्रत्युत्तरहि देतात. पुरुष हा या बाबतींत स्त्रीपेक्षां अधिक धिम्मा आहे. तो एखादी गोष्ट ऐकल्यावर तिच्यावर विचार करतो, नंतर आपल्या शब्दांची निवड करतो आणि नंतर योग्य शब्दांची निवड केल्यावर उत्तर देतो. स्त्रियांमध्यें 'हं' 'असें' अशा तऱ्हेचे सामान्यार्थक शब्द घालण्याची प्रवृत्ति अधिक आढळते. याचें कारण त्यांच्यामध्यें कित्येक वाक्यें अर्धवट सोडून देण्याची प्रवृत्ति असते. कारण त्या आपणांस काय बोलावयाचें याचा पूर्णपणें विचार करण्यापूर्वीच बोलावयास प्रारंभ करतात. तसेंच त्यांच्या शब्दांमध्यें उद्गारवाची शब्दांचा व वाक्यखंडांचा भरणाहि अधिक असतो. स्त्रियांची ग्राहकशक्तीहि पुरुषापेक्षां अधिक असते ही गोष्ट दिसून आलेली आहे. एकच पॅरिग्राफ स्त्रियांनीं व पुरुषांनीं सारखाच वेळ अवलोकन केल्यास त्याचें पुनरुच्चारण अथवा सारांशकथन पुरुषांपेक्षा स्त्रिया अधिक चांगलें करूं शकतात. स्त्रिया प्रत्युत्तर देण्यास किंवा बोलण्यास पुरुषांपेक्षां अधिक तत्पर असतात, ही गोष्ट जरी खरी असली तरी त्यांची शब्दसंपत्ति मर्यादित क्षेत्रापुरतीच व संख्येनेंहि मर्यादित असते व त्या विचाराच्या बाबतींत सूक्ष्मपणापेक्षां सरासरीकडे अधिक झुकलेल्या दिसतात हॅवेलॉक एलीस यानें असें दाखविलें आहे कीं, ज्याप्रमाणें अत्यंत बुद्धिमान् व्यक्ती पुरुषांमध्यें अधिक होतात त्याप्रमाणें वेडयाचेंहि प्रमाण स्त्रियांपेक्षां पुरुषांमध्यें अधिक असतें व ही गोष्ट आपणांस भाषेच्या बाबतींतहि आढळून येते. जगांतील अत्यंत मोठमोठे वक्ते किंवा ग्रंथकार हे पुरुषच होऊन गेलें आहेत. तसेंच अज्ञानी लोकांची लोकसंख्याहि पुरुषांमध्येंच अधिक निघेल. परंतु सरासरीनें बुद्धीचें प्रमाण स्त्रियांमध्यें अधिक आढळेल. याचें कारणहि शोधण्यास फार दूर जावयास नको. याचें मूळ आपल्या कुटुंबांतील श्रमविभागणीमध्यें आहे. आज पिढयानुपिढया मनुष्यास अशा तऱ्हेचें काम पडत आहे कीं, त्यास आपला सर्व उत्साह फार थोडया वेळेपुरता एकत्र करावा लागतो व ती वेळ म्हणजे जगांतील कलह. उदा. युद्ध व पारध हे प्रसंग होत. अशा वेळीं त्यास बोलण्याचे प्रसंग थोडेच असतात. हें श्रमाचें काम झाल्यावरोबर मनुष्य लागलाच शिथिल होऊन आळसामध्यें आपला वेळ घालविण्यास प्रवृत्त होतो. उलट स्त्रियांच्या वांटणीस जें घरकाम येतें त्यामध्यें असा तात्पुरता विशेष जोराचा उत्साह दाखविण्याचे प्रसंग येत नसतात. तरी सतत श्रमाचे प्रसंग तिच्यावर नेहमींच येतात. उदा. तिला मुलांची काळजी घेणें, स्वयंपाक करणें, शिवणें, टिपणें, धुणें वगैरे कामें करावीं लागतात. या कामांत तिला फारसा खोल विचार करावा लागत नाहीं, व हीं कामें इतरांच्या सहवासांतहि करतां येण्यासारखीं असल्यामुळें सामान्यतः काम करतांनाहि तोंड चालू ठेवण्याची प्रवृत्ति त्यांच्या ठिकाणीं जास्त आढळून येते, व हीच घटना थोडयाबहुत फरकानें आपणांस आजहि चालू असलेली आढळून येते.

**परकीयांचा संपर्क**—भाषेच्या वाढीमध्यें एखाद्या राष्ट्राचा परकीय राष्ट्राशीं संबंध आल्यास फार महत्त्वाचा परिणाम होतो. दोन भिन्न भिन्न राष्ट्रांचा संनिकर्ष पुढें दिलेल्या निरनिराळ्या प्रकारांनीं होऊं शकतो असें हेम्पल यानें दाखविलें आहे. (१) जेत्याची संख्या लहान असून जरी ते राज्यकर्ते असले तरी त्यांची संख्या देशाच्या भाषेवर परिणाम करण्यासारखी नसते. अशा वेळीं त्यांचे वंशज देश्यभाषेचाच स्वीकार करतात व त्यांची मूळ भाषा नष्ट होते. परंतु त्यांतील शासनसंस्था, सैन्य वगैरे बाबतींतील शब्द देश्यभाषेमध्यें मिसळतात. (२) जेत्यांची संख्या पुष्कळ असून ते स्वतःचीं कुटुंबें घेऊन येतात व त्यांचा प्रवाह दीर्घकालपर्यंत चालू राहतो. अशा वेळीं जेत्यांचा वर्ग हा उच्च व मध्यमवर्ग बनून त्यांच्यापैकीं कांहीं खालच्या वर्गांतहि अंतर्भूत होतात देश्य लोक दूर निघून जातात किंवा दास बनतात व त्यांची भाषा दासभाषा होते व ती जवळ जवळ नाहींशी होऊन फक्त त्यांनीं उचललेल्या कांहीं हलक्या धंद्यांमध्यें मात्र शिल्लक राहते. (३) जित लोकांना जेते आपल्या साम्राज्यांत सामील करून त्यांचा एक प्रांत बनवून त्यावर आपले सरदार व सैन्य पाठवून राज्य करतात व कांहीं व्यापारी व वसाहती लोकहि त्यांवरोबर येतात. हे लोक जित राष्ट्रांतील उच्च व वजनदार मध्यम वर्गाचे बनतात. ही क्रिया जर दीर्घकाल चालली तर जित राष्ट्रांतील लोक जेत्यांच्या भाषेचें व राहणीचें अनुकरण करतात. (४) कांहीं लोक परकीय देशामध्यें लहान लहान टोळयांनीं निरनिराळ्या वेळीं वसाहत करण्यास येतात व तेथें नोकरी–चाकरी करून किंवा लहान लहान धंदे करून राहतात. अशा वेळीं ते देश्य लोकांशीं मिसळण्याचा व त्यांची भाषा शिकण्याचा प्रयत्न करतात व आपलें पूर्वदेशीय वैशिष्टय टाकून देऊन देश्य लोकांशीं एकजीव होण्याची धडपड करीत असतात. असे लोक हळू हळू देश्य लोकांतच अंतर्भूत होतात व त्यांच्या मूळ भाषेचा देश्य भाषेवर कांहींहि परिणाम होत नाहीं. वरील प्रकारांमध्यें आपणास असें आढळून येईल कीं, पहिल्या व चौथ्या प्रकारामध्यें देश्य भाषेस प्रामुख्य मिळतें आणि दुसऱ्या व तिसऱ्या प्रकारामध्यें जेत्यांच्या भाषेस महत्त्व प्राप्त होतें व तिसऱ्या प्रकाराशिवाय बाकीच्या सर्व प्रकारांत बहुसंख्य लोकांची भाषा ही सामान्य भाषा बनते.

वरील प्रकारांत आपणांस चौथ्या प्रकारामध्यें वसाहतवाल्यांच्या मूळ भाषेंतील कांहीं वर्ण देश्यभाषेंतील कांहीं वर्णांबद्दल योजलेले आढळून येतील. परंतु ही क्रिया ओंपर्यंत ते मूळ भाषेस चिटकून राहतील तेंवपर्यंत दृष्टोत्पत्तीस पडेल. त्यांचीं मुलें लहानपणापासून जर देश्य भाषा शिकतील तर तीं आपल्या मूळ भाषेंतील लकबी अजीबात टाकून देतील व त्यामुळें त्यांच्या परकीयपणाचा देश्य भाषेवर कांहींच परिणाम होणार नाहीं. परंतु तिसऱ्या वर्गामध्यें जेव्हां एखाद्या राष्ट्रांतील सर्वच लोक दीर्घ कालामध्यें स्वतःची भाषा टाकून राज्यकर्त्यांची भाषा स्वीकारण्याचा प्रयत्न करतील तेव्हां त्यांच्या भाषेमध्यें वर्णव्यत्यासाचीं अनेक उदाहरणें आपणांस आढळून येतील व त्याचा त्या प्रदेशांतील एकंदर भाषेवर महत्वाचा परिणाम होईल.

**शब्दांची देवघेव**—अशा तऱ्हेनें जेव्हां दोन भाषा बोलणारे लोक एकत्र येतील तेव्हां त्या दोन भाषांतील कांहीं शब्दांची देवघेव होणें मात्र अपरिहार्य आहे. अशा तऱ्हेनें शब्दांची देवघेव कोणत्या प्रकारच्या शब्दांत होत असते हें आपण पाहूं. जेव्हां दोन भाषांचा संबंध येतो तेव्हां जर एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राची भाषा शिकत असेल तर त्या परकीय राष्ट्राच्या भाषेपेक्षां त्या राष्ट्राच्या देश्यभाषेवरच त्याचा परिणाम अधिक होतो. जेव्हां आपण एखादी परकीय भाषा बोलतों तेव्हां बोलण्यामध्यें आपण स्वभाषेंतील एकहि शब्द न आणण्याचा प्रयत्न करतों. परतु स्वतःची भाषा बोलत असतांना मात्र आपण तितकी काळजी घेत नाहीं. फेडरिक दि ग्रेट हा आपणांस फ्रेंच भाषा फार उत्तम येते म्हणून अभिमान बाळगीत असे, व त्याच्या फ्रेंच भाषेंतील लेखनांत एकहि जर्मन शब्द आढळत नसे. परंतु त्याचें जर्मन भाषेंतील लेखन मात्र अनेक फ्रेंच शब्द व वाक्प्रचार यांनीं भरलेलें आढळतें. कित्येकदा वक्ता परकीय भाषेंतील शब्द आपलें त्या भाषेच्या ज्ञानाचें प्रदर्शन करण्याकरितां घालीत असतो. आपणांकडील फारसा इंग्रजीचा गंध नसलेले हरिदासहि मधून मधून इंग्रजी शब्द कीर्तनांत उच्चारतांना आपणांस आढळतात. जेथें असे परकीय शब्द एखाद्या देश्य भाषेंत गेलेले आढळतात तेथें त्या बाबतीपुरता तरी परकीय भाषेचा त्या देश्य भाषेवरील श्रेष्ठपणा व्यक्त होतो. आतां अशी परकीय शब्दांची संख्या देश्य भाषेमध्यें नेहमींच पुष्कळ आढळते असें नाहीं. कित्येकदां ती फारच थोडी व कांहीं विशिष्ट बाबींपुरतीच आपणांस आढळून येईल. उदा. एखादा जिन्नस एका देशांत मुळींच तयार होत नसेल व तो परकीय देशांतून आणावा लागेल तर त्या पदार्थाचा वाचक शब्द त्या पदार्थाबरोबर त्या देशांत येईल. उदा. आपणांस शर्करा हा शब्द जगांतील अनेक भाषांत गेलेला आढळून येईल सं. शर्करा; फा. शकर; अर. सक्कर, आसक्कर, ग्री. सख्खर, लॅ. सॅक्करम्; इटा झुकेरो; जर्म. त्सुकर, जु. फ्रें. सुक; फ्रें सकर; इं शुगर; हिं. शक्कर, का. शक्करे, सक्करे; सिं. शकर. तसेंच कांहीं वनस्पती व प्राणी नवीनच एखाद्या देशांत प्रवेश करतांना आपलीं नांवें आपल्या बरोबर घेऊन येतात व तीं देश्य भाषांतून रूढ होतात. अननस, पपई, बांबू, कांगारू, जिराफ इत्यादि शब्द या प्रकारचे होत. जेव्हां एखाद्या राष्ट्राची संस्कृति दुसऱ्या राष्ट्रापेक्षां अधिक प्रगत असते तेव्हां त्या संस्कृतीबरोबर त्या भाषेंतील शब्दहि त्या हीन संस्कृतीच्या देशांत प्रवेश करतात. गणित, ज्योतिष वगैरे शास्त्रांतील पारिभाषिक शब्दांचें उदाहरण आपणांस या बाबतींत देतां येईल परकीय भाषेंतील शब्द घेणें कित्येकदा खरोखरीच जरूर असतें परंतु कांहीं प्रसंगीं तितकी जरूरी नसतांहि परकीय शब्द देश्य भाषेंत घुसलेले आपणास आढळतात या गोष्टीस कारण म्हटलें म्हणजे परकीय भाषेंतील शब्द योजून आपण फार शिष्ट आहों असें दाखविण्याची प्रवृत्ति किंवा परकीय भाषेंतूनच विचार करण्याची प्रवृत्ति हें होय. तसेंच कित्येकदां एखादी कल्पना अगर वस्तु प्रथम परकीय भाषेच्या द्वारें आपणास ज्ञात झाल्यास स्वभाषेंतील योग्य शब्दांत ती व्यक्त करण्याचे परिश्रम न घेतां केवळ आळसामुळेंच परकीय शब्दांतच ती व्यक्त करण्याची प्रवृत्ति कित्येक लोकांत आढळून येते. या गोष्टीस कित्येकदां भाषांतरकारहि जबाबदार असतात भाषादूषणाचें कारण अनेकदां वांशिक संस्काराच्या ऐवजीं संस्कृतिसंस्कार हेंच अधिक प्रभावशाली असतें. तथापि आपणास हीहि गोष्ट विसरून चालणार नाहीं कीं, परकीय शब्द घेतल्यानें भाषा अधिक समृद्ध होते व विचारांतील निरनिराळ्या छटा दाखविण्यास ती अधिक पात्र होते. यामुळें भाषाशुद्धीबद्दल गवगवा करणाऱ्या लोकांचें म्हणणें आपणास केव्हांहि सर्वच मान्य करतां येणार नाहीं. आतां कोणत्या तऱ्हेचे परकीय शब्द सामान्यत देश्य भाषेंत प्रवेश करतात हें पाहूं.—सामान्यत नामें, विशेषणें किंवा क्रियापदें अशा तऱ्हेचे मुख्य शब्दच परकीय भाषांतून घेण्याकडे प्रवृत्ति दिसते. सर्वनामें, शब्दयोगी अव्ययें, साहाय्यक क्रियापदें इत्यादि दुय्यम दर्जाचे शब्द बहुधा स्वीकारले जात नाहींत संख्यावाचक शब्द क्वचितच परकी भाषेंतून घेतले जातात, व असे घेतले गेलेच तर ते एखाद्या खेळासंबंधीं तदनुषंगानें आलेले आढळतात. उदा. इटिदांडूच्या खेळांतील बकट, रेंड, मुंड इत्यादि शब्द १,२,३ या संख्यांचे वाचक असून ते तेलगू भाषेंतून मराठींत आले आहेत. तसेंच सांकेतिक अथवा गुप्त भाषेकरितां म्हणून कांहीं परकी भाषेंतील संख्यावाचक शब्द व्यवहारांत आपणांस आढळतात उदा. आवाठ (२), उदाणु ( ३ ) इत्यादि नट भाषेंतील शब्द व्यापारी लोकांत रूढ आहेत शब्दयोगी अव्ययें व

उभयान्वयी अव्ययें वगैरे क्वचितच परकीय भाषेंतील घेतलीं जातात व अशीं घेतलीं गेल्यास आपणास त्या दोन भाषांचा संबंध विशेष झाला असला पाहिजे असें म्हणतां यईल उदा मराठी भाषेंत व आणि, कीं, ही फारसी भाषेंतील आलेलीं अव्ययें होत परकीय भाषेंतील शब्दांचा देश्य भाषेच्या व्याकरणावर कांहीं परिणाम होतो काय असा प्रश्न विचारला असता व्हिटने यांनीं त्यास जोराचें नकारार्थी उत्तर दिलें आहे व सामान्यत परकीय भाषेंतील शब्द घेतांना त्याचें विशिष्ट रूपच घेतलें जातें व त्याचें व्याकरण सामान्यत देश्य भाषेप्रमाणें होतें तथापि आपणास देश्य भाषेचें व्याकरण परकीय भाषेपासून सर्वस्वी अविकृत राहतें असें म्हणता यावयाचें नाहीं, तर आपणास कित्येक ठिकाणीं वाक्यरचनेवर परकीय भाषेचा परिणाम झालेला आढळतो व कित्येक वाक्प्रचारहि परकीय भाषेवरून देश्य भाषेमध्यें उत्पन्न होतात सध्याच्या इंग्रजी शिकलेल्या लेखकांच्या मराठी लिखाणात आपणास ही गोष्ट प्रत्यहीं आढळते कित्येक शब्द परकीय भाषेंतील शब्दाच्या भाषांतर रूपानें देश्य भाषेंत नवीन तयार हातात हातरुमाल, आभारांत ठेवणें, अभिनंदन करणें, ठराव मतास टाकणें इत्यादि उदाहरणें या प्रकारचीं होत याखेरीज उर्दू पिजिन इंग्लिश, चिनूक जार्गन, क्रिओल, बिशलेमार इत्यादि प्रकारच्या मिश्र भाषाहि भिन्न लोकांच्या व्यवहारामुळें उत्पन्न होतात

**भाषेचें बदलणारें स्वरूप**—एखाद्या राष्ट्रामध्यें एकच भाषा दीर्घकालपर्यंत प्रचलित असली तरी तिच्या स्वरूपामध्यें कालांतरानें बदल होत चाललेला आपणास आढळून येतो उदाहरणार्थ, आर्य लोक भरतखंडामध्यें आले त्यावेळीं जी संस्कृत भाषा बोलत होते तीस आर्ष अथवा वैदिक असें नाव आहे तिच्यामध्यें व रामायणमहाभारतकालीन संस्कृत भाषेमध्यें आपणास फरक आढळतो तसेंच कालिदासादिकांच्या काव्यग्रंथांच्या संस्कृत भाषेचें रूपहि आपणांस थोडेंसें भिन्न आढळतें व त्यानंतर तर त्याच लोकांचे वंशज प्राकृत व अलीकडे देश्य भाषा बोलू लागले आहेत हें आपण पहातों इंग्रजी ही एकच भाषा दीर्घकालपर्यंत बोलणाऱ्या इंग्रज लोकांच्या भाषेंतहि प्राचीन मध्यकालीन व अर्वाचीन अशीं तिचीं भिन्न स्वरूपें आपणास आढळतात ज्ञानेश्वरकालीन मराठी व आजचें मराठी यांतहि आपणास किती तरी फरक पडलेला दिसतो एवढेंच नव्हे तर स धूम, ग्री थ्युमस, लॅ फ्युमस, प्रा स्लॅव्हा दायम्यु गॉ दॉंस, प्रा इं डुस्ट-डुन्स्ट-डस्ट या शब्दांमध्यें कांहीं साम्य असेल अशी आपणास प्रथम कल्पना यावयाची नाहीं परंतु तौलनिक भाषाशास्त्रामध्यें जर कांहीं अर्थ असेल तर हे सर्व शब्द एकाच मूळ शब्दामध्यें उच्चारभेद उत्पन्न होऊन तयार झालेले आहेत हे उच्चारातील फरक प्रत्येक समाजामध्यें वरचेवर होत असतात भाषेमध्यें जर कांहीं स्थिर गोष्ट असेल तर तींतील मानसिक क्रिया अथवा स्मृतिचिन्हें ही होय या क्रियेचा ऐतिहासिक अभ्यास करणें शक्य नाहीं परंतु याच स्मृतिचिन्हांस आपण जें ध्वनिरूपानें व्यक्त स्वरूप देतों त्यामध्यें मात्र कालांतरानें सारखा फरक पडत असतो यावरून ध्वनींतील फरक अथवा उच्चारभेद म्हणजे या स्मृतिचिन्हांना व्यक्त स्वरूप देण्याच्या बाबतींत होणारा फरक होय व असा फरक समाजांतील निरनिराळया व्यक्तींमध्यें हळू हळू इतका पडत जातो कीं, एकाच शब्दाच्या उच्चारांतील ध्वनीमध्यें कांहीं पिढयांच्या अंतरानें पुष्कळच फरक पडतो व ज्याअर्थी आपणास असा फरक आढळतो त्याअर्थी तो शब्द उच्चारतांना त्या समाजांतील व्यक्ति आपल्या वागिंद्रियाची रचना दोन्ही वेळीं निरनिराळया प्रकारानें करीत असली पाहिजे विशिष्ट उच्चार करावयाच्या वेळची जी वागिंद्रियाची रचना तीसच वाक्पद्धति असें म्हणतात व उच्चारभेदाची मीमांसा करावयाची म्हणजे विशिष्ट समाजाच्या या वाक्पद्धतीचीच मीमांसा करणें होय प्रत्येक व्यक्तीच्या वागिंद्रियाची रचना स्वाभाविकत च अस्थिर असल्यामुळें त्या व्यक्तीनें केलेल्या उच्चारामध्यें थोडा बदल होण्याची संभवनीयता नेहमींच असते व हळू हळू हे बदल कायमचे होतात अशा तऱ्हेनें व्यक्तीच्या उच्चारामध्यें बदल होणें ही गोष्ट स्वाभाविक व न टाळता येणारी आहे व त्यामुळें विशिष्ट वाक्पद्धति बदलत असते आणि त्याबरोबर उच्चारभेद होत जातो

**ध्वनिनियम अथवा उच्चारभेदनियम**—हे भेद कांहीं विशिष्ट नियमास अनुसरून होतात त्यासच ' उच्चारभेदनियम ' किंवा स्वरनियम किंवा ध्वनिनियम असें नाव देण्यात येतें, व आधुनिक भाषाशास्त्रामध्यें यास फार महत्व देण्यात येतें याचें थोडक्यात स्वरूप सांगावयाचें म्हणजे असें सांगता येईल कीं, विशिष्ट भाषेच्या विशिष्ट कालीं उच्चारण्याच्या पद्धतीचें निरीक्षण करून केलेलें विधान म्हणजे ध्वनिनियम होय तसेंच विशिष्ट परिस्थितीमध्यें विशिष्ट शब्दाचा विशिष्ट उच्चार कसा होतो हेंहि आपणांस अशा ध्वनिनियमानें सांगतां येतें उदा पुढें जोडाक्षर आलें असता मागील ऱ्हस्व स्वरास गुरुत्व येतें किंवा त्यावर जोर पडतो जसें–सत्ता येथें स तील अ वर जोर येतो तसेंच ध्वनिनियमानें आपणास एकाच शब्दाचीं दोन निरनिराळया काळाचीं रूपें विशिष्ट तऱ्हेचीं असतात असें सांगता येतें उदा ज्ञानेश्वरकालीन औं ऐवजीं सध्या उ वापरण्याचा प्रघात आहे उदा म्हणौनी–म्हणून, विवरौनिया–विवरूनियां साडौनि–साडून इ तसेंच निरनिराळया भाषांतील शब्दांची तुलना करूनहि आपणांस विशिष्ट ध्वनिनियम तयार करतां येतात उदा स शत झें सातेम् ग्री हेक्तोन लॅ कॅंटम् गॉ हुंद, लिथु सिंतस् म्हणजे शभर, यावरून आपणांस असा नियम काढता यईल कीं, मूळ एका ध्वनीस संस्कृतमध्यें श, ग्रीकमध्यें क, लॅटिनमध्यें क,

जर्मनमध्ये ह, लिथुॲनिअनमध्ये स असें रूप प्राप्त होतें. अशा तऱ्हेनें विशिष्ट ध्वनीमध्ये निरनिराळ्या तऱ्हेचे फरक कसे पडत जातात हें पाहणें ही भाषाशास्त्रांतील एक महत्त्वाची गोष्ट होय, व या संशोधनास ऐतिहासिक व तौलनिक अशा दोन बाजू आहेत. व भाषाशास्त्राचें मूळ या ध्वनिविषयक संशोधनामध्येंच आहे, व अशा तऱ्हेचे बदल होण्याची निरनिराळ्या भाषांतील प्रवृत्ति जर आपणांस निश्चितपणें माहीत होणार नाहीं तर एकाच शब्दास भिन्न भिन्न कालांत व भिन्न भिन्न भाषेत जीं निरनिराळीं स्वरूपें प्राप्त होतात त्यांतील सादृश्य आपणांस निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. आपणांस वैदिक सोम व अवेस्ती होम हे शब्द एकच आहेत ही गोष्ट 'ह' हा विशिष्ट परिस्थितींत 'स' चाच उच्चारभेद आहे हा नियम ठाऊक असल्याशिवाय माहीत होणें शक्य नाहीं.

**ध्वनिनियमांचें निरपवादित्व**—भाषेतील फरक न कळत होत असतात ही गोष्ट वर सांगितलीच आहे. बोलणारी व्यक्ति शब्दाच्या उच्चारामध्यें ऐकणाराच्या किंवा स्वतःच्याहि फारसें लक्षांत येणार नाहीं इतका किंचित् फरक करूं शकते. म्हणजे प्रत्येक बोलणारा विशिष्ट अक्षराच्या प्रमाण मानलेल्या उच्चाराच्या जवळपास कोठें तरी उच्चार करण्याचा प्रयत्न करीत असतो व प्रत्येक वेळीं तें अक्षर उच्चारतांना तो तसाच उच्चार करण्याचा जाणूनबुजून प्रयत्न करतो. आतां निरनिराळ्या वेळच्या उच्चारांमध्यें कदाचित किंचित फरक भासण्याचा संभव आहे. परंतु तो इतकी काळजी घेतो कीं, त्या विशिष्ट उच्चारावरून प्रमाण उच्चाराचा बोध व्हावा. एवढी गोष्ट लक्षांत ठेवून आपणांस असें सामान्यतः विधान करतां येईल कीं, प्रत्येक मनुष्य विशिष्ट अक्षराचा एकच उच्चार करतो व ही गोष्ट जशी व्यक्तीच्या बाबतींत लागू पडते तशीच समाजाच्याहि बाबतींत खरी आहे. म्हणजे विशिष्ट समाज एका गृहीत धरलेल्या कालीं विशिष्ट उच्चार त्याच परिस्थितींत त्याच पद्धतीनें करीत असतो यासच लेस्किन, ब्रुगमन, ऑस्थॉफ, पॉल, सीव्हर्स वगैरे भाषाशास्त्रज्ञांच्या पंथानें ध्वनिनियमास अपवाद नसतो असें म्हटलें आहे. आतां ज्या ठिकाणीं आपणांस वारंवार अपवाद दिसून येतात त्या ठिकाणीं तसे दिसण्यास पुढील कारणांचा संभव असतो. (१) त्या ध्वनीवर त्याच शब्दांतील इतर शब्द, वाक्य अथवा आघात यांचा परिणाम झालेला असतो. किंवा (२) एखाद्या शब्दामध्यें आपणांस तो ध्वनि असल्यासारखा वाटतो तेथें वास्तविक तो निराळ्याच वर्गातील असून त्याची उपपत्तीहि भिन्न असते. (३) तो शब्द निराळ्याच भाषेतील उसना घेतलेला असून त्याचा उच्चार भाषेतील सामान्य उच्चारापेक्षां भिन्न असतो. (४) तो अपवादात्मक ध्वनि सामान्य ध्वनिनियमावरून बनलेला नसून दुसऱ्याच एखाद्या वर्गातील ध्वनीवरून केवळ सादृश्यावरून बनलेला असतो. वरील अपवाद सोडले असतां एका भाषेतील अमुक अमुक ध्वनीस विशिष्ट कालीं दुसऱ्या भाषेत अमुक स्वरूप प्राप्त होतें अशा तऱ्हेचें विधान करणें समर्थनीय ठरतें इतक्या गोष्टी लक्षांत ठेवून ध्वनिनियम हे अबाधित असतात असें म्हणता येईल व असें नसेल तर ध्वनींतील फरक जर कोणाच्याहि लहरीकरितां होत जातील तर भाषाशास्त्र हें शास्त्र या पदवीसच प्राप्त होणार नाहीं. ध्वनिनियम हे भौतिक शास्त्रांतील नियमासारखे नाहींत. कारण त्यांची व्याप्ति सार्वत्रिक नसते, तर केवळ विशिष्ट भाषेपुरतीच मर्यादित असते. ध्वनिनियम हे केवळ एका विशिष्ट परिस्थितीबद्दलचें विधान अथवा विधानपरंपरा असून त्यांस यापेक्षा अधिक व्यापक स्वरूप नसतें.

**भाषेत फरक पडण्याचीं कारणें**—या उच्चारभेदाचीं कारणें शोधावयाचीं असल्यास आपणांस विशिष्ट समाजाची वाक्पद्धति विशिष्ट वेळीं कशी बनत असते याचा विचार केला पाहिजे. पूर्वी सर्व उच्चारभेदांचें कारण मनुष्याचा स्वाभाविक आळस किंवा उच्चारसौलभ्य हें आहे असें समजण्यांत येत असे (श्लेषेर, व्हिटने). परंतु सुलभता व काठिण्य ह्या गोष्टी सापेक्ष आहेत. जी गोष्ट आपणांस एका वेळीं किंवा विशिष्ट परिस्थितीमध्यें कठिण वाटते तीच दुसऱ्या वेळीं वाटणार नाहीं. व संवयीनें कांहीं कठिण उच्चारहि आपण सहज काढूं शकतों व अपरिचित उच्चार आपणांस कठिण वाटतात, व कांहीं उच्चारभेद तर आपणांस सुलभतेपेक्षां काठिण्याकडेच झुकलेले आढळतात. कांहीं ग्रंथकारांनीं कर्णमाधुर्य किंवा नादबद्धता हें एक उच्चारभेदाचें कारण दिलें आहे (बॉप, ग्रेरर). परंतु बोलणाऱ्याकडून जे शब्दोच्चारामध्यें फरक होतात ते बहुतकरून मुद्दाम केलेले नसून नकळत होत असतात व असे जर कर्णमाधुर्याकरितां शब्दोच्चारामध्यें फरक होत गेले असते तर ती गोष्ट निरनिराळ्या व्यक्तींच्या लहरीवर अवलंबून राहून शब्दांच्या उच्चारामध्यें अगणित फरक होत जाऊन समाजामध्यें अनवस्था प्राप्त झाली असती. कांहींनीं हवामान हें एक उच्चारभेदाचें कारण दिलें आहे (ऑस्थॉफ). अर्थात हवामानाचा सामान्यतः राहणीवर, आयुष्यावर व संवयीवर परिणाम घडतो ही गोष्ट आपणांस मान्य केली पाहिजे. परंतु एकाच हवामानामध्यें राहणाऱ्या समाजाच्या भाषेमध्येंहि आपणास कालांतरानें फरक पडलेले दिसतात. त्यामुळें हें कारण आपणांस निश्चितपणें विशिष्ट तऱ्हेच्या उच्चारभेदास म्हणून देतां यावयाचें नाहीं. कांहीं भाषाशास्त्र्यांनीं उच्चारभेदाचें कारण लहान मुलें भाषा शिकत असतांना वडिलांपासून तीं ऐकून पुन्हां उच्चार करतांना ज्या चुका करतात तें होय असें प्रतिपादिलें आहे, (डार्मस्टेटर, पॅसी). ही गोष्ट खरी

मानेली तरी असें म्हणावें लागेल कीं, लहान मुलांना आपल्या समाजाची भाषा पूर्णपणें केव्हांहि शिकतां येत नाहीं. परंतु आपणांस ह्याच्या उलट अनुभव येतो, कारण लहान मुलांनीं केलेल्या ढोबळ चुका लवकरच दुरुस्त करतां येतात व साधारणतः मुलें ७।८ वर्षांचीं होईपर्यंत आपल्या भाषेंतील शब्दांचे निरनिराळे सर्व उच्चार व ध्वनी पूर्णपणें अवगत करून घेतात तसेंच एका पिढींतील सर्वच मुलें एकाच प्रकारच्या चुका कशा करतील? परकीय लोकांशीं संबंध हेंहि उच्चारभेदाचें एक कारण देण्यात येतें (हर्टे, वेस्लेर). यासंबंधीं बरेंचसें विवेचन आपण पूर्वी केलेंच आहे एकाच मानववंशाची वाक्पद्धति सामान्यतः एकाच स्वरूपाची असते व भिन्न वंशामध्यें जितकें अधिक अंतर असेल तितका त्यात फरक अधिक असेल वरील मत मर्यादित भाषेंतील निरनिराळ्या शाखांमध्यें– उदा० लॅटिन भाषेच्या निरनिराळ्या इटॅलियन, स्पॅनिश, फ्रेंच, प्रॉव्हेन्सल इ० पोटशाखांमध्यें– जे फरक पडले आहेत त्यांची उपपत्ति लावण्यास सयुक्तिक दिसतें व परकीयांचा संनिकर्ष हें एक भाषेंतील फरकांस बलवत्तर कारण आहे ही गोष्ट अलीकडील बहुतेक शास्त्रकारांस मान्य झाली आहे परंतु जेथें असा परकीयाचा संबंध येत नाहीं अशा भाषेमध्येंहि– उदा. इंग्रजी भाषेमध्यें–निरनिराळ्या काळांत जे अनेक फरक पडत गेले त्यांचें स्पष्टीकरण या उपपत्तीनें होत नाहीं. अशा तऱ्हेचे फरक पडण्यास मनुष्याचा व्यवसाय अथवा धंदा हें एक कारण पुढें करण्यात येतें विशिष्ट व्यवसायांतील मनुष्य नेहमीं आपल्या शरीराच्या विशिष्ट अवयवाचा उपयोग वारंवार विशिष्ट तऱ्हेनें करीत असतो. त्यामुळें त्याच्या अवयवांची रचना व त्याच्या शारीरिक संवयी यांस एक विशिष्ट वळण लागतें ह्या सवयींचा त्याच्या वागिंद्रियावरहि परिणाम होत असला पाहिजे व त्यामुळें त्याची वाक्पद्धतीहि विशिष्ट प्रकारची बनत असली पाहिजे एखाद्या मनुष्यास आपल्या धंद्याच्या निमित्तानें एकसारखें मोठ्यानें ओरडावें लागत असल्यास त्याच्या आवाजावर त्या ओरडण्याचा परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. तसेंच पुष्कळ गोंगाट असलेल्या ठिकाणीं काम करावयाचें असल्यास किंवा नेहमीं दूर अंतरावरून दुसऱ्याशीं बोलावयाचा प्रसंग आल्यास सामान्यत हळू होत जाणारे उच्चार या व्यक्तींच्या बाबतींत ऐकू न आल्यामुळें जरा मोठे होतात व स्वरांस–विशेषत ज्यावर आघात आहे अशा अक्षरांतील स्वरांस–या लोकांच्या भाषेंत प्रामुख्य मिळतें व त्यामुळें त्यांच्या सामान्य वाक्पद्धतीवरहि त्याचा परिणाम होतो. तसेंच देशामध्यें युद्ध वगैरेसारखी एखादी मोठी खळबळ झाली किंवा सामाजिक अगर धार्मिक क्रांति झाली, दुष्काळ वगैरेसारखी आपत्ति आली तर समाजाच्या आयुष्यक्रमांत जो गोंधळ होतो व विस्कळितपणा उत्पन्न होतो तोहि या उच्चारभेदास कारण होतो. एकंदरींत पाहतां वंश, हवामान, व्यवसाय, वागिंद्रियाची रचना, व्यक्तिगत उच्चारभिन्नता, ऐतिहासिक व सांस्कृतिक परिस्थिति, उच्चारसुलभतेकडे प्रवृत्ति, मानवस्वभाव, अनुकरणप्रियता, परकीयांचा सहवास, आनुवंशिक संस्कार, यात पुन्हा (अ) बाह्यस्वरूपविषयक, अथवा भिन्न प्रकृतिमूलक, (आ) अंत प्रवृत्तिमूलक–हवामान, रोग, अनैतिक आचरण इ पासून होणारे, (ई) जातिसंकरज इत्यादि यामुळें भाषेमध्यें फेरबदल नेहमीं पडून येत असतात. यांपैकीं प्रत्येक व सर्वांचाच मनुष्याच्या व समाजाच्या राहाणीवर व संवयीवर व त्यामुळें भाषेवर थोडाबहुत परिणाम होतो ही गोष्ट आपणास मान्य केली पाहिजे

**उच्चारभेदांचे प्रकार**—हे ध्वनिविषयक फरक दोन प्रकारचे असतात, निरपेक्ष व सापेक्ष उदा (१) शब्दाचा उच्चार करण्याची निरनिराळ्या लोकांतील भिन्न पद्धति अथवा वाक्पद्धतींतील भेद यामुळें होणारे फरक उदा. मराठीमध्यें आपण व आणि व हीं अक्षरें निरनिराळ्या तऱ्हेनें उच्चारतों पण बंगालीमध्यें दोहोंचाहि उच्चार व प्रमाणेंच करतात किंवा बचा उच्चार ओंसारखा करतात. (२) आघातांतील फरक यामुळें तर फारच महत्त्वाचे व निरनिराळ्या प्रकारचे फरक होतात प्रत्येक वर्णाच्या उच्चाराच्या इतिहासामध्यें त्यावर आघात असेल किंवा नसेल त्या मानानें त्याच्या रूपांतराची दिशा अगदीं भिन्न भिन्न असते. प्रसिद्ध व्हर्नेरचा नियम या आघातवैशिष्ट्याचेंच उदाहरण आहे तसेंच इंग्रजी भाषेंतील धातूंचीं स्वरभेदानें होणारीं निरनिराळ्या काळचीं रूपें (सिंग, सँग, संग) हीं आघातभेदामुळेंच होतात या आघातभेदामुळें अनेक प्रकारचे फरक होतात त्यांचें येथें विस्तृत विवेचन करण्यास जागा नाहीं, पण निर्देश करतों– (अ) स्वरद्वीकरण (डिफ्थाँगायझेशन), (आ) द्वंद्वस्वरैकीकरण (मानाफ्थाँगायझेशन), (इ) स्वरलोप, (ई) द्वित्वीकरण, (उ) वर्णनिमज्जन, (ऊ) विभिन्नीकरण, (ऋ) वर्णलोप, (ॠ) वर्णागम वगैरे. हे फरक निरपेक्ष असतात याखेरीज प्रत्येक भाषेंत उच्चाराच्या बाबतींत कांहीं सापेक्ष फरक होत असतात. म्हणजे एका वर्णाशेजारीं दुसरा वर्ण आला असता कांहीं परिस्थितींत त्या वर्णांत फरक होतो (१) गुण, वृध्दि व संप्रसारण हे संस्कृत शब्दांमध्यें आपणांस दिसतात, (२) अन्त्यलोप– यावत्–जों, कटक–कडें, (३) स्वरलोप– गम्–जग्मुः, (४) सान्निध्य परिणाम–पुनश्चर्वण, (५) स्वरागम– स्त्री–अस्तुरी, (६) स्वरभक्ति– स्वत.–सवता, –त्रास तरास, वर्ष–वरीस, इन्द्र–इन्दर, (७) अवयवलोप–सुकें केळें–सुकेळें, (८) वर्णलोप– जीवन–जिणें, (९) वर्णव्यत्यास–मराहट्ट–महट्टर, लघु–हलु इत्यादि.

ग्रिमचें सूत्र हाहि एक महत्त्वाचा ध्वनिनियम आहे. त्यामध्यें इंडोयुरोपीय अथवा मूळ आर्यन् भाषेंतील वर्णांचें ग्रीकमधून गॉथिक भाषेंत व नंतर जर्मन भाषेंत जातांना रूपांतर कसकसें होत जातें तें दाखविलें आहे. उदा. इंडोयुरोपीय भाषांतील प, त (ट), क या वर्णांबद्दल गॉथिक अथवा प्राचीन भाषांत अनुक्रमें फ, थ, ह हे वर्ण येतात व नंतर त्यांचे जागीं उच्च जर्मन भाषेंत ब, द, ग हे वर्ण येतात. यांतच पुढें थोडी दुरुस्ती करून व्हर्नरनें असें दाखविलें कीं संस्कृत भाषेंतील प, त, क या वर्णांपूर्वी असलेल्या वर्णावर जर आघात नसेल तर त्यांचें रूपांतर फ, थ, ह मध्यें होऊन लागलीच ब, द, ग मध्यें होतें. तसेंच संस्कृत शिवा आर्यन् भाषेंतील युरोपीय एसहरा अपूर्वी येणाऱ्या कण्ठ्य वर्णांबद्दल तालव्यवर्ण येतात. हा तालव्य नियमहि महत्त्वाचा आहे.

सादृश्यमूलक भेद—ध्वनिविषयक नियमांप्रमाणेंच सादृश्य हेंहि ध्वनिविषयक फरक घडवून आणण्यास कारण होतें. आपण शब्दांतील उच्चारांमध्यें फरक झालेली अशीं दोन उदाहरणें घेतलीं कीं एकामध्यें ध्वनीबरोबरच अर्थामध्यें फरक झालेला आहे व दुसऱ्यामध्यें केवळ ध्वनींतच फरक झाला असून अर्थ कायम राहिला आहे. तर आपणांस असें आढळून येईल कीं, दुसऱ्या उदाहरणांत ध्वनिविषयक नियम हें फरकाचें कारण असून पहिल्या उदाहरणांत सादृश्य हें कारण असण्याचा संभव आहे. ज्या भाषेचें आपणांस साधारण ज्ञान आहे त्या भाषेमध्यें बोलत असतांना आपल्या मनांतील निरनिराळ्या तऱ्हेचे विचार व्यक्त करतांना शब्दांचीं निरनिराळीं रूपें आपणांस सहज बनवितां येतात. परंतु अशा तऱ्हेनें विशेषणांचीं क्रियाविशेषणें बनविणें, क्रियापदाचीं निरनिराळीं रूपें बनविणें किंवा नामांचीं लिंग–वचन–विभक्तीप्रमाणें निरनिराळीं रूपें बनविणें ही गोष्ट आपणांस केवळ स्मरणशक्तीच्या साहाय्यानें बिनचूक रीतीनें करतां येते असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. कोणाच्याहि स्मरणामध्यें सर्व तऱ्हेचीं रूपें राहणें शक्य नाहीं. हीच गोष्ट भाषेंतील सर्व शब्दांच्या ज्ञानाच्या अशक्यतेबद्दल पतंजलीनें सांगितली आहे. 'बृहस्पतिरिन्द्राय दिव्यं वर्षसहस्रं प्रतिपदोक्तानां शब्दानां शब्दपारायणं प्रोवाच नान्तं जगाम।' (पा. महा. १.१.१). या गोष्टीची तितकी जरूरहि नाहीं. कारण मनुष्य बोलतांना शब्दाचीं योग्य तीं रूपें बनविण्याची प्रवृत्ति त्यास स्वाभाविकच होऊन त्याच्या स्मरणांत नसलेलीं रूपेंहि तो वापरतो. हीं बनवितांना तो कांहीं प्रत्ययहि योजतो. त्यावेळीं जर प्रत्येक वेळीं त्यास स्मरणशक्तीचा उपयोग करणें जरूर पडेल तर त्यास न चाचपडतां बोलतांच येणार नाहीं. वस्तुस्थिति अशी असते कीं, आपल्या स्मरणांत फारच थोडीं शब्दांचीं रूपें तयार असतात. परंतु त्यांवरून आपणांस सर्वसामान्य रीतीनें जरूर तीं शब्दांचीं रूपें बनवितां येतात. याच क्रियेस सादृश्य हें नांव आहे. आपल्या बोलण्यामध्यें विशिष्ट कार्य करणारे कांहीं प्रत्यय असतात व वेळेवर विचाराबरोबरच त्याची उपस्थिति मनामध्यें होऊन आपल्या भाषणांत आपण त्यांची योजना करतों. यावरून आपल्या भाषणांत व्यवहारामध्यें आपण स्मरणशक्तीपेक्षां सादृश्य या गोष्टीचाच वास्तविक अधिक उपयोग करतों. अशा तऱ्हेनें बनविलेलीं बहुतेक रूपें शुद्ध असतात परंतु कित्येकदां मनावर कांहीं विशिष्ट संस्कार होऊन एकाच पिढीनें वापरलेल्या रूपांमध्यें व दुसऱ्या पिढीनें वापरलेल्या रूपांमध्यें फरक पडण्याचा संभव असतो. विशिष्ट रूप हें शुद्ध किंवा अशुद्ध ठरविणें हें त्या वेळच्या त्या समाजाच्या रूढीवर अवलंबून असतें. जीं रूपें रूढ आहेत तीं शुद्ध समजण्यांत येतात व रूढ नसलेलीं अशुद्ध समजलीं जातात. परंतु दोन्हीही रूपें एकाच पद्धतीनें बनविलेलीं असतात. विशिष्ट व्यक्तीनें वापरलेलें विशिष्ट शब्दाचें रूप रूढ रूपापेक्षां भिन्न किंवा अशुद्ध असण्याचें कारण त्याच्या मनांतील त्या रूपाच्या कल्पनेशीं इतर गोष्टींचें असलेलें साहचर्य व इतर समाजाच्या मनांतील साहचर्य यामध्यें असलेला फरक हें होय. अशा तऱ्हेचे कल्पनासाहचर्यावरून बनलेले निरनिराळे शब्द किंवा रूपें आपणांस प्रत्येक भाषेच्या इतिहासांत निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या तऱ्हेनें बनलेलीं आढळतात. आपल्या मनामध्यें विशिष्ट शब्दांचें निरनिराळ्या वर्गांशीं कल्पनासाहचर्य असतें. उदा. (१) त्या शब्दाचा अर्थ, (२) त्याचें व्याकरणविषयक कार्य, (३) स्वरूपसाम्य इ. जेव्हां विशिष्ट शब्दाच्या रूपामध्यें एकापेक्षां अधिक गोष्टींचें साहचर्य असेल तेव्हां त्याचें रूप शुद्ध बनण्याचा अधिक संभव असतो. यांतील अर्थविषयक साहचर्य पुढीलप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेचें असूं शकेल – (१) आप्तसंबंध– पिता, माता, बंधु, सखा इ. (२) ऋतुमानविषयक– उन्हाळा, पावसाळा, हिंवाळा इ. (३) प्राण्यांचीं नांवें– (अ) जंगली–सिंह, वाघ वगैरे, (आ) पाळींव–कुत्रा, मांजर वगैरे. याप्रमाणें आपण शब्दाच्या निरनिराळ्या विभक्ती, क्रियापदांचें कार्य वगैरेंचे गट कल्पून आपल्या स्मरणांत ठेवतों व अशा तऱ्हेनें बोलणाऱ्याच्या मनांत भाषेंतील प्रत्येक शब्द कोणत्या तरी विशिष्ट गटांत अंतर्भूत असतो व त्याचा अर्थ त्याशीं संबद्ध असतो. या आपल्या गटास आपण साहचर्यसंघ म्हणूं. दुसऱ्या तऱ्हेचा साहचर्यसंघ व्याकरणविषयक किंवा वाक्यांतील कार्य यावरून बनलेला असेल. याच्या साहाय्यानें आपण नामांचीं अनेकवचनें, विशेषणांचीं क्रियाविशेषणें वगैरे बनवितों. अशाच तऱ्हेच्या कालविषयक साहचर्यसंघावरून आपण क्रियापदाच्या निरनिराळ्या काळांचीं रूपें बनवितों. उदा. धरणें–धरलें, भरणें–भरलें,

परंतु आपणांस कित्येकदां जीं अशुद्ध रूपें बनलेलीं आढळतात तींहि वास्तविक याच पद्धतीनें बनविलेलीं असतात. आपण अशुद्ध रूपांस सदोषसादृश्यानें बनविलेलीं असें म्हणतों परंतु तीं बनविणारा आपल्या दृष्टीनें शुद्ध म्हणूनच बनवीत असतो. परंतु परिणाम मात्र आपणास निराळाच झालेला आढळतो. उदा. मरणें याचें भूतकालवाचक मेला हें रूप पाहून त्यावरून एखाद्यानें चरणें याचें जर चेला असें रूप केलें तर त्यास अशुद्ध म्हणूं परंतु त्यांत त्याच्या पद्धतीचा दोष नसून त्यास चरणें याचें चरला, सरणें याचें सरला अशा तऱ्हेचीं रूपें बनतात व मरणें व चरणें हीं दोन क्रियापदें एका गटांतील नसून भिन्न गटांतील आहेत ही गोष्ट माहीत नसते व त्यामुळें माहीत असलेल्या रूपावरून व सादृश्यावरून तो भलतेंच रूप बनवितो एवढेंच. अशा तऱ्हेनें जेव्हां आपणांस एखादा मनुष्य अशुद्ध अथवा भलतेंच रूप वापरतांना आढळतो तेव्हां त्यासहि वास्तविक कांहीं कारण असतें व तें कारण शोधून काढणें म्हणजे त्याच्या मनांतील कल्पनासाहचर्य शोधून काढणें ही गोष्ट मोठी मनोरंजक आहे. जर हें साहचर्य आपल्या मनांतील साहचर्यापेक्षां भिन्न असेल तर सादृश्यामुळेंच तो मनुष्य निराळेंच रूप बनवील ही गोष्ट उघड आहे. आतां विशिष्टशब्दाचें रूप शुद्ध कोणतें हें त्या शब्दाशीं संबध असलेल्या शब्दांच्या गटांवरून किंवा तें रूप भाषेमध्यें वारंवार वापरलें जाण्यावर अवलंबून असतें. स्वीट यानें असें दाखविलें आहे कीं, शब्दांचीं जीं अपवादात्मक रूपें भाषेमध्यें रूढ असतात तीं बहुधा अतिशय सामान्य अथवा नेहमीं वापरल्या जाणाऱ्या शब्दांचींच शिल्लक राहातात. क्वचित आढळणारीं रूपें हळु हळू सामान्य शब्दांच्या कक्षेंत येण्याचा संभव अधिक असतो. एकाच वाक्प्रचारात आढळणाऱ्या शब्दांमध्येंहि अशीच साहचर्याची कल्पना उद्भूत होते. एकाच धातूपासून बनलेल्या शब्दाचीं कांहीं परिस्थितीमध्यें इतकीं भिन्न रूपें होतात कीं, त्यांचें मूळ एकच असेल असें वाटेनासें होतें अशा वेळीं तो शब्द आपल्या मूळच्या गटांतून निघून दुसऱ्याच गटात सामील होतो. कित्येकदां असें प्रतिपादण्यांत येतें कीं; ध्वनिविषयक फरकांच्या नियमांमध्यें सादृश्यामुळें घोटाळा होण्याचा संभव असतो. परंतु वास्तविक असें असतें कीं ध्वनिविषयक नियम आपलें कार्य नियमितपणें करीतच असतात. परंतु कांहीं बाबतींत कल्पनासाहचर्याचा जोर इतका असतो कीं, त्यामुळें विशिष्ट शब्दाचें तशाच तऱ्हेच्या रूपांतर न पावलेल्या शब्दाच्या सादृश्यामुळें पुन्हां मूळ रूपाकडे परावर्तन होतें. अशा वेळीं रूपांतर-पावलेला व मूळ रूपांतील असे दोन्ही शब्द भाषेमध्यें रूढ होतात व कित्येकदां ते किंचित् भिन्न अर्थांनीं वापरले जातात व त्यांच्या रूपामध्यें जितकें अंतर अधिक असेल तितकें त्यांच्या अर्थामध्यें अधिक अंतर राहण्याचा संभव असतो. हीं सादृश्यमूलक रूपें बनण्याची क्रिया प्रत्येक भाषेच्या इतिहासामध्यें आपणास सर्व कालांत आढळून येते व त्यामुळें भाषेमध्यें कांहींसें स्थैर्य आणण्याचें कार्य व त्याबरोबरच नवीन नवीन साहचर्यांतव बनवून त्यांपासून नवीन नवीन प्रकार बनविण्याचें कार्य प्रत्येक जिवंत भाषेमध्यें चालु असतें. हीं नवीन साहचर्यें प्रथम एखाद्या व्यक्तीच्या मनांत उत्पन्न होतात व त्याचा एकंदर समाजाच्या मनावर जितक्या मानानें परिणाम होईल त्यावर तन्मूलक शब्दरूपें भाषेंत कायम राहणें अगर न राहणें हें अवलंबून असतें. जर व्यक्तिविषयक साहचर्यकल्पनेचा समाजावर कांहींचपरिणाम झाला नाहीं तर तन्मूलकरूपें समाजांतील व्यवहारामध्यें लुप्त होतात. तसेंच ज्याप्रमाणें एका समाजामध्यें ध्वनिविषयक फरक पडण्याची विशिष्ट प्रवृत्ति आढळते त्याप्रमाणें या कल्पनासाहचर्याची व सादृश्यमूलक रूपें बनविण्याची पद्धति विशिष्ट समाजामध्यें भिन्न भिन्न असते. व त्या त्या प्रमाणें त्याच्या बोली अथवा पोटभाषा बनत असतात जेव्हां आपणांस अशा भिन्न साहचर्यकल्पना असलेल्या लोकांच्या बोलींतील कांहीं निराळीं शब्दरूपें बनलेलीं आढळतात तेव्हां आपण त्यांस अशुद्ध किंवा व्याकरणदुष्ट म्हणतों. परंतु आपण त्यावेळीं अशा तऱ्हेनें शब्दांच्या रूपांची शुद्धता ठरविण्यास वास्तविक कोणतेंच प्रमाण नसतें ही गोष्ट विसरतों विशिष्ट बोलीमध्यें विशिष्ट साहचर्यकल्पना प्रचलित असतात. व त्या सर्व समाजास सामान्य असतात. त्यामुळें तन्मूलक बनलेलीं रूपें त्या भाषेपुरतीं शुद्ध असतात. त्यामुळें एखाद्या समाजाची भाषा शुद्ध रीतीनें बोलणें म्हणजे त्या समाजांतील या साहचर्य कल्पनाचें पूर्णपणें ग्रहण करणें होय. कोणत्याहि भाषेच्या इतिहासाचा अभ्यास करतांना आपणास या तऱ्हेचीं ध्वनिनियमापेक्षा सादृश्यमूलक रूपें बनलेलीं वारवार आढळतात व अशा वेळीं आपलें काम त्या साहचर्यकल्पनांचा संबंध शोधून काढणें हेंच होय. हे सर्वहि वारवार बदलत असून निरनिराळ्या कालीं निरनिराळे सप बनण्याची प्रवृत्ति असते व ही क्रिया प्राचीन आर्यकालापासून आजतागायत चालुच आहे.

**वाक्यविषयक व अर्थविषयक फरक**--ध्वनिविषयक पद्धतशीर फरक हा प्रथम निरनिराळ्या वैयक्तिक अनुभवांवरून ज्ञात होतो. परंतु अशा तऱ्हेनें आपणास त्याची अनेक उदाहरणांवरून एकदां जाणीव झाली म्हणजे समाजांत तो नियमितपणें रूढ झालेला आपणास आढळून येतो. व हा प्रकार आपणास केवळ ध्वनीमध्येंच आढळतो असें नव्हे तर स्वरापात, उच्चनीचत्व, न्हस्वदीर्घत्व व मदुगुरुत्व इत्यादि गोष्टींतहि आढळतो तेव्हां हा ध्वनिविषयक फरक केवळ शब्दांच्या उच्चारामध्येंच होत असेल व त्याचा अर्थावर परिणाम होत नसेल तेव्हां त्यास आपण केवळ ध्वनिविषयक फरक असें म्हणतो. उदा.

करोनि–करून, म्हणौनि–म्हणून, दिधला–दिला, इत्यादि फरक अर्थभेदास कारण होत नाहीत. परंतु जेव्हां स्वरभेदाबरोबर अर्थभेदहि होत असेल तेव्हां त्यास केवळ ध्वनिविषयक फरक असें म्हणतां येणार नाहीं. याप्रमाणें शब्दाच्या उच्चारभेदाबरोबर अर्थभेद झाल्याचीं उदाहरणें आपणांस अनेक देतां येतील. कधीं कधीं एकाच शब्दाच्या उच्चारभेदामुळें त्याच्या दोन स्वरूपांत अर्थभेदहि झालेला आपणांस आढळून येतो. उदा. टाळ (राख), टाहळा (पत्र), फाळ (नांगराचा) फाळा (पट्टी) कित्येकदां वाक्यरचनेच्या बाबतींतहि कालांतरानें आपणांस फरक झालेला दृष्टीस पडतो. अर्थभेदाच्या बाबतींत आपणांस एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, जरी विशिष्ट शब्दास एखाद्या भाषेमध्यें विशिष्ट कालीं विशिष्ट अर्थ रूढ असला तरी त्या शब्दाच्या स्वरूपामध्य व अर्थामध्यें स्वाभाविक किंवा अंतस्थित असा कांहींच संबंध नसतो. यामुळें शब्दाच्या स्वरूपांत बदल होण्याचें व अर्थांत बदल होण्याचें कार्य स्वतंत्र रीतीनेंहि होत असण्याचा संभव आहे. कित्येकदां शब्दांच्या स्वरूपांत बदल होईल पण अर्थ जुनाच कायम राहील, व या दोन फरकांमध्यें परस्परसंबंध कोणताच नसेल व अशा तऱ्हेनें शब्द व त्याचा अर्थ हीं इतकीं निगडित नसतात ही गोष्ट आपणांस भाषेचा ऐतिहासिक अभ्यास केला असतां दिसून येईल व यामुळेंच आपणांस जेथें शब्दाच्या स्वरूपामध्यें बदल होणें किंवा न होणें यावर अवलंबून नसलेला अर्थामध्यें बदल झालेला आढळतो तेव्हां त्यास आपण अर्थभेद असें नांव देतों. याप्रमाणें जरी आपण भाषेंतील फरकांचे ध्वनिविषयक, स्वरूपविषयक, वाक्यविषयक व अर्थविषयक असें वर्गीकरण केलें तरी हे एकमेकांशी इतके संबद्ध किंवा मिश्र असतात कीं, त्यांची एकमेकांवरील व्याप्ति आपणांस टाळतां येणें शक्य नसतें. उदा. आपणास कांहीं शब्द असे आढळतात कीं, ज्यांचा उच्चार व अर्थहि जवळ जवळ सारखेच असतात व त्यामुळें आपण त्यांचा एकमेकांशीं संबंध जोडतों. परंतु त्यांमध्यें कोणत्याहि तऱ्हेचा ऐतिहासिक संबंध नसतो. उदा. इं. स्पॅरोग्रास व ॲस्परागस. या प्रकारास लौकिक व्युत्पत्ति असें नांव देतात. या लौकिक व्युत्पत्तींमध्यें ध्वनिविषयक, अर्थविषयक किंवा ध्वनि व अर्थविषयक अशा कोणत्या तरी एका प्रकारचें सादृश्य मुळाशीं असतें. मनुष्याची प्रवृत्ति मनामध्यें निरनिराळ्या शब्दांचे गट अथवा संघ बनविण्याकडे असते व एखादी शब्द त्यास भानगडीचे वाटतात. त्यामुळें आकस्मिक सादृश्यामुळें कांहीं शब्द भलत्याच गटामध्यें अंतर्भूत केले जातात. ही गोष्ट विशेषत. परकीय भाषेतून घेतलेल्या शब्दाच्या बाबतींत आपणास आढळून येते. तथापि ज्या शब्दाची व्युत्पत्ति माहीत नाहीं व जे फारसे प्रचारांत नसतात अशा स्वभाषेंतील शब्दांच्याहि बाबतींत घडून येते अशा तऱ्हेचीं लौकिक व्युत्पत्तीचीं उदाहरणें सर्व भाषांतून कमीजास्त प्रमाणांत आढळून येतात. अशा तऱ्हेच्या लौकिक व्युत्पत्तीचें वर्गीकरण करणें कठिण आहे. तथापि त्यांचे पुढें दिल्याप्रमाणें तीन प्रकार करतां येतील, (१) ध्वनि व अर्थविषयक सादृश्यमूलक, (२) केवळ ध्वनिविषयक सादृश्यमूलक, (३) केवळ अर्थसादृश्यमूलक.

**गौरवोक्ति अथवा पर्यायोक्ति**—या लौकिक व्युत्पत्तींसारखाच औचित्य, भीति, सभ्यपणा इत्यादिबद्दलच्या आपल्या मनांत ज्या कल्पना असतात त्यामुळें शब्दाच्या अर्थांत फरक घडून येतो. ज्या शब्दाचा अर्थ अपवित्र, विनाशक अप्रिय, त्रासदायक, अधार्मिक इ. प्रकारचा असेल तेथें त्याच्या स्वरूपामध्यें फरक पडण्याची प्रवृत्ति आढळते. यास सदुक्ति ग्राम्यतापरिहार, किंवा गौरवोक्ति असें नांव देतां येईल. ही प्रवृत्ति आपणास सुसंस्कृत व असंस्कृत सर्वच लोकांत आढळते. व याचें कारण त्या शब्दाचा त्या प्रत्यक्ष वस्तूशीं संबंध जोडण्यांत येऊन त्या वस्तूचें अप्रियत्व त्या शब्दासहि जोडण्यात येतें हे होय. या प्रकारामुळें शब्दामध्यें पुढील तऱ्हेचे फरक घडून येतात (१) ध्वनिविषयक भेद, उ. परसाकडे–परशुराम पाटलाकडे, लघवी,–लघुशंका, (२) समानार्थक शब्दप्रयोग बैल–गाईंचे प्राणनाथ, धेनुवल्लभ; लठ्ठ–स्थूल (३) नास्त्यर्थक शब्दप्रयोग दरिद्री–निष्कांचन, विराळ–अशुचिता, अशौच इत्यादि

**अर्थमूलक शब्दस्वरूपभेद**—शब्दामध्यें रूपभेद व्हावयाचे अनेक प्रकार आहेत हे करतांना करणाऱ्याच्या मनांत शब्दाच्या स्वरूपामध्यें फरक करावयाचा ही गोष्ट प्रामुख्यानें नसते. विशिष्ट शब्दाच्या अर्थामध्यें कालांतरानें असा फरक पडतो कीं, त्या शब्दाच्या मूळ स्वरूपामध्यें तो अर्थ व्यक्त करण्याचें पूर्ण सामर्थ्य नाहीं असें वाटू लागतें व ही उणीव भरून काढण्याकरितां मनुष्य आपल्याभतानें त्या शब्दाच्या स्वरूपांत बदल घडवून आणतो. किंवा शब्दाच्या मूळ स्वरूपाबद्दलचीच कल्पना कांहीं कालांतरानें बदलते व विशिष्ट अर्थ व्यक्त करण्यास तें विशिष्ट स्वरूप अयोग्य वाटून त्यामध्यें फरक घडवून आणण्याची प्रवृत्ति होते. उदा. (१) कधीं कधीं मूळ शब्दांतील कांहीं भाग प्रत्ययरूपी आहे अशी समजूत होते. व त्यामुळें नवीनच स्वरूपांत एखादा नवीन शब्द त्या मूळ शब्दापासून तयार करण्यांत येतो. उदा. असुर–सुर–भूसुर; अदिती–दिती–दैत्य, (२) कित्येकदां प्रत्यय हाच मूळ शब्दांत सामील होतो व अशा तऱ्हेनें नवीनच शब्द बनविला जातो. तिळेल तैल, खोबरेल तेल; (३) कित्येकदां कांहीं स्वतंत्र शब्दास लाक्षणिक अर्थानें प्रत्ययाचें स्वरूप येतें व त्यावरून अनेक शब्द बनविण्यांत येतात. उदा.

वाहन=वाहन, घोडा वगैरे मनुष्य किंवा सामान वाहणारा यावरून कार्यवाह ( चिटणीस ), भारवाही ( कुटुंबाचा पोषणकर्ता ). ( ४ ) कित्येकदां एखाद्या सामासिक शब्दाची रचना मूळ कशी झाली आहे तें न समजतां निराळ्याच तऱ्हेनें बनली असावी अशी कल्पना होऊन त्यामुळें कांहीं शब्दांच्या स्वरूपांत बदल होतो. ( उदा. इं. चाइल्डहुड, स्टेडफास्ट ). कित्येकदां परकीय भाषेंतील उपसर्ग किंवा प्रत्यय उसने घेतल्यानेंहि शब्दामध्यें बदल झालेले आढळतात.

**शब्दस्वरूपभेदांचा वाक्यरचनेवर परिणाम**--अशा तऱ्हेनें शब्दाच्या स्वरूपांत बदल होत गेले म्हणजे ज्याप्रमाणें ध्वनिविषयक फरकामुळें शब्दांमध्ये स्वरूपविषयक फरक होतात तसे भाषेमध्यें वाक्यरचनेच्या बाबतींतहि फरक होतात. उदा. द्विवचन व प्रथमेचें एकवचन ही रूपें आतां मराठींतून अजिबात नाहींशीं झालीं आहेत. किंवा विभक्तीचें कार्य शब्दयोगी अव्ययांकडूनहि सध्यांच्या मराठी भाषेंत होतें. तथापि ध्वनिविषयक किंवा स्वरूपविषयक बदल होण्यापेक्षां वाक्य रचनाविषयक बदल होण्याची क्रिया अधिक मंद असते.

**शब्द व अर्थांतरप्राप्ति**—आपण वर पाहिलेंच आहे कीं, शब्दाच्या स्वरूपांतील ध्वनिविषयक फरक व त्याच्या अर्थांतील फरक याची गति भिन्न भिन्न असून त्यांचा परस्पराशीं संबंध असतोच असें नाहीं. उदा. सं. ग्रंथि, म. गांठ यामध्यें रूपभेद झाला असला तरी अर्थभेद झालेला आपणांस दिसत नाहीं. विशिष्ट शब्दाला विशिष्ट अर्थ कसा प्राप्त होतो यासंबंधीं सर्वसामान्य अथवा निश्चित नियम आपणांला सांगतां येणार नाही. भाषा जेव्हां प्रथम तयार झाली किंवा भाषा मुळींच अस्तित्वांत नव्हती तो काल आपणांपासून अत्यंत दूर आहे. आपणास केवळ कांहीं विशिष्ट कल्पनाद्योतक असे विशिष्ट ध्वनिसमुच्चय आपणांकडे परंपरागत आलेले आढळतात. व त्यांचा आपणास फार तर तार्किकदृष्ट्या व मानसशास्त्रीयदृष्ट्या पृथक्करण करून अभ्यास करतां येणें शक्य आहे. जेव्हां आपल्या मनामध्यें एखादी कल्पना येते व ती व्यक्त करावी अशी आपणांस स्फूर्ती होते तेव्हां आपणांजवळ असलेल्या ध्वनिसमुच्चयाच्या साहाय्यानें आपण ती व्यक्त करतों व त्या विशिष्ट ध्वनिसमुच्चयास तत्कल्पनाबोधक अर्थ प्राप्त होतो. हीच गोष्ट शंकराचार्यांनी आपल्या भाष्यांत व्यक्त केली आहे. ' प्रजापतेरपिस्रष्टुः सृष्टेःपूर्वंवैदिकाःशब्दा मनसि प्रादुर्बभूवुः पश्चात्तदनुगतानर्थान् ससर्जेतिगम्यते । स भूरितिव्याहरत् स भूमिमसृजत ' ( तै. ब्रा. २।२।४।२ ). हीच कल्पना वैशेषिक सूत्रांत ' बुद्धिपूर्वा वाक्यकृतिर्वेदे ' या शब्दांनीं व्यक्त केली आहे. [ वै सू. ६.१.१ ] विशिष्ट कल्पना विशिष्ट ध्वनिसमुच्चयानें व्यक्त करणें हें कार्यहि प्रत्येक व्यक्ति आपल्या पूर्वसंस्कारानुरूप करीत असते. यामुळें प्रत्येक ध्वनिसमुच्चयाशीं विशिष्ट अर्थ परंपरेनें निगडित होतो. शब्द आणि त्याचा अर्थ यांचा परस्पर संबंध काय यासंबंधीं भारतीय पंडितांनीं फार मनोरंजक चर्चा अनेक ठिकाणीं केलेली आढळते. उदा. पतञ्जलीनें महाभाष्यांत ' गौ रत्यत्र कः शब्दः ' या प्रश्नास तो रूप, द्रव्य, क्रिया, गुण, आकृति इत्यादि वाचक नसून 'कस्तर्हि शब्दः' म्हणून पुन्हा प्रश्न करून 'येनोच्चरितेन सास्नालाङ्गूलककुदखुरविषाणिनां संप्रत्ययो भवति सशब्दः । अथवा प्रतीत पदार्थको लोके ध्वनि. शब्द इत्युच्यते ' असें उत्तर दिलें आहे व शेवटीं ' तस्माद् ध्वनिः शब्दः ' असा सिध्दान्त सांगितला आहे. तसेंच शब्दातील वर्णापासुन अर्थबोध कसा होतो याबद्दल थोडक्यांत श्रीशंकराचार्यांनीं बादरायणसूत्र भाष्यांत विवेचन केलें आहे. ' व्यस्तद्वारेप्येकैकवर्णग्रहणानन्तरं समस्त प्रत्यवमर्शिन्यांबुध्दौ तादशाएव प्रत्यवभासमानास्तंतमर्थमव्यभिचारेण प्रत्याययिष्यन्तीति वर्णवादिनां लघीयसी कल्पना । स्फोटवादिनस्तु दृष्टहानिरदृष्टकल्पनाच वर्णाश्चेमे क्रमेण गृह्यमाणाः स्फोटं व्यञ्जयन्ति स स्फोटोऽर्थं व्यनक्तीति गरीयसी कल्पना स्यात्। ( वेदान्तसूत्रभाष्य १.३.२८ ) न्यायसूत्रांत 'आप्तोपदेशसामर्थ्यात् शब्दादर्थसंप्रत्ययः' [ न्यासू. २-१-५२ ] व याचे पुढील ५६ व्या सूत्रावरील भाष्यांत वात्स्यायनानें शब्दार्थसमयाचें ' कः पुनरयंसमयः । अस्य शब्दस्येदमर्थजातमभिधेयमिति अभिधानाभिधेयनियमयोग । ' असें स्पष्टीकरण केलें आहे. महाभाष्यात ' कथं पुनर्ज्ञायते सिध्दः शब्दोर्थ संबधश्चेति । याचें 'लोकतः' असेंच उत्तर दिलें आहे. [ पा. म. १.१.१ ] ' अनेन शब्दनायमर्थोबोद्धव्यः इति संकेतः ' याप्रमाणें समाजसंकेतानें शब्दास अर्थ प्राप्त होतो. ही गोष्ट सर्वमान्य आहे व साहित्यशास्त्रकारांनीं साक्षात्संकेतज अर्थ तो अभिधा अथवा वाच्यार्थ असेंच म्हटलें आहे. आतां विशिष्ट भाषेंतील अर्थविषयक विकास एका दिशेनें होत गेले व ध्वनिविषयक विकास निराळ्याच दिशेनें होत गेला तर त्यामध्यें फरक होणें साहजिक आहे व अशा तऱ्हेनें दोन्ही विकासांची प्रवृत्ति भिन्न असणेंहि शक्य आहे. कारण विशिष्ट ध्वनिसमुच्चय तयार होणें व त्यास विशिष्ट अर्थ प्राप्त होणें या दोन क्रिया यांचें फल जरी एक असलें तरी त्या भिन्न भिन्न परिस्थितींत चालू असतात. आतां विशिष्ट अर्थामध्यें फरक पडला आहे ही गोष्ट आपणांस बिनचूक रीतीनें कळण्यास शब्दांचे अर्थ व भाषा यांचा मनाशीं संबंध आहे ही गोष्ट ठाऊक असली पाहिजे. दोन ध्वनी एका शेजारीं ठेवल्यानें जर त्यांवर मानसिक क्रिया झाली नाहीं तर त्यांपासुन अर्थनिष्पत्ति होणें शक्य नाहीं. व ही मानसिक क्रियाहि जेव्हां वक्ता आणि श्रोता ह्या दोघांच्याहि मनांत एकाच स्वरूपांत होईल तेव्हां एकाचें भाषण

दुसऱ्यास समजेल. विशिष्ट भाषा बोलणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या मनांत विशिष्ट तऱ्हेच्या ध्वनीचें साहचर्य, विशिष्ट भावना, उद्देश वगैरेशीं निगडित असतें व हा संबंध ती व्यक्ति ज्या समाजामध्यें वावरत असते त्या समाजातील लोकांच्या सवयी अथवा प्रघात यांवर अवलंबून असतो व विशिष्ट चिन्हांना विशिष्ट अर्थ प्राप्त होऊन तो स्थिर राहण्याचें कारण अनेक व्यक्तींच्या मनामध्यें त्या विशिष्ट ध्वनिचिन्हांनीं विशिष्ट मानसिक कार्य घडून येणें हेंच होय.

**शब्दाच्या अर्थामध्यें बदल**—जेव्हां आपण विशिष्ट शब्दाचा अर्थ बदलला आहे असें म्हणतों तेव्हां त्या विशिष्ट ध्वनिसमुच्चयामध्यें कांहीं फरक पडला आहे असें नसून तज्जनित त्या समाजातील लोकांच्या मानसिक क्रियेमध्यें मात्र कांहीं फरक होऊन त्यांनीं त्याच विशिष्ट ध्वनिसमुच्चयास निराळ्या कल्पनेशीं निगडित केलें आहे हें होय. यावरून आपणांस ही गोष्ट स्पष्ट होते कीं, शब्दांच्या अर्थांतील फरक ही एक सामाजिक मानसिक क्रिया असून त्या संबंधीचे नियम व तिचें स्वरूप आपणांस मनुष्याच्या मन प्रवृत्तीचे वैयक्तिक व सामाजिकदृष्ट्या नियम व स्वरूप यांचा अभ्यास केल्याशिवाय समजणार नाहीं. प्रथम विशिष्ट शब्दास विशिष्ट अर्थ देण्याचें कार्य एका व्यक्तीकडून घडतें व तोंपर्यंत तो अर्थ वैयक्तिक असून त्यास स्थैर्य प्राप्त झालेलें नसतें. परंतु जेव्हां तेच ध्वनी त्याच अर्थानें अनेकवार एखाद्या समाजातील लोक आपल्या व्यवहारामध्यें वापरूं लागतात तेव्हां त्या ध्वनीस तो अर्थ निश्चितपणें प्राप्त होतो. तथापि या विशिष्ट अर्थावरहि मनुष्याचें मन त्याच्या साहचर्य, भेद, तादात्म्य, पृथक्करण, संयोजन, उत्पादन, पुनरुत्पादन इ. शक्तींनीं सारखें कार्य करीत असतें व त्या त्या अर्थांत कमीजास्त फेरबदल करून अधिक निश्चितता आणण्याचें कार्य करतें व अशा रीतीनें त्यास सामान्यतः स्थिरता प्राप्त होते. परंतु व्यवहारांतील भाषेमध्यें या अर्थामध्यें थोडाफार फरक होणें साहजिक असतें व त्यामुळें बोलण्याचा व्यवहार हें अर्थविषयक बदल पडून आणण्याचें कारण आहे. इतर सर्व कारणें त्या मानानें दुय्यम प्रतीचीं आहेत व ज्या मानानें व्यवहारामध्यें वाक्यांत उपयोग करतांना विशिष्ट शब्दास विशिष्ट अर्थ देणें प्राप्त होईल त्या मानानें त्या शब्दाला विशिष्ट अर्थ प्राप्त होत असतो व अशा तऱ्हेनें वाक्यांत किंवा व्यवहारांत रूढ झाल्याखेरीज विशिष्ट शब्दाच्या अर्थामध्यें पडलेला वैयक्तिक फरक सामान्यत्व व स्थिरत्व पावूं शकत नाहीं. आतां हे अर्थविषयक फरक होण्याचीं निरनिराळीं कारणें कोणतीं असतात हें पाहूं. (१) शब्दाच्या स्वरूपांतील अथवा ध्वनींतील फरक (उदा. वाचाट=बडबड्या व चावट=चेष्टेखोर, वात्रट, कलश=तांब्या, कळस=शिखराग्र, पक्ष पख, बाजू पाखे–छपराची बाजू) (२) स्थानभिन्नता किंवा भिन्नसाहचर्यमूलक फरक (उदा. जस्ताचें फूल, दगडफूल, तगरीचें फूल, कर्णफूल). (३) सांस्कृतिक फरक. यामुळें विशिष्ट शब्दाच्या मूळ अर्थामध्यें बदल होऊन रूढ अर्थ निराळाच होतो. उदा. मणि संस्कृत रत्न, मराठी कांचेचा मणि, क्रिया संस्कृत कार्य, मराठी और्ध्वदेहिक, फुलपात्र शौच इत्यादि. (४) परकीय भाषेंतील उसनें घेतलेले शब्द (उदा. मिस्किल–फारसी–गरीब, मराठी–लबाड, औरत फारसी–गुह्य भाग, मराठी–स्त्री) (५) स्वराघातांत बदल उदा. इंद्रशत्रु (६) अलंकारिक उपयोग (उदा. पात्र, अगदळ, अर्धांग, गुरू, मामा, वाणिक इत्यादि). कित्येकदां आपणांस विशिष्ट शब्दाचा अर्थ अधिक व्यापक झाल्याचें आढळून येतें. उदा. कादंबरी. कित्येकदां आपणांस लक्षणेनें एकाच शब्दाचे अनेक अर्थ झालेले आढळतात. यामध्यें यौगिक अर्थ जरी एक असला तरी त्याच्या निरनिराळ्या अंगांप्रमाणें निरनिराळे लाक्षणिक अर्थ उत्पन्न होऊन आपणांस एक शब्द अनेक गोष्टींचा वाचक झालेला आढळतो. उदा. डोळा हा इंद्रिय अथवा दृष्टीचें साधन म्हणून आपणांस माहीत आहे परंतु त्याचाच अर्थ छिद्र असाहि लक्षणेनें होतो. अभिलाषबुद्धि असाहि एखाद्या गोष्टीवर डोळा ठेवणें या बाबतींत होतो. किंवा जागरूकता हाहि अर्थ एखाद्याच्या कृत्यावर डोळा ठेवणें या ठिकाणीं समजतो. अशा प्रकारें लक्षणेनें एकच शब्द अनेक कल्पना व्यक्त करूं शकतो. लक्षणा ही भाषेमध्यें शब्दसंपत्ति वाढविणारी एक मोठी शक्ति आहे व तीमुळें भाषेस सौंदर्यहि प्राप्त होतें. साहित्यदर्पणकारांनीं लक्षणा ८० प्रकारांची असते असें म्हटलें आहे. उपमारूपकादि अलंकारांनींहि लक्षणेचें कार्य होतें. तसेंच शब्दाची अभिधा व लक्षणेप्रमाणें अर्थ व्यक्त करण्याची जी व्यंजना ही तिसरी शक्ति तीमुळेंहि शब्दाचे अनेक अर्थ संभवतात. 'सायंकाळ झाली' या शब्दांवरून निरनिराळे अर्थ ध्वनित होतील. उदाहरणार्थ ब्राह्मणास संध्येची वेळ झाली असें सूचित करतां येईल. मजुरास काम बंद करण्याची वेळ झाली असें वाटेल, तर अभिसारिणीस प्रियकराकडे जाण्याची वेळ झाली असें मनांत येईल. शब्दांच्या अर्थविषयक फरक पहात असतां आपण फक्त विशिष्ट अर्थांमध्यें केवळ शब्दाच्या अर्थामध्यें पडलेल्या फरकांचा अभ्यास करतों. परंतु ज्या ज्या शब्दाला अर्थ म्हणून आहे तेथें तेथें त्या अर्थामध्यें फरक होणें संभवनीय आहे या दृष्टीनें प्रत्ययरूप पावलेले कांहीं शब्द उदा. कर किंवा करी हा क्रियावाचक शब्द निरनिराळ्या शब्दांशीं जोडला असतां त्यांच्या अर्थांत किती फरक होत जातो हें पाहणें फार मनोरंजक आहे. उदा. देणेकरी, घेणेकरी, मधुकरी, वारकरी, गडकरी, गोलकरी, मानकरी इ. तसेंच कांहीं सामासिक शब्दांच्या अवयवामध्येंहि

आपणांस असेच भिन्न भिन्न अर्थ भिन्न शब्दांशीं समास केला असतां झालेले आढळतात. अशा तऱ्हेने शब्दामध्यें त्याच्या वाक्यातील स्थानावरून, आघातावरून, ध्वनीवरून, वगैरेहि फरक झालेला आपणांस दिसून येईल. तसेच द्विवचनाचा लोप विभक्तीचा लोप इत्यादि गोष्टींमध्येंहि आपणांस भाषेमध्यें वसवसं फरक पडत जात तें दिसून येईल.

**शब्दांचा लोप**—तसच आपणांस भाषेमध्यें कांहीं शब्द अजीबात कालांतरानें लुप्त झालेले आढळतात. घरांतील वृद्ध माणसानें अथवा आजानें उच्चारलेले शब्द नातवास अगदी अपरिचित होतात. जुने ग्रंथ चाळीत असतांना तर आपणास ही गोष्ट अधिक स्पष्ट दिसते. ज्ञानेश्वराच्या काळचे किती तरी शब्द आज भाषेतून अजीबात गेले आहेत. विशेषतः समानार्थक शब्दांतील अनेक शब्दांचा लोप होण्याची क्रिया अगदीं स्वाभाविक दिसते. ही गोष्ट आपणांस वैदिक भाषेंत एकच पदार्थवाचक असलेलीं अनेक नामें अभिजात संस्कृत भाषेत लुप्त झालीं यावरून दिसून येते. सामान्यतः जवळ जवळ सारखीच कल्पना व्यक्त करणारे दोन शब्द असल्यास त्यांच्या अर्थामध्यें थोडा फार फरक करण्याची क्रिया प्रत्येक समाजांत आढळते. उदा. पोथी व पुस्तक या दोन शब्दांनीं दोन निरनिराळ्या तऱ्हेचे ग्रंथ व्यक्त होतात. असें जेथें होणार नाहीं तेथें एक शब्द लोप पावतो. केव्हां केव्हां विशिष्ट शब्द समाजांतील एका विशिष्ट गटामध्येंच लुप्त होतात व इतर समाजांत ते प्रचलित असतात.

**नवीन शब्दांचा प्रवेश**—तथापि लुप्त होणाऱ्या शब्दांपेक्षा प्रत्येक भाषेमध्यें नवीन शब्द रूढ होण्याची क्रिया मात्र अधिक जोराने चालू असते. सध्याच्या इंग्रजी भाषेचें उदाहरण घेतल्यास तीतील शब्दसंपत्ति पूर्वीच्या कोणत्याहि कालापेक्षा अधिक आहे व शास्त्रीय ज्ञान व संशोधन यांची वाढ व त्याचा व्यवहारांत उपयोग, मनुष्याचा वाढत असणारा व्याप व व्यवहार व बदलणारी परिस्थिति आणि विचार, जगांतील भिन्न भिन्न प्रदेशांतील लोकांमधील वाढत असणारें दळणवळण, व्यापार व उद्योगधंदे यांची अवाढव्य प्रगति व मालाची प्रचंड देवाण–घेवाण व वाढत्या मोठ्या यामुळे लिखित भाषेची वाढ झपाट्याने होत असून शिक्षण सामान्य लोकांमध्येंहि वाढत आहे. या सर्व व इतर अनेक गोष्टी मिळून सामान्य लोकांचीहि शब्दसंपत्ति झपाट्यानें वाढत आहे. व ज्या राष्ट्रास आपली भाषा समृद्ध व्हावी अशी इच्छा असेल त्यानें आपला अनेकविध कार्यांचा व्याप व शिक्षणाचा प्रसार वाढविणें जरूर आहे. भाषेमध्यें नवीन नवीन तयार होणारे शब्द सर्वच लोकांमध्यें सारख्याच प्रमाणांत रूढ होतात असें नाहीं. तर त्यांतील कांहीं–उदाहरणार्थ शास्त्रीय परिभाषा ही विद्वान लोकांतच रूढ होऊं शकते व कांहीं–मात्र सामान्य जनापर्यंत पोंचतात. प्रत्येक शब्दानें विशिष्ट व निश्चित कल्पनाच व्यक्त व्हावी व प्रत्येक कल्पनेस स्वतंत्र शब्द असावा म्हणजे समानार्थक शब्दांच्या अर्थरेषा निश्चित असाव्या ही अलीकडे वाढत असणारी प्रवृत्ति भाषेमध्यें नवीन नवीन शब्द रूढ होण्यास बरीचशी कारणीभूत होते. इंग्रजी भाषेमध्यें तर अशा तऱ्हेचे समानार्थक शब्द अनेक भाषांतून येत असल्यामुळें त्यांचे अर्थ निश्चित करणें त्या भाषेस अलीकडे जरूरीचें वाटतें. उदा. स्टूल, चेअर, हेड, चीफ, सिम्पथी, कंपॅशन इ. मराठी भाषेंतहि टेबल, चूक, खिळा, खीळ, मोळा, स्क्रू, बाल्ट, सुरमा; किंवा अडसर, अडणा, कडी, चपरास, बोल्ट, खीळ, हॉल्डफास्ट या शब्दांच्या अर्थांत एकच कार्य करीत असतांहि भेद करावा लागत पडतो.

**नवीन शब्दांचें उत्पादन**—जेव्हां भाषा प्रथमच तयार होत असेल तेव्हां प्रत्येक शब्द नवीनच बनविण्याची क्रिया प्राधान्यानें चालू असली पाहिजे. नैसर्गिक ध्वनी व क्रिया यापासून प्रथम अनुकरणात्मक, पुनरुक्तिमूलक व उद्गारवाचक शब्द तयार झाले असावे. लहान मुलेंहि कांहीं शब्द तयार करतात असें एक मत आहे. यासंबंधीं पूर्वी विवेचन केलेंच आहे. परंतु बहुतेक शब्द भाषेतून प्रचलित असलेले ध्वनी व रूढ शब्द यांच्या संयोगापासून अथवा त्यांच्या स्वरूपांत बदल करून बनविलेले असतात. शास्त्रीय परिभाषा सामान्यतः पूर्वीच्या अभिजात म्हणजे संस्कृत, ग्रीक, लॅटिन वगैरे भाषांतील धातूंवरून बनविण्याची प्रवृत्ति आढळते. व असे बनविलेले शब्द फार लांबलचक होत असल्यास त्यामध्यें संक्षेप करण्याचीहि प्रवृत्ति दिसते. विशेषतः लौकिक भाषेंत रूढ होत असतांना त्यास संक्षिप्त रूप दिलेलें आपणास आढळतें. अनेक शब्दांच्या आद्याक्षरावरूनहि नवीन शब्द बनविण्याची आपणास कांहीं उदाहरणें आढळतात. उदा. सोकोनी (स्टँडर्ड ऑइल कंपनी ऑफ न्यू यॉर्क), बेस्ट (बॉम्बे इलेक्ट्रिक सप्लाय अँड ट्रॅम कंपनी), एडसु (ई डी ससून) टॉमको (टाटा ऑइल मिल कंपनी), टॉबी (टपुरक्युलॉसिस) इ. याशिवाय भाषेतील शब्दसंपत्तीमध्यें भर पडण्याचा एक मार्ग म्हणजे परकीय भाषेंतील घेतलेले शब्द होत. यासंबंधीं विवेचन पूर्वी केलेंच आहे.

**पोटभाषा कशा बनतात**—आतां एकाच भाषेच्या स्वरूपामध्यें कालांतरानें फरक होऊन निरनिराळ्या पोटभाषा अथवा बोली कशा उत्पन्न होतात हें आपण पाहू. वास्तविक मूळ भाषा व तिची बोली यामध्यें मूलतः कांहींच फरक नसतो. तर त्यामध्यें मूळ भाषेच्या स्वरूपांत व प्रचलित स्वरूपांत किती प्रमाणांत फरक पडला आहे हें पाहूनच आपण एकीस भाषा व दुसरीस

बोली असें नाव देतों. भाषेमध्यें फरक पडण्याचें प्रथम व्यक्ति कारण होते व अशा अनेक व्यक्तींमध्यें फरक पडला म्हणजे त्या समाजाच्या भाषेमध्यें फरक पडतो. आतां प्रत्येक व्यक्तीच्या भाषेमध्यें कांहीं तरी वैशिष्ट्य असतच, तरी एखाद्या समाजाची किंवा व्यक्तीची भाषा एका स्वरूपाची आहे असें आपणास कसें म्हणतां येईल? तेव्हां भाषेच्या दृष्टीनें ज्यास आपण समाज म्हणतों त्याची व्याख्या अशी करता येईल कीं, जो व्यक्तिसमूह सामाजिक दळणवळणामुळें एकाच तऱ्हेची भाषा उपयोगांत आणतो व त्या भाषेतील वैयक्तिक भेद इतके क्षुल्लक असतात कीं, त्यास उपेक्षणीय म्हणता येईल अशा तऱ्हेचा व्यक्तिसमूह होय. आतां एखाद्या राष्ट्रामध्यें—जरी आपण त्यास एक राष्ट्र असें म्हणतों तरी असे लहान लहान समाज पुष्कळ असतात व जितका समाज लहान असेल तितका त्याच्यामध्यें परस्पर दळणवळण व लागाबांधा अधिक असतो. अशा तऱ्हेनें एखाद्या प्रांतांत, जिल्ह्यांत किंवा शहरांत एकेक स्वतंत्र समाज असून ते इतर प्रांत, जिल्हा किंवा शहर यांपासून बरेचसे पृथक् असतात व त्यांचा परस्परांवर फारसा परिणाम होत नाहीं. अशा लहानशा समाजांत आपसांतील दळणवळण व लागाबांधा इतर अशाच तऱ्हेच्या दुसऱ्या समाजापेक्षां अधिक असतो. परंतु अशा तऱ्हेच्या प्रांत किंवा जिल्ह्यांतील समाजामध्येंहि त्यापेक्षां लहान व अधिक निगडित असे खेड्यांत किंवा लहान वाड्यांत राहणारे दुसरे लहान लहान समाज असतात व अशा खेड्यांत किंवा वाडींतहि निरनिराळीं कुटुंबें रहात असतात व अशा कुटुंबामध्यें कांहीं व्यक्ती असतात. आतां आपणास एकभाषिक समाज कोणास म्हणावें हा प्रश्न पडतो. सामान्यतः एक गांव अथवा खेडें हा एक एकभाषिक समाज होतो. मोठाल्या शहरामध्यें निरनिराळ्या दर्जाच व धंद्यांतील लोकांचा एकभाषिक समाज बनतात व कधीं कधीं शहराच्या विशिष्ट भागांत राहणारेहि लहानसे एकभाषिक समाज असतात. आतां अशा एकाच समाजांतील व्यक्तींमध्यें हि आपणांस उच्चारभेद किंवा उच्चारभेदाची प्रवृत्ति आढळून येते. परंतु ती इतकी अल्प असते कीं, ती त्या व्यक्तीच्या अथवा त्या समाजाच्याहि लक्षांत येत नाहीं. हे भेद मानसिक व शारीरिक रचनेमुळें स्वभावतःच उत्पन्न झालेले असतात. परंतु त्यांची वाढ विशिष्ट मर्यादेच्या पलीकडे कधींहि होत नाहीं. कारण व्यक्तीची प्रवृत्ति साधारणतः आपण ऐकिलेल्या विशिष्ट शब्दाच्या उच्चाराप्रमाणें शक्य तितका शुद्ध उच्चार करण्याकडे असते व सर्व समाज एकाच परिस्थितींत रहात असल्यामुळें त्यांची मानसिक व शारीरिक वृत्तीहि एकाच तऱ्हेची बनण्यास परिस्थिति अनुकूल असते व त्यामुळें या समाजाची एकच वाक्पद्धति व उच्चारभेदप्रवृत्ति सर्व व्यक्तींमध्यें वसत असते. अर्थात् एकाच व्यक्तीमध्यें ज्या प्रवृत्ती असतील त्याच जर त्या समाजामध्यें असतील तर त्या प्रवृत्तीस बळकटी येईल व ज्या केवळ वैयक्तिक असून समाजामध्यें नसतील त्या क्षीण होऊन लुप्त होतील. याप्रमाणें प्रत्येक समाजामध्यें त्यांतील सर्व व्यक्तींस सामान्य अशा कांहीं प्रवृत्ती स्वाभाविकतःच वाढत असतात व त्यांच्या विरुद्ध प्रयत्न करण्याचीहि प्रवृत्ति सामान्यतः आढळत नाहीं. याप्रमाणें वैयक्तिक भेद सोडून दिले तर समाजाची भाषा सामान्यतः एकरूप असते असें म्हणता येईल व तींतील फरकहि सामान्यतः एकाच दिशेनें होत जातील असें म्हणावयास हरकत नाहीं. आतां समाजामध्यें अशा तऱ्हेचें भाषेचें एकस्वरूप राहण्यास एका विशिष्ट परिस्थितीचें अस्तित्व आपण गृहीत धरलें आहे. समजा कांहीं आकस्मिक कारणांमुळें सदर परिस्थितींत बदल झाला व त्या समाजांतील व्यक्तींतील दळणवळण पूर्वीइतकें कायम राहिलें नाहीं किंवा त्यांच्या आयुष्यक्रमांत फरक होऊन निरनिराळ्या व्यक्तींची परिस्थिति भिन्न भिन्न बनत गेली तर आपणांस अशा तऱ्हेनें भिन्न परिस्थितींत पडलेल्या निरनिराळ्या व्यक्तींच्या समुदायास एकच समाज म्हणून म्हणतां यावयाचें नाहीं. तर मूळ परिस्थितीमध्यें जे निरनिराळ्या तऱ्हेचे फरक झाले असतील व त्या फरकांच जेवढ्या लोकांत सामान्यत्व असेल तेवढेच लहान लहान समाज एकस्वरूपी राहतील व अशा तऱ्हेचे हे लहान समाज एकमेकांपासून पृथक्त्व पावतील व हें पृथक्त्व त्यामधील परस्पर दळणवळणास होणाऱ्या प्रतिबंधाच्या प्रमाणावर अवलंबून असेल व अशा तऱ्हेचे या समाजामध्यें पृथक् पृथक् लहान समाज उत्पन्न झाल्यावर प्रत्येक समाजांतील प्रवृत्तींची स्वतंत्र वाढ होत राहील व कालांतरानें त्यांमध्यें आपणास पुष्कळ फरक पडलेला दिसून येईल. आतां यांतील कोणत्या प्रवृत्तींची वाढ विशेष होईल हें त्या समाजाच्या एकंदर राहणीवर व स्वरूपावर अवलंबून असेल. याप्रमाणें पोटभाषा किंवा बोली बनण्याची क्रिया ही अशा तऱ्हेचे पृथक्त्व पावलेले निरनिराळे लहान समाज व त्या समाजांतील निरनिराळ्या प्रवृत्तींवर अवलंबून आहे व दोन बोलींतील फरक हा त्या बोलणाऱ्या समाजांतील पृथक्त्वावर अवलंबून राहील.

**पोटभाषा बनण्याचीं कारणें**.—आतां असें पृथक्त्व होण्याचीं कारणें कोणतीं तें आपण पाहूं.—याकरतां समाजाचे चढत्या प्रमाणांत भाग पाडावयाचे झाल्यास आपणास असे पाडतां येतील. कांहीं व्यक्ती मिळून एक कुटुंब होतें. कांहीं कुटुंबें मिळून एक लहानशी वाडी होते. कांहीं वाड्यांचें एक खेडें होतें व अशीं कांहीं खेडीं मिळून तालुका—जिल्हा—प्रांत—प्रांतांचें राष्ट्र याप्रमाणें हा चढता क्रम आहे व राष्ट्रामध्यें प्रांत, जिल्हे, तालुके, वाड्या, कुटुंबें व व्यक्ती ही सर्व अंतर्भूत होतात. या

सर्व विभागामध्यें थोडें बहुत पृथक्त्व असतेंच एका कुटुंबातील व्यक्तींतहि आपणास वय, लिंग वगैरे बाबतींत भाषेच्या दृष्टीनें भिन्नपणा आढळतो, परंतु तो इतका अल्प असतो कीं त्याकडे लक्ष देण्याचें कारण नसते कुटुंबाकुटुंबामध्यें निरनिराळे धंदे, वर्ग किंवा रहाणी इत्यादि सामाजिक कारणामुळें फरक असतो. निरनिराळ्या गांवांत भौगोलिक फरक असतो उदा त्यांच्या मध्यें कमीजास्ती अंतर, पर्वत, नद्या, अरण्यें, दलदली, तळीं वगैरे भिन्न भिन्न असतात. तसाच राज्यपद्धतीमध्येंहि निरनिराळ्या गांवात किंवा प्रांतात फरक पडलेला असतो तसाच निरनिराळ्या राष्ट्रांमध्येंहि भौगोलिक व राज्यशासनविषयक भिन्नपणा आपणास आढळतो याशिवायहि हवामान, जमिनीची सुपीकता, आयुष्यक्रमपद्धति, धर्म, वंश इत्यादि गोष्टीहि निरनिराळ्या प्रांतांत व राष्ट्रांत भिन्नपणा आणण्यास कारणीभूत असतात आपणातील सामाजिक भेद जितके तीव्र असतील तितका आपणामध्यें पृथक्पणा अधिक आढळेल तसेंच एखाद्या समाजाची त्यातील लोकसंख्येमुळें एकदी वाढ व विस्तार होणें शक्य आहे कीं, त्यातील सरहद्दीवरचे लोक व मध्यवर्ती लोक यांच्यामध्यें भौगोलिक दृष्ट्या व हवामान, जमिनीची सुपीकता इत्यादि बाबतींतहि बराच फरक होण्याचा संभव आहे त्यामुळें त्यांच्या आयुष्क्रमामध्येंहि सर्वस्वी फरक होऊन समाज रचनेमध्येंहि भिन्नपणा येणें साहजिकच आहे व त्याचा नवीन समाजाशीं किंवा राष्ट्रांशीं संबंध येऊन त्याच्यात निरनिराळे बदल पडण्याचा संभव आहे. किंवा एखादा समाज आपलें मूलस्थान सोडून अगदीं निराळ्याच भौगोलिक परिस्थितींत असलेल्या प्रांतात जाऊन राहिल्यास त्याच्यामध्यें थोड्याच काळात अतिशय फरक पडण्याच्या संभव आहे भाषेमध्यें फरक पडण्याच्या बाबतींत भौगोलिक परिस्थिति हें एक अत्यंत महत्त्वाचें कारण आहे कारण तीमुळें समाजामध्यें पृथक्पणा व दळणवळणास पूर्ण प्रतिबंध होणें शक्य असतें व भौगोलिक परिस्थितीमध्यें हवामान, जमिनीची सुपीकता वगैरे गोष्टीहि अंतर्भूत असल्यामुळें मनुष्याच्या शारीरिक व मानसिक रचनेमध्यें व त्यामुळें त्याच्या वाक्पद्धतीमध्यें फरक पडून येणें स्वाभाविक असतें एकाच परिस्थितीमध्यें राहणाऱ्या मनुष्याच्याहि वाक्पद्धतीमध्यें फरक होण्याची प्रवृत्ति असते हें आपण पाहिलेंच आहे तेव्हां जर समाजाच्या परिस्थितीमध्यें परदेशगमन, भिन्न हवामान किंवा शत्रुसहवास इत्यादि गोष्टी घडून आल्या तर ही प्रवृत्ति अधिक बळावते एकाच मोठ्या शहरामध्ये निरनिराळ्या सामाजिक वर्गांमध्ये बोलण्याच्या पद्धतींत किती फरक असतो हें आपणांस माटमाठे अधिकारी, व्यापारी, धंदेवाले लोक, कसबी लोक व कंगाल लोक यांच्या भाषेकडे पाहिलें असतां दिसून येतें या निरनिराळ्या वर्गांमध्यें सामाजिक पृथक्त्व असतें व तें कांहीं अंशीं व्यवसायांतील फरक व कांहीं अंशीं निरनिराळ्या समाजांच्या दर्जांतील किंवा जातींतील फरक यावर अवलंबून असतें तथापि सामान्यत एकाच शहरांतील भाषेचा विचार केल्यास आपणांस ती एकाच स्वरूपाची घटना व लिंग्यामध्यें आणि इतर शब्दांच्या भाषांत आपणास फरक दृगोचर पडतो. त्या मानानें अभिजात किंवा नागर भाषा ही मात्र अनेक निरनिराळ्या वर्गांकडून एकाच स्वरूपांत बोलली जाते व याचें कारण पाठशाला व विद्यापीठें हीं होत त्याप्रमाणच निरनिराळे उत्सव, सभा, सम्मेलन, परिषदा, नाटकें, कीर्तनें, विवाहादि समारंभ, जत्रा वगैरे ठिकाणीहि सर्व लोकांस समजेल अशा तऱ्हेची भाषा वापरणें जरूर असल्यामुळें भाषेस एकरूपता येणें व विशिष्ट भाषेस प्रामुख्य मिळणें या क्रिया होत असतात या क्रियेंत एक विशिष्ट भाषा ही इतर पोटभाषांवर आक्रमण करीत असून आपलें सार्वत्रिकत्व प्रस्थापित करण्याचें कार्य घडवून आणते व आगगाडी, मोटार, चित्रपट, बोलपट, टेलिफोन, वायरलेस, रेडिओ इत्यादि दळणवळणाचीं साधनें जसजशीं वाढत जातील तसतशी भाषेस एक स्वरूप येण्याची प्रवृत्ति अधिक वाढत जाईल

**शिष्ट अथवा एकस्वरूपी भाषा**--सध्यांच्या सामाजिक व्यवस्थेमध्यें व दळणवळणाच्या साधनांच्या सुलभतेमुळें अगदीं लहान खेड्यातील व्यक्ति सोडून दिली तर कोणत्याहि इसमास आपणांस एका विशिष्ट समाजाचा घटक म्हणून वेगळें काढतां येणार नाहीं. कारण त्याच्या समाजातील स्थानामुळें त्याच्या व्यवसायामुळें व त्याच्या वस्तीस्थानामुळें त्याचा एकाच वेळीं अनेक तऱ्हेच्या समाजाशीं निरनिराळ्या वर्गांच्या लोकांशीं व देशातील निरनिराळ्या भागांशीं एकाच वेळीं संबंध येतो याचा परिणाम असा होतो कीं, एखादी व्यक्ति अगदीं एकांतवासांत व जगाशीं संबंध नसलेल्या लहानशा खेड्यांतच राहात नसेल तर तिची भाषा कोणत्याहि एखाद्या विशिष्ट समाजाची भाषा म्हणून राहणार नाहीं तर तीमध्यें अनेक समाजांच्या भाषांचें अथवा बोलींचें मिश्रण सांपडेल आपण एखाद्या मुंबईच्या श्रीमान व्यापाऱ्याचें उदाहरण घेतल्यास आपणांस असें आढळेल कीं, तो आपला बराचसा काल शहरामध्यें आपल्या व्यवसायाकरता आपल्याशीं शिक्षण व दर्जा या बाबतींत सारख्या असा समव्यवसायी लोकांत घालवितो तर कांहीं वेळ त्याच धंद्यामुळें अगदीं निरनिराळ्या दर्जाच्या व परिस्थितींतील लोकांशीं त्यास घालवावा लागतो तसेच त्याचें शिक्षण एखाद्या कॉलेजमध्यें किंवा युनिव्हर्सिटींत झालेलें असतें तेथें तो सुशिक्षित लोकांत वागलेला असतो. त्यानें बराचसा प्रवासहि केलेला असतो व त्याच्या धंद्यामुळें त्यास मुंबईबाहेर एखाद्या

हवाशीर ठिकाणीं बंगला वगैरे बांधून उपनगर किंवा खेड्यांतील आयुष्यक्रमाचाहि अनुभव घेतां येतो. आपला धंदा सांभाळून त्याला जो फुरसतीचा वेळ मिळतो त्यावेळीं त्याचा इतर धंद्यांतील विद्वान लोक, राजकारणी पुरुष, कौन्सिलचे सभासद किंवा इतर मुत्सद्दी लोक किंवा कामगार, मजुर वगैरेशीहि संबंध येतो. अशा मनुष्यास आपणाला कोणत्याहि नागरिक, खेडवळ, सुशिक्षित वगैरे एका विशिष्ट वर्गांत घालतां येणार नाहीं कारण त्यामध्ये या सर्वच घटकांचे थोडे बहुत गुण आढळतात व अशा तऱ्हेचा मनुष्य बहुधा अभिजात भाषा व्यवहारांत वापरतो व अशा तऱ्हेनें बोलणाऱ्याच्या भाषेवर अनेक भाषांचा मिश्र परिणाम झालेला असतो. तसेच प्रत्येक समाजाची अथवा प्रांताची भाषा अभिजात भाषेनें थोडाफार संस्कार पावलेली असते थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे कोणत्याहि सामाजिक व्यवस्थेमध्यें ती अगदीं प्राथमिक स्वरूपाची किंवा विशेष प्रगत अशी नसली तरी कोणताहि समाज इतर समाजाशीं अगदीं अलग असा राहणें शक्य नाहीं. आतां प्राथमिक अवस्थेमध्यें विशिष्ट समाजांतील व्यक्तींचा बाह्य लोकांपेक्षां स्वकीय लोकांशींच अधिक संबंध येणें शक्य आहे तथापि सभोंवतालच्या इतर समाजाच्या संपर्कापासून कोणताहि समाज अलिप्त राहणें शक्य न हो व त्याचा प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष कांहीं तरी परिणाम त्या समाजाच्या भाषेवर होतच असतो. हा परिणाम त्या समाजांतील निरनिराळ्या व्यक्तींवरहि निरनिराळ्या प्रमाणांत होत असल्यामुळें कांहीं व्यक्तीच परकीयांच्या भाषावैशिष्ट्याचें ग्रहण करतात त्यामुळें कोणत्याहि वेळीं कोणत्याहि समाजाची भाषा पूर्णपणें एकरूप असणें शक्य होत नाहीं ही गोष्ट गृहीत धरून आपणास कोणत्याहि कालची उदा. प्राचीन आर्य लोकांची किंवा जर्मन लोकांची भाषा म्हणून विशिष्ट भाषेस संबोधितां येईल कारण परकीय भाषांचा संपर्क प्रथम एका कुटुंबांत होऊन त्या कुटुंबापासून त्याच्या जमातीमध्यें पसरून त्या जमातीचा इतर जमातींशीं संबंध आला म्हणजे त्यांमध्ये पसरून जे फरक प्रारंभीं अल्प प्रमाणांत असतात तेच कालांतरानें वाढत जाऊन त्यांत बरेंच अंतर पडतें. सध्यां जी आपणास सर्व प्रांतभर भाषेचें एकच स्वरूप बनण्याकडे प्रवृत्ति दिसून येत आहे ती वास्तविक भाषेची स्वाभाविक प्रवृत्ति नसून एक विशिष्ट भाषा इतर बोलींवर आक्रमण करून तिचें स्वरूप इतरास प्राप्त होण्याची ती क्रिया आहे अर्थात ही क्रिया किती अंशानें पूर्ण होईल हें त्या विशिष्ट भाषेच्या प्रभावावर अवलंबून राहील व तिच्यांतील एकरूपता कायम राहणें हें पुन्हां भौगोलिक व सामाजिक पृथक्त्व कमी कमी होत जाण्यावर अवलंबून राहील तथापि अशा एकस्वरूप समाजाच्या भाषेमध्येंहि सूक्ष्म निरीक्षण करणारास थोडेफार स्थानिक फरक आढळल्याशिवाय राहणार नाहींत.

**राष्ट्रभाषा**--प्रांताचा व्यवहार सुलभतेनें व्हावा म्हणून ज्याप्रमाणें एखादि प्रांतिक बोली प्रांतीय शिष्ट भाषा बनते तशीच राष्ट्राचा व्यवहार करितां राष्ट्रीय भाषेची आवश्यकता उत्पन्न होते व एखादी प्रांतिक भाषा राष्ट्रभाषा बनते ही गोष्टहि राजसत्ता व विशिष्ट भाषेचें व्यापलेलें क्षेत्र अथवा लोकसंख्या यावर अवलंबून असते मराठेशाहींत मराठीचा प्रसार कानडी व हिंदी भाषांच्याहि क्षेत्रांत बराच झाला होता पण आज आपणास हिंदी ही राष्ट्र भाषा करणें सुलभ आहे असें आपण मानतों. नेदरलंडमध्यें एका काळीं केवळ बोली असलेली हॉलंडांतील पश्चिम नीच फ्रॅंकोनियन भाषा ही कालांतरानें साहित्यिक किंवा वाङ्मयीन स्वरूप पावून डच लोकांनीं तिला आपल्या राष्ट्रभाषेचें स्वरूप दिलें जर्मनीमधील सध्याची शिष्ट भाषा ही एक वरच्या सॅक्सनी प्रांतांतील मध्य व उच्च जर्मन बोलीचें संकीर्ण स्वरूप होय तिनें त्या देशांतील निरनिराळ्या प्रांतांतील अनेक बोलींवर आपलें वर्चस्व स्थापित केलें आहे व त्या त्या प्रांतांत प्रवेश केला आहे नेदरलंड व जर्मनी या देशांच्या राष्ट्रीय भाषांतील फरक स्पष्ट असून त्यांमध्ये सांक्रमिक अवस्था आपणास आढळत नाहीं तशीच गोष्ट फ्रेंच व इटॅलियन या अर्वाचीन शिष्ट भाषांची आहे तथापि सामान्यतः आपणास असें म्हणतां येईल कीं, जेथें दोन शिष्ट भाषांचा संबंध येतो तेथें एकीचा शेवट कोठें होतो व दुसरीचा आरंभ कोठें होतो हें नक्की सांगणें कठिण असतें या दोन भाषांच्या क्षेत्रामध्यें अशी एक लहानशी पट्टी असते कीं जिच्यामध्यें या दोन्हीहि भाषांतील विशेष मिसळलेले आपणांस आढळतील. उदा. आपण दक्षिण महाराष्ट्राकडे जाऊं लागलों तर मराठीचें क्षेत्र कोठें संपतें व कानडीचें कोठून सुरू होतें याची मर्यादा रेषा आपणांस निश्चितपणें घालतां येणार नाहीं तीच गोष्ट गुजराथी व मराठी यांचा जेथें संबंध येतो त्या प्रदेशाबद्दल म्हणतां येईल.

**सार्वराष्ट्रीय अथवा जागतिक भाषा**--सर्व जगास सुलभतेनें बोलतां येईल अशी एकभाषा प्रचलित होणें शक्य आहे काय याबद्दल अलीकडे बरीच चर्चा करण्यांत येते व एस्पेरँटो नांवाची भाषा बोलणारे लोक युरोपमध्यें हजारों व सर्वत्र पसरलेले आढळतात तथापि ही कृत्रिम भाषा जर जगांतील सुसंस्कृत वर्गांत रूढ होऊन कायम राहिली तर तिच्यांतील उच्चार व रचना या बाबतींतील एकरूपता, फार दिवस टिकणार नाहीं व त्यामुळें तिचें मूळ उद्दिष्ट साध्य होणार नाहीं. सध्यां त्या भाषेंतील शब्दांची उच्चारपद्धति सामान्यतः बहुतेक देशांतील लोकांस सुलभतेनें शिकतां येते. परंतु

प्रत्येक देशांतील व्यक्ति आपल्या मातृभाषेच्या वाक्पद्धतीप्रमाणें शब्दाच्या उच्चारांत फरक करीत जाते त्यामुळें या उच्चारामध्येंहि प्रत्येक देशांत तेथील भाषेंतील उच्चाराप्रमाणें हळू हळू स्वाभाविकत:च फरक पडत जातील व त्यामुळें कांहीं पिढ्यांनंतर याच एस्परँटो भाषेस प्रत्येक देशांत उच्चाराच्या बाबतींत निरनिराळें स्वरूप आलेलें आपणास दिसून येईल तसेंच या भाषेंतील आघात कायम ठेवणेंहि कठिण जाईल व त्यामध्यें किंचितहि बदल झाला तरी शब्दाचा अर्थ कळणें कठिण होत जाईल आतां दळणवळणाचीं साधनें अतिशय त्वरित गतीनें वाढत असल्यामुळें निरनिराळ्या देशांचा संबंध आज निरनिराळ्या प्रांतांचा संबंध आहे त्यापेक्षांहि अधिक सुलभतेनें जोडता येईल ही गोष्ट खरी आहे टेलिफोन वगैरे साधनांनीं जगांतील कोणत्याहि भागांतील मनुष्याशीं आज बोलता येणें सुलभ झालें आहे तथापि हीं साधनें कितीहि सुलभ झालीं तरी जगांतील दोन निरनिराळ्या भागांतील व्यक्तींचा संबंध एका खेड्यांतील दोन व्यक्तींच्या संबंधाइतका निकट येणें केव्हांहि शक्य नाहीं त्यामुळें हे भाषेंतील फरक जरी मंदगतीनें होत राहिले तरी ते फरक होण्याची क्रिया ही सतत चालूच राहणार तसेंच दरम्यान भाषेंतील वाक्यरचनेचा तिच्यावर परिणाम होणारच थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे जोंपर्यंत एस्परँटो भाषा जिवंत आहे तोंपर्यंत तिच्यामध्यें फरक हे होत जाणारच तेव्हां जोंपर्यंत एस्परँटो ही भाषा प्रचलित असेल तोंपर्यंत तिचें स्वरूप नेहमीं निरनिराळ्या देशांत बदलत राहील हें निर्विवाद होय एस्परँटोस रखवाच व्होलापुक ईडिअम न्यूट्रल, अविकारी लॅटिन, इडो, नॉव्हिअल, बेसिक वगैरे भाषा जागतिक म्हणून पुढें आणण्याचा प्रयत्न चालू आहे, त्यांचीहि तीच गत आहे

**भाषांचें वर्गीकरण**—आपणास जर वर्गीकरणाच्या दृष्टीनें सध्याच्या केवळ अभिजात अथवा राष्ट्रीय भाषांचाच विचार करावयाचा असेल तर आपलें काम बरेंच सुलभ होईल परंतु तसें वर्गीकरण अशास्त्रीय होईल, याकरितां आपणास भाषेच्या क्षेत्राच्या मर्यादा निश्चित करणें अवश्य आहे परंतु या बाबतींत आपणांस जेथें दोन भाषांचा सीमांत प्रदेश येतो तेथें निश्चित मर्यादा घालणें कठिण जातें तसेंच कांहीं बोलींना भाषेचें स्वरूप शास्त्रीयदृष्टीनें प्राप्त झालेलें नसतें व कांहीं नवीनच तयार होत असलेल्या आढळून येतात तसेंच आतांपर्यंत किती भाषा नष्ट होऊन गेल्या याचीहि आपणास पूर्ण खबर नसते त्यामुळें आतांपर्यंत होऊन गेलेल्या सर्व भाषांची यादी तयार करणें हें फार कठिण काम आहे फिंक यानें आपल्या पुस्तकांत दोन हजाराच्या वर भाषांचीं नावें नमूद केलीं आहेत तसेंच पुन्हा केवळ भाषांची संख्या देण्यापेक्षा त्यांचें गटवार वर्गीकरण करणें ही गोष्ट त्याहूनहि कठिण आहे अशा तऱ्हेचें वर्गीकरण करण्याकरितां कोणतें तत्त्व स्वीकारावें हा मोठा प्रश्न पडतो व अशा तऱ्हेचें तत्त्व आपण लावूं म्हटलें तरी आपलें अनेक भाषांचें ज्ञान इतकें मर्यादित असतें कीं, आपणास त्याचें विशिष्ट तत्त्वाच्या दृष्टीनेंहि वर्गीकरण करणें निर्दोष होईल अशी खात्री नसते ही गोष्ट अस्तित्वांत असलेल्या भाषांची झाली मग ज्या भाषा आज नष्ट झाल्या आहेत त्यांच्याबद्दल तर बोलावयासच नको त्यामुळें भाषांचें कोणत्याहि तऱ्हेनें वर्गीकरण केलें तरी तें अगदीं निर्दोष होईल अशी अपेक्षा करणें बरोबर होणार नाहीं तथापि या बाबतींत आजपर्यंत झालेले प्रयत्न मनोरंजक असून त्यामुळें भाषाशास्त्रीय संशोधनालाहि अनेक दिशांनीं चालना मिळाली आहे

**बाह्य स्वरूपमूलक वर्गीकरण**—भाषेचें वर्गीकरण करण्याची एक पद्धति निरनिराळ्या भाषांचें बाह्य स्वरूप अवलोकन करून त्यावरून बसविलेली आहे या वर्गीकरणांत भाषेंतील कोणतेंहि वाक्य हें पूर्ण कल्पना व्यक्त करणारें सर्वांत लहान मूलमान धरून त्याच्या स्वरूपामध्यें निरनिराळ्या भाषांत जे भेद आढळतात त्यास अनुसरून निरनिराळ्या भाषांचे वर्ग पाडलेले आहेत उदा ‘ सुतार लाकूड तासतो ’ यामध्यें आपणास एक कल्पना पूर्णपणें व्यक्त झालेली दिसते तेव्हां हा एक भाषेचा पूर्ण घटक समजावयास हरकत नाहीं यास आपण वाक्य असें म्हणतों आतां यामध्यें सुतार, लाकूड आणि तासणें या तीन गोष्टींतील कल्पनांचें एकत्र मंथन करून आपणास विशिष्ट गोष्टीचा बोध होतो यांत आपण वाक्याचें सुतार, लाकूड आणि तासणें या निरनिराळ्या भागामध्यें पृथक्करण करतों व त्या कल्पनेचा पूर्ण अर्थ होण्याकरितां त्याचें पुन्हा एकत्र मंथन करून आपण वाक्यार्थ करून घेतों याप्रमाणें पृथक्करण व समन्वय या दोनहि क्रिया आपणास या ठिकाणीं दिसतात यांतील सुतार किंवा तासणें या दोन्हींपैकीं कोणत्याहि एका गोष्टीस प्रामुख्य देऊन दुसरीस गौण अथवा तत्संबद्ध मानता येईल यांतील सुतार हें नाम असून तासणें ही क्रिया आहे. याप्रमाणें कांहीं भाषांत नामास प्रामुख्य असतें तर कांहीं भाषांत क्रियेस प्राधान्य असतें आणि त्यामुळें कांहीं भाषांस नामप्रधान भाषा व कांहींस क्रियाप्रधान भाषा असें आपणास म्हणता येईल संस्कृत किंवा मराठी या क्रियाप्रधान भाषा आहेत तर ग्रीनलंडिक ही भाषा नामप्रधान आहे उदा संस्कृतमध्यें आपण जर ‘अहं पश्यामि’ असें म्हणूं तर ग्रीनलंडिक भाषेमध्यें तीच कल्पना ‘ दर्शनं तस्य मम ’ अशा रीतीनें व्यक्त करावी लागेल संस्कृतमधील ‘अहं तं हन्मि’ याच ग्रीनलंडिकमध्यें ‘मरणं तस्य मम’ असें रूप होईल यावरूनच विशेषणात्मक अथवा संबंधमूलक आणि विधेयात्मक असें एक भाषांचें वर्गीकरण करण्यात येतें

**रूपात्मक व अरूपात्मक भाषा**—आतां पृथक्करण अथवा संश्लेषण हें वर आपण वाक्यामध्यें केलेलें पाहिलें. परंतु ही क्रिया भाषेच्या कोणत्याहि अवस्थेंत होण्यासारखी आहे. उदा. वाक्यांतील निरनिराळे शब्द बनविण्याच्या कामींहि आपण या क्रियेचा उपयोग कित्येकदां करतों. ह्या तत्त्वावरूनहि भाषेचें वर्गीकरण आपणांस करतां येणें शक्य आहे. उदा. कांहीं भाषांस रूपात्मक भाषा व कांहींस अरूपात्मक भाषा असें म्हणण्याची एक प्रथा आहे. संस्कृत वगैरे भाषांमध्यें नामांस आपण निरनिराळे प्रत्यय लावून रूपें बनवितों. परंतु चिनी भाषेमध्यें अशा तऱ्हेचा शब्दाच्या रूपात मुळींच फरक पडत नाहीं. परंतु हें वर्गीकरण अलीकडे कोणी मान्य करीत नाहीं.

**पृथक्करणात्मक व संयोगात्मक भाषा**—वरील पृथक्करण व संश्लेषण हें तत्त्व जर आपण वाक्यरचनेस न लावतां वाक्याचे भाग जे निरनिराळे शब्द त्यांस लावलें तर आपणांस एक नवीनच वर्गीकरणाचें तत्त्व प्राप्त होईल. अशा दृष्टीनें ज्या भाषेंतील शब्द केवळ स्वतंत्र नसून त्यांमध्यें एखादा मूलघटक अथवा धातु व प्रत्यय इ. गौण अवयव असतात अशा भाषेंत ही संश्लेषणाची क्रिया आपणांस दिसून येते. उदा. 'त्याच्या मुलास खेळावयास आवडतें.' येथें वाक्यांतील प्रत्येक शब्दांत मूल शब्द व इतर प्रत्ययादि गौण घटक आढळतात व हे घटक मूळ शब्दाशीं जोडलेले दिसतात. परंतु चिनीसारख्या भाषेंत वाक्यांतील प्रत्येक शब्द निरनिराळा ठेवलेला असतो व त्यामध्यें ही जोडणी आपणांस दिसत नाहीं. अशा प्रकारें मूळ शब्दास निरनिराळीं कार्यें दाखविणारे घटक जोडण्याची क्रिया कांहीं भाषांत अधिक परिणत स्थितीस गेलेली असते तर कांहीं भाषांत ती फक्त कांहीं अंशानींच दृष्टीस पडते. कांहीं भाषांत तर एकाच शब्दानें सर्व वाक्याचा बोध होऊं शकतो. उदा. सं. गच्छति. या शब्दानें जाणारी व्यक्ति, जाण्याची क्रिया, तिचा काल, वचन वगैरे सर्व गोष्टींचा बोध पूर्ण होतो. व यास वाक्यात्मक शब्द असें म्हणतां येईल. कांहीं भाषांत तर अनेक मिश्र कल्पनादर्शक वाक्येंहि एका शब्दांत व्यक्त करतां येतात. अशा प्रकारच्या अमेरिकेंतील मूळच्या रहिवाशांत कांहीं भाषा आहेत. त्यांना अनेकसंधायक ( पॉलिसिंथेटिक ) असें म्हणतात. अशा तऱ्हेचें एक उदाहरण फिंक यानें ग्रीनलंडिक भाषेमधील दिलें आहे. यांत मी मासे पकडण्यास योग्य अशी वस्तु मिळविण्याचा प्रयत्न करतों, इतक्या कल्पना 'औलिस-उत्-इसर्-सि-निअर्पु-न्गा' या एका शब्दांत व्यक्त होतात. यांत औलिस=मासे धरण्याचें साधन, इसक=योग्य, सिवुन्गा=मिळविणें इ. घटक आहेत. अशा भाषांमध्यें मूळ शब्द व घटक हे ज्या पद्धतीनें एकमेकांस जोडले जातात तीवरून भाषांचें वर्गीकरण करण्यास साधन प्राप्त होतें. दयाळूपणा, दुकानदारी, गृहरचना या ठिकाणीं प्रत्येक शब्दांतील *अवयव एकापुढें एक ठेवलेले असून ते सहज वेगळे करतां येण्यासारखे आहेत व त्यांतील एक अवयव दुसऱ्या शब्दांशीं* जोडून निराळा शब्द सहज बनवितां येण्यासारखा आहे. या जोडणीस संश्लेषण अथवा चिकटणें म्हणतात व यावरून कांहीं भाषांस चिकट्या अथवा संश्लिष्ट असें नांव मिळालें आहे. अशा भाषांचीं कांहीं उदाहरणें म्हणजे तुर्की, फिनोउग्री, बंटु व मलायापोलिनेशन भाषासंघ हे होत. उदा. तुर्कीमध्यें मक्-करणें हा शब्द निरनिराळ्या शब्दांस जोडून विशिष्ट कृति करण्याचा बोध करतां येतो. उदा. सेवमेक्-प्रेम करणें. यझमक्=लेखन करणें इ. यासच ईस हा परस्परदर्शक शब्द जोडला तर सेवइसमेक=परस्पर प्रेम करणें किंवा 'दिर' हा प्रयोजक शब्द जोडला तर सेवदिरमेक्=प्रेम करावयास लावणें असे शब्द तयार होतात. जितके या दुय्यम शब्दांचे अथवा प्रत्ययांचे अर्थ निश्चित असतील तितका या भाषेचा चिकटेपणा अधिक स्पष्ट होईल जेव्हां मूळ शब्द व घटक यांच्या संयोगामुळें मूळ शब्दांत किंवा घटकांत फरक होऊन तो ओळखणें कठिण जातें तेव्हां आपणास एक निराळाच प्रकार आढळतो. यास मीलन ( फ्युजन ) असें म्हणतां येईल. उदा. उपेक्षा यांतील उप्+ईक्ष् यांचें पूर्ण मीलन झालें आहे तसेंच 'धाष्टर्य' येथेंहि घडलें आहे तसेंच इंग्रजीतील सिंग-सँग-संग यांतील किंवा माऊस व माइस यांतील विकरण ओळखण्यास अधिक कठिण असतें. अशा तऱ्हेचा विकार विशेष रीतीनें सेमिटिक भाषांमध्यें आढळतो. त्या भाषांत शब्दांतील व्यंजनें हे मूळ शब्द असून स्वर हे फरक पाडविणारे घटक असतात. त्यांतील मूळ व्यंजनांचा स्वराशिवाय कांहींच अर्थ होत नाहीं. परंतु निरनिराळ्या स्वरांची योजना केली असतां मात्र निरनिराळे अर्थ प्राप्त होतात. उदा. अरबी भाषेंतील क्तुब् हा धातु अथवा मूळ शब्द घेतला तर 'कतब' याचा अर्थ 'त्यानें लिहिलें' असा होतो. पण त्यात निरनिराळ्या स्वरांची योजना केली असतां पुढें दिल्याप्रमाणें निरनिराळे अर्थ प्राप्त होतात. ( १ ) कत्ब=लेखन, ( २ ) कातिब्=लेखक, ( ३ ) किताब=पुस्तक, ( ४ ) कितावत=शिलालेख, ( ५ ) मक्तूब=लिहिलेलें, ( ६ ) तक्तीब=लिहावयास लावणें, ( ७ ) मुकातबत्=पत्र व्यवहार, ( ८ ) इक्ताब=लिहावयास सांगणें, ( ९ ) तकातुब=एकमेकांस लिहिणें, ( १० ) मुस्कातीब-पत्रव्यवहार ठेवणारा, ( ११ ) मक्तब-लेखनशाला. अशा भाषांत विशिष्ट प्रत्ययांस विशिष्ट अर्थ असून तो जोडला असतां मूळ शब्दाच्या अर्थांत तेवढी भर पडत जाते. परंतु वर दिलेल्या उदाहरणांत जेथें प्रत्ययामुळें शब्दाच्या स्वरूपांत फरक पडतो तेथें अर्थामध्येंहि संक्षिप्तता येण्याचा संभव असतो.. या चिकटेपणाचाच केव्हां केव्हां प्रत्ययाशीं

भिन्नपणा दाखविण्यांत येत असतो. परंतु प्रत्यय ही संज्ञा इंडो-युरोपीय भाषांतील प्राचीन भाषामध्यें जे विकार होतात ते दाखविण्याकरितां योजिलेली होती. 'करिष्यामि' यांतील प्रत्यय लागल्यामुळें मूळ धातुमध्यें जो अधिक अर्थ उत्पन्न होतो किंवा 'नृपाणाम्' येथे जी विभक्तिप्रत्ययामुळें अर्थात भर पडते ती वास्तविक त्या विशिष्ट शब्दाचें वाक्यांतील इतर शब्दांशीं जें नातें किंवा संबंध असतो तो दाखविण्यामुळें पडते म्हणून तिचा वास्तविक संबंध मूळ शब्दाकडे येण्याऐवजीं वाक्यरचनेकडे जातो. परंतु चोर-चौर्य या शब्दांमध्यें केवळ अर्थदर्शकच फरक झालेला असून विभक्तिदर्शक फरक नाहीं. प्रत्ययी भाषांमध्यें प्रत्ययमीलन व वाक्यरचनेतील फरक या दोहोंचेंहि मिश्रण असतें.

**एकाकी भाषा**—भाषांतील प्रत्ययांवरून त्यांचें स्वरूप संश्लेषणात्मक म्हणजे विश्लेषणाचें किंवा विभक्तिप्रत्ययाचें किंवा पृथक्पणाचें आहे यावरून निरनिराळ्या भाषांत भेद दर्शविण्यांत येतो व ज्या भाषेतील शब्द केव्हांच विकरण पावत नाहीं ( उदा. चिनी. ) त्यांना एकाकी भाषा म्हणतात. तसेंच त्यांतील शब्द जर सामान्यतः एकाक्षरीच असतील तर त्यांस एकाक्षरी भाषा असेंहि नांव देतात. अशा प्रकारची चिनी ही नमुनेदार एकाक्षरी भाषा म्हणतां येईल. तथापि त्या भाषेंतहि क्वचित समास आढळतो.

**समावेशक किंवा अंतर्ग्राही भाषा**--भाषेच्या स्वरूपावरून आणखीहि एक प्रकार पाडतां येतो. त्यास अंतर्ग्राही (इन्कारपोरेटिंग) भाषा असें नांव देतां येईल. या भाषांचा कधीं कधीं अनेकसंघायक भाषांशीं घोंटाळा करण्यांत येतो. यांच्या नांवावरून या भाषांमध्यें शब्दाच्या पोटांत प्रत्ययात्मक अगर गौण घटक शब्द घेण्याची क्रिया होत असते. हा नवीन अंतर्भूत होणारा भाग प्रत्यक्ष मूळ शब्दाच्या पोटांतच गेला पाहिजे असें नसून मूळ शब्द व प्रत्यय किंवा दोन प्रत्यय यांच्यामध्येंहि आला तरी चालतो. वर दिलेलें तुर्की भाषेचें सेवमेक=प्रीति करणें व सेवइसमेक्=परस्पर प्रीति करणें व सेवइसदिरमेक्=परस्परांवर प्रीति करावयास लावणें. हीं अशा तऱ्हेचीं अंतग्रहणाचीं उदाहरणें म्हणून देतां येतील. संस्कृतमध्यें 'उपैनं यज्ञो नमति' यांत उपनमति या क्रियापदांत 'एनं' व 'यज्ञ' हे शब्द अंतर्भूत झाल्याचें आपणांस दिसतें. किंवा पर+अपहार यामध्यें परस्वापहार, परदारापहार, परदाराधनापहार या रीतीनें पर आणि अपहार यामध्यें स्व, धन, दारा, इ. शब्द अंतर्भूत झालेले आपणांस दिसून येतील. मेक्सिकोंतील इंडियन लोकांच्या भाषेत " नि नका क्वा=मी मांस खातों, नि त्ला क्वा=मी कांहीतरी खातों." अशा रीतीनें मी आणि खातों यामध्यें खाण्याच्या पदार्थाचें नांव अंतर्भूत केलेलें आपणांस दिसून येईल. अशा तऱ्हेनें अंतर्भूत झालेल्या शब्दाच्या रूपामध्यें कधीं कधीं संक्षेप करण्याचीहि प्रवृत्ति आढळून येते.

**एकाकी व इतर भाषा**--एकाकी व एकाकी नसलेल्या भाषांमध्यें एक महत्वाचा फरक हा आहे कीं, एकाकी भाषेतील शब्द स्वतः स्वतंत्र असून स्वयंपूर्ण असतात परंतु त्यांचा अर्थ वाक्यांतील त्यांच्या विशिष्ट स्थानावर अवलंबून असतो व स्थानांतरावरोबर अर्थांतरहि होतें. उदा. चिनी भाषेमध्यें 'वो त नी'=मी तुला मारतों. पण 'नी त वो'=तूं मला मारतोस.' तसेंच 'त्स ऐ जेन'=समर्थ मनुष्य. परंतु 'जेन त्स ऐ'=मनुष्यसामर्थ्य. 'हौ जेन'=चांगला मनुष्य. पण 'जेन हौ'=मनुष्याचा चांगुलपणा असे अर्थ होतात. तेंच मराठीमध्यें 'तूं मला मारतोस' यासारख्या वाक्यांत 'मला तूं मारतोस' किंवा 'मला मारतोस तूं' किंवा 'मारतोस मला तूं.' अशा रीतीनें शब्दांचें स्थान कसेंहि बदललें तरी अर्थबदल होत नाहीं. याप्रमाणें प्रत्ययी भाषांमध्यें वाक्यांतील शब्दाच्या स्थानावर त्याचा अर्थ अवलंबून नसतो, व त्यांतील प्रत्ययांवरून त्याचा व वाक्यांतील इतर शब्दांचा संबंध व तदनुषंगिक अर्थ हे निश्चित होतात.

**या पद्धतींचें ग्राह्याग्राह्यत्व**—बाह्यस्वरूपविषयक पद्धतीप्रमाणें भाषांचे (१) एकाकी, (२) चिकट्या, (३) प्रत्ययी अथवा विकरणात्मक, (४) समावेशक, (५) अनेकसंघायक व (६) पृथक्करणात्मक असे सहा वर्ग पडतात. ही पद्धति अलीकडे त्याज्य समजण्यांत येते. वास्तविक एकाकित्व, संश्लिष्टत्व किंवा विकारित्व या भाषेच्या वाढीमधील निरनिराळ्या अवस्था आहेत. शिवाय यामध्यें वाक्यरचना व शब्दरचना ह्याचा घोंटाळा होतो. तसेंच या तिन्ही प्रकारची रचना आपणांस एकाच भाषेत व एकाच वेळींहि आढळूं शकते. आतां कित्येक भाषांत विशिष्ट प्रवृत्तीवरच जोर दिलेला आढळतो. व इतर पद्धतीकडे त्या मानानें दुर्लक्ष झालेलें आढळतें. चिनी भाषेमध्यें एकाकित्व व पृथक्करण या गोष्टीस प्राधान्य देऊन संयोगीकरणाकडे दुर्लक्ष केललें आढळतें. तथापि चिनी भाषेमध्येंहि तिला एकाकी स्वरूप येण्यापूर्वी प्रत्यय होते असें एक मत आहे (वनेहाडे कार्ल्प्रेन. पूर्वचिनीप्रत्यययुक्त भाषा, जर्नल एशियाटिक १५,२०५-३२). तसेंच भाषेचें स्वरूपहि सर्व काल एकाच प्रकारचें राहतें असें नाहीं. केव्हां केव्हां भाषेच्या इतिहासांत आपणास भाषेची प्रवृत्ति एका दिशेकडून अगदीं विरुद्ध दिशेकडे गेल्याचीहि उदाहरणें आढळतात. तेव्हां अशा तत्त्वावर केलेलें वर्गीकरण हे कायमचें टिकणारें न होतां वरचेवर बदलण्याची पाळी येईल, व

यामुळें ज्या भाषांचा परस्परांशीं कांहीं संबंध नाहीं अशाहि भाषा आपण एकाच वर्गांत घालण्याचा संभव आहे याकरितां अलीकडे या वर्गीकरणपद्धतीवर कोणी फारसा भर देत नाहीं

**मानववंशमूलक वर्गीकरण**—भाषावर्गीकरणाची दुसरी पद्धत म्हटली म्हणजे ती ज्या मानवसमाजांत रूढ आहे त्या मानवसमाजास अनुलक्षून निरनिराळ्या भाषांचें वर्गीकरण करणें होय ही पद्धति फ्रेडरिक मुल्र यानें सुचविली आहे यानें प्रथम बारा निरनिराळे मानववंश अस्तित्वांत होते अशी कल्पना केली आहे व त्याचेहि पुन्हां भाषेची वाढ होईपर्यंत सुमारें शंभर मानववंशशास्त्रदृष्ट्या निरनिराळे गट कल्पिले आहेत व याप्रमाणें सुमारें निरनिराळ्या मूळ शंभर प्रकारच्या भाषा होत्या अशी त्यानें कल्पना केली आहे व त्यांपासून पुढें अनेक भाषा निघाल्या अशी त्याची समजूत आहे हें मानववंशाचें वर्गीकरण त्यानें मनुष्यांच्या केसांच्या रचनेवरून कुरळे, सरळ अशा तऱ्हेनें केलेलें आहे परंतु भाषाशास्त्रज्ञांनीं या वर्गीकरणपद्धतीस फारसें महत्त्व दिलें नाहीं याचें कारण मनुष्य प्रथम अनेक मूळ वंशांपासून उत्पन्न झाला हें मानणें अशास्त्रीय आहे कारण मनुष्यजातीची उत्पत्ति कशी झाली याबद्दल अद्यापि एकवाक्यता झालेली नाहीं व याबद्दल ऐतिहासिक पुरावा मुळींच उपलब्ध नाहीं मानववंशशास्त्रज्ञांसहि आपल्या विचारपद्धतीमध्यें मधून मधून मोठमोठाले खड्डे पडलेले आढळतात जर पृथ्वीच्या पाठीवर निरनिराळ्या ठिकाणीं स्वतंत्रतेनें निरनिराळ्या मानवसमाजांची उत्पत्ति झाली असेल तर त्यामध्यें निरनिराळ्या तऱ्हेच्या भाषा उत्पन्न होणें स्वाभाविक आहे तथापि पुढें अशा भाषांचें मिश्रण झालें असतां त्या मिश्रित भाषेची उत्पत्ति शोधून काढणें साधनांच्या अभावीं अशक्य आहे कोणतीहि भाषा अगदीं तिच्यांत फरक केव्हांहि होणार नाहीं अशा तऱ्हेनें सीलबंद असूं शकत नाहीं, हें आपणांस प्रत्येक भाषेच्या इतिहासावरून कळून येतें आजची मराठी ही इंडो युरोपियन किंवा आर्यन् भाषेपासून निघाली आहे ही गोष्ट जरी खरी असली तरी हा संबंध जोडण्यास आपणास मध्यंतरीं पुष्कळच दुवे जोडावे लागतात, तसेंच निरनिराळ्या मानववंशाविषयींहि विचार करीत असतांना आपणांस (कोणतेंहि तुलनेचें प्रमाण लावलें तरी) सर्वस्वी शुद्ध व एकरक्ताची अशी मानवजाति आज जगांत कोठेंहि आढळत नाहीं एखादा जपानी मनुष्य जर इंग्लंडांत जन्मून इंग्लंडांतच वाढला तर त्याची मातृभाषा इंग्रजी होऊन तींतील ध्वनी व उच्चारण्याची पद्धति तो इतकी आत्मसात् करील कीं, त्यास एखाद्या इंग्रज मनुष्याइतकेंच जपानी भाषा शिकणें कठिण जाईल अमेरिकेमध्यें आज युरोपांतील सर्व निरनिराळ्या वंशांच्या लोकांनीं (जर्मन, डच, फ्रेंच, इटालियन, पोल, जपानी, नीग्रो, यांनीं) आपली मूळ भाषा सोडून देऊन इंग्रजी भाषेचा स्वीकार केलेला आहे व थोड्या पिढ्यांमध्यें त्यांनीं ती आत्मसात् केलेली आहे इंग्लंडमध्येंहि आज जे निरनिराळ्या वंशांचें मिश्रण झालेलें आपणास आढळतें व त्या प्रत्येक वंशानें आपल्या भाषेचे विशेष इंग्रजी भाषेमध्यें कायम ठेवल्याचें आढळतें, त्यावरूनहि मानववंशाचा भाषेशीं तितका निकट संबंध नाहीं ही गोष्ट आपल्या ध्यानांत येते यावरून मानववंशाची प्रगति व भाषेची प्रगति ही एकाच दिशेनें चाललेली नसते ही गोष्ट आपल्या लक्षांत येईल यामुळें वंशसंकर झाला असतां जरी त्याचा भाषेवर थोडा फार परिणाम होतो ही गोष्ट खरी असली तरी ती भाषेच्या वर्गीकरणास पुरेसें साधन मानतां येणार नाहीं स्टर्न्थॉल व मिस्टेली यांच्या वर्गीकरणाचा उल्लेख पूर्वीं केलाच आहे

**भाषावंशानुसारी वर्गीकरण**--भाषावर्गीकरणाची आणखी एक पद्धति म्हणजे भाषावंशानुसारी वर्गीकरण होय ही पद्धति अनेकांनीं मान्य केलेली आहे या पद्धतीस वास्तविक ऐतिहासिक वर्गीकरण हें नांव अधिक सार्थ होईल कारण भाषांचा वंश अथवा विस्तार ही कल्पना तितकी अन्वर्थक नाहीं जेव्हां आपण भाषांचे वंश कल्पून भाषांचीं कुळें व भाषांचा मातृकन्यासंबंध अथवा स्वसृसंबंध आहे असें म्हणतों तेव्हां आपण तें केवळ अलंकारिक पद्धतीनेंच बोलतों असें म्हटलें पाहिजे एका भाषेपासून दुसरी भाषा उत्पन्न होत नसून भाषा ही वास्तविक मनुष्यापासून उत्पन्न होते भाषा ही एक मानवी व सामाजिक स्वरूपाची क्रिया आहे व मनुष्याच्या मानसिक व व्यावहारिक प्रगतीबरोबर भाषेचीहि प्रगति व तिच्या स्वरूपांत बदल होत असतो ज्याप्रमाणें एखाद्या एक वर्षाच्या मुलाचें कांहीं वर्षांनीं ऐंशी वर्षांच्या म्हाताऱ्यांत रूपांतर होतें परंतु मूळची व्यक्ति तीच असते त्याप्रमाणें प्राकृत किंवा देश्य भाषा या वैदिक किंवा संस्कृत भाषांचींच रूपांतरें आहेत परंतु आज आपल्या दृष्टीला निरनिराळ्या देश्य भाषा ह्या स्वतंत्र व नवीन भाषा आहेत असें दिसतें कारण त्यांच्या स्वरूपांतील फरक फारच मोठा असून त्या एकमेकांसहि अपरिचित झाल्या आहेत हा फरक पडण्याचें कारण त्या भाषांच्या अंगीं नसून ती बोलणाऱ्या समाजाच्या व त्याच्या इतिहासाच्या ठिकाणीं आहे तेव्हां निरनिराळ्या प्राकृत भाषा ह्या आपणांस सदृश भाषा किंवा स्वसृभाषा आहेत असें म्हणतां येईल कारण त्या एकाच मूळ संस्कृत भाषेपासून बनल्या आहेत परंतु ही परिभाषा केवळ अलंकारिक आहे हें आपणांस विसरून चालणार नाहीं याप्रमाणें जर आपणांस प्रत्येक भाषेच्या इतिहासाचें ज्ञान करून घेतां आलें व त्यांचा उगम अथवा त्यांत

वेगळें स्वरूप केव्हा प्राप्त झालें हें निश्चितपणें माहीत करून घेतां आलें तर आपणास त्यांच्या उच्चारपद्धतीचा, स्वरूपाचा किंवा वाक्यरचनापद्धतीचा तौलनिक अभ्यास करण्याचें कारण नाहीं व अशा रीतीनें ऐतिहासिक अभ्यास हीच सरळ व अत्यंत सुरक्षित अशी पद्धति होय. याप्रमाणें आपणास भरतखंडातील निरनिराळ्या बंगाली, हिंदी, गुजराथी, मराठी इ. देश्य भाषांचा ऐतिहासिक अभ्यास करून त्यांचें नातें अथवा परस्पर संबंध त्यांच्या स्वरूपाचा तौलनिक अभ्यास केल्याखेरीजहि जाणतां येईल. आपण या निरनिराळ्या भाषांतील लेखांचा अभ्यास केला असतां प्रत्येक भाषा विशिष्ट प्राकृतापासून व ती विशिष्ट प्राकृत संस्कृतापासून निघाली आहे हें कळून येईल व जोंपर्यंत विशिष्ट प्रांतांतील लोक आपली परंपरागत भाषा वापरीत आहेत तोंपर्यंत या देश्य भाषांमध्यें परस्परांत कितीहि फरक पडत गेला तरी त्यांचें मूळ हुडकून काढण्यास आपणास कठिण जाणार नाहीं व त्यांचें परस्परांशीं असलेलें नातें कायम राहील. अशा पद्धतीनें अभ्यास केला असतां आपणास असें दिसून येतें कीं, या निरनिराळ्या भाषांतील घटनाविषयक, शब्दसंपत्तिविषयक किंवा वाक्यरचनात्मक जें साम्य आहे तें त्यांच्या या वांशिक संबंधा-मुळें असून तें त्यांचें कारण नसून परिणाम आहे. अनेक शतकांमध्यें घडून येणाऱ्या फरकामुळें दोन भाषांतील साम्य अगदीं नाहींसें होऊन त्यांस पूर्णपणें निराळेंच स्वरूप प्राप्त होणें संभवनीय आहे व अशा वेळीं परस्परांच्या साक्षात् तुलनेनें त्यांतील साम्य हुडकून काढणें अशक्य आहे. आज जर बल्गेरियन व इराणी यांची त्यांच्या अर्वाचीन स्वरूपांत तुलना करूं लागलों तर त्या दोन्ही इंडो-युरोपीयन भाषेपासूनच निघाल्या आहेत ही गोष्ट जर आपण संस्कृत इंडो-युरोपियन भाषेचीं कांहीं वैशिष्ट्यें ठाऊक नसतील तर सिद्ध करणें कठिण जाईल. तेव्हां दोन भाषांचें मूळ जर एकच असेल तर आजच्या त्यांच्या स्वरूपांत कितीहि बदल झाला असला तरी ऐतिहासिक अभ्यासानें त्यांस एकत्र जोडणें आपणास कठिण नाहीं. अशा तऱ्हेचा ऐतिहासिक अभ्यास जेव्हां एखाद्या भाषेतील निरनिराळ्या काळचे लेख आपणास उपलब्ध असतील तेव्हांच त्यांची तुलना करून करतां येणें शक्य आहे. तसेंच हे लेख जेथें शब्दांचे ध्वनिलेख असतील तेथेंच त्यांची तुलना करणें शक्य होईल. परंतु चिनी भाषेसारख्या भाषेच्या लेखांत जेथें ध्वनिचिन्हांच्या ऐवजीं कल्पनाचित्रें असतात तेथें त्यांची तुलना करून ऐतिहासिक अभ्यास करणें शक्य नसतें व यामुळेंच चिनी भाषे-मध्यें जरी फार मोठें वाङ्मय उपलब्ध आहे तरी त्याचा ऐतिहासिक अभ्यास करणें फार अवघड पडतें. अशा तऱ्हेनें निरनिराळ्या भाषांचे वांशिक संबंध जोडण्यास पुढील निरनिराळीं साधनें उपयोगांत आलीं आहेत. (१) भौगोलिक स्थान—जेव्हां एकमेकांशीं संबंध नसलेले या दोन निरनिराळ्या ठिकाणीं असलेल्या दोन भाषांत पुष्कळसे शब्द सामान्य असतात तेव्हां त्यांमध्यें वांशिक संबंध असावा अशी कल्पना करण्यांत येते. जर ऐतिहासिक कालामध्यें या दोन स्थानांतील लोकांचें दळणवळण असल्याचें दिसून आलें नाहीं व त्यांमध्यें शब्दांची देवघेव झाल्याचें दिसलें नसेल तर त्यांतील साम्य वंशमूलकच असलें पाहिजे. परंतु ज्या लोकांच्या भाषें-तील लेख उपलब्ध नसतील त्यांचा इतिहास आपणास इतका अल्प माहीत असतो कीं, त्यांच्या निरनिराळ्या समाजांतील घटकांमध्यें परस्पर दळणवळण होतें कीं नव्हतें हें सिद्ध करणें कठिण जातें. कारण इतिहासामध्यें आपणास निरनिराळ्या भाषांच्या भौगोलिक स्थानामध्यें पुष्कळच फरक पडलेला कांहीं बाबतींत आढळून येतो. कधीं कधीं एखादा समाजच आपली भाषा बरोबर घेऊन स्थानत्याग करतो (उदा० दक्षिण आफ्रिकेंतील डच). कधीं कधीं परिस्थितीमुळें एका बोलीचा पगडा दुसऱ्या बोलीवर पडून तीस प्रमुखत्व मिळतें व दुसरी अजीबात नष्ट होते आणि त्यामुळें त्या जेत्या बोलीचा संबंध निराळ्या शेजारच्या भाषांशीं येतो (उदा. पूर्व जर्मनीतील गॉथिक बरोबरीच्या बोली). कधीं कधीं विशिष्ट बोली बोलणारे लहान लहान समाज पहाडांमध्यें किंवा समुद्रकिनारीं जाऊन राहतात व त्यामुळें त्यांच्या भाषाप्रदेशास लहान लहान वेगळें स्वरूप येतें (उदा. ब्राहुई बास्क हंगेरियन वगैरे). (२) कोणी कोणी भाषेचीं सामान्य घटना ध्वनिविषयक स्वरूपविषयक किंवा वाक्यरचनात्मक हीं वांशिक संबंध जोडण्यास पुरेशीं कारणें आहेत असें मानतात. तथापि भाषाशास्त्रीयदृष्ट्या या गोष्टीस कितीहि महत्त्व असलें तरी वंशसंबंध जोडण्यास त्या पुरेशा नाहींत. भाषेचें स्वरूप प्रत्ययी चिकटी एकाकी वगैरे कोणत्याहि प्रकारचें असलें तरी अशा स्वरूपाच्या दोन भाषांमध्यें संबंध असलाच असें मानतां येणार नाहीं ही गोष्ट आपण वर दाखविलीच आहे. ह्या गोष्टी भाषेच्या प्रगतीमध्यें कमी-अधिक प्रमाणांत नेहमींच चालू असतात आणि हे परिणाम जगाच्या निरनिराळ्या भाषांमध्यें निरनिराळ्या गोष्टींपासून उत्पन्न होतात. (३) एकाच वंशापासून उत्पन्न झालेल्या भाषांमध्यें कांहीं शब्द सामान्य असणें साहजिकच आहे परंतु हे दोन शब्दांतील साम्य अधिक सूक्ष्म दृष्टीनें तपासणें जरूर आहे. वर वर सारख्या दिसणाऱ्या एकाच मूळ शब्दापासून उत्पन्न झालेले अशा भासणाऱ्या शब्दांचाहि कधीं कधीं परस्परसंबंध अगदींच नसल्याचें आढळून येतें. उदा. ग्री पिऑस, ल ल्यूम किंवा ज्यु फ्युएर फ्रें फ्यू यांचा एकमेकांशीं कांहीं संबंध नाहीं. ब्लुम फ्लुम इत्यादि व फिक हइ कम् व फाइल्ड या शब्दांशीं संबद्ध आहेत. एका भाषेतील शब्द दुसऱ्या भाषेंत जाण्याची क्रिया इतकी सहज घडून येत असते कीं त्यावरून त्यांचा

संबंध जोडणें अवघड होतें कोणत्याहि भाषेमध्यें अमिश्र अशी शब्दसंपत्ति आढळत नाहीं काहीं भाषांतून तर परकीय शब्द घेण्याची प्रवृत्ति अतिशय आढळून येते याचें कारण शब्द हा भाषेंतील एक स्वतंत्र घटक असून तो दुसऱ्या भाषेच्या व्याकरणामध्यें फरक केल्याशिवाय सहज आपला प्रवेश करून घेऊं शकतो विशेषत ज्या भाषेंतील शब्दांची व्युत्पत्ति फारशी भानगडीची नसते तेंथें ही क्रिया अधिक सुलभ असते जेथें भाषेंतील लेखपरंपरा अत्रुटित उपलब्ध असते तेथें विशिष्ट परकीय शब्दांनीं त्या भाषेंत केव्हां प्रवेश केला हें आपणास निश्चितपणें सांगतां येतें परंतु ज्या भाषेंतील लेख दीर्घकालपर्यंतचे उपलब्ध नसतात तेथें ही गोष्ट कठिण होते जेव्हां दोन भाषांत एकच शब्द आढळतो तेव्हां तो कोणत्या भाषेपासून कोणत्या भाषेनें उसना घेतला हें ठरविणें पुन्हां अधिक कठिण असतें केव्हां केव्हां तो तिसऱ्याच एका भाषेतून दोहींनीहि उचलला असण्याचा संभव असतो किंवा त्यांतील साम्य त्यांची निरनिराळ्या तऱ्हेनें परिणति झाल्यामुळेंहि उत्पन्न झालेलें असण्याचा संभव असतो यामुळें अशा वेळीं केवळ शब्दसाम्यावरून दोन भाषांचें नातें जोडणें कठिण असतें तथापि सामान्य शब्दसंपत्ति हें एक दोन भाषांतील संबंध जोडण्यास महत्त्वाचें कारण आहे ही गोष्ट आपणास अमान्य करतां येणार नाहीं शब्दाचें स्वरूप जितकें सामान्य तितका तो परकीय असण्याचा संभव कमी व जितकें अमूर्त अथवा नवकल्पनादर्शक तितका तो उसना घेतलेला असण्याचा संभव जास्ती जर दोन भाषांमध्यें तुलनेनें सामान्य वस्तुवाचक ( उदा प्राणी, शरीरावयव, तारे, पंचमहाभूतें, खाणें, पिणें, निजणें इ० परिचित क्रिया, पुरुषवाचक सर्वनामें, संख्यावाचक विशेषणें, अव्ययें इ० ) शब्द बरेचसे सामान्य आढळतील तर त्या दोन भाषांत वांशिक संबंध आहे असें म्हणण्यास बरीच जागा आहे असें समजण्यास हरकत नाहीं (४) दोन भाषांतील वांशिक संबंध सिद्ध करण्यास त्यांतील ध्वनिविषयक आणि स्वरूपविषयक साम्य हें महत्त्वाचें आहे वास्तविक या दोन गोष्टींत इतका एकमारखा फरक पडत असतो कीं, त्यावरून वांशिक साम्याची कल्पना करणें बरोबर होणार नाहीं असें आपणास प्रथमदर्शनीं वाटतें परंतु भाषेच्या प्रगतीच्या विशिष्ट अवस्थेमध्यें तिची ध्वनिपद्धति निश्चित असून ती बोलणाऱ्या समाजाच्या वाक्पद्धतीशीं निगडित असते व तत्संबद्ध काहीं मानसिक क्रियाहि निश्चित स्वरूपाच्या असतात ही वाक्पद्धति आणि या मानसिक प्रवृत्ती विशिष्ट समाजाच्या ध्वनिपद्धतीस इतरांपेक्षां निराळें असें निश्चित स्वरूप देतात व त्यांचें वैशिष्ट्य इतकें निश्चित असतें कीं एका भाषेंतील विशिष्ट ध्वनींचें अनुकरण दुसऱ्या भाषेंत क्वचितच केलें जातें व या ध्वनींमध्यें जो कालांतरानें फरक पडत जातो तो त्या विशिष्ट वाक्पद्धतीमध्यें व मानसिक प्रवृत्तीमध्यें होणाऱ्या बदलास अनुसरून असाच होत असतो जेव्हां काहीं अनपेक्षित कारणामुळें एखादा निराळाच ध्वनि एखाद्या भाषेमध्यें प्रवेश करतो तेव्हां तो त्या पुढील एखाद्या कालामध्यें पुन्हां टाकून दिलेलाहि कधीं कधीं आढळतो इंग्रजी भाषेमध्यें अनेक परकीय भाषांतून शब्द घेतले गेले आहेत परंतु त्यांचा उच्चार त्या भाषेंतील विशिष्ट ध्वनिपद्धतीस अनुसरून बदलण्यात आलेला आहे तसेच भाषेमध्यें जे निरनिराळे उच्चार करण्यात येतात ते विशिष्ट मूळ ध्वनींच्या निरनिराळ्या प्रकारच्या संयोगापासून बनविण्यात येतात तेव्हां एखादा परकीय ध्वनि भाषेंत आल्यास त्यानें अनेक प्रकारचे संयोगहि त्या भाषेंत येण्याचा संभव असतो व ही गोष्ट भाषेच्या प्रगतीच्या विरुद्ध असते प्रत्येक भाषेतील ध्वनींची वाढ अंत प्रवृत्तीनें होत असून त्यामध्यें बाहेरची भर पडत नसते तेव्हां ज्या ठिकाणीं आपणास दोन भाषामध्यें ध्वनिविषयक नियमांनें सादृश्य आढळून येईल तेव्हां त्या दोन भाषांत वांशिक संबंध आहे असें गृहीत धरण्यास हरकत नाहीं (५) भाषांचा वांशिक संबंध जोडण्यास भाषांचें स्वरूप हेंहि एक गमक आहे भाषेचें स्वरूप म्हणजे केवळ ती प्रत्ययी आहे वगैरे प्रकारच नसून भाषेंतील विशिष्ट शब्दांचीं प्रचलित रूपें सारखीं असणें जरूर आहे उदा क्रियापदाचीं निरनिराळीं रूपें नाम व सर्वनामाचीं निरनिराळीं रूपें हीं ज्या दोन भाषांत सारखीं असतील त्यामध्ये स्वरूपविषयक व अर्थात वांशिक संबंध आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं विशेषत जेथें अपवादात्मक रूपें सारखीं असतील तेथें तें एका भाषेच्या प्राचीन स्वरूपांतील गमक म्हणून त्यास अधिक महत्त्व आहे वरील विवेचनावरून आपणास असें दिसून येईल कीं, भाषांचा वांशिक संबंध जोडणें ही गोष्ट काहीं सोपी नव्हे कित्येक भाषांच्या बाबतींत जुन्या लेखांच्या अभावामुळें किंवा त्यांच्या स्वरूपात आमूलाग्र बदल झाल्यामुळें त्यांचा ऐतिहासिक अभ्यास करणें कठिण असतें यामुळें सर्व भाषांचें पूर्ण वर्गीकरण करणें हें ध्येय साध्य करणें नेहमीं दूरच राहील तथापि आतापर्यंतच्या संशोधनावरून काहीं भाषावंश निश्चितपणें मान्य करण्यांत आले आहेत त्यामध्यें इंडो-युरोपिय हा सर्वांत महत्त्वाचा असून सेमिटिक, फिनोउग्रिक, बंटु मलाया, पोलेनेशिअन, कॉकेशन, द्राविड यांचेंहि स्थान निश्चित झालें आहे ज्या भाषांत लेख किंवा वाङ्मय उपलब्ध आहे त्या भाषांचा अभ्यास अलीकडे बराच झालेला असून ज्या भाषांच्या पूर्वस्वरूपाबद्दल फारशी माहिती मिळत नाहीं त्या भाषांचा अभ्यास अजून व्हावयाचा आहे व तो अधिक कठिण आहे

**आर्यन् भाषावंश**—सध्या पश्चिम व दक्षिण आशियांतील आणि युरोपांतील बहुतेक देशामध्यें प्रचलित असलेल्या भाषेला आतापर्यंत इंडो-युरोपीय, इंडो-जर्मानिक व आर्यन् अशीं नांवें निरनिराळ्या भाषाशास्त्रज्ञांनीं दिलीं आहेत त्यापैकीं

इंडोजर्मानिक हें नाव विशेषत जर्मन भाषाशास्त्रज्ञात रूढ आहे तर लॅटिन देशातील भाषाशास्त्रज्ञ विशेषत इंडो-युरोपियन हें नाव अधिक पसत करतात पहिल्या नांवात या भाषेनें या दोन लोकानीं व्यापलेल्या भाषा येतात तर दुसऱ्यात दोन प्रदेश येतात इग्रज भाषाशास्त्रज्ञ दोन्हीहि शब्द वापरतात व काहीं भाषाशास्त्रज्ञ आर्यन् हें नावच अधिक पसत करतात ही आर्यन् भाषा बोलणारे लोक मूळ कोठें होते याबद्दल निरनिराळीं मतें प्रदर्शित झालीं आहेत काहींच्या मतें त्यांचें मूलस्थान मध्य आशिया हें होतें तर काहींच्या मतें स्कॅंडिनेव्हिया, डॅन्यूब नदीकाठ, जर्मनी किंवा कॉकेशस पर्वत असें होतें लो टिळकाच्या मतें वेदभाषी आर्यांचे पूर्वज पूर्वी उत्तरध्रुवाजवळ राहात होते या भाषेचें मूळ स्वरूप कसें होतें याचें आपणास निश्चित ज्ञान नाहीं तथापि तिची वाढ दीर्घकालपर्यंत झालेली असून ती पूर्ण प्रत्ययी भाषा होती व तिचें स्वरूप बरेंच गुतागुतीचें होतें असें मानतात या इंडो-युरोपियन भाषाच्या गावतींत आपणास शास्त्रीयदृष्टया असें दाखविता येतें कीं, या सर्व मूळ एका भाषेपासूनच निघालेल्या आहेत परतु त्या बोलणाऱ्या लोकाचा काहीं वाशिक सबध आहे असें निश्चितपणें म्हणता येत नाहीं, असें प्राफचें मत आहे कारण ही आर्यन् भाषा बोलणारे मूळचे लोक जेव्हा निरनिराळया प्रदेशामध्यें गले तेव्हा त्यांच्यामध्यें अनेक प्रकारचें वाशिक मिश्रण होणें स्वाभाविकच होतें व अनेक प्रदेशातील लोकानीं आपली मूळची भाषा टाकून तिच्या एवजीं या भाषेचा स्वीकार केला असणें सभवनीय आहे अशा तऱ्हेचें स्वत ची भाषा सोडून निरनिराळ्या भाषा स्वीकारल्याचे प्रकार ऐतिहासिक काळातहि आपणास आढळतात व यामुळेंच आपणास ज्या लोकानीं या आर्यन् भाषेचा स्वीकार केला नाहीं असे काही ब्राहुइ भाषा बोलणाऱ्या लोकाप्रमाणें बेटा सारख प्रदेश आढळतात व हीच गोष्ट आपणास वशात भेद नसलेले इस्थोनियन लोक फिनोउग्रिक भाषा व लेट हे आर्यन् भाषा बोलतात यात दिसते आज आपणास शुद्ध आर्यवशाचें स्वरूप युरोपातील कोणत्याहि प्रदेशात पाहावयास मिळणें कठिण आहे आर्यन् भाषेच सर्वांत जुनें स्वरूप आपणांस वेदामध्यें पहावयास सापडतें या भाषेचें खिस्तपूर्व कालांतील स्वरूप आपणास दुसऱ्या फक्त तीन भाषांत आढळून येतें त्या म्हणजे (१) इंडो-इराणी अथवा अवेस्ता, (२) ग्रीक (३) लॅटिन भाषासघ यातील इंडो-इराणी भाषेचें स्वरूप मूळच्या भाषेशीं अधिक जवळ आहे जर्मानिक भाषांतील लेख खिस्ती शकाच्या आरभ कालापूर्वी आढळत नाहींत व या वेळीं त्या भाषेमध्यें ध्वनिविषयक व स्वरूपविषयक पुष्कळच फरक पडला होता हा फरक पडण्याचीं कारणेंहि या भाषेनें व्यापलेल्या निरनिराळ्या क्षेत्रात निरनिराळ्या प्रकारचीं होतीं ज्या भाषेमध्यें वास्तविक अधिक अर्वाचीन लेख उपलब्ध आहेत त्यांमध्येंहि काहीं प्राचीन आर्य प्रयोग आपल्या दृ ीस पडतात, तर काहीं भाषांतील अत्यत जुन्या लेखातहि अधिक बदल झालेले आढळून येतात स्लॅव्होनिक व लिथुॲनिअन भाषामध्यें हा फरक पडण्याची क्रिया जर्मानिक भाषा पेक्षा फारच मद गतीनें चाललेली आढळते या दृष्टीनें आपणांस या आर्यनवशसभव भाषामध्यें निरनिराळ्या प्रकारचीं नातीं दाखवितां येतील

**मूळची आर्यन भाषा**—आपणांस जरी आज मूळच्या आर्यन् भाषेचें स्वरूप कसें होतें हें प्रत्यक्ष आढळत नाहीं तरी काळजीपूर्वक तौलनिक पद्धति स्वीकारल्यास आपणांस तिच्या स्वरूपाचें काहींसें ज्ञान करून घेतां येणें शक्य आहे उदा प या ध्वनीबद्दल आजच्या या वशांतील भाषांत पुढें दिल्याप्रमाणें निरनिराळे ध्वनी आपणास आढळतात इंडो-इ प, ग्री प, लॅ प, मूळ जर्मन फ-व, लिथु प, स्लॅ प, आर्मे ह व या सादृश्यावरून आपणांस असें म्हणतां येईल कीं, या सर्व ध्वनींस अनुरूप असा मूळ आर्यन् भाषेंत एखादा ध्वनि असला पाहिजे व अशी या सर्व भाषातील निरनिराळीं सादृश्यें एकत्र केल्यास त्यातून आपणास प्रत्येक सादृश्यास एक असे मूळ आर्यन् भाषेंतील सर्व ध्वनी शोधून काढता येतील अर्थात ही गोष्ट जितकी आपणास वाटते तितकी सोपी नाहीं परंतु त्यावरून मूळ भाषा शोधून काढण्याची पद्धति आपणास दिसून येन व जी गोष्ट आपण ध्वनींस लावतो तीच शब्दाचीं रूपें व वाक्यरचना यासहि लावतां येणें शक्य आहे असें गृहीत धरण्यास आप णास कांहीं हरकत नाहीं अशा रीतीनें मूळ आर्यन भाषेचें ज्ञान आपणांस करून घेतां येणें शक्य आहे अर्थात अशा रीतीनें आपण कल्पनेनें जुळविलेल्या विशिष्टरूपामध्यें जसजसे नवीन नवीन शोध लागत जातात तसतसा फरक करणें जरूर पडेल उदा १८७६ पर्यंत आर्यन् भाषेमध्यें फक्त अ, इ, उ हे तीन स्वरच होते अशी कल्पना होती परतु मागाहून असें दृष्टीस पडलें कीं, जेव्हां आर्यन् भाषेंतील 'अ' यास सदृश युरोपियन भाषांत 'ए' हा स्वर असतो तव्हां आर्यन् भाषेंतील कण्ठ्य वर्णाचें तालव्यांत रूपांतर होतें व जेव्हा आर्यन भाषेंतील 'अ' चें युरोपियन भाषेंतील 'अ' अथवा 'ओ' बरोबर सादृश्य असतें तेव्हां याप्रमाणें फरक होत नाहीं (यास तालव्य नियम असें म्हणतात) यावरून आर्यन् भाषेंतील 'अ' हा युरोपियन भाषेंतील 'अ', 'ए' व 'ओ' या तिन्ही स्वरांचें काय करतो असें दिसून आलें याप्रमाणें नवीन नवीन शोध जसजसे लागत जातील तसतसे आपल्या कल्पित मूळ आर्यन् भाषेच्या स्वरूपामध्यें फरक पडलेला आपणास दिसून येईल म्हणजे सध्यां आपणांस केवळ तिचें एक काल्पनिक स्वरूप फार झालें तर बनवितां येईल परतु तें आजच्या जिवत भाषांच्या मानानें फारच आकुचित स्वरूपाचें असेल

**वांशिक संबंधाचें ज्ञान**—वांशिक वर्गीकरण हें ऐतिहासिक सत्यावर अवलंबून असल्यामुळें अधिक स्थिर स्वरूपाचें व वैयक्तिक कल्पनावैचित्र्यावर अवलंबून नसलेलें असतें. ऐतिहासिक सत्य हें स्थिर स्वरूपाचें असून त्याचें महत्त्व बदलत नाहीं आणि ऐतिहासिक विवेचनपद्धतीनें संशोधन केलें असतां आपणास दोन भाषांमध्यें वांशिक संबंध एक आहे तरी अथवा नाहीं तरी अशा तऱ्हेचें स्पष्ट ज्ञान होतें. व ज्या पद्धतीनें आपणांस इंग्रजी ही आर्यन् कुलांतील भाषा आहे ही गोष्ट स्पष्ट होते त्याच पद्धतीनें संस्कृत व लिथुअॅनियन या भाषाहि आर्यन कुलांतील आहेत ही गोष्ट स्पष्ट होते. अर्थात् त्यांमधील परस्पर संबंधाचें प्रमाण निरनिराळें असेल एवढेंच. दोन भाषांच्या आजच्या स्वरूपांत आपणांस कितीहि फरक दिसत असला तरी त्यांचें मूळ वांशिक स्वरूप कधींहि बदलत नाहीं. उदा. अर्वाचीन फारसीमध्यें विभक्तिप्रत्ययांचा बहुतेक लोप झालेला आहे, तर अर्वाचीन जर्मनमध्यें विभक्तिप्रत्यय बरेच राहिलेले आहेत. भाषेंत होत असणारा फरक भौगोलिक परिस्थिति व कालाचें अंतर याखेरीज अनेक कारणांवर व परिस्थितीवर अवलंबून असतो व यामुळें आर्यन् वंशांतील निरनिराळ्या भाषांमध्यें साम्य अथवा विरोध कमीजास्त प्रमाणांत कां आढळतो या प्रश्नाचा विचार करणें महत्त्वाचें आहे.

**श्लेशरची स्तम्भमीमांसा**—श्लेशर या भाषाशास्त्रज्ञानें आपल्या 'स्तंभ' उपपत्तीमध्यें विशिष्ट भाषेचें मूळ आर्यन् भाषेपासून अंतर, एवढीच गोष्ट लक्षांत घेतली होती. त्याच्या मतानें मूळच्या आर्यन् भाषेच्या प्रथम दोन शाखा झाल्या-( १ ) स्लॅव्हो जर्मानिक, ( २ ) आर्यो-ग्रीको-इटॅलो-केल्टिक. पहिल्या शाखेच्या पुन्हा स्लॅव्हो-लिथुअॅनियन आणि जर्मानिक अशा दोन उपशाखा झाल्या. व दुसऱ्या शाखेच्या आर्यन् आणि ग्रीको-इटॅलो-केल्टिक अशा दोन उपशाखा बनल्या व त्या शाखांच्या पुढें निरनिराळ्या पोटशाखा तयार झाल्या. त्याच्या मतानें मूळ आर्यन् लोकांची वस्ती मध्य आशियांत होती आणि त्यामुळें त्या मूळ प्रदेशापासून विशिष्ट भाषेचा प्रदेश जितका दूर असेल तितकी ती मूळ भाषेपासून लौकर पृथक् झाली असली पाहिजे व तिचें प्राचीन अथवा आद्यस्वरूप कमी प्रतीं असलें पाहिजे. यामुळें पश्चिमेकडील दूरच्या भाषा या मूळ भाषेपासून लौकर अलग झालेल्या व त्या मानानें कमी आर्ष स्वरूपाच्या व पूर्वेकडील भाषा त्या मानानें नंतर अलग झालेल्या व अधिक आर्ष स्वरूपाच्या असल्या पाहिजेत असें त्याचें मत होतें. परंतु वस्तुस्थिति त्याच्या सिद्धांतास पोषक अशी आढळेना. उदा. स्लॅव्होनिक भाषेचें स्वरूप आर्यो-ग्रीको-इटॅलो-केल्टिक भाषासंघापेक्षां वास्तविक जर स्लॅव्हो-जर्मानिक शाखा मूळ आर्यन भाषेपासून लौकर अलग झाली असेल तर अधिक अर्वाचीन तऱ्हेचें असावयास पाहिजे. परंतु स्लॅव्हो-लिथुअॅनियन भाषांचें इंडो-इराणियन भाषांशीं तर इतकें साम्य आहे कीं, त्यास केटम संघांतून सातम् संघामध्यें घालण्यांत येतें. श्लेशर यानें ही गोष्ट केवळ आपाततः घडली आहे असें याचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला. परंतु अर्वाचीन संशोधनामुळें असें सिद्ध झालें आहे, कीं, इटालिक व केल्टिक भाषांचें जर्मानिक भाषांशीं स्लॅव्हो-लिथुअॅनियन भाषांपेक्षां अधिक साम्य आहे. व यामुळें स्लॅव्हो-जर्मानिक म्हणून एक मुख्य शाखा होती ही उपपत्ति ग्राह्य मानली तर ज्या दोन शाखा मूळच्या भाषेपासून साक्षात निघाल्या आहेत त्यांच्या प्रदेशामध्य स्पष्ट अशी मर्यादारेषा आढळणार नाहीं, तर सीमांतक्षेत्रांत एक मिश्र स्वरूप आढळलें पाहिजे. तसें या दोन भाषांच्या बाबतींत आपणास दिसून येत नाहीं.

**श्मिटची लहरीमीमांसा**—वरील विरोधाचा परिहार करण्याकरितां जोहानीस श्मिट यानें पुढील उपपत्ति पुढें आणली. त्यानें असें सुचविलें कीं, मूळच्या आर्यन् भाषेमध्यें जो फरक पडत गेला तो एकदम एका भाषेपासून दुसरी भाषा उत्पन्न झाली अशा तऱ्हेचा नसून ज्याप्रमाणें एका परातीतील पाण्यांत एखादी वस्तु टाकली असतां निरनिराळ्या लाटा उत्पन्न होतात व त्या एकमेकांत मिसळून जुन्या मोडून नव्या लाटा पुन्हा तयार होत असतात तशा तऱ्हेनें निरनिराळीं व्यापक अशीं भाषाक्षेत्रें उत्पन्न होऊन त्यांच्या मिश्रणानें पुढें नवीन भाषा उत्पन्न झाल्या असाव्या. व यामुळें एका भाषेंतील कांहीं गोष्टींचें दुसऱ्या एका शाखेशीं साम्य आढळतें, तर दुसऱ्या कांहीं गोष्टींचें तिसऱ्याच एका भाषेशीं साम्य आढळतें. उदा. केल्टिक भाषेंतील कांहीं विशेष इटालिक भाषेशीं, तर कांहीं जर्मानिक भाषेशीं सदृश आहेत. अलीकडे पोटभाषासंबंधीं अभ्यास होऊन जी उपपत्ति प्रसिद्धीस आली आहे तिच्याशीं वरील उपपत्ति विसंगत दिसते. या पोटभाषांच्या अभ्यासावरून असें दिसून आलें आहे कीं, पोटभाषांची उत्पत्ति ही एकापासून दुसरी अशी सरळ रेषेंत होत नसून निरनिराळ्या पोटभाषांमध्यें कांहीं कांहीं गोष्टींत साम्य आढळतें. उदा. 'अ' पोटभाषेंतील कांहीं गोष्टी 'ब', 'क', पोट भाषांशीं तर इतर कांहीं 'क', व 'ड', पोटभाषांशीं सदृश असतात परंतु 'ब' भाषेशीं नसतात तर 'ब' भाषेंतील कांहीं विशेष 'क' व 'ड' भाषेशीं सदृश असतात पण 'अ' भाषेशीं नसतात व प्रत्येक भाषेंतील विशेष आपापल्या परीनें परिणत होत असतात. व त्यांचा इतरांशीं संबंध नसतो. अशा तऱ्हेनें आपण प्रत्येक भाषाविशेषाची जर आकृति काढूं लागलों तर एकमेकांत मिसळणाऱ्या अनेक वक्र रेषा तयार होतील. यास समभाषाविशेषदर्शक

( आयसोफोन्स ) असें म्हणतात. जर या भाषांत स्वरूपविषयक, शब्दसंपत्तिविषयक अथवा वाक्यरचनाविषयक साम्य असेल तर हे वक्र समस्वरूपी असतील. जेथें आपणांस दोन पोटभाषा शेजारीं शेजारीं असून त्यांमध्यें मिश्र प्रदेश आढळणार नाहीं तेथें एका पोटभाषेनें आपलें वर्चस्व दुसऱ्या पोटभाषेवर पूर्णपणें बसविलें आहे असें समजावें. ही गोष्टहि आपणांस वस्तुस्थितीस अनुसरून दिसते. परंतु या लहरीमीमांसेमध्यें एक दोष असा दिसून येतो कीं, मूळ आर्यन् भाषा ज्या प्रदेशांत बोलली जात होती तो प्रदेश भौगोलिक दृष्ट्या तिच्या स्वरूपांत फरक पडण्यास अतिशय अनुकूल होता ही गोष्ट गृहीत धरण्यांत येते. याकरितां आर्यन भाषेचा प्रसार कसा होत गेला, या गोष्टीचा ऐतिहासिक अभ्यास अलीकडे चालू आहे. जेव्हां एक भाषा दुसऱ्या भाषेचें सर्वस्वी अतिक्रमण करून तिचें स्थान आपण घेते व तिला नामशेष करते तेव्हां मूळच्या भाषेचे कांहीं विशेष नवीन भाषेमध्यें शिरणें अपरिहार्य असतें व ही क्रिया मूळ आर्यन भाषेच्या स्वरूपामध्यें निरनिराळ्या क्षेत्रांत निरनिराळे फरक घडवून आणण्यास कारण झाली असावी. आर्यन् भाषाभाषी लोकांनीं जगांतील अत्यंत विस्तृत असें क्षेत्र व्यापिलें आहे व त्यांच्या भाषेचें अनेक निरनिराळ्या भाषांशीं मिश्रण झालें आहे. जेथें ते अधिक काल स्थायिक होऊन त्यांच्या अधिक पिढ्या झाल्या असतील तेथें त्यांच्या भाषेंत फार मंद गतीनें फरक पडला असेल. व त्यामुळें जुन्या भाषेच्या स्वरूपाचे अवशेष त्या भाषेंत अधिक आढळतील परंतु जेथें त्यांचें मिश्रण अतिशय जलद झालें असेल व मोठमोठाल्या उलाढाली झाल्या असतील तेथें त्यांच्या भाषेंत फरक फार जलद पडत गेला असेल. दक्षिण आफ्रिकेंत बोअर लोकांचा पोर्तुगीज, फ्रेंच आफ्रिकन व अँग्लो सॅक्सन इतक्या लोकांशीं थोडक्या कालांत संबंध आल्यामुळें दक्षिण आफ्रिकेंतील डच भाषा हीस निराळेंच स्वरूप आलें आहे, उलट लिथुअॅनियन भाषेचें स्वरूप दीर्घकालपर्यंत स्थिर राहिलें आहे.

**आर्यन् भाषेचें मूळ स्वरूप**—ही मूळ आर्यन् भाषा बोलणाऱ्या लोकांची सांस्कृतिक प्रगति बरीच झाली असल्यामुळें त्यांच्या भाषेस सुसंस्कृत स्वरूप प्राप्त झालें असावें परंतु तिचें मूळचें स्वरूप कोणतें होतें व तिचा तत्कालीन इतर भाषांशीं काय संबंध होता हें सांगणें कठिण आहे. आर्यन् भाषेसारख्याच सेमिटिक व फिनोउग्रिक या दोन भाषांचा व आर्यन् भाषेचा कांहीं संबंध असावा हें हर्मन मोलर ( सेमिटिक आणि इंडो-जर्मानिक १९०७ ) यानें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे, परंतु त्यावरून कांहीं निश्चित अनुमान काढतां येत नाहीं. अथापि या भाषांच्या मूळ स्वरूपाचा अभ्यास पुष्कळच व्हावयाचा आहे. आशिया मायनरमधील बाणाग्र लिपींतील लेखाच्या वाचनामुळें हिटाइट या भाषेमध्यें आर्यन् भाषेचें स्वरूप कायम असून तींत कांहीं शब्दविषयक, ध्वनिविषयक व वाक्यरचनाविषयक इतर भाषांतील विशेष शिरले असावे असें दिसून येतें. हिटाइट ही भाषा मूळच्या आर्यन भाषेची एक स्वसृभाषा असावी अशीहि एक उपपत्ति पुढें करण्यांत आली आहे. तसें असल्यास हिटाइट भाषेचा अभ्यास अधिक झाल्यास आर्यन् भाषेच्या मूळ स्वरूपाविषयीं आपणांस अधिक ज्ञान होण्याचा संभव आहे.

**कैंटम् व सातेम् संघ**—जरी मूळची आर्यन् भाषा सामान्यतः एक स्वरूपाची होती असें म्हणण्यांत येतें तरी ही गोष्ट पूर्णांशानें सत्य मानून चालणार नाहीं. कारण बराचसा मोठा प्रदेश व्यापणाऱ्या कोणत्याहि भाषेचें स्वरूप सर्वत्र पूर्णपणें अभिन्न असणें शक्य नाहीं. तर त्यामध्यें बदल होण्याची प्रवृत्ति सर्वत्र असून परिस्थितीप्रमाणें विशिष्ट प्रवृत्तीचा जोर होऊन एकाच भाषेमध्यें निरनिराळे फरक घडून येतात व या भेदप्रवृत्तीमुळेंच आर्यन् भाषेच्या कन्यारूप भाषांमध्यें निरनिराळे फरक उत्पन्न झाले आहेत. याचीं दोन उदाहरणें पुढें दिलीं आहेत—मूळ इंडो-युरोपियन भाषांतील दंततालव्य वर्णाबद्दल तिच्या कांहीं कन्याभाषांत 'स' कार व कांहीं भाषांत 'क'कार आढळतो. उदा. मूळ आर्यन् भाषेंतील 'कतोम'बद्दल ग्री. हेक्तान लॅ. कॅंटम्, वेल्श कँट, गॉ. हुंड, उलट सं. शतम्, झेंद सातेम्, प्राची. स्लॅ. सुतो, लिथु. सितस्, अशीं रूपें आढळतात. तसेंच ग्री. ओइकॉस, बरोबर लॅ. विकस्, गॉ. वैह्स, तर उलट अल्बे. विस, सं. विशम्, झेंद विसएम् अशीं रूपें आढळतील. वरील फरकांमुळें शंभरवाचक शतं शब्दावरून 'कॅंटम्' व 'सातेम्' भाषा म्हणून दोन भाषाकुलें पृथक् कल्पिलीं आहेत. कॅंटम् कुलांत पश्चिमेकडील ग्रीक, इटालिक, केल्टिक आणि जर्मानिक भाषा येतात, तर सातेम् कुलांत पूर्वेकडील इंडो-इराणी, स्लॅव्हो-बाल्टिक, आर्मेनियन व अल्बेनियन भाषा मोडतात. परंतु अशा तऱ्हेनें केवळ एकाच भेदप्रवृत्तीवरून भाषांचें वर्गीकरण करणें अशास्त्रीय आहे असें भाक म्हणतो. कारण अशा तऱ्हेनें दुसऱ्याहि एखाद्या भेदप्रवृत्तीवरून आपणांस भाषांचें वर्गीकरण करतां येईल; किंवा विशिष्ट भेदप्रवृत्तीवरून वर्गीकरण करूं लागल्यास ती भेदप्रवृत्ति सर्वच भाषांत सामान्य नसल्यास तें वर्गीकरण बरोबर होणार नाहीं. कारण एका भाषेपासून निघणाऱ्या सर्वच भाषांमध्यें विशिष्ट भेदप्रवृत्ति सामान्यत्वें असतेच असें नाहीं हें आपण वर दाखविलेंच आहे. कांहीं भाषांत एक भेदप्रवृत्ति सामान्य, तर दुसऱ्यांत निराळीच असते. एका भाषेंत एक आढळली तर दुसरीस तिचा संपर्कहि नसतो. उदा. इंडो-युरोपियन भाषांतील ब, द, ग या ध्वनींबद्दल जर्मन व आर्मेनियन या दोन्हीहि भाषांत प, त, क हे

ध्वनी येतात. परंतु या दोन्ही भाषांमध्ये साक्षात् नातें कांहीहि नाही. तसेंच केंटम् व सातेम् भाषासंघाचें भौगोलिक क्षेत्रहि एकसंबद्ध नाहीं. मध्य आशियांतील तुखारी भाषा ही एक केंटम् भाषा आहे. केंटम् आणि सातेम् हा फरकहि कदाचित मूळचा नसून मागाहून उद्भूत झाला असण्याचा संभव आहे.

**भाषांचीं मूळ स्वरूपें**—ज्याप्रमाणें मूळच्या आर्यन भाषेचें स्वरूप शास्त्रीय व तौलनिक पद्धतीनें आपणांस माहीत करून घेतां येईल त्याप्रमाणें मूळची जर्मानिक, मूळची स्लॅव्हॉनिक, मूळची केल्टिक व मूळची ग्रीक या भाषांचेंहि स्वरूप आपणांस कदाचित मनविता येईल. ही गोष्ट निरनिराळ्या एका कुलांतील भाषांतील साम्यें एकत्र करून करता येण्यासारखी आहे. तथापि आपणांस या भाषांचें निरनिराळ्या पोटभाषा बनण्यापूर्वीचें स्वरूप आजच्या स्थितींत अज्ञात आहे. आतां भाषांच्या निरनिराळ्या कुलांचा विचार करूं.

**इंडो-इराणी**—या कुलांत भारतीय व इराणी या दोन भाषासंघांचा समावेश होतो.

भारतीय —यांच्यामध्यें तीन कालिक भेद पाडण्यात येतात–( १ ) प्राचीन भारतीय अथवा संस्कृत; हींत वेद संहिता, ब्राह्मणें, उपनिषदें यांतील भाषेचें स्वरूप अधिक प्राचीन असून रामायण व महाभारत यांतील स्वरूप तदनंतरचें आहे. पाणिनि व इतर वैय्याकरणांनीं संस्कृत अभिजात भाषेचें स्वरूप निश्चित केलें व या भाषेमध्यें अर्वाचीन कालांतहि ग्रंथरचना होत आलेली आहे. ( २ ) मध्यकालीन अथवा प्राकृत भाषा. यांमध्यें पाली, शौरसेनी, मागधी, अर्धमागधी, महाराष्ट्री व त्यांचे निरनिराळे अपभ्रंश यांचा अंतर्भाव होतो. ( ३ ) अर्वाचीन कुलांतील मराठी, बंगाली, हिंदी, गुजराथी वगैरे देश्यभाषा होत. भारतीय भाषांची माहिती पुढें स्वतंत्र परिशिष्टांत दिली आहे व यांचें विवेचन मराठी भाषेच्या उत्पत्तिविषयीं विवेचन करतांना येईल.

**प्राचीन इराणी**—दरायस पासून अर्ताक्षरक्षिसपर्यंतचे बाणाग्र लिपींतील लेख उपलब्ध आहेत त्यांत प्राचीन इराणी भाषा ही पहावयास सांपडते. त्या वेळच्याच दुसऱ्या भाषेचें सर्वांत जुनें स्वरूप अवेस्ता, हें होय. झेंद-अवेस्ता या पार्शांच्या धार्मिक ग्रंथांत आपणांस ह्या भाषेतील वाङ्मय पहावयास सांपडतें. वास्तविक अवेस्ता हा झरथुष्ट्राचा मूळ ग्रंथ असून झेंद ही त्यावरील टीका होय परंतु सध्या दोहोंसहि झेंदावेस्ता असें म्हणतात. आपल्या वेद प्रमाणेंच झेंदावस्ता हा ग्रंथ अवस्ता भाषेंतील छंदोग्रंथ आहे. या ग्रंथाची परंपरा जरी प्राचीन असली तरी त्याचें लेखन सासनिद कालांत (२२६–६४१) झालेलें आहे. सांप्रत झेंदावस्ता हा शब्द प्राचीन इराणी अवेस्ता भाषेस सामान्यतः लावतात. यांतील गाथांची भाषा ऋग्वेदांतील भाषेसारखी असून कांहीं विशिष्ट ध्वनिनियमांस अनुसरून त्यांतील अक्षरांत फरक केल्यास आपणांस त्यांचें वैदिक भाषेमध्यें सुलभतेनें रूपांतर करतां येतें.

**मध्य इराणी**—या भाषेचा काल सामान्यतः ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकापासून ख्रिस्तोत्तर सातव्या शतकापर्यंतचा आहे. परंतु हींतील लेख आपणास ख्रिस्ती शकानंतरचेच आढळतात. पहलवी भाषेची उत्पत्ति प्राचीन बाणाग्र लिपींतील लेखांतील भाषेपासून झाली असावी. इतर मध्यकालीन इराणी लिखाणांत आपणांस सोगदियन व शक ह्या पोटभाषा आढळतात.

**अर्वाचीन इराणी**—हिचा काल आठव्या शतकानंतरचा होय. हिची उत्पत्ति पेहल्वीपासूनची आहे. या भाषेंत विविध वाङ्मय असून ही सर्व इराणांत चालू आहे. व तीमध्यें फारच थोडा फरक पडलेला आहे. मात्र तिनें पुष्कळच अरबी भाषेंतील शब्द उचलले आहेत. हीसच फारसी असें म्हणतात. मुसलमानी राज्यकर्त्यांबरोबर हिचा हिंदुस्थानांत पुष्कळच प्रवेश झालेला आहे. ह्या फारसी भाषेखेरीज इराणलगतच्या भागांत अनेक भाषा प्रचारांत आहेत. त्यांतील मुख्य म्हणजे कास्पियन, कुर्दीश, बलुची, पामीर, अफगाण, यग्नोबी, ऑसेटिक, ह्या होत. ही शेवटची भाषा बोलणारे फक्त सतरा हजार लोक असून ते कॉकेशस पर्वतावर राहतात.

**तुखारी**—विसाव्या शतकाच्या आरंभीं पूर्व तुर्कस्थानांत कांहीं ग्रंथ सांपडले. त्यामध्यें दोन इंडो युरोपीय पोटभाषा आढळल्या. त्यांस तुखारी असें नांव देण्यांत येतें. त्या १० व्या शतकापूर्वी प्रचलित असाव्या असें म्हणतात. ह्यांचा अभ्यास अजून फारसा झाला नसून त्यांस कोणत्या भाषाशाखेंत घालावें हें निश्चित ठरलें नाहीं.

**आर्मेनियन**—ही भाषा बोलणाऱ्यांची संख्या सुमारें ४० लक्ष आहे व तिचा प्रदेश आशिया व युरोप यांचा सीमांतप्रदेश होय. तसेंच मेसापोटेमिया, कॉकेशस पर्वताचा दक्षिण भाग व काळ्या समुद्राचा दक्षिण किनारा या प्रांतांत ती चालते. आर्मेनियन लोकांचे संघ निरनिराळ्या प्रदेशांत ( इराण, हिंदुस्थान, ईजिप्त, तुर्कस्तान, बल्गेरिया, रुमानिया, संयुक्त संस्थानें-अमेरिका ) वसाहत करून राहिले असून आपली मातृभाषा बोलतात. या भाषेंत अनेक पार्थियन ( फारसी ) शब्द असल्यामुळें ही भाषा इराणीची एक शाखा असावी असें मानण्यांत येत असे. परंतु ती एक इंडो युरोपीय भाषेची स्वतंत्र शाखा आहे असें आतां निश्चित ठरलें आहे. ह्या भाषेंत झालेलें नवव्या शतकांतील बायबलचें एक भाषांतर उपलब्ध आहे परंतु त्याची

भाषा पांचव्या किंवा सहाव्या शतकांतील असावी असें म्हणतात. या भाषेंत अलीकडे ऐतिहासिक, धार्मिक, व इतर कांहीं वाङ्मय तयार झालें आहे. हिच्या स्वरूपांत फारच थोडा फरक झालेला आहे. हिच्या निरनिराळया स्वतंत्र अनेक बोली तयार झाल्या आहेत. परंतु त्यास स्वतंत्र मानण्याइतका पृथक्‌पणा त्यांमध्यें आलेला नसून त्यांच्या वाङ्मयीन भाषेचें स्वरूप एकच आहे.

हेलेनिक—इंडो-युरोपियन भाषेचा प्रसार सध्याच्या ग्रीस देशांत झाला तो एकाच वेळीं नसून निरनिराळया कालीं होत गेला व तो होत असता ती भाषा बोलणाऱ्या लोकांचा निरनिराळया ठिकाणीं निरनिराळया लोकांशीं संबंध आला. त्या लोकांची जरी आज आपणास माहिती नसली तरी सध्यां आपणांस जी ग्रीक भाषा म्हणून परिचित आहे तिला फार प्राचीन कालींच बोलीचें स्वरूप प्राप्त झालें होतें. ग्रीक भाषेंत ल जुन्यात जुने लेख ख्रिस्तपूर्व ७ व्या ८ व्या शतकांतील आढळतात व पाचव्या शतकापासून बरेच शिलालेख वगैरे मिळतात तसेंच होमरच काव्य व इतर अनेक प्रकारचें वाङ्मय मिळतें. या लेखांतील भाषेवरून ग्रीक भाषेस बोलीचें स्वरूप आल्याचें स्पष्ट दिसतें परंतु या निरनिराळया लेखांत आढळणाऱ्या बोलींत फारसा फरक आढळत नसल्यामुळें त्यामध्यें बरेचसें ऐक्य आढळतें व त्यांतील साम्यावरून त्यांचे निरनिराळे संघ पाडतां येतात, उदा. (१) आयॉनिक, ॲटिक, एकियन, एओलिक, डोरिक वगैरे. या भाषाचे पुन्हां अनेक प्रकार झालेले आढळतात. तसेंच त्यांचा दर्जाहि निरनिराळा आढळतो. ॲटिक व आयॉनेक या भाषा ऐतिहासिक वाङ्मयानें संपन्न अशा आढळतात. व त्याचा प्रसारहि बऱ्याच मोठया क्षेत्रावर झाला असावा असें दिसतें व त्यामुळें एक सामान्य प्रकारची बोली त्या त्या प्रदेशांत तयार झाली असावी असें दिसते. या सामान्य बोलीस कोइनेभाषा असें म्हणतात. व हिचे प्रासंगिक निरनिराळे प्रकार होते. उदा. डोरिककोइने, ॲटिककोइने, आयॉनिककोइने वगैरे. कालांतरानें (सुमारें ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकांत) ॲटिककोइने या भाषेंत आयॉनिक शब्दसंपत्तीची भर पडून ती सर्व ग्रीक लोकांची भाषा झाली व इतर सर्व पोटभाषा नाहींशा झाल्या. सध्यां ग्रीस देशांत चालू असलेल्या बोली या ॲटिक भाषेपासून निघालेल्या असल्या तरी त्यांचा पूर्वीच्या बोलींशीं कांहीं संबंध नाहीं. सध्यां प्रचलित असलेली अर्वाचीन ग्रीक भाषा रोमेइक या नावानेंहि प्रसिद्ध आहे व तिची ॲटिक कोइनेपासून उत्पत्ति कशी झाली यासंबंधींचा इतिहास अर्धवट ज्ञात आहे. ही सध्यां ग्रीस देश व आयॉनिक आणि एजियन समुद्रांतील बेटें, एशिया मायनरमधील कांहीं भाग, इजिप्त, इटली, उत्तरअमेरिका यांतील ग्रीक वसाहती यांत प्रचलित आहे. प्राचीन इतिहासामध्यें हेलेनिक प्रदेशाच्या उत्तरभागांत थ्रेशियन, फ्युजियन, मॅसिडोनियन वगैरे भाषा प्रचलित असल्याचें आढळतें. या इंडो-युरोपियन भाषा असून आर्मेनियन आणि ग्रीक यांमधील दुव्याच्या स्वरूपाच्या असाव्या.

अल्बेनियन—अल्बेनियन–ही भाषा अल्बेनिया व ग्रीस, इटली सिसली, डाल्मेशिया, उत्तर अमेरिका येथील कांहीं वसाहतींमध्यें सुमारें पाच लक्ष लोक बोलतात. ही इंडो–युरोपियन शाखेच्या इलिरियन नावाच्या संघापासून निघाली असें कांहींचें मत आहे. या इलिरियन भाषेंतील कांहीं शिलालेख उपलब्ध आहेत पण त्यांचें पूर्ण वाचन अद्याप झालेलें नाहीं. ही भाषा बहुधा ग्रीक, व इटालियन भाषा यामधील सांक्रमिक अवस्था दाखवीत असावी. अल्बेनियन भाषेंतील जुन्यांत जुने लेख केवळ सतराव्या शतकापासूनचे उपलब्ध आहेत व या भाषेंत लॅटिन, ग्रीक टर्किश, स्लॅव्हॉनिक व इटालियन या सर्व भाषांतील शब्दांची भर पडलेली आहे असें दिसतें. या इलिरियनसंघात ईशान्य इटलींतील व्हेनेटिक व दक्षिण इटलींतील मेसॅपिक या फारशा माहीत नसणाऱ्या दोन भाषा मोडतात.

इटालो-केल्टिक—इटालो केल्टिक हा पूर्वी अतिशय सदृश अशा पोटभाषांचा संघ असावा असें वाटतें. परंतु आपणास त्याचें जे ऐतिहासिक ज्ञान आहे त्यावरून जरी इटॅलिक व केल्टिक भाषांत कांहीं साम्य दिसून आलें तरी त्यांमध्यें इतका फरक आढळतो कीं त्यांस दोन स्वतंत्र शाखा मानणें सयुक्तिक होईल.

इटालिक —या संघांतील लॅटिन ही एकच भाषा जिवंत राहिली आहे. हिच्यापासून पुढें रोमान्स भाषा निघाल्या. परंतु लॅटिन भाषेचा सर्व रोमन साम्राज्यात प्रसार होण्यापूर्वी इतर कांहीं इटॅलिक बोली प्रचारात होत्या, त्यांतील कांहीं पूर्णपणें नष्ट झाल्या असल्या पाहिजेत. परंतु त्यांपकीं कांहीं बोलींचे अवशेष आढळतात. उदा. सॅम्निअम, कॅम्पॅनिया, लुकॅनिया, ब्रुटिअम, ॲप्युलिया आणि मेसाना या प्रांतांतील रूढ असलेली ऑस्कन बोली हींतील कांहीं शिलालेख उपलब्ध आहेत व ती पहिल्या शतकापर्यंत जिवंत असावी. दुसरी एक उंब्रियन ही बोली ॲपेनाइन्स व टायबर नदीच्या डाव्या तीरावर प्रचलित होती. या भाषेंतील कांहीं ख्रिस्तापूर्वीचे मंत्र वगैरे उपलब्ध आहेत. ही केव्हां नष्ट झाली हें कळत नाहीं.

लॅटिनः—लॅटिन ही पूर्वी रोम शहराची भाषा होती. या भाषेनें सभोंवतालच्या प्रदेशांतील व शहरांतील बोलींवर लवकरच वर्चस्व स्थापन केलें. जोंपर्यंत हिचें क्षेत्र मर्यादित होतें तोंपर्यंत ही एकस्वरूपी होती. परंतु तिचें क्षेत्र विस्तार पावल्यानंतर

तिनें ऑस्कन, उंब्रियन वगैरे इटालिक बोलींवर व इटलींतील इलिरियन आणि सिसिलींतील इतर केल्टिक बोलींवर आपलें वर्चस्व स्थापन केलें. परंतु या निरनिराळ्या भाषांशीं संबंध आल्यामुळें लॅटिन भाषेच्या स्वरूपातहि पुष्कळच फरक पडत गेला. लॅटिन लेखनभाषेस अभिजात स्वरूप प्राप्त होऊन तिच्यामध्यें महत्वाचें व समृद्ध असें वाङ्मय तयार झालें. त्यामुळें लॅटिन वाङ्मयीन भाषा व बोली यांमध्यें हळू हळू अंतर पडत गेलें. लॅटिन लेखनभाषेचें कृत्रिम व स्थिर असें स्वरूप रोमन साम्राज्य नष्ट झाल्यानंतरहि अनेक शतकें कायम राहिलें. कारण सर्व शास्त्रीय लेखन मध्ययुगीन कालानंतरहि याच भाषेंत चालू असून ग्रंथलेखनाकरितां हिचें नंतरहि पुन्हां पुनरुज्जीवन करण्यांत आलें. सांप्रतहि रोमन कॅथोलिक लोकांची धार्मिक व विधिविषयक भाषा हीच लॅटिन आहे.

रोमान्स भाषा:—कालांतरानें इटलीच्या बाहेरील रोमन लोकांच्या वसाहतींत तेथील स्थानिक भाषांचें प्राबल्य वाढलें व जसजसा रोमन साम्राज्यांतील निनिराळ्या प्रांतांतील लोकांचा रोमशीं व परस्परांशीं संबंध शिथिल होत गेला व अखेरीस रानटी लोकांच्या स्वारीमुळें अजिबात नष्ट झाला तसतशी निरनिराळ्या देशभाषांमध्येंहि अराजक स्थिति निर्माण झाली व प्रत्येक भाषेची भिन्न भिन्न परिस्थितीमध्यें निरनिराळ्या तऱ्हेची वाढ होऊन रोमान्स भाषा नांवाच्या अगदीं निरनिराळ्या भाषा तयार झाल्या. या संक्रमणावस्थेंत कांहीं भाषा केवळ बोली म्हणून शिल्लक राहिल्या तर कांहीं अजीबात नष्ट झाल्या. परंतु त्यांतील कांहींनीं आपलें क्षेत्र वाढवून आपणांस वाङ्मयीन व बौद्धिक दळणवळणास योग्य असें स्वरूप प्राप्त करून घेतलें. त्यांतील कांहीं भाषांस राष्ट्रीय स्वरूप प्राप्त होऊन त्यांचा पुष्कळ मोठ्या क्षेत्रावर प्रसार झाला. सध्या अस्तित्वांत असलेल्या रोमान्स भाषा पुढें दिल्याप्रमाणें आहेत:–(1) इटॅलियन संघ:–याचें क्षेत्र इटली, सिसिली, सार्डिनिया, कॉर्सिका हे प्रदेश असून त्यांत पुष्कळच बोलींचा अंतर्भाव होतो. फ्लॉरेन्स येथील टस्कन भाषेस राष्ट्रीय स्वरूप प्राप्त होऊन ती सध्यांच्या इटलीची वाङ्मयीन भाषा बनली आहे. या भाषेंतील जुन्यांत जुना लेख खिस्त शक ९६४ चा आहे. (२) ऱ्हिटो रोमनिक अथवा लेडिन संघ:–ही पूर्वींच्या ऱ्हिटिया नावाच्या रोमन प्रांताची भाषा होती. सध्या या संघांतील तीन बोली स्वित्झरलंडांतील ग्रिसन या भागांत व टिरोल आणि फ्रौल या परगण्यांत चालू आहेत. (३) रुमानियन संघ:–या संघांत रुमानिया, ट्रान्सिल्व्हानिया, ग्रीसचा कांहीं भाग व ईस्ट्रिया यांतील तीन किंवा चार बोली मोडतात. रुमानियन भाषेस सहाव्या शतकापासुन साहित्यिक स्वरूप आलें आहे. (४) प्रॉव्हेन्सल संघ:–यामध्यें प्रोव्हेन्सल, लँग्विडॉक, ऑवेर्गनॉट, लिमोसिन, गॅस्कन वगैरे भाषा मोडतात. यांतील जुन्यांत जुनें वाङ्मय अकराव्या शतकांतील आढळतें. (५) फ्रेंच संघ:–यामध्यें पॉएतेविन, नॉर्मन, पिकार्ड, वालून, लॉरेनिज, बर्गंडियन, शांपेन्वा, इले–द–फ्रासे, शैंपिन्वा, बॉदवा, व्हॅलेसिए, सव्होयर्द इ. भाषा येतात. इले–द–फ्रांसे व विशेषत: पॅरिसमधील भाषा ही राष्ट्रीय स्वरूपाची व फ्रेंच लोकांची साहित्यिक भाषा आहे. हींतील जुन्यांत जुना लेख इ. स. ८४२ चा आहे. (६) कॅटेलन संघ:–यांतील जुन्यांत जुना लेख ११७१ सालचा आहे. (७) पोर्तुगीज संघ:–यामध्येंच गॅलिशियन भाषा येतात. पोर्तुगीज भाषेचें साहित्यिक स्वरूप ११९२ मधील एका सनदेंत आढळतें. (८) स्पॅनिश संघ:–यामध्यें कॅस्टिलियन, अँडाल्युशियन, अॅरागोनीज, लिओनीज या बोली येतात. यांतील कॅस्टिलियन भाषेस राष्ट्रीय व साहित्यिक महत्त्व आहे. हींतील प्रथम लेख ११४५ मधील आहे. स्पेन व पोर्तुगालमधील यहुदी लोकांनीं आपल्या स्पॅनिश नांवावरून सेफार्डिक किंवा सेफार्दिम नांवाची एक स्वतंत्र बोली बनविली आहे. हिचें व्याकरण व बराचसा शब्दसंग्रह स्पॅनिश आहे. तथापि तीमध्यें बरेच सेमिटिक विशेष आढळतात. स्पेनमधून बाहेर जाणाऱ्या ज्यू वसाहतकारांनीं जगाच्या अनेक भागांत–विशेषत: मोठमोठ्या शहरांत–या भाषेचा प्रवेश केला आहे. सोळाव्या शतकापासून अनेक रोमान्स भाषांनीं जगाच्या निरनिराळ्या भागांत प्रवेश केला आहे. पोर्तुगीज ही ब्राझिलमध्यें, तर स्पॅनिश ही दक्षिण व मध्य अमेरिका, मेक्सिको, मोरोक्को आणि अल्जेरिया या भागांत, फ्रेंच ही कॅनेडा, उत्तर आफ्रिका व फ्रेंच वसाहती यांमध्यें आणि इटालियन ही उत्तरअमेरिका, तसेंच अर्जेंटाइनमधील आणि उत्तरआफ्रिकेचा किनारा व इटलीच्या इतर वसाहतींत आढळते. या क्षेत्रांतून या भाषांचें निरनिराळ्या स्थानिक असंस्कृत भाषांशीं मिश्रण होऊन त्या त्या ठिकाणीं मिश्र भाषा उत्पन्न झाल्या आहेत.

केल्टिक—खिस्ती शकापूर्वी केल्टिक भाषा युरोपांतील बऱ्याच मोठ्या भागावर प्रचलित होती. परंतु इतर इंडो युरोपीय भाषांपुढें तिची पिछेहाट होऊन तिचे थोडे अवशेष मात्र युरोपांत पहावयास सांपडतात. परंतु आयर्लंड व ग्रेटब्रिटन या बेटांमध्यें या भाषेंतील कांहीं वाक्प्रचार शिल्लक आहेत व कांहीं नष्ट झालेल्या पोटभाषांतील लेख उपलब्ध आहेत. या बेटांतील भाषांत मुख्य दोन संघ आढळतात–(१) ब्रिटन:—ही इंग्लंडचा बराचसा भाग व फ्रान्समधील ब्रिटनी या प्रांतांत पुढील निरनिराळ्या नांवाच्या बोलींत आढळते. (अ) किमरिक अथवा वेल्श–ही वेल्स प्रांतांत आठव्या शतकापासून रूढ आहे.

( आ ) कॉर्निश:—या भाषेतील नवव्या शतकांतील लेख उपलब्ध आहेत. ही अठराव्या शतकांत नष्ट झाली. ( इ ) ब्रेटन अथवा आर्मोरिकन:—ही अद्यापि ब्रिटनमधील सुमारें दहा लक्ष लोक बोलतात. हिच्या कांहीं पोटभाषा आहेत. ( २ ) गेलिक—ही पूर्वी आयर्लंडमध्यें प्रचलित होती. या भाषेतील लेख पांचव्या शतकापासून उपलब्ध आहेत. या भाषेसच आयरिश असें नांव असून हिच्यामध्यें आठव्या शतकापासूनचें फार मोठें वाङ्मय मध्य युगामध्यें उपलब्ध होतें. अलीकडे तिला राष्ट्रीय स्वरूप देण्याचे प्रयत्न चालू आहेत. पांचव्या शतकामध्यें कांहीं आयरिश वसाहतकारांनीं ही भाषा स्कॉटलंडमध्यें आणली. हिची येथें स्वतंत्र वाढ होऊन कांहीं वाङ्मयहि हिच्यामध्यें तयार झालें. सध्यां हीस गेलिक, स्कॉच किंवा एरसे म्हणतात. हिचेंच एक स्वरूप मँक्स या नांवानें आइल ऑफ मॅनमध्यें प्रचलित आहे.

बाल्टास्लॅव्हॉनिक—स्लॅव्हॉनिक व बाल्टिक हे अलीकडे स्वतंत्र संघ मानतात परंतु ते अलीकडेच स्वतंत्र झाले असून त्यांमध्यें बरेंच साम्य आहे. या भाषेत असलेल्या आर्ष विशेषांवरून—विशेषतः यांतील विभक्ति व शब्दसंग्रह यावरून भाषाशास्त्रीयदृष्ट्या यांस फार महत्त्वाच्या मानतात. विशेषतः लिथुॲनियन ही तौलनिक भाषाभ्यासास अतिशय महत्त्वाची आहे. हिचें अर्वाचीन स्वरूप तिच्या १६ व्या शतकांतील स्वरूपाहून फारसें भिन्न नसून कांहींतें गॉथिक भाषेहूनहि प्राचीन स्वरूप तींत पहावयास सांपडतें.

बाल्टिक:—या तीन भाषा आहेत. ( १ ) जुनी प्रशियन ही सध्यां नष्ट असून तींतील १२ व्या व सोळाव्या शतकांतील कांहीं लेख मात्र उपलब्ध आहेत ( २ ) लिथुॲनियन.—ही अद्यापि सुमारें पंचवीस लक्ष लोक पूर्व प्रशिया व लिथुॲनियामध्यें बोलतांना आढळतात. या देशास स्वातंत्र्य प्राप्त झाल्यामुळें राष्ट्रीय भाषा म्हणून तिचें महत्त्व वाढण्याचा संभव आहे. हींतील जुने लेख १५४७ पासुनचे उपलब्ध आहेत. ( ३ ) लेटिश.—ही लॅटव्हिया देशाची आता राष्ट्रीय भाषा झाली असून कूर्लंड व लिव्होनियाच्या दक्षिणेस सुमारें १० लक्ष लोक ही भाषा वापरतात. हिचें स्वरूप लिथुॲनियन भाषेपेक्षां थोडेसें प्रगत आहे. हींतील लेख सोळाव्या शतकापासूनचे आढळतात.

दक्षिण स्लॅव्हॉनिक.—या भाषात तीन संघ येतात. (१) दक्षिण स्लॅव्हॉनिक ह्या भाषेस—तींत ९ व्या शतकांत सायरिल व मेथोडियस या दोन बधूंनीं बायबलचें भाषांतर कल्यामुळें—अतिशय धार्मिक महत्त्व प्राप्त झालें आहे. व धार्मिक भाषा म्हणून तिचा प्रसार बराच झाला असून तिला जुनी चर्चस्लॅव्हॉनिक असें म्हणतात. याखेरीज या भाषेमध्यें पुढील तीन संघ येतात. ( अ ) स्लोव्हेनियन—ही सुमारें दहा लाख लोकांची भाषा असून हिची माहिती १० व्या शतकापासूनची मिळते व हींतील वाङ्मय आठव्या शतकापासूनचें उपलब्ध आहे. ( आ ) सर्बोक्रोएशियन—ही युगोस्लोव्हियांतील सर्व व क्रोट मिळून सुमारें ९० लक्ष लोक बोलतात. हींतील वाङ्मय १९ व्या शतकापासुन आढळतें. (इ) बल्गेरियन—ही बल्गरियामध्यें तीस लक्ष लोक बोलतात. १९ व्या शतकांत हीस राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें,

पूर्व स्लॅव्हॉनिक:—यामध्यें पूर्वी बाराव्या शतकांत एकत्र असलेले परंतु आतां विभक्त झालेले तीन निरनिराळे संघ आढळतात. ते सर्व रशियांत प्रचलित असून त्यांतील जुन्यांत जुना लेख ११ व्या शतकांतील आढळतो ( अ ) ल्हुरशियन अथवा रथेनियन—हींत अनेक बोली असून हिचा प्रसार दक्षिण रशिया बुकोविना, पूर्व गॅलिशिया, उत्तर हंगेरी या भागात आहे. लोकसंख्या तीन कोट. (आ) श्वेतरशियन—ही श्वेतरशियाच्या म्हणजे मोगिलेव्ह, स्मालेंस्क विटेब्स्क, मिन्स्क या प्रांतात बोली म्हणून प्रचलित आहे. ( इ ) महत् रशियन किंवा रशियन—ही मध्य व पश्चिम रशियामध्यें प्रचलित आहे. यापैकीं मास्को येथील भाषेस साहित्यिक स्वरूप प्राप्त झालें आहे हिचा प्रसार राज्यसत्तेमुळें बऱ्याच मोठ्या प्रदेशावर झाला आहे. सध्या ही दहा कोटी लोक बोलतात. हिचें सध्यांचें स्वरूप १८ व्या शतकातील आहे.

पश्चिम स्लॅव्हॉनिक:—या भाषेचे चेकोस्लोव्हेकियन ही सुमारें ९ लाख लोकात प्रचलित असलेली व तेराव्या शतकांतील लेख असलेली आणि पोलिश ही सुमारें दोन कोट लोकांची भाषा हे दोन प्रकार आहेत पोलिश भाषेत बरेंच वाङ्मय असून तींतील प्रथमचे लेख १४ व्या शतकातील आहेत. याखेरीज या भाषेच्या सोरबियन अथवा वेंडिश आणि पोलॅबिश या दोन बोली आहेत. कांहीं किरकोळ स्लॅव्हॉनिक बोली जर्मन भाषेत अंतर्भूत होऊन गेल्या आहेत.

जर्मानिक—उत्तरजर्मानिक अथवा स्कँडेनेव्हियन. सर्वांत जुने जर्मानिक शिलालेख स्कँडेनेव्हियन भाषेत सुमारें ३ ते ८ व्या शतकांतील आहेत यांतील भाषेस जुनी नॉर्स किंवा जुनी स्कँडिनेव्हिअन म्हणतात. ८ व्या शतकानंतर या भाषेच्या अनेक शाखा झाल्या व अकराव्या शतकात हिच्या पश्चिम स्कँडेनेव्हियन (आइसलँडिक व नॉर्वेजियन) व पूर्व स्कँडेनेव्हियन (स्वीडिश, डॅनिश) अशा दोन स्वतंत्र शाखा आढळतात. आइसलँडिक व नॉर्वेजियन या भाषा प्रथम एकस्वरूप होत्या परंतु नॉर्वेजियन लोकांनीं ९ व्या

शतकांत जेव्हां आइसलंडमध्यें प्रवेश केला तेव्हां तेथें त्यांच्या भाषेची वाढ तेथील परिस्थितीस अनुसरून झाली मध्ययुगांत आइसलंडिक भाषा वाङ्मयसमृद्ध होती व तींतील एड्डा नांवाच्या कथा वाङ्मयदृष्ट्या महत्त्वाच्या आहेत नॉर्वेजियन भाषेचाहि मध्ययुगापासूनचा इतिहास उपलब्ध आहे १४ व्या शतकांत नॉर्वेवर डेन्मार्कची सत्ता स्थापन झाल्यामुळें तीवर डॅनिश भाषेचा पगडा बसला व १९ व्या शतकांत तिला केवळ बोलीचें स्वरूप आलें १९ व्या शतकांत डेन्मार्कपासून नॉर्वे स्वतंत्र झाल्यामुळें या भाषेची राष्ट्रभाषा म्हणून वाढ होत आहे व तींत वाङ्मयहि तयार होत आहे स्वीडिश व डॅनिश या भाषांची वाढ १४ व्या शतकापासून राष्ट्रीय व साहित्यिक भाषा म्हणून चालू आहे या दोहोंवर नीच व उच्च जर्मन या भाषांचा बराचसा परिणाम झालेला आहे

पूर्व जर्मानिक —अनेक पूर्व जर्मानिक बोली आतां नामशेष झाल्या आहेत बर्गंडियन व व्हँडाल लोकांच्या बोलींतील फक्त कांहीं विशेषनामें शिल्लक आहेत या सर्वांपैकीं गॉथिक भाषेतील लेख बरेच उपलब्ध आहेत गॉथ लोकांनीं तिसऱ्या शतकांत बाल्कन प्रदेशांत जें राज्य स्थापन केलें होतें त्याचे आस्ट्रो-गॉथ व विसीगॉथ असे विभाग पडले त्यांपैकीं पहिल्या लोकांच्या भाषांवर उत्तरइटलीतील भाषांनीं आक्रमण केलें व दुसऱ्या लोकांच्या भाषांवर स्पॅनिश भाषेचें आक्रमण झालें यांच्या भाषांचे अवशेष उल्फिलास नांवाच्या एका चौथ्या शतकांतील बिशपानें भाषांतर केलेल्या बायबलामध्यें सांपडतात बाल्कनमधील गॉथिक भाषा फार प्राचीन काळींच नष्ट झाली क्रिमियामधील गॉथिक भाषेचे कांहीं शब्दरूपी अवशेष १६ व्या शतकांत जनविलेले आढळतात

पश्चिम जर्मानिक —या भाषेंत पुढें दिलेले सर्व आढळतात (१) ॲंग्लोफ्रिजियन (अ) इंग्लिश–जर्मनीमधून जे ॲंगल्स, सॅक्सन, ज्यूट व कदाचित् फ्रिजियन लोक पांचव्या व सहाव्या शतकांत ब्रिटनमध्य आले त्यांनीं आपली भाषा केल्ट लोकांवर लादली आणि त्यांना डोंगराळ प्रदेशांत हांकलून दिलें तथापि या नवीन भाषा सर्वस्वी एक स्वरूपाच्या नव्हत्या व बारकाईनें पाहिल्यास त्यांचीं तीन स्वरूपें आढळून येतील (१) ॲंग्लिकन–उत्तर मध्य प्रदेशांत ( नॉर्दंब्रिया व मर्शिया ), ( २ ) सॅक्सन–दक्षिणेंत ( ससेक्स वेसक्स ), व ( ३ ) केंटिश–जैक्स्यस ( केंट ) युरोपशीं संबंध सुटल्यामुळें येथील भाषेची वाढ स्वतंत्रपणें झाली पांचव्या शतकापासून बाराव्या शतकापर्यंत हीस ॲंग्लो सॅक्सन किंवा जुनी इंग्रजी असें नांव होतें हींतील जुने लेख व वाङ्मय (किडमॉन बाय नेवुल्फ बेओवुल्फ वगैरेंचें ) सातव्या शतकांतील आढळतें या भाषेवर जुन्या केल्ट भाषेचा, खिस्ती धर्मामुळें लॅटिन भाषेचा व नॉर्मन लोकांच्या व डेन व नार्वेजिअन लोकांच्या स्वाऱ्यांमुळें त्यांच्या भाषांचा व अखेरीस फ्रेंच भाषेचा परिणाम होत गेला तथापि तिचें मूळ जर्मानिक स्वरूप नाहींसें झालें नाहीं तेराव्या शतकापासून फ्रेंच भाषेचा परिणाम कमी होत जाऊन पंधराव्या शतकांत इंग्रजी भाषेस पुन्हां राजभाषेचें स्वरूप प्राप्त झालें मध्य इंग्लिश —या भाषेचा काल ११ व्या शतकापासून १६ व्या शतकापर्यंत होता या कालात तिला बरेंचसें एकस्वरूप प्राप्त झालें व तिचा प्रसार सर्वत्र होऊन स्कॉटलंड व आयर्लंडमध्येंहि तिचा प्रवेश झाला व ती राष्ट्रीय भाषा होऊन तीमध्यें वाङ्मयहि पुष्कळ तयार होऊन इतर बोली मागें पडल्या अर्वाचीन इंग्लिश —या भाषेच्या स्वरूपांत विशेष हा आहे कीं ती अतिशय साधी व पृथक्करणात्मक आहे तिचें व्याकरणहि साधें असून तिच्यामध्यें सर्व राष्ट्रांतील शब्दांचा संग्रह केलेला आहे व तिचा प्रसारहि जगांतील सर्व भागांत झाला असून जगांतील व्यवहारास व व्यापारास तिचा उपयोग होत आहे ही भाषा सुमारें वीस कोटी लोक बोलतात हिच्या प्रसारामुळें हिच्यांत ब्रिटिश अमेरिकन, ऑस्ट्रेलियन कॅनेडियन असे स्थानिक भेद पडले आहेत तसेंच स्थानिक भाषांशीं मिश्रण होऊन हिच्यापासूनच पिजिन इंग्लिशसारख्या कांहीं मिश्र भाषा तयार झाल्या आहेत

फ्रिजियन —या भाषेचें इंग्रजी भाषेशीं बरेंच साम्य आहे पूर्वफ्रिजियन भाषेचें नॉर्दंब्रियन भाषेशीं व पश्चिम फ्रिजियन भाषेचें केंटिश भाषेशीं सादृश्य आहे मध्ययुगांत फ्रिजियन भाषा वायव्य जर्मनीमध्यें व नेदरलंडांतील किनाऱ्यावर मोठ्या प्रदेशावर बोलली जात होती परंतु अलीकडे डच व नीचजर्मन भाषांच्या प्रसारामुळें तिचें क्षेत्र बरेंच आकुंचित झालें आहे सांप्रत फिनलंड या डच प्रांतांत वेस्ट फ्रिजियन व ओल्डेनबर्ग या जर्मन प्रांतांत ईस्ट फ्रिजियन या भाषा चालू असून श्लेस्विग व जवळपासच्या बेटांत नॉर्थ फ्रिजियन ही प्रचलित आहे व त्यांतील जुनें वाङ्मय तेराव्या शतकांतील असून तिला हॉलंडमधील फ्रिजियन लोकांनीं आपल्या लेखांनीं साहित्यिक स्वरूप देण्याचा प्रयत्न केला आहे

जर्मन —जर्मनभाषासंघांतून मुख्यत दोन राष्ट्रीय भाषा निघाल्या आहेत ( १ ) जर्मन व ( २ ) डच या दोन्हीहि वाङ्मयसमृद्ध आहेत जर्मनभाषांचे मुख्यत दोन वर्ग त्यांतील विशिष्ट उच्च जर्मन व्यंजनविकारावरून करण्यांत येतात ज्या मध्यें हा व्यंजनविकार होत नाहीं त्यास नीचजर्मन असें नांव त्या सखल-प्रदेशांत असल्यामुळें मिळालें आहे या जर्मनीच्या

उत्तरभागांत प्रचलित आहेत दुसरा वर्ग जर्मनीच्या दक्षिण भागांत अथवा डोंगराळ भागात असून त्यास उच्चजर्मन असें नांव आहे या दुसऱ्या वर्गामध्यें हा व्यञ्जनविकार सातत्यानें होत आला आहे या वर्गात (अ) बव्हेरियन भाषा (बव्हेरिया, ऑस्ट्रिया, थिरिया, टिरोलचा भाग, कॅरिंथिया), (आ) व अॅलेमॅनिक भाषा (स्वित्झरलंड, बेडन, अल्सेस, वुर्टेंबर्ग) हे दोन वर्ग येतात यांस अपरजर्मन असें नांव आहे मध्यजर्मन भाषांमध्यें पुढील विभाग पडतात (अ) थुरिंजियन (थुरिंजिया), (आ) अपर सॅक्सोनियन व (इ) पूर्वफ्रँकोनियन (थुरिंबर्ग, बँबर्ग) (ई) न्हेनिश फ्रँकोनियन (मेन्झ, फ्रांकफुर्ट ऑन द मेन, वर्म्स, स्पेयर, विसेनबर्ग), (उ) मध्य फ्रँकोनियन हिचाच प्रकार मोसेल फ्रँकोनियन (ट्रिअर) आणि रिपुआरियन (कोलोन) नीचजर्मन भाषा डन्कर्के ते कोनिग्झबर्ग यांस जोडणाऱ्या रेषेच्या उत्तरच्या बाजूस आहे यामध्यें सॅक्सन व नीच फ्रँकोनियन बोली मोडतात परंतु अलीकडे नीच फ्रँकोनियन भाषेचें नेदरलंडमधील राष्ट्रीय भाषेमध्यें रूपांतर झालें असल्यामुळें सध्या नीच जर्मन हा शब्द त्यांतील फक्त सॅक्सन भाषांसच, म्हणजे अलीकडे प्लॅटडॉएश नांवानें माहीत असणाऱ्या भाषांसच वापरतात.

उच्च जर्मन —आठव्या शतकामधील जे लेख सांपडतात त्यांवरून उच्चजर्मन व नीचजर्मन भाषांमध्यें आढळणारा व्यंजनविकारांतील फरक फारच स्पष्ट दिसतो अकराव्या शतकापासून सोळाव्या शतकाच्या मध्यापर्यंत या भाषेस मध्यउच्चजर्मन असें नांव देत असत व यामध्यें बऱ्याच पोटभाषांचा अंतर्भाव होत असे परंतु त्या वेळच्या वाङ्मयांत त्या सर्वांस एकस्वरूप देण्याची क्रिया चालू असल्याचें दृष्टीस पडतें या सर्व भाषांस एकस्वरूप प्राप्त झाल्यानंतर तीस अर्वाचीन उच्च जर्मन असें नाव प्राप्त झालें ही क्रिया लॅटिन भाषेच्याऐवजी देश्य भाषा उपयोगांत आणणें, मुद्रणकलेची वाढ व ल्यूथरनें केलेलें बायबलचें भाषांतर इ. कारणांमुळें घडून आली तथापि या भाषेस इतर पोटभाषांवर वर्चस्व मिळवून एकस्वरूप येण्यास बराच दीर्घ काल लागला व उच्च सन्देशें अभिजात वाङ्मयम या भाषेमध्यें तयार झाल्यामुळेंच ही क्रिया घडून आली सध्या ही अर्वाचीन उच्चजर्मन भाषा बोलणाऱ्या लोकांची संख्या आठ कोटी असून तिचा प्रसार सभोंवारच्या पोलंड, चेकोस्लोव्हेकिया, ऑस्ट्रिया, स्वित्झरलंड, फ्रान्स, बेल्जिअम, हॉलंड व हंगरी, रुमानिया, रशिया, उत्तर व दक्षिण आफ्रिका यांतील वसाहती यांमध्यें चालू आहे

जुडा जर्मन अथवा यीडिश —स्पेनमधील यहुदी लोकांस सेफार्डिम असें नांव होतें तसें जर्मनीमधील ज्यू लोकांस अश्केनाझिम असें म्हणत असत यांनी चौदाव्या शतकापासून आपली एक स्वतंत्र जुडो–जर्मन अथवा यीडिश नावाची भाषा तयार केली आहे ही भाषा मुख्यत मध्यजर्मनीमध्यें हिब्रू, स्लॅव्होनिक व इतर कांहीं भाषांच्या मिश्रणानें तयार झाली आहे हिचा प्रसार सध्या खुद्द जर्मनीमध्यें फारसा नाहीं कारण तेथील ज्यू लोकांनीं जर्मन भाषेमध्यें महत्त्वाचें वाङ्मय लिहून काढून आपल्या समाजांत यीडिश भाषेऐवजी जर्मन भाषा रूढ केली परंतु जे लोक जर्मनींतून युरोपच्या निरनिराळ्या भागांत वसाहत करण्यास गेले त्यांनीं ही भाषा आपल्याबरोबर नेली असून बाल्टिक समुद्रापासून काळ्या समुद्रापर्यंत ज्या यहुदी वसाहती आहेत त्यांमध्यें ही भाषा प्रचलित आहे यांतीलच कांहीं लोक अमेरिकेमध्यें वसाहत करून राहिले असून तेथें यीडिश भाषा साधारण बऱ्या प्रमाणात वापरली जाते हिचाच एक प्रकार अल्सेस व लॉरेनमधील कांहीं जमातींत रूढ आहे

नीच जर्मन —सर्वांत जुनें नीचजर्मन भाषेतील लिखाण म्हटलें म्हणजे नवव्या शतकांतील हेलियंड नावाचें धार्मिक काव्य होय या स्वरूपांत या भाषेस ओल्डसॅक्सन हें नांव होतें कालांतरानें या भाषेनें फ्रिजियन, डॅनिश व स्लॅव्होनिक भाषांवर वर्चस्व स्थापन करून बराच प्रदेश व्यापला परंतु उच्च जर्मन भाषेच्या वाङ्मयीन व अभिजात स्वरूपामुळें ही भाषा मागें पडून आतां फक्त कांहीं ठिकाणीं स्थानिक बोलीच्या रूपानें आढळतें १९ व्या शतकात हिचें पुनरुज्जीवन करण्याचा थोडा प्रयत्न करण्यात आला होता

डच —नेदरलंडांत सध्यां प्रचारांत असलेल्या निरनिराळ्या भाषा म्हटल्या म्हणजे फ्रिजियन (फ्रिजिया), सॅक्सन (पूर्वभाग), वेस्ट लो फ्रँकोनियन (दक्षिण व पश्चिम भाग), या होत प्राचीन डच भाषेतील लेख उपलब्ध नाहींत दहाव्या शतकातील कांहीं स्तोत्रांचें भाषांतर मात्र उपलब्ध आहे परंतु त्याची भाषा डच भाषेची मूळ प्रकृति जी वेस्ट लो फ्रँकोनियन तिच्याहून थोडी निराळी असून तिला ईस्ट लो फ्रँकोनियन म्हणता येईल पश्चिमेकडील भाषेतील पहिला लेख १२ व्या शतकातील आढळतो त्यानंतर या भाषेच्या वाढींतील मध्यकाल सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंतचा असून त्यावेळीं सांस्कृतिक व आर्थिक समृद्धीचीं केंद्रें फ्लँडर्समध्यें होतीं व त्यामुळें मध्यकालीन डच भाषेचें स्वरूप आपणास फ्लेमिश किंवा दक्षिण डच भाषेमध्यें आढळतें यानंतर या भाषेस अर्वाचीनडच असें नांव प्राप्त झालें या वेळच्या उलाढालीमुळें या देशाचें सांस्कृतिक व आर्थिक केंद्र फ्लेमिश शहरांच्या ऐवजीं अम्स्टरडॅम, हेग, हार्लेम, लेडेन, वगैरे शहरांकडे गेलें आणि त्यामुळें हॉलंडमधील भाषेस महत्त्व मिळून त्या भाषेंत धार्मिक वाङ्मय व इतर साहित्य तयार होऊन तीस अभिजात स्वरूप प्राप्त झालें तथापि इतर भाषा

घरगुती व्यवहारांत कायम राहिल्या. बेल्जममधील परिस्थितीमुळें डच भाषेस आपलें वर्चस्व आपल्या प्रांताच्याबाहेर स्थापन करणें कठिण झालें. तथापि सध्यां हॉलंड व फ्लँडर्समध्यें एकच भाषा चालू आहे असें म्हणतां येईल. युरोपबाहेर डच भाषा दक्षिण आफ्रिकेंतील बोअर लोकांत व डच ईस्ट आणि वेस्ट इंडीजमध्यें आणि अमेरिकेंतील डच वसाहतींत प्रचलित आहे. अर्थात् तेथें तीस घरेंच मिश्र स्वरूप प्राप्त झालें आहे.

आर्येतर भाषा.—पश्चिम आशियामध्यें अलीकडे जी संशोधनाची व निरनिराळ्या ठिकाणीं जमिनींतील अवशेष खणून काढण्याची क्रिया चालू आहे तीमुळें अनेक भाषांतील लेख अवशेषरूपानें नजरेस येत आहेत. यांपैकीं कांहीं भाषा आर्यन् भाषेशीं संबद्ध असलेल्या आढळतात. परंतु कांहींचें स्थान अद्यापि निश्चित झालें नाहीं. याचें कारण ज्या लिपींत ते लेख लिहिलेले असतात त्यांचें वाचन करणें व त्यांचें व्याकरण व इतर अर्थ लावणें हें काम अद्यापि नीटसें झालें नाहीं. सी. आउट्रॅन यानें या भाषांचे पुढें दिल्याप्रमाणें तीन वर्ग पाडले आहेत. (१) युफ्रटिस-तैग्रिस या नद्यांच्या प्रदेशांतील, (२) एशियामायनर, व मेसापोटेमियाचा डोंगराळ प्रदेश यांतील व (३) भूमध्यसमुद्रांतील. तथापि या भाषांच निरनिराळ्या तत्त्वांवरहि संघ पाडण्यांत आले आहेत. (१) सुमेरियनः—यांतील पहिला संघ सुमेरियन भाषांचा होय. यांतील जुन्यांत जुने लेख ख्रिस्तपूर्व चार हजार वर्षांचे आहेत. ही ख्रिस्तपूर्व पाच हजार वर्षांपासून युफ्रेटिस नदीतीर, बाबिलोन, व इराणी आखात या प्रदेशांत प्रचलित होती. ती स्वतः सेमिटिक संघांतील नसली तरी तिनें सेमिटिक भाषांवर बराच परिणाम केला आहे. यांतील वाङ्मय सुमारें दोन हजार वर्षांइतक्या दीर्घकालावर पसरलेलें आहे. व जरी सुमेरियन भाषेवर पुढें अक्कड भाषेचें वर्चस्व स्थापन झालें तरी सुमेरियन हीच लिहिण्याची व धार्मिक भाषा म्हणून ख्रिस्तपूर्व ३०० पर्यंत चालू होती. हिचीं दोन कालांतील दोन भिन्न स्वरूपें आढळतात. (२) दुसरा संघ एशियामायनर व मेसापोटेमिया या प्रदेशांतील होय. यांत पुढील भाषा येतात. (अ) मित्तानियनः—ही युफ्रेटीस नदीच्या वरच्या बाजूस प्रचलित असून या भाषेंतील कांहीं पत्रें व विशेषनामें मात्र उपलब्ध आहेत. (आ) कॉसियनः—ही झगरोस पर्वताच्या पूर्वेकडे प्रचलित होती. हींतील कांहीं तुरळक शब्द राहिलेले आहेत. (इ) वानिकः—ही वान सरोवराच्या सभोंवती बोलली जात होती. या भाषेंतील ख्रिस्तपूर्व ८ व्या ९ व्या शतकांतील कांहीं शिलालेख उपलब्ध आहेत. (ई) एलामाइटः—ही झगरोस पर्वताच्या दक्षिणेकडे प्रचलित असून या भाषेंतील शिलालेख ख्रिस्तपूर्व २६०० पर्यंतचे उपलब्ध आहेत. (उ) हिटाइट-कॅपेडोशियन भाषा या काळ्या समुद्राच्या दक्षिणेस कॅपेडोशियामध्यें प्रचलित असून यांतील बरेच बाणाग्र लिपींतील इष्टिकालेख उपलब्ध आहेत. हिटाइट भाषेच्या अभ्यासावरून सेमिटिक, सुमेरियन, मिटनी, एलमाईट, कॉकेशियन, इट्रस्कन व आर्यन् या भाषांमध्यें उच्चारविषयक व शब्दविषयक कांहीं सादृश्य असाव असें दिसतें. हिचें स्वरूप आर्यन् भाषासारखें दिसतें. हिचे वांशिक नातें अद्यापि निश्चित झालें नाहीं. परंतु तिचा पश्चिम आशियामायनरमधील सिलिशियन, कॅरियन, लिशियन, लिडियन वगैरे अल्पज्ञात भाषांशीं संबंध असावा असें दिसत.

भूमध्यसमुद्र.—या संघामध्यें भूमध्य समुद्रालगतच्या भागांत चालू असलेल्या प्राचीन आशियांतील भाषा मोडतात. यांतील महत्त्वाचा भाषा म्हटली म्हणजे इटलींतील इट्रस्कन भाषा ही होय. ही पूर्वी फ्लोरेन्सपासून रोमपर्यंत प्रचलित होती. व पुढें तिचा प्रसार या प्रांतांत अधिक झाला. या भाषेचा एशियामायनरमधील भाषांशीं कांहीं तरी संबंध असावा ही गोष्ट निश्चित आहे. परंतु तो संबंध कशा तऱ्हेचा होता यासंबंधीं अद्यापि निश्चित मत देतां येत नाहीं. या भाषेशीं सदृश अशा दुसऱ्या अनेक भाषा भूमध्यसमुद्रांतील सायप्रस, क्रीट, लेम्नॉस वगैरे बेटांत चालू होत्या.

हॅमिटो-सेमिटिक.—या संघांत हेमिटिक (नोआचा दुसरा मुलगा हॅम याच्या नांवावरून) आणि सेमिटिक (नोआचा वडील मुलगा सेम याच्या नावावरून) हे दोन वर्ग येतात यांतील पहिल्या वर्गांतील भाषांमध्यें परस्पर संबंध फार थोडा आहे. परंतु दुसऱ्या वर्गांतील भाषा अधिक संबद्ध दिसतात. या भाषा उत्तर आफ्रिकेंतील गोरे लोक व पश्चिम आशियांतील महत्त्वाच्या लोकांत रूढ आहेत. यांचा आर्यन् भाषेशीं किंवा मध्य आफ्रिकेंतील बांटु भाषेशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न करण्यांत आला होता. परंतु त्यास विशेष फळ आलें नाहीं. या भाषांनीं व्यापलेल्या प्रदेशामध्यें अद्यापपर्यंत फारसा फरक झालेला नाहीं. तथापि त्यांचा प्रसार व महत्त्व यांवर काळाचा बराच परिणाम झालेला आहे. (अ) सेमिटिक.—हिचे पूर्व सेमिटिक व पश्चिम सेमिटिक असे दोन वर्ग पाडतां येतात व पश्चिम सेमिटिकचे पुन्हां वायव्य व नैर्ऋत्य असे दोन पोटभेद मानतात. या भाषांचा विशेष म्हणजे त्यांतील मूळ शब्द तीन व्यंजनात्मक असून त्यांत जोडलेल्या निरनिराळ्या स्वरांवरून व स्वरांच्या स्थानांवरून निरनिराळे शब्द बनविण्यांत येतात. याचें उदाहरण पूर्वी अरबी कुतब् या शब्दांत दिलें आहेच. (आ) पूर्व सेमिटिकः—यांपैकीं अक्कडी भाषा मात्र ज्ञात आहे. ही प्राचीन बाबिलोनिया व असिरिया यांमध्यें प्रचलित असल्यामुळें तीस असुरो-बाबिलोनियन

अंतेहि म्हणतात. या भाषेतील लेख ख्रिस्तपूर्व २६०० ते १८०० वर्षांचे आढळतात. परंतु बाबिलोन शहराचा नाश झाल्यानंतर (ख्रि. पू. ५२६) या भाषेचें स्थान अरेमियन भाषेनें घेतलें व ही फक्त ख्रिस्ताच्या उदयापर्यंत धार्मिकभाषा म्हणून प्रचलित होती.

वायव्य सेमिटिकः--या शाखेंत कॅनेनेटिक व अरेमियन या भाषा येतात. यांपैकीं पहिलीच्या पुन्हां फिनिशियन आणि हिब्रू या दोन शाखा असून जुनी कॅनेनेटिक म्हणून हिचें भाषरूपी एक स्वरूप ख्रिस्तपूर्व १४०० च्या सुमारास शिलालेखांत आढळतें.

फिनिशियनः--ही भूमध्यसमुद्राच्या आशियाकडील किनाऱ्यावर प्रचलित असून तिचें क्षेत्र उत्तर आफ्रिकेंतील कार्थेजपर्यंत पसरलेलें होतें. या भाषेंतील शिलालेख ख्रिस्तपूर्व नवव्या शतकापर्यंतचे उपलब्ध आहेत. परंतु त्या लेखांत स्वर-चिन्हें आढळत नसल्यामुळें त्यांचा अर्थ लागत नाहीं. आशियामध्यें ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकांत हिचें स्थान अरेमियन भाषेनें घेतलें. तथापि ही कार्थेजमध्यें ख्रिस्तोत्तर चौथ्या शतकापर्यंत चालू होती. या वसाहतींतील फिनिशियन भाषेस प्युनिक असें दुसरें नांव होतें.

हिब्रूः--ही भाषा पॅलेस्टाइनमध्यें प्रचलित असून बायबलमधील जुना करार हा या भाषेंतील सर्वांत जुना लेख आहे. याचा काल ख्रि. पू. एक हजार वर्षांच्या पूर्वीचा आहे असें मानितात. ख्रि. पू. पांचव्या शतकामध्यें या लेखाची पुन्हां नव्यानें मांडणी करण्यांत आली. तथापि हिब्रू ही बोलण्याची भाषा म्हणून हळु हळु प्रचारांतून नाहींशी होत चालली. ख्रि. पू. तिसऱ्या शतकांतच या भाषेचें मिश्नेइक हिब्रू या नांवाचें एक नवीन स्वरूप तयार झालेलें आढळतें. मध्ययुगापासून अंतापर्यंत अरेमियन भाषा-मिश्र अशी एक हिब्रू भाषा यहुदी धर्मोपदेशक लिहित असलेले आढळतात. सध्यांची 'झायनिस्ट' चळवळ हिब्रूच्या पुनरुज्जीवनास थोडीशी कारण झाली आहे. त्यांतच सध्यां जर्मनीमधून चाललेली ज्यू लोकांची हद्दपारी या चळवळीस पोषकच होईल असें वाटतें.

अरेमियन.--ही भाषा अनेक बोलींच्या स्वरूपांत अकेडीयन भाषेच्या पूर्व दिशेस व हिब्रू व फिनिशियन भाषेच्या सभोंवतालच्या प्रदेशांत चालू होती. हिंचा विस्तार ख्रि. पू. ३ ते ६ व्या शतकांत बराच झाला व त्या वेळीं हिनें अक्कडीयन, फिनिशियन, व हिब्रू या भाषांवर वर्चस्व स्थापन केलें. सध्यां ही आजच्या स्वरूपांत निओअरेमिया, अथवा निओसिरियॅक या नांवानें सुमारें दोन लक्ष लोक बोलतात. बाकीचा तिचा प्रदेश अरबी भाषेनें व्यापिला आहे.

नैर्ऋत्य सेमिटिकः--अरबीः--उत्तर अरबस्तानांत पहिल्या व दुसऱ्या शतकांतील कांहीं लेख अरबी भाषेशीं संबंध असलेल्या लिह्यानाइट नावाच्या भाषेंत आढळतात. ही मध्य अरबस्तानांत प्रचलित होती. याच वेळीं एक अरबी साहित्यिकभाषा इस्लामेतर काव्यामध्यें वापरलेली आढळते. परंतु ती अद्याप लेखनिविष्ट झाली नव्हती. या भाषेमध्यें ख्रिस्ती शकाच्या सातव्या शतकांत कुराण नावानें महंमदाचीं धार्मिक वचनें संग्रहीत करण्यांत आलीं. कुराणात जें अरबी भाषेचें स्वरूप आढळतें तें साहित्यिक असून प्रचारांतील बोलीचें स्वरूप त्यापेक्षां थोडें निराळें होतें. परंतु या साहित्यिक भाषेस अभिजात स्वरूप प्राप्त होऊन तिच्यामध्यें भरपूर व विविध ग्रंथरचना झाली. अद्यापिहि लेखनभाषा म्हणून हिचें स्वरूप कायम आहे व इस्लामी धर्मा-बरोबर हिचा प्रसारहि पुष्कळ झालेला आहे. या वेळच्या प्रचारांतील बोलींबद्दल फारच थोडी माहिती मिळते. सध्यां आशिया व आफ्रिका खंडांत ज्या भाषा प्रचारांत आहेत त्या परस्परांस सहज समजण्यासारख्या असून त्यांचे निश्चित असे भिन्न प्रकार पड-लेले नाहींत. सध्यांची बोलण्याची अरबी भाषा अतिशय साधी असून व्याकरणदृष्ट्या पृथक्करणस्वरूपाची आहे. याच भाषेशीं संबद्ध असलेल्या दक्षिणअरबीमध्यें ख्रि. पू ६ ते ८ व्या शतकामधील शिलालेख आढळतात. या भाषेंत इतर व हुमय फारसें नसून सध्यां ही फक्त अरबस्तानच्या आग्नेयीकडील प्रदेशांत थोडी फार चालू आहे

इथिओपिक.--ही अबिसिनियामध्यें प्रचलित असून दक्षिणअरबी व हॅमेटिक बोलींचें मिश्रण आहे. सध्याच्या अबि-सिनियन ख्रिस्ती लोकांची धार्मिक भाषा गीझ या नांवाची आहे सध्यां प्रचलित असलेल्या येथील भाषांमध्यें अम्हारिक ही विशेष महत्त्वाची असून तीमध्यें तेराव्या शतकापासून लेखन सुरु असून ती राजभाषा आहे

हॅमिटिक--या शाखेंतील इजिप्शियन ही ख्रि पू. चार हजार वर्षांपासून प्रचलित आहे. ही ख्रि. शकाच्या ७ व्या शतकांत जिवंत होती. या भाषेच्या चित्रयुक्त लिपीमुळें ही फार महत्त्वाची असून प्राचीन संस्कृतीच्या अभ्यासाच्या दृष्टीनेंहि तिचें महत्त्व फार आहे. ख्रि. शकाच्या ३ ऱ्या शतकामध्यें नवीन करारांचें त्या वेळच्या कॉप्टिक भाषेमध्यें भाषांतर झालें होतें. ही १६ व्या शत-कांत प्रचारांतून गेली. तथापि तिला अजून कॉप्टिक पंथामध्यें धार्मिक महत्त्व आहे. इतर हॅमिटिक भाषांबद्दल शास्त्रीय अशी फारच थोडी माहिती मिळते. इजिप्त व अटलांटिक या दरम्यानच्या उत्तर आफ्रिकेमध्यें लिबियन आणि बरबर या बोली

विखुरलेल्या आढळतात. यांतील फारच थोडे लेख व धार्मिक ग्रंथ उपलब्ध आहेत. अरबी भाषेने सातव्या शतकामध्ये यांचे स्थान घेण्यापूर्वी उत्तर आफ्रिकेमध्ये लिबियन व बरबर या बोलण्याच्या भाषा असून प्युनिक व लॅटिन या लिहिण्याच्या भाषा होत्या.

कुशिटिकः--(हॅमचा वडील मुलगा कुश याच्या नांवावरून) ही हॅमिटिक भाषेची शाखा आफ्रिकेच्या पूर्वेकडील कोपऱ्यांत प्रचलित आहे. हींत निरनिराळ्या बोली असून त्या बोलणाऱ्यांची संख्या सुमारें आठ लाख आहे. परंतु त्यांमध्ये वाङ्मय उपलब्ध नाहीं. यांतील महत्त्वाच्या बोली म्हणजे बेजा, साहो, आफर, सोमाली, गल्ला, अगाव, सिदमा ह्या होत.

**फिनोउग्रिक आणि सामोयिदिक**--बराच काल पर्यंत फिनोउग्रिक अथवा उरल आणि सामोयिदिक या उरल अल्ताइक भाषासंघाची एक शाखा म्हणून मानीत असत. परंतु एका सामान्य उरेलियन भाषेपासून त्या निघाल्या असून त्यांचा एस्किमो-अल्युशियन भाषेशीं संबंध आहे. फिनोउग्रिक ही प्रथम व्होल्गा नदीच्या मध्यभागाजवळ बोलली जात होती. पुढें तेथील लोकांच्या परिभ्रमणाबरोबर तिच्या बऱ्याच शाखा झाल्या. त्या फिनिश व तत्संबद्ध कॅरेलियन, ओलोनेशियन, व्हेपसे, वोते, एस्थोनियन, लिव्होनियन, लॅप, मोर्डव्हिनियन, शेरेमिशियन, पर्मियन, व तिच्या शाखा झिरियन व वोतियक, तसेंच वोगल, *ओस्तियाक आणि मग्यार अथवा हंगेरियन या होत. यांतील फक्त एस्थोनियन (१७ वें शतक), फिनिश (१२ वें शतक), लॅप व हंगेरियन (१८ वें शतक), या चार साहित्यिक भाषा आहेत. सामोयिदिकः*--ह्या बोली उरल पर्वताच्या उत्तरेपासून येनिसीपर्यंतच्या प्रदेशांत सुमारें अठरा हजार लोक बोलतात

**तुर्की, मंगोली व तुंगुसी**--यांस अल्तेइक भाषा असें म्हणतात. यांत परस्परांमध्यें बरेंच साम्य आहे. तथापि त्यांचा अजून वांशिक संबंध निश्चित झाला नाहीं.

तुर्कीः—या भाषेंत सुमारें २८ बोली असून ही युरोप व आशियांतील बऱ्याच मोठ्या प्रदेशावर प्रचलित आहे. युरोपमध्यें क्रिमिया द्वीपकल्प, कॅस्पियन समुद्रकिनारा व्होल्गा आणि कामा या नद्यांचें तीर आणि तुर्कस्तान या भागांत ही प्रचलित असुन आशियामध्यें आशियामायनर व चिनी तुर्कस्तानपासून इराण, अफगाणिस्तान ते येनिसी नदीपर्यंत हिच्या बोली पसरलेल्या आहेत हिचीच याकुत नांवाची एक बोली सैबेरियामध्यें प्रचलित आहे. या भाषेचा प्रसार सुमारें चार कोटी लोकांत आहे. *ऑटोमन अथवा उस्मानली हिला वास्तविक तुर्की म्हणून म्हणतात. ही युरोपमध्यें व आशियांतील तुर्कस्तानांत* प्रचलित आहे. या एकंदर बोलींमध्यें याकुत व दुसरी व्होल्गा आणि कामा नद्यांच्या आसपास असलेली चुवाश या दोन बोलींत विशेष फरक आढळून येतो. या भाषेंतील लेख इ. सनाच्या आठव्या शतकांतील आढळतात. यांतील वाङ्मय चौदाव्या शतकापर्यंत विशेषपणें पुढें आलेलें नव्हतें व १९ व्या शतकापर्यंत या भाषेवर अरबी व फारसी भाषांचा पगडा बसलेला होता. परंतु अलीकडे युरोपियन भाषांचें वर्चस्व स्थापन होत आहे

मंगोलीः--तेराव्या शतकामध्यें चेंगिझखान या मोंगल सरदारानें बराच भूप्रदेश आक्रमण केला होता. परंतु त्यापूर्वीचा या लोकांचा इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं. या भाषेचे सध्यां थोडेफार अवशेष कास्पियन समुद्राच्या उत्तरेकडे व्होल्गा नदीच्या किनाऱ्यावर व उत्तर अफगाणिस्तानामध्यें आढळतात. सध्यां सुमारें तीस लक्ष लोक या बोली वापरतात. यांतील जुन्यांत जुने शिलालेख तेराव्या शतकांतील असून त्यानंतरचें कांहीं ऐतिहासिक व धार्मिक वाङ्मय उपलब्ध आहे.

तुंगुसीः--तुंगुसी व मांचु लोक आणि भाषा यांविषयींची पूर्वीची फारशी माहिती मिळत नाहीं. ही सध्यां सुमारें दहा लाख लोक वापरतात चिनी भाषेच्या वर्चस्वामुळें ही लवकरच नष्ट होण्याचा संभव आहे. तथापि सतराव्या शतकापासून मांचु भाषेमध्यें भाषांतरें, व्याकरणें व मोठमोठे कोश तयार झाले असुन तिला निश्चित स्वरूप प्राप्त झालें होतें. मांचु भाषेंतील पांच भाषांचा व ३६ भाग असलेला एक कोश ब्रिटिश म्युझियममध्यें उपलब्ध आहे. भाषाभ्यासाच्या दृष्टीनें या भाषेंतील लेख फार महत्त्वाचे आहेत. या भाषेच्या बऱ्याच बोली आहेत.

जपानी—या भाषेचें वांशिक स्थान अजून निश्चित झालें नाहीं. हिचा कोरियन भाषेशीं निकटचा संबंध दिसतो परंतु कांहीं भाषाशास्त्रज्ञ तिला उरल अल्तेइक संघाशीं जोडतात. या भाषेंतील लेखनपद्धति चिनी भाषेशीं संबद्ध आहे. या भाषेंतील वाङ्मय समृद्ध असून ८ व्या ९ व्या शतकापासून उपलब्ध आहे सध्यांची जपानी भाषा टोकियो येथील बोलीवरून तयार झाली आहे. ही भाषा बोलणारे सहा कोटी लोक असून ते मुख्यतः जपानमध्यें परंतु थोडेफार कोरिया, अमेरिका व इतर देशांत आढळतात. हिचें स्वरूप संश्लिष्ट अथवा चिकटें आहे तथापि प्रत्ययमयताहि आढळते.

**कोरियन**—ही जपानी भाषेशीं सदृश व संबद्ध अशी एक चिकटी भाषा आहे हिची लोकसंख्या एक कोटि सत्तर लक्ष असून ती कोरियामध्यें प्रचलित आहे. या भाषेंत पुष्कळ चिनी शब्दांची भर पडलेली आहे. पंधराव्या शतकापर्यंत ही चिनी लिपींत लिहीत असत त्या सुमारास संस्कृत भाषेवरून एक वर्णमाला तयार करण्यांत आली व स्वर आणि व्यंजनांची स्वतंत्र व्यवस्था करण्यांत आली.

**ऐनु**—याच प्रदेशांतील दुसरी अवर्गीकृत भाषा म्हटली म्हणजे साघालीन व इतर बेटांत सुमारें वीस हजार लोकांत प्रचलित असलेली ऐनु ही होय हिचें स्वरूप चिकटें असून हिच्या तीन बोली आहेत हींत मुळींच वाङ्मय नाहीं.

**हायपरबोलियन अथवा पॅलिओ एशियाटिक भाषा**—या भाषा संबंधीं फारच थोडी माहिती असून यामध्यें युकाघीर, चुकचे आणि कोर्याक ( सायबेरियांतील ईशान्यभागांतील ), कामचाडल ( कामचाटकामधील ) व गिलियाक ( सॅघेलियन बेटांतील ) या भाषा मोडतात या लक्षणविशिष्ट नसून त्यांच्यांतील परस्पर संबंध अजून निश्चित नाहीं.

**बास्क**—ही भाषा आर्यन् प्रदेशांत असून आर्येतर आहे. हिला बास्क लोक युस्कारा अथवा एस्कारा असें म्हणतात. स्पेनमध्यें उत्तरेकडील चार प्रांतांत व फ्रान्समधील दोन जिल्ह्यांत ही प्रचलित आहे. हिचा संबंध निरनिराळ्या भाषांशीं जोडण्यांत येतो. कांहींच्या मतें ही स्पेन व दक्षिण फ्रान्समध्यें पूर्वी प्रचलित असलेल्या आयबेरियन भाषेपासून निघाली असावी. तर कांहींच्या मतें ती हॅमिटोसेमिटिक, कॉकेशन, इट्रस्कन वगैरे भाषांशीं संबद्ध आहे. ही जरी फार ल्हानशा क्षेत्रांत प्रचलित आहे तरी तीमध्यें अनेक पोटभाषा असून त्या पोटभाषांत पुन्हा अनेक प्रकारचें सादृश्य असल्यामुळें परस्परांपासून त्यांचे भिन्नत्व दाखवितां येत नाहीं. यांतील जुन्यांत जुने अवशेष आठव्या शतकांतील असून तीं गांवांचीं नांवें आहेत. या भाषेंतील पहिला ग्रंथ १५४५ मधील असून १९ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत या भाषेंतील वाङ्मय फक्त धार्मिक होतें परंतु अलीकडे बरीच नवीन ग्रंथरचना झाली आहे भाषाशास्त्रदृष्ट्या ही फार महत्त्वाची भाषा आहे हिचें स्वरूप चिकटें आहे

**कॉकेशन भाषा**—कास्पियन व काळ्या समुद्राच्या दरम्यान आपणास आर्यनहि नव्हे व सेमिटिक किंवा उरल अल्ताइक नव्हेत असे दोन भाषासंघ आढळतात. यास उत्तर व दक्षिण कॉकेशन अशीं नांवें असून यांची लोकसंख्या सुमारें वीस लक्ष आहे कांहीं भाषाशास्त्रज्ञ यांचें जाफेटिक भाषा म्हणून वर्गीकरण करतात. कॉकेशन भाषांचे पुन्हां पूर्व व पश्चिम असे दोन वर्ग पाडण्यांत येतात यांतील पहिल्यास त्यांतील एका पोटभाषेवरून चेचेन असें नांव देतात यांतील अवार नावाच्या एका भाषेमध्यें नामाच्या तीस विभक्ती आहेत चेचेन भाषेंत नामांस सहा लिंगें असून त्यांतील चारांत फक्त ध्वनिविषयक फरक आहेत व त्यामुळें अर्थांत कोणताहि बदल होत नाहीं यांतील बहुतेक नामें व क्रियापदें अनियमित रीतीनें चालतात परंतु पश्चिमेकडील संघामध्यें इतका अनियमितपणा आढळत नाहीं. या संघांत तीन शाखा असून त्यांतील सर्केशियन ही विशेष ज्ञात आहे ह्या कोणत्याहि भाषेस स्वतंत्र लिपी अथवा वाङ्मय नाहीं. दक्षिण कॉकेशन —ही शाखा मध्य व पश्चिम कॉकेशसमध्यें सुमारें पंधरा लक्ष लोकांत प्रचलित असून तीमध्यें पांच निरनिराळ्या बोली आहेत. त्यांपैकीं जॉर्जियन ही फार महत्त्वाची आहे. हिची स्वतंत्र लिपी असून तीमध्यें १० व्या शतकापासून खिस्ती वाङ्मय उपलब्ध आहे. हिचें स्वरूप प्रत्ययी आर्यन् व चिकट्या तुर्की भाषा यांच्यामधलें आहे

**द्राविड**—या भाषा दक्षिणहिंदुस्थानांतील सुमारें सात कोटी लोक बोलतात यांचा कांहीं लोक मुंडा भाषेशीं संबंध जोडतात परंतु बरेच लोक हें मान्य करीत नाहींत पूर्वी या भाषांचा प्रसार हिंदुस्थानाच्या बऱ्याच भागावर होता, असें मानावयास जागा आहे. बलुचिस्तानांत एकाकी असलेली ब्राहुइ भाषा हा तिचा उत्तरेकडील अवशेष होय या भाषेंतील लिंगभेद हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याहि भाषांत आढळत नाहीं मुंडा भाषेप्रमाणें या भाषेंत परसग्राहक व परव्यावर्तक ( आपण करूं, आम्ही करू ) अशीं स्वतंत्र प्रथम पुरुषी सर्वनामें आहेत तसेंच कांहींमध्यें अकरणरूपी क्रियापदें आढळतात यांत पुढें दिलेल्या पोटभाषा आहेत ( अ ) तामिळ—ही वाङ्मयसंपन्न भाषा आहे. साहित्यिक तामिळ भाषेचें स्वरूप आर्ष असून अशिक्षित लोकांस तें समजत नाहीं ( आ ) कानडी—ही पश्चिमेकडे पंधरा लाख लोक बोलतात हीमध्यें पांचव्या शतकांतील शिलालेख उपलब्ध असून ९ व्या शतकापासून वाङ्मय आढळतें (इ) तेलगू—ही पूर्व किनाऱ्यावर प्रचलित असून हींत अकराव्या शतकापासून वाङ्मय आढळतें. ( ई ) मल्याळम्—हिला तामीळ भाषेचाच पोटभेद मानतात हीमध्यें तेराव्या शतकापासूनचें वाङ्मय उपलब्ध आहे या भाषा आपल्या निकटवर्ती असल्यामुळें त्यांची संस्कृत भाषेशीं काल्डवेलनें केलेली तुलना पुढें दिली आहे.

**द्राविड व संस्कृत**—द्राविड भाषा व संस्कृत यामध्यें पुढील बाबतींत व्याकरणविषयक भेद आढळतात—(१) द्राविड भाषांत सर्व अचेतन वस्तुवाचक नामें नपुंसकलिंगी मानतात, पुल्लिंगी आणि स्त्रीलिंगी हा भेद फक्त पुढील बाबतींत आढळतो,

(अ) तृतीयपुरुषी सर्वनामें, (आ) सचेतन वस्तूंस लागणारी विशेषणें यांस सार्वनामिक प्रत्यय लागतात क्रियापदाचीं तृतीयपुरुषी रूपें हींहि सार्वनामिक प्रत्यय लावून बनवितात व त्यांचीं एकवचनीं तीन रूपें व अनेकवचनीं दोन रूपें तृतीयपुरुषी सर्वनामाप्रमाणें बनवितात इतर बाबतींत जेव्हां लिंगभेद दाखवावयाचा असेल तेव्हां स्त्रीपुरुषवाचक स्वतंत्र शब्द मागें जोडतात पण या ठिकाणींहि त्या नामाचें लिंग नपुंसकच असून क्रियापदाचें रूपहि त्यास जुळणारें असेंच वापरतात हा विशेष आपणास सिथियन भाषांत आढळतो पण सर्व आर्यन भाषांत लिंगभेदाचें विशेष महत्त्व आहे ( २ ) द्राविड नामांचीं विभक्तीचीं निरनिराळीं रूपें विभक्तिप्रत्ययांच्या ऐवजी निराळींच अव्ययें दोवटीं जोडून बनविण्यात येतात यामध्यें एकवचनी व अनेकवचनी रूपें बनवितांना असा भेद आढळतो कीं, एकवचनामध्यें विभक्तिप्रत्यय मूळ शब्दासच जोडतात तर अनेकवचनी प्रत्यय मूळ शब्दास जोडण्याऐवजीं सिथियन भाषेप्रमाणें अनेकवचन करणाऱ्या प्रत्ययास जोडतात मूळ शब्दास अनेकवचनी प्रत्यय जोडला म्हणजे सर्व नामें एकवचनाप्रमाणेंच अनेकवचनांत व तिन्ही लिंगांत चालतात ( ३ ) द्राविड नपुंसकलिंगी नामाचें अनेकवचन क्वचितच होतें व क्रियापदाच्या बाबतींत तर नपुंसकलिंगी अनेकवचन फारच क्वचित येतें ( ४ ) द्राविड भाषांतील चतुर्थीचे प्रत्यय कु, कि अथवा गे याचें संस्कृत अथवा इतर कोणत्याच आर्यन भाषेंतील प्रत्ययांशीं सादृश्य आढळत नाहीं तर उलट ते तुर्की भाषेंतील चतुर्थीच्या प्रत्ययासारखे अथवा बेहिस्तून शिलालेखांतील सिथियन भाषेसारखे किंवा कांहीं फिनिश वर्गांतील भाषांसारखे दिसतात आर्यन् भाषांमध्यें ज्या ठिकाणीं उपसर्ग अथवा शब्दयोगी अव्ययें शब्दाच्या मागें जोडलेलीं आढळतात त्या ठिकाणीं द्राविड भाषेमध्यें सिथियन भाषेप्रमाणें पश्चात्योगी शब्द जोडतात या शब्दांस भाषेमध्यें स्वतंत्र स्थान नसून ते संबंधदर्शक अथवा गुणदर्शक नामें असून साहाय्यक शब्दाप्रमाणें त्यांचा उपयोग करतात सर्व क्रियाविशेषणें हीं सामान्यनामें, धातुसाधितनामें, किंवा क्रियापदाची तुमंत किंवा हेत्वर्थक रूपें असून तीं त्यांचा संबंध असणाऱ्या क्रियापदाच्या पूर्वी येतात ( ५ ) संस्कृत व इतर आर्यन भाषांत विशेषणांचीं नामाप्रमाणें रूपें होतात व तीं तत्संबद्ध नामाप्रमाणें लिंग, वचन, विभक्ति यांस अनुसरून होतात परंतु द्राविड भाषांमध्यें सिथियन भाषाप्रमाणेंच विशेषणांचीं रूपें बदलत नाहींत यांचें मूळ स्वरूप भाववाचक नामाप्रमाणें असतें व जेव्हां तीं भाववाचक नामें म्हणून वाक्यांत वापरलीं जातात तेव्हां त्यावर नामांप्रमाणेंच सर्व कार्यें होतात परंतु जेव्हां नामाशीं गुणविशेषणें म्हणून उपयोग करण्यांत येतो तेव्हां त्यांच्या रूपांत कोणताहि बदल न होतां तीं फक्त नामाच्या पूर्वी योजतात ( ६ ) मंगोलियन, माञ्चु व कित्येक सिथियन भाषांप्रमाणें व इतर आर्यन् भाषांच्या उलट द्राविड भाषेंत विशेषणाच्या ऐवजीं क्रियापदाचीं धातुसाधित रूपें योजतात व त्यामुळें जेव्हां गुणदर्शक नामांचा विशेषणाप्रमाणें उपयोग केला जातो तेव्हां धातुसाधिताचे प्रत्यय त्यांस जोडतात व त्यास नामाचें व क्रियापदाचें असें दोहोंचेंहि स्वरूप येतें ( ७ ) द्राविड भाषांचा इतर अनेक सिथियन भाषाप्रमाणें हा एक विशेष आहे कीं, त्यामध्यें प्रथमपुरुषी सर्वनामांचीं अनेकवचनीं दोन रूपें असतात एकामध्यें द्वितीयपुरुषाचा अंतर्भाव होतो व एकांत होत नाहीं (उदा आपण आम्ही) म्हणजे एक परसंग्राहक असतें तर दुसरें परव्यावर्तक असतें ही गोष्ट आपणास संस्कृत किंवा इतर आर्यन भाषांत आढळत नाहीं या दोन भाषांस सदृश अशा गोष्टी म्हटल्या म्हणजे दोहींतहि द्विवचन आढळतें ही होय ( ८ ) द्राविड भाषांत कर्मकर्तरि प्रयोग आढळत नाहीं त्याऐवजीं कांहीं सहाय्यक क्रियापदें वापरतात ( ९ ) द्राविड भाषांमध्यें सिथियन भाषांप्रमाणें व आर्यन भाषांच्या उलट उभयान्वयी अव्ययाच्या ऐवजीं पूर्वकालवाचक धातुसाधित वापरण्याची अधिक प्रवृत्ति आढळते ( १० ) द्राविड भाषांत करणरूपी व अकरणरूपी क्रियापदाचे स्वतंत्र प्रयोग असतात याहि बाबतींत त्यांचें सिथियन भाषांशीं साम्य व आर्यन भाषांशी विसादृश्य दिसून येतें ( ११ ) द्राविड भाषामध्यें मंगोलियन, माञ्चु व कांहीं अशानें सिथियन भाषांत आढळणारा एक विशेष म्हणजे संबंधी सर्वनामाच्या ऐवजीं संबंधीधातुसाधितें वापरण्याची प्रवृत्ति आढळते गोंड भाषेशिवाय कोणत्याहि द्राविड भाषेंत संबंधीसर्वनाम आढळत नाहीं गोंड भाषेमध्यें संबंधी धातुसाधितें नष्ट झालीं असून त्यांऐवजीं हिंदी भाषेंतील संबंधीसर्वनामें रूढ झालीं आहेत द्राविड भाषांत संबंधीसर्वनामाची जागा संबंधीधातुसाधितांनीं घेतली असून हीं धातुसाधितें क्रियापदाच्या वर्तमान, भूत व भविष्य काळाच्याच धातुसाधितास प्रत्यय लावून तयार करतात व हा प्रत्यय व षष्ठीचा प्रत्यय हे एकच होत उदा० स 'पुरुष य आगत' या ऐवजीं तामिळ भाषेंत 'य आगत' पुरुष ' (वद अ आळ) असा वाक्प्रचार आढळतो, येथें वदु--आगत या भूतकालवाचक धातुसाधिताचें वन्द अन्यआगत असें संबंधी धातुसाधित 'अ' हा षष्ठीचा व विशेषणात्मक प्रत्यय लावून बनविण्यांत येतें ( १२ ) द्राविड भाषांतील वाक्यरचनाहि सिथियन भाषाप्रमाणेंच संस्कृत भाषेहून सर्वथा भिन्न आहे, संस्कृत भाषेंत मुख्य शब्दाच्या पूर्वी तत्संबद्ध शब्द योजतात जसें 'रामस्य पुत्र' परंतु द्राविड भाषेंत मुख्य शब्द प्रथम येऊन संबद्ध शब्द नंतर योजण्यांत येतो यामुळें वाक्यरचनेंत आरंभी नेहमीं कर्त्याचें स्थान असतें व क्रियापद वाक्याच्या शेवटीं येतें विशेषण

विशेष्याच्या पूर्वी असतें. क्रियाविशेषण क्रियापदाच्या पूर्वी असतें. ज्या नामाचा क्रियापदाशीं संबंध असतो तें नाम तत्संबद्ध शब्दांसह क्रियापदाच्या पूर्वी येतें. संबंधी धातुसाधित तत्संबद्ध नामाच्या पूर्वी येतें. वाक्यांतील अकरणरूपी भाग करणरूपी भागाच्या पूर्वी येतो. षष्ठ्यन्त नाम तत्संबद्ध नामाच्या पूर्वी येतें शब्दयोगीअव्यय तत्संबंध नामाच्या पूर्वी येण्याच्या ऐवजीं नंतर येतें व वाक्याच्या शेवटीं क्रियापद येतें. या सर्व बाबतींत द्राविड भाषांचें सिथियन भाषांशीं साम्य आहे.

**द्राविड भाषा व संस्कृतसंभव भाषा**--द्राविड भाषा व उत्तरहिंदुस्थानांतील भाषा यांमध्यें पुढील बाबतींत व्याकरणविषयक साम्य आढळतें-(१) नामाचें सामान्य रूप करून त्यास विभक्तिप्रत्यय जोडण्यांत येतात. (२) नामांस अनेकवचनाचा प्रत्यय लागल्यानंतर बहुधा एकवचनासारखेच प्रत्यय लावून त्यांचीं निरनिराळीं अनेकवचनी विभक्तींचीं रूपें बनविण्यांत येतात. (३) प्रथमपुरुषी एकवचनी सर्वनामांचीं परसंग्राहक व परव्यावर्तक अशीं दोन रूपें असतात.' उदा. आपण वरूं व आम्हीं करूं (४) पूर्वयोगी अव्ययांच्या ऐवजीं पश्चात्‌योगी अव्ययें वापरतात म्हणजे उपसर्ग पूर्वी जोडण्याच्या ऐवजीं शब्दयोगी अव्ययें नंतर जोडण्यांत येतात. उदा. --अभिरामं-रामापुढें; उपगृहं- घराजवळ इत्यादि (५) क्रियापदाचीं निरनिराळ्या काळांतील रूपें धातुसाधिताच्या साहाय्यानें करतात. (६) मुख्य वाक्याच्या पूर्वी संबंधी वाक्यें योजतात जर तो आला तर मी येईन. (७) मुख्य शब्दानंतर संबद्ध शब्द योजतात.

**द्राविड भाषा व बेहिस्तून लेख भाषा**--द्राविड भाषा व बेहिस्तुन लेखांतील भाषा यांच्यामध्यें पुढील सादृश्य आढळतें-(१) ह्या दोन्ही भाषांत ट, ड, ण हीं मूर्धन्य व्यंजनें आढळतात ही व्यंजनें संस्कृतमध्यें आढळत असलीं तरी तीं संस्कृत भाषेमध्यें द्राविड भाषेमधून आलेलीं आहेत (२) तामिळ भाषा व या लेखांतील भाषा यांमध्यें एकच व्यंजन शब्दाच्या प्रारंभीं आलें तर त्याचा उच्चार कठोर करावयाचा व शब्दाच्या मध्यें आलें तर मृदु करावयाचा व एकाकी असेल तर कठोर करावयाचा आणि द्वित्त असेल तर मृदु करावयाचा हा नियम सामान्य आढळतो (३) या लेखांतील भाषेंत षष्ठीचीं रूपें न, निन, व इन हे प्रत्यय लावून बनविलेलीं आढळतात यासारखींच द्राविड भाषेंतील रूपें तेलगूमध्यें नी लावून गोंडी व ब्राहुईमध्यें न अथवा अ लावून आणि तामिळमध्यें इन् हा प्रत्यय लावून होतात. (४) या लेखांतील चतुर्थीचा प्रत्यय इकी अथवा इक असा आहे व द्राविड चतुर्थीचे प्रत्यय कु, कि, क इत्यादि आहेत. या प्रत्ययाच्या पूर्वी तामिळ व मल्याळीमध्यें उ व इ असे स्वर येतात. आणि त्यामुळें क चें द्वित्त होतें उदा. तुला या अर्थी कानडीमध्यें निन-अ-गे मल्याळीमध्यें निन-अ-क्कु तर बेहुस्तुन लेखात निन-इक्क अशीं रूपें आढळतात. (५) बेहिस्तुन लेखात सर्वनामांचीं द्वितीयेचीं रूपें उन, इन् अथवा न प्रत्यय लावून केलेलीं आढळतात, यांचीं तेलगूमधील नु अथवा नि आणि कानडीमधील अम्, अन, ऊ हे द्वितीयेचे प्रत्यय सदृश दिसतात (६) या लेखात संख्यावाचक शब्द फक्त 'किर' हा आढळतो. याचा र अथवा इर या संख्यावाचक विशेषणाशीं अथवा उपपदाशीं संबंध दिसतो. तेलगूमध्यें एक या अर्थी ओक असा शब्द असून तामिळमध्यें ओर असा शब्द आहे खोंड भाषेंत एक या अर्थी र हा शब्द आहे, तो तामिळमधील ओर शब्दाशीं किंवा विशेषत बेहिस्तून लेखातील र अथवा इर शब्दाशीं सदृश दिसतो. या लेखांतील क्रमवाचक संख्याविशेषणाच्या शेवटीं इम् असे वर्ण येतात तर तामिळभाषेंतील याच संख्याविशेषणाच्या शेवटीं आम् हे वर्ण येतात व सामोयिदीक भाषामध्यें इम् असे येतात. (७) द्वितीयपुरुषवाचक सर्वनाम या लेखात व द्राविड भाषांत नी असें एकच आढळतें. याचें सामान्य रूप निन् असें होतें व तेंच द्वितीयेचेंहि रूप आहे या सर्वनामाचें अनेकवचनी रूप या लेखात योजलेलें आढळत नाहीं. (८) या लेखांच्या भाषेंत द्राविड भाषाप्रमाणेंच संबंधीधातुसाधित योजलेलें आढळतें याखेरीज संबंधीसर्वनामहि आढळतें. व हा विशेष सर्व सिथियन भाषावंशांत आढळतो. (९) या लेखात अकरणात्मक आज्ञार्थी अथवा निषेधार्थक अव्यय इनि असें योजिलेलें आढळतें. गोंड भाषेंत आपणांस मिनि असें आढळतें बेहिस्तुन शिलालेखातील क्रियापदें चालविण्याची पद्धत उग्रियन वंशांतील हंगेरियन किंवा मोर्डिन भाषासारखी आढळते. परंतु द्राविड भाषापासून ती सर्वथा भिन्न आहे द्राविड भाषातील क्रियापदाचीं रूपें धातूस कालवाचक अव्ययें जोडून बनविण्यात येतात. व त्यांचीं निरनिराळीं पुरुषवाचक रूपें सार्वनामिक प्रत्यय जोडून बनविण्यांत येतात. हें विसादृश्य लक्षात घेतलें तरीसुद्धा या दोन भाषामध्यें काहीतरी निकटचा संबंध असावा ही गोष्ट लक्षात येते. द्राविड भाषा ह्या सिथियन वंशातील तुर्की, उग्रियन, मंगोली किंवा तुगुसी भाषांशीं संबद्ध नसून त्या फिनिश किंवा उग्रियन-विशेषतः ओस्तियाक शाखेशीं-संबद्ध असाव्यात असें काल्डवेलनें म्हटलें आहे.

**द्राविड भाषांत शिरलेले आर्य विशेष**--द्राविड भाषात जें आर्यन भाषाविशेषाचें मिश्रण झालेलें आहे तें पुढील बाबतींत होय-(१) एकापुढें एक येणाऱ्या दोन स्वराचा संयोग होऊं नये म्हणून त्यामध्यें न घालण्याचा ग्रीक अथवा संस्कृत भाषांप्रमाणें प्रघात. (२) तृतीयपुरुषवाचक सर्वनामें व क्रियापदें यामध्यें लिंगभेद, विशेषत: नपुंसकलिंगाचें अस्तित्व.

( ३ ) दर्शकसर्वनामें अथवा तृतीयपुरुषवाचक सर्वनामें यांचें नपुंसक लिंग करीत असतांना 'द,' अथवा 'त,' हा आगम लावणें. ( ४ ) नपुंसकलिंगी शब्दांचें अनेकवचन लॅटिनप्रमाणें अकारान्त असणें. ( ५ ) दूरचा पदार्थ दाखविण्याकरितां योजावयाच्या दर्शकसर्वनामांत 'अ' व जवळचा पदार्थ दाखविण्याच्या दर्शक सर्वनामांत 'इ' हा स्वर असणें. (६) फारसी भाषेप्रमाणें भूतकालवाचक रूपें 'द' जोडून करणें. (७) कांहीं भूतकालवाचक रूपें वर्णाची द्विरुक्ति अथवा अभ्यास करून करणें (८) धातुसाधित नामें अथवा तद्रूपें क्रियापदांतील स्वर दीर्घ करून बनविणें.

**संस्कृत व तामिळ**—तामिळ भाषेवर संस्कृत भाषेच्या संसर्गानें पुढील परिणाम झालेले दिसतात (१) लिंगायत आगम, शंकराचार्य व रामानुजाचार्य यांच्या ग्रंथांनीं आपल्या तत्त्वज्ञानाच्या प्रसाराबरोबर ११ व्या शतकापासून १६ व्या शतकापर्यंत अनेक संस्कृत तत्सम शब्द तामिळ भाषेंत अंतर्भूत केले. (२) यापूर्वी ९ व्या शतकापासून १३ व्या शतकापर्यंत जैन ग्रंथकारांनीं अनेक संस्कृत तद्धित शब्द तामिळ वाङ्मयामध्यें योजले. हा काळ तामिळ वाङ्मयाचें सुवर्णयुग म्हणून प्रसिद्ध आहे. याच वेळीं कुरळ, चिंतामणी आणि अभिजात तामिळ कोश व व्याकरणें लिहिलीं गेलीं. या तद्धित शब्दांत तामिळभाषाविशेषांनुसार बदल झालेला आढळतो. उदा. लोक या संस्कृत शब्दाचें उलगु असें रूप झालें आहे. राजा याचें अरसु असें रूप झालें आहे. ( ३ ) यापूर्वीहि कांहीं संस्कृत तत्सम अथवा तद्भव शब्द तामिळ भाषेंत प्रविष्ट झाले होते. हे प्राचीनकाळच्या ब्राह्मण, पंडित, ज्योतिषी, पुरोहित वगैरे वर्गाच्या संसर्गापासून आले असावे. यांचें रूप वरील दोन्हीं प्रकारच्या शब्दांपेक्षांहि अधिक बदललेलें दिसतें. उदा. सं. श्री या शब्दाचें तिरु असें रूप बनलें आहे तर कर्मन याचें करुमम् अथवा कन्मम् व प्राचीन तामीळमध्यें कमु असें रूप आढळतें. कांहीं तामिळ महिन्यांचीं नांवें संस्कृत नांवांपासून बनलेलीं आढळतात. उदा. पूर्व आषाढ पासुन पुराडं, पूर्व भाद्रपदापासून पुरट्टासी अशीं रूपें बनलेलीं आढळतात.

**संस्कृत भाषेंतील मूर्धन्य वर्ण**—संस्कृत भाषेंतील मूर्धन्य वर्ण द्राविड भाषेंतून आले असावे यास पुढील कारणें संभवतात ( १ ) द्राविड भाषांत मूर्धन्य वर्ण हे अनेक धातूंमध्यें त्यांचे इतर धातूंशीं पृथक्त्व दाखविण्याकरितां अवश्य व मुख्य घटक म्हणून आढळतात तर संस्कृतमध्यें मूर्धन्य वर्ण हे दंत्यवर्णांपासून संधिनियमानें बनलेले आढळतात. (२) संस्कृत भाषेशीं वांशिक संबंध असलेल्या ग्रीक, लॅटिन, गॉथिक, केल्टिक, लिथुअॅनियन, स्लॅव्हॉनिक, फारसी, झेंद यापैकीं कोणत्याहि भाषेंत मूर्धन्य वर्ण आढळत नाहींत. व या भाषांचा संबंध संस्कृत भाषा बोलणाऱ्या लोकांशीं हिंदुस्थानांत त्यांचें आगमन होण्यापूर्वी होता. तर द्राविड भाषांशीं संबंध त्यांचे हिंदुस्थानात आगमन झाल्यावर आला. व सर्व द्राविड भाषांत मूर्धन्य वर्ण आढळतात. तसेंच या मूर्धन्य वर्णांचा प्रचार संस्कृतपेक्षांहि हिंदुस्थानामध्यें उत्पन्न झालेल्या प्राकृत भाषांमध्यें अधिक आढळतो. (३) तामिळ भाषेमध्यें जे संस्कृत भाषेंतील शब्द आले आहेत त्यांतील कठीण रूपें तामिळ भाषेनें उच्चार सुलभ करून घेतलीं आहेत. संस्कृत शब्दांतील महाप्राण व संस्कृत 'ष' हा उच्चारण्यास कठिण असलेला वर्ण तामिळ भाषेनें गाळून टाकला आहे. किंवा त्यामध्यें बदल केला आहे. अर्थात या भाषेनें संस्कृतमधील उच्चारास कठिण असे मूर्धन्य वर्ण संस्कृत तद्भव शब्दांतच केवळ नव्हे तर मूळ तामिळ शब्दांतहि घेतले असणें संभवत नाहीं. ( ४ ) तेलगु ही भाषा संस्कृत भाषेशीं अगदीं निकट असूनहि मूर्धन्य वर्णांचा उपयोग तेलगु भाषेपेक्षा तामिळ भाषेंत अधिक आढळतो. या सर्व कारणांवरून मूर्धन्य वर्ण हे द्राविड भाषांनीं संस्कृत भाषेपासून घेतलेले असण्याच्या ऐवजीं संस्कृत भाषेंतच द्राविड भाषांमधून आले असावे हें अधिक संभवनीय दिसतें.

**उत्तरद्राविड**—या हळू हळू नष्ट होत असून त्यांचें स्थान आर्यन् भाषा घेत आहेत. गोंडी ( मध्यहिंदुस्थान ), ब्राहुइ ( बलुचिस्थान ), कोरकु ( छोटानागपूर ), व माल्तो ( राजमहाल टेकड्या ) या भाषा या संघांत मोडतात.

**अंदमानी**—अंदमान बेटांतील भाषांस अद्यापि कोणत्याहि विशिष्ट संघांत सामील केलेलें नाहीं.

**आस्ट्रो-आशियाटिक भाषा**—या भाषा अनामपासुन छोटानागपुरपर्यंत विखुरल्या आहेत. यांमध्यें मुख्य तीन शाखा आहेत. पश्चिमेकडे मुंडा व कोल ( छोटा नागपूर ), पूर्वेकडे अनामी ( दक्षिण चिनी समुद्र ) आणि मॉनख्मेर ( वरील दोहोंच्या दरम्यान ) यांतील शब्दसमूह व व्याकरणविशेषांवरूनच त्यांचा एक भाषासंघ समजण्यांत येतो. तथापि अजून यांचा वांशिक संबंध तितका निश्चित ठरला नाहीं. यांमध्यें संख्याविशेषणें, उपसर्ग वगैरे बाबतींत साम्य असलें तरी रचनेच्या बाबतींत बरीच भिन्नता आढळते. उदा. मुंडा या चिकटया भाषा असून अनामी एकाक्षरी आहेत.

**मॉनख्मेर.**—या संघांत मॉन, ख्मेर, चाम, या तीन सुसंस्कृत भाषा व अनामपासून आसामपर्यंत ते मलाया द्वीपकल्प पर्यंत पसरलेल्या अनेक असंस्कृत भाषा मोडतात. यांतील सयाम व इंडो चीनमधील ख्मेर भाषासंघ फार महत्त्वाचा आहे. यांतील जुने शिलालेख इ. स. सातव्या शतकांतील आढळतात या भाषाची व्याकरणपद्धति महत्त्वाची आहे.

अनामी:—या भाषा टाँकिनचा पूर्व किनारा इंडो-चीन व कोचीन चीन या प्रदेशात प्रचलित असून या तई व आस्ट्रो आशियाटिक यांमधील संक्रमणावस्था दाखवितात. यात अनामी ही सुसंस्कृत भाषा असून तिच्या अनेक बोली आहेत. या भाषेतील पहिला ग्रंथ पंधराव्या शतकांतील चिनी लिपींत लिहिलेला आढळतो. सतराव्या शतकापासून ही भाषा लॅटिन लिपींत लिहिण्याची पद्धत पडली आहे. ही भाषा कांहीं बाबतींत मॉनख्मेर भाषेशीं सदृश दिसते, तथापि चिनी व तई भाषांतीलहि कांहीं विशेष तीमध्यें आढळतात, ही चिनीसारखी एकाक्षरी, अप्रत्ययी व पृथक्करणात्मक भाषा आहे.

मुंडा अथवा कोल:—या भाषा हिमालयाच्या भोंवतीं व छोटानागपूर या दोन प्रदेशांत आढळतात. या भाषांचा तिबेटी व ब्रम्ही भाषांशीं संबंध जोडण्यांत येतो, प्राचीनकाळीं हिमालयापासून बंगालच्या उपसागरापर्यंत मुंडा भाषा प्रचलित असे, परंतु हळू हळू तिचें स्थान तिबेटी, मंगोलियन व आर्यन् भाषांनीं घेतलें. हिचें अर्वाचीन स्वरूपच पाहण्यास सांपडतें, व तें विकट आहे.

**चिनी, तिबेटो-ब्रह्मी व तई**—या भाषासंघास तिबेटो-चिनी अथवा इंडो-चिनी असेंहि म्हणतात. तिबेटो-ब्रह्मी ही चिनी भाषेशीं संबद्ध असावी. परंतु तई भाषा तिबेटो-ब्रह्मी व मॉनख्मेर ह्या दोन्हींशींहि संबद्ध आढळते. चिनी-तिबेटी-ब्रह्मी व ऑस्ट्रो-आशियाटिक भाषा याचा एक स्वतंत्र भाषासंघ असावा अशी एक कल्पना आहे. व तई ही भाषा ह्या दोन भाषामधील दुवा असावा. या तिहींसहि एकाक्षरी समजण्यांत येतें. परंतु त्यांच्या अर्वाचीन स्वरूपांतहि त्यांस हें नांव पूर्णपणें लागू पडत नाहीं. तिबेटो-ब्रह्मी भाषांत उपसर्ग आढळतात. तिबेटी भाषेत तर क्रियापदाच्या स्वरूपांतहि कांहीं विकार झालेले आढळून येतात. तसेंच प्राचीन काळीं चिनी भाषेतहि नामांच्या व धातूंच्या रूपांत विकार होत असावा असें दिसतें परंतु त्यांच्या विशिष्ट लेखन-पद्धतीमुळें त्यांतील मूळशब्द अथवा धातु पृथक् करणें कठिण असल्यानें यासंबंधीं निश्चित मत देता येत नाहीं. तथापि सामान्यतः या भाषांची एकाक्षरी रूपाकडे प्रवृत्ति दिसून येत असल्यावरून चिनी व तिबेटी या भाषांत तई भाषेपेक्षां अधिक साम्य आढळतें.

तिबेटो-ब्रह्मी:—यामध्यें तिबेटी व ब्रम्ही हे दोन भाषासंघ व त्यांचे अनेक प्रकार येतात. यांची लोकसंख्या दोनकोटी आहे. तिबेटी भाषेतील लेख सातव्या शतकापासून, तर ब्रह्मी भाषेतील अकराव्या शतकापासून आढळतात.

चिनी:—या भाषेतील लेख खि. पू. दोन हजार वर्षांपासूनचे आढळतात. परंतु या भाषेची लिहिण्याची तऱ्हा विचित्र असल्यामुळें यातील लेख वाचणें अतिशय कठिण आहे. व या भाषेत इतके प्रकार आहेत कीं, एका शाखेच्या लोकांस दुसऱ्या शाखेंतील लेख मुळींच वाचतां येत नाहींत. या भाषेत वर्णलिपी नसून प्रत्येक शब्दाकरितां स्वतंत्र अक्षरें असतात, व तीं बहुतेक कल्पनाचित्रें असतात. त्यामुळें अशा अक्षरांची संख्या पुष्कळ मोठी असते. ही कमीत कमी चार हजार असून त्याचे त्यांतील सामान्य वर्णावरून २१४ गट पाडण्यांत येतात व हे सामान्यवर्ग कोशामध्यें आद्याक्षराप्रमाणें वापरतात. ही भाषा वाङ्मय व संस्कृति-दृष्ट्या फार महत्त्वाची आहे. परंतु हिच्या लिहिण्याच्या विचित्र पद्धतीमुळें हिचा ध्वनिविषयक अथवा स्वरूपविषयक ऐतिहासिक अभ्यास करतां येत नाहीं हिचे आर्षकालीन ( ६ वें शतक ), प्राचीन ( ६-१० वें शतक ), मध्यकालीन ( १०-१३ वें शतक ) व अर्वाचीन ( १३ नंतर ) असे कालदृष्ट्या विभाग पाडण्यात येतात. प्राचीन चिनीचें स्वरूप अत्यंत पृथक्करणात्मक होतें. परंतु आर्षचिनीमध्यें उपसर्ग व प्रत्ययपद्धति असावी असें दिसतें. हिची एकाक्षरी स्वरूपाकडे स्पष्टपणें प्रवृत्ति आढळते. सांप्रतची पेकिन शहराची भाषा हिलाच मंदारिन, क्वान, ह्वा अथवा गौरयु असें म्हणतात. ही सरकारीभाषा म्हणून सार्वत्रिक बनत चालली आहे. चिनी भाषा बोलणारे लोक चाळीस कोटी असून ती भाषा भोंवतालच्याहि अनेक देशांत पसरलेली आहे.

तई:—तई किंवा शान भाषा या सयाम, तिबेट, ब्रह्मदेश, चीन व इंडो-चीन याच्या काहीं भागात प्रचलित आहेत. यांतील सयामी ही भाषा सुसंस्कृत असून वाङ्मयसमृद्ध आहे इतर निरनिराळ्या बोली चीनपासून हिंदुस्थानपर्यंतच्या निरनिराळ्या प्रदेशात पसरलेल्या आहेत. सर्वांत जुने सयामी शिलालेख इ. स १२९३ मधील आढळतात.

**मलाई-पॉलोनेशियन अथवा ऑस्ट्रोनेशियन भाषा**—या भाषा हिंदी व पॅसिफिक महासागरांतील मादागास्कर बेटापासून चिलीच्या पश्चिमेकडील ईस्टर बेटापर्यंत पसरल्या आहेत. याची विभागणी साधारणतः भौगोलिक प्रदेशावरून करतात. परंतु ती भाषाशास्त्रदृष्ट्या तितकी बरोबर नाहीं. याचे इंडोनेशियन, मेलानेशियन, मायक्रोनेशियन व पॉलिनेशियन असे संघ पाडलेले आहेत. यांची रचना व स्वरूप सामान्यतः एकरूपी असते पण शब्दांची बरीच भेसळ आढळते. यांतील मूळ शब्द बहुधा दोन अक्षरांचे आढळतात. परंतु पूर्वी ते एकाक्षरी असावेत असें वाटतें. या भाषांतील क्रियापदांस उपसर्ग वगैरे लागतात. परंतु नामांस विभक्ति, लिंग अथवा वचन आढळत नाहीं. जरी या भाषांत परस्पर संबंध आहे असें गृहीत धरतात तरी तो अद्यापि कोणत्या स्वरूपाचा आहे हें निश्चित झालें नाहीं. यांतील कांहींचा अभ्यास बराचसा झाला आहे. परंतु काहींचें ज्ञान फारच अल्प आहे.

इंडोनेशियन:—ही भाषा बोलणारे लोक पांच कोटी आहेत व ते उत्तरेकडे फोर्मोसा बेटापर्यंत, पूर्वेकडे न्यू गिनी-पर्यंत, तर पश्चिमेकडे मादागास्करपर्यंत पसरलेले आहेत. हिच्या मुख्यतः आठ शाखा असून त्यामध्यें अनेक पोटभाषा आहेत. (१) फिलिपाईन फोर्मोसा संघ:—यांतील फोर्मोसन ही फोर्मोसा बेटात असून तगलोग, विसायन, बिकोल व बॉटॉक ह्या फिलिपाईन बेटांत आढळतात. (२) सेलिबिससंघ—यामध्यें बुगी आणि मकासर ह्या भाषा आहेत. (३) बोर्निओ संघ:—यांत डायक ही एकच भाषा आहे. (४) जावा-मदुरा-बलि-संघ:—ह्यामध्यें कवि ही मृत भाषा व जावानी, सुन्दानी, मदुरी व बलिनी या भाषा येतात. (५) सुमात्रासंघ:—यामध्यें अचिनीज, बत्तक, रेजंग, लँपाँग, मलयु, मेन्तावे ह्या भाषा मोडतात. (६) मलाक्का संघामध्यें मलयु भाषा आहे. (७) मादागास्कर बेटांत मादागासी नांवाच्या बोली आढळतात. (८) बलि व सेलिबीस आणि न्यू गिनी या बेटांच्या दरम्यान लॅपॉक व पोलोहि या भाषा दिसतात. यांपैकीं जावानी भाषेचाच इतिहास काय तो १०-१२ शतकांचा आढळतो. कवि हें प्राचीन जावानी भाषेचें नांव असून त्या भाषेंत आठव्या शतकापासूनचें लिखाण आढळतें. या भाषेंत महाभारतादि अनेक संस्कृत ग्रंथांचें भाषांतर, झालें असून अनेक संस्कृत, शब्द वृत्तें वगैरे आढळतात. जावा बेटांत ही भाषा बोलणारे लोक पूर्वेकडील भागांत सुमारें दोन कोटी असून पश्चिमेकडील भागांत सुमारें सत्तर लाख लोक सुन्दानी भाषा बोलतात व पूर्वेकडील भागांत आणि मदुरा बेटांत सुमारें तीस लाख लोक मदुरी भाषा बोलतात. बलि बेटांत बली भाषा बोलणारे लोक सुमारें तीस लाख आहेत. या चारहि भाषांत एक शिष्ट व एक ग्राम्य अशीं दोन स्वरूपें आढळतात. जावानी भाषेंतील शिष्ट भाषेस क्रोमो असें म्हणतात व ग्राम्य भाषेस न्गोको असें म्हणतात. या भाषेंत संस्कृत, अरबी, पोर्तुगीज, डच, पर्शियन, द्राविड, चिनी वगैरे अनेक भाषांतील शब्द पुष्कळ प्रमाणांत मिसळलेले आहेत. तसेंच द्वैभाषिक शब्दयुग्में या भाषांत फार आढळतात. उदा. शपथ-संग् संग्=शाप देणें हें संस्कृत कवि शब्दयुग्म असून जव्हारमाणिकं=रत्न हें फारसी-मलयु (संस्कृत) शब्दयुग्म आहे. संख्यापद्धति दशमानात्मक आहे. अतिशयितता दाखविण्याकरितां शब्दाची द्विरुक्ति करण्याचा प्रघात आहे. उदा. मेंतावे भाषेंत इगि=पुष्कळ असा शब्द असून इगि इगि इगि इगि याचा अर्थ कल्पनेपेक्षांहि अतिशय असा होतो. या भाषांची संस्कृत, अरबी किंवा लॅटिन लिपी आढळते.

मेलानेशियन.—या भाषा प्रामुख्यानें सॉलोमन, सांताक्रुझ, टॉरेस, बँक्स, न्यू हेब्रिडिज, लॉयल्टी आणि फिजी या बेटांत आढळतात. यांतील फिजी बेटांतील बोलींचा अभ्यास कांहींसा झालेला आहे. परंतु त्यांत लेखनपद्धति रूढ नसल्यामुळें यांचें ज्ञान केवळ युरोपियन मिशनऱ्यांनीं आपल्या लिपींत लिहिलेल्या लेखांवरून मिळतें व हे मिशनरी भाषाशास्त्रज्ञ नसल्यामुळें त्यांचें लिखाण भाषाशास्त्रीयदृष्ट्या बिनचूक नव्हतें. या भाषांचे विशेष म्हणजे द्विरुक्ति अथवा अभ्यास, एकाकी व सप्रत्यय पुरुषवाचक सर्वनामें, द्विवचनी, त्रिवचनी व परसंग्राहक आणि परव्यावर्तक रूपें, हे होत. कांहीं बेटांत दशमानसंख्यापद्धति आढळते, तर कांहींत पंचमान, तर कांहींत विंशतिमानपद्धति आढळते. लॉयल्टी बेटांत वीस ही संख्या मनुष्यवाचक शब्दानें दाखवितात व ४० ही संख्या दोन मनुष्यें या अर्थी शब्दानें दाखवितात.

मायक्रोनेशियन.—ही भाषा गिल्बर्ट अथवा किंग्समिल बेटें, मार्शल बेटें, कॅरोलीन बेटें, यांप [illegible] बेटें यांमध्यें आढळते. परंतु कॅरोलिन द्वीपसमूहातील मेरयू बेटांतील आणि रीपन बेटांतील चामोरा भाषा फिलिपाइन संघांतील आहेत. या भाषांचें स्वरूप व उच्चारपद्धति मेलानेशियन भाषांसारखीच आहेत. या सर्व भाषांत सर्वनामाच्या बाबतींत आपणास वैचित्र्य आढळतें. व तें म्हणजे सर्वनामांत द्विवचन, त्रिवचन, चतुर्वचन असून परसंग्राहक व परव्यावर्तक रूपें आढळतात.

पॉलिनेशियन:—या भाषा मेलानेशियनच्या पूर्वेकडे व दक्षिणेकडे आहेत. सामोआ अथवा नॅव्हिगेटर बेटें, कुक अथवा हर्वे बेटें, सोसायटी बेटें, त्वामोतु बेटें, तोंगा अथवा फ्रेंडली बेटें, गॅम्बियर बेटें, ईस्टर बेट, न्यू झीलंड, चॅटहॅम बेट, मार्केसस बेटें, हवाई बेटें व कांहीं मेलानेशियन संघातील बेटांत या भाषा प्रचलित आहेत. या भाषांचा इंडोनेशियन भाषांशीं निकटचा संबंध दिसतो. परंतु यामध्यें व्यंजनाचा लोप करण्याची प्रवृत्ति विशेष आढळते. उदा. मलाई भाषेंत अकर हा शब्द मूळ या अर्थी वापरतात, तर मॅओरी (न्यू झीलंड) मध्यें अक असा शब्द योजला जातो. पण हवाई भाषेंत त्याचें रूप अअ असें होतें. या भाषांत जोडाक्षरें आढळत नाहींत. पण द्विरुक्ति अथवा अभ्यास आढळतो. यांतील उपपदास अनेकवचनी रूप निराळें असतें. हा विशेष इतर मलायापॉलिनेशियन भाषांत आढळत नाहीं. संख्यापद्धति दशमान असून पुरुषवाचक सर्वनामास एकवचन, द्विवचन व अनेकवचनी रूपें आढळतात व परसंग्राहक व व्यावर्तक रूपें असतात.

**पाप्युअन**—न्यू गिनी व आसपासचीं बेटें यांतील भाषांचें अजून वर्गीकरण करण्याइतकें ज्ञान झालें नाहीं. या भाषांसंबंधीं निरनिराळ्या संशोधकांनीं निरनिराळी व परस्परविरुद्ध माहिती दिलेली आढळते. न्यू गिनी बेटांतील कांहीं बोली मलाया

पॉलिनेशियन स्वरूपाच्या असाव्यात परंतु पॉप्युअन या नावानें ओळखल्या जाणाऱ्या भाषाचा मलाया पॉलिनेशियन अथवा ऑस्ट्रेलियन लोकांच्या भाषेशीं संबंध दिसत नाहीं यांतील कांहीं भाषा अत्यंत लहान क्षेत्रात म्हणजे थोड्याशा चौरस मैलांतच वापरत आहेत पी डब्ल्यू श्मिट यानें यांतील ध्वनिविशेष व व्याकरणविशेषावरून त्याचें वर्गीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे परंतु त्याच त्यानें केवळ तात्पुरतें असें म्हटलें आहे

**आस्ट्रेलियन देश्य भाषा**—ऑस्ट्रेलिया खंडामध्यें प्रचलित असलेल्या निरनिराळ्या भाषांचा परस्परसंबंध अद्यापि निश्चित झाला नाहीं ऑस्ट्रेलियांतील साठ लक्ष लोकसंख्येमध्यें फक्त साठ हजार देश्यलोक आहेत व त्याचीहि संख्या हळू हळू कमी होत चालली आहे या भाषा मृत होण्याच्या पूर्वी त्यांचा शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास होणें फार अगत्याचें आहे त्यांच्यासंबंधीं जी तुटपुंजी माहिती मिळते तीवरून या सर्व भाषांचें मूळ स्वरूप पूर्वी एकच असून त्या परस्परामध्यें निकट संबंध असावा असें दिसतें श्मिट यानें त्यांचे उत्तर व दक्षिण असे दोन संघ पाडले आहेत त्यांतील दक्षिण संघातील भाषांत काहींसें साम्य आढळतें

**टॅस्मॅनियन**—ही एक स्वतंत्र भाषा असून ती टॅस्मानिया बेटावर प्रचलित होती परंतु आता ती नष्ट झाली आहे

**अमेरिकन इंडियन भाषा**—या वर्गामध्यें युरोपियन लोक येण्यापूर्वी उत्तर व दक्षिण अमेरिकेंत ज्या देश्य भाषा प्रचलित होत्या त्यांचा समावेश घालण्यांत येतें कोलंबसाच्या आगमनाच्या वेळीं अमेरिकन लोकांची अधिकांत अधिक लोकसंख्या चार–साडेचार कोटी असावी असें पी रिवेट यानें अनुमान केलें आहे त्यांपैकीं सुमारें पंधरा लाख मेक्सिकोच्या उत्तरेकडील भागात असावे व त्या विस्तीर्ण प्रदेशात ते दूरवर तुरळक तुरळक पसरलेले असावे व त्यामुळें त्यांच्यामध्यें भाषाविषयक फरक अतिशय पडले असावे सांप्रत उत्तरअमेरिकेमध्यें सुमारें पाच लक्ष इंडियन लोक आहेत तर मध्यअमेरिकेंत ६५ लक्ष व दक्षिण अमेरिकेंत ८५ लक्ष इंडियन लोक आढळतात हे आकडे अदाजानें खरे मानले तर त्यांची लोकसंख्या पूर्वीच्या मानानें एकतृतीयांश पर्यंत घटली आहे मानववंशशास्त्रदृष्ट्या विचार केला असता अमेरिकन इंडियन लोकांची पूर्वी एक मूळ भाषा असून तिच्यापासून सध्यांच्या अनेक बोली निघाल्या असल्या पाहिजेत परंतु भाषाशास्त्रदृष्ट्या तसा पुरावा आढळत नाहीं या लोकामध्यें मध्यअमेरिकेंतील काहीं थोडे समाज सोडले तर लेखनकला कधींच प्रचलित नव्हती यानीं दगडावर, अस्थींवर किंवा लाकडावर वगैरे काढलेलीं जीं निरनिराळीं चित्रें आढळतात त्यांचा अर्थ फक्त त्या त्या जमातींतील लोकांसच कळत असला पाहिजे परंतु भाषाशास्त्रदृष्ट्या त्याचा फारसा उपयोग होत नाहीं खरी लेखनपद्धति फक्त अझ्टेक व त्याच्या आसपासच्या काहीं जमाती आणि मध्यअमेरिकेंतील मय लोकांत आढळते यांतील बरेचसे लेख शाबूत असून नवीन नवीन उपलब्ध होत आहेत परंतु त्यांचाहि उपयोग मर्यादितच होतो अझ्टेक लोक एका चित्रलिपींत हरणाच्या कातड्यावर किंवा कुरणावर लिहीत असत व काहीं ठिकाणीं त्याचें स्पॅनिश भाषेंत किंवा रोमन लिपींत रूपांतर केलेलेंहि आढळतें तथापि या लेखांचा अर्थ निश्चितपणें लावता येत नाहीं मय लोकांतहि चित्रलिपीच प्रचारात असून त्याचे लेख स्मारकांवर आढळतात या लिपीचा अद्यापि पूर्णपणें उलगडा झाला नाहीं तथापि संख्यावाचक शब्द व दिवस आणि महिने यांचीं नावें व त्यांची कालगणनापद्धति माहीत झाली आहे, याखेरीज मिशनरी व संशोधकानीं जमविलेल्या काहीं शब्दांच्या याद्या व अगदीं अलीकडे लिहिलेले लेख व बनविलेलीं काहीं व्याकरणें आज पहावयास सापडतात सांप्रतच्या या अमेरिकन बोलींच्या स्वरूपात इतका भिन्नपणा आढळतो कीं, त्यामध्यें वांशिक संबंध जोडणें अशक्य नसलें तरी अतिशय कठिण काम आहे यांच्या अभ्यासाची सामुग्री म्हणजे केवळ काहीं शब्द एवढीच असल्यामुळें व त्याचें स्वरूप अथवा ध्वनि किंवा उच्चारपद्धतिविषयक कोणतेंहि साम्य या निरनिराळ्या भाषांत दाखविण्यात येत नसल्यामुळें त्याचें तौलनिक व्याकरण करण्याचा अद्याप कोणीहि प्रयत्न केला नाहीं या सर्वच बोलींत अंतर्ग्राहकता अथवा समासशक्यत्व आढळत नाहीं उदा मय भाषेची रचना अतिशय साधी आहे हिचें स्वरूप संयोजक नसून पृथक्करणात्मक आहे यांतील बहुतेक मूळ शब्द अथवा धातु एकाक्षरी किंवा द्व्यक्षरी आहेत व त्यांची वाक्यरचनापद्धति इंग्रजी पद्धतीप्रमाणें आहे असें ब्रिन्टन यानें दाखविलें आहे तसेंच या निरनिराळ्या भाषांतील परस्परसंबंध दाखविणाऱ्या काहीं दुव्याच्या स्वरूपाच्या बोली अजीबात नष्ट झाल्या आहेत व काहीं झपाट्यानें नष्ट होत आहेत यामुळें ज्यांचा एकमेकांशीं काहीं संबंध लागत नाहीं अशा बोलींची संख्या बरीच मोठी आहे रिवेटच्या गणतीप्रमाणें ती १२३ आहे एकट्या उत्तर अमेरिकेंत त्यांची संख्या उहलेनबेक यानें ५४, तर रिवेट यानें २६ दिली आहे यात एस्किमो भाषेचा अंतर्भाव करितात परंतु ती फिनोउग्रिक किंवा उरलियन भाषेशीं संबद्ध असावी असें मानतात रेडिन यानें उत्तर अमेरिकेंतील भाषाचें तीन कुलींमध्यें वर्गीकरण केलें आहे परंतु त्याच एक केवळ धार्ष्ट्याचा प्रयत्न असें मानतात तथापि अर्वाचीन अभ्यासकानीं तौलनिक पद्धतीनें पूर्वी ज्या भाषास स्वतंत्र मानीत असत त्यांना एका वर्गांत आणण्याचा प्रयत्न केला आहे उदा नादेनेसंघ यामध्यें अटलांटिक किनाऱ्यापासून उत्तर मेक्सिकोपर्यंत आणि पॅसिफिक किनाऱ्यापासून हडसन उपसागरापर्यंतच्या सर्व भाषांचा समावेश होतो याच्या अथापास्कन, हैदा आणि त्लिन्गित या

तीन शाखा आहेत. दुसरा युटो अॅझ्टेक संघ. यामध्यें शोशोनियन पायमामोनोरन आणि नहुआतल या तीन शाखा येतात. या उत्तर व मध्य अमेरिकेमध्यें विस्तीर्ण प्रदेशावर पसरल्या आहेत कधीं कधीं यांतील एखाद्या बोलीस महत्त्व प्राप्त होऊन तिचें आजूबाजूच्या बोलींवर वर्चस्व स्थापन होत असे व त्याचें स्थान ती घेत असे. अशा तऱ्हेनें केचुअन अथवा इनासिनी ही दक्षिण अमेरिकेतील कोलंबसपूर्वीची थोडाफार संस्कार पावलेली भाषा होती ही इंका साम्राज्याची राजभाषा असून स्पॅनिश लोकांच्या कारकीर्दीत ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं तिचा धर्मप्रसाराच्या कामीं उपयोग केल्यामुळें तिचें क्षेत्र अधिकच वाढत गेलें. हीच गोष्ट ट्रुपिग्वाराणी नांवाच्या दुसऱ्या एका भाषाकुलाची आढळते. १६ व्या शतकाच्या आरंभीं ही भाषा पॅरागे व त्याभोंवतालच्या प्रदेशांत रूढ होती. परंतु ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं आपल्या प्रचाराकरितां तिचा उपयोग केल्यामुळें सर्व ब्राझिल देशामध्यें स्थानिक भाषेबरोबरच तिचा स्वीकार सर्व लोकांनीं करून बहुतेक लोक द्वैभाषिक बनले. अशा तऱ्हेचें एक विचित्र उदाहरण अँटिलिस या बेटांत आढळतें. या ठिकाणीं पूर्वीं दक्षिण अमेरिकेंतील अराबाकन जातीचे लोक रहात असत परंतु कांहीं काळानें कॅरिब नांवाच्या दुसऱ्या एका टोळीनें हें बेट जिंकून अराबाकी लोकांस पालवून दिलें किंवा मारून टाकलें परंतु त्यांच्या बायकांस जिवंत ठेवून त्यांच्याशीं लग्नें लावलीं. त्यामुळें तेथील स्त्रिया अराबाकी भाषा बोलत तर पुरुष कॅरिब भाषा बोलत. व मुलांस जरी दोन्ही भाषा येत असत तथापि अराबाकी ही स्त्रियांची भाषा व कॅरिब ही पुरुषांची भाषा म्हणून दीर्घकालपर्यंत अस्तित्वांत राहिली व अद्यापहि ही स्थिति पूर्णपणें नष्ट झाली नाहीं त्यांतल्यात्यांत अराबाकी भाषेचेंच विशेष कॅरिब भाषेनें उचललें आहेत यावरून स्त्रियांच्या भाषेचा परिणाम पुरुषांच्या भाषेवर अधिक झाला ही गोष्ट स्पष्ट होते उत्तर अमेरिकेंतील महत्त्वाच्या इंडियन भाषा म्हटल्या म्हणजे एस्किमो, अल्गोंकियन, होकन, इरॉक्किअन, नादने, पेनुशियन, सिओअन, युटो अॅझ्टेक या होत.

आफ्रिकेंतील नीग्रो भाषा—अमेरिकेच्या उलट आफ्रिकेंतील भाषा अधिक एकस्वरूपी आढळतात. उत्तरेकडील प्रदेशांत प्रचलित असलेल्या हॅमिटो सेमिटिक भाषा सोडून दिल्या व हॉटेंटॉट, बुशमेन, आणि पिग्मीज या दक्षिणेंतील भाषा वगळल्या तर बाकी राहणाऱ्या विस्तीर्ण प्रदेशामध्यें या निरनिराळ्या बोली आढळतात. त्यांतील निकट संबंध स्पष्ट दिसून येतो. जरी आज सुदानी भाषांत बांटु भाषेपेक्षां अधिक वैचित्र्य आढळतें तथापि मॉरिस द ला फॉसे याच्या मतानें त्या सर्वांत इतक्या महत्त्वाचीं साम्यें आढळतात कीं त्या मूळच्या एका आफ्रिकन नीग्रो भाषेपासून निघाल्या असाव्या असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु पी. डब्ल्यू. श्मिट ही गोष्ट मान्य करीत नाहीं अमेरिकेंतील इंडियन लोकांपेक्षां आफ्रिकन लोकांची वस्ती अधिक दाट आहे. कदाचित हॉटेंटॉट, बुशमेन व नेग्रिटो या लोकांमध्यें प्रचलित असणाऱ्या भाषा या मूळच्या भाषेचें थोडेसें प्राथमिक रूप असून सुदानी व बांटु या तिच भाषेचें अर्वाचीन स्वरूप दर्शवीत असतील या भाषांचें क्षेत्र व स्वरूप गेल्या ४०५ शतकांत कायम राहिलें आहे एवढेंच नव्हे तर त्यांच्या शब्दांतहि फारसा बदल झालेला नाहीं—ही गोष्ट महत्त्वाची आहे. पॅलिओ—आफ्रिकन भाषांमध्यें हॉटेंटॉट ही अधिक परिचित आहे तिचा बुशमेन भाषेशीं निकटचा संबंध दिसतो बुशमेन भाषेंत मूळच्या भाषेचें स्वरूप अधिक स्पष्ट दिसतें तर हॉटेंटॉट भाषेवर हॅमिटिक भाषाचा कांहींसा परिणाम झालेला असावा. हॉटेंटॉट लोकांनी पूर्वीं फार मोठा प्रदेश व्यापला असून एका कालीं ते हेमाइट लोकांचे शेजारी असावे. हॅमिटिक भाषेचा परिणाम आफ्रिकन नीग्रो लोकांवर फार प्राचीन काळापासून झाला असावा. नाईल नदीच्या वरच्या भागापासून कॅमेरून पर्यंतच्या प्रदेशांत असणाऱ्या नीग्रो लोकांच्या बोलींबद्दल फारच थोडी माहिती उपलब्ध आहे हे खुजे लोक अतिशय मंद बुद्धीचे असून बहुतेक आपल्या शेजाऱ्यांच्या नीग्रो भाषा बोलतात परंतु मधूनच ते जे कांहीं नीग्रोशब्द वापरतात त्यांच्या उच्चारावरून त्यांची हॉटेंटॉट व बुशमेन भाषांशीं संबद्ध अशी एखादी स्वतःची भाषा असावीसें वाटतें हॉटेंटॉट भाषांपैकीं बहुतेक सर्व शब्द एकाक्षरी असतात. या भाषांत प्रथमपुरुषी द्विवचन व बहुवचन असून पर संग्राहक व व्यावर्तक सर्वनामें आहेत व त्यांतील क्रियापदें अनेक तऱ्हेनें व करणरूपी व अकरणरूपी निरनिराळीं चालतात. या सर्वांना नीग्रो भाषा असें सामान्य नांव असलें तरी त्यांचें वर्गीकरण करण्याचे कांहीं प्रयत्न झाले आहेत यामध्यें मुख्यतः दोन शाखा आहेत बांटु शाखा ही भूमध्यरेषेच्या दक्षिणेकडे प्रचलित असून तीमध्ये अनेक थोडा फार फरक असलेल्या परंतु सामान्यतः एकाच स्वरूपाच्या बोली आहेत सुदानी शाखा ही भूमध्यरेषेच्या उत्तरेस असून हॅमिटो—सेमिटिक भाषांच्या दक्षिणेस आहे. या शाखेत परस्परांपासून अनेक बाबतींत भिन्न परंतु स्वतः एकस्वरूपी असे अनेक लहान लहान संघ आहेत. परंतु त्यांतील मर्यादारेषा स्पष्ट काढतां येत नाहींत. त्यांमध्यें कांहींत अरबी तर कांहींत हॅमिटिक विशेषांचें मिश्रण झालेलें आहे कांहीं अर्धवट बांटु स्वरूपाच्या भाषा कांगोचा उत्तर भाग, गयून, कामेरून, सुदान आणि अटलांटिक किनारा या प्रदेशांत आढळतात. यांना कांहीं लोक पश्चिम आफ्रिकन म्हणून स्वतंत्र संघ मानतात या भाषांचें स्वरूप अगदीं साधें दिसतें ही गोष्ट कदाचित परकीय भाषांशीं संबंध आल्यामुळें झाली असावी. या मुख्य वर्गांच्यापुढें या भाषांचें वर्गीकरण करणें अतिशय कठिण आहे कारण द ला फॉसे यानें उल्लेखिलेल्या सुमारें ४३५ सुदानी भाषांपैकीं फक्त ५१६ च लेखनिविष्ट आढळतात. त्या म्हटल्या म्हणजे ( १ ) वाइ (नायगेरो सेनेगॉली संघ)—

**अंतर्मुख**—वि १ अंतर्निष्ठ आत्मनिष्ठ, ध्यानस्थ २ निवृत्तिमार्गी, विरक्त ३ आत वळलेली, विचारी, आत्मचिंतनपर (दृष्टि इ०) [स]

**अंतर्याम**—न १ आत्मा, जीव २ (ल) मन अंतःकरण चित्त ३ अंतरंग, आतील गोष्ट [स] (वाप्र) **०कळवळणें**–आतड्याला पीळ पडणें, तळमळ होणें **–मीं ताप वसणें**–हाडीं ज्वर चिरणें **–मीं रडणें**–मनातल्या मनात दुःख करणें झुरणें **–मीं वास करणें**–हृदयात खोल जाऊन बसणें, अंतःकरणावर ठसून राहणें **–मास डाग वसणें–लागणें**–हृदयास धक्का बसणें (दुःखामुळें) **–मीचें दुःख अंतर्यामास ठाऊक**–मनाची पीडा मनासच माहीत (ती इतरांना कळणें अशक्य या अर्थी) **–मीची खूण अंतर्यामास ठाऊक**–मनातले बेत किंवा खलबतें, अनुभव ज्याचीं त्याला माहीत, अपकार किंवा उपकार केलेले मनाचे मनास माहीत **–मीची खूण आईला ठाऊक**–१ आपल्या मनातल्या गोष्टी आईलाच माहीत असतात –गोल २ मुलाचा जनक कोण हें आईसच माहीत असतें (अंतर्याम याऐवजीं अन्याम असेंहि अशुद्ध रूप योजितात)

**अंतर्यामी**—वि १ जवळचा, जिवश्चकंठश्च, जिवलग २ अंतर्यामाचा साक्षी (जीवात्मा, ईश्वर)

**अंतर्यामीचा**—वि १ जिवलग, अतिशय परिचयाचा, अंतर्यामी पहा २ अकृत्रिम, खरापुरा, कळकळीचा, मनोभावापासूनचा, निष्कपट (अंतर्याम शब्दाच्या सप्तमीपासून साधित झालेला शब्द)

**अंतर्युति**—स्त्री (ज्यो) ग्रहाची गौणयुति [स]

**अंतर्लापिका**—स्त्री श्लोकाचा अर्थ लावण्याचें मर्म गुप्त रूपानें त्याच श्लोकात ठेवलेलें असतें अशा प्रकारचा श्लोक, गूढ श्लोक गर्भितार्थश्लोक 'क बलवंत न बाधते शीत। कबलवंत न बाधते शीतम्।' 'औषध न लगे मजला' –नल ५१ [स]

**अंतर्वत्नी**—स्त्री (काव्य) गरोदर स्त्री 'अंतर्वत्नी पत्नी झाल्या, ब्याला सपुत्र फळ शके।'–मोसभा १ ७७ 'सवत्सरें झार्‍ही पोटशी। अंतर्वत्नी झाली ऐका।' –गुच ११ १० [स]

**अंतर्वर्ती**—वि १ आत असलेला, मध्यस्थित समाविष्ट आकलित 'परि महर्शे सुयाहाती। दिधली तयाची सुनी। तया भासा अंतर्वर्ती। जगचि कलें।' –अमृ १० २ २ गौण (ग्रह) याच्या उलट बहिर्वर्ती बुध आणि शुक्र ग्रहांस अंतर्वर्ती ग्रह म्हणतात, कारण त्यांच्या कक्षा पृथ्वी आणि सूर्य यांच्यामध्यें आहेत [स अंतर्+वृत्]

**अंतर्वसन**—आतलें वस्त्र अंतरीय पहा 'अंतर्वसन धाव। समन। केतुकीवसन प्रावरण।' –ह ३४ १६३ [स अंतर्+वस्] धाको. २ ७

**अंतर्वास**—पु (योग) १ आतील वस्ती २ आत्म्यात वास करणें, परमेश्वराशीं तादात्म्य पावणें, आत्मनिष्ठ असणें 'आवडीच्या करा ऐसे। अंतर्वासें जाणतसा।' –तुगा १७६१ [स अंतर्+वस्]

**अंतर्वासी**—वि आत्मनिष्ठ (योगी), आत्म्यात विलीन झालेला (योग्याचा एक प्रकार)

**अंतर्वृद्धि**—स्त्री अंतर्गळ पहा.

**अंतर्वेदी**—स्त्री १ कोणत्याहि दोन नद्यांमधील प्रदेश, दुआब २ (विशेषतः) गंगा व यमुना यामधील प्रांत, (प्राचीन काळीं येथें ब्रह्मदेवानें जो यज्ञ केला त्याची ही वेदी होती म्हणून हा देश पवित्र मानतात) तैत्तिरीय आरण्यकात (५ १) आर्यावर्त अथवा कुरुक्षेत्रावर यज्ञभूमीचें रूपक केलें आहे त्यातील वेदीची जागा गंगा आणि यमुना नद्यांच्या भागात येते प्राचीन काळीं इटावा तें अलाहाबाद या दुआबच्या दक्षिणेकडील प्रदेशाला अंतर्वेदी म्हणत कधीं कधीं सबंध दुआबालाच हें नांव दिलेलें आढळतें 'अब्दाली कालेहून यमुना उतरून अलीकडे येऊ लागले तरी, अंतर्वेदींत उर्वांनीं उतरून पायरद यावा' –रा १ २०० [रा]

**अंतर्वैर**—पुन गुप्त शत्रुत्व, आतून द्वेष [स]

**अंतर्वैरी**—पु १ गुप्तशत्रु २ एखाद्याच्या मरणाच्या वेळेस ज्याचा ध्यास घेतला असता जो (मुलगा, मुलगी) काहीं अडचणीमुळें त्यास भेटत नाहीं परंतु मरणानंतर येऊन पोंचतो तो 'पोटचा पोर देखील एखादवेळीं अंतर्वैरी होतो' [स]

**अंतर्हित**—वि १ अदृश्य, अंतर्धान पावलेला –शिल्पवि ४७७ २ लपविलेलें, आवरण घातलें, दडविलेलें [स]

**अंतर्ज्ञान**—१ परमात्म्याविषयींचें ज्ञान, दिव्यज्ञान २ योगसाधन, ईश्वरकृपा इ०मुळें दुसऱ्याच्या मनातील गुप्त गोष्टींची होणारी माहिती, गुप्त ज्ञान ३ जगातील चाललेल्या व्यवहाराचें–तें व्यवहार प्रत्यक्ष न पाहता–मनास झालेलें ज्ञान, अप्रत्यक्षविषयदर्शन ४ सहजोपलब्ध ज्ञान तात्कालिक ज्ञान (द) दिव्यदर्शन [स]

**अंतर्ज्ञानी**—वि अंतर्ज्ञान असलेला, अप्रत्यक्ष विषयद्रष्टा, सहजज्ञानी [स]

**अंतवत**—वि नाशवंत मर्त्य विनाशवंत आदि असलेली (वस्तु देह) 'अथवा ऐसा नेणा। नु अंतवंतचि हें मानिसी।' –ज्ञा २ १५२ [स]

**अंत शौच**—न मनाची शुद्धता, अंतःकरणाचें पावित्र्य, (काम-क्रोधादिकांचा त्याग व शमदम वैराग्य, भगवद्भक्ति इ चा स्वीकार केल्यामुळें होणारी अंतःकरणाची निर्मळता) अंतःशुद्धि [स]

**अंत संज्ञा**—स्त्री आंतून जागृति, आत्मज्ञान, आ मराप [स अंत+सम्+ज्ञा]

**अंत साक्षी**—वि अत करण जाणणारा अतर्ज्ञानी [स ]

**अंत स्थ**—न अप अनस्थ,अतस्त १ (व्यापक) गुप्त रीतीचा लाच, दरबारखर्चाचा एक भाग, सरकारांतून आपल्यासारखें काम करून घेण्यासाठीं कारकून, मुत्सद्दी, मोठमाठे सरकारी अधिकारी यांना त्याचा हक्क म्हणून ( लाच नव्हे ) ठोकळ रोख रकम देण्याची पद्धत ही मुसलमानी, मराठी व इंग्रज कंपनीच्याहि रियासतींत त्यावेळीं सररहा प्रचलित होती, दरबारखर्च पहा –गागा ५६, –पया २०४ गुप्त मसलत किंवा तह ठरविणाऱ्या अधिकाऱ्यासप्रत्यक्षरकडून ही रकम मिळे चिकोडी व मनोळी हे दान प्रांत पेशव्यांनीं कोल्हापुरकरास नजर करून त्याबद्दल किंमत म्हणून ११ लाख रुपये सरकारात घनले व शेरीन १० लाख व अतस्थ स्वत साठी घतले '–थोमारा २०९ 'गडवाल सस्थानापासुन सरकार २०००० खडणी सालीना धर्ड त्यात सरवारामगपुला ५००० अतस्थ मिळत '–थोमारा २५४ २ ( सामा ) लाच –वि १ गुप्त, खासगत, एकांत स्थळीं किंवा खासगत जागीं केलेलें २ अतस्थित, मधला, आत असलेला, आतील [स ] ०पट्टी–स्त्री सरकारास आवश्यक लागणारा खर्च निभावण्यासाठीं प्रसगीं जमीनदारावर व क्वचित रयतेवर बसविण्यात येणारा कर ०पत्र–न हुडीबरोबर पाठविलेलें खुणेचें पत्र

**अंत स्थिति**—स्त्री १ आतली अवस्था ( मन, आत्मा, प्रसग, घर इ० ची ) 'अत स्थिति यजमानाची ठाउकी आम्हां ती।' २ आतील अधिष्ठान, वास्तव्य ३ अतरात्मा [स ]

**अंतस्थी**—अतस्थ अर्थ १ पहा

**अंतायन**—न. शेवट आता स्तवकाचें अतायनीं। ब्रह्म प्रळय वर्णील मुनी।' –कथा १ १४ १२८ [स अत+अयन?, वण–न]

**अंतिक**—वि जवळचा, निकटचा, समीपवर्ती –पु (ल) सेवक, नोकर [स ]

**अतिम**—वि शेवटचा, अखरचा, शेवटील, अत्य [स ] ०साध्य–न शेवटचें उद्दिष्ट, ध्येय स्वात य हें अतिमसाध्य ठरावें '–टिळ्या [स ]

**अतीं**—श्रव १ शेवटीं नतर, पश्चात् परिणामीं, अखरीस मग अनुभवाअतीं=अनुभवानतर केल्याअतीं घेतल्याअतीं व्यवहाराचे अतीं चार पैस सुटतात किंवा मिळतात हें चालेच आह ' २ ज्यामुळें, साठीं, करितां स्तत्र ' सरकारकामाअतीं मी आलो नाहीं '[ अतची सप्तमी विभक्ति]

**अतीगुती**—स्त्री अडचण, अडथळा ' अवश्य म्हणून नृप नाथ। चोळ्यांतस समस्त। ऐसें रायास गावागावीं होत। अतीगुती चालावया।'–नव १८ १४ [गुता–ती द्वि ]

**अतील**—वि अतीचा, शेवटचा 'हाचि श्लोकींचा अतील चरण।'–एभा २९ ८८ [अत]

**अंतुता**—क्रिवि आंत ' आकाशा ठाव अनुता। मूनभास निवला।'–वसीस्व ११ २९

**अंतुती**—श शेवट, समाप्ति 'नमस्कारासीं धारी नाहीं अतुती।' –सप्र १ ६६ [अत]

**अंतुरी–तोर–तोरी**—स्त्री १ (काव्य) स्त्री, बायको, पत्नी, भार्या (सामा ) बाईं (अव ) अतोरिया ' अतोरिया सुमरें। सांडानिया भांडारें।'–ज्ञा १ २२० 'जन्मला जयाचे उदरीं। तयांसीं जो विरोध करी। सखी मानिली अतुरी। ता येक मूर्ख।' –दा २ १ ८ ( सामान्यपणें ) कोणतीहि स्त्री 'न कळे हो मात्र मुनि मार्ग एक' अतुरी। सार्‍या सवत्सरा जन्म तया उदरीं॥,–तुगा २७७ [स आन्त पुरिकी आन्त पुरी, प्रा अतउरी–अतुरी]

**अंतुवट**—आंतुवट पहा

**अंतेज**—पु अत्यज, महार 'तीन दिवसांचा उपासी अतज।'–रामदासी २ १५८ [अत्यज]

**अंतेवासी**—पु (कायदा) (शब्दश जवळ राहणारा) गुरूजवळ राहणारा, उमेदवार शिष्य, विद्यार्थी (करार केलेला) [स अन्ते+वस्]

**अंतेष्ट–ष्टी**—स्त्री और्ध्वदेहिक सस्कार, क्रिया, उत्तरक्रिया [स अत्य+इष्टि]

**अंतोरिक–अतोर**—न अत पुर, राणीवसा 'तैसीं दीसतीं अतोरें। यादवाचीं।'–शिशु ५५ –पच ३ ७ अंतुरी पहा [स अन्त पुर प्रा अतउर]

**अंतोर–री**—न स्त्री अतुरी पहा 'आपुलें रुपविलें अतोर। मेरू पर्वतीं॥'–शिशु २४०, हिरोनिया देवाचीं अतोर।'–एभा ४ २२७

**अतौतें**—श्रव. आत मध्यें अतौत पहा [स अतर् द्वि ]

**अत्य**—वि शेवटचा, अतिम, चरम, अखेरचा –न सख्या स्थानसज्ञातील जलधी' च्या पुढील व ' मध्य ' च्या मागील एक सज्ञा, एक हजार महापद्म –पु महार 'अत्यु रायेव वैसविग।' ज्ञा १३ ७२४ [स] ०कर्म क्रिया न स्त्री उत्तरक्रिया, अतष्ट पहा ०गोदान–न १ पापक्षालनार्थ अनुष्ठान करताना त्यातील प्रधान कर्म आटोपल्यानतर लागलीच करावयाचें गाईचें दान २ मरणापूर्वी प्र हाणास केलेलें गाईचें दान ०धन–पद–न गणित किंवा भूमितिश्रेढींतील शेवटची सख्या ०नाडी–स्त्री (ज्यो) अश्विनी, भरणी कृत्तिका इत्यादि २७ नक्षत्रांना आद्यनाडी, मध्यनाडी व अत्यनाडी अशा अनुक्रमें सज्ञा आहेत, त्यापैकीं कृत्तिका वगैरे नक्षत्रास लागणारी सज्ञा नाडी पहा

**अंत्यज**—पु शूद्र जातीच्या खालील महार, माग चांभार इ० अतिशूद्र धोबी, चांभार, बुरूड, नट कोळी, मेद (पारधी)

मित्र, या सात जातींचा अंत्यजात समावेश करीत असत –मनु ८ २७९ तैसे क्षत्री वैश्य स्त्रीया । का शूद्र अंत्यजादि इया ।' –ज्ञा ९ ४६०, –एभा २३ ८१ 'मग पडरीक्षेत्रामाजीं निश्चिनीं। जन्म पावसील अंत्यज याती।' –सवि २० १३३ [स अंत्य+ज] –वि शेवटचा, शेवटील

**अंत्यांक**—पु शेवटचा आकडा, त्रैराशिकातील तिसरी संख्या, पद [स]

**अंत्यावस्थ**—वि मरणसमयींची व्यथा भोगीत असलेला प्राणांतिक व्यथेनें पीडित [स अंत्य+अवस्था]

**अंत्याक्षरी**—स्त्री अनध्यायाच्या दिवशीं विद्यार्थ्यांचा आवडता श्लोकादिकांच्या भेंड्या लावण्याचा प्रकार (एकानें श्लोक म्हणावा तो ज्या अक्षरावर संपेल त्या अक्षरावर आरंभिलेला श्लोक दुसऱ्यानें म्हणावा पुन्हा तो ज्या अक्षरावर संपेल त्या अक्षरानें आरंभिलेला श्लोक पूर्वीच्यानें म्हणावा वगैरे भेंड्या [स अंत्य+अक्षर]

**अंत्येष्टि**—उत्तरकार्य अंतष्ट पहा गर्भाधानापासून अंत्येष्टी पर्यंत शास्त्रीय संस्कार होणें आवश्यक आहे ' –टि ४ ३२ [स अंत्य+इष्टि]

**अंत्र अंत्रमाळ**—न आंत्र आतडें 'घायीं मातले महावीर। वाहिती अंत्रमाळांचे भार।' –एरुस्व ८ ४७ –मुसभा ७ ३६ 'रथतेल रागन वणवा जळती अंत्रीं।' –ऐपो ४०४ [स अंत्र प्री एंतरॉन]

**अंत्रपट-पाट**—अंत पट अंतरपाट पहा 'बाहुलें योजिलें रणतळवट। आयुष्य अवधी अंत्रपाट।' –मुसभा १५ ११३ –एभा ८ ७ 'घेऊन दिव्य अंत्रपटासी' –वेसीस्व १० ७४

**अंत्रपुच्छदाह**—पु एक रोग अंत्रपुच्छ (अपेंडिक्स) ही एक लहान व अरुंद अशी नळाकृति नळी आतड्यापासून निघालेली असते हिच्या पोकळींत दाह सूज अगर पू होऊन होणारा रोग (इ) अपेंडिसाइटिस [स अंत्र+पुच्छ+दाह]

**अंत्रमाळा**—स्त्री (गो) काळीज अंतःकरण अंत्र पहा

**अंत्रवृद्धि**—स्त्री अंतर्गळ पहा [स]

**अंत्रळ-त्रेळ**—न (गो) अंतराळ वातावरण [स अंतराळ]

**अंत्रा**—पु ध्रुपदाच्या अस्ताई अंत्रा व आभोग या तीन भागांपैकीं दुसरा भाग अंतरा पालुपदानंतरचा पदाचा भाग कडवें 'भरीं अर्थ यमक अन्यामधीं रंग करारा। –प्रग ३० [स]

**अंत्राटणें**—अक्रि आपटणें भुमी अंत्राटीती रांगे। –उपा १७२१ [आ+आहाटणें]

**अंत्रावरणदाह**—पु (वद्य) उदराच्या पोकळींत अंत्रावरण (पेरिटोनियम) नावाच्या पडद्यांत तीव्र अगर दीर्घकाळ टिकणारा दाहक्रिया नावाचा रोग (इ) पेरीटॉनिटिस [स]

**अंत्राळ**—न अंतराळ, अंतरिक्ष मज आहे बळ आळीचें सबळ। पाहीन अंत्राळ हृदय तुमें।' –तुगा ४०८० अंत्रळ पहा

**अंत्राळीं**—क्रिवि अधांतरीं, वरच्यावर (क्रि०टेवणें) [स अंतराल]

**अंत्रिक**—वि मोडलेलें, टाकलेलें, ओलांडलेलें, गाळलेलें [अंतर]

**अंत्रीबुक**—न नोंदवही, जत्रीचें पुस्तक (इ) एन्ट्रीबुक धनीपणाच किती नवरच बुकांत पत्र नोंदलें तें अंत्रीबुकाचे विना त्यावर लिहावें ' –न्यासे ७० [इ एन्ट्रीबुक]

**अंथ(थु)रण**—उक्रि १ पसरणें, पसरून घालणें (सतरजी, तट्या इ० जमीन इ० कावर बिछाने, बसणें इत्यादिकार्थ) 'तो निजावया सावकाश। समाधि मी त्यास आथुरीं।' –एभा १९ २८८ २ पसरून झांकणें, वर टाकणें, घालणें 'या एवढ्याशा रुमाल्यानें ही एवढी जागा अथरली जाणार नाहीं ' [स आस्त रण प्रा अत्थरण]

**अंथरी**—स्त्री अथरण्याचें साधन उ० गालिचा, रुजामा, जाजम, सतरजी वळकाच्या काबींची ताड अथवा शिंदीच्या पानांची किंवा गवताची चटई [स आस्तृ प्रा अत्थर]

**अंथरुण**—न निजण्यासाठीं अथरण्याच्या उपयोगी वस्त्रें, बिछाना नाकळ विषय अंथुरणीं। आधीं स्नान होतें त्या दिसांत नवतें राहाणी।' –प्रला १७६ (दायकी ल०) पतिमरण, विपयसुख तिला अंथरुण ठाऊक नाहीं' (अप) अंथ्रण 'अंथ्रुण पांघ्रुण ना निजाया मचक' –दावि १२९ [स आस्तरण, प्रा अत्थरण अत्थुरण] (वाप्र) १ अंथरुणाप्रमाणें किंवा अंथरूण पाहून पाय पसरावे–साधनाप्रमाणें साध्य ठरवावें ऐपत पाहून खर्च करावा, सामर्थ्यानुरूप वागावें २ भुईचें अंथरुण आणि आकाशाचें पांघरूण=अतिशय दारिद्र्याला लावतात –रुणाचा धांगा करणें–खाटेंत लोळून अंथरुणाचा चोळामोळा करणें ०धरणें–आजारी पडणें ०कांबरूण-पांघरुण–न १ बिछाना व पांघरायाचें वस्त्र बाड बिछाना जवळचें सामान

**अंद**—वि (गो) गच्च आवळलेलें, तंग आवळलेला–ली–लें ही गाठ नट अंद जाल्या ' [स अद्=बांधणें अदु=सांखळी]

**अंदण**—न (विरू) आंदण १ मुलीच्या बापानें मुलीस किंवा जावयास ठराविक देणगी किंवा हुंडा यांखेरीज लग्नांत जें विशेष वर्गीस द्यावयाचें तें जमीन गुरेंढोरें दासदासी इ० 'पुदमनी म्हणे रायासी। मज आंदण द्या भीमकीसी। होईन कृष्णाची निजदासी। चरणमवसी निरंतर।' –एरुस्व १८ १० २ करणी ३ मर्दीत नजराणा एखादि पदार्थ न्यून नाहीं। सिद्धी मराही आंदणपां।' –रावि १३ १०५ [स अन्यदान?, आनन्द?, अनुदान?]

**अंदणा-णी-ण्या**—वि १ आंदणामध्यें मिळालेलें, आंदणा संबंधींचें (दासदासी इ०) 'झालो पांगिल जनासी। ससाराची आदणी दासी।'—तुगा ६९५, २ स्वाधीन असलेला, वश 'त्याचा आदणा मी श्रीगुरु। ज्यासि विषयभोगू नावडे।' —एभा २२ १६८ —पु देणगी, आदण आंदण पहा 'सत्य करीन दद वचना। तयाच्या स्वाधीन हो प्राणा। मग हा तुज आंदणा देईन अवे॥'—कथा १ ७ १७० [ अदण ]

**अंदणें**—क्रि (गो) आवळ्ड करणें, घट करणें [स अद्=बांधणें]

**अंदन, अंधण**—(ना) आधण पहा

**अंदर**—शअ (हिं) आंत [स अत, फा अदर्] ०घुशी—स्त्री चोरी करण्याकरितां घरांत गुपचुप घुसणें ०पट्टा-पु (व) आंतरपा, नुकसान, न्यून

**अंदरसा**—क्रिवि अंतस्थ रीतीनें, आतून 'अदरसा भाषण हास्य विनोदभाव सानदप्रीती। अविकळ करवी जगत्कर्ता।' -निमाखुमुद्राचपू ५६६ [स अतरस्थ]

**अंदरून**—अ (व) आंतून, आतल्या बाजून 'अदरून दाराला कडी घाल।' [स अतर्]

**अंदाज-जा**—पु १ कयास, तर्क, हेतु, मनाची धाव २ सुमार, अजमास 'तुमचा अदाज कसा काय चालतो?' ३ (अदाजा) मान, परिमाण, दर, प्रमाण ४ ठरींव प्रमाण, नेमणूक, मचा [फा अदाज्] ०पट्टी—स्त्री पिकाच्या किंमतीचा अदाज ०पत्र—न अनुमान केलेल्या बातम्या, भाव ज्यात असतात तें पत्र —केसरी ३१५३० ०पत्रक-पुढील सालच्या जमाखर्चाचें अदाजानें केलेलें पत्रक (इ) एस्टिमेट, बजट

**अंदाजण-न**—क्रिवि (ना) अदानें, अजमासें 'अदाजण दोन किंवा तीन वर्षांपासुन' [फा अदाज्]

**अंदाजा**—स्त्री (गो) धाडस

**अंदाजी**—वि अदाजानें, अजमासानें केलेलें, अदाजी जमाखर्चे-हिशेब इ०

**अंदाधुद-दी**—स्त्री अधाधुद पहा

**अंदारी**—स्त्री (माण) दांडे आणि दाडे यांच्यामध्यें बसविलेल्या लहान फळ्या प्रत्यनीं अधारी पहा

**अंदाऊ**—पु पारशी उपाध्याय, मोबेद [अध्यारु]

**अंदुघप**—क्रि (गो) आवळणें 'घट अदू नाका, सदरुच आसुनी' [स अद्=बांधणें]

**अंदु अंदुज**—पु हाडयाव्रण (पायाचा एक रोग) कधींहि बरी न होणारी जखम किडवळ 'नायटे अदु गजकर्ण।'—दा ३६२० [अदु]

**अंदुक**—पु बेडी, सांखळी, पायहसळी अंदु पहा 'राहे उभा प्रभु गमे इभसा, धृतचरण भक्त अदुकगा।'—मोभीष्म १०.१०५ 'अदुक झाला दुर्योधना गर्व।'—मोउद्योग ७ ३०. [स ]

**अंदू**—पु १ सांखळी, निर्बंध, बेडी २ हत्तीच्या पायास बांधावयाची सांखळी, दोर, सांखळदंड, मागील पायास सांखळदंड बांधण्याकरिता अडकविलेली लाकडी चवकट 'जसा गज हस्तीं अदु लेऊन करी टाणावर धुरी।'—पला ४ ३६ ३ दोन भिंतींना अथवा दगडांना जोडणारी लोखंडाची पट्टी, सळई ४ पायांतील वाळा 'तिधारा अदु पोंटरिया। चरणींचिया॥' —शिशु ७१६ 'अदु तोडराचा झणत्कार।'—वेसी ३ ७२ [स अद=बांधणें] ०घालणें-अडविणें-१ लढाईंत हत्ती पळून जाऊ नये म्हणून त्याचे पुढील पाय सांखळीनें बांधणें 'हत्तीस अदु घालून मारता मारता मरावें'—भाव ७३ त्यावरून २ (ल) कोंडून ठेवणें, दाबांत ठेवणें, कैदेंत घालणें, अडचणीत आणणें ०वांकी—स्त्री अव सांखळयांच्या वांकी, हत्ताठीच्या वाकी 'कटी किंकिणी क्षुद्र घटा। किंकिणी कल्लिरें पायवाटा। भद्रवांकीचिया वोभाग। वरी दशांगुळी॥'—कथा ५ १६ १८५

**अंदू**—क्रिवि (कों गो) यदा, अवदा पहा

**अंदेश**—पु आदेश, आज्ञा 'कीं उत्तर सत्वर हस्ति पाठवा ऐसा हा अदेश।'—सत्वलिंग, मनमौरी ४१ अक २ [आदेश अप]

**अंदेशा-सा**—पु १ विचार, कल्पना २ संशय, शंका, वहीम 'अदेशाचे गोवीं पडों नये।'—दावि २४५ ३ भीति, काळजी 'पुरदुरु पाहता झालें शरीर किती करू अदेसा।'—पला ४१२ ४ मसलत योजना [फा अदेशा]

**अंदोलन**—आंदोलन पहा

**अंदोळणें**—आंदुळणें पहा

**अंध**—वि १ आंधळा, दृष्टिहीन २ (ल) बेगुमान, बेपर्वा, उन्मत्त जसें-मदांध, द्रव्यांध, इ० ३ अडाणी, अज्ञ ४ अश्विनीपासुन तीन तीन नक्षत्रें सोडून चवथीं रोहिण्यादिक अशी जीं नक्षत्रें तीं प्रत्येक —पु अधार 'मग अज्ञानांध केवळ। तेणें आच्छादिजे सकळ।'—ज्ञा १ ३३५ [स ] ०गज (हस्ति) न्याय-एखाद्या विषयाचा भलताच अर्थ करून घेणें, एखाद्दुसरा अंश पाहून त्यावरून सगळ्या विषयाचा भलताच ग्रह करून घेणें (कांहीं आंधळीं माणसें हत्तीपाशीं जाऊन त्याचा आकार ठरवूं लागलीं एकानें सोंड चाचपली आणि हत्ती सापासारखा असतो असें म्हटलें दुसऱ्यानें पाय चाचपले तो म्हणे खांबासारखा असतो तिसऱ्यानें कान चाचपले, तो म्हणे हत्ती सुपासारखा इ० वरून) ०दर्पण न्याय-(आंधळयाला आरशाचा काय उपयोग यावरून)

ज्याला ज्या गोष्टीचा उपयोग नाहीं ती त्याला दणें (ग्राम्र) अशा दत्ता आमत्रण सर्वेचि येती दोघजण (=आधळयाला वाल दिलें असता हातीं धरणारा माणूस व आधळा असे दोघे येतात)

**अधक**—वि १ अधुक, कमी प्रकाशाचा (उजेड, प्रकाश अथवा चकचकीत वस्तु) २ फिका, विन तरतरीचा, निस्तेज, (रग, रगीत वस्तु) मद [स]

**अंधक, अंधकअंधक**—क्रिवि १ दुरळकदुरळक अस्पष्ट अव्यक्त, मिणमिणीत (दिवा वस्तु) (क्रि० दिसणें) २ धुस्ट, धुद (हवा, वातावरण)

**अंधकणें**—अक्रि अधक होणें, झाकुळणें, आवरण पडणें निस्तेज होणें, मावळणें 'ततारा क्षमस्त होता। अधक्ला।' –ऐपो ९२ [अधक]

**अधकार**—पु (अप) अध कार १ अधार, काळोखी, काळोख, प्रकाशाभाव 'सूर्ये देउनि घतला अधकार।' –ह ३ २०३ २ (ल) बुद्धिमाद्य अज्ञान [स]

**अंधकूप**—पु १ गवत किंवा झाडझुडप यामुळें निचें तोंड दिसत नाहीं अशी विहीर, अधारी विहीर 'मग अधकूप आश्राग।' –ज्ञा १ ०३९ –एभा ७ ४५० २ एक नरक [स]

**अंधतम**—पु १ जास्त अधार, आधळें करण्याइतका काळोख २ (ल) आध्यात्मिक अज्ञानाधकार अध्यात्मज्ञानाचा अभाव ३ एक नरक 'तेणें अकर्म कर्मवशें अधतमीं तो प्रवशे।' –एभा १० ५९० –वि अत्यत अधळा [स]

**अंधतामिस्र**—न एक नरक [स]

**अंधत्व**—न आधळेपणा, दृष्टिहीनता, चक्षुरिंद्रियाचा अभाव 'प्रज्यामीच्या ज्वाळा। अधत्व कवि पावल्या॥' [स]

**अंधपरंपरा**—स्त्री १ आधळ्याची ओळ माळ एका अधळयापासून दुसऱ्या अधळयास प्राप्त होऊन चालत आलेली रीत वगैरे २ एकाचें पाहून दुसऱ्यानें त्याचें पाहून तिसऱ्यानें, याप्रमाणें कोणतीहि गोष्ट करण्याचा परिपाठ गतानुगतिकत्व, खरें खोटें फायदा तोटा न पाहता वाडवडील किंवा समाज ज्यों करीत आले तसें करणें (यावरून अधपरपरान्याय निघाला आहे) 'लोकाची सामान्यत प्रवृत्ति अशा आढळत कीं जो समज एकदा होऊन बसला तो पीढ्यी आधी या न्यायानें काळ परपरेनें पुढें चालवावयाचा –नि [स]

**अंधरध**—न अधपण –हको

**अंधविलोकन**—न आधळ्यानें पाहणें (यावरून असभाव्य गोष्टीविषयीं योजतात–जों शपुप) असभाव्य गोष्ट [स]

**अंधळा**—वि १ ज्याला दिसत नाहीं असा (मनुष्य, डोळा) ३ (पहा २ (ल) अज्ञानी अजाणता, दुकणारा, विवेकशून्य अविचारी, गोंधळ्या, अव्यवस्थित (व्यवहार), बेकायदेशीर (राज्य) [स अध] म्ह० अधळा सांगे गोष्टी, बहिरा गाढव फिरे, अधळया मनीं आयतवार (सोमवार), बहिरा (किंवा पागळा) म्हणतो माझी बायको गर्भार या (परस्पर गैरसमज दाखविणाऱ्या) व अशा पुष्कळ म्हणी आहेत अध ळ्याचेश गाई देव राखतो=ईश्वर गरिबा–दुबळयाची काळजी घेतो अधळयानें दळावें कुत्र्यानें पीठ खावें किंवा अधळें दळतें कुत्रें पीठ खातें=एकानें कष्ट करावे व भलत्यानेंच त्याचा फायदा घ्यावा अशी बेबदशाही, अदाधुंदी 'यास्तव आमचें सरकारास रयतेच्या वर्तीनें असें निक्षून सागणें आहे कीं आधळें दळतें आणि कुत्रें पीठ खातें असला प्रकार यापुढें चालावयाचा नाहीं' –सास २ ३१६ अधळयापुढें नाच बहिऱ्या पुढें गायन=ज्याला ज्याची किंमत नाहीं त्याला ती वस्तु देणगी दणें (गो) आधळयासरी नाजून भानी भैऱ्यासरी गावन उपयोग किते?' अधळ्या बहिऱ्याची गाठ=प्रत्येक जण दुसऱ्या बद्दल गैरसमज करून घेतो अशा दोन माणसाची भेट २ परस्पराना मदत करण्यास असमर्थ अशाची गाठ अधळा मागतो एक डोळा देव देतो दोन (दैव अनुकूल झालें असता कधीं कधीं आपल्या इच्छेपेक्षा अधिकहि देतें यावरून)=अपेक्षेपक्षा अधिक मिळणें अधळ्यास अधळा वाट दाखवितो=एक अज्ञानी दुसऱ्या अज्ञानी माणसास उपदेश करतो, मार्गदर्शक होतो (म्हणजे दोघेहि फसतात) अधळा रोजगार आणि सिधा ससार=अव्यव स्थितपणामुळें दुसऱ्याचा पगडा स्वत वर बसणें –ळ्याचा रस्ता–वाट–मार्ग–पु सरळ, रुद व मोकळा रस्ता, आधळयाला अडचणीशिवाय जाता यईल असा हमरस्ता ०कारभार–पु अदाधुदीनें चालविलेलें राज्य, बेबदशाही, अव्यवस्थित काम ०डोळा–पु अधळा माणूस (विशेषत एका डोळ्यानें) ०तिधळा–तिरळा–वि (वों) १ अन्गडी, धाटगडी, पित्त्या २ (इटीदाडूच्या खेळातील) दुसरा, दोन्ही बाजूंनीं खेळणारा रहाणारा ३ (ल) दोहीं दगडींवर हात टेकणारा, दुरोगा ०नारळ–पु पोंवळा नारळ शहाळें ज्यात दुसतें पाणीच असल्यामुळें वाजत नाहीं असा नारळ पहा –ळ्याची काठी–१ अधळा अशक्त निराश्रित याचा पुरवारी अथवा आश्रयदाता, अधळ्याला आधारभूत गोष्ट (अधळ्याला सर्व आधार त्याच्या काठीचा असतो यावरून) या अर्थाची राहो देवा एक तरि दृष्टी। भीमा मा मागे तरि होऊ देईं दशाग यष्टी। –मोरी ? ४६ २ म्हातान्या आईबापाचा एकुलता एक मुलगा –ळ्याची माळ माळका–स्त्री १ अधळ्या लोकाची माळ रांग २ (ल) अज्ञानी व मूर्ख लोकाची परपरा –ळ्याची मिठी–स्त्री पक्की मिठी, चिकट –ळ्यात काणा राजा–जेथें सर्वच अडाणी असतात तेथें थोडेसें शहाण्याचें

तेज पडतें –ळ्यासी जन सारेंचि आंधळें–जसें आपण असतों तसेंच जग आपल्याला दिसतें

**अंधळी कोशिंवीर**—स्त्री एकानें डोळे मिटून इतराना धरण्याचा मुलाचा एक खेळ वि का राजवाडे याच्या मतें अधा कोशिंवी नावाचा खेळ, कौशावी नगरात खेळत –भाअ १८३२ (र हा बगालींत षष्ठीचा प्रत्यय आहे, जसें –आमार दश=आमचा देश तसें–कौशावीर=कौशावीचा) ०खेळणें-न्यायनीति सोडून वागणें व्यवहाराकडे दुर्लक्ष करणें 'इकडे अशी अधळीकोशिंवीर खेळताना पाहिलें कीं अगाची अशी आग।नेते'–प्रेमसन्यास ३१

**अंधळी गाय**—स्त्री गरीब, अशक्त, निरुपद्रवी माणूस म्ह० अधळ्या गाईत लगडी गाय प्रधान=गावढळ माणसामध्यें शेंदाड शिपाई किंवा तिस्मारखान, ओसाड रानात एरड बळी (अडाणी लोकाना कोणीहि शहाणपण शिकवावें या अर्थी )

**अंधळी वेळ**—स्त्री (फलज्यो) ज्या वेळीं हरवलेली वस्तु सापडत नाहीं ती वाईट वेळ अधळें नक्षत्र पहा

**अंधळें**—वि दृष्टिहीन ०गारुड–न १ लवाडी, लुच्चेगिरी अतरमतर २ गुप्त मसलत छक्केपजे, कट 'दुसरें काहीं अधळेंगारूड असलें तरी त्याचा थाग लावू देणारा नाहीं '–वफा ६ ०तिरलें–न अधळा तिरळा घेऊन खेळ खेळणें अधळा तिरळा पहा ०नक्षत्र–न ज्या नक्षत्रावर हरवलेली वस्तु पुष्कळ खटपट करूनहि सापडत नाहीं तें नक्षत्र अंध ४ पहा (क्रि० लागणें ) ०वरण–न ज्या वरणात मुळींच डोळ शिल्लक राहिले नाहींत असें वरण ह्याच्या उलट डाळस वरण

**अंधळ्या**—स्त्रीअव सूर्य चित्रा नक्षत्राजवळ असणें, त्या वेळीं पडणारा पाऊस

**अंधाई**—स्त्री १ अधार काळोख २ (ल ) अदाधुदी, बखेडा [ हिं ]

**अंधाटी**—स्त्री १ एखाद्याच्या सरळ बोलण्यावर दुसऱ्यानें घेतलेला आक्षेप अडफाग २ अमल्या आक्षेपानीं स्वत चें मत सिद्ध करण्याचा धरलेला हट्ट ( क्रि० घेणें, फोडणें, काढणें ) ३ बधाटी पहा हा शब्द कधीं कधीं बधाटीशीं जोडून येतो [बधाटी द्वि ]

**अंधाधुंद–ध अंदाधुदी–धी**—स्त्री गोंधळ, घोटाळा अराजकता धडाडी, अव्यवस्था (राज्य, घर, कामकाज इ० मध्यें ) –वि अव्यवस्थित, अनियमित, बबदी (कारभार राज्यतत्र ) [ हिं अधा+धुद]

**अंधार–रा**—पु १ काळोख, अधकार 'खोलींत अधार पडिला फार । सालीं न दिसे अणुमात्र ।'–नवि १ १३४ 'अधार हा चोरास पथ्य '२ (ल) अडाणीपणा, अज्ञान 'जाणपणें घे अधार। ता एक पडतमूर्ख।'–दा २ १० २७ ४ (ल) अन्याय, उपद्रव, अदाधुदी, घोटाळा, वेबदशाही [ स अधकार, प्रा अधार ] ०अंधारीं उजाडीं (सागणें, शिकविणें)–क्रिवि गुप्तरीतीनें व उघड, सरळ, स्पष्ट शब्दात व सुचवून, खाजगी रीतीनें व चारचौघात, अनेक मार्गांनीं व रीतींनीं ०कोठडी–स्त्री एकातवासाची शिक्षा देण्याकरितां चोहोंकडून बद असलेलें व फक्त हवा येण्याकरिता झरोका असलेलें तळघर, खोली २ (ल ) एकातवासाची शिक्षा (क्रि० टाकणें, ठरवणें, देणें) ०कोंडी–दाण–खणी, अंधारी कोठडी–स्त्री अधारकोठडी, काळोखी खोली, तळघर, तुरुग ०खोली–स्त्री १ ( फोटो ) (इ ) डार्क रूम, फोटोग्राफीसाठीं लागणारी बिन उजेडाची खोली २ अधारकोठडी पहा ०गडत–न अतिशय काळोख (क्रि० पडणें, येणें, चढणें, होणें ) अधार गडप–प असेहि शब्द वापरतात –क्रिवि दाट काळोखात [ स अवकर+गर्त ]

**अंधारणें**—अक्रि १ जमून येणें व काळोख करणें ( अभ्रें, पाऊस ) 'पाऊस अधारला ' ' अभाळ अधारलें ' मेघ अधारले ' [स अधकार] २ (अकर्तृक) काळोखें येणें ( अभ्रामुळें ), अधार पडणें, सध्याकाळ होणें अंधारून यणें–असादि प्रयोग वरील अर्थी करतात ( गो ) पाव्स सामर्थो आधारून आयला ' 'सरीवरी येति महासरीही। अधारलो येइ दिसे न काहीं।' –पाअक ९९

**अंधारी**—स्त्री १ काळ्याकुट्ट ढगामुळें पडलेला अधार २ घोडा किंवा रहाटाचा, घाण्याचा बैल याच्या डोळ्यास लावण्याची झापड 'अधारी भरगच्चीची निमजरी '–ऐरापुप्र ९ ५१३ ३ पित्तक्षोभानें डोळ्यापुढें एकाएकीं भासणारा अधार किंवा चक्कर, मूर्च्छा तसेंच उतारवयामुळें व (ल ) आळ्यतेमुळें डोळ्यावर यणारी धुदी ( क्रि० यणें) (गो ) 'ताज्या डोळ्याकडन अधारी आयली '

**अधारी**—स्त्री १ रहाटगाड्याच्या चाकाच्या दोन दात्या मधील जागा, दातार, खाचा २ कडीपाटाच्या दोन कड्या मधील जागा झाकण्याकरिता बसविलेली आडवी फळी, खांदे व दांडे याच्यामधील फळी ३ लाकडी जिन्याच्या दोन पायर्‍या मध्यें मागच्या बाजूस असलेली पोकळ जागा बद करण्याकरिता बसवावयाची फळी ' अधारी उच ठेवू नका '४ तुरुग, अधार कोठडी, तळघर ५ अधार, काळोख, ( क्रि० येणें, पडणें) ६ (ल ) अज्ञान 'तेथें अधारी गेली। मग बुद्धी भावली।' –परमा १० ११ ७ बळद, भिंतींत काढलेलें कपाट, तळघर. ०अंधारीं–बाधारीं–क्रिवि १ काळोखात, अधारात, सांदी कोंदींत, कान्याकोपऱ्यांत २ (ल ) गुप्तपणें, चोरून, आडून, (अधारी द्वि ) ०रात्र–स्त्री वद्य पक्षातील रात्र, अंधारानें युक्त असलेली रात्र, काळोखी रात्र

**अंधारूपण**—न अग्यारू-पारशाचा एक धार्मिक हुद्दा व त्याचें काम, अदारू, मोबेद याचें काम [ अध्याचार्य-अध्यार्य-अधि+आर्य ]

**अंधारें**—न १ अधार, काळोखी 'तुनीयेन अभयकरें। अनावर है माया वोसरे। जैसें सुर्यप्रकाशें अधारें। पळोन जायें॥' –दा १४९ २ रातांधळें 'गिरी विरी आणि अधारें' –दा ३६२६ [ अधार ]

**अंधी**—स्त्री ( हिं ) १ काळोखी, अभाळ भरून येणें २ तुफान, वादळ, ळोळ ( क्रि० हाणें, उठणें, बसणें, जाणें ) [ स अध, हिं आधी ]

**अंधु**—पु विहीर, कूप 'सिंधु अगस्त्याऽचमना न पुरे, पुरतील काय मग अधु।' –मोद्रोण ९८५ [ स अधसु= कूप ]

**अंधुक-धूक**—क्रिवि मंद, अधक पहा

**अंधुककाय**—स्त्री ( गो ) परोत्कर्षासहिष्णुता

**अंधुको**—वि ( गो ) दुसऱ्याचा उत्कर्ष ज्याला पाहवत नाहीं असा, मत्सरी [ स अधक ]

**अंधुळी**—स्त्री सावली, छाया –शर

**अंधेर**—अधार पहा [ स अधकार, प्रा अधार, हिं अधेर –रा ] **०नगरी**–स्त्री ( अन्याय, जुलूम–जबरदस्ती जेथें नेहमीं चालते असें स्थळ ) अव्यवस्थितपणाचा कारभार, बेबंदशाही म्ह० अधेरनगरी व झोटिंग पादशाही 'आमच्या अधेरनगरी व झोटिंग पाच्छाहीच्या पद्धतीचा कारभार यापुढें मुळींच चालू द्यावा कामा नये' –साम १२३८

**अंधेरी**—अधारी पहा

**अंपायर**—पु खेळातील निर्णय देणारा माणूस मध्यस्थ, पंच, प्रश्नस्थ 'पण आमच्या अपायरनें मला नॉटऔट दिल्या वर मी रागावलों यात मला मुळ्हा वाटत नाहीं –सुदे ८१ [ इं ]

**अंब**—स्त्री आंब अर्थ १ पहा [ स अम्ल ]

**अंब**—न पाणी, अबु पहा [ स अबु ]

**अंब**—अ राजपत्नी, गुरुपत्नी, मित्रपत्नी, माध्वी, सासू व आई या सर्वांस आदरार्थी संबोधन [ स अबा ]

**अंबफडी-फाटी**—स्त्री कच्च्या आब्याची वाळविलेली फोड, अबोशी, हिचा उपयोग चिचेऐवजी कालवणांत करितात आंबोशी पहा [ स आम्र+काष्ठ म अबा+फाटी ]

**अंबट**—वि १ आंबट चवीचा, कामरख चरींचा, कच्चाला दिवस आंबट, चिंच लिंबू यांच्यासारखा २ ( ल ) निरुत्साही कंटाळलेला, खिन्न [ स अम्ल प्रा अंब, अम्लात् अम्ल+आवट (प्युत्पत्ति) ] 'अबटोंड' **०करणें**-( ल ) निराश करणें होणें **०होणें-होऊन येणें-पडणें**–निराश होणें, हताश होणें **०मार्गणें**–दुसऱ्याचें भाडण स्वत वर ओढून घेणें **०ओलें**–वि अर्धवट ओलसर, दमट, किंचित् ओलें **०चिबट**–अबट हि अबट, तेलकट इ० अपथ्यकारक, विवक्षित मधुरपणा नसलेला **०ढाण-ढस**–( व ) अबट ढहन, अतिशय अबट ( ताक, दहीं, चिंच इ० ) ठसका लागण्याइतकें आबट [ अबट+टाण, ढस= अतिशयार्थी (ध्वनिवाचक), स ध्वनित, प्रा ढणिय ] **०तोंड**–न निराश, खिन्नमुद्रा, (क्रि० करणें, होणें) 'महात्मा गांधींच्या स्वातन्त्र्ययुद्धाच्या बातम्या नोकरशाहीला आबट तोंड करून वाचाव्या लागतात' –कमरी २५३३ **०निंबू**–न कागदी लिंबू **०मिसळ** (लावण)–(गो) १ तिखटमीठ लावणें २ बहारीनें वर्णन करणें 'तो गेलें कितेंय सांगता तें आबट मिसोंग लावून सांगप' **०वणी**–न (निंदायुक्त) अबट पाणी, आमटी [अबट+वन=पाणी] **०वाणा**–वि १ अतिशय अबट २ (ल) निराश कलेला, संतुष्ट हसलेला, खिजलेला [ अबट+वर्ण ] **०वेल**–स्त्री गवोशीची वल, हिचा रस अबट असतो, वेलाचा रंग पाढरा, पानें जाड, असतात, ही मारक व अग्निदीपक आहे, कडमडवेल –शे ६२६ [स आम्लपर्णी, अम्बष्ठकी] **०शोक**–पु नसती आवड, भलतीच चैन 'त्याचा उद्योग म्हणजे निव्वळ आबट शोक' –तोव २२१ **०शोकी**–वि भलतीच चैन करणारा 'रात्रिश्री मोठे आबटशोकी सार' **०वरण**–न चिंचगुळाचें, फोडणीचें पातळ वरण ( साध्या वरणाच्या उलट ) मद्रासी 'या नाटकात सार कळेना का अबट वरण कळेना!' –नाटु ३७० **०पण**–न ( व ) चिंच, आमसुल वगैरे अबट पदार्थ 'वरणात आबटपण टाक **०सर**–वि थोडेसें अबट (ताक वगैरे) **घईचरून अंबट होणें**–थोडक्यासाठीं रागावून मनुष्यास तोडणें

**अंबट**—स्त्री एक वनस्पति ( इ ) एवन्गिया तेतान्द्रा

**अंबटणें**—अक्रि अबट होणें [ अबट ]

**अंबटा**—वि अतिशय अबट ( पदार्थ वगैरे ) [ अबट ]

**अंबटाई**—स्त्री आंबटपणा

**अंबटाण**—स्त्री १ अबूस वास २ ( ना ) टरफलें काढलेली चिंचेची फळें, चिंच ३ पदार्थांतील अबट रस ४ ( कु ) अबटपणा 'अनू आवटाण सराय आमा'

**अंबटायणें-विणें**—अक्रि आंबट पदार्थ खाल्ल्यामुळे आवणें ( दात, ओठ वगैरे ) –सक्रि दोत वगैरे ठेवून आंबविणें ( पाणी घातलेलें पीठ वगैरे )

**अंबटी**—स्त्री १ एक झाड, हें आकारानें मध्यम असून त्याचा व्यास दहा ते बारा अगुळें असतो. याचीं पानें लिंबाच्या पानांसारखीं, फळें आवळ्यासारखीं टोकदार व आबट ३ एक वनस्पति, 'अबट' पहा –शे ६२१ ३ आमटी, सार, पीठ, चिंच, कोथिंबीर वगैरे घालून केलेला पदार्थ वगैरे सारख्या पातळ पदार्थास कालवण म्हणतात

तोंडी लावण्याचा पातळ पदार्थ, चटणी, अवटरण ०**नाटक मंडळी**-स्त्री (ल) पौराणिक नाटक मंडळ्यांच्या भाजनांमध्ये आमगी हा एक विशेष प्रकार असे, म्हणून त्या नाटकमंडळ्यांना ही 'आमगी नाटक मंडळी' म्हणून अनादरपूर्वक म्हणण्यात येई [अवट]

**अंवट्या**—वि १ जें फळ नेहमी अवट असतें तें (चिंच, एक प्रकारचा आंबा इ०), अवट असणारा (पदार्थ) २ ज्याला अवट पदार्थ आवडतो तो (माणूस) [अवट]

**अंवण**—अक्रि १ अवट होणें (उघडे राहिल्यामुळें, शिळें झाल्यामुळें अन्न वगैरे) २ अवट पदार्थ खाल्ल्यानें दात, ओंठ अवट होणें ३ अतिशय श्रमानें, थंडीनें किंवा मार लागल्यामुळें अंग ठणकणें, हलकें होणें, बधिर होणें ४ अतिशय तृप्त झाल्यामुळें कंटाळा येणें, वीट येणें ५ एखाद्या विषयांत निष्णात किंवा पटाईत होणें [स अम्ल, श अव] **अंवत पडणें**-पुष्कळ काळ अधांतरी लोंबकळत राहणें, भिजत घोंगडें पडणें, रेंगाळणें, दिरंगाईवर टाकलेलें असणें (आरंभिलेलें काम, धंदा इ०) **अंवत टाकणें**-आरंभिलेलें काम किंवा धंदा, उद्योग अर्धवट किंवा दिरंगाईवर टाकणें

जगतीं तळीं।' -भाअ १८३८ याच्या कामाबद्दल इ २४ पट्टा [फा]

**अंबर**—पु १ एक धातु दशी औषधांत याचा उपयोग करतात २ अंबरचा केलेला जिन्नस (मणी, सरी दागिने) अंबरउदी पहा

**अंवर, अंबरवेल**-स्त्री अमरवेल [स]

**अंबरउदी**—पु स्पर्म व्हेल नावाच्या माशाच्या आतड्यांत होणारा एक पदार्थ हा सुगंधी व औषधी आहे

**अंबरस**—पु पिकलेल्या आंब्याचा काढलेला रस आं रस, आंबरस [स आम्र+रस, म अंबा+रस]

**अंबरसा**—पु (व) अंबरचा लहान मुलांच्या गळ्यातील एक दागिना 'मुलीला अंबरसा केला आहे' [अर फा अंबरचा]

**अंबराई**—स्त्री आंब्याच्या झाडांची रांग किंवा बाग 'आंबे तरूंची बहु तोषदायी। आहे तशी ही घन आंबराई।' [स आम्र+राजी=राई]

**अंबरी**—वि अंबरानें सुगंधित केलेली (तंबाखू वगैरे) [अंबर]

घोपटणें, मारून हुळहुळा करणें ३ लोंबकळत ठेवणें, आशा लावून ठेवणें [ अव ]

**अंवशी**—वि मेघासारखा निळा, मेघवर्ण [ स अम्बु= पाणी+सदृश ]

**अंवष्ठाण, अंवसाण**—स्त्री ( कों ) अवटध्याण, अबुस वास, अवटाण पहा

**अंवष्ठ ( ष्ठ )**—पु ब्राह्मण बाप व वैश्य आई यापासुन झालेली संतति, अशाची जात 'अवष्ठ आणि मूर्धावसिक्त।' –एभा २० ३३. [ स ]

**अंवसाण**—स्त्री आमसाण, अमसुल, अवटाण पहा

**अंवसुका-खा**—वि (कों) अर्धवट सुकलेला दमट, किंचित ओलसर, अवट ओला [ अव+सुका-खा ]

**अंवसूल-सोल**—न रातांबीच्या फळाचें त्याच्याच रसात भिजवून वाळविलेलें सालपट, कोकमसाल, याच्या बियांचें तेल काढतात त्यास रातेल, कोकमेल असें म्हणतात थंडीनें अंगाची कातडी तडकल्यास तिच्यावर हें लावतात अमसुल पहा

**अंवळ-सा**—अमळ-सा पहा

**अंवळी**—पु एक मासा, पिउरा मासा ( पुणें ) याच्या छातीवर दोन व पाठीवर एक असे तांबड्या रंगाचे पंख असून बाकीचें अंग पांढरें असतें, लांबी दोन तीन इंच

**अंवा**—स्त्री १ आई 'म्हणोनि अंबे श्रीमते।'–ज्ञा १२ १० २ राजपत्नी, साध्वी इ० स आदरार्थी संबोधन ३ दुर्गा, भवानी, पार्वती ( देवी ) अंबाबाई पहा 'साह्य नव्हेचि गे अंबा। विन्मुख जाहली जगदंबा।'–एरुस्व ५ ७३ [ स अंबा, प्रा अम्मा, जर्मन अम्मा-मो ]

**अंवा**—पु एक झाड व त्याचें मधुर फळ, आंबा, आम्र, याचें कोंवळें फळ अवट व त्रिदोष, रक्तदोषकारक आहे पिकलेलें फळ गोड, शक्तिवर्धक, जड, वातनाशक आहे याचा रस सारक, स्निग्ध, बलकारक आहे याची कोय तुरट ओकारी व अतिसारनाशक आहे याचा मोहोर अतिसार, प्रमेह व रक्तदोष नाशक आहे याचें पान कफ व पित्तनाशक आहे आंब्याला रंगावरून, स्थळावरून, व्यक्तीवरून व रुचीवरून निरनिराळीं नांवें असतात जसें –शेंदरी, शिवापुरी, हपूस, तोतापुरी, गोपा इ० आंब्याचें झाड हिंदुस्थानांत होतें रानांत, डोंगरांत उगवणाऱ्या आंब्याला रायवळ, बागेंत लावलेल्यास इरमाल व कलम केलेल्यास कलमी अंबा म्हणतात याच्या कापा ( कापून खाण्याचा ) व रसाळ (रस काढण्याचा) अशा दोन जाती आहेत हें झाड पुष्कळ वर्षे टिकतें कच्च्या आंब्याचें लोणचें व पाडाच्या आंब्याचा मुरंबा, गुळंबा करतात 'पिवळा आणि सुगंध। अमृता ऐसा असे स्वाद। परी अंबा तव प्रसिद्ध। एकलाचि।'–विउ १० १९ [स आम्र, प्रा अंब] –ब्याचा-काप-तळका-पु अंब्याचा एका, बाजूचा काप, फोड –चा टाहाळा-डाहळा-ढाळा-पु १ आंब्याची ल्हानशी फांदी हा शुभ व अशुभ दोन्ही प्रसंगी असतो यावरून २ ( ल ) शुभ-अशुभ प्रसंगीं किंवा सुखदु खाच्या प्रसंगीं दुसऱ्याच्या घरीं सारखेपणानें वागणारा माणूस, लग्न वगैरे समारभात दोहोंपक्षाकडील माणूस • –चा शेंकडा–६ आंब्याचा १ पाडा, ५३ पाड्याचा ( ३१० आंबे ) १ शेंकडा सवध शेंकडा घेतला तर ३२० अंबे मिळतात निरनिराळ्या ठिकाणीं अंब्याचा शेंकडा निराळा आहे काहीं ठिकाणीं २२ पाड्याचा शेंकडा असतो ०उतरणें–१ आंबे झाडावरून खालीं न पाडता काढणें 'आज आमच्या झाडाचे आंबे उतरावयाचे आहेत' २ फार पिकणें 'आंबा उतरला आहे, कशाला खातोस?' ०शिंपणें–वरात घरीं जाण्याच्या पूर्वी गौरीहारातील देवी घेण्याकरिता वर जातो तेथें गौरीहाराच्या जागीं भिंतीवर अंब्याचें झाड काढलेलें असतें, तेथें आंबा शिंपताना वधू आपला डावा पाय वराच्या उजव्या मांडीवर आणि डावा हात त्याच्या पागोट्यावर ठेवून त्याअपाशीं उभी राहून उजव्या हातानें नागवेलीच्या किंवा आंब्याच्या पानानें आंबा शिंपते त्यावेळीं बायका आंबा शिंपण्याबद्दलचें गाणें म्हणतात 'आंबा शिंपावया गोरटी। कडे घेऊनि कृष्ण उठी। आइती कलीसे गोमटी। कुंकुमें वाटी परिपूर्ण।'–एरुस्व १५ १४२. ०बाधणें–झाडास फळ लागणें **अंबे मार-बहार**–फाल्गुन महिन्यात म्हणजे आंब्याला मोहोर येण्याच्या दिवसात जें तिसरें फळाचें पीक येतें तें, म्हणजे तिसरा बार ( मृगबार, हत्तीबार असे आणखी दोन बार आहेत ) –दे २ १२ –ब्याचा मोहोर–पु (एक पक्वान्न) दुधात भिजविलेल्या रव्याचे गवले करून मध्यें चिमटून योड वळले म्हणजे होणारें त्रिदळ. –चें पन्हें–न अबवणी पहा –चें साठ–न कल्हईच्या ताटाला तूप लावून त्यात अबरस ओततात व तो सुकवून त्यावर दुसऱ्या अबरसाचा थर ओततात व पुन्हा सुकू देतात. गोडीसाठीं यात साखर घालतात सुकल्यावर तो पोळीप्रमाणें होतो अशा प्रकारें जी पोळी करतात ती –चा भात–पु केशरी भाताप्रमाणें भात शिजत आला म्हणजे त्यात हपूसचे आंबे चिरून त्याच्या फोडी घालून केलेला भात ०गदरलेला-गद्रा-गजरा–पु पाडाचा अंबा 'अतिरिति एक दोरींत ओविले फळझाडें आबागरा।'–पला ६६.

**अंवाडा**—पु बायकांच्या केसांचा बुचडा, केसांची मानेवर गाठ, हा आंब्याच्या आकाराचा असतो म्हणून हें नांव पडलें, फुग्याचा, पालख्याचा इ० याचे प्रकार आहेत 'ता बहुतकरून बुचडाच उलटा घातलेला आंबाडा'–पदबोध 'पन्नी घालिते अंबाडा। वर गोंवुनी केवडा। मागें धावे दुडदुडा। शारदा पहाया॥' –मेळ्याची पदें [ स आम्रातक, प्रा अंबाडय=अंब्याचें फळ ]

**अंवाडा**—पु. १ अंबाडीचें झाड व पानें; हें झाड चार पांच हात उंच वाढतें. सुकल्यावर भिजूं घालून त्यावरील वाख काढतात, त्याचे गोणपाट, दोर व कागद करतात. काड्यांना सगकाड्या म्हणतात. विलायती अंबाडी हा एक दुसरा प्रकार आहे. याचीं बोंडें तांबड्या रंगाचीं, शामसुलाप्रमाणें आंबट असून तीं सुकवून उपयोगांत आणतात. २ कोंकण व कर्नाटकांत होणारें मोठें झाड, पानें रामफळी सारखीं व फळ आंबट व पोफळाएवढें असून त्यांत आंब्यासारखी कोय असते. चिंचेऐवजीं याचा उपयोग करतात कोवळ्या फळांचें लोणचें होतें. यास आंब्यासारखा मोहोर येतो. हें रक्तदोष, क्षत व क्षयनाशक आहे. [सं. आम्रातक; प्रा. आम्माडओ; अप. अंबाडय. हिं. अंवाडा; गु. अमेडा ]]

**अंवाडी**—स्त्री. १ अंबाडा अर्थ १ पहा. २ या झाडाचें बी (यापासून तेल काढतात). ३ याचें तंतुमय वेष्टन–त्वचा; यापासून दोर करतात. ४ याचीं पानें–भाजी म्हणून हीं खातात, ५ आंब्याची कैरी. ६ अंब्याचें रोप. ७ (गो.) कैऱ्यांचें तुमनें मीठ घालून केलेलें तोंडीलावणें. **केसांची** ०**होणें–दिसूं लागणें**–केस पिकल्यामुळें अंबाडीच्या वाखासारखे दिसूं लागणें. 'नाहीं तर याचे पहा अंबाडीकेस!' –नि ०**पट्टी**–स्त्री. अंबाडीच्या लागवडीवर किंवा तिच्यापासून दोर करण्याबद्दलची एक पट्टी.

**अंबाडी**—पु. वेदाण्यांतील एक जात. –मुव्या १०८.

**अंवाडी**—पु. एक मासा (वाळलेलें सुकट).

**अंवाडी**—स्त्री. अंबाडीचें पान; मोठ्या व तिखट पानाची नागवेलीची एक जात. [म्हैसूर संस्थानांत अंबाडी नावाचें गांव आहे, त्यावरून; का. अंबाडी येले]

**अंबाबाई**—स्त्री. १ कोल्हापुरची देवी. (सामा.) कोणतीहि (जोगेश्वरी, तुळजापुरची वगैरे) देवी. 'उदो उदोगे अंबाबाई। भक्तासाठीं धांवत येई।' २ (ल) दुष्ट स्त्री. ३ (विनोदानें) आमटी. [सं. अंबा+म. बाई] ०**चा उदो**–पोत घेऊन 'उदो उदो गे' करीत नाचणें; (गो.) अंबाबाये हुदों. ०**चा पोत**–अंबाबाईचा पुजारी जो भुत्या त्याच्या हातांतील चिंध्यांचा पीळ देऊन केलेला मोठा पेटलेला कांकडा. [सं. पोत=वस्त्र. पलेता ?]

**अंबार**—न. १ अंबारखाना; भिंतींतील धान्य ठेवण्याची कोठडी; धान्यागार; कोठार. अंबर पहा. (सामा.) कसलाहि ढीग, रास. २ (वे.) कापलेल्या गवताचा ढीग. ०**बांधणें**–धान्य सांठविण्यासाठीं तळघर बांधणें. ३ (कर्ना.) पिकाचा सरकारी हिस्सा; अंबारराशी. [फा. अंबार=ढीग, धान्याचें कोठार.] ०**सारी**–ब्राह्मण गांवकामगारांखेरीज इतर घरावर कर.

**अंबारी**—स्त्री. हत्तीवरील बसावयाची मेघडंबरी, आसन, बैठक; जेव्हां वर छताची योजना नसेल तेव्हा या बैठकीला हौदा म्हणतात. क्वचित उंटावरील बैठकीलाहि अंबारी म्हणतात. 'अयनें अंबाऱ्या शोभल्या वरी।' –नव १३.७५. [अर. अमारी] **अंबारींत बसणें**–श्रेष्ठपणास चढणें. **उलट्या अंबारींत बसणें, उलट्या अंबारीनें राज्य करणें–उलटी अंबारी हातांत येणें**–भिक्षांदेही करणें; भीक मागणें (गांठ मारलेल्या भिक्षेच्या झोळीचा आकार उलट्या अंबारीसारखा असतो यावरून). 'माझी कातड्याची पेटी व पराळाचें आणि चार धोतरें एवढें मात्र ...... बचावलें. नाहीं तर आजच उलट्या अंबारीच्या राज्याचा उपभोग घ्यावा लागला असता.' –रंगराव.

**अंबावाटी**—स्त्री. अंबा शिंपण्यामधील रंगाची वाटी. 'तुर्या अंबावाटी घेऊनि गोरटी.' –दावि ३७.

**अंबिका**—स्त्री. १ आई. 'कां एकलौतिया बाळका–। वरी पडौनि टाके अंबिका।' –ज्ञा १३.५०२. २ जगदंबा; पार्वती. 'चंद्र तेथें चंद्रिका। शंभु तेथें अंबिका।' –ज्ञा १८.१६३२. अंबा, अंबाबाई पहा.

**अंबी, अंबेकरी**—पु (कर्ना.) नावाडी, भोई; धीवर. 'मासे मारणारे कोळी व नावा वलविणारे अंबी नदींत एके ठिकाणीं बुडून बऱ्याच अंतरावर पाण्यावर येतांना पुष्कळांनीं पाहिलें असेल.' –प्राणिमो १५. [का. अंबी=नाव; अंबिग= नावाडी; हिं. अंबी]

**अंबीण**—स्त्री. इतरांपेक्षां अधिक लांबट अंबा येणारें आंब्याचें झाड. [अंबा]

**अंबीर**—पु. अमीर; हंबीर; सरदार. राज या शब्दाला जोडून विशेषत. हा शब्द येतो. 'धन्य पुण्यामधिं आपुण राज अंबिरा।' –प्रला ९८. [अर. अमीर]

**अंबीरी**—वि. अमिरी, सरदारी. 'महादेव कवीचे छंद राज अंबीरी' –प्रला १४३. अमीर पहा. [अर. अमीर]

**अंबील**—स्त्री.-१ नाचण्याचें पीठ अंबवून किंवा ताकांत घालून शिजवून केलेला पदार्थ, वऱ्हाडात ज्वारीचें पीठ भिजवून त्यांत सोवरें, खसखस, साखर टाकतात. ही अंबील महालक्ष्मीच्या सणास करतात. 'लाडू अनारसे नाहीं कामाचे। मावाची आंबील बरी।' –अमृत १३९. 'पिष्ट जळें कालविती। तें औंवरी आंबे तोंवरी ठेविती। तो आंबट वास गोड मानूनी पिती। आंबिल म्हणती तयातें॥' –यथादी १७.१३७ २(ल) घाणेरडें पाणी; गढूळ पाणी [अम्ल, सं. प्रा अंबिल=खट्टा रस] ०**भुरक्या**–वि. १ अंबील खाणारा. २ (ल) अशक्त; नेभळट; मेषपात्र; दुधखुळा; भोळा (माणूस) **अंबिलगाडा**–पु. (वे.) चित्रविचित्र वेलींनीं नटविलेली, सजविलेली गाडी.

**अंबु**—न पाणी 'महा प्रळयांबूचें जैसें भरलेपण।' –ज्ञा १५ २८४ [स]

**अंबुखणें-खिणें, आंबुखणें**—उक्रि १ टाकणें, फेंकणें, वर्षणें 'प्रळयाग्नीचीं उजितीं। आंबुखिलीं जैसीं।' –ज्ञा ११ ३४२ २ सेचन करणें, सिंचणें, शिंपडणें 'घृतें आंबुखूनि आगि याळें।' –ज्ञा १४,१६२ [स अभि+उक्ष्, अभ्युक्षण, प्रा अब्भुक्खण=शिडकाव, सिंचन]

**अंबुखा**—पु पाण्याचा वर्षाव, वृष्टि, शिंतोडा, हवका आंबुखा पहा 'मोक्षमार्गाकडे। जैं याचा आंबुखा पडे।' –ज्ञा १६ २६१ [स अभि+उक्ष्, प्रा अब्भुक्ख=सिंचन करणें]

**अंबुची, अंबुची(चोंची)चिंबोची**—स्त्री एक आवर वेल, हिच्या पानाची भाजी करतात अवाशी पहा

**अंबुज**—न कमळ नयनांबुज पादांबुज, अंबुजाक्ष इ० समास होतात 'जें तू ज्ञानांबुज। द्विरेफु वीं॥' –ज्ञा १४ २८६ 'सिंहासनेसि मज नेइल अंबुजाक्षा। अंबूक चैद्य जरि तू करिसी उपेक्षा॥' –वामन (रुक्मिणी पत्रिका) ४ [स अंबु=पाणी+ज=जन्मलेलें]

**अंबुद**—न अंबर, आकाश आंबुट पहा 'घडघडिले चक्र वाट। रजें अंबुट कोंदलें॥' –एरुस्व ८ १४

**अंबुटकी**—स्त्री अगदीं कोंवळा आंबा 'मुलें अंबुटक्या टिपण्यास गेलीं' [अंबा, अंबुट–की प्रत्यय]

**अंबुणी**—स्त्री उसाची लागवड झाल्यानंतर त्यास तिसरे दिवशीं पाणी देतात तें, अंबवणी [अंबु+अर्पण?]

**अं(आं)बुथणें**—उक्रि १ वाटणें, जास्त होणें 'औषधाचेनि नांवें अमृतें। जैसा नवज्वरु आंबुथे।' –ज्ञा १३ ७२२ २ (ल) प्रज्वलित होणें, प्रदीप्त होणें, पेटणें, पेटविणें, उजळणें 'तैसा वैराग्याचा वोलावा। विचाराचा तो दिवा। आंबुथितां आत्म ठेवा। काढींची तो।' –ज्ञा १८ १००८ [स अभ्युत्थ, प्रा अब्भुत्थ किंवा अब्भुत्त=प्रकाशित होणें]

**अंबुद**—पु ढग, मेघ 'जगदंबुदगर्भ नभ।' –ज्ञा १८ ७ कि ऐकतां तव वचनांबुद। ममचित्त शिखी नृत्य करी॥' [स]

**अंबुधर**—पु ढग, अभ्र 'चातक होतां तृषाक्रांत। नाव होनें लक्षित अंबुधरातें॥' –रुवि २५ २ –ह २६ ११७ [स]

**अंबुधि अंबुनिधि**—पु समुद्र महासागर सामासशब्द–दुग्धांबुधि क्षारांबुधि इ० 'अंबुधे सदृश वा तुज पाहतां' [स]

**अंबुरकी चिंच**—स्त्री बहुतक पिकलेली गाभुळली चिंच

**अंबुरा**—पु अंबूर, अंबर पहा

**अंबुला**—पु नवरा, पति 'नंदनंदन हा आचाज अंबुला यो।' –निगा ६५ –ज्ञा १३ ९७८ अंबुलेपण–न नवरेपण आंबुलेपणा पहा

**अंबुला**—पु पाण्याचा थेंब [स अंबु+ल]

**अंबुला**—पु कानातील आं०याच्या आकाराचा डूल आंवळा, आमला, अमल पहा 'कुमाराचे आंवुले कडदोरी। मजपाशीं आणिजे॥' –शिशु ११९३९ [स आम्र, आमलक]

**अंबुली**—स्त्री आंबुली, पत्नी, नवरी 'लाबलावे कासोटें। मिरविती आं(आ)बुलिआ पुढें॥' –शिशु ८९१

**अंबुली**—स्त्री (वों) आंब्याचें ल्हान झाड [स आम्र, प्रा अंब+ल]

**अंबुशी**—अंबोशी पहा

**अंबुसणें**—अक्रि अंबणें पहा

**अंबूर**—पु पकड, चिमटा याअर्थी अंबर पहा [तुल० सिं अंबूर]

**अंबूस**—वि १ आंबलेलें, आंबट वास येणारें २ (ना) आंबट 'दहीं भल अंबूस झाल नं?' [स अम्ल]

**अंबेकरी**—पु अंबी पहा

**अंबेमोहोर-हर**—पु आंब्याच्या मोहोराइतका बारिक, गोल, पांढरा व सुवासिक तांदूळ याच्या काढाच्या पातीलाहि आंब्याच्या मोहोरासारखा वास येतो बेळगावाकडे याच्या काळा व पांढरा अशा दोन जाती आहेत पैकीं काळा उत्तम २ नाचणीचा एक प्रकार [अंबा+मोहोर, गो अंबेम्होवर]

**अंबेरी**—स्त्री (राजा) एक झाड व त्याचा चीक

**अंबेहळद**—स्त्री एक हळदीचें झाड हें रानात होतें या हळदीच्या गाठी मोठ्या असून त्यास दर्प फार असतो अंबहळद बागाइती हळदीप्रमाणें खाण्याच्या–मसाल्याच्या उपयोगी पडत नाहीं हिचें लोणचें मात्र घालतात ही रक्तविकार नाशक असून अगास लावण्याच्या मसाल्यात घालतात दुखावलेल्या भागावर हिचा लेप करितात –शे ६ २४ [स आम्र+हरिद्रा, प्रा अंब हल्दा, हिं अंबिया हल्दी, गु अंबाहळदर]

**अंबोण**—न गुराना घालावयाचें पेंड, कोंडा, सरकी इ० चें भिजवून किंवा शिजवून केलेलें मिश्रण, त्याला अंबूस वास येतो २ विवाह झाल्यावर वर व वधू या दोहीं पक्षांकडील बायका परस्परास जेवणाचें आमंत्रण देतवेळीं मुख्य विहिणीपुढें भाजी सद्र कोंडा पेंडीचा खडा, भाजीच्या काड्या इ० शिप्यानें भर केलें शिपतर ठेवतात तें [आम+अन्न अंबणें] ०दाखविणें–(ल) लांच देणें साहेबाची भेट घ्यायची म्हणजे चपराशाला अंबोण दाखवावें लागतें'

**अंबाण**—न गाडीच्या चाकाच्या तुंब्यांतील लोखंडी कडें अंबवण पहा

**अंबोणी**—स्त्री ऊस लावल्यावर तिसऱ्या दिवशीं प्रथम पाणी देतात तें अंबवनी पहा

**अंबोटी**—स्त्री १ आमटी २ एक वनस्पति ३ सुका, शत वेधी [ अत्रट, हिं अंबोटी ]

**अंबोरा**—पु (व) (धनगरी) रमात शिल्लक असलेलें अन्न एकत्र शिजवून सर्व नातेवाईकांना हक्कानें वाटण्यात येणारें अन्न

**अंबोशा-शी**—स्त्री (कों) कच्च्या आंब्याच्या साल विलेल्या फोडी याचें लोणचें करतात

**अंबोटी**—स्त्री १ बारीक पानांची, भुईसरपट, आपोआप उगवणारी वनस्पति, अंबट वेल, अंबुशी २ एक लहान झुडुपाच्या पानांची चटणी करतात [ स आम्ल ]

**अंबोली**—स्त्री एक वनस्पति -शे ६ ७४

**अंबोसा**—पु आलुबुखार [ फा ]

**अंबोळी**—स्त्री धिरडें, तांदूळ व त्याच्या निमी उडदाची डाळ भिजत घालून वाटून त्यात मीठ, मिरच्या कढीलिंब वगैरे घालून तें मिश्रण आवळ्यावर चुलीवर तूप लावलेल्या तव्यावर ओतावें वर झाकण घालावें, थोड्या वेळानें अंबोळी बनते [ अंबर्ण+पोळी ] ०थांबोळी-पु (कु) रहान मुलाचा एक खेळ

**अंब्या**—पु अंबेकरी, नावाडी अंबी पहा [ का अंबी=नाव ]

**अॅम्बुलन्स**—न (इ) १ फिरतें इस्पितळ, सैन्याबरोबर असणारा दवाखाना २ जखमी किंवा रोगी याच्याकरिता वाहन ०कोअर-न क्षणपरिचर्यापथक

**अंभ्र**—पु. (काव्य) आम्र, आम्र आंबा 'अंभ्रदानें दिधलीं।' -दा ३ ३ ४४ [ स आम्र ]

**अंभ्रुक-को**—क्रिवि (गो) आतल्या आत अंभ्रुकोहांसो=आतल्या आत हसणें

**अंभ्रुचें**—अक्रि (गो) पिकणें (फळ)

**अंभ**—न पाणी 'नातरी आटलिया अंभ।' -ज्ञा १५ २७ (काव्यात हा शब्द समासयुक्त येतो जसें -अंभोनिधि=समुद्र, अंभोज=कमळ इ०) [ स अंभस् ]

**अंभोज**—न कमळ, पद्म, अंबुज [ स ]

**अंभोधि, अंभोनिधि**—पु समुद्र अंबुधि पहा [ स ]

**अंमल, अंमलदार**—अमल-दार पहा

**अंमळ-सा**—अमळ-सा पहा [ अम्नार(=अल्पार्थी)-अमल-अमळ-भाअ १८३४ ]

**अंमस**—स्त्री (गो) अमावास्या, मावस अमास पहा [ स अमा ]

**अंमा**—अ परंतु, पण अमा पहा [ अर अम्मा ]

**अंवठा**—अवठा पहा

**अंवढा-डा-धंढा**—अंवढा पहा

**अंवदां**—क्रिवि (कुण) यंदा, ह्या वर्षी अवदा पहा

**अंश**—पु १ भाग, खंड, विभाग, तुकडा, हिस्सा, वाटा हा शब्द विशेषत समासात योजला जातो व त्यात थोडासा भिन्नार्थहि आढळतो जसें -जलांश, धान्यांश, ज्वरांश, उष्णांश, इ० 'तरी शाकाचे अंश फेडणें।' -ज्ञा १५ ४६४, 'हंसवाहिनी आख्या ऐशी तुझेनि अंशेंसी तिसी झाली।' -एभा १ २ ९ २ लेश, राहिलेला, शेष 'केलीं खाहीं तर त्याचा अंश फार वेळ राहतो' 'पोटांत अन्नाचा अंश गेला म्हणजे हुशार होईल' ३ वर्तुळाचा ३६० वा भाग, (इ) डिग्री अक्षांश, रेखांश ४ (गणित) अपूर्णांक, व्यवहारी अपूर्णांकांतील रेघेवरील संख्या, याच्या उलट छेद ५ आदित्यांपैकीं एक ६ (ल) माया 'अंश देवन्नीं एकीकडे। अनंतें हारपैलीं ब्रह्मांडें।' -क ८५ [ स ] ०मात्र-क्रिवि अंशत, थोडें, किंचित् ०सवर्णन-न सर्व अपूर्णांक समच्छेद करणें, सारखें रूप देणें ०स्वर-पु (राग) वादी स्वर पहा ०हारी, अंशाधिकारी-वि भागीदार, वाटेकरी, पातीदार

**अंश**—बकाट, खांदा, अंस ; ०फलक-न खांदा, बकाट. [ सं अंस=खांदा ]

**अंश**—पु (छाप) खिळ्याची जाडी (मजकुराच्या उंचाच्या मानानें) (इ) पॉईंट [ स ]

**अंशतः**—क्रिवि भागाभागानें, पायरीपायरीनें, थोडें थोडें, हळूहळू, जराजरा, किंचित्, काहीं [ स ]

**अंशावतार**—पु ईश्वराच्या अंशाचा अवतार, ह्याच्या उलट पूर्णावतार (यांत प्रत्यक्ष ईश्वरच अवतार घेतो) [ स अंश+अवतार ]

**अंशांश**—पु अंशाचा अंश, भागाचा भाग, पोटविभाग [ स अंश+अंश ]

**अंशिक**—वि अंशात्मक, थोडेंसें, किंचित्, अल्प 'जयांचें आंगिक अंशिकें।' -ज्ञा १८ १७२४ [ स अंश ]

**अंशित**—वि वाटलेलें, विभागलेलें [ स ]

**अंशी**—पु भागीदार, अंशहारी पहा [ स ]

**अंशु**—पु. किरण, कर, रश्मी प्रकाशशलाका ०मापक-पु किरणाच्या अंगीं असणारे गुणधर्म ओळखण्याचें यंत्र। (इ) रेडिओमीटर ०माळी-पु सूर्य 'जैसा वर्षोनि मृतजळीं। आपुला रसु अंशुमाळी।' -ज्ञा १५ २९७

**अंशुक**—न वस्त्र 'न भातळे जो द्विज अंशुकासी।' -सारुह १ ४४ [ स ]

**अंस**—पु खांदा, अंश पहा 'वागवी निज सिदोरिस अंसीं।' -सारुह ३ १२० [ स ] ०फलक-अंश-फलक पहा

**अंसुढाळ**—वि १ अंशुढाळ पहा २ अंशुढाळ पहा ३ रडया, सदोदित रडका [ अंसु+ढाळणें ]

**अंसुपात**—अश्रुपात पहा.

**अंसू**—न. असुं पहा.

**अँहँ**—उद्गा. नापसंति दाखविणारा उद्गार. [ ध्व. ]

**अंस्व**—न. १ पूज्य; शून्य. –विवि ८.३.४६. २ अभाव. ' आज तुपाचें अंस्व आहे.' [ ' अंस्वमंस्वेति क्रन्जलम् ' या श्राद्धांतील वचनावरून ]

---

# अः

**अः**—शेवटचा स्वर. –पु. १ कार्तिकस्वामी. २ विसर्ग. ३ मंत्रांतील बीज.

**अःअः**—उद्गा. हा:! हा:! आनंद, खेद या विकाराचा दर्शक ध्वनि. ' अः अः तव भजना विसरलों । ' –दावि ७६.

---

# क

**क**—१ मराठी वर्णमालेंतील १७ वा वर्ण आणि पहिलें व्यंजन. अक्षरविकास–याच्या पांच अवस्था असून पहिली अशोक कालीन तर शेवटची ११ व्या शतकांतील. पहिली अवस्था थेट क्रूसासारखी असून पुढें आडवी–उभी रेघ वांकदार होऊं लागली. २ पुष्कळ संस्कृत नामांना तीं दुसऱ्या शब्दांशीं संयुक्त होतांना ( समासांत ) हा शब्दातिशय प्रत्यय लागतो, जसें:–आत्म–आत्मक. ' हें जग पंचभूतात्मक आहे '; 'अलंकार सुवर्णात्मक आहेत. स्तुत्यात्मक; निंदात्मक ( परिपूर्ण याअर्थी ); मूल–मूलक, ज्यापासून उत्पन्न होतें तो या अर्थी. ' पुण्य मूलक सुख ' (ज्या-अर्थी ) ' स्त्रीमूलक कलह ' इ०; पूर्व–पूर्वक पुरस्सर; अनुसरून; मुद्दाम उ० बुद्धिपूर्वक; आदरपूर्वक; शपथपूर्वक ( भाषण इ० ) लहान वय, सारखेपणा, प्रेम इ० दर्शविण्याकरितां कधीं कधीं शब्दाच्या शेवटीं हें अक्षर जोडतात. त्यामुळें अर्थ फारसा बदलत नाहीं. उ० बालक; पुत्रक; दंडक इ०, बहुव्रीहि समासापुढें प्रायः याचा प्रयोग होतो. उ० देवदत्त आहे नाम ज्याचें तो देवदत्त नामक. ' जीवत्पितृक पुरुष ', ' देवमातृक देश ', ' आनंदविषयक वाक्य. ' ३ ब्रह्मदेव, दक्षप्रजापति; कश्यप; वायु; सूर्य; यम; विष्णु, अग्नि इ० देवता. ४ मन; अंत करण, आत्मा. ५ पक्षिविशेष; पक्षी; पक्ष्यांचा राजा. ६ पाणी, पिण्याचा पातळ पदार्थ.

**कं**—न. सुख; आनंद; उ० नाक=( न अकं=दु.खं यत्र ) स्वर्ग [ सं. ]

**क॥**—१ कर्यात; कसबा. २ कमावीस. [ संक्षेप ] ०दार–कमाविसदार.

**कॅ**—अ. ( गो. ) कोठें.

**कइं**—क्रिवि. ( चि. ) केव्हां. कई पहा. ' उरास उर हा सये कइं फिरूनि लागेल गे ॥ '

**कइंचा**—क्रिवि. कैचा पहा.

**कइठ–ड–कईठ**—न. ( गो. खा. ) कवठ (झाड व फळ) पहा.

**कइली**—कैली पहा.

**कइवाड–र**—न. अंगिकार; कैवार; कैवाड–र पहा. 'कईवाड नव्हे घालावया उडी। आपणांसी ओढी भय मागें ॥' –तुगा ४७. ' घेई माझा भार करी कईवार। उतरी हा पार भवसिंधु ॥ ' –तुगा १६५७.

**कई–ईं**— क्रिवि. १ ( काव्य ) केव्हां; कधीं. ' जळो आतां संसारु वो कई शेवट पुरे। ' –तुगा १२०. २ कोठें. ' एथेंहि सत्गी करूं विहो। तरी निघो कईंपां।' [ सं. कदा; प्रा. कइ ]

**कईक**—केक पहा.

**कईपक्षी**—पु. कैवारी. ' माझा तो कईपक्षी पांडुरंग। ' –तुगा ७७२. [ ? ]

**कउल, कउलावण, कउली, कऊल**—कौमध्यें पहा. ' हिंगडे सला कउल दिला ' –ऐपो १४.

**कऊवऊ**—वि. ( विचित्र प्रयोग) ओंगळ; तिरस्कार वाटण्या-जोगी; कुरूप ( वस्तु ). [ काऊ+वाऊ ? ]

**कऊळ**—पु. ( व. ) कावीळ पहा. ' त्याला कऊळ झाला. '

**कंक**—पु. १ बगळा; करकोचा, क्रौंच; बाणांच्या शेवटीं याचीं पिसें लावीत असत. २ अज्ञातवासांत धर्मराजानें (पांडव) ब्राह्मण-रूपांत धारण केलेलें नांव; आपणास बळेंच ब्राह्मण म्हणविणारा; खोटा ब्राह्मण. ३ क्षत्रिय; यावरून मराठ्यातील एक आडनांव उ० एसाजी कंक. [ सं. ] ०पत्री–पिच्छ–पु बाण. ' ते वज्रा-परीस कठोर। कंकपत्री सरळे ' –कृमुरा ५०.९२.

**कंकण**—पुन १ बांगडी; चुडा. 'पुण्या हातीं कंकणचुडा। नवल दोंडा भूस या। ' –तुगा ९७७. २ बायकांच्या हातांतील सोन्याच्या बांगडीसारखा पण रुंद व काटेदार असा दागिना; कांकण; बांगडी. ' नाग मुदी कंकण. ' –अमृ ९.१२. ३ यज्ञदीक्षा घेते वेळीं यजमान आपल्या हातांत पिवळा दोरा बांधतो तो. ' तें यज्ञकंकणकरांबुजि राघवातें. –कुशलवाख्यान ' ४ लग्नविधींत हळदीनें पिवळा करून वधुवराच्या हातांत बांधलेला अनेक पदरी दोरा. ज्यांत दुर्वा व हळकुंड बांधलेलें असतें व जो लग्नांत मंत्रून वधुवर ( वधूच्या डाव्या व वराच्या उजव्या मनगटांत ) परस्परांच्या मनगटांत बांधतात तो. ५ (ग्राम.) हातांतील कडें. [ सं. ]

०(हातांत) बांधणें-१ (स्वीकारलेल्या गोष्टीचा) अभिमान बाळगणें २ (एखाद्या कामाचें) तें काम पार पाडण्यासाठीं प्रतिज्ञा करणें, मेहनत करीत राहणें ०काडी-स्त्री (बे) एक मवत, सनकाडी ०घटित-वि परस्पर समान अशीं ल्हान ल्हान कर्कणें किंवा वलयें एकास एक जोडून ज्या प्राण्या ीं शरीरें बन सात तो (प्राणिवर्ग) -प्राणिमो ९७ ०बंध-पु १ गोलाकार श्लोक अक्षरी श्लोकरचना, यांत कोणत्याहि अक्षरापासून म्हणा वयास आरंभ केला तरी कांहीं तरी सुंदर अर्थनिष्पत्ति होते २ लग्नांतील कंकण बांधण्याचा विधि [स]

**कंकणाकृति**—वि कंकणाच्या (बांगडीच्या) आकाराचें —स्त्री कंकणासारखी आकृति ०ग्रहण-न ज्या सूर्यग्रहणामध्यें सूर्याचा मध्यभाग समास होऊन सभोंवतालच्या बाहेरील वलयाकार भाग दृश्य असतो असें ग्रहण वलयाकार ग्रहण (इं) ॲनुलर [स]

**कंकणाश्व**—पु. मानेवर तीन भोंवरे असलेला घोडा, हा शुभदायक व कल्याणप्रद होय —अश्वप ९२ [स]

**कंकणी-दार**—कंगणी-दार पहा

**कंकर-रा**—पु १ रेंव, बाळू रेती, ल्हान ल्हान खडे, गार गोट्यांचा चुरा, पुळणीच्या जमिनींत चुनखडीप्रमाणें या मातीचे थर पुष्कळ ठिकाणीं आढळतात 'जेथील लागल्या कंकर। नीच ते घोर वेव्हार होती।' -एभा १७५ ल्हान खडा, गारगोटी, कण 'हिरा कंकरा म्हणोनि।' -दावि २०१ 'नर्मदेंत जितके कंकर तितके शंकर' २ कांकर, ढोल, मृदंग इ०ची ओढदोरी, वादी, सामान्यत चामडें 'कोणी बाणवशावाचून असेल त्याच्या पाठीचा तीन बोटें-कंकर काढा' —गोपद्माची कहाणी पृ ३६ —वि (ल) दगडासारखें, कठोर 'वचन कंकर तें उतराया।' —दावि ३८० [स कर्कर प्रा कक्कर, हिं कंकरी, सिं कंकिरो]

**कंकर-री**—स्त्री दववाभळ

**कंकरी**—स्त्री १ पीळ भरलेल्या रेशमाची लड काकरी (मगच्या टल?) २ खणावरील काठाला लागून काढलेली खडी [कंकर१]

**कंकवा**—कंगवा पहा

**कंकातणें**—अकि त्रासणें भुकेनें व्याकूळ होणें, दमणें —सकि बेजार करणें त्रास देणें छळणें [कातणें]

**कंकार**—स्त्री १ क सारखा आकार असलेली वस्तु ककारा सारखी वस्तु २ (ल) सुषुम्ना नाडी काकीमुख पहा कंका रांत-सुषुम्ना नाडीचें अग्र, शेवट ब्रह्मरंध्र मग जालंधर नाडी। ककारांत फोडी।' -ज्ञा ६ ३०२ [स क+कार+अंत]

**कंकाल-ळ**—पु १ अस्थिपंजर. 'नग्नभैरव वेताळ। झोटिंग पिशाच कंकाळ।' -एभा १० ५८० २ पिशाच्च, प्रेत 'झोटिंग वेताळ कंकाळ वड।' -दावि ४४६ [स कंकाल]

**कंकास**—पु (गु) मार, जंजाळ, भांडणतंटा -मीश ता २६.३० [कंकातणें]

**कंकाळा-ळी**—वि (काव्य) क्रूर, राक्षसी, राक्षसी [कंकाल] —स्त्री राक्षसी, पिशाची, एक क्षुद्र देवी. 'येक म्हणती काळी कंकाळी। येक म्हणती भद्रकाळी।' -दा ८ १० ३५ ०मंत्र-पु वरील देवतेचा मंत्र 'बाळा मंत्र बगुळा मंत्र। काळि मंत्र कंकाळि मंत्र।' -दा ५ ४ ७ [स कंकाल]

**कंकु**—स्त्री गळ्यांतील पाणी, मानेचा पुढील भाग 'भवि ष्यातरें शोभे कंठ। पृष्ठभागींचें कंकु बरवंट। ब्रह्मांडपुराणें ग्रीवा गुप्त। मनोहर शोभली॥' -स्वानु ७ ३ ८९ [स कंकुद्=उंच वटा]

**कंकोत्री**—स्त्री (गु) कुंकुमपत्रिका, लग्नाची निमंत्रणपत्र [स कुंकुमपत्रिका]

**कंकोळ-ळ**—पु कापुरचिनी, कबाबचिनी याचा वेल असतो, फळ मिऱ्याएवढें व काळें असून थंड असतें सुगंधी पदार्थांत व औषधांत याचा उपयोग करतात व विड्यात घालूनहि खातात -श ११९६ [स कंकोल्ल, हिं कंकोला, ब कांकला]

**कंक्रा**—पु (राफी) हिरकणीच्या जातीचा रेतीचा दगड कंकर पहा

**कंक्रातणें**—कंकातणें पहा कंक्रो म्हणून बसणें-(विचित्र प्रयोग) खा खा होणें, खासावणें, भुकेनें व्याकुळ होणें

**कंगई**—स्त्री कंगवा पहा

**कंगट्टी**—पु (बरडी) अठरा इंच लांब व दीड इंच व्यासाचा एका टोंकाला चपटा होत गेलेला लोखंडी पत्ता. यानें बरड लोक घर फोडतात —गुन्हेगारजाती १०

**कंगण-णी**—पु स्त्री १ कंकण, बांगडी कांकण स्त्रियांच्या हातातील एक दागिना हा पाटल्यांच्या शेजारीं घालतात विशे षत नूतन वधूच्या हातात घालतात 'चंद्रहार पुतळ्यांची माळ आली घसरून पाठिवाल्ती। या मजला वेदना लागती कंगण्या तुमच्या पाठीप्रती॥' -होला ९६ २ पागोट्याचा कपाळावरील बिनीवरचा उंच व वळ्या असलेला कंगव्याच्या आकाराचा भाग, पेच पीळ 'पगडीच्या कंगण्या सुटल्या' -समाम ७४ ३ कंगोरा, किनार छपेली, कंकणाकृति उंचवटा, कोर (भिंत, खांब इ० सुशोभित करण्यासाठीं केलेला) साधारणपणें १०।१२ फुगवर बांधकाम गेल्यावर एकरी अगर दुहेरी विटाचा थर बांधकाम सोडून पुढें दाखवितात ती भिंत, कंगोरा (इं) स्ट्रिंग कोर्स 'छप्पर जेथें भिंतीस मिळतें तेथें कंगणी असावी' -मॅरट ११६ ४ घोड्याची कलगी, तुरा कपाळावरची पंगी 'मोडिया बाणली मोहाळी। कंगण टोप रागावळी।' -एरुस्व ८ १५ ५ केस विंचरण्याचा ल्हान कंगवा [स कंकण, हिं कंगन-नी सिं

गु कगणु प कगण, काश्मी कगुन ] ०दार–वि १ कगणी–पुढें पीळ असलेलें (पागोटें, पगडी) 'कगणिदार भरजरी पिळाची पगडि शिरावर।'–मृ १८ २ नक्षीदार सुरेख 'अशी फक्कड कगणीदार लावणी काढ्तस कीं ज्याच नाव त्ये'–तोब ९८ ०वाळया–स्त्री अँव कानातील कगव्याच्या आकाराच्या वाळ्या, वाळ्याचा एक प्रकार, एक दागिना 'हिरी वाळ्या कगण वाळ्या मनोहर।'–अफला ५५

**कंगणें**—खगणें पहा

**कंगर-ळ**—कगण–णी अर्थ ४ पहा

**कंगरपिस्स**—वि (गो) कौशल्यपूर्ण, नक्षीदार, छानदार [कगरा]

**कंगरा-रो**—पु १ (गो) कौशल्य २ कगोरा, काठ [फा कगुरा]

**कंगवा**—पु अर्धचद्राकार पाठीची, एका बाजूनें दाते असलेली एक प्रकारची केंस विंचरण्याची फणी, कगई 'न्हाव्याच्या धोकटींत कगवा असतो' [स ककत, सिं कगो, हिं कगुवा]

**कंगाल**—वि १ भिकार, दरिद्री निष्काचन 'नातरी गुरू भम मातेन। योजिला होता कगाल हीन।'–नव १६ ११७ २ गरीब, क्षुद्र, नापीक, दुर्भिक्ष असलेला (देश, गाव, पीक जमीन, इ०) ३ लुटारू –ख ३७०२ [फा कगाल, तु० स ककाल=हाडाचा सापळा, सिं ककालु] ०पोतें–न १ भिक्षेची झोळी २ अतिशय मैल अगरखा, चोळी, विजार वगैरे पोतेवजा कपडा (निंदाव्यजक प्रयोग) ०वंत–वि अतिशय दरिद्री 'जेवीं अर्कापुढें खद्योत। हीन दीन अति दीसत। तेवी मज कगालवतातें। ओळखील कोण तेथें।'–नव १९ ९

**कंगाली**—स्त्री १ कगालपणा दारिद्य, दुर्भिक्ष, हीनता २ गरिबी, द्रव्यहीनता कगाल पहा

**कंगी**—एक वनस्पतिरोग –शे ९ ११६

**कंगुमंगु, कंगमंग**—स्त्री १ टगळमगळ, टाळाटाळी, काकू, घुम्मळणें, मागें मागें घेणें २ मोघम, दुटप्पी भाषण ३ चोखदळपणा (जेवणातील), जेवताना चार करणें –वि १ काकू करणारा, गुळमुळीत (माणूस, भाषण, वर्तन इ०) २ व्यर्थ, मोघम, निरर्थक (भाषण) ३ अशक्त, दुबळा, छळा (प्राणी) [ध्व मग (मग) द्वि ?]

**कंगूरा-गोरा**—पु १ कड, कांठ कोर 'ती खडकाच्या कगोऱ्यावर शेळ्या चरावयास सोडुन'–पाव्ह ४२ २ कगणी अर्थ ३ पहा याच्यावर नक्षीकाम करतात ३ खाच कोनाडा, भिंत इ०च्या कडावरची कोरलेली नागमोडी रेघ ४ कठडा, कोट, (दळळ किंवा विहीर याची) ५ कोणाकार वस्तूच्या शिरा, कोपरा [फा कगुरा=किल्ल्याचा कोनाडी तट]

**कंगोरी**—स्त्री एक फुलझाड व त्याचें फूल [ककरी ?]

**कंघी**—स्त्री (काशीप्रांत) फणी, कगवा पहा [हिं]

**कच**—स्त्री (च चा उच्चार दतताल्व्य) १ चोहोंकडून आलेली अडचणीची स्थिति, घोंटाळा, सकट २ चेप, दाब, अट काव, कोंडमारा ३ रेव, रतीचे बारीक कण, खडयाचा अश (भाकरी पीठ इ० तील ४ (गवडी) बारीक, अर्धा इंची खडी ५ माघार घेणें, भीतीनें शरण जाणें, मागें पाय काढणें (क्रि० खाणें) 'इग्रजी सैन्यानें कच खाल्ली'–इप १३९ ६ भाडा भाडी, तटा, मारामारी [ध्व]

**कच**—पु ठोकर, पोंचा, खोंक, खळगा करकोचा, खांच, छिद्र (क्रि० पाडणें) 'झाडास कच पाडल्यानें तेलकट राळेसारखा रस वाहतो'–सेंपु १ ९७ [का कच्चा=खाच]

**कच**—पु केंस (उच्चार तालव्य) 'दु शासनें धरिले कच। तेणेंचि वाढली कचकच।'–एभा १ २१० 'तु मलिन कुटिल निरस जडहि पुनर्भवपणेंहि कचसा च।'–मोआदि ९ ६३ [स]

**कंच**—न (कर्ना तजा) पितळी तपेलें, गोल भाकाराचें, ओतींव, काशाचें किंवा पितळेचें भाडें, गुडा [का कचु=काशें]

**कचक**—स्त्री १ हाणाहाणी, मारामारी, चकमक, तटा (काठ्या, तरवारी इ०नीं–यात कचकच असा ध्वनि निघतो यावरून) (क्रि० उडणें, झडणें) २ (रोगाची) शिणक, शिळक, चमक, उसण (क्रि० भरणें) ३ आकस्मिक धक्का ४ कवरपट्याला तरवार टागण्यासाठीं असलेली कडी, पट्टदळ्याची चपरास, आंकडा, (दोन टोकें एकमेकात अडकविण्यासाठीं) फासा, अडकण ५ (व) भीति, दहशत कच पहा (क्रि० खाणें) 'तेव्हापासुन कचक खाल्ली' [ध्व] –वि अवाढव्य, जगी, अजस्र, प्रचड (इमारत), मोठें, भरभक्कम (ओझें) सपादन, ययास्थित (जेवण)

**कचकच**—स्त्री १ पिंगळा, करकोचा याचें ओरडणें २ रव किंवा रेवाळ पदार्थ दाताखालीं सापडल्यानें होणारा आवाज ३ अशी रेव, रेती, खडे, कण ४ (ल) कटकट, वाद, तटा, भाडण, त्रास, पिरपीर 'वृथा कचकच वाढविती।'–एभा २८ ५८३ 'मथुरातार्ईच्या जाण्याच्या वेळीं कचकच त्याच्या कपाळाशीं नको असेंहि त्या माउलीच्या मनांत आलें'–मायेचा बाजार. ५ (गु) बडबड, जल्पना, गप्पा 'शब्द कचकच वाढविती।'–एभा ९ ४०८ ६ (गा) अस्ताव्यस्तपणा, गर्दी

**कचकच-चां**—क्रिवि १ कचकच आवाज करीत (खाणें, चावणें), मोठ्यानें आरडाओरड करून (भाडणें) 'त्या दोघी सदानकदा कचकच भाडतात' [ध्वनि]

**कचकचणी**—स्त्री (गो) कचकच लागेल, होईल अशी स्थिति, अधकच्चेपणा. 'जिनसाची कचकचणी करू नका' [कचकच]

**कचकचणें**—अक्रि १ कचकच आवाज करणें २ दात चावणें, खाणें, वाजणें [कचकच]

**कचकचाट**—पु १ अतिशय कचकच, मोठा व सतुप आवाज, हलकल्लोळ (पिंगळयाचें ओरडणें, भाडणांतील आरडा ओरड, तरवारीचा खणखणाट वगैरे) २ भांडाभांडी, तडावखेडा [ध्व]

**कचकचीत**—वि १ टणक, अपक, कच्चा हिरवा, (भात) २ बद वाजणारें, फुटक्या आवाजाचें (मडकें इ०) ३ मोठा आणि ठळक, स्पष्ट दिसणारा (दागिना, अलकार) ४ जीत कचकच लागते अशी, रेवाळ (भाकरी वगैरे), रेताड, भरड ५ (गो) पुष्कळ, विपुल —क्रिवि १ रोख वाजवून; खणखणा (दिलेला दाम, पैका) 'या दागिन्याबद्दल कचकचीत शमर रुपये दिले आहेत' २ पुरेपूर, सपाटून (मौज करणें, उपभोग घेणें) केवळ जोर दर्शविण्याकरिताहि हा शब्द योजतात [कचकच]

**कचकट**—स्त्री पटकन मोडता येण्याजोगा, ठिसूळ असा बोरू, काठी, वासा, तरवार इ० —वि भिकार, टाकाऊ, मोडका [कच]

**कचकडा**—पु १ कासवाची पाठ, हाड, कासवाचा खवला २ गव्याचें शिंग वगैरे, ज्यापासून फण्या वगैरे करतात तो ३ इग्रजी सेल्युलाइडला प्रतिशब्द. [स कच्छ+कृत्ति, प्रा कच्छकड]

**कचकणें**—अक्रि १ कच खाणें, मागें परतणें, माघार घेणें (भीतीनें) २ मारामुळें दबणें, एका बाजूस निसटणें, स्थळा पासून भ्रष्ट होणें ३ ताण पडून किंचित् मोडणें (हाड, काठी, तुळई इ०) 'घराची तुळई कचकली' ४ निराशा होणें, धारण जाणें, धैर्य गळणें —उक्रि जोरानें ओढणें, हिसका देणें, धक्का मारणें [ध्व कच, का कचकने=जोरानें, एकदम, कच असा आवाज होऊन]

**कचकन-कर-दिशीं**—क्रिवि काच, मडकें इ० मोडताना होणाऱ्या आवाजाचा अनुवादक, ताड्कन, खाड्दिशीं, जोरानें, एकदम (पोटात शस्त्र खुपसणें, दाताखालीं खडा सापडणें) (क्रि० फुटणें, वाजणें) [ध्व, का कचकने]

**कचकय**—पु (गो) आवाळे शिजवून केलेला पदार्थ कोच पुढें पहा

**कचकरणें**—अक्रि कचकणें पहा [कच+करणें]

**कचकल**—पुन १ फुटक्या मडक्याचा खालचा अर्धा भाग २ (राजा) रास, ढीग (काचेच्या तुकड्याचा, खापड्याचा किंवा इतर वस्तूंचा) अनेक पदार्थांच्या तुकड्याचा समुदाय, काचेचे तुकडे [फा कचकोल=भिक्षापात्र, प्याला]

**कचकल**—पु१ कांहीं कच्च्या फळांचा कठिण मगज, बीज गर्भ, गाभा [कच्चा ?]

**कचका**—पु १ तरवार किंवा काठी यांचा जोराचा वार, मार, घाव, टोला 'दोहीं हातानीं कचका दिला। येवीपावता चिरित नेत्र।' -ऐपो १०. २ एकदम व जोराचा हिस्का, ओढ ३ जोर, बळ, आवेश, कामाचा धबडगा, सपाटा, झपाटा 'सध्या कामाचा कचका भारी' ४ निष्काळजीपणानें, घसमुसळे-पणानें वापर, वागवणी, अतिशय ताण 'याच्या कचक्याखालीं हें धोतर टिकावयाचें नाहीं' ५ रोखठोकपणा, तडफ, तापट पणा 'त्या सुभेदाराचा कचका कठिण' ६ भीतीमुळें एकाएकीं बसणारा धक्का, मनावर होणारा परिणाम (क्रि० खाणें, बसणें) [कच, कचक]

**कचकाडी**—स्त्री (बायकी) तीन मुली चकावयास लागल्या-वर सर्वांचे हात पालथे अगर उताणे पडले तर कचकाडी म्हणून पुन्हा चकावें लागतें त्यास म्हणतात [चकणें]

**कचकावणें-विणें**—अक्रि १ जोरानें बाधणें, खेचणें (ओझें, गाठोडें, भारा इ०) २ मारणें, ठोकणें, खरडपट्टी काढणें, (जोरा जोरानें व मोठ्यानें) शिव्या देणें ३ सपाट्यानें लागणें, उरक-ण्याच्या पाठीस लागणें (काम, धदा, व्यापार इ०). ४ एकदम जोरानें हिस्का मारणें, हासडणें, कचकणें ५ ठासणें, चोंदणें, टाकून ठोकून दडपणें [कचका]

**कचकावून, कचकून**—क्रिवि (प्रत्येक क्रियापदाशीं-विशे षत जेथें शक्ति, उत्साह, चापल्य, जोर दाखवावयाचा असतो तेथें जोडतात) सर्व शक्ति खर्च करून, जिवापाड मेहनत करून, खूप, अतिशय [का कचकने] ०बांधणें-जोरानें, ताणून बांधणें ०धरणें-घट्ट धरणें, मिठी मारणें ०मारणें-सपाटून ठोकणें ०जेवणें-खाणें-चापून, गळ्यापर्यंत, ओठापर्यंत जेवणें 'मजल गाठायाची आहे, कचकून जेव' ०बोलणें-सांगणें इ०-निर्भीडपणें, स्पष्ट बोलणें, खरडपट्टी काढणें इ० ०कापणें, तोडणें, मोडणें, पोट भरणें, खर्च करणें इ०—

**कचकोडा**—पु (ना) अगदींच कच्चें फळ, दोडा, कोंवळें फळ [कच्चा+दोडा]

**कचकोल**—पु कचकल पहा —न (कों) फुटक्या कांठाचें किंवा बिनतोंड मडकें [तुल० फा कचकोल=भिक्षापात्र, नरोटी]

**कचक्या**—वि १ खुमखुमी जिरविणारा, जोरदार, हिंमतदार, धीट, साहसी, अधिक बलवान, वरचढ, शक्तिमान, दुसऱ्याला दाबात ठेवण्यासाठीं तीव्र उपाय योजण्यात मागेंपुढें न पाहणारा, खमक्या २ सपाट्यानें काम करणारा, तडफदार, चटूचटू कामें उरकणारा, चलाख, ३ कचक पहा [कचका]

**कचखडी**—स्त्री (इमारतकाम) सामान्य खडीपेक्षाहि बारीक खडी, अर्धा इंच जाडीचे दगडाचे तुकडे कच अर्थ ४ पहा

**कचडें**—न (ज्याचा वरील भाग फुटला आहे असा) घागरीचा खालचा भाग, बिननोंडी भाडें कचकल पहा

**कचणी**—स्त्री १ (कु) गिरमीट फिरविण्याची धनुकली २ आवळून बांधलेली दोरी, कसणी पहा

**कचणें**—अक्रि कचरणें, कचकरणें पहा [ध्व]

**कचदील**—वि १ कुटिल २ कच्च्या मनाचा, भित्रा, संशयी, दुबळा, अशक्त, भेकड 'राजा कचदील आहे, यथें भेटीस येता संशय धरितो' —सभा १४ [फा कज्+दिल]

**कंचन**—स्त्री पंजाबातील दोर करणारी व साप पकडणारी आणि खाणारी जिप्सीसारखी कजर जात कजर पहा

**कंचन, कांचन**—पु १ आपट्याच्या पानासारखीं पण पातळ व लहान पानें असलेला, पिंवळसर फुलें येणारा एक वृक्ष, तांबडीं फुलें येणारेंहि एक झाड आहे काचन पहा २ डोंगरी टेंबुरणी ३ सोनें 'काहे परिस कंचन करे धातु। नहि माल तुटत पावत धातु॥' —तुगा ४३९ [स काचन]

**कचनार**—स्त्री एक सुगंधी वनस्पति, याच्या फुलाची सुंदर भाजी होते 'पाच दवणा मरवा कचनार।' —भफला ४९ [स काचनार, हिं कचनार—ल]

**कंचनी**—स्त्री (हिं) नाचणारी बाई, कसबीण, कलावंतीण, नर्तकी 'त्या कंचनी विषयीं तुम्हास कसें काय वाटतें?' —विवि १०५—७१२२.

**कचपाश**—पु १ डोक्यावरचे केंस, कच २ केंसाचा पाश, फास (क्रि० घालणें) [स] ०घालणें—केंसानें गळा कापणें, विश्वासघात करणें

**कचंवणें, कचमणें, कचमळणें**—उक्रि १ टवळणें, गढूळ करणें, रेंदाळणें (हात, पाय इ० काचा स्पर्श करून पाणी वगैरे) 'कचवलेलें उदक' २ हाताळणें, चिवडणें, राड करणें (अन्न) [कच+मळणें?]

**कचंवणें, कचमणें**—अक्रि (पोटात) खळाळणें, कालवणें, पोट बिघडणें

**कचमच-चां**—क्रिवि कचकच असताना (रेंव लागल्यामुळें येणारी—चव, आवाज) [ध्व]

**कचमा**—पु १ गढूळपणा (पाण्याचा दारूचा) रेंदाळपणा २ सवगोलकार, गोंधळ, घोंटाळा, अव्यवस्थितपणा, गर्दी (अन्न, कामधदा, माणसें, गुरें इ० ची), वस्तूचा अव्यवस्थितपणा ३ घाण, केरकचरा, गवतकाडी [?]

**कचमोडा**—वि (व) धैर्य नसणारा, कच खाणारा, भित्रा, भेकड, कच्च्या दिलाचा, अवसानघातकी (माणूस) 'इतक्याच श्रमानें तो कचमोडा होऊन गेला' [कच+मोडणें]

**कचमोहरें**—वि (ल) कच खाल्लेले, बिन हिंमतीचें (माणूस) 'मार दिला त्यामुळें लोक कचमोहरे जाले' —पया ४३१. [कच+मोहरा]

**कचर**—स्त्री (कों व) तळयात लव्हाळ्याच्या मुळाशीं उगवणारा एक सुपारीएवढा कंद, हा उपासाला खातात हा चिकट व गोड असतो, फुरडी कचरा पहा [स कसेरु, कच्चुरा?]

**कचर-कचेर**—न (गो) वाढ खुंटलेलें विड्याचें पान. [कुचर?]

**कचर**—स्त्री (गो) खिळे ठोकण्यासाठीं भिंतींत बसविलेलें लाकूड, ठोकळा, फळी [?]

**कंचर-री**—काचर, कचार पहा ०पट्टी—बागड्या तयार करणाऱ्यावर बसविलेली पट्टी

**कचरट**—वि १ लवकर तुकडा पडणारा, ठिसूळ (पदार्थ) २ (ल) अशक्त, कुचकामाचें, हलकट (माणूस, पशु, वस्त्र इ०) 'हिरवटासी दुरी धरावें। कचरटासीं न बोलावें।' —दा ११५ २१ [स कच्चर=दुष्ट, कुत्सित]

**कचरट**—न कचरा, घाण —वि घाणीचें [सं कच्चर=वाईट, घाण कचरा+ट=लघुत्वदर्शक प्रत्यय]

**कचरणें**—अक्रि १ कच खाणें कचकरणें पहा —अकर्तृक क्रि (ग्रा) (उचकी वगैरेमुळें) घशाशीं—घशाखालीं येणें (अन्न वगैरे) 'माझ्या गळ्याशीं कचरतें'

**कचरा**—पु १ घाण, केर, लाकूड वगैरेचे बारीक तुकडे, गाळसाळ २ उकिरडा, उकिरड्यावरील घाण (सामा) टाकाऊ गोष्ट, निरुपयोगी वस्तु ३ (ल) बिन लढाऊ लोक —ख ४३०९ 'सैन्याबरोबरचा बाजार, उदमी लोक वगैरे कचरा' —ऐपो २३२ वरील टीप? [स कचर=मलिन, सिं किचिरो]

**कचरा**—पु कचरकंद कचर पहा

**कचरा**—वि तांदुळाची एक जात

**कचरा-री**—पुस्त्री एक झाड हें सुगंधी असतें कचरा अंगाला लावितात काचरी, काळी हळद कचोरा पहा [स कर्चूर, प्रा कच्चूर, हिं कचूर, गु कचूरो]

**कचरा, खचरा**—पु खाच किंवा खोवण पाडण्याचें सुतारांचें एक हत्यार [खाच खचणें]

**कचरी, काचरी**—स्त्री फळाचे किंवा भाजीचे काप, फोडी काचरी पहा ०सुपारी—खांडकी सुपारी पहा

**कचऱ्याल**—न (कु) फडताळ 'कचऱ्यालात हवी आसा' [?]

**कचलपट**—वि कच खाणारा, कच्च्या दिलाचा, भित्रा, भेकड [कचर+पट किंवा कच+लटपट]

**कचला**—कचरा पहा.

**कचवा**—पु एक वाद्य 'सतार, कचवा, सरोद आणि सार मंडळ वाजविणारे '–(बडोदें) कलावत खातें ४९ कछवा पहा

**कंचा-ची-चें**—सना कोणता-ती-तें ? प्रश्नार्थक 'ह्यातुन कचा मागून घ्यावा '–ऐपो ३३ [कोणचा अप]

**कचा**—कच्चा पहा (अव) कचे 'त्या गावचे कचे राखावे '–मसाप २ ७०.

**कचा**—(ना) काचेची गोटी, बैदुल [काच]

**कचॉ-चो**—पु १ (गो) ठिपकेदार लहान मासा, लहान ढोमेले मासा २ (सामा) लहान पोर, मूल (मनुष्य, जनावर, पक्षी इ० चें) –वि लहान, काचा [कचा]

**कचाकच-चां**—क्रिवि १ जोरानें मारण्याचा आवाज होऊन, सपसप, चटाचट (मारणें, तोडणें, मोडणें) 'त्यानें तर वारीनें कचाकच माणसें तोडलीं ' २ दाताखालीं रेव सापडल्यानें आवाज होऊन, खडे लागून, कचकचा पहा [ध्व]

**कचाकच, कचाकची**—स्त्री १ भांडण, चकमक, कज्जा, वाचावाच 'त्याची व आमची कचाकच झाली ' २ केशाकेशी, गुद्दागुद्दी, तरवारी, काठ्या इ० ची हातघाईची लढाई हाणमार, तोडातोड [ध्व कचकच]

**कचाच**—पु १ अनेक करकोच्याचा एकदम झालेला ओरडा, शब्द २ गोंगाट, गलबला, कलकलाट (पक्षी, माकडें, माणसें यांचा) [ध्व कच]

**कचाचणें**—अक्रि कचकचणें, कचाच करणें (पिंगळ्यानीं) ओरडणें, कलकलाट करणें, गोंगाट, करणें, रागानें आरडाओरडा करणें (माणसें, पक्षी, माकडें इ०नीं) [ध्व कचाच]

**कचाट**—पुन १ युक्ति, बेत, धाडस यत्न, कारस्थान 'पर्वे करावीं कचाटें। चालवावीं भक्तीचीं वाटें। नाना वैभवें कचाटें। उपासनामार्गें।'–दा २ ९ १७ २ त्रासाचें, अवघड काम 'हजार कचाटें करावीं तेव्हा थोडें पोट भरतें ' ३ घोंटाळा, संकट, अडचण, भानगड, लचांड 'ऐसें सांगतां कचाट। तुज वाटेल हें कचाट।'–एभा ७ ३४५ १४ ४५८ ४ ताट्टमत, कुभांड, दुसऱ्याचें नुकसान करण्यासाठीं योजलेली गुप्त युक्ति, व्यूह [स कृच्छ्र+पात ?]

**कचाटी**—संकटमय स्थिति, त्रास, अडचण, गोंधळून जाण्यासारखी मनस्थिति (क्रि० सांपडणें, धरणें–बहुधा सप्तम्यंत 'तावडींत सापडणें' याप्रमाणें प्रयोग) 'न पडतां कचाटीं धरा भाव।'–दावि ४७३ २ लचांड, भानगड, त्रास ३ (ल) संसार 'गुंतलें कचाटीं क्षमा करा।'–दावि ७६५ **कचाटीत सांपडणें**–एखाद्याच्या तावडींत येणें, अडचणींत येणें (म) कचाट्यांत सांपडणें

**कचाटी-ट्या**—वि १ कचाटें करणारा, उपद्यापी, भानगड्या, लटपट्या, कुभांडखोर २ उद्योगी, कारस्थानी, मोठा योजक, मसलत्या

**कचाडें**—न कचकल कचडें पहा

**कचार-री**—पु काचकाम किंवा बांगड्या करणारा, काचार, बांगडी–कासार. [काचकार]

**कचावणें**—अक्रि कचणें, कचकरणें पहा

**कची**—वि चीर पडलेला, बद आवाजाचा (रुपया इ०) व्यंग असलेला [ध्व कच] ०**ढेली-चा**–वि बद, टोका पडलेला, छाप पुसलेला (रुपया इ०)

**कची**—स्त्री (गो) फुगलेलें पोट [?]

**कचीकाई**—स्त्री (कर्ना) ईडनिंबू [का कच=पितळी भांडें+काई=फळ, पितळेच्या भांड्याप्रमाणें पिंवळें दिसणारें फळ]

**कचीवहिवाट**—स्त्री कुळकर्ण्यानें लिहून पाटलाची सही घेतलेली जमाखर्चाची पावती, कच्ची पावती [कच्ची+वहिवाट]

**कंचुक**—पु १ पेटी, बंडी, अंगरखा, झगा, खमीस, पोंघरूण, चोळणा, लांडी विजार, इ० 'समर्थकटीचा आपाद कंचुक।'–सप्र ७ ३१ २ कवच, चिलखत ३ सापाची कात ४ साल, कोंडा, करवंटी, कवच, बाह्यांग (दाणा, फळ, इ० चें) ५ (काव्य) आवरण, आच्छादन, पांघरूण 'बाहरी नभाचा कंचुक।'–विपू ४ ६५ 'पाविजे जव कंचुकातें। ब्रह्मांडाचिया।'–गीता १ ११४५ [स]

**कंचुकित**—वि कंचुकानें, आवरण्यानें आच्छादित 'आपाद कंचुकित। रोमांच आले॥'–ज्ञा ९ ५२७

**कंचुकी**—पु १ अंतपुराचा वृद्ध द्वारपाळ, पाहारेकरी, खोजा, चोपदार (काव्य) राजमहालांतील राजाचा विश्वासु नोकर २ साप –स्त्री १ कांचोळी, चोळी 'अंतर्वसन बाह्यवसन। कंचुकी वरून प्रावरण। पंचवसनें संपूर्ण। क्रियालागीं देईं या॥', –ह६४ १६६, 'करयुगें उर मस्तक ताडिते। वसन आणिक कंचुकि फाडित॥'–वामन भामा ५ २ एक वनस्पति, आमध ३ फुलाचें कचोळें, पाती, गोंड, देंठाजवळ असलेलें फुलाचें आवरण, [स] ०**विधान**–न चोळी उतरून टाकणें, घटकंचुकीचा प्रकार 'कुंभपूजा कंचुकीविधान। अघोरक्रिया मद्यपान। आणि त्रिपुरसुंदरीपूजन। कामाक्षा विधी॥'–स्वाु ७ २ ४३

**कचेबचे**—पु अव (प्र) कच्चे बच्चे पहा

**कचेमाडूक**—न (कु) शेपटी असलेली बेडकाची जात, लहान बेडूक [कचा+स मंडूक]

**कचेरी**—स्त्री काम, कारभार करण्याची (राजकी, संस्थानी, सरकारी) जागा, कार्यालय, न्यायालय, कोठें, चावडी २ कचेरींत काम करणारी मंडळी ३ त्याचें काम, कारभार [हिं कचहरी, ते कचेली]

**कचेल**—न कपाट कचऱ्याल पहा

**कचोरा**—पु (नाविक) नावेचा कणा—नाको

**कचोरा-री-ला**—पुस्त्री हळदीच्या झाडासारखें एक झाड याचे कंद जमिनींत सापडतात कडाच्या काचऱ्या उकडून लोण च्यात घालतात कचोरा सुगधी असल्यामुळ अगास लावण्याच्या मसाल्यात घालतात कापुरकाचरी म्हणून याची एक दुसरी जात आहे कचरा-री पहा [स कर्चूर, प्रा कच्चूर, गु कचूरो]

**कचोरी-डी**—स्त्री १ तिखट मसाल्याचें पुरण भरलेली पुरी, यात बटाटेव डाळीचेंपुरणहि घालतात (गु) कचोरी. 'पोळी भात सीरा कचोर।'—नव ९ ११६ २ कणीक व उडदानी डाळ याची तळलेली पुरी ३ विरडीपुरी, शिंगाडेपुरी(मासयुक्त)चा एक प्रकार —गृशि २ १९ [॰प्रा दे कचरा, हिं कचौरी, का कचरी]

**कचोळ-ळा-ळें, कंचोळें**—नपु १ एकास एक लायून तीनं घरें व वर पत्रा असलेलें एक ल्हान पूजेचें उपकरण (पचा मृत ठेवण्याकरिता), गधाक्षतपात्र, एक पूजापात्र 'उगेच हातीं मिरवी कचोळें'—सारुह ७ ९० —ह १९ ४७ २ वर्तुळाकृति असलेले लोक, कोचाळें ३ फुलाचें आच्छादन, 'कनक कमळाचा कचोळा। कीजे परागाचा उधळा।'—शिशु ७८१ —शिल्पवि ६६५ [फा, कचकोल=पेला तुल० स कच्छ+आल्य]

**कचोळी**—स्त्री (गो) सोनें इ० धातूची देवाची मूर्ति

**कच्च**—(कर्ना) खाच, ल्हान खळगा (लाकूड वगैरेवर चाकू रधा वगैरेनें पडणारा) [का कच्चु=खाच, वण]

**कँच्चकरप**—अकि (गो) खेकसणें

**कच्च जावप**—अकि (गो) दचकणें, घस्स होणें

**कच्चा**—वि १ न पिकलेला, हिरवा, कोंवळा (फळ, गळू, पान इ०) २ साफसुफ न केलेला, ओबडधोबड (दगड, चिरा, इ०) ३ अशिजा (भात, भाकरी, रसायन इ०) ४ अपुरा व पक्का न केलेला, सरासरीचा, ठोकळ (जमाखर्च, काम, इ०) ५ अपूर्ण, अपक्व, अप्रौढ (कट मसलत इ०) ६ अपुरें समजलेलें किंवा मिळविलेलें (शास्त्र, कला) ७ अपुऱ्या ज्ञानाचा, अर्धवट शिक्षणाचा (माणूस) 'तो अभ्यासात कच्चा आहे' ८ बिन वाकबगार, अडाणी, सस्कारहीन, यथातथ्य ज्ञान असलेला ९ कोता, अप्रौढ, सकुचित (विचार, बुद्धि) १० गौण ल्हान, कमी (वजन, माप, इ०) ११ न टिकणारा, लवकर नाहींसा होणारा (रग इ०) १२ सविस्तर, सर्व पोटभेद ज्यामध्यें घेतले आहेत असा (हिशेब) १३ बळकट नाहीं असा (बाधकाम इ०) 'मातींत घर बाधू नये, मातीचें काम अगदीं कच्चें असतें' १४ इयत्तेहून, बाजवी पेक्षां कमी 'आम्हीं एका तासात एक कच्चा कोस चाललों' १५ कढवून फार घट्ट न केलेला (साखरेचा पाक इ०) १६ (गणित) त्रैराशिकातील दुसरें व तिसरें या दोन पदाचा गुणाकार करून येणाऱ्या रकमेस कच्चे म्हणतात नतर त्यास प्रथमपदानें भागून आलेल्या भागाकारास पक्के किंवा पक्का म्हणतात (ज्याच्यामध्यें भारी परिमाणाच्या किंमतीवरून हलक्या परिमाणाची किंमत काढावयाची असते अशा हिशेबात उपयोग), उ० १० शेरास पाच रुपये, तर १॥ पावशेरास किती येथें ५ व १॥ ह्याचा गुणाकार जो ७॥ ते कच्चे १७ कामामध्यें तोटानफा होईल तो मूळ धन्याचा अशा बोलीनें केलेली (नोकरी मामलत, इ०), पगारी (मक्ता न देता नोकराकडून प्रत्यक्षपणें सारा वगैरे वसूल करण्याच्या पद्धतीला हा शब्द लावितात) कच्चा हा शब्द अपुरा, ओबड धोबड, अप्रौढ, उणा ह्या अर्थानें शब्दश व लाक्षणिकरीत्या अनेक प्रकारें योजतात उ० **कच्चा मजकूर-लिहिणें-वर्तमान-बातमी-हकिगत-कैफियत**—वरवरचें, पक्कें नव्हे तें, कसें तरी तयार केलेलें, अदाजी **कच्चा ताळा-ताळेबंद-कीर्द-जमाबंदी-बाब-हिशेब-बेरीज**' इ०, =अपुरा, बद न केलेला, अपूर्ण [ध्व कच, हिं कच्चा, तु० स कच्य=खोटें] **०अमदानी**—स्त्री एकदर जमा (खर्च वजा न करिता) **०अंमल**—पु १ पगार घेऊन केलेली सरकारी (जिल्ह्याची, तालुक्याची) नोकरी, काम, याच्या उलट मक्त्याचा अमल कच्चा मोकद्दमा पहा. २ कच्चा अर्थ १७ पहा **०असामी**—पु हगामी, उपरी शेतकरी—मालक, ज्याचा कबजा कायमचा नाहीं असा इसम **०आकार**—पु ठोकळ हिशेब, अदाज, साधारण आढावा. **०कागद**—पु खळ न लावलेला कागद **०करवड**—पु माशाचा एक प्रकार, याचा रस्सा करतात —गृशि २ ४७ **०खर्च**—पु १ कच्चा हिशेब, टाचण २ तात्पुरता, कायम नव्हे असा खर्च 'कच्चे खर्चाचे तमाशे असतील त्याच्या नाइरानें वेळीं आपले लोकास १० दिवस रजा द्यावी'—(बडोदें,) कलावत खातें २० ३ गुजरी, ठोकळ खर्चाखेरीज खर्च, जो प्रसगीं होईल तो सामान्य खर्च **०खर्डा**—पु १ अदाजपत्रक, बजेट (हिशेबाचें), पक्का करण्यापूर्वीचा पहिला खर्डा २ कुळकर्ण्यानें शेतकऱ्याकडून आलेल्या रकमाचा ठेवलेला हिशेब. **०खाना**—पु पोळ्या, डाळभात, खिचडी इ० जिनस —ममाप १ १० **०डाक, डाग**—पु शिसें, जस्त किंवा कथील यानीं दिलेला डाक (चादीचा नव्हे), तात्पुरता जोड, कमतर करणें **०ताप, ज्वर**—पु साधा ताप, विकोपाला न गेलेला ताप **०तोळा**—पु (क) ९२ गुंजाचा तोळा (पक्का तोळा ९६ गुंजाचा असतो) **०दोरा-धागा**—पु पक्कन तुटणारा दोरा, पीळ न घातलेला दोरा **०पक्का**—वि अंदाजी, ठोकळ आणि त्यावरून केलेला पक्का हे दोन्ही ज्यात आहेत असा (जमाखर्च, वही, खतावणी इ०) **०पाडा-डा**—पु. ठोकळ, तोंडी, अटक, ठाकठीक न केलेली, कच्ची हकिगत,

वर्तमान, साधन ( क्रि० वाचणें ) ०घटघडा-पु इसमवार पगारवाटणी ( सरकारी नाकर किंवा मजूर याना ), डोईपगार ०भरणा-पु रयतेनें भरलेला सारा, वसूल (ऐन किंवा नक्त) ०मामला, मामलत-पु कच्चा अमल पहा ०माल-पु ओबडधोबड, न कमावलेला, मूळच्या स्वरूपांतील, ज्याचा जिनस बनविला नाहीं अशी वस्तु ( कापूस, कातडें, घी, वनस्पती इ० ) ' विलायती कारखान्यांत हिंदुस्थानांतून जो कच्चा माल जातो तो बंद झाला ' -के ३१ ५ ३० ०मोकदमा-पु कामामध्यें नफातोटा होईल तो धन्याच्या वाटणीला अशा बोलीनें केलेलें काम, गुमास्तेगिरी, कच्चा अंमल मक्त्याच्या उलट ०रंग-पु १ धुतला असतां जाणारा, न टिकाऊ रंग, रंग पक्का करण्यासाठीं उकळावा लागतो, तो उकळला नसला म्हणजे त्यास कच्चा रंग म्हणतात २ तिफाशी सोंगट्यात काळा अथवा हिरवा रंग ०वसूल-पु रयतेकडून आलेला सारा, खड (ज्याची वर्गवारी काढली नाहीं असा) ०शेर-पु प्रमाणभूत (पक्क्या) शेरापेक्षां कमी असणारा शेर (क) १५ रुपये भारांचा शेर (उलट पक्का ८० भाराचा) कच्ची-स्त्री (तिफाशी सोंगट्यात) १ मेलेली पण पुन्हा युक्तीच जिवत केलेली, युक्तीच बसविलेली सोंगटी, पट फिरून न आलेली सोंगटी २ हिरवी किंवा काळी सोंगटी तिफाशीं सोंगट्यात तांबडा व पिवळा यास पक्का व हिरवा व काळा यास कच्चा रंग अशा संज्ञा आहेत ३ (ल) फजिती, मानहानि, अपकीर्ति ०असामी-स्त्री दिवाळें वाजलेला किंवा अपुरीं साधनें असलेला, नालायक सावकार, कनाटदार, कुळ कर्जदार, खडकरी इ० ०कमाविशी-कमावीस-स्त्री तैनात घेऊन केलेलें सारावसुलीचें काम, नफातोटा धन्याचा अशा बोलीनें मामलत वगैरे करावयाचा प्रकार, कच्चा अमल (ह्याच्या उलट मक्त्याची कमाविशी) ०कुदी-स्त्री कपडा भट्टींत न घालतां नुसता धुवून केलेली घडी इस्त्री २ धुतलेल्या कपड्यास खळ न लावतां केलेली इस्त्री [कच्ची+कुदी=खळ लावणें, इस्त्री करणें] ०कैद-स्त्री चौकशीपूर्वीची किंवा अपराध शाबीत होण्यापूर्वीची कैद २ नजरकैद, साधी कैद ०कोंबी करणें-(क) एखाद्याचें भजन करणें ०खोर-पु सदोदित ज्याची फजिती किंवा कच्ची होते असा माणूस फजीतखोर ०जमाबंदी-स्त्री एकूण आलेली गावची जमा (खर्च वेगळा काढून तो वजा न घालता) ०जप्ती-स्त्री (कायदा) दाव्याचा निकाल लागण्यापूर्वी केलेली जप्ती, अबलजप्ती पहा ०बाजू स्त्री.(सोंगट्याचा खेळ) तिफाशी डावात काळ्या व हिरव्या सोंगट्या. ०बुटी-बूटी स्त्री सोनेरी किंवा रुपेरी रंगानें कापडावर काढितात ती बूट, फुलें, पडी -वि अशा कापडाचें (पागोटें अंगरखा इ०), खडीदार ०माती स्त्री कोरडी, चिकणपणा नसणारी माती ०मामलत-कच्चा अमल पहा ०मिती-स्त्री मारवाडी, सावकार हे कर्जाऊ दिलेल्या रकमेची तारीख आदल्या दिवशींची घालतात ती याच्या उलट पक्की मिती (कुळाकडून आलेल्या रकमेची तारीख मात्र दुसऱ्या दिवशींची घालतात) ०मुदत-स्त्री (सावकारी) हुंडी हातात पडल्यानंतर अमुक दिवसांतच ती वटविली पाहिजे अशा प्रकारची दिलेली मुदत, ह्याच्या उलट बदीमुदत (=हुंडींत दिलेल्या तारखेनंतरची जास्त मुदत) २ हुंडीची ठराविक मुदत भरण्यापूर्वीचा काल, अद्याप भरावयाचा मुदतीचा काल ०लढाई-स्त्री पुरा निकाल न होतां झालेलें युद्ध, दोन्ही पक्षांनीं मध्येंच सोडून दिलेली लढाई, अनिर्णीत लढाई ०वहिवाट-स्त्री. कच्ची वहिवाट पहा ०शाई-स्त्री लाख न मिसळलेली, पाण्यानें निघून जाण्यासारखी शाई ०सुपारी-स्त्री न शिजविलेली सुपारी, पोफळ, रोठा ०हुंडी-स्त्री अद्याप न पटलेली किंवा न स्वीकारलेली हुंडी कच्चें-वि न पिकलेलें, व इतर अर्थी कच्चा पहा ०अंडें-न नवीन घातलेलें अंडें, तानें अंडें ०अक्षर-न खराब व बिन वळणाचें अक्षर, वळण नसलेलें अक्षर ०इरसाल-न जिल्ह्यातून सरकारी खजिन्यात पाठविलेला शेतसाऱ्याचा भरणा ०कातडें-न न कमावलेलें किंवा रंगविलेलें कातडें -खोर-कच्चीखोर पहा ०खातें-न (हिशेब) ज्या खात्याचें येणें-देणें पुढील सालास उतरावें लागत नाहीं असें खातें, तात्पुरतें खातें ०गिरी-स्त्री कच्चेपणा, अपूर्णता, अपक्वता 'तुम्ही आधीं कच्चेगिरी केली म्हणून फर ला' ०चीट-छीट-न जें धुतलें असतां त्यावरील रंग नाहींसा होतो असें चीट ०दूध-१ न तापविलेलें, निरसें दूध २ नवीन व्यालेल्या जनावराचें पहिल्या बारा दिवसांतील दूध, कोवळें दूध ०नाणें-न चलनी नाण्यात आलेला सरकारी वसूल (यात निरनिराळीं नाणीं सरमिसळ आलीं असतात) ०पान-न पानवेलीचें, विड्याचें हिरवें पान (याच्या उलट पक्कें पिकलेलें पान) ०पोतें-न सरकारी चावडींत भरलेला शेतसारा, सरकारी खजिन्यात ज्या स्थितींत येतो त्या स्थितींतील वसुली पैसा ०बच्चें-न (अव कच्चींबच्चीं) मुलेंबाळें पोरेंबाळें, लहान मूल 'यक म्हणे या पळोन जावें। तरि कच्चे बच्चे काय करावे।' -दावि २३२ 'तो चार कच्च्याबच्च्याचा धनी आहे' [हिं कच्चाबच्चा] ०बारा-पु (तिफाशी सोंगट्यात) फाशावरील एक दान, (एकावर पाच एकावर सहा व एकावर एक असा) बारा मिळण्याचें दान ०मडकें-१ न भाजलेलें मडकें २ (ल) अज्ञानी माणूस (मडकें=डोकें बुद्धि) 'हें अजून कच्चें मडकें आहे' -नाम ४ ०रंग-पु (तिफाशी सोंगट्यात) हिरवा व काळा रंग कच्ची बाजू पहा ०रेशीम-न पाण्यांत न उकळलेलें रेशीम ०लोणी-न कोऱ्या दुधापासून घुसळून काढलेलें लोणी (दह्याचें नव्हे) ०वजन-न (क) (सोन्याचें) ९२ गुंजांचा तोळा कच्चा तोळा पहा

**कच्चेरा**–पु पावसाळ्यात, बाजारात भात येत राहील अशी व्यवस्था करणारा मुंबईतील ठेकेदार अशी नेमणूक जुन्या काळीं सरकारातून होत असे

**कच्छ**—पु १ कासोटा, नेसलेल्या वस्त्राचें टोंक जें मागें खोंवितात तें (क्रि० घालणें, सोडणें) २ नदीच्या किंवा समुद्राच्या काठचा प्रदेश कच्छप्रांताला यावरून नांव पडलें आहे ३ दलदल, पाणथळ जमीन. 'भीतो बहु दुरुनिहि पद ठेवाया जसा करी कच्छीं।' –मोसभा २ ४८ ४ कासव, व त्याची पाठ ५ विष्णूच्या दशावतारांपैकीं दुसरा, कच्छावतार ६ नांदुरकीचें झाड ७ नावेची नाळ [स]

**कच्छप**—पु १ कासव 'पृथ्वीलागुनी कच्छप।' –दावि १६८ २ नांदुरकी ३ कासोटा कच्छ पहा **कच्छपीं लागणें**–आश्रय करणें, एखाद्याच्या मागें मागें करणें, तनानें चालणें, नादी लागणें (माणसाबद्दल–आपलें काम करून घेण्यासाठीं) त्याचमें होणें, त्यावर अवलंबून असणें (कार्य, पदार्थ) (सोमयज्ञामध्यें बहिष्पवमानाच्या वेळीं एक ऋत्विज दुसऱ्याच्या कासोट्याला धरून आहवनीयाकडे जातो त्यावरून) 'तो सारखा बायकोच्या कच्छपीं लागला आहे हें बरें नाहीं' २ पाठ न सोडणें, पाठ पुरविणें, त्रास देणें 'अरे, माझ्या का असा कच्छपीं लागला आहेस? जरा खेळायला जा!' [स कच्छ]

**कच्छपी**—स्त्री सरस्वतीचा वीणा [स कच्छ]

**कच्छमच्छ**—न (बायकी) चातुर्मासात पहिले दोन महिने दूध व शेवटचे दोन महिने दहीं न खाणें हें मत (विष्णूच्या पहिल्या दोन अवताराच्या जोडीप्रमाणें दूध, दहीं हे शब्द जोडीनें येतात यावरून)

**कच्छी**—वि १ कच्छ प्रांतातील (घोडा, माणूस इ०) [कच्छ] –स्त्री (गो) मेणा

**कछवा**—स्त्री (संगीत) एक सतार, यातील भोपळा कासवाच्या पाठीसारखा असून क्वचित लाकडी असतो ताराची संख्या, तारा मिळविण्याची पद्धति, पडदे वगैरे सर्व बाबी सतारीसारख्याच असतात यातहि रागदारीच्या व लयकारीच्या गती वाजवितात [स कच्छ]

**कंज**—पु ब्रह्मदेव –न कमळ 'सर्वस्व परित्यागुनि ज्याचें स्मरतात पाद-कंज यमी।' –मोवन १२८ [स कम्+ज] ०**कन्या**–स्त्री सरस्वती

**कज**—(कों) एक मासा

**कजर**—स्त्री शिंके करणारी जोगी–जुगाऱ्या पिटाड्या, म्होरक्या, दोऱ्या वळणारी एक जात निषिप्रमाणें एक भटकी जात –गागा ११९ ही जात अस्पृश्यांपैकीं समजली जाते कंजर पहा

**कंजरीट**—पु खंजरीट, ताजखपक्षी याच्या डोळ्याची उपमा बायकाच्या डोळ्यास देतात 'बोलली मुपाम काय कंजरीट लोचनी' –(रामसुतात्मज) द्रौपदीवस्त्रहरण ११४ [स खंजरीट]

**कजलणें-जेलणें**—अक्रि (दुफाशी सोंगट्यात) दुफाशी सोंगट्यांत सोंगट्या जुगल्यानंतर बारा, तेवी, दुड्डी इत्यादि जुगदान खेळणें कदलणें पहा

**कजलबाश**—पु बंदुकवाला, लाल टोपीचा इराणी शिपाई [तु किझीलबाश्]

**कजली**—कदली पहा

**कंजा**—कज्जा पहा 'कंजा शंभू ब्रह्मा करिति हृदयाब्जीं पदक ज्या।' –वामन विराट ५१

**कजाख-ग**—वि १ क्रूर, दुष्ट, राक्षसी, रानटी (रशियन सैन्यातील कोसॅक नावाचे शूर व धाडसी घोडेस्वार, यावरून) २ धाडसोर तटेखोर, खाष्ट, हट्टी [तु कझाक्–झगाक, चोर, पुंड, रशि कोसॅक]

**कजाखी-गी**—स्त्री १ रानटीपणा, क्रूरपणा, राक्षसीपणा, कजागपणा २ गनिमिकाव्याची जोराची लढाई 'ते फौज कजाखीस व आमची फौज समुख धुजास कामास येईल' –दिमरा १२० ३ कष्ट–अष्टप्रधानाचा इतिहास २४५ ४ ताकद, सैन्यबळ ५ युक्ति, हुनर 'चौकशी पडली असता कजाखी करून नावें न सागता सुटून यावें' –मराचियोरा ३९ ६ पुडाई, चोरी, लूटफाट 'इस्माईलबेग कोठील कोण ऐसें असता ५००० फौज बाळगून कजागी करितो' –रा १० २०१ [तुर्की]

**कजान**—पु नारळाच्या सावळ्या

**कंजार, कंजारी**—पु एक जातीचे लोक कजर पहा –गागा ११९

**कंजारी कंजारीण**—स्त्री १ कंजार जातीची स्त्री या टाळ्या पिटून व अश्लील गाणीं गाऊन भिक्षा मागतात –गागा ११९ १२६ २ (ल) कमं पिनारलेली स्त्री 'कशी कंजारीण आयत्यावेळीं पुढें झाली' –कीन –भाव ११८ [हिं]

**कजावा**—पु १ उंटाचें खोगीर २ उंटाचें वाहन यात बायका बसून जातात [फा]

**कजिया**—कज्जा पहा

**कंजूत**—वि (व) शिवळा बेरड्या

**कंजूष-ष-स**—वि कद्रू, कवडीचुंबक, कृपण चिक्कू [स कर्ण+जुष्, प्रा कण्णझूस?, हिं कंजूस=कानातील मळ खाणारा, कृपण]

**कजेल-ली**—स्त्री कदली पहा

फजेलीवर येणें—क्रि भांडण करणें, मारणें, आरडणें [कज्जा]

कज्जल—पुन काजळ (दिव्यावर धरलेलें) शाभेसाठीं किंवा औषधासाठीं याचा उपयोग करतात, सुरमा कज्जली पहा [स]

कज्जला—वि (व) भांडखोर, फजाग. [कज्जा+ला]

कज्जली—स्त्री १ (वैद्यक) पारा व गंधक एकत्र खलून केलेलें रसायन, काजळी २ काजळासारखें औषध

कज्जा—१ भांडण, तंटा, वैर, वितुष्ट, शिरीगाळ २ (कायदा) वाद, प्रकरण, खटला (विशेषत फौजदारी वाद) ३ लढाई 'कज्जा मोठा घोरधर जाला' —राज ३ १८४ [अर कझिया=प्रतिज्ञा, गोष्ट, फा कझिया=भांडण, तुल० स कार्य-गान्ज] ०टांकून काढणें—भांडण उकरून काढणें ०कटकट-खोकला-भांडण फफावत-तुतली लढ्यामाठें भांडणतंट वादविवाद वितुष्ट विरोध —रा ८ १८३ 'कज्जेफफावती होवीत रस्त्यांत।' (क्रि० करणें, काढणें आणणें)

कज्जाक-स, कज्जाकी-स्त्री-गी—कजाख-खी पहा

कज्जेखोर, कज्जेदलाल—वि भांडखोर, तंटखोर, कळीचा नारद, भांडणें लावणारा, उपस्थित करणारा 'आम्हीं भांडखोर व कज्जेदलाल शास्त्र्यांची अशीं लोकें लावण्यात आल्यामुळें नानासाहेबांच्या वारंवारप्रमाणें आम्हास हि माऊवदकी साधण्याचा हक्क सांप्रत प्राप्त झाला आहे' —माऊ अ २ प्र १

कज्जेदलाली—स्त्री उपस्थित केलेलीं भांडणें, भांडणें लावण्याची वृत्ति, त्याबद्दल मिळणारा पैसा —के ३१ ५ ३० 'ह्यात तेव्हा प्रसंगीं कज्जेदलालीच्या तटेबखेड्यामध्यें रूपमाया सेना पतिसाहेबानीं वादीप्रतिवादींचें काम आपल्याकडे घेणें म्हणजे परमेश्वरी सकताविरुद्ध वागण्यासारखें आहे' —वाय २ २ [फा कझियादलाल]

कज्या—कज्जा पहा —समासद ४८ 'बाकीचा पैसा द्यावा म्हणून कज्या केला।' —एपो २८६

कज्याळ—न (माण) पाण्यांत उगवणारी एक वनस्पति

कट—पु १ जूट, टोळी, संघ, ऐकमत्य 'अलीकडे अशा प्रकारच्या हजारों जुटी किंवा कट युरोपात होऊं लागले आहेत' —आगर ३ ६७ २ वडुकीच्या दस्त्यांत नळी घट्ट बसविण्यासाठीं असलेलें वेढे, कडी, हत्तीच्या दाताना घातलेले कडे, (सामा) वेढे, गेंदी 'वडुकीला कट घडयास नकी' —प्रला ४७ ३ अगावर किंवा कपड्यावर बसलेलें मळाचें पूट, लेप ४ सोंगट्याच्या पटात × अशी खूण केलेलें घर, (ह्या घरामध्यें सोंगटी बसली असता ती मरत नाहीं, तिला कटावर बसली असें म्हणतात) 'हिरवी मारे पिवळी लागे लाल बैसली कटीं। परात राहे पडून काळी तिची गुरगी गति।' —विक ८६ ओगीवोर्नीच्या पैंगेर खेळात एक रंगाच्या चार सोंगट्या ५ तबूच्या किंवा कनातीच्या काठ्यांचीं टोकें बसविण्यासाठीं आणि तंबूचे दोर ज्या जागीं बांधतात ती जागा सुरक्षित राहण्यासाठीं तंबूच्या कनातीला लाविलेली कातडी टोपी, सांपण, (सामा) चामड्याचा काठ, कड, पदार्थांची कड सराव हाल नये म्हणून तिला घातलेली कातडी गोट ६ गडस्थल 'प्रेरिलें भेदाया पति पेंधेंद्रिदाट कटाभ तिनें' —मोसभा ५ १६ ७ अमुक एक परिमाणाचा कडवा बांधण्याची शारी (साडेतीन हात लांबीची) —रारि ८५० ८ आग्रह —रार ४४८६ ९ (अ) सतारीचा पडदा (आ) ज्यांतून सतारीच्या तारा ओवून खुंटीस बांधतात त्या भोकें असलेल्या हस्तीदंती पट्ट्या १० हिरडे व लाखडाचा कीस यांचें मिश्रण (?) ११ विशिष्ट खेळांतील ४ एक्के, ४ राजे, इ० जे मार्काचे सच ते [स कट=आवरण घालणें, आच्छादणें, कन्न तुल० का कट्टु=बांधणें, रचणें, बंधन घालणें] कटास हात लावणें—दवळाची पायरी अथवा उबरठा याला हात लावून विश्वासु राहण्याबद्दल शपथ घेणें, (एखाद्या कार्याबद्दल अथवा गुप्त मंडळीबद्दल), बेलभंडार उचलणें

कट—पु कष्ट, त्रास, दुःख, यातना, वेदना (अव) (क्रि० खाणें, भोगणें) [कष्ट]

कट—पु १ सैन्याचा एक गट, व्यूह, विशिष्ट रचना २ गुप्त मसलत, व्यूह, विमू 'तुम्हाला त्या सर्वांनीं वेगळें टाकण्याविषयीं कट केला आहे' 'आमच्याविरुद्ध पुण्यात कट झालेला आहे कीं नाहीं बोल?' —इप ३७ [का कट्टे=रचना, बांधणी]

कट—पु १ पुरण शिजवून आमटीसाठीं त्यांतील जें पाणी काढतात तें २ काढा कषाय, घाणेरडें पाणी (कपडे धुतल्यानें झालेलें) [का कट्टु=डाळीचा, कडधान्याचा रस]

कट—स्त्री कटि, कंबर 'सुंदर तें ध्यान उभें विटेवरी। कर कटावरी ठेवूनिया।' —तुगा १ 'विटेवरी पाय, कटेवरी हात।' [कटि, कट]

कट—पु कूट गाणें 'कटावरि कट पदावरि प्रवद।' —दावि १६३ [का कट्टु=रचणें (कविता, नाटक इ०), कटाव]

कट—पु. मनाई, थांबविण्याचा हुकूम 'ते जाणोनियां एम्पेर दोरु। लोकांसि कट्ट केला थोरु। म्हणे न करा युद्धअनचा सचारु। ऐसा डांगोरा पिटिला।' —ख्रिपु २ ४२ १३७ [का कट्टु=प्रतिबंध करणें].

कट—पु १ घाव, वार, फटका २ (क्रिकेट) बोलरनें टाकलेला चेंडू आडविणें (डाव्या बाजूस न मारता), दिशा बदलणें (चेंडूचीं) याचे फॉरवर्ड कट, स्क्वेअर कट व लेट कट असे प्रकार

आहेत –व्यायाम १० १९२२ [इं , तुल० स छृत, प्रा कट= कापलेलें, छिन्न ]

कट—पु काळा रग, कीट [स किट्ट]

कट—पु १ (धुत ) कड, दोवट, यानूचा गोट २ (बा ) दोताचा बाध [ कड, बा कट=दोवट ]

कटई—पु चाभारातील एक पोटजात, यातील लोक पड यास कट लावितात कट अर्थ ५ पहा

कटक—न १ सैन्य 'एकीं पाषाण वाऊनि उतरलीं। समुद्र कटकें॥'–ज्ञा १० ३६ 'हें कटक साड तिकड चाल तुझ्या हयनी गोधना राळ तो।'–मोविराट ( नवनीत ) ७१ 'तरी यहुत कटक घेऊन। ज्येष्ठासि धरी तु वेष्टन।'–शवि ३८ १३९ २ कंकण, कडें ( हातातील ) 'परतु मुगुट नव्हे कटक। कडें मुगुट होइचना॥'–यथादी १५५७ 'यश हारविलें सेवे लिति शस्त्रें हार कुंडलें कटकें॥'–मोआदि ३० ३२ ३ छावणी ४ राजधानी [ स ] ०उलगणें–( क ) कार्य पार पडणें म्ह० कटकास गुळवणी=सैन्याला गूळपाणी जसें पुरणार नाहीं तसें ( पुष्कळ पाहुण्याना अपुरें अन्न ). अपुरेपणा ०बंद–वि सैन्या सहित, सैन्यानें सिद्ध 'खान कटकबद केला'–पपो ११ 'कटकबद फावे पुढें कीर्ति धावे।'–दावि ३२३ ०बंध–सैन्य रचना, व्यूह 'वातें घनसा द्रोणें धर्माचा भेदिला कटकबध।' –मोद्रोण १० ४

कटक—पु ( गो ) नारळाचा एक प्रकार

कटक—न कटकी पहा

कंटक—पु १ काटा, वृक्षावरील टोंचायाजोगा अवयव 'कटकशल्यें बाधटलीं। मखमालींची लव वटली।'–कक ( ध्रुपूर्ण ) १ २ माशाच्या शरीरातील हाडाचा सापळा ३ ( ल ) व्याधि, पीडा, दुर्जन, दुष्ट माणूस 'भाविका कटक करि ताती पीडा।'–तुगा १२८९ 'पवित्राला म्हणती नको हा कटक।'–तुगा ४०८ ४ ( ल ) क्रूर, रानटी माणूस ५ चिक्कू, कृपण ६ शत्रु, वैरी, आनि अकटक केलें नृपनय निपुणें सुयोधनें राज्य।'–मोसभा ७ ३ ७ ( शाप ) अग्र, टोंक ( इ ) पाइट. ८ अडथळा, अडचण 'माझ्या मार्गातला तो कटक आहे ' [ स ]

कंटक—वि सोशीक, काटक पहा

कटकई—स्त्री सैन्याचा तळ 'उपरी श्रीरामचद्रकि कट कई।'–वैद्यकवाड ८०. [ स कटक, कटकिका ]

कटकट—स्त्री १ भाडण, कज्जा, तगा म्ह० 'मिया आणि बिबी व कटकट उभी' २ किरकीर, बडबड, गडबड, गलबला, गोंगाट ३ युद्ध 'दळीं केला कटकट।'–दावि ४९६ –पया १०७ ४ त्रास, पीडा, भुणभुण 'नेणती वैकुठनायका। वृथा कटकट करितातीं।'–ह १६ ६४ 'काशी केली वाराणशी कली तरी कपाळाची कटकट नाहीं गेली' ५ पासाधीस, तक्रार ( क्रि० करणें ) ६ आवाज ( घड्याळाचा ), किटकीट, काहीं त्रासाचा, रागाचा शब्द [ ध्व कट् , सिं किटकिटी ]

कटकट—उद्गा दु खोद्गार अरेरे! हायहाय! कटकटा पहा 'अहा कटकट! ते काळीं'–एभा १० ४२५ आहाकटा पहा

कटकटणें—अक्रि १ ( कों कु ) चुरचुरणें, ठणठणणें २ स्वत विषयीं त्रासणें, स्वत वर रागावणें, वैतागणें ३ कलकल करणें ४ कटकट करणें, त्रासाचा, रागाचा आवाज करणें [ कटकट ]

कटकटा—उद्गा ( काव्य ) दु ख, त्रास, असतोष याचा उद्गार, दैवाला दोष लावताना काढलेला उद्गार, हायहाय! हा नशीबा! प्रारब्धा! 'एथ अर्जुन म्हणे कटकटा।'–ज्ञा ११ ४५२ 'मग म्हणे गा कटकटा। किंनी करू गे आहाकटा। मर मर विधातया दुष्टा। काय अदृष्टा। लीहिलें॥'–एरुस्व ५ ६१. 'यमसम यम समरीं हे पाहुनि म्हणतील तु कटकटा कीं' –मोउद्योग ४ ६ [ स ]

कटकट्या—वि कटकट करणारा, किरकिऱ्या, तुसडा, चिडका, भाडखोर [ कटकट ]

कंटकत्वक्—पु ( प्राणि ) ताराकृति प्राणी, या वर्गातील प्राण्याच्या कातडीवर काट्यासारखे केंस असतात –प्राणिमा १३६ [ स ]

कटदृ–कन–कर–दिशीं—क्रिवि पट्दिशीं मोडण्याचा आवाज ( घट दोरी, काठी इ० चा ) होऊन, कट् असा आवाज करून [ ध्व ]

कटकरणें—अक्रि १ ( बे ) तुटणें ( दोर, काठी इ० ) 'दोर नवा करकरीत बाजारातुन आणला पण पाणी ओढताना कटकला' २ ( व ) हूं कीं चू करणें [ कट् करणें ]

कटका—पु ( हिं ) तुकडा, कुटका ( भाकरीचा ) [ ध्व, कट् ]

कंटकारी—स्त्री १ रिंगणी २ सावरी ३ बेहकळीचें झाड. [ स ]

कटकी—स्त्री दालचिनीच्या पानासारखें पान असलेलें, १२।१५ फूट उचीचें चिवट झाड याचें फळ लहान असुन मुलें त्याचा नळींत घालून बदुकीप्रमाणें आवाज करतात

कटकी( खण )—पु अपुरा, ( तीन खणी किंवा घडी ) कनाटकी खण, हा दक्षिणी बायकाना चोळीला पुरत नाहीं, थोडा जास्त ( एक घडी ) घ्यावा लागतो

कटगर–घर—न ( व ) १ लाकडी कठडा, कटारा, कुपण, कुडण २ घराभोंवतालचें कपाउड, कुपण [ स काष्ठ+गृह, हिं कटघरा–गरा ]

**कटंजन, कटिंजन**—न १ कठडा (नक्षीदार), गराडा, गराद (दार, खिडकी, गाडी, पलंग इ० काचा), कपाउंड (घाटा भोंवतालचें), कामटयाची उभी-आडवी जाळी, जाळीदार काम २ अर्धी जाळी किंवा भिंत घातलेला ओटा ३ (माण) पिंपळ, औदुंबर वगैरेंच्या भोंवतालचा पार ४ देवळाभोंवतालची प्रदक्षिणेची वाट, कटांजन [स काष्ठ+जनित]

**कटणें**—अक्रि १ अतिशय मळणें (शरीर वस्त्र इ०), मळ बसणें, किटणें २ एखाद्या गोष्टींत निपुण, तरबेज तयार होणें ३ विटणें, नकोसें होणें, किटणें 'तेंच तेंच रडगाणें एकून कान कटले' [कट]

**कटणें**—अक्रि अतिशय मेहनत करणें, निवापाड श्रम करणें [कट]

**कटणें**—अक्रि १ (हिं) लढाईंत ठार होणें, जायबंदी होणें, एखादा अवयव तुटणें, कापला जाणें 'त्या युद्धांत हजारों माणसें कटलीं' २ कापलें जाणें, कापणी होणें (शेताची) ३ कमी होणें (खर्च, पगार, मजुरी इ०) काट मारली जाणें ४ कष्टानें जाणें, कसातरी निघून जाणें (दिवस, इ०) 'असें नसतें तर महेंद्राच्या घरामध्यें ती रात्र कटतीना!' -पप्र १८० ५ (ल च) खजील होणें, शरमिंधें होणें ६ तुटणें, छाटलें जाणें [ध्व कट् हिं कटना=कापलें जाणें, तुल० इ कट्] **कटून करणें**-झटून काम करणें **कटून मरणें**-अखेरपर्यंत लढाई करून मरणें, हात, पाय इ० अवयव तुटून जाणें लढाईंत कापलें जाणें 'कटून मरावें खरं असा धर्म क्षत्रियाचा। करें रहा म्हणनीस घरीं डाग लागल जन्माचा।' -होला १६७ **कटून लढणें**-पुष्कळांना मारीत मारीत लढणें, मोठ्या शौर्यानें लढणें

**कटतर**—न (विणकाम) खाटसरी पहा

**कटता-ती**—पुस्त्री मालाच्या पोत्यांत ज्या प्रमाणांत भोंगा (पाकळपणा) किंवा खोका असेल त्या प्रमाणांत त्या मालाची किंमत कमी करणें नुकसानभरपाई (पल्ल्याच्या भावानें), कडता पहा [कटणें]

**कटतें व्याज**—न तुटक मुदतीचें व्याज, कटमितीचें म्हणून (मुदतीच्या आंत सुद्धा) ज्या मितीस परतफेड होईल तेथपर्यंत तेंच फक्त मितीवार आकारलेलें व्याज

**कटदोरा**—पु कमरेभोंवतीं बांधावयाचा चांदीचा, सोन्याचा, रेशमाचा, अगर साधा दोरा, गोफ, साखळी, करगोटा, करदोडा, कटिसूत्र [स कटि+म दोरा, कटित्र-कडतर-कडदर-दोर-दोरा]

**कटपट**—पु कमरेचें वस्त्र (धोतर, लुगडें) 'कटप्रदेशीं कटपटा' -वेसी ९१६ [स कटि+पट]

**कटपट्टा**—पु नळी घट्ट रहावी म्हणून बंदुकीभोंवतीं असणारें वेढें, कडी 'बंदुकीला कटपट्यास नक्षा।' -ऐपो २१७ कट अर्थ २ पहा

**कटबंद**—पु गाडीच्या चाकाच्या तुंब्यावरील आंतील बाजूची कडी, पट्टी, बाहेरील बाजूच्या कडीला नोंहबद म्हणतात [कट]

**कटबंद**—पु कडदोरा, कटिबंध 'कटबंध कौपीन अंग वसन' -दावि २५३ [कटि+बंध]

**कटबंद**—पु श्लोक; कटिबंध पहा 'कटबंद बदले दासवरी' -दावि ७८७ [का कट्टु=रचणें, कट=कटाव+बंध]

**कटमस्त-ता, कटमस्तान**—वि (हिं) १ धिप्पाड, गलेलठ्ठ, गबदुल, धष्टपुष्ट, पेंढर २ चढेल, मस्त, आडदांड ३ (व ना) हाडापरानी मजबूत, सशक्त, बळकट 'बायको कटमस्त आहे' [हिं कट+मस्त]

**कटमिति-मुदत**—स्त्री व्याजाच्या हिशेबाचा एक प्रकार (ह्यांत कर्जाची रक्कम व्याजासह जसजशी फेडली जावे तसतसें मुद्दल कमी कमी होत जातें), दुगमिती-मुदत (तृतीयांत, षष्ठ्यंत प्रयोग-**कटमितीनें, कटमितीचा**) [हिं कट+मिती=तिथी]

**कटर**—वि १ कापण्याचें यंत्र (फोटोच्या बाजू इ०) २ कपडे कापून बेतणारा (शिंपी) 'कपडा उत्तम होणें हें सर्वस्वी कटरवर अवलंबून आहे' [इ]

**कटरा**—पु (हिं) चौक (शहरांतील), बाजार, किल्ल्याची बाजारपेठ [कटा]

**कटरी**—वि (चांदा, ना) ठेंगणा, लहान

**कटलरी**—स्त्री चाकू, सुऱ्या इ० लोखंडी हत्यारें व तीं करण्याचा धंदा, कारखाना [इ]

**कटला**—पु कत्ता पहा

**कॅटलाग**—पु १ (इ) शाळेंतील मुलांचें हजिरीपत्रक २ याद यादी, जंत्री, टिपण, फेरिस्त ३ माहितीपत्रक, अनुक्रमणिका, सूचिका -क १६ ४ २३

**कटवट**—स्त्री कमरेची किंवा मांडीची बाजू 'तिया आदव्ता कटवटीं। आदवळें वीर्य।' -कथा २ ५ ६६ [स कटि+वर्ती]

**कटवणा**—स्त्री पाथरवटाचें हत्यार, दगडफोड्याची पहार (सासा) पहार 'कटवणीनें जमीन खोदली' [का कटि=टाकीनें दगड फाडणें]

**कटवणी**—न १ शिजविलेल्या पुरणांतील आमटीकरितां काढलेलें पाणी कोणत्याहि शिजविलेल्या उसळीचें पाणी काढून त्यांत ताक घालून केलेलें मिश्रण, कढ २ गढूळ, खराब, मलिन पाणी (कपडे वगैरे धुतल्यामुळें झालेलें) [का कट्टु म कट+वन=पाणी]

**कटवणें-विणें**—अक्रि (व) खजील करणें 'त्या प्रसंगीं बापूनीं त्याला चांगच कटवला' -उक्रि १ कमी करणें, कापणें.

'प्या दिशोप व्याज कटवा जी ' –होला १४३ २ ताडणें, छाटणें 'मी ती पावडी कटविली ' [ कटणें ]

**कटवा**—पु (व ) वेहळीच्या लाकडाची मोठी टिपरी हिनें मुलें खेळतात 'त्याच्याकरितां कटवा आणला नाहीं ' [ कटणें ]

**कटसरी**—स्त्री (गो ) कडोसरी कनवट–टी पहा

**कटा**—उद्गा हाय हाय ! कटकटा ! कटकना पहा 'कना मिया चाटिग। गुचस्वेदु।' –ज्ञा १३ ५३९ 'भूप म्हणे कटा पोटा महद्भूत आलें कैचें।' –दावि ४९०

**कटा**—पु कटा पहा

**कटा**—पु १ (हिं ) वध, हत्या, कत्तल, कापाकापी, ठार मारणें –होके १८ 'सपूर्ण कटा जाला ' –शिदि २९ २ रत्न पुतांचा जोहार [ कटणें ]

**कटाई**—१ (व ) शेताची, पिकाची कापणी २ कापणी करिता दिलेली मजुरी [ हिं ]

**कटाकटा**—उद्गा कटकटा पहा 'म्हणती नाडलों कटा कटा ' –रास २ २९

**कटाकटी**—स्त्री काटाकाटी १ सर्वसाधारण छाटाछाट, कपात (विविध बाबी, वेतन इ० ची ) २ (गु ना ) भाडण, कटकट [ कटणें द्वि ] **कटाकटीनें**–क्रिवि जेमतेम, ओढून ताणून, सरासरी

**कटाकय, कीटाकोय**—(गो ) कोकिळ पक्षी [ हिं कोयल, म कोयाळ ]

**कटाग्नि**—पु. अपराध्याच्या अगाला गवत बाधुन त्याला आग लावून जाळण्याची शिक्षा [ स कट=गवत+अग्नि ]

**कटाचूर**—वि १ (व ) पुरेपूर 'सुधारायाला कटाचूर दोन महिने हवेत ' २ (माळवी ) दोन दणारा दान घणारा

**कटाजन**—न कटजन पहा

**कटांदर**—पु (कु ) कद काढेचोर कलदर कलिंदर पहा

**कटाप**—पु (गो ) उपाय, इलाज 'कटाप चलप ना

**कटाप**—वि (पत्त्याचा खेळ ) खलास, नास्तिरूप अभाव रूप (क्रि० करणें ) 'त्यानें किलावर रग कटाप केला ' [ इ कट् ऑफ ]

**कटापार**—क्रिवि काटयाबाहेर कटयापार–पलीकडे परि पद्रिकाश्रमी बद्रीतरु । त्यातें वर्णिता नसे पारु । कीं वाट दावी कटापारू । तयामाजीं रिघाल्या ॥ ' –नव १२ १७७

**कटायी**—कटई कटाह पहा

**कटार-ट्यार**—स्त्री १ सरळ व एक हात लाबीचें दोन्ही बाजूला धार व पुढें चिंचोळें टोंक असलेलें, पोटात खुपसण्याचें एक हत्यार, हें कमरेला खोंवतात 'तरी बायाचि कां बाधावी कटारें।' –ज्ञा ४ २३३ 'काटती मार्जीच्या कटारा। उभयाच्या कापिती शिरा।' –कथा ३ १० १५० २ कापडावर कट्यारीसारखी काढलेली वेलबुट्टी ३ (ल ) दहशत, भीति, धास्ती, अतर्यामी होणारें दुःख, आधि, मानसिक यातना, मनाला सतत बोंचणारें दुःख 'इमजाचे उरावर कट्यार राहील ' –पया २५६. ४ अधिकाराचें एक चिन्ह, स्वराज्यात मोठ्या अधिकाराचीं वस्त्रें देताना शिक्केकट्यार सरकाराकडून मिळत असे 'शिक्के दउत पट कटार दुसरी करा ' –ऐपो ३०५ [ स कटार, दे कटार कटारी हिं गु कटार, सिं कटारो ] ०जिवाला असणें–लागणें–अतिशय दुःख काढणें, मनाला अतिशय काळजी लागणें, कट्यारीप्रमाणें दुःख, चिंता बोचत राहाणें ०उरावर–जिवावर–टाकणें–(कर्ज, अपरिहार्य कर्तव्य, पाशाची भीति, जबाबदारी इ० च्या ) कचाट्यात सापडणें, नेहमीं आगामी सकटाच्या काळजींत असणें 'इमजाचे उरावर क० राहील ' –पया २५६ ०लावणें–टोंचून बोलणें, निंदा करणें ०आरी–स्त्री (चाभार ) काट्याची आरी, हिनें सुई शिवाय खालींवर दोरा आणता येतो ०काठ–पु (कापडाचा ) कट्यारीप्रमाणें काढलेला काठ ०बाह–हा–वि कट्यारवाला, कट्यार बाळगणारा (शिपाई ) 'बाहाणी लाविती कटारबाहें –उपा १११०

**कटारा**—पु कठडा, गरादा [ स काष्ठ+धारक, प्रा कट्ठहारय, हिं कटहरा=कठडा ]

**कटारा, कटारीदार**—वि १ कट्यारीसारखे पट्टे, वेलबुट्टी, शिवण असलेलें (कापड, चीट इ० ) 'चोळी अजिरी जरिकाठाची रग कटारी नवा।' –पला ४ २१ २ कट्यारीप्रमाणें वीण असणारा (गोफ दागिना, शिवण इ० ) –स्त्री १ लहान कट्यार २ डोंगरकडा, कपार, बाजू 'डोंगरकटारीच किल्ल ' –शिदि २८५ –शे ७ १५९ [ कटार द कटारी ]

**कटाव**—पु १ व्यवस्थित बाधणी, डौलदार रचना, थाट, मेळ, दखावा (सैन्य परिवार इ० चा ) –शिल्पवि ५३९ २ (ल ) आगापछीरपणा भारदस्तपणा, प्रौढपणा (भाषण, निबध इ० चा ) ३ व्यवस्थितपणा तरतरीतपणा, भपका (पोषाख, चेहरा चाल ठराव इ० चा ) ४ सघ कट, जूट 'आनद घटाव ब्रह्म कटाव । थोर भिगाव हे गुरु कृपा।' –दावि ३१३,४७६ ५ एक प्रकारचा कवितेचा छद कटावाची कविता, ही एक धावनी रचना असून यातील गटाच्या पक्तीची सख्या निश्चित नसते अमृतरायकवीन या छदात बरींच पदें केलीं आहेत कटिबध पहा ६ (ल ) कत्तल लढाईतील जोराचा हल्ला 'कटाव करीत चालले जेव्हा तिराचा मार बसविली ॥' –ऐपा २७८ [ स कृत् अर कट=आकार, रूप, कापणी (कोट इ० ) ची ] ०गरी–स्त्री घालून

पाडून बोलणें 'बहुतचि बोलिला कटावणीनें' -दावि १८४

**कटावणी**—स्त्री. १ व्याजकटावणी, कटमिती पहा २ कटि बंध पहा ३ कटवणी पहा

**कटास**—पु कष्ट, त्रास, संकट (अन्न वस्त्र, घरदार इ० च्या अभावामुळें), काबाडकष्ट, दुःखेशशी, अगमाड (आजारी, त्रासिक, असंतोषी माणसाच्या शुश्रूषेमुळें, श्रमामुळें होणारी) (क्रि० काढणें, सोसणें, निघणें)

**कटासणी-णें**—उक्रि कटासणी-णें पहा

**कटासणें**—अक्रि १ त्रास, संकट सहन करणें, हाल सोसणें [कष्ट] २ दमणें, थकणें, भागणें [कटास]

**कटासन**—न दर्भ मोळ किंवा गवत याची एहानशी एका माणसापुरती चटई, तृणासन, दर्भासन [स] ०घालून बसणें-१ तपश्चर्या करणें २ (ल) तपश्चर्येचें ढोंग करणें

**कटाह**—पु कढई, कटायी (कढई उलटी केली असता तिचा आकार आतून आकाशासारखा दिसतो वेदांतात ब्रह्मकटाह, अंड कटाह अशी आकाशास उपमा दिलेली असते) 'तेथें ब्रह्मकटाह शतकूट। हो पाहत असे॥' -ज्ञा ११४७ [स]

**कंटाळ**—पु. १ कंटाळा, थकवा २ वीट, शिसारी, तिर स्कार कंटाळा पहा ०खोर-वि कंटाळा करणारा, आळशी, टिवल्याबावल्या करणारा, सुस्त [कंटाळा+फा खोर=करणारा] ०वाणा-वाणी-वि कंटाळा आणणारा, त्रासदायक [कंटाळा+वान]

**कंटाळणें**—अक्रि १ त्रासणें, दमणें, भागणें २ आळसणें ३ शिसारी येणें, विटणें [स कठ् (=कृच्छ्रजीवने)-कट-काटाळणें -भाअ १८३२, स कंटकिल, प्रा कटइल? -काटाळ]

**कटाळा, कंटाळा**—पु १ थकवा, क्षीण भाग (क्रि० येणें) २ अरुचि, वीट, चिळस खंती, शिसारी (क्रि० येणें) 'पापा जयाचा कंटाळा।' -ज्ञा १६४१९ ३ आळस ४ भय त्रास, कांगाव्या पहा 'का हातीं घेतलिया माळा। फिटे सर्पा भासाचा कंटाळा।' -ज्ञा १५५६० [कगळणें]

**कंटाळ्या**—वि लवकर त्रासणारा कंटाळणारा (काम करमणूक, धंदा, इ० स) [कंटाळा]

**कटाक्ष**—पु १ डोळ्याच्या कोपऱ्यातून पाहणें (साभि प्रायान) अपांगदर्शन-दृष्टि, डोळा घालणें, मारणें, वाकडी दृष्टि 'काय चंचळ मासा। कामिनीकटाक्षु जैसा।' -ज्ञा १४१७० २ (ल) व्यंग्यार्थाचें भाषण, छद्मीपणा, उपरोधिक भाषणाचा रोख ३ दान राग वैर 'जेव्हा तेव्हा त्याचा माझ्यावर कटाक्ष! मी काय त्याचें असें घोडें मारलें आहे?' ४ क्रोधदृष्टि गैरमर्जी 'त्यानें माझ्याकडे कटाक्षानें पाहताच मी ग्यालों' ५ मुद्दा जोर, रोख, कल, प्रवृत्ति 'मोटमोठ्या रसिकाचादि वरीलप्रमाणें कटाक्ष आढळेल' -नि 'गीतेचा सर्व कटाक्ष याच तत्त्वावर आहे' -टि ४५२३ [स]

**कटाक्ष**—वि काटक, सहनशील (शरीर, माणूस) 'मेंढरापेक्षा बकरें कटाक्ष असतें' -मराठी ३ रें पु (१८७३) ११८ -पु कणखरपणा, सोशिकपणा, (श्रम वगैरेचा) काटकपणा [स काष्ठ+भक्ष=मांस, प्रा कट्ठ+भक्ष?]

**कटि**—स्त्री १ कंबर, देहाचा मध्य भाग माजी २ कड (कडेवर घेण्याचें ठिकाण) 'कर कटीवरी ठेऊनिया।' ३ (नृत्य) नृत्यामध्यें कटिकर्में पाच आहेत -कंपित छिन्न, विवृत्त, उद्वाहित, व रेचित [स] ०कांची-कमरपट्टा 'कटिकांचीवरी हिरे थोर। जैसे दिनकर जडियेले॥' -राधि ८४९ ०छिन्न-न (नृत्य) दोन्ही हात दोन्ही बाजूस वर उचलून पताकाहस्त करून मनग टात सैल करून कंबर पुढें मागें हलविणें ०तट-न कंबर ढुंगण कमवट 'बरी नादनटी तिला कटितटीं खोवोनि पोटीं धरी।' -वामन, वनसुधा १८ ०स्नान-न (गो) कमरेपर्यंतचें स्नान ०बंद-वि १ कटबंद पहा २ संयमी, ज्यानें कामविकार आटोक्यांत ठेवला आहे असा (पुरुष, स्त्री) ०बद्ध-वि १ कंबर कसलेला २ तयार (क्रि० होणें, असणें) ०बंध-पु १ कंबरपट्टा, कटिबंद, मेखला, कांची २ भूमेखला, भूवलय, पृथ्वीच्या गोलावरील वातावरणाचा कल्पिलेला पट्टा, प्रांत, अयनवृत्तें आणि ध्रुववृत्तें याच्यामुळें झालेले भूपृष्ठाचे भाग, हे पुढील प्रमाणें आहेत -१ उष्णकटिबंध-कर्कवृत्त आणि मकरवृत्त यामध्यें (४७ अंश) आहे यात उष्णता फार असते २ समशीतोष्ण कटिबंध-अयन वृत्त आणि ध्रुववृत्त याच्यामध्यें (प्रत्येक ४३ अंश) आहे उत्तरेकडील तो उत्तरसमशीतोष्ण आणि दक्षिणेकडील तो दक्षिण समशीतोष्ण यात उष्णता व थंडी समसमान असते ३ शीत कटिबंध-ध्रुववृत्त आणि ध्रुव याच्यामध्यें (प्रत्येक २३॥ अंश) आहे ह्यात थंडी फार असते ३ कटाव, विशिष्ट प्रकारची पद्य रचना ०बंधन-न कंबरपट्टा, करदोडा 'कटिबंधनें, अगझोल परिधानपीतांबर प्रावरणें हे सामग्री आणावी' कटिबंध पहा ०भ्रांत-न (नृत्य) उजवा पाय सुचीकरून मग अपविद्ध करणें प्रमाणें करून कटिरेचित करणें ०वात-पु कंबरेंत शिरणारा वात, कंबर धरणें ०शूल-पु (ल) अतिशय कामवासना, विषयल ंपटता (पुरुषाबद्दल वापरतात) -शूलाची व्यथा-स्त्री बाहेर ख्यालीपणाचा छंद ०संधी-स्त्री प्रत्येक गात्राचा आदिम भाग (इ) बॉक्स? ०सम(करण)-न (नृत्य) पायांचें स्वस्तिक करून पाय काढून वेग व दोन्ही हात कटीवर ठेवणें व कमरेची एक बाजू थोडी वर करणें ०सूत्र-न करगोटा, करदोडा, कंबरपट्टा, कटिबंद [स] ०स्नान-कटिस्नान, पायापासून कंबरेपर्यंतचें अंग धुणें, स्नानाचा एक प्रकार

२ (ल) दासीपुत्र ३ (ल) पखिचाहा, हलक्या जातीचा, बहिष्कृत माणूस ०भोपळी-स्त्री कडू भोपळ्याची वेल, कडू भोपळा अर्थ १ पहा -दो ९ २३६ ०वट-टु-वि (काव्य) कडवट पहा 'कैलासवा कडुवट। उमावा तुरट।' -शिशु ६१५ 'जैसा निंब जिभे कडुवटु।' -ज्ञा १८ १८६ 'कडुवट हरिनामे वाटनी पापियाला।' -वामन, नामसुधा १४ ३४ ०वाघांटी-स्त्री कडवट फळें येणारी एक वनस्पति, आषाढी द्वादशीस हिच्या फळांची भाजी करतात ०विख-वि कडूजहर, विषाप्रमाणे कडू ०विटाळ-पु १ मृताशौच, सुतक २ बाळंतपणाचा विटाळ, बाळंतिणीला येणारा दहा दिवसाचा विटाळ, जननाशौच (क्रि० येणें, जाणें, सरणें, फिटणें,) ०वृंदावन-न कडू इंद्रायण पहा 'कडू वृंदावन। साखरेचें आळें।' -तुगा

फंडुलो-पु (गो) १ लहान कंडुडो २ (ल) मोठें पोट

फडुवा-वि कडवट, दु खकारक कडवा पहा 'कडुवा ससार दु खाद। दारें नीगवु दिसें॥' -शिशु ५८७ [स कटुवत्]

फडुवाळ, फोडवाळ-(गो) कडू मासळी [स कटु+ व्याल, प्रा वाल]

फडुसा-पु (माण) सधिप्रकाश [कवडसा]

फंडू-पुस्त्री १ खाज, खाज सुटण्याचा रोग २ खाल्ल्यावर किंवा स्पर्श केल्यावर खाज उत्पन्न करण्याचा धर्म (वनस्पति, भाजीपाला यांचा) ३ (ल) शिरशिरी, खुमखुम, उत्कळा, आवेश, ईर (लढाई, भाडण इ० ची) 'जेसु तुवां उत्तमु प्रेत्नु केला। महापवित्रु धावतिस्रु रचिला। तेंणे पापाचा कडु फेडिला।' -शिशु ११३८ ४ मस्ती, माज, चळ 'घोडयाला नगाऱ्या-खालीं घाला म्हणजे त्याची कडू जिरेल' ५ कोरडी खरूज [स]

फडून-शम १ पासुन 'त्याकडून रुपये घ्या' २ दिशेनें, बाजूनें 'हा हिंदुस्थानाकडून आला' ३ करून, नें, वारी (साधन दाखविणारें अव्यय) 'त्यानें शस्त्राकडून मारलें' ४ करवीं, द्वारां, परत्वें, मार्गानें, मुळें, साहाय्यानें, मदतीनें, क्या योगानें (प्रयोज्य कारण दाखविणारें) 'मी त्याकडून घर बाधवीन' 'पर्जन्येंकडून सर्वांस सुख होतें' 'विचारें कडून' -पया ८७ [वा कड, कडे]

फडूसें-न (क) सधिप्रकाश, कडुसा पहा 'आता कडूसें पडलें आहे'

फडे-शम १ बाजूला, दिशेला 'हातीं धरुनि तियेसी। कडे काढी व्योमकेशी।' -गुच ३२ ११० 'यदा तुमच्या कडे धारण कशी आहे?' २ पाशीं, जवळ, ताब्यात, हातात हाताखालीं, दिमतींत, व्यवस्थेत 'त्याजकडे शभर शिपाई आहेत' ३ आत, खालीं, सबधीं, निसबत 'हा पागेकडे चाकर आहे' ४ हवालीं, स्वाधीन (करणें, देणें) 'ज्याचें त्याकडे दे' घाको २ १२ ५ पक्षाला, बाजूला 'सरदारांनीं तलवार मारावी, परतु यश धन्याकडे,' 'कौरव-पाडवाच्या युद्धात श्रीकृष्ण पाडवाकडे गेला' ६ हातांत, पाशीं, जवळ 'त्याकडे माझे रुपये आहेत' ७ (ल) पलीकडे, पार 'स्वामी तारका गुरुनाथा। ससारसागराकडे लावी।' -गुच ४५ १०६ ८ जबाबदारी, पत्कर 'हें काम माझ्याकडे लागलें' ९ (कुण) काळ, वेळ यासबधीं निरर्थक अव्यय, स, ला 'तू उद्याकडे मला भेट' [का कडे, म कड]

फडे-क्रिवि (काव्य) कडेवर, कमरेवर 'विवाहहोमालागीं श्रीहरी। वेगें चला वोहल्यावरी। कडे घ्यावी नोवरी।' -एरुस्व १६ ११. 'कडे शिशु तयास घे कवळोनि माता कडे' -केका १२१ [स कटि]

फडें-न १ हातात पायात किंवा दडात घालावयाचा एक वाटोळा कंकणाकृति अलंकार २ (ल) वेढा, घेर, भोंवताली घेर, सभोंवतालीं वर्तुळाकार रांग (सैन्य, डोंगर इ०ची) 'भोंवतें आवर्णो दक्ष कडे।' -दा १६ ३ १० 'जमलें भ्रमराचें हो कडें।' -रत्न १० 'कठिण दिवस म्हणून कुणब्यानें पितराला एकाद-दुसरा जातिबाधव सांगितला कीं दारापुढें माहाराचें कडें पडतें' -गागा १०३ ३ विहिरीच्या तळचा लाकडाचा गोल थर (ज्यावेळीं खालीं धर लागत नाहीं त्यावेळीं कडें घालून त्यावर बाधकाम करतात) ४ पोवाडे गाणाऱ्याचें एक चर्मवाद्य, डफ, हें लाकडी एक-सव्वा हात व्यासाचें कडें घेऊन त्यावर चिक्कण मातीनें कातडें चिकट वून व चौफेर कागदपट्टी लावतात 'रामजोशी यांनीं आपल्या वयाचीं वीस वर्षे तमाशा पाहण्यात व कडें वाजविण्यात घाल विलीं' -राला २ ५ (ल) बडीस पायात अडकवावयाचीं वलयें असतात तीं प्रत्येकीं (सामा) वेडी 'माझे भक्तीचिया आवडीं। अह सोह दोनी कडीं। तुम्ही अभिमानाची बिडी। विषयगोडी निमाली।' -एभा १४ ३११ ६ (व) (ल) गुदद्वारातून पडणारें ऐंडक ७ वर्तुळाकार काठ सीमा कड (तरोरा, चाळण इ०ची) ८ खळयातील धान्य बाहेर जाऊ नये म्हणून त्याभोंवतीं वेलींचें किंवा गवताचें घातलेलें वेटोळें १९३० ९ मोट ज्याला बाध तात तें लोखडी गोल वलय [स कटक, प्रा कडअ, गो कु चि कडां]

फडेकपाट-र-न १ दरड व गुहा, दरीखोरें गिरी गव्हर डोंगरांतील खबदाड, खोरें, दरीकदर, गुहा, भुयार (प्रथमेंत क्वचित प्रयोग बहुतेक कडेकपारात, कडेकपारीं असेच प्रयोग आढळतात) 'कडेकपारीं धावती जनें।' -सप्र ३ ३४ २ (ल) दुर्गम, अवघड ठिकाण 'कडेकपारीं जाऊनि। महासोदे दडाले।' [कडा+कपाट]

फडेकाठ-पु १ शेवट, बाजू २ लांब, दूरवर (सामा) कडेकाठास, कडेकाठेस असेहि प्रयोग आढळतात [कड+काठ]

**कडेकोट**—वि कडाकोट पहा

**कडेपाट**—पु कडीपाट पहा

**कडेल**—न रेशमी लुगडें [स. कटि, दे कडिल्ल=कटिवस्त्र]

**कडेलग**—क्रिवि अगदीं शेवटाजवळ 'जेय हृदियें साडिती होडा। कडेलग॥' —ज्ञा ६ ५६. [कड+लग=पावतों]

**कडेलाट**—पु १ कडेपात, मुक्ति मिळण्यासाठीं योग्यानें कड्यावरून घेतलेली उडी, अपराध्यास कड्यावरून लोटून देणें, अशी दिलेली शिक्षा (क्रि० करणें) २ (ल) परमावधि, शिकस्त, अतिरेक, कमाल (पाऊस, पीक, संपत्ति कृति इ० ची) (क्रि० होणें) 'ही (जॉन्सनची) प्रमावस्था स्थाईक होऊन मुळींच गापत्र बुद्धिभ्रश होईल कीं काय याची त्यास अतिशयित भीति वाटे पण या कडेलोटावर गोष्ट यऊन ठेपली नाहीं' —नि ७०२ ३ (ल) ऱ्हास, अध पात, उतरती कळा ४ पराकाष्ठेच्या तिर स्कारानें वागविणें ५ घालवून देणें, काढून टाकणें (जागा, अधिकार, इ० वरून) ६ शेवट करणें —वि खालच्या प्रतीचा, दर्जाचा, हलका (माणूस, वस्तु) [कड+लोटणें]

**कडेवाला**—वि कडें (वाद्य) वाजविणारा, तमासगीर, डफवाला [कडें]

**कडेशेवट**—क्रिवि कमींत कमी, कांहीं नाहीं म्हटलें तरी, सरतेशेवटीं, पराकाष्ठा, कड शेवटीं, कडे शेवटचा असेहि प्रयोग आढळतात 'मी तुला कडेशेवटची गोष्ट सागतो' [कड+शेवट]

**कडेशेवटचा**—वि १ अगदीं अखेरचा, अंतिम, अगदीं कडेचा, सीमेचा २ पराकाष्ठेचा (मूर्ख, वृद्ध, दुर्दैवी इ०) ३ अगदीं शक्य तों कमी (किंमत, खर्च, नफा, इ०) 'कडेशेव टचा उपाय-उपचार-मसलत-योजना-तोड-मनसुबा इ०'

**कडेस-सी**—शअ कडेला, बाजूस कडे पहा 'बापाच्या उजवे कडेसि बसली म्या पाहिली नोवरी।' —र ६

**कडो, कोडो**—पु (गो) भात ठेवण्यासाठीं तट्या वगैरे लावून केलेली जागा, कणगा [कडा]

**कडो**—पु (गो) काढा [कढ, कढणें]

**कडोकडा**—क्रिवि १ जोरानें, नेटानें झपाटयानें कडो विकडी पहा 'आले अवघे नवलक्ष गडी। बळकाविली यमुनाथडी हमामा घालिती कडोकडी।' —ह १० ९५ —दावि ४९२ [कड]

**कडोजी**—स्त्री एक वनस्पति, कुत्र्याचें मूत

**कंडोरा**—पु (कों) उसाचा करवा, गंडेरी [स कांड, प्रा कड]

**कडोविकडी**—स्त्री (कड्यात कड्या, त्यापासून झालेली गुतागुत) १ भाषणातील डावपेंच, (ज्यांत मुद्दापत्ता लागणार नाहीं असें) अनिश्चितपणाचें व खाचाखोचीचें भाषण, दुटप्पी बोलणें, (कडोविकडीचा असा पद्यर्थत प्रयोग रूढ आहे) २ (कुस्ती) पेंच, कौशल्य 'मल्लविद्येच्या कडोविकडी। जीमूती दाविता पडेपाडीं।' —मुविराट २ ६८ ३ युक्त्या, खुब्या, मसलती 'तवीं उत्तमोत्तम ज्ञाननिर्वडी। उद्धव कडो विकडी पुसारिला।' —एभा २८ ६९८ —वि उत्तम, व्यवस्थित, बंदोबस्तीचें 'राखण ठेवी कडोविकडी।' —कथा १ ० १७८ —क्रिवि १ अति जोरानें, झपाटयानें निग्रानें नेटानें 'शंखें सुरतील गार्दी। वीर भिडतील कडोविकडी।' —एरुस्व ७ ७४ —दा २० ८ १९ २ नाना प्रकारानी, रीतींनी —एभा १५ २५ 'पुच्छ नाचवी कडाविकडा' —दावि २० ४९ ३ दुटप्पी, खुबीदार भाषणें करून, मोठया युक्तीच्या बोलण्यानें **—डाचा**—वि १ कडोविकडीनें भरलेल, केलेले (भाषण, अर्थ, कल्पना, लिहिणें, गाणें, नाचणें, वाजविणें इ०) अन्योक्तिव्याजोक्ति-व्यगोक्तीचा, उपरोधिक, औपरोधिक 'कडोविकडीचे विचार सुचले।' —ऐपो २१४ २ युक्त्या, मसलती, डावपेंच यानीं युक्त (क्रिया, हावभाव, वाग्युक्‍इ०) शिताफी इ० नें भरलेलें 'कडोविकडींचीं निवरावीं। अत कर्णे॥' —दा ११ १० १० ३ खुबीदार, कुशल, चतुराईनें अलकृत, झील, कप, आघात, छाया, उडणी, झोक इ० नें भरलेलें (गाणें, नाचणें, वाजविणें) 'टेवी कडोविकडिची ठिवण हा। अक्षरीं मोत्याची ववण। ल्य लाऊन करती श्रवण हो।' —प्रला १२२ [कडी द्वि]

**कडोविकडीचा**—वि १ कडचें, शेवटचें, पराकाष्ठेचें, परमावधीचें (भांडण लढाई, वाद इ०) २ कडक, रागीट, उग्र, जहाल (भाषण, निंदा इ०) ३ सक्त, भारी, निश्चयाची (मागणी, बोलावणें, इ०) [कड=शेवट]

**कडोसरी कडोस्त्री-सी**—स्त्री १ कमरेस बाधलेल्या (लुगडें, धोतर इ०) वस्त्राचा कमरेजवळ खोवण्यात येणारा भाग (यात पैसा, सुपारी इ० निरस ठेवतात) 'कडोसरी नसला तरी कनवटीला खास आहे' —तोव १४ २ शरीराची (उजवी, डावी) जागा कमरचा भाग ३ वस्त्राच्या आवळण्यानें काळ वडलेली, वाईट झालेली कमरेची जागा (सामान्यत चतुर्थ्यंत व पंचम्यंत म, चा इ० प्रत्यय लावून प्रयोग) **कडोसरीस खोवणें, खुपसणें, कडोसरीचा पैसा** [स कटि, म कड+सरी, किंवा कटिवस्त्र] (वाप्र) **कडोसरी-सरीस येणें**-अगदीं जेरीस येणें

**कडासा**—पु सर्पप्रकार वखडसा पहा 'मंत्रमोवते कडे कापले। असभाव्य कडोसे पडिले।' —दा १६ ३ १७

**कडोळ**—न कडवळ पहा 'न राइ खोंडया मत्ता कडोळ।' —अफला ६६

**कडोळ-ळी-ळें**—न स्त्री १ वडें, आगटी २ (व) स्त्रियांच्या पायातील चादीचें कडें [सं कटालिका, प्रा कडोली]

**कडोळी-ळ्या लगाम**—पु प्रत्येक टोंकास दोन दोन कड्या असलेला लगाम लगाम पहा [स कगलिया, प्रा कडाली –घोड्याच्या तोंडास बांधण्याचें एक उपकरण]

**कडौंचें**—उक्रि (गो) शिजविणें कढविणें पहा

**कंडुड**—पु (गो) फोडलेला अर्धा बांबू [स कांड]

**कड्डाण**—(गो) कडण, कडधान्य पहा

**कड्डावचें**—क्रि (गो) घरावर बांबूचें ओंवण करणें [कड्]

**कड्डुंचें**—क्रि (गो) दगडानें वाटून बारीक पूड करणें [काडणें]

**कड्या**—पु १ पिवळें फूल येणारें एक झुडूप अथवा त्याची बी २ दुसरें एक झाड व त्याचें फळ कटया पहा

**कड्या**—पु झाळण्याचें लोखंडी हातोडीसारखें हत्यार, खडया [कडी]

**कड्याखार**—पु टाकणखार याचे दोन प्रकार –कड्या टाकणखार व तेल्या टाकणखार (चौक्याचा टाकणखार) [खडा+टाकणखार]

**कड्याचा लगाम**—पु कड्याचा केलेला लगाम, साखळी लगाम लगाम पहा [कडी]

**कड्यारोग**—पु जनावरांना होणारा एक रोग, फोफसा –शे १० १३२

**कड्याळ**—न १ जनावरांचा चारा (जोंधळा किंवा बाजरी) कडवळ पहा २ (ल) उंच व राकट स्त्री [कडवळ] ०**दातीं धरणें**–१ आश्रयास जाणें शरण जाणें, दातीं तृण धरणें २ दैन्य प्रदर्शित करणें नादार होणें

**कड्याळ**—न आरोप आळ, कवगाळ पहा

**कड्याळें**—न १ मोठा नफा, प्राप्ति, लाभ (व्यापारात) २ एकदम एकाएकीं दैव उघडणें, घवाड सापडणें (क्रि० लागणें)

**कड्याळें**—न कडोळ्या लगाम पहा

**कड्ये**—स्त्री (कों) कंबर कटि (फक्त चतुर्थीत प्रयोग) 'कडयला–कडयेवर घेणें' –क्रिवि कडेवर कमरेवर कडिये पहा [स कटि, म कड]

**कढ**—पु १ उष्णतेमुळें पाणी इ० स येणारी उकळी, आधण फार तापल्यामुळें बुडबुडे येतात ती अवस्था (क्रि० येणें) म्ह० जाळावाचून किंवा आगीवाचून कढ नाहीं आणि मायेवाचून रड नाहीं ' २ फार तापल्यामुळें येणारे बुडबुड फेंस ३ (ल) डोक्यावर फार वळ ओझें घतल्यानुळें डोक्यास येणारी तप्तता, दीण रग ४ (ल) उमाळा गहिंवर (प्रेम, दु ख इ० काचा) स्फुरण दिरिदिरी (भांडण वादविवाद शिवीगाळ इ० ची) रडण्याचा–भांडण्याचा–क्रोधाचा कढ ' [स क्वथ्; प्रा कढ] ०**ओढून घेणें**–परस्पर चाललेल्या भांडणाचा संबंध आपणाकडे घेणें, दुसऱ्यावरचा राग आपणावर ओढून घेणें ०**जिरविणें**–एखाद्याचा राग, ताशेरा शमविणें, शांत करणें

**कढई**—स्त्री १ पदार्थ तळण्यासाठीं किंवा कढविण्यासाठीं अर्धवट पसरट व दोन कान असलेलें धातूचें भांडें, काईल (दूध, उसाचा रस वगैरे कढविण्यासाठीं) २ (नाशिक) नदीला मोठा पूर आला असता पाण्यांत होणारा जगी भोंवरा [स कटाह प्रा कडाह हिं कडाहा, ब कडाई, उरि कहाई गु कढा किंवा कढणें]

**कढंक**—क्रिवि कढ येईपर्यंत? 'धडधडा ज्वाळा जळती कढक। त्यासी क्रमपाक बोलिजे।' –स्वानु २ ४ ११ [कढ+अक?]

**कढण, क**—न १ (सामा) काढा, कढविलेलें पाणी, ज्यात कांहीं पदार्थ उकळला आहे असें पाणी, पिठलें 'कढण काला कालविलें ताक।' –निगा १०० २ तूर, मूग वगैरे कडधान्य ज्यात शिजविलें आहे असें पाणी, कट, कट्ट ३ मांसाचें काल वण, मांस शिजविल्यानंतर त्यात आलेला तवंग, मांदें [कढ] ०**निघणें**–(ना) रतीस येणें, मेटाकुटीस येणें

**कढणी**—स्त्री पदार्थ कढण्याची किंवा कढविण्याची क्रिया, [कढणें]

**कढणें**—अक्रि १ कढण्याच्या अवस्थेला येणें, आधण येणें, उकळणें, शिजणें (दूध, तेल, लोणी इ०) 'बोले जें तच्छ्रवणें माझेचि कढोत न तुमचे कर्ण।' –मोकर्ण ४० ९ २ उष्णतेपासुन तापून रस होणें, (धातु इ० चा) ३ (ल) रागावणें, संतापणें, तापणें 'अश्वत्थामा कोपें अत्र न क ढयल म्हणोनिया कढला।' –मोऐपिक १ ३९ [स क्वथ्, प्रा कढ, हिं कढना, गु कढवु सिं कढणु] **कढण्याचा बिंदु**–पु. कढ येण्यापर्यंतचें उष्णमान, (इ) बॉइलिंग पॉइंट

**कढणें**—अक्रि कण्हणें, विवळणें 'येक डोई खाजविती। येक कडों लागती। सावकास।' –दा १८ ९ १५ [ध्व]

**कढत**—वि भाजण्यासारखें गरम ऊन, कडकडीत ताप लेलें, आधण आलेलें (दुध, पाणी पदार्थ धातु इ०) [कढणें]

**कढतवणी**—न (कों) कढत पाणी (पोह्यांच्या भाता वर, भाकरी करावयाच्या पिठात वगैरे घालावयाचें) २ (ल) चहा [कढत+पाणी किंवा वणी –स वन्=पाणी]

**कढता**—पु कडता पहा

**कढय**—स्त्री (गो) कढई पहा –वि (गो) अति ताप लेलें, कढलेलें कढत (दूध पाणी वगैरे) [कढ]

**कढविणें**—उक्रि कढणें याचें प्रयोजक रूप १ कढ आणणें, फार तापविणें, उकळविणें, शिजविणें (दूध, तूप इ०) पाण्याकडे याचा क्वचितच उपयोग करितात २ वितळविणें, रस करणें (धातु इ० चा)

**कढशीळ**—वि फार तापलेलें, कढत, उतण्यापर्यंत आलेलें (दूध, तूप, लोणी इ०) [स क्वथ्+शील]

**कढा**—पु (गो) काढा [कढ]

**कढी**—स्त्री १ ताकास हरभऱ्याचें पीठ लावून फोडणी वगैरे देऊन कढवून केलेलें कालवण, ताकाची आमटी कोंकणांत आंब सुलाचीहि कढी करतात 'भाजी होती वांग्याची। वालाचे गोळ्याची कढी।'–श्रीगीत ६६ २ एक औषधी काढा, निरगुडीचीं पानें, ओवा, चित्रकमूळ, हळद व सुंठ यांचें चूर्ण, व कांजी ताकांत मिसळून केलेली कढी ही वातहारक व अग्निवर्धक आहे [स क्वथ्=कढणें, कढिआ, सिं कढ्ही] (वाप्र) शिळ्या कढीला ऊत आणणें=१ (शिळी कढी कढविणें), प्रसंग संपल्यानंतर एखाद्याचें धाडस किंवा शौर्य चेष्टविणें २ स्मरणातून गेलेल्या–जुन्यापुराण्या वादाला पुन्हां तोंड पाडणें ०पातळ होणें–(ल) १ आजारामुळें अशक्त–फिकट–निस्तेज होणें २ भीतीनें घाबरणें–गांगरणें–जर्जर होणें (कप) ०खाऊ–वि १ कढीची आवड असलेला (ब्राह्मणास उपहासानें म्हणतात) २ (ल) शेळपट भ्याड, नामर्द ०गवत–पात–नस्त्री गवती चहा किंवा पाती चहा, हा कढींत घालतात ०चट–वि (ना) कढीभुरक्या, कढीखाऊ (ब्राह्मण) ०निंब–पु बारीक कांटे असलेलें एक झाड, याच्या पाल्याला एकप्रकारचा सुवास येतो, तो कढींत, मसाल्यांत घालतात व त्याची चटणीहि करतात यास गोड निंब, (खान) मद्दुनिंब, झिरंग असेंहि म्हणतात [स कैटर्य] ०भात–पु लग्नविधींतील एक सोहळा, सीमांतपूजनांत वधूपक्षानें वरपक्षाकडील मंडळींस कढीभाताचें जेवण घालणें व कढीचें व भाताचें भाडें आंदण देणें ०भुरक्या कढीभात खाणारा–वि कढीखाऊ पहा 'कढीभातखाऊ म्हणती ब्राह्मणा जगांत तयानींच करणी केली असर्गी अचाट।' –विक ७

**कढें**—न कढई, उसाचा रस कढविण्याची काहील 'रस उसाचा लोहाचे कढे। जों जों अग्नीज्वाळा करिता कढें।'–यथा १३ ५९२ २७५ [कढई]

**कढ्या**—पु एक झाड व त्याचें फळ कड्या

**कण**—पु १ रज, रेणु परमाणु एखाद्या पदार्थाचा सूक्ष्म अंश, (शाप) अणु २ रत्नाचा पैलू, चमक, (हिं) कनी, हिरकणी, हिऱ्याची बारीक चुणी ३ कणी, धान्याच्या दाण्याचा अंश 'एन्हवीं कणा आणि भूसा।'–ज्ञा १८ ९३९ ४ सबंध दाणा 'आतां कक्षेंत झोळी घालून। मागे कण घरोघरीं –नव १७ १२४ ५ धान्य 'कणु एकु सांडविती'–ऋ ८८ –एभा २ ३७२ 'दामदुप्पट, कण तिप्पट' ६ ठिणगी, स्फुलिंग (अग्नीचा) 'जळति अग्निकणेंचि तृणें जरी।'–वामन, नामसुधा ५८ ७ थेंब (पाणी वगैरे पातळ पदार्थांचा) ८ (कों. कुलाबा) रताळ्यासारखा कंद, कणक कणगर [स]

**कण**—पु (सोनारी) कारल्यासारखें परंतु मूठ नसलेलें, वीतभर लांबीचें (अंगठी वगैरेस गोल आकार देण्याचें) एक उपकरण

**कण**—स्त्री एक प्रकारची उसण, तिडीक, कळ (पाठ, मान, कंबर वगैरेंत येणारी) धमक पहा (क्रि० भरणें) [? स क्वण्, कण]

**कण**—पु (क) वावडी समतोल राहण्याकरितां तीस बांधावयाचा कापडाचा तुकडा, शेपटी, चिंधी (क्रि० लावणें, मारणें) 'ही वावडी कण मागते आहे', 'वावडीला बहुधा कण लागतो' [का कण=चोळीचें वस्त्र, म खण]

**कणऊर**—स्त्री (कों) दाणेऊब, धान्य पिकून तयार होण्याच्या हंगामांतील उष्णता (भाद्रपद आश्विन महिन्यांतील) [कण+ऊब]

**कणक, कणंक**—न (कु) कळक, बांबूची एक जात

**कणक**—न एक कंद, मूळ, कणगर, कण अर्थ ८ पहा

**कणक**—स्त्री कळ, तिडीक (ताण बसल्यामुळें किंवा संधिवातामुळें पोटांत, कमरेंत, पाठींत, डोक्यांत वगैरे उत्पन्न होणारी), उसणीहून भिन्न धमक पहा (क्रि० चालणें, निघणें, भरणें) [कण]

**कणकण–णी**—स्त्री १ हुडहुडी, शिरशिरी, अंग मोडून येणें, (ज्वर भरण्याच्या सुमारास) थंडीची वेळ (क्रि० येणें, भरणें) २ ताप निघाल्यावर अंगांत राहणारी कडकी, मुरलेला ज्वर. (क्रि० राहणें, येणें, होणें) ३ (गो) दुःख [ध्व स कण्=शब्द करणें]

**कणकणणें**—अक्रि अंग मोडून येणें, कणकण वाटणें, डोकें दुखणें, थंडीचे शहारे येणें (ज्वर वगैरे येण्याच्या वेळीं) [कणकण]

**कणकणीं**—क्रिवि (गो) घडीघडीं, पावलोपावलीं, वेळोवेळीं [क्षणोक्षणीं]

**कणकणें**—अक्रि १ कळकणें, आंबट पदार्थास हिरवटपणा व विकारीधर्म उत्पन्न होणें (निकल्हईच्या भांड्यांत ठेवल्यामुळें) २ कल्क लागणें, कळकलें जाणें (भांडें) [स कल्क]

**कणका**—पु कनका पहा

**कणकील**—न (वर्हाडी शेती) जोखडास बैलाच्या मानेजवळ, आंतील बाजूस असणारी खीळ, पडदाडी जुवाची आंतील खीळ. [कणा+कील=खीळ]

**कणक्या**—वि दणकट, दांडगा, बळकट, खमक्या, पड न घेणारा (याच्या उलट पिठ्या गव्हाची कणीक म्हणजे दाटर व इतर धान्याचें पीठ मऊ, दबेल असतें यावरून) भरपूर, मोठा (बाजार. इ०) [कण]

**कणखर**—वि कठिण, बळकट, मजबूत, घट्ट (दगड, लाकूड इ०), टिकाऊ, दणकट (कापड वगैरे), धटाकट्टा, धडधाकट (शरीर, मनुष्य), प्रखर, धगधगीत (काहीं लाकडाचा जाळ) [कण+खर]

**कणखाचिणें**—उक्रि (विरू) खणकावणें, रागें भरणें, भोसडणें, तासडपट्टी काढणें, चापणें (ध्व खणखाचिणें)

**कणग, कणंग, कणण**—न १ (गो) कणगर नावाचें कद कण, कणक-कें पहा २ रताळें कण, कणकें पहा

**कणंग**—स्त्री धान्य साठविण्यासाठीं बांबूचें किंवा फोका टयाचें केलेलें पात्र, ल्हान खोली, पेंव, कणगा, ठिरी, कणिग [कण+गम्?, तुल का कणजा=कणगी (फा कण=बांबूची काठी)?]

**कणंग**—पु चवळया सालासकट दळून त्यात मैदा, मऊ भात व साखर घालून त्याचे गाळे करून उकडतात तें पक्वान्न —गृशि १ ४०१ [कण]

**कणगर-रें**—न १ बटाटयासारख्या एका कदाचा वेल (स्त्रीपु) २ मूळ, कद (न) यास गोवेंबटाटा म्हणतात हा कद शिजवून किंवा भाजून खातात यास कण, कणक, काटेकणगर व वनक्कद असेंहि नाव आहे हा रताळ्यापेक्षा जाड असता उपासास खातात याचा वेल मोठा वाढत नाहीं पानें वाटोळीं व बारीक असतात यास जमिनींत बटाटयायेवढे लाबट कद लागतात ३ (पुस्त्री) एक झाड, कुडका काकणा

**कणगा**—पु १ मोठी कणग कणग पहा २ धान्य साठविण्यासाठीं जमिनीवर वर्तुळाकार बांबूचा तट्टया उभा करून बाहेरील बाजूनें कळक पुरून त्यासह तट्टया दोरानीं बाधून केलेलें साधन, पालटें, पालें, कोथळा, कणगोली, कोठार [कणग पहा]

**कणगी, कणगुला-लें**—स्त्रीपुन १ (वों) ल्हान कणग 'कणगींत उतरोनि पाटया भरोनि दती' —रामदासी २ २ 'कणगीची काटितील लिंपण। गूळ शर्करा खातील सपूर्ण।' —जै ६ ४९

**कणगी**—स्त्री कणगर कद, राताळु कण, कणक पहा

**कणगुली-गूल-गोल**—स्त्रीन कणग्याप्रमाणें बांबूच्या कावटयाचा विणलेला वाटोळा कोयळा, ल्हान कणगी कणगुला [कणगा]

**कणडुली-डुलो, कणडो**—(गो) करडी (बांबूची वेताची) कणगुली पहा

**कणणें**—अक्रि १ कण्हणें, कुथणें, विवळणें, हायहुय करणें (आजार, वेदना याच्या अतिरेकामुळें) २ कण किंवा उसण भरून दु खित होणें, स्नायू ताठणें [स क्वण्=शब्द करणें]

**कणदार**—वि १ कणीदार, कण्या असलेलें (तूप वगैरे) २ भरपूर कणसें आलेलें (पीक), दाण्यानीं गच्च भरलेलें (कणीस) ३ सकस, कसदार, ज्यात अधिक सार, सत्त्व आहे असा (कडबा, गवत, धान्य, तूप इ०) [कण=दार प्रत्यय]

**कणपट्टी**—स्त्री (माण) (शेती) मोटेचा कणा बसविण्यास आधार अशा खाच असलेल्या दोन पट्टयापैकीं एक [कणा+पट्टी]

**कणयार**—पु (वे) (शेती) रेडयाच्या चामडयाची पट्टी, मोट व तीवरील कडें याना जोडणारे चामडयाचे पट्टे [का कोण=रेडा+वार=वादी पट्टी]

**कणरी**—पु (गु) कुणबी पहा

**कणभ**—पु एक प्रकारची विषारी माशी, ही चावली असतां सूज, ज्वर, वाती इ० लक्षणें होतात, दशाची जागा कुजते [स]

**कणलक्षांश**—पु कणाचा एक लक्षावा भाग, अणूहून ल्हान, अति सूक्ष्म अणु परमाणु कणाचा अत्यत सूक्ष्म अश (ज्याचे आणखी भाग पडणार नाहींत असा) [स]

**कणलोणी**—न कराद'र लोणी, सरकीचा रतीब असलेल्या जनावराच्या दुधापासून केलेलें लोणी (याच्या उलट तण लोणी) [कण+लोणी]

**कणव, कणवा**—स्त्री पु करुणा, दया, कळवळा, कृपा 'वीं कणवा घालुनि उडी। पावविला सत थडी।' —ऋ १०२. साडिली कणव या भननाची' —किंगवि ५४ 'जया सर्वमूर्ती कणव। तया नमस्कारिती सकळ देव।' —मुआदि १९ १७२ [स कण्-रडणें, अश्रु गाळणें ?]

**कणवट-टी**—स्त्री (राना) कडोसरी पहा [स कटि+वत्, का कणय=कमरेभोंवतीं वस्त्राची गाठ+वत]

**कणवट**—न कणीस धान्य 'जैसें भाजलें कणवटें।' —विउ ७ ९४ [स कण+वृत्]

**कणवण**—स्त्री कण्ह विवळणी, किरकीर (विशेषत ल्हान मुलाची) [स क्वण्=शब्द करणें, म कण्हणें]

**कणवणणें**—अक्रि कण्हणें, विवळणें, किरकीर करणें [कणवण]

**कणवळणें कणवळा**—कन्हवळणें, कन्हवळा पहा

**कणवाळ-वाळा**—वि कृपाळु दयाळु कन्हवाळ पहा भक्ताचा कनवाळ भीम म्हणे।' —रामदासी २ १२४

**कणवाळू**—कन्हवाळू पहा

**कणश**—क्रिवि १ कणाकणानें २ थोडयोडें, हळूहळू [स]

**कणशा**—वि १ कणीस चोळणारा २ (ल) अडाणी, मूर्ख, गावटळ, रानवट, रिठोळ [स कणिश, म कणीस]

**कणशी**—स्त्री (वों कु गो) भाताची ओंबी, लोंबी, लोंगर, कणीस, [स कणिश]

**कणस**—न (वों) कणीस पहा (अव) कणसा

**कणा**—पु १ पुस्तरा, मानेपासून माकडहाडापर्यंतचा पाठीचा दांडा, मणक्याची रांग २ (ल) पर्वताची लांबट ओळ ३ डोंगरा-पर्वतावर चढण्याउतरण्याची पाऊलवाट. ४ दोन्ही बाजूस उतार असलेल्या डोंगराच्या रांगेवरील उंच रस्ता, दंड रांग पहा ५ रांगोळी किंवा पिठानें जमिनीवर, भिंतीवर काढलेल्या रेषा व आकृती, यच हळदकुंकू यांनीं भिंतीवर काढलेली आकृति ६ रांगोळीची मुठी, पुड ७ धान्याची घातलेली लांबट रास, ओळ, रांग ८ मातीचा सोंडर ज्यावरून ओढला जातो तें लांबट चाक ९ हातराहाटाचें मधलें लाकूड 'उलटरहाटाच्या कण्याप्रमाणें जागच्या जागीं फिरून फिरून त्याची बुद्धि निश्चयाशीं होते'—ऋवि १६ १० गाडीच्या चाकाचा आंस ११ जहाजाचा खालचा भाग, हा निमुळता व पाठीच्या कण्यासारखा असतो 'जहाजाचा कणा दगडात कच्च पसरा'—मदम १८९ [का कण=काठी, कणे= उभा किंवा आडवा दांडा, आंस, रूळ (फिरता), वें स कर्णकः= दांडा]

**कणा**—पु स्त्रिया लुगडें नेसताना प्रथम लुगड्याचा वेढा घेतात तो [का कणय=कमरेभोंवतीं वस्त्राची गाठ]

**कणा**—पु एक झाड, पिंपळी नावाची वनस्पति [स]

**कणा**—पु (सोनारी) अंगठी वगैरेस वाटोळा आकार यावयाचें एक हत्यार, कण [का]

**कणाक**—न (कु) कळक, वाबू [का कण]

**कणाणी**—स्त्री कणकणी, धडकी, दहशत 'कीं भयाची बैसली कणाणी। वदनीं खिळी पडियेली।'—कृमुरा १४ २४ [स कण्=शब्द करणें, वेदना]

**कणावणें**—क्रि (गो) घोटणें (गो रूप) कणावचें

**कणाळी**—स्त्री (पोत्यास भोंक पडलें असता त्यातून गळणारी) धान्याची धार ओळ (पाटातून वाहणारा) पाण्याचा प्रवाह (क्रि० लागणें पडणें) [स कण+आवली]

**कणिक**—कणीक पहा

**कणिका**—स्त्री १ अति सूक्ष्म कण अंश (धान्य तूप वगैरेचा) 'घृत-मधु-शर्करा कणिका', बीजकणिका तरी घन वट।'—ज्ञा ७ ५५ २ (सामा) कणी, कण तूप साखर इ० चा (सामा अनेकवचनी प्रयोग) 'जैशा घृताचिया कणिका।'—एभा २ ६४२ [स हिं कणिका=बारीक वाळू]

**कणिकनीति**—स्त्री कणिक ऋषीनें धृतराष्ट्रास सांगितलेली कुटिल राजनीति ही महाभारतात आहे

**कणिकोंडा**—पु कणिकूट तांदूळ वगैरे काढून-पाखडून राहिलो तो गाळ, कण्या व कोंडा

**कणिस**—स्त्री १ कणसी २ कणगर कणस पहा

**कणिया**—पु कणा पहा 'भ्रमण करितां निमणी। ते छत्र कणियाची आणी। लोट नावरे मेदिनी। म्हणोनि मेरु रोविला॥'—कथा ६ २ २४

**कणियारें**—वि (गो) कणीदार, कणदार

**कणी**—स्त्री १ फुटका अंश, भाग (धान्य वगैरेचा), कण पहा २ भात शिजल्यावर त्यात राहिलेला कच्चा तांदुळाचा अंश, शिजलेल्या अन्नांतील हिरवा अंश ३ (राजा) पातळ भाजी इ० स लावतात तें पीठ ४ (अनेकवचनी प्रयोग) तूप मध, साखर इ० काचा सूक्ष्म अंश ५ (अव) शिजलेल्या धान्याचा अंश ६ (यु) रत्नाचा बारीक तुकडा, अंश [कण] **कण्या कण्या करणें**—१ दीनपणा स्वीकारून भीक मागणें 'कण्या कण्या केल्या तरी कुणीहि दाद घेत नाहींत असा कठु काल आला' २ लाचार पणें क्षमेची याचना करणें **दाताच्या कण्या करणें**—केवळ नमता एखाद्यास अनेक वेळा उपदेश करणें, सांगणें, पढविणें **कण्या खाऊन मिशास तूप लावणें**—पोटास खावयास मिळालें नाहीं तरी बाहेर डौल मिरविणें, नसता दिमाख दाखविणें **कण्या टाकून कोंबडीं झुजविणें**—आपला पैसा वगैरे खर्च करून दुसऱ्या दोघात कलागत उत्पन्न करून देऊन त्याच्या भांडणाची मजा पाहणें

**कणी**—स्त्री डोळ्यातील बाहुली [स कनीनिका, का कण=डोळा, कणी=दृष्टि, दर्शन]

**कणीक**—स्त्री गव्हाचें पीठ, आटा, कणिकेची पोळी, पुरी, सांजा इ० पदार्थ करतात [स कणिक=सूक्ष्म कण गव्हाचें पीठ, पिं कणिक=गहू का कणक=गव्हाचा मैदा] ०तिंबणें, **कणके सारखा तिंबणें, कणीक मऊ करणें**—एखाद्यास खूप मारणें ठोकणें, झोडपणें, चेंदामेंदा करणें, (पोळी वगैरे करण्यासाठीं कणीक खूप मळून मऊ करावी लागते त्यावरून) 'भीमानें बकासुराची कणीक चांगलीच तिंबली', अशा रीतीनें विश्वामित्राची चांगली कणीक तिंबली '—नाकु ३ ६१ **कणकेचा गरा**—पु गव्हाचा रवा **कणकेत मीठ**—(कणीक भिजविताना तींत थोडें मीठ घातलें असता खारट न लागता अधिक चव येते यावरून) ओळखू न येईल इतका दुसऱ्याच्या संपत्तीचा अपहार

**कणीकूट कणीकोंडा**—नपु भात काढून झाल्यावर तांदुळाखेरीज राहिलेल्या कण्या व तूस धान्यांश [कण]

**कणीदार**—वि कण्या असलेलें, कणदार पहा

**कणीस**—न १ ज्यात धान्य भरलें जाइ असा धान्याचा तुरा गुच्छ, भुट्टा (भात वरी राळा, गहू या धान्याशिवाय) २ केतकीच्या झाडास येणारा तुरा पुष्प कवडयाचा गुच्छ ३ नारळाची पोय धारणी (जीस पुढें नारळ धरतात ती) ४ कुरड्या करण्याकरिता भिजविलेलें व मळलेलें तांदुळाचें पीठ हें

सोन्यान दाबून त्याच्या कुरड्या पाडतात ५ डमाचें वाढे, तुरा 'ऊस साडूनि मागती। कणीस त्याचें।' –एभा २१ ३३९ [स कणिश, प्रा कणिस, 'कणिश सस्यशीर्षक।' –हेमचंद्र] ०निसवणें–पसवणें–कणीस बाहेर येणें ०पागोरा–पु (व्यापक) जोंधळा, बाजरी वगैरेचें कणीस (क्रि० घेणें, तोडणें मोडणें) 'हिंडल्या फिरल्या बडुव्यानीं कणीसपागोरें नेले म्हणून तोंडेंथोडीं राहिलीं'

**कणीस**—न गाडीच्या चाकात शिरलेला कण्याचा भाग [कणा]

**कणुरा**—पु कणी, सूक्ष्म अश 'हीम कणुऱ्यापाठीं। लागतु दीसती।' –शिशु ६४१ [कण]

**कणू**—न कण, अश [कण]

**कणेकड**—न (कों) रहाटगाडग्याच्या चाकाचा कणा, कणेकड रूख व तोरण गावर फिरत असतें [कणा+काष्ठ] ०डाचें खापेकड करणें (एखाद्या मोठ्या लाकडाचें कणेकड करावें म्हणून तें तासीत असता त्याचे खापकडाच्या आकाराचे तुकडे करणें) एखादी मोठी गोष्ट सुधारावयाची म्हणून यत्न करीत असता उलट ती अधिक विघडविणें, विनायकाचा वानर बनविणें

**कणेचीचाहुली**—स्त्री रहाटाचा किंवा मोटचा कणा ज्या दोन खांबावर टेंकतो व फिरतो त्यास म्हणतात

**कणेर–री, कण्हेर–री**—पुस्त्री तांबडीं किंवा पांढरीं फुलें येणारें एक झाड याचीं फुलें एकेरी, दुहेरी, तिहेरी पाकळीचीं असतात मुळी विषारी असून पानें लांबट असतात पिवळीं फुलें असणाराहि एक कण्हेर आहे याचीं फुलें घंटेच्या आकाराचीं असतात —न कणेर, कण्हेरीचें फूल [स कणेर, कर्णिकार, प्रा कणिआर]

**कणेर**—पु (कों) कडेसर पक्षी

**कणेरा, कण्हेरा**—वि १ कण्या फार असलेला (सडलेला तांदूळ) २ कण्याचा (भात) [स कण] ०भात–पु कण्याचा केलेला भात

**कणेरा**—वि लाल किंवा काळें अग असून त्यावर पांढरे पट असलेलें (कापड) लुगड्याची एक तऱ्हा कणेरी लुगडें पहा [कण्हेर]

**कणेरान**—न (खाटिक) कंबर व त्या भागातील मांस [कणा]

**कणेरी–रा, कण्हेरी–रा**—स्त्रीपु १ कण्या शिजवून पातळ पिण्याजोगें केलेलें पेय २ तांदूळ धुवून भाजून वाटून तें पीठ पाण्यास लावून पातळ, पिण्याजोगी केलेली लापशी, मंड ही आजारी माणसास देतात, पेज, कांजी कण्हेरी करताना तांदुळाच्या सहापट पाणी घेतात

**कणेरी केळ**—स्त्री एका जातीची केळ कण्हेरपात पहा कणेरें केळें–न कणेरी केळीचें फळ

**कणेरी लुगडें, कणेरें लुगडें**—न काळा किंवा तांबडा पोत असून त्यावर पांढरे पट असलेलें लुगडें [कणेर+लुगडें]

**कणेवाल**—स्त्री (गो) एक वनस्पति.

**कणैरी**—स्त्री कणेरीचें झाड व त्याचें फूल 'कणैरीची लाखौली वाउनी।' –शिशु ७३९ [स कणेर]

**कणो**—पु (गो) गव्हाचा जाड रवा, गरा, साजा [कण]

**कणोर, कणवर**—पु डाळीची चुरी, कण, कळणा [कण]

**कण्ण**—न (गो) मूग किंवा मुगाच्या डाळीची केलेली गोड कांजी [स कण]

**कण्णेवर्चे**—क्रि (गो) निरुपयोगी गवत काढून टाकणें

**कण्या**—स्त्री अव कणी पहा तांदूळ, जोंधळा, बाजरी वगैरे धान्य भरड दळून तें शिजवून केलेलें पक्वान्न, कण्याचें अन्न 'कण्या विदुर मंदिरीं म्हणति साधु आस्वादिल्या।' –केका ३८

**कण्व**—पु १ एक ऋषि २ यजुर्वेदाची एक शाखा व त्या शाखेचे ब्राह्मण, कण्व व काण्णव हीं उपनावें यापासून झालीं आहेत [स]

**कण्हणें**—क्रि विवळणें, कणणें पहा. 'एक क्षुधितु पटवंतु। एक सेंकमीतु कण्हतु' –शिशु १०५७

**कण्ही**—स्त्री (शेती) उसावरील रोग –शे ७ २२३

**कण्हेरपात**—स्त्री केळीची एक जात, हिचें केळें मधुर असून त्याचा गीर ऊन भाकरीवर पितळतो –कृषि ४८९

**कण्हेरी गाणें**—क्रि रडणें, केकाटणें, किरकिरणें, बारीक आवाजात रडणें

**कंत**—पु (प्र) कांत पति, नवरा [स कांत, प्रा कंत]

**कंत**—पु (गो) (सरकारास) सारा, कर देण्याचा हप्ता [?]

**कतक**—न एक दागिना, पदक –शर –देहु ४७

**कतक**—पु एक झाड, निवळी, कासविंदा 'अतिसह्वासि वच मना कतक कढुपिता बना निवळवील।' –मोविराट ३ १६. [स] ०पिटी–स्त्री निवळीच्या बींचें चूर्ण यानें गढूळ पाणी स्वच्छ होतें 'उदकीं न घालिता कतकपिटी।' –ज्ञा १० ६८३.

**कतगुता, कुतगुत्ता**—पु ठराविक वसुलाच्या बोलीनें जमिनीची मालकी यात वसुलीचा दर नेहमीपेक्षा कमी असतो [ता. कत्तु गुत्तगइ]

**कंतणें**—अक्रि (क) चळणें, ढळणें, हलणें, जागा सोडणें. 'ही वावडी कतत आहे तिला कांना लावा' [स क्रम्–कांत, प्रा कत तुल० का कंतु=डुडणें, खालीं जाणें, मावळणें]

**कतबा कतावत–ती**—पुस्त्री १ करारपत्र, पंचायतीपुढें दिलेली कैफीयत, लेख, आमचें म्हणणें खोटें ठरल्यास आम्ही अपराधी होऊं असें वादी–प्रतिवादी या जबानींत प्रतिज्ञापूर्वक लिहून देतात २ ऋणपत्र, कर्जरोखा ३ लेख, करारनामा, कबुलायत.

'तुमच्या चाकरापासून कतवे घेतले आहेत की तुम्हाकडे चाकरीस जाऊ नये, त्यास ते कतवे तुमचे तुम्हास देऊ ' -रा ८ १५८ [अर किताब, कितापत]

**कतरण**—स्त्री १ कातरलेले तुकडे, कात्रण, तडका भाग कापून काढलेले विड्याच्या पानाचे तुकडे २ पुस्तकरा रगीत कडा कापून टाकल्या ना निघालेला कागदाचा चुरा [स कृत्, कर्तित, प्रा कत्तरिअ, ब कतरण, हिं कतरन]

**कतरणी**—स्त्री (माळवी) कातरी [स कृत्]

**कतरणे**—क्रि निघून जाणे, उडून जाणे, नाहींसे होणे 'तुम्ही येथून कतरा !' [स कृ, हिं कतराना=भोंवताली फिरणे]

**कतरबेत**—पु १ काटकसर, मितव्यय, छाटाछाट २ उचले गिरी, खिसेकातरूपणा ३ टाकठिकी, टापटीप, सुव्यवस्था [स कातर+बेत]—स्त्री—वि १ काटकसरी मितव्ययी २ उचले पणा करणारा, खिसेकापू ३ नीटनेटका, टाकठिकीचा

**कतरभेद**—पुअव १ शकल, क्लृप्त्या, डावपेंच, युक्त्या, लबाड्या २ लष्करी डावपेंच, गनिमी कावे, सेनापतीनें सैन्या कडून दाखविलेल्या हुलकावण्या [स कातर+भेद]

**कतरा**—पु (वे) केरकचरा, अडगळ कतरण पहा

**कतल**—कत्तल पहा 'कतलेमध्यें तीनचार लक्ष माणसे कतल जाली ' -रा ६ २४७

**कतलाम**—स्त्री सरसे कत्तल, काटाकाट, कापाकापी, विजन 'त्यास दीड प्रहर लूट व कतलाम जाली ' -रा १ १११ 'गोळी न वाजवितां (शहर) दिलें यास्तव कतलाम केलें नाहीं ' -ख १ ३२ [फा कत्ल्-इ-आम]

**कतवर-वार**—न १ सैन्यातील बाजारबुणगे सामान सुमान वगैरे लेंढार म्ह० एकपट लष्कर सातपट कतवार 'पान पतच्या लढाईत लष्करावरोबर कतवारही बरेच होतें ' २ (ल) जनसमुदाय, मेळा, थवा (उडाणटप्पू, तमासगीर, रिकामटेकडे, गप्पा मारणारे वगैरे लोकांचा) ३ केरकचरा, गदळमाती गवत ४ अडगळ, निरुपयोगी वस्तू [हिं कतवार]

**कतान, कतान**—न तागाचें कापड, वेल्व्हटचें कापड [अर कत्तान=तागाचें कापड, कतान=जवस]

**कतार-रा**—स्त्रीपु १ रांग, ओळ (विशेषत उंटाची) 'अबलग गाड्याच गाड्या कतारे।' -दावि ३३३ 'बारा हजार बाणांची कतार ' -ऐपो १०६ २ रांग, ओळ श्रेणि (डोंगराची) [अर कतार, किनार] ०बनो-(सघव्यायाम) कवाइत करणाऱ्याना लहान लहान टोळ्या करण्याबद्दलचा हुकूम -सध्या ३८ (इ) फॉर्म सेक्शन्स एक कतार=एका रांगेत उभे राहण्याचा हुकूम

**कति**—किती पहा [स]

**कतिपय**—वि कित्येक, अनेक 'साड्याहि नौपटीच्या कतिपय लुगडीं जे नवे पाजणीचीं।' -सारुह ३ ४१ [स]

**कतीरा**—पु झाडापासून निघणारा एक प्रकारचा गोंद, डिंक [हिं कतीरा]

**कतोस्**—पु झुरणी, काळजी 'जिवाला कतोस लागलाय भगदी ' [कम्=कमी+तोष]

**कत्तल**—स्त्री १ हिंसा, लढाईत होणारी माणसांची कापा कापी, छाटाछाटी, विजन (क्रि० करणें, उडविणें) कतल पहा २ सरसकट नाश, एकजात मोडतोड (झाडें, इमारती इत्या दिकांची) ३ मोहरमच्या दहाव्या दिवशीं मुसलमान फकीर जे विधी आचरतात ते [अर कत्ल] —ची रात्र-स्त्री १ मोह रमच्या दहाव्या तारखेची रात्र (या रात्रीं अलीचे मुलगे लढाईत मेले यावरून) २ आणीबाणीची वेळ, ऐन घाईची-गर्दीची वेळ, लगबाई ३ (ल) काटाकाटी, कापाकापी ०खाना-पु जेथें बकरी इ० जनावरें मारून त्याचें मांस विकलें जातें ती जागा, खाटीकखाना 'कत्तलखाने गांवाबाहेर नेणें हें आरो ग्याच्या दृष्टीनें आवश्यक आहे ' -के २४ ६ ३० ०बाज-वि हिंसाप्रिय, रुधिरप्रिय, कत्तल करणारा [अर कत्ल+फा बाज्] ०होणें-मारला जाणें 'नानापाशीं कत्तल झाला।' -ऐपो १२०.

**कत्ति**—स्त्री (कर्ना) कोयता, तरवार [का कत्ति, फ्रें जि कत=सुरी, वस्तरा, हिं कत्ती=सुरी, गु कती, सिं काती, स कृत्-कृत]

**कत्थक**—पु (हिं) उत्तरहिंदुस्थान तील गवयाची एक जात हे लोक पायांत चाळ बांधून नाचतात कत्थकी नाच तिकडे प्रसिद्ध आहेत [स कत्थ्=वाखाणणें]

**कत्थन**—न बडबड, वृथा बोल 'कर्णा ! उगा उगा रे ! किति कत्थन ? हें न ऐकवे कानें।' -मोकर्ण २५ १७ [स कत्थन= बढाई]

**कत्रण-त्राण**—न १ मसलत, शकल, तोड, गुप्त बेत, (चातुर्यानें बांधलेलें) संधान २ कत्राट पहा

**कत्राणी-ण्या**—वि १ गुप्त मसलत करणारा, तोड काढ णारा, हिकमती, समलत्या, खलबत्या (अपायकारक बुद्धीनें करणारा) २ कत्राटदार पहा

**कत्राट-ड**—न १ ठेका, मक्ता, (इ) कॉन्ट्रॅक्ट २ (ल) कुलगडें, लचांड, किंगळ कत्रण पहा [इ कॉन्ट्रॅक्ट] ०दार-वि कत्राटें घेणारा, ठेकेदार, मक्तेदार, कबालदार, एखादें काम अंगावर घेऊन पुरें करून देणारा, कॉन्ट्रॅक्टर

**कत्रेल, कत्रेल**—न (कु गो) भिंतींतील फडताळ, दुलाब. [पोर्तु कातारीरा]

**कत्वार**—न (व) मेळा, थवा, लेंढार कतवर पहा 'कशाला त्या-या पोराच कत्वार आपल्या घरीं आणतां ?' [हिं]

**कथ**—क्रिवि (खा) कोठें [स कुत्र, प्रा कत्थ, तुल० व कथि]

**कंथ**—पु (काव्य) पति, नवरा 'कथा सामोरी आली' –वसा ५६ [स कांत, प्रा कत, गु कंथ]

**कथक**—पु १ पुराणीक, कथेकरी, गोष्टी सांगणारा २ कथन करणारा, सागणारा [स कथ्=सागणें]

**कथंचित्**—क्रिवि १ कमातरी, कोणत्या तरी रीतीनें, मोठ्या कष्टानें, प्रयत्नानें २ कदाचित्, यथाकथंचित् पहा [स]

**कथज्या**—क्रिवि (बागलाणी) कोठें कथ पहा

**कथड्या**—वि (निंदाव्य) कथा करणारा, (हरदास, सत इ०) [कथा]

**कथणें**—उक्रि १ सागणें, निवेदन करणें, वर्णन करणें, तप शीलवार गोष्ट सागणें 'तैसेंचि मातें विर्षी कथित। कथितेनि तापें कथू विसरत॥' –ज्ञा १० १२८ 'स्वामी अर्जुनसुभद्रा पाणिग्रहण। कथा कथावी म्हणता मुनिकुलमडण। परमानदें कथन करी॥' –निमा, सुभद्राचपू १ १२ २ पद्यरूपात सागणें, गाणें [स कथ्=सागणें] **कथून ठेवणें, अगोदर कथून ठेवणें–कथणें**–भविष्य सागणें, गोष्ट घडण्यापूर्वीच सागून ठेवणें

**कथन**—न १ सागणें, निवेदन करणें, कथण्याचा व्यापार (क्रि० करणें) 'तें अक्षरी कथन करी। मजप्रती।' –ज्ञा १ ८७ २ आख्यान, गोष्ट, हकीकत, वृत्तांत [स]

**कथना**—स्त्री गप्पा, थापा, वार्ता 'वहिणी म्हणे मज दिसती कथना। जोंवरि न मना अनुताप।' –व ५१३ [स कत्थना=बढाई]

**कथनात्मक**—वि १ सागण्यासारखें (कथा, गोष्ट, हकीकत), कथनीय पहा २ वर्णनात्मक, ज्यांत नुसतें वर्णन, हकीकत लिहावयाची असते असा (निबंध), निबंधाचा हा एक प्रकार आहे [स]

**कथनीय**—वि सागण्यासारखें, कळविण्यास योग्य असें (हकीकत, वृत्तांत वगैरे) [स]

**कथंवा**—(कों) केळीचें रोप [?]

**कथरी**—स्त्री (गो) एक प्रकारची ढाल [?]

**कथला ळा**—पु (हिं) भाडण, तटा, हरकत, अटकाव, भानगड [तु ते कल्लत=भाडण, का कोटले=त्रास, दु ख]

**कथला-ली**—पु गुराना होणारी खरूज खवडे [कथील (?)]

**कथली**—एक प्रकारचा डिंक –मुव्या ४६ शको २ १३

**कथली**—स्त्री १ कथलाचें भाडें, कथलें २ कथलाच्या तपेल्याच्या आकाराचें भाडें –वि कथिलासबधी, कथलाचें (भाडें वगैरे) [कथील]

**कथली**—स्त्री एक तृणधान्य **कथली खरूज**–स्त्री जींतून पू वहात आहे अशी—ओली भिनलेली खरूज २ (ल) अति द्वाड, खोडकर मनुष्य ३ कोळमास, आळस झोंबणारें दु ख, पीडा, त्रासदायक गोष्ट **कथली व्याध-धी-पीडा**–स्त्री १ वहात असलेली गर्मी, उपदश, मद, २ (ल) खोडकर, त्रासदायक मनुष्य, मरी, प्लेग, वाखा वगैरे आजार, साथ, व्याधि, पीडा

**कथली, काथली**—स्त्री (ना) महालक्ष्मीच्या सणाच्या दिवशीं पडवळ घालून केलेली कढी हा शब्द याच दिवशीं उपयोगात आणिला जातो [स क्वथ्=कढणें]

**कथलें**—न कथलाचें मोठें भाडें, मोठी कथली [कथील]

**कथलें दु ख, कथल्यारोग, कथलें परमें**–नपुन उपदशाचा एक प्रकार, कथलीव्याध अर्थ १ पहा

**कथल्या देवी**—स्त्रीअव मोठे फोड उठणाऱ्या, चिघळणाऱ्या देवी, चिघळ्या देवी देवी पहा

**कथा**—स्त्री १ गोष्ट, रचलेली गोष्ट, कल्पित गोष्ट, कहाणी 'कथा बोलू हे मधुर सुधाधारा।' –र १ २ हकीकत, वर्णन 'स्मरला स्मरहर भरला कठ न वदवेचि ते कथा राहो।'–मोसभा १ ३३ ३ टाळ, मृदग, वीणा इ० साधनानीं हरिदास देवादिकांचें गुणवर्णन करतात ती, कीर्तन, देवादिकांच्या गोष्टी सागणें, हा एक सार्वजनिक करमणुकीचा, परमार्थ साधनाचा प्रकार आहे 'चातुर्मासात बहुतेक देवळातून कथा चालतात' ४ केलेलें कृत्य, काम, (पराक्रमाचा) प्रसग, पराक्रम 'गेला माधव लोक सोडुन किती गाऊ तयाच्या कथा।', 'अशा त्याच्या कथा आहेत बाबा!' ५ (ल) महत्त्व, वजन, पर्वा, मातब्बरी (मनुष्य, वस्तू वगैरेंची) किंमत पहा 'तो दुसरा प्रश्न करील उत्पन्न। मग ऐसियाची कथा कोण।' –नव १६ ६८ 'क्षुद्र पशु पक्ष्याची काय कथा पाचही महाभूतें।' –विद्याप्रशसा (चिपळूणकर) ७ ६ भाषण, म्हणणें, सागणें ७ हकीकत, प्रयोजन, विषय 'तू सतत्तवर्नी रतसी। कथची से न करिसी।'–ज्ञा ५ १४१ [स] **०होणें**–कि केवळ कथेंत राहणें, नुसती कथा बनणें (खरें अस्तित्व नसणें), स्मृतिरूपानें अस्तित्व असणें **कथेची गति**–स्त्री कथा सुरू, चालू असणें, कथेचा ओघ, प्रवाह 'जव्हा कथेची गति हे वदावी। मनुष्यभर्गी रस रौद्र दावी।' –वामन-सीता स्वयवर ४९ **–नुसंधान**–न वृत्तवर्णनाचा सदर्भ, सबध, गोष्टीची, हकीकतीची सगति **०प्रसंग**–पु १ गोष्टीचा, सभाषणाचा ओघ २ गोष्टींतील, वर्णनांतील प्रसग **०याधणें**–क्रि कथा रचणें, लिहिणें, पद्यमय रचनेंत चरित्र लिहिणें 'तथापि

वाधेन कथा विचित्रा।'–सारह १ ३० ०भाग–पु १ पुराण किंवा इतर ग्रंथांतील राजे वगैरेंचे पराक्रम, गोष्टी, चरित्रें इ०चें वर्णन ज्यांत आहे असा भाग २ कीर्तनांतील आख्यान, कीर्तनाचा विषय ३ विशिष्ट प्रसंगाचें वर्णन, हकीकत [स] –मृत–न अमृताप्रमाणें गोड, चित्त रंजन करणारी गोष्ट कथारस पहा 'कालिंदिचें जीवन शुद्ध केलें। कथामृतानें जग हें सुकेलें' –वामन–हरिविलास १ ७४ [स] ०रस–पु (कथेंतील गोडी) १ प्रतिपादनाची सुंदर हातोटी, उत्तम प्रकारें अलंकारादिकांनीं कथाभाग सजविणें, कथाशृंगार 'हरिदासानें कथारस चांगला केला' २ साधें भगवद्गुणानुवाद, कीर्तन, कथा (अलंकार इ० सजावटीविरहित) 'कथारस काय निघाला होता?' [स] ०रूप ग्रंथ–पु १ वर्णनांनीं, हकीकतींनीं भरलेला किंवा इतिहासपर ग्रंथ, ज्यांत आख्यानें, गोष्टी आहेत असा गद्य ग्रंथ, बखर २ गद्यमय ग्रंथ, प्रबंध ०लाप–पु वर्णन, कथा सांगणें 'व्यापारांतर टाकुनी तव कथालापासि जे आदरी।'–र ६ ०वार्ता–स्त्री गप्पा, गोष्टी 'त्या दोघी महालांत बसून परस्पर कथावार्ता करीत होत्या'–राणी चंद्रावती १६४ ०शेष–वि कथारूपानें उरलेला, स्मृतिरूपानें अवशिष्ट राहिलेला, सत्कार्यादिरूप कथा मात्र ज्याची राहिली आहे असा, कथेवरूनच ज्याची माहिती मिळते असा (मृत, गत मनुष्य) 'दुराग्रही प्रवर्तोन योग्यायोग्य कार्ये न विचारतां स्वांगें संपादित होत्साता स्थळोस्थळीं अपमान पावोन कथाशेष जाहला'–मराग्रं ५ ०संदर्भ (चुकीनें) संदर्प–पु भाषणांतील पूर्वापर संबंध, वृत्तवर्णनांतील संगति कथानुसंधान पहा [स]

**कंथा**—स्त्री १ गोधडी अनेक चिंध्या एकत्र शिवून व ठिगळें देऊन केलेलें जाड वस्त्र 'कंथा हो कां मृदु आस्तरण।'–एभा १८ २५० 'प्राकृत संस्कृत मिश्रित यास्तव कोणी म्हणेल ही कंथा!'–मो स्फुट आर्या ५ (नवनीत पृ २५४) २ (हिं) जोगी वापरीत असलेलें एक उत्तरीय वस्त्र, याचा झोळीसारखाहि उपयोग होतो 'कंथा कमंडलु देह उपचारा। जाणवितो वारा अवसरु।'–तुगा २१४० 'समर्थे कंथा मेखळा देऊनि स्वछळासी आणिलें।'–सप्र २१ ५५ [स] ०धारी–पु १ कंथा पांघरणारा घेणारा वापरणारा २ (ल) जोगी, गोसावी 'कंथाधारी बहुत केले'–सप्र १२ ३८

**कथा**—(गा) कंथा पहा

**कथाईन, कथाऊन**—क्रिवि (खा) कोठून, कोणीकडून [स कुतः, प्रा कत्थ पंचमीचा हून व कडून प्रत्यय लागून, [स कुत +ऊन]

**कथान**—न कथानक पहा 'धर्मे केला अश्वमेध पूर्ण। तें मज कथान सांगावें॥'–जै १ ३७

**कथानक**—न १ गोष्ट, वृत्तांत, हकीकत, वर्णन २ नाटक, कादंबरी वगैरेंचें संविधानक, विषय [स]

**कथावो**—(कु गो) इरडो, झाडाचें रोप, इरडो पहा. [स काष्ठ+भाव, प्रा कट्ठ+भाव?]

**कथाल**—न (कु) कथली, कथलाचें भांडें [कथील]

**कथावें**—न (ना) गान्हाणें, निंदा अव प्रयोग 'कथावें करणें'=गान्हाणीं सांगणें, निंदा करणें [स कथा]

**कथिका**—स्त्री कथी 'कथिका वाग्मिती सुवास।'–येमीस्व १२ १०१ –सुधा ११ ११६ [स कथ्]

**कथित**—वि सांगितलेलें, वर्णिलेलें (वृत्त, हकीकत वगैरे) [स]

**कथील**—न एक खनिज धातु वंग, त्रपु, कल्हईची धातु हा धातु मऊ ठिसूळ असून उष्णतेनें वितळतो, आंबट पदार्थ कळकू नये म्हणून भांड्यास कल्हई करण्याकडे याचा उपयोग होतो, व भांड्यास डाक देण्याकडेहि याचा उपयोग करतात, पण हा डांक कच्चा असतो कथिलांत खुरक व मिश्रक असे दोन भेद आहेत खुरक हें मृदु व पातळ असून लवकर वितळतें, मिश्रक काळसर पांढरट असतें 'कृष्णाश्रितें करावी चिंता न, जशी रसाश्रितें कथिलें।'–मोभीष्म ११ ४७ [स कस्तीर, अप कत्थील=कथील] ०कुटणें–कि (ल) काथ्याकूट करणें, व्यर्थ बडबडणें ०कुट्या–पु १ कथलाचें काम करणारा २ (ल) वृथा बडबड करणारा, काथ्याकुट्या ३ (निंदाव्य) सोनार ०कूट–न (ल) काथ्याकूट, गप्पाष्टक रिकाम्या गप्पा

**कथेकरी**—पु १ कथा करणारा, हरदास, कीर्तन करणारा २ गोष्टी सांगणारा [कथा+करणें]

**कथलागी**—वि १ कथेला उपयोगी, योग्य, आवश्यक (गवयी, वाद्य इ०) २ (ल) कथेचा शोकी, कथा असेल तेथें नेहमीं जाणारा [स कथा+लग्]

**कथ्थक**—कत्थक पहा '१९१५–१६ सालापासून गवई, तंतुवाद्यकार व कथ्थक यांच्या परीक्षा चालू राहिल्या आहेत!'–कला (बडोदें) १

**कथ्य**—वि कथनीय, सांगण्यास, बोलण्यास, निवेदन करण्यास योग्य (गोष्ट, हकीकत इ०) [स]

**कद**—पु रेशमी, सोंवळ्याचें नेसावयाचें वस्त्र, रेशमी मुकटा, साधारणतः कद बिनकांठी असतात, पण याचे जरीकांठी, इंद्रफुलकांठी व साधा असे प्रकार आहेत कद जनानी व मर्दानी असा दोन्ही प्रकारचा असतो [स कदक?]

**कद**—स्त्री १ किंमत लायकी, महत्त्व, वजन 'कार्कुनाची कद किती?'–होक ४४ 'तुझा काय कद मजशीं वाद करायाला?' २ बांधणी, उभार, आकार, ठेवण, आगलद 'औलादीची कद मादीचे कदीप्रमाणें बहुतकरून होते'–अश्वप १ १४२

'घराची कदटेंगणी आहे!', 'तो इसम टेंगण्या कदाचा व जाडा होता!' –विछिन्न १ १५२ ३ गोणीचे दोन भाग जोडणारा पट्टा किंवा दोन भाग जोडणारी शिवण ४ जाडी, भरींवपणा, घनता (क्रि० धरणें, सोडणें) 'हिऱ्याचा कद जसजसा पातळ तसतशी त्याची किंमत अधिक' [अर कद्=ठेवण बांधा] ०जिरचिर्णें–मोडणें–वि (एखाद्याचा) ताठा, अहंता, मीपणा झाडणें उतरविणें ०पाहणें–वस्त पाहणें, किंमत करणें, पाणी परीक्षणें

कंद–पु. १ कांदा, गड्डा, मगज, गीर असलेलें मूळ (सुरण, अळू वगैरेंचें) 'जन्ममरणाचा बाध। समूळनि तुटो कंद।' –तुगा ११४२ २ (खा ना) रताळें ३ (ल) (समासांत) मूळ, साठा, उगम, उत्पत्तिस्थान जसें –आनंदकंद, अमृतकंद विलासकंद 'जैसें महूर कां म्हणिजे। विषकंदातें॥' –ज्ञा ५ ११५ 'इंदिरावरा आनंदकंदा।' –ह ३ ९३ ४ (योग) नाभिस्थानाखालील मणिपूरचक्र, मूलाधाराचा ऊर्ध्वभाग, (सामा) नाभिस्थान, नाभिकंद 'कंदावरि हाती। उठली दिसे।' –ज्ञा ६ २२७ [स]

कंद–स्त्री (व) काढलेली ज्वारी [कडण]

कदंड–पु घोर, कठोर शिक्षा 'दडु करिता कदंडीं। आग देईन॥' –गीता १ ७० [स कु+दंड]

कदन, कंदन–न १ नाश, कत्तल, संहार 'जुझती त्याचें कदनि कदन।' –मु ३३ 'एकचि झाला हाहाकार। कदन करिता लोटला पूर।' –नव १७ ८८ 'युद्ध यावें मज दारुण। जेणें भुजाचें होय कदन॥' –कथा १ ६ १४ २ युद्ध, लढाई, 'पृथ्वी तेचि उखळ जाण। नागरें वीर घाली वैरण। मुसळघायें करी चूर्ण। रणकंदन मांडिलें॥' –एरुस्व १० ६० 'कदन कराया मदन शुभांगी' –अमृत २४ [स कद्, कंद्, फा कंदन= खणणें, उखडणें]

कदन्न–न १ वाईट, जाडेंभरडें, हलकें अन्न, निःसत्व अन्न, हलक्या धान्याचें अन्न 'कदन्नासि देखता नयनीं। कुसु मुसुनी खातसे॥' –सवि ८ ३३ २ दानास किंवा हवनास अयोग्य अन्न (घृतादिरहित हरीक, राळा, इ०) [स कत्= कुत्सित+अन्न]

कदपस–पु घोड्यास होणारा एक रोग यामुळें बरसा तींत घोड्याच्या गुडघ्यावर फोड येतात यावर एरंडीचें बीं गाईच्या जुन्या तुपात वाटून लावतात –अश्वप २ २९०

कदंब–पु १ एक वृक्ष कळंब 'तूंचि मूळ प्राणारंभा। विश्वकदंबा जीवा तूं॥' –एरुस्व ६ ९४ 'हरी देखिला वक्र दृष्टी कदंबीं।' 'जाळवे न तरु तोचि कदंब।' –वामन हरि विलास १ ४२ २ मोहरीचें झाड, मोहरीचा दाणा ३ समुदाय फणस पेरू आणि लिंबतरूंच्या भरलें तीर कदंबीं।' –नरहरि 'जेथ तो श्रीवत्सु। जेथ भक्तकदंबु।' –ज्ञा १८ १६५७ ४ पृथ्वीचे ध्रुव ज्या बिंदूभोवतीं फिरतात तो बिंदु [स]

कदंबक–पु घोड्याच्या पायास होणारा एक रोग –अश्वप २ ३८

कदंबभ्रमवृत्त–न भ्रमवृत्त कदंब ४ पहा [स]

कदंबा–पु करार, कतरा पहा

कदंबिनी–स्त्री १ स्त्री, सखी २ कदंबाचें फूल? 'कदंबिनी घालिती मुकुटीं।' –शिशु ७८४ [स]

कदम–कदंब पहा

कदम–पु १ पाय, पाऊल 'आमचे दिलांत रावसाहेबाचे कदम पहावयाची उमेद बहुत आहे' –रा १ ६४ २ चालताना दोन पावलांत राहणारें अंतर (सुमारें अडीच फूट) ३ एक मोजणीचें माप वायव्यसरहद्दप्रांतात १० कदम=एक कच्चा बिघा (एकदशांश एकर) धरतात ४ (ल) शिरकाव, प्रवेश 'पातशाहींत त्याचा कदम न शिरावा हें आहेच' –दिमरा १ ३६.५ चालरीत, वागणूक, वर्तणूक [अर कदम्] ०खोल–(सपन्यायाय) हा हुकूम मिळाल्यावर प्रत्यकानें आपला डावा पाय डावीकडे १२॥ इंच अंतरावर आपटून ठेवावा व हात मागें नेऊन ते एकमेकांत एकमेकांनीं धरले आहेत असे असावेत डाव्या हाताच्या तळहातावर उजव्या हाताचा पालथा पंजा ठेवावा –सन्या ७ (इं) स्टँड ॲट ईझ ०बोस–वि पायांचें चुंबन घेणारा, अत्यंत नम्र 'प्रथमदर्शनीं मोंगलअश्री नबाबापाशीं येताच कदमबोस झाले' –रा ५ १९१ [फा कदम्बोस्]
०बोसी–स्त्री पादस्पर्श पायांचें चुंबन, नमस्कार, प्रणाम, वंदन (वडील माणसास किंवा राजास पायाला हात लावून त्या हातांचें चुंबन घेणें ही चाल मुसलमानांत आहे) 'वडी फजर साहेबके कदमबोसी करनेकु हुजूर खडे होऊ' –मव ६७ [अर कदम्=पाऊल फा बुसा=चुंबन]

कंदमूळ–न खाण्याच्या उपयोगी असे कंद व मुळें (रताळीं, मुळे, गाजर इ०) [कंद+मूळ]

कदर–स्त्री १ किंमत, शक्ति, प्रभाव, हिंमत, फिकीर २ तब्बेत, प्रकृति स्वभाव (विशेषत कडक वाईट, अहितकारक, निष्ठुर इ०) 'आदरें करून विनविता कदर का कठीण करितां तुम्ही' –प्रला १२१ ३ ठराव अधिकार 'आपणाकडे फौजेचे बेगमीस सरंजाम कदर करून दिला' –समारो १ १५५ ४ धनीपणाचा डौल, अम्मल चालविण्याचा स्वभाव, वचक हुकमत, धाक, जरब, शिस्त, दरारा नानाची कदर (मुत्सद्दी म्हणून) मोठी होती' –नि १००९ ५ गुणाची पारख, चहा, बूज 'त्याचा उद्देश लायकीची कदर करून चांगल्या गोष्टीला उत्तेजन देणें हाच होय' –सगाभा २ [अर कद्र=किंमत, महत्त्व] ०काढणें–

सोसणें–क्रि त्रास सहन करणें, मर्जी, तब्येत सभाळणें (रागीट किंवा आजारी मनुष्य, धनी, मूल वगैरेची)

**कंदर-रा**—स्त्री १ गुहा, दरी 'दुमदुमिताती गिरिकंदरें।'–ज्ञा ११३० २ डोंगरांतील खोरीव टेपें ३ (ल) अंतःकरण, हृदय 'बोले तों गृहि कृष्ण ये झटकरी आनदली कंदरीं।'–नदा ३१ [स]

**कदरणें**—अक्रि त्रासणें, दमणें, थकणें 'तुम्ही किती हि थकला, कदरला, हताश झाला तरी '–दिवाकरदृष्टि १७ [कदर]

**कदरदान**—वि योग्यता जाणणारा, गुणग्राही, पारख करणारा, चहाता (कागदपत्रांतील लिहिण्याच्या मायन्यामध्यें उपयोग करतात) 'कैलासवासी महाराज हे मनुष्याचे कदरदान होते '–विक्षिप्त २५० [अर कद्र+फा दान]

**कदरदानी**—स्त्री गुणग्राहकता, पारख, चहा 'जे त्याचे खावदगिरीस व कदरदानीस उचित तेंच करितील '–रा ३ १२० [अर कद्र, फा दानी]

**कदर्थणें**—अक्रि १ कष्टी करणें, गांजणें संकटांत घालणें 'आतां पराजयें राजा। जैसा कदर्थिजे लाजा।'–ज्ञा १६ १७५ 'न देखों हें विपयस्वप्न। जेणें कदर्थलें बहु '–रास १ ११ २ कासावीस होणें, कष्टी होणें 'इये हिंसेचे भेण। तेथ कदर्थिले प्राण।'–ज्ञा १३ २३५ [स कदर्थन=पीडा करणें, हाल]

**कदर्थविणें**—प्रयोजक क्रि १ कष्टविणें, त्रासविणें 'जो कदर्थवी निजप्राण। कदर्यू पूर्ण त्या नाव।' –एभा २३ १०५ २ नाहींसा करणें 'आतां कदर्थवित व्याधी। वळी करण्याचिया आधीं।'–ज्ञा १६ १४१

**कंदर्प**—पु १ मदन, कामदेव 'ऐसा नियतु का कदर्पु।' –ज्ञा ७ ५१ 'कोटि कदर्प लोपती पुढें। ऐसें सुदर लावण्य रूपडें।' –सवि १७ १६४ [स कदर्प] २ (ल) कादा [स कद+दर्प= कुत्सित दर्प (?)] –र्पाचें घर–न योनी, स्त्रीजननेंद्रिय, स्मरमंदिर–गृह–कूप 'कुश्चित कदर्पाचें घर। ज्याचि साचार सेविलें।' –एभा २६ ११२ ०केली–पु शृगार, मदनक्रीडा, सुरतक्रीडा, सभोग 'तेथ कदर्पकेळी खेळतीं युगळें। राजहसाचीं॥'–शिशु ६४९

**कदर्य-र्यू**—वि कृपण, कजुष चिक्कू 'समयीं सारम्यगुणा लुपहूनि कदर्युचा न डेरा हो।'–मोविराट ३ ११ [स कद्= वाईट+अर्य, कदर्य=कृपण]

**कदर्य**—न कदान, कुत्सित अन्न 'कदर्यावर बैसली माशी। ते उडविताही न उडे जैसी। गुतोनी राहे तिये रसीं। रुचीचिया चाडा॥'–ज्ञाप्र ७१० [स कद्+अर्य, कदर्य=क्षुद्र, अप्रिय]

**कदल**—न केळें, केळीचें, कदलीचें फळ [स]

**कदेळ**—न (गो) खुर्ची [पोर्तु कादेरा]

**कदलणें**—अनि (दुफाशी सोंगट्याचे खेळांत) सोंगट्या जुगल्यानंतर वेती, बारा वगैरे जुगदान खेळणें कदली पहा

**कदलणें**—अक्रि सर्चणें, घालविणें, गमाविणें (वेळ) [का कडयिसु कदालिसु=घालविणें, हालविणें ?]

**कदली**—स्त्री (दुफाशी खेळांतील) बारा, वेती, दुइदी, आठ वगैरे जुगदान

**कदली**—स्त्री केळ, केळीचें झाड [स]

**कदा**—क्रिवि १ केव्हां, कोणत्या वेळीं 'कदा नेणों योद्धी शरधिंतुनि काढी धर कदा।' –र ३ 'असा अतिथिधार्मिकस्तुत पहा! कदा सापडे।'–केका १२१ २ केव्हांहि 'माया-निवर्तक अग्नाशन। तयासही जाण कदा नुपजे।'–एभा २ ४६२ 'मग हा कदा देशात। जाणार नाहीं सर्वस्वें।'–नव १६ १२ [स, तुल० लॅ कादो] ०काळाचा, काळींचा–वि अतिशय जुन्या काळांतील, प्राचीन, पुरातन, ज्याचा काल नक्की माहीत नाहीं असा [कदा+काळ] ०काळीं, कदानकाळीं–क्रिवि प्राचीनकाळीं, पूर्वी, मागें, केव्हा तरी, क्वचित् प्रसगीं 'नित्यश जो येणार त्यापेक्षा कदाकाळीं येणाराचा आदर फार होतो '

**कदाचित्, कदाचित, कदाश्चित, कदाचित्पक्षीं, कदान**—उभ न जाणों, सहजगत्या, एखादवेळीं, चुकून –क्रिवि केव्हा तरी, कधीं तरी, क्वचित् [स कदा+चित्]

**कदान्न**—न नीरस अन्न, कदन पहा 'भावें हें कदान्न खासी त्याचे घरीं।'–तुगा ५३४ [कद्=वाईट+अन्न]

**कदापि**—क्रिवि १ केव्हांहि, कधींहि, मुळींच, कोणत्याहि वेळीं (नाहीं–निषेधार्थी उपयोग) २ कधीं कधीं, केव्हा केव्हा 'कदापि त्या होवोनि अप्सरा। जळद्वारें नेती विवरा। मग भोगिती पुरुषमात्रा। मानवासी॥'–कथा ५ ४ ८९ [स कदा+अपि]

**कदा पुरणें**—क्रि (व) कवखुती निघणें, दुर्दैव ओढवणें

**कंदार**—वि (गो) हट्ट, वर्दळ, निकर (क्रि येणें, पेटणें) 'कदार आयलों–पेटलों=निकरावर, वर्दळीवर येणें, आला [कद+वर ?]

**कंदाल**—स्त्री (कों कुण) त्रास, कटकट, भाडण कंदाळी पहा

**कंदाळी**—स्त्री (कों) परचक्रापासून होणारा उपद्रव, हानि, त्रास, भाडण (शत्रु सैन्य, लुटारू इ० चा) [स कद्, कदल=युद्ध, तग]

**कंदाळू**—न महाबळेश्वराकडे होणारें भुईकमळ, महादकादा, याचा कादा फार मोठा असतो म्हणून यास हें नाव पडलें [स कदली=कमळबीज, कद+आलु]

**कदिमी, कदिमाई**—स्त्री जुनेपणा, जुना लौकिक, परपरा, स्नेह 'सर्कारचें काम होऊन येईल परतु उभयतांचे कदिमीस व

निठेस एक प्रकारें दिसेल '–रा १ ३३५ 'आपल्या कदिमास बोल न लागे तो विचार करणें '–रा ८ ११९ [अर किद्म= प्राचीनत्व, कदीम=प्राचीन, जुना, कदीमी=प्राचीन, फा कदीमी]

**कंदी**—वि कदाच्या (मुळाच्या) रंगासारखा, धुऱ्याच्या रंगाचा, भुरकट, पिंगट रंगाचें, उदी (वस्त्र, पागोटें) [स कंद= मूळ, कंदी=मुळाच्या रंगाचा, तुल० से कद्रु=पिंगट] ०**पागोटें**–न भुरकट रंगाचें, कंदी रंगाचें पागोटें 'धुद नेत्र पहा धाइत गळ्यामधें आलें पागोटें कंदी।'–प्रला १८९ 'कंदी पागोटें सादीचीं धोतरें वगैरे वस्तुस उदार आश्रय देणें कितां शक्य आहे '–आगर ३ ९६ ०**पेढा**–पु एक प्रकारचा पेढा (सातान्याकडे रूढ)

**कंदी**—स्त्री खाण, स्थान, साठा 'जे ज्ञानाची कंदी।–परमा ११५ [स कधि=महासागर]

**कंदी**—क्रिवि (कुण माण कों) कधीं, केव्हां [स कदा तुल० लॅ कादो] ०**मंदी**–क्रिवि कधींमधीं, केव्हाकेव्हा

**कदीम-मी**—वि प्राचीन, पुरातन, जुनापुराणा, फार दिवसाचा (चाकर, वतन, धर्म, वहिवाट इ०) 'खेंचुन वाड्या बाहेर काटलें कदीम शिपायाला।–ऐपो ३९८ 'पाटील कुळ कर्णी शेटे महाजन कदीम हक्कदारी।'–पला ७० [अर कदीम–मी]

**कदीमल् अय्याम**—पुरातनकाळापासुन 'कदीमल्अय्याम सेणवी मजकूर याचे पिडी दर पिडी भोगवटा चालिला आहे ] –गोइसा १२ [अर कदीमुलअय्याम्]

**कंदील**—पु १ हातात घेऊन कोठेंहि नेण्यासारखा वारा लागू नये म्हणून ज्यास भोंवतीं काच बसविलेली असते असा दिवा, फाणस २ पितळेचा लामणदिवा, टांगता दिवा (वाणी लोकाच्या दुकानात लावतात तो) [अर कन्दाल, तुल० इं कॅंडल् (लॅ कॅंडेर=प्रकाशणें, कॅंडेला)]

**कंदुक**—पु चेंडू 'नातरी उदकाचिये भूमिके। आफळिलेनि कंदुकें।'–ज्ञा १७ २८० 'हरि मुलामधें कंदुक खेळतो' –वामन–द्वारका विजय ३ २३ [स]

**कंदुरी कंदोरी**—स्त्री १ (कों) गलबतासाठीं व इतर कामीं मोठे दोर तयार करण्यासाठीं बांधलेला लांबट सोपा–घर २ गळ्यात बांधावयाचा मंतरलेला दोरा ३ करगोटा कडदोरा [का कण्णी=दोर? गु कदोरो=कडदोरा, करगोटा]

**कंदुरी, कंदोरी**—स्त्री १ पैगंबर महमद याची मुलगी फातिमा हिच्या सन्मानार्थ मुसलमान लोक करतात तो भोजन समारंभ २ (ल) उत्सवाचें जेवण भंडारा, समाराधना 'कंदुरी सोहळा स्वानंदाचा '–दावि ३५३ –ऐपो २६२ 'शेख सल्लाची करू कदुरी मशीरण बोल्ले '–पया ५३ [फा कदूरी]

**कंदुरा, कंदोरी**—स्त्री बकऱ्याचें मास, सागुती, मासाचा नैवेद्य 'त्या कदुरीचीं पुण्यें जालीं ते करामत देखोन।'–मव १०३ तेगावच पिराला बकऱ्याची कदुरी करतात '–गुजा ३१ [फा कदूरी]

**कंदुरी**—मेजावरील आस्तरण (तागाचें अथवा चामड्याचें) [फा कदूरी]

**कंदुल**—पु काचनाचें फूल, फुलाची एक जात, कदल 'कंदुलाचे हार तुटे। अशोकाचें झळ्वुकें गळे।'–शिशु ७१७. [स कंदल]

**कंदे**—न (कु गो) पसरट तोंडाचें मातीचें भाडें (पाणी ठेवण्याच्या उपयोगी) [अर कद्ह=पेला?]

**कदेल कदेलडाव, कदेलदान, कदेली, कदेलणें**—कजेली व कजलणें पहा

**कदेली**—स्त्री केळीचें झाड, कदली पहा

**कंदोरी**—पु १ कनारी लोकाची जात हे दोऱ्या करतात २ कंदुरी पहा

**कद्दू**– पु (ना) दुध्या भोपळा [फा कुदु–दूदू, प्रा कद्दुइया, हिं कद्दू] ०**दाखविणें**–क्रि (ना) निराश करणें, अंगठा दाखविणें, वाटाण्याच्या अक्षता लावणें

**कद्धी**—क्रिवि (वायरी) कधींहि, केव्हाहि कोणत्याहि वेळीं, कदापि (नकारार्थी व निश्चयात्मक) (जोरानें ठासुन सागताना योजतात) [कधीं+हि]

**कद्धीं, कर्धी**—क्रिवि कव्हा केव्हा 'कद्धीं ते उपवास निर्मळ करी कद्धीं करी पारणा।'–निमा सुभद्राचंपु ३ ८४ [कधीं+कधीं]

**कंद्या**—पु (कों) कदील फाणस कदील पहा

**कद्रू**—वि कृपण, कंजूप, चिक्कू, कदर्य [स कदर्य]

**कंधर, कंधरा**—पुस्त्री मस्तक, शिर, कंठ, मान, गळा 'कंधरीं घातली ज्यानें त्यानें '–वामन, उपदेशमाला १ ६३ [स]

**कधीं**—क्रिवि १ कोणत्या दिवशीं? केव्हा? केव्हा पहा २ कोणत्याहि वेळीं केव्हाहि, नेहमीं [वै कर्हि, स कदा] ०**कधीं ०मधीं**–क्रिवि कव्हा कव्हा, मधून मधून एखाद्यावेळीं [स कदा द्वि] ०**काळीं**–क्रिवि कदाकाळीं, केव्हा तरी, कोणत्या तरी वेळीं किती तरी दिवसामागें, फार दिवसांनीं, क्वचित् प्रसगीं ०**च**–क्रिवि १ पुष्कळ दिवसापूर्वी, पुष्कळ काळापूर्वी, फार मागें २ कव्हाहि कद्धीं (नकारार्थी प्रयोग) ०**चा**–वि १ पूर्वीच्या काळचा, प्राचीन काळचा, फार मागचा २ केव्हाचा? कोणत्या वेळचा–दिवसाचा? ३ केव्हापासून, फार वेळापासून 'मी कधींचा आपली वाट पहात आहें' ०**तरी**–क्रिवि

करतल—पु तळ हात, हाताचा तळवा 'प्रत्यङ्बुद्धी कर तळें। हातवमार्वें '–ज्ञा १५ २५८ [ स ] ०भाप–स्त्री हाता वर हात मारणें, वचन देणें 'असें वदून करतलभाप। देऊन तुष्ट केलें त्यास।'–नव १५ १७७ ०भिक्षा–स्त्री १ घरोघर जाऊन जें अन्न कोणी घालील तें तळ हातावर घेऊन तेथच्या तेथेंच उम्या उम्या खाणें, अशा प्रकारचें व्रत किंवा भिक्षा २ (ल°) घरदार नसणें, फकिंग असणें, भिक्षावृत्ति 'करतल भिक्षा।तरुतल वास।'–चर्पटपंजरी [ स ]

करतलामल, करतलामलक, करतलामलकवत्—क्रिवि (हातात प्रत्यक्ष स्थित असलेला आवळा जसा सर्व बाजूनीं पाहता यतो त्याप्रमाणें) १ सिद्ध स्पष्ट, उघड, ज्याचें सर्व बाजूनीं ज्ञान झालें आहे असें, ज्यास दुसरे प्रमाणाची गरज नाहीं असें असशयित ' 'वेदशास्त्राचा मथितार्थ।झाला करतला मलकवत।'–एभा ११ १०४९ 'ते करतलामलकसे दूरूनि दिसते अशेप मग तीतें।'–मोस्त्री ४ ३ २ (ल) अवगत अस लेली, हातचा मळ बनलेली, अत्यत सुलभ साध्य (विद्या, कला शास्त्र वगैरे) 'चतुर्दश विद्या चौसष्ट कला। करतलामळ जयासी सकळा।'–ह ३१ ८ 'महाराष्ट्र व सस्कृत या दोन्ही भाषा मोरोपताला करतलामल होत्या'–नि ७६५ ३ स्वाधीन, सुगम 'सारा भूगोल ज्यास करतलामलकवत् आहे त्यास एखाद्या रानात नेऊन सोडला किंवा त्याच्या हातीं जहाजाचें सुकाणू दिलें तर काय मौज होईल बरें!'–नि [ कर+तल+आमलक ]

करताल–ली, करतालिका—नपुस्त्री १ (वाद्य) बाहे रच्या बाजूनें निमगोल व आतून सपाट असें धातूचें टीचभर लाब व तीन बोटें रुद व दोन्ही कडाना निमुळतें असें दोन दोन तुकड्याचें वाद्य हें आगटा व बोटें यामध्यें धरून चिपळ्यातारखें वाजवितात ताल धरण्याकडे याचा उपयोग करतात कव्हा कव्हा मृदगाच्या साथींत वाजवितात (सामा) चिपळ्या, टाळ 'नृत्यकृत्य तत्कारतान करताल घुमवस्या अतरीं।'–राला ३१ २ टाळी, दोन्ही तळहात एकमेकावर आपटून काढलेला आवाज (क्रि० वाजविणें, देणें, पिटणें) 'अद्वय भजनें अखड स्मरणें वाजवि करताळी।'–एकनाथ पदें (नवनीत) पृ ४४९ 'कथा अन्वय लापणिका।नाम घोप करताळिका'–दा ४ २ १० ३ चुटकी चिटकी (क्रि० वाजविणें) [ स कर+तल, ताल, गु करताल ] ०धरणें–हातानीं ताल धरणें, साथ करणें

करतुकीचा कादा—वि (श्लेपार्थानें) करणारा, कर्तृत्व वान् 'गाडे घोडे गाई म्हैशी बैल आदणपुरी। करतुकीचा कादा तिन्दा येतो आंगावरी।'–पला ८१ [ स कर्तृत्व ]

करतुत—स्त्री (वे) पराक्रम कर्तेपणा [ स कर्तृत्व, हिं करतूत, गो करतुब ]

करद—वि कर देणारा, माडलिक, 'पाचाळ, कुलिंद, ऋपिक केले जिंकूनि करद सस्नेह।'–मोकर्ण ६ ९ 'कोची येथील राजा सामरीन राजाचा करद असता त्यानेंही यावेळीं आपल्या अधि पतिविरुद्ध बड केलें होतें'–गोमतक इतिहास ४० [ स कर+दा= देणें ]

करद, करंदी—स्त्रीन (कु राजा) करवदीचें झाड, यास फार कांटे असतात करवदाचें फळ पिकल्यावर काळ्या रगाचें होतें व रुचकर लागतें हिरव्या फळाचें लोणचें करतात [ स करमर्द, प्रा करमद्द किंवा करमद, गु करमदा, हिं करौंदा]

करदनकाळ—वि अति क्रूर, करमतकाळ पहा [ स कदन+काळ ]

करदळ–ळी—स्त्री १ एक फुलझाड, कापूरकेळ २ केळीचें झाड [ स कदल ]

करदा—पु शेतकरी, जमीन करणारा, कसणारा, स्वत शेतीचा धदा करणारा (मालक किंवा कूळ) हा शब्द अनेक वचनीं हि उपयोगात आणतात, जसे –करदे पाटील [ फा करद कार, स कर+दा ]

करंदा, कारंदा—पुन करद पहा

करदाय, करंदें—स्त्री (गो) १ कटकट, मोठा आवाज २ कठोर शब्दानीं ताडण दु शब्द [ ध्व ? ]

करदावलें—न एक प्रकारचें गवत, याचीं फुलें पिवळीं अस तात करदोळ पहा

करंदी चौकट—स्त्री जोड चौकट दुहरी चौकट

करदोटा–डा–रा, करधोटा–डा—पु १ कडदोरा, कर गोटा पहा २ कमरपट्टा 'कटीं त्यालिसे करदोरा'–दवी दास भामावर्णन ८ ०तोडणारा–वि अतिशय कडक तबाखुला म्हणतात

करदोडा—पु (ना) बाधीव विहिरींत उतरण्यासाठीं बांध कामास धरून राखलेला कंगोरा, हा विहिरीच्या तळापर्यंत असून सुमारें दीड हात अतरानें ठेवतात

करदोडी—स्त्री शूद्र लोकाचा कमरेस बाधावयाचा सुती करगोटा करदोरा–डा [ स कटि+म दोरा ]

करदोडी–री—स्त्री मोठाले दोर वळण्यासाठीं तयार केलेला तात्पुरता सोपा, दोरशाळा

करदोंडी—स्त्री एक प्रकारचें झाड

करदोळ—न (वे) एक प्रकारचें गवत करदावलें पहा [ का करडे ]

कर न कर, कर न करी, कर ना करी, कर न कन्या—वि १ जें करावयास पाहिजे तें न करणारा व जें करा वयास नको तें करणारा असा (मनुष्य) २ हट्टी, वेडा, तडेल,

अकरनकर, 'हा तुझा करनकरी स्वभाव तुझ्या मावशील आव डला नाहीं '—वाळ २ ७७ ३ (गो कु) परोत्कर्ष न साह णारा [करणें+न करणें] म्ह० करनकऱ्या चा यमान=करनकरेपणाचें मत, वरील प्रमाणें वागण्याचें मत प्रकार, तऱ्हा 'आयर्लंद निश्चयापासुन आजपर्यंत इंग्लंडनें तर्थे तुलना करनकऱ्याचा वसा चालविला आहे '—आयर्लंदचा इतिहास

**करनाटक**—पु. एक देश, कर्नाटक पहा [स कर्णाटक का करि=काळा+नाडु=प्रात] ०ओस पडणें–बहिरें होणें, बधिरत्व पावणें [स कर्ण=कान]

**करनाटकी**—वि कानडी (भाषा, मनुष्य वस्तु इ०)

**करप-पा**—पुस्त्री १ शिजवितांना करपलेलें, काळें होऊन भांड्यास चिकटलेलें अन्न, पदार्थ २ अति उष्णतेनें जळलेलें किंवा वाळलेलें पीक [करपणें]

**करप**—न (रा) कठिण पदार्थाचा धार असलेला तुकडा (काच, शिंप, दगड, खापर, काल्वें वगैरेचा), कपरी [स कर्पर=दगड, खडा, म कडपा, कपरा]

**करपचंद्र**—पु (गो सोनारी) घडयाळाची साखळी, छड

**करपजी, करपजी**—स्त्री (गो) हातांत धरावयाची माटी पणती

**करपट**—वि १ करपलेलें, अर्धवट जळलेलें (अन्न, भात भाकरी) २ जळका, जळकट (वास) ३ अजीर्णामुळें घशाशीं येणारें दुर्गंधयुक्त आवट (ढेकर) [का करि=भाजणें, करपणें, करकु–करिकु=भाजलेलें, जळलेलें ?]

**करपट**—न वस्त्राचा फाटका तुकडा, फडकें, 'जेविं करपट शतें कृशान। विकसिने जैसा।'—कथा ३ १६ १ [स कर्पट=जुनें कापड]

**करपट**—पु (कु) आकस्मिक येणारा, तुफानासारखा वारा व पाऊस

**करपटसड्या करपटड्या**—वि पौष्टिक अन्न अथवा पदार्थ सेवन केला असताहि जो पुष्ट होत नाहीं असा (मनुष्य) [करपट+सडणें]

**करपटाण**—स्त्री करपलेल्या अन्नाचा वाईट वास, घाण [करपट+घाण]

**करपणें**—अक्रि १ भाजणें जळणें, होरपळणें, भाजून निरुपयोगी होणें (अन्न वगैरे) २ कडक ऊन किंवा ऊन यामुळें नष्ट होणें, नासणें (शेतांतील पीक, झाडें) 'फळतीं झाडें करपती।—दा ३ ३ ४६ ३ म्लान निस्तेज दुर्बळ होणें (भय शोक इ० मुळें) वाळणें झडणें निस्तेज होणें 'स्वास्थ्य पावे करपतेंहि मनी '—मोरा पृ १५ ४ खगणें दु खानें, विकारानें क्षीण होणें (शरीर) 'स्पर्शे जालेया कमळांचा। तनु करपतसे।'—शिशु ८३३ ५ कष्टी होणें, दु ख पावणें 'तसें तत्सौंदर्य परिमदन दिसों करपना।'—विवि ८ १ २० [का करकु, करपु का करि=जळणें, भाजणें, तुल० स कृप्=दुर्बल होणें]

**करपत्र**—न करवत 'तिति दिस करपत्रीं आप । जीव धान्य।'—साप्र ३ ७३ [स कर+पत्र]

**करपल्लव**—पु १ (काव्य) हाताचा पंजा हात 'पद्दात करपल्लवां नव सरळा।'—ज्ञा ११ ·१५ २ हातानें खूण करणें, पल्लवणें [क्रि० करणें] [म] करपल्लवी, करपल्लवी भाषा, (अप) करपाल्लवी स्त्री अक्षरादि वर्ण हाताच्या बोटांवर बसवून त्या संकेतानें भाषा चालणें, खुणांनीं बोलणें, गुप्त मूक भाषा (क्रि० करणें) 'करपाल्लवी नादवळा। करपाल्लवी भदकळा।'—दा ५ ५ २७ 'माझ्या मुक्या मनाची करपल्लवी आपल्याला समजेल का ?'—मा १०७

**करपविणें**—उक्रि १ करपणें प्रयोजक अन्न शिजत असतां जाळणें, भाजणें, काळें करणें २ जाळणें, नासणें, कोमेजणें, (झाड, पीक इ०)

**करपक्ष प्राणी**—पु पक्ष हेच ज्याचे हात आहेत असे प्राणी (वाघूळ, पाकोळी वगैरे)—प्राणिमो ८२ [स कर+पक्ष+प्राणी]

**करपा**—वि करपट पहा 'करपा ढेकर '

**करपा**—पु जळका, वाळलेला तुकडा, भाग, करपलेला भाग [करपणें]

**करपा**—पु (गो कों) चपटा, सपाट व पातळ शिपला करप पहा [कपरा]

**करपा**—पु द्राक्षावर पडणारी एक कीड जंतु [करपणें]

**करपा**—पु काळ्या रंगाचें फूल येणारें एक झाड —नाको

**करपात्रा**—वि कर (हात) हेंच ज्याचें (भोजनाचें) पात्र आहे असा (परमहंस) करतलभिक्षाशी, जोगड्याचा एक वर्ग 'परमहंस करपात्री '—वमीस्व १२ ६१ [स कर+पात्र]

**करपा**—स्त्री १ जळणें नासणें, सुकलेली, वाळलेली स्थिति (पावसाच्या अभावामुळें पीक इ० ची) (क्रि० पडणें) २ ताप, मूक वगैरेमुळें पोटांत पडणारी आग (क्रि० पडणें) ३ भांड्याच्या बुडास लागलेली जळ, मस काळेपणा ४ करपलेलें अन्न [स करपणें]

**करपी**—वि (जुन्नरी) दोन्ही गालावर पांढरा रंग असलेली (मेंढी) 'ही मेंढी करपी आहे '

**करपुतळी**—स्त्री कागदाच्या पाठीला काजळाचा लेप लावून त्यावर दिव्याच्या प्रकाशांत पाहून किंवा भविष्य पाहण्याची एक रीत कोणी हाताच्या आंगठ्याच्या नखास काजळ लावून त्यावरहि पाहतात, कज्जलपुतळी [कर+पुतळी]

करपुष्कर—न (करकमल) १ हाताचें अग्र, बोटें २ (काव्य) हत्तीच्या सोंडेचें टोक 'प्रभु वारण जमा करपुष्करानें। श्रीराम चाप उचली करपुष्करानें' –वामन, सीतास्वयंवर ३२ [स कर=हात+पुष्कर=कमल, पुष्प]

करपृष्ठ—न तळ हाताचा मागचा, सालचा भाग, हाताची पाठ [स]

करपेल—न मऊ व चांगलें, गुराने खावयाजोगें एक प्रकारचें गवत

करफाग—स्त्री (खा) (सोनारी) आगट्या वगैरेच्या टाकाची पट्टी

करफस—पु सरडा 'चार करफस व अवखाईचें मूळ बारीक करून करडईच तेलांत भाजून मिळवून केस गळे असतील तेथें लावावें' –अभप २ ३०४ [फा]

करंबट—स्त्री १ एक प्रकारची चटणी, आलें धुवून त्यांत मीठ, हिंग घालून वाटून दह्यांत कालवून केलेली चटणी २ आवळकाठी, केळफूल वगैरे पदार्थांत हिंग, जिरें, मिरें, अमसूल, मीठ घालून वाटून केलेली चटणी ३ (कु) आंबा, काजू यांच्या फोडीस मीठ, मसाला लावून केलेलें लोणचें [स करंभ=मिश्रण, दध्योदन, मिश्र पदार्थ, खाद्य]

करवड-वाड—स्त्री गुरानीं खाऊन उरलेला व तुडविलेला कडब्याचा गाळ, कडवड पहा 'जावयासवें आलें घोडें। दाणा देती करवाडें।' –भावार्थ रामायण, किष्किं ११ १०४

करवडणें—अक्रि करवडीत होणें, करवडणें पहा

करवडी—आउताचा एक प्रकार –दो ७ १७

करबंदी—स्त्री कर देण्याचें बंद करणें, सरकारी कर (शेती व मालावरील) न देण्याबद्दलची चळवळ 'अलाहाबाद काँग्रेसमध्यें करबंदी, जंगलसत्याग्रह वगैरे ठराव पास झाले' –के ३१ ५ १९३० [कर+बंद]

करबपाग—न (को) मासे धरण्याचें एक प्रकारचें जाळें [करव=? +पाग=जाळें]

करबल—न (वे) मुसलमानाच्या मोहरमांत हिंदूंनीं काढलेले मेळे, लेजिमीचा खेळ [अर करबला=हुसेनचें मृत्युस्थान]

करंबल—स्त्री एक झाड हें झाड मोठें असून याचें पान मोठें हात-सव्वा हात लांब असतें, करमल पहा 'न पाहातां सवलें। मानससरोवरीचीं कमळें। आणि जिती करबाळें। गुढालीनिया।' –शिशु ७८६

करंबुटी—स्त्री १ (कों) लहान, हिरवा, कच्चा न पिकलेला, आंबा, आंब्याची कैरी २ खारांत मुरलेल्या कोंवळ्या कैऱ्या 'आणि करबुट्या रायतीं।' –मसाप २ २४ ३ चटणी, करंबट पहा [कर=काळा+अंबुटी]

दाखो २. १७

करंबें करमणें—न १ मातलेल्या आंब्याच्या बल्कांत गूळ व मसाला घालून केलेलें तोंडीलावणें, चिंचेंत गूळ, मसाला घालून केलेलें तोंडीलावणें २ रुचकर पदार्थ घालून भाजलेलें किंवा उकडलेलें फळ, रुचकर पदार्थ घालून भाजलेला किंवा उकडलेला बाठ धरलेला आंबा

करंबेल, करबील—पु (गो) एक झाड याचीं पानें फाडणीस उपयोगी पडतात करवीर पहा.

करंबेळ—पुन एक झाड व त्याचें फळ हें झाड सह्याद्रीच्या उतारावर होतें याचें लाकूड इमारत कामास उपयोगी असतें

करंबेळें—न लोणच्याचा एक पदार्थ, करंबें पहा

करभ—पु १ मनगटापासून बोटाच्या मुळापर्यंतचा तळहाताचा भाग २ हत्ती, उंट किंवा इतर पशूचें लहान पिलूं, छावा [स]

करभार, करभाग—पु मांडलिक राजानें सार्वभौम राजास द्यावयाची खंडणी, कर (ताना) खंडणी, कर (क्रि० घेणें, देणें, वसविणें) 'श्रीमंतास करभार देउन आले शरण रिपू पृथ्वीवरले।' –ऐपो १९८ 'सर्व राव दती करभार। कर जोडुनि वारंवार।' [सं कर+भार, भाग]

करभूषण—न हातांत घालावयाचें रत्नजडित कडें. 'पिवळें पदक, करभूषण।' –रामाची भूपाळी [स कर+भूषण]

करम—न (हिं) नशीब, दैव, कर्म पहा [म कर्म]

करम, करमकंद, करमकल्ला, करमकांदा, करमगड्डा, करमाचाकांदा, करमभाजी—न पु स्त्री कोबी, पानकोबी [फा करम्, करब्]

कॅरम—पु एक टिकल्यांचा खेळ यांत एका फळ्यावर दोन रंगाच्या ९।९ टिकल्या व एक राणी टिकली असून त्या दोन बाजूंच्या गड्यांनीं आपआपल्या रंगाच्या टिकल्या कोपऱ्यांत असलेल्या छिद्रांत घालावयाच्या असतात हा खेळ कलकत्ता येथील कार व महलानोबिस कंपनीनें प्रचारांत आणला व त्याच्या आद्याक्षरावरून त्यास नाव पडलें ०बोर्ड-पु टिकल्यांचा खेळ खेळावयाचा, चार खिसे असलेला चौरंग

करम-फर्माय-मुख्लिसान—वि (फा) स्नेह्यावर कृपा करणारा (पत्रव्यवहारातील एक मायना)–रा ३ ४५१ [फा]

करमट—स्त्री करवट पहा

करमणूक, करमत—स्त्री १ (काव्य) आनंदानें, सुखानें काळ घालविणें, मनोरंजन, रमणूक २ खेळ, मौज, आवडता उद्योग क्रीडा [करमणें]

करमणें—अक्रि आनंदांत, सुखांत, मौजेंत, चैनींत काळ घालविणें, आनंदांत सुखांत, काळ जाणें 'मला करमत नाहीं.' [स क्रम्=जाणें, क्रमण]

करमणें—अक्रि एखाद्या क्षारांतफळ वगैरे राहिल्यानें त्यास, किंवा फार वेळ पाण्यांत राहिल्यानें हात पाय वगैरेस सुरकुत्या पडणें, आक्रसणें, चिरमुटणें, चिरम्या पडणें

करमर—स्त्रीन एक झाड व त्यास येणारें फळ, करवल; करमल, याचें पान आवळ्याच्या पानासारखें परंतु थोडें लहान असतें फळ लांबट असून त्याच्या पाकळ्या थोड्या वर आलेल्या असतात फळाचें लोणचें करतात —श ६ २२ लॅ. अव्हरोआ कॅरमबोला [म कर्मरंग]

करमरा—वि आकारानें करमराच्या फळासारखा (कांचेचा, सोन्याचा वगैरे मणी) बाहेरून फुगीर करवे असलेला मणी ज्याचा (मणी) [करमर]

करमल-ळ—न १ कमरख, करमर एक आंबट फळें येणारें झाड व त्याचें फळ लॅ अॅव्हरोआ कॅरमबोला २ कर बेल, एक मोठें झाड याची पानें मोठी व लांबट असतात लॅ डिलनिआ पेंटाजिनिआ

करमलवाल—स्त्री. (गो.) भाजीच्या उपयोगी पडणारी एक वेल

करमाला—स्त्री माळेप्रमाणें बोटांचा उपयोग करणें, जप संख्या मोजण्यासाठी उपयोगात आणलेली उजव्या हाताची बोटें (त्यांची पेरें), करांगुलीचीं तीन पेरें, तर्जनीचीं तीन पेरें व मधील दोन बोटांचीं मधल्याशिवाय दोन पेरें याप्रमाणें दहा पेरांची ही माला होते [सं कर+माला]

करमीन—पु एक प्रकारचा मासा (हा शब्द चुकीनेंहि तयार झाला असेल कारण याच निरनिराळे पाठभेद आढळतात) 'सुंसुमार घडियाळ मत्स्य मगर। कूर्म कामीन जळविखार।' —मुआदि २९ ७७ [कर[१] +मीन, का कर=वरिष्ठ, महत्]

करमुइ—स्त्री कळा.—शर

करमुंचें—क्रि (गो) मिठाच्या पाण्यांत भिजणें, करमणें पहा [स क्षार+मुच्[१]]

करमोड—पु (व) तापाची कसर; अंग मोडून येणें 'तापाचा करमोड येतो' [कर+मोडणें, गु करमाडिया=गुरांचा एक राग]

करमोडी—स्त्री (वाई) एक वनस्पति

करल—स्त्री (चि) तांदूळ, सावे, नाचणी, राळा, वरी यांच्यावरील टरफल (विशेषत) बारीक तुस [स]

करल—वि (कु) रोड अशक्त कमी दूध देणारी (म्हैस)

करल—वि बरड मुरमाड (जमीन)

करली-लें—स्त्रीन (कु वों) पाणी उपसण्याचें लाकडी साधन बागेंत माडाळी, कळी, पोफळी यांना पाणी शिंपण्यासाठी याचा उपयोग करतात हें पन्हळासारखें असून कमानदार असतें याचा हातकरलें म्हणतात पायकरल्याचीं दोन्हीं तोंडें बंद असतात याची एक बाजू हातात धरून दुसरी बाजू पाण्यात टेकवून मधील भागास गुडघ्यानें धक्का देऊन पाणी उडवितात 'करल्यानं पाणी उसाप' [तुल० हिं करवार=विहिरींतून पाणी उपसण्याचें साधन]

करलावणी—स्त्री (कु) चिंचेपासून चिंचोके वगळे करण्याची (काढण्याची) कृति, काल्लणी.

करलावणें—क्रि (कु) चिंचेपासून चिंचोके काढणें, वेगळे करणें, काढणें

करली—स्त्री (वों) पांढऱ्या रंगाचा मासा, याच्या अंगा वर काटे असतात लांबी सुमारें वीड हात असते

करला—स्त्री एक प्रकारचें गवत

करली—वि (कुलाबा) आखुड

करलें—करली पहा

करवजी-जें—स्त्रीन एक औषधी वनस्पति

करवजी—(कु) करजी पहा

करवंजें—न पाण्याचा फवारा कारंजें पहा

करवट—पुन (व्हाव) एक कडू फळ व त्याचें वेल, कारट पहा 'जेंवि भाजिलें करवटें। तरी कडुपण न घटे।' [स कटु]

करवट—स्त्री (ना) एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळणें [हिं करवट]

करवटणें—अक्रि (ना) एका कुशीवर पडणें, निजणें [हिं करवटना]

करवंटी, करवंटी करोटी—स्त्री नारळावरील कठिण त्वचा नरोटी नराटी (वाप्र) हातीं करवंटी देणें-भिकेस लावणें [स करोटी]

करवड—स्त्री १ खरवड दूध वगैरे पदार्थ तापविले असतां भांड्याच्या तळाशीं बसणारा खरवडून काढण्यासारखा भाग २ (ल) म्हातारपण 'ती साऱ्या मुलखाची मेली करवड!' खरवडणें]

करवडणें—अक्रि करवडणें पहा

करवडी, करवंडी—स्त्री पोटाची खाच, पोटाची खळगी, पोट 'बाप करी जोडी लेकराच आदी। आपली करवडी वाळ वुनि।' —तुगा १५८३ [स करड]

करवडी, करवंडा—स्त्री समूह, राशी जमाव, थवा. 'नदी वाहता दुथडी। झाल्या प्रेताच्या दरडी। धाडणें बगळे पृथी गाडी। गज करवडी महाग्राह॥' —एरुस्व १० ८०, 'हस्तींची सहित गज करवडी, असंख्यात पाडिल्या।' —मुआदि ४४.१०१ [?]

करवण—स्त्री (गो) १ फळाची लहान खाप-फोड-फाक २ फळांचा घड।

करवत—पु १ (सुतारी) लाकूड कापण्याचें हत्यार करवती पातें भरकम २ सोनारीहत्यार -वि (व)(ल) अतिशय गार यड याट युर्ट्वल्या बराबर करवतीनें कापल्या सारस करण्या इतक यड 'पाणी फार करवत आहे' करवद पहा [स करपत्र] ०काठ करवती काठ पु (विणकाम) धोतर लुगडे वग रच्या काठांत करवतीच्या आकाराची नक्षी करवती नक्षीचा काठ करवता कांठी-वि ज्याच्या कांठांत करवतीसारखी नक्षी आहे असे (धोतर लुगडे वगैरे) आडवा करवत घालणें-बाप्र एखाद्या कार्यास अडथळा करणें प्रतिबंध करणें हरकत करणें जिवाला करवत लागणें-असणें-अतिशय काळजी लागणें असणें करवताखालीं धरणें, करवती घालणें-अतिशय गांजणें जाचणें जुलुम करणें

करवतणें—सक्रि करवतीने कापणें (लाकूड वगैरे), अर कसों -शा ७ ७ [करवत]

करवती—स्त्री लहान करवत ०लगाम-काटेरी लगाम पहा

करवता—स्त्री एक झाड वाळा उबर

करवद द्रा—स्त्री एक झाड करंद पहा -शी ९ २६२ ११ ८८ [म करमर्द-करमरा प्रा करवदी]

करवद—न १ करवदीचें फळ २ (ल) (करवदाचें फळ फार आंबट व आणणारें असतें यावरून) अतिशय गार शहार आणणार म रगणाचें आधिक्य दाखविण्यासाठीं गार शब्दापुढें हा शब्द योजितात गार गार करवद' (हवा दारू ३०)

करवदणें—अक्रि १ करवदण्यासारखें शहारण्यासारखें गार असणें अतिशय थंडगार होणें (पाणी ताक हवा हात वगैरे) [करवद]

करवल-ळ—पु करोल बंदूकवाला घोडेस्वार 'एक मदा उचलोनि वळें। वीर करवले पाडिती -एभा ३० ११५ 'चाळीस हजार करवल जमले'-ऐपो १०७ 'नामी करवळ आहे हुजुरात।'-ऐपो २७७ [हि करोल तु करावुल]

करवला-ली—पुस्त्री नवऱ्या मुलीच्या किंवा नवऱ्याच्या भावास व बहिणीस लग्नात विनोदानें म्हणतात विवाहप्रसंगीं वर वली वधू व वर यांच्या पाठीमागें हातात कलश घेऊन उभी रहात भगते (वामा) मानकरी मानकरीण करवली सुभद्रा वल्हाळ। चाल सुनाळा उन्मनी।'-एरुस्व १६ ४२ कर वलीचा मान सुप्रसन्ना टेवी घगाळी।'-वसा ५४ [स करक (कलश)+वान वती म कल्हा+वला ली प्रत्यय]

करवला—स्त्री (हिं) बंदूकवाल्या घोडेस्वाराच युद्धातील कौशल्य किंवा कामगिरी [करवल पहा]

करवस्त्र—न हातरुमाल घाम पुसण्याचें वस्त्र (इ) हँड करचीफ [स कर+वस्त्र]

करवळणें—क्रि (व) कळवळणें, हळहळणें, द्रव येणें 'हालपाहून सुद्धां त्याचा जीव करवळत नाहीं' [कळवळणें]

करवा—पु १ सोललेल्या उसाचा तुकडा, गंडेरी [का कर्बु कब्बु=ऊस तुल० स खव=लहान खुजा] ०पडणें-क्रि शरी राचा एखादा अवयव मोडणें, तुकडा पडणें, अतिशय दुखावणें, दमणें थकणें (कंबर, हात वगैरे) 'हाताचा, कमरेचा करवा पडला'

करवा—पु १ करदोचा, दोरी वगैरे बांधल्यामुळें पडलेला वण २ लाकूड वगैरेस दोरी बांधण्याकरितां पाडलेली वाटोळी खाच, भवरी

करवा—पु मोत्यास मध्य खोलगटपणा असणें मोत्यास मध्यभागीं सभोंवती पडलेला करवाचा, रेघ हा मोत्यात दोष समजतात मार्ती डोळ्याममार धरलें असतां आंतील बाजूस चिरल्यासारखी रेघ दिसते तिला नर म्हणतात अशा मोत्यास थोडा खोलगटपणा असल्याने करवा म्हणतात.

करवा—पु नृत्यातील एक प्रकार कारवा, केरवा नाच यात वयपरिवर्तन केलें असतें त्या दिवशीं गाणें व करवा नाच पाहून दरबार फार खुष झालें -धर्मानी ९० [स करव]

करवाड-डें—न करवड पहा योनि नोंदळियाचीं कर वाडें। खाता भलते लागतां गोडें। -एभा २१ ०६७

करवाद—पु (कों) त्रास कष्ट श्रम [करवादण]

करवादणें—अक्रि (कु) त्रासणें श्रमणें कष्टी होणें, पिरपिरणें कटाळा आल्यामुळें रागानें कुरकुरणें, पिरपिरणें 'अरे पण झालें काय तुला इतकें करवादायाला'-रत्न ५४ [स कर+वद्-वाद=कुरकुर करणें]

करवाल—स्त्री तरवार 'फाडितु करवाळें। काढिती आतांचें पेंगाळ।'-शिशु १०४८ 'त्यांजवळ धनुर्बाण, परंतु करवाल वगैरे हत्यारासारखीं हत्यारें नाहींत -चद्रगुप्त ६१ [स करवाल]

करवाळ—न (कु) सपादिकाच्या अंगाचा मधला भाग [?]

करवीं-वें—शअ (एखाद्या) कडून, द्वारें-साधन-मार्गे, मध्यस्थी दाखविणारें प्रयोज्य कर्त्यापुढें कर्तृत्ववाचक हें अव्यय लागतें 'दुर्योधीं करविलीं करतळें। भीममना करवीं॥'-शिशु ८५३ -अमृ ७ १२६ 'तुला करवेना तर मुलाकरवीं करीव' [स क]

करवार—पु १ कण्हेरीचें झाड व फूल २ कोल्हापूर [स]

करवाल—(गो) एक वनस्पति, हिचीं पानें सुवासिक असून तीं कढींत किंवा आमटींत घालतात करवेल करवेली पहा

करवण—न (गो) लहान खाप, तुकडा कारवण पहा

करवेल—न (वायदशी) हळदीसारखें एक गवत करपेल पहा -मसाप ३ २४६

करवेली—स्त्री (वों कुलाबा) गाडीच्या सारीचें पुढचें व मागचें आडवें लांकूड

करव्ह—न (व) नांगर धरण्यासाठीं मागील बाजूस लाव लेलें मुठीचें लाकूड, हमणें [स कर+वह्]

करशींग—पु (गो) गोमंतक प्रांतातील एक झाड

करशुद्धि—स्त्री हातावर पाणी घालणें, हात धुणें विशेषत श्राद्धास ब्राह्मण जेवावयास बसताना त्याचे हातावर घालतात 'खाद्य नैवेद्य समर्पें भक्षिती। करशुद्धि देतसे भूपती।'—रुवि ७ १२१ [स]

करस्थापन—न कर बसविणें, लादणें [स]

करसावळ-ळी—स्त्री खरसावळी पहा

करहाट देश—पु कऱ्हाटट, कऱ्हा नदीच्या कांठचा प्रदेश, कऱ्हाड व त्याच्या आसपासचा प्रांत [स]

करळ—पु वाळूमिश्र ठिसूळ दगड, खरड, कड [स कर्क] ०लागणें-(वाई) पाभरीच्या फणानें जमीन जास्त खोल उक रली जाणें

करळ—नस्त्री (राजा) तांदूळ व ज्वार धान्याचें तूस, भुसा, टरफल करल पहा

करळ—स्त्री छिद्र, (विरळ विणलेल्या रोवळी सुप, पाटी यांच्या मधील) फट, चीर [स करल=वेळू, किंवा कराल=दंद, उघडें]

करळ-ळा—नपु कुंभाराच्या भट्टींत कौलें, विटा वगैरेंच्या खालीं घातलेलें, अर्धवट जळलेलें गवत २ अशा गवताची एक काडी

करळ—वि (व) उतरतें, कलतें 'झोपडीचें छप्पर जास्त करळ असल्यानें पाणी थांबलें नाहीं' ०जाणें-होणें-क्रि एका अंगाला कलणें, जाणें (जू, धुरी, नांगर, गाडा, तराजू तराजूची दांडी यासबंधीं योजतात) हा शब्द शेतकरी लोकांत विशेष रूढ आहे ०धरणें-क्रि (नांगर) आडवा धरणें ०चालणें-आडवें जाणें, आडवें निघणें यांच्या विरुद्ध शब्द (उभें) आणें, चालणें

करळ—काळ्या जमिनीचा एक प्रकार हिच्यांत भुसभुशीत पणा नसून ही फार चिकट असते हिच्यांतून पाणी झिरपून जात नाहीं पाणी पडलें असतां हिच्यावर मिठासारखा पांढरा क्षार येतो हिचे काळा करळ व पांढरा करळ असे दोन प्रकार आहेत [का करल=खारटपणा, क्षारता]

करळ—वि (व) महाग, कडक, धाजवीपेक्षा जास्त (किंमत) 'बाजारांत उशिरां गेल्यानें गहू जरा करळ पडले'

करळी—स्त्री मोठ्या झाल्यामुळें पायांतून येणारे पेटके

करळी—१ गाडीच्या साटीच्या चौकटीचें पुढचें व मागचें लाकूड अलेली करवेली पहा २ (वों ठाणें) उभे खुंट ज्यांत बसवितात त्या दोन लाकडांपैकीं वरच्या लाकडास करळी म्हण तात, पिन्यावरील आडवें लाकूड, करळी, दोन आडवीं लाकडें (तरसे) दोन लांब तुकडे (घोडी किंवा घोडवीं) हीं सर्व मिळून गाडीची साटी होते ३ (माण) वावकऱ्या व घोडवाच्या यांच्यामध्यें बसविलेल्या एक हात उंचीच्या व चार बोटें रुंदीच्या फळ्या प्रत्येकीं ४ (सुनारी) कपाटाच्या माग्याची फळी ५ गाडीच्या पेटीवरील भाग

करळी—स्त्री १ गुरळी, जाळ्याचा न विणलेला भाग, धागा, तंतु [का करि=दशी] २ धोतर, लुगडें वगैरेंचा भाग, दशी [का करि=दशी]

करळी—वि करळ दगडानीं बांधलेली, करळ दगडाची (इमारत, वस्तु वगैरे) [करळ]

करक्षालन—न हात धुणें, आचवणें 'देऊनि कृष्णासि आचमन। सवेंचि केलें करक्षालन।'—एरुस्व १५ १५६ [स]

करा करा दिवा, करा दिव्याचा मान—पु कऱ्हा पहा

करा—पु (राजा) पाण्यावर आलेला तरंग, साय -पु जोंधळा, बाजरी वगैरेंच्या कणसावर पाऊस पडून दाण्यास येणारा मोड, अंकुर

करा—पु (गो) पावसांत पडणारी गार [स करक=गार]

कराकर-रा—क्रिवि (ध्व) दात खाणें, ऊस चावणें, काकडी खाणें यावेळीं होणाऱ्या आवाजानें युक्त, करकरा पहा [ध्व]

करागळा—पु (व) खाचरा(गाडी) चा सगाडा व आख यांना जोडणारे दोन बाजूचे खुंट

करागळी करांगुलि-ळी—स्त्री हाताचें किंवा पायाचें लहान बोट कनिष्ठिका, करंगळी पहा [स कर+अंगुलि]

कराचलि—स्त्री एक आखूड तलवार, करचली पहा [फा कराचळी]

कराज—न (कु) कर्ज (अप) म्हण, कर्ज 'कराज काढलं हां' [अर कर्ज़]

कराड—पु १ कंप, आवेश लहर (ताप वगैरे विकृतीनें येणारी) २ मनोविकाराचा क्षोभ, जोराची लहर चीड (क्रि०येणें)

कराड-डा—स्त्री (खान गु व) पर्वताची किंवा नदीची दरड, कडा 'मदनाची थोर कराडी।'—एभा १३ ५८१

कराड—न (कु) सुकलेलें रान, गवत करड पहा [का करड-वाळलेला घास, गवत]

कराडणें—क्रि कुरतडणें, करडणें पहा 'कामक्रोधाच्या उदरीं पाहीं। मूळाच्या टाळीं कराडी।'—एभा १० ५१७ 'मूषकें करांडोनि दशी। पादहीन करावा।'—मुआदि ३४ ४

कराडणें—क्रि (कु) जून होणें [का करड=कठिण, रक्ष]

**करांडा**—पु २ (व घाटी) अंगावर फोड अथवा गळू झालें असता येणारा ताप, कणकण ( क्रि० येणें )

**करांडा**—पु १ (कों) ओंडा, ठोकळा, करडा अर्थ २ पहा २ (कु) करांडो, नारळाच्या किंवा केळीच्या झाडाचें खोड, बुंध

**करांडी**—स्त्री १ शक्ति, जोर, बळ, अवसान ;(क्रि० धरणें, येणें ) २ श्रम, कष्ट. ' उपास करांडीं । तिहीं करावीं बापुडीं ।' –तुगा ६४७ ३ (अव करांड्या) पेटके, वाब ( क्रि ०येणें, चढणें, ओढणें, उठणें )

**करांडूं**—न शाळीचें पिलूं करडूं पहा

**कराणा**—पु एक प्रकारची भाजी

**कराणी**—पु ( गो ) मुखत्यार, एजंट [ करणें, करणारा ]

**करातलयी**—स्त्री ( गो ) गमना, वेश्या [ स कृ]

**कराती**—( कों ) एक प्रकारची उघडी गाडी

**करादा-दें**—पुन करद करवद, करवंदी पहा [स करमर्द]

**करादा**—पु करदा ( कों ) एक प्रकारची वल हीस जमी नीत यणारा कद व वर येणारें फळ याचे गोड करादा व कडू करादा असे दोन भेद आहेत

**कराप**—न (कु) १ लोखंडाच्या भांडींत जळकट विटा सारखी अशुद्ध धातु कीट २ मुरलेला पदार्थ करपा पहा [करपणें]

**कराब**—न (कु) आठ पाकळी कमळाच्या आकाराचें व एका पाकळीस मोत्याचे घोस असलेलें कर्णभूषण, करावफूल, ( अव ) करावा [ स कुरबक=तांबडी कोरांटी ]

**करावीन**—स्त्री करडावीन पहा 'करावीन वडमार याची खूण '–ऐपो १०९ [ इ कॅराबिन ]

**करामत**—स्त्री १ चमत्कार अद्भुत गोष्ट नवल 'म्हणे येथ करामत दिसे बहुत । मग औरंगजेबासी जाणविली मात ।' –सवि २१२६ 'म्हणे करामत पाहू याची ।' –रामदासी १ १२२ २ कर्तृत्व, कौशल्य, खुबी चातुर्य, चमत्कार करण्याचें सामर्थ्य 'आपली करामत कारागारानें त्या पुतळ्यात खर्च केली होती '–विवि ८ २ २९ ३ गुंतागुंतीची, कौशल्याची रचना यंत्र, विविध साधनांची जुळवाजुळव [ अर करामत् ]

**करामती**—वि अंगीं करामत असणारा युक्तिवान्, चातुर्य वान्, कुशल हिकमतीचा, शोधक, कल्पक मूल्य न म्हणे करामती । कराड जाणे ॥' –दा ३ ९ ११ ' अघटी दैवत करा मती ।'–दावि ४६२ [ अर करामत ]

**करामात**—स्त्री महत्कृपा ज ये समयीं आपण येणें गोया (=म्हणज ) करामात जाली '–रा १ १८८ [ अर करामात्, करामतचें अव ]

**करार**—पु १ ठराव, वचन, बोली, कबुली 'मन्सबा करार केला '–सभासद ३० 'जमीनच दवास करार करून दिल्ही पाहिजे '–मसाप २ ३ ५ २ निश्चय, शाश्वति, ठाम मत 'तुका म्हणे एका क्षणाचा करार । पाईक अपार सुख भोगी ।' –तुगा ३७३ ' राजश्री नारायणराव घोरपडे यास पाठवणार म्हणतात, करार नाहीं '–रा ११ १६६६ ३ ( कायदा ) कायद्यानें अमल बजावणी करतां येईल अशी कबुलायत ( इ ) कॉंट्रॅक्ट, 'दोन इसमामध्ये एकमेकांत व वर्ने दऊन जेव्हां एखादी गोष्ट ठरते तेव्हां अशा वचनाला सगनमत म्हणतात व तें सगनमत कायद्यानें अमलात आणता येण्यासारखें असेल तर त्यास करार म्हणतात ' –घका ९२ –वि मुकर, कायम, निश्चित [अर करार्] ०दाद–पु ठराव लेखी वचन, करारमदार [ फा करारदाद ] ०नामा–पु ठरावपत्र, कराराचा कागद, करारलेख [ फा करार+नामह् ] ०मदार–पु १ वचन, बोली, कागद लिहून देणें, अनुमति वगैरे बद्दल व्यापक संज्ञा. [ अर करार+मदार ] २ ( मदारावर जोर देऊन योजितात ) खात्रीचें अभिवचन, आणभाक, बेलभंडारा ०वाकई वाके, वाकै–घडल्याप्रमाणें, बरोबर, अचुकपणें 'करारवाकई हकीकत '–रा १८ ७१ 'त्यासी माली-मामलतीचा इतला करारवाकै देऊ '–रा ६ ६१२ [ फा करारवाकिई ]

**करार**—पु ( ख्रि ) दवाची मनुष्यजातीसबंधीं कल्पेली योजना ( हिब्रू भाषेंत करार या शब्दाचा अर्थवाचक जो शब्द आहे त्याचा अर्थ कापणें अथवा वचन असा आहे ) 'मी मेघात धनुष्य ठेविलें आहे तें तुमच्या माझ्या मधल्या करारांचें चिन्ह समजावें '–उत्प ९ १३ ख्रिस्ती करार दोन आहेत **१ जुना करार**–पु (ख्रि ) ओल्ड टेस्टामेंट या इंग्रजी शब्दाचा पर्याय, परमेश्वरानें इस्रायल लोकांशीं मोशे याच्यातर्फे जो करार केला होता तो त्यांत नेमशास्त्रासबधीं बाह्यविधि व नियम लाविले होते 'कारण जुना करार वाचितात तेव्हां तेंच आच्छादन तसेंच न काढिलेलें राहतें '–२करिंथ ३ १४ –इत्री ८ ७ १३ २ ख्रिस्ती पवित्रशास्त्र या ग्रंथाचा पूर्वार्ध **नवा करार**–पु १ (ख्रि ) न्यू टेस्टामेंट या इंग्रजी शब्दाचा पर्याय, भविष्यवादामध्ये ईश्वर व मानवजाति यामधील ज्या नैतिक संबंधाविषयीं भविष्य वर्तविलें आहे तो संबंध 'मी इस्राएलाच्या घराण्याशीं नवा करार करीन '–इत्री ८ ८ २ येशु ख्रिस्तानें मनुष्यांशीं केलेला करार, त्यानें क्रूसावर आपलें रक्त सांडून त्यावर आपला छाप मारिला त्यायोगें ख्रिस्तावर भाव ठेवणारास तारण प्राप्त होतें ३ पवित्र शास्त्र या ग्रंथाचा उत्तरार्ध

**कराराचा**—वि १ केलेल्या ठरावास जो कधीं टळत नाहीं तो, विश्वासू प्रतिज्ञा पाळणारा ' निवडक घालिस सहस्र बरोबर फौज कराराची ।' –ऐपो ३१५ २ निश्चयी, एकवचनी [करार]

**करारी**—वि १ कराराचा २ निश्चयी, बाणेदार, विश्वासू ३ पक्का, स्थिर मनाचा, दृढप्रतिज्ञ ४ टिकाऊ, तग धरणारा (वस्तु,

करीत—शअ (राना) कडून, कर्वी करव पहा

करुण—वि १ दया उत्पन्न करणारा, पामर आणणारा (प्रमग) २ दयार्द्र दीन, कृपावत [म] ०रस-पु नवरसा पैकीं एक दुसऱ्याची विपन्न स्थिति, प्रियजनवियोग इ० कारणानी अत करणात जी वृत्ति उत्पन्न हाते ती, दुसऱ्याचें दुःख पाहून अत करणामध्यें उत्पन्न होणारी भावना व्यक्त करणारा रस 'सांगा नवरस लक्षण। तरी शृगार हास्य करुण।'-निगा २८१ [म]

करुण(दृष्टि)—वि (नृत्य) दुःख झालें असता डोळ अर्धवट मिटतात व बाहुल्या अश्रुपूर्ण होतात व नासाग्री नजर लागत तदी (दृष्टि) हा अभिनय करुणरसाचा आहे

करुणा करुणा—पुस्त्री दया कृपा माया दया पर्णे, कींव 'मग जो अल्दरमामा करुणा बस ी नव सनावर तीं।'-माउयाम ७९१ कृपालुता परमदुखा। करुणा केमी तुज नये।' -व्य ..

करुणाकर—वि दयासागर, कृपानिधि दया करणारा कृपा करणारा (परमेश्वर) नाभी नाभी या उत्तरें। करुणाकरें शातवाज।' -तुगा ११०९ 'जो जगद्गुरु करुणाकर। त्यासि भक्त वचित्र आवडती फार।' -सवि ११९

करुणाकीर्तन—न १ (परमेश्वराच्या) दयेचें व कृपेचें वर्णन २ (ल) गयावया करणें, काकुळत करणें, दयेसाठीं विनवणी

करुणाग—वि नम्र 'नमन करूं साष्टांगीं। उभा राहिला करुणागीं।'-तुच ३५ ३१ [स करुण+अग]

करुणा भाकणें—कि दुसऱ्यास करुणा यईल असें दीनवाणें भाषण करणें दयेची याचना करणें, काकुळत करणें, गयावया करणें 'देसानिया अतममया। करुणा भाकिती भोगीतनया।' ह-११ १४१ करुणा अनुतापें भाकावी॥' -सवि ३ ९१

करुणारस —करुणरस पहा

करुणास्वर—पु दीनवाणा, करुणेचा, काकुळतीचा शब्द [स]

करुणाळा—वि दया, करुणा करणारा, कृपालु 'जरि तू करुणाळा गासावी। भणौनि विटसी ना।' -ऋ ७० [स करुण +आलुच]

करू—वि करणारा उदा० यज्ञिकरू धिंड्डाडकरू, होतकरू 'पुत ह शुभलक्षणी रत सदा धर्मकरू रक्षणीं।' -आसीस्व १८ [स कृ]

करून—शअ १ कडून, कर्वी मुळें योगानें (साधन कारण भूत, मार्गदर्शक या अर्थी) क्षेमें यावा द्वारकानाथ। याचस्वार्थ करूनिया।' -ह ५६० २ होऊन (स्वत ज्याअर्थीनें विचारानें) बद्दल योगतात परतु हा तितका शुद्ध नाहीं होऊन पहा

करुच—पु (लि) हे एक प्रकारचे स्वद्त असून ते दवाच्या समक्षतचे दर्शक होत असे जुन्या कराराचरून दिसतें 'एदन बागाच्या पूर्वभागीं करूब व गरगर फिरणारी ज्वालारूप तरवार ठेवली' -उत्प ३ २४ [हिब्रू कुब (अव) कुरीम, म चिदचिन, इ चेरब]

करें—न (व) मडकें करा [स करक]

करें-कन्हें—न उट 'अशोकाचे अगवमे। वघडिले करहेंनि नसें।' -ज्ञा ११ ४१४ [स करभ=उटाचें पिलू]

करें—वि (गो) कृश, अशक्त [स कृश]

करेड—न (गो) तणाची एक जात, एक प्रकारचें गवत, करड पहा २ तवल्याच्या चामड्यावर दखवयाची शाई, पुडी [का करिडु=काळा पदार्थ, काटगा]

करेणु—स्त्री हत्ती हत्तीण हत्तीचें पिल्लू गजयालक 'करेणुपद चालता दिसति पक्ष्मचे पी। —वामनस्म ला नारद्दि १४३ नवनीत पृ ४०२ [स]

करेत—न (गो) घोडयाची गाडी, वारी [पो करित, इ कॅरेज]

करप-य—स्त्री (गो) तंबाखु जाळून केलेली पूड करप पहा [करपणें]

करपाक—पु (तजा) कढिलिंब [ते करें=काळा+वेपा =लिंब+आकु=पाला]

करम-करमेट—स्त्री (गो) कोणत्याहि फळाची व शिवीर करपें करमग पहा. 'आमाडयां करेम'

करेम-नी—स्त्री (वे) एक प्रकारचें भात साळी

करेल करेल आंबा—पु (गो) कलमी आंब्याची एक जात [पाउँ केरेल]

करेला—पु (व्यायाम) कारलें, दोन हातानीं फिरविण्याचा मोठा मुद्गल याचें वजन सुमारें दीड मण, लाबी ४३ इच, घर ०९ इच असतो [हिं करेल, स कराल ?]

करेळ—पु (वों) एक जातीचा मासा हा आक्टोबर-नोव्हेंबरमध्यें सापडतो

करो—पु (गो) कर करा पहा

करोट—पु (व) रोताच्या लावणीबद्दल देणारें धान्य [टट?]

करोट होणें—कि (कुण) मरणें, स्मशानभूमिविपदात जाणें [स करट म करोटी, कारट]

करोटी—स्त्री करवटा नरोटी करोटी हातात घेणें— भीक मागणें, विपन्नावस्थेस पोंचणें [स करोटी]

करोड—वि १ (हिं) कोटी (सख्या) २ (ल) असख्य [स कोटि प्रा कोडि]

करोडगिरी—स्त्री १ करोडा याचें काम व कचेरी २ माला वरील जकात कर 'निजामाला करोडगिरीच जी उत्पन्न आहे' [करोडा+गिरी]

**करोडा**—पु १ (कांहीं प्रांतात) कमिशनर किंवा सर मामले दाराच्या दर्जाचा अधिकारी, सुभा २ (मोंगलाईत) मालावरील जकात वसूल करणारा कामगार, जकातदार, नाकेवाला [हिं करोडा-डी, स कर]

**करों(रौं)डा**—स्त्री करवंदी पहा. –शर

**कराना**—क्रम करून, करून पहा 'दानांतुपान करवी मनुष्यां करानी।'–र ५१

**करोनी**—क्रि करून (कर धातूचें रूप)

**करोल-ळ**—पु बंदुकवाला घोडेस्वार, करवळ-ल पहा 'यांजरीज थोर थोर गाडयावरील भाडी व करोळ अमा चालला तोफखाना सज्जिला '–मराभा ६ [तु करावुल]

**करोली-ळी**—स्त्री १ करोल्याचें काम वसव २ (घोडया वरील स्वारानीं केलेला) बंदुकीचा मारा, फैर 'श्रीमत कडील बार्गीर झाडून जमा होऊन करोळी सुरू झाली '–पया ४५

**करोळा**—पु कुंभाराच्या आव्यांतील जळकें वगैरे करळ-ळा पहा

**करोळी**—स्त्री (व) गाडीचे धुरे ज्या लाकडात घालतात त्यास म्हणतात करळी पहा 'नुकतीच करोळी केल्यानें बरें झालें '

**करोळें**—न १ गाडीच्या साटीचें आडवें लाकूड, याच्या उलट दांडू २ करळी पहा

**कर्क**—पु १ खेकडा, कुरलें-ली, वलकडें, किर्वे २ (ज्यो) बारा राशींपैकीं चौथी रास [स कर्क, फा. कर्क] ०वृत्त–न उत्तर ध्रुव सूर्याकडे पूर्णपणें कलला म्हणजे २३॥ उत्तरअक्षांशापर्यंत सूर्यकिरण लंबरूप पडतात, या अंतरावरून जाणारें जें अक्षवृत्त ते ०रेषा–स्त्री. सूर्याच्या उत्तरेकडे जाण्याच्या मर्यादेवरील रेषा

**कर्क**—पु करक. वरातीच्या झारीतील दिवा 'वरा विस्तारिलों सुख। सोळा कळाचे सोज्या कर्क।'–एरुस्व १६ १५९ [स करक]

**कर्कट-कर्कटलें**—वि (व) कळकट, घाणेरडें, ओंगळ, मळानें करवडलेलें 'फडके कर्कट होऊन गेलें, धू एकदाचें' [करवडणेंप्रमाणें]

**कर्कट, कर्कटक कर्कोटक**—पुन १ (गणित) त्रिज्या २ वर्तुळ काढण्याचें साधन, कंपास ३ कर्क पहा

**कर्कटशृंगी**—स्त्री एक झाड, काकडशिंगी पहा [स कर्कट=काकड-डी+शृंग=शिंग]

**कर्कणें**—क्रि करण्याचा (वाद्य) कठोर आवाज काढणें कठोर शब्द करणें 'कर्णे किती एक रणघंटी कर्कती।'–ऐपो ११९ [ध्व.]

**कर्कर**—पु (एखाद्या रत्नाच्या आत दिसणारे) रेत कण, रेव, रेती, कच [ध्व खरखर]

**कर्कश**—वि १ कर्णकठोर, कर्णकटु शिरशिरी भरणारा, झोंबणारा (आवाज), याच्या उलट मधुर 'वाजों नका कर्कश रे नगीरा '–दावि १६१ २ (ल) बोचणारें अंत करणाला झोंबणारें (भाषण, वचन) 'कर्कश वचनें वर्कश मार।' –ज्ञा ८ २७ ३ तुसडा, तिरसट, रानटी, वाईट स्वभावाचा ४ कठीण, अतिदाट 'झाडी हे कर्कश भयंकर'–रामदासी २ १३७ तों रान कर्कश अचाट। गगनचुंबित तरु अचाट।'–नव २३ ९ ५ क्रूर, कठोर, निर्दय, भयंकर 'कर्कश वश उभा रणरंगीं राघव तमा।'–दावि ३३४ [म कर्कश]

**कर्कशा**—स्त्री १ भांडखोर, कैदाशीण, कृत्या, जगनाड, तडेखोर, भांडकुदळ स्त्री २ कर्कश, कठोर आवाज असणारी स्त्री, मधुर स बोलणारी उलट [स कर्कश]

**कर्कशा**—पु भांडण 'ते समयीं यांणीं भाऊसाहेबांचा कर्कशा केला नाहीं '–रा १६ १५ [अर कर्कशा, ध्व.]

**कर्कग्रह (संयुतहस्त)**—न (नृत्य) दोन्ही हातांचीं बोटें एकमेकांच्या बेचक्यात घालून अडकवून ठेवणें [सं]

**कर्की**—स्त्री घडशी, मौर्ति, वचक 'समोर गाता कोणी दिसेना। मनामधीं बसली कर्की।'–होला १८ [कडकी]

**कर्कोचा (च्या)**—पु. एक पक्षी, करकोचा पहा 'हुमे कर्कोच्या सुतार।'–दावि २४४ [स क्रौंच]

**कर्कोट, कर्कोटक**—पु १ (पुराण) कद्रूपुत्र, एक नाग, सर्पराज, याला नऊ हजार हत्तींचें बळ होतें नल राजास वनवासांत यानें दंश केला होता कलिदोषनाशाकरिता याचें स्मरण करतात 'कर्कोटकस्य नागस्य कीर्तनं कलिनाशनम्।' 'नाना सर्प उगवले काळ कर्कोट चालिले।'–दावि ५०१ २ (उप) कन्हाडे जातीच्या ब्राह्मणास म्हणतात ३ सूड घेणारा, दीर्घद्वेषी मनुष्य. [स]

**कर्कोटकी, कर्कोटी**—स्त्री फांगुली पहा

**कर्केत**—पु (रत्न) लसण्या, रत्नाचा एक प्रकार हें एक उपरत्न आहे [स कर्केतर=रत्नविशेष करकेतन पहा]

**कर्कोटावर्णी**—क्रि (गो) नारळाचा कीस पाटयावर घालून किंचित बारीक करणें खांचणें [ध्व]

**कर्चूर**—पु कचरा, कापुरकाचरी, कचोरा, एक सुगंधी व औषधि द्रव्य, हा रुच्य, उद्दीपक कटु व गुल्मरात, कफ, कृमि नाशक आहे –बृहन्निघं ११५ [स]

**कर्चा**—पु हिन्याचा लहान तुकडा, कण, रज –जमि (बहारे) (परिभाषा).

**कर्ज**—न ऋण, दुसऱ्यापासुन उसनें घेतलेलें द्रव्य, खर्चासाठीं परत देण्याच्या बोलीनें काढलेली रक्कम, ठराविक व्याजानें दुसऱ्या कडून उसनवार घेतलेली रक्कम, कर्जाचे ऋणकोसंबधीं पाच व धनको संबधीं दोन असे सात प्रकार आहेत [अर कर्झ्, स तुल० कर्ज्=पीडा देणें] ०**लागणें**–क्रि ऋणकरी होणें 'हा मार्से कर्ज लागतो ' **डोई वरून पाणी जाई इतकें कर्ज असणें**–अतिशय कर्ज असणें, कर्जांत बुडून राहाणें ०**अमदान**–स्त्री परत किंवा वसूल आलेल्या कर्जाची जमाखर्चाच्या वहींतील बाजू, कर्जफेडीसाठीं आलेली रक्कम जेथें जमा केली असते ती हिशबाची बाजू, कर्जेदादन पहा [अर कर्झ्+आमदनि] ०**करी**–पु १ ऋणकरी, ऋणको २ धनको, कर्जाऊ रक्कम देणारा ३ कर्जदाराना तगादा लावणारा नोकर, माणूस, शिपाई, अधिकारी ०**खत**–न कर्ज घेतल्याबद्दल ऋणकोनें धनकोस लिहून द्यावयाचा कागद, कर्जरोखा, ऋणपत्र ०**दादन**–न परतफेड म्हणून वसूल आलेल्या कर्जाची जमाखर्चाच्या वहींतील बाजू, कर्जफेडीसाठीं दिलेली रक्कम जेथें मांडली जाते ती जमा खर्चाची बाजू, कर्ज अमदान पहा [फा कर्झ्+दादन] ०**दार**–वि १ कर्जकरी, ऋणकरी, ऋणको 'सबब नादारीस आलों आणि लोकाचे कर्जदारी जाहलों '–रा १३ ९१ २ धनको 'तर्फ मजकूरची रयत कर्जदार (ऋणको) जाली आहे त्यास कर्जदाराची (धनकोची) निकड होते आणि द्यावयाशी अवसर नाहीं '–वाडसमा २ २२५ [फा कर्झ्+दार] ०**दारी**–स्त्री ऋणकोपणा ०**पाणी**–न कर्जवाम, कर्ज या शब्दास व्यापक सज्ञा ०**बंदी**–वि ऋणको 'खायाचाचून बैल मेले, कर्जबंदी झाला '–पला ८९ [कर्ज+बंदी] ०**बाजारी**–वि ज्यास अनेकाचें कर्ज आहे असा, देणेंदार, ज्यास फार कर्ज आहे असा (माणूस) [अर कर्झ्+बाझार्] ०**भरी**–रू–वि कर्जबाजारी, देणेंदार. 'आपण कर्ज भरू होतात '–बाळ २ १२९ [कर्ज+भरणें] ०**रोखा**–पु कर्जखत पहा (क्रि० लिहून देणें, घेणें) [फा] ०**वाम**–न ऋण, देणें. 'सावकाराच्या योगानें राज्य आबादान होतें पडलें सकट प्रसगीं कर्जवाम पाहिजे तें मिळतें '–मराआ २० [अर कर्झ्+फा वाम्]

**कर्जाऊ**—वि व्याजाच्या बोलीनें घेतलेलें किंवा दिलेलें (द्रव्य) [कर्ज] **कर्जी**–क्रिवि व्याजू, व्याजानें, व्याजाच्या बोलीनें दिलेल्या किंवा घेतलेल्या सबधानें [कर्ज]

**कर्डा, कर्डि कर्टी**—करडा पहा 'गगथडीहुन आली पुण्याला कर्डिफौज बाकी स्वारी '=ऐपो ३२३

**कर्डी**—करडई पहा

**कर्डा काकडा**—वि कडक, कडवा, कठोर 'हम बडे कडे काकडे शिपाई है '–रासक्रीडा १० [कडा+काकडा]

**कर्ण**—वि रक्ता (रग) –अभप १२७ धको २, १८

**कर्ण**—पु १ कान, शब्दग्राहक इंद्रिय, ज्यानें आपणास ऐकावयास येतें तो अवयव 'परि दूताच्या मुखें हे वार्ता। सत्यभामेच्या कर्णी तत्वता। प्रवेशली आघत।' –ह २६ १०२. २ अग देशचा राजा, हा फार उदार होता 'रिपुगज पचाननु। कर्णवीरु।' –ज्ञा १ १०५ ३ (वरील कर्ण उदार होता म्हणून त्यावरून लक्षणेनें), मोठा दाता, उदार पुरुष, (उप) कृपण मनुष्यासहि म्हणतात उदा० 'कर्णाचा अवतार ' ४ (भूमिती) भुजाच्या अतापासुन कोटीच्या मूळापर्यंतचें सूत्र, काटकोन त्रिकोणात काटकोनासमोरील बाजू, काटकोन चौकोनाचे समोरील दोन कोण जोडणारी रेषा ५ नावेचें सुकाणू 'त्या नाव्याड्यानीं वाजील शेकून जहाजाच्या कर्ण्यावर निजविलें ' –स्वप ३३० [स] ०(कान) **ओढणें, ओढविणें**–लक्ष्यपूर्वक कान देणें, किंवा द्यावयास लावणें 'जो मायानियता। तो वसिष्ठा पुढें वोढनी कर्ण।' (वाप्र) **कर्ण स्पृष्ट कटि चालयति**–एक सांगितलें असता एक करणारा, हुब्या, टोणप्या मनुष्यास लावतात ०**कटु**–वि १ कानाला त्रास आणणारें, कठोर, कर्कश २ (ल) अप्रिय (भाषण, शब्द, गाणें) [स] ०**गत–घृष्ट**–वि कानावर आलेलें, एखवार ऐकलेलें, कानावरून गेलेलें, उडत उडत ऐकलेलें (वाक्य वगैरे) [स] ०**छेद**–पु १ कान कापण्याची शिक्षा (चोराना दिलेली) २ कानाच्या पाळीस भोंक पाडणें, कर्णवेध [स] ०**जप**–पु १ कानात सांगितलेला मंत्र, उपदेश, उपनयनाच्या वेळीं गुरु शिष्यास सांगतो तो 'गीत भाटींव तो श्रवणीं। कर्णजप।' –ज्ञा १७ २९७ २ कानात गुप्त गोष्ट सांगणें ३ कानाशीं केलेली पुटपुट, चहाडी, चुगली, चुगलखोरी; कर्णजप पहा ०**ताटंक**–न बानिवडें, कर्णभूषण 'भुलविल्या कृष्णवेधकें। पायीं घातलीं कर्णताटकें।' –ह १९ ६६ [स] ०**ताळा**–पु (कानाचें झडपणें) कानाची हालचाल 'पाठीं निवृत्तिकर्णताळें।'–ज्ञा १७ ७ ०**धार**–पु १ नावाडी, सुकाणू धरणारा, सुकाण्या २ (ल) पुढारी, नेता 'कळों आलें बरे उघडले डोळ। कर्णधार मिळे तरी बरें।–तुगा ८८७. [स] ०**नाद**–पु कानात एकसारखा होणारा आवाज [स] ०**पथ, पंथ**–पु कानाचा मार्ग, ज्या मार्गानें कानात ध्वनि शिरतो तो मार्ग 'कथा गेली कर्णपथा ' [स.] ०**पाली**–स्त्री कानाची पाळ खालचें टोंक [स] ०**पिशाच**–पुन १ मंत्रसाध्य एक पिशाच, हें उपासकास भूत, भविष्य, वर्तमान वृत्त सांगतें असा समज आहे 'कर्णपिशाच भगलिनी। उच्छिष्टचांडाळी रानसटवी जखणी।' –ह १३ ६ 'मला तुझें सारें कृत्य कर्णपिशाच्चानें सांगितलें ' २ भविष्यकथन, भाग्यकथन ३ गुप्त गोष्टी सांगणारा, [स] ०**पिशाची**–पु भविष्य सांगणारा, ज्योतिषी ०**पिशी**–स्त्री कर्णपिशाच ०**पुट**–न कानाचा बाहेरचा भाग, कान 'या बोलाची

कांगुरी। तिथ प्रसिद्धी आली हिरीगी। म्हणोनि तुल्या इन कर्णपुरीं। वसों कां ज।' –ज्ञा १८ २८१ [स] ॰पुष्प-फूल-भूषण–न १ स्त्रियांच्या कानांतील एक दागिना, ईमररिंग 'करीत सतांसी कर्णभूषणें' –ज्ञा १४ १८ –देहु ५२ (नाको) २ घोड्याच्या कानांतील दागिना –स्वप ५३ [स] ॰पूर–एक दागिना–देहु ४६ (नाको) [स] ॰मधुर–वि मंजुळ, कानास गोड लागणारा, मनाला समाधान, आल्हाद देणारा, सुस्वर (ध्वनि आवाज) [स] ॰मात्रा–स्त्री कर्णभूषण कानांतील दागिना 'हस्तमात्रा कर्णमात्रा। कृष्णासी घोपिल्या विचित्रा।' –एरुस्व १५ १४९ 'कर्णमात्रा यया देवें।' –गीता २ २४९६ ॰मूळ–न १ कानाचें मूळ, कान 'जरा कर्णमुळीं सांगों आली गोष्टी' –तुगा ३३४७ 'हळु हळु तनयाच्या कर्णमूळास गेली।' –सारुह २ ११३ २ कानाच्या खालीं होणारें दुःख, रोग कर्णवळ ३ कानाच्या मागें भोंवरा असणें, घोड्याचें एक लक्षण –मभप ९८ ॰मैथुन–न कानाशीं लागणें, चुगली, चहाडी, कानगोष्टी कानमंत्र करणें (वाईट अर्थानें योजितात) [स] ॰रेषा–स्त्री कर्ण अर्थ ४ पहा –शिल्पवि ४०३ ॰रोग–पु कानास होणारे रोग हे कर्णशूळ, कर्णनाद, बाधीर्य, कर्णक्ष्वेड, कर्णस्राव, कर्णकंडू इ॰ २८ आहेत –योर २ ८० ॰वेध पु लहान मुलाचा कान टोंचण्याचा (कानाच्या पाळीस भोंक पाडण्याचा) एक विधि हा मुलाचें नाव ठेवण्याच्या दिवशीं करतात [स] ॰व्रण–पु कानाच्या आंत पडलेलें ज्यांतून पू वगैरे वहात आहे असें क्षत [स] ॰शूळ–पु कानामध्यें काहीं विकृतीमुळें उत्पन्न होणारा ठणका [स] ॰श्रुत वि कानानीं ऐकलेलें, ऐकींव [स] ॰संपुट–न कानाच्या तीन भागांपैकीं एक भाग, पाळ व चाफा याशिवाय जो खोलगट भाग असतो तो [स कर्ण+संपुट]

**कर्णखोर**—वि (ना) कर न करणारा, कर म्हणून सांगितलेलें न करता जें करूं नको म्हणून सांगितलें तें मुद्दाम करणारा [कर+न+कर+खोर]

**कर्णम् करणम्**—पु (तंजा) कुलकर्णी लखदीव वेगात करणी नावाचे कारकून शानभोग आहेत [तामिळ–करणम्]

**कर्णा**—पु एक वाद्य करणा पहा 'वाजंत्र। वाजती कर्णे धाजतें वाजती' –दत्तपदें ५ ॰करणें–क्रि (क) कर्णा वाजविणें 'तो कर्णा करून आला'

**कर्णाचा अवतार**—पु. १ मोठा दानशूर, उदार पुरुष २ (उप) कृपण मनुष्य

**कर्णाचा पहारा**—पु सूर्योदयापासून पहिल्या तीन तासांचा पहारा पहिला पहारा अति पवित्र वेळ रामपहारा

**कर्णांत**—क्रिवि कानापर्यंत (लांबट डोळे वगैरे) [स कर्ण+अंत]

**कर्णारूढ**—वि कानावर आलेलें, गेलेलें, ऐकलेलें, ऐकींव (शब्द वाक्य इ॰) [स कर्ण+आरूढ]

**कर्णार्श**—पु कान फुटणें, कान वाहणें, कानाचा एक रोग [स कर्ण+अर्श]

**कर्णावतंस**—पु कानांतील अलंकार, कर्णभूषण [स कर्ण+अवतंस]।

**कर्णावळ-ळी**—स्त्री एक फूल झाड [स कर्ण+आवलि]

**कर्णिक**—करणिक पहा

**कर्णिका**—स्त्री १ कमळ वगैरे फुलांचा कोश 'देरीं म्हणती योगद्रुमा। श्रेष्ठ कर्णिका रानद्रुमा।' –नव २२ ७१ २ हाताचें मधलें बोट ३ कमळाची कळी 'यत्र उभवणि उपासकां। त्याची आंगोळियां मुद्रिका। त्रिकोण षट्कोण कर्णिका। जडित माणिका आगलोक।' –एरुस्व १ ५१ ४ कर्णभूषण (तानवडे, तानव इ॰) –देहु ४६ (नाको) ५ कमळाची पाकळी 'माझें हृदय दिव्य कमळ। जें तेजोमय परम निर्मळ। अष्टकर्णिका अति कोमळ। मध्यें घननीळ विराजे।' –ह ३५ १ [स]

**कर्णी**—स्त्री गवड्याची थापी करणी पहा

**कर्णेकरी**—वि कर्णा वाजविणारा

**कर्णेजप**—वि चहाडखोर, प्रच्छन्न निंदक कर्णजप पहा [स कर्णे सप्तमी+जप]

**कर्णोपकर्णी**—क्रिवि या कानापासून त्या कानीं, एकानें दुसऱ्याला, त्यानें तिसऱ्याला, त्यानें चौथ्याला अशा रीतीनें, उडत उडत (ऐकलेली गोष्ट, हकीकत) 'सर्व बातम्या कर्णोपकर्णी आल्या त्या दिल्या' –क १७५ ३० [कर्ण+उपकर्ण, स कर्णाकर्णि]

**कर्तक**—वि १ कापणारा, छेदणारा २ कपडे बेतणारा (शिंपी) 'कर्तकानें काळजीपूर्वक कर्तकाचें काम केलें पाहिजे' –काम [स कृत्]

**कर्तन**—न १ छेदन कापणें, कातरणें कातरकाम २ (विण काम) सूत कातणें, सूत काढणें ३ (शिंपी) कापडाचें कातरकाम, बेतकाम (इं) कटिंग [स कृत्] **कर्तनीय** वि कापण्यास कातरण्यास छाटण्यास योग्य [स]

**कर्तब**—न १ चातुर्य, कसब, कर्तृत्व, शिताफी, २ (हिं) गायनांतील कौशल्य आलाप, ताना वगैरे [स कर्तव्य] ॰गारी दारी–स्त्री १ कर्तृत्व, कौशल्य करामत, हुशारी २ गानकौशल्य [हिं कर्तब+फा गार]

**कर्तरि**—वि (॰या) कर्तृ शब्दाची सप्तमी, कर्त्याला अनुसरून ते याच्या उलट कर्मणि धातूंना व शब्दांना लावून ज्यांच्या योगें अनेक प्रकारचीं धातुसाधितें होतात असे प्रत्ययाचे प्रकार [स कर्तृ] ॰प्रयोग–पु (व्या) कर्त्यावरून क्रियापद फिरतें म्हणजे

कर्त्याच्या लिंगवचनास अनुसरून क्रियापदाचें रूप असतें, तेथें कर्तरि प्रयोग होतो, याचे दोन भेद आहेत सकर्मकर्तरि व अकर्म कर्तरि

**कर्तरि**—स्त्री कातरी, कैंची [ स कर्तरी ]

**कर्तरीमुख( हस्त )**—पु ( नृत्य ) तर्जनी व मधलें बोट मागच्या बाजूस वळवून उभें ठेवणें करगळी उभी सरळ ठेवणें, अनामिका व आंगठा तळहाताच्या बाजूस वळलेला ठेवणें [ स ]

**कर्तवी, कर्तुत्वी**—पु ( कर्ता याचें अप रूप ) कर्ता करणारा, बनवणारा [ स कृ ]

**कर्तव्य**—वि १ मनांत योजिलेलें, आवश्यक करावयाचें, उद्दिष्ट ( कार्य ), करण्यास योग्य असें [ स ]—न १ अवश्यकर्म काम, कृत्य, कार्य २ कार्य करण्यांत कुशलता 'विचित्र कर्तव्य निरंजनाचें' **कर्तव्यता**—स्त्री कर्तव्य पहा 'स्फूर्ति ये चढण्यास दुर्घट तरी कर्तव्यतेचा कडा।'—मनोहरमाला वर्ष १ अं १ **०भूमिति**—स्त्री भूमितीचा एक प्रकार यांत निरनिराळ्या आकृति काढण्याच्या कृति सांगितलेल्या असतात ( इ ) प्रॅक्टिकल जॉमेट्री **०शून्य**—वि आवश्यक कर्म न करणारा, कर्तृत्वहीन, बेजबाबदार [ स ]

**कर्ता**—पु १ करणारा, उत्पन्न करणारा, कारण होणारा, घडविणारा, रचणारा, जुळवणारा 'नवल कर्तयाची करणी। पुढें सेवक वेत्रपाणी। धावा म्हणता सभाजनीं। चपळ चरणीं धावतो॥'—ह ३४ १२८ 'कर्ता न दिसे नयनीं।'—दावि ३८५ २ ( व्या ) प्रथमा विभक्ति किंवा क्रियापदाचें उद्देश्य, एक कारक, उद्देश्य ३ कर्तबगार माणूस, कर्तृत्ववान् 'समशेर बहाद्दर रणीं थकले कर्त्याची गत आहे न्यारी'—ऐपो १३५ ४ व्यवस्थापक, श्रम करून मिळविणारा मनुष्य, कारभार, प्रपंच, घर इ० सभाळणारा, मिळविता माणूस ५ ( कायदा ) हिंदु एकत्र कुटुंबाची व्यवस्था पाहणारा पुढारी इसम [ स कर्तृ ] **०हर्ता, ०हर्तापालिता**-वि ( करणारा व नाश करणारा, जड विणारा व भंगणारा, जोडणारा तोडणारा ) परमेश्वराचें गुण दर्शक नाव 'कर्ता हर्तापालिता। मज परता नसेचि॥'[ स ]

**कर्ता, कडता**—पु ( व ) उट्टें, वचपा 'या अपमानाचा कर्ता काढल्याविना मी राहणारा नाहीं'

**कर्तुक, कर्तूक**—स्त्री १ ( व ) पराक्रम, कर्तृक, कर्तुत्व पहा २ ( ना ) करणी अगर जादूटोणा [ स कर्तृत्व ]

**कर्तुकी**—स्त्री कर्तृत्व, कर्तुक -गागा २६१ [स कर्तृत्व]

**कर्तुत्व**—स्त्री १ ( कर्तृत्व अप ) काम, कार्य, कर्तव्य 'रजोगुणाचें कर्तुत्व। दाखऊं आता।'—दा २ ५ ६ २ कुशलता, काम करण्यात चतुराई ३ पराक्रम, कर्तबगारी, कर्तृत्व पहा 'कर्तुत्व याचेंन स्वभावें।'—दा १८ ४ ३३

**कर्तुप**—स्त्री ( व ) कर्तबगारी

**कर्तुमकर्ता, कर्तुमकर्ता**—वि पु कुशल, दक्ष, निपुण, शिताफीनें काम चालविणारा, आवरणारा, हुषार, कार्यक्षम चालक म्ह० कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं समर्थ (ही संस्कृत म्हण आहे)=ज्याच्या शक्ती अमर्याद आणि अप्रतिबद्ध आहेत अशा पुरुषासबधानें योजतात जो नवीन करण्याला, असलेलें मोडण्याला किंवा वाटेल तसें फिरविण्याला समर्थ आहे असा ( परमेश्वर, साधु ऋषि, राजा, अधिकारी वगैरे) 'यिवा म्हणसि समर्थोहं कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं।'—मोसशयरत्नमाला २४ ( नवनीत पृ ३५१ ) 'आज मराठेशाहींत कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं शक्ति जर कोणाची असेल तर ती संताजी घोरपडे आणि धनाजी जाधव या दोघाचीच होय'—स्वप २१० [ स कर्तुं+अकर्तुं+अन्यथा+कर्तुं ]

**कर्तूज**—न ( कु ) कसब, कौशल्य 'तेच्याकेड कर्तूज र्श आसा'=त्याचे जवळ चागलें कसब आहे [ स कर्तृत्व, म कर्तृत्व ]

**कर्तूव-गारी**—कर्तब-गारी पहा

**कर्तृक**—वि (समासांत) जो करतो, उत्पन्न करतो, बनवितो त्याचें विशेषण, —नें केलेलें 'हा श्लोक परशुरामकर्तृक आहे'[ स ]

**कर्तृत्व**—न १ कर्तेपणा, सामर्थ्य, नैपुण्य बावबगारी, कार्य करण्याची शक्ति २ कृति, काम, कार्य 'कर्तृत्व कुमारीचें कळलें। ऋषीनें शापिलें ते वेळे।'—रावि ३ १०१ [ स ] **०शक्ति**—स्त्री उत्कृष्टपणें काम पार पाडण्याचें सामर्थ्य, उरक, कार्यक्षमता ( इ ) एफिशीएन्सी -शिल्पवि ७५२

**कर्तृभूत**—वि ( व्या ) कर्ता म्हणून असणारा, क्रियापदाचा कर्ता, क्रियेचा प्रवर्तक [ स ]

**कर्तृवाचक**—पु ( व्या ) धातुसाधित विशेषण, हें मूळ धातुस प्रत्यय लागून होतें उदा० करणार, हसणार, करणारा, जाणारा इ० [ स ]

**कर्तृवाच्य**—पु १ कर्तरिप्रयोग २ कर्तृदर्शक नाम, कर्तरि धातूचें विशेषण वगैरे [ स ]

**कर्देगर-गार**—पु शस्त्रें करणारा [फा कार्द=चाकू+गार]

**कर्दनकाळ**—वि क्रूर, तापट, कडक, भयकर शिक्षा करणारा करदनकाळ कस्पतकाळ पहा 'मराठे म्हटले म्हणजे मोगल, रोहिले, पठाण, रजपूत वगैरेंना कर्दनकाळासारखे वाटतात'—लोकहितवादी

**कर्दनयस्तन**—न १ जडविणें व वितळविणें, एक दागिना मोडून त्या धातूचा दुसरा दागिना करणें, घडामोड करणें, २ ( जमाखर्च ) ठोकमालपैकीं वस्तु नावें लिहून त्याचें तयार झालेले जिन्नस जमेकडे लिहिणें, उदा० धान्य नावें लिहून त्याचें दळून आणलेलें पीठ जमा लिहिणें, कापड नावें लिहून तागे, वस्त्रें

इ० जमा करणें, हिशोब 'कर्दन वस्तन, गुणाकार भागाकार करा वयाचा सराव बहुत असावा' –पया ४५९ ३ ठोक नाण्याचा सुर्दा करणें व सुर्याचें नाणें करणें, पदे करणें व माड करणें [फा कर्दन्=करणें+वस्तन्=बांधणें]

**कर्दम**—पु १ चिखल, रेंदा, गाळ 'जैसा कर्दमी श्याग। राजहंस।' –ज्ञा २ ४ 'कर्दमपर्थे वर्षाकाळीं। मार्गे चालत नाहीं कीं॥' –सुसभा ३ ८१ २ (ल) जाळें, जुवाड, अव्यवस्थित रास किंवा समूह, उकिरडा ३ (ल) वर्णसंकर, जातीजातींचा गोंधळ, शुद्ध–अशुद्ध यांचा अगर सोंवळें–ओवळें यांचा एककार 'केवळी ये रांडेची अगवण। भ्रमविते अवघे जन। याती अठरा चाऱ्ही वर्ण। कर्दम करूनि विगाळिले॥' –तुगा ४१४९ [स] ०वायु–पु (शाप) एक विषारी वायु अङ्गारवायु (इ) मार्श ग्यास –शिल्पवि ७६१

**कर्दळ–ळी**—स्त्री १ केळ, कापूरकेळ करदळ पहा 'ना तरी कर्दळीचा गाभा। सुयी सांडोनी उभा।' –ज्ञा ६ २९५ कदळी वनीं अश्व बांधिला' –लवकुशाख्यान १० (मराठी ५ वें पुस्तक १८८५) २ एक केळीसारखें लहान फूल झाड [स कदली]

**कर्दळणें**—अक्रि (व) १ करुणा येणें 'माझें मन तें पाहून कर्दळलें' २ (पदार्थ) घशातून आग करीत खालीं जाणें 'आजचें औषध कर्दळत गेलें' [?+स दल्=फुटणें]

**कर्दा**—करदा पहा

**कर्दी**—स्त्री लागवडीखालची जमीन –शर

**कर्नाटकी**—वि १ कर्नाटक देशातील, कानडी, कनड २ (व) करणी किंवा जादूटोणा जाणणारा (पुरुष, स्त्री) ०संगीत पद्धति–'दक्षिणीसंगीतपद्धति' पहा

**कर्पट**—करपट पहा ०ढेंकर–करपटढेंकर पहा येक राउत सोडिती। येक कर्पट ढेंकर देती।' –दा १८ ९ १७

**कर्पटाण**—स्त्री कर्पटघाण, करपटाण पहा 'दग्ध होता सुटली कर्पटाणी' –कृसु ४१ ५६

**कर्पसाण, कर्पुसाण**—स्त्री (गो) करपट घाण, करपटाण

**कर्पी**—स्त्री (कातकरी) अंगातील बंडी –गुजा ५४

**कर्पील कर्पूल**—पु (कु) एक जातीचें गवत करपेल पहा

**कर्पूर्से**—क्रि (गो) करपणें पहा

**कर्पूर**—पु १ कापूर, एक सुगंधी द्रव्य, हें पूजेच्या साहित्यात वापरतात याचे चंद्रसेनी, भीमसेनी व रंभा असे तीन भेद आहेत 'जैसा कर्पूराचा राशी कीजे' –ज्ञा २ २५१ 'चंद्राचि कर्पूराचें उटणें' –रावि १ २१ २ (होमिओपाथी) कँफर, हें माहामारी (कॉलरा) वर रामबाण औषध आहे [स] ०कर्दळी–केळी–केळें–स्त्री कर्पूरकेळी कर्दळी 'कर्पूरकेळींचीं गर्भे ।न कोंदाटे।' –ज्ञा ११ २५० 'कर्पूरकर्दळी डोल्ती।' –ह १० १६० 'कर्पूरकेळें सोनकेळें।' –सप्र १५ २४ ०गौर–पु. शंकर 'कर्पूरगौर भोळा नयनीं विशाळा।' –शंकराची आरती –वि कापरासारखा गोरा 'अथवा धवळ धाम गोक्षीर। कर्पूरगौर पंचवक्त्र।' –एभा १३ ९८ [स] ०रंभा–स्त्री कापूरकेळ, कर्पूरकर्दळी पहा 'दिसन मृदु जिचे ऊरु। कर्पूररंभा।' –आप १४ ०विडा–पु कापूर घातलेला विडा 'ऐसें सपादूनीयां भोजन। मग कर्पूरविडे घेती दोघेजण।' –जै १० ३०

**कर्पूस**—पु (गो) लहान मुलाची कानटोपी

**कर्पूराम्ल**—न (रसा) कापराचें अम्ल (इ) कॅम्फोरिक ॲसिड [स]

**कर्ब**—पु (रसा शाप) एक अधातुरूप मूलद्रव्य (परमाणुभारांक १२) हें हिरा, ग्रॅफाईट कोळसा, संगमरवरी दगड वगैरेंत आढळतें (इ) कार्बन

**कर्बाम्लवायु**—पु (शाप) कॅर्बानिक ॲसिड वायु हा कर्ब आणि प्राणवायु यांच्या संयोगापासून बनतो हा ज्वलनास मदत करीत नाहीं

**कर्बट**—न (गो) एक बारीक मासळी

**कर्बाड**—न कडब, करबड पहा

**कर्बूर**—वि १ करडा, कबरा, काळसर पांढरा (घोडा इ०) २ चित्रविचित्र, निरनिराळ्या रंगाच्या छटा असलेला (घोडा इ०) [स कर्बुर]

**कर्म**—न १ एखादें काम, कृत्य 'हें कर्म झालें समरात जेव्हां। होतास कोठें रणभीरु तेव्हां।' –वणीसंहार ३ २ स्नान संध्या, यज्ञयागादि धार्मिक विधि, याचे नित्य, नैमित्तिक व काम्य असे तीन भेद आहेत ३ सांप्रतच्या आयुष्यातील कृति, चाल, आचार, वर्तणूक, यावरून दैव किंवा नशीब अशा अर्थानें योजतात–येथें दैव म्हणजे पूर्वजन्मार्जित पापपुण्याचा भोगवटा होय, पूर्वजन्मकृत आचरण, संचित. 'अरे अरे कर्मा। वारा वरें झालीं याच धर्मा॥' 'या व्यापारात मीं साफ बुडालों मार्में कर्म! दुसरें काय?' 'कर्मवलित', 'कर्मवल्लत्तर', घोर–कठिण कर्म' या संज्ञा कर्माचें (दैवाचें) वर्चस्व, काठिण्य, निष्ठुरता दाखवितात ४ विशिष्ट काम, नैतिक कर्तव्य, जाति, धंदा वगैरेंनीं मान लेलें आवश्यक कृत्य ५ (व्या) कर्त्यानें अमुक क्रिया केली हें दाखविणारा शब्द, कर्तृविषयक व्यापाराचें कारक कर्माची विभक्ति प्राय द्वितीया असते 'रामा गाय बाघतो' यांत गाय हें कर्म ६ उद्योग, कामधंदा, नेमलेलें, विशिष्ट प्रकारचें काम ७ सुरतक्रीडा, मैथुन रतिसुख, संभोग 'त्यानें तिच्याशीं कर्म केलें' ८ सामान्य क्रिया, ऐहिक व्यापार मायिक क्रिया 'माया हा सामान्य शब्द असून तिच्याच देखाव्याला नामरूपें

व व्यापाराला कर्मे हीं विशिष्टार्थक नामें आहेत '—गीर २६० [स] (वाप्र) कर्म दोन पावलें पुढें—नशीब नेहमीं आपल्यापुढें धावत असतें ०आड ठाकणें—कर्म आडवें येणें, आपत्ति ओढवणें 'अन्न घेवोनि जों निघाली। तों कर्म आड ठाकलें।' —ह १६ १३० कर्मानें ओढणें-ओढवणें—दैवाचा पाश येऊन पडणें, दैवाधीन होणें —नें जागें होणें—दैव अनुकूल होणें —नें धाव घेणें—दैव पुढें येणें, दैवाकडून प्रतिबंध, अडथळा होणें —नें पाठ पुरविणें-उभें राहणें—दैवानें मोडता, अडथळा घालणें, कर्म ओढवणें —नें मागें घेणें-सरणें—दैवानें साहाय्य न करणें,केल्या कर्माचें फळ—न केलेल्या कृत्याचा परिणाम 'केल्या कर्माचें फळ बापा। ऐश्वर्य तुज देतील।'—अमृत, नव ४४३ (सामाशब्द) ०कचाट—न प्रारब्धामुळें मागें लागलेलें दुर्दैव, संकट, विपन्नावस्था, कर्म कटकट, पूर्व जन्मीचें पाप, भोग 'प्राणी कष्टकर्मेचि मेले। कर्मकचाटें।'—दा १८ ८ २० [स कर्म+म कचाट] ०कटकट-खटखट—स्त्री १ प्रारब्धयोगानें वाट्यास आलेलें किंवा गळ्यात पडलेलें व कंटाळा येण्याजोगें कोणतेंहि काम, वरचेवर त्रास देणारें, डोकें उठविणारें, अडथळा आणणारें काम किंवा व्यक्ति कोणतीहि नशीबीं आलेली पीडा, त्रास, छळ, जाच वगैरे २ (ल) जिकिरीचें, नावडतें काम, *ब्याद* '*मी म्हातारा झालों*, माझ्यामागें ही शिकविण्याची कर्म कटकट कशाला?' 'आता त्यांची कर्मकटकट आपणास कशाला हवी'—नि ६७ ३ (ल) भांडण, तंटा, कटकट 'तुम्हा दोघात नेहमीं इतकी कर्मकटकट चालत असते' —भा ३७ ०कटटो—वि (गो) हतभागी कर्मकरंटा ०कथन-नी—न १ कर्मकथा, *कर्माची कहाणी* २ (ल) दुर्दैवी प्रसंगकथन, दु खदकथा, कर्मकथा पहा 'ऐसी आमुची कर्मकथनी। तें अनायासें आलें सर्व घडोनी।'—मक २६ १८५ [स] ०कथा—स्त्री १ प्रारब्धामुळें भोगलेल्या दु ख त्रास, दगदग, वगैरेची दुसऱ्याजवळ सांगितलेली गोष्ट, वृत्तांत, कहाणी २ आत्मश्लाघेचें किंवा रिकामटेकडें भाषण, वार्ता ३ एखाद्या प्रसंगाची किंवा कृत्याची खरी व इत्थंभूत हकीकत ४ कंटाळवाणें, निरर्थक भाषण, वडबड [स] ०कपाट—न कर्म कचाट पहा [स] ०कहाणी—स्त्री कर्मकथा पहा ०कांड—न त्रिकांड वेदातील यज्ञासंबंधीचा कर्ममार्गदर्शक व आचारनिदर्शक भाग,—मन्त्र व ब्राह्मणें मिळून जो वेदभाग त्यास कर्मकांड व उपनिषदास ज्ञानकांड म्हणतात 'कर्म कांड तरी जाणें। मुखोद्गत पुराणें।'—ज्ञा १३ ८२८ २ धर्मकर्म, आचारविचार, संस्कार वगैरेंना व्यापक अर्थानें हा शब्द लावितात (सामा) आन्हिक नित्यनैमित्तिक आचार 'कृष्णगीत रचता श्रवणातें। कर्मकांड रुचि न दे कवणातें॥' 'आता आपलें कर्मकांड अगदीं एकाबाजूस ठेवावें' —चंद्रगुप्त ३५ ३ कंटाळवाणी, निरर्थक वडवड, कर्मकथा (क्रि० गाणें, सांगणें, बोलणें) ०कार—वि १ (गो) कर्मनिष्ठ. २ शिल्पी, लोहार [स] ०काल-ळ—पु धर्मकार्य करण्यास उचित असलेला काळ, वेळ, समय [स] ०केरसुणी—स्त्री कर्मरूपी केर सरसकट झाडणारी, कर्मापासुन सोडविणारी केरसुणी 'तेव्हा तचि श्रद्धा होये। कर्मकेरसुणी।'—ज्ञा १७ ६४ ०गति—स्त्री दैव, प्रारब्ध, नशीब दैवगति पहा [स] ०चंडाळ-चांडाळ—पु (*कृत्यानें*) *निवळ चांडाळ* १ *अति क्रूर, पाषाणहृदयी* माणूस २ स्वैर वर्तनी, धर्मलंड, दुरात्मा [स] ०चोदना—स्त्री कर्म करण्याची प्रेरणा 'कर्मचोदना व कर्मसंग्रह हे शब्द पारिभाषिक आहेत'—गीर ८३५ [स] ०ज—वि कर्मापासुन उत्पन्न झालेलें 'सकळ यज्ञ कर्मज' —ज्ञा ८ ४६ [स] ०जड—पु कर्मठ लोक 'तिन्हीं लोकांचा शास्ता। ईश्वर तो मी नियता। येणें कर्मजडाची वार्ता। अनीश्वरता छेदिली।'—एभा १० ६३१ ०जात—न सर्व प्रकारचें कर्म, सर्व तऱ्हेचे व्यापार. 'मग सस्य फळपाकांत। तैसें निमालिया कर्मजात। आत्मज्ञान गिंवसित। अर्पमें ये।' —ज्ञा १८ १२९ [स] ०जीव—वि (गो) बारीक, लहान प्राणी ०दक्ष—वि धर्माचार व विधि यांत निपुण, कर्मठ, कर्मशील, कर्मनिष्ठ, कर्मिष्ठ यासारखा उपयोग 'कर्मदक्षा कर्ममोचका। जयराम कोदंड भजना।'[स] ०धर्म—न (क)पु (यासमासातील धर्म शब्द जरी पुल्लिंगी असला तरी बहुतेक सर्व समास नपुसकलिंगीच आहेत कारण यांतील प्रधानार्थ कर्म शब्दापासुनच निघालेला असुन धर्म शब्द केवळ जोडशब्द आहे) वर्तन वर्तनक्रम, कृत्य, आचरण 'जसें ज्याचें कर्मधर्म तशी त्यास फलप्राप्ति,' '*कर्मधर्मानें कोण्ही* संपत्ति भोगतो आणि गादीवर बसतो, कोण्ही फाशी जातो', कोण्हाच्या कर्मधर्मांत कोण्हाचा वाटा नाहीं' =प्रत्येकाला स्वत च्या कृत्यावद्दल झाडा दिला पाहिजे ०धर्मगुण—पु कर्म धर्माचा प्रभाव शक्ति कर्मधर्मसंयोग पहा [स] ०धर्मविरहित—वि धर्माज्ञा, धार्मिक व्रतें व कृत्यें ज्यानें सोडलीं आहेत किंवा जो त्यापासून मुक्त झाला आहे असा, ऋषि किंवा साधुजन यांना चांगल्या अर्थी व उच्छृंखल व धर्मलंड यांना वाईट अर्थी लावतात आम्हीं कर्मातीत झालों म्हणती' या शब्दाचा अर्थ दोन्हीं प्रकारचा म्हणजे चांगला व वाईटहि आहे 'झालों कर्म धर्मविरहित। मना आवडे तो भोग भोगित।' [स] ०धर्मसंयोग-धर्मयोग—पु १ स्वत चें दैव आणि सत्कर्म यांचा संयोग भाग्य व सदाचार यांचें ऐक्य (पूर्वजन्मार्जित आणि इहजन्मार्जित सत्कृत्यांचे फळ मिळून) २ अकल्पित मेळ, यदृच्छा, प्रारब्धयोग ०धर्मसंयोगानें—क्रिवि अचानक, चमत्कारिक किंवा अकल्पित मेळ मिळून येऊन, प्रसंगोपात्त, प्रारब्धयोगानें 'कर्मधर्मसंयोगानें मी अगदीं सहज बाहेर गेलों तों

माझी नजर तिच्याकडे गेली '–मायेचा बाजार 'कर्मधर्मसंयोगानें तुमची गाठ पडली आहे तर गोड बोलून काळ लोटावा ' ०धारय समास–पु (व्या ) वक्त्याच्या मनात उभय शब्दांचा भाव ज्यांत समान असतो किंवा उभय शब्दांचा परस्पर उपमानोपमेयभावसंबंध ज्यात असतो तो, विशेष्य–विशेषणाचें सान्निध्य असून त्यांचा जो समास पडतो तो, उदा० 'भक्तिमार्ग= भक्ति तोच मार्ग, किंवा भक्तिरूप जो मार्ग तो, भवसागर, संसारवृक्ष, काव्यपुरुष '–मराठीभाषेचें व्या २७५ तत्पुरुषसमासाचा एक भेद [स ] ०निष्ठ–वि कर्मठ पहा 'जया लाभाचिया आशा । करूनि धैर्याहूंचा भरवसा । घालीत षट्कर्मांचा धारसा । कर्मनिष्ठ । ' –ज्ञा ६ ४७४ [स ] ०निष्ठा–स्त्री १ कर्मावर निष्ठा २ कर्मयोग 'वैदिक धर्मात . दोन मार्ग आहेत, पैकी एका मार्गास ज्ञाननिष्ठा व दुसऱ्यास कर्मयोग किंवा संक्षेपानें नुसता योग अगर कर्मनिष्ठा असें म्हणतात –गीर ३०१ [स ] ०न्यास–पु १ कर्म किंवा कृत्यें यांचा त्याग (पुढील जन्मीं हित व्हावें किंवा फळ मिळावें म्हणून ) २ फलन्यास, कर्मापासून मिळणाऱ्या फलाविषयींच्या इच्छेचा किंवा आशेचा त्याग, निष्कामकर्म [स ] ०फल–न प्रारब्धापासून मिळणारें फळ, पूर्वजन्मीं केलेल्या पापपुण्याचें चांगलें अगर वाईट असें या जन्मीं भोगावें लागणारें फळ 'साइनि दुधाचि टकळी । गोंचारी गावधेनु वेंटाळी । किंबहुना कर्मफळीं । तैसें कीजे । ' –ज्ञा १८ १७४ [स ] ०फुटका–वि भाग्यहीन, दुर्दैवी, कमनशिबाचा, अभागी [कर्म+फुटणें ] ०फुटणें–सकि दुर्दैव ओढवणें गोत्यात येणें, नुकसान होणें ०बंध–पु फलाशेनें केलेल्या कर्मांमुळें प्राप्त झालेलें बंधन, प्रारब्धप्राप्त स्थिति मायिक पसारा ऐहिक मायापाश, प्रपंच, संसार 'जो पहुडला स्वानंदसागरीं । कर्मबंधीं न पडे तो । ' [स ] ०बंधु–पु व्यवसायबंधु समव्यवसायी एकाच प्रकारचें काम करणारा [स ] ०भुवन–न कर्मरूप घर 'तेथ न्यायें आणि अन्यायें । हा द्विविधु साधूनि आवो । उभवितां न रवी खेंवो । कर्मभुवनें । –ज्ञा १८ ४५५ [स ] ०भूमि भूमिका–स्त्री १ इहलोक मृत्युलोक यज्ञादि धार्मिक कृत्यें जेथें करता येतात ती जागा कर्म करावयाचें क्षेत्र रंगभूमि (मर्त्यांची ) 'जेथ मनाचा प्रवेशु नाहीं । त्याची पायवाट ते ठायीं । ऐसें स्वइच्छा विचारिता महीं । आले ते पाहीं कर्मभूमीसी '–एभा २ १८४ 'परम प्रतापी दशरथपिता । कर्मभूमीस येईल मागुता । ' –रावि १६ ८६ [स ] २ प्राधान्यानें भारतवर्ष –हको ०भोग–पु भवितव्यतेच्या नियमानुरूप मिळणारीं सुखदु खें सोसणें दैवाची भरपाई पूर्वसंचितानुरूप या जन्मीं प्राप्त होणारी स्थिति 'माझा कर्मभोग चुकत नाहीं '[स ] ०भ्रष्ट–वि धर्मशास्त्रविहित नित्यनैमित्तिक कर्मांचें आचरण न करणारा, धर्माज्ञा व धर्मकर्म परिपालनाविषयीं उदासीन, कर्तव्यच्युत, कर्तव्यपराङ्मुख [स ] ०मार्ग–पु १ स्नानसंध्या इ० धर्म करण्याची रीत, यज्ञयागादि कर्मरूप ईश्वरप्राप्तीचा किंवा मोक्षाचा साधनीभूत मार्ग, सत्कृत्यें केल्यानें व धर्माचरणानें मोक्षाला जाण्याचा मार्ग २ धर्मकृत्यें करण्याचा खरा मार्ग ३ श्रौत म्हणजे यज्ञयागादि कर्मांचा मार्ग 'भारतीय तत्त्वज्ञानांत मोक्षाचे कर्ममार्ग, ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग असे तीन मार्ग सांगितले आहेत –ज्ञाको क १३२ [स ] ०मार्गी–वि कर्ममार्गानें जाणारा, जो निष्ठापूर्वक धर्माचरण करून परमेश्वर प्राप्तीविषयीं झटतो तो [स ] ०मुक्ति–स्त्री स्नानसंध्यादि नित्य नैमित्तिक कर्में करण्याची आवश्यकता ज्या स्थितींत उरत नाहीं अशी अवस्था, नैष्कर्म्यसिद्धि [स ] ०मोचक–वि कर्ममार्गापासून मुक्त करणारें, ऐहिक सुखदु खापासून सोडविणारें 'कर्मदक्षा कर्ममोचका । जयराम कोदंडभजना । ' [स ] ०मोचन–न कर्ममार्गापासून मुक्तता ०योग–पु १ प्रारब्ध, दैव, यदृच्छा, योगायोग २ दैवगतीनें घडणारी गोष्ट –शर ३ व्यापार, चळवळ किंवा कार्य करण्याचें तत्त्व –ज्ञाको क १३५ ४ ज्ञान हेंच जरी मोक्षसाधन असलें तरी कर्मशून्य राहणें कधींच शक्य नसल्यामुळें त्याचें बंधकत्व नाहींसें होण्यास कर्में कधींहि न सोडता शेवटपर्यंत तींच निष्कामबुद्धीनें करीत राहण्याचा जो योग तो –टिसु ४७–४८, याला इंग्रजींत एनर्जीझम असा प्रतिशब्द गीतारहस्यात सुचविला आहे –गीर ३०१वरील टीप या योगाचें जें शास्त्र त्यास कर्मयोग म्हणतात व तें आचरणारा तो कर्मयोगी) 'बलवत (टिळक ) कर्मयोगी ' –सन्मित्रसमाज मेळा पद्यावली १९२९, पद १ [स ] ०लंड–वि धर्मशास्त्रविहित नित्यनैमित्तिक विधींचें पालन न करणारा, धर्मभ्रष्ट धर्मविधि व धर्माज्ञेचा धिक्कार करणारा, उपहास करणारा [स ] ०लोप–पु नित्य धार्मिक क्रमांतील एखादें कर्म सोडणें, न करणें, दीर्घकालपर्यंत नित्य अगर नैमित्तिक कर्मविधि न करणें [स ] ०वाचकधातुसाधित–न मूळ धातूस 'ला ' किंवा 'लेला ' हे प्रत्यय लाविले असता होणारें धातुसाधित उ० केलेला, दिलेला परंतु यात 'पढ' धातूचा गण वर्ज्य करून हे प्रत्यय लावितेसमयीं सकर्मक धातूस 'इ ' आगम होतो उदा० टेंकिला, अर्पिला आकर्पिलेला –मराठी भाषेचें व्याकरण १७३ [स ] ०वाद–पु १ धर्मविहित कर्मांनींच मोक्षप्राप्ति होते असें मत २ मनुष्यास विशिष्ट जन्मात जें सुखदु ख मिळतें तें त्याच्या पूर्व जन्मातील कृत्याचें फल होय असा युक्तिवाद कर्माचें फळ भोगणें ही कल्पना –ज्ञाको क १२६ [स ] ०वादी–पु कर्मवादावरच भिस्त ठेवून त्याचें समर्थन करणारा माणूस [स ] ०वासना–स्त्री दैनिक धर्मकृत्याबद्दलची इच्छा, आवड [स ] ०विधि–पु ( अनेकवचनींहि प्रयोग

होतो ) धर्मसंबंधी कृत्यें वगैरेचे नियम, पद्धति, रीति, मार्ग, कोणत्याहि विशिष्ट प्रकारच्या धर्मकृत्याचें सूत्र किंवा विधान [स ] ०विपाक-पु १ पूर्व जन्मीं केलेल्या पुण्य, पाप वगैरे कृत्यांचें पुढील जन्मीं दुःखरूप फल भोगावयाचें हा सिद्धांत २ कर्माची परिनिष्पत्ति, परिणाम [स ] ०वीर-पु कार्यकर्ता, पराक्रमी मनुष्य 'कर्मवीर गिधुरी गेला' -नमाम ४५ [सं] ०वेग-कर्माचा वेग-पु दैवाचा किंवा प्रारब्धाचा जोर, झपाटा, सामर्थ्य, धडा, पूर्वसंचिताचा प्रभाव 'कर्माचा भोवरा। जैसा भवे गरगरा। कर्मवेगाचा उभारा। जोवरी।' 'जेवें कर्माचा वेग सरे। तेथें धांव पुरे।' [स ] २ (अनेक वार केलेल्या) कृत्याचा जोर, सामर्थ्य, प्रवाद, सवयीचा जोर, स्वाभाविक प्रेरणा, 'कर्मवेग भलत्याकडे ओढून नेईल' ०शील-वि. कर्मासक्त धर्मानें वागणारा, शास्त्रानें सांगितलेलीं सर्व धर्मकर्में जो सतापासून काळजीपूर्वक करतो तो [स ] ०संगी-वि कामांत, धर्मानुष्ठानांत, व्रतनियमनांत सतत गढलेला, याच्या विरुद्ध ज्ञानाभ्यासी [स ] ०संग्रह-पु निरनिराळे व्यवसाय, व्यापार, आपण ज्या क्रिया करतों त्या, मानसिक क्रियेच्या तोडीची बाह्य, प्रत्यक्ष क्रिया 'कर्मसंग्रह या शब्दानें त्याच मानसिक क्रियेच्या तोडीच्या बाह्य क्रिया दाखविल्या जातात' -गीर ८३६ [स ] ०संचय-पु कर्मसमूह, मनुष्याचे अनेकविध व्यापार, क्रिया, चलनवलनादि कृत्य 'तेंचि कर्ता करण कार्य। हा कर्मसंचयो।' -ज्ञा १८५१२ [स ] ०संन्यास-पु १ कर्मांचा त्याग, नित्य नैमित्तिकादि कर्में करण्याचें सोडून देणें २ शारीरिक सोडून इतर सर्व कर्मांचा त्याग (शांकरमत) 'शंकराचार्यांच्या मतांत कर्मसंन्यासच प्रतिपाद्य आहे' -टिसू ५ [स ] ०सूत्र-न नित्य धर्मकर्मांची व त्यासंबंधीं नियमांची मालिका, कर्तव्यकर्म परंपरा 'भवपाश तोडिते शास्त्र। ज्ञान ईश्वराचें विचित्र। परि जिवाचें कैसें कर्मसूत्र। जे अनावडी तेथें विपर्यी।' ०हीन-वि धार्मिक नियम, विधि न पाळणारा, धार्मिक नियमाबद्दल काळजी न करणारा [स ] म्ह० कर्मणो गहना गति =नशिबाची गति जाणणें शक्य नाहीं (एखादी वाईट गोष्ट अकल्पित घडली म्हणजे दैववादी मनुष्य ही म्हण म्हणतो )

**कर्मठ**—वि १ शास्त्रविहित स्नानसंध्या इत्यादि कर्माविषयीं निष्ठावंत, धर्मासंबंधींच्या बारीकसारीकहि गोष्टी श्रद्धेनें किंवा आग्रहानें पाळणारा, सनातनी, धर्मनिष्ठ 'आता कर्मठा के वारी। मोक्षाची हे।' -ज्ञा १८६८ २कर्ममार्गी कर्मावर भिस्त ठेवणारा ०पणा-न निष्ठापूर्वक धर्माचरण 'वृथा गेलें त्याचें हवन। कर्मठपण कर्माचें।' -एरुस्व ३ ३१ [स कर्म+स्थ ]

**कर्मणा**—स्त्री कर्मणूक, फुरसद कालक्रमणा 'जेथें नाहीं आत्मज्ञान। तया नाव कर्मणा।' -दा ७ ९ ५७ [स क्रमण]

**कर्मणि**—वि कर्माच्या संबंधानें कर्माशीं जुळणारें कर्तरि पहा ०प्रयोग-पु (व्या ) जेथें वाक्यांत कर्माप्रमाणें क्रियापदाचें लिंगवचन फिरतें तो प्रयोग [स ] ०वाच्य-पु (व्या ) १ कर्मकर्तरिप्रयोग २ कर्मणिकृदंत, कर्मणि धातुसाधित [स ]

**कर्मणें**—अक्रि क्रमणें, जाणें, पार पडणें 'ऐसे बहुत दिवस कर्मले।' -पच ३ १० -सक्रि घालविणें, पार पाडणें

**कर्मर**—न एक प्रकारचें शस्त्र 'काय देह घालू करवती कर्मरी। टाकू या भीतरीं अग्नीमाजीं।' -तुगा १११८ 'करवतीं कर्मरीं दहासी देहण।' -तुगा २४५४

**कर्मल-ली**—पु (गो ) कुळागरांत होणारें एक रानझाड -न त्याचें फळ

**कर्माकर्मविचार**—पु योग्य किंवा करावयाच्या गोष्टी आणि अयोग्य किंवा टाकावयाच्या गोष्टी या विषयींचा विचार, विवक्षित कृत्य नैतिकदृष्ट्या योग्य अथवा अयोग्य या संबंधीं विचार, व्यावहारिक नीति -ज्ञाको क १३५ [स ]

**कर्माकार**—पु कर्म, नाना प्रकारच्या क्रिया, व्यापार, हालचाली 'पैं प्राचीनसंस्कारदोषें। पांचही कारणें सहतुकें। काम बीजती गा अनेकें। कर्माकारें।' -ज्ञा १८४३१ 'आणि पंचकारणदळवाडें। जिहीं कर्माकार मांडे।' -ज्ञा १८३०५ [स कर्म+आकार ]

**कर्मांग**—न कर्माचा किंवा धार्मिक आचारांचा भाग, परिशिष्टरूप क्रिया [स ] ०देवता-स्त्री ('कर्मांगभूत देवता' या शब्दाचा संक्षेप) कोणताहि धार्मिक विधि अगर कर्म ज्या देवतेला उद्देशून केलें असेल ती देवता, मुख्य देवता [स ]

**कर्माचा दोरा**—पु दैवाची गति, प्रारब्ध प्राप्त आयुष्यक्रम, स्थिति

**कर्माची गति**—स्त्री दैवाची गति, दैवगति, प्रारब्ध, नशिबाचा फेरा 'पहा कर्माची गति गहन। जिच्या अनुष्ठा न पडे रविकिरण। ते गरोदर फिरे विपिन। मृगनेत्री।'

**कर्माचें कातडें**—न (ना ) नशीब, प्रारब्ध 'तो काय माझ्या कर्माचें कातडें नेणार आहे?'

**कर्मांतर**—न और्ध्वदेहिक क्रिया, उत्तरक्रिया, क्रिया शब्दाशीं जोडून वापरतात जसें -क्रियाकर्मांतर [स कर्म+अंतर]

**कर्मांतऱ्या**—पु और्ध्वदेहिक धर्मकर्म सांगणाऱ्या ब्राह्मणाला तुच्छतेनें, हलक्या अर्थानें लावण्यांत येणारा शब्द, कारटा [स कर्म+अन्तर ]

**कर्मातीत**—वि धार्मिक आचारविचार पाळून करण्याची आवश्यकता ज्यास उरली नाही, त्याची ज्याला जरूर नाहीं असा, ज्याला कर्मबंधन नाहीं असा, मुक्त, योगी, परमेश्वर 'जे

आत्मा मी कर्मातीतु । सर्वकर्मसाक्षिभूतु । हे आपली कदी मानु । नायकेचि कानीं ।' –ज्ञा १८ ३८४ [स कर्म+अतीत]

**कर्माध्यक्ष**—पु प्रत्यक कार्याचा न्यायान्याय पाहणारा, मनुष्याची कृत्यें व व्यवहार यांचे यथार्थ परीक्षण करणारा, ईश्वराचे एक नाव 'जो भूतांतरात्मा कर्माध्यक्ष ।' –ह १८५९ [स कर्म+अध्यक्ष]

**कर्मार्पण**—न स्वतःचीं धार्मिक कृत्यें किंवा अनुष्ठानें परमेश्वरास किंवा इष्ट देवतेस अर्पण करणें 'कर्मार्पणाचा क्रम साग झाला ।' [स कर्म+अर्पण]

**कर्माभिमानी-या**—पु कर्म मी करतों असा अहंकार बाळगणारा 'आतां ययाचि कर्मा भजतां। कर्माभिमानिया कता। तो जीवुहि त्रिविधता। पातला असे।' –ज्ञा १८ ६२८ [स ]

**कर्मिष्ठ**—वि कर्मठ पहा

**कर्मी**—वि कर्मठ पहा 'आणि तयाही केलियाचें। तोंडीं लावी दौंडाचें। कर्मी या नाम पाठाचें। वाणें सारी।' –ज्ञा १८ ६०३ [कर्म]

**कर्मीभूत**—वि (व्या) कर्मविभक्तियुक्त, द्वितिया विभक्तीचा, कर्माच्या स्थानीं असलेला, क्रिया घडलेला [स ]

**कर्मेंद्रिय**—न १ ज्याच्या योगें वाणतें तरी काम होतें व पदार्थाचें ग्रहण गमन इ कर्म करतां येतें तें शरीराचें इंद्रिय ज्ञानेंद्रियाच्या उलट, कर्मेंद्रियें पांच आहेत –हात, पाय, वाणी, शिश्न व गुद परी कर्मेंद्रिय प्रवृत्ती। निरोधुनी।' –ज्ञा ३ ६४ २ शिश्न, जननेंद्रिय 'छिनाळ पुरुषाचे डोळे काढून त्याचें कर्मेंद्रिय छेदीत' –व्यभिचार निषेधक बोध ८ [स कर्म+इंद्रिय] ०पचक–वरील पांच इंद्रियांच्या समुदायास म्हणतात

**कर्मवर्म**—नअव वाईट कृत्यें, दोष उणीवा, छिद्रें (क्रि० काढणें) [स कर्म+वर्म]

**कर्मोपासना**—स्त्री धार्मिक विधि करीत राहणें धार्मिक अनुष्ठान सतत चालविणें, कर्ममार्गाला अनुसरून परमेश्वराची सेवा करणें, आत्मोपासना, ज्ञानोपासना याच्या उलट [स कर्म+उपासना]

**कयात-द**—करियात पहा

**कऱ्या**—वि कडक, कठिण, भयंकर 'काय दुकाळ पडला कऱ्या।' –अमृत ११७ [अर करह=काळा]

**कर्ले**—न (गो) फळावरचें साल्पट, साल, 'कर्लांवुक' =सोलणें, सालें काढणें

**कर्लो**—पु (कों) माडाला पाणी शिंपण्याचें एक साधन करला ले पहा

**कर्ली-ल्ली**—स्त्री १ (कु) एक जातीचा अरुद व लांब मासा २ (गो) एक प्रकारचें गवत करवेल पहा

**कर्वत**—करवत पहा 'तों पुत्रें कर्वता आणविलें।' –जै ४७ ८

**कर्वल-ळ**—करवल-ळ, करोल पहा 'नामी कर्वल आहे दुद्दुराते' –पया ५४

**कर्वळी**—स्त्री (गो) बैसांन घालण्याचा बायकांचा एक दागिना

**कर्वा**—१ करवा पहा २ (गो) माड अथवा कंसल्यादि झाडाचा तुकडा, ओंडका, करडा

**कर्शण**—न कृश होणें, रोड होणें, करणें, वैद्यकांतील एक प्रकार, मेद नाहींसा करण्याची प्रतिक्रिया, बृहण (लठ्ठ होणें) याच्या उलट [स कृश्-कर्श्]

**कर्ष**—पु सोनें, चांदी मोजावयाचें सोळा मापांचें एक परिमाण, प्राचीन पद्धतीप्रमाणें मापास ५ गुंजा धरीत, पण सध्याच्या पद्धतींत ८ गुंजा धरतात, त्यामुळें प्राचीन पद्धतीप्रमाणें ८० गुंजांचा म्हणजे १७६ ग्रॅम भेनचा कर्ष होईल पण सध्याच्या पद्धतीप्रमाणें १२८ गुंजांचा म्हणजे २८० ट्राय ग्रेन भार कर्ष होय [स कृष्]

**कर्षक**—वि १ ओढणारा, खेंचणारा २ शेत करणारा, नांगरणारा [स कृष्=ओढणें]

**कर्षण**—न १ ओढणें, खेंचणें २ शेत कसणी, जमीन नांगरणी [स कृष्, झेंद करेश, फा कशिदन्] –क्रि कर्षणें १ ओढणें खेचणें २ शेत नांगरणें, कसणें

**कर्षित**—वि १ ओढलेलें २ नांगरलेलें [स ]

**कऱ्हवेलु**—न एक प्रकारचें गवत करवेल पहा 'कऱ्हवेलु मारवेलु गोडाळें।' –गीता २ ५२८६

**कऱ्हा-ऱ्हे**—पु उंट, उंटाचें पिलुं 'तव विकट नामें कऱ्हा' –पच ३९ 'अशोकाचे अगवसें। चघळिले कऱ्हेनि जैसें।' –ज्ञा ११ ४१४ [स करभ]

**कऱ्हा-ऱ्हे**—१ मडकें, मातीचा लहान घडा, ज्या मडक्यास तोटीसारखें स्तन (टोक) असतें असें मडकें, रहाट गाडग्याच्या माळेतील मडकें 'राहाटमाळेचे करे। पुढती रिता पुढती भरे।' –एभा १० ६७६ 'सोन्याचा कऱ्हा मोत्यानीं भरा' –वेड्याचा बाजार २ रमांत पाणी भरलेल्या तांब्यात अथवा पंचपात्रींत आंब्याच्या डहाळ्या, पानें टाकून त्यावर शेंडी वर केलेला नारळ ठेवतात या भांड्यास कऱ्हा म्हणतात व तो नवरीच्या व नवऱ्याच्या बहिणीच्या (बहीण नसल्यास दुसऱ्या स्त्रीच्या) हातात असतो आणि तो कऱ्हा घेऊन ती आपल्या बहिणीच्या (वधूच्या) अगर भावाच्या (वराच्या) मागें उभी असते –(क्रि० धेणें) ३ सामान्यत करवा तांब्या ४ (बायकी) मंगळागौरीची पंचामृती पूजा झाल्यावरोबर तें तीथें एका

भाड्यांत भरून त्याचें तोंड चोळीनें बांधून त्यावर गोड्या तेलाचा दिवा ठेवतात तो ( हा प्रकार बहुधा कोंकणांत आढळतो ) ५ एखाद्या मंगल संस्काराच्या वेळीं ओवाळावयास अगर मागें धरावयास जो दिवा घेतात तो 'मागें मी मुहूर्ताचा कन्हा घेऊन उभी होतें' -वेडपांचा बाजार. [स करक, प्रा करअ=करा] ०दिवा-पु वरील ५ वा अर्थ पहा ओवाळणें दिवा, लामण दिवा (क्रि० घेणें) [स करक+दीप, प्रा करअ+दीव] ०दिव्याचा मान-पु कन्हा दिवा धरणाऱ्या स्त्रीस वस्त्रें वगैरे देऊन तिचा केलेला सन्मान व तीं द्यावयाचीं सन्मानाचीं वस्त्रें-पोषाख

**कन्हाट**—पु कडवट रानकाकडी, कडू कारिंट [स कटु]

**कन्हाडकांगुणी-कांगोणी**—स्त्री कांगुणीची एक जात

**कन्हाडा**—पु महाराष्ट्रीय ब्राह्मणाचा एक पोटभेद व त्यातील व्यक्ति

**कन्हेरी**—पु चवरी धरणारा 'मीचि वारी मी कन्हेरी' -एभा १२ ५६१ 'धारना पवनु। कन्हरी वरुणु।' -शिशु ५०

**कन्होड**—स्त्री (व घाटी) कालवड

**कन्होडा**—पु (सा) मुगाच्या डाळीचा वडा

**कन्ह्या**—पु वाळूच्या दगडाची एक नरम जात [का करे=काळा]

**कन्ह्या बसणें**—वाप्र (व) नेट लागणें, जिवावर येणें 'दुपारपर्यंत कन्ह्या बसला'=उपास पडला

**कल**—पु. १ ओघ, ओढा, प्रवृत्ति, झोंक २ (ल) मनाचा किंवा इच्छेचा ओढा, बुद्धीची किंवा स्वभावाची प्रवृत्ति, चित्तवृत्तीचा ओघ, रोंख 'असत्कार्यीं कल नसो मानसाचा।' -भजनतरंगिणी ८३ ३ ऱ्हास, ओसरा उतार याचा आरंभ (दिवस, विकार, लहर, पूर, अतिरेक, याचा) (क्रि० खाणें, पडणें) 'कांहीं कालापूर्वी सुधारणा ऐन शिखरास जाऊन पोंचल्याचें जें मान दिसत होतें त्यास आता कल पडून लोकांच्या मनानें उलट खाल्याचीं चिन्हें दृष्टीस पडू लागलीं आहेत' -नि ४९० 'एकाच पारड्यात सगळें वजन पडलें म्हणजे जशी तराजूची दांडी एकाच बाजूस कल खाते' -नि ४३९ ४ पातळीचा तिरपेपणा, तिरकसपणा (इ) इक्लिनेशन ऑफ दि प्लेन 'क्षितिज पातळीशीं उतरणीची सपाटी जो कोन करिते त्यास उतरणीचा कल म्हणतात' -यस्थि ९६ ५ मळसूत्राचा तिरपेपणा, चढवळण, (इ) अँगल ऑफ दि स्क्रयू, मळसूत्राचा कल -यस्थि १०१ ६ वळण, रोंख, झोंक (क्रि० धरणें=गाडीचें एक चाक खालीं व एक चाक उंच झालें असता उंच झालेल्या चाकाला हात देणें, तोल सांभाळणें) [स कल्=प्रवृत्त करणें] ०पाहून वागणें-(वाप्र) एखाद्याच्या तब्बेतीप्रमाणें, मर्जीप्रमाणें हलकेपणा शक्यो २ १९ स्वीकारून वागणें, वारा वाहील तशी पाठ देणें २ प्रसंगीं धोरण किंवा योग्यायोग्य विचार पाहून त्याप्रमाणें वागणें

**कल**—वि मंजुळ, मृदु, हळु (आवाज) 'ते जयजय घोष कलरवें। स्वर्गें गाजविताती आघवे।' -ज्ञा ११ ३३६ [ध्व सं]

**कलई-कर-गार**—कल्हई पहा

**कलंक**—पु १ तांबें किंवा पितळेच्या भाड्यांना आंबट पदार्थाचा संपर्क झाला असतां जो हिरवट विषारी पदार्थ उत्पन्न होतो तो, जंग, रुप्याच्या हीणाला व लोखंडाच्या कीटालाहि म्हणतात २ डाग, ठिपका (विशेषत चंद्रावरील दिसणारा काळा डाग) 'जरी चंद्रीं जाला कलंकु।' -ज्ञा १८ २७३ 'मग आला चंद्रासी। स्पर्शी केला गुरुपत्नीसी। कलंक लागला चंद्रासी। ऐसें झालें जाण पां।' -शनिमहात्म्य ३२९ ३ (ल) दोष, कालिमा, दुष्कर्मामुळें प्राप्त होणारा, अपकीर्तिरूप दोष, बट्टा, कमीपणा [स] (क्रि० लागणें)

**कलकत**—पु (व) यवा, जमाव

**कलकत्तिया**—पु विलायती तवारु -कृषि ४२१

**कल-कन-कर—दिशीं**—क्रिवि एकदम फुटल्यानें, तुटल्यानें जो आवाज होतो तसा होऊन, करून, त्या आवाजानें युक्त होत्साता 'कलकन फुटलें, उललें, चीर गेली' 'काय सुख वाणूं सख्याचें जणूं कलकन छाती फाटेल' -पला ४ १ [ध्व]

**कलकल-कल्कल**—पु एकमेकांत मिसळलेला ध्वनि, आवाज, शब्द, गोंगाट, वटवट, कटकट (माणसाची), किलकिलाट, कल्ला (पक्ष्याचा) (क्रि० करणें=विवळणें) 'कलकल कलहंसें फार केला सुटाया।' -र ४३ 'मुलानों कलकल करूं नका' -कोर ४८४ 'किती गुण आठवूं राजसा कलकल करितें अनिवार' -प्रला १३७ [स कल्=अव्यक्त शब्द करणें]

**कलकलणें**—अक्रि १ (कों गो) अस्वस्थ होणें, त्रासणें (माणसाच्या भाडणानें किंवा पक्ष्याच्या किलकिलाटानें) २ उन्हानें, पित्तक्षोभानें मस्तक दुखूं लागणें ३ धावरणें, काळीज धडधडणें ४ गडबड गोंगाट कोलाहल करणें [कलकल]

**कलकलाट**—पु १ भांडणाऱ्या माणसाचा किंवा चिडलेल्या पक्ष्याच्या आवाजाचा शब्द २ कोलाहल, कल्ला, आरडओरड, गोंगाट, 'हमें मुक्ता नेली मग केला कलकलाट काकानीं' ३ अशा आवाजापासून उत्पन्न झालेला अस्वस्थपणा 'माझें डोकें कलकलाट करितें' ४ अतिशय उष्णतेची वपोत्पादक अवस्था 'ऊन्ह कलकलाट करितें' [स कल्=अव्यक्त शब्द करणें]

**कलकल्या**—पु साळुंकीहून लहान, पाढऱ्या रंगाचा व अंगावर काळे ठिपके असलेला, लांबट चोंचीचा एक पक्षी, खव्या, विठ्या, हा मरळ माशाचीं पिलें खातो -मरळ माश्याची पैदास ७

**कलंकित-कलंकी**—वि १ कलंकयुक्त झालेला किंवा कलकाचे गुण ज्यात आले आहेत असा, कळकट २ (ल) दूषित, डाग लागलेला, अपवित्र झालेला ३ बदनाम झालेला, निंदित [कलंक]

कल्की—पु १ दुष्टांचा संहार करणारा, भावी, दहावा, शेवटचा विष्णूचा अवतार २ (ल) भांडण, तंटा, कलह 'तेथुनि माजला कल्की ऐका आश्चर्याची मात।'-वेपो ३८३ ३ दहावनारी गजिफांतील शेवटचा रंग [स कल्की]

कलखापरो—स्त्री एक औषधी,(६) भिंक वारबोनग ही गोमूत्रात टालायग्राने शिजविली म्हणजे शुद्ध होते -योर २२४

कलंगडा—पु (संगीत) गाण्यांतील एक राग राग पहा

कलगडी-ड़ें—कलिंगडी-डें पहा

कलगायन—न मंजूळ मधुर गाणे 'जयें तो लक्ष्मी रमण। करित होता कलगायन।'-रास १ १८२ [कल+गायन]

कलगी—स्त्री १ पागोटयावर खोंवावयाचें एक रत्नखचित शिरोभूषण शोभादायक पिसें किंवा तुरा २ घोडयाच्या डोक्यावर बांधावयाचा पिसांचा तुरा तसेंच म्होरकीस ज्या दोन्ही बाजूस झुरमुळ्या लावतात त्यांसहि म्हणतात ३ शृंगारिक लावणीचा एक प्रकार यांत प्रकृति ही पुरुषापेक्षां श्रेष्ठ मानतात व ती पुरुषाचें आर्जव करिते असें वर्णन असतें, या संप्रदायाचें दर्शक चिन्ह जें डफावर लावतात तें 'सगनभाऊ व त्याचे अनुयायी आपणास कलगीवाले असें म्हणवून घेतात व हें चिन्ह ते धारण करितात' ४ पुष्पगुच्छ 'श्रीमंतास प्रथम कलगी समर्पण करून त्यावरच अत्तर गुलाब देतात'-ऐरा प्रभु ९ ४२३ ५ कोंबड्याच्या डोक्यावरील तुरा ६ एक फुलझाड व त्याचें फुल [तु कलगी] ०तुरा-पु कलगी हा एक पक्ष व तुरा हा त्याचा प्रतिपक्ष यामधील चढाओढ लावणीचा एक प्रकार ही लावणी प्रश्नोत्तररूपी असते कलगीवाल्याना नागश व तुरेवाल्यांना हरिदास असेंहि म्हणतात -शाको क १४६ ०वाला-वि (हि) पुरुषापेक्षा प्रकृति श्रेष्ठ मानून कलगी जातीच्या लावण्या म्हणणारा

कलच—पु कीट (अंगावर घट्ट बसलेलें) घाण किटण मळ

कल्चर्ड मोतीं—न कृत्रिम मोतीं जपानी लोकांनी नैसर्गिक मोत्याप्रमाणें मौक्तिकजंतूकडून कृत्रिम मोतीं तयार करण्याचें काम सुरू केलें आहे काहीं जातींच्या माशाच्या खव त्यापासून उत्तम जातीच्या त्याप्रमाणें तेज असलेलें एक सत्त्व तयार करून तें कांचेच्या आतून अगर बाहेरून लावून खोटे मोतीं फ्रान्स-जपानांत तयार करतात हे व कलचर्ड मोतीं हीं दोन्ही भिन्न आहेत [इ कल्चर्ड=वाढविलेलें, कृत्रिम]

कल्चुडी—स्त्री (गो) सोनें साफ करण्याची रानडुक रांच्या केसाची सोनाराची कुंचली [कल+स चूडा]

कल्छा—पु उलथणें करछा पहा

कलंडणें—अक्रि एका बाजूस तोल जाणें, भार जाणें, पडणें, लवडणें -उक्रि विरुद्ध किंवा दुसऱ्या बाजूस ढकलणें, पालथें होणें [स कड्]

कलंडविणें—उक्रि १ एकीकडच्या तोलावर पाडणें २ उलटविणें उलडविणें

कलंडा—वि एका बाजूवर आधार देऊन किंवा टेकून असलेला, कलथा, बाजूवर पडलेला [कल]

कलंडी—स्त्री १ बाजूवर तोल जाणें, उलटणें (क्रि० देणें) २ उलथापालथ

कलणें—अक्रि १ बाजूवर पडणें, एका अंगावर तोल जाणें, कलडणें, एकारणें, किंचित झोंक जाणें झुकणें टेकणें [कल] २ (ल) कमी होण्यास लागणें उतरणें मध्यरात्र माध्यान्हादि जे काल ते कांहींसे अतिक्रांत होणें, ऱ्हास होऊं लागणें ३ (ल) एखाद्याकडे कल ओढा प्रवृत्ति असणें (मन, मर्जी, स्वभाव यांची) [स कड्=प्रमत्त करणें]

कलणें—क्रि जाणणें [स कल=गणणें, मोजणें]

कलता—वि एका बाजूवर झुकलेला तोललेला वळलेला, लवलेला कलडलेला, तिरकस 'जरि कांटा कलताए दैवाचा। जेउता राजमठु।'-ऋ ३९ [कलणें]

कलतान—न (व) तागाचें जाड विणलेलें कापड, कतान बारदान 'सुपारं मालाचें बारदान मोठें कलतानी असल्यास २॥ रत्तल वजन धरतात -मुव्या ६६ [कतान पहा]

कलत्र—न स्माची स्त्री भार्या पत्नी कुटुंब, बायको, (वामांगी) 'पहिलें मवचोरांचें मैत्र। हाटमेरीचें कलत्र।'-ज्ञा १८ ७९७ पुत्र कलत्र आणि ब्रह्मचारी। हेहि परी दासविली।' -एभा १ १९१ तुझ्याठायीं अति तत्पर। कलत्रभावें विनटली॥'-एरुस्व ३ ४७ वृद्धापकाळीं ओळखिजे कलत्र॥' [स कल=शरीर+त्र गड्-कडन-कलत्र]

कलथणें—उक्रि १ उलथणें पालथें होणें एका बाजूवर किंवा विरुद्ध दिशेला फिरविणें तोल जाणें उलटविणें उलथें पालथें करणें अगे दुष्टी माते दशवदन पाडीं कलथुनि।' -अनंत सीतास्वयंवर ७० तो करथलीं सव्य अंगावरी।' -ह ५ २७ तैसें शिवचाप कलथलें।'-रावि ८ ८० २ समोर बार वळविणें फिरविणें वळणें फिरणें (जड किंवा कोणत्या तरी एका बाजूला घट्ट बसविलेली वस्तु) [कल]

कलथा—वि एका बाजूस तोल गेलेला कलता पहा -स्त्री धक्का ठोसा गुद्दा -शर -पु एक प्रकारचें पसरट तोंडाचें व ज्याला मागें दांडा आहे असें उपकरण तव्यावरील पोळ्या, भाकरी इत्यादि परतण्यासाठीं तळलेला पदार्थ कढईतून बाहेर काढण्याकरितां, निखारे चुलींतून बाहेर काढण्यासाठीं, उपयोगांत

आणावयाचें व तापत असलेलें दूध वगैरे ढवळण्याचें साधन, उलथणें, काविलथा, सराटा 'रुप्याचा कल्था, सोन्याचा तवा' –मदनम ९६ [स कल्]

**कलथी**—स्त्री उलथणी कलंडी पहा –वि कल्लेला–ली–लें, वळलेली 'मानेवर मस्तकाची कलथी बैठक पाहून गुणाचें डोकें ठिकाणावर राहील?'–भावबधन २४ 'अमल भडचा प्रहाराचा दुपार कलथी'–सला २६

**कलंदर**—पु कलिंदर, ऊद, काडेचोर

**कलंदर**—पु मुसलमान साधु, फकीर [अर]

**कलंदर**—पु मिश्र उत्पत्तीचा मनुष्य, सकरज [स]

**कलंदर-रा-द्रा**—पु १ एक सुती व रेशमी वस्त्र, गर्भरेशमी वस्त्र, लुगड्याची एक जात 'चदा–चदी ओर क़ल्दर।' –अमृत ४९ २ दुहेरी आच्छादन असलेला तंबू. ३ अशा आच्छादनापैकीं वरचें आच्छादन [अर कलदरा]

**कलदार**—वि (हिं) इंग्रजी चालू शिक्याचें (नाणें) ज्या नाण्यावर मुखवटा आहे असें नाणें, सुरती 'पचवीस शें रुपये कलदार घेऊन'–विक्षिप्त २ १६ [अर कल्ह=डोकें]

**कलंधर**—पु एक फकीराचा पंथ, मुसुलमान साधु 'फकीर कल्धर वल्मिर्मूर्ति।'–सप्र १७ ३८ [अर कल्दर=साधु]

**कलना**—स्त्री १ जिवाच्या अंगीं अंत करणासबधानें उत्पन्न होणारा सामर्थ्यविशेष, ज्यामुळें विषयानुभव मिळतो ती, पदार्थांचे गुण किंवा परिणाम जाणण्याचें मानसिक सामर्थ्य, चेतना, जाणण्याचें सामर्थ्य, ज्ञान 'सृष्ट पदार्थांपैकीं ज्यास जीवन आहे पण चैतन्य व कलना नाहीं'–मराठी सहावें पुस्तक, पृ २१७ (आ २ सन १८७५) [स कल्=गणणें] **कालकलना**—स्त्री आयुष्याचा शेवट जीवितावधि, जीवनांत, मृत्यु 'खड्गें वाजती खणखणा काळकलना माडिली'–एरुस्व ८ ४० [स कल्=गणणें, मोजणें]

**कलप**—पु सशय, अंदेशा, विकल्प [स कल्प]

**कलप-फ**—पु १ परीट लोक कपड्यांना लावतात ती खळ २ पाढरे केंस काळे दिसावे म्हणून जो रंग लावतात तो [स कल्क]

**कलपणें**—अक्रि अतिशय दु खात किंवा क्लेशांत येणें, धडपडणें, धापा टाकणें, तडफडणें (वेदनामुळें) [स क्लृप्]

**कलपणें**—उक्रि १ (कल्पिणें अप) मानणें, कल्पना करणें २ दुसऱ्याचें अनिष्ट चिंतणें, जळफळणें [स क्लृप्]

**कलपर्टें**—न (बे) दगडी भाडें [का कल्ल=दगड+परटी=नरोटी]

**कलवी-लंबी-ळंबी**—स्त्री (नाविक) अगदीं पाठीमागचें शीड [अर कल्व्=मध्य ?]

**कलबुरगी**—वि कलबुरगा गावासबधीं (लुगडें वगैरे) 'कलबुर्गी, हल्वुर्गी लुगडें।'–अमृत ४९

**कलबूत-द-भूत-द**—पु १ सागाडा, टोकळा किंवा चौकट (ज्यावर कोणतीहि वस्तु तयार करतात अशी), मुलाची पगडी तयार करावयायाचा ठोकळा, जोड्याचा लाकडी साचा **०ठोकणें**-(चाभारी धंदा) जोड्यात लाकडी साचा घालणें २ (गवडी काम) कमानीखालीं दगडमातीच्या आधारा करिता ठ्यावयाची लाकडाची वाटोळी माडणी 'सर्व कमानी कल्बुदावर बाधाव्या.'–मॅरट १२ 'रायवळ लाकडाचीं कल्बुदें तयार करून'–मॅरट १८ छत्रीचा करडा, पक्ष्याचा सागाडा २ ठेंगणा पण मजबूत मनुष्य, घोडा, भरींव व मजबूत नग, भाडें, पदार्थ ३ कातड्यात पेंढा किंवा भुसा भरून ठेवलेली जनावर इत्यादिकाची आकृति 'वाघाचा कलभूत दिसे वाघा ऐसा। परी नाहीं दशा साच अगीं।'–तुगा २८६१ [फा कालबुद=आकृति]

**कलंबो-ची**—पु (गो) कलमी आंबा

**कलभ**—न हत्तीचें पिल्लू, छावा 'कलभमथन हरिसि तसें त्याला तें कर्म वाटलें सोपें।'–मोद्रोण ३ ४० [स =करभ]

**कल(ळ)भंट-ड-त**—वि कलहशूर, भाडण–तंटा करण्यात पटाईत, तत्पर, भाडकुदळ 'पाटील, कुळकर्णी बरेच कलभड असले तर'–गागा ८५ 'निराक निलाजिरा कळभट। टोणपा लींद धट उद्धट।'–दा २ ३ ३२ [सं कलह+भड]

**कल(लं-ळं)भा-मा-व्हा**—पु. भाडण–तंटा, झगडा, कलागती (क्रि० लावणें, भाडणें, करणें, माजणें, लागणें) 'बोलें इंद्रिया लागे कळभा। एकमेका।'–ज्ञा ६ १६ [स कलह+भड]

**कलभांड**—वि भाडखोर कलभड पहा 'मोंगल कलभाडू, मारिला कोंडू कोंडू झाले श्रीमतासी बळ।'–ऐपो २४५ [कलह+भाडणें] –न गोसाव्याचा एक पंथ व त्यातील व्यक्ति, अठरा आखाडे पहा

**कलम**—न १ लेखातील विशेष मुद्याबद्दल किंवा गोष्टीबद्दल लिहिलेला तेवढाच भाग, स्वतत्र सदर, बाब, मुद्दा, परिच्छेद. पुस्तकगृह हें एक सुधारणुकीचें मोठें कलम आहे'–नि १५ 'एकट्यावरूनच काव्यरचनेस नाक मुरडणें हें अली कडील रसिकाचें पहिलें कलम ठरून गेलें आहे'–नि १४१. २ एका झाडाची फांदी–डहाळी दुसऱ्या झाडाच्या फांदीवर लावून काहीं कृतिविशेषानें त्या दोहोंचाहि एकजीव करणें, कलमाचे प्रकार –१ भिंतीचें कलम–दोन फायाचें सुसते लेखणी सारखे तास घेऊन त्या एकमेकीस जोडणें २ पाचरीचें कलम–एका फांदीला खाचा पाडून त्यात दुसऱ्या फांदीचा तुकडा पाचरी प्रमाणें मारणें, बसविणें ३ दाबाचें कमल–फांदीला चीर घेऊन फट पाडून ती मातींत पुरतात, थोड्या दिवसानीं तिला मुळ्या फुटल्या म्हणजे ही मुळ्याची फांदी कापून निराळी लावतात

४ गुटीचें कलम–एक जाड बुंध्याचें सबंध झाड कापून टाकून त्या कापलेल्या भागांत आतील गाभा व साल यांत फट पाडून त्यांत दुसऱ्या झाडाच्या फांदीचा जाड तुकडा गुटीप्रमाणें बसविणें ५ गुटीचें कलम–डोळे भरण्याचें ६ भेटकलम–दोन झाडांच्या साली काढून आगें एकत्र जोडून बांधून एकजीव होईल असें करणें ३ वरील कलम करण्याची कृति ४ चितान्याची कुंचगी किंवा पेन्सिल 'रजपूत कलम, कांगडी कलम, महाराष्ट्रीयकलम, मोंगली कलम इ० '–चित्रकला संप्रदाय 'इतकें नाजूक कलम घोणऱ्या चितान्याजवळ असेल ? '–इंप ४४ ५ बोरूची लेखणी 'हाती कलम घेऊन पडला '–ऐपो ३९१ ६ कापा काप, तोडातोड (हात, पाय वगैरेची), झाडांची खच्ची किंवा छाटाछाटी. 'हे ज्योतिषी व त्याचे पुरस्कर्ते यांचे आमच्या कमठ राजाचे कारकीर्दीत खचित हात कलम केले असते ' –विवि (क्रि० करणें ) 'द्राक्षाच्या दुसऱ्या छाटणीच्या वेळेस फांदी जितकी जून असते तितकी ठेवून बाकीची छाटतात यास कलम म्हणतात '–शेतकरी २ ११ ७ रकाना. ८ कायद्याच्या पुस्तकांतील प्रत्येक नियम, वानू परिच्छेद, 'पिनल कोड कलम ४३५ प्रमाणें अपक्रियेचा अपराध वामनरावाचे माथीं बसला ' –विक्षिप्त १ ४३ ९ (कु) (सोनारी धंदा) पच्ची करण्याचें एक हत्यार १० दुकानदारांचा परस्पर उधार देवघेवीच्या हिशेबा तील मुदत ही १ महिना १० दिवस किंवा १॥ महिना असते त्यानंतर उधार रकमेवर ०पाज आकारतात त्यास मुदत संपल्या नंतर कलम पिकलें असें म्हणतात ११ (ल) पत्र 'चाललें कलम फौजेचें। राऊत पायदळाचे।'–ऐपो २३० [अर कल्म=बोरू, लेखणी] ०कसाई–पु १ हिशेबनीस, हिशेब तपासनीस, पगाराचा बटवडा करणें वगैरे कामाचा कारकून, खर्चात छाटाछाट करून लोकांचें (लेखणीनें) नुकसान करणारा इसम २ जो आपल्या लेख णीनें (लेखानें) लोकांना बुडवितो तो ३ कारकुनी डावपेंचात दुसऱ्याचा गळा गोत्यात अडकविणारा ०कुचराई–स्त्री लुच्चे गिरीनें हिशेबात एखादी बाब गोवणें, गाळणें, गबाळेपणानें किंवा घाईनें लेखामध्यें अक्षरें खाणें–गाळणें [कलम+कुचराई] ०जारी– १ पत्रें लिहून सैन्याची केलेली जमवाजमव, नावनिशी (क्रि० करणें चालणें) 'कलम ज्यारीचे घटाव मचले।'–ऐपो २१४ २ विज्ञप्ति, पत्रलेखन 'ते कलमजारी करून फौज ठेवू लागले ' –मराचियोशा ९ [फा] ०तराश–स–पु हुषार, चलाख, लेखणीबहाद्दर [फा तराश=चाकू] ०दान–दानी–नस्त्री १ लेखणी व दौत ठेवण्याचें लाकडी घर, ठोकळा, खोबळा, लाकट पेटी [फा कल्म दान् ] २ ज्या दिवाणखान्याची मधली तख्तपोशी तबकासारखी सपाट नसून दोन्ही बाजूची (डाव्या व उजव्या हाताकडील) तख्तपोशी छपराप्रमाणें उतरती असते असा दिवाणखाना ३ फटाक्यांची एक जात, प्रकार 'कलम दानी एका पेटींत ५०० पुडे असतात.'–गुंज्या ११८ ४ (इमारत) हवा आंत येण्यासाठी भिंतींत केलेली खिडकीवजा योजना. ५ दरवाज्याच्या झडपेमध्यें फळीची चौकट करून आंत नक्षीदार अगर एखादी आकृति काढून पातळ फळी भरून तयार करतात ते ०बंद–वि पत्रीं नमूद, लेखनिविष्ट, लिखित 'तेच मजकूर येव जरा तफावत न करितां कलमबंद केले '–रा १ ४४ [फा] ०बंद करणें–क्रि लिहून घेणें, टिपून ठेवणें, टाक गुतविणें ०बंदी–वि १ अनेक प्रकारचीं अनेक कलमें निर्णयपूर्वक ज्यात बांधून दिलीं आहेत तो लेख, निरनिराळीं खातीं, सदरें व बाबी निरनिराळ्या कलमांखालीं लिहिलेली याद (यात हुकुमाची, कबुलायतीच्या किंवा कराराच्या कलमाची नोंद असते), विषयवार नोंदणी, सर्व तपशिलाच्या बाबींची एका खालीं एक क्रमानें केलेली नोंद २ कलमजारी पहा ०बहाद्दर– वि लेखणीशूर, हुषार लेखक, तरबेज कारकून ०बाज–वि १ कलम चालविणारा, फरडा २ सर्व कलमें अथवा बाबी, नियम यांत निष्णात 'कायद्याच्या कलमबाज शब्दार्थानें '–अभ्युदय ता ३० ११ २८ ०वार–क्रिवि ज्यात एकामागून एक सर्व कटी, बाबी लिहिल्या किंवा सांगितल्या आहेत अशा तऱ्हेनें, बाबीमागून बाब साप्रमाण सूक्ष्मपणें व विशेषपणें, तपशील- वार, विषयवार ०सफाई–स्त्री वळणदार लिहिणें, सुंदर अक्षर, कारकुनी हात [फा.] ०सूत्रा–वि लेखनकुशल, लेखननिपुण [अर कल्म+स सून]

कलम—स्त्री (माण) मूर्च्छा, बेशुद्धि (क्रि० येणें)

कलम—पु (गो) तेलामुळें भांड्याला आलेला दिरवेपणा, कळक [स कल्मष]

कलमल-कलमलणें—कळमळ–कळमळणें पहा

कलमा-म्हा—पु ('ला इलाह इल्लल्ला मुहम्मदुर्रसुल्ला =अल्लाशिवाय दुसरा देव नाहीं, मुहम्मद अल्लाचा प्रेषित आहे ') हें इस्लामी धर्मसूत्र या शब्दाच्या उच्च व तल्लख उच्चारामुळें मराठ्यांनीं याचा अर्थ पुढील प्रमाणें रूढ केला आहे – भांडण तंटा, कलागत, मोठमोठ्यानें ओरडणें, (क्रि करणें, लावणें, मांडणें, माजवणें, उठवणें, चालवणें, –अक्रि होणें, लागणें, माजणें) 'झाला लष्कराचा बोभाट कलमा दाट तीनशें साठ बिगारी धरले।' –मसिपो ४३५ [अर कलिमा, फा कल्मा]

कलमाकाप—न (गो) एक वन्य औषधी

कलमी—वि १ लेखी, लिहिलेले, लेखनिविष्ट, याच्या उलट तोंडीं किंवा उडत उडत क्रि० करणें, लिहिणें 'जबानी बातमीस व कलमी बातमीस थोडे बहुत अंतर पडतच आहे '–खरे ४. १४७० 'मुंबईकरांनीं आम्रे यास कलमी केलें '–खरे ७ ५७१ २

पगारी 'या स्वारीस कल्मी फौज ठेवावी असा इरादा –होकै ५ ३ (गो) लिहिणारा ४ (व घाटी) उची व तिखट दालचिनी ५ कलम केलेलें झाड, सदर झाडाचें फळ, (आंबा इ०) ६ (कुल) देवळी जात ७ (हेट) डोलाच्या मागची काठी किंवा मागचें म्हणजे दुसरें शीड, ही काठी डोलकाठीपेक्षा एक हात कमी असते (कल्वी पहा) [अर कल्म = बोरू, लेखणी] **०दालचिनी**–स्त्री वरील ४ या अर्थे पहा **०लता**–स्त्री लवगी वासाची वेल **०सोरा**–पु उत्तम जातीचा सोरा हा पाढरा असून याचे लाबट खडे असतात

**कलय**—स्त्री (गो) कल्ई पहा

**कलयुग**—न कलियुग चौथें युग, शेवटचें युग, ज्यात कली कल्ह भाडण इ०चा अम्मल जास्त तें [स कलियुग]

**कलरव**—पु मजुळ, मधुर असा पक्ष्याचा आवाज किलबिल 'वरि सुहावे कलरव। पक्षियाचे' –ऋ १५ 'वसतें शृगारिलें वन। कोकिला कलरवें गायन।' –एभा ४ ८१ [स]

**कलवड**—पु शेण, माती वगैरेनीं झाकलेला वाळलेल्या गोवऱ्याचा ढीग कलोड पहा [स कल्=एकत्र करणें]

**कलवंडणें**—सक्रि भाडणें, तडणें कळवडणें पहा

**कल्वणें-विणें**—सक्रि (ना) मागें किंवा बाजूला करणें वळविणें, कल्तें करणें [कल]

**कलवत**—न (गो) कलावतीण [कला+वत-वान]

**कल्वतें**—स्त्री (कु) करगळीच्या नखाइतके रुद अतिशय चपल व सुदर मासे हे कळप करून पाण्यात हिंडतात

**कल्वार**—पु (हिं) कलाल, दारूविक्या कलाल पहा

**कलश**—पु १ तांब्या, गडवा, धातूचें किंवा मातीचें भाडें, कळशी, घागर (पाण्यासाठीं) 'येर कलशीचें येरीं। रचविजे जयापरी।' –ज्ञा १३ ११४४ 'न करिती कलशपूजेचें काम। नवरीचे उपाध्ये सकाम।' –एरुस्व १५ ६३ २ कळस, घुमट, कलशाकार शिखर 'दारवडा सदा उघडा। वरी कलशु गोखडा' –ज्ञा १८ १५०८ [स, तुल इ चॅलीस] **०श्रुति**–पु कुभकर्ण [स] **०सभव-कलशोद्भव**–पु अगस्ति ऋषि हा घटांत जन्मला म्हणून यास म्हणतात 'सिंधु गर्जे तोंवरींच पाही। जों कलशोद्भव देखिला नाहीं।' –रावि १ १६१ [स]

**कलसणें-कल्सवल्सकरणें**—(व ना) परतणें, ढवळणें 'रवा खूप कल्सून काढावा'

**कलसपा(ग)ी**—वि काठामध्यें कळसाची नक्षी काढली आहे असें (धोतर, लुगडीं, पागोटीं) कळसपाक पहा **०लुगडी**–वि ज्याच्या काठामध्यें तीन गोमा व एक कळसासारखी लुगडी असते असें वस्त्र

**कलह-हो**—पु तंटा, भाडण, कज्जा, शिवीगाळ, दुही 'लावाल कल्हो नव्हतें।' –शिशु १२४ [स] **०उकरून काढणें**–क्रि भाडण उपस्थित होईल असें पूर्वीचें एखादें कारण शोधून काढून त्याचा उल्लेख करणें 'द्यूतीं द्रुपदसुतेतें माडीवरि बैस ये म्हणे खल हा। खिजवुनि सभेंत काढित होता उकरुनि पुन पुन्हा कल्हा।' –मोगदा ५ १०

**कल्हमा**—पु (व घाटी) गोंगाट [कलमा पहा]

**कल्हंस**—पु १ राजहस, मराल (कित्येकाच्या मतें पाणकोंबडा) बगळा 'त्यातील एक कलहस तटीं निजेला।' –र ९ २ ब्रह्मदेवाचें नाव [स]

**कल्हातरिता**—स्त्री जिचें भाडण सपलें आहे अथवा प्रच्छन्न आहे, जिची समजूत झाली आहे किंवा सात्वन केलें आहे अशी पत्नी परतु काहीं ग्रथकारानीं जी भाडणामुळें आपल्या नवऱ्यापासुन विभक्त झाली आहे अशी स्त्री असा अर्थ केला आहे भाडखोर, कर्कशा, कैदाशीण –सा द ११७ [स]

**कला-ळा**—स्त्री १ लिहिणें, वाचणें, गाणें, घोड्यावर बसणें, चित्रें काढणें इ० कौशल्याचीं कामें, कला चौसष्ट आहेत चौसष्ट कला पहा २ चतुराईची यात्रिक वगैरे योजना, तिच्या रचनेचें ज्ञान, चालविण्याची युक्ति, त्यापासून विवक्षित फल उत्पन्न करण्याचें चातुर्य, त्याची गुप्त खुबी, किल्ली, मख्खी, यटक ३ चतुराई, बुद्धिकौशल्य, शोधक बुद्धि, कसब, युक्ति, लीला 'तुका म्हणे त्याची कोण जाणें कळा। वागवी पागुळा पायावीण।' –तुगा ३६७७ 'तयात फिरती तरी करिती अप्सराच्या कला' –नरहरी, गगारत्नमाला १४३ (नवनीत पृ ४३२) ४ चद्राच्याबिबाचा सोळावा भाग, प्रत्येक दिवशीं वाढणारी किंवा कमी होणारी चद्राची कोर 'चद्रासि लागती कळा। उपराग येतो।' –र २ ५ वेळाचें एक परिमाण सुमारें ८ सेकदाबरोबर, ३० काष्ठा म्हणजे एक कला ६ एक अशाचा (वर्तुळाच्या ३६० व्या भागाचा) एकसाठाशाचा भाग ७ पदार्थमानाचा (सोळावा किंवा ल्हानसा) अश, लेश, लव, तीळ रज कण ८ काति, टवटवीतपणा, स्वच्छपणा, नितळपणा, सौंदर्य, तेज, चमक (माणसाच्या चेहऱ्यावरील) 'राजकुमार मदनाचा पुतळा। रविशशि कळा लोपल्या।' –तुगा २ 'घराची कळा अगण सागतें' ९ सूर्य, पृथ्वी व परप्रकाश खस्त पदार्थ यामध्यें कोण झाल्यामुळें पृथ्वीवरून त्या पदार्थाची जी काहीं प्रकाशित व अप्रकाशित आकृति दिसते ती –सृष्टिशास्त्र १३८ ग्रहाच्या प्रकाशित भागाचा जो अश आपणास वाढताना किंवा कमी होताना दिसतो तो –सूस, ज्योति शास्त्राचीं मूलतत्त्वें १० (प्राणिशास्त्र) शरीरांतील नाजुक त्वचेसारखा पडदा (इ) इटरनल मेंब्रेन ११ (अश्व) कुच आणि कुच्किका–

घोडयाचे अवयव –अभप ६४ १२ (ताल) मात्रा, नियमानुसार तालाचे झालेले भाग, हे आठ आहेत–ध्रुवका, सर्पिणी, कृष्णा, पद्मिनी, विसर्जिता, विक्षिप्ता, पताका व पतिता. १३ (ताल) खाली, टाळी न वाजविणें १४ शास्त्राचा व्यावहारिक उपयोग, कोणत्याहि उद्दिष्ट विषयास उद्दिष्ट प्रसंगीं शास्त्रीय सिद्धांत लागू करणें (शास्त्र याच्या विरुद्ध) –सुकी १२ [स] ०तीत–वि अत्यंत सूक्ष्म, अंशाच्या विभागाच्या पलीकडला, मायेच्या पलीकडला 'कलितकाळ कौतूहल। कलातीत।'–ज्ञा १८ ३ [स] ०निधि–पु चंद्र 'आल्हाददारक कलानिधि परंतु न्यून क्षयासहित।'–सीता स्वयंवर (नाको) [स]

**कलाक**—पु तास, अवर 'गाडीला अजून दोन कलाक अवकाश आहे' –मावचन ५२ 'घरी आली म्हणजे अर्धा अर्धा कलाक निपचित पडत असे' –उपाप्रयमाला, माही हीच गत १५ [इ क्लॉक, तुल स कला+क]

**कलाकंद**—पु माव्याची, खव्याची बर्फी, मिठाई [हिं कला+कंद, फा कल्हा-इ-कद=मिठाई]

**कलाकल**—क्रिवि एकामागून एक कडकड होणारा आवाज (टाके तुटणें, गाठी तोडणें, फाडणें, तडकणें वगैरेचा) [ध्वनि]

**कलाकौशल्य**—न शास्त्र व त्यातील कुशलपणा, चातुर्य युक्ति, बुद्धि कळाकुशलता पहा [स कला+कौशल्य]

**कलागत**—स्त्री सपाटयाचें भांडण, तंटा, रागाची शिवी गाळ, खटखट, कळ, लावालावी (क्रि० करणें, लावणें=कौलीत लावणें) 'बहु कलागती। तुज भांडणें भोंवतीं।'–तुगा ५७३ [स कलह+गति]

**कलागती-त्या**—वि भांडखोर, कटकटया, कज्जेदलाल भांडण लावून गम्मत पाहणारा (क्रि० लावून देणें, लावणें) 'श्रीआचार्यांनीं निदान या रिकामटेकडया कलागतीखोर पुणे कराच्या नादास मुळींच लागू नये' –आगर ३ १४५ [कलह+गति]

**कलाजंग**—पु (कुस्ती) (कोपरापासून मनगटापर्यंतच्या भागास कलाई म्हणतात) मनगटापासून कोपरापर्यंत हात बांधून फिरून पाठीवरून ओढें टाकतात त्याप्रमाणें टाकणें [स कला अर जंग=लढाई हिं कलाइ=मनगट]

**कलाझगडी**—(माण) भांडखोर [कला+जग]

**कलाट**—पु (रत्ना) भांडखोर, नासदायक अतिशय द्वाड मनुष्य लचाडी [कलह]

**कलाटणी**—स्त्री १ (क) कोलांटी, उलटी २ (ल) परावर्तन, स्थित्यंतर 'केव्हा केव्हा काव्यांत विचाराला एकदम कलाटणी दिली असता काव्याचें सौंदर्य वाढतें' ३ (माण) थाप, बात, उडवाउडवी [कल]

**कलांडणें-कलांडा**—कलंडणें-डा पहा

**कलांतर**—न पैशावरील व्याज 'म्हणे कलांतर घेऊन अगोदरी। दोन चार सातवरी मज यावे।'–भवि ५३ १८६ [स कला+अंतर]

**कलाप**—पु १ समुदाय, समूह, जमाव (सामा शब्द) केदारकलाप, मुद्राकलाप, क्रियाकलाप, पल्लवकलाप, तंतुकलाप 'परी क्रियाकलापु आघवा।'–ज्ञा ४ ९५ २ मयूरपिच्छाचा समुदाय –हको [स कलाप]

**कलापक**—पु (नृत्य) तीन करणांचा समुदाय [स कलाप]

**कलापीठ**—न (टंकयंत्र) सूत्रनिबद्ध चिन्हांची कळ–त्याचें पीठ (चिन्हांची कळ दाबतांना कागदावर तें चिन्ह मुद्रित होतें) (इ) कीबोर्ड

**कलांफा**—पु संशय अदेशा, अनिश्चिति, शंका, भीति, धरसोड [अर कल्फ=लक्ष, चेहऱ्यावरील सुरकुती, स कल्प]

**कलाबतु**—पु चांदीचा अथवा सोन्याचा जर (तार) चढवून पीळ दिलेला रेशमाचा दोरा [फा कलाब=सुताची गुंडी, रीळ हिं कलाबत्तू]

**कलाभुवन**—न निरनिराळीं कलाकौशल्यें शिकण्याची जागा, कारखाना [स कला+भुवन]

**कलामुला**—ईश्वरी वचन 'कलमे शरीफ म्हणजे अत्युत्कृष्ट वचन व कलामुला म्हणजे ईश्वरी वचन' –धाको १०५ [अर कलाम=वचन, भाषण, प्रवचन]

**कलामेशरीफ**—न अत्युत्कृष्ट वचन (कुराण ग्रंथ) [अर कलाम=वचन+शरीफ=श्रेष्ठ]

**कलाय**—पु वाटाणा (विशेषत करडया रंगाचा) [स]

**कलाल**—दारू वगैरे अमली पेयें गाळणारा व विकणारा [स कल्यापाल, दे कल्लाल कल्या=मद्य अर कल्लार=दारू गाळणारा व विकणारा] ०भट्टी–स्त्री १ दारू गाळण्याची भट्टी, मद्य तयार करण्याची जागा कारखाना २ मद्यावरील कर 'पूर्वी या राज्यात कलालभट्टीचें म्हणून एक उत्पन्न असून तें आमदार खान्यात जमा करण्यात येत असे' –ऐरा (बडोदे) ७१

**कलाली**—स्त्री १ कलालाचें काम धंदा २ दारू गाळण्याच्या भट्टीवरील व दारू विकणाऱ्या दुकानावरील सरकारी कर

**कलाली**—वि कपटी, मतलबी 'आणि मन जयाचें कलाली।'–ज्ञा १८ ६७२ [स कला]

**कलाली**—वि भयंकर क्रूर 'बहु सावजें व्याघ्रसिंहें कलाली' –विवि २१ २१७ [स कराल]

**कलाली**—स्त्री पक्षांची किलबिल, आवाज, ओरडणें 'सिक पिंगळा आणी पारी। वोखटें होता काक कलाली।'–दा ३ ७ ५८ [स कल्=शब्द करणें]

**कलाव**—पु गोळा–शार [स कल्=सकलन करणें]

**कलावर्णे**—क्रि (व) फिरविणें, कलविणें, कलतें करणें [कलणें पहा]

**कलावत**—पु (हिं) एक प्रकारचें गाणें गीत

**कलावंत**—वि १ काहीं तरी कला जाणारा, कलाभिज्ञ कला पहा परंतु विशेषत गाणारे नाचणारे वाजविणारे आणि त्यातही कलावंतिणींचे सारिंदे, पखवाज व सारंगी वाजविणारे, याना लावतात [स कलावत्] २ (प्रचा) धृवपद गाणारा ३ (गो) नाचणारी स्त्री, गाण्याचा धंदा करणारी एक जात (नायकीण) 'मौलाबक्षाचे चिरंजीव यास कलावंत सुपरिंटेंडेंट असा हुद्दा देऊन '—कलावंत खातें (बडोदें) १ ०खातें—न गुणीजनाचा (गाणारे, नाचणारे वाजविणारे इ० चें) परामर्ष घेणारें एक खातें 'कलावंत खातें स्थापन झाल्यापासून कोणत गुणीजन नोकरीत ठेविले '—कलावंत खातें (बडोदें) २ म्ह० (गा) १ कलावंत नाचता देवळात म्हणून गावडी नाचता घरात (दुसऱ्याचें निरर्थक अनुकरण करणें याअर्थी) २ कलावंताचें भाग्य आणि तिरड्याचें राज्य तीनच दीस=कलावंतिणीचें भाग्य तारुण्य असेपर्यंत व तेरड्याचें राज्य रंग विटपर्यंत (अल्पकाळ टिकणारें वैभव) —ची प्रीत—(गो) खोटें, रुक्षें, वरकानी प्रेम, प्रीति

**कलावती**—स्त्री १ नर्तकी, नायकीण, वेश्या [स] २ तुंबरूच्या वीणेचें नांव [स कला+वत्]

**कलावंतीण**—स्त्री १ कळवतीण, गायिका, वेश्या, नर्तकी, नायकीण, कलावती पहा ह्या बाया उत्सवांत, यात्रेंत बैठकींत गाणें करतात 'स्वर्गातील जी प्रमुख कलावंतीण मेनका तिची मुलगी शकुंतला '—नाकु ३ २ [स कलावती]

**कलावनी**—स्त्री (व) औत वळवण्याची जागा [कलणें]

**कलावा**—पु १ हत्तीवरील माहुत ज्या रिकीबींत पाय ठेवतो त्या रिकीबीची दोरी ही हत्तीच्या गळ्याभोवतीं असते २ एका बाजूस किंवा वर वळविणें किंवा ताल्ला करणें (डाव्या किंवा उजव्या भागावर) तोलून ठेवणें, (घोडा) परत फिरवणें एक दोन फेऱ्या, खेपा किंवा वळणें घेणें, फेरफटका करणें (क्रि० एऊ सारखें देणें) 'तू देतावड कलावा देऊन य '

**कलाचा**—पु जनावरास चरावयास सोडलें असता तें फार दूर जाऊ नये म्हणून त्याच्या पायास दोरी बांधून टेवतात ती, मानपखाडा, दुपटी, मानखुर कळवा पहा

**कलि—ली**—पु १ कृतत्रेताद्वापारादि चार युगांतील शेवटचें चालू युग, कलहाचा किंवा दुर्बुद्धीचा काळ काहींच्या मतें या युगाचा आरंभ खिस्ती शकापूर्वी तीनशें काहींच्या मतें ३१०१ व काहींच्या १९७० वर्षांपूर्वी झाला याचा अवधि ४३२००० वर्षें आहे व तो अवधि संपला म्हणजे सर्व जगाचा प्रलय होणार आहे २ भांडण तंटा, कलह 'नमीच कलि प्रगट।'—मामभा ३ २१ ३ कलियुगाची देवता 'साभाळा जी श्रीदावली। तुम्ही का कलिसारिखे।' —तुगा १४५८ ४ दशावतारी गंजीफातील शेवटचा रंग ५ विल्वा, भिलावा ६ पाप 'गर्तिच्या वाटविल्या त्या मुली। काय वाढ विसिल हा कली'—राला ४० ७ युद्ध 'करिति महागजसमान गाढ कली।'—मोआदि २८ ३६ ८ मत्सर 'तच्चिंती शिरला अनर्थं मूळक कली।'—विक ३१ ०काल—पु कलियुगातील दिवस, अज्ञानमय त्रासदायक, संकटकारक काल कलिकाळ पहा [स]—चा पहारा—पु राक्षसी निर्दयता, दुष्टपणा किंवा बेबंदी घडून आली असता उच्चारावयाचा शब्द ०द्रुम—पु १ बेहडा, त्याचें झाड व फळ २ बिब्याचें झाड व त्याचें फळ [स] ०पुरुष—पु १ वाईट भाडखोर मनुष्य, दुष्ट मनुष्य २ नाटकांतील नायकाचा प्रतिस्पर्धी, खळपुरुष, दुष्ट पात्र 'आपल्या नित्याच्या ओळखीचा जो कलिपुरुष'—विचारविलास ४१ [स] ०मल—पु कलियुगातील पापवासना, दुष्ट वासना, दुर्बुद्धि, दोष, पातकें 'एका जनार्दनीं रसाळा। कथा कलिमल नाशिनी।' —एरुस्व ९ ६६ [स कलि+मल] ०महात्म्य—न कलियुगापासून उद्भवणारे परिणाम, संकटें इ० कलियुगाचें वर्चस्व, अमल, प्रभाव [स] ०युग—न कलि—ली अर्थ १ पहा युगचतुष्टयातील चवथें युग ०युगवर्ष—न शालिवाहन शकापूर्वी ३१७९ या वर्षी (ख्रिपू ३१०२ ता १८ फेब्रुवारी) भारतीय युद्ध झालें त्यानंतर थोडक्याच दिवसांनीं कलियुग सुरू झालें —ज्ञाको क १७५ ०युगाचा ब्रह्मा—पु कल्पक व चतुर पुरुष, बुद्धिवान मनुष्य ०सचरणें—क्रि मनुष्य भांडण्याच्या बेतास आला म्हणजे त्याच्या संबधानें म्हणतात. 'ह्याच्या मनांत, पोटांत कली संचरला'

**कलिका—कली**—स्त्री कळी, न उमलेलें फूल, मुकुल, कुड्मल [स कलिका]

**कलिंग**—पु १ हिंदुस्थानातील एका प्राचीन देशाचें नांव, सांप्रतचा ओढया प्रांत (कटक, बालासूर, जगन्नाथपुरी इ० जिल्हे यांत येतात) २ एक पक्षी —मोशांती ६१ [स]

**कलिंगड—डी—ण**—स्त्रीन कलिंगडाची वेल व तिचें फळ, टरबूज (मिथमध्यें कद्दू कलिंगड होतें, त्याला किरबट म्हणतात िलसत हीं याची एक जात आहे त्यास घेवसें म्हणतात. त्याची भाजी करतात तिची तेंड टिंडा, मेद्रा टिंड वगैरे हिंदी नांवें आहेत) याच्या दोन जाती आहेत —काळें व गोल, पांढरें व लांबट यांतील गर लाल असून तो खातात याच्या पानास पाच टोकें असून दान टोकांत दीड अंगुळ खाच असते हें मलघ्नक असून हरिपित्तदोष, व तृषा यांचें नाशक आहे —यार १. ५५. वगु २ १९ [स कालिंगी]

**कलिजा**—पु काळीज [हिं कलिजा, तुल अर कब्द= हृदय]

**कलिं(लीं)दर**—पु. ऊद, काडेचोर, काळमाजर, कानेदर 'सावरें, ससे, कलिंदरें, सायाळ इत्यादि जनावराचा सर्वदा त्रास' —खेया ३ ३

**कलिंदर**—पु १ मुसलमानी भिकारी फकिराची एक जात, दर्वेशाचा एक पथ या पथातील लोक मुडण करितात व नेहमीं फिरत असतात 'मलग मडग कल्दर।' —दावि ४७४ २ लावणीमध्यें हा शब्द नेहमीं येतो पण याचा अर्थ निरनिराळा आढळतो जसें —अनिर्बंध वागणारा, त्यावरून दुर्व्यसनी, निसव लेला, फदी, इश्कबाज, किंवा सुदर चपळ किंवा फटकुऱ्या, गवाळ, भग्क्या, उनाडटप्पू दारुड्या, व्यसनी, लोकातुन उठ लेला, विसाट, छादिष्ट पति बिजवर नवरा माझा कलिंदर राजा।' [अर फा कल्दर=एका पथाचे फकीर]

**कलिंदरा**—वि कलिंदराच्या गुणावगुणानीं युक्त, विषया सक्त बदफैली [अर कलदर]

**कलिंदरा-द्रा**—पु (हिं) १ एक प्रकारचें सुती किंवा रेशमी कापड, कलदरा २ दुहेरी आच्छादनाच्या तवूचें बाहेरील आच्छा दन [अर कलदरा]

**कलिंदरी**—स्त्री कलदराची वृत्ति अथवा अवस्था

**कलिदा-जिवाचा कलिदा**—पु अत्यत प्रिय मनुष्य प्राणप्रिय माणूस [हिं कलिजा-काळीज]

**कलियार**—पु १ जिवलग कठमणि, (मित्र, वस्तु) २ होडीच्या समोरासमोरील बाजू तोलणारी आडवी दांडी

**कलिया**—पु मासाचे खाण्याचे पदार्थ —गृशि २ ९ धने जिरें, शहाजिरें, मिरें, दालचिनी, लवगा वेलची इ० वस्तूचा मसाला वाटून मासाला लावतात व तें रसेदार बनवितात त्याला कलिया, कोरमा, दोप्याजा किंवा सालन अशीं नावें आहेत —गृ २ ५१ [अर कलिया]

**कलियाद-कल्याद**—न (गो) कुलुप, टाळें [पो कादि आदो]

**कलिवर-कलेवर**—न १ शरीर 'जीव आला पायां पाशीं। येथें असें कलिवरेंसीं।' —तुगा ८३४ २ प्रेत 'अन्योन्य व्युगुलहीं राहों दती न धड कलेवर तें।' —मोद्रोण ३ ३२ [स कलेवर तुल लॅ कडेवर]

**कलिशता**—स्त्री किल्मिष खलप किंतु 'माझे मनात आतां कलिशता नाहीं' —रा ५ ८ [फा खलिश् तुल स कलुष]

**कलील**—पु गोळा, मिश्र रास काला 'जन्म सरयावन्हीं। योनि गर्भ कलील पावरी। उकडीजती जठरीं। पूयपकीं।' —ज्ञाप्र २८९ [स कलिल=गोळा]

**कलुली-लोली**—स्त्री घोडा (घोडीसाठीं) किंवा घोडी (घोड्यासाठीं) माजावर येणें, मोगेच्छा तल्फ मस्ती येऊन मारलेल्या उच्या कुल्ली पहा [स कल्लोल]

**कलुष**—न पाप, पातक, दोष 'जन्ममृत्युदु खें। व्याधि वार्धक्य कलुषें।' —ज्ञा १३ ५३५ [स कलुष] —वि (ल) गढूळ, मातट, घाणेरडें, दूषित, खराब, अस्थिर, प्रतिकूल, सशय ग्रस्त 'चित्तवृत्ति कलुष झाली असता श्लेषाची स्फूर्ति कोठून होणार?' —नि ८७७ [स]

**कलुषित**—वि गढूळ झालेलें, मलिन असलेलें, खराब केलेलें, सशयग्रस्त, दूषित

**कलेक्टर**—पु (इं) इग्रजी राज्यातील जिल्ह्याचा अधि कारी

**कॅलेंडर**—न इग्रजी तारीख व वाराचें पत्रक, पचाग, काला दर्श [इं]

**कलेप**—पु कलप-फ पहा

**कलेवर**—न १ मनुष्याचें अथवा पशूचें शरीर (आत्म्याहून निराळें दाखविण्यासाठीं योजतात) २ निर्जीव, अचेतन, प्रेत, शव, रागाच्या बोलण्यात वापरतात 'अझुनी वैरियाचिया कलेवरा। विसबसीना।' —ज्ञा ११ १०५, 'घायीं घायीं किळकिळती एक वेळे। गज कलेवरें पाडिलीं।' —एरुस्व १० ५५ 'एकसरीं केली कलेवरें साटी। आता नका तुटी पायासवें।' —तुगा ९२२ ३ (गो ल) कृश मनुष्य [स कलेवर तुल० लॅ कॅडेवर]

**कलोक**—क्रिवि (ना) कोठपर्यंत, किती वेळपर्यंत, कुठवर 'मी येथें कलोक बसूं?' [कुठल्ग-कुलोग-कलोग=कुठवर]

**कलोड-कल्वड-ड्ड**—पु १ शेण, माती इत्यादि लिंप णानें आच्छादित असलेला सुकलेल्या गोवऱ्याचा ढीग, गज, हा ढीग पावसात भिजूं नये म्हणून त्यावर घातलेलें खोपटासारखें छप्पर २ कांहीं प्रांतात लाकूडफाटा, कडबा, गोवऱ्या वगैरेच्या गजीला म्हणतात हा ढीग शेणमातीच्या लिंपणानें आच्छादिलेला असतो किंवा नसतो 'तमाम शिराचीं नाकें कापून डेरियां पुढें कल्वडाप्रमाणें चौरा घातग' —भाव ७१ 'गोवऱ्याचा मोठा कल्वड लाव' ३ शेणमातीनें लिंपलेला डेरा अगर मडकें (क्रि० बसणें=म्हातारपणामुळें शक्तिहीन होणें परस्वाधीन होणें) माझे हातींचा कल्वडु। मजवांचुनि नको पोहूं।' —तुगा २९९३ [स कल्=सकलन करणें]

**कलोत्तर**—कलांतर पहा

**कल्क**—न पाट्यावर बारीक वाटलेलें द्रव्य वाळलेलें अस ल्यास पाणी घालून यथाप्रमाणें बारीक वाटलेलें औषध —योर १ १७८ वाटून, ठेचून, चचून, दिजवून, खलून गलगलित दळ-युक्त चूर्ण केलेलें औषध ठेवा, 'त्यांत चिंचेचा कल्क टाकावा' —गृशि २ ४४ [स]

**कल्की**—कल्की पहा

कल्केरिया कार्ब—न (होमिओपाथी) मुर्दूस, दात उशिरा येणें, पोट मोठें होणें, व हातापायाच्या काड्या असणें, इ० ल्हान मुलाच्या रोगावर औषध–होमि ३९ [इ ]

कलड–डें—न ( खा ) पायातील किंवा हातातील कडें [स कटक ]

कल्प—पु १ चार अब्ज, बत्तीस कोटी मानुष किंवा सौर वर्षे, ब्रह्मदेवाचा एक अहोरात्र, दिवस, जगाच्या उत्पत्तिलया मधील काळ, चार युगाची एक चौकडी अशा हजार चौकड्या 'मज दास करी त्याचा । सतदासाच्या दासाचा । मग होत कल्प वरि । सुखें गर्भवास हरी । '–तुगा ११७४ 'ब्रह्मदेवाच्या दिवसासच कल्प असें म्हणतात ' –गीर ७३३ ' मना कल्पना कल्पिता कल्प कोटी । नव्हे रे नव्हे सर्वथा राम भेटी । ' –राम ५९ २ धार्मिक विधि, आचाराचें वर्णन ज्यात केलें आहे असें सहा वेदाग पैकीं एक, यात श्रौत व गृह्यसूत्रें येतात ३ विशेष प्रकारात विकल्प ऐच्छिक अथवा विकल्पेंकरून ४ सशय, अदेशा, शका 'मी सर्वस्वें दासी मनीं नको कल्प आणू दुसरा । '–होला ९९ 'काशिराम म्हणे कल्प काहीं ठेवू नको रे । '–हाला १५० ५ निश्चय किंवा उद्देश ६ एखाद्या वस्तुविषयीं एक मुख्य व एक गौण असे दोन पक्ष असतात ते प्रत्येकीं –वि १ –च्या योग्यतेचा, शक्त, समर्थ २ ( समासात ) सारखा, सदृश उ० तृणकल्प, पर्वतकल्प [स क्लृप्=कल्पना करणें ]

कल्पक—वि योजक, नवीन युक्ति, कल्पना, शोध काढ ण्यात हुषार, चतुर, शोधक [स ]

कल्पणें—कल्पिणें पहा

कल्पतरु–द्रुम—पु १ इद्र लोकातील पाच देवतरूंपैकीं एक, एक काल्पनिक वृक्ष, आपण कल्पिलेली कोणती हि वस्तु याच्यापासून प्राप्त होते अशी समजूत आहे ' जयजय देव श्रीगुरो । अकल्प नाल्पकल्पतरो । '–ज्ञा १८ १० ' कल्पतरूची कल्पना वारी । परिसाची निवारी जडत्व कालिमा । ' –एरुस्व ३ १५ 'हे हरि नामाची आविली । । विश्राति कल्पतरूची साउली । –तुगा ३३९ 'मना राम कल्पतरू कामधेनु । '–राम ६० 'धावा कुठार कल्पद्रुमसा हा वर मला वधापाय । '–मोभीष्म १ ८५ 'कल्पद्रुमाचे मादाडे । चद्रकर शाभनी । ' –एभा १० ६०९ २ पुष्कळ फळें देणारे इहलोकातहि कांहीं वृक्ष आहेत त्यास म्हणतात ३ फायदेशीर धदा ४ उदार, सर्वांचे सर्वप्रकारें चाऊ विणारा यजमान ५ माड [स ]

कल्पना—स्त्री १ मन पटावर उमटलेलें चित्र किंवा तत्सबधीं विचार तत्त्ववेत्त्यांनीं या शब्दाचा पुष्कळ प्रकारें अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे –ज्ञाको क १८० एखादी गोष्ट करावी किंवा न करावी याबद्दल मत करण्यात जी विशेष वृत्ति ढळे ती, विचार 'मना कल्पना ते नको विषयाची ' –राम ५ २ योजना, युक्ति, शकल, तोड ' त्या गुप्त कल्पना कोणास कळाव्या । कोणें यऊन आटोपाव्या । ' –दा १९ ८ १८ ३ विवक्षित कार्यसिद्धीसाठीं बुद्धीनें योजलेला उपाय ४ भावना, मनोवृत्ति, समज, ग्रह, कल्पित गोष्ट, मानसिक सृष्टि ५ तर्क, अनुमान, भास ६ उद्देश, बेत, हेतु ७ सशय, शका, अदेशा, भय ' कल्पनेची बाधा नाहो कोणे काळीं । ही सत मडळी सुखी असो । ' –तुगा 'वेदशास्त्र सत चार कल्पना घेती साधुजन । ' –ऐपो ३८९ ८ गृहीत धरणें, मानणें, आधारभूत धरणें 'उपासक उपासनेसाठीं ईश्वरी मूर्तत्वादि कल्पना करितात ' ९ शब्द किंवा वाक्य जुळविण्यासाठीं माडणी, करामत, गोष्टीची रचना, 'पदें जरी ठाऊक असगीं तरी वाक्याची कल्पना करण्यास बोलण्याचा अभ्यास पाहिजे ' १० कला, युक्ति, रहस्य ( कल्पक योजनेचें ) जुळविण्याची किंवा करण्याची योजना ११ मनात उठलेले तरग, विचार लहरी [स क्लृप्] ०पूरित–वि कल्पनेचा भरपूर विलास असलेलें ' पाखरास व हालल्या पिंपळ पानास –या कविता कल्पनापूरित आहेत ' –गोविंदाग्रज (हर्षेकृत). ०बाज–वि तर्के, अनुमान करण्यात हुशार, वस्ताद, नवीन नवीन युक्त्या काढणारा, तर्कबाज, सुपीक डोक्याचा [स कल्पना+फा बाज] ०रूप–वि कल्पित, मानीव, कल्पनामात्र, अवास्तविक, ज्यात खरें असें काहींच नाहीं असें (प्रपच, ससार, सुखदु ख, देह, सपत्ति, सृष्टि याविषयीं योजतात) ०वाद–पु नवीन कल्पना, युक्त्या, सारणी, तर्क, तोड काढण्याची किंवा बाधण्याची शक्ति, कल्पना कर ण्याचें मनाचें सामर्थ्य, बुद्धिसामर्थ्य, भावनेचा जोर ( इ ) आयडिआलिझम् ०शक्ति–स्त्री शोधक बुद्धि, तर्कशक्ति, कल्पनेनें जाणण्याचें सामर्थ्य ०साहचर्य–न ( मानसशास्त्र ) एखाद्या वस्तूचें प्रत्यक्ष ज्ञान झालें असता त्यामुळें मागील अनुभवाचें स्मरण होतें ती क्रिया, हें साहचर्य तीन प्रकारचें आहे–सान्निध्य, साम्य, विरोध –ज्ञाको क १८० [म ] ०सृष्टि–स्त्री कल्पनेनें रेखाट लेलें चित्र वस्तु वस्तुत जागेवर पदार्थ नसताहि अत करणानें अनेक कल्पना करून स्वप्नमनोरथादिरूप रचिला जो प्रपच ती, कविकल्पित, चमत्काराचह अद्भुत गोष्टी ०सृष्टिप्रिय–वि कल्पनासृष्टींत रमणारा ( इ ) आयडियालिस्टिक [स ]

कल्पनीय—वि मनात आणण्यास, तर्क करण्यास, शोधून काढण्यास, गृहीत धरण्यास योग्य किंवा शक्य [स ]

कल्पवृक्ष—पु ( गो ) कल्पद्रुम, कल्पतरु पहा

कल्पलता—स्त्री कल्पतरु पहा ' परि ते वाचाचि करीं कल्पलता । विवेकाची । ' –ज्ञा १० २०

कल्पवर—क्रिवि कल्पाच्या अतापर्यंत कल्पांतीं, सृष्टीच्या अतापर्यंत, महाप्रलय होऊन सर्व सृष्टीचा नाश होईपर्यंत सृष्टीच्या आयुष्यभर [कल्प+वर]

**कल्पवृक्ष**—पु कल्पतरु पहा मदार पारिजातक, संतान, कल्पवृक्ष, हरिचंदन या पाच देवतरूंपैकी एक 'फळे कल्पवृक्षु जैसा।' –ज्ञा ४ २१६ 'की कल्पवृक्ष शोधित आला धर।' –रावि १ ४८ 'कल्पवृक्षाखालीं बसुन झोळीस गाठी कां बांध्या ?' 'कल्पवृक्ष अगणीं देख। तो कासया मागेल भीक।' [स ]

**कल्पांत**—१ कल्पाचा शेवट जगाचा अंत ज्यावेळीं होतो त्यास कल्पांत प्रलय असें म्हणतात–तोहि एक कल्पपर्यंत राहतो ब्रह्मदेवाच्या अहोरात्राचा शेवट 'कुपितें कर्णे केली कल्पांतीं जेंवि घावरी सृष्टि।' –मोकर्ण ४७ १२ २ भयंकर सकट अनर्थ या शब्दाचे अर्थ १, ७ पहा ३ (ल ) परमावधीचें दु ख, आकांत, कल्लोळ (मूक तहान ,रुदन, रोग, दु ख विरह इ०चा) [कल्प+अंत] •काळ–पु १ विश्वाचा अंतकाळ, प्रलयकाळ २ (ल ) अतिशय, भयंकर, क्रूर माणूस, भूत, राक्षस

**कल्पांतरीं–कल्पांतीं**—क्रिवि १ (काव्यांत) (अकरणात्मक, नास्तिपक्षी रचनेंत ) केव्हांहि नव्हे, जगाचा नाश होईपर्यंतहि नव्हे २ नास्तिपक्षी रचना नसतानाहि, नेहमीं, सदोदित, सृष्टीचें अस्तित्व आहे तोंपर्यंत जगाच्या अंतापर्यंत [ कल्पांत ]

**कल्पांतरीं**—क्रिवि एक सपल्यानंतर दुसऱ्या कल्पामध्यें [स कल्प+अंतर ]

**कल्पांतवरीं**—क्रिवि जगाच्या अंतापर्यंत 'तो पडेल अघोरीं। कल्पांतवरीं पतित।' –मोल

**कल्पादि**—पु. कल्पारंभ कल्पास ज्या दिवशीं आरंभ झाला तो दिवस, ब्रह्मदेवाच्या दिवसाचा प्रारंभ 'तें हें ज्ञान कल्पादीं। चतु श्लोकपदबंधीं।' –एभा १ १४५ [स कल्प+आदि]

**कल्पिणें**—उक्रि १ विचार करणें, कल्पना करणें वाटणें, अनुमान करणें २ योजणें मनांत आणणें (बेत, युक्ति, शक्कल) ३ मनन करून रचणें, जुळविणें, बनविणें मनोमय तयार करणें, शोध लावणें ४ कल्पना करणें, तर्क करणें अनुमान, अजमास बांधणें 'हा जीवु ना नोहे। लोक कल्पी यणें भावें।' –ज्ञा १३ ११५ ५ मनन चिंतन विचार करणें, विचारांत मग्न असणें ६ गृहीत धरणें, मानणें [स कल्प्]

**कल्पित**—वि मानलेलें, वाटलेलें, कल्पिलेलें योजिलेलें रचलेलें युक्तीनें बसविलेलें, नवीन शोधून काढलेलें, जुळविलेलें खरें नव्हे तें •कादंबरी–स्त्री (करमणुकीचा ग्रंथ ) कल्पनेनें रचलेली खरी नसलेली गोष्ट अवास्तविक कथा [स ]

**कल्पिता**—वि कल्पना करणारें ( मन ) 'हेंचि कैल्पावें तरी जाणिजे। परी आदा कल्पितें कैंचे आणिजे।' –ज्ञा ६ ३७७

**कल्पे झाडणें**—क्रि (व ) मारणें

**कल्मी**—वि मध्यें असलेला 'कल्मी कांगी' =मधली डोळकाठी –बाडमा १ ३३६ [अर कल्ब्=मध्य, अंतरंग ]

**कल्मष–ष**—न १ चिखल, राड, रेंदा, कोणत्याहि मळ, घाण २ पाप, अंत करणांतील दुष्ट विचार 'या कल्मषाची थोरी। सांगन तुज।' –ज्ञा १ २४२ 'त्वद्दर्शनें कल्मश सर्व गेलें' –नरहरी गंगारत्नमाल ३० ( नवनीत, पृ ४१९ ) [ स ]

**कल्मा**—कल्मा पहा

**कल्या**—स्त्री (कुल्या भप ) नदी घृतकल्या मधुकल्या या समासांत योजतात

**कल्याण**—न १ क्षेम कुशल शुभ चांगलें, बरें हित, फायद्याची गोष्ट 'चित्तीं धरी जा हे बोल। त्यांचें कल्याण होईल।' २ गायनातील एक थाट, राग राग पहा यांतील स्वर शुद्ध षड्ज, शुद्ध ऋषभ शुद्ध गांधार, तीव्र मध्यम, शुद्ध पंचम शुद्ध धैवत व शुद्ध निषाद कल्याण गौडी श्रीराग। मुरलींत आळवी श्रीराग' –ह १० ११७ दीप भूप कल्याण तू गाता प्रकाश साऱ्या स्थळीं पडती।' –प्रला १३७ ३ श्रीसमर्थ रामदास स्वामींचा पट्टशिष्य, याचें मूळ नांव अंबाजी, गांव डोमगांव हा ब्रह्मचारी होता समर्थांनीं सांगून यानीं दासबोध लिहिला (यावरून लक्षणेनें ) पट्टशिष्य 'केसरीकारास रावबहादुराचा मत्सर झाला आहे इत्यादि कांहीं कुत्सित कल्पना रा. ब च्या कल्याण शिष्यानें काढल्या' –टि ४ ४ ४ (द्राविड ) लग्न 'शके १६०४ मध्यें लक्ष्मीनारायण कल्याण नांवाचें एक मराठी नाटक तंजावर येथे रचलें गेलें 'यणें रीती नाट्यारंभ करून लक्ष्मीनारायणकल्याण नाटक निर्विघ्नसिद्धि सर्व जनांस संतोष देवो' –प्रगमाला

**कल्याणडु**—उद्गा (ना ) ( मुलांच्या खेळांतील ) डाव बुडाला नाहीं असें दर्शविणारा एक सावधगिरीचा शब्द

**कल्याणथाट**—एका थाटाचें नांव अनेक रागजनक कल्याण नावाचा स्वरसमुदाय कल्याण अर्थ २ पहा

**कल्याणी**—स्त्री १ (ज्योतिष ) भद्रा नांवाचा एक योग याचा काल अर्धी तिथि अथवा एक करणाइतका असतो व दर साडे तीन तिथि अथवा सात करणानंतर तो पुन्हा येतो म्हणून प्रत्येक सातव्या करणास भद्रा असतात 'व्यतिपात वैधृत कल्याणी हे तव कुयोग असे' –होरा ४१ ७ २ एक रागिणी –वि कल्याण नांवें ( तांब्या वगैरे पात्र ) [ स ]

**कल्याद**—न (गो ) कुलूप कलियाद पहा

**कल्ल**—वि (गो ) पोकळ

**कल्लँ**—न (गो ) साल, टरफल

**कल्लँ–ल्ली–ल्लें**—नस्त्री (गो ) कुंभागरास पाणी देण्या साठीं कळेंबें लाकडाचें लांबट पन्हळासारखें पात्र कल्ली पहा

**कल्ला**—पु १ गुलमिशा, गालावरील केसाचा झुपका, काप २ कोंबडयाचा तुरा, डोक्यावरील लाल मासल भाग [स गल्ल? हिं, फा कल्ल=गाल]

**कल्ला**—पु घोडयाचा एक रग, सर्व शरीर लाल परतु त्यात जर्दा रग मिश्र असून आयाळ व शेपटी काळी आणि पाठीवर सैली अशा रगास म्हणतात —अश्वप १ २९

**कल्ला**—पु (ध्वनि) गलबला, ओरड, गोंगाट, गोंधळ, कल्लोळ [ध्व स कल्]

**कल्लावर्चे**—सक्रि (गो) सोलणें [गो कल=सालपट]

**कल्ली-ल्ले**—स्त्रीन (गो) वाग शिपण्याचें साधन करली पहा

**कल्लोल-ळ-कल्होळ**—पु १ पाण्याची लाट, लहर, मोठी लाट 'तें आणिकें म्हणती वेगळें। कल्लोळ हें।'—ज्ञा ५ १०० 'पाणी कल्लोळाचें मिसें। आपणपें हेलावे जैसें।'—अमृ ७ १३५ 'कैसा गुरु कर्णधार कुशळ। आवर्त खळाळ आदळ। चुकवूनि विकल्पाचे कल्लोळ।'—एमा २० १७७ २ आगीचा डोंब, लोळ, ज्योत, जोराचा झोंक ३ दर्याचा गलबला, कलकलाट, आरडाओरड, गर्जना 'गवेषण राजा रणकल्लोळीं। घेईल समफळी यादवासी।'—एरुस्व ९ ६३ 'हरिनामें पिटोनि टाळी। कीर्तनकल्लोळीं गर्जती।' ४ (ल) आधिक्य, अतिशयितता, अत्राढ्यता 'होती दु खाचे कल्लोळ'—रामदास (नवनीत पृ १४८) [स]

**कल्हई-ल्हे, कल्हय**—स्त्री १ कथील व नवसागर यांचें मिश्रण करून स्वयपाकाच्या ताब्यापितळेच्या भाड्यास जो लेप करतात तो, व तो देण्याची क्रिया २ मुलामा, पातळ वर सोन्याची कल्हई अथवा रुप्याची कल्हई=दागिन्या वरचा मुलामा—सोन्याचा अथवा रुप्याचा ३ भिंगामध्यें प्रतिबिंब दिसावें म्हणून त्यास जो पाऱ्याचा लेप देतात तो आरशाच्या मागील पाऱ्याचा लेप, मुलामा 'आरसे आहेत ज्याची कल्हई उडाली असेल व पालखीस लागू होत असे असतील ते हुजूर पाठवावे'—रा १२ १४२ [अर कल्ई=कथील] ०करणें—क्रि १ झिल्ई, पातळ हात, लेप देणें, चकचकीत करणें, वरच्या अगानें चकाकी आणणें २ (ल) सावरासावर करणें, वाईट बाजूवर पाघरूण घालून चागली बाजू पुढें माडणें एखाद्या गोष्टीस वरवर चागलें स्वरूप देणें ३ उगीच उपद्व्याप करणें, उद्योग, स्तोम माजविणें फुगविणें (साधारण दुखापत वगैरेचें) ४ (विनो दानें) पुरणपोळींत पुरण वगैरे थोडें भरणें, ०चा—वि १ ज्याला कल्हई केली आहे असा २ (ल) वरवर घुतलेला, किंचित उजळ केलेला, चकचकीत केलेला ०कर-गर-गार—पु भांडयाकुडयाना कल्हई लावणारा [अर कल्ई=कथील+फा गर (म कर)] ०करप—(गो) (ल) सारवासारव करणें

**कल्हई**—स्त्री (काहील किंवा काईल अप) कढई, उसाचा रस कढविण्याचें पात्र [स कटाह]

**कल्हमा**—पु (व) गोंगाट, आरडाओरड [अर कल्मा]

**कल्हातणें**—अक्रि कल्हून पडणें—पाडणें 'का वाटे जाता बोंघे। कल्हाताही डोळा लागे।'—ज्ञा १४ १८८ [कल्हणें]

**कल्हार**—पुन (प्र कह्लार) १ पाढरें कमळ, याचें बीं खातात 'कल्हाराचिया मोहटिआ'—शिशु ७६६ २ (ल) हृदयकमल 'कल्हारीं जिवाचिये।'—भाए ४५३ 'सवर्म हृदयकल्हारीं। तेथ कारुण्यवेळेच्या भरीं।'—ज्ञा २ ७१ 'सर्पाचिया परी। विषें भरला कल्हारीं।'—तुगा २१७७ [स]

**कल्हे-गर-गार**—पु, मुलामा, कल्हई पहा 'लावू जाणे विल्हे तुकासाच आणि कल्हे!'—तुगा ६२५

**कल्हो-ल्हो**—पु कल्ह पहा 'कल्हो लागला पडितापडि ताला।'—दावि ३९४

**कल्होड**—पु (दे) कालवड —देशीनाममाला

**कल्होळ**—पु कल्लोल पहा 'श्वेत चामरें छत्रें डवळ। जेवीं कल्होळ लहरींचे।'—मुविराट ८ २७

**कल्होळणें**—अक्रि आरबळणें, ओरडणें, दु खानें रडणें, विव्हळणें [कल्लोळ]

**कव**—स्त्री १ मिठी, वेंघ, विळखा, वेढा, वेंग, वेंख, खेव, हस्ताग्राशीं हस्ताग्र मिळवून मध्यें होणारी पोकळी 'महा कल्पा परौती। कव घालूनि अवचिती।'—ज्ञा १३ ६१ हें झाड माझ्या कवेंत मावत नाहीं ''कव मारिलि अवदुल्लयानें'—ऐपो १९ 'सोडा कवेंतून मला घेउद्या जरा विसावा तरी'—प्रला १९८ २ मासे धरण्याची जाळीं समुद्रात ज्या डावाना बाधतात त्या डावानीं व्यापली जाणारी जागा ३ (ल) मडप, ठडी 'करिता आठव। धावोनिया घाली कव।'—तुगा २५२१ 'सहस्रार्जुनानें कव घालून। ग्रीवेशी धरिला दशवदन।'—रावि २ १२३ 'वरी माजरें कव घातली।'—गीता १ २१४५ ४ आक्रम, आकलन (उघडून विस्तृत केलेलें तोंड, कानीचीं दोन पातीं, मन बुद्धि वगैरेचें क्षेत्र ५ (वि) फार मोठी चीज वेशुद्धि ०घालणें—क्रि १ मिठी घालणें, मारणें, झडप घालणें 'कणी धराया पातें त्या भरिला घालुनि कव चपट्याला'—मोकर्ण १४ ६५. २ (ससारास किंवा कामास) आवडीनें, हौसेनें मनात थारा देणें, आस धरणें, दृढ इच्छा करणें 'रुक्मिणी अति सत्वर पातली। चरण सप्रमनीं कव घातली।'—किमुदा २८ [स क्षेम-म खेव-कव?]

**कवइता**—पु कवन करणारा, कवि [स कु]

**कवकवित**—वि १ पाणचट, वेचव, निचव, पचपचीत २ (गो) टवटवीत

कथकचित यासारख्या शब्दात कवबद्दल की असें पुष्कळ ठिकाणीं वापरतात की पहा

**कवच**—पुन १ कठिण आवरण, बाह्य आच्छादन, फळाची जाड साल, कठिण त्वचा २ चिलखत, अंगत्राण, शरीराचें संरक्षण करणारें एक प्रकारचें पोलादी किंवा चामड्याचें वगैरे साधन 'जैसें वज्र कवच लेइजे। मग शस्त्राचा वर्षावो साहिजे।'—ज्ञा २ २३२ 'गोवळीं यश नेलें अमुचें। म्हणोनि कवचें बाणलीं।'—एरुस्व ८ १० ३ (ल) कोणतेंहि आच्छादन, आवरण, रक्षणसाधन 'अग्नि ऐसें आह्वाच। तेजा नामाचें आहे कवच'—ज्ञा ७ ३६ 'नातरी सर्पें कवच साडिलें'—ज्ञा ८ ६६ ४ झाडाच्या सालीवर अगर कागदावर मंत्र किंवा तोडगा लिहून हातात अगर अगावर धारण करतात तो ५ मन्त्रातील ऱ्हा, ऱ्हीं इत्यादि बीज अक्षर ६ मारुती अगर देवी याच्या मूर्तीवरील शेंदुराचा थर हा काहीं दिवसानीं सुटून पडल्यास देवानें कवच टाकलें असें म्हणतात ७ टणक आच्छादन, टरफल, कठिण त्वचा 'अड्यावरील कवच' [स] ०टाकणें—कि १ कात टाकणें (सापानें) 'नातरी सर्पें कवच साडिलें।'—ज्ञा ८ ६६ २ (ल) पुनरुज्जीवन होणें, नवा उत्साह येणें, दुखण्यातून उठणें ३ मूर्तीवरील शेंदुराचा लेप, थर पडणें ०कुडरी-ली, ०कुहिरी-ली—स्त्री काचकुइली, खाजकुइली कुडरी ०धर वर्ग-वाशी—वि गोगलगाय, खेकडा, शेंवडे, झिंगे, कासव या वर्गातील प्राणी सधिपाद प्राणी ह्यातील बहुतेकाना झिंगासारखे चार अवयव व दहा पाय असतात छाती व डोकें मिळून एकच भाग असून मागें पोट असतें पाठीवर कवचासारखी कठिण कातडी असते ०बीज—न खाजकुइरीचें बीं, हें औषधी आहे

**कवचा**—पु (व) गवड्याची करणी, थापी (ना) मोठा चमचा

**कंवचाळ**—न वर्तुळाकार बसलेल्या माणसाचा घेर, वर्तुळ, घेरा (क्रि घालणें, बसणें, जमणें,) [कवच]

**कंवची**—स्त्री १ (कों) उडलेला किंवा फुटलेला ल्हान तुकडा, कपची २ अड्यावरील कठिण पापुद्रा, आच्छादन विशे षत अर्धा भाग किंवा तुकडा ३ डोक्याची कवटी, नरटी ४ कपाळ ५ नारळाची अर्धी करवटी, भाग ६ (गो.) काचेचा तुकडा

**कवट**—स्त्री (कों) वेंग, कव पहा

**कंवट**—न (कों) कोंबडीचें अडें ०गाळणें—कि धीर सोडणें, भयानें गागरणें, घाबरणें ०भावलें—न (कु) पिशाच बाधा काढून टाकण्याकरता पिठाचें बाहुलें, कोंबड्याचें अडें व एक दिवा अगावरून काढून बाहेर नेऊन टाकतात तें [कवट+बाहुलें]

**कंवटल-ळ-ल्य-टाल-ळ**—न १ जारणमारणादि प्रयोग, कुयेडे, चेटूक 'केलीं नाना कवटाळें। पुत्रलोभें केलीं हाळें।' —दा ३ ३ ४५ २ कुभांड, डावपेंच, खोटें नाटें करणें, कृत्रिम, लबाड, तुफान, कारस्थान 'राणीचा एवढें कवटाळ रचण्यातला जो उद्देश तें मात्र बिलकुल झालें नाहीं'—नि ५२९ [स कुट=वाकडा, कौटल्य=कपट]

**कवटा**—पु (ना) वेंग, कव पहा

**कंवटाळी-ऱ्या-ळ्या-ळी**—वि १ कवटाळ करणारा, चेटक्या २ कुभाडी, तुफानखोर, डावपेंच करणारा [कंवटाल]

**कंवटाळणें**—उक्रि १ मिठी मारणें, आलिंगन देणें, कवेंत धरणें 'अभिस्तम बाही कवटाळविती।'—तुगा ७०२ २ भोंवतें लागणें, आश्रय घेणें, भोंवतीं धरणें, वेढणें (वेलींनीं झाडा दिकास) ३ आत घेणें, स्वीकारणें, मित्रभावानें दाखल करणें ४ कवेत घेणें (देश वगैरे) ५ (ल) आत येणें, जाणें, असणें ६ समजणें, बुद्धीनें आकलन करणें (एखादा विषय) [का कट्टा हिंदु, ? स कव]

**कंवटाळी**—स्त्री मिठी

**कवटाळीण**—स्त्री चेटकीण, जादुगारीण [कवटाल]

**कवटी**—स्त्री (कों) मिठी कव पहा

**कवटी**—स्त्री (कों) अड्याचें कवच, नारळाची नरोटी, माणसाच्या डोक्याचें हाड

**कंवटील-ळ-टिल्य**—न कवटल पहा ०मंत्र—पु कव टल पहा

**कंवटें**—न अड्याचें कवच

**कंवठ**—स्त्री एक फळझाड हें दमट प्रदेशात होतें झाड मोठें असून याच्या फळास कवठ म्हणतात हें फळ वाटोळें असून याच्यावरील कवच कठिण असतें हिरव्या कवठाच्या मगजाचें सार आणि पिकलेल्याचा मुरबा करतात —वगु २ ३० कवठ हत्तीस फार आवडतें पाल्याचा रस पित्तविकारावर उपयोगी आहे झाडा पासून उत्तम गोंद निघतो —कृषि ७६८ —स्त्री २ आणिक एक निराळें झाड, याचें फळ कवठासारखेंच असतें परंतु हें फळ कडू असतें म्हणून खात नाहींत याच्या बिया सुपारीएवढ्या असतात व त्याचें तेल काढतात तें खरजेवर औषधी आहे हें झाड कोंक णात होतें —न (कोंबडीचें) अडें [स कपित्थ, प्रा कवित्थ, कपित्थ–कविट्ठ–कवीठ–कवठ–रा प्रथमाला हिं कैथ] —ठाचा तटू—पु (व) कवठाची चटणी

**कंवठाळी**—वि (गो) कारस्थानी [कवटाल]

**कवंठी**—स्त्री कवठाचें झाड

**कवटी**—स्त्री मस्तकाची कवटी

**कवठेल**—न कडू कवठाचें तेल हें तेल कवठें काढून ठेवून तीं पधरा दिवसानीं पिकल्यावर फोडून बिया रासेंत कालवून रास करून ठेवून चार-सहा दिवसांनीं काढतात [कवठ+तेल]

**कंवठ्याल**—न (कु) कवठेल

**कवड**—स्त्री १ (कों) फोडलेल्या नारळाचा अर्धा भाग 'शुद्ध सत्वाचा कवड मोठा। बोध बिरडें बाधला गाठा।'–तुगा ४४४६ [स करोटी]

**कवडपट्टा**—पु (व) कवड्याची गुफिलेली माळ [कवडी+पट्टा]

**कंवडल-ळ**—स्त्रीन १ कडू वृदावनाचा वेल व फळ याचें पान खरखरीत व सुरकुत्या असलेलें असून त्रिदली असतें फळाचा रग पहिल्यानें हिरवा व पिकल्यावर तांबडा होतो हें फळ कडू असतें –वगु २ २१ २ (ल) (हें फळ वरून सुदर दिसतें पण अतर्भाग काळा असुन कडू असतो म्हणून वर चागल्या दिसणाऱ्या परतु अत करणाच्या दुष्ट मनुष्यास यानी नेहमीं उपमा देतात) मत्सरी, दुष्ट, नीच, द्वेषी माणूस ३ (कों) नारळाचें बेलें [स कमडलु]

**कवडसा, कडोसा**—पु १ खिडकींतून, दरवाज्यातून, छपरातुन अथवा एखाद्या फटींतून पडलेले प्रकाशाचे किरण अथवा परावर्तित प्रकाश 'सूर्य जयाचेनि उजाळे। कवडसेनि' –अमृ २ २३ 'झाडाच्या सावलींत लाव लाव उन्हाचे कवडसे पडले म्हणजे लावच लाब प्रकाशस्तभ दिसत'–पान्द ४९ २ रात्रीच्या वेळीं पलग, मनुष्य, दिवा अथवा एखादा पदार्थ याची त्याच्या जवळच पडणारी छायाकृति

**कवडा**—पु एक पक्षी, कपोत, होला, होल्गा, हा अनिष्ट सुचक समजतात हा घरात शिरला असता कपोतशाति करतात 'जळीं तळपताचि मासा। कवडा झेलूनि ने आकाशा।'–एभा २२ ७२८ 'हा न भला बुडवाया शिरला या राजमदिरीं कवडा।'–मोसभा ४ ७७ [स कपोत]

**कवडा**—पु १ मोठी कवडी 'आयुष्याचे तीन कवडे। विषयाचें घाडें कदा न करी।'–एभा ३ ५६१ 'जैसा वेश्या भोगीं कवडा वेंचे। मग दारहि चेपू न ये तियेचें।'–ज्ञा ९ ३२९ 'पुसता पोरवडा। घरीं न कवडा चित्तीं धरा नीवडा।' –आप्र ४९ 'नेदी फुटका कवडा। चोरीं घातला दवडा'–दावि २८४ २ (ल) डोळ्यावर येणारा सारा, डोळ्यांतील फूल, कवडी ३ विसुरलेले, विस्कळित मेघ, ढग ४ (चाभारधदा) गिरणींतील साच्यास लागणारें कातडें ५ दह्याचा किंवा नासलेल्या दुधाचा घट्ट व कापता येणारा गोळा, गाठ, गठळी 'दुधीं कांजीचा थेंबू पडे। तेणें दुधाचे होती कवडे।'–भारा १० ६७ [स कपर्दिक] ०मिरविणें–क्रि निशाणी, चिन्ह लक्षण दाखविणें, खेळणें (दवीचा भुत्या किंवा आराधी दवीचा अलकार म्हणून आपल्या गळ्यांत कवड्याची माळ घालतो दावरून) कोणत्याहि गोष्टीचें वैभव मिरविणें 'आपले कवित्वाचा कवडा। मिरवी सज्जन सभेपुढें।' ०गहूं. कवड्या गहूं–पु एकप्रकारचा गहू खपल्या गहू पहा

**कवडाशा**—पु एक जातीचा मासा

**कवंडाळ**—न कवटाळ, कपट, चेटूक पहा 'कांहीं तरी कवडाळ करतें'–नामना ८४

**कवडी**—स्त्री १ कपर्दिका, समुद्रातील एका जलजतूच्या शरीरावरील कवच याचा चलनाकडे उपयोग होत असे एका पैशाला ६४ किंवा ८० कवड्या मिळतात तीन प्रकारच्या कवड्या असतात–दही, सगुणी व भवानी 'हातीं कवडी विया दवडी' 'शख सिंपी धुला कवडे। आधीं त्याचें घर घडे।'–दा ९ ७ ५ 'परिखळ जन हे नेदिती कवडी तेही'–श्रीधर (नवनीत पृ ४४४) २ हाताच्या पायाच्या नखावर जो पाढरा ठिपका असतो तो ३ विटीदाडूच्या खेळातील एक शब्द ४ कवडा अर्थ ५ पहा ५ रशीमकाठी वस्त्राच्या काठाची विणकर विरळ झाली असता त्यात उभ्या ताण्याचे दिसणारे पाढरे ठिपके अश ६ डोळ्यातील फूल वडस ७ चलनाचा अत्यत अल्प अश ८ सर्पाच्या अगावरील पाढरे ठिपके ९ (उपहा) दात, कवळी? १० बुबुळाशिवाय डोळ्याचा पाढरा भाग ११ कवडीचें झाड, हें लहान असुन यास पाढरीं फुलें येतात याचा तापावर उपयोग होतो १२ फोडपलेल्या गव्हाच्या ताटातील कणस १३ मुसलमान लोक दाढीचा जो भाग कधींहि काढीत नाहींत तो, अल्लाचा नूर १४ दह्याचा घट्ट गोळा, गाठ, गठळी [स कपर्दिका, प्रा कवड्डिआ=कवडी, हिं प कौडी] ०कवडी सांठविणें–क्रि चिक्कूपणानें पैशाचा साठा करणें ०उलटी पडणें–क्रि फासा किंवा डाव उलटा पडणें, गोष्ट अगावर येणें ०किमतीचा–वि निरुपयोगी, कुचकामाचा ०चा खेळ–पु टीदाडूच्या खेळातील एक प्रकार ०चा माल–पु १ अगदीं कमी किमतीचा माल २ (ल) तुच्छ पदार्थ, कुचकामाचा ०टक–चुंबक–पूत–वि चिक्कू, कृपण, कजूष (मनुष्य) 'कवडीचुबक आहे' 'दोघेही सुगम कवडी चुबक।'–विवि ८ ११ २०७ ०बाज–वि चागल्या प्रकारें कवड्या खेळणारा ०मोल–वि अगदीं कमी किमतीचा, क्षुल्लक दर्जाचा 'एका मार्गांतील पुष्कळ बाटाहेही दुसऱ्या मार्गांत कवडीमोल ठरतात' –टि ४ १२०

**कवडी**—स्त्री काटक्याचें कवाड, कवाडी [स कपाट=कवाड]

**कवडेफाक**—पु (कों) एक प्रकारचें गवत, एक पालेभाजी, हिचीं फुलें बारीक, पांढरीं व पाख्यांसारखीं असतात

**कवडे लोभाण**—पु. कवड्या ऊद, जाळण्याचा एक प्रकारचा धूप

**कवडेसाळेर**—पु (गो) एक जातीचा पक्षी

**कवड्डी**—पु (माळवी) हुतुतूचा खेळ यांत हुतुतु असें न म्हणतां कबड्डी, कवड्डी असें म्हणतात [ध्व]

**कवड्या ऊद**—पु धुपाची पांढरी जात कवडेलोभाण

**कवड्या-घणस-घोणस**—पु घोणस, सापांतील एक जात, याच्या अंगावर टिपके असतात

**कवड्या लिंब**—पु लिंबाची एक जात

**कवड्या साप-सर्प**—पु अंगावर कवडीसारखे टिपके असणारा साप

**कवण**—प्रश्ना (काव्य) कोण? काय? कोणता? कोणीहि 'जेणें उसळलें कालकूट। धरी कवण।'—ज्ञा १ ८९ 'त्या द्वीप देय वीर्यें न सुर नरामाजीं सांपला कवण।'—मोकर्ण ९ २३ 'ऐसा कवण नाहीं भाडला।'—ऐपो ८९ 'पक्ष नमुनी सर्वथा पराधीन। कवण ऐशी वाढवी हरीविण।'—विक १४ [स क नु, क पुन] **कवणीकडे**—क्रिवि कोठेंही 'का महाप्रळयींचें तेज वाढे। तैसें आपणेंनवीण कवणीकडे। नेदीची उरों।'—ज्ञा ११ १९४ **कवणीया**—कोणत्या, कोण्या 'कवणीयापरि न निर्वचे।'—विनि ८४५ **कवणियाचा**—कोणाचा 'कोण तू गा कोठील कवणियाचा'—र २४ **कवणु**—कोण 'वाणी कवणु जाणें।'—दाव ७ [स क पुन—कउण—कवण—कोण—राभाअ १८३३] **कवण्या**—कोणत्या? 'विश्वोदर तू तुला महावा पट कवण्या हातीं'—विक २ **०गुणें**—क्रिवि (काव्य) कां, कशामुळें, कोणत्या कारणासाठीं 'का माझा विसर पडला मायबाप। सांडियेली कृपा कवण्यागुणें।'

**कवणी**—स्त्री सुतार नावाचा पक्षी

**कवणें**—उक्रि १ रचणें (ओवी, श्लोक, भाषण, भय, कविता) जुळविणें, कवन करणें 'मग कोण कवी न कवी कविता।'—लीलावती 'सुवर्णी जो वर्णी वद कवण वर्णी कवयिता'—र ११ २ (गो) गोळा करणें [स कु—कवन]

**कवणें**—क्रि (गो) आलिंगिणें, कवेंत घेणें कव पहा

**कवणें**—स कोणी 'प्रपच कवणें निर्मिला।'—विपू २ १०१

**कवतिक-तीक-तूक**—न (काव्य) कौतुक, नवल आश्चर्य लीला 'एन्हवीं एरही तुरतीं मूतळीं। कवतिका लागीं।—शिशु ७०२ 'आता अर्जुना आणिकही येक। सांगेन एकें कवतिक।'—ज्ञा २ ३०३ 'भणोनि तें वाणिता कवतिकें। वाचे सीरसु न देखे।'—ऋ ३८ 'एकु घरा नेउनि कवतिकें पञ्जरा घातला'—पच ५१ 'अवधारिजे कवतीक'—उषा २८११ 'रामकृष्णें केलें कवतुक गोकुळीं। गोपाळांचें मेळी गाई चारी।'—तुगा १६ [स कौतुक]

**कवंद-दी**—स्त्री १ (राजा) रापली, सालपट, पापुद्रा (जमिनीचा, गिलाव्याचा, पोतेराचा) वाळलेला पोव, पुळी. २ (बे) वाकळ, गोधडी [का कदी=वाकळ]

**कवदर-रीं**—स्त्री चवेणी व तिचें पान रानकेळ पहा

**कवदो**—पु (गो) टेंभा

**कवन**—न कविता, काव्य, पद्य, गाणें त्याची जुळणी. 'स्तवन करी रघुनाथ तयाचें। कवन स्वीकारावें'—र ४२ २ (कु) कल्पित गोष्ट [स]

**कवयिता**—पु कवि, काव्यकर्ता 'सुवर्णी जो वर्णी वद करण वर्णी कवयिता।'—र ९२ [स कु—कवणें]

**कवल-करार**—करल व सत्तावद्ध शब्दासाठीं कौल पहा

**कवल-ळ**—पु तोंडांतील घास 'न बळ प्रेक्षी परि यति हस्तींचा पाहतां गळे कवळ।'—मोकृष्णविजय ८६ १२ 'शिष्य श्रवणीं कवळ भरी। उद्गार वचनें।'—दा ५ २ १७ [स कवल=ग्रास, तुल हिब्रू कभोम्हन=अन्न]

**कवल-ळ**—स्त्री मिठी 'घालु दे कवळ वेंस ये अवळ तुला मैतरणी।'—प्रला २०८ [कव]

**कवल-ळ**—न (कों) भातशेतीची जमीन भाजण्यासाठीं ऐन, किंजळ, साग, बेहडा इत्यादि झाडांचे जे टाळे तोडून ठेवतात ते राब (क्रि० तोडणें, लावणें, भाजणें, जाळणें) 'कवळ तोडावयासी मजुरी असामी वीस एकून आकार पोटासुद्धा दर माणेप्रमाणें'—मसाप २ २ ६५

**कवला-फोड, ल्सलशीत, कवलार-रू, कवलाघण, कवली, कवलुं**—कौ खालीं पहा

**कवलिता**—वि रक्षणकर्ता, रक्षक [स. कवल]

**कवसरी-ली-कुहिरी-ली**—कवचकुहरी पहा 'भुईकोहळे पाच शेर आणि कवसकुहिरीचें बी पाच शेर एकत्र करून त्याचें चूर्ण करावें'—अश्वप १ १३९

**कंवसाल**—न कुभांड, कपट, कवटाळ, किंगाळ, बदनामी करणारें कपटजाल जादु, युक्ति 'कृष्णें कवसाल केलें।'—रास २ ६४५ [स कौशल्य?]

**कंवसाली-ल्या**—वि कवसाल करणारा, चेटका, कपटी

**कवळ**—न (कों) टाळे, शिरडीं, शिरीं कवल-ळ २ पहा **०काठी**—स्त्री १ राब २ झाडपाला, हलक्या काट्या, काड्या, शिरीं, शिरकाठीं वगैरे कवल-ळ पहा

**कवळ**—पु १ घास, कवल-ळ अर्थ १ पहा 'मुखींचा कवळ मुखींजाण। मनें ध्यान लागलें।'—एभा १२ ११२ 'तयाचे मुखीं मिष्टान्नकवळ।'—विउ ११ १३३ २ (मुठींत घेतलेली) वस्तु (हातात मावणारा) पदार्थ (गवत लाकूड), मूठभर जिन्नस 'कामधेनूसी शुष्क तृणकवळ। —रावि १ २२ ३ मध्यभाग,

गाभा 'त्या मुसळाचा मध्यकवळ। चूर्ण नव्हेच अतिप्रवळ। उरला वज्रप्राय केवळ। तो समुद्रीं तत्काळ बुडारिला।' –एभा १ ३८१ ४ टाच, (टाचेच्या) खालचा भाग, तळ 'बाल्सुर्याचेनि उजाळें। तैसीं कवळें टाचाचीं' –एरुस्व १ २१ ५ (कु) औषधी झाडाचा पाला वगैरे वाटून डोकीवर घालतात तो लेप, थर, पेंड 'कायाचा कवळ डोक्यावर घाल'' ६ (चाभार) (मोटेच्या) डेन्यास सोंड जोडण्याचा साधा (क्रि० काढणें= सोंडेचें व डेन्याचें मेज बरोबर बसण्यासाठीं केलेली कापाकाप) ७ (गो) गोळा

**कवळ**—स्त्री कावीळ, कामीण (पित्तप्रकोपामुळें उत्पन्न होणारी) 'कवळें अभ्यासिला डोळा। तों चंद्रमा देखे पिवळा' –एभा १० ६३३ [स कामला]

**कवळचें**—क्रि (गो) कवळणें, मिठी मारणें

**कवळटें-ठा**—नपु (कों) कवळासाठीं राखलेला विन लागवडीचा डोंगराळ भाग ०ठा–पु राब कवल–ळ २ पद्दा 'गरीब रयतेस गुरें चारण्यास व कवळठा नण्यासही मोकळीक देण्याची मारामार पडते' –टि १ २०१

**कवळ**—स्त्री १ मिठी, आलिंगन, खेंव 'पृथा देवी आणि सौंवळी। स्नेहें मिळाल्या खेंवकवळीं।' –मुआदि ४५ ११९ 'दोष मिसळले केशकवळी' –मुविराट ३ १४१ २ नागराच्या रुमणीची खीळ, पाचर. [कव]

**कवळणी**—स्त्री (कों) गोळा करणें, कवळणें [कव]

**कवळणें**—उक्रि १ (गो कवळचें) पकडणें, कवटाळणें 'शीघ्र रथावरुनि उडी टाकी कवळूनि शक्ति झुलनि गदा।' –मोभीष्म ९ ५४ 'नागरी कवळी मग आउतें वोढी' –उपा १४५७ २ (राजा) एक ठिकाणीं जुळविणें, रास करणें (विस्कटलेल्या वस्तूंची) ३ (काव्य) तोंडानें धरणें, दांतीं पकडणें गिळणें 'सपानें मंडूक कवळिला।' ४ व्यापणें 'हे तिन्ही एकवटले। तेथ शब्दब्रह्म कवळलें।' –ज्ञा १ २० ५ आकलन करणें 'परी अपराधु तो आणिक आहे। जें मी गीतार्थु कवळु पाहें।' –ज्ञा १ ६६ [स कवल]

**कवळणें**—सक्रि आलिंगन देणें, मिठी मारणें 'सुनें तो विश्वपाळ कवळावा' –मोउद्योग ७ ९ स्नेहें धावोनि स्वलाही। मातें कवळी दोन्हीं बाहीं।' 'ससा माया मातें कवळि बहु दाऊनि ममता।' –विवि १८७६ १ २० [कव]

**कवळपट्टी**—स्त्री (ढोर) मोटेच्या सोंडेची मोटी पट्टी

**कवळा**—पु १ घास कवल–ळ अर्थ १ पद्दा २ राब कवळ अर्थ ३ पद्दा ३ (गो) वळकटी [कवल]

**कवळा**—वि कोवळा –पु माडाच्या, ताडाच्या झाडाचा रील दांडा (नवें नारळ धरतात व जेथून ताप सुटतात तो) [स कोमल]

**कवळाचें सळ**—न (ढोर) मोटेची सोंड व ढेरा एकत्र करावयास लागणारें सळ

**कवळास**—पु (गो) दसऱ्यानंतर उत्सवसमाप्तीच्या वेळीं देवाच्या अवसराकडून विडा इ० प्रसाद कल्याणार्थ घेणें ०णें–उक्रि १ उत्सवसमारंभ आटोपल्यानंतर गणपती अथवा गौरी यांच्या मूर्तीचें तळ्यात अथवा नदींत विसर्जन करणें २ (बायकी) मंगळागौरीची पूजा झाल्यावर दुसऱ्या दिवशीं ती वोळवावयाच्या पूर्वी तिची मूर्ति उठविण्यासाठीं हलविणें, विसर्जन करणें, पूजापत्री वगैरे एकत्र काढून दवीं वेगळी काढणें [स कवल]

**कवळी**—स्त्री १ कवळ याचें ऱ्हस्वत्वदर्शक रूप, वेंघेत मावणारा गवत, लाकूड इ० पदार्थ २ मिठी, वेंग, झडप 'महाकाळेशीं कवळी। देओ पाताळीं।' –शिशु ८७९ 'उल्वपणें देतीं कवळी। धूमडळासीं॥' –शिशु ३२२ ३ दाताची पंक्ति, रांग ४ पाचशें अथवा साडेपाचशें (विड्याच्या) पानांचा पुडा 'तर मग बहुधा रामटेकच्या पानांची कवळी आली असेल' –सोच ६९ ५ पानाचा ल्हानसा पुडा, गुडाळी ५ कानातील एक दागिना ६ (कु) नांगराच्या रुमणीची खुंटी ७ नांगराच्या रुमणीची खीळ ८ (गो) घट्ट जमीन ९ (कों) माशाची एक जात हंगाम आक्टोबर, नोव्हेंबरात पकडतात १० घास [स कवल] ०करणें–क्रि (व) रवथ करणें

**कवळी**—स्त्री पोटातील रोग, कावीळ [स कामला]

**कवळी**—वि कोवळी 'बारे तनू असता कवळी। परी शयनाहूनि उठती उप काळीं।' –नव २२ १६३ [स कोमल]

**कवलु**—पु. स्पर्श –शर (नागा ३८२)

**कवळो**—पु (गो) अथरुणाची गुंडाळी, वळकटी कवळा पद्दा [स कवल]

**कवळ्या**—वि (गुन्हाळ) उसाचीं कांडीं अथवा पेरें गोळा करून काढेकऱ्यापाशीं (चरकात लावण्यासाठीं) नेऊन देणारा [कवळ]

**कवा**—पु कॉफी किंवा सुंठ दिजवून तयार केलेला अर्क, एक पेय [अर कह्वा]

**कवा**—क्रिवि (कुण) केव्हां 'याच्या वकाला इस्तरी राज कवा व्हत' –याय २ ३ [स कदा]

**कवाइती-दी, कवाइतदार-ददार**—वि लष्करी डावपचांत निष्णात, तरवज, परंतु खाल युद्धीचा, युक्तियाज, कारस्थानी असा माणसाबद्दल पुष्कळ वळां योजतात. [अर कवाईद]

**कवाईत-द**—स्त्री १ शिस्त, लष्करी हालचाली, रचना; युद्धकलेचें दिम्नींचें शिक्षण २ (ल) शक्कल, युक्ति, हिकमत [अर कवाईद]

**कवांकी**—स्त्री ( गु ) एक जातीचा पक्षी.

**कवाटी**—स्त्री ( कों ) आलिंगन [ कव ]

**कवा ठायन**—क्रिवि ( माण ) केव्हांपासुन

**कवाड**—न १ दार, दरवाजा 'नेत्रद्वारींचीं कवाडें लागू पाहती।' –ज्ञा ६ २०२ 'मनीं लागो हे ध्यान। कवाड केव्हां उघडे दे।' –दत्तपदें भूपाळी, पृ ८ 'घाली कवाड टळगी वाड रातीं' –तुगा १२१ २ ( व ) दरवाज्याच्या फळ्या, कावड माळ्यी किवाड ( क्रि० घालणें, लावणें ) [ स कपाट, प्रा कवाड, हिं किवाड गु कमाड, प कवाड ]

**कवाडी**—स्त्री ल्हानसें कवाड, कामटयाची किंवा गवताची केलेली ताटी, दाताचें फाटर, परसाच्या झांपा [ सं कपाट ]

**कवाडी**—स्त्री विटीदांडूच्या खेळांतील एक शब्द कवडी पहा

**कवाणी**—स्त्री सुतार पक्षी कवणी पहा

**कवाता-ती-था-थी-ठी**—पु १ ( कों कु ) माडाचें ल्हान झाड रोपटें, नारळ लागण्यापूर्वीचें अडीच हात उंचीचें झाड २ ( गो ) नारळाच्या झाडाचा कोंब ३ ( कों ) पोफळीचें रोप ४ ( कों ) नारळाच्या रापास नवीन फुटलेलीं पहिलीं तीन पानें

**कवाधरज**—क्रिवि ( माण ) केव्हांपासून, फार वेळपासून

**कवाथी-कावथी**—स्त्री पोफळीचें रोप

**कवायत**—स्त्री १ युध्दविषयक सामुदायिक हालचाल, सैन्याची कसरत, कारवाई, कवाईत पहा 'ल्हाईच समयीं कवायतीनें चालावें' –रा १० ६५ २ नियम पद्धति, युक्ति शिस्त 'सखारामपतानीं कवायत धरली आहे जे' –स ५ २६२५ [ अर कवाइद=काइदाचें अव ]

**कवायती कवाइती-कवाइतीत**—वि १ कवाइत शिकलेला 'काळ कवाइतीत दहा-पांच नित्य यतात' –रा १० १९१ २ ( गो ) कावबाज कारस्थानी [ अर कवाइद् ]

**कवारी**—स्त्री ( गो ) कापलेल्या लाकडाची भेग मोठी होण्यासाठीं आत ठोकलेली मोठी पाचर कावर पहा

**कवाल**—पु १ ख्याल गाणारा गवई 'कवालाचें गायन ऐकून बरा जाते' –रा ७ ५०७ २ ख्याल नावाचें मुसलमानी गाणें [ अर कव्वाल् ]

**कवाला**—पु जमीन, घर वगैरेचें क्रयपत्र खरेदीखत सौदापत्र दस्तऐवज, कवालत कवाला पहा [ अर कबाला ]

**कवाली-ख्याल**—स्त्रीपु कवाल गवई जें गाणें गातो तें ख्याल ( क्रि० गाणें ) [ अर कव्वाल् ]

**कवाली**—वि कवालासंबंधीचें

**कवासो**—पु ( गो ) केवडा केतकी [ स केतकी ]

**कवाळ**—न १ ( कु ) राम, कवठ कवल-ळ पहा २ ( क ) वाळलेल्या काटक्यांचें ओझें

**कवाळा**—पु. ( कु ) कवळा अर्थ २ पहा

**कवाळू**—पु ( कों ) नारळाचें चोड सोलून काढल्यावर त्यांतून निघणारा कोवळा नारळ

**कवि**—पु १ रमात्कारविशिष्ट रचना करणारा, काव्यकर्ता, शाहीर, 'जैं न देख रवि तें देखे कवि' २ (ल) पंडित, जाणता, ज्ञानी 'स्वपरांच्या भूषणासि कवि टाळी।' –मोआदि ८ ३५ 'हा प्राकृत पुरुष नव्हे सागावें काय म्यां तुला कविरा' –मोवर्ण २२ ३८ 'फार तर काय पण कवि या शब्दाचा अर्थ शहाणा मसाहि पुढें होऊन गेला' –नि ३४ ३ शुक्राचार्य दैत्यगुरु झाला ययाति कविचा जामाता तीच सरकथा परिसा।' –मोआदि ९ ६ ४ (ल) विदुर 'नसुनि कवि म्हणे राया न धूत-विचार हा मला रुचला। –मोसभा ३ ४९ तेथें ज्ञान विशारद शारद शशिगौर गौरवाई कवी।' –मोसभा १ १२ [ स कु=शब्द करणें-कवि ] ॰नैरकुश्य-न कवीची निरप्रतिबधता, कविस्वातन्त्र्य [ स ] ॰समय-संकेत-पु निसर्गांत विद्यमान नसलेल्या अशा काहीं गोष्टी आपल्या प्राचीन कवींनीं कल्पिल्या होत्या त्या, कविकल्पना. 'गगनातले सगळे देव गगनकुसुमाप्रमाणें खोटे आहेत ते मानणें हा एक कविसंकेत किंवा सुजनसंकेत आहे' –सुदे ११९ ॰हीर-वि कविश्रेष्ठ, कवींमध्यें हिऱ्यासारखा, मोठा कवि

**कविजा**—पु कलथा, उलथण्याचें साधन [ अर. कब्ज़= उलथणें, परतणें ]

**कविजा**—स्त्री शुक्राचार्यांची मुलगी देवयानी [ स कवि+जन् ]

**कविथ**—न कवठ पहा

**कवित-ता-त्व-त्र-कवीत**—नस्त्री १ कवन, काव्य, पद्य, आल्हादकारक पद्यरचना, रसयुक्त वाक्यरचना २ प्रतिभासंपन्न ( गद्य पद्य, ) रचना 'जेणें अनुताप उपजे। जेणें लौकिक लाजे। जणें ज्ञान उमजे। या नाव कवित्व।' –दा १४ ३ ४८ [ स ]

**कविताशक्ति**—स्त्री प्रतिभा, काव्यरचनेचें सामर्थ्य स्फूर्ति [ स ]

**कवित्व**—कविता पहा ॰करणी-स्त्री (काव्य) काव्यरचनेंतील चतुराई ॰कला-स्त्री १ कवितेची कला, कवितेंतील सरस पद्यरचना खुबीदार अर्थबोध मनावर ठसण्यासारखी वर्णनपद्धति वगैरे गुण काव्यरचनेंतील कौशल्य सौंदर्य २ कवितेंतील रसपरिपोष ३ कविता शक्तीपासून स्वाभाविकपणें उद्भवणारी (कवीच्या मुखावरील चमकणारी ) शोभा, तेज चमक, दीप्ति [ स ]

कविलास—पु कैलास या शब्दाचा अपभ्रंश –हको

कवीठ—न १ कवठ पहा 'जैसें का कवीठ घातलें वडवा नळीं–ज्ञा ११ ४३३ २ (खा) लहान खरबूज

कवीदील—वि शक्तहृदय, निर्भय, धीट, शूर [अर कवी=सशक्त, सामर्थ्ययुक्त,+दिल्=मन]

कवीशा—वि (व) कैदाशीण [स कर्कशा]

कवीहाल—वि बेशक, नि शक, धीट 'तुम्हीं कवीहाल होऊन आपल्या वतनावरी येणें।'–रा १७ ३४ [अर कवी=सशक्त, दळकट, फा हाल=धीर, धीटपणा]

कवूल—न (छपरावरील) कौल, कऊल

कवेड—न (गो) झोंपडीचें दार, कवाड पहा.

कवेश—पु (कवीश अप) पति, नवरा 'व्यर्थ दिवस जातात खबर सांगा माझ्या कवेशा।'–होला १११

कवेळ—न (गो) लेप, थर, पेंड कवळ पहा

कव्य—न पितरास अर्पण करावयाची वस्तु, अन्न वगैरे [स]

कव्वर—क्रिवि (मुंबईच्या आसपास, कुण) कोठवर, कोठपर्यंत, किती लांब (स्थळ व अवकाश यासंबधीं) [स कुत्र किंवा कदा+वर]

कव्वा—वि (ना) कावेबाज, धूर्त [हिं कव्वा=कावळा]

कव्ह—न (व) निर्मळीचें बीं (कवणा पहा)

कव्ह्-व्हा-ळ—न. वेढा, गवसणी 'आकाशासि कव्हळ। पडोनि ठेलें।'–ज्ञा ११ ३५९ [कवळ]

कव्हण-णा-णी—कोण ? कोणा ? कोणी ? 'कव्हणाहि न चिंती वोरू'–शिशु ८६८ 'तया येसणा बलिष्ठु। नाही कव्हणीं।'–गीता १ ९०१ [कोण]

कव्हणी—क्रिवि १ कोठेंहि 'कव्हणीं सुखेंन नाहीं ऐसें। जेथ फीटे भवपारों।'–ऋ १९ २ कोणत्या, कोण्या 'कव्हणी एकी वेळीं।'–शिशु ३८

कव्हणें—क्रिवि कोणनें, कोणत्या 'तरी आलेति कव्हणें काजें।'–शिशु ११८

कव्हेरी—क्रिवि (ना) किती लांबपर्यंत ? कोठपर्यंत ? कव्वर पहा

कव्हा—पु युद, कोंपरी कवा अर्थ १ पहा 'शहाजादे यासही कव्हा यावा'–रा ५ २२ [अर कव्वा]

कशा—पु १ चाबूक, कोरडा, 'चाल उगीच प्रभुतीं हट करिता पाठिशीं कशा लागे।'–मोसभा ५ ८ 'क्षत्रियतेज असें हें जें तुजला पीडितें कशापातें'–मोआदि ३२ २२ २ कमरपट्टा –दार [स]

कंशा—पु (यावनी) कोवसा (अप) पक्षपाती काम पत्करणारा, मुद्द घेणारा किंवा रक्षण करणारा, विशेषत भांडणांत त्याला पुरा देणारा

कशाचा—वि (काय) कोणत्या वस्तूचा, गोष्टीचा, जातीचा, प्रकाराचा, तऱ्हेचा ? 'हा रुपया कशाचा तर चांदीचा' [स कस्य]

कशा(सा)य—पु काढा [स कषाय]

कशाला—क्रिवि कोणत्या गोष्टीसाठीं ? का ? काय म्हणून [कसा]

कशास—क्रिवि कशाकरिता ? 'जया बहु तयास या मज कशास मी हावरा।'–केका १४ [कसा]

कशि(शी)दा—पु वेलबुटीचें काम, वस्त्रावरील दोऱ्यानें, रेशमानें किंवा जरीनें केलेलें नक्शी काम, भरतकाम, सडीचें काम (वस्त्रावरील) [फा कशिदह्]

कशी—स्त्री (राजा कुण) नाचणी वगैरेचें झोडपून दाणे काढून घेतलेलें कणीस, पिशी

कशी—स्त्री काचणी, जाच, जिरीर –शर [स कष्]

कशीश—स्त्री ओढ, हट्ट, आढेवेढ 'नबाबाचे प्रकृतींत कशीश फार आहे'–रा ५ १७१ [फा कशिश् = आकर्षण, विरोध]

कशेट-ड-रु—न वरूसारखें एक तृण [स कशेरु]

कशेय—क्रिवि (गो) कसाही, कांहीं तरी करून [कसा]

कशेरु—पु (शाप) पृष्ठवंश, (सामासिक) कशेरुकंटक-घन-पार्श्वशृंग-बाहु [स कशेरु=पृष्ठवंश]

कशेला—वि. १ कसला (अप) कशासारखा, कसल्या जातीचा, प्रकाराचा, पद्धतीचा

कशेला—पु १ (ना व) वाटोळा गडवा, लहान लोटा, वाटोळ्या बुडाचा घडींव तांब्या 'कशेला फुटका निघाला' [कलश ?]

कशो—स्त्री (ना) कस.

कश्चन, कश्चित्—सना कोणी एक, कोणी तरी एक, अमुक [स]

कश्मल-ळ—न १ घाण, कचरा, दूषित वस्तु 'जैसा गावींचिया कश्मळा। उकरडा होय येकवळा।'–ज्ञा १८ ६५० –वि आक्षिप्त, खराब झालेलें तें कश्मळ आघवी। आचरण ज।'–ज्ञा १८ ६२० 'पाहता दहो अतिकश्मळ'–एभा २० १४६ 'कवण बधु वरितें, कश्मला कोणपा या ?'–आसि ३८ २ पाप, मल, दोष –वि पापी, दूषित, अमंगल [स]

कश्यपीं लागणें—क्रि कश्यपीं लागणें या रूपानें कुडीचें रूप आश्रय घेणें, मागें लागणें कच्छपी पहा

कश्याक—क्रिवि (हेटकरी) कशाला ?

कष-पाषाण—पु ज्या दगडावर घासून सोनें वगैरे धातूंच्या शुद्धतेची परीक्षा करतात तो दगड, कसवटीचा दगड [स कष्= घासणें+पाषाण]

**कषा**—पु (व) काढा [स कषाय]

**कषाय**—पु १ औषधी वनस्पतींचा काढा, अर्क २ गेरूचा रंग [स] –वि १ तिखट, तुरटनें कडवट २ (काषायअप) गेरू अथवा कावेच्या रंगाचें, ३ कलुषित, बेरंग, विचलित (चित्तवृत्ति, तादात्म्य)

**कष्ट**—पु १ शारीरिक श्रम, त्रास, आयास, प्रयत्न, मेहनत, परिश्रम 'कष्टेंविण फळ नाहीं। कष्टेंविण राज्य नाहीं।' –दा १८ ७ ३ २ थकवा, क्षीण, श्रम (शारीरिक, मानसिक), दुःख, अस्वस्थता (सामान्यत अव प्रयोग) ३ दुःख, व्याधि, संकट [स कष्=घासणें] ०करी–पु मजूर, अंगमेहनतीचें, दगदगीचें, हलक्या दर्जाचें काम करणारा, कामकरी

**कष्टणें**—अक्रि १ फार अंगमेहनतीमुळें, काबाडकष्टामुळें थकणें, दमणें, प्राण कासावीस होणें २ (मनात) दुःखी होणें, अतिशय क्लेश, त्रास होणें 'बहु कष्टली शब्द कारुण्य बोले।' –दावि ४९६ ३ श्रम, आयास करणें, हाडाचीं काडें करणें, रक्ताचें पाणी करणें (अंगमेहनतीमुळें, अंगमेहनत करून) [कष्ट]

**कष्टसाध्य**—वि अति श्रम किंवा मेहनत केल्यावाचून सिद्धीस न जाणारा, मेहनतीचा, त्रासदायक [स कष्ट+साध्य]

**कष्टाची धण**—स्त्री श्रमाची, मेहनतीची समृद्धि होईल असें काम, जिच्यापासून कांहीं फलप्राप्ति नाहीं पण केवळ मेहनत पडली अशी गोष्ट, विफल श्रम

**कष्टार्जित**—वि श्रम करून मिळविलेलें [स कष्ट+अर्जित]

**कष्टाळू**—वि मेहनती, उद्योगी, परिश्रम करणारा [स कष्ट+आलुच]

**कष्टी**—वि १ कष्टाळू २ त्रासदायक, मेहनतीचें ३ शिणलेला, थकलेला, खिन्न, व्याकुळ, दुःखी 'म्हणउनि होतों क्षणो क्षणें कष्टी।' –मोकर्ण १ १५ –पु (गो) मजूर, माडाची सूर काढणारा नोकर

**कष्टीक**—वि (व) कष्टाळू, मेहनती

**कस**—पु १ सामर्थ्य, तक्वा, जोर, जोम, हशील, अर्थ, पाणी, चाखुलपणा, (शरीराचा) जोम, पाणी, बल, शक्ति, सामर्थ्य 'नामापुढें उरावयालागीं। कस त्याचे अगीं असेना।' –एभा २८ ३९१ (एखाद्या वस्तूचें) सत्त्व, पुष्टिदायक जोमदार, पुष्टीकारक जोमदारपणा उत्पन्न करणारा तत्त्वांश (जमिनींत धान्योत्पादक अंश, धान्यात अन्नांश, दुधात स्निग्धांश इत्यादि प्रमाणें) अभ्यासाही लागीं। कसु नाहीं तुझिया आंगीं।' –ज्ञा १२ १४ गाईपेक्षा म्हशीचें दूध कसाला जास्त', नदीकाठची शेतजमीन कसाला चांगली असते' २ फलदायकता, व्यापार धंदा, याच्यापासून योग्य प्राप्ति कस ३ कसोटीवर लावून सोन्याची किंवा रुप्याची ठरवलेली योग्यता, गुण, शुद्धतेचें प्रमाण व ही शुद्धता ठरविण्यासाठीं त्या दगडावर मारलेली रेघ, घांसलेला भाग 'या महातेजाचेनि कसें। जरी चोखाळु प्रतिबिंब दिसे।' –ज्ञा ४ १८० 'हें सोनें कसाला जास्त भरेल' (क्रि० उतरणें, लागणें) ४ परीक्षा, 'तुजविणें दुसरें दिसतें न त्या। जरु कसा न कसा उतरे तुझ्या?' –केलेशाध्वी 'जरी उतरेल माझ्या कसीं।' –मुवन (नवनीत, पृ १८४) –स्त्री ५ कचर, लचक, उसण (क्रि० भरणें) ६ (गा) रेती ७ (चि) मदशेष, कसर [स कष्=घासणें]

**कस**—पु व्यक्ति, जण, असामी 'कुणबीण कस एक' [फा कस्]

**कस**—क्रिवि (कातकरी) कोठें? 'तू आहास कस?'

**कंस**—पु १ वर्तुळाचा, परिघाचा भाग, अंश, तुकडा, ([{ यापैकीं कोणतेंहि चिन्ह, कुडली २ वर्तुळाची ज्या ३ श्रीकृष्णाच्या मामाचें नाव, मथुरेचा एक राजा [स]

**कसई**—स्त्री कासई कसाड, एक प्रकारचें जाडें गवत, याचा उपयोग कूड घालण्याकडे करतात कशेट पहा [स कशेरु]

**कसकस**—स्त्री १ ताप येण्याच्या पूर्वी अंग मोडून येणें, व दुखणें, सामान्यत शरीर, अवयव दुखणें (क्रि० येणें, भरणें) २ शिरशिरी, हुडहुडी (भयकर गोष्ट पाहिल्यानें किंवा एकल्यानें येणारी) (क्रि० येणें, वाटणें, भरणें) ३ भय, काळजी, दुःख, हुरहुर (क्रि० लागणें) [ध्व]

**कसकसचा-ला**—वि कोणत्या प्रकारचा–पद्धतीचा–रीतीचा? कशासारखा? कसा? [कसा द्वि]

**कसकसणें**—अक्रि १ शरीर किंवा अंग दुखणें, मोडून येणें (दुखापतीनें, पक्षघातानें, दगदगीनें, अति श्रमानें) २ ताप येण्यापूर्वी शिरशिरी हुडहुडी भरणें ३ शहारे येणें, भरणें, शिवशिवणें [ध्व]

**कसकसा**—वि १ कसकसचा पहा [कसा द्वि] –क्रिवि २ कसा, कोणत्या अर्थानें? 'तू कसकसा गेलास, त्यानें कसकसें सांगितलें?'

**कसकुसणें**—क्रि कुसकरणें 'तुझा गोकुळींचा भानवसी। दत्याचीं मोराडी कसकुसी।' –शिशु ४३५

**कसचा**—वि (कधीं कधीं काय किंवा कधीं कधीं कसा याचें विभक्ति-रूप) कशाचा, कोणत्या गोष्टीचा, वस्तूचा, कोणत्या प्रकारचा, जातीचा, तऱ्हेचा

**कसणी-नी**—स्त्री १ बाधण्याची दोरी (एखाद्या ओझ्याची, गोणीची, गठ्ठयाची, चोळीची) बधन, पाश, बद 'साठविलें तें सांडेल म्हणी। यालागीं कचुकी गोणी। मार्जी दाटोनि कसणी। विरडें कशी मुबद्ध।' –मुरशु ४८ 'दाटे त्रिगुणाचे कसणी।

कृष्णावाचोनी कोण सोडी।'–एरुम्व ७४१ २ कसा, लावट व अरुंद अशी पैसे ठेवण्याची पिशवी म्ह० (व) कसणी ढिली करावी लागेल=पैसा खर्च करावा लागेल ३ सुताराची सामता ओढण्यासाठीं काठीला दोरी बांधून केलेली धनुकली ४ बांधणी, दोरी ०ची चोळी–स्त्री काचोळी 'साडया साउली पातळें गोंडे कसणियाच्या चोळया। सुया घेउनी सकळा कळवा चरी पळे।'–तुगा १३३ [स कर्ष्] कसण्या–नी–अव (विण काम) (अव) हत्येच्या खिळया (बाजूच्या खुंट्या) गुंड व पान (हत्येची वरील पेटी) यास बांधण्याच्या दोऱ्या [कसणी अव]

**कसणी**—स्त्री (कसणें या उक्रि चें धातुसाधित नाम) कसोटी, पारख, परीक्षा 'रोज लष्कराची तपासणी व कसणी करीत।'–मदम २७२ [स कष्=घासणें]

**कसणु(नु)सा–कसनसू**—वि ज्याचें स्वरूपाविष्करण होत नाहीं असा कसाचसा पहा

**कसणें**—उक्रि १ घट्ट बांधणें, दोरानें अथवा दोरीनें घट्ट आवळणें, करकचणें, जोरानें ओढणें, धरणें 'गुलालाचे हौदे भरुनिया खुप कसले हस्तीवरी।'–ऐपो २०३ 'मारी सोटे घेत झोल बैल भाड्याचा कसावा।' –अफला ६८ 'पाहू म्हणे राजया। तीर कसुन सोडला'' 'वाकडी चाप कशी मनीं स्थिति कशी'–आसी ५५ 'घोंडा किंवा टोला कसुन मारला २ (शेत) करणें ३ घट्ट बांधणें नेसणें 'कासे कशिला सोनसला।'–एभा ३ ५७१ 'जन कासया घिते सुन कसितें न करावया भजन कारा' –मोविराट ५ २२ [स कर्ष्]

**कसणें**—उक्रि १ (सोनें वगैरे) कसोटीवर घासून पाहणें, परीक्षा करणें २ कसून परीक्षा घेणें, कडकपणें तपासणें, नाना प्रकारानीं चाळणें, छानणें, उलट सुलट प्रश्न विचारणें, सामान्यत परीक्षणें, तपासणें 'कसोनि पाहे रुक्मिणी रमण। टाकितो भजन काय मानें।'' 'राजा पलातें कसी।'–आसी ७ ३ झटून मिळविणें 'मग शरण रिघून त्यातें। योगालागीं कशीन कीं।' –नव १४ १०३ –अक्रि १ काटक, सहिष्णु मजबूत होणें (श्रमामुळें व्यायामामुळें–शरीर) चांगला सराव किंवा तरबजपणा असणें व त्यामुळें निगुतच अंगीं येणें [स कष्=घासणें]

**कसणें**—क्रि ठसकणें, दुखणें, ठणकणें (शरीर अथवा अवयव)

**कसद्**—पु हेतु विचार निश्चय दुगर रोचीं टाणें खालीं देखोन कसद टाणीं घेण्याचा केला –रा १५.२० [अर कस्द=हेतु, इच्छा]

**कसदार**—वि ज्यात सार, सत्त्व, बळ, जोम, चांगुलपणा आहे असें, सत्त्वयुक्त, सरस, बलिष्ठ भरींव, सकस [कस+दार]

**कसंदी**—स्त्री (व) तिसऱ्याची भुकटी कसुदी पहा

**कसना**—क्रिवि (कातकरी) कोठला? कसला? 'शिपाई सागह तू कसना।'–मसाप ८ १ ३२ [कसा]

**कसपट**—न (लाकूड वगैरेचा) लहान कण, साल्पट, केर, गवताचा तुकडा, धान्याचे कण, तूस 'बायको धमक्ट दादला कसपट' –प्रमाणें मानणें, मोजणें, लेखणें, गणणें, धरणें–तुच्छ मानणें, क्षुद्रवत् लेखणें

**कसब**—न १ धंदा, व्यापार, काम, उद्योग, कला 'कसबें व व्यापार होई'–शालोपयोगी नीति ११८ २ चातुर्य, हुशारी, कोण याहि कलेंत नैपुण्य, करामत (लिहिणें, घोड्यावर बसणें, पोहणें यामधील) 'शिपाईगिरीचें कसब जेथें, तेथें लिहिण्याचें कसब मनसब्याचें उणें असतें'–खरे ६ २६५६ ३ वेश्येचा धंदा, शरीरविक्रय ४ हिकमत, कावा, शक्कल (लबाडीची) ५ रुप्याची बारीक तार, (सोनेरी रुपेरी) कलाबतू [अर कस्ब] ०चिठ्ठी–स्त्री वेश्येला आपला धंदा चालविण्याबद्दल दिलेला परवाना, पत्र ०चोर–पु अप्रामाणिकपणानें काम करणारा, चुकारतट्टू आपलें कौशल्य पुरतें खर्च न करणारा, सुमार बेताचें काम करणारा ०चोरी–स्त्री १ कसबाची चोरी, फसवाफसवी, लबाडी, कपटानें किंवा लुच्चेगिरीनें पूर्ण कौशल्य न दाखविणें २ सोनार, कुळकर्णी, वाणी वगैरे लोक आपल्या धंद्यातील कौशल्यानें दुसऱ्याशीं जी लबाडी करतात ती

**कसबा–बे**—पु १ परगणा किंवा महालाचें मुख्य ठाणें, शहरातील जुनी वसाहत, वस्ती, नव्या वस्तीहून भिन्न, जुनें गाव 'कसब्याचें गाव मौजे गावापेक्षा अधिक विस्तृत व रोजगारयुक्त असतें'–गागा २ [अर कसबा]

**कसबाती**—वि १ धूर्त, कावबाज, लुच्चा, हिकमती (कला किंवा कपट यांत) २ (अनिश्चित) कसबी, हुशार, चलाख, कुशल (कारागीर) 'कसबाती लोक'–समारो ५ ७ [कसब्]

**कसबी**—वि चतुर हुशार तरबेज (कला, कामात) गुणी, कारागीर, हुन्नरी 'गलबतें बांधणारे मोठे कसबी व खलाशी फारच हुशार असतात' पाव्ह १०२ [अर कस्ब]

**कसबीण**—स्त्री नाचणारी स्त्री, वेश्या, शरीरविक्रय करून त्या पैशावर चरितार्थ चालविणारी स्त्री कसबतीण पहा [कसब]

**कसम**—स्त्री शपथ प्रतिज्ञा (क्रि० खाणें) 'याहीं कसम खाऊन खातून पाठविलें कीं '–रा १ ४६ [अर कसम]

**कसमस–सा–साट**—स्त्री १ रग, जोर 'विषयाचा विसर पडे। इंद्रियांची कसमस मोडे।'–ज्ञा ६ १८८ 'तन्हीं खेळाचेनि कसमसाटें। काहीं जाणिन ना।' –शिशु ७१२ २ चाचऱ्य ३ दाटी 'आंगिचेनि कसमसाटें।'–शिशु ७११ ४ (ल) सळाळ, चकचकीतपणा 'कांतिचिया कसमसा। सुधाकरेसि हरि करि मारिसा।'–भाए ६४६ [कस]

**कसमसा**—वि क्षुद्र 'हा लोक हो कसमसा करितो कसाया।' –अरक हरिराज मुद्गलांचें भाषांतर २५

**कसमळ**—स्त्री मळ, घाण 'अवघाच माल खळ्यांत आणून कसमळ वाढून स्वानदाची रास करणें।' –भज १२३ –वि ओंगळ, दुराचारी 'नये राहों उभें कसमळापाशीं।' –तुगा २६९ [स कश्मल]

**कसय**—स्त्री (गो) गाळ [कस]

**कसर**—स्त्री १ न्यूनता, उणीव, कच्चेपणा, अपुरेपणा, चूक (मापात, वजनात, काम पुरें करण्यांत, हिशेबात इ०) 'तू मोजण्यामध्यें कसर करू नको' (क्रि० राहणें, येणें, निघणें) २ अंश, लेश, किंचित् भाग, थोडीशी बाकी 'पागोट्याचा रग पुरतेपणीं गेला नाहीं, कांहीं कसर आहे' 'ज्वर गेला परंतु कांहीं कसर राहिली आहे' ३ आधिक्य, नफा, फायदा 'दहा तोळे घेऊन विक्री केली त्यांत मासाभर कसर राहिली' 'त्या रुपयात कसर मिळाली' 'ह्या व्यापारामध्यें माझी कसर सुटली' ४ (हिशेबात) दोन्ही बाजूंच्या बेरजा बरोबर होण्याकरिता कोणत्या तरी बाजूतून काढलेली किंवा मिळविलेली रक्कम 'जमेत कसर होऊन . ' –रा १० ३४१ ५ तापाची कणकण, कडकी (ताप येण्यापूर्वीची किंवा ताप गेल्यानंतरची) 'सरदीची हवा यामुळें कसर येते' ६ चिकटूपणाची काटाकाट, छाटाछाट, काट, कपात ७ अप्रामाणिक, अयोग्य मार्गानें मिळविलेला पैसा, उपटलेली रक्कम, मधल्यामध्यें चावलेला पैसा, लाच, गैरवाजवी फायदा ८ कागद किंवा कापड खाणारी एक कीड 'कपड्यास कागदास, भातास पिठास तांदुळास वगैरेस खाणाऱ्या कसरीच्या आळ्या भिन्न भिन्न जातींच्या असतात' –प्राणिमो ११४ ९ कर्जमतीचें व्याज, जसजसें मुद्दल जमा होईल तसतसें त्यावरील व्याज वद करण्याचा प्रकार १० कामामध्यें कुचराई, चालढकल 'कोणीहि लढाईमध्यें अणुमात्र कसर केली नाहीं' 'आपला निरपेक्ष उत्तम सल्ला देण्यास कसर केली नाहीं' –नि ९९७ [अर कस्र] ०काढणें–क्रि कमीपणा भरून काढणें, एखाद्या धंद्यात किंवा गोष्टींत आलेला किंचितसा तोटा किंवा उणीव दुसऱ्या धंद्यात किंवा गोष्टींत भरून काढणें ०करणें–(व) १ काटकसर करणें २ ज्वरांश येणें ०येणें–अगावर कांटा उभा राहाणें, बारीक ताप येणें (गो) कसरणें ०लागणें–कसरीच्या किड्यानें पदार्थ खाणें ०कुसर–कुसरात–स्त्री उणीव, न्यूनता, कसर अर्थ १ पहा [कसर द्वि] ०णें–अक्रि १ एका बाजूस घसरणें, निसटणें जागेवरून थोडेसें बाहेर जाणें 'भ्रमातुनि कसरल, आदि पुरुषाला अनुसराल हो' –होहिरोबा (नवनीत पृ ४४९]) २ (ल) कमी होणें, उतार पडणें (ताप, पाऊस, दुष्काळ यास), कमी होणें, उतरणें (दिवस) ०दिढी–स्त्री ऐन जिनसी सारा भरणाऱ्या रयतेवर त्या धान्याचा बसविलेला अधिक कर ०पट्टी–स्त्री १ जादा कर (प्रत्येक कुळावरील) २ तोटा भरून काढण्यासाठीं बसविलेला कर ०बतला–पु ऐन जिनसी वसूलात जें कमीजास्त होईल त्याबद्दलची सूट

**कसर**—स्त्री विरळ (कापूस पिंजल्यासारखे) ढग, मळभ, अभ्र

**कसर**—पाण्यांत उत्पन्न होणारा खाण्याच्या उपयोगी एक प्रकारचा कंद

**कसरत**—स्त्री १ सवय सराव, नेहमीं गुण असणें, रावता (कला, तालीम इ० मध्यें), सरावामुळें प्राप्त होणारा तरबेजपणा, हुषारी, चतुराई २ मर्दानी खेळ ३ मेहनत करणें, कष्ट करणें, मोठें श्रम करणें [अर कस्रत] ०खाना–पु व्यायामशाळा 'जोत्याजीबरोबर कसरतखान्यांत गेले आहेत' –स्वप २४५ [अर कस्रत्+फा खाना]

**कसरता**—क्रिवि किंचित् तोललेला, सरळ रेषेपासून थोडासा कललेला, सरकलेला, एका बाजूवर गेलेला [कसरणें] –तें येणें–क्रि हळूहळू युद्धातून हळु हळु माघार घेणें, निसटणें, एका बाजूस होणें

**कसरती**—वि १ व्यायाम केलेला, तालीमबाज २ राबलेला, वहिवाटलेला ३ वाकबगार झालेला [अ कसरत्]

**कसरा**—वि १ करडा, पांढुरक्या रंगाचा, कबरा २ निरनिराळ्या रंगाचा, तऱ्हेचा

**कसरी**—वि १ कसरीसंबंधाचा, मितव्ययी, काटकसरी, विशेषत कद्रू कृपण माणसास म्हणतात २ काटकसरीनें, थोड्या खर्चात घेतलेला (माल वगैरे) [कसर]

**कसरी**—वि (माण) अंगावर काळ्या–पांढऱ्या रंगाची लोकर असलेली (मेंढी)

**कसलत–ती**—कमालत–ती पहा

**कसला**—वि कोणत्या प्रकारचा, जातीचा, तऱ्हेचा, कशासारखा, कोणासारखा [कसा]

**कसलमंद**—वि अस्वस्थ, आजारी, बिमार 'मीर आलम याची तबियत कसलमंद येण्याची ताकद नाहीं' –रा ५ १४३ [अर कसल्+फा मन्द]

**कसवट–टी**—स्त्री १ कस लावण्याचा दगड, कसोटी 'लाऊनिया कसवटी। उत्तम सुवर्णाची खोटी।' –एभा ११ १४६४ २ करामत –शर ३ परीक्षा, एखादी गोष्ट व्यक्ति हिचा खरेपणा किंवा लबाडी ठरविण्यासाठीं युक्तीनें कसून परीक्षा करणें (क्रि० घेणें, पाहणें, उतरणें) 'स्वपद वोपाया लाविती कसवटी।' –दावि २१७ 'म्हणे ऋषीची जाहली कसवटी।' –कथा ३ ३ ७५ (ल) कसास लावणारा, परीक्षा पाहणारा

परीक्षक 'देखपा गा किरिटी। आश्रमधर्माचिया राहाटी। विधि मार्गा कसवटी। जे आपणचि होती।' –ज्ञा ९ ३०७ [स कष-पट्टिका, प्रा कसवट्टिआ]

**कसवटी**—स्त्री शेताची मशागत, मेहनत [स कर्षं]

**कसवंटी**—स्त्री एक प्रकारचें लोणचें कसुदी पहा

**कसा**—वि कोणत्या जातीचा, प्रकारचा, घर्तीचा, रीतीचा देखाव्याचा, म्ह० 'कशात काय फाटक्यात पाय' [स कीदृश]

**कसा**—क्रिवि १ कोणत्या प्रकारानें अथवा रीतीनें ? कशा साठीं ? कोणत्या कारणानें ? हा शब्द अपूर्वता किंवा लोको त्तरपणा दाखविण्यासाठीं निरनिराळ्या क्रियापदाबरोबर पुष्कळ वेळा योजितात जसें –हा धावतो कसा, जेवतो कसा, लिहितो कसा, बोलतो कसा इ० त्याचें वर्णन मला करवत नाहीं !, ओहो ! धाव कसा, बोल कसा, जेव कसा=ज्याला दुसरें उदाहरण नाहीं असें धाव, जेव, वगैरे म्हणजे मारुती सारखा धाव, बृहस्पती सारखा बोल, गणपतीसारखा लिही, कर्णासारखा किंवा बळीसारखा दानधर्म कर इ० २ सामान्य अर्थानेंहि योजितात जसें –जा कसा, ये कसा, बोल कसा=कोणत्या तरी प्रकारानें, कसेंहि करून जा, ये, बोल इ० ३ निश्चितार्थानें किंवा निःसंदेहार्थानें जसें–तू जा कसा=निश्चित जा 'भीष्म पतन पावे तों आम्हांला हो सहाय चाल कसा।' –मोभीष्म १ १०२

**कसा**—पु १ अंगरखा किंवा टोपडें इत्यादिकाचा बंद 'आंगडियाचा कसा सोडिला। म्हणे नखें दुखती माझीं आता।' –ह ७ २४४ २ पैसे ठेवण्याकरिता हात दीड-हात लांब व अरुंद असलेली कमरेस बांधावयाची पिशवी ३ (बायकांचा) झोळणा, बटवा वगैरेची दोरी, नाडी [स कर्षं]

**कसा**—पु (आगरी) ल्हान बोरू याची लेखणी करतात 'ह्या ओहोळाच्या खाचरात चालू सालीं कसा फार आहे' [स कशेरु]

**कसां**—क्रिवि (राजा) कसें

**कसाई**—पु १ खाटीक, गुरें मारून त्याच्या मांसाच्या विक्रीवर पोट भरणारा, ही मुसलमान लोकांची जात असते २ (ल) अत्यंत निष्ठुर हृदयाचा माणूस ०खाना–पु कत्तलखाना पशुवध करण्याची जागा म्ह० कसायाला गाय धार्जिणी (कसाई निष्ठुरपणानें गाईचा घात करतो असें असताहि ती त्याच्यापुढें गरीब बनते यावरून) =दुष्ट आणि कठोर माणसाशीं सारे लोक गरिबीनें वागतात या अर्थी

**कसाई**—स्त्री खेचून बांधणी 'वाहनाचे कसाईची जबाब दारी ज्या त्या मालकावर आहे' –स्वारीनियम (वडादें) ८९ [स कर्षं]

**कसाकसा**—वि कोणत्या प्रकारचा, रीतीचा, जातीचा ? कशासारखा ? [कसा द्वि]

**कसा काय**—क्रिवि कसकसा पहा 'आज तिकडचा बेत कसा काय आहे ?'

**कसाकुशा**—स्त्री घासाघीस, खाराखुरी, तडफड, काकू, टंगळमंगळ, नाखू [ध्व]

**कसाचसा**—वि ज्याचें स्वरूप सांगता येत नाहीं अशा एखाद्यासारखा, कधीं दृष्ट नव्हे किंवा श्रुत नव्हे अशा काहीं विल क्षण प्रकारचा, (चमत्कारिक व आश्चर्यकारक वस्तु किंवा प्रसंग याबद्दल योजतात) 'हा काय पदार्थ चमत्कारिक, हा कसाचसा दिसतो' [कसा+च=जोर दाखविणारा+सा, असा=सादृश]

**कसाट-ड**—न एक प्रकारचें गवत कशेट पहा [स कशेरु]

**कसाटी**—स्त्री (व) बैलाच्या गळ्यात बांधावयाची घंटा

**कसाडी**—स्त्री १ (व) दुधाची चरवी, कासडी २ मिरच्यांची पूड, तिखट कसुदी पहा

**कसा तरी**—क्रिवि कोणत्या तरी प्रकारानें 'प्रसादचतुरा कसा तरि करा बरा हा जन।' –केका ६३

**कसाब**—पु खाटीक कसाई पहा 'कसाबाचे आळी मांडिलें प्रमाण। बस्वणाची आण तया काई।' –तुगा ३०६८. [अर कस्साब] ०करणी–स्त्री कसाबासारखी निष्ठुर कृति

**कसाबसा**—क्रिवि मोठ्या कष्टानें, प्रयासानें 'मी त्यापा सून कसेबसे दहा रुपये मिळविले'

**कसाबी**—स्त्री १ खाटकाचा धंदा २ (ल) क्रौर्य –वि क्रूर [फा कस्साबी]

**कसाय**—पु (गो) औषधाचा काढा [स कषाय]

**कसालत**—स्त्री १ पीडा, दुःख, संकट २ कठिण काम, मेहनतीचें काम, (क्रि० काढणें) ३ अतिशय श्रम, आयास (क्रि० येणें, करणें) ३ खसालत पहा [अर कसालत्=दुःख] ०काढणें, सोसणें–क्रि त्रास–ओझें सोसणें, एखाद्याची घाण काढणें, जाच काढणें, कुरकुर, किरकीर पिरपीर सोसणें

**कसालती**—वि १ फार श्रम करणारा, मेहनती २ अति शय दगदगीचें, त्रासाचें, मेहनतीचें (काम) [अर कसाला]

**कसाला**—पु १ श्रम, आयास कसालत पहा 'राजश्री गोविंदपंत मामा वृद्ध, त्यांनीं कसाला किती करावा ?' –खरे ९ ४६७४ 'त्याजला लिहिण्याचा कसाला होईना' –रा ६ २५१ २ कडक रीतीनें वागविणें, छळणें, पिदून काढणें, बेजार करणें (क्रि० करणें, लावणें) ३ अतिशय मेहनतीची परिस्थिति, जुलमाची अमदानी (क्रि० होणें, लागणें, गुजरणें) ४ पीडा, संकट 'स्वामींनीं हा नूतन संपादिलेला देश यावर कसाला पडतो ही विचाराची वाट नव्हे' –मराभा ७ [अर कसाला=दुःख]

फसि(सी)दा—पु कशि(शी)दा पहा

फेसिया—स्त्री हिरवी गारगोटी एक रत्न

फसीद करणें—कि काढ्रा घेणें कसीदगी पहा [अर फासिद्=न्यून, कमी, फा कसीद=न्यून, कमी]

फसीदगी—स्त्री कमी करणें 'जरूर एक वक्त बादशाही कामाबद्दल कांहीं कसीदगी केले तरी मयत्र-सर्वांनें मुनादला देऊन याजद कसीद करावें' -इम ६७ [फा कसीदन्=कमी करणें, काढ्रा घेणें फा कसीदगी=गैरमर्जी]

फसु—पु कस पहा 'कांदं वेनल्यकनकाचा वसु। भरे कस वढिए चीण।' -ऋ ९८ [कस]

फसुदा—पु कशिदा पहा 'आपले गच्चीवर बसून कसु कीला कसुदा काढीत होत्यें' -पारिभौ १५

फसुंदी—स्त्री १ (ना) मिरच्यांची भुकटी, तिखट २ (व) आम्ब्याच्या कैर्यांचे लोणचें 'यदा आंब्याची कसुंदी घाल' [हिं कसौंदी]

फसूं—न (वों) शेताची हद्द दाखविण्यासाठीं घातलेली दगडाची बाधवरळी, गडगा 'यदा शेताला कसूं घालावयाचें आहे' [कुरू]

फसूर—स्त्री १ कमीपणा, न्यूनता २ चूक, अपराध, दोष 'कसूर माफ' ३ हयगय, अळटळ, आळस 'आपली मनें स्पष्टपणें बोलून दाखविण्यास कधींही कसूर केली नाहीं' -टि ४ ३४३ [अर कुसूर्=दोष न्यूनता] ०कोताई-स्त्री चूक, न्यून 'स्वामी सेवेचे ठायीं आम्हांपासून कसूरकोताई हा कालपर्यंत जाली नाहीं व पुढेंहि होणार नाहीं' -पया ६८ [कसूर+कोताई] ०दार-वि दोषी, अपराधी 'पोषाख ठरविलेले मुदतीचे आत खराब केल्यास नवीन करण्याकरिता कसूरदाराचे पगारांतून खर्च कापून घेतला जाईल' -खानोनियम (बडोदें) प्रस्तावना ३

फसूरी—कसूर पहा खानो नियम (बडोदें) १

फसें—क्रिवि कोणत्या रीतीनें, कशाप्रकारें? 'हें कोडें कसें सोडवायचें' 'तुझें कसें काय चाललें आहे?' [स कथम्] ०करून-ही करून-क्रिवि कोणत्याही प्रकारें, कशाहि रीतीनें ०बसें-क्रिवि मोठ्या कष्टानें, अति श्रमानें, कसें तरी, काहीं तरी करून जेमतेम 'कळनिया चित्त स्थिर कसेंबसें।' -ल्लेदशास्त्री [स कथम्, कसें द्वि]

फसेई—स्त्रीन वासे गवत, एक औषधी वनस्पति [स काश इ काइक्श]

फसेरू—पुन एक गवत, कचरा, (वों) फुरडें कशाट पहा [सं कशेरु]

फसेरा—वि कशासारखा, कोणासारखा, कोणत्या जातीचा, तऱ्हेचा, पध्दतीचा [कसा]

फसेंसें, फसेंमेंच—क्रिवि काहीं तरी चमत्कारिक, न सांगतां येण्यासारखें, कसाबसा पहा ०होणें वाटणें-१ (वायकी) चमत्कारिक वाटणें, नेहमींपेक्षा निराळ्याच भावना होणें 'तुला कां वरें आज कसेंसेंच वाटतें?' -सरा रजपूत वीर २ चैन किंवा स्वस्थता नसणें [कसें द्वि]

फसो—(वों गो) कसा पहा

फसो—पु (गो) वद, कसा पहा (झाडाचे वगैरे)

फसोटा—पु १ कस लावण्याचा दगड २ परीक्षा कसोटी पहा

फसोटा, फसोटापेंच—पु १ कुस्तीचा एक पेंच आपल्या पंजानें जोडीदाराचा एक पंजा धरून एकदम जोडीदाराचा हात बाहेर टाकून जोडीदाराच्या कानाच्या खालीं मानेवर आपल्या आंगठ्याकडील बाजूच्या हातानें मारणें २ जोडीदाराचे दोन्हीं हात आपले हातांत धरून जोडीदाराचा एक हात खिंडधारून देऊन आपल्या हाताच्या मुठीच्या हाडानें जोडीदाराच्या कानशिलावर मारणें [कस]

फसोटी—स्त्री १ कसवट-टी पहा (क्रि० घेणें, पहाणें) २ परीक्षा 'व्यवहाराची एकच कसोटी आपणास पुरे होईल' -टि ४ ११९ ३ कसवटीचा दगड कसोटीस उतरणें-कि परीक्षेंत उत्तीर्ण होणें, उत्कृष्ट निघणें [स कष+पट, प्रा कसवट, हिं कसौटी]

फसोटी करणें—कि १ परीक्षा करणें, २ पेंच घालणें ३ (ल) सुरत क्रीडेंतील डाव खेळणें 'शान होईल जीव जरा फिरून मग मल कसोटी कसा। नव्या नवतीचा बहर नूतन जी वाली आली रसा।' -होला ८४ [कस]

फसोशी—स्त्री १ सूक्ष्म, बारीक, छड्न छड्न घेतलेली परीक्षा, तपासणी, चौकशी, पारख २ काळजी, श्रम, दक्षता (क्रि० खाणें, भोगणें) ३ त्रास, दगदग, खस्त, नेहमींची कट कट (क्रि० खाणें सोसणें) 'नवऱ्याची कसोशी बायकोनें फार खाली' ४ डोंबणारें व त्रासदायक दुःख, यातना, ठणका (क्रि० सोसणें) ५ आटोकाट प्रयत्न [कस, फा कोशिश्=अभ्यास, प्रयत्न] कसासींत आणणें कि कष्टसाध्य करणें जबरदस्तींत आणणें पाव १६

फस्करणें—अकि दात करकर खाणें 'दात कस्करे आणि हरळे। या नाव आदिभूतिक।' -दा ३ ७ २३ [ध्व]

फस्कसा—पु कचकच, शहारे 'नेत्रासि फौरवि कसा अणि कस्कसा य।' -अक्क गगाधर, रसकल्लोल ११६ [ध्व]

फस्त—स्त्री १ खराबी, नुकसान, झीज, तोटा (क्रि० सोसणें, खाणें) २ (ल) उणेपणा, न्यूनता, कमताई वाण (क्रि० घेणें, खाणें) 'हा कमाही प्रसंग पडला तरी कधीं कस्त

घेत नाही ' ३ तसदी, परिश्रम, दगदग, त्रास (क्रि० खाणें) शुश्रुषा, मेहनत, खस्ता 'पावल अस्त रवी मग मस्त ते कस्त करूनि ते दस्त करावे।' –अज्ञ, राधावर्णन ४ 'नाना जल्दीनें रवानगी होण्याची कस्त करीत आहेत' –ख ११ ६१५४ 'काकाच्या दुखण्यात त्यानें फार कस्त खाल्ली' [सं कष्ट, हिं कस्त=वाण, कमताई]

**कस्त**—पुस्त्री हेतु, विचार, निश्चय 'अब्दाली कोठें? त्याचा कस्त कसा आहे?' –रा १ २४९ 'पुण्यास यावें ही इंग्रजाची मोठी कस्त आहे' –खरे, ७ ३५८५ [अर कस्द्=इच्छा, हेतु]

**कस्त(स्ता)न**—न १ वाळलेला पाचोळा, केरकचरा २ (कों) गवती छपरातील काड्या, गवत वगैरे [सं कुत्सित+तृण–कुस्तण–कस्तन, तुल० का कस=कचरा, गवळ+सं तृण, म तण]

**कस्त(स्ता)न**—न. कुसण्याचा दोरखंड, गाडीचा दोर [कसणें+ताणणें?]

**कस्तर**—पुन १ डाक-ख, भांडें साधण्याकरिता किंवा फुटलेलें घट्ट करण्याकरिता जो कथलाचा लेप बसवितात तो 'कथलाचें काम करणारे व शिशाचें काम करणारे कासार ह्या मिश्र धातूचें कस्तर करितात' –मराठी ६ वें पुस्तक (१८७५) १६९ २ जडण, डाक लावण्याची क्रिया (क्रि० करणें, होणें, लादणें, बसणें, जाणें) **कस्तुरी करणें**–कस्तरणें पहा [सं कस्तीर=कथील, कल्हई, तुल० ग्री कस्सीतेरोस]

**कस्तर**—कस्तन पहा

**कस्तरणें**—उक्रि कस्तर करणें, झाळणें, डाक बसविणें

**कस्ता**—पु. (माण) त्रास, खस्ता [सं कष्ट]

**कस्ता-स्ती**—वि १ कसरता, कललेला, सरकलेला, झुकलेला (खांब, भिंत, तराजूची दांडी, माप इ०) २ (ल) हलका, कमी (मापात किंवा वजनात) ३ कमी मापलेली किंवा वजन केलेली (वस्तु माप) याच्या उलट रास्ती=बरोबर ४ (ल) हलका, खोटा, वाईट, अप्रामाणिक (धंदा, भाषण इ०) ५ एका बाजूला ढळलेलें, मार्गापासुन ढळलेलें, सरकलेलें, मार्गच्युत [सं कस्=हलणें, जाणें, का कमि=सरकणें, घसरणें?, हिंदू कोइसि घिस्=जाणें] **कस्ते घेणें**–क्रि १ एका बाजूस होणें २ माघार घेणें, अंग काढून घेणें (धंद्यांतून)

**कस्तान**—कस्तन पहा

**कस्तानी**—वि काळसर तांबूस रंगाचा, तल्या कुमाईत (घोडा)

**कस्ती**—वि फार श्रम करणारा, उद्योगी, मेहनती, कष्टाळु –स्त्री श्रम, कष्ट, मेहनत [सं कष्ट]

**कस्तुरी**—कस्तुरी पहा 'कस्तुरी चोरिली चोरें। परी परिमळें हाट भरे।' –ज्ञ ३ १७९

**कस्तुरी भेंडी**—स्त्री एक झाड –शे ११ १४०

**कस्तुर मोगरा**—पु एक वेली, तुसर –शे १० ४४

**कस्तुरी मोगरा**—पु (गो) दुर्गंधी सोडणारा एक किडा.

**कस्तूर**—पुन डाक लावणें कस्तर अर्थ १ पहा (क्रि० करणें, होणें) 'वाहकाच्या तुकड्याचीं टोकें स्वच्छ करून त्यास तिरपा पाल्वसाधा करून साध्यास कस्तूर करावा' –मेरट ८९ ०गोल-पु डाक लावण्याचें हत्यार

**कस्तूरी-कस्तुरिका**—स्त्री १ एक अति सुगंधी द्रव्य याचा रंग काळा असुन हें विशिष्ट मृगाच्या नाभींत सापडतें कस्तुरीमृग नेपाळ, तिबेट इ० हिमालयाच्या प्रदेशात आढळतात 'नेपाळेश्वर भाळस्थ चिखल कस्तूरिका मानिनी।' –मराठी ४ थें पुस्तक पृ २०७ (१९०६) 'केशरकस्तुरी ल्लाटी। कंठीं हार साजिरा।' –भूपाळी गणपतीची २ कपाळास लावावयाच्या तावट्या गंधाच्या मधोमध जो काळा ठिपका लावतात तो. ०मृग–मृग–पु ज्या हरिणाच्या बेंबींतल्या गाठींत कस्तुरी सापडते तो हरिण, एका जनावरापासुन सरासरी एक औंस कस्तुरी मिळते 'सिंहजसे प्रतिपर्वतीं नाहित कस्तुरी एण वनोवनिं कैचे।' –वामनी प्रय, ४ बोधपर सवाया ८ 'देहींच देव असता करि भ्रमतोसि व्यर्थ तू रानीं। नाभित सुगंधि असुनी कस्तुरिमृग जेंवि तो फिरे रानीं।'

**कस्वीण, कज्वीण**—कसवीण पहा

**कस्मळ**—न १ कश्मल पहा २ (माण) मोठें कष्ट (क्रि० होणें, उठणें)

**कस्रत-ती**—कसरत-ती पहा

**कस्रे-कम**—क्रिवि कमींत कमी 'कस्रेकम हजार फिरंगी उतरले आहेत' –चिरा १ [अर कस्र+कम]

**कस्स**—न (गो) कळ, कमर

**कस्सा**—कसा १ पहा (बाप्र)

**कस्सा म्हणून कस्सा**—क्रिवि अगदीं, बिलकुल 'मणी मंगळसूत्र अन् जोडव्याशिवाय कस्सा म्हणून कस्सा सुद्धा सुतळीचा तोडा देखील दादान वहिनीला केला नाहीन' –प्रफुल्लता १२ ७२४

**कहगया वहगया, कहियया वहिगया**—वि क्रिवि (हिं) वाऱ्यावर गेला, उडून गेला, नाश झाला, फुकट गेला, नष्ट झाला (उपदेश, शिकवण, भाषण इ०) याच अर्थी कहगया वहगया अथवा कंगयाबंगया–वहिगया असेहि शब्दप्रयोग आढळतात [हिं कहा गया वहा गया]

**कहड**—पु कढ, त्रास 'तेतिस कोटी सुरगण मुनिजन जोडिति ज्याला पाणी। कळिकाळाचा कहड अडमा सदा फिरकिरनिर्वाणी।' –दत्तपदें पृ. ८९ **कहडणें**–अक्रि कढणें पहा

**कहर**—पु. १ निग्रह; अतिरेक; पराकाष्ठा; जोर; अमर्याद पणा; आवेश. 'तोफेचा एकच वर्षला कहरा' –पया ५५. २ ईश्वरप्रकोप; अनर्थ; क्षोभ. 'उदंड झाला कहर तर टाकूं नये शहर.' ३ जुलूम; गहजब. ४ विकट प्रसंग. –वि. कहरी, कहरी अर्थ ४,५ पहा. 'कहर मजील–कोस–ऊन्ह–पाऊस–धारा.' [अर. कह्र्=अनर्थ] ०दर्याव-दर्या–पु अफाट, अमर्याद समुद्र; महासागर. (महासागराच्या विशालतेसंबंधीं योजतात.)

**कहरवा, कहरवी**—कारवा पहा.

**कहरी–ऱ्या, कहारी**—वि. १ भयंकर; क्रूर; अतिशय कडक, निष्ठुर. 'पारिपत्यहि कहरी होत असतें.' –खरे ८.४३६४. २ अतिशय विषारी; जालीम; जलाल (साप, विंचू वगैरे). ३ प्रखर; फणफणणारा; पोळणारा (ताप, कपाळ दुखणें, आजार, ऊन). ४ (व्यापक) पराकाष्ठेचें; बेसुमार; अतिशय दुःखद; भयंकर; प्रचंड (ओझें, मजल, कोस, पर्वत, अरण्य इ०). ५ आवेशाचें; रानटी; अद्वातद्वा (रडणें, खरडपट्टी काढणें वगैरे) ६ प्राणहारक; मर्मभेदी. 'जखमा शस्त्रांच्या कहरी लागून मृत्यु पावले.' –चित्रगुप्त ७०.

**कहा**—क्रिवि. (हिं.) कोठें? [सं. कुत्र, क; प्रा. कहिं, कहिआ] म्ह० कहा राजाभोज कहां गंगातेली (कुठें इंद्राचा ऐरावत व कुठें शामभटाची तट्टाणी या म्हणीच्या समानार्थक हिंदी म्हण. तैलंगणांतील गंग राजाच्या उपहासार्थी मूळ ही म्हण पडली).

**कहाकर**—पु. (व.) जमिनीचा विशिष्ट तुकडा, –महाराष्ट्र सप्टेंबर १९२९.

**कहाडणी–कहाडणें**—काढणी–णें पहा.

**कहाणी–काहाणी**—स्त्री. १ गोष्ट; वृत्तवर्णन; कथा, आख्यायिका. 'म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी। ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं।' –ज्ञा ९.५०१. 'कृष्णाची आणीक काहाणी। तो स्त्री जाहला मोहिनी।' –एरुस्व २.१९. २ दुःखदायक आत्मकथन; हालअपेष्टांची स्वतःची गोष्ट (क्रि० सांगणें; गाणें) ३ शिकवण, उपदेश; कानउघाडणी. 'उपडे घागरीवर पाणी नी मूर्खाजवळ काहाणी।' ४ स्वतः घेतलेल्या व्रताच्या दिवशीं बायका व्रतविषयक जी गोष्ट सांगतात ती. [सं. कथनिका, प्रा. कहणिआ, हिं. कहानी, सिं. किहाणी]

**कहाणी**—स्त्री. ज्वारीवर क्वचित पडणारा एक रोग; काजळी यानें ज्वारीचे दाणे काळे होऊन जळून जातात. काणी पहा.

**कहा(ह)त**—स्त्री. १ दरोडा; लूट; धाड (चोरांची, दरोडेखोरांची). २ एखादा वस्तूवर पडणारी धाड, उडी (खादाड मुलांची). ३ शेतावर पडणारी धाड (गुरांची, टोळांची). ४ चढाई; चाल. [अर. कहत=दुष्काळ] कहातीस येणें–क्रि. विकारवश होणें; कुस्तुलीस येणें; क्रोधाविष्ट होणें; भान सुटणें.

**कहातला, कहातेला**—वि. (व.ना.) आधाशी; हांवरा; वखवखलेला. 'असा कहातेल्यासारखा काय करतोस?' [अर. कहत]

**कहाता**—वि क्रिवि. कललेला, कस्तर; तिरपा; एका तोलावरचा; कलता.

**कहा(ह)ती**—वि. १ निर्भय; धीट; साहसी. २ तुफान; क्षुब्ध; विचारशून्य. ३ धाडसी; अविचारी; बेछूट; बेहगळ (कृत्य) ४ (व्यापक) अतिशय मोठा; बेसुमार मोठा (वजन; पर्वताची चढण, प्रवासाची मजल, ऊन, पाऊस, वारा इ०) [अर. कहत]

**कहामहा**—क्रिवि. (खा.) केव्हां तरी; कधींमधीं.

**कहार**—पु. कहर पहा. –जना ३९२. ०मांडणें–क्रि. (बायकी) अतिशय त्रास देणें; उच्छेद मांडणें.

**कहार**—पु. १ भोयाची एक जात. मेणा, पालखी वाहणारांची एक जात. २ (काशी) गडी; नोकर (हा बहुधा कहार जातीचा असतो यावरून). [सं. स्कंधकार; हिं. कहार]

**कहार**—पु. जोंधळ्याची एक जात. –शे ११.१५५.(नाको).

**कहारवा, कहिरवा**—कारवा पहा.

**कहाली**—स्त्री. १ आग; उष्मा; उकाडा. काहिली पहा. 'विषयकहालिनें अति पोळतें। जेव्हां लहर मनीं येते तेव्हां करीं कुच आपुले चोळतें।' –प्रला १०२.

**कहाल्या**—(व.) जमिनीचे लहान लहान वहीत भाग.

**कहावणें**—अक्रि. १ (को.) अतिशय भेदरणें; भयानें गांगरून जाणें. २ रागावणें; कावणें पहा.

**कहिं**—क्रिवि. कधीं; केव्हां. कहीं पहा. ०कही–कधींमधीं; कधीं तरी. 'विशेषू झाल्या कहिंकही। अभ्यास तिहीं करावा।' –एभा १३.२४८. [सं. वै. कर्हि]

**कहिरा**—वि. तिरळा. 'मदनपुतळा काणा कहिरा।'–अमृत ४२.

**कही**—स्त्री. १ (हिं.) लष्करासाठीं गवत, लाकूडफाटा इ० लुटून किंवा अन्य रीतीनें आणणारी सैन्याची टोळी. २ अशी सामुग्री आणण्याची क्रिया; सैन्याला दाणावैरण मिळवणें. 'तशा मध्यें पतिशाज निल आतात उडून कहिला।' –प्रला २०२. 'मरारनिल्हेचे खेड्यांची कही शेतें कापून नेलीं.'–खरे ५.२३१२. [फा. कही] ०कबाड–न. चारा, गवत व लाकूडफाटा. ०वाला–पु कहींतील माणूस. २ (ल.) तेजोहीन; मळीण; वस्त्रहीन.

**कहीं**—१ (खा.) कधीं? केव्हां? केव्हांहि. 'परी कहीं न करिशी संभाषण। विसरोनिया।' –शिशु ८८. 'जो दुजयाची वास पाहे। त्याचें कार्य कहींच नोहे।' –एरुस्व ५.२. 'अचिंतन

कहीं उपजेचिना।'-रयो १ १०९९ २ कोठें? कोठेंहि 'सशया तिमकासी कहीं नाहीं सुख।'-दावि ६३ [स वै कर्हि, ल्टिडु बुर्, गॉ हुर, जर्म वर, इ न्हेभर, प्रा कहिं, हिं कहीं]

कह्या—पु (हिं) आज्ञा, हुकुम, म्हणणें, सागणें 'कहे तुका जग भुलारे। कह्या न मानत कोय।'-तुगा ४२९ [स कथ्, प्रा कह] कह्यांत-(कह्या सप्तमी) आज्ञेंत, हुकुमात, ताब्यात (क्रि० असणें, राहणें, वागणें, चालणें) ०कह्यात नसणें-क्रि ताब्यात, हुकुमात नसणें

कह्लार—न कल्हार पहा

कळ—स्त्री तीक्ष्ण व एकदम उद्भवणारें दु ख, तिडीक, रग (डोकें, शरीर, पोट यात), धमक पहा (क्रि० उठणें, होणें) 'वाटी वटक वायगोळा। हातीं पायीं लागती कळा।' 'सराटे जेविं महागजातें। कळ लाउनि उभे करिती।'-श्रीधर (नवनीत पृ २२२), 'माझे पोटात कळ निघाली आहे' [ध्व] ०पडणें-क्रि चैन पडणें, विश्राति मिळणें (नकारात्मक प्रयोग) 'सुजना जेंवि खळ, कळ क्षणहि पडोंदे नरा न देवा त्या।'-मोकर्ण ११ ५४ 'चद्रावळ पाहता नपडे त्यासीं कळ। -अफला ५४

कळ—स्त्री युक्ति (उघडण्या-झाकण्याची, बद करण्याची, खुलें करण्याची), चावी, किल्ली, साधन, मर्म 'तुका म्हणे कळ। पाय धरिल्या न चले बळ।'-तुगा ४४३ 'त्याचा गर्व हरे परस्पर असा योजीत कोणे कळे।'-विगवि १० 'या यत्राची कळ दाविली कीं तें झालें सुरू' २ कला, खुबी, रचना, रहस्य, किल्ली (यत्राची किंवा युक्ति-रचनेची) या अर्थासाठीं कला पहा ३ तराजूच्या दाडीचा मधला काटा 'धाय हाणिता कळे जवळीं। पारडें उचलेल अतराळीं।'-ह ३० ८६ [स कला] दाबणें-कमान दाबणें, मुख्स्थान दाबणें, ठिकाण, किल्ली यास हात घालणें २ (ल) मर्मस्थानीं स्पर्शणें, वश होईल असें करणें

कळ—स्त्री १ भाडण, कलागत, तटा, खोडी (क्रि० काढणें, लावणें) 'ऐसें गोत्रचि दोहीं दळीं। उदित जालें अस कळी।'-ज्ञा १ १८४ 'तिनें घरातल्या घरात बारीक कळ लाव ण्यास अगोदरच प्रारभ केला होता'-रगराव 'एलवज्याचर पहिल्यानें जाउन केली कळ।'-ऐपो ३८७ २ कुरापत, भाड णाचें कारण (क्रि० काढणें) 'आम्हासि मद्र नाहीं अनुकूळ। नसती उत्पन होति कळ।'-शनि १८२ 'मी म्हणतो कीं त्वा कळ काढली'-वाळ २ ४५ [स कलि] म्ह० बोलता कळ धुता मळ=उत्तर-प्रत्युत्तरानें भाडण वाढतें आणि वरवर धुतल्यानें अधिक अधिक मळ सुटत जातो

शको २ २२

कळक-कळंक—पु १ मोठ्या जातीचा भरींव किंवा पोकळ बाबू टोकर, वळू २ (कों) एक मोठा कळक घेऊन त्याला प्रत्येक पेरावर फुटलेल्या फादीचे टोक पाय ठेवण्यापुरतें वीतभर राखून ठेवून तोडतात आणि त्या लाकडाचा उपयोग उच झाडावर चढण्यासाठीं शिडीसारखा करतात तें लाकूड 'झाड उच आहे, शिडी पुरणार नाहीं, कळक लाव'-स्त्री (कळक) बाबूचें बेट, जाळी

कळंक—पु कलक, डाग, बट्टा, कालिमा, कीट, गज कलक पहा 'तयाचिये दिठीचा झणें कळकु। लागेल तुक्षिया प्रेमा।'-ज्ञा ६ ११५ कळकट पहा [स कलक]

कळकट—न १ कल्क, मळ, गज, ताब्या वगैरे ताब्याच्या भाड्यावर आबटाचा स्पर्श झाला असता उत्पन्न होणारा हिरवट विषारी पदार्थ २ घाण (कपडे, भाडीं यावरील) [स कल्क]

कळंकट, कळकट—वि १ गजानें कळकलेलें, विषार लाग-लेलें, मलिन, खराब २ घाणेरडें, वाईट गुण ज्यात आहत असें, दूषित, पापी (माणूस, चाल, वर्तन) [स कलकित]

कळंकटणें, कळकटणें—अक्रि १ किंचित कळकणें, हिरवें होणें, गजणें २ घाणेरडें होणें, नासणें 'कळकटेना हें नाम पियुख'-दाव ७८१ [कळकट]

कळकटा—वि भाडखोर कलह करणारा 'ज्यासी त्यासी कळकटा। स्वयें सदाचा चोरटा।'-दा १९ ३ ९ [कळ= भाडण]

कळकणें कळंकणें—अक्रि विषार लागणें, हिरवें होणें; विटणें, विघडणें, गज चढणें, मलिन होणें, कळकट होणें (भाडें अम्लादि पदार्थ) [स कलक]

कळ कर-कन-दिशीं-दिनीं—क्रिवि फुटण्याचा आवाज होऊन (काच किंवा कोणत्याहि ठिसूळ पदार्थाचा) [ध्व कल्= आवाज करणें]

कळकळ—स्त्री १ मनापासून काळजी, वेध, आस्था; उत्सुकता (एखाद्या कामाविषयीं) २ मनाला येणारा द्रव, कळ-वळा, दया (क्रि० राटणें, असणें) [स कल्=जोडणें]

कळकळ—स्त्री भाडणातील आवेशाचें व ओरडून केलेलें भाषण, गोंगाट कलकल पहा [ध्व स कल्=आवाज करणें]

कळकळणें—अक्रि १ तापणें, सतप्त होणें (उन्हानें, सूर्याच्या उष्णतेनें) उकाडा होणें, धगधगणें २ चिरणें, हलणें, तळमळणें (उन्हानें) उकळी फुटणें, बुडबुडे येणें (उकळत्या पाण्याला), सळसळणें ३ अतिशय दु ख होऊन क्षुब्ध होणें; तळमळणें, व्याकूळ होणें, त्रासणें (आत्मा, जीव), पोटात कालवणें (दया, कींव येऊन), द्रव येणें, हळहळणें 'हितरत

गुरु मन पाहुनि नव सद्गुणा गुणास कळकळतें।' —मोभीष्म १२ ४३. ४ हलणें, उमळणें (अशुभप्रयोगी उपयोग) 'माझ्या पोटांत कळकळतें' ५ अतिशय भूक लागणें, खात सुटणें, करणें ६ गरजणें, ओरडणें, मोठ्यानें, उच्च सुरांत बोलणें (ओरडणांत) [ध्व स कल्=आवाज करणें]

**कळकळपणी**—न (गो) निवळ पाणी, गुळगुळपणी, पाणी मिसळलेल्या दुधाला, ताकाला म्हणतात [ध्व कळकळ+स वन=पाणी]

**कळकळी, कळकळीत**—वि किळकिळी, किळकिळीत पहा

**कळकळ्या**—वि १ रागानें ओरडून मोठ्यानें बोलणारा, रागावणारा २ कळवळ्यानें बोलणारा —सीमा किळकिळ्या पहा [स कल्=आवाज करणें]

**कळकी**—वि कळकाचें, बांबूचें केलेलें (टोपली, दुरडी वगैरे जिन्नस) [कळक] ०कागद्-पु कळकापासून तयार केलेला पांढरा शुभ्र व उत्तम प्रकारचा दौलताबादी कागद ०नारायण-पु अतिशय उंच मनुष्य, ताडासारखा उंच, ऐटबाज मनुष्य ०बाण-पु बांबूच्या नळकांड्यांत दारू ठासून जो बाण करतात तो ०चा कोंब-पु वेळूचा कोंब, याची भाजी करतात

**कळंकी**—स्त्री (गो) बांबूची एक जात, कणक [कळक]

**कळंकी**—पुवि पातकी कलंकी पहा 'गेला तरी जावो सुखें नरकासी। कळंकी याविशीं शिवों नये।' —तुगा ३७८४ ०भारद्-पु भांडखोर, कळलाव्या, तंटा लावणाऱ्या माणसाला म्हणतात

**कळकुटा**—वि (ना) कळ लावणारा, भांडण उपस्थित करणारा कळकटा पहा

**कळकुटा, कळकूट, कळंकूट**—वि कळकट, थोडासा कळकलेला, नासलेला कळकट पहा

**कळकुया**—वि दांडगा, मजबूत [कळकाचा कोंब ?]

**कळकूट, कळंकूट**—न बांबूचा लहान तुकडा [कळक]

**कळक्या-ऊंस**—पु एक प्रकारचा ऊंस हा फार टणक असून यांत रस थोडा पण फार गोड असतो [कळक+ऊस]

**कळखंड**—पु अतिशय लहान तुकडा, सूक्ष्म भाग 'भिवई जाणों कामकोदंड। नयन बाणले कापखंड। पातीं पातरिले कळखंड अंजनाचे ॥' —कथा ५ १६ १८० [स कला+खंड]

**कळगा**—पु १ काच, बांगडीचा लहानसा तुकडा 'हे व्यर्थ काचणाचे दावितिल न समरसिंधुतट कळगे।' —मोसभा ७ ९ २ (व) मोडतोड झालेलें सामान [स कल्=आवाज करणें]

**कळगा**—वि भांडखोर कळलाव्या [कळ=भांडण]

**कळगा**—पु (बेने इस्राएल) अग्नी, अग्निपात्र '(महार पोस) आपल्या गुरीचा कळगा बसीव दऊन तिनी पीक टाकले' —बेने १७

**कळंगु**—पु मिथ स्त्रियांच्या कानांतील एक दागिना (?) 'कानीं कळंगु रेखीं मुदी। केतकीदळें शोभती शिरीं।' —कथा २ १७ ११७

**कळगोंडा-घेटया-चेतया**—वि कळलाव्या, आग लाव्या [कळ+चेतविणें]

**कळघोडा**—पु कळ असलेला लाकडाचा घोडा यांत्रिक रचनेचा घोडा [कळ=कला+घोडा]

**कळघोडा**—वि (कु) हट्टी, दुराग्रही [कळ=भांडण+घोडा]

**कळंजणें**—अक्रि (गो) अतिशय भुकेमुळें किंवा रड ण्यामुळें घसा जाऊन व्याकुळ होणें (मुन ६०), मूर्च्छित होणें [स कल्ज]

**कळंजतूक**—वि अतिशय सुडौल व वजनांत भारी असे, ओटभार वजनाचें (मोतीं वगैरे) 'गवारा हातीं दीने कळंजतूक मोतीं।' —भाए ६७४ [स कलंज=परिमाणविशेष+स तुक=तोलणें]

**कळजी**—न (जनावराच्या) हृदयांतील मांस [काळीज]

**कळंजें**—न (गो) अपयश [काळें+अंजन]

**कळण**—न (गो) कडधान्याचा कट, कडधान्य शिजव ल्यानंतर काढलेलें पाणी, कढण

**कळण-णा**—नपु भरडलेल्या डाळीचा चुरा-चुरी 'आणि चुरस डाळी उडिदाची घेती। कळणा विरस टाकिती।' —यथा १७ १३४ [सं कला=अंश]

**कळणाकोंडा**—पु १ धान्याचा चूर व टरफल 'देवा कळणा अथवा कोंडा। आम्हा दई भुकेच्या तोंडा।' —तुकाराम पदें (नवनीत पृ ४४८) २ गरिबांचें अन्न 'कळण्याकोंड्याची भाकरी आणि कण्याचुरड्याची भाजी' (दळणकांडण करितांना निघणारा कणी, चुरा, कोंडा वगैरे, यावरून) ३ (ल) दळणकांडणाचा धंदा 'मी कळणाकोंडा करून पोट भरतें' [कळणा+कोंडा]

**कळणें**—अक्रि १ समजणें, उमजणें, जाणणें 'कळे साधूसी दुर्जनाची बुद्धि।' —ज्ञा ७ ९३ २ मनांत भरणें, ठसणें ३ क्षण क्षणणें, थरथरणें, चेतनायुक्त असणें, अनुभव, आठवण (विशेषत दुःखाची) राहाणें (शरीरावयव, इंद्रिय) [स कलन] **कळे न कळे इतका**—किंचित, अतिशय थोडा, लक्षांत न येण्याइतका अंश म्ह० कळेना वळेना भाजी भाकर गिळेना=अक्षरशत्रु, ठोंब्या माणसाबद्दल वापरतात

**कळणें**—क्रि (ल) ओढणें 'वाखाणिती वेदपुराण लीला। जिणे तुझा दास वळें कळीला।'—निमा १ ६१ [स कल्]

**कळणें, कयणें**—न (गो) कडधान्याचा कट कळण पहा

**कळत**—क्रिवि कळून, समजून, उमजून, ठाऊक असून मुद्दाम [कळणें] ०न कळत—न समजून, चुकीनें, ठाऊक नसता ०नकळत—१ अगदीं थोडा, हळू, न समजेल अशा रीतीनें, पक्के होय कीं नाहीं हें न सांगता येण्याजोगें 'ताप कळतनकळत येतो' २ गफलतीनें, चुकून, दुर्लक्षामुळें, प्रमादानें, अजाणता 'अपराध कळतनकळत केला असल्यास क्षमा करावी' ०मूर्ख—वि पढतमूर्ख, कळत असून मूर्ख, लुच्चेगिरीनें समजत नाहीं असें दाखविणारा [कळणें+मूर्ख]

**कळत्र**—न स्त्री, पत्नी कलत्र पहा

**कळथी**—स्त्री (गु) कुळीथ, हुलगा [स कुलित्थ]

**कळप**—पु १ समुदाय, जमाव, समूह (पशु पक्षी इ० चा), झुंड, थवा २ (ल) पंथ, धर्म ख्रिस्ती धर्मांत चर्चच्या कक्षेंतील लोकसमूहाला 'फ्लॉक' (कळप) म्हणतात यावरून, 'येशूच्या कळपांत तो गेला'—हिंदु ११ २ ३० [स कलाप, तुल० ते कलुपु=एकत्र होणें] ०शुद्ध—वि कळपामध्यें राहणारा, कळप सोडून न जाणारा याच्या उलट ओढाळ=कळप सोडून जाणारा, कळपांतून पळणारा [कळप+शुद्ध] कळपांतलें गुरूं—न (ल) दांडगा, उद्दट, अतिशय धोंड, खेडवळ असा माणूस, असंस्कृत

**कळपा, कळपणें**—पुन १ सालपट, सपटी, कवची, तुकडा, साल (भाजण्यानें किंवा ऊन्ह लागण्यानें शरीरावरील निघणारा) २ निघालेला तुकडा, खवला (गजलेल्या लोखंडाचा), पोपडा, पापुद्रा ३ दगडाची निघालेली कपरी, लाकडाची ढलपी, शिलपी

**कळपुटी**—स्त्री (गो) मासळीच्या डोक्याचा केलेला एक खाद्यपदार्थ

**कळंब**—पु कदंब, हें झाड मोठें होतें पानें रुंद असून झाडास गोंद येतो —वगु २२ —शि ५ २६३ 'देव चढले कळंबावरी।' [स कदंब, प्रा कलम्ब]

**कळंबी**—स्त्री मागची डोलकाठी, कळंबी-कळंबी पहा

**कळंबें**—न कुत्र्याचें मूत कुत्र्याची छत्री अळंबें पहा

**कळंभा**—पु भांडण तंटा 'घालें इंद्रियां लाग कळंभा।' —ज्ञा ६ १६ [स कलह+भांड]

**कळंभाड**—कळंभा पहा [कळ=कलह+भट-भाड]

**कळम**—पु (गो) कळक गज

**कळमळ-ळी**—स्त्री वांती होण्यापूर्वी पोटांत होणारी विकृति, मळमळ, उचंब, पोटांत कालवणें, ढवळणें [कल्म-ल्मानि—भाअ १८३४, क्लम्=थकणें+म्लै=दमणें]

**कळमळणें**—अक्रि १ पोटांत ढवळून येणें, उमळणें 'माझे पोटांत—मला कळमळतें' २ दयेनें, मनाच्या कोमलपणानें कळवळणें, पोटांत तोडणें [कळमळ]

**कळयारा**—वि (कु) हट्टी, दुराग्रही

**कळयुग**—न चौथें युग, कलियुग पहा

**कळलावी**—स्त्री १ एक फुलाची वेल, हिचीं पानें आल्याच्या पानाप्रमाणें असतात फुलाच्या पाकळ्या लांब असून फूल जास्वंदीच्या फुलाएवढें असतें ही वेल कुंपणावर येते हिला खड्या नाग, (कों) कळई, कळवी अशीं नावें आहेत —वगु २ २२ २ एक वनस्पति-कंद [स कलिहारि]

**कळलाव्या**—वि तंटे लावणारा, आगलाव्या, कळीचा नारद, कज्जेदलाल 'असो नारद तेथूनि निघाला। बाणासुराचे दळीं पातला। वीर कापले ते वेळा। म्हणती कळलाव्या आलारे।' —नै ८३ ८४ [कळ+लावणें]

**कळव, कोळोव**—पु (गो) मांजराचा कुचा

**कळवंड-डा-डी**—नपुस्त्री १ गमतीची कुस्ती, झोंबाझोंबी, अंगलगीस जाणें (कुत्र्या-मांजराचें) 'कुत्र्याचें कळवंड पुष्कळ वेळ चालू होतें' २ भांडण, कलह 'शिंदे-होळकर आले कळवंडी। मरणाची हुंडी।' —राला १०४ [कळ+भंड-वंड]

**कळवंडणें**—अक्रि १ मोठमोठ्यानें ओरडून भांडणें, तंटा करणें, कज्जा करणें २ भांडणांत किंवा आरडाओरडींत दुसऱ्याच्या अंगावरून पलीकडे उड्या मारणें, खेळांत भांडणें (कुत्रीं मांजरें इ० नीं) [कळवंड]

**कळवंडाकळवंड**—स्त्री परस्पर भांडण, तंडण, साधारण भांडणतंटा कळवंड पहा

**कळवंतीण**—स्त्री नाचणारी व गाणारी स्त्री, नाइकीण, कचनी कळवंतीण व कसबीण यांत भेद आहे कळवंतीण उभी राहून किंवा नाचत गाते पण कसबीण बसूनच गाते, तसेंच कळवंतीण गीत नृत्य इ० कलांवर आपली उपजीविका करते पण कसबीण उपजीविकेसाठीं देहविक्रय करते, या परस्परांना आपलें काम करूं देत नाहींत २ बाजरीच्या पिकावरील एक किडा, पांखरू फुलपांखरू, पतंग [स कलावती]

**कळवळ-ळा**—स्त्रीपु १ कींव, दया, पोटांत होणारी कालवाकालव, दयेचा उमाळा २ तळमळ 'योगियां अनारीं अति निचळ। नाहीं कळवळ कल्पना।' —एभा ८ ५६ ३ आस्था, माया 'त्याला मुलांचा कळवळा अधिक आहे'

**कळवळणें**—अक्रि १ दयार्द्र होणें, कींव येणें, द्रवणें 'रडे शिशु तयासि पै कळवळोनि माता कढे।' —केका १२१ २ व्यथित होणें, दुःखानें कासावीस होणें, व्याकुळ होणें (शिशु वगैरे, निर्बल उरणें इ० मुळें)

**कळगा**—पु ( गो ) विसपण गावाच्या माशळीचें पोर

**कळवा, कळावा**—पु १ ( घोडा वगैरे जनावराच्या ) पुढच्या व मागच्या एकेका पायास बांधलेली दोरी, दावी (सदर जनावरानें कुरणात चरत असतां दूर जाऊ नये म्हणून बांधतात ती) ( क्रि० घालणें ) 'घोड्याला कळवा घालून सोड' 'पाटीवरि मोळी। तोचि कळवा पायीं तळीं।' –तुगा १५४२ २ कळ व्यानें जनावर बांधणें, जखडणें, खोडा घालणें [ का कव्डिवु= अडवणें, खोडा घालणें ]

**कळवाकळव**—स्त्री १ सर्वत्र सांगणें, चोहोंकडे कळविणें २ यानें त्याला, त्यानें याला अशा रीतीनें सांगणें, परस्पर कळ विणें. [ कळविणें द्वि ]

**कळविणें**—उक्रि १ माहीत करून देणें, माहिती सांगणें, बातमी देणें २ फोड करून, स्पष्टीकरण करून सांगणें, शिक विणें, विवेचिणें [ कळणें प्रयोजक ]

**कळवी**—स्त्री मुख्य सरकारी खजिन्यातून खोटें किंवा बद नाणें म्हणून परगण्याच्या खजिन्यात परत आलेली रक्कम, पैसा, खोटें नाणें

**कळशी-सी**—स्त्री १ लहान घागर, केळी २ भिंतीवर किंवा इमारतीवर नक्षीसाठीं गोळा, काठी इ० वर कळसाप्रमाणें असणारी नक्षी २ ( गो ) तवला [ स कलश ]

**कळस**—पु १ देऊळ, अंबारी, देव्हारा, तंबूचा खांब, छप राचीं टोकें इत्यादिकांवर सुशोभित किंवा रंगीत असा लाकडाचा, दगडाचा, बांधकामाचा वगैरे नक्षीदार कलशाकार जो भाग लाव तात तो 'राजमंदिराचे ढळले कळस।' २ घुमटी, शिखर. ३ ( ल ) उत्तरोत्तर होणाऱ्या वृद्धीचा ( मोठेपणाचा, चांगल्या किंवा वाईट कृत्याचा ) अतिरेक, पराकाष्ठा, शिरोबिंदु, शिखर ४ एखाद्या कामाचा शेवट, अंत, पलटीचा प्रारंभ 'झाला भक्तीचा कळस। आले वसतीस दोष।' –तुगा ४१२ ५ मानेचा कळस, शिखर, मस्तक, डोकें मानेचा कळस ढळणें=मरणोन्मुख होणें ६ कलश, लहान घागर ( मातीची किंवा धातूची ) कळ सास येणें–सपणें 'कळसा आला प्रवृत्तु।' –ऋ १०३ 'कळसा आलें निरूपण। प्रेम सज्जन जाणती।' –एरुस्व १८६० 'कामहि आलें कळसासी' –दावि ४६२ **०होणें**–देऊळ वगैरे इमारतीवर कळस ठेविला म्हणजे बांधकामाची पूर्णता झाली असें होतें त्यावरून पूर्ण वैभवास चढणें, जोर, तीव्रता, विस्तार वगैरेची पूर्ण वाढ होणें ( हा शब्दप्रयोग चांगल्या व वाईट अशा दोन्ही अर्थी वापरतात) 'वैभवाचा–दु ष्टाचा कळस झाला' 'अव रंगजेबाच्या कारकीर्दीत मोगलसत्तेचा अगदीं कळस झाला होता' **०पट्टी**–स्त्री ( बांधकाम ) कळसाची नक्षी असलेली पट्टी, पान 'माडीला कळसपट्टी सोनियाची।' –लोक २६८ **०पाक**–पु पागोट्या वस्त्रावरील एक प्रकारची रंगीत वेलपत्ती ( भोजीच्या आकाराची, उलट सुलट कळस असलेली ) 'नाना मंडपीवरें। कळसपाकें दर्शनाशी आलीं।' –सप्र ९ २८. **०पाकी**–वि कळसपाक काढलेलें ( कापड, पागोटें ), विशिष्ट नागमोडी रंगीत वेलपत्तीचें ( वस्त्र, बायकांचें पातळ ) –भाअ १० ३ १२६ [ कळस+पाक ] **०पाणी**–न १ ( लग्नात ) वधूवरें न्हातेवेळीं नवऱ्यामुलाच्या अंगावरील पाणी मुलीच्या अंगावर जें पडतें त्यास म्हणतात ( सामा ) नवऱ्याचें उष्टें पाणी, एक ग्रामाचार [ सं कलश+वन=पाणी ]

**कळसणें**—उक्रि गुप्तपणें पहाणें, हेरणें, बारीकपणें व जिज्ञासुपणें पहाणें, जिज्ञासापूर्वक व चोकसपणानें तपासणें, सूक्ष्म रीतीनें व लक्षपूर्वक पाहणें, कळाशीनें पहाणें [ स कला+ईक्ष् ]

**कळसा**—पु १ ( को ) तोटीची, मातीची घागर, घडा, कोंकणात नारळी वगैरे झाडांना पाणी घालण्यासाठीं कळशा वापर तात २ ( राजा ) धातूची घागर ३ (कुंभारी) ज्यापासून मडकीं वगैरे करतात त्या मळलेल्या मातीचा ढीग. ४ ( ना. व ) अक्षयतृतीयेच्या दिवशीं ब्राह्मणास जो मातीचा कलश दान देतात तो ५ ( व ) शुभकार्यांच्या प्रसंगीं वापरण्यात येणारी मातीची लहान घागर, कलश 'कळसा घेऊन उभा रहा' म्ह० काखेस कळसा, गांवास वळसा [ स कलश ]

**कळसुंचें**—क्रि १ ( गो ) मिसळणें, कालविणें २ नार ळाचा कीस तव्यावर परतणें कलसणें पहा

**कळसूत्र**—न १ बाहुली चालविण्याची दोरी, सावन कळ सूत्री बाहुलें पहा २ (ल) मुख्य भाग, मध्यवर्ती कल्पना, मुख्य आधार, ज्यावर सर्व हालचाली अवलंबून असतात असा भाग 'जी साऱ्या नाटकाचें जणों काय कळसूत्रच आहे' –नि ५३७ ३ खरा चालक अदृश्य राहून निर्जीव वस्तू स्वयंप्रेरणेनें चलन वलन करतात असें भासविण्याची युक्ति [ स कला–कळ+सूत्र ]

**कळसूत्री**—वि कळसूत्राची, कळसूत्रासंबंधी –स्त्री (ल) क्रांति, अचानक झालेली उलथापालथ 'कशी एकाएकीं झाली धन्य कळसूत्री।' –ऐपो ४०४ **०बाहुलें**–न १ बाहुल्याचे अवयव जसे पाहिजेत तसे फिरावे म्हणून युक्तीनें त्याच्या अंगातून तारा नेलेल्या असतात, त्या तारांच्या योगानें त्या बाहुल्यांना पाहिजे तसें नाचवितां येतें, अशा बाहुल्यांपैकीं प्रत्येक प्राचीनकाळीं कळसूत्री बाहुल्यांच्या खेळाचा प्रचार सर्वत्र असे 'सूत्रधार' हा शब्दहि त्यावरून आला २ ( ल ) स्वतःचें काहीं ठाम मत नसून दुसऱ्याच्या मतानें वागणारा माणूस, कोणाच्या तरी कह्यात राहणारा, पुळपुळीत माणूस 'बाजीरावाचें कळसूत्री बाहुलें आपले हातीं बरें सापडलें असें बाळोबास वाटलें' –अस्तभा १९

फळज्ञ—वि १ सूज्ञ, जाणता 'श्लाघ्य हा तुज नरो कळज्ञ।' —अकक हरिराज मुद्गलाचार्यांचें भाषांतर ३ २ कलावान [स कला+ज्ञ]

फळा—पु १ फुलाची मोठी कळी, चोरक, कळीचें मोठें स्वरूप 'तो कनक चपकाचा कळा।' —ज्ञा ६ २५७ २ केळ फूल 'पाहला जैसा केळींचा कळा। स्वयें विकासे फळादळा।' —एभा २ ५७७ ३ चौफुला वगैरेस शोभेसाठीं कळीच्या आका राचें हातात धरण्यासाठीं जें बोंड बसवितात तें ४ घुमटीचा वरचा कळीसारखा भाग [स कलिका] ०फूल—न १ एक औषधासाठीं वाळविलेली फुलाची कळी २ कोणतेंहि कळीच्या आकाराचें फूल ०मोगरा पु (सोनारी) मोगऱ्याच्या फुलाच्या कळीसारखा आकार दिलेला कोणत्याहि दागिन्याचा भाग कळी पहा

फळा—स्त्री १ कला या शब्दाच्या सर्व अर्थी योजतात 'कीं हे नाना कळांचें जीवन।' —दा १ ७ २ 'असो सकळ कळा प्रवीण। विद्यामात्र परिपूर्ण।' —दा २ किरण, प्रकाश 'जैसें शारदीयेचे चंद्रकळे— । माजीं अमृत कण कोंवळे।' —ज्ञा १ ५६ ३ तेज 'तैसें पिंडाचेनि आकारें। तें कळाचि का अवतरे।' —ज्ञा ६ २५० 'जनविजन समान कळा। तेचि आपाद वन माळा।' —एरुस्व १ ४१ ४ चंद्राचा १६ वा अंश, त्यावरून १६ ही संख्या 'चंद्रमा कळीं घाला। न दिसे कोणें मार्गी वोसावला।' —ज्ञा १५ ३०३ 'चंद्रासि लागति कळा उपराग येतो।' —र २ ५ मनस्थिति 'काय भाव एक निवडू निराळा। जाणसी तू कळा अंतरींची।' —तुगा १६१३ ६ देखावा, दशा 'दावुनि वैराग्याची कळा। भोगी विषयाचा सोहळा।' —तुगा २८३५ ७ युक्ति 'कळा तुजपाशीं आमुचें निवन। उचित करून देई आम्हा।' —तुगा ९ ८ चातुर्य, करणी 'पान्यामार्नी रागज्ञान। केल्या अति मधुर गायन। तो पान्याचा नव्हे गुण। कळा जाण गात्याची।' —एभा १० २६७ ज्याची कळा तोच जाण।' —ऐपो १४४ ९ ज्ञान 'कस्तूरीचा वास घेईल काउळा। हरिच ती कळा कळे तया।' —ब ९८ १० हालचाल, चलनवलन 'शरिरातुनिया प्राण गळाल्या लोपति सर्व कळा।' —रत्न ४ ३ ११ प्रकार 'जेवीं माउली दखोनि डोळा। बालक नाचे नाना कळा।' —एभा ३ ५९९ [स कला] ०जाणें—वि (व) अवनति होणें, दुर्मुखलेलें दिसणें 'त्याच्याअन्रा कारखान्याच्या गल्या कळा। —ऐपो १४२ ०ईस—वि कुशल, कलावान (मनुष्य) ०कळी—स्त्री मर्म, कौशल्य 'तेथ जुंझाची कळाकळी। ते दशाचि वेगळी।' —शिशु ८७९ ०कांती—स्त्री (शरीराची, चेहऱ्याची, देहाची) चमक, सतेजता, तेज, टवटवी 'परम मळीण दिसती। कळाकांती नसे काहीं।' ०कुशलता— कौशल्य—स्त्रीन कसब व चातुर्य, नैपुण्य व करामत, शहाणपणा व बुद्धि ०कुसरी—स्त्री १ (कुसरी हा शब्द लुप्त झाला असून बहुधा कला शब्दाबरोबर अधिक जोर येण्याकरिता योजितात) चातुर्याची कल्पना, युक्ति, करामत, कुशलतेची रचना, शहाणपणाची योजना २ कौशल्य, कसर, कारागिरी (गाणें, चित्रकला इ० तील) 'पतिच्या मनावाचूनि सर्व स्त्रीच्या वृथा कळाकुसरी।' —मो ३ बारीक नक्षीकाम (जीगचें काम, भरतकाम इ०) [अनेकवचन, कळा= कुशलता+कुसरी] ०खाऊ—घाण—वि १ एखाद्याच्या मोठेपणास, अंगास कालिमा आणणारा २ जो दुसऱ्याला मूर्ख बनवितो, घोटाळ्यात, गोत्यात आणतो तो 'घरीं कळाखाऊ अवळा नसावी अशी। अवघा वेळ रागामधीं नागीण धुसधुशी।' —पला ८० २ (व्यापक) शोभा येण्यासाठीं, सौंदर्यासाठीं कोणतीहि गोष्ट केली असता तिचा ज्यावर परिणाम होत नाहीं अशी व्यक्ति (विशेषत स्त्रिया व मुलें), घाणेरडा, कळाहीन, मळकट, घाण 'कळाखाऊ कपडे घालून जर गेलात तर काम कसें होईल?' ०तीन—स्त्री (व) कलावतीण ०धर—वि कलावान पंडित, विद्वान् 'जितुके कळाधर पृथ्वीवरी। जे जे आले शाहूनगरीं।' —निमा (आत्मचरित्र) १ १०६ ०निधि—पु १ चंद्र २ ज्याच्यापाशीं पुष्कळ कला आहेत असा ०न्यास वि अनेक कलाकौशल्यानें बनविलेलें, नक्षीदार 'पाचा आगोळिया विन्यास। कळान्यास मुद्रिका।' —एरुस्व १५ ५३ ०पात्र—वि कळावान, कलावंत 'विद्यापात्रें कळापात्रें। विशेष गुणाचीं सत्पात्रें।' —दा १ ८ २३ —न कलावतीण 'तों सभेसी आलीं कळापात्रें। श्रीची लीला वर्णिती विचित्रें। त्या गौरविल्या राजीव नेत्रें। वस्त्रें भूषणें देवोनिया।' —ह २१ १५१ ०वंत—वि कलावंत पहा ०वती—वंती—वंतीण—स्त्री कलावतीण, कळवतीण पहा 'कळावती ते करी दरिद्र। कामिका पाश घालुनि।' —दावि ४५१ ०विद्—वि कलावान, कुशल 'तें कळाविदीं आइकावी। अवधान देओनी।' —शिशु ६५१ ०विदपण—न कुशलता 'एय कळाविदपण कळा।' —ज्ञा ? ३७ ०सूत्र—न कळसूत्र पहा ०सूत्राचा खेळ—पु कळसूत्री बाहुल्याचा खेळ ०सूत्राची बाहुली—स्त्री विशिष्ट प्रकारच्या दोऱ्यांनीं हालणारी बाहुली ०सूत्री—वि कळसूत्री पहा

फळाकळा करण—क्रि (ध्वनि) त्रास आणण्यासारख्या व डोकें उठविण्यासारख्या हकस्रोरपणानें भापण करणें, भीक मागणें, कंटाळा येईल अशा रीतीनें पुन पुन मागणें

फळांतर—न व्याज कलांतर पहा 'पैं कळांतर गाठीं बांधिजे' —ज्ञा १७ २८७ 'लोभ्या कळांतरीची आस। बोटें मोजी दिवस मास' —तुगा ११४७ 'द्रव्य नसेल तरी घ्यावें। रूण कळांतरें।' —दा ३ २ ३७ 'मतीत अभ्यागत आलिया

घरासी। त्यावरी जैसें कुत्तें बसवसी। कळातें काढून न्याह्या जावयासी। पाया पडोनि समजावी।' –स्वानु ३ ५ १७

**कळातीत**–वि निर्गुण (परब्रह्म) [स कला+अतीत]

**कळाये**–पु (गो) एक दागिना कळावी पहा

**कळाव**–पु (गो) उशीर, वेळ 'कळाव जालो' =उशीर झाला [स कालव्यय]

**कळावंत**–पु कलावंत, गवई वगैरे कलावान लोक 'कळावंताचें जें मन। तें कळाकार जालें।' –दा १४ ५ ३० [कलावंत]

**कळावा**–पु पायदळ, कळवा पहा 'भीम वसा विक्रम गति सेवक झाला ह्या कळावासा।' –मोद्रोण १२ २६

**कळावी-कळाविया**–स्त्री १ स्त्रियांच्या हातातील कळेदार दागिना 'करीं कळाविया बुडे ककणें। मुद्रिका रत्नें सुलक्षणें।' –कथा ५.१६ १८३ २ हत्तीच्या दातास बसविलेल्या सोन्याच्या मुळी, शेंवी, टोपण 'शृंगीं मिरविलीं मुदारीं। दतीं खोविल्या कळाविया सुरी।' –कथा ४ ९ ४६. [कळा]

**कळावो**–पु (गो) मिठागरातील माती

**कळाशी-सी**–स्त्री १ दोन लाकडें किंवा दगड यांचा एकाशीं एक घट व नीट बसविलेला सांधा, सधि २ सांध्याचा बेमालूम जोर, एकसधीपणा ३ असा सांधा करण्याकरिता दोन्ही वस्तूंचा जोडाशीं येणारा सफाईदार केलेला पृष्ठभाग 'सांध्यात दोन्ही बाजूपासून निदान तीन इंच कळाशी असावी' –बॅरट ३४ ४ कळाशी करण्याचें हत्यार ५ (गो) (सुतारी) खिळा असलेली बारीक काठी, हिनें लाकडावर खोल रेषा काढतात, टेवण, फावडी, आखणी, खतावणी ६ (व) नागराच्या दातास फाळ पक्का बसविण्याकरिता घालावयाची लोखंडी कडी ७ कायमपणा, बेमालूमपणा 'अजुनिहि न वचे हा चंद्र असाच लाशी। यदुपतिविरहाची बैसवीली कळासी॥' –सारुह ३ ११० [कला]

**कळाशी**–स्त्री (महानुभावी) मुख, हात, पाय आणि वाद्यघोष यासह नृत्य 'मोनका कळाशी करी।' –भाए ४५९ [स कला किंवा कर्शिका, प्रा कसिया=वाद्यविशेष ?]

**कळाशी-सी**–स्त्री कौशल्य कळास पहा युक्तीनें, कळाशीनें मोर्चेबंदी केली' –भाय १५

**कळास-सू**–वि धारदार, हौलदार, 'मध्य कळासु नेम्का। शुद्ध घटिका मेखळे।' –एभा ११ १४८१ 'सुरेख साबु कळासें। ओढविलें बहुतें सारासें।' –शिशु ३४७ –पु कौशल्य, चातुर्य 'तों साडवंसिसे कळासु। दाविसी तू।' –ज्ञा १७८

**कळासणें**–क्रि १ सांधा जोडणें, एकत्र करणें 'जैसे यत्र कळासिलें। तैसेच हें ठायीं ठायीं बांधिलें।' २ (ल) जखडणें, घट्ट करणें, बांधणें 'कर्माच्या वज्रगांठी। कळासे तो।' –ज्ञा १८ ३९० 'सर्वेंत्र बाधिजे कळासून।' –रयो ६ १३५ ३ फट न ठेवता बांधकाम करणें, घट्ट, मजबूत जोडणी करणें, पक्के बंद करणें 'सर्वे द्वारीं कवाडें। कळासनी।' –ज्ञा १८ ११२ 'कळासले एकेवेळें असाडकुलुपें।' –एभा २ ५१४ ४ निग्रह, निरोधन करणें 'बाहेरी धीट जैसी। दाटुगा पति कळासी।' –ज्ञा १३ ५०५ [कळासी]

**कळास्य**–पु कळाशीनें केलेली घडण, बेमालूम रचना, बांधणी, कळाशी 'पाहतां मडपाचा कळास्य। तेणें हर्षे परम हास्य।' –स्वानु ८ ५ ४९ [कळासी]

**कळिकटा-काटा**–पु. भांडण, कलह 'विधि निषेधा चिया वाटा। दाविता झाचि दिवटा। बधमोक्ष कळिकाटा। शिष्ट झाचि।' –अमृ ६ ५. –वि भांडखोर, कलह लावणारा [स कलि+कटक]

**कळिका**–स्त्री १ कलिका पहा 'परि कळिकेमाजीं सापडे। कौंवळीये॥' –ज्ञा १ २०१ २ (ल) ज्योत (दिव्याची) 'जैसी दीपकलिका धाकुटी। परी बहु तेजातें प्रगटी।' –ज्ञा २ २३८

**कळिका**–न एक प्रकारचें कापड, कॅलिको –मुन्या १२३ [इ कॅलिको]

**कळिकाळ**–पु १ (काव्य) कलियुग, कलियुगातील काळ २ (ल) अनिष्ट संकटमय वेळ, विपत्तीचा समय 'त्यासी कळिकाळाचें नाहीं भय।' –ह १८ ८२ 'घालुनिया कास करितो कैवाड। कळिकाळासि आड लागों नेदी।' [स कलि+काल]

**कळिता**–वि १ ग्रास करणारा, खाणारा 'पैं कळितया मार्जी महाकाळु।' –ज्ञा १० २४८ २ कळ चालविणारा, हातात असलेला, फिरविणारा, नियामक 'जो जगाचा नियता। ह्या काळाचा कृष्ण कळिता।' –एभा ६ ३२६

**कळिंद्री**–वि (गो) दरिद्री, दळभद्री कलंदर पहा [फा कलन्दर]

**कळिलावा**–वि कळलाव्या, आगलाव्या, भांडणतंटा उपस्थित करणारा 'एकु वेळु मीं कैलासीं गेला। तव म्हणती हा कळिलावा आला।' –शिशु १३१ [कळ+लावणें]

**कळि(ळी)वर**–न कलेवर पहा "आताचि पडो अथवा राहो। मिथ्या कळीवर।' –दा ७ १० ९ [स कलेवर]

**कळी**–पु (विणकाम) सात चटके ज्यात एकत्र असतात तो सुताचा लड [स कलिका]

**कळी**–स्त्री १ कलिका, फूल उमलण्यापूर्वी पाकळ्याचा जो परस्परात संकोच झालेला असतो ती स्थिति, मुकुल, कोरक २ कमळाच्या कळीच्या आकाराचें एका जातीचें हस्तीदंती किंवा लाकडी भांडें (यात केशर इ० ठेवितात) ३ बुरीच्या लाकडांतील

दाणा ४ लहान खडा (भाजलेल्या चुनखडीचा, मिठाचा, इ०), उदा० चुनकळी 'तुका म्हणे लवणकळी । पडतां जळीं तें होय।' -तुगा २७२९ ५ कळीच्या आकृतीचा शिवणाचा विडा-पट्टी, कळीदार पट्टी ६ आंगरख्याच्या घोळाच्या दोन त्रिकोणी भागापैकीं मागील भाग (ह दोन भाग व आगा मिळून घोळाची बाजू होते-मोल), अंगरख्याच्या कापडाचे त्रिकोणाकार जे तुकडे असतात ते प्रत्येकीं -शाको ७ सदऱ्याच्या बगलेंत किंवा चोळीच्या बगलेंत जो अनुक्रमें चौकोनी व तिकोनी तुकडा देतात ती, बगल झाकणारा कपडा ८ मराठेशाही पागोट्याच्या पुढील भागीं असलेला कळीच्या आकृतीचा पीळ ९ एखाद्या काटकी भोंवताली गुंडाळलेलें सुमारें तीन मासे वजनाचें रेशीम, रेशमी दोरा १० एखादा काटकीचा तुकडा किंवा पानाचा देठ किंवा असाच दुसरा पदार्थ ज्यावर मातीची लहानशी गोळी लावून त्यावर वेगड चिकटविलेला असतो किंवा वेगड लावलेली मातीची कळीच्या आकाराची गोळी ज्यावर बसविलेली असते तो कळस 'गणपतीच्या मस्तकावरची कळी पडली' ११ चौपाखी छपराची तिकोनी बाजू ०उमलणें-१ फुल विकसणें, फुलणें, उघडणें २ (ल) मौन सोडून मोकळेपणानें बोलावयास लागणें (आतल्या गाठीच्या व घुम्या माणसानें) ३ एखाद्याचा रुसवा, औदासिन्य जाऊन चेहरा प्रफुल्लित होणें ४ स्पर्धेनें किंवा मत्सरानें जळणें, चढाओढीच्या भरीस पडणें **कळीचा चुना**-पु भाजलेली चुनखडी, चुन्याच्या कळ्यापासून तयार केलेला खाऊ चुना (खाण्याचा) **कळ्यांची पटी**-पु (कु) चापेकळ्याची तयार केलेली वेणी **कळीचें पान, कळीदार पान**-न आकडपाचें विड्याचें पान, ज्याची आकृति शंकट किंवा कळीसारखी आहे असें टोंकदार पान **कळीचें काम**-न दगडाची चिनवरी ओबडधोबड रवाई, (दे) रेंडम रवल

**कळी**—स्त्री १ भांडण, तंटा, कज्जा, कलागत 'विकत कळी जयानें घेतली आजि मोलें।' -सारुह ३ ७८ 'कळी करि सुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं।' -कका २१ 'येगे कळी बैस माथे नळीं' २ कलियुग, चालू युग 'एसें तुगीं परी कळीं। आणि महाराष्ट्र मडळीं।' -ज्ञा १८१८०२ ३ युद्ध 'ऐसें गोत्रचि दोहीं दळीं। उदित जालें असे कळी।' -ज्ञा १ १८४ **कळीचा नारद**-पु कळलाव्या, भांडण लावून देणारा, कुचेष्टलाल, आगलाव्या, चुगल्या, लावालावी करून तंटे उपस्थित करणारा (पुराणांत नारद हा नेहमीं तिन्ही लोकांत भांडणें उपस्थित करतो असा कथा आढळतात यावरून) [कळ+नारद] **कळीवाचून काटा निघणें**-भांडणतंटा किंवा त्रासावाचून अनिष्ट गोष्ट नाहींशी होणें 'कालेजात विद्यार्थ्यांची भलतची गर्दी होत असते ती कमी व्हावी यासाठीं कॉलेजची फी वाढवून १५ रुपये करावी म्हणजे आपोआपच कळीवांचून काटा निघेल अशी कल्पना निघाली आहे' -मनोरंजन पु ७ भाग ८

**कळीत**—न उभ्या पिकाचा किंवा फळाचा अदाज, अभावणी, आणेवारी [कळणें] ०करप-(गो) कळविणें

**कळेवर**—न कलेवर पहा 'आपण व्हावें एकीकडे। देव कळेवरी जोडे।' -तुगा ३४६१ [स कलेवर]

**कळो**—पु कलह, भांडण 'मग तें कळो वाढविती। पर रूपें कष्टती।' -दा १२ २ ९ 'नित्य घरामध्यें कळो माजला करू पाहती कुगडी।' -पला ७६ [स कलह] ०कळो-(गो) बायकांची वजवज, कलकलाट

**कळो**—पु (गो) कळ्या, सोनार जातीस उपहासानें म्हणतात [कला]

**कळोतर, कळोत्र**—न वस्त्र, उपवस्त्र 'धोत्रें कळोत्रें नेसला। यज्ञोपवीत रुळे गळा।' -ह ४ ११२ [स कल्त्र=कटि+उत्तरीय?]

**कळ्योंचें**—क्रि (गो) फुलणें, कळी येणें [कळ्यो=कळ्या]

**कळ्हणा**—पु (कों) कळण, डाळीचा चुरा, कळणा पहा.

**कळ्हांटणें**—उक्रि (राजा) धान्य आणि माती एकत्र मिसळली असता हातानें चाळवून चाळवून निवडणें [स कल्=गोळा करणें]

**कळ्हो**—पु कल्ह, दंगा, भांडण, तंटा, कळी, कळो पहा. 'जाणता पुरुष असेल जेथें। कळ्हो वेचा उठेल तेथें।' -दा १९ ४ १६ (क्रि० करणें, माजविणें) [स कलह]

**कळ्ळ**—वि (वे) चोरटा [का]

**कक्ष**—पु १ खाक, खाद्याच्या खालची बाजू २ एक बाजू, बगल, कुस 'शैल कक्षांचीं कुहरें। जळाशय परिसरें।' -ज्ञा १३ ६१२ [स कक्षा]

**कक्षा**—स्त्री १ वादविवादातील वादीप्रतिवादींचा कोटिक्रम आक्षेप, उत्तरप्रत्युत्तर [स] २ खण, खोली ३ ग्रहाचा व ताऱ्याचा सचारमार्ग, चद्र, सूर्य, नक्षत्रें इत्यादि कोणतीहि खस्थ वस्तु दुसऱ्या कोणत्याहि खस्थ वस्तूभोंवतीं ज्या मार्गानें फिरते तो मार्ग, ग्रह व उपग्रह यांच्या कक्षा दीर्घवर्तुळाकृति असतात ४ (ल) सीमा, आटोका, पोंच, मर्यादा, क्षेत्र 'याची चौकशी कमेटीच्या कक्षेबाहेरची आहे' -केसरी १२ ७ ३० ५ कक्ष पहा ०पति-कक्षाधीश-पु १ (लक्षापति किंवा लक्षाधीश या शब्दाशीं जुळविण्याकरितां बनविलेलें विनोदी रूप) आपल्या पाशीं फुटकी कवडीहि नाहीं हें दाखविण्यासाठीं स्वत ज्या खाकावर करून दाखविणारा २ (ल) अत्यत दरिद्री माणूस म्ह० कक्षापती कीं लक्षापति ०पात-पु. (ज्यो) एका ग्रहाची कक्षा

दुसऱ्याच्या कक्षेच्या सरळ पातळीस ज्या बिंदूवर छेदते तो (६)नोड ०पातरेषा-स्त्री जी सरळ रेषा पृथ्वीच्या मध्य बिंदूंतून जाऊन कक्षापातास जोडते ती रेषा

**कंक्षा**—स्त्री (गो) मर्यादा, भीड, मुर्वत [स काक्षा]

**का**—क्रिवि प्रश्नार्थक वाक्याच्या शवटीं तोच अर्थ दाखवि ण्याकरितां हें अव्यय योजतात व त्यामुळें वाक्यार्थ पुराहि होतो, काय हें तू आणलेलेंपागोटें का? 'तू सम तिकडे जातोस का?

**का, कां**—उभ अथवा, किंवा, कीं 'का मुदेलिया सुधा कर। आपणपें भरें सागर।' –अमृ ७ १५२ निमोर्ली वल्कलें परिधान। का त्यागिलीं अति जीर्ण वस्त्रें घ्यावीं।'–एभा ३ ४५२ 'सळो का पळो'

**का, कॉ**—उद्गा काव्, काव् असा कावळ्याचा ध्वनि 'का का शब्द करुनी भ्रमती त्याच्या कुळात मी झालों।' –मोकर्ण २८ ५९ [ध्व]

**का**—क्रिवि १ प्रश्नार्थक अव्यय कशासाठीं, कोणत्या कार णानें, काय म्हणून, 'मीं पाया लागें का। काइसेयां लागीं।' –शिशु २२४ २ (काव्य) पादपूरक अव्यय 'देशोदेशींचे जे का नृप।' [स किम्, मेंजि क]

**काइ काइ**—सना कांहीं 'काइ करो अभ्यागतु। तुम्हीं निजा नंदें तृप्तु।'–शिशु ७४ 'काइ करीन प्राणेश्वरा।' –उषा ५४६ [स किंहि–काइ]–क्रिवि किती, काय? 'तेवि नगरप्रवेसी आनदु। काइ सांगों।' –ऋ २० 'तो निर्मेतसु काइ म्हणिजे। बोल वरी।' –ज्ञा ४ ११३ –प्रश्नार्थक अव्यय, काय 'असो तुम्हीं आमुचा मर्ता। दखीला काइ जाता'' –रास २ १८१ [स किंहि–काइ]

**काइणी**—स्त्री (प्र) काइणी, कद्दाणी जोंधळ्यावरील रोग काणी पहा

**काइमी**—स्त्री कायमपणा, स्थिरपणा, पक्केपणा, शाश्वति अढळपणाची स्थिति, ठरलेली परिस्थिति [अर काईम]

**काइरस**—पु काकडी वगैरे कच्च्या फळाची चिंच, गूळ घालून केलेली पातळसर कोशिंबीर कायरस पहा [का काई= कच्चें फळ+रस]

**काइलींतला खडा**—पु १ उसाच्या रसाच्या काहिलींतील खडा २ (ल) तावून सुलाखून निघालेला, कसोटीस उतरलेला माणूस

**काइसा-सी सें**—सना १कसला? कशाचा? कोठील? 'द्दावो कवणु असे आंगनीं चाद्दाळु काइसा।'–शिशु १७२ २ कशाचा ची–चें? कशाकरितां? काय म्हणून? ३ कसा–सी– सें? 'ऐसें कांइसें वो निढाळपण।'–शिशु १५९ [कसा]

**काइसेन-नि**—सना कशानें, कोणत्या मार्गानें, प्रकारानें? 'वेदशास्त्रयुक्तिबळें। माझें स्वरूप काइसेनि न कळे।' –एभा १९ ५३ 'जंव जीवाशिवा एसी गति जाली। तेंव आता काइसेन कराची बोली।' –स्वानु १० ५ ६ [कसा, कशानें]

**काई**—वि (त) कच्चा –न कच्चें फळ [द्रा का काई=कच्चें फळ]

**काई काई**—१ (काव्य) काय?,काइ पहा 'एरीकडे श्रीचक्रपाणी। काई करिते जाले।' –शिशु ८५२ 'ऐं प्राकृतें काई जालीं।' –दाव ३४० 'तेणें मतें काज काई।' –विउ ८ १३ २ कसें? ३ कांहीं तरी 'मेला काळा विकाळ दशानन करून काई।' –राला ९

**काईट**—पु (व) काळवीट (अप) पहा

**काईत**—पु (हिं) कायस्थ जात व त्या जातींतील व्यक्ति कायत पहा

**काईम**—वि १ कायम, उभा २ स्थिर, मजबूत ठोक लेला, पक्का ३ कावीज 'परंतु आठपधरा दिवसात सारीं स्थळें इंग्रजानी काईम करितात' –खरे ११ ६०७९ ४ नित्य [अर काईम्=उभा, स्थिर] ०दाईम, कायमदायम–वि निर तरचा, कायमचा, फार काळ पूर्वीपासुनचा, सतत चालणारा [अर काइम्+दायम्]

**काईल**—स्त्री काहिली, उसाचा रस कढविण्याचें, पसरट तोंडाचें भांडें, मोठी कढई [स काहल=विस्तृत, काहला=मोठा नगारा]

**काईल-यल-यर**—वि १दडित, जित 'दोहींकडून तुम्ही काईल व्हाल तेव्हा आम्हावर शब्द' –रा १ २२६ २ कुंठित निरुत्तर 'पत्र खोटें आहे तें शाबीद म्हणजे आम्हीं त्यास काईल करू' –खरे ५ २४७१ [अर काइल्=जित]

**काउ-ऊ**—पु (बालभाषा) कावळा 'ये रे ये रे काऊ। बाळ घाली जेवू।' ०काऊ–उद्गा कावकाव पहा 'मग आठवावे कृष्णाबाई। श्रमें फुटल्यावर होइल काउकाउ।'–सगा ८९ [ध्व]

**काउरें**—न वड, काविरें पहा

**काउस**—न (व) एक प्रकारचें गवत हें शेतात उगवतें याच्या मुळ्या १०–१२ फूट खोल जातात त्या पिकाना त्रास दायक असतात [स काश]

**काउळा**—पु कावळा 'तरी तो काउळियांसीचि सुकाळु जाहला।' –ज्ञा १ ४३८ [कावळा]

**काउळकाठी**—स्त्री फाटक्या, रायासाठीं झाडाच्या तोड लेल्या फांद्या, कवळकाठी पहा

**काऊ**—स्त्री (कों) गेरू, काव पहा

**काऊन-हून**—(ना) कां म्हणून

फाऊर—वि (व) जबर काम करणारा, मेहनती. 'म्हातारा मोठा फाऊर आहे' [स कार्यकर]

काऊल—न (वे) तुरण [का कावल-ली-लु]

काऊस—पु १ (व) उसाच्या शेंडयाचा नीरस भाग, वाढें २ (ल) कुचकामाचा माणूस म्ह॰ उसाच्या पोटीं काऊस जन्मला=हिऱ्याच्या पोटीं गारगोटी [स कु+इक्षु]

काऊळकुटी—(गो) कवळकाठी पहा –शे ३ ९

काक—पु कावळा, काऊ 'जे मृत्यु काकामि पुरोडी। साडिली आहे।' –ज्ञा ८ १४० 'देऊनि काक घ्यावे पाच तुवा चिन्-चई–शितिकठ।' –मोसभा ४ १९ [स] ॰जंघा–स्त्री एक वनस्पति, काग [स] ॰तालीय न यदृच्छा, आकस्मिकता, दैवघटना –वि यदृच्छापूर्वक, एकसमयावच्छेद, सहजासहजीं घडणारी, आगन्तुक, दैवागत [स काक+ताल=ताड] ॰तालीयन्याय–पु (मूळ संस्कृतात कावळा येणें व त्याच वेळीं ताडफळ प्राप्त होणें याचा दृष्टात आकस्मिक इष्टवस्तु-लाभाच्या वेळीं देतात) ताडाच्या झाडाच्या फांदीवर कावळा बसला आणि त्याच वेळीं जर कर्मधर्मसंयोगानें ती फांदी मोडली तर बसणें आणि मोडणें ह्या दोन क्रियाचा एकमेकींशीं वास्तविक कार्यकारणभाव नसताहि अज्ञानी लोक त्याचा परस्परांशीं सबध जोडतात त्याप्रमाण यदृच्छेनें किंवा अकल्पित तऱ्हेनें एखादी गोष्ट घडून आली असता तिचा सबध दुसऱ्या एखाद्या विशिष्ट गोष्टीशीं कोणी माणूस जोडू लागला तर त्यावेळीं हा न्याय लागू करतात यावरून काकतालीय न्यायानें म्हणजे यदृच्छेनें, कर्मधर्मसयोगानें, दैवगतीनें असा अर्थ होतो 'ऐसी कर्माचि गति गहन। एथ काकतालीयन्यायें जाण। अवचटें लाभे माणूसपण। भवाब्धितारण महातारू।' –एभा २० १७३ 'प्रस्तुत पुस्तक लिहिलें जाण्यास काकतालीयन्यायानें आम्हीं कारण झालों' –टि ४ १८१ ॰तालीयवत्–क्रिवि केवळ यदृच्छेनें, दैवयोगानें, काकतालीयन्यायानें [स] ॰ताळ–काकतालीय पहा 'अमृतसिद्धी योग फावला। अकल्पित काकताळें।' –निमा (आत्मचरित्र) १ १०४ ॰दंतपरीक्षा–स्त्री ज्यात काहीं अर्थ नाहीं अशा विषयाची खोल चिकित्सा (वास्तविक कावळ्याला दात नसतात यावरून) (सस्कृत म्हण) ॰दृष्टि–वि १ तीक्ष्ण दृष्टीचा, सूक्ष्म दृष्टीचा, बारीक व चलाख नजरेचा २ छिद्रान्वेषी वाईट तेवढयाच गोष्टी पाहणारा –स्त्री (कावळया सारखी) तीक्ष्ण नजर, सूक्ष्म नजर, दृष्टि 'बाजारातून जर सोदे काकदृष्टीनें फिरलें तर सध्याकाळीं येथें वेळ मोडून राहण्याचा मोथ दला मिळेल' –विवि ८ ८ १५५ [स] ॰पद–न १ लिहिताना गळलेल्या अक्षराच्या दुरुस्तीच्या वेळीं जेथें तें अक्षर घालावयाचें असेल तेथें करावयाची (कावळयाच्या पाया सारखी) Λ अशी खूण (गु) काकपत्र २ हिरा या रत्नात तीन मोठे काळे छाटे असत्यास त्या दोषास म्हणतात [स] ॰पक्ष–पु (कानावरील झुलपें, लहान मुलाच्या पहिल्या हजामतीच्या वेळीं दोन्हीं कानावर हीं झुलपें ठेवतात व मोठेपणीं तीं काढून टाकतात परतु काहीं लोक (विशेषत लष्करातील मराठे) तीं नेहमीं ठेवतात [स काक+पक्ष=पख) ॰फळ–फळी–स्त्री एक वनस्पति –न तिचें फळ हीच काकमारी नांवाची वनस्पती असावी असें काहींचें मत आहे ॰बलिबळ–ळी–पुस्त्रीन (को गो) वैश्वदेव व बलिहरण होऊन उरलेला भात घराबाहेर कावळ्याला टाकतात तो, कागवळ ॰मारी–काकफळी पहा ॰मुखी–वि सगळा एकरंगी पण तोंड काळसर असलेला (घोडा) ॰मैथुन न कावळी–कावळा याचा रतिप्रसग, मैथुन हें पाहिल्यास लवकर मरण येतें अशी समजूत असल्यानें तें पाहणारा आपल्या मृत्यूची खोटीच बातमी पाठवितो म्ह॰ 'काकमैथुन पहावें सहा महिन्यात मसणात जावें' ॰मैथुनशांति–स्त्री काकमैथुन पाहिलें असता पाप किंवा अनिष्ट निरसनार्थ करावयाची शाति ॰यव–१ ज्यामध्यें पीठ किंवा सत्वांश नसतो असा पोंचट यव, पोल, फोलकट, धान्याचें वाझें कणीस २ तृणधान्य 'पढतिल चर्ममयमृग काकयव जसे तसेचि फटकळ गे।' –मोसभा ७ ९ [तुल॰ फा काक=कोंडा] ॰रव–१ कावळ्याचें ओरडणें, कावकाव 'दिवसां काकरवातें भीते रात्रीं तरूनि जाय नदी।' २ (ल) निंदकाची व्यर्थ निंदा 'ज्यास आपली योग्यता यथार्थ भासत असेल त्यानें कर्णकटु काकरवाची अगदीं पर्वा करू नये' –नि ॰वंध्या–स्त्री एकदा प्रसूत होऊन पुन्हा जी प्रसूत होत नाहीं अशी स्त्री, मादी ॰शंका–स्त्री कावळा ज्याप्रमाणें साशकपणें बसतो तसा साशकपणा, भीति, शका 'सर्पोचें अग खाणें असुखद बसणें काकशकाप्रमाणें।' –केंसु ८३ ॰सावळा–वि काळा, काळया सावळया रंगाचा ॰स्नान–न (कावळयाप्रमाणें) घाईघाईनें, अर्धवट केलेलें स्नान, अघोळ, मुसळस्नान पहा ॰स्पर्श–पु मृताच्या दहाव्या दिवशीं मृतास द्यावयाच्या पिंडाला कावळ्यानें शिवणें हा पिंड तयार असता त्याला कावळा शिवला नाहीं तर मृताच्या आप्तापैकीं कोणी तरी त्यावेळीं मृताच्या इच्छा पूर्ण करण्याचें वचन देतो व त्यानतर पिंडाला कावळा स्पर्श करतो [स] ॰स्वर–पु १ कावळयाची ओरड, काव काव २ (ल) कर्णकठोर स्वर

काक—पु (माण) फारी फुगण्याचा साधा, काख [स. कक्षा]

काक, कॉक—पु तोटी, नळाची चावी –शिल्पवि २२८ [इ]

काकई—स्त्री १ कवच असलेला एक प्रकारचा मासा २ त्याची कवची

**काककव्वा**—पु काकावुवा काकाकव्वा पहा

**काकट-ड**—वि अढळ, स्थिर, मजबूत बांध्याचें

**कांकटणी-डणी**—स्त्री (गो) तिरपीट, अडखळण्याची स्थिति

**काकड**—स्त्री थंडीनें भरणारी हुडहुडी (क्रि० भरणें) [काकडणें]

**काकड**—न १ कांकडाचा वृक्ष हा मोठा असून याचीं पानें साधारण मोठीं व लांबट असतात काकड हें फळ आवळयाएवढें दिसतें, परंतु त्यात आवळ्यासारखी मोठी आठी नसते याचें लोणचें चांगलें होतें —वगु २ २४ —शे ९ २६४ [स कर्कटक]

**काकड**—पु १ (काव्य) खडा, कंकर, २ कुचर, चाड —वि (राजा) पुरतेपणीं न शिजलेला, कच्चा (भात, चाड) कडधान्यातील जे दाणे भिजत किंवा शिजत नाहींत व कठिण राहतात ते 'सगळें शिजविता अवघड। काकड करिती कड कड। समभावें भरडी दृढ। होतील गोड परिपाकें।' —एरुस्व १८ ४५ ते अपवचि राहे प्राप्ती। जेवीं काकड जाती मुगाची।' —एभा २४ ४१९ [स कर्कर, प्रा ककर, म कंकर]

**काकडआरती**—स्त्री पहाटेच्या वेळीं काकडा पेटवून त्यानें देवाला करावयाची आरती 'काकडआरती परमात्म्या श्री रघुपती।' —पावि २६० [काकडा+आरती]

**काकडकुडा**—वि थंडीनें काकडलेला, कुडकुडलेला, ताठर लेला [काकडणें+कुडकुडणें]

**काकडणें**—अक्रि थंडीनें गारठणें, कळा येऊन अवटरणें, संकुचित होणें (हात पाय, इ०) 'काकडलें बैसली दातखिळी।' —दावि ६६ 'आणि हिमाच्या वर्षावानें काकडलेली ऐशी।' —केक ४ [ध्व कड]

**काकडशिंगी**—स्त्री एक औषधी वनस्पति हिरडयाच्या पानाच्या देठाशीं रस जमून तेथें फोडासारखी ग्रंथी बनते ती शिंग हिचा रंग काळसर असून आकार खेंकडाच्या आकड्याप्रमाणें किंवा बोकडाच्या शिंगाप्रमाणें असतो म्हणून हीस हें नाव पडलें बाळतपणात किंवा लहान मुलाच्या रोगावर ही औषधीआहे —शे ११ ११७ [स कर्कटशृंगी, हिं काकडसिंगी, व काकडा=खेकडा]

**काकडा**—पु १ (को) पुरतें पिकलें नसलेलें भात पीक वगैरे कोंवळें, कच्चें फळ (पेरु इ०) (गो) काकडो —वि लहान, व रसभरित, हिरवा व रसाळ जारस पहा

**का(का)कडा**—पु १ कापडाच्या चिंधीची वळलेली वात 'निगुण काकडा द्वैतघृतें तिंबिला।' —दावि २६० २ दिव्याची वात ३ काठीला चिंधूट गुंडाळून त्यावर तेल ओतून पेटविलेली मशाल 'सूक्ष्माहि रविकराहुनि बहुत तमा काय काकडा खातो।' —मोभीष्म ७ ६ ४ कापडाची बारीक गुंडाळी—दोरी ५ (ल) चामड्याच्या चाबकाचें टोंक, चाब काच्या वाद्या प्रत्येकीं ६ वादीनें मारलेला फटकारा, तडाखा ७ (ल) लांब आंकडा (चिंच वगैरेंचा) ८ (खान ल) विंचवाची वळलेली नांगी

**काकडा-डी**—पुस्त्री अतिशय थंडी, अंग गारठविणारी थंडी (क्रि० भरणें)

**कांकडी**—स्त्री १ एक प्रकारचा वेल व त्यास येणारें फळ तवसें, खिरा काकडीचा वेल असतो खिरा, वाकडी, वाळुक, तवसें इ० फळें एकाच जातीचीं आहेत काकडींत साधी, सात पानी, टरकाकडी, तवसें व नारंगी अशा जाती आहेत काकडीची भाजी, कोशिंबीर, साडगे, लोणचें, वायरस इत्यादि पदार्थ करतात पाढऱ्या काकडीला राजकाकडी असें म्हणतात ती पडवळासारखी लांब असते काकडी मूत्रकारक, थंड, रुक्ष व रक्तपित्त आणि मूत्र कृच्छ्र याची नाशक आहे —वगु २ २५ पिकलेली काकडी पित्त कारक व कफवातनाशकारक आहे —योर १ ४३ 'जन्मकाळची काकडी। भक्षिताहे।' —दा ३ १ ९ म्हृ० कोल्हा काकडीस राजी २ लहान भोपळा, कोहळा [स कर्कटी, प्रा हिं प कक्कडी, सिं ककिडी]

**काकडें**—न (को) कोवळें दाहाळें, अडसर

**काकण**—पु. (कु) गरुड पक्षी [स कक=श्येन ?]

**काकण-णी**—नस्त्री कंकण, १ बांगडी, पाटली, बायकांच्या हातांतील सोन्याचा एक दागिना, कंगणी, मनगटाचें भूषण, अलंकार 'घोंसाळा काकणाचा हातीं। नारीं सेंडें धारितीती।' —शिशु ५९० 'कां नाटितां कांकण। सोनेंचि तें।' —ज्ञा १४ ३७८ [स कंकण] म्हृ० हातच्या कांकणास आरसा कशाला ? ०घालणें-भरणें-हातात बांगड्या भरणें (ल) बायकी, भागूबाई, म्याड पुरुषास लावतात 'काकणें आम्हासम हातीं। भरलेलीं का हो होतीं।' —समामगीतें ४२ ०फोडणें-(गो) १ वैधव्य आणणें २ कडक शिक्षा करणें ०वाढणें-वाढविणें-(बायकी) बांगड्या पिचणें फुटणें, (काकण हा सौभाग्य लंकार असल्यानें त्यास फुटणें न म्हणता उलट वाढणें, वाढविणें असा प्रयोग करितात उ० कुंकू वाढविणें-वाढणें इ०) ०कार-पु (गो) बांगडी कासार, बांगडीवाला कांकणवाला पहा ०कोर-न (ना) बांगडीचा तुकडा ०घोण-स्त्री (गो) गोम, घोण ०भर, दोन काकणें-थोडें अधिक जास्त, दोन वस्तूंची तुलना करताना एकीचें दुसरीवर किंचित आधिक्य दाख विण्यासाठीं योजितात 'त्यापेक्षा हा कांकणभर जास्त होईल' 'पुरुषाइतकीच किंवा कांकणभर जास्तच बुद्धिमत्ता असून कित्येक शतकें आम्ही विचार करावयाचें सोडून दिलें' —विविधवृत्त (खास अंक १९२८) २ (ग्रामा) अल्पप्रमाण, कांकणभरानें

– त्यानें अशींहि रूपें आढळतात ०वाला–पु. बागडया भर णारा, कासार ' काकणवाले फुलारी कासार। ' –दावि ४८८

**काकणता, कांकणा**—पु १ (सोनारी) गोठ, पाटली, आगठी, वाकी, किंवा नासारख्या दागिन्यास गोल आकार देण्यासाठीं केलेला खुग, निमुळता लाकडी ठोकळा, देशमुख, वरलाणा, काकता २ (दे) चौंगा, पाच अगुळें रुंदी, हाताची रुंदी [ कंकण ]

**कॉंकणा**—पु (गो) शूद्राची एक जात [ कोंकण ]

**काकणी**—(गो) अर्धे कणीस

**काकणी ताफता**—पु तापता, ताफता नावाच्या कापडाचा एक प्रकार

**काकणी पाग**—न (कों) मासे पकडण्याचें एक प्रकारचें जाळें [ काकण+पाग ]

**काकणेज**—न रेणुका, रेणुकबीज एक सुगधी औषधी द्रव्य –मुव्या ११०, १६५

**काकता**—काकणता पहा

**कांकवाळ**—न (कु) कडेवरचें मूल, कुकुवाळ

**काकंवी**—स्त्री काकवी, चिकी, राब [ दे कक्कव का ]

**काकम, काकै**—स्त्री (गो) काकवी

**काकय**—स्त्री (गो) कावीळ

**काकर**—पु (पिंजारी) कापूस पिंजण्याच्या कमानीस असलेल्या पल्याच्या कडेवरील पट्टी

**काकर**—स्त्री १ (भाकरीचा खेळ) नदीतील तलावातील पाण्याच्या पृष्ठभागावर खापरी अथवा चपटा दगड जोरानें पाण्याला लागून मारला असता होणाऱ्या उशा प्रत्येकी २ भोंवरा जमिनीवर टाकला असता त्याचे होणारे पहिले एक दोन फेरे (हे हलू होतात)

**काकर**—पु (हिं) खडा कंकर, पहा

**का-कांकर**—पु १ कातड्याची वादी, ढोल, तबला याची वादी, ओढण, कक्र पहा २ (राजा) शरीरावर नखानें वोचक रल्यामुळें होणारा ओरखडा, ओरबाडा, खरचटल्याची खुण ३ ज्याला छातीच्या बरगडया जुळलेल्या असतात तो कण्यासुद्धा पाठीचा भाग ' बरगडया, मान, काकर वगैरे भागातलें मास व हाडें यखनीच्या चागलीं उपयोगी पडतात –गृशि २ १३

**काकरणें**—अक्रि चाचरणें, का कू करणें डळमळणें, हो ना करणें, दिरगाई करणें [ काकू करणें ]

**काकरणें**—अक्रि (व) मिटणें, लागणें 'सगळया रात्रींत डोळा काकरला नाहीं '

**का(का)करता**—वि क्रिवि तिरकस, वसरता, वळलेला, तिरपा, बाजूवर कललेला ०येणें–क्रि माघार घेणें, मागें पाय काढणें, निसटणें

**काकरी**—स्त्री नागराची एक फेरी, वळसा (क्रि० घेणें)

**काकरी**—स्त्री (व) चिंता, काळजी, द्रुमणें ' एक सारखी आमच्या मागें काकरी असे '

**काकरी**—स्त्री (गु) बारीक खडी, दगडाच्या बारीक चिपा, 'रेती अथवा काक्री टाकून जागा साफ करावी ' –स्वारी नियम (बडोदें) ११५ [ कक्कर ]

**काकरी**—स्त्री कातलेलें रेशीम, त्याचे गुडे, गुडाळें, लड, कुकडें, कक्री

**काकरोळ**—पु एक पक्षी, ' ढोंक, कबूतर, सुरखाब, काकरोळ हे जसे जमीनीवरचे पक्षी ' –गृशि २ १०

**काकलक**—न कठमणि, नरडा, कठनाळाचा पुढें आलेला मुख्य भाग [ स ]

**काकळूत**—काकळूत पहा

**काकवी**—स्त्री १ उसाच्या रसाचा कच्च्या कणाचा पातळ राधा २ आटवून थोडासा घट्ट झालेला उसाचा रस मडक्यात भरून तीं मडकीं घडवचीवर पालथीं ठेविल्यावर त्यातून गळून पडणारा रस ' भिऊनि म्हणतील का जशि सुधा तशी काकवी।' –केका १०९ [ दे ककव, का काक्वी ]

**काकसावणें**—अक्रि (कुण) शका घेणें, अदेशा धरणें, आशका धरणें [ स काक्षा ]

**काकसासू-सासरा**—स्त्रीपु (तजा) नवऱ्याची आत, तिचा नवरा [ काका=आत ]

**काकळूत, काकळूत मामळूत**—स्त्री १ दया करण्याबद्दल परोपरीची विनवणी, कळवळा उत्पन्न करण्यासाठीं गयावया करून प्रार्थना, विनति करणें, करुणा भाकणें (क्रि० करणें) २ करुणा, दया, अनुकपा, कळवळा (क्रि० येणें, करणें) 'देवाला भक्ताची काकळूत आली ' 'बा गडयानों, तुमची मला काकळूत वाटल्ये ' –बाल १ ७० ८० ३ दयेमुळें अपराधाची उपेक्षा करण्याची बुद्धि [ स काकलि=मजूळ, बारीक मृदु तुल का कक्लाते= प्रेम दया काकळूत ] **काकुळतीस येणें**–अत करणाला पाझर फुटविण्यासारख्या रीतीनें गयावया करणें **काकुळती करणें**–१ दया येणें विनवणीनें हृदयाला द्रव येणें, २ अति दीनवाण्या रीतीनें पदर पसरून कळवळयानें मागणें **काकुळता करणें काकुळती येणें**–(राजा) दया भाकून द्रव येईपर्यंत विनवणी करणें **काकळूत वाणा-णी**–वि दीनवाणा, रडवा (स्वर ध्वनि, वाणी)

**काका**—उद्गा कावळयाची कावकाव काव पहा ' स्वज्ञाति श्रेष्ठाचें गतिताडव पाहताचि काकानीं। इयभरें नभ भरिलें का का का का अशा स्वहाकानीं। ' –मोकर्ण २८ ४१ [ ध्व ]

काका—पु १ चुलता, बापाचा भाऊ २ एखादा आप ल्याहून वडील पुरुष यांसहि म्हणतात व्यावहारिक नाव पहा 'त्याचा काका दुसरा'=त्याच्यासारखा दुसरा कोणी' [ हिं काका, दे का कक्क, सिं काको, तुल० फा काका=वडील भाऊ ] ०मामा-कोणी तरी नातेवाईक, आप्त, स्वकीय ०मामा करणें-मनधरणी करणें

काका—स्त्री (कु) आत, आत्याबाई, सावीस

कांका—पु (कों) नारळाच्या सावळीचा (झावळीचा) अग्रभाग, माडावर ज्या दांडयाला फुलें व फळें (नारळ) येतात तो दांडा, पोय याला अनेक फांटे फुटलेले असतात 'काक्याचे अळवण चांगले होतें'

काकाकुवा, काकातू—पु काकाकुवा, एक प्रकारचा पोपट [ हिं काकातूआ, मलाया काकातुआ, इं कॉकाटू, काका+हिं कौवा ]

काकाडो—पु (गो) ल्हान व कच्चें फळ, काकडा

कांकाण, काकाण्णो—न (कु गो) बांगडी, कंकण, पहा [ सं कंकण, म कांकण ]

कांकारडा-डो—वि (कु) अपक्व, कच्चा, हिरवा, काकाडो, कांकडी विशेषत काजूला म्हणतात

काकांवचें—क्रि (गो) कोंबडयाचें ओरडणें [ ध्व गो कॉं=कोंबडयाचें ओरडणें, कोकलणें, तुल० इं कॉक ]

कांकाळणें—क्रि (कु) कचरणें, डगमगणें कांकरणें पहा

काकाक्षिगोलकन्याय—पु (कावळयाच्या दोन डोळ्यात एकच बुबुळ असून तें तो प्रसंगाप्रमाणें एकांतून दुसऱ्यांत फिरवितो अशी लोकसमजूत आहे त्यावरून हा न्याय) एकच शब्द अनेक अर्थांनीं योजणें एका शब्दाचे दोन किंवा अनेक अर्थ संभवत असल्यास किंवा एकाच वस्तूचा दोन किंवा अनेक कामीं उपयोग होत असल्यास त्याच्या स्पष्टीकरणार्थ हा न्याय लावतात

काकिणी—स्त्री १ वीस कवडयांचें वजन, एक दमडी 'काकिणी म्हणजे वीस कवडी।' -एभा २३ ३५४. २ एक कवडी ३ एका दंडाच्या (काठीचा) चौथा भाग, एक हात (कोपरापासून मधल्या बोटाच्या टोकापर्यंत) [ सं काकिणी, काकिणिका ]

काकिता—स्त्री (संगीत) गातांना कावळयासारखा निघणारा आवाज

काकी—स्त्री काकू, चुलती, काकाची बायको काका पहा [ का ककि, फा. हिं काकी=मावशी ]

काको, कांकी—स्त्री एक प्रकारची रानातील पालेभाजी

काग्री, फांकी—स्त्री काकवी पहा

कां कीं—उभ (का=काय+कीं=असें, का? असें जर विचारलें तर त्याचें कारण असें) कारण कीं, सबब, म्हणून, का तर 'पोरास ल्हानपणापासून शिस्तीत ठेवावें कां कीं, मोरपणीं शिस्त लागत नाहीं' 'नवीन मराठी ग्रंथ वाचावे, कां कीं नवीन शब्द, नवी भाषापद्धतीचें अवलोकन करावें' -विवि ८ ८ १४२ [ सं किंकिं ]

कांकीट—वि (कों) सडपातळ बांध्याचा, बारीक, पातळ, किडकिडीत [ सर काकू=वाळका, सडपातळ ]

काकीमुख—न (हटयोग) सुषुम्ना नाडीचें टोंक, ब्रह्मरंध्र 'निघोनि काकीमुखाची वाट। सवेग निकूट घेतलें।' -एभा १४ ४४६

काकीस—स्त्री (कों कुण) आत्या, आपल्याहून वडील भाद्या स्त्रीला सन्मानार्थी म्हणतात काका पहा

काकु—स्त्री एक प्रकारचा अलंकार, यांत प्रश्नार्थक किंवा दुसऱ्या स्वरानें शब्दार्थांच्या अर्थाहून उलट अर्थ ध्वनित होतो, स्वरभेदेंकरून विरुद्धार्थ करणाबोधक जो वाक्याचा डौल तो. 'मी काय तुम्हीं आपणें समजत नाहीं? परंतु काय करूं उपाय नाहीं?' (यांत आपणें समजतों असा अर्थ होतो) 'तो काय मूर्ख आहे?' हें होणार नाहीं?' (म्हणजे हें खात्रीनें होईल) [ सं ]

काकुलता-काकुलपण—स्त्रीन काकळूत पहा 'तरी त्यास काकुलपणें सांगून पहावें' -भाव १३२

काकुलती-ळत-ळती—स्त्री याचना, कींव इ०, काकळूत पहा 'अहो देहो पार्थिव कीर जाये। ययाची काकुळती कवण आहे।' -ज्ञा ११ ३६७ 'आठवण तुम्हीं यावी पांडुरंगा। कींव माझी सांगा काकुलती।' -तुगा २२०७ [ का कक्कलाते ] ०स येणें-जाणें-करणें-करुणा भाकणें 'किती देवा येऊं तुम्हां काकुळती। काय या संचितीं लिहिलें माझ्या।' कोठें विशेषणार्थीहि योजतात 'आणिका मी कोणहा जाऊं काकुळती। रोण कामा येती अंतकाळीं।'

काकुलवंत—वि (गो) दयाई स्वभावाचा

कांकुला—पु मुलाची डोई करतांना टाळूवर जे केस ठेवतात ते, चौल (क्रि० ठेवणें) [ सं काक+कला? ]

काकू—स्त्री चुलती, काकी पहा

कांकूं, कांकूं—क्रिवि १ अनमान, अळटळ, टंगळमंगळ करीत 'मी बोलतों या विषयीं स्पष्ट काय तें सांगा, कांकू करीत बसू नका' -स्त्री २ टंगळमंगळ, घरसोड, अळटळ, चुचराई कुरकूर (क्रि० करणें) सारें एरव्हचमारा आयुष्य देखील लोकहिताकडे व्यात लोकांनीं कांकू करावी ना?' -टि ४ १४८ 'आम्हीं कितीहि कांकू केलें तरी विद्याप्रसार हा होत जाणारच' -आगरकर ३ कण्हणें (ताप वगैरेमध्यें), हलु व अस्पष्ट शब्द करणें (मार बसला असता) (क्रि० करणें, म्हणणें) -न होय किंवा नाहीं याविषयीं अनिश्चय, एकमत नसणें, उभयविध भाषण [ ध्व ]

**काकूस**—स्त्री काक्षी, पुल्ली, काखेस पहा

**कांकूस**—पु (गो) दगणवटी, दोन्याचा बसण्याची जागा

**कांकोरा**—पु (ग्रां) ओरखडा, बोचकारा कांखर पहा

**काकोली**—स्त्री एक ज्वरनाशक व कफनाशक वनस्पति, क्षोलिका, वायसाली [स]

**काकोळ**—पु १ डोंबकावळा २ एक प्रकारचे विष ३ (गो) कावळा ४ (गो) कावळी [स काकोल]

**कांक्रीट**—न चुना, वाळू, सिमेंट, दगड, गोटे यांचे एकत्र केलेले मिश्रण, बांधकामात याचा उपयोग करतात [इ काँक्रीट]

**काक्वर्थ**—पु एक अलंकार, यांत प्रश्नार्थक किंवा दुसऱ्या स्वराने शब्दाच्या वाच्यार्थाहून उलट अर्थ घ्वनित होतो काकु पहा.

**काख, कांख**—स्त्री १ बाहूखालील हात व बरगडी यामधील खोलगट जागा, बगल, खाक 'काखेसी मेरू घेऊनि देखा। कैसें नृत्य करील पिपीलिका।' –दावि १२२ म्ह० 'काखेंत कळसा, गावास वळसा' 'काखेंत घाकटें महारवाडा शोधी' २ तत् ताणा, पागोरा (कारण हा देंठाच्या काखेतून फुटतो म्हणून) (क्रि० फुटणें) [स कक्षा, प्रा कस्ख, हिं कांख, गु व उ काख, मीगन कख] **काखा वर करणें**–बगलेंत काहीं नाहीं हें दाखविण्यासाठीं दोन्ही हात वर करणें, दिवाळखोरी प्रसिद्ध करणें, आपण खंक बनलों असें सांगणें, नगा बनणें **काखा वाजविणें**–आनंद प्रदर्शक चेष्टा करणें, आनंदाचे भरांत दंड बगलेवर मारणें, टिऱ्या पिटणें **काखेंतला काढून बाजारांत मांडणें**–स्वकपोलकल्पित गोष्ट खरीच आहे म्हणून भर चारचौघापुढें मांडणें, सांगणें **काखेस मारणें**–१ एखाद्यास आश्रय देणें, आपलासा म्हणणें २ काहीं पदार्थ घेऊन पळ काढणें, किंवा एखादी वस्तु उपटून पोबारा करणें °**वि(मि)लाई-विल्ली**–स्त्री काखेंत होणारी एक गाठ बगलबिल्ली, काखमांजरी पहा °**भोंवरा**–पु घोड्याच्या पुढील दोन पाया पैकीं कोणत्याहि एका पायाच्या जाघेंत असणारा केसांचा भोंवरा हा अशुभकारक समजतात °**मांजरी**–स्त्री काखेंतील गळू, बगलेंतील पुटकुळी, बाहु बगलड्या, खांदे व काखा या ठिकाणीं पित्तप्रकोपामुळें वेदनायुक्त व काळ्या फोडांनीं व्यापलेली अशी होणारी एक गाठ –योर २४२५ हिला लोणी लावून ते मांजराकडून चाटविलें म्हणजे ही बरी होते अशी समजूत आहे °**वाळ**–(कु) चोळीला काखेंत लावण्याची पट्टी, लाग °**सावला**–वि (वाटेनें जाणाऱ्या किंवा आवयास निघालेल्या प्रवाशाप्रमाणें काखेंत सावलें म्हणजे निरगून घेतलेला) आळशी, उदासीन, (चालू कामधंद्याविषयीं) काळजी आस्था, किंवा संबंध न दाखविणारा (निष्काळजी चाकर, मुलगा किंवा एखाद्या संस्थेच्या सभासदाला हा शब्द निंदाव्यंजकतेनें लावतात)

**कांखर**—पु (राजा) ओरखडा, बोचकारा. कांकर पहा

**काखची**—स्त्री (राजा) काक्वी पहा

**काखा**—पु ताणा, तंतु, काख अर्थ २ पहा

**काखां**—पु १ (कों) झाडाचें वाळलेलें खोड किंवा धान्याचें ताट, धुट २ (ल) किडकिडीत माणूस [अर काकू ?]

**काखाटणें**—अक्रि काखा वर करणें पहा [काख]

**काखाटणें, काखाळणें**—उक्रि काखेस मारणें पहा [काख]

**काखाटी-काखोटी**—स्त्री (व्याप) काख, बगल, बगलेत एखादी वस्तु घेतली किंवा घेऊन पळवली तर विशेषत योजतात 'काखाटीस ओझें मारून चालला' 'त्यानें त्याचा वज्जा काखोटीस मारला'.[काख]

**काखावर्त**—पु काखभोंवरा पहा –अश्वप १२४

**काखाविणें**—उक्रि काखेस मारणें, काखाटणें पहा

**काखाळा-ळ्या**—वि (ग्रा) एखादी वस्तु उपटून पळविण्याला टपून बसलेला, उचल्या, लोभी, आपल्या पोळीवर तूप ओढणारा ओढाळ जनावरालाहि म्हणतात [काख+आलुच् प्रत्यय]

**काखाळी**—स्त्री विनाकारण अतिशय कांगावा करणारी स्त्री

**काखी**—वि काळा–तांबूस असा रंग खाकी पहा [काषाय–काखाइ–काखी –भाअ १८३२]

**काग**—पु कावळा 'विषयवासना धरूनि थोर। बाह्य मिरविती आचार। जेवीं कागाचा शौचाचार। विष्ठातत्पर मानसीं।' –एभा ९ ३५६ 'आज कागे काग बोलतो घरावरी। हाच शकुन साच पति येत असे घरीं।' –होला १३० 'ते काय गुण लागती येरा। कागा न शोभे पिंजरा।' –तुगा १८६२ म्ह० शभर वर्षे कागा हजार वर्षे नागा [स काक, प्रा काअ, सिं कागु हिं कौवा, हिं प गु व काग] °**टाळीन्याय**–काकतालीय न्याय पहा 'पावलों हा देह कागटाळी न्यायें। न घडे उपायें घडों आलें।' –तुगा १६१६

**काग**—पु एक धान्य, वरीतील एक प्रकार परंतु वरीत व यांत फरक पुष्कळ आहे वरीवरील साल पातळ व रंग पिंवळा असतो परंतु कागाचें साल जाड असून तांबूस, पिंवळें, काळसर अशा तीन–चार रंगाचें असतें कागाचा भात, पेज लाह्या, भाकरी इ० करितात कागाचें रोप दोन–अडीच हात उंच होऊन त्यास जें कणीस येतें तें बाजरीच्या कणसाप्रमाणें लांब व बारीक असतें राळा –शे ९ २८१ [स कङ्गु]

**कागची**—स्त्री कागुणी पहा

**कांगचपो**—स्त्री (कु) कागण्या, काजिण्या रोग

**कागज**—(हिं) कागद पहा कागज्–पत्र –रा १३ ९३

**कागडा**—पु एक कुस्ताड –धागेची माहिती ९३

**कागडा**—पु कावळा (निंदाव्यंजक) –वि कावळ्याच्या दृष्टीसारखी चचल दृष्टि असलेला, धूर्त, दक्ष, कावेबाज, हुषार ‘तो मोठा कागडा आहे’ [हिं कागडा=कावळा, गु कागडो=कावळा, भि कागडो] **०खाऊ**–पु (उप) पारशी लोक

**कागडे**—(हेट नाविक) नैर्ऋत्य दिशा, नैर्ऋत्य दिशेचा अधिपति निर्ऋति ही मृत्युदेवता आहे व कागडा (कावळा) मृत्यु सूचक पक्षी आहे तेव्हा कागडा व नैर्ऋत्य यांचा असा संबंध असावा

**कांगणी**—स्त्री कांगुणी पहा

**कांगणेल**—न कांगणीचें तेल [कांगणी+तेल]

**कागद**—पु १ कापूस, चिंध्या, ताग वगैरेपासून रांधा तयार करून त्यापासून लिहिण्यासाठीं केलेला पदार्थ–पत्र हिंदुस्थानात भवर, मुंज वगैरे गवतापासून कागद करितात कृतीसाठीं शाको (क) २२२ पहा कागदापूर्वी भूर्जपत्रें, ताडपत्रें, पापीरस (ईजिप्तमधील एका झाडाची साल) अगरूची साल, बांबूची पट्टी, चर्मपत्रें, कमळाचीं पानें याचा उपयोग लेखनाकडे करीत २ पत्र, चिठ्ठी, ज्यावर कांहीं लिहिलें आहे असा कोणताहि कागद, खर्डा ३ दस्तैवज, रजिस्टर पत्र, खत ‘अहो कागद करून द्या’ ४ वचनचिठ्ठी [अर काघज़्, फा कागद, गु कागळ, ते कागितमु] **०कापणें**–कागदाच्या जाळ्या, चित्रें वगैरे तयार करणें, हस्तव्यवसायाचा एक प्रकार –अध्यापन १५० **–दावर बसणें**–(शाळेतील मुलांबद्दल) धूळपाटीवरचें लिहिणें सपून कागदावर खर्डे लिहिण्यास सुरवात करणें, मूळाक्षरापुढें प्रगति होणें **–दावर बसविणें–घालणें**–खर्डे लिहिण्यास प्रारंभ करविणें, खर्डे लिहिण्यास शिकविणें **०भिजविणें**–(छाप) छापण्यासाठीं जे कागद घेतात ते प्रथम भिजवावे लागतात दहा किंवा बारा कागद घेऊन त्यावर पाणी शिंपडतात मोठ्या छापखान्यातून प्रत्येक भिजलेल्या दस्त्याखालीं एक एक कोरडा दस्ता असा क्रम ठेवतात याप्रमाणें सर्व कागदाच्या जुडग्या पाणी शिंपडून तयार झाल्यावर त्याच्यावर दडपण ठेवतात म्हणजे कागद नरम होतो –मुद्रणदर्पण ७८ **०भेटविणें**–पत्र देणें, चिठी पाठविणें ‘शहराबाहेर मुक्काम करुनि कागद भेटविला। गोष्ट लाविता तिर्शी पतीचा हुकूम आठविला।’ –पत्र ८८ **०कुटारी–कुट्या**–पु कागद करणारा, चिंध्या किंवा रद्दी कागद कुटून त्यांचे कागद तयार करणारी एक जात [कागद+कुटणें] **–दाचा घोडा**–पु कबुलीपत्र (कर्ज इ० चें), कर्जरोखा, दस्त (क्रि० करून देणें) **०पत्र**–न (व्यापक) कागदपत्रें, चिठ्ठ्याचपाट्या, सनद, रोखा, पत्रव्यवहार [कागद+पत्र] **०वहा**–पु सरकारी कामासाठीं होणारा कागदाचा खर्च [फा]

**कागदी**—वि १ कागदाचा, कागदासंबंधीं, कागदापासून तयार केलेला (जाळी, मखर, डबा इ०) २ (ल) तकलादी, बारीक, निर्जीव, निर्बळ, किरकोळ बांध्याचा, हाडाचा ३ (ल) पातळ व नाजूक सालीचा (आंबा, लिंबू, वगैरे फळ, बाबू) ४ पत्रें नेणारा, पोंहोचविणारा, जासूद, दूत, कासीद, हलकारा –पु १ कागद तयार करणारा माणूस, त्याची जात हे बहुतकरून मुसलमान असतात २ (गु) कागदाचा व्यापारी, स्टेशनरी सामानाचा दुकानदार [अर काघज़्] **०घोडे नाचविणें**–१ कागदोपत्रीं व्यवहार करण्यांत वेळ खर्च करणें, फक्त कलमबहादुरी दाखविणें २ (ल) प्रत्यक्ष अंग मोडून काम न करितां, कृति न करतां, केवळ पत्रोपत्रीं व्यवहार करणें (दिवाळींत मुलें जनावरांचीं कागदी चित्रें करून तीं दिव्याभोंवतीं फिरावयास लावितात, त्यावरून) ‘कोणतीही नवीन घटना करावयाची जबाबदारी व अधिकार सर्व इंग्रज मंत्रिमंडळाकडेच असल्यानें आयरिश लोकांना राष्टनेचे कागदी घोडे नाचवून तरी काय उपयोग?’ –आयर्लंडचा इतिहास **०आंबा**–पु पातळ सालीचा आंबा हा चवीस उत्कृष्ट असतो **०इमारत**–स्त्री कमजोर इमारत **०कबुतर**–न दुधासारख्या पांढऱ्या रंगाचा पारवा –मराठी ४ थें पु ६७ (१८७३) **०गोळीबार**–पु लेखी विरोध, लेखी मारामारीचीं उत्तरें–प्रत्युत्तरें, कागदावर कोरडी वाटाघाट करणें ‘बुक कमिटी क्रमिक पुस्तकांत ढवळाढवळ करू लागताच डॉक्टर भालचंद्र यांचे दवाखान्यात कांहीं सद्गृहस्थांनीं जमून जुपता कागदी गोळीबार सुरू करावा ’–टि ४ ४१९ **०चिवा**–पु चिवा बांबूतील स्त्रीजात, पोकळ वेळू याच्या उलट भरींव चिवा **०जवान–ज्वान**–पु. अशक्त, किडकिडीत काठीचा मनुष्य, काडीपेलवान, लेचापेचा माणूस **०निंबू–लिंबू**–न लहान व पातळ सालीचें लिंबू हें आंबट, वातनाशक, अग्निदीपक व हलकें असतें **०बदाम**–पु पातळ सालीचा बदाम **०वागें**–न एक प्रकारचें पातळ सालीचें वांगें ‘सारा केशरी भात। कागदी वागी भात’–स्त्रीगीत ६७ **०वेळू–वांबू** कळक पातळ सालीचा, पोकळ, कागदी चिवा पहा

**कागदोपत्रीं**—क्रिवि १ पत्ररूपानें, पत्रव्यवहारानें, लेखद्वारा २ पत्रांत, चिठ्ठींत, पत्रोपत्रीं, लिहिण्यांत [कागद+पत्र]

**काग (गी) फळ**—न काकफळ, एक वनस्पति

**कागवळ**—स्त्री काकवलि पहा

**कांगरघाई**—स्त्री (व) कांघाई, कागावा ‘आपलीच काघर घाई मचवितो’

**कागल**—न. (कु) कांगुणी पहा

**कागली**—वि कागल गावचा (रुपाया)

**कागली**—स्त्री (वे) एक प्रकारचें फळ

**कांगा**—न (गो) एक ल्हान मुलाचा (तिकट्याचा) खेळ
**कॉगॉ**—पु (गो) शिंपल्याच्या वर्गातील प्राणी
**कांगाई**—स्त्री काधाई पहा
**कागाकव्वा**—काकाव्वा पहा
**कांगातांदूळ**—पु (गो) एक डोंगरी धान्य, वरीसारखें एक धान्य, काग पहा

**कागावाशी**—न एका जातीचें काळें मोतीं --वि कागा वाशी रगाचा –शिल्पवि ५६४ [काक+आवाशाही]

**कांगारु**—न ऑस्ट्रेलियातील एक जनावर, याला लाब शेपूट असतें व याचे मागील पाय पुढील पायापेक्षा मोठे असतात मादीच्या पोटाला एक पिशवी असते व तींत ती आपलीं पिलें ठेवते [इ]

**कागाव-वा, कांगावखोर**—काधाव-काधावखोर पहा 'तिनें जो एक रद्दा सुदरीचे पाठींत दिला, त्यानें ती पोर कळव ळली, पण तें लक्षात न घेता ती आपल्या डोक्याला लागल्या बद्दल कागावा करू लागली' –पकोघे

**कांगावें**—न कांघाव पहा
**कागाळ(ळी)खोर**—वि कागाळी करणारा
**कागाळी**—स्त्री १ गान्हाणें, तक्रार, ओरड (एखाद्या बद्दल) २ विरुद्ध सागणें, कळविणें, चुगली करणें, चहाडी (क्रि० करणें) [काग+आळी ?]

**कागिनी**—स्त्री एका रागिणीचें नाव, राग पहा
**कागु(गो)णी**—स्त्री १ एक उपधान्य, काग पहा २ एक औषधी वनस्पति आणि तिचें फळ, (हिं) मालकागनी (स) ज्योतिष्मती हीं झाडें पावसात उगवतात व दोन हात उंच वाढ तात यास लाल व गुंजेएवढीं फळें येतात, तीं मुलें आवडीनें खातात याच्या पानाच्या रसानें कागदावर लिहिलेलें हिरव्या रगाच्या शाईप्रमाणें दिसतें [स कगुणी]

**कागुद**—(माण कुण) कागद
**कागू**—काग पहा
**कागोणेल**—न कांगुणीचें तेल कागणेल पहा
**काग्रेस**—स्त्री १ सभा, मडळी, मडळ २ महापरिषद प्रतिनिधिसभा ३ हिंदी राष्ट्रीय सभा हिची स्थापना इ स १८८५ सालीं डिसेंबरात मुबई शहरीं झाली 'सर्वांनीं मिळून काँग्रेससारख्या सस्थेनें आमच्या मनात ज्या आशा उत्पन्न केल्या आहेत त्या सफल करण्याच्या उद्योगास हरएक प्रकारें लागलें पाहिजे' –टि २ ११ 'नेमस्त पक्षाची निराळी काँग्रेस व राष्ट्रीय पक्षाची निराळी काँग्रेस हा प्रकार निवळताना दृष्ट वाटत नव्हता' –सुदे ६२

**कांघाई-घाव, काघावें**—स्त्रीन (ल्हानशी दुखापत अगर थोडेंसें नुकसान झालें असता तें) फुगवून सागणें, उगीच ओरडणें, अन्यायाचा खोटा डागोरा पिटणें (क्रि० करणें) [ध्व ?] ०खोर–कागावा करणारा, उगीच आरडाओरड करणारा, लटकी तक्रार करणारा [ध्व ?]

**काच**—पु स्त्री १ एक कठिण ठिसूळ व पारदर्शक असा पदार्थ, भिंग, वाळू, सोडा, पोटॅश, चुना, अल्युमिना, शिशाचा आक्साइड वगैरेपासून काच तयार करतात हिच्या अनेक जाती असून प्रत्येकीचे गुणधर्म निरनिराळे आहेत काचेचे बागडी, आरसे, छायाचित्र घेण्याची काच वगैरे अनेक पदार्थ करतात २ स्फटिक, गार (रत्नासारखा जिचा उपयोग होतो ती) ३ पोटॅशाचा कोणताहि स्फटिकावस्थेंतील क्षार ४ डोळ्यातला काचबिंदु ५ (माळवी) आरसा [स काच] ०**मारणें**–(चाभारी) काचेनें घासणें ०**कमळ**–न एक कमळासारखी आकृति, एका वर्तुळाच्या परिघामध्यें ज्याचे मध्यबिंदु आहेत अशीं वर्तुळें यात असतात ०**कागद**–पु सामान्यत लाकूड वगैरे घासून गुळगुळीत करण्यासाठीं यत्रावर किंवा भाड्यावर चढलेला गज काढण्यासाठीं वापरण्यात येणारा काचेचा, वाळूचा, कुरुदाचा कागद, पॉलिश कपडा, चादीसोन्याच्या भाड्यास निल्हई देण्याकरिता हा वापरतात कागदावर सरसात काचेची पूड, वाळू कुरुदाची पूड वगैरे बसवून हा तयार करतात ०**चित्र कला**–स्त्री रगीबेरगी काचेचे बारीक तुकडे जुळवून केलेलीं चित्रें, आकृती (इ) मोसाईक ०**वंदी**–स्त्री काचेचे तुकडे बसवि लेली जमीन 'काचबदि आणी जळ । सारिखेंचि वाटे सकळ ।' –दा ८ ५ ४३ ०**बिंदु-बिंब**–पुन एक नेत्ररोग, मोतीबिंदु डोळ्यातील बुबुळात एक काचेप्रमाणें बिंदु येतो व त्यामुळें दिसेनासें होतें ०**मणी**–पु काचेचा मणी, स्फटिक, एक प्रकारचें रत्न ०**मिना**–पु काचेच्या रसानें एखादें पात्र मढविणें, चित्रें काढणें सिलिका, मिनियम् व पोटॅश याच्या मिश्रणा पासून तयार करतात (इ) एनॅमल ०**लवण** न (हिं) कृत्रिम मीठ ०**वटी**–स्त्री काचेचा तुकडा, भिंग चिंतामणीचिया साठीं। दईजे फुकटी काचवटी।' –विपू २ १५ 'ज्याचे गाठीं नाहीं काचवटी। परी सतुष्टता नित्य पोटीं।' –एभा १९ ५५९ 'तुका म्हणे दिली चिंतामणीसाठीं। उचित काचवटी दइवत।' –तुगा २३५७

**काच**—पु सदरा वगैरेच्या गुडीचें घर काज पहा
**काच**—पु १ जाच, त्रास, छळ चांगल्या गोष्टी मनु ष्यास हव्या असल्या पण त्याचेपासून त्यास काच बसावा असा साठीं त्या नकोत' –अमृताचा घुटका (उपा प्रथमालिका) १ २ दु ख 'पाणी मीच पाहीं वण घाली मीच। मजवीण काच

मनीं वाहे।' –व १४ [काचणें, स कच्=बांधणें, किंवा कांच्=बांधणें]

**कांचफळणें**—अक्रि १ (कों) भयानें किंवा व्यग्रतेनें अडखळत बोलणें, अर्धवट, घोटाळ्याचें भाषण करणें २ गोंधळल्याप्रमाणें, अनिश्चितपणें कोणतेंहि काम करणें [वाच=भाषा+फळ=दोष ?]

**काचका**—पु सागरगोटा, मुठी खेळण्यासाठीं वापरतात तो लाखी रंगाचे खडे –मुव्या १७० गजगा पहा [स कटकरन, ते कवचकाइ, गु काकच, म गजगा]

**काचका**—पु (कों) एक मासा

**काचकिरडा**—वि १ (बादली, कों) दडस पचकचित भरडकणी लागणारा असा (भात, भाजी) २ पुरता न शिजलेला, कच्चा 'भाताला पळी देऊन जाळ कर नाहींतर तो काचकिरडा होईल' [स काच]

**काचकुय(इ,री, काचकुरी**—स्त्री खाज उत्पन्न करणारी एक वनस्पति कुहरी पहा 'बागेंत वाढणाऱ्या काचकुइरीचा मुलाजा करण्यांत कांहीं हशील आहे काय?' –नि १०८३

**काचळ्ळी**—स्त्री (राजा बायकी) गुदगुली, कुचाळी (क्रिया व भावना) (क्रि० करणें, होणें)

**काचकूच**—स्त्री अळटळ, टगळमगळ

**का(का)चणी**—स्त्री १ घर्षण 'देवें वायूच्या कल्लोळीं। परस्परें वळूवाळी। स्वजातिकांचणीं इगळी। पेटली ते होळी वनाची करी।' –एभा १३ १८९ २ घर्षणानें पडलेली खाच वळ, ओरखडा 'दोरें किरा कापे पडिला काचणी।' –तुगा ३३९४ ३ रेडे वगैरेंवीं शिंगें कापण्याकरितां तयार केलेली दोरी ४ काळजी, हुरहुर, चिंता 'ऐसा पडिलों काचणी। करी धावा म्हणउनि।' –तुगा १५०८ ५ गाजणी, जाचणी छळणूक ६ नाश, काटणें, छाटणें, 'बुद नोहे ते चिंतामणी। हर्षे केली भवकाचणी।' –नव १४ २६ [स काचन=बंधन]

म्ह०–(व) गहू घालावा दाटणी बायको घालावी काचणी

**कांचणी**—स्त्री (गो) एक प्रकारची चोळी, काचोळी [स काचन=बंधन]

**का(का)चणें**—अक्रि १ घर्षणानें कमी होणें, झिजणें 'तुज जवळि भल्याचा काय सन्मान काचे।' –सारुह ६ १०५ २ ('ल) झिजणें, झडणें, कृश होणें, वाळणें (भूक, तहान काळजी, दु ख, आजार यामुळें) ३ भिणें, धाकणें 'परिझाले हरिविरि करि वर जाता जेविं तेविं भट काचे।' –मोकर्ण ४३ ६६, –उक्रि गांजणें, छळणें, त्रास देणें [स कच् किंवा कांच्=बांधणें, काचन=बंधन, म काच]

**कांचन**—न वचन १ सोनें, सुवर्ण 'एकें लान्कांचनसम पिवळे।' –ज्ञा ११ १२५. [स कांच्=प्रकाशणें]

**कांचन**—पु १ एक फुलझाड, कांचनार हें झाड मोठें वाढतें, पानें आपट्याच्या पानासारखीं असतात याच्या पांढरा, पिवळा, तांबडा, अशा तीन जाती आहेत देंग चवळी–शिकेकाईसारखी असते तांबड्याचा रंग तांबूस असून तें रंगाच्या उपयोगी पडतें हें फार चिवट असून त्याच्या काठ्या वरितात –वगु २ ७७ 'कांचन पुष्पे श्वेत पीत। तेणें सैन्यांत अति शोभा।' –भारा किष्किंधा ९ ४१ २ डोंगरी टेंभुर्णी –शे १० २१४ [स काचनार गु कंचनार]

**कांचन**—पु गंजिफाच्या खेळांतील एक रंग –शास्त्रीको ? मनुकांचनी म्हणून गंजिफाचा एक प्रकार आहे तो हा असावा

**कांचनभट**—पु (शारदा नाटकांतील एक पात्र यानें द्रव्यलोभानें शारदा नावाची आपली अल्पवयी मुलगी श्रीमंत पण जरठ मनुष्याला देण्याचा बेत केला होता यावरून ल) द्रव्याच्या लोभानें म्हाताऱ्याला मुलगी देणारा अति लोभी माणूस

**कांचनाम्ल**—न (शाप) क्रिसेनिक ॲसिड [क्रिसीन=कांचनीय]

**कांचनार**—पु डोंगरी टेंभुर्णी [स]

**काचफोड**—पु एक प्रकारचा फोड यांत पाणी असून हा मोठा असतो कांसेफोड (अप) [का कच्छ+फोड]

**काचय**—वि (काच्य) भित्रा, अधीर काचा अर्थ २ पहा

**काचरणें**—काचणें पहा 'तिच्या आयुष्याच्या दोरीचा अर्धवट काचरलेला एकेरी पदर तुटला नव्हता' –झामू ६७

**काचरी**—स्त्री १ फळें, फळभाज्या यांचे काप काढून वाळवितात ती, फोडी उसरी तें पाहे होईल काचरी। वाळली जैसी।' –ज्ञा १३ ५५५ 'वाळऊनि काचरी करावी। भाजवेलेची।' –अमृ ६ ४८ २ (ल) म्हाताऱ्या स्त्रीचे सुरकुतलेले स्तन ३ (ल) सुरकुती [स कातरा, प्रा कच्चरा, गु काचरी, सिं कचिरी]

०सुपारी–स्त्री खाडकापी सुपारी

**काचरी**—कचरा, कचरी पहा [स कर्चूर]

**काचवर्णे**—क्रि काचेचा मिना चढविणें

**काचवा**—पु विन बाह्याचा कमरेपर्यंतचा अंगरखा, बंडी, कवजा, जाकीट [स काच्–बांधणें]

**काचळ**—स्त्री १ पातळ तुकडा चीप २ कातळ, दगडाचा लांबट तुकडा, दगडाची लांबट कपरी 'दगडाच्या तळाशीं काचळा असू नयेत' –मॅरट ३४ –वि दगडाचे तुकडे, चिपा असलेली (जमीन इ०) ०रान–न दगडाच गोटे, चिपा असलेली जमीन

**काचा**—वि १ (काच्य) कच्चा, अपक्व, न शिजलेला, हिरवा 'विचार हा काचा कदा नव्हे।' –दावि ७४ २ (ल)

भित्रा, अवीर, घाबरा 'तेथ भेडाची कवण मातु। काचया केर फिटु।' -ज्ञा ११३४ ३ अतज्ज्ञ, अर्धवट ज्ञानी 'ऐसा मार्ग विवेकाचा। प्राणी जो स्वयें काचा। त्यास हें कळेना।' -दा ११८२४ 'म्हणे अल्पज्ञी तोचि हें बाळ काचें।' -मराधा ३९ [कच्चा ध्व कच्]

**काचा**—पु (व) करकोचा, घट्टा [काच कोचणें]

**काचा, कांचा-च्या**—पु १ वीत-सव्वावीत रुंदीचा व तीन-साडेतीन हात लांब असा कमरेस बांधावयाचा पट्टा, वस्त्र २ नेसलेल्या धोतराचा, लुगड्याचा जो पुढचा ओचा मागें खोंवतात तो (क्रि० घालणें, खोचणें, मारणें) ३ लंगोटासारखी कुस्तीच्या वेळेस नेसावयाची नगारीसारखी घट्ट पट्टी, चड्डी 'पहिलवानानें आत लंगोट घातलेला असुन त्यावर काचा घातलेला आहे' -पहिलवान व कुस्ती (बडोदें) ११ [स कच्=बांधणें, कच्छ] ०घालणें-भिडणें-धुटला सोगा मागें खोवणें ०भिडविणें-काचा घट्ट आवळणें, कबर भिडणें 'त्यामागें साडचोळणा घालून काचा भिडविलेले तीन चारशें मावळे हटकरी लोक चालले आहेत' -मोचनगड

**काचाकुची**—स्त्री सकोच काचकूच पहा

**काचाबुल-भूल**—वि (गो) कावराबावरा काचा बुलचें-(गो) कावराबावरा होणें

**काचार-री, कांचारी**—पु काच तयार करणारे लोक, कांसार -दहु १३२ [स काच]

**काचावणें**—अक्रि १ आजारामुळें खंगणें, क्षीण होणें, काळजीनें किंवा दु खानें नि शक्त होणें २ (काव्य) भीतीनें माघार घेणें, कचणें, कच खाणें, अडखळणें, कापणें, धैर्य सुटणें 'काचावला वीर पुढें धसेना।' -वामन, भीष्मप्रतिज्ञा १२ [काच]

**कांचाळा, काचोळ**—पु (कु) गोणपाटाची, कावळ्याची हात नसलेली बंडी काचवा पहा

**काची**—पु (हिं) फळभाजी, फळफळावळ विकणारा, काछी, काचिया 'नतर जानूनें काचीला विचारिलें कीं, सिनाफकें महाग झाल्याचें कारण काय?' -मराठी ६ वें पुस्तक (१८७५) १८८ [काच्छी, कच्छी]

**काची**—पु (कों) एक मासा

**काची**—वि (तंजा) करवतीकाठी (साडी लुगडें)

**काची**—स्त्री १ कमरपट्टा (सोन्याचा-चांदीचा), कमरेची साखळी, पण -बहु ४९५० [स कांच्=बांधणें] २ कांजीवरम् शहर, सप्तपुऱ्यांपैकीं एक

**काची-चें**—वि १ काचा, कच्चा 'एकें सदाग्र अवघे। एकें अर्धकाचीं तुरें।' -एरुस्व १४१०६ -वि 'अमृतादिक मधुरहि तीं मानुनि एका तुरेंनि मन काचीं।' -मोरामे १८ दशो २ २४ 'चोरटे काचे निघाले चोरी। आपलें तैसें पारखे घरीं।' -तुगा २९३४ २ (ल) अधीर अज्ञ 'एथ मन करूनिया काचें।' -ज्ञा ११६३० 'बुद्धिहीण माणुस काचें।' -दा १५१११

**कांचीकुची**—स्त्री सकोच, काचाकुची, काचकूच पहा 'नव्हों आम्हीं आजिकाळींचीं। काचीकुची चाळवणी।' -तुगा १३९८ [काच]

**कांचीबंद, कांचुबंदी**—काचबंदी पहा 'सुंदर श्रीधर नागर रुपडें काचीबंद आगणी।' -नामदेव ७८ 'काचबुंदी करूनी भुई।' -श्रीगीत ६२

**काचुक**—न (क) (विटीदांडू) अंतराळीं विटी झेलणें 'माझीं चार काचुकें झालीं' [?]

**कांचुलिया**—पु धर्मकचुकी विधि आचरणारा हिंदु शाक्ताचा एक पंथ काचोळीपंथ पहा [स कंचुली=काचोळी, हिं कांचुली]

**काचेचें भांडें**—न १ (ल) समुद्राचें खारें पाणी खारींत येऊ नये यासाठीं खारीवर नेहमी राखण ठेवावी लागते समुद्राचें पाणी आंत आल्यास खारीची जमीन निरुपयोगी होते म्हणून या जमिनीस हें नांव आहे, शेत जमीन २ (ल) नाजुक व ठिसूळ असा पदार्थ किंवा प्राणी (स्त्री, घोडा, अव्रू इ०)

**काचोटी**—स्त्री (काव्य) काचेचा मणी (अलंकार म्हणून मानलेला) 'काचोटी आणि महामणी। मेरू मशकसम नव्हे।' -ह १८४ [काच]

**कांचोळणें**—अक्रि (ग्राम्यांत) गांठ, कोंय धरणें, बनणें [काचोळी]

**काचोळा**—पु १ धान्य वगैरेंचा कोंडा, कोंस, भूस २ बारीक कोंडा [कातळ, काचळ ?]

**काचोळा**—पु काचळ पहा

**काचोळी**—स्त्री १ (व) मिरचीचा देठ २ (तंजा) वांग्याचा देठ कचाळें, काचोळें पहा

**का(कां)चोळी**—स्त्री १ जिचे बंद पाठीवर बांधतात अशी चोळी, हिला गांठ किंवा बिरडें नसतें ही तुकड्यातुकड्यांची करतात ल्हानमुली, मारवाडी व गुजराथी स्त्रिया ही बहुधा वापरतात 'आंगींची उतटली काचोळी।' -एरुस्व ५८८ 'ढेर पोटीला नवी काचोळी शोभत नाहीं' -कम २ पाढऱ्या रंगाची अरुंद चोळी (लग्नांत नवरीला घालतात ती) [स कंचुलिका, कंचु?] ०पंथ-पु हा गुजराथेंत आहे या पंथांतील लोक (स्त्री, पुरुष) रात्रीं एके ठिकाणीं जमून जेवनास व नंतर जमलेल्या स्त्रियांच्या काचोळ्या एका घागरींत घालतात त्यांतील एकएक काचोळी काढून पंथाचा गुरु जमलेल्या एकएक पुरुषाला देतो जिची काचोळी ज्या पुरुषाला मिळेल त्या स्त्रीशीं तो पुरुष रात्रभर रममाण होतो पट्टचुटीपंथ ०पंथी-वि वरील पंथाचा अनुयायी

**काचोळी, कांचोळी**—स्त्री नुकतीच तयार झालेली आऱ्यातील कोय

**काचोळें**—न १ फळें, फुलें यांच्या देंठास आच्छादन करणारा भाग, वाटी २ धान्याचें टरफल, कवच. ३ गंध, अक्षता, हळद, कुंकू या पांच वस्तु ठेवण्याचें एक गोल, पांच घरांचें धातूचें भांडें, पान कचोळें पहा

**काच्छी काछी**—पु कच्छ प्रांतातील माणूस, फळें विकणारा, उत्तरहिंदुस्तानात हे माळ्याचा धंदा करतात [ स कच्छ= प्रांत ]

**काच्छीण**—स्त्री कच्छी स्त्री

**काज**—न १ ( काव्य ) काम, धंदा, कृत्य 'तरी आलेंती कव्हणें काजें।' –शिशु ११८ 'आमुचिया काजाचेनि पाडें।' –ज्ञा १.११२ 'आता काज न ये हाता।' –उपा २८९ 'तें (नारायणास्त्र)हि प्रतिहत केलें करितो हीं सिद्ध कृष्ण तो काजें।' –मोकर्ण १२१ 'होइ घाटी अवघड। काजविण करी बड बड।' –दा २१४९ 'भस्तननाचिया काजा। जेवीं करिती अवर्णपूजा।' –एरुस्व ६ ५४ २ कारण, उपयोग, प्रयोजन 'त्या वेडियाच्या गोठी। काय काज।' –विपू १ ३४ 'ऐसा कानिवीण आतुडला।' –ज्ञा ६ ७९ 'शिरीं आहे रामराज। औषधाचे कोण काज।' ३ ( ल ) हेतु मनोरथ 'त्र्यंबक हा तीर्थराज। पुरवी मतरीचें काज।'–भूपाळी ११ [स कार्य–कज्ज–काज, सिं काजु, गु हिं प काज ] •काम–कारभार–पु (प्र ) कामकाज–कारभार पहा

**काज**—स्त्री १ काच, भिंग [ स काच ] २ ( गो ) काचेसारखें तकाकणारें तेल, रोगण, वार्निश

**काज**—पु गुंडी अडकविण्याचें भोंक ( सदरा, अंगरखा इ० चें ) [हिं काज, पोर्तु कासा] •पट्टी–स्त्री काज केलेली पट्टी ( सदरा, अंगरखा यांची ) 'डावीकडे काजपट्टी जोडावी' –शिवदि २ ३०

**काज**—स्त्री ( कों गो ) काजूचें झाड व फळ रस्त्याच्या बाजूला तावदार, पिवळ्या फळांच्या भारानें लवलेल्या हिरव्या गार काजीची रांग लागली होती ' –सह्याद्री ८८ [ काजू ] •धार–पु ( गो ) काजूची दारू करून विकणारी एक खिस्ती जात •चेल–याल–न ( कु ) काजूची दारू तेल

**काज**—न यदक 'उर्दूत काज म्हणजे यदक ' –गृशि २ १२० [ तुर्की काज् ]

**काजकीर्द**—स्त्री अमदानी, अम्मल, कारभार ( राजाचा ) [ काज+कीर्द ]

**काजगी, काजा**—स्त्री तोंडामधून घेऊन ( ओठाळी ) पागीवरून डपटाखालून नेलेली घोड्याच्या लगामाची दोरी, ओठाळी व दाढी जिनें बांधतात ती दोरी, लगाम, कांटेरी मुगा [ अर काझ्झी, हिं काझ ]

**काजगें**—न ( ढोरधंदा ) अघोड उलटी करतेवेळेस तग डीला भोक पाडून तिच्यात ओवावयाची दोरी [ काजगी ]

**कांजणी**—स्त्री ( गो ) ल्गामधील बोदल्याच्या भोंवता रची भांड्यांची किंवा मडक्यांची उतरंड, वही

**कांजणी**—स्त्री ( क ) कानाच्या बाजूनें चेहऱ्यावर येणारे केस. [ स कर्ण+जन् ]

**काज(जि)णी**—स्त्री १ एक प्रकारचा देवीसारखा रोग व त्याचा फोड (नेहमीं कांजण्या असा अव प्रयोग करतात), देवीं-पेक्षा हे फोड लहान असतात यांचा उद्भवकाल तेरा दिवसांचा लक्षणें –थोड्या तापाच्या दुखण्यानें पाठ छाती, तोंड, मान, पोट यावरून उद्भवतात एका आठवड्यात यांच्या घन, जल व रक्त पीटिका बनतात यांचा वर्ण लाल व किंचित खोलगट असतो –गोल्सनीप्रयोगचंद्रिका १२ ( क्रि० येणें, निघणें, उगवणें )

**काजर**—न काजऱ्याच्या फळाचें विष

**काजरवेल**—स्त्री एक जातीची औषधी वेल

**काजरा**—पु कुचला, एक विषारी वृक्ष याचीं फळें, पानें, बीं हीं विषारी असतात फळास जहरी कुचला म्हणतात हिंदुस्थानात याच्या सात जाती आहेत हें झाड ४० ते ६० फूट उंच वाढतें बुंध्याचा घेर १२ फूट पर्यंत वाढतो पुष्कळ विस्तार वाढतो हें औषधोपयोगी आहे याचीं पानें रुंद, अंडाकृति, नागवेलीच्या पानासारखीं असतात फुलें हिरवट पांढरीं व मंजिरीच्या आकाराचीं असतात फळ कवठाच्या आकाराचें व नारिंगी रंगाचें असून आत सफेत पिवळ्या रंगाचा गर व गराच्या आत दोन्हीं बाजूस एक इंच व्यासाच्या पिवळट किंवा उदी रंगाच्या बिया असतात या अतिशय विषारी असून यास वास नसतो –वगु ७ ४१२ 'हाइरु अवीति दता का हा उपदेश काजरा मातें।' –मोउद्योग १३ २६ [ स कारस्कर, प्रा कज्जवार ]

**काजवणी**—स्त्री ( कु गो ) कांजी, भाताच्या पेजेला पीठ व मीठ, मिरची लावून तयार केलेली पेज [ कांजी+पाणी ]

**काजवा**—पु. रात्रीं ज्याच्या ढुंगणाजवळ प्रकाश दिसतो, असा एक किडा 'कहनि काय चिकील रविला काजवा रण।' –मोभवरीवारव्यान ४२ (नवनीत पृ ३६५) १ (अव ) पित्तादिकानें किंवा जबर मार बसल्यानें डोळ्यांपुढें जे सूक्ष्म प्रकाशाचे अणु दिसतात ते, यांना 'काजवे लखलखतात' असें म्हणतात म्ह० काजव्याचा उजेड गाडीभोंवता =गरिबाला गरिबीचेंच कामें होणार, किंवा स्वत पुरतीच मदत करतां येणार [ स खद्योति, खद्योत, प्रा खज्जोअ ] ( डोळ्यांपुढें ) काजवे

चमकणें-पधारी येणें -च्याचा उजेड-क्षणभगुरता, अशाश्वतता, कमताई, महागाई, पाण्यावरचा बुडबुडा

काजळ—न दिव्यापासुन उत्पन्न होणारा एक काळा पदार्थ हें अंजन म्हणून औषधासाठीं अगर शोभेसाठीं डोळ्यात घालतात, मस [स कज्जल] —ळाचा डोंगर-पु १ दिव्यावर जो काजळाचा उलटा निमुळता गट्ठा जमतो तो २ (ल) अतिशय काळा मनुष्य ०कुंकु-न १ स्त्रियाची वेणीफणी, नट्टापट्टा वगैरेंना व्यापक सज्ञा 'तिंग न्हाऊ धुवू घालून काजळकुकू करून अगावर वस्त्रें भूषणें घालून सतोषित केलें' -कम २ ५७ २ एका रानटी झाडाच्या फुलाला (व्यगोक्तीनें) म्हणतात ०तीज-(व) हरतालिकेचा दिवस -ळाची कोठडी-स्त्री (ल) सरकारी खजिना किंवा पैशाच्या देवघेवीची मोठी पेढी 'काजळाच्या कोठडींत गेलें तर तोंड काळें मोजलें तर हात काळे'

कांजळ-ळा—पु राडीच्या काठीं उगवणारें व सरपणाच्या उपयोगी असे झाड यास बकुळीच्या फुलासारखीं ल्हान व सुवासिक फुलें येतात -वगु २९

काजळणें—क्रि काळें होणें 'ते अयापि काजळले दिसतुमें।' -शिशु ७४०

काजळी—स्त्री १ वात किंवा कापडा वगैरेचा जळून काळा झालेला कण, भाग, कोळी, कोजळी 'मग आगी लागलिया कापुरा। ना काजळी ना वैश्वानरा।' -ज्ञा १५ ४३९ २ धान्यावर, विशेषत जोंधळ्यावर पडणारा एक रोग, यामुळें कणसात धान्याऐवजीं काळा पदार्थ निघतो, कोळशी, काजळ्या काणी ३ दिव्याच्या धुरानें जमलेला काळ्या पदार्थाचा थर ४ दागिन्याच्या अगद व खोलगट भोंकातील लाख जाळून बाहेर काढली म्हणजे आत जो लाखेचा थोडासा जळका भाग राहतो तो ५ पित्तविकारानें डोळ्यापुढें येणारी अधारी ६ काजळ धरण्याकरितां दिव्यावर जें भांडें वगैरे धरतात तें ७ काजळाइतपत अतिशय बारीक वाटलेलें औषध वगैरे ८ काजळ-ण नावाचें झाड ९ अथर, राळ, टरपेंटाईन वगैरे पदार्थ जाळले असता शिल्लक राहणारें काळेपण १० (ल) दु ख, काळजी 'नाना चिंतचा काजळी। नाना दु खें चित्त पोळी।' -दा ३ ६ ७० 'चिंता काजळी लागली।' -दा ३ ७ ५८ -वि काजळाचें केलेलें (शाई, पागोटयासाठीं काळा रग अशा रगानें रग विलेलें कापड) [स कज्जल] ०कागद-पु (छ) कार्बनपपर ज्याच्या पाठीवर लिहिलें असतां खालीं ठेवलेल्या कागदावर अक्षरें उठतात असा काळा रग लावलेला कागद

काजळी—स्त्री गाय, म्हैस इत्यादिकांनें व्याल्यानंतर दोन तीन दिवस येणारें दूध, चीक [का ५ ३]

काजळ्या—पु गव्हावरील रोग काजळी पहा

काजा—पु काजगी पहा.

काजाऊ—वि कामीं येणारा, कामास उपयोगी पडणारा, उपयुक्त [स कार्य=काज]

काजाणू—न इमारतीचें ल्हान-मोठें लाकूड, सर्व लाकडी सामान [स कार्य]

काजार—न (गो) लग्न [पो काजारी=लग्न झालेला]

काजारी—पु काचेच्या बांगड्या करणारा व विकणारा कासार व त्याची जात काचारी पहा [स काच]

कांजिणी-कांजें—कांज(जि)णी पहा

काजी—पु मुसल्मानी धर्मशास्त्राप्रमाणें निकाल देणारा न्यायाधीश [अर काझी] म्ह० १ राजा चोले दळ हाले काजी बोले दाढी हाले-राजाचा हुकुम सर्व सैन्य ऐकतें पण गरीब काजीचें कोणी ऐकत नाहीं फक्त त्याची दाढी हालते तेवढीच-म्हणजे गरिबाला कोणी विचारीत नाहीं २ (व) काजीजी दुबळे क्यों? शहरका अंदेशा=जेव्हा एखादा माणूस नसती चिंता करतो तेव्हा म्हणतात काजीफोंड-पु (गो) मसणवट ०शरा-धर्मशास्त्र -शारो १८३ [अर काझी+शर्अ=धर्मशास्त्र]

कांजी—स्त्री १ कढ काढलेलें पाणी, आवळलेली पेज, कांजवणी, कण्हेरी 'जो अमृतासि टी ठेवी। तो जैसा काजी न सेवी।' -ज्ञा २ ३६४ 'गाजीत परि सहावें म्हणिजे वैद्यें दिली सुधा कांजी।' -मोकर्ण २१ ४० 'का जीवनामृत उपेक्षुनि प्याल कांजी।' -आसु ५४ 'कांजी वदनीं घातली।' -दे कृष्णजन्म ५९ २ खळ ३ ताकाची स्वच्छ निवळी म्ह० रोनी नाद कांजी लाभे [स कांजिक, ता कांजी] ४ -न (कु) त्रिफळें, तांदुळाची पज, कोथिंबीर याची कढी 'थोडें कांजी वाढ' ०घड्डे-पु पु हिंगाची धुरी दिलेल्या मातीच्या भांड्यात स्वच्छ पाणी भरून त्यात मीठ, मोहऱ्या, वगैरे मसाल्याचे पदार्थ घालून त्यांत तळलेले उडदाचे वडे घालावे व भांड्याचें तोंड तीन दिवस बांधून ठेवून मग काढावे -योर (व) हरभऱ्याची भिजलेली डाळ वाटून पाडणीचे ताकात कालवून नतर त्याचे वडे करतात ते ०हाऊस-न १ (लष्करी) लष्करांनीत शिपायाला शिक्षा देण्याचा एक प्रकार शिपायाला खूप काम करावयास देऊन फक्त कांजी पिण्यास देतात २ (व ना) कोंडवाडा

काजीण—स्त्री (गो) मगज

काजुरा गोरी—स्त्री आवे इदद

काजुला—पु १ (कु) सर्व स्त्रानानतर उघडणारें बाताचें टोक, काजळी, गूड २ (कु) स्त्रानीचा गड [स कज्जल]

**फाजुली**—स्त्री (गो.) गोकर्णाचें झाड

**फाजुलें**—न (गो) कानकोरणें.

**फाजुलो**—पु १ (कु) काजवा नावाचा किडा. २ (गो) वातीचें गुल, कोळी, कोजळी ३ (गो) काजूची दारू

**फाजू**—पु काजूचें-जांभीचें झाड व फळाची बी हे झाड रानांत, डोंगरांत-विशेषत मलबार, गोमंतक, मालवण या प्रांतीं होतें याच्या तांबडा, पिवळा व पांढरा अशा जाती आहेत फळ मऊ असून पुढें बी असते तिची साल कठिण असून आंत बियासारखा चीक असतो सालीच्या आतील गोळवास काजूगोळा म्हणतात पिकलेल्या फळास जाम म्हणतात व ते खातात बी भाजून अगर वाळवून वरील साल काढून खातात मिठाई इत्यादि पदार्थांत बीचा उपयोग करतात बीयाचा चीक तारवाच्या तळास लावतात -वगु २ २९ काजूच्या फळाची दारू होते कच्च्या फळाचा चीक पायास होणाऱ्या चिखल्या रोगावर उपयोगी पडतो -कृषि ७२७ धातूस डाक लाविण्यासाठीं याचा रस उपयोगी आहे [मलायी कायु, मॅ अकाजु पोर्तु अकाजु, इं कॅशु हिं शु काजें]

**कांजें**—वि (गो) पुरतें झालेलें, वाढ खुटलेलें फळ [काचा]

**कां जें**—कारण, कीं 'का जे विखेनें मोटा। म्हणोनिया।' -दा ९४९

**काजेल-उपैल, काज्याल**—न (कु गो) काजूचें तेल २ काजूची दारू ३ काजूचा डामरासारखा चीक, हा गाडीच्या वंगणास उपयोगी पडतो

**काज्या**—पु काजगी पहा

**काझ**—स्त्री (गो) वारनीस, काचेसारखें तकतकणारें तेल

**काझी**—काजी पहा

**काट**—न शाई बनविण्यासाठीं नाचणी, बाजरी इत्यादि जाळून त्यांत पाणी ओतून केलेलें शिरें कुळीथ हरभरा इ० कडधान्याचें शिजवून काढलेलें पाणी, कढण, कट, सुपाऱ्या रंगीत पदार्थ किंवा कडधान्य शिजविलेलें पाणी, आमपुटें तयार करण्यासाठीं त्यांना पुट देण्यासाठीं केलेलें रातांब्यांचें पाणी, (गो) मास शिजवून तयार केलेलें पाणी [स क्वथ्=कढविणें]

**काट**—पु १ (कों) कवळ, शिरांनी इ० (राबासाठीं) २ (विड्याच्या पानाची) लहानशी रास, कुजकीं पानें कापून शिलक राहिलेली कत्रण ३ गंजिफा अगर पत्ते पिसून झाल्यावर वाटण्याच्या आधीं वाटणाऱ्याच्या डावे हातच्या माणसाकडून जो भाग काढून ठेवतात ती क्रिया ४ राज्यकारभार, घरखर्च वगैरेमधील काटछाट, काटकसर, कपात 'लँकेशायरच्या गिरणीवाल्यांनीं मजुरींत काट करण्याचें ठरविलें आहे' -के १४ ७ ३० ५ रेघ, फुली, खोडणें ६ -स्त्री तोटा 'या व्यवहारात त्याला चांगलीच काट बसली' ७ (शिंपीधंदा) कापलेला नमुना 'विजारीचा काट पोंचला नाहीं' ८ (गो) पदार्थावळी किंवा ओझें यांना बांधावयाचा बंद ९ आघात, प्रहार 'केला पडवेन्यावर काट' -दे.कृटिबसंप्रद ३ [सं कृत्=कापणें, लिथु केर्ट्रे, ग्री केइरो, स्लॉ कोतु, लॅ कर्टस, हिंद्रु कर्तयिम्] ०देणें-मारणें, खोडणें, छाटणें, अपमान करणें

**काट**—पु १ गुप्त कट, खोल मसलत 'असा काट नर्नाथ खन यानें केला' -भाव ५८ २ यत्न, युक्ति, चातुर्य 'त्याचा तेथें कांहीं काट चालत नाहीं' ३ (व) द्वेष 'तो पहिल्यापासून माझा काट करतो' [सं कूट]

**काट**—पु १ पट राड, राप, गज, मळ 'भीतरीं निद्रा तें कामराड। असत्य कांटें काटली।' -एमा ११ ५९७ 'अनेक दोषांचे काट। ने जे गादलें निर्वोट। होती हरिनामें चोखट। क्षण एक न लागता।' -तुगा २८९८ २ (महानुभाव) कपड्यावरील वस्तुंचें (लाख, चीक वगैरेचें) लुगण, सडीचा रंग, कापडावरील डाग 'कपायाचें काट। फेडूनि कीजे धुवट।' -भाए ७८३

**काट**—न मसण [स कट=स्मशान, फा कव्ह=स्मशान]

**काटांत जाणें**—मसणांत जाणें २ (ल) ज्याची आपल्याला माहिती किंवा काळजी नाहीं त्याच्या हजर असण्याबद्दल अगर जण्याबद्दल बेफिकीरवृत्तीनें बोलणें जसें -'तो काटांत गेला' =कुठें तरी, मसणांत गेला

**कांट**—न १ पावसाळ्यांत उत्पन्न होणारा जळवासारखा एक किडा [कांणट पहा] २ (कों) कुपण, वई पालव्यासाठीं (बाभळ, बोर वगैरेच्या) भाऱ्यातील एक फांटा, खुंट ३ (कों) आकटोबर-नोव्हेंबरमध्यें पकडला जाणारा समुद्रांतील एक मासा [स कटक]

**काटक**—वि कर्नाटकातील एक रानटी व क्रूर रामोशी, बेरड यासारखी जात, यावरून दरोडेखोर, गळेकापू लोकांना हा शब्द लावतात [स कटक, तुल का काट=किडा] -वि कष्टाळु कणखर, अति मेहनती (शरीर, माणूस)

**काटकढी**—स्त्री कडदण शिजवून त्याच्या पाण्याची-काटाची केलेली कढी [काट+कढ]

**काटकवळ**—न (कों) राबाचें कवळ [काट+कवळ]

**काटकसर**—स्त्री १ खर्च कमी करण्याची क्रिया, काटछाट, मितव्यय (क्रि० करणें, काढणें, पहाणें) 'दुष्काळामुळें काटकसरीची पहिली कात्री युनिव्हर्सिटीस सरकारातून जी पांच हजार रुपयांची मदत होती तिजवर पडली' -टि २ १२२ २ अशा रीतीनें शिलक टाकलेला पैसा, रकम [हिं काटना+अर कसर] ०री-ऱ्या-वि बेतानें खर्च करणारा, मितव्ययी

**काटकाई**—स्त्री १ काटक, रामोशी, बेरड, भिल्ल वगैरे लोकांनीं केलेली पुंडाई, नासधूस, अनर्थ 'वाटेंत काटकाई फार यास्तव माणसें येत नाहींत'—खर १११० यावरून २ क्रूरता, विध्वंस, रानटीपणा [काटक]

**काटकी, काटकुळी, काटकोळी**—स्त्री लाकडाची झिलपी, धलपी, तुकडा, शिरपुटी, (अव) काटक्याकुटक्या, काटक्या, काटकुटी, काटकूट [स काष्ठक]

**काटकुटी-कूट**—स्त्री १ काटकी (अव) २ लहान काटकी ३ काथ्याकूट, वादविवाद, ऊहापोह चर्चा [काष्ठ]

**काटकुळा-कोळा**—वि रोडका, किडकिडीत, क्षीण, खंगलेला, कृश, सडपातळ

**काटकोण-न**—पु १ नव्वद अंशाचा कोन, वर्तुळाच्या चतुर्थांशाइतका कोन, 'दोन सरळ रेषांनीं एकमेकींस छेदिलें असता छेदनबिंदूशीं झालेले सर्व कोन जर परस्परांशीं सारखे म्हणजे एक परिमाणाचे असतील तर त्यांतील प्रत्येक कोन काटकोन होय'—महमा ४ (इ) राइट अँगल २ गवंड्याचा अगर सुताराचा गुण्या, कोनाळी (क) [काटणें+कोन] ०चौकोन-पु ज्या चौकोनाचे सर्व कोन काटकोन असतात तो—महमा ८ ०त्रिकोण-पु ज्या त्रिकोणाचा एक कोन काटकोन असतो तो—महमा ७

**काटकोना गुण्या**—पु गुण्या काटकोण-न अर्थ २ पहा

**काटक्याकुटक्या**—स्त्री अव लाकडाच्या ढलप्या, झिलप्या, तुकडे

**काटगिरी**—स्त्री शहाणपणाची व धूर्तपणाची मसलत, योजना किंवा बेत करण्यातील चातुर्य धूर्तता, कावेबाजपणा (विशेषत अपकार करण्यामध्ये) [काट+फा गिरी]

**काटगोल**—पु काटोळा वासा, सोट इत्यादि [काट+गोल]

**काटणी**—स्त्री १ जोंधळा, रानगुरा इत्यादि पिकांच्या कणसांची कापणी २ गंजिफा, पत्ते वाटण्यापूर्वी त्यांतील कांहीं पानें उचलून काढून ठेवण्याची क्रिया, काट ३ पहा ३ विड्याच्या पानांतील नासक्या पानांची छाटणी ४ जंगलाची, रानाची कापणी, छाटणी ५ सैन्याची कत्तल, कापाकाप ०वाटणी-स्त्री पत्ते किंवा गंजिफा काढून वाटण्याची क्रिया [स कृत]

**काटणें**—अक्रि मळणें, मलीन होणें, राप चढणें, लेप चढणें 'तैसिया वदनीं प्रळयरुधिरें। काटलिया दाढा।'—ज्ञा ११ ३४१ 'जे काटली नित्य मह्मानुतानें।—सारह १ २८ 'धुळीनें काटलें आकाश।' [काट=मळ]

**काटणें**—उक्रि १ छाटणें, कापणें (परंतु विवक्षित प्रसंगींच याअर्थी उपयोग करतात) गंजिफा, पत्ते इत्यादिकांतून कांहीं भाग उतरणें, कमी करणें, छाटणें, (शरीराचा एखादा भाग) 'कारा काटलिया मुखीं कटतंग टोराचिया शोणितें।'—आता १३ २ दु खात, अडचणींत, नासान वेळ घालविणें, खर्चणें 'हुजूर चाकरी राजापाशीं कांहीं दिवस काटले।'—पला ८८ [स कृत, हिं काटना, तुल प्रा कट्ट, प कट्टणा, सिं कटणु, ब काटिना, गु काटवु]

**काटदार-बाज**—वि कावेबाज, धूर्त, कल्पक, मतलबी, कारस्थानी

**काटमूय**—स्त्री (गो) काडमुंगी, वाघमुगी ही मोठी, काळी असून चावते दशाचा वेग फार तीव्र असून गाधी-दादी उठतात 'काटमूय आयल्या जाल्या रामलक्ष्मणाची दूराय घाल'

**काटमोगरा**—स्त्री मोगऱ्याची एक जात

**का(क)टला**—पु कडता पहा

**कांटला-ली, काटवेल**—पुस्त्री फळ न येणारा करटोलीचा वेल, रानकारलें

**काटलें**—न १ (कों) करटुलीचें फळ २ काटेरी रान?—शर

**काटवट**—स्त्री १ भाकरीचें पीठ मळण्याची लाकडी, कान असलेली परात, काथोट २ (विडकाम) चरकाची खालची बैठक, बुड [स काष्ठ+वृत]

**काटवण-न**—न १ काटेरान, काटेरी वन 'काटवण अरण्यक्षिति। आधवेंचि साडोनि जाये सागाती।'—एभा ६ ३४३ 'कडे मुरडूनि काटवण। ऐसा आणिलीं तीं कोण कोण गा।'—तुगा ४१४६ 'पसरितो सराट भारी। काटवण बोरी।'—राला ६६ [स कटक+वन]

**काटवणी**—न १ कडधान्य शिजविलेलें पाणी, रंग उकळलेलें पाणी २ अतिशय गढूळ पाणी, (फोड, गढू ६० पुन वाहणारें पाणी यासहि ही संज्ञा लावितात) 'निळा म्हणे काटवणीं। घालिती घाणीं जाणिवेच्या।'—निगा २४१ [स कथ्-काट+वन-पाणी]

**काटवल**—न १ (व) करटोली, काटली २ (कों) गुराला घालण्याचें किंवा छपरावर घालण्याचें गवत (त्याच्याहून भाताण निराळें)

**काटवळ**—न काटेरी झाडाच्या बारीक फांद्या

**काटवाडा**—पु (कों) कोरड्या दिवसात रानामध्ये किंवा कुरणात तात्पुरता बांधलेला गोठा, भोंवतीं काट्यांची ताटी लावून केलेली, रात्रीचीं गुरें कोंडण्याची जागा [काट+वाडा]

**काटविकरा**—पु (राजा) अतिशय दुर्मिळता, महागाई, टचाई कमतरता 'भाजीस अतिशय काटविकरा आला' [काट+विक्रय]

**काट(ढ)शह-हा**—पु (बुद्धिबळ) काटा शह, बुद्धिबळाच्या खेळात एखाद्या मोहऱ्याच्या पगात असलेलें आपलेंच दुसरें मोहरें काढून सेव्हन प्रतिपक्षीय राजावर मोहऱ्याचा मारा लागू करणें, (सामान्यत) जरन काढणें [काट+शह]

**कांटस**—वि काटयाचा, कटेरी 'जैसा कमळवनीं कांसु। वाढिलिया कागु।' -ज्ञा १८ ६१७ [स कटक]

**काटसरी**—स्त्री १ (ढोरधंदा) कातडयाच्या कडेचा भाग, कडेची पट्टी २ (विणकाम) टोंकास टांचणी बसविलेल्या दोन काटया लुगडें विणताना काठास ताण बसण्याकरिता लावतात त्यांपैकीं प्रत्येक, सट्टी काटोसी पहा [काट+सरी]

**काटळणें**—उक्रि चिंचेच्या आकडयांतून चिंचाके काढणें

**काटळी**—स्त्री एक प्रकारचें हलकें धान्य ²

**काटा, कांटा**—पु १ अणकुचीदार, तीक्ष्ण टोंक असलेली, जी बोचली असता रक्त काढते अशी काडी, बाभळीचा, बोरीचा दाभणासारखा टोंचणारा अवयव 'सर्प कपाळीं काटा नेहटे। कां सापसुरळीचें पुच्छ तुटे।' -भारा बाल ८ ३५ २ (भयानें, थंडीनें वगैरे) अंगावर उभे राहणारे शहारे, रोमांच ३ (अव) तापानंतर अंगावर खरखरीतपणा अथवा बारीक पुटकुळ्या असतात तो, पुरळ ४ (अव) तापाच्या पूर्वी अंगावर येणारी शिरशिरी, रोमांच, कसर ५ विंचवाच्या नांगीचें पुढचें तीक्ष्ण टोंक ६ कुक्कुटादिकाचा खिळा, जो कुकुटाच्या दाढींत वसतो व मागें सरतो तो ७ वेळू वाबू वगैरेंना येणारा तुरा, मोहोर, फुलोरा ८ कमर, मान, पाठ याच्या आतील बाजूस आधारभूत असलेला अस्थिविशेष ९ गुणाकार भागाकार याचा ताळा पाहण्यासाठीं अंक मांडण्याकरिता घातलेली चौफुली (×) १० राघु मैना इत्यादिकांच्या गळ्यात होणारा एक रोग ११ वजनानें विकलेल्या वस्तूवर जें कांहीं वजन कटौती देतात तें कडता पहा १२ नदी किंवा समुद्रातील पाण्याखालीं झाकलेला खडक १३ काटयासारखी शरीरास बोचणारी कोणतीहि वस्तु (माशाचें हाड, चक्राचा दाता, घड्याळाचा हातकाटा, खडबडीत लगामाचें टोंक करवतीचा दाता, जेवणातील वापरावयाचें दातालें-कांटा, ज्वारीचें किंवा भाजीपाल्यावरील खरखरीत केंस, लव इ०) 'काटा बराबर एकावर एक आला' -रासक्रीडा ७ १४ हलवा, हलवा मिठाई यावरील टोंक रवा (क्रि० येणें, उमगणें, वळणें, उठणें) १५ (विणकाम) वशारन करताना इकडून तिकडे (वशारन पुढें सरकण्यासाठीं) फिरवावयाचें लाकूड १६ (व) थेंब 'घरात तेलाचा एक काटा नाहीं' -वशाप ५१ १२ ४७८ १७ (कु) सुताराचें एक हत्यार १८ (ल) त्रास देणारा माणूस, व्याधि, शल्य पीडा, शत्रु 'धर्माच्या हृदयातिल काढितसे मी समूळ काटा हो।' १९ तराजूच्या दांडीमधील उभा खिळा 'जरि काटा करताए दैवाचा। जेउता राजमुद्र।' -ऋ ३९ २० काटा असलेला तराजू (विशेषत सोनाराचा, सराफाचा) 'मेरूचिया वजनास पाहीं। काटिया गतली जिही राई।' -ह १० १६१ [स कण्टक, प्रा कंटओ, अप कंटउ, हिंगन, फ्रे नि कंडो ते कांटा] **०उपटणें**-१ (क प) त्रासदायक प्राणी, शत्रु गोष्ट, नाहींशी होणें २ (व प) समूळ नाहींसा करणें, काढून टाकणें **०काढणें**-आपल्या मार्गांत असलेल्या, आपणास पदोपदीं नडवणाऱ्या शत्रूस दूर करणें 'वसुदानाच्या पुत्रें जो अभिमुख काशिराज तो वधिला। कांटाचि काढिला तो जाणा तव सूनुच्या मनामधिला।' -मोकर्ण ४ १५ **०मारणें**-१ काटयानें भिद्र करणें २ अंगांत (तापाची) कसर येणें **०मोडणें**-१ (व) विंचू चावणें २ किंचित उष्ण होणें 'थंड पाण्याचा थोडा कांटा मोडला' **कांटयाचा नायटा होणें**-काटा मोडल्यावर लगेच तो काटला नाहीं तर त्या ठिकाणीं नायटा होतो म्हणजे आरंभीं क्षुल्लक वाटणाऱ्या वाईट गोष्टीचे पुढें मोठे हानिकारक परिणाम कधीं कधीं होतात **काटयानें कांटा काढणें**-एका दुष्टाच्या हातून परभारें दुसऱ्या दुष्टाचें शासन होईल असें करणें 'कांटयानें काढितात कांटा कीं' **काटयाप्रमाणें सलणें**-सतत त्रासदायक होणें, दुःखकारक होणें, मत्सर, हेवा, द्वेष वाटणें **काटयावर ओढणें**-दुःखांत घालणें, वस्त्र काटयावर ओढलें असता फाटतें त्यावरून **काटयावर घालणें**-दुःखात लोटणें 'त्यात (कौरव सैन्यात) मरेनचि शिरता काटयावरि घालिता चिरे पट कीं।' -मोविराट ३ ४१ **कांटयावर येणें**-(बैलगाडी) आसाच्या दोन्ही बाजूला समतोल वजन होणें **०धारवाडी**-अगदीं बरोबर तोल दाखविणारा कांटा 'टीका करणाऱ्याच्या हातात नेहमीं धारवाडी काटा असला पाहिजे' **काटेकाळजी**-अतिशय सूक्ष्म काळजी, चिंता 'नवीन गव्हर्नर हे काटयाकाळजीनें व निःपक्षपातबुद्धीनें आपलें काम करतील' -दि १४३३ **०भर**-(बायकी) थोडें 'आज तिच्या दुखण्याला काटाभर माघचें पाऊल आहे' **०राखण**-स्त्री (कु) लाकडात खाच, रेघ पाडण्याच्या उपयोगी सुताराचें एक हत्यार, खतावणी, फावडी **०रूणगी**-(गो) रूणगर, रुन्क पहा

**काटाकाट, टी-काटाकूट**—स्त्री १ काटकसर, कापाकापी, छाटाछाटी २ सरसहा कापाकापी, तोडातोडी, कत्तल (लढाईतील) 'त्या काटाकाटींतून तो वाचला' -अस्तभा ८१ [काटणें]

**काटागिरी**—काटगिरी पहा

**काटा(टि)जन**—न कटजा कटजन पहा

**काटादाटा**—वि मारून मुटकून बनविलेला

**काटांदीर-काटुंदूर-काटादूर**—पु (गो) झाडावर राहाणारा घुशीसारखा एक प्राणी, कांडेचोर, ऊद [काष्ठ+उदीर]

**काटारा**—उटकगार-री पहा

**कांटारा**—पु (राजा कु) काटा

**कांटालें**—न १ तराजू २ रोमाच, शहारे

**कांटाळणें**—अक्रि कडाळणें 'जो काटाळे रोगमर्णी। तो एक कुपुत्र दुरात्मा।' –मुसभा ५ ८८ 'ऐसी उनाहृतमाची ख्याती। ऐकोनि उद्धव काटाळे चित्तीं।' –एभा ३१ ५४४ 'प्राकृत आइकानि काटाळे।' –गीता २ २०५२ 'काटाल्ला दीनकरु।' –उपा १७७८

**काटाळवाणी**—वि कटाळवाणी, 'अमुप लक्षविती कातडी। कटाळवाणी।' –दा ३ १ ४१९

**काटाला**—पु १ रोमाच 'सर्वांगा काटाळा आला।' –ज्ञा १ १९७ 'दखोनि मरिष्ठाचा मेळा। शुक्राआर्गी भय काटाळा।' –सुआदि ५ १२९ २ तानवा 'जें निल्याचाचेनि मानें। उपमेचा काटाळा न दिसे सानें।' –ज्ञा ८ ०६३ 'माझिया प्रचडपुण्याचळा। तुज्ञ घालिते कोण काटाळा।' –सुआदि १९ १७९ ३ काटा, कटक ४ भय, त्रास 'जवीं मोति याची वटमाळा। भमें सर्प भासली डोळा। ० प्रमातीं धालिती गळा। न बाधी काटाळा सर्पभयाचा।' –एभा २४ ६८ ५ गाभड, धडा, समतोल करण्याकरिता घातलेला पदार्थ 'म्हणोनि रिर्वेसीं काटाळा। गुरुत्वें तूचि आगळा।' –ज्ञा १७ ३ [स कटक]

**काटाळी**—स्त्री (गो) धिड

**काटाळू**—वि (क) काटे असणारें (बाभळ, बोर इ०) झाड

**कांटाळें**—न १ तानवा तोलण्याचें साधन, तराजू कांगळा पहा 'जोख जालें फुडें। ताजवें काटाळें।' –कान्दिपुराण २८४० 'नातरी पृथ्वीचेनि पाडें। काटाळें जरी जोडे।' –ज्ञा ४ १८१ 'मेरूमहि मिळेल कागळें। आशहि पाळिले वळिराळें।' –स्वानु ७ २ १० २ उपमेय, तुल्य वस्तु सारख्या वजनाचा पदार्थ, 'म्हणौनि इय आत्मलीले। नाहीं आन कागळें।' –अमृ ७ २६६ ३ वजन 'सतनुची काटाळें। मार्गें जाले।' –ज्ञा १४ ५१

**का-काटी**—सवि (नदभापा) वीस ही सख्या 'उधानु कागीवरी चोपड्ची आस। नवरा राजत मिरवनसे।' –तुगा ४४५९ ०**मुद्र**–मवि (नदभापा) पचवीस हीसख्या सोन्याचा भाय काटीमुद्र आहे'

**कां(का)टी**—स्त्री १ कांटेरी झुडुप शताव्या बुपणा सीलकरि असलेली एक फांगी, कांटी झाड किंवा झुडुप वहतील त्याची एक फांदी 'धोंड मदपावर टाकरे त्यावरती काटी टाकली' –विवि ८ ४ ६६ 'अधा नाइली जों दृष्टी। सर्वेचि पायीं रुपली कांटी।' –कथा १ ७ १६ २ (गाण्याण्प्पा) प्रत्येक बाजूची उभी मर्यादरेषा (या दापांना जोडणारी मधली आडवी ती पाटी) ३ बाभळीचें लहान झाड ४ काटेरी कुपण 'बाहेरी यमनियमाची काटी लाविली।' –ज्ञा९ २१३ 'खेटिता कुंप काटी खुट दरडी न पाहे।' –तुगा ३४९ 'काटिया काटी झाडावी' –शिशु ४९४ ०**वड**–न काटा, कटक 'तया तोंडीं काटिवडें। आतु जुसतीं हाडें।' –ज्ञा १३ ६७८ ०**लागणें**–ओस पडणें ०**लावणें**–(घर, ससार, व्यवहार, रोजगार) मोडणें, नाश करणें, सोडणें, विध्वसकरणें 'आपुल्या ससाराप लावोनि का ी। आमचे पाठीं लागलास का।' ०**आपल्या पोटावर ओढणें**–भुकेनें मरण्यापेक्षा काट खावयास तयार होणें, अति अधाशी, स्वार्थपरायण होणें **काट्याचें कोलेंहे करणें**–क्षुल्लक गोष्टीचा बाऊ करणें –**ने काटी झाडावी**–काट्यानें काटा काटणें 'काटीनें काटी झाडावी।' –दा १९ ९ १२ **कांट्याकुट्या**–स्त्री (अव) काटेरी झाडेंझुडपें म्ह० 'दुरून डोंगर साजरा जवळ गेलें की कांट्याकुट्या (जवळ जाताना काजरा) =लाबून कोणतीहि गोष्ट चांगली दिसते पण जवळून पाहता तिचे दोष दिसतात –**शीं काट्या घासणें**–(व प) फजिती करणें, बेजार करणें, छळ करणें, त्रास देणें, गानणें **काट्यावरुन ओढणें**–अतिशय त्रास देणें, छळणें, गानणें

**काटील**—स्त्री रानकरटोली व तिचें फळ

**का-काट्टक**—न १ लाकडाची दिलपी, बारीक कामरी, काडी २ लहान काटी 'धावली माझ काटुक घेऊनि।' –दावि १९ –वि (गो) चामुट पहा

**काटे**—न १ पावसाळ्यात उत्पन्न होणारा लहान किडा, काट अर्थ १ पहा, काणीट २ जोंधळा दूर पिकणारी काळी जमीन, जोंधळ्याची एक जात –नामको

**काटे**—पु कटक (अव) ०**आसण**–पु एक जातीचें काटेरी झाड ०**कडी लगाम**–पु कड्या असलेला लगाम, काटे लगा माचा एक प्रकार, लगाम पहा ०**कणग**–न कणगर फळ ०**कुट्याचा-सराट्याचा**–वि काटेरी (झाडझुडप), काटे असलेला, कटकयुक ०**कुयरी**–स्त्री कुयरीची एक जात ०**कुंव(वा)र-कुंवारी-कोरफड**–स्त्री कोरफड, घृतकुमारी [कटक+कुमारी] ०**कुवळा**–पु एक झाड लॅ सायटरोकिसॉन टोमेन्टासम ०**केतक-ती**–पुस्त्री रानकेवडा, पायपात 'काटकेकतीचे झाडाला आत जन्मला केवडा।' ०**कोर**–वि १ कडक, तंतोतंत नम्यात, अमलात आणण्यात कामीं शिस्तवार, निष्ठुर २ रेखलेला, नमका, बरोबर, बिनचूक, रीतसर, रतिभरहि चूक नाहीं असा, मेहनतीनें केलेला, ३ बारीक, पुरता, नाजूक, नेमें तिटा एकदाहि चूक नसलेली नाहीं असे (काम) –क्रिवि बरोबर, टाक टिकीनें, योग्य प्रमाण ठरवून, पण [कांटा+कोर] ०**कोहळ**–**कोहळें**–न (व) कोहळा, काहाळा ०**गहूं**–पु (व) गव्हाचा

एकप्रकार ( आकोला, खामगांव या भागात होतो) ०गाटी-स्त्री छाटाछाटी, कापाकापी [काटणें ] ०घर-न ज्याचें अंगावरील कवच कांट्यांनीं व्यापलें आहे असा किडा 'कोसले अथवा काटे घरें । नाना पृष्ठिभागीं चालती घरें ।' -दा १ ७ ४ ०चिर्णी-स्त्री (गो ) कुळकण्यांचा भत्ता ०चुंबक-पुन विलायती किंवा पांढरा धोत्रा, उंटांना हा फार आवडतो हा चेंचून कांग मोड लेल्या जागीं बांधून असतां कांग बाहेर निघतो ०डोळे-उ (अव ) अतिशय खुपतात अशाप्रकारें डोळे येणें, यांच्या उलट डोणडोळे हे नुसते सुजतात व अतिशय पू येतो ०तोल-वि १ अगदीं बरोबर वजन असलेला, काट्यानें तोललेला, बिनचूक, बरोबर नेमका २ फार नाजुक ०धोत्रा-पु पिवळा धोत्रा विलायती धोतरा हें झाड दोन हात उंचीचें असून त्यावर सर्वत्र कांटे असतात याचें बहुकीच्या दारूप्रमाणें काळें असतें व मुळास चोक म्हणतात इ यास ऑर्जेमोनियम -वगु २ ३१ ०बुरड-स्त्री (गो ) पुष्कळ कांटे असलेली मासळी ०भाजी-स्त्री एक पालेभाजी, कांटेमाठ (लॅ ) अमरयस स्पिनोसस ०भांटरी-स्त्री ज्याचें फळ भोंवऱ्या प्रमाणें असून त्यास कांटे असतात असें एक काटेरी झाड ०मोड णावळ-स्त्री १ शेताच्या जमीनीची पाहाणी करीत असतां मामले दाराच्या पायात काटा मोडल्यामुळें धरटीं जो दंड वसूल करण्यात येत असे तो -मोल २ कदाचित् कांटेरी झाडेंझुडपें तोडून टाक ण्याकरिता त्यांवर बसविलेला सरकारी कर ०रा-री-वि कांट्यांनीं भरलेला, ज्यावर कांटे आहेत असा -पु एक लहान काटेरी झाड याला पांढरीं सुंदर फुलें येतात ०रिंगणी-स्त्री एक कांटेरी, जमीनीसरपट वाढणारें झुडुप याला वांग्यासारखें फळ येतें तें औषधी आहे ०री-वि कांट्यांनीं भरलेलें ०री तार-जिला लोखंडाचे कांटे मधून मधून बसविलेले असतात अशी कुंपणास बसविलेली तार इ बार्बवायर ०रें-न (राजा ) कंटकयुक्त करवंदीचें वगैरे शिरें, फांदी ०लगाम-पु कंटकयुक्त लगाम ०वन-न अरण्य, जंगल (ज्यात काटेरी झाडें पुष्कळ आहेत असें) ०वाळूक-न ( क ) कांटे असलेलें वाळूक ०शेवती-स्त्री शेवती नावाच्या फुलझाडाची एक जात पांढरी शेवती, गुलाबी शेवती अगर शेवंतीगुलाब गुलाबाप्रमाणें हिच्या झाडास कांटे असतात याचीं पानें गुलाबाप्रमाणें कानदार असून त्यास रास्त डीच्या आकाराचें लहान व एक पाकळीच्या घेराचें पांढरें फूल येतें हीं झाडें हिमालयात होतात -वगु २ ३२ -तीप्र-४०

काटेळें—न (कों ) झाडावर लागणारें मोहोळ, मधाचें पोळें

काटोमोटो—पु (गो ) मीठभाकर [ काटो=मासळीचा तुकडा+मोटो=भाताचें शीत]

काटोखी—स्त्री (विणकाम ) कोष्ट्याचें एक उपकरण, लहान खिळे मारलेली एक पट्टी, काठी, मागावरील ताण ताठ राहण्याकरिता त्याच्या दोन्हीं बाजूस लावतात कटसरी पहा

काट्टा-ट्टी—पुस्त्री (व ) काटा-टी.

कांटघाळें—न (गो ) पाचोळी

कॉंट्रॅक्ट—न (इं ) (कायदा ) मक्ता, ठेका, घर अगर इमारत बांधण्याची जोखीम स्वत वर घेऊन त्याबद्दल ठोक रक्कम घेणें, करार [इ कॉंट्रॅक्ट]

का-कांठ—पु १ कडा, बाजू, मर्यादा, टोंक, किनारी (ताट, पागोटें, सडकें इ च्या भोंवतालचा भाग), कोर (भाडीं वगैरेंची ), कंगोरा २ किनारा (समुद्राचा), जवळची भूमि, थड-डी (समुद्र, नदी यांची ) ३ पदर, किनारी (वस्त्राची वेलबुट्टीची किंवा साधी ) [सं. कंठ=गळा, काष्ठा=सीमा ] ०कोणा मोजणें-सूक्ष्मपणें परीक्षणें, चारकाइनें तपासणें -ठावर बसणें (पखवाजाच्या काठावर थाप मारली म्हणजे बद्द आवाज होतो त्यावरून ) सोडणें, कमी होणें, (धंदा, गोष्ट) नासणें (काम) अकर्तृक योजनात 'याच्या काठावर बसली (चोपडी किंवा एखादें अध्याहृत स्त्रीलिंगी नाम ) -ठावर मारणें-बिघडणें, नासणें, मारणें -ठावर येणें-जिवावर येणें ०किनारा -पु बाजूची पट्टी-कडा-काठ [काठ+किनारा] ०कोपरा-पु बाजू, कड, कोपरा कोन 'सारें शेत पिकलें (गेलें) नाहीं काठ कोपरा पिकला (गेला) ०दोरा-पु कापडाच्या गांठीस-काठाला घातलेला जाड दोरा, पदराला घातलेली दोऱ्याची शिवण ०(ठा) परा-प्रा-फरा-पु १ (कों ) फुटलेल्या मातीच्या मडक्याचा वरचा भाग अर्धा भाग, गळा, काठ 'कापा कुंडा त्याचिऱ्यास । चिता कांठफरा गळां वहात । तोही शुनीमागें धावत । कामासक्त अविचारी ।' -एभा १३ २०६ 'जें का काठफरा उलटे । दवसी ज्याचें बुड गेलें । तें न पाहिजे हालविलें । असो सचरलें निन आलों ।' -एरुस्व १८ ४५ ५ बोडकें गलबत (शीड, काठी वगैरे कांहीं नसलेलें ) गलबताचा सांगाडा, खटारा ०फुटका-वि ज्याचा काठ मोडला आहे असा ०मोडका-मोडा-काठफुटका पहा ०मोरा-१ काटेरा पहा 'जेसी नीचाचा काठमोरा । गळा अडकल्या मांजरा । ते रिघोनि शुचीचिया घरा । नाना रसपानीं विटाळी ।' -एभा२६ २०६ 'काठमोरा त्याचे निडळी रुतला ।' -पच ४४ 'हाता न ये ज्या घरचा गोरस । तरी ताडन करी त्याचिया मुखास । त्याच्या गळा काठमोरे हृषीकेश । घालोनियां हिंडवी ।' -ह ७ १४६ २ पोळी, भाकरीचा कडेचा तुकडा ( क्रि० घेणें, तोडणें ) काठमोरा गळ्यात अटकणें-येणें-एखादा धंद्यातील, कामातील लभ्यांश हातीं न लागतां व्यर्थ शीण पडणें (ज्याला मडक्यातील वस्तु खावयास मिळाली नाहीं पण मडक्याचा कांठ गळ्यात अडकला त्या कुत्र्याप्रमाणें ) ०रें-न

कापडाची किनारी, धार 'धोतराची काठरी लोंबू लागली' •चा-पु (ना) काठ, किनारा, थडी •सर-तुडुंब, काठोकाठ, ओतप्रोत

**काठकर**—पु देवादिकाच्या उत्सव समारंभात पागोटें बांध लेली काठी किंवा निशाण घेऊन चालणारा माणूस [काठी+कर]

**काठंगा-ग्या**—वि (कों) काठीसारखा, बारीक, सडपा तळ, किरकोळ, काटकोळा [काठ+अंग]

**काठ(ठा)ण**—न कडदण, कडधान्य, काहींच्या मतें हर भरा वाटाणा मसूर लाख इ रब्बीच्या पिकाला हा शब्द लागत नाहीं बाकीच्या खरीपातील द्विदल धान्याला लावतात 'काठाणी ती ४ उडीद, तुरी वगैरे पावसाळी'—मसाप २ २ ६९ [स काष्ठ+अन]

**काठणें**—उक्रि कढणें, सोसणें, -तुन पार पडणें

**काठभोंवरी**—कटि भोंवरी पहा एक झाड

**काठवट-टा**—१ काटवट १ पहा [काष्ठ+वाटी] २ (गुन्हाळ) नवरानवरीच्या खालच्या आस फिरणारें आडवें लाकूड, चरकाची बैठक

**काठवण**—१ काव्वण पहा झाडी, काटेरी रान 'सातपुडी डोंगर साजणी झाडी काठवण भिल्लाचें।'—मसाप १ १ २ 'ओढिती काठवणा सोई।'—तुगा ७०२ [स कटक+वन]

**काठयाड**—न घोडे विकणाऱ्या काठेवाडी लोकांचा तळ किंवा समुदाय [काठेवाड=एक प्रांत]

**का-कांठळी**—स्त्री हलकें धान्य [काठण]

**का-कांठळी**—काठाळी, वस्त्राचा कांठ, किनारी [काठ]

**काठा**—पु (व) वरू [स काष्ठ]

**का-काठा**—पु १ (कों) काठ, किनारा, थडी [काठ] २ वर जमीनीचा थर असलेला कातळ, खडकाळ जमीन 'विहि रीस दहा हातापासून काठा आहे' ३ पर्वताची कपारी [स काष्ठा] मूळकाठा-मुळबांध-पु (कों) समुद्रकांठच्या भातशेतीच्या जमिनी (खार) भोंवतालचा बांध या बांधाच्या मातीमध्यें भाताचा पेंढा बळकटीसाठीं घालतात —कृषि २१३

**काठांगा-ग्या**—काठगा पहा

**का-कांठाड**—न चेहऱ्याची एक बाजू, गाल, गोबाड कानटाळ पहा [काट] काठाण, काठाप्रा वगैरे—काठण, काट्या इ पहा

**काठा बांधणें**—भांड्यांत शिजविलेल्या पदार्थाची वाफ बाहेर जाऊं नये म्हणून भांड्यावर ठेवलेलें झांकण सर्व बाजूंनी ओल्या कणकेनें बंद करणें —गृदि २ १४० [काठ+बांधणें]

**काठार-रा**—नपु नदी-समुद्राचा कांठ; किनारा [काठ]

**काठारा**—पु १ काठ(ठा)रा, फुटकें भांडें २ गलबताचा सगारा-सागाडा

दाको १ २५

**कांठाळी**—स्त्री १ कापडाचा काठ-पदर [काठ] २ (कों) मासे पकडण्याचें वस्त्रासारखें एक लांब जाळें

**कांठाळी**—स्त्री कानाचें टाळें-पडदा क्रि बसणें 'मग दोंचि बसली मग काठाळी।'—ऐपो २२४ [कान+टाळी]

**काठिण्य**—न कठिणपणा, घट्टपणा, मजबुती, कडकपणा, दृढता, एका पदार्थाचा दुसऱ्यावर चरा पडण्यास जो प्रतिबंध होतो तो —पदार्थवर्णन ६ 'विसबू न सके धोंडीं। काठिण्य जैसें।'—ज्ञा १८ ७५४ [स]

**कांठिली**—स्त्री एक हलकें धान्य काठळी पहा.

**काठी**—स्त्री १ लहान झाडाचा सोट, खोड २ दांडकें, छडी, (सामान्यत) वेत्र् बांबू इत्यादिकांचा पांच चार हात लांबीचा सोटा, दांडका, लाठी (टोकाला गोळे नसलेली), ३ निशाण, दिंडी, 'खंडेरावाची काठी'—ऐराप्र १ ३०५ महा देवास काठी नेतात'—मसाप २ २ २६ 'नाना काठ्या शासनें वेत्रधार।'—सप्र २१ ३४ ४ जहाजाची डोलकाठी, ज्यावर शीड बांधतात तो सोट 'सोडिले मचवे लोक चढती काठी वर।'—विवि ८ ३ ५४ ५ काठीचा फटकारा (क्रि० मारणें) 'आम्हा लागलिसे पाठी। बालत्व तारुण्य काठी।'—तुगा १३४७ 'माझी साहीं शकें काठी। ऐसा बळिया सृष्टी असेना।' —एभा ४ १२० ६ जमीन मापनाचें एक माप, साधन ही पांच हात पाच मुठी लांबीची असते एकविसावा भाग, किंवा एकचारशें अंश बिघा ७ वरील काठीनें मोजलेलें क्षेत्रफळ ८ शरीर शरी राची काठी, अंगकाठी, चण, बांधा, ठेवण 'सुर्याचेनी दीपें। वसीस्टाची काठी तपे।'—उषा ८७० 'ते काठीनें मध्यम उचीच होते —कोरकि २१ ९ जननेंद्रिय (पुरुषाचें) १० उसाची एक जात ११ (नदभाषा) वीस ही संख्या 'केवळ काठी पवितु त्यासी। सागोनियां दीधलें।'—भवि ४२ ४५ १२ (ल) अडकाठी १३ महाराच्या हातातील सरकारी काठी 'महाराच्या कामाची पाळी आली व संपली म्हणजे काठी आली व काठी पडली असें म्हणतात'—गागा ४९ १४ (कु) लाकडें (जळाऊ), सरपण 'आज काट्या नाय हाडल्य' १५ (छा) जुळविलेले खिळे (टाईप) छापण्यासाठीं लोखंडी चौकटींत (चेसमध्यें) आवळण्यासाठीं सभोंवार टाकावयाची एका बाजूस सरळ व एका बाजूस निमुळती होत गेलेली विवक्षित मापाची लाकडी पट्टी (इ साईडस्टिक) [स काष्ठ, तुउ सीगन कास्ट, पा जि काट, काठी, मैं. जि कठ] •टाकणें—सरकारी चाकरीच्या महा रानें आपली पाळी दुसऱ्यास देणें •नें हाकणें—१ भेदाभेद न करतां सर्वांस एका कोंडींत गोवणें सब घोडे बारा टके भाषा न्यायानें वागविणें —नें पाणी दिपणें—स्वत श्रम न करतां दुसऱ्याकडून काम करवून घेणें •नें पाणी दिपणें—दुसराईनें

निष्काळजीपणानें काम करणें -नें पाणी हाटलें तरी दोन ठिकाणीं होत नाहीं-पक्की जिवलग मैत्री, दाट मैत्री, पक्का स्नेह -ला सोनें बांधून चालावें-चांगल्या बंदोबस्ताच्या राज्याचें निदर्शक -वर कांवळा घेणें-घालणें-भांडण तंटयासाठीं तयार होणें, राहणें, मज्ज असणें, कंबर कसणें, सिद्ध होणें ०वाजणें-(नाविक) डोलकाठी भंगणें ०शिखरास लागणें-१ (जनेमध्यें निरनिराळे मानकरी लोक आपल्या निशाणाची काठी देवळाच्या शिखरास लावतात त्यावरून) आपल्या जन्माचें सार्थक करणें, ध्येय साध्य करणें, उद्दिष्ट साधणें, इष्टार्थ साधणें 'माझ्य' काठ्या लागल्या शिखराला -मसाप ११६ २ आयुष्याच्या अखरीस येणें, आयुष्यातील इतिकर्तव्यता संपणें -सारखें पडणें साष्टांग नमस्कार घालणें, 'लिंग वा प्रतिमा दिठीं। दखतखेवों अगष्टी। लोटिजे वा काठी। पडली जैसी। -ज्ञा १७ २०४ काठ्या लावणें-(ना) चिडविणें, नाहक त्रास देणें ०कर-रु-वार-हातात सोन्याचांदीचा काठी घेतलेला राजाचा, देवाचा द्वारपाळ, चोपदार 'नंदिकेश्वर महानीळ। काठीवर दोघे प्रबळ।' -मुच २९ ११९ 'तव ता बळीदैत्याचे द्वारीं। काठीवर झालासे हरी।' -कथा २ ३ ३१ ऐसें काठीकरू बोलिला।' -उषा ८९ 'मग राजा काटिकारातें म्हणे।' -पंच ०करवळा-पु श्रीकृष्णाची गावुलातील वेषाची नक्कल करण्यासाठीं गुराख्याचीं पोरें हातात काठी व पाठीवर-खांद्यावर कांवळा घेतात त्यास समुच्चयानें म्हणतात ०वाला-पु सरकारी पाटीचा महार

काठें—न (राजा) डोंगराच्या वरतीं पुष्कळ माती असलेली सपाट जमीन ही वरकस पिकाची असते भाजावळ करून रुव्ही, कडेनें खाटोळा तीळ किंवा अंबाडी, रुव्ही वेंचून झाल्यावर ताग अथवा भात खालच तूर व कडेनें वरी दुसऱ्या वर्षीं भाजावळ न करिता सावा त्यातच तूर व उडीद अथवा नाचणा कुरीवर राबिलेल्या हीं पिकें होतात [काठ]

काठि—न (कों कु) मान, कंठ, गळा [कंठ]

काटे(ठ्ये)डोळें—काटेडोळे पहा

काठेमोडा—वि (कु) कुटिल वृत्तीचा

काठेवाड-डी-काठ्यावाड-डी—वि १ काठेवाडस वर्धीना २ काटकुळा, हडा, बारीक (माणूस घोडा.)

काठे(ठ्या)वाडी भिकार—न किरकोळ, काटकुळ्या रोडक्या माणसाला तुच्छतादर्शक म्हणतात

काठोकाठ—क्रिवि काठापर्यंत, भरपूर [काठ द्वि]

काठोट-ठ-उ—स्त्री (व खा) कायोन काठवट पहा

काठाट्या—पु (व) फुचकामाचा माणूस 'कोणाचा दिला मासा काटोरपाच वरा'

काटोडा—पु (व) जोम, काठी पहा (क्रि० मोडणें= जोम नाहींसा होणें, करणें) 'कामानें मुलीचा काठोडा मोडला'

काठ्या—वि १ गव्हाचा एक प्रकार, काटे गहू २ काटेडोळे पहा

काठ्याळा—वि काटकुळा, सडपातळ, किरकोळ [काठी]

काठ्याळें—न १ (कों) लहानसें मधमाशांचें पोळें (लहान फांदीला अथवा काठीला लागलेलें) [काठी] २ आंबणाना घालावयाचें बच्चाचें जवण

काड—स्त्रीन १ कडधान्य काढून घेतल्यावर राहिलेलें गुळी, भूस २ गहू नाचणी उडीद वगैरे धान्य काढल्यानंतर राहणारें ताट, तृण, ३ (कों) भात काढून घेऊन पेंढ्याचे माचोंडे बांधतात ते झाडल्यानें आतून जो बारीक पेंढा पडतो तो ४ (कों) आवण उपटल्यावर जें काहीं शिल्लक राहतें तें ५ अंबाडी, ताग इ० च्या सोललेल्या काड्या, जोख्या सणकाड्या ६ (सामान्यत) द्विदल धान्याचें भूस ७ (वे) नाचण्या कापल्यानतर उरणारें ताट ८ (व) मातीच्या भिंतीचा एक हात उंचीचा थर थाड पहा [स काष्ठ] ०कुसुंबा-पु एक प्रकारची रानभाजी ही खातात ०क्या-(काडूक, पुन) (तुच्छ) १ काडीसारखा २ भांडखोर, कलह लावणारा, यजुर्वेदी ब्राह्मण ऋग्वेदी ब्राह्मणाबद्दल योजितात ०दान-न जेवल्यानंतर दात कोरण्याकरिता ज्या काड्या लागतात तें ठेवण्याचें एक भांडें, किंवा भिंतींतील एक कोनाडा ०भिकारी-पु अत्यंत कवडीचुंबक माणूस, काडीमुर्दा फुकटन घालविणारा मनुष्य ०वात-स्त्री तुळशी वगैरेंच्या काडीस कापूस लावून-गुंडाळून देवापुढें लावण्यासाठीं जो काकडा करतात तो 'रात्रीं उजळोन काडवाती। अर्चनीं ओवाळिते गभस्ती।' -मोर [काष्ठवर्ति] म्ह० सूर्यापुढें काडवाती=निरुपयोगी, तुलनेस अयोग्य वस्तु ०वाळा-पु लहान मुलाच्या पायातील रुप्याचा बारीक भरीव वाळा, काडोळें ०शीर-न वालाचें अगर बाजरीचें पांभसद उपटलेलें रोपटें ०सर-न कडधान्याची मळणी झाल्यावर राहिलेलीं ताटें झुडपें ०सरी पुस्त्रीन (विणकाम) काटसरी पहा

काड—पु एक प्रकारचा मासा हा आपल्याकडे कोचीन मस्यानच्या समुद्रकिनाऱ्यावर सापडतो याचें तेल (यकृतातून काढलेलें) औषधोपयोगी आहे हें संधिवातविकार क्षय व कफ क्षय ह्या रोगावर फार उपयोगी पडतें [इं कॉड]

कांड—न १ दोन सांध्यामधील भाग, पेरें २ झाडाचें खोड, सोट, बुंधा ३ वेदाच्या विभागांपैकीं प्रत्येक (उपासनाकांड, कर्मकांड, ज्ञानकांड) अध्याय, प्रकरण, अंक, परिच्छेद, विभाग 'एवं हिंसाचि अहिंसा। कर्मकांडीं हा ऐसा।' -ज्ञा १३ २३६ 'धनुर्भंग नाटकांत अंकाऐवजीं कांड हा शब्द

वापरला आहे ' ४ बाण, तीर ' थोड काडाचा घाई मातला ।' –शिशु ४३९ 'तो माझे आ काडा । सदां भिए ।' –शिशु ८९४ 'कुनोलाचीं सदटें । सुति वाडें ।' –ज्ञा १६ ४०४ 'हरि नामाचें धनुष्यकाडें ।' –तुगा २१५९ 'केली निर्माण कमी हाणुनि धमुर्वेत काड वनधारा।'–मोभीष्म १२ २२ ५ गलबताचें शीड उभारण्याचा दोर, परभाणास अडकविलेली जाडी दोरी, परभाण, डोलकाठीला ज्या दोरसाडानें बांधलेलें असतें तो दोर हा खालींवर सरकतो ६ गहू नाचणी हरभरा इ० चें काड, ताट (दाणा काढल्यानंतरचें) ७ (कों) माडाचा सोट, रोड ८ (व.) मातीच्या भिंतीचा एक थर 'त्यानें एक काड नवीन बसविलें ' ९ (गो) कमरेस घालण्याचा चांदीचा गोफ १० (सोनारी) सरीचा आंतील गाभा ११ संधि, ·साधा १२ (महानुभावी) ज्ञान (?) 'येणेंशी काड गुडा कव्हणी घेना। –भाए ५२० ०काढणें–खारीच्या भात ज्या पाटया (जमी नीचे लहान लहान तुकडे) पाडतात त्यांच्या बांधास मातीची भर देणें हें काम वैशाखात करतात ०कू–(व) १ वेळूचें पेर २ मातीच्या भिंतीचा एक थर ०का–कोंडका–पु लाकडाचा ओंडका, ठोकळा ०कें–न १ काडक अर्थ २ पहा २ काडका–कोंडका पहा 'काडकें डवचितां कृष्णसर्प ।' –मुवन १२ ९१ ३ उंच, धिप्पाड, लट्ठ, अगडबंब, टोंणगा (मनुष्य) ४ बुडें 'काडकें मोठें म्हणजे जाड व लांब असावें ' –मुव्या २०७ ०त्रय–न वेदाचीं तीन काडें, भाग, कर्म–उपासना–ज्ञान काड 'तरी काडत्रयात्मक।शब्दराशी अशेख।'–ज्ञा १८ १४३१ [स] ०पा–पु (गो) मुसळ म्ह० काडपाक कोंब फुटणें=मुसळाला अकुर फुटणें ०रू–न १ चोटाचीं पेरें व अग्रें यास होणारें उखणू २ तीन चार पेरांचें उसाचें काडें ०वेल–स्त्री एक औषधी निवडुंगाप्रमाणें पण बारीक वेल वई निधारी, चौधारी अशा हिच्या दोन जाती आहेत हिला पेरें असतात त्रिधारी काड वेलीस हाडसंधि असेंहि म्हणतात [स काडवल्लि] ०शेर–पु शेराभोंवतीं आढळणारी लांब नाजुक पेरापेराची एक वेल ०सोट–पु सहा मुठी सोन्याच्या एका सुतावर मधील भाग च्याच सुमारें २॥ ३ मुठीच्या भागावर दुसरें एक सोन्याचें सूत पिळून पहिल्या सुताच्या एका टोकास वाटोळा फासा व दुसऱ्या टोकास नागफासा करून गजर वेटण्यापूर्वी जो सरीचा भाग तयार होतो तो (काड १० पहा)

**काड–कन–कर–दिनी–दिशीं**—क्रिवि (ध्वनि) चाब काच्या किंवा छडीच्या आवाजासारखा आवाज करून, अशा आवाजासहित

**काडकूट–कांडणकुटण**—स्त्रीन काडणें, कुटणें, पाखडणें वगैरेस समुच्चयानें [काडणें+कुटणें]

**कांडण**—न १ तांदूळ वगैरे सडणें (त्यादेवरील तूस काढण्यासाठीं) 'आकाश उजळें काडणी। साडि कालिमा।' –प्रमराज ८१ २ सडण्यासाठीं घेतलेली धान्याची रास ३ काडणावळ, सडणावळ, सडण्याची मजुरी ४ नाचणी, उडिदाची काड [स कडन] ०साळ–कांडसाळ–स्त्री दळणकाडणाचा घरातील एक सोपा **कांडणावळ**–स्त्री काडणाबद्दलची मजुरी

**कांडण–काणण**—न (गो) मुसळ

**काडणा**—न (कु) विहिरींतून पाणी काढण्याचें साधन, रहाट, कळशी, काढणें [काढणें]

**काडणी**—काढणी पहा [काढणें]

**काडणी**—स्त्री काडण, काडण्याची क्रिया

**काडणें**—उक्रि भात इ० धान्य वरील तूस काढण्याकरिता उखळींत सडणें–चेंचणें, कुटणें (मुसळानें) [स कडन] म्ह० काडल्यावगर फोवू न्हय मारल्याबगर धोव न्हयू=(गो) काडल्या शिवाय पोह बनत नाहींत तसेंच बायकोला मारल्याशिवाय नवरेपण येत नाहीं

**कांडप**—न (राजा) काडण ०काढणें–क्रि १ (कु) मारणें, झोडणें २ शक्तीच्याबाहेर काम देणें

**काडपी**—पु (राजा) काडपाचा धंदा करणारा बाप्या, पुरुष, मनुष्य ०ण–स्त्री (राजा) काडपाचा धंदा करणारी बाई 'काडपिणींचा प्रश्न सोडविणें किती अवघड आहे!' –विचारविलास १३३

**काडवा**—पु (कों) सध पाण्यात न सापडणारा मासा

**काडमुंगी**—स्त्री एक मोठी काळी मुंगी, ही चावली असता रोग यतात

**काडय**—स्त्री (कु) एक जातीचा मासा

**कांडर–डार–रें–डेर**—न सापाची एक जात हा चावला असता तो भाग कुजू लागून तो माणूस मरता याचें काटे पायाला लागले तरीहि पाय कुजतो

**काडरणें**—अक्रि (माण) काडीं करणें, कातरणें

**का(का)डवाळा–चळी–डोळी**—पुस्त्री (सोनारी) पायात घालावयाचे चारीचे वाळे

**काडविणें**—उक्रि १ खाज शमविण्यासाठीं नखानीं खाज विणें २ (ल) चतविणें, चिडविणें, डिवचणें [स कंडूय्=खाजविणें]

**काडळणें**—अक्रि घासुन घासन झिजणें, कमी होणें [स काड्]

**काडळणें**—क्रि खाजविणें, चोळून खाज नाहींशी करणें [स कडूय्=खाजविणें]

**काडा–डो**—पु (कों गो) काडेहुरा, शेर, चिकाडा

**काडा**-पु (बे) धान्यरूपी कर्ज काढा अर्थ २ पहा [काढणें]

**कांडाई**—स्त्री कांडणावळ

**काडाकूट**—स्त्री काथ्याकूट, कष्टसाध्य गोष्ट 'चाळीस भय छापून प्रसिद्ध करणें ही केवढी काडाकूट आहे बरें!' —तुफान प्रस्तावना ३०

**कांडात काढणें**—क्रि. खूप ठोकणें, बेदम मारणें. 'त्यांनी मारे दंडानीं वेश्यांचें कांडात काढलें —नामना ४९ 'भाई मारा यच्या आधींच मी तुम्हा कांडात काढीन ' —विचार विलास २७२

**कांडादळाभरडा**—पु दळण, कांडण वगैरेस व्यापक संज्ञा.

**कांडानुसमय**—पु विशिष्ट समुदायांतील प्रत्येक व्यक्तीला एक वस्तु अगर वस्तूंचा संच—जोड देण्याचा अनुक्रम, प्रतिसमुच्चय, प्रतिगम (देणें), याच्या उलट पदार्थानुसमय

**कांडारणें**—उक्रि जोराचा कोंब फुटणें, फोफावणें, कांड, खोड मजबूत, भक्कम होणें (ऊस, जोंधळा इ चें, कधीं कधीं मुलालाहि लावतात ) [स कांड]

**कांडारणें**—सक्रि करांडणें पहा, चावून चावून कमी करणें, कुरतडणें

**कांडारा-रो**—पु १ (गो) बांबू ऊस, केळ इ चा उभा चिरलेला तुकडा, फाक [स कांड] २ कांडण्यानें निराळा झालेला कोंडा, तूस [कांडणें]

**कांडारी**—पु सुकाणूं धरणारा, नावाडी, कर्णधार

**काडार्को**—पु (गो) एक प्रकारचा मासा

**कांडाविणें**—उक्रि कांडविणें पहा.

**काडासेक**—स्त्री (गो) चमचे पळ्या इ अडकविण्यासाठीं भोंक पाडून केलेली लाकडाची अथवा लोखंडाची एक पट्टी

**काडाळ**—स्त्री (कु) मासे धरण्याचें लहान जाळें, याच्या टोकास लाकडाचे लहान तुकडे लावतात

**काडाळणें**—अक्रि १ लांब व बळकट अशीं पेरें येणें, वेगानें व जोमानें वाढणें (जोंधळा, बाजरी इ ) २ (ल) मूल सपाटून वाढीस लागणें ३ (नाशिक) जोंधळा, बाजरी, ऊस पेराशीं काळा पडणें (ल) रक्तपिती होणें (माणमाला) [काड]

**काडाळणें**—उक्रि खाजविणें [स कड्]

**काडाळणें**—सक्रि १ काडारणें, करांडणें पहा घासून भिनविणें २ खाज सुटणें, कंड खाणें [कड्डू]

**कांडाळी-ळो**—स्त्री मध्यम प्रतीचें, सुताचें मासे धरण्याचें जाळ [कांड]

**काडाळें**—न धनुष्य 'अर्जुनाचेनि काडाळें। बहूत माणुखरणा आलें।' —शिशु ८८२ [काड=बाण+आलय=घर]

**काडिवणें**—क्रि (कों) खाजविणें, घासणें, चोळणें [स. कड्डू]

**काडी**—स्त्री १ गवत वगैरेचा तुकडा—दांडा, 'तृणाची काडी न मिळे। ऊर्णी झाडोरे करपले।' —भावार्थ रामायण, बाल १ ७१ २ लांकडाची काटकी, शिरपूट, धातूचा बारीक लांबट तुकडा, आगकाडी इ (ल) काडीच्या मोराची अथवा आकाराची वस्तु 'जीवनें शिंपिग तिडपिडी। विजिला प्राण सांडी। लागला तरी काडी। उरों नेदी।' —ज्ञा १३ ७२०. 'काडीचोर तो पाडीचोर'= काडी (क्षुद्रक वस्तु) चोरल्याचें एकदा सिद्ध झालें म्हणजे पुढें त्यानें पाडी (वासरूं) सारखी मोठी वस्तु चोरली असा आळ साहजिकच येतो क्षुद्रक अपराध करणारा माणूस मोठा अपराधहि करतो [काष्ठ] ३ (जरीची किंवा रेशमाची या शब्दाच्या पुढें काडी आली असता) जरी—रेशमी—काठ (वस्त्राचा) किंवा वस्त्रावरची पट्टी, वीण असा अर्थ होतो ४ (गंजिफा) डाव जिंकणें एका खेळाडूस सर्व पानें देण्याची पाळी येणें क्रि लागणें ५ (खा) दिव्याची (पणतीची) ज्योत ६ (सुतार काम) धातूची बारीक काच ७ (व ना) हातांतील टकावयाची काठी ८ (व ना) सरपण (अव) काड्या ९ गुराचा चारा 'जनावरांना वैरण-काडी देण्याचा हुकूम सोडला ' —कोंकि ७३६ १० (गो) बायकांच्या नाकांतील चमकी ११ (कु) एक जातीचा मासा याच्या अंगावर कांटे असून आकृति सर्पाप्रमाणें असते म्ह० १ काडीची सत्ता लाखाची मत्ता=थोड्याशा अधिकारानें जें काम होतें तें पुष्कळशा पैशानें होत नाहीं २ काडीपासून जोडावें लाखापासून मोडावें (वाप्र) (आडवी उभी) **काडी ओढणें**-(ल) निरक्षर आडव्या उभ्या रेषा काढायला समर्थ नसणें, म्हणजे काहींहि अक्षर लिहिता न येणें अक्षरशत्रु —**ची आग माडीस लागणें**-श्रेष्ठ माणसास कनिष्ठ माणसापासून किंवा एखाद्या क्षुद्रक कारणापासून अगर व्यक्तीकडून उपद्रव होणें —**नें औषध लावणें**-दुसऱ्याच्या जखमेला दुरून बोट न लावतां काडीनें औषध लावणें यावरून, अंग राखून काम करणें **०मोडणें-मोडून देणें**-क्रि पदर फाडून देणें, पालव कापून देणें विवाहसंबंध तोडून टाकणें, रद्द करणें **काडी लागणें**-जळणें, राख होणें, नाश पावणें, नाहींसा होणें 'नमुताईच्या संसारास काडी लागली ' —हाच का धर्म —नाशिक्कर २५ **०कसपट**-न गदळ, घाण, केरकचरा, 'म्हणा म्हटलें हा मार्ग चांगला काडीकसपट नसे।' —अफला ७५ **०कुडुल्यो**-(वाप्र, बायकी) छपापाणी खेळतांना जर सर्व मुली बसल्या तर एका मुलीनें सर्व गड्यास सावध करून तोंडानें काडी कुडुल्यो म्हणून सर्वांनीं उठणें **०खार-काडेखार**-पु पापडखार (सोनार वापरतात) —**चा**-यत्किंचितहि, थोडा, अल्प 'नाटक वाल्यांत काडीचा देखील गुण नसतो ' —विकार विलसित **०पेढी**-स्त्री पेंढी काडी पहा **०भर**-फार थोडा, यत्किंचितहि 'तुम्हांला कोणी काडीभरहि उपद्रव करणार नाहीं ' —विवि

८३५३ ०महाल पु कोल्हाटी-डोंबारी विसाडी इ० भटक्या लोकांच्या गवती झोंपड्याना तुच्छतेनें म्हणतात ०माग्र-काडी भर पहा ०माया-(व) अगदीं रोड ०मोड-१ (हिंदुकायदा) नवरा व बायको यांनीं आपला विवाहसंबंध तोडून टाकणें (या समयीं गवताची काडी चार गडळींसमक्ष मोडतात ही रीत शूद्रादि लोकांत आहे) २ (ल) संबंध तोडणें 'घाबरियाच्या मोडा काड्या । धाडा म्याडा वळतिया ।' -तुगा २२७ ०येरढी-काडीभर पहा

**काडी**—स्त्री १ वेखंड, सुंठ, आलें, हळद इ चीं मुळें व तुकडा मोड, अंकूर, ऊस वगैरेंचीं पेरें २ त्या आकाराचा धातूचा लांबट तुकडा ३ वस्त्र विणण्यासाठीं ज्या काडीला सूत गुंडाळलेलें असतें ती काडी ४ (विणकाम) धोटधाच्या आंतील दोन्याचें गुंडाळें, बाबीण, धोटधामध्यें बसेल अशा लाकडी अगर बोरूच्या तुकड्यावर भरलेल्या सुताची गुंडाळी ५ लसणीचा गड्डा ६ (गो) चंदनाचें खोड 'गंधा काडी बरी वासाची आपा' ७ (कों नाविक) दोन्ही रोजास साधणारें व दोन्ही रोजासहित भागाचें लाकूड, हा गलबताचा पाया होय या लाकडास वरच्या अंगास दोन्ही बाजूस खाचा पाडून त्यांत फळ्या बसवितात ८ (छापखाना) फर्मा ठोकताना पान (पेज) व सामान (फर्निचर) हें चौकटीला आवळून बसण्याकरिता ठोकावयाचा लाकडाचा तुकडा [स कांड] —चें लाकूड-धोटयांतील सूत ज्या बोरूच्या काडीवर गुंडाळतात ती, नन्या ०पिरगाळणें-फिरविणें-गारुडी आपल्या हातांतील लाकडाची ल्हान काठी आपल्या डाव्या हाताभोंवतीं अथवा अंगाभोंवतीं फिरवितो ती (यक्षिणीची) **कांडी फिरविणें**-चमत्कार घडवून आणणें, अवचित एकादी गोष्ट घडवून पूर्वी घडलेल्या कृत्याच्या उलट घडून येणें

**काडुक**—न (व) काटुक ल्हान काडी [स काष्ठ]

**काडुरचें**—क्रि (गो) नखांनीं कुरतडणें, खाजवणें [स कड्डू]

**काडुळणें**—अक्रि तुकडे तुकडे पडणें (दोरा, सूत, धागा इ चे) [स काड]

**काडुळणें**—उक्रि (कों) खाजविणें [स कड्डय]

**काडू**—पु १ गाइळ, गाडवळ, पावसाळ्यांत उत्पन्न होणारा एक किडा, दानवें-दानवा २ सुताराचें एक हत्यार

**काड**—न १ पेर, पर्व संधा २ दोन पेरांतील भाग-तुकडा ३ ऊस बांबू इ चा तीन चार पेरांचा तुकडा-भाग टिपरें ४ झाडाचें सरळ खोड, विशेषत फांद्या फुटावयाच्या भागींचें ५ (ल) लांबी मोजण्याचें एक माप (काडी दोरा इ) अशा रीतीनें वाटेल त्या लांबीचें घेतलेलें माप यावरून (लांब भिंतीचा, ओटयाचा, विहिरीचा पाण्याच्या पाटाचा, इमारत कामाचा) एक किंवा विशिष्ट भाग ६ जुनी वाळलेली, वठलेली टणक वेल ७ एकदा मळणी केलेलीं किंवा झोडपलेलीं धान्याचीं ताटें, कणसें (फेकून दिलेलीं किंवा दुसऱ्यादा मळणी करण्यासाठीं, झोडपण्यासाठीं ठेवलेलीं) ८ भात, नाचणी, वरी इ ची लावणी करण्यास योग्य असलेली दाढ ९ बोटाच्या सांध्यास होणारा एक रोग १० बाण, तीर 'काडें मोकलीसी चांगें ।' -उषा १५२६ काड पहा ११ (ना) बोरू [सं काड] अडचा-अडीच कांड्यावर येणें-१ (गव्हाच्या ताटास ओंबी फुटते तेव्हा अडीच पेरें असतात यावरून) ओंबी बाहेर पडण्याच्या बेतास येणें २ चिडण्याच्या परमावधीस पोंचणें (माणूस) **काडेंपेरें लावणें-लावून पहाणें**-वहिमी खुनी मनुष्याच्या, चोराच्या पायाचें मोजमाप सांपडलेल्या मागाच्या पायाशीं ताडून पाहाणें **काडेपेरें मिळणें किंवा कमीजास्त होणें**-वरील प्रकारात बरोबर जुळणें किंवा न जुळणें **काडेंपेरें घेणें**-मोजमाप घेणें **काडेपेरें पाहून**-(गुरें विकत घेताना) त्याचें साधे व हाडपेर अंगकाठी वगैरे पाहून (घेणें) ०करी-पु १ (गु हाळ) कतळयानें आणून दिलेली उंसाचीं कांडीं चरकात घालणारा २ (क) सुतार ०चिरणें (आटयापाट्या) सूर धरणारानें पहिली टाळी देऊन पहिल्या पाटीस पाय लावून पुन्हा परत येऊन दुसरी टाळी देणें ०चोर-दर-पु ऊद, काळमांजर, कलिंदर, कानेदर वगैरे ०श्वर-सर-पु लांब मानेचा बगळा, 'गीध घारी काडेसरें ।' -दावि २४४ [काड+ईश्वर] ०सारर-न निवडुंगाची एक जात तिधारी किंवा चौधारी निवडुंग (याच्या उलट पानसावर) ०हुरा-पु (कों) काडाशेर, चिकाडा कांडीं असलेला शेर

**काडेचिराइत**—न चिराईत नांवाच्या ल्हान झाडाच्या वाळलेल्या फांद्या, याचा रंग काळसर असून चव कडू असते याचा ज्वरावरील काढयांत उपयोग करतात [काडे+चिराईत]

**काडोकाड**—क्रिवि बोटाच्या प्रत्येक पेरावर 'किती काडोकाड मिरवाल मुद्या ।' -अमृत ११७ [काड द्वि]

**काडोरी-रें**—स्त्रीन १ काडें अर्थ १ २, ३ पहा तुकडा, खाडोळें, खाडोळी 'सहस्रभुजाचीं काडोरी करी ।' -एभा ४२४० 'तुझिये भुजाची काडोरी । करील तो ।' -कथा १६३१ 'तुची करीन काडारी ।' -तै १३२७ 'करीत आहे हाताचीं काडोरी ।' -उषा १८३४ [स कांड]

**काडोळ-ळी**—पुस्त्री सारडोळ, एक मोठा वृक्ष याचा रंग पांढरा असून याला वसंत ऋतूत फळें येतात फळाचा आकार बदामासारखा व फुलें लाल असतात झाडास पांढरा डिंक येतो त्यास कथल्याचा डिंक म्हणतात -वगु २ ३०

**काडोळणें**—उक्रि खाजविणें 'पायें पायें काडोळी । सेवा करी हीन कुळीं । तो येक मूर्ख ।' -दा २१६४ 'हरिण काडोळितो हर्षें ग रोहिणी अगें ।' -वग्सा ५९ [स कड्डय]

**फांडोळी-ळें**—स्त्रीन (वों) शेतामध्यें पाणी अडवि॰ण्यासाठीं घातलेले मातीचे बांध, ताल काड काढणें पहा [कांड]

**फांडोळें**—न १ लहान मुलाच्या पायांतील रुप्याचा वाळा, विडी २ अधिकाऱ्यानें आपल्या येथील कार्याकरिता वसुल केलेला जादा कर -मोल [स कांड+वलय]

**फाड्डुंय**—न (गो) एक लहान मासा

**फाड्या**—स्त्री १ काडी या शब्दाचें अनेक वचन २ विशे॰ टोचण्याकरिता हाताच्या बोटासारखीं टोकें असलेलें चांदीचें झाड ॰निवडुंग-दुरा-काडेदुग पहा

**फाढ**—पु जंगलातून ओढून आणलेला लाकडाचा ओंडका

**फाढकुलुंवा**—काडवुंवा पहा

**फाढघाल**—स्त्री एखादा पदार्थ विनाकारण पुन्हां पुन्हां बाहेर काढणें व आत घालणें-उचलणें ठेवणें इ [काढणें+घालणें]

**काढणी**—स्त्री १ (काढणें-धाना) कापून घेणें (जोंधळा, बाजरी वगैरे पीक) द्विदल धान्यें उपटणें, भुईसपाट असलेल्या झुडुपांवरील अगर वेलीवरील फळें खुडणें, कापून रास करणें (मर्यादित उपयोग) २ विशेषत सुताचा पक्का दोर, अबाडी ताग, रेशीम याचाहि दोर-री (मर्यादित उपयोग) विहिरींतून पाणी काढण्याकरिता, घोड्याला खुंट्याशीं बांधण्याकरिता, किंवा त्याला फेरीवर धरण्याकरिता, गोणी, कठाळ, आखें, बस्ता, मालाचा गठ्ठा, याना आवळण्याकरिता, तंबू ताणण्याकरिता वापरतात ३ सर्व साधारण औतास बेटक अगर येटक घालण्यास उपयोगात आणण्याची दोरी, बेठण, सोल [काढणें]

**काढणें**—उक्रि १ आतून बाहेर, वर, घेणें, ओढून घेणें 'दाढी धरून ह्या मेल्याला बाहेर ओढून काढल्याशिवाय हा ताळ्यावर यायचा नाहीं' -वाय २४ २ (ल) पळविणें, उठविणें (अक्षरें, ओळी, आकृति) ३ मागावर वस्त्र इत्यादि तयार करणें-विणणें ४ नवीन शोध करणें, जुळविणें, पाडणें (तऱ्हा, मार्ग, रीत, दृष्ट) ५ मिळविणें, जुळविणें, उत्पन्न करणें 'या शेतातून वर्षास दोन खंडी धान्य काढतों' ६ मिळविणें, श्रमानें संपादन करणें ७ घेणें, कर्ज काढणें, उसनवारी घेणें (पैसा उपटणें) ८ वादविवादाचा विषय, भाषण सुरू करणें, ओघास आणणें, मुद्दा पुढें मांडणें; उपस्थित करणें ९ शोधणें, उजेडात आणणें, छडा लावणें, दाखविणें (दोष, गुणधर्म) १० कळणें, सहनकरणें, सोसणें, लोटणें, घालविणें (दुःख, आजार, क्लेश, काळ) 'मी धान्यावाचून दोन दिवस काढले' 'एका धोतरावर थंडी काढली' 'गुरु काढिता भूत आणि पोर काढितें दुःख' ११ (वों) शिकविणें, वळणीस आणणें, कामायोग्य तयार करणें (पशु) १२ शुश्रूषा करणें, चाकरी करणें (पोराची, दुखणेकऱ्याची) १३ हुडकणें, पत्ता काढणें (रस्ता, पाहिजे असलेली वस्तु) 'पुढें वाट काढणारी मंडळी होती' -विवि ८ १ १८ १४ उपटणें (जोंधळ्याचें पीक) १५ (घोडा, बैल इ नीं दु खामुळें) चालताना पाय वांकडा टाकणें १६ उपसणें (तरवार) 'मी तरवार काढली' १७ दूर करणें 'संसार काढूनिया कांटी।' -ज्ञा १३ ८६६ [स कृष्-(कृष्ट)-प्रा कड्ढ, आर्मेनियमजि कस, पोजि कुल, बं काड, सिं कड(णु) हिं काढ(ना), गु काढ(वु)] (वाप्र) थंउजा काढणें-बळेंच भांडण सुरू करणें, वरंढेवर येणें, आणणें काढतें घेणें-स्वत ला सोडवून घेणें, पाय मार्गे घेणें (भांडण, झगडा, लढाई यांमधून) 'कृतवर्म्मा बळिभद्र काढिलें। मुष्टामुष्टी।' -शिशु ९७६ **काम काढणें**-१ काम लावविणें २ (व) ठार मारणें, नाश करणें, काडात काढणें, ३ (व) रतिसमागम करणें, त्यांत दमविणें **केश काढणें**-श्मश्रु करणें (विशेषत विधवा स्त्रीची) **घोडी काढणें**-घोडीस घोडा लावणें (संभोगासाठीं) **दाणा-पीक काढणें**-धान्य, शेत पीक कापून जमा करणें **दुखणें काढणें-(व य)** (आजाऱ्याची) शुश्रूषा करणें, स्वत चें दु ख सहन करणें **देव-प्रारब्ध-नशीब-काढणें**-उदयास येणें, दैव उघडणें, पैसा मिळविणें 'दैवचि मूर्तिमंत। येईल देखा काढत। तुम्हांपाशीं।' -ज्ञा ३ १०१ **पाऊस-आभाळ-काढणें**-वाऱ्यानें पाऊस आणणें, ढग भरणें **रुई काढणें**-रुइ लागणें **शेत-वनजर-नवें रान-काढणें**-नवीन जमीन लागवडीस आणणें, नांगरणें

**काढणें**—अक्रि उतरणें, शमणें, निघणें, कमी होणें (पाऊस, ताप, नदीचा पूर) 'पाऊस काढला म्हणजे मी बाजारात जाईन' 'सिंधु एके मार्गे काढे।' -ज्ञा १५ ११९

**काढणें**—न (वों गो) विहिरींतून पाणी काढण्याचें साधन पोहरा, कळशी, बसकट आकाराचा तांब्याचा लोटा, दोरी बांधण्यासाठीं याला एक कडी असते

**काढता पाय**—पु प्रसंगांतून निसटणें, पळणें 'नानानीं प्रसंग पाहून पुण्यातून काढता पाय घेतला' -अस्तभा ६

**काढतें**—न (जुगार) पैशाऐवजीं ठेवलेली हस्तिदंताची नरद

**काढतें घेणें**—क्रि १ मार्गे पळणें, २ फौज मोडू न देता शिस्तवार माघार घेणें

**फाढदगड**—पु (गवंडीकाम) खाणींतून काढलेला किंवा पाडविलेला दगड, अनघड दगड, पायाच्या भरतीच्या कामीं उपयोगी

**फाढल्या कामाचा-रेघेचा**—वि सोंपविलेलें, सांगितलेलें तेवढेंच काम करणारा, करण्याला समर्थ, सांगकाम्या

**फाढवण-न**—न. गावातून शेताकडे औत बैल जोडून नेताना वाटेंत तें जमीनीवर घासू नये यासाठीं त्याच्याखालीं एक कोनाकृति लाकूड बांधतात तें

**काढवणी**—न फाटललें पाणी (धान्या उलट प्रवाहानें अगर पाटानें वाहात येणारें पाणी) [काढणें+पाणी]

**काढवाढ**—स्त्री (व) मार्गे पुढें करण्याची क्रिया, सरका सरकी

**काढवान**—काढवण पहा

**काढविणें**—उक्रि १ घोड्याजवळ घोडी (संभोगार्थ) आण विणें २ घोडीपासून संतति उत्पन्न करून घेणें [काढणें]

**काढशाह**—काटशह पहा

**काढा**—पु १ औषधी वनस्पति उकळून त्याचा अर्क ज्यात उतरला आहे असें पाणी, कषाय, अर्क, याचें सामान्य प्रमाण – काढा करण्याची जी द्रव्यें असतील त्याच्या सोळापट पाणी घालून तें चौथाई राहीपर्यंत आटवावें म्हणजे तो पिण्यास योग्य होतो –योर १ ३१५ [स कषाय, क्वाय] ०काढणें–१ अधिक काढणें, उपटणें, मिळविणें २ लोभी बनणें ३ पाठ लाग करणें (टोणग्यांची अथवा बैलाची झोंबी लागली म्हणजे एक टोणगा अथवा बैल दुसऱ्या टोणग्याच्या अथवा बैलाच्या मागें धावत जाऊन पाठलाग करतो त्यास व मनुष्याच्या बाबतींतहि म्हणतात 'तें देखोनि शैल्याचा सावळीं। काढाओ काढिला। –शिशु ९५६ **काढयांत कोळणें**–१ काढयात एखादें औषध कुसकरणें २ (ल) दु खानें क्षीण होणें 'पाहुन मनाचा खबीर दु खे पहा काढो कोळतें।'–प्रला १०२ ३ एकायास रोख नाण्यानें कर्ज देऊन व्याजाच्या ऐवजीं धान्यरूपानें व्याज घेणें–देणें, व ता व्यवहार (क्रि० काढणें, करणें) (पचम्यत प्रयोग काढयावर काढयानें इ०) [काढणें] ४ माळवें, भाजीपाला विकत घेतला असता त्यावर बोलीपेक्षा ज्यास्त जो अधिक मागून घेतात तो भाजीपाला, वर्ताळा, (क्रि० घेणें) 'एका पैशाची खरेदी, दोन पैशाचा काढा' ५ (व) उपवास, लघन. 'त्याला तापात काढा पडला'

**काढाऊ**—वि १ काढून, मुरळ घालून, फूस लावून आण लेला (चाकर, बायको इ) २ मुद्दाम तयार केलेला

**काढाओढ–ढा**—पुस्त्रि अनेकापासुन कर्ज काढण्याची क्रिया 'तो काढाओढा काढून पोट भरतो'–**चा धनी**–पु कर्ज बाजारी झालेला माणूस

**काढाओढी**—स्त्री (गो) आवेपिळे, श्राम

**काढाकाढी**—स्त्री १ घाईनें, गडबडीनें, काढणें, काढून टाकणें, हिमकणें या वरून भटपटीनें लगबगीनें तयारीस लागणें, उपाययोजना करणें 'शुका म्हणे आता करी काढाकाढी। जाती ऐसी घडी पुन्हा न ये।'–क्रिवि त्वरेनें, घाईनें, जलदीनें, त्वेषानें 'म्हणती युद्ध माडेल कडाडी। मी उठेन काढाकाढी।' –एरुस्व ४ ३८ [काढणें द्वि]

**काढावा**—पु शोध, तपास, तलास 'काढावा काढूनि येक वीरातें। घेऊनि गेला।'–कालिका पुराण १७ ४६

**काढ(ढीं)व**—वि १ सांगून तयार करविलेलें, मुद्दाम बन विलेलें, काढाऊ (वस्त्र, इ) २ खोडकर मुलाला व कजाग स्त्रीला –मेश्येला–निंदेनें म्हणतात ३ मुद्दाम काढविलेली, तयार करविलेली (घोड्याची पैदास) [काढणें]

**काढ्ट–ढ्या**—वि दुसऱ्यापासून आर्जव इ० युक्त्या करून कर्जे, द्रव्य इ० काढणारा, पैसे उपटणारा, उडीबहाल, तुबड्या

**काणकूण**—स्त्री १ कुणकुण, गुणगुण, दुसऱ्याला ऐकू न येईल असें भाषण, पुटपुटणें [ध्वनि] २ पिरपिर, कुरकुर ३ टगळमगळ, उडवाउडवीची भाषा, धरसोड [ध्व]

**काणको**—पु (गो) एक जातीचा मासा

**काण(न)गी**—स्त्री कानगोष्ट

**काण(न)गी**—स्त्री दवाचा नैवेद्य 'काहीं काणगी नको कराया कानगिला घेउनि।'–राला १९ १५ [का कणिके=देणगी]

**काणट**—स्त्री सर्पाची एक जात (काणीट पहा)

**काणस**—कानस पहा

**काणा**—वि १ ज्याच्या दोन डोळ्यापैकीं एका डोळ्याची शक्ति गेली आहे असा, एका डोळ्यानें अधळा, एकाक्ष 'काणीला जसें सोगयाचें काजळ शोभत नाहीं.'–कम १ ३२ २ तिरव्या डोळ्याचा, चकणा, ज्याला बुबुळें तिरकस केल्याशिवाय दिसत नाहीं असा हाच अर्थ विशेष रूढ–प्रचारात आहे 'कावळा हा काणा पक्षी आहे' ३ तिरवा डोळा (एका डोळ्यानें, दोहों डोळ्यानीं) काणा डोळा, काणे डोळे, असे प्रयोग होतात ४ ज्या देशात पाहिजे असलेला जिन्नस वेळेस मिळत नाहीं किंवा जेथील भाव एकदा स्वस्त तर एकदा महाग असतात असा देश, शहर, खेडें ज्या देशात आपण दुष्कर्मादि केल्यामुळें पुन्हा त्या देशात जावयास आपल्यास लाज वाटते तो देश, शहर, खेडें इ 'डोळा काणा असावा पण मुलुख काणा असु नये' ५ एक पेड मोठा व दुसरा बारीक अशा तऱ्हेनें विणलेला दोर तसेंच तिढून वाकडी झालेली खाट, माचा, बाज ६ तिरकस, तिर्यक्, तिरवा, वक्र, वाकडा 'जाईल काणे वाटारे।'–दावि १५८. [स काण एकाक्ष का काण] म्ह० १ काणा कैपती अंधळा हिकमती २ काण्या डोळयानें पाहणें=कटाक्ष मारणें ३ क्वचित् काणा भद्रेत्साधु=काणा किंवा एका डोळयानें अधळा मनुष्य प्राय सुस्व भावी नसतो बहुतकरून लबाड असतो अंधळ्यात काणा राजा

**काणाडी**—स्त्री कानशीळ कानाडी पहा [स कर्णनाडी]

**काणी**—स्त्री रिघना, क्लेश 'जाणानि अत करणें। काणी घेतली।' -ज्ञा १८ ७६ [स क्वण्-ध्वनि] -वि क्लेशदायक 'मायबाप, बधु बहिणी। नोवरी न दिसता वाटे काणी।' -दा ३ २ ४०

**काणी**—वि तराजूचीं दोन्हीं पारडीं सारखीं नसणें, एक पारडें तिरपें असणें -स्त्री सीं सारखीं करण्यासाठीं एकात जें वजन, पासग घालतात तें, पासग [का काणि=तराजूतील वेतोल, पासग]

**काणी**—स्त्री १ (कु माण) बैलाचा लगाम, जनावराच्या गळयास बांधण्याचें चऱ्हाट, दोर २ लहान दोरी, दाव्याची एका बाजूची दोरी ३ (वे) लहान फास केलेली दोरी

**काणी**—स्त्री ज्वारी, गहू यावरील एक रोग, ह्यामुळें कणीस लोंबी काळी पडते काजळी

**काणी**—स्त्री (गो) कहाणी गोष्ट

**काणीट**—न एक जळूच्या जातीचा लहान प्राणी हा माण साच्या त्वचेला चिकटून रक्त ओढून घेतो (काणट पहा)

**काणी पेठ**—स्त्री काणा ४ पहा, धान्य वगैरेचा साठा नस ल्यानें दुसऱ्या गावावर अवलबून राहाणारें, तसेंच भावात वरच वर चढउतार होत असल्यामुळें येथील व्यापारी लुच्चेगिरी-नफेबाजी करतात असें शहर

**काणु-णू-क**—न (गो) देवास यावयाची देणगी, दवा पुढें पैसा ठेवतात तो, काणगी [का कणिके=देणगी]

**काणें**—न एक जातीचा मासा, हा भाद्रपदात अश्विनात पकडतात

**काणेर**—न वाडर पहा

**काणोसा**—पु कानोसा, लक्ष्य देऊन ऐकण्याची रीत (क्रि० घेणें) [स कर्ण]

**काणोसें**—वि वाकडें, तिरपें 'कांहीं बरें कांहीं काणोसें।' -दा १९ ८ २२

**काण्णव-ण्हव**—पु कण्वशाखीय ब्राह्मण, ब्राह्मणातील एक पोटजात व त्यातील व्यक्ति [स कण्व]

**काण्णी**—स्त्री (गो) काढणी, दोरी [काणी पहा]

**काण्णुवाण्णु**—न (कायनुवायनु) १ कांहीं तरी ज्याला कोणी विचारीत नाहीं किंवा ज्याकडे कोणी लक्ष देत नाहीं अशी वस्तु किंवा मनुष्य, क्षुद्रतादर्शक किंवा औदासिन्यदर्शक शब्द 'त्या जागीं कांहीं काण्णुवाण्णु भरलें' 'त्यानें कांहीं काण्णुवाण्णु आणलें' 'तो कांहीं काण्णु वाण्णु बोलला' २ पुरुषानें मृदुपणानें घातलेल्या समजुतीस क्रिया हा शब्द लावतात क्रि० बोलणें ३ परस्त्री अथवा पर पुरुष यांच्या परस्परातील अनीतिकारक शृंगारचेष्टा, कुजबुज, गुलगुल गोष्टी [स किम्+नु]

**कात-थ**—पु खैर वगैरे झाडाच्या लाकडापासून उक ळून काढलेला एक पदार्थ, हा (खाण्याच्या) विड्यात घालतात याच्या काळा, पिवळा व खैरसाल अशा तीन जाती आहेत [स क्वाथ] (म्ह) एवढयानें काय कात होणार? कमीजास्त उणीव अतिशय थोडा या अर्थानें वापरतात (एखादा पदार्थ कमी पडल्यास) ०कडी-री-कातोडी-पु कात तयार करणारी एक जात व त्यातील व्यक्ति, एक गुन्हेगार जात, कायोडी याच्यात दोन पोट जाती आहेत १ धार कातकरी व २ सोन कातकरी मुख्य वस्ती ठाणें व कुलाबा जिल्ह्यात आहे यांची भाषा मराठी असून ते नाकात बोलतात आणि प्रत्यय गाळ तात व खैराचा कात काढतात लाकडें तोडून कोळसे पाडतात उद राच्या बिळातील धान्य काढतात वगैरे -गुन्हेजात ५४ ०गोळी-स्त्री कातामध्यें सुवासिक द्रव्यें घालून जी लहान गोळी करतात ती ही विड्यात घालतात ०चुली-स्त्री कात तयार करणाऱ्यावर बसविलेला सरकारी कर ०बोळ-पु खैरकात आणि बोळ याचें मिश्रण, हें औषध बाळतिणीचे उपयोगी आहे याचा रग काळा असतो 'पोराचें पोर मेलें आणि कातबोळाचें मागणें आलें' 'सऱ्या शास मूळ वाढेस कातबोळ' [कात+बोळ] ०भट्टी स्त्री १ कात तयार करण्याची भट्टी, चुलाण २ कातचुली, त्यावरील कर ०वड-कार-वडी-पु (कों) कातकरी ०वाडी-स्त्री कातक ऱ्याची वस्ती,

**कात**—स्त्री (कु) भाजीपाला व मिरची यांचें फळ, कातरड

**कात**—स्त्री सापानें टाकलेली त्वचा, मेंग (कृत्ति शब्दाचा मूळ अर्थ कोणत्याहि जनावराचें कातडें असा आहे) हें एक प्रकारचें कातडेंच होय क्रि० टाकणें [स कृत्ति-क्त्ति-काति कत्तिट=कात्ति-कात राज-प्रय, भाइ १९३२] कात टाकणें-पुन्हा ताजातवाना होणें कातीला येणें-कात टाकण्यास तयार होणें, वृद्ध होणें

**कात**—स्त्री रेशीम (कातलेलें) ०पकतारी-स्त्री रेश माची एक जात एकेरी रेशीम -मुव्या ९७ ०कलकत्ता-स्त्री चीन देशातून येणारें कातलेलें रेशीम ०दोनतारी-स्त्री रेशमाची एक जात पिळाचें रेशीम -मुव्या ९७

**कात**—स्त्री १ तेज, तकाकी, पाणी, सौंदर्य २ (ल) टवटवी, निर्मळपणा, निरोगीपणा (चेहरा, मुद्रा किंवा शरीराचा वर्ण यावरील) -वि सुदर, तेजस्वी

**कात**—पु १ लाकूड, हस्तिदत वगैरेचा कातताना पडलेला भुसा चुरा, कीस [कातणें]

**कात**—पु (कों) काठ याचा अपभ्रंश, कडा, काठ

**कात**—पु नवरा, पति 'तिये कातु मिनलिया न राहवे। हृदय जेवीं।'—ज्ञा ११ ५७७ 'तेणें तरी कृष्णनाथ। भीमकी कात हो लक्ष्मी।'—एरुस्व ६ २६ [म कम्-कात].

**कात**—पु १ (लोहकात याचा सक्षेप) लोहचुंबक, चुंबक व त्याचें भस्म 'जैसा कात अवच्छिन्न। जड लोहातें वाचेष्टन।'—विउ ४ ४९ २ कढई वगैरेचें लोखन [स (अयस्)-कात]

**कातकाम**—न कातण्याचें काम लाकूड, धातू यत्रावर चढवून फिरवू हत्यारानें त्याना निरनिराळे आकार देऊन बनविलेलें काम [कातणें+काम]

**कातकुतली**—स्त्री (गो) खानकुयली

**कातकुली**—स्त्री गुदगुली, काचकुली, गुदगुलीची क्रिया

**कातडी**—स्त्री १ मनुष्य पशु (सजीव) इ॰ च्या अगावरील कातडें-त्वचा, चर्म, चामडी, पापुदरा, साल २ चाळवटलेलें घासलेलें, रोंवत असणारें कातडें [स कृत्ति] **॰वायसर**-पु यत्रातील भाग घट्ट बसण्याकरिता चामड्याचा जो तुकडा वापरतात तो [कातडी+इं वॉशर]

**कातडें**—न १ त्वचा, चम, चामडी २ कमावलेलें कातडें [कृत्ति], आपल्या अगाचें कातडें काढून जोडा शिवला तरी फिटणार नाहीं=एखाद्याचा अतिशय (न फिटण्यासारखा) उपकार झाला असता म्हणतात **॰पांघरणें**—एखादी गोष्ट माहीत असून सुद्धा माहित नाहीं असें ढोंग करणें, ठकविणें, फसविणें 'परतु दोघाचा न्याय चालत असता अगाढुत मध्येंच तोंड घालून न्यायस्थाचें कातडें पाघरून काहीं घोटाळा करणें अगदीं रास्त नाहीं'—टि४ १२८ सिंहाचें कातडें पाघरणें=खोटेंच अवमान आणणें, लटकेंच शौर्य दाखविणें **डोळ्यावर कातडें ओढणें**-डोळेझाक करणें, लक्ष न देणें

**कातण**—न करज्या वगैरे करताना त्याच्या कडाचें कातण्यानें निघालेलें पीठ [स कर्तन]

**कात(ती)ण**—स्त्री काळ्याच्या वर्गातील एक किडा याचे पाय लाब व शरीर काळसर असतें माशा पकडण्यासाठीं हि कोळ्यासारखें हा आपल्या अगातून तंतु काढतो म्हणून म्हणतात 'पिसवा गोचिड कांतणी।'—दावि २४४ 'कातण्या म्हणती घर आमुचें।—दा १ १० ३६ **—चें घर**—न वरील किड्याचें पाडल्या रगाचें तकतकीत व चिवट असें घर हें घराच्या साधीकोपऱ्यात तुळवगावर आढळतें हें लावलें असतां कापलेल्या भागाचें रक्त थाबतें [स कांतणें]

**कातणा**—न (कु) सुताराचें एक हत्यार

**कातणें**—उक्रि १ चाती, रहाट वगैरेवर सुत काढणें २ चरकावर चढून विशिष्ट गोलाकार देणें ३ करज्या वगैरेचे कांठ कातण्यानें कापणें ४ (ल) (खोडी किंवा दुष्कृत्य करण्याबद्दल) नावरूपास आणणें (?) राबवून रचविणें, युक्ति काढणें, त्यानें मजवर-विषयीं कारसें कातलें।'५ छळणें, गाजणें, विजार करणें, पाठीस लागणें, निवळणें 'काय कातलें भगवता वेळोवेळा।'—ऐपो १४२ ६ (गो) नारळ खवणें ७ जुपणें 'जैसें घडाचिये जावळियेसे कातलें चाऱ्ही।'—ज्ञा १ १३८ 'उदंड अवयवीं कातळ साव्राअणीचें।'—शिशु ९३६ 'निवडलें कातलिसे श्वान। तैसें दिशा हिंडे मन।'—तुगा २९०० ९ (जरतार) पीळ देणें, वळणें. [स कृत्] **कातून पिंजणें-काढणें**-पुष्कळ श्रम घेऊन तयार करणें, नावरूपास आणणें

**कांतणें**—अक्रि (कों) १ वाचणें, घर्षणानें झिजणें, कमी होणें २ दुखणें, नास वगैरेनें कावणें, क्षीण होणें [स कृन्]

**कांतणें**—न १ करज्या वगैरेच्या काठास कटि आणण्याचें एक साधन याच्या चातीला दातें असतात व धरावयाला दाडा असतो ल्हानशा पितळी दाड्याला (दातें असलेलें) बसविलेलें चक्र २ (गो) खवणी, खवला, नारळ खवण्याचें साधन

**कातनेकड**—न (कों) तोरणावर कनेकड फिरत असताना दोन्हीं लाकडें घासून झिजू नयेत म्हणून बाजूस दोन खुंट्या मारून त्यामध्यें कनेकडासाठीं व तोरणावर जें लाकूड घालतात तें 'काहीं लोक कातनेकडासाठीं माडाच्या पोयऱ्याचाहि उपयोग करतात'

**कातन्याभाजी**—स्त्री एक वनस्पति कात पहा

**कातयंत्र**—न सर्व साधारण कातकाम तयार करण्यासाठीं लागणारें यंत्र, हीं निरनिराळ्या प्रकारचीं असतात (स्क्रू करणारें, व्हील, सपाट टरेट, बोअरिंग, मिलिंग वगैरे) इं लेथ

**कातयो**—स्त्री (गो) कृत्तिका

**कातर**—स्त्री चिवट प्राण्याच्या केसावर अथवा लोंकरीवर पडणारा एक रोग, कातरी, चई, चाई, उदरी

**कातर**—वि १ भ्यालेला, भित्रा, भयभीत, भ्याड 'बहु कातर विदुर सदा वटवट करितो अशीच हा नीच।'—मोसभा ४ ९० २ अगचोर 'गुरु दास्याविषयीं कातर।'—विपु १ ५२ 'त्यासि चोरू हरू कातरू। म्हणोनि दह केला थोरू।'—एभा ११ ४५९ [स] **॰वेळ**-एन तिन्हीसाज, दिवस व रात्र यांचा सधिकाल 'मग काय करता इथें बसून? कातर वेळ झालीना?'—स्वप ३४

**कातर**—स्त्री १ मोठी कात्री, थोटें अडकविण्यासाठीं मागें पोलादाचीं दोन मोकें असलेली व एका खिळ्यानें सांधलेली व फिरती पातीं असलेली, हिनें कागद, कापड इत्यादि वस्तु कातरल्या जातात २ (ल) दोन नद्या किंवा रस्ते जेथें जुळतात, मिळतात त्यांच्यामधील त्रिकोणाकृति प्रदेश, वर्तुळाच्या दोन त्रिज्यामधील भाग, आडें टेकवण्यासाठीं दोन बाजे जोडून केलेली कैंची, त्रिकोण

३ (ल) अडचणीची स्थिति, घोंटाळा, आपत्ति, पेंच, कोडें ४ तळ हातावरील विवक्षित दोन रेषामधील त्रिकोणाकृति भाग व त्या रेषा या रेषांवरून दुर्भाग्य वर्तवितात, अशा माणसाजवळ पैसा टिकत नाहीं अशी समजूत आहे ५ तेराच्या घाण्याभोवतीं फिरणारें कातरीच्या आकाराचें एक लाकूड ६ (माण) वणमें असलेल्या वडव्याच्या पुष्कळ पेंढयांची मडलाकृति रचना ७ अष्टदिशांच्या मधील अंतराळें प्रत्येकी ८ (कों) ओक्तीचे दुवेळकें, वेळें ९ दांडपट्टा खेळण्याचें एक हत्यार 'याशिवाय माध, धोक, कातर इत्यादि नाना प्रकारचीं उपकरणीं मर्दानी खेळास लागतात' –राज्या ६८ [स कृत्–कर्तरी, प्रे नि कत, पोर्तु नि वच्छ, वपस्] म्ह० हातावर साखर आणि मानेवर कातर (गोडबोल्या दुष्ट माणसाच्या बाह्य वर्तनाला, बोलण्याला लावतात) ०लावणें–कमी करणें, काटकसर करणें 'वाढत्या खर्चास कातर लावली' ०कुतर–वि आतबाहर कापलेलें, कातरलेलें, करवतीकाठी –स्त्री कातरलेला चुरा, भुसा ०खुरा–पु (चाभार) नखीखालचा खुरा ०चुरा–स्त्री (ओतकाम) जिल्हई देतांना खालीं पडणारा धातूचा चुरा, भुसा ०ण–कि (गो) कातरणें ०ण–णी–स्त्री कापण्याची, कातरण्याची क्रिया –न १ वस्त्र विणल्यावर कणीला जीं उभ्या सुताचीं टोकें राहातात तीं २ कातरलेले तुकडे, चुरा ३ (व) कातीण नांवाचा किडा ४ धास्पतीवरील रोग ०चेत–ती–चेवत–ती–कतरवेत–ती पहा ०माळा–पु घराच्या अगदीं वरचा माळा, मजला ०विडा–कात्रीविडा–पु चार पानें घेऊन त्यांतील एक एक पान मधल्या शिरेस दुमडून हाताचे नखांनीं डेखापासून ते शेवटपर्यंत सारखें कातरे पाडून गोविंदविडा करतात तो ०वेल–स्त्री कातरी, हिचीं पानें कातरनिरगुडीच्या पानासारखीं असतात –वगु ५ ३२ [कातर+वल्ली] ०शितर–वि काटकसरी, मितव्ययी, सावध, विचारी [कातर द्वि] कातऱ्या चोर–पु कातरीनें खिसा कापणारा चोर, खिसेकातरू

**कातर**—वि (गो) खारवट शेतजमीन

**का तर**—उभ कारण, का कीं [का+तर, स किंनर्ताह]

**कातरणें**—उक्रि १ कात्रीनें कापणें, काटणें २ चावून, कुरतडून टोचून कापणें ३ मेंढीवरील लोंकर भादरणें ४ (कु) कमी होणें [स कर्तन]

**कातरणें**—अक्रि भिणें, कचरणें, माघार घेणें 'कुविचारा कातरू नको।' –अफला ९१ [स कातर]

**कातरता**—क्रिवि तिरकस, तिरपा, घसरता, चाटून काकरता पहा 'गोळी मानस कातरती लागली' –भाव ५७

**कातरा**—पु १ कातण्याचें कृत्य, काट, छाट 'तेणें प्रपचीं वर कातरा रे।' –दावि ३७९ २ कातरलेले तुकडे, भुसा, कीस, चुरा (वस्त्र, लांकूड, कागद, सुपारी, पानें इ० चा). ३ कातराव याचा भाग ४ पायरीची भाजी, हिचीं पानें कातरल्याप्रमाणें असतात ५ फाक, फोड, तुकडा (क्रि० घेणें) ६ (ल) दोन सोप्याच्या जोडाचा संधिभाग ७ (राजा) हातापायाला पड णाऱ्या भेगा (क्रि० पडणें) ८ (माण) शाळू किंवा जोंधळ्याच्या, पेंढयाची गंजी, जेथें शाळू अगर जोंधळा होत नाहीं तेथें या शब्दाऐवजीं ढीग, सुडी हे शब्द वापरतात कातर अर्थ ६ पहा ९ तिरकस येणारे दोन ओघ, प्रवाह 'वायोचा कातरा घसवटे। तेणें उष्णें वन्हि पेटे।' –दा १३ ३ ८ [स कृत्]

**कातरा**—वि कातरता, तिरका, ओझरता, वाकडा काकरता पहा

**कातरी**—स्त्री १ कातर अर्थ १ पहा २ (ल) तेलाच्या घाण्याच्या खालीं दोन आडवीं लाकडें जेथें मिळतात ती जागा, भाग ३ केसाना लागणारा एक रोग, चाई, उदरी (क्रि० लागणें) ४ (कुस्ती) एक डाव, आपला एक पाय जोडीदारानें वरतीं उचलला तर तो पाय जोडीदारानें जितका उचलिला असेल तर्थे त्याच्या पोटाला किंवा छातीला टेकून आपला दुसरा पाय जोडीदाराच्या गुडघ्याच्या खवणीजवळ व पजा जोडीदाराच्या टाचेला टेकून कातरीच्या दोन्हीं पातीप्रमाणें दोन्ही पायानें जोडीदाराला चीत करणें यास कातरी असें म्हणतात –वि कातलेलें, छाटलेलें खाडें पाडलेलें,(काहीं काहीं वनस्पति) जसें–कात्री निर्गुंड–निरगुडी–निरगुड–निवडुग–पान–विडा [स कर्तरि, प्रा कत्तरि] ०चालविणें–काटकसर करणें ०निर्गुंड–स्त्री निर्गुंडीतील एक प्रकार

**कातर्य**—न भितरेपणा, भ्याडपणा, नेभळेपणा [स]

**कातली–ळी**—स्त्री (गो कु हेट) ओल्या नारळाचें खव लेलें खोबरें 'नवऱ्यान दिली कातली' –सह्याद्रीच्या पायथ्याशीं ६ [स कृत्]

**कातवणें**—अक्रि सतापणें, कातावणें, खेंकसणें [स क+तप् किंवा तृ?]

**कातवळ**—वि खरकाळ प्रदेश [कातळ पहा]

**कात(ता)विणें**—उक्रि १ छळणें, वेजार करणें, त्रासविणें, चिडविणें २ (गो) कोरणें

**कातळ**—पुन खडक, प्रस्तर, एकसारखा सलग दगड किंवा दगडाळ जमीन 'सीळा कातळा परवडी।' –दावि २४४ 'कशा कठिण कातळावरूनि झरत जाहता।' –आधुनिक कविता वि भो महाजनी [कातल] ०वट–वि कातळ असलेली, खडकाळ (जमीन, प्रांत)

**कातळा**—पु (कों) पातळ फाक, फोड (फळ, मूळ इ० ची) [स कृत्]

**कातळा**—वि कांतिमान, श्वेत 'तो कैसा दिसताए कातळा। जैसा अमृतरसाचा ओतिला।' –शिशु ९९४ [स कांति] ०ऊंस–पु एक प्रकारचा ऊस

**कांता**—स्त्री १ सुंदर स्त्री, आवडती स्त्री २ पत्नी, स्त्याची बायको 'परी प्रियापुढें कांता। रिगे जैसेनि।' –ज्ञा १७.२७५ [स कम्–कांता] ०दृष्टि–स्त्री (नृत्य) चित्त प्रसन्न व संतुष्ट झालें असतां खोटया रागाचा भाव आणून शृंगारसूचक भ्रूक्षेप व कटाक्ष दाखविणें हा अभिनय शृंगाररसाचे वेळीं करतात

**कांताडी-डें**—कांतडी-डें पहा

**कांतार**—न १ अरण्य, वन 'सिंह सखा असतां पाहीं। कांतार हिंडतां भय नाहीं।' २ कठिण व विकट वाट [स]

**का(कां)तारी**—पु कातकाम करणारा, कातणारा

**का(कां)तावणें**—अक्रि चिरडीस जाऊन तोंड टाकणें, रागावणें, चिडणें

**का(कां)ताविणें**—उक्रि त्रासविणें, पीडणें, बेजार करणें, भागविणें

**काताळ**—पु (कु) कातळ पहा

**कांति-ती**—स्त्री १ तेज, सौंदर्य, शोभा, प्रकाश 'अव यवकांतीची भाव। तैसी दिसे।' –ज्ञा ६ २५१ 'कनकासवें जैसी कांति' –एरुस्व १ १६ २ देह, काया, 'काय सांगों सुख झालें आलिंगनें। निवाली दर्शनें कांति माझी।' –तुगा ६१७ 'पेटली सकळ कांति रोमावळी। नावरे हे होळी दहन जालें।' –तुगा ६५० [स कम्–शोभणें–कांति] ०करणें–(वे) शकराच्या पिंडीच्या वर तजेलदार गिलावा करणें ०पुंज–पु तेजाचा पुंजका त्यावर कांहीं ठिकाणीं कांतिपुंज असावेत असा भास होतो' –सुर्यावरील ठिपके आगरकर ०मान–वि ज्याचे अंगीं तेज, पाणी आहे असा, तेजस्वी, सतेज, सुंदर, तेज पुंज [स]

**कांति**—स्त्री सर्पाची कात, मेंग [स कृत्ति]

**कांतिऊ**—वि (महानुभावी) रेखीव, कोरीव, कातीव 'वैराग्याचा कांतिऊ।' –भाए २[illegible] [कातणें]

**का(कां)तिया, का(कां)ती**—पुळी माडाची पोय कापण्याचें ताडी काढण्याचें एक हत्यार, कोयता 'आपुलिया पुढिलाचिया। अंगीं घालूनि कातिया।' –ज्ञा १७ ९६ 'लोहा गेल्या निचूळ कोयतें कातिया।' –ह २२ ३५ 'नातरी कठीं घालिती कातीं।' –कथा ३ १० ७८ [कातणें, सीमन कों गो कु कात का कत्त]

**कातीखुमारी**—स्त्री ज्या माडापासुन माडी काढतात त्या माडावरील सरकारी कर

**का(कां)तीण**—स्त्री कातण अर्थ २ पहा

**का(कां)तीव**—वि १ चरकावर तयार केलेलें, चरकीं धरलेलें, पैलू पाडलेलें २ लहानसें पण सुबक बनविलेलें, नक्षीदार, उठावदार [कातणें] ०कोरीव–वि कातविलेलें व कोरविलेलें, सुबक, सुंदर, सुरेख डौलानें

**कातुकडी**—स्त्री (राजा) काथ्याचा तुकडा, दोरी, काथकडी पहा

**कातें**—न (का) काथ्या, सुंभ

**कातोर**—पु १ कातकरी पहा २ तीरकमठयासारखें कठिण लाकडाचें, कातड्यानें मढविलेलें, तीन फूट लांबीचें हत्यार हें गर गर फिरवून मारलें असतां सुमारें ५० यार्ड लांब जातें आणि चांगला मार बसला तर मोठी दुखापत होते –गुजा ६९

**कांतोणा**—पु (गो) पिंजारी, कातणारा [स कृत्]

**कात्या**—स्त्री (अव) (राजा) कृत्तिका नक्षत्र [कृत्तिका –कृत्तिआ–कात्या] ०चा पाऊस–पु कृत्तिका नक्षत्राचा पाऊस

**कात्यायन**—न ठार मारणें, बडविणें, नुकसान करणें (क्रि० करणें, काढणें)

**कात्यायन**—पु एक ऋषि व सूत्रकार ०सूत्र–न यजुर्वेदाच्या एका शाखेचें सूत्र

**कात्यायन वीणा**—स्त्री सारमंडळ शब्द पहा, एक वीणा, वाद्य

**कात्यायनी**—स्त्री पार्वती

**कात्री**—कातरी पहा **कात्रींत धरणें**–अडचणींत आणणें

**कात्रुड**—न (कु) भाजीपाला व मिरची याचें लहान फळ

**कात्रो**—पु (गो) सुपारीचा घड

**काथ–करी–गोळी–बोळ–वडी–काथोडी**—कात मध्ये पहा

**काथकडी**—स्त्री काथ्याची काडी [काथ्या+काडी]

**काथंबणें**—अक्रि (राजा) आवा बाठ धरण्याच्या दशेस येणें

**काथंग्रा**—पु केळीचा मोठा कोंब (केळीला चिरून उगवलेला किंवा निराळा लावलेला मोना,) मोना, पासवा

**काथवट**—काटवट पहा

**काथा-थ्या**—१ नारळाच्या सोडण्याच्या आंतील तंतुमय आवरणाचा जाड थर हा भिजवून, कुटून त्याच्या दोऱ्या वळतात, त्यास सुंभ म्हणतात २ याचा केलेला दोर दोरी ३ सुरमाडावरील तंतु ४ आंब्याच्या कोईस, बाठीस असलेलें केशर ०कुटणें–(ल) ज्यापासून कांहीं फलनिष्पत्ति नाहीं असा पोकळ वादविवाद करणें [काथ्या+कुटणें] ०कूट–थ्या–थे–कूट–स्त्री रिकामी चर्चा, निरर्थक वाद (क्रि० करणें) 'अमल्या शास्त्रार्थांत पडून विनाकारण काथ्याकूट तरी करण्याची काय जरूर आहे' –टि ४ ११८ ०मेथा–पु आजीबाईच्या बटव्यातील औषधें, वनस्पती –थ्याचा नमदा–पु दरवाज्यात पाय पुसण्यासाठीं

ठेवलेलें काथ्याचें आड तरट 'रस्त्यास लागून काथ्याचे दोन नमते टाकण्यात यावे' –ऐरापुत्र (बडोदें) ३ १८३

**काथी**—स्त्री कटी, कल्लरण 'काथी ताथी साथी चह सह।' –अमृतसुदा ३४ [स. कथ्]

**काथोट**—स्त्री १ काथवट काटवट पहा २ (कों) गुरांना होणारा एक प्रकारचा रोग 'आमच्या म्हशीला काथोट झाली होती म्हणून तिला डागावी लागली'

**काथोट**—वि (गो) सोलता न येणारें, फारच काथ्या असलेलें (फळ, सुपारी) [काथ्या]

**काथोडी**—पु कातकरी

**काध्या**—स्त्री अव (राजा) कृत्तिका नक्षत्र

**काध्ल**—स्त्री (गो) कढई, काहील [स कटाह]

**कांदपर्ण**—अक्रि कानपर्णे पहा

**कादंबरी**—स्त्री १ कल्पित कथा, सुंदर, मनोरंजक, अद्भुत, रसमय गोष्ट २ बाणभट्टानें रचलेली एक गोष्ट [बाणभट्टाच्या कादंबरी नावाच्या ग्रंथावरून]

**कादय**—पु (गो) तुरग [पो काडेयो]

**कादराई**—स्त्री एक प्रकारचें कापड –मुंब्या १२३

**कादरी**—स्त्री (राजा) कांद्यास जे लहान लहान कांदे फुटतात ते प्रत्येकीं [स कंद]

**कादल-ळ**—पु (राजा) खाडीच्या कांठीं किंवा खाऱ्या पाण्याच्या दलदलींत (खाजणात) उत्पन्न होणारें एक झाड हीं झाडें खाजणाच्या बांधाची माती वाहून जाऊं नये म्हणून लावतात 'हात बुडून कादळाचें रुख झालें'

**कादल्या**—न (कु) कमळाचें कंद

**कादव मासा**—पु हा मासा मरळमाशाप्रमाणें दिसतो दोहोंत मुख्य भेद तोंडाच्या आकृतींत असतो कादव्याचें तोंड त्याच्या आकृतीच्या मानानें मोठें व रुंद असतें मरळाचें तोंड लांबट असतें –मरळ माशाच्या पैदासी संबधीं नियम ४ (बडोदें)

**कांदा**—पु १ एक कंद, पलाण्डु याचा रोपा हात–सव्वा हात लांब व सरळ असून याचीं पातीं नळीसारखीं असतात हीं फार्ने व चटुकीच्या दांडूप्रमाणें असतें पात्याच्या मधून जो देठ निघतो त्यास नळा म्हणतात कांद्याच्या पांढरा व तांबडा अशा दोन जाती आहेत पांढरा औषधी आहे हा गुणानें लसुणीप्रमाणें कफकारक, थंड व रसकाळीं व पाककाळीं गोड असल्यानें वाताचा नाश करतो –धार १ ५७ कांदा पौष्टिक आहे –चगु २२ २ मुख्य भाग, गड्डा (कोबी नवलकोल इ० चा, सामान्यत कोणत्याहि पदार्थाचा महत्त्वाचा किंवा मूळ भाग) ३ (ल) जिभेचा मूळ भाग ४ मधाच्या पोळ्यातील मध असलेला भाग ५ सरकारी जागेंत लावलेल्या कांद्यावरील कर ६ (उप) मूर्ख 'शहाण्याचा कांदा' 'अक्कलेचा कांदा.' ७ वनगाईचा केसांमह शेपटीचा भाग म्ह० कांदा आणि मदाचा बांधा, कांद्याला बिस्मिल्ला कशाला? 'तुमच्या सारख्या धुधुल्याला ते (इंग्रज सरकार) फुकरानें ठवून देतील कांद्याला कशाला?' –खरादे २०६ [स कंद]

**कादाचित्क**—वि १ कदाचित् जें होणार तें, असंभाव्य तरी शक्य २ प्रसंगोपात्त येणारें, कारणप्रसंगानें, क्वचित् उपस्थित होणारें [स कदाचित्+क]

**कांदाळ**—न (कों कोळी) कोळ्याचें मासे पाण्याचें एक जाळें

**कादंबिनी**—स्त्री मेघमाला, अभ्र 'तापोपशम कादंबिनी।' –ऋ १ [स कादंबिनी]

**काद्रव**—पु कद्रुपुत्र, पाताळलोकातील सर्प, नाग 'कीं काद्रवें देखतां अरुणानुज। येवोनिया झडपी जैसा।' [स काद्रवेय]

**काधया**—अ काय? कसें 'तेथें काधया अपघातें' –गीता २.१४२

**कांधान**—वि (ना व) अति आंबट ०णें–अति आंबट होणें, वळकणें, (दहीं इ०) 'दहीं कांधानलें मिळालें'

**कान**—पु १ श्रोत्र, कर्णेंद्रिय, श्रवणेंद्रिय, शरीराच्या ज्या अवयवामुळें आपणास ऐकूं येतें तो अवयव २ (ल) कढई मोदकपात्र किंवा या सारख्या भांड्याच्या कड्या, सामान्यत कानाच्या आकाराची वस्तु ३ दागिने घालण्यासाठीं कानाला पाडलेलें भोंक 'माझा भिकबाळीचा कान बुजला आहे' ४ बंदुकीचा काना किंवा रंजक, दारू पेटविण्याचें छिद्र वत्ती लावावयाची जागा [स कर्ण] (वाप्र) ०उघडणें–केलेल्या मूर्खपणाचीं कृत्यें समजणें (स्वत ची व दुसऱ्याची), डोळे उघडणें, एखादी गोष्ट स्पष्ट करून दाखविणें, समजूत पटविणें, **०उघडून सांगणें**–समजावून सांगणें, स्पष्ट सूचना देणें **०उपटणें धरणें पिळणें, पिरगळणें** शिक्षा करण्यासाठीं कान धरून पिळवटणें, ओढणें, शिस्त लावणें 'त्याला जिवंत जिवंत पकडून त्याचे कान उपटल्या शिवाय आम्ही राहणार नाहीं' –वाय २ २ **०कापणें–कापून हातावर देणें**–वरचढ करणें वडी करणें, वर ताण करणें, मात करणें, फसविणें 'दुकानदारानें माझा चांगला कान कापला' ०किटणें–एखादी गोष्ट पुन्हा पुन्हा ऐकविण्यामुळें वीट कंटाळा येणें **०खडा–डी लावणें**–सूचना देणें, मनावर ठसेल असें सांगणें **०खडी लावून घेणें**–स्वत ला शिक्षा लावून घेऊन चुकी सुधारणें **०झाडणें**–१ स्पष्ट नाकारणें, ऐकून न घेणें, कानावर येऊं न देणें, निषेध करणें 'स्वर्गा जाणें हें सांडी। भवविषयीं कान झाडी।' –ज्ञा १३ ६१७ २ उपदेश झिडकारणें, न मानणें **०टवकारून, पसरून, ऐकणें**–लक्ष देणें, पूर्ण लक्ष देऊन

ऐकणें 'भाषण करणार म्हटल्याबरोबर त्यांनीं कान टवकारून पहावे '–के ३१५३० ०टोचणें–१ कानाला भोंक पाडणें २ (ल) फूस देणें, चिथावणें, चढविणें ३ कानउघडणी करणें, झाडणें, ताशेरा झाडणें, खरडपट्टी काढणें (सोनारानें) कान टोचणें–तिऱ्हाइतानें कानउघडणी करणें ०देणें–लक्ष देणें 'श्रीरामराजा देतसे कान।' –दावि ७८० ०धरणें–शासन करणें ०धरून-पिळून घेणें–वादाची वस्तु बळजबरीनें वच ज्यात, ताब्यात घेणें ०निवणें-थंड होणें–बरें वाटणें, आव डती किंवा जिव्हाळ्याबद्दल उत्कंठा लागलेली अशी गोष्ट ऐकून संतोष होणें ०पसरून ऐकणें–पूर्ण लक्ष देऊन ऐकणें (पण कृति न करणें) ०पाडणें–१ धैर्य सुटणें, निराश होणें २ आपल्या ताब्यात आला बसलासें वाटणें, गरीब बनणें, माघार घेणें ३ ऐकू येत नाहीं असें सोंग करणें, काणा डोळा करणें 'कान पाडुनि बसे धरणीसी।' –किंमवि २२० 'मी ह्याविषयीं कान पाड णार नाहीं '–बाळ २१५ ०पिळून घेणें–स्वत चा मूर्खपणा करून आल्यामुळें व त्याचे दुष्परिणाम भोगल्यानंतर पुन्हां तसें न वागण्याबद्दल दृढ निश्चय करणें ०पूर ओस करून बसणें–बहिऱ्याचें सोंग घेणें, ऐकू येत नाहीं असें भासविणें ०पूर ओस पडणें–बहिरा होणें ०फुंकणें–१ कानात मंत्र सांगणें, उपदेश देणें २ चुगली करणें, मनात भरविणें, चाहाडी, लावालावी करणें ०फुटणें–बहिरा होणें (पूर्ण, अर्धवट) ०भरणें–मारणें–चहाडया करणें, कानात सांगणें, चिथविणें –०येणें–ऐकण्याची शक्ति येणें ०लांबणें–१ वयानें जसजसें मोठें होत जाईल तसतशी अक्कल कमी होत जाणें (ल्हान मुलाविषयीं) २ (गाढवाचे कान लांब असतात यावरून) गाढव होणें ०होणें–लक्ष देणें, सावध होणें, सावधपणानें वागणें कानाआड–मागें-वरून-ऊन जाणें–उपदेश, शिक्षा, ताकीद वगैरेचा एखाद्यावर उपयोग न होणें –चा चावा घेणें–खोटया नाटया गोष्टी सांगून दुसऱ्याचें मन कलुषित करणें –चे कानवले होणें–कान वाकडे, (कानोल्याप्रमाणें) पिळवटलेले होणें –चे किडे झाडणें–१ परनिंदा श्रवणदोषापासुन मुक्त करणें, किल्मिष घालविणें, मनातील गैरसमज अढी दूर करणें २ (कानात किड्याचा प्रवेश झाला आहे अशा समजुतीनें) बरोबर समजूत पाडणें हितवाद सांगणें, चांगली खरडपट्टी काढणें –त खुंटया मारणें–१ बहिरें होणें २ पूर्वीचा एक शिक्षेचा प्रकार 'कानीं खुंटया आदळिती। अपानीं मेखा मारिती।'–दा ३७७३ –त जपणें–कानात पुटपुटणें, गुप्त रीतीनें बोलणें सुचविणें कानमंत्र देणें, चहाडी करणें –त तुळशी घालणें-घालून बसणें–१ ऐकू येत नाहीं असें भासविणें सोंग करणें २ माया पाश झुगारून दिल्याचा आविर्भाव आणणें, उपरति झाल्याचें दाख विणें, विरक्तीचें सोंग आणणें –त तेल घालून निजणें–अति शय दुर्लक्ष करणें, पूर्णपणें उदासीन असणें –त भरणें–चुगल्या करणें, एखाद्याचें वाईट करण्याविषयीं भरी भरणें –त भेंड घालणें–(व) बहिरेपणाचें सोंग घेणें, न ऐकणें –त वारें भरणें–उच्छृंखल होणें, एखाद्या गोष्टीचा पूर्ण विचार न करता हुरळून जाणें 'ही गरीब गाय कानात वारें भरल्यामुळें उधळली आणि सैरावैरा धावून अखेर चिखलात रुतली '–मु ६१ (या) कानानें ऐकणें-त्या कानानें–सोडणें–मनात मुळींच न ठेवणें, राखणें –पाठीमागें टाकणें–दुर्लक्ष करणें 'फुकटच्या उपदेशा प्रमाणें त्याचा निरोप कानापाठीमागें टाकणार नसाल तर सांगतों' –मु १०५ –बाहेर-वेगळा करणें–दुर्लक्ष करणें, उदासीन राहणें –मध्यें-त-मंत्र सांगणें, फुंकणें–चिथविणें, चेतविणें –मागें टाकणें–१ उपदेश शिकवण, सूचना इ० कडे लक्ष न देणें २ दुर्लक्ष करणें 'शत्रूचा समाचार अगोदर घेतला पाहिजे घरचीं भांडणें तूर्त कानामागें टाकलीं पाहिजेत '–बाजीराव –ला खडा लावणें–मूर्खपणाचें किंवा दुष्टपणाचें काम पुन्हा न करण्या विषयीं निश्चय करणें (कानाच्या पाळीच्या मागें खडा लावून दाब ण्याचा पूर्वी शिक्षेचा एक प्रकार होता) –वर (उजव्या डाव्या) पडणें-निजणें-लेटणें–एका कुशीकर (डाव्या उजव्या) निजणें –वर मान ठेवणें–आळशीपणानं किंवा निष्काळजीपणानें बसणें –वर येणें–ऐकणें, श्रुत होणें, 'येणार पुढें पुष्कळ आलें आताचि काय काना तें।' –मोभीष्म ७६ –वर हात ठेवणें–त बोटें घालणें, कान-झांकणें–१ एखादी गोष्ट मुळींच माहीत नाहीं अगर तींत आपला बिलकुल संबंध नाहीं असें दाखविणें, नाकारणें, नाकबूल जाणें २ एखादी मनाविरुद्ध गोष्ट ऐकवत नाहीं म्हणून कानात बोटें घालणें 'तो हा बांधिला केलें कर्म अमित साधु घातसें मोठें। खोटें हें म्हणतिल शिव शिव कर्णीं घालतील बुध बोटें।'–मोभी ४३६ –वरून जाणें–१ कान चाटून जाणें, २ (ल) थोडासा तोटा होणें ३ ऐकलेलें असणें –शीं कान लावणें–गुप्त रीतीनें मिळून मसलत, खलबत करणें –शीं लागणें, कानीं लागणें–कानात सांगणें, हळूच बोलणें, गुप्त रीतीनें सुचविणें –स कोन न कळूं-न लागूं देणें–अतिशय गुप्तपणा राखणें आणि झाल्यावर सुद्धा कानास कोन लागू नये ही तर खबर दारी घेतलीच पाहिजे '–मु १०८ –स दट्टे-दडे बसणें–बहिरा होणें कानीं कपाळीं रडणें–ओरडणें–सदोदित नेहमीं बुद्धिवाद करीत असणें, नेहमीं, पुन्हा पुन्हा सांगणें –नीं कोपीं बसणें-लागणें–(चोरून ऐकण्यासाठीं) कानाकोपऱ्यांत, अड चणींत बसणें, कानोसा घेणें –नीं मनीं नसणें–एखाद्याची कल्पना नसणें कधींच न ऐकलेलें, मनात नसलेलें ऐकणें –नीं सात बाळ्या असणें–(ल्हान मुलाच्या भाषेत) (ऐकावयाचेंच

नाहीं असा निश्चय दाखवावयाचा असता) ह्या कानाचें त्या कानास कळू न देणें, अतिशय गुप्तपणा ठेवणें म्ह० (व) १ कानाची कोन झाली नाहीं=कुणालाहि कळलें नाहीं. २ कानामागून आले महालिंग (तिखट) झाले, =मागून आलेला किंवा वयानें ल्हान असा माणूस जेव्हां वरचढ होतो तेव्हां योजतात ३ मुडघा कानाची पण अभिमानाची=अगांत दोष असून अभिमानयुक्त ४ (गो) कान मान हालवप=एखादी गोष्ट करण्यासाठीं उत्सुकता दाखविणें ५ (गो) कान फुक म्हळ्यार व्हान फुकता=एक सांगि तल्यावर दुसरेंच करणें ६ (गो) कानाचा पोळा आनी पोटाची चिरी वोटता तितली घाढता=मवयीनें सवय वाढते ७ कान आणि डोळे याच्यात चार बोटांचें अंतर=पाहिलेलें व ऐकिलेलें यांत केव्हां केव्हां अंतर असतें, ऐकलेलें तितकें विश्वसनीय नसतें, पुढें खोटें ठरण्याचा संभव असतो ८ कानामागून आले शिंगट ते झालें अति तिखट-(कानाच्या नतर शिंगें उद्भवतात म्हणून) एखादा उपऱ्या मागून येऊन एकाएकीं मोठ्या पदाला चढला व पहिल्या लोकांना शिकवू लागला-त्रास देऊ लागला तर त्यास म्हणतात यावरून कानामागून येणें व तिखट होणें सामाशब्द- ०आढा-पु (बैल गाडी) गाडी उतरणीवर असता किंवा बैल बेफाम असला तर तो ताब्यात रहावा म्हणून कासऱ्यानें बैलाच्या कानाला टाकलेला वेढा ०कडी-स्त्री (लोखंडी काम) कानाच्या आकाराचा पत्रा कापून त्याला जें एक लाबट तोंड ठेवतात तें वळवून त्यात बसविलेली कडी अशा दोन बाजूस दोन कड्या असतात ०कवडा-पु कान खवडा पहा ०कळाशी-सी-स्त्री (घोडा, बैल इ० च्या) कानाची व डोक्याची ठेवण, आकार 'अस्सल जरदी घोडी भिवरथडी वर बसली चांदणी। कानकळाशी फेरफारक्यामध्ये कोणी तरी दिली आदणी।'-पला ४ २१ ०काचा-पु (गो) पाण्या वर तरंगणारा एक ल्हान मासा -मसाप ३ ३ १५७ -वि कान कापलेला, कानफाटया ०कारी-स्त्री (विणकाम) ताणा ताणून धर णारी एक घनुकली ०किरळी-कीड-कुरकुटी-कुरटी-स्त्री (कों) कानास होणारा एक रोग, कानाची कीड ०कुडें-न काना तील कुडें, एक अलंकार [कर्ण+कुडल, कण्णकुडल-कानकुडें] ०कुलाय-स्त्री (गो) कान वाकेपर्यंतचा डोक्यावर घालण्याचा निमुळता टोप [स कर्ण+कुलाय=घर, झांकण] ०कूण-स्त्री १ गुणगुण, बाजारगप्प २ कुजबूज, कुरकूर ३ तक्रार, का कू अनिश्चित वर्तन [कान+कुणकुण] ०कूस-अनिश्चितता, का कू चालढकल, कानकूण अर्थ ३ पहा [कान+ध्व कुस] ०केस-पुअव (नुकत्याच विधवा झालेल्या स्त्रीचें) केशवपन करणें व अलंकार घेणें (क्रि० करणें) ०कोंडा-वि १ (आश्रयदाता, ११८र्ता ज्याला आपलीं अडींपिडीं, दोष माहीत आहेत अशा माणसासमोर) लज्जित, मुग्ध, खजिल, कुंठित, ओशाळा, भय चकित झालेला, भित्रा 'गुरुज्ञानाचें अंजन नसतां कानकोंडा प्रपंच फोल।' -अमृत १९ 'ईश्वरी कानकोंडा जाला। कुडुव कायाडी।' -दा ३ ४ ४७ 'मी कानकोंडा आहलों दुर्मती।' -नवि ५५ १०६ २ ऐकूं येत नाहीं असें ढोंग करणारा. -पु दुर्लक्ष्य, ऐकू येत नसल्याचें ढोंग 'तुजविषयीं कानकोंडा करू काय मी आता।'-दावि ८२ [कान+कोंडणें] ०कांडा-पु. कानां तील भुसकट, मळ ०कोंडीं-गाडा, कानागाडा-स्त्रीपु बहिरे- पणाचें ढोंग घेणें, दुर्लक्ष करणें, का कू करणें, अळटळ करणें, ऐकण्या न ऐकण्याबद्दल अनिश्चितता (क्रि० करणें) [कान+कोंडा] ०कोंडा-डी-वाटणें-शरमिंधे होणें, वाटणें ०कोंडें-वि लाजिरवाणें कानकोंडा-डी पहा 'ऐसी परस्त्रीची संगत। घडता जनांत कानकोंडें।' -महिकथा २८ १०० -न १ दुर्लक्ष, 'कली नाहीं चिंता नामीं कानकोंडें। अती कोण्या तोंडें जात असे।' -रामदास (नवनीत पृ १५२) २ निडरपणा 'कानकोंडें साहो नये।' -दा १४ १ ६ ०कोपरा-पु वेडावाकडा भाग, कान किंवा कोपरा, पुढें आलेला भाग (शेत, घन पदार्थ इ०चा) चतुरस्र, वर्तुल इ० आकारविरहित जे क्षेत्रादिकाचे अंश असतात तो ०कोरणी-णें-कानातील मळ काढण्याची, पुढें वाटी असलेली धातूची ल्हानशी काडी, कानमळ काढण्याचें हत्यार ०खडी-स्त्री. सूचना, ताकीद 'मी त्यास कानखडी लावली' ०खवडा-पु बास राच्या कानाला होणारा एक रोग, तो नाहींसा होण्यासाठीं बास राच्या कानांत एक कथलाची बाळी घालतात ०खीळ-स्त्री १ (बैल- गाडी) चाक पडू नये किंवा जागेवरून मागेंपुढें सरकू नये म्हणून आसास घातलेली कडी, कुणी २ (औत) जेथें दोन शिवळा जोखडास असतात त्यातील बाहेरील शिवळ ०खोरणें-(ना) कानकोरणी-णें पहा ०गच्ची-स्त्री १ पहा अगर वस्त्र यानीं कान झाकणें, बाधणें (क्रि० करणें, बाधणें) २ खोटया, अनिष्ट गोष्टी ऐकू नये म्हणून कानावर हात ठेवणें, आपल्या कानीं सातबाळ्या करणें (क्रि० करणें) [कान+गच्च] ०गोष्ट- स्त्री कानांत सांगितलेली गोष्ट, रहस्य, कर्णमैथुन ०घसणी- स्त्री १ कानगोष्ट पहा २ कुजबूज, आळ 'जाणोनि कान घसणी हरि चालियेला'-अकक कृष्णकौतुक ५४ ०घुशी-घुसणी-स्त्री (गोट्याचा खेळ) हाताच्या बोटांनीं आपला कान धरून त्याच हाताच्या कोपरानें गोटी उडविण्याचा प्रकार ०घोण-स्त्री गोम नावाचा सरपटणारा किडा, घोण, कर्णजुळिका, कर्णकोटी हा कानांत शिरतो ०चा कोन-पु क्रिवि कानाच्या कोपऱ्यात, अगदीं जवळ, कोठेंहि, किंचित् (ऐकू न येणें, परिस्फुटता न करणें) 'म्या त्याचीं ल्वाडी कानाच्याकोनाला कळू दिली नाहीं' 'कानाचाकोन समजला नाहीं' ०चिट्-पु खेळातील समाईक गडी, राहाटया ०चिपी-स्त्री १ कानाचा वरचा भाग पिरगळणें,

कानपिचरी ( शाळेंतील पतोजीच्या शिक्षेचा अथवा मुलांच्या खेळातील शिक्षेचा एक प्रकार ) ( क्रि० घेणें ) २ खेळांत ख्याडी केल्याबद्दल शिक्षा म्हणून स्वत चा कान पिरगळून घेणें ( क्रि० घालणें ) ०चिवळी-( कों ) कानचिपी पहा ( क्रि० घेणें ०चोर-वि ( गो ) ऐकून न ऐकल्यें करणारा ०टाळ-ठाळ-ळी-ळें-ठळ्या-ठाळ्या-टाळी-ळें-(अव ) (बसणें क्रियापदास जोडून) बधिर होणें, दडे बसणें, कानाचे पडदे बद होणें ऐकू न येणें ( थडी, वारा, मोठा आवाज इ मुळें ) -गलि ३ १७ २ ( उघडणें क्रियापदाला जोडून ) बहिरेपणा जाणें, ऐकू येऊ लागणें ३ समजण्याला, शिकविण्याला योग्य होणें, डोळे उघडणें, ताळ्यावर येणें ४ ताळ्यावर आणणें [ कर्ण+स्थळ ] ०टोपी-पु कान, कपाळ झाकणारी टोपी, माकडटोपी, कानपट्टीची टोपी ०पट-स्त्री ( व ) कानशील, कानाजवळील गाल व कपाळ यामधील भाग ०पट्टी-स्त्री १ कानगच्ची अर्थ १ पहा कान झाकतील अशा तऱ्हेनें डोक्याला गुंडाळणें २ कानपट, कान-शील 'भाल्याची जखम कानपट्टीस लागली ' -भाव ५७ ०पिसा-वि ( कों ) कानाचा हलका, भोळसर, खोट्या गोष्टींवर विश्वास ठेवणारा ०पिळा ळ्या-पु. (लग्नात) नवऱ्यामुलीचा भाऊ नवरीच्या हातात लाजाहोमाच्या वेळेस लाह्या घालतो व नवरामुलगा त्याचा कान पिळतो, त्याबद्दल त्याला नवऱ्यामुलाकडून कानपिळ्याचें अगर कानपिळणीचें पागोटें मिळतें तो मान ०फट-ड-स्त्रीन कानशील, गालफड, कानाच्या पुढील गालाचा प्रदेश ( विशेषत थोबाडीत मारतांना ह्या शब्दाचा उपयोग करतात जसें-मी तुझें कानफड सुजवीन, फोडीन, कानफडात मारीन [स कर्ण+फलक ] ०फटा-फाटा-टी-ट्या-डी-पु नाथपथ व त्या पथातील गोसावी ह्याची परपरा आदिनाथापासून आहे याच्यात प्रख्यात असे नऊ नाथ होऊन गले हे शैवमतानुयायी आहेत हे कानाच्या पाळीस मोठें भोंक पाडून त्यात काचेच्या किंवा लाकडाच्या गोल चकत्या घालतात ह्याच्या गळ्यात शिंगी, पुंगी असते हे किनरीवर गोपीचद राजाची गाणीं म्हणतात व्याघ्रावर गजचर्मावर परिधान शुद्ध कानफटा।' -प्रला ५ [ कान+फाट ] कानफटा ( इ ) नाव पडणें-क्रि दुर्लौकिक होणें नाव बद्द होणें कानफाट्याच्या वर्तनाबद्दल लोक साशंक असतात त्यावरून लोकात एकदा शका उत्पन्न झाली कीं ती जात नाहीं उदा० म्ह० एकदा कानफाट्या नाव पडलें म्हणजे जन्मभर तें तसेंच राहातें त्यावरून एकदा दुष्कृत्य केलें म्हणजे त्याचा कलक जन्मभर राहतो ०फुटी-स्त्री १ एक औषधी वेल २ (हेट ) कडधान्यातील एका गवताचें बीं ०फुसी-स्त्री कानगोष्ट, कानात पुटपुटणें, कुजबूज ०फोडी-स्त्री अजगधा वनस्पति, तिळवळ ०भेरा-भायरा-वि बहिरट. ०मंत्र-मंत्री-पुस्त्री कानात सांगितलेली गोष्ट, गुप्त मसलत ०वडा-वि १ एका कुशीवर, बाजूवर निजलेला, आडवा झालेला (क्रि० निजणें, पडणें, होणें ) 'ना येणेसीं मुख वाकडें । करूनि ठाकाल कान वडे।' -ज्ञा १८ १६९३ 'परि ते कानवडि पराङ्मुख निजेली होती।' -पच ३ १५ 'कोणी कानवडे निजती -दा १८. ९ ७ २ पराङ्मुख 'दुर दुर जासी निघुन बघुन रागवुन होसि कां कानवडा । -प्रला १६२ -पु दाराचें झाकण, वस्त्राचा आडपडदा -शर ०वडें-क्रिवि कानवडा पहा एका कुशीवर, बाजूवर 'तिए धारचेनि दडवादडें । नावेकु मुखचद्र कानवडें ।' -शिशु ७१२ 'नये अळसे मोडू अग । वथे कानवडे ढुग ।' -तुगा २४१३ ०वसा-पु कानोसा, दूरचा शब्द कान देऊन एकाग्रतेनें ऐकण्याची कृति ( क्रि० घेणें, लागणें, लावणें ) ०वळ-पु कानामागें होणारा एक रोग ०वळा-वि. कानवडा पहा ( क्रि० असणें, निजणें, पडणें ) -पु ( पशूच्या ) डाव्या कानाखालीं दिलेल्या डागाची रेघ ०वळे-पुअव गालावर आलले कानाच्या बाह्य अगावरील केंस कानवा-व्ह-ळा-पु कानोसा ( क्रि० घेणें, लावणें ) ०विळें-न ( कु ) कानातील मळ ०वेणी, कानशीलवेणी-स्त्री ल्हान मुलाच्या कानावरील केसाची घातलेली वेणी ०वेरी-क्रिवि कानापर्यंत, कानाविरी 'जे अनर्थाचे कानवेरी।' -ज्ञा ९ १८२ ०शिरा-स्त्रीअव कानाजवळच्या शिरा 'कानशिरा दुखतात, धमकतात, उठल्या ' ०शील-सल-सूल, कानाड-न १ कानाच्या जवळचा, गाल व कपाळ यांमधील भाग ' कानसुला भाली। आगें कूट जाली।' -शिशु ९७० 'घोर जाहली हातफळी । हाणिताती कानसुली । एकमेका।' -कथा ५ १७ १४१ 'याच कानसुलीं मारीतसे हाका।' -तुगा १८०५ २ गालफड, चेहऱ्याची एक बाजू, कानठाड, कानफड [ कर्णशिरस ] ०सर-पु बैलाच्या कान व शिंगाभोंवतीं बाधावयाची रगीत सुती दोरी ०साक्षी-पु ऐकीव माहिती सागणारा साक्षीदार काना-नें आरभ होणारे सामासिक शब्द-कानाकोचा-वि कानाला कटु कर्कश, वाईट लागणारें, कर्णकटु ( भाषण, इ० ) 'आणि का कानेंकोचें बोले।' -तुगा २७३५ ०कोचा-कोपरा-१ उचवट व भेगा पृष्ठभागीं विषमता (जागा, वस्तू इ० ची) २ (ल ) एकूण एक भाग 'मी घराचा कानाकोपरा शोधला '[कान+कोपरा, कोचा] ३ पुढें मागें झालेला, भाग, उचसखल भाग गन्द्व खड्डा कानाकोपऱ्याचें भाषण-न गुपचुपीचें भाषण कुजबूज, गुप्तपणाचें बोलणें, खाजगी, घरगुती बोलणें -चा आदळ-वि ज्याच्या पोटात कोणतीहि गोष्ट राहात नाही असा, वहकणारा, बबबड करणारा -चा अड-वि १ अर्धवट बहिरा, बहिरट २ ( ल ) ज्याला सागून लवकर समजत नाहीं असा -चा टप्पा-पु हाकेचें अतर -चा

तिखट-वि तीक्ष्ण श्रवणेंद्रियाचा -चा पडदा-पु ध्वनीचा आघात होऊन नाद उत्पन्न होणारें कानांतील तनूर, ध्वनिलहरी ज्यावर आदळल्यामुळें कंप उत्पन्न होऊन ऐकूं येतें तो पातळ पापुदरा -वर लेखणी ठेवणारा, वाळगणारा-वि हुषार, वाकबगार कारकून, त्सरक यास म्हणतात -चा हलका-वरी खोटी गोष्ट स,गितली असता तीवर सहज विश्वास ठेवणारा, चहाडखोराचें खरें मानणारा

कानें—अ (व) कायजणूं कीं काय ? अनिश्चितार्थी, वाक्य पूरक शब्द 'तो गेला कान' [स किं नु]

कानकली—स्त्री ज्वारीची एक जात -शे ८ २२४

कानगी—स्त्री १ (गुप्तपणें) कानांत सांगणें, कानगोष्ट कानमंत्र (क्रि० करणें, देणें) 'त्याला कानगी मिळाली वाटतें ' २ ऐकणें, कानोसा (क्रि० घेणें, घेत बसणें) [कान]

कानगी—स्त्री गिरीच्या व्यंकोबाला जी वार्षिक दक्षिणा देतात ती, देवापुढील देणगी, नैवेद्य, माणुक पहा | 'लोक उदक कानग्या वाहती ।' -दावि ४५ [का कणिके, ते क नुक= देणगी ]

कानगी—स्त्री (कों) एक मोठें झाड याच्या बियांचें तेल काढतात, लाकूड इमारतीस उपयोगी पडतें [का कानगु]

कानगो—पु कुळकर्ण्यासारखा एक ग्रामाधिकारी, जमिनीची, वहिवाटीची, वसुलाची नोंद ठेवून माहिती पुरविणारा, मोजणी करण्यांत व धारा ठरविण्यांत मदत करणारा वतनदार मुलकी अधिकारी, कुळाचे मृत्यु वारसा स्थानिक वहिवाटी, सार्वजनिक कायदे इ० सर्व गोष्टींची माहिती हा देत असे यास सारा माफ असून जमिनी व कांहीं वक्षनें असत [फा कानून+ गो=कायदा जाणणारा ]

कानगोई—स्त्री कानुगोचें काम अगर वतन ' सर्कार मज्यूर येथील कानगोईचें वतन ' -रा १२ १७४

कानची—स्त्री लांब कानाचें वटवाघूळ

कानट—स्त्री (कों) समुद्रातील एक ल्हान मासा

कानटें—न (कों) १ फुरशाच्या जातीचें एक विषारी जनावर, ल्हान साप ' विंचू सर्प दश करिती । कानटे फुर्सी । -दा १ १० ५५ २ (गो) जळूच्या जातीचा व जळूप्रमाणेंच रक्त शोषून घेणारा प्राणी, हा पावसाळ्यात उत्पन्न होतो व पावसा ळ्यानंतर मरतो, (गो) कानटा काणट, काणीट पहा

कानडा—पु एक राग, राग पहा [ हिं कान्हडा ]

कानडा—पु बहिरा, कानवडा पहा 'कानडा सखा ना वेडा नेत रोकडा किं पेलेतिरा ।' -देप २८

कानडा—वि १ कर्नाटकासबंधीं (भाषा, माणूस इ०) 'या वेगळे नटुकी, तुरसदाज, कानडे याची सचणी करून हरामें मेळविले ' -मराआ ६ २ (ल) वडावाकडा, दुर्बोध 'हें परि सतां जरी कानडें । तरी जाणपा पार्थ उघडें ।' -ज्ञा ६ १२० 'एँगें गुरुगम्य कुवाडें । उमगताचि कानडें ।' -सिस ६ १५. ३ ल्याड 'तुझ्यायशु स्वामि कानडया कौसाल्या रे ।' -तुगा १४० [स कर्णाट, प्रा कण्णाड, का कन्नड ]

कानडी—वि १ कर्नाटकांतील (भाषा, माणूस, इ०) २ (ल) अडाणी, चमत्कारिक रानगी, ओबडधोबड, लोकविरुद्ध, आडदांड (द्रुम, चालरीत भाषण, पोषाख, माणूस इ०) कानडा अर्थ २ पहा ०अप्पा-पु कर्नाटकांतील सामान्य माणसाला उद्देशून हा शब्द उच्चारतात 'आणि मराठीला मज्जाव झाला तर एखादा गुजराथी शामळो होईन, कानडी-अप्पा होईन ' -मा ४५

कानडे—पुअव सुनाच्या चरख्याच्या चातीजवळचे दोन खुंटे

कानन—न अरण्य, रान 'भरत जननि धाडी कानना राघवासी । -वामन (भरतभाव) २ ' महा दुर्धर कानन । देखतां भयभीत होय मन ।' -रावि १ १०६ [स ]

कानपणें—अक्रि १ मद पडणें, मावळणें, कमी होणें (देवी, गोवर इ० च्या पुळ्या, ताप, ज्वर इ०) २ (ल) घोटाळणें, लज्जित होणें, लाजणें, ३ हिरमुसणें [तुल स क्नयति=कमी करणें, हिं कान=लज्जा ]

कानपा—पु. १ (कों) कावीट, काटवट किंवा कढई याचे धरावयाचे कान, कड्या, २ तोफेचा गाडीवर टकणारा अवयव, तोफेचा काना

कानमुशी—स्त्री समुद्रातील एक मासा

कानवडणें—अक्रि एका कुशीवर निजणें, एका अंगावर असणें ' कानवडोनि अमृत घेऊनि पडे सुखा । -मार्जी कुडलिनीच्या ।' -स्वानु ९ ५ ५३ [कानवडा ]

कानवला—पु एका झाडाचें नाव

कानवला—पु १ पोटात गूळ-साखरेचें पुरण घातलेली मोटी करंजी ' चिंतामणिगत बालक जो दुर्लभ त्यासि काय कानवला ।' -मो विराट ५७३ २ (व) सपीटाची घडीची पोळी, चिरोटा हा खिरीशीं खातात ' बहु साधु साधु वदले ते काळाच्या पुढील कानवले । -मोशल्य १ ५९ ३ (विनोदानें) कान पिरगळा. (क्रि० देणें, घेणें, खाणें, मिळणें) हातापायाचा कानवला होणें-हातपाय कानवल्याप्रमाणें आखडून जाणें

कानवा—पु कानातील मळ [ कर्णवर्ती ? ]

कानवायरा—वि (महानुभावी) ओबडधोबड ' कर्मे कानवायरा उपळा । तिही टाकी कीजे निर्षाळा । ' -ज्ञाप्र ४२५

**कानस**—स्त्री १ घासणी, लोखंड घासून साफ करण्याचें, कीस काढण्याचें, धार लावण्याचें एक पोलादी हत्यार, सोनाराच्या धद्यात सुमारें पन्नास प्रकारच्या कानसी लागतात ( गोल, अर्धगोल, चौकोनी, तिधारी, चपटी, सुरीसारखी, फर्मा इ० ) २ करवत ०घालणें-इशारा देणें, जोरानें सागणें, बजावणें, बजावून सागणें 'त्या गोष्टीची कानस घातली '

**कानसणी**—स्त्री १ कानसण्याची क्रिया २ करवतण्याची क्रिया [ कानसणें ]

**कानसणें**—उक्रि १ कानसण्याची क्रिया करणें, कानशीनें घासणें २ करवतणें, अरकसणें, करवतीनें कापणें, चिरणें

**कानळ**—पु पर्वताचा लाब गेलेला फाटा, ओळ, भाग [ कान+ओळ ]

**काना**—पु १ बदुकीची, तोफेची दारू किंवा रजक शिलगवण्याचें भोंक 'ठोकिले खिळे कानात ।' -सप्रामगीतें ७३ 'त्या ( तोफा ) हलविणें शक्य नसल्यानें अपजय झाल्यास त्याच्या कान्यात खिळे मारून त्या निरुपयोगी करण्यात येत ' -हिंक १७८ २ रजकीचा पेला [ दे काण=सच्छिद्र, का कन=भोक ]

**काना**—पु १ तोफेस दोहीं अगाला मुठीनें धरण्याजोगे व गाड्यात अडकविण्याजोगे जे दोन आडवे खुट असतात ते २ अक्षराची पुढील ' आ 'काराची उभी रेघ ( ा ) ३ ( कों ) मोरीचें पाणी वगैरे वाहण्यासाठीं पन्हाळीसारखा कोरलेला चिरा किंवा चुन्याची केलेली पन्हाळी ४ ( माण ) नागराच्या फाळानें पडलेली रेघ, तास -मसाप २ ३ ७९ [स कर्ण, कान]

**काना**—वि. काणा पहा चकणा, तिरळा म्ह० (व) 'काना कयाति आयला हिकमति।' [ स प्रा काण, हिं काना ]

**काना**—पु कोना, कोपरा ' मग एरी कानिआ परतली । वैदर्भीतें।' -शिशु १७५

**कानाईचा**—पु समुद्रातील काळया, पाढऱ्या माशाचें एक नाव

**कानागाडा**—पु बहिरा असल्याचें सोंग, टगल मगल, दुर्लक्ष, ऐकलें न ऐकलसें करण्याची क्रिया (क्रि० करणें ) [ कान+गाडणें ]

**कानाडी**—क्रिवि कानापर्यंत, आकर्ण, ( बाण सोडावयाच्या वेळीं धनुष्याची दोरी कानाच्या टोकापर्यंत ओढतात यावरून ) 'द्रौढ कानाडी भरली नीजभुजीं । ' -उपा १४०४ ' मग कानाडी धरोनि शर । हृदयीं विंधिला निशाचर। -कथा २ १३ १२२ 'नाराच अर्धचद्रकार जाण । कानाडी ओढोनि वर्षतसे।' -जै ४३ २ 'शरासनीं शर लावून । कानाडी ओढून सावज लक्षी । -शिली २ ४१ -स्त्री कानापर्यंत ओढलेली धनुष्याची दोरी [ कर्ण+नाडी, कण्णनाडी-कानाडी ]
धको २. २७

**कानाडोळा**—पु ( प्र ) काणाडोळा एखाद्या अपराधाकडे दुर्लक्ष्य, मनात न आणणें २ डोळ्यानीं फेलेली खूण, गुप्त खूण ( क्रि० करणें ) ३ उदासीनपणा, दुर्लक्ष, आळस, ढिलाई

**कानापॉ-पॉ**—पु ( गो ) चौरग [ पोर्तु कानापे, तुल० इ कॅनोपी ]

**कानामात्रा**—स्त्री ( शुद्ध लेखनात ) अक्षरावर द्यावयाची काना, मात्रा, बिंदु इ० चिन्हें ' मी आपलेकडून चागलें लिहिलें परतु कोठें कानामात्रा गेली असली तर पहा ' [ काना+मात्रा ]

**कानारी**—वि ( गो ) कोंकणी

**कानावर्त**—पु घोड्याच्या कानावरील केसाचा भोंवरा हा अशुभ मानितात [ कान+आवर्त ]

**कानिट**—कानटें पहा

**कानिवला**—पु ( गो ) कानातील मळ

**कानी**—१ जोंधळ्यावरील एक रोग काणी पहा -शे ९ १३१

**कानी**—स्त्री १ ( कों ) गुराच्या दाव्याचा फास, दावें; काढणी, पेंडें, ( गुराच्या गळ्यात अडकविण्याचें अगर त्यालाच जोडलेलें दुसरें), दाव्यातील दोहोंपैकी एका बाजूची दोरी 'ऐसें सत्व सुखज्ञानीं । जीवासि लावूनि कानी । ' -ज्ञा १४ १५८ २ शिंके व त्याच्या दोऱ्या प्रत्येकी ४ ( क ) लहान दोरी काणी पहा [ का कण्णी=दावें, दोर ]

**कानीन**—वि १ कुमारिकेला लग्नापूर्वी झालेला पुत्र (उदा० कर्ण, व्यास ) २ मुलीचा मुलगा, दौहित्र [ स ]

**कानुगो**—कानगो पहा

**कानुड**—वि कानडी पहा ' भाषा कानुड बोबडी वाणी।' -दावि ३८९

**कानुडा**—वि लबाड, लुच्चा, कपटी कानडा पहा

**कानुडा**—पु श्रीकृष्ण ' कानुडयानें माझें मन मोहिलें।' -अमृत १४ [ स कृष्ण-कन्ह-कानु+डा ]

**कानुला**—पु ( गो ) कानातील मळ

**कानू**—स्त्री १ (कायदा) अट, नियम, ठराव म्ह० कान द्यावा पण कानू देऊ नये ( ही म्हण खडकऱ्यात प्रचलित आहे ) =काहीं झालें तरी नवीन कराचें ओझें येऊन पडू नये म्हणून यत्न करावा 'त्यानीं अशी कानू कधीं आपणावर चढवून घेतली नाहीं ते आता कसें कबूल करितील ' -ख २ ६९३ २ हक्क, रीत, वहिवाट ' कान देऊ पण कानू सोडणार नाहीं ' ३ बाजारांत विक्रीला आलेल्या जिनसावरील द्यावयाचा कर, पट्टी ' हल्ली सालोसाल नजरेची कानू गावगन्नास बसविली ते दूर करावी ' -ऐटि २ ४१ ४ नियम, कायदा 'पूर्वापार यास माफ असतां हालीं कानू करावयास कायी गरज ' -रा २० ३६० [अर कानून,

तुल० इ कॅनन] ०कनात-स्त्री चाल, रीत, कायदा, हक्क ०काननात-कर, पट्टी वगैरे 'वेठी, जेठा व बाजे कानू-कान नातीचा उपसर्ग न देणें' -रा २० ३६० [कानू+काननात (कानूनचें अव)] ०कायदा-पु (राजशासन) कायदेकानू, नियम, ठराव वगैरेंना समुच्चयानें योजितात [कानू+कायदा] ०जापता-पु सरकारी कायदेकानूंचें पुस्तक, कोड कानूचें पुस्तक ०बाब-स्त्री एक कर पूर्वी मराठी मुलुखात जमीनदार हा कर वसूल करीत असत

**कानून**—न एक वाद्य -देहु ३७ (-नाको) [गो कॉन्नॉ]

**कानेकोंचे**—पुअव १ कोन व कोंपरे, खांचा खोंचा २ (ल) गूढार्थ, आतील खुबी, रहस्य, मर्म (क्रि० लागणें, जाणणें, समजणें, पाहणें) [काना=कोन, कोंपरा+खोंचा=खोचा] ०भाषण-न खोंचदार, बोचणारें, मर्मभेदी, अपमानकारक भाषण

**कानेटी**—स्त्री (कु) कानात जाणारा घोणीच्या वर्गी तील एक ल्हान प्राणी [कर्ण+कीटक]

**कानेदूर**—पु कांडेचोर पहा

**कानेर-न्हेर**—(कों कुण बे) गडबड, त्रास, कटकट (वाद्यांचा आवाज इ० ची) 'इजिनाचा फारसा कानेर होत नाहीं -मोटारटिप्पणी (जगती १ २४ १८) [स क्वणितृ, प्रा कणिर=आवाज करणारा]

**कानोकान-नीं**—क्रिवि कर्णोकर्णी, एकानें ऐकून दुसऱ्यास सांगितलेलें फार चांगली तू जर माहीत कळलीस कानोका नाला।' -अफला ७६ [कान द्वि]

**कानोड**—वि (व) वाकडें, एका कानावर, बाजुवर कल लेलें, कलतें 'मातीचा कुंभ कानोडा ठेऊन' -ऐरापु (विवाहविधि) ८१

**कानोडणें**—कानवडणें पहा

**कानोला-ली**—पुस्त्री (का) करंजी कानवला पहा

**कानोसा**—पु आबोळी, एक पक्वान्न

**कानोसा**—पु कानवसा पहा (क्रि० घेणें, लावणें)

**कान्नूबान्नू**—काण्णूबाण्णू पहा

**कान्मानें**—वि (गो) ऐकलें न ऐकल्यासारखें

**कान्वेत**—(गो) चाकू, सुरी

**कान्सऱ्या-री**—स्त्रीअव कापड विणतेवेळेस विणलेल्या कापडास ताण यावा म्हणून कापडाच्या काठास, लावावयाच्या ज्यांच्या टोकास टाचण्या टोंचलेल्या असतात असा पट्या काट सरी पहा

**कान्सुरें**—न (गो) शक्तिहीनाचें भाषण [कन्हणें+सूर]

**कान्हम**—स्त्री शेतजमिनीची एक जात -शे ७ १५ (-नाको)

**कान्हा**—पु (कों) पोई (नारळीच्या झापाचा, बोंडाचा शेवटचा भाग) चा एक तुकडा, ह्यानें जमीन सारवतात

**कान्हा**—पु १ (काव्य) कृष्ण 'धरिला पालव न सोडी माझा यशें। काहीं करिता या नंदाचिया कान्हें।' -तुगा १३४ 'यशोदे बाळ तुझा कान्हा कान्हा। तो रागल आला तान्हा।' २ (ल) तानुलें, लहान मूल [स कृष्ण-कण्ह-काण्हा, प्रा कण्हो]

**कान्हा-डोळा-मात्रा, कान्हीं, कान्हु-जाबता**—माना, कानु इ० खालीं पहा

**कान्हाई-ई**—स्त्रीन (लडिवाळपणें) कान्हा २ पहा 'माझे सावळे कान्हाई।' -ह १८ ८९ -नागा १०

**कान्हाडी**—कानाडी पहा 'कान्हाडी बोंविली भाकणें।' -वसीस्व १४ १३७

**कान्ही**—स्त्री (व) गुरें बांधण्याची दोरी, ल्हान दावें कानी पहा. [का कण्णी=दावें, दोर]

**कान्हीं**—स्त्री १ ज्वारी, गहू यावर पडणारा एक रोग काणी पहा 'का कान्हीं पडे पिकासी। घाली शेतासी निंदणें।' -एभा १० ५१४ २ (ढोर धंदा) चामड्याचे केंस निघाल्या वर केंस आणि वरील त्वचा यांच्या दरम्यान असलेला एक काळा पदार्थ (क्रि० काढणें) [स कृष्ण=काळा, प्रा कण्ह]

**कान्हू**—स्त्री कायदा कानू पहा 'बैसविली याणें कान्हू' -देप ८२

**कान्हू न्हो**—१ श्रीकृष्ण, कान्हा पहा 'कामेंगौ कान्हू नायकें।' -चौऱ्यांशी शिलालेख 'अवतारी कान्हो जगजेठी।' -दावि ४४२ २ (ल) ल्हान मुलगा, तान्हुला [स कृष्ण-कण्ण=कण्ह-काण्ह-कान्ह-कान्हु (ममतादर्शक)]

**कान्होबा**—पु १ श्रीकृष्ण २ कानिफनाथ ऊर्फ कन्होबा, याची समाधी कान्होबाची मढी (जिल्हा नगर) येथें आहे हिंदु व मुसलमान हिची पुजाअर्चा करतात

**कान्होला**—(व) कानवला पहा

**कान्होला**—पु. तान्ह्या मुलाच्या कानांतून निघणारा पांढरा मळ कानवा, कानविल

**काप**—पुअव १ स्त्रियांच्या कानातील एक कुड्यासारखा दागिना म्ह० 'काप गेले भोकें राहिलीं=वैभवाचे दिवस गेल्यावर फक्त त्याची आठवण देणारीं चिन्हें मात्र दु:खाला कारणीभूत होऊन राहतात या अर्थी [का कोप्पु] ०सरपळी-स्त्री (कु) हा कानाच्या पाळींत घालावयाचा अलंकार दृष्याच्या आकाराचा असतो पुढ्यांत व यांत फरक हा कीं याला बाजूस चवलीच्या आकाराची चिंचाक्याप्रमाणे फुगीर सोन्याची टीक व त्याच्या खालच्या बाजूस

मोत्यांचें डाले (तबकडी) व सोन्याची सरफळी (साखळी, श्रीमत लोक साखळीला हिरे-मोतीं लावतात) असते सांखळीचा आंकडा कानाच्या बाजूनें गालफडावरून वर केंसात अडकवितात ०सांखळी—कानातील दागिन्याची सांखळी, कापाची साखळी

**काप**—पु १ फाक, फोड, तुकडा (फळाचा) (क्रि० करणें, पाडणें, पडणें) 'रताळयाचे-बटाटयाचे काप' २ (कु) मिठाईच्या वडया, मिठाई [स कृप्² प्रा कप्प=कातर्णे] ०खर्डी—स्त्री पडीत जमीन

**काप**—पु कँप, छावणी, तळ, गोट 'कापाच्या मैदानात आल्यावर, सभा भरली'–के १० ६ ३० [इ कँप]

**कॉप**—न (गो) १ पेला २ रिरिमिरी [पोर्तु कॉप्स, इ कप्]

**कांप**—पु. १ कापणें, थरकाप, लटपट, थरथर 'विषयी जैसा, देहीं शिरता भयशोभयोत्य कांप, रतू²।'–मोभीष्म ७ १७ २ भीति, भय 'मनात काप तिच्या।'–मोवन ४ १४५ [कंप]

**कापकडी सुपारी**—स्त्री (राजा) कोवळया सुपारीचे शिजवून वाळविलेले काप [काप+कडी=कढणें+सुपारी]

**कापट-टें**—पुन (व ना) खण (चोळीचा), कापडाचा तुकडा, कपटा 'कापटें स्वस्त भावांत पडलें' [स कर्पट]

**कापटणें**—उक्रि (कों) भादरणें (मेंढ्या, म्हशी) [कापणें]

**कापटा**—पु कपटा पहा तुकडा, फाळका (केळीचें पान, कागद, दगड, लाकूड इ० चा) (वा प्र) **कापटे काढणें**-(व) खूप मारणें, बडवणें [कापणें]

**कापटी**—स्त्री १ (कों) पातळ, चपटी फोड, फाक, चकली, काचरी (आंबा, टरबूज इ० ची) २ (गो) ढलपी, तुकडा (लाकडाचा) [काप]

**कापट्य**—न १ कपटीपणा, खोटेपणा २ कपट, छद्म फसवणूक 'ऋषीनें कापट्य नेणोन।' [स]

**कापड**—न १ वस्त्र, कपडा (गो) लुगडें २ (विणकाम) उभार सुतात आडवण सुत घातलें म्हणजे त्यास कापड म्हणतात [स कर्पट प्रा कप्पड, सिं कपडु हिं कपडा] ०आख-पु कापडावरील त्याच्या किंमतीची चिठ्ठी, आंकडा, आख अर्थ ३ पहा ०करी-पु कापड विकणारा, बजाज, चाटी ०गज कापडाचा गज-पु हा दोन फूटतीन इंचपासून दोन फूट अकरा इंच असतो ०चोपड-न (व्यापक) वस्त्रें व इतर पदार्थ (तूप, तेल इ०) कापड व दुसऱ्या किरकोळ वस्तू [कापड द्वि] ०चौकी-स्त्री कापडाचा तंबू 'रानगिरी माडविया। सुरगा कापड चौकिया।'–शिशु ५७२ 'दारवटा बाह्यप्रदेशीं। कापड चौदी उभविली कैसी।'–कथा ४ १८ २१७ ०ताका-पु कापडाचा वीस ते चाळीस वारांचा तुकडा ०निशी-निवीशी-स्त्री कापडासंबंधीं लिहावयाचें काम, कापडनिसाचें काम, हुद्दा ०नीस-निवीस-पु फरासखान्यावरील अधिकारी, राजाच्या वस्त्रागारावरील अधिकारी ०लेप-पु मात कापड पहा

**कापडणें**—उक्रि (कों) कापडानें मढविणें (छत, खांब इ०)

**कापडणें**—क्रि (राजा) कापटणें पहा

**कापडी**—पु गंगेची कावड खांद्यावर घेऊन रामेश्वरास जाता जातां वाटेंत गंगोदक, जपमाळा, जानवीं इत्यादि विकणारे यात्रेकरू, भगवें वस्त्र, भगवी पताका असलेले तीर्थयात्रा करणारे (सामा) यात्रेकरू, प्रवासी, मुसाफर 'जिये मार्गींचा कापडी। महेशु आझुनि'–ज्ञा ६ १५३ 'तुमा कापडी केला जगन्नाथा।' –शिशु ४४४ 'प्रभातकाळीं उठुनि कापडी तीर्थपथ लक्षी' –होला १६ [स कार्पटिक, प्रा कप्पडिअ=भिक्षुक, भिकारी, दे कपड=मुसाफर]

**कापडी**—वि कापडाचें बनविलेलें [कापड]

**कापडीक**—पु यात्रेकरू, कापडी पहा 'मुक्तीचे काप डीक।'–भाए १०३

**कापण-णी**—स्त्री १ (कु गो) श्मश्रु, हजामत २ (विशे) कापणी, छाटणी (पिकाची), पीक काढणें 'भात कापणी' [कापणें]

**कापणावळ**—स्त्री कापण्याची, तोडण्याची मजुरी (पीक, शेत, लाकूड इ० ची) [कापणें]

**कापणें**—उक्रि १ छाटणें, चिरणें, फोडणें, तोडणें, दोन भाग करणें (धारेच्या शस्त्रानें) २ (ल) कपात करणें, कमी करणें, काटाकाट करणें (पगार, वर्षासन, रोजमुरा, इ०) ३ (कों) हजामत करणें ४ होण्यासारखें, उरकण्यासारखें असणें (काम) 'हें काम मला कापतें' म्ह० १ कापलें तरी आपलें =शिक्षा केली तरी आपलेंच मूल (पुढें त्याची काळजी आपणच घेतों) २ कापल्या करंगळीवर मुतणें=(नकारार्थी) केव्हांहि कोणा च्याहि उपयोगी न पडणें [स कृप् प्रा कप्प सिं कपणु]

**कापणें**—अक्रि हलणें कंपायमान होणें थडथड वाजणें 'कुरवाळुनि म्हणे गा राजसुता योग्य तू न कापाला।' –मोविराट ३ ७७ [स कंप]

**कापण्या**—स्त्री अव जनावराच्या काळजामधील मांसा पासून तयार केलेला पदार्थ (खजूरासारखा) –गृहि २ ११० [कापणें]

**कापता**—विक्रिवि तिरकस, कातरता

**कापरवणी**—न कापराच्या वासाचें पाणी, कापूर घात लेलें पाणी [स कर्पूर+वन=पाणी कापूर+पाणी]

कापरा-री-रें—पुस्त्रीन १ कंप, थरथर, हुडहुडी, कापण्याची रिहति (क्रि० सुटणें भरणें) 'हृदयीं दाटून भय कापरा।' –नव १० ६५ २ (ल) भीति, भय –वि कांपणारा, घाबरमान, भीरु 'केला असेल भीमें व्यूह असा थाल कापरा भूतें।' –मोभीष्म ६ ३ [स कंप, म काप]

कार्पटिक—पु तीर्थवासी, यात्रेकरू कापडी पहा [स]

कापला—काफला पहा

कापविणें—क्रि (कापणें प्रयोजक) भिवविणें, दटाविणें, कंप सुटावयास लावणें 'काळोख कापवु दुरी निज तर्जनीनें।' [कंप]

कापसा—वि १ (कों) पोकळ, लठ्ठ, स्थूल, ढमाल्या. 'तो दिसायला कापसा आहे पण ताकद नाहीं.' २ हलका, जलमय, कापसासारखा मऊ (मुळा, भोंपळा, दोडका) [कापूस]

कापशी—स्त्री कापसाचें झाड, कापूस कापशीचे प्रकार दोन –देवकापशी व रानकापशी, बागांत व घरांत लावतात ती देवकापशी व शेतांत लावतात ती रानकापशी रान कापशीचीं झाडें दोन-तीन हात उंच वाढतात व देवकापशीचीं झाडें पुरुष-दीड पुरुष उंच वाढतात झाडास येणाऱ्या बोंडापासून कापूस उत्पन्न होतो कापशीच्या बियांचें (सरकीचें) तेल काढतात –दो १० २४ [स कार्पास, प्रा कप्पास, म कापूस]

कापसाळें—न कापसाचें देवास वाहण्याकरितां स्त्रिया तयार करतात ते कुंकुमयुक्त वस्त्र [कापूस]

कापसाळें—न (गो) एक जातीची मासळी

कापळा, कोपळा—पु (कों) उडीच्या गराचा काप [काप?]

कापा—वि कापून खाण्यासारखा, टणक व भरलेला (आंबा फणस, पपई इ० फळ) याच्या उलट बरका (=लिबलिबीत) ०फणस—पु ज्याचे गर मऊ नसून जो कापून खावा लागतो असा फणस हा उत्तम समजतात 'ववन बहुत उदरामधीं भरलें, फणस जसा मोटा कापा' –होला १८ [कापणें]

कापाउड—न १ आवार, परस २ कुंपण, परडें [इ]

कापाड—न (राजा कु कुण) वस्त्र, लुगडें, कापड पहा [कापड अप]

कापालिक—पु वाममार्गी, शैव-शाक्तपंथी लोक, संप्रदाय (ह्यांच्या हातांत पाणी पिण्यासाठीं नरकपाल असतें या वरून) –वि कपाळासंबंधीं, कवटीसंबंधीं [स]

कापिन्नणें—वि (काव्य) कापणें पहा घाबरणें, भयानें थरथरणें 'रंभा कापिन्नली गदगदा।' –मुरंशु ४३९

कापी—स्त्री (कु) सोललेल्या सोडणाच्या काथ्याच्या वरचें साल,

कॉपी—स्त्री १ नक्कल, प्रतिलेख २ इंग्रजी लिहिण्याचें पुस्तक, यांत इंग्रजी मूळाक्षरें, शब्द इ० वळविण्यासाठीं छापलेले असतात ३ (छाप) छापण्याकरितां तयार केलेला लेख, ज्यावरून खिळे जुळवून मुद्रण करावयाचें तें अगदीं अखेरचें हस्तलिखित (इं) मॅनुस्क्रिप्ट ०राइट–पु ग्रंथावरील मालकीहक्क, पुनर्मुद्रणाधिकार, कोणताहि ग्रंथ किंवा ग्रंथरचना ही तयार करून पुढें आणणें किंवा त्या ग्रंथाचा बराचसा भाग संकलित करणें व तो प्रसिद्ध झाला नसल्यास प्रसिद्ध करणें या बाबतींतील जो विशिष्ट आणि एकट्याचा पुरता हक्क असतो तो –घरचा कायदा १५५. २ ग्रंथमालकीचा कायदा [इ कॉपी+राईट=हक्क]

कापींव—वि १ कापलेला, तोडलेला, छाटलेला २ कापण्यास योग्य, कापा [कापणें] ०सुपारी–स्त्री दुधांत शिजवून वाळवलेले सुपारीचे काप, फोडी, तुकडे, कापकडी सुपारी

कापुसणें—अक्रि १ (एखादा पदार्थ) बुरशीनें, पांढऱ्या ततूंनीं आच्छादित होणें, बुरसणें २ स्थूल, थलथलीत, लठ्ठ होणें [कापूस]

कापूर—पु एक पांढऱ्या रंगाचें ज्वालाग्राही सुगंधी द्रव्य या याच झाडापासून व दालचिनी इ० द्रव्यापासून कापूर बनवितात हिंदुस्थानात कापूरकेळीपासूनहि कापूर निघतो 'कापुरें तैं चांगु माळाधिलें।' –शिशु ६२९ [तुल० द्रा कर्प्पु=दालचिनी (हा शब्द ग्रीकांनीं उचलला होता काल्डवेल ९३ ९४), सं कर्पूर, प्रा कप्पूर, हिं गु कपूर, ते कर्पुरमु, मलाया कापुर, सइ-अर काफूर, लॅ कॅंफोरा, इ कॅंफर] म्ह० चोळला कापूर नासनो= अति झालें म्हणजे बिघडतें ०आरती–स्त्री (कर्ना) कापुरारती १ तबकांत कापूर पेटवून त्यानें देव, गुरु, ब्राह्मण यांस ओंवाळण्याची क्रिया २ (बडोदा) कापूर पेटविण्याचें पात्र, इलकारती –ऐरापुप्र २ २ ०कचरा-री–पुस्त्री एक सुवासिक कंद [स कर्पूर+कर्चूर, हिं कपूरकचरी] ०करदळी–स्त्री जिच्या गर्भांत कापूर निघतो अशी कर्दळ, केळ ०केळ-ळी–स्त्री एक प्रकारची केळ, कापूरकरदळी पहा –शै ३० ४३ 'वरीनि कापूरकेळी। भ्रमराची गाक छटिलीं।' –शिशु ६०५ ०गोरी–वि कापरासारखी गोरी, शुभ्र 'कापुर गोरी चोखट।' –ऋ ८२ ०चिनी–स्त्री चिनी कापूर, एक ओषधी वनस्पति, द्रव्य [स चीनाक+कर्पूर] ०पोवळें–न खोटें, कृत्रिम पोवळें (हें लाखेचें करतात) ०भेंडी–स्त्री एक झाड ०मोतीं–न खोटें, कृत्रिम मोतीं (हें पान्याचें बनवितात) ०वणी–कापरवणी पहा ०विडा–पु कापूर घालून केलेला पानाचा विडा 'आरोहण तया झाली, कापूरविडे देती।' –वसा ५३ ०वेल–स्त्री १ नागवेलीचा एक प्रकार 'कापुर वेलीचीं चोसडीं। उजळिरी पोविडीं।' –ऋ ८४ २ एक फुलवेल

**कापूस**—पु १ कापशीच्या फळांतील द्रव्यविशेष, ततुमय पांढरा पदार्थ, ह्यापासून वस्त्रें करतात याचे दोन प्रकार आहेत-आखूड धाग्याचा (खानदेश, वऱ्हाड) व लांब धाग्याचा (सिंध) (क्रि० पिंजणें, कातणें, लोढणें, घटणें) रुई, सावरी, कुडा व इतर काहीं झाडें यांच्यापासूनहि जो असाच पदार्थ निघतो तो ३ (ल) अवाळू चामखीळ वगैरेमधील पांढरें कापसा सारखें फुशफुशीत मांस ४ केळीच्या कालांतील ततू ५ तवरें, भोपळा इ० नासल्यामुळें आत होणारा पांढरा पदार्थ [स कार्पास, प्रा कप्पास, हिं गु कपास] ॰घटणें-लोढणें, कापसांतील सरकी काढणें ॰महाग करणें-(ल) कृश, अशक्त होणें (याच्या उलट कापूस स्वस्त, सवग करणें=लठ्ठ होणें) (गो) कापूस म्हाग करणें म्हृ० (व) १ कापुस केव्हढ्या चिकट लेखच्या= घ्यावयाचें थोडेंच पण भाव विचारून विचारून दुकानदाराला सतावलें असता दुकानदार असें म्हणतो २ (गो) कापूस खाली चोटान, बैल खाले बैलान=कापूस विकून आलेले पैसे चैनींत घाल विले पण कापूस लादून आणलेले बैल पोसण्यासाठीं एकेक बैल विकणें भाग पडलें **-साची मोट**-स्त्री (ल) लठ्ठ, स्थूलदेही माणूस **-साचें बीं**-सरकी **-साचा नग**-(धारवाडी) धार वाड येथें ४८ मणाला एक नग म्हणतात व २८ पौंडांचा एक मण असतो

**कापोळा**—कापळा पहा

**काफडी**—स्त्री खरपुडी (खरजेची)?—नाको

**काफर**—वि (मुसलमान लोक मुसलमानेतरास हा शब्द लावतात) अश्रद्धावान, यहुदी, ख्रिस्ती, अगर मुसलमान धर्म प्रयावर श्रद्धा न ठेवणारा, परधर्मी, नास्तिक 'या कलीमध्यें मुसल मान काफर जहाले याचा सहार करावयाकरिता रहीमनें पैदा कला आहे' -चित्रगुप्त ७० 'प्रथम तू कोण काफर आहेस तें साग।' -स्वप १४३ २ (ल) लुच्चा, लवाड, बदमाश, हराम खोर ३ हबशी काफरी पहा [अर काफिर] ॰शाई-स्त्री काफरांचें राज्य 'यवनाचे मनात कीं काफरशाई जाहली'-ऐटि ११८

**काफरी**—पु १ हबशी, शिद्दी २ पूर्व आफ्रिकेंतील एक जात

**काफला, काफिला**—पु १ प्रवाशांचा त्यमाणाचा तांडा प्रवासी यात्रेकरूंचा तांडा, समूह कारवान 'किती येक ते काफले लुटताती' -इम २४ २ जहाजाचा, गलबताचा समुदाय, आर मार [अर काफिला, इ कॅफिला]

**काफिर**—काफर पहा

**काफी**—स्त्री १ बुंद एक झाड व त्याचें बीं २ बुंदाची भाजून दळून केलेली पूड ३ या पुडीचें साखर दूध इ० घालून केलेलें पेय, एक उत्तेजक पेय काफीचें झाड ३-४ हात उंच वाढतें फुलें चमेलीसारखीं पांढरीं असून फुलल्यानंतर आठ महिन्यांनीं फळें तयार होतात तीं लाबोडी व पिकल्यानंतर तांबड्या रंगाचीं दिस तात तीं पिकल्यावर त्यांतून बुंद काढून घेतात एका फळांत दोन बुंद (बिया) असतात एका झाडावर एका वेळीं शेर-अच्छेर बुंद निघतात बुंदाचा रंग हिरवा असतो -वगु २ ३९ १६ व्या शतकांत आशिया खंडाच्या पश्चिम भागांत कॉफीचा प्रसार होता, पुढें सर्वत्र झाला [तुर्की, अर काहवे=पिणें, इ कॉफी, फ्रें काफे, कव्हा पहा]

**काफी**—पु (संगीत) १ एक राग या रागांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत व कोमल निषाद हे स्वर लागतात जाती संपूर्ण-संपूर्ण, वादी पंचम व संवादी षड्ज गानसमय मध्यरात्र, तरी पण सार्वकालिकहि मानतात २ एका थाटाचें नांव याचे सात स्वर असे -शुद्ध षड्ज, शुद्ध ऋषभ, कोमल गांधार, शुद्ध मध्यम, शुद्ध धैवत व कोमल निषाद

**काय**—स्त्री १ बांबू वगैरेचें उभें लांबट भेतुक, चिरफळी, कामटी २ लोखंड अगर इतर धातूचा चापट लांबट तुकडा, गज ३ कोपरापासून मनगटापर्यंतचा हात, हाड 'त्याच्या मनगटाची कांब रुंद व जाडी होती' -कोरकि ९१ ४ (कों) (कुस्ती) जोडीदाराच्या मानेला घातलेला विळखा, मिठी ५ (कु) रीप, लांकडाची पट्टी ६ पधरा तसू लांबीची काठी (जमीन मोजण्याची) ७ (विणकाम) लगा तणून झाल्यावर त्याची परमणी करते वेळीं सांधींत घालण्यासाठीं वेळूच्या कामटीचे केलेले लांबट तुकडे प्रत्येक ८ (तंजा) तार [का कबि] ॰मोठी असणें-मनगट बळकट जोरदार, भरभक्कम असणें, हाडपेर बळकट असणें, सशक्त असणें

**कावजात**—स्त्री तावा, अम्मल, सत्ता, काबीजाती 'सिद्दीच्या किल्ल्याच्या कावजातीची मुबारकी आँ शहामत-पन्हास दिली जाली' -ऐटि २ ९० [अर कब्जियत]

**कावट-टी**—स्त्री १ कावीट पहा २ (गो) पनावळी लावण्याचीं शिंगरें करण्याकरिता नारळीच्या झावळीच्या दांड्याच्या पाठीचे काढलेले लांबट तुकडे प्रत्येकी, चोय [का कम्बि, तुल० स कमट=वेळु]

**कावडी**—स्त्री (खान) (कुंभारी) कावीट (चार बोटें लांब व दोन बोटें रुंद) ही मडकें घासण्यास घेतात [कावटी]

**कावरणें**—क्रि (क कुण) पाघरणें (वर्णव्यत्यासानें) 'कावळा कावर'

**कायरा**—वि कवरा पहा भुरकट, काळा [सिं कबिरो, स कर्बुर]

**कावरा**—पु. भुईसरपट पसरलेलें झुडुप (नेपती, आर्द्र, पंचोवंद इ० झुडपें ). (लॅ. कॅपारिस) -शाको क ३६४ [ तुल हिं. काव्रा; सिं. काल्वारी ]

**कांवरुण**—न. ( राजा. कुण ) पांघरुण. ' पढ्दर कांवरुण घी घेऊन गावाद. ' =चिरगूट पांघरुणहि घेण्यास सांपडेल. -मसाप २.४.११०. [ पांघरुण वर्णव्यत्यास ]

**कांवरें**—न. ( कों. ) डोळ्यांतीला वाळलेला मळ; चिपड. [ कॅवरें ? ]

**कावली**—वि. (कों.) काबूलसंबंधीं (उंट इ०). -स्त्री. भाज लेले पांढरे काबुली हरभरे; हे शुक्रवारीं वाटतात, यावरून खारे वाटाणे शुक्रवारीं वाटतात त्यांसहि म्हणतात. -मसाप २.२.७२. यांस तिखट मीठ व हळद लावलेली असते. [ काबूल ]

**कांवळ-ळा-ळी-ळें**—स्त्री.पुक्लीन. १ घोंगडी; मेंढीच्या लोकरीचें वस्त्र. ' अकीर्तिच असो रुचे तुज कशी भ्रजीं कांवळी । ' -केका ७८. ' कांवळा घेई काळा । ' -होला १६. २ लोकरीच्या दोन घोंगड्यांची शिवून केलेली मोठी घोंगडी. ३ गाई-बैलाची मानेखालची पोळी. ' गळ्याखालीं गाईस जशी कांवळ असते... ' -तीत्र ५४. [ सं. कंबल ] **भिजत कांवळें जड होणें**-१ एखाद्या संकटाची उपेक्षा केल्यानें तें जास्तच वाढत जाणें. २ एखादें काम लोंबकळत पडणें. **कांवळ्यावर काढणें**-मरणाच्या वेळीं मनुष्याला गादीवरून काढून घोंगडीवर ठेवतात त्यावरून मरणाची शेवटची घटका; आसन्न मृत्यु. ' तुम्हांला कांवळ्यावर काढलें होतें.' -नामना १२३. **कांवळीट**-न. घोंगडी; ब्लॅंकेट. ' घोंगडी, घावळी, तुरणुस, पट्टू, फलानीन, कावळीट हीं सगळीं लोकरीचींच करितात. ' -मराठी तिसरें पुस्तक आवृ. ४, पृ. १५. **कांवळ्या**-१ (वि.) कांवळें वापरणारा. २ (ल.) मजूर.

**कावळो**—पु (कु.) काम्या.

**कांवळो-ळ्या-घोणस**—पु एक जातीचा सर्प. याला चट्टे असतात.

**काया**—पु. उत्तरेकडील लोक. ( गु ) ओखा मंडळांतील याचे लोक.

**काया**—पु (कों.) वोंवळा, चेचव नारळ.

**काया**—पु. मक्केस मशिदींत जो मोठा काळा दगड आहे तो. [ अर. ]

**कांवाटणें**—उक्रि गाय वगैरेच्या निरणांत विषयुक्त कांव घालून ठार मारणें; गोमास खाण्यास मिळावें म्हणून महार लोक करतात अशी समजूत आहे. [ कांव. ]

**कावाड, कावाड कष्ट-काम**—पुन. कबाड पहा. ' मग स्वप्नाचें कावाड । वोदरी निद्रा । ' -ज्ञा १८.५४०. ' तैसें गुरुकृपेवीण कावाड । ' -सवि १.४४. 'वाहोनि प्रपंच कावाड । शिणविलें हाड व्यर्थेचि ' -भवि ४९.६३. ' वाटतें कावाड विषय-सुरा । '-तुगा १६१८. 'कावाडकष्ट मुलीच करतात.'-नाकु ३.४२. ०राौत-पु. (कों.) कावाडाची खोती करणारा; सरकारास सारण पुरविणारा मक्तेदार. ०खोती-स्त्री. सदर मक्ता.

**कावाडी**—पु. मजूर; कष्ट करणारा माणूस; कवाड वाहणारा; ज्याला नाजुक, कुशलतेचें काम करतां येत नाहीं असा माणूस; ' कावाडी वाहती कावाड । ' -दा ६.९.६.

**कावाड्या**—वि. कावाडी पहा. ०गाड्या-स्त्रीअव. सामानाच्या गाड्या.

**कावाय**—स्त्री. (गो.) झबलें [पो. काबिया; तुल. म. कब्जा; फा. कबाचा ]

**कावासांव**—न. ( गो. ) तडजोड; निकाल.

**कावाळ**—पु. ( कों. ) काम्या ( नारळाच्या सोडणाचा ).

**कांवी**—स्त्री. १ धनुष्याची कांबीट. धनुर्दंड; कमठा; 'कांवी वाजे काळाची ' -विउ ८.१. २ छडी; काठी. ' तयाच्या माथां कांवि वाजे । ' -भाए ६३६. 'सुदां योधांचिये कांवीवरी । ' -ज्ञा १८.१०७०.'वळें भक्तरीपु शिरीं कांवी वाजे । ' -राम २९. [प्रा. कमठ=वेळु; का. कंबि ] ०**आयाळ**-घोड्याच्या डोळ्यावरून खालीं लोंबणारी आयाळ व खालपर्यंत लोंबणाऱ्या केसाची शेपटी ( ही असणारा घोडा शुभदायक समजला जातो ). -अश्वप १.५१. ०**चें लोखंड**-ज्याच्या हात सळ्या किंवा पट्या करतात असें लोखंड; ( इं. ) बार आयर्न. ०**तासप**-( गो. ) पट्टन जाणें.

**कांवी**—स्त्रीअव. (क.) मुलास पाजण करण्याकरितां फुलीच्या आकाराच्या केलेल्या काठ्या.

**कावीज**—वि. १ कब्जा घेणारा; सत्ताधीश. ' पुन्हां पाटी-लबावा सल्तनतींत कावीज होईल. ' -दिमरा १.२५२. २ आधीन; हस्तगत. -न. ग्रास; दगदग. [ अर. काबिज् ] ०**मुतसरिफ**-वि. कब्जा व वहिवाट उपभोगणारा. ' हर्गीज की कावीज मुत-सरीफ वहात्तर वर्षें नाहीं ... ' -रा २०.४७. [ अर. काबिज्+मुतसर्रिफ् ]

**कावीजात-द**—पु कावीज केलेला प्रांत; ताब्यांतील प्रदेश. 'नवीन काबिजादींतील हिंदु लोकांचा न्यायनियम एक प्रकारच्या कायद्यानें चालत होता. ' -गोमांतकरीतीभाती प्रस्तावना [ अर. काबिज् ]

**कावीजाती**—स्त्री. तावा. ' यावरी त्याची कावीजाती बैसली.' -पेदसमा २१७.

**कांवीट**—स्त्रीन. १ कावटी; बांबूचा तुकडा; भेतुक; वेळूची लांब फाक. ' तेथें या काविटाचा गरिब गुण किती प्रौढिही कोण येथें ?' -आसी ३९. २ (ल.) मनगटाची कांब; हाड; जनावरांच्या

पुढच्या तगडीचें हाड २ तिरकमठा, धनुष्याची काठी, दंड ‘मग पाचशतें काचिटें वोढी। मोडोनिया वोटें।’ –कथा २ १४ २ [स कमठ=वेळु, का कम्बि]

**काबील**—वि १ कर्तृत्ववान, कर्तबगार, हुशार, प्रवीण ‘एक काबील मनुष्य नजीबखान रोहिला आहे’ –भाष २० ‘त्यास जन्मभर कुमार्गांत काबील करतात’ –व्युनि ३५ २ मजबूत, बळकट, चिवट ३ (चुकीनें) काबीज –शास्त्री को [अर काबिल्]

**कांबील**—स्त्री कामीण, काबीळ [स कामला]

**काबुची**—वि लुच्चा, धूर्त, फसव्या, युक्तिबाज ‘मोंगल लोक काबुची आहेत’ –रा १ ५२ [तु काबूची=जुल्मी, अनिर्बंध]

**काबुयार, काबुयारी**—स्त्री काबू पहा

**काबू**—स्त्री १ संधि ‘आपली काबू साधून तेथें न गुंतता महाराजांनीं स्वराज्यात यावें’ –चिनगुप्त ८० ‘मस्लत कानूस आली’ –खरे १ १४४ २ कब्जा, ताबा, सत्ता, नियंत्रण ‘पातशहाचे मनात स्वामींचे काबूत राहावें’ –दिमरा १ ११ ‘या पद्धतीनें घोडा स्वाराचे काबूत राहतो’ –हिलइ १७२ –वि १ बळकट, मजबूत ‘(चेनरायदुर्ग) इतका काबू किल्ला असून एकाएकीं पस्त झाला’ –खरे १२२४ २ धूर्त, कावेबाज, लबाड [तु काबू=सामर्थ्य, सत्ता] ०**कार–यार–वर**–वि धूर्त हिकमती, लबाड ‘जाटात जीव आहे मोठा काबूकार आहे’ –रा १ १२९ ‘काबूवार खरा फिरंगी’ –आयाह ३ ०**तलब** –वि संधि साधणारा ‘इमज वेइमान काबूतलब’ –पया ४६४ ०**यारी**–स्त्री लुच्चेगिरी, धूर्तता ०**वख्त**–पु संधि योग्य समय ‘खालीं मैदान देखून व काबूवख्त पाहून’ –खरे ३५६७

**काबेरू**—न (कों) साप अडचणीच्या जागीं असता त्याला धरून ठेवण्यासाठीं टोंकाला लोखंडी अणकुचीदार कांटे बसविलेली काठी [काब]

**कांबोज**—पु १ एक देश, रोहिलखंड, मुरादाबाद वगैरे भाग २ ब्रह्मदेशाच्या दक्षिणेस असलेला देश (कांबोडिया) [स कुंभज?]

**काब्या शेंदूर**—पु कावेसारखा, लांब तुकड्याचा शेंदूर हा औषधी आहे [काब+शेंदूर]

**कांभरूण**—न पांघरुण=(वर्णव्यत्यास) (क्रि० कांभरणें=पांघरणें)

**कांभे(घे)रा**—पु आढें किंवा पाखाड्या यांना तुळईपासून दिलेला लाकडी धिरा [काब]

**काम**—न १ गोष्ट, कार्य, व्यापार, कृत्य २ धंदा, उद्योग, हातीं घेतलेला व्यवसाय ‘तुमच्या मुलाला काय काम आहे?’ ३ क्रिया, कृति करण्याचा व्यापार ‘कर्माचें काम सरे। विरमे मन।’ –ज्ञा ७ १७७ ४ सामान्यत कोणताहि व्यवहार, बाबत, ‘या कामात माझा एक भागीदार आहे.’ ५ गरज, प्रसंग, प्रयोजन ‘सध्यां मला चाकूचें काम नाहीं’ ६ उपयोग, पात्रता, उपयुक्तता, सोईस्करपणा ‘हें हत्यार त्याच्या कामास पडेल’ [सं कर्म, प्रा कम्म, सिं कमु हिं गु काम, सींगन कम] (वाप्र) ०**काढणें**–१ रापाडून त्रास देणें, मन मानेल तसें वाग विणें, सतावणें, छळणें २ (ल) खोड मोडणें, कुंठित करणें, नक्षा उतरणें, खरडपट्टी काढणें, जेरीस आणणें ३ ठार मारणें ‘सन १८७३ सालीं होन्याकोळ्यानें बंड केलें व मारवाड्याचें काम काटलें’ –गुजा ५९ ०**चोरणें**–अंग राखून, कुचराईनें रेंगाळत, काम करणें ०**नसणें**–निरुपयोगी, निष्फळ होणें, (एखाद्या वस्तूची) गरज नसणें ०**बजावणें**–करणें, पार पाडणें, तडीस नेणें ०**मनावर घेणें**–१ महत्त्वाचें समजणें, किंमत देणें २ करण्याविषयीं उद्युक्त होणें, कळकळीनें झटणें ०**साधणें**–वाटेल तें झालें तरी काम तडीस नेणें, संपविणें, पुरें करणें **कामात काम करून घेणें–उरकणें**–मोठें काम चाललें असतां त्याच्या साधनांनीं त्याच जातीच्या लहानशा प्रकारचें काम साधून घेणें ‘कामात काम भज मना राम।’ –**मांत पडणें**–१ एखाद्या कामात, धंद्यात, व्यवसायांत भाग घेणें, पत्करणें २ पराभूत होणें, अयशस्वी होणें (उद्योगांत धंद्यात) –**मांत पाणी शिरणें**–व्यवहारात, धंद्यात तोटा होणें –**मांतून जाणें**–निरुपयोगी होणें –**मा नये**–(काव्य) उपयोगी नाहीं –**मा येणें**–उपयोगी पडणें ‘सहदेव मात्र कामा आला करि विक्रम प्रकाम रणीं।’ –मोकर्ण ३८ ३१ ‘तुला कामा येतील वेल्हाळे।’ –र १२ –**माला येणें**–१ पत्करणें, सहन केलें जाणें ‘तू अशा रीतीनें वागलास तर तें माझ्या कामाला येणार नाहीं’ २ उपयोगी पडणें ‘कठिण समय येता कोण कामासि येतो?’ –र १० –**माला–स येणें**–लढाईत स्वामीकार्यार्थ मरण येणें –**मावर पडणें**–१ उपयोगी होणें २ योग्य होणें, बरोबर असणें (कृति, रीत काम इ०) **कामीं असणें**–१ (व) कामावर असणें २ नोकर असणें –**मीं येणें**–कामाला–स येणें पहा ‘गोखल्याच्या निशाणाभोंवतीं पांचशें वीर कामीं आले’ –विवि १० १० २२९ –**मीं लावणें**–१ उपयोग करणें २ वेठीस धरणें म्ह० १ (क) काम करत्या बैलाला मारणें=पेंकणा-रालाच पुन्हां पुन्हा काम सांगणें २ (गो) काम केल्यार दाम दिवप=काम केल्यावर दाम (मजुरी) देणें ३ खांदा देऊन काम करणें=झटून, मन पूर्वक काम करणें ४ कामात भंड पडणें=काम

–शिशु ९४६ ०कारी–वि मदनाचा वेग उत्पन्न करणारा 'नसे अंतरीं कामकारी विकारी।' –राम ५० ०क्रोध लोभादि–पुअव काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर या षड्रिपूबद्दल योजावयाचा संक्षेप 'विकल पडता प्राक्तन। स्वधर्मी राहाटे कीं मन। कामक्रोध शत्रु संपूर्ण। केले आधीन तुवा कीं।' –पाप्र १५ १३० 'परस्त्रीसीं काम निषिद्ध। ब्राह्मणा वरी नसावा क्रोध। सुहृदयातीसीं मद। सहसाही न करावा।' –पाप्र १५ १३३ 'सत्सग धरावा आर्धी। नायकावी दुर्जनाची बुद्धी। कामक्रोधादिक बादी। दमवावे निज पराक्रमें।' –पाप्र ३९ २१ ०गृह–न स्त्रियाचें जननेंद्रिय 'कामिनी कामगृहा सखी। प्राणी प्राणातें स्वयें दिणविती।' –एभा ३ २४२ ०ग्रस्त–पीडित–दग्ध–व्यथित–व्याकुळ–व्याप्त–वश–आकुल–आक्रांत–आतुर–अंध–आधीन–अन्वित–वि मदन विकारानें क्षुब्ध झालेला (सर्व शब्द समानार्थक आहेत) [स] ०चेष्टा–स्त्री शृगारचेष्टा, क्रीडा, कामविकार उत्पन्न करणारे हावभाव, चाळे 'कामचेष्टा करी तरळी। मधुर वचन बोलोनियां।' [स] ०ज्वर–पु १ मदनाचा वेग २ मदन पीडेनें झालेला सताप ०ट–वि मदनानें व्याप्त 'शिश्न कामट मातलें।' –गीता २ ५०६१ ०थाळोरें–रोळें–पृपण, अड कुली 'कामथाळोरा पुसाटीं। घाछुनि पडे।' –एभा १४ ३८२ [काम+पारोळें] ०देव–मदन ०धेनु–स्त्री १ (पौराणिक) इच्छिलेली वस्तु तात्काळ देणारी स्वर्गातील एक गाय, सुरभि, सुरधेनु, त्यावरून पुष्कळ दूध देणारी गाय २ (ल) नेहमीं उपयोगी पडणारा धनी, नानाप्रकारचा हिकमती नोकर, अति शय उत्पन्न येणारें शेत, झाड, नानाप्रकारचे विषय ज्यात नमूद केले आहेत असें पुस्तक 'मना राम कल्पतरु कामधेनु' –राम ६०. 'जयातें कामधेनु माये। तयासि अप्राप्त काहीं आहे।' –ज्ञा १ ७९ २ पुष्कळ ठिकाणीं उपयोगी पडणारें वस्त्र, वस्तु पदार्थ ३ सर्वांना उपयोगी पडणारा माणूस ४ (ल) भिक्षा मागण्याची झोळी (क्रि० लाभणें) ०निक–न मनात काहीं इच्छा धरून केलेलें व्रत –वि इष्ट, आवडण्यासारखें (कामधदा) [स] ०पिसा–वि मदनविकारानें व्याप्त झालेला 'तया कामपीसा धरी कठनाळीं।' –दावि २४३ ०प्रकोप–पु कामविकाराचा क्षोभ [स] ०बाज–वि विषयासक्त स्त्रीलपट, बाहेरख्याली, रडीबाज ०भक्ति–स्त्री मनात इच्छा धरून केलेली भक्ति, उपासना, याच्या उलट भावभक्ति [स] ०मगरमिठी–स्त्री मदनरूपी मगरानें घातलेली मिठी, तीव्र सभोगेच्छा ०मरण–न इच्छामरण, वाटेल तेव्हा स्वत ला मृत्यु आणण्याची शक्ति. [स] ०मरणी–वि इच्छामरणी [स] ०रमण–वि स्वेच्छेनें विहार करणारा 'जो सकळ मगळा मगळ पूर्ण। जो का गोकुळीं कामरमग।' –एभा १ २३९ ०रूप–न १ इच्छेप्रमाणें धारण करतां येणारें रूप २ एक देश (आसाममध्यें) –वि १ इच्छेप्रमाणें रूप धारण करणारा २ सुदर, मनोहर, रमणीय, ज्याचें मदनासारखें रूप आहे असा ०रूपि–वि कामरूप (वि) पहा ०शास्त्र–रतिशास्त्र, कोकशास्त्र, स्त्री–पुरुष समोगाची इतिकर्तव्यता ज्यात सागितली आहे तें शास्त्र, शृगारशास्त्र, स्त्रीपुरुषप्रेमविषयक शास्त्र [सं] ०सदन–स्थान–न जननेंद्रिय, योनि, उपस्थ कामांतक–पु मदनाचा नाश करणारा, शकर –मातुर–वि मैथुनेच्छेनें विव्हळ झालेला –ली 'जाणितला तिहीं कामातुर नारी। कृष्णभोगावरि चित्त ज्याचें।' –तुगा १२ 'नव्हेचि तो शुक कामातुरिला।' –अमृत (शुकचरित्र) २५ –मानळ–ळ–पु मदनाचा दाह, कामविकाराचा सताप 'मी कामानळें करून। गेले आइळोन प्राणपती।' [स] –मारी–पु कामातक पहा 'त्या प्रभुयशामि मानी अमृताचें पूर्ण ताट कामारी।' –मो परतु रामायण –मालय–कामसदन पहा

**काम**—न एक प्रकारचें पाणकोंबडीसारखें पाखरू, हें पाण्यात सापडतें व कोंकणात कार्तिकापासून पुढें तळयामध्यें आढळतें

**कामट–टी–ठी**—कांचीट पहा

**कामठा**—पु. (ना) सुताराची सुतारकाम करण्याची शाळा, जागा (काम पहा) [स कर्मस्थान]

**कामणुक**—स्त्री कर्मणूक 'सुनास नाहीं तरि कामणुका।' –सारुह ३ १६ [करमणूक]

**कामण्णा**—पु कामदेवाची मूर्ति, कर्नाटकात मदनाची मूर्ति करून तिची पूजा करण्याची चाल आहे [स काम+अण्णा]

**कामत**—पु सारस्वत ब्राह्मणातील एक उपनाव –न १ (गो) डोंगरी वरकस शेत, जमीन २ घराऊ शेती, खडानें न दिलेली शेती, उपरी कुळानें केलेली शेती, सरकारी कामगारास मिळालेली जमीन [विल्सन–ते कमतमु, स कर्म]

**कामती**—पु (वे) नोकर, शेतावर काम करणारा मजूर [काम]

**कामथ**—न (माण) इमानेंइतबारें केलेल्या चाकरीबद्दल मिळालेली इनाम जमीन (कामत पहा)

**कामदा**—स्त्री एक वृत्त याच्या चरणात दहा अक्षरें असून र, य, ज, ग, हे गण येतात [स]

**कामदानी**—वि कशिदाचें अगरख्याचें कापड

**कामना**—स्त्री इच्छा, कल, वासना, मनोरथ 'पै अवस्था आणि कामना।' –ज्ञा १८ २०२ 'नारदा सागती कामिनी कामना।' –नरहरि दानव्रत १०२ 'जें मागसी पुरवितों तव कामना ही।' –वामनचरित्र ८ [स] ०पूर्ति–स्त्री इच्छेची तृप्ति, समाधान, सतोष

**कामरूण**—कावरूण पहा.

**कामला-ळ**—स्त्री कावीळ रोग, हळद्या रोग 'वचळेली कामलादि दोषीं। दृष्टी न रीगे वर्णविशेषीं।' –ऋ ६७ [स कामला]

**कामलेट**—न ब्लँकट 'चकन्याच्या येमाचीं कामलेट वगैरे वस्त्रे होतात' मराठी तिसरें पुस्तक पृ ११९ आवृ ४

**कामविणें**—क्रि १ कमविणें, उपयोगांत आणणें, कामांत आणणें 'जे सर्व दोषाचा वसौटा। तपचि कामऊनि सुभटा।' –ज्ञा १८ ७५२ 'ते देवोचि तुमधा कामविजे।' –अमृ ९ ३९ २ निर्माण करणें, संपादणें, कुशलतेनें तयार करणें 'पाचही कारणें सहेतुकें। कामवीजती गा अनेकें।' –ज्ञा १८ ४३१ उघाळीं कामविलीं कुसर। हिरवणिया।' –कालिका २७ ३१ [स कृ-कर्म]

**कामळ**—न कांवळ पहा 'घनी धेनु चारितां कामळ हाती काठी।' –अफला ८१

**कामळा-ळी-ळें-ळया**—कांवळा पहा

**कामळीकुज्यांच**—वि (गो) भ्याड, पळपुटा

**कामाऊ-यी-विणें**—कमाऊ पहा

**कामाटी**—१ व्यापार काम, कर्म 'मनें कल्पिली सकळ सृष्टि। मन वृत इंद्रिय कामाटी।' –एभा २२ ४६२ [स कर्म]

**कामाठी**—पु १ तेलंगणातील एक जात व तींतील व्यक्ति २ झाडणें, बैठक घालणें वगैरे घरकामाकरिता ठेविलेला नोकर (कामाठी अगर इतर कोणत्याहि जातीचा), याच्या बायकोस कामाठीण म्हणतात 'शीघ्र आणोनि कामाठ्यासी। गर्ता याजिली कृपासरसी।' –नव १४ १७८ ३ लष्करातील डेरे, राहुटया लावणारे मजूर 'आली सातपुड्याची घडी, तोफगाडी, दारूगोळी घोडीं घाट पुढें माहीं कामाठे खादी पर्वत फौज उभी राही।' –ऐपो ४३४ [स]

**कामाठी**—(ल) खाबाचें उथाळें

**कामाठी**—स्त्री कावीट, कामटी पहा

**कामाठी**—स्त्री (महानुभावी) येरझार, व्यापार, काम 'तय' कार्हीच नाहीं कामाठी। जन्ममरणाची।' –भाए ८३२ [स कृ-कर्म]

**कामानें**—(तजा) नको असणें कामा नये याचा संक्षेप 'पथ्य कामानें, पण रोग बरा व्हावा, असें कसें होईल?' [कामा नये]

**कामार**—पु (गो) घिसाडी, लोहार [वै स कर्मार –ऋवे १० ७२ २ स कर्म-कार]

**कामार फाडूडूंग**—न (गो) एक जातीचा मासा

**कामार खर्ची**—स्त्री (गो) एका जातीचा मासा

**कामावणें**—क्रि १ कमविणें, तयार करणें, घडविणें 'कीं मेरूचा गाभा कामाविला। विश्वकर्मेनी।' –शिशु ४५. २ संस्कार करणें, स्वरूप देणें, आकार देणें 'जेवीं लोह कामाविता जाणा। होय दर्पण सोज्वळ।' –एभा १९ २६१ [स कृ-कर्म]

**कामाक्षी**—स्त्री १ एक फुलझाड, कर्दळीचें झाड २ एक देवी (कांची-कांजीवरम् येथील) [स]

**कामिक**—वि काम्य, इच्छा धरून केलेलें, 'परी न कामिता कामिक। न निफजे जें।' –ज्ञा १८ ९७ [स कम्]

**कामिण-णी**—स्त्री कावीळ 'कुलिक तरळ कामिणी। मुखमा सुठरें माळिणी।' –दा ३ ६ २५ [स कामला]

**कामिणी**—स्त्री (अव) कामिनी, स्त्री 'रश्मिभ्र मोईरे पटका कामिणी।' –दावि ३५० [स कामिनी]

**कामित**—न इच्छित, वांछित 'कामद मेघश्याम पुरवितो कामित निजदासाचें।' –मो सुदामचरित्र ७६ (नवनीत पृ ३७९) [स कम्]

**कामिता**—वि इच्छा करणारा 'नातरि कामितयाचिया इच्छा।' –ज्ञा ४ २१६ [स कम्]

**कामिना-नी-णा-णी**—स्त्री १ प्रियकर स्त्री, सुंदर स्त्री, शृंगारचेष्टा करणारी स्त्री, प्रियतमा 'काय चंचलु मासा। कामिनी कटाक्षु जैसा।' –ज्ञा १४ १७० 'ऐशीं सहस्र ज्या सुंदरा कामिनी। माझी मुखरणी मंदोदरी।' –तुगा ३४६३ 'बघुन कामिणी हुला नगरच्या पडलिल बीमार' –मृ १८ 'गोष्टी माध्वी पैष्टी। तीन मद्य प्रगट जनीं। चौथें मद्य तें कामिनी।' [स] २ सामान्य अर्थानें स्त्री [स कम्]

**कामी**—वि १ विषयासक्त, कामुक 'कामी कोपी लोभी जे संसारात पावती भ्रमते'–मोविराट ४ ६० २ इच्छा करणारा, अभिलाषी 'पतिप्रीति कामी नसे पापकामी। असी ते अहा पावलें शाप का मी।' [स कम्]

**कामी**—वि १ उपयुक्त, उपयोगी पडणारा (माणूस) २ उद्योगी, तत्पर, नेहमीं कामांत असणारा 'कामी निकामी लोका। बरें पाहे।' –दा १२ १ १५ [स कृ-कर्म]

**कामीक**—वि विषयासक्त 'कामीक म्हणे परमप्रीति। वैसे मचकीं वल्लभे।' –मुविराट २३ १३५ [कम्]

**कामीरू-रु**—वि (राजा) उद्योगी (माणूस) [स कृ कर्म]

**कामीट**—स्त्री न कांबीट पहा

**कामीण-न**—स्त्री कावीळ यानें डोळे, अंग, नखें इ० पिवळे होतात [illegible] दिसतात 'कामीण [illegible] ।' –भवि

१३ १०२ 'कामीणीनें पिवळी जाली।' दा-१४ १० २० 'कामीन जयाच्या जाहाली नेत्रासि। दखे तो चद्रासी पीतवर्ण' -तुगा ३११० [स कामला]

**कामुक**—वि १ विषयी, लंपट, कामीक (काव्य) 'नविये आवडीचेनि भरें। कामुक निज वनिता विसरे।' -ज्ञा १ १८७ 'अशा कामुका नागकुमारी।' -रासक्रीडा ६ २ इच्छा करणारा, फलासक्त, लोभी 'आचरे कामुक जैसा। कर्मी भरू होमावा तैसा।' -ज्ञा ३ १६९ (समासात) विद्या कामुक, धनकामुक मोक्षकामुक, पुत्रकामुक [स]

**कामुकी**—स्त्री १ विलासिनी स्त्री २ स्वैरिणी [स]

**कामुनी**—स्त्री ओषधीवनस्पति, हिची फळें लहान मिऱ्या सारखीं, लाल रंगाचीं व आवटगोड असतात

**कामुन-म्हून-हून-ऊन**—(रा व ना) काय म्हणून? का? 'का म्हून सातावत गा!' म्ह० (व) 'कामुन पेरले उव तर ज्याची त्याला गव'

**कामेरपण**—न (कों) शेतकाम [काम]

**कामेरा-री-रें**—स्त्री (गो कु) कामकरी स्त्री, मोल करीण, मजुरीण [कर्मकार]

**कामोखी**—स्त्री लोहाराचा, तांबटाचा चिमटा

**कामोद**—पु (राग) गायनशास्त्रातील एक राग हा रागात षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, तीव्र मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति संपूर्ण-संपूर्ण, वादी पंचम, संवादी ऋषभ, गानसमय रात्रीचा पहिला प्रहर [स]

**काम्य**—वि १ आनंददायक, इष्ट, पसंत पडणारें, सुख दायक २ पुढें कांहीं फायदा होईल किंवा चांगलें होईल अशा इच्छेनें केलेलें काम, इच्छित कर्म करण्यास योग्य 'केलें काम्य कर्म तैसें।' -ज्ञा १८ १०३ ३ हेतु इच्छा, इच्छित वस्तु, गोष्ट 'येणें विधि पुरे वाहता। काम्य होय तुम्हा त्वरिता।' -गुच ३७५८ [स कम्=इच्छा करणें] ०कर्म-न १ फलाशापूर्वक कर्म मनात इच्छा धरून केलेलें कर्म, (याच्या उलट नित्यकर्म, नैमित्तिक कर्म) 'आपण शास्त्रास अनुसरून जें कर्म करतों तें काम्यकर्म होय' -नीर ५५ [स] ०दान-न १ आनंददायक देणगी २ (अनिश्चित) मनातील इच्छा पुरी होण्यासाठीं केलेलें दान, केवळ मनाच्या प्रेरणेनें दिलेली देणगी, (याच्या उलट नित्यदान) [स] ०धर्म-न मनात इच्छा ठेवून केलेला धर्म इष्ट हेतु साधण्या साठीं केलेलें व्रतनियमादि कृत्य ०प्रीति-स्त्री मनातील इच्छा तृप्त होण्याकरिता किंवा मोबदला मिळविण्याकरिता केलेलें प्रेम ०भक्ति-स्त्री फलप्राप्तीच्या इच्छेनें केलेली भक्ति ०मरण-न १ कांहीं इष्ट हेतु सिद्धीस जावा यासाठीं पत्करलेला मृत्यु २ इच्छामरण ०व्रत-न फलप्राप्तीच्या आशेनें केलेलें व्रत

**काम्रा**—न (गो) म्युनिसिपालिटी [पो कामर, इ कॅमेरा]

**काय**—पु देह, शरीर, (विप्र) काया 'तैसें मनें वाचा काय। भजतया दु ख देतु जायें।' -ज्ञा १८ ६५६ 'माय करी बाळाचें नित्य श्रमवूनि काय जेवि हित' -मोउद्योग ६११ [स]

**काय**—सना १ कशाचा? कसला? कोणता? 'आनृण्य न जोडावें तरि आम्ही अर्थ जोडिला काय' -मोभीष्म १२ ६० 'प्रमाद मग काय तो जरि निवारिना लाघवा।' -केका ६६ २ जें, जें काय 'तो काय देईल तें घऊन ये' ३ किती मोठा, केवढा, 'हा काय हो मूर्ख!' 'दु खसमयेंचि सरलें, सुख काय सरों।' -वामन स्फुटश्लोक ६९, (नवनीत पृ १४१) ४ (गो) मुळींच, कांहीं सुद्धा 'पाचा नळांत जेव्हा काय दिसे नाचि भेद लव तीस' -मोवन ४ ७१ 'लोभ केलिया कायही नुरे' -माहरी गंगाधररत्नमाला ३४ (नवनीत पृ ४२०) ५ तुच्छतादर्शक 'हा काय रत्नभोक्ता मालू अनुताप पावुनी हाका।' -मोआदि ३२ १७ 'शिउबा बोले गर्जून मोंगल काय आणिले जिनस।' -विवि ८ ४ ८० ६ एखाद्या समुच्चयातील निरनिराळ्या वस्तु किंवा निरनिराळे प्रकार दाखविणारें सर्वनाम 'सजगुरा काय, जोंधळा काय, गहू काय, जो जिन्नस पाहिजे तो आहे' ७ द्विरुक्ति (काय काय), संख्याविस्तार, भेद याबद्दल आश्चर्य दाखविण्या साठीं, एखाद्या पदार्थाचा विशेषपणा किंवा भिन्नपणा दाखविण्या साठीं 'मी काय काय त्याचे गुण सांगू?' 'त्यानें काय काय तुला सांगितलें किंवा काय काय पदार्थ तुला दिले म्ह० १ (गो) काय दीस सुनेचे काय दीस सायचे=कांहीं दिवस सुनेचे कांहीं सासूचे २ काय करूं कसें करूं=कांहींच न सुचणें ०एक-कांहीं, किती, कोणी, कित्येक 'कायेक उपमता भरती' -तुगा ७२५ ०क-कांहीं एक, कोणतें दिनानाथ द्वारकाधीश साह्य जरी तरी कायक न करी -राला ११ ०गे बाई तरी-क्रिवि (बायकी) एक वाक्प्रचार (आश्चर्यदर्शक) ०की-कोण जाणे, ठाऊक नाहीं अशा अर्थाचें उत्तर 'माझा बैल इकडून गेला काय? उत्तर=काय की' ०जाणे-कोण जाणतो? कोणाला ठाऊक? कोण सांगेल? (अशिष्ट लोकांत हा प्रयोग रूढ आहे)' ०जाळणें (निरुप योगी तुच्छकामाच्या वस्तूस अनुलक्षून एक वाक्प्रचार) काय उपयोग? काय जाळावें (जळे) नेऊनि' -दावि २१० 'जैसें विगत विधवेचें स्वरूप। यौवन काय जाळावें।' 'काय जळलें दिवसभर अभद्र बोलणें?' ०तो-(तिरस्कारदर्शक) क पदार्थ, य कश्चित ०माय-(कु) कांहीं [काय द्वि कांहीं बाही] ०म्हणून-कशाकरिता ०लें-ह्यलें-(ना) कशाला? क्याकरिता?

कां म्हणून? ०शी–सी–सें–कितीशी? कोणती? कशाची? काय होय? कशाचें? कशाला? शुद्धनादर्शक; क.पदार्थे. 'दयानिधि तुम्हां- पुढें जनकथा भना कायशा।' –केका २६. 'इतरांची शक्ति कायशी।' –दावि ४०५. 'ब्रह्मविद्येची गोष्टी। त्यांसी कायशी।' –विपू १.५७. 'तया शाम्भवा कायशी कोप भातो' –राम ६०. 'समर्थांपरीं कायसें उगें' –दावि २१. ०सया–कशाला? कशाचें? 'सांगा कवण तें ब्रह्म। कायसया नाम कर्म।' –ज्ञा ८.२. ०सा–वि. १ (अनिश्चितार्थी) एखादी गोष्ट निश्चित न आठवतां तिची साधारण आठवण असतां योजतात. 'त्यानें कायसा निरोप सांगितला होता पण मी विसरलों.' २ कशासारखा. ३ कशाचा. 'जरी मूर्ख हो बोल कायसा आतां –दावि १७८. ४ कशासाठीं? कशाकरितां? काय कामाचा? काय उपयोग? 'तेथें कायसा या ग्रंथाचा उद्यम।' –विपू ७.१५४. ०साच–वि. कशाचसा; कशासाच; बरोबर वर्णन करतां येत नाहीं असा, अशासारखा; चमत्कारिक; आश्चर्य उत्पन्न करणारा. ०साठीं–(व.) कशासाठीं. ०सें–न. कांहींसें. 'असेंच कायसें तुम्हीं म्हणाला होता खरें!' –भस्तंगा ६६. ०सेसें–क्रिवि. कांहीं तरी एक. 'मुलांसाठीं बाईसाहेबांनीहि कायसेसें केलें आहे.' –योरकि २६. ०सेना–नी–नें–कशानें; कोणत्या कारणानें. 'कायसेनी पाहुणेर क्षीरसागरा।' –ज्ञा १०.११. 'तें तूं म्हणशी कायसेन। ऐक सांगेन उद्धवा।' –एभा २९.८३६. ०होय–काय फर्क आहे? काय उपयोग आहे? 'आंधळ्याला वर्णिल्या काय होय.' –नि ५१०.

काय—क्रिवि. प्रश्नार्थक किंवा आश्चर्य उत्पन्न करणारें अव्यय 'त्वां त्याला मारलेंस काय?' 'आज पाऊस पडेल काय?'

काय—(गो.) पणा (भाववाचक) या अर्थाचा प्रत्यय. 'किरपीन काय=' कृपणपणा.'

कायकोळ—स्त्री. (गो.) कावीळ.

कायकोळ—स्त्री. (गो.) कलिंगडाची वेल.

कायक्लेश—पुअव. शारीरिक दुःखें; अंगमेहनत, श्रम; कष्ट [सं. काय+क्लेश]

कायजा—पु. घोड्याचा लगाम. [अर. कायजाह्]

कायटी—स्त्री. घालमेल –हंको.

कायडो—पु (गो.) कर्तव्यकर्म.

कायणी—स्त्री. (कु.) कहाणी, गोष्ट.

कायणु(नु)वायणु(नु)—काहीं तरी. काणुवाणु पहा.

कायत–थ–पु कायस्थ; एक हिंदु जात. याचा धंदा लेखकाचा–विशेषत. विकीसाठीं काढलेल्या ग्रंथाच्या नकला करण्याचा असे. हे उत्तरहिंदुस्थानचे रहिवासी आहेत. यांना कायस्थ असें जरी म्हणतात तरी दक्षिणेकडील कायस्थ प्रभूंशीं यांचा कांहीं संबंध नाहीं. कायस्थ प्रभु हे क्षत्रिय आहेत. [सं. कायस्थ]

कायती—वि. कायत जातिविषयक (लिहिण्याची एक पद्धत) [कायत]

कायदा—पु. १ नियम; व्यवहार; धर्मशास्त्र; शिरस्ता; वहिवाट; न्यायानें वर्तावें, अन्यायानें वागल्यास अमुक शिक्षा होईल असें सांगणारा तो कायदा. 'समाजनियमनाच्या अनेक साहित्यापैकीं कायदा हें एक साहित्य होय.' –ज्ञाको क १८२ [अर. क़ाइद़ा] कायदे–कौन्सिल–न. कायदा ज्या प्रतिनिधि (लोकनियुक्त, सरकारनियुक्त) मंडळांत मान्य केला जातो तें. हिंदुस्थानांत ज्या प्रांतांत गव्हर्नर असतो त्या प्रांतांत कायदे–कौन्सिल असतें. ०पंडित–वि. कायद्यांत निष्णात. ०बाज–वि. कायद्यांत तरबेज; कायदेपंडित, ०भंग–पु. जुलमी कायदे मोडण्याची क्रिया. ०मंडळ–न. कायदेकौन्सिल. ०शीर–क्रिवि. कायद्याप्रमाणें; नियमाप्रमाणें; नियमांबरहुकूम; कायद्याबरहुकूम; ठरावाप्रमाणें; सशास्त्र; न्याय्य (वागणारा). ०शीर चळवळ–स्त्री. न्याय्य, कायदा न मोडतां प्रजेनें केलेली राजकीय चळवळ (इं.) कॉन्स्टिट्यूशनल ॲजिटेशन. 'हक्क देणारे व घेणारे यांच्या शक्तींत जमीनअस्मानाचें अंतर असलें तरी (प्रजेनें) सामोपचार अर्थात कायदेशीर चळवळ करणें. जरूर आहे.' –टिपु ५६. –द्याची अट–स्त्री. कायद्याचा निर्बंध. –चा बळी–पु. जुलमी कायदे मोडल्यामुळें शिक्षा पावलेला माणूस.

कायदा—पु. लगाम. कायजा पहा.

कायनातें—न. (गो.) आव; मासळी नसलेली कांद्यांची आमटी. आंव पहा.

कायपत्री—स्त्री. एक प्रकारची साल; जायपत्री; मायपत्री; खोटी जायपत्री.

कायपुळी—स्त्री. पाटीवर होणारी काळपुळी. [काया+पुळी]

कायफळ—१ एक लहान झाड; याचें साल व बीं औषधाच्या उपयोगी असतें. हें सुगंधी उटण्यांत वापरतात. २ रानजायफळ. ३ हरदासी कोटींत जायफळ, मायफळ, कायफळ या तिघांचा संबंध आणून जाय फळ=लहान मूल, जुकतेंच जन्मलेलें मूल (जे जावयाचें=मरावयाचें आहे), त्याची माया धरून –मायफळ= कायफळ (=कायलाभ) आहे अशी विनोदी रचना करतात. [सं. कट्फल, प्रा. कप्फल; म. कायफळ]

कायम—वि. सततचें; स्थिर; टिकाऊ. 'मुलुख सरंजामास देऊन केली कायम गलिमाई, मनुष्यमात्रादिकांचें बाहेर होतें पेशवाई' –ऐपो ४२१. [अर. काइम्] ०जुबान–वि. एकवचनी, सत्यवक्ता; शब्दास मागें न घेणारा. 'फरासीस कायम जुबान

व वहादर आहे ' –चिरा २४ ०ठरावाचे–वि ठराविक पद्धतीचें 'सभेचे ठराव कायमठरावाचे झाले आहेत ' –टि १ ५३५ ०दायम–वि निरंतरचें, नेहमींचें, पक्कें, टिकाऊ [अर काइम+दायम्] ०मकाम–पु येक अधिकारी तगीर होऊन त्याचें काम वर दुसरा होणें त्यास कायम मकाम म्हणावें –रा ७ ९२ [अर] ०मुक्काम–वि (व ना) बदली, हंगामी, तात्पुरता 'तुमची नेमणूक कायममुक्काम केली आहे ' [अर कायम+मकाम] ०मिजाज–स–वि निश्चयी, अचचल, दृढचित्त 'साप्रत तिकडे कायममिजाज व मजबुत एक नबाब नजबखान आहेत ' –दिमरा १ ८ 'आसाहेवी कायममिजास जाणोन ' –ख ३५७५ [अर काइम्+मिज़ाज़] ०मिजाजी–स्त्री करारीपणा, निश्चयीपणा 'याचे कायम मिजाजीचा प्रकार म्हणावा तरी मेणाचें नाक याचा मिजाज आहे ' –दिमरा १ २३८

**काय(ई)मी**—स्त्री निश्चिती, स्थैर्य, मजबुती 'कलम्ते वरावें लिहिणें रास्त, दुरुस्त व कायमीचें '–खरे ७ ३५६८ 'तिकडील मात्र कायमी असावी ' –रा ५ १८८ [फा]

**कायर**—वि लाचार, भिन्रा 'ते कायर जाले ' –होकै ३६ [अर काहिर्, स कातर]

**कायरस**—पु अगरस, पाणी न वापरता काढलेला रस [काय+रस]

**कायरस**—पु कोणत्याहि हिरव्या फळाचें पचामृत [ते काय =कच्चें, हिरवें फळ, का काई+म रस]

**कायल**—कादैल पहा ०करणें–(व) फजीत करणें

**कायल**—स्त्री (कु) मोठी काहील, कढई

**कायलाथी**—पु (गो) लोखडी कलथा

**कायली**—स्त्री (गो कु) काहिली, भडका, लाही

**कायलोण**—न (गो) काहील

**कायलोळी**—स्त्री १ (गो कु) आवोळी, घिरडें २ एक प्रकारची पोळी

**कायस्थ**—पु १ एक हिंदूची जात व तींतील व्यक्ति प्रभूच्या दोन (कायस्थ आणि पाताणे) भेदांपैकी एक भेद याचा धदा लेखकाचा जितकी कदर एखाद्या दासावर किंवा कायस्था वर (कारकुनावर) तितकीच कदर आपल्या मानीत नसत –चद्र १०६ २ कास्त –मोल (जाति विवेक पहा) ३ कायत पहा [स]

**कायस्थी**—वि कायस्थासबधी

**काया**—स्त्री देह, शरीर, रूप, आकार, अग 'याति शूद्रवशी होत्या कोमेलिया। त्यांसि कृष्णें काया दिव्य दिली।' –तुगा ५३ (स काय) (वाप्र) ०दाखविणें–दिसणें–पाहणें–(रोगी व वैद्य, पति–पत्नी अथवा पुनर्विवाहास अनुकूल असलेली विधवा याच्यासबधीं प्रयोग करतात) अग उघडें करणें ०झांकणें–उघडी टाकणें–पडणें–या वाक्प्रचारात काया शब्दानें शरीराचा जो भाग सभ्याचारानुसार अवश्य झाकला पाहिजे त्याचा बोध होतो हा शब्दप्रयोग स्त्रियाच्या बोलण्यात येतो अग, भाग (देह–शरीर, तनु नव्हे) या शब्दानेंहि वरील वाक्प्रचारात तोच अर्थ निघतो ०पडणें–मरणें ०पालटणें–फिरणें–बदलणें–आजारानतर शरीर सतेज होणें ०वाचा मनेंकरून–शारीरिक, शाब्दिक, मानसिक यानीं युक्त, शरीराच्या सर्व अवयवानीं, इंद्रियानीं व मनाच्या कल्पनानीं युक्त, सामान्यत सर्व प्रकारानीं मन पूर्वक (एखादें कृत्य करणें) सामाशब्द– ०पूर–पु देह, शरीर ०कष्ट–पु अगमेहनत 'माझें हें धन कायाकष्टाचें आहे ' ०वाचामानस–न शरीर, वाणी व मन, देह, वाचा आणि आत्मा 'हा अवतरला शेषशाई। जाण क्षीराब्धीचा जावई। दृढ लागे पायीं। कायावाचामानसें।'

**कायि–यी**—न हिरवें फळ [का]

**कायिक**—वि शारीरिक, देहाविषयींचें [स] ०वाचिक–मानसिक–वि शारीरिक, शाब्दिक व अत करणविषयक (पाद सेवन पूजा, भक्ति, शुश्रुषा, सेवा इ०) ०वृद्धि–व्याज–स्त्री (शारीरिक श्रमाच्या प्राप्तीला अनुसरून) दररोज अगर मासिक यावयाचें व्याज, कायिक व्याज, याऐवजीं कालिक व्याज–वृद्धि असेंहि म्हणतात

**कायिसा**—अ कशाकरिता –शर

**कायी**—अ (काव्य) काय ? कोणतें ? 'सागाजी मुनिराया। कारण कायी। सतचरित्रें तिही ठायीं। वरणावया कारण कायी।' –वया १ २ ३० [काय]

**कायें**—अ १ काय ? 'मना सांगपा रावणा कायें जाले।' –राम १३ २ काहीं 'भाग्य पुरुष कायें येक। सेवीत नाहीं।' –दा १ ६ ११

**कायेसी**—वि कसली ? कसची ? किंतीशी ? 'पाहता देवाचे रूपेसी। मावेची कृपा कायेसी ' –दा ४ ८ २४

**कार**—पु जोंधळ्याची एक जात

**कार**—पुस्त्री एकप्रकारचा काळा व ठणक दगड [का कार=काळा]

**कार**—पु करार ठराव, वचन (क्रि० करणें, ठरविणें) 'आम्हीं त्याचा मोडूनि कार।' –अफला २० [अर करार]

**कार**—पु (राजा कु) खत, राब

**कार**—पु अक्षराच्या पुढें त्याचा निर्देश करण्यासाठीं लावला जाणारा एक प्रत्यय जसें–अकार, ककार, पकार इ० [स कृ]

**कार**—पु कर्ता, करणारा या अर्थी सस्कृत शब्दापुढें लावण्यांत येणारा एक प्रत्यय जसें –ग्रथकार, शास्त्रकार [स कृ, का कारी]

का म्हणून? ०शी-सी-से-कितीशी? कोणती? कशाची? काय होय? कशाचें? कशाला? क्षुद्रतादर्शक, क पदार्थ 'दयानिधि तुम्हां पुढें जनकथा असा कायशा।'—केका २६ 'इतरांची शक्ति कायसी। —दावि ४०५ 'ब्रह्मविद्येची गोष्टी। त्यांसी कायसी।'—विपू १ ५७ 'तया साम्यता कायसी कोण आतो'—राम ६० 'समर्था घरीं कायसें उणें'—दावि २१. ०सया-कशाला? कशाचें? 'साग फवण तें प्रश्न। कायसया नाम कर्म।'—ज्ञा ८ २ ०सा-वि १ (अनिश्चितार्थी) एखादी गोष्ट निश्चित न आठवतां तिची साधारण आठवण असतो योजतात 'त्यानें कायसा निरोप सांगितला होता पण मी विसरलों' २ कशासारखा ३ कशाचा 'जरी मूर्ख हो बोल कायसा आतां—दावि १७८ ४ कशासाठीं? कशाकरितां? काय फायद्याचा? काय उपयोग? 'तेथें कायसा या प्रयाचा उद्यम।'—विपू ७ १५४ ०साच-वि. कसाचसा, कसासाच, बरोबर वर्णन करतां येत नाहीं असा, असासारखा, चमत्कारिक आश्चर्य उत्पन्न करणारा ०साठीं-(व) कशा साठीं ०सें-न काहींसें 'असेंच कायसें तुम्हीं म्हणाला होता ना?'—अस्तमा ६६ ०सेसें-क्रिवि कांहीं तरी एक मुलासाठीं बाईसाहबांनीहि कायसेसें केलें आहे'—कोरकि २६ ०सेना-नी-नें-कशानें, कोणत्या कारणानें 'कायसेनी पाहुणेर क्षीर सागरा।'—ज्ञा १० ११ 'तें तू म्हणसी कायसेन। ऐक सांगेन उद्धवा।'—एभा २९ ८३६ ०होय-काय पर्वा आहे? काय उपयोग आहे? 'आवळयाला सर्वीच्या काय होय'—नि ५१०

काय—क्रिवि प्रश्नार्थक किंवा आश्चर्य उत्पन्न करणारें अव्यय 'त्वा त्याला मारलेस काय?' 'आज पाऊस पडेल काय?'

काय—(गो) पणा (भाववाचक) या अर्थाचा प्रत्यय 'किरपीन काय=' कृपणपणा'

कायकोळ—स्त्री (गो) कावीळ

कायकोळ—स्त्री (गो) कलिंगडाची वेल

कायक्लेश—पुअव शारीरिक दुःखें, अंगमेहनत, श्रम, कष्ट [स काय+क्लेश]

कायजा—पु घोड्याचा लगाम [अर कायजाह्]

कायटी—स्त्री घाल्मेल—दको

कायडो—पु (गो) कर्तव्यकर्म

कायणी—स्त्री (कु) कहाणी, गोष्ट

कायणु(णु)वायणु(णु)—काहीं तरी काणुवाणु पहा

कायस्त-थ—पु कायस्थ, एक हिंदु जात याचा धंदा लेखकाचा—विशेषत विक्रीसाठीं काढलेल्या ग्रंथाच्या नकला करण्याचा असे हे उत्तरहिंदुस्थानचे रहिवासी आहेत याना कायस्थ असें जरी म्हणतात तरी दक्षिणेकडील कायस्थ प्रभूशीं याचा कांहीं संबंध नाहीं कायस्थ प्रभु हे क्षत्रिय आहेत [स कायस्थ]

कायती—वि कायत जातिविषयक (लिहिण्याची एक पद्धत) [कायत]

कायदा—पु १ नियम, व्यवहार, धर्मशास्त्र, शिरस्ता, वहिवाट, न्यायानें वर्तावें, अन्यायानें वागल्यास अमुक शिक्षा होईल असें सांगणारा तो कायदा 'समाजनियमनाच्या अनेक साहित्यापैकीं कायदा हें एक साहित्य होय'—ज्ञाको क ३८२ [अर काइदा] कायदे-कौन्सिल-न कायदा ज्या प्रतिनिधि (लोकनियुक्त, सरकारनियुक्त) मंडळांत मान्य केला जातो तें हिंदुस्थानांत ज्या प्रांतांत गव्हर्नर असतो त्या प्रांतात कायदे-कौन्सिल असतें ०पंडित-वि कायद्यांत निष्णात ०बाज-वि कायद्यांत तरबेज, कायदपंडित, ०भंग-पु जुलमी कायदे मोडण्याची क्रिया ०मंडळ-न कायदेकौन्सिल ०शीर-क्रिवि कायद्याप्रमाणें, नियमाप्रमाणें, नियमांबरहुकूम, कायद्याबरहुकूम, ठरावाप्रमाणें, सशास्त्र, न्याय्य (वागणारा) ०शीर चळवळ-स्त्री न्याय्य, कायदा न मोडतां प्रजेनें केलेली राजकीय चळवळ (इ) कॉन्स्टिट्यूशनल ॲजिटेशन 'हक्क देणारे व घेणारे यांच्या शक्तींत जमीनअस्मानाचें अंतर असलें तरी (प्रजेनें) सामोपचार अर्थांत कायदेशीर चळवळ करणें जरूर आहे'—टिसू ५६ —याची अट-स्त्री कायद्याचा निर्बंध —चा बळी-पु जुलमी कायदे मोडल्यामुळें शिक्षा पावलेला माणूस

कायदा—पु लगाम कायजा पहा

कायनातें—न (गो) आंब, मासळी नसलेली कायाची आमटी आंब पहा

कायपत्री—स्त्री एक प्रकारची साल, आयपत्री, मायपत्री, खोटी जायपत्री

कायपुळी—स्त्री पाठीवर होणारी काळपुळी [काया+पुळी]

कायफळ—१ एक लहान झाड, याचें साल व बीं औषधाच्या उपयोगी असतें हें सुगंधी उटण्यात वापरतात २ रानजायफळ ३ हरदासी कोटींत जायफळ, मारफळ, कायफळ या तिघाचा संबंध आणून जाय फळ=ल्हान मूल, तुकतेंच जन्मलेलें मूल (जें जावयाचें=मरावयाचें आहे) त्याची माया धरून—मायफळ= कायफळ (=कायलाभ) आहे अशी विनोदी रचना करतात [स कटफल, प्रा कप्फल, म कायफळ]

कायम—वि सततचें स्थिर, टिकाऊ 'मुलूख सरंजामास देऊन केली कायम गलिमाई, मनुष्यमात्रादिकांचें माहेर होति पेशवाई'—ऐपो ४२१ [अर काइम्] ०जुबान-वि एकवचनी, सत्यवक्ता, शब्दास मागें न घेणारा 'फरासीस कायम जुबान

व वहादर आहे.' –चिरा २४. ०ठशाचें–वि. ठराविक पद्धतीचें. 'सभेचे ठराव कायमठशाचे झाले आहेत.' –टि १.५३५. ०दायम–वि. निरंतरचें; नेहमींचें; पक्कें; टिकाऊ. [अर. काईम्+दायम्] ०मकाम–पु. येक अधिकारी तगीर होऊन त्याचे कामावर दुसरा होणें त्यास कायम मकाम म्हणावें. –रा ७.९२ [अर.] ०मुक्काम–वि. (व. ना.) बदली; हंगामी; तात्पुरता. 'तुमची नेमणूक कायममुक्काम केली आहे.' [अर. कायम+मकाम] ०मिजाज–स–वि. निश्चयी; अचंचल; दृढचित्त. 'सांप्रत तिकडे कायममिजाज व मजबूत एक नबाब नजबखान आहेत.' –दिमरा १.८. 'आसाहेवी कायममिजास जाणोन...' –ख ३५७५. [अर. काइम+मिझाझ्] ०मिजाजी–स्त्री. करारीपणा; निश्चयीपणा. 'यांचे कायम मिजाजीचा प्रकार म्हणावा तरी मेणाचें नाक यांचा मिजाज आहे.' –दिमरा १.२२८.

काय(ई)मी—स्त्री. निश्चिती; स्थैर्य; मजबुती. 'कलकत्ते-करांचें लिहिणें रास्त, दुरस्त व कायमीचें.' –खरे ७.३५६८. 'तिकडील मात्र कायमी असावी' –रा ५.१८८. [फा.]

कायर—वि. लाचार; भित्रा. 'ते कायर जाले.' –होकै ३६. [अर. काहिर्; सं. कातर]

कायरस—पु. अंगरस; पाणी न वापरतां काढलेला रस. [काय+रस]

कायरस—पु. कोणत्यादि हिरव्या फळाचें पंचामृत. [वे. काय =कच्चें, हिरवें फळ; का. काई+सं. रस]

कायल—काईल पहा. ०करणें–(व.) फजीत करणें.

कायल—स्त्री. (कु.) मोठी काहील; कढई.

कायलायो—पु. (गो.) लोखंडी कलथा.

कायली—स्त्री. (गो. कु.) काहिली; भडका; लाही.

कायलोण—न. (गो.) काहील.

कायलोळी—स्त्री. १ (गो. कु.) आंबोळी; घिरडें. २ एक प्रकारची पोळी.

कायस्थ—पु १ एक हिंदूंची जात व तींतील व्यक्ति प्रभूंच्या दोन (कायस्थ आणि पाताणे) भेदांपैकीं एक भेद. यांचा धंदा लेखकाचा. 'जितकी कदर एखाद्या दासावर किंवा कायस्थावर (कारकुनावर) तितकीच कदर आपल्या ... मानीत नसत.' –चंद्र १०६. २ कास्त. –मोल. (जाति विवेक पहा). ३ कादन पहा. [सं.]

कायस्थी—वि. कायस्थासंबंधीं.

काया—स्त्री. देह; शरीर; रूप; आकार; अंग. 'याति शूद्रांची होत्या कोमेलिया। त्यांसि कृष्णें काया दिव्य दिली।' –तुगा ५३. [सं. काय] (वाप्र.) ०दाखविणें-दिसणें-पाहणें–(रोगी व वैद्य, पति-पत्नी अथवा पुनर्विवाहास अनुकूल असलेली विधवा यांच्यासंबंधीं प्रयोग करतात) अंग उघडें करणें. ०झांकणें–उघडी टाकणें–पडणें–या वाक्प्रचारांत काया शब्दानें शरीराचा जो भाग सभ्याचारानुसार अवश्य झांकला पाहिजे त्याचा बोध होतो. हा शब्दप्रयोग स्त्रियांच्या बोलण्यांत येतो. अंग, आंग (देह–शरीर, तनु नव्हे) या शब्दानेंहि वरील वाक्प्रचारांत तोच अर्थ निघतो. ०पडणें–मरणें. ०पालटणें–फिरणें–बदलणें–आजारानंतर शरीर सतेज होणें. ०वाचा-मनेंकरून–शारीरिक, शाब्दिक, मानसिक यांनीं युक्त; शरीराच्या सर्व अवयवांनीं, इंद्रियांनीं व मनाच्या कल्पनांनीं युक्त; सामान्यतः सर्व प्रकारांनीं मनःपूर्वक (एखादें कृत्य करणें). सामाशब्द–०पूर–पु. देह; शरीर. ०कष्ट–पु. अंगमेहनत. 'माझें हें धन कायाकष्टाचें आहे.' ०वाचामानस–न. शरीर, वाणी व मन; देह, वाचा आणि आत्मा. 'हा अवतरला शेषशाई। जाण क्षीराब्धीचा जावई। दृढ लागे पायीं। कायावाचामानसें।'

कायि–यी—न. हिरवें फळ. [का.]

कायिक—वि. शारीरिक; देहाविषयींचें. [सं.] ०वाचिक-मानसिक–वि. शारीरिक, शाब्दिक व अंतःकरणविषयक (पादसेवन, पूजा, भक्ति, शुश्रुषा, सेवा इ०). ०वृद्धि–व्याज–स्त्री. (शारीरिक श्रमाच्या प्राप्तीला अनुसरून) दररोज अगर मासिक यावयाचें व्याज; कायिक व्याज, याऐवजीं कालिक व्याज–वृद्धि असेंहि म्हणतात.

कायिसा—अ. कशाकरितां –शर.

कायी—अ. (काव्य) काय? कोणतें? 'सांगाजी मुनिराया। कारण कायी। संतचरित्रें तिही ठायीं। वरणावया कारण कायी।' –कथा १.२.३०. [काय]

काये—अ. १ काय? 'मना सांगपा रावणा काये जाले।' –राम १३. २ कांहीं 'भाग्य पुरुष काये येक। सेवीत नाहीं।' –दा १.६ ११.

कायेसी—वि. कसली? कसची? कितीशी? 'पाहतां देवाचे कृपेसी। मातेची कृपा कायेसी' –दा ४.८.२४.

कार—पु. जोंधळ्याची एक जात.

कार—पुस्त्री. एक प्रकारचा काळा व टणक दगड. [का. कार=काळा]

कार—पु. करार; ठराव; वचन. (क्रि० करणें; ठरविणें.) 'आम्हीं त्याचा मोडूनि कार।' –अफला २०. [अर. करार]

कार—पु. (राजा. कु.) खत; राब.

कार—पु. अक्षराच्या पुढें त्याचा निर्देश करण्यासाठीं लावला जाणारा एक प्रत्यय. जसें–अकार, ककार, पकार इ० [सं. कृ]

कार—पु कर्ता, करणारा या अर्थी संस्कृत शब्दापुढें लावण्यांत येणारा एक प्रत्यय. जसें:–ग्रंथकार; शास्त्रकार. [सं. कृ; का. कारी]

**कार**—पु कहार, पालखी वाहणारा भोई [ कहार ]

**कार**—पु ( वे ) कहर [ कहर ]

**कार**—पु ( गो ) माळयानें आगराच्या-बागेच्या-माळ कास यावयाचा आड उत्पनाबद्दल खंड [ स कर ]

**कार**—स्त्री ( चंद्रपुरी ) मुलगी, लेक

**कार**—पु, ( कों ) एक मासा

**कार**—न ( क ) मुळलेलें नख, कॉर [ कोर ]

**कार**—न काम 'त्या मवाफीक कार सुरत-पिजीर होऊन . '—पया ३८४ [ फा कार् ]

**कार**—पु, ( व ) शेवट, अखेर, परिणाम 'हें मरम जख मेचा कार करील' ०करणें-परिणामकारक होणें [ कहर ]

**कार**—स्त्री ( व कारपड ) कोरफड, कुमारी [ स कुमारी-कुमारी-कार ]

**कार**—पु ( हेट ) कार व पाजरी हे जहाजावर पूर्वी दोन अधिकारी असत याना आकाशात वर दूरवर फिरणाऱ्या टरा विक जातींच्या पक्ष्यांची माहिती असे होकायत्राची युक्ति निघण्या पूर्वी असे दोन अधिकारी प्रत्येक जहाजावर असत

**कारक**—वि करणारा, घडवून आणणारा, प्ररणा देणारा, उत्पन्न करणारा, सामाशब्द-शातिकारक, बुद्धिकारक ( असे सामासिक शब्द हजारों आहेत व आणखी हजारों करता येतील )

**कारक**—न ( व्या ) क्रियेच्या अन्वयानें जो विभक्तीचा अर्थ होतो तो, नामाचा क्रियापदाशीं असलेला संबध, हीं कारकें सहा आहेत-कर्ता, कर्म, करण, सप्रदान, अपादान व अधिकरण, [ स ] **कारकनिमित्त**-न (तर्कशास्त्र) कारण, साधन, क्रियेची निमित्तभूत वस्तु याच्या उलट ज्ञापक निमित्त [ स कृ ]

**कारक**—वि (राजा ) खतविलेली जमीन

**कारक**—पु व्यापाऱ्यांनीं यावयाचा कर —विल्सन २

**कारका**—स्त्री गारा, मेघातून पडणारे बर्फाचे तुकडे करक पहा [ स कॄ=विखिरणें, करक=गार ]

**कारकीर्द**—स्त्री अमलाची मुदत, काळ, ( राजाचा वगैरे राज्य करण्याचा काळ ) राजवटी, सत्तेचा काल, अधिकाराचा, व्यवहाराचा काल [ फा कार्+कर्द ]

**कारकुनी**—स्त्री १ कारकुनाची जागा, काम २ केलेल्या कामगिरीबद्दल कारकुनाला दिलेला पैसा, वेतन ( जो आपला कारकून नव्हे त्यास ) ३ चाकरीबद्दल किंवा विक्रीच्या मिनसावर मिळणारी कारकुनाची किफायत, नफा ४ कारकुनाच्या काम गिरीबद्दल त्यास द्यावयाच्या रकमेसाठीं बसविलेली पट्टी, कर ५ ( ल ) काटकसर, बारकाई, काटेकोर व चोख व्यवस्था ६ एक झुडूप —वि कारकुनासबधीं [ कारकून ] ०कावा-मत-पुन कारकून लोकांचा धूर्तपणा, लबाडी, डावपेंच, यावरून सामान्यत कपट, लुच्चेगिरी ०घट्टा-चिन्ह-पुन कारकुनाचा घट्टा, चिन्ह, खूण, निशाणी (मांडी मोडून सतत बसल्यामुळें डाव्या पायाच्या घोट्याला घट्टा पडतो यावरून ) ०पेशा, कारकूनकी-पुस्त्री कारकुनाचें काम, धदा, नोकरी.

**कारकून**—पु १ कामाचा माणूस लेखक, लिहिण्याचें काम करणारा, महालीचे कारकुनांनी इस्कील करून दुम्बाला करीत नाहींत –रा २० १५२ २ ( गो ) ( ल ) धूर्त मनुष्य, हिशेबी व हुषार माणूस ( तिरस्कार दर्शविताना कारकुडा म्हणतात ) ( वाप्र ) सवा हात लेखणीचा कारकून (=शिफारस करताना व्यानोचीतें म्हणतात) – नाची मेहुणी–स्त्री ( ल )कातरावयाची कातर ( विनोदानें कातरी इकडे तिकडे पडते व लवकर सापडत नाहीं म्हणून म्हणतात ) [ फा कारकुन् =करणारा ]

**कारकोळी-ळया**—वि कारकोळ देशासबधीं ( ब्राह्मण वगैरे )

**कारखानदार**—वि कारखान्यावरील अधिकारी, कारखान्यातील कोणीहि माणूस, कारखान्याचा मालक [ फा ]

**कारखाननीस**—पु कारखान्यावरील मनुष्य कारखान्याचा हिशेब ठेवणारा अमलदार, सरकारी धान्याच्या कोठारावरील अधिकारी, आठ दरकदारांपैकीं एक [ फा कार्खान+नवीस ]

**कारखाना**—पु १ जेथें एखाद्याचा व्यवहार चालतो अशी मोठी इमारत जसें-गलबतें बांधण्याची गोदी, दारुगोळ्याचा कारखाना, यंत्रशाळा वगैरे कोणतेंहि प्रचड काम, धदा वगैरे व तो चालविण्याकरिता ठेवलेला परिवार खातें 'तमाम कार्सानें जात चराईस जाण्याचा हुकुम जाला '–रा ७ १६६ 'खंडराव महाराजाच्या कारकीर्दीत त्यास ( कलावत खातें ) कारखान्याचें स्वरूप नव्हतें ' –कलावत खातें १ ( बडोदें ) 'कारखाने ज्याचे त्याला '–ऐपो २३१ २ कोणतीहि धंद्याची जागा ४ सामार गृह-राज्यको ७ १० [ फा कार्+खाना=कामाची जागा ]

**कारगत**—स्त्री ( चिट ) कारकीर्द –मसाप २ ४ १०८

**कारगुजरी**—स्त्री ( हिं ) बाजारपेठ

**कारगुजार**—वि ( हिं ) कामकाजात हुषार, अनुभविक

**कारचक्र-रंचकर-रजकर-रंजकर-रजगार**—पु बंदुकी, पिस्तुलें, तलवारी, खंजीर, चाकू, सुऱ्या वस्तरे वगैरे शस्त्रें करणारा, शस्त्रकार, मांडीं करणारा कासार, चिलखत करणारा [ स कंकचकार ]

**कारज**—न ( चद्रपुरी ) काळीज, हृदय

**कारंजें**—न शोभेसाठीं पाण्याचा फवारा उंच उडविण्याचें एक साधन 'न रजे कारजें निम्नुनि फांसी तें पत्रफाशी '–र ३२.

**कारट**—न १ ( कों ) और्ध्वदेहिक कर्मास कुत्सितार्थी म्हणतात २ ती क्रिया करणाऱ्या ब्राह्मणास दिलेली दक्षिणा

०खाऊ-वि ओर्ध्वदेहिक क्रिया करणाऱ्या ब्राह्मणास उपहासानें म्हणतात [स करट]

**कारटा-ट्या**—पु कारटखाऊ पहा 'कीं प्राणी पावल्या मृत्युसदन। सतोषनी कारटे ब्राह्मण।' –भक ४९९ 'नदीवर क्रिया चालवणारे कारटे याच्या पदरीं पडणारा प्रतिग्रह पाहून विल्सन साहेब अशा सारख्याचा आत्मा का वरें तळमळू नये' –नि १०५८

**कारटा-पोरटा**—पु खोडकर, मात्य, द्वाड मूल [स कुमार–कुमार+टा]

**कारंडव**—पु बदकांच्या जातीचा एक पक्षी, करडवा, करढोंक याच्या मादीस कारडवी म्हणतात [स]

**कारंडा**—पु ओंडा, ठोकळा करडा पहा

**कारडोल**—न काजूच्या बियाचें तेल

**कारण**—न १ कार्याचे अधिकरणीं नियमेंकरून विद्यमान असून जें कार्योत्पादक तें, निमित्त, कार्यप्रवर्तक, प्रमाण, आधार, ज्यामुळें एखादी गोष्ट घडते तें, हीं तीन आहेत–समवायी, असमवायी व निमित्त (अतस्थ किंवा अविभाज्य, दूरस्थ किंवा अप्रत्यक्ष, साधनभूत किंवा आकस्मिक, कारण याचा प्रयमार्थी कर्तृत्व, हेतु, अपेक्षा, प्रेरणा, उद्देश, आधार इतरत्या अर्थी प्रयोग होतो) 'तयाही बोधा कारण। जाणता मीचि।' –ज्ञा १५ ४३८ 'ऐसा आहे समाचार। कारण पाहिजे विचार।' –दा १२ ६ २९ २ प्रयोजन, हेतु ३ गरज, काम, प्रसग 'आज पाऊस पडला नाहीं म्हणून छत्रीचें कारण लागलें नाहीं' ४ मुज किंवा लग्नासारखा कोणताहि समारभ ५ साधन उपकरण, घटक मूलतत्त्व, आद्यद्रव्य ६ (न्याय) नियतपूर्व, दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीवर अवलबून नसणारें –न्याप ३४ ७ मसलत 'हाता चढे धन। ऐसें रचिलें कारण।' –तुगा १८४० ८ कार्य 'जाऊं दे सावित्री, मज करू दे कारण।' –वसा ६७ 'करूनी कारण स्वामी यश घ्यावें। पाईका त्या नावें खरेपण' –तुगा ३७९ ९ इच्छित वस्तु, सृष्टीचें आद्य तत्व तेथ इच्छा आणि बुद्धी घडवी अहकारेंसीं आधीं। मग तिया लाविता वेधीं। कारणाच्या।' –ज्ञा १३ ९६८ १० साध्य 'तें परब्रह्म निर्वाण। जें आत्मविदाचें कारण।' –ज्ञा ५ १४९ ११ (वेदात) महत्तत्त्व, अहकार व सूक्ष्म पचभूतें (आनदगिरीचें मत) पच ज्ञानेंद्रियें, त्याचें पाच विषय मन बुद्धि व अहकार (शांकरमत भगवद्गीता १३ २०) [स कृ–करणें] **कारणीं लावणें**–कामाला, उपयोगाला लावणें (देह द्रव्य सामर्थ्य आयुष्य जन्म इ०) 'कारणीं लावानि करील सार्थक।' –दावि ३९१ ०त्व–न कारण असणें, कारणरूप असणें [स] ०देह–शरीर–पुन देहचतुष्टयापैकीं तिसरा देह याला अविद्येचें किंवा अज्ञानाचें अधिष्ठान आहे 'स्थूल सूक्ष्म देहद्वयातें। आणि विपरीत ज्ञानातें। अज्ञानचि प्रसवलें म्हणोनि त्यातें। कारण देह म्हणिजे पैं।' [स] ०परत्वें–कारण पडल्यास, जरूर लागल्यास 'कोंडो भटाबरोबर मात्र ती कारणपरत्वें बोलत होती' –स्वप २१४. ०वादी–पु (कायदा) वादी, फिर्यादी [स]

**कारणा**—स्त्री १ (अशिष्ट) करुणा, दया, कृपा २ गयावया, काकळूत, विनवणी (क्रि० भाकणें)

**कारणात्**—क्रिवि कारणासाठीं–मुळें–स्तव, [स कारण याची पचमी]

**कारणि(णी)क**—वि १ उपयुक्त, जरूर, समुचित, जरूरीपुरतें 'कारणिक एखाद लोक मात्र किळयात ठेविले' –भाव ३६ २ घडवून आणणारा व्यवस्था ठेवणारा ३ कारणपरत्वें घडलेला, निमित्तपूर्वक बनलेला 'गौळीयाचे घरीं देखा। कृष्ण उपजला कारणिका।' –मुच ८ ५४ –पु राज्याचा मुख्य मत्री किंवा सावकारी जहाजावरील मुख्य गुमास्ता, कारभारी, व्यवस्थापक, 'इतर कारणी भले लोळविले।' –ऐपो २०९ [स]

**कारणीं-ण**—शअ १ चतुर्थी विभक्तीचें लक्षण, स्तव, साठीं, करिता, मुळें 'ब्राह्मणाकारणें गाय दे' २ ठिकाणीं, 'देवकारणीं लावावू' –दा २ ५ ३० ३ कडे 'तेव्हा त्या तेल्णिीनें। पाहिलें विक्रमाकारणें।' –शनि २८७ [कारण]

**कारणोत्तर**—न (कायदा) विशिष्ट मुद्दा कबूल न करितां वादीचें म्हणणें कबूल करणें, विशेष हरकत घेणें [स]

**कारतुस, काडतुस**—न बदुकींतून उडवावयाचें दारू व शिशाची गोळी असलेलें खवच [इ कार्टरिज]

**कारंदा**—पु १ (व) कारभारी, कारवाई करणारा मनुष्य, कर्ता, कारस्थानी [फा कारदाज, स कर्ता]

**कार(रिं)दा**—पु एक वेल, त्याचें फळ व कद करादा, करिंदा पहा

**कारदाज**—वि कावील, कारस्थानी [फा कारदाज]

**कारदाजी**—स्त्री कारस्थानीपणा, शहाणपणा, मुत्सद्दीगिरी कारदाजीची मसलत सागितली ते न ऐकिली जे' –जोरा ३९ [फा]

**कारनीस**—न गलथा, कगोरा, कगणी 'भिंतीच्या माथ्यासभोंवतीं लाकडी कारनीस बसवावें' –मॅरट ७७ [इ कॉर्निस]

**कारबेल**—पु (इ) एखादा लाकडी सर वगैरे ठेवण्याकरिता भिंतींतून पुढें काढलेले दगडी किंवा लाकडी ठोकळे 'दगडाच्या ठोकळ्याऐवजीं कारबेल्स भिंतींत घालावे' –मॅरट ६० [इ कॉर्बेल]

**कारभाऊ नारभाऊ**—पुअव कारु नारु हे एकेमेकाना सबोधिताना म्हणतात –गागा १३

**कारभार**—पु राज्य, सावकारी किंवा एखादा धंदा अंगावर घेऊन त्यासाठीं करावयाची सर्व तऱ्हेची खटपट, व्यवस्था, उद्योगधंदा, काम (क्रि० हाकणें, टाकणें) [स कार्यभार तुल फा. कार-ओ-बार] म्ह० करील त्याचा कारभार मारील त्याची तरवार, राखील त्याचें घर व खपेल त्याचें शेत

**कारभारी**—पु १ व्यवस्थापक, कारभार करणारा, मोठा धंदा चालविणारा, राजाचा मुख्य मंत्री किंवा दिवाण २ (सामा) व्यवस्था पाहणारा कोणीहि प्रतिष्ठित गृहस्थ (मग तो स्वत ज्या घराची किंवा मालकाच्या घराची किंवा धंद्याची व्यवस्था पहात असो) ३ (कों कु खा कुण) बायकोनें नवऱ्याचा उल्लेख करताना योजावयाचा शब्द ४ (ल) उठाठेवी करणारा माणूस ०मंडळ—न सरकारी किंवा एखाद्या संस्थेच्या अधिकाऱ्यांची मंडळी व्यवस्थापक मंडळी, राजाचें मंत्रिमंडळ ०मुखत्यार—पु १ राज्याचा मुख्य प्रधान २ मुख्य व्यवस्थापक किंवा मुख्य चालक

**कारभारीण**—स्त्री १ कारभाऱ्याची बायको किंवा एखाद्या कामाची स्वत व्यवस्था पाहणारी स्त्री २ (कों खा कुण) नवऱ्यानें बायकोचा उल्लेख करताना म्हणावयाचा शब्द

**कारभान्य**—न १ पीडा देणारें जादूचें कृत्य, जारणमारण, चेटूक २ खोटा व्यवहार, कचाट, खटलें कवटाळ (क्रि० करणें, रचणें, योजणें, मांडणें)

**कारमोरी**—वि (कुनरी) वैशाख महिन्याच्या विणींत जन्मलेलें कोंकरूं (मढी वैशाख किंवा कार्तिक महिन्यात विते)

**कारला**—पु स्त्रियांच्या हातातील कारल्यासारख्या बांगड्याचा एक प्रकार

**कारली-लें**—स्त्रीन १ एक भाजी व तिचा वेल, कारेली, याचें फळ कडू व सुमारें वीतभर लांब असून, अग्निदीपक, अत्युत्तम कफनाशक आहे याच्या पांढरें व हिरवें अशा दोन जाती आहेत —योर १ ४२ २ काहीं लोक करडीच्या झाडासहि म्हणतात [स कारवेल्ल]

**कारलें**—न १ कारली वेलीचें फळ २ कारल्याच्या आकाराचा सोन्याचा दागिना (स्त्रियांच्या गळयातील सुगं किंवा एखाद्या माळेच्या मधोमध असलेला) 'भोंवऱ्या कारलें भांगार' —वेसीस्व ११ ५ ३ अणकुचीदार खिळे मारलेलें लांकडी किंवा लोखंडी मुद्गर, हें पूर्वी प्रत्येक किल्ल्यांतील बुरुजावर ठेवीत व शत्रु बुरुज किंवा तट चढून येऊ लागला तर त्याच्यावर फेंकीत 'तेथ षोडश महावाक्येंसी कारलीं। समविषमत्वें प्रति बुरुजीं ठेविलीं।' —स्वानु १० २ ९ ४ (मल्लविद्या) करेला मुद्गर हा निमुळता, लांब, कमरेपर्यंत उंचीचा व पाच शेरापासून दीड मणापर्यंत वजनाचा असतो ५ मोहरमच्या सणात कारल्याच्या फळाच्या आकाराची एक काठी करून तिला कागद वगैरे चिकटवून ६ एके तिकडे नाचवितात ती ६ घावकाच्या दाढीच्या व वाटीच्या मधील कारल्याच्या आकाराचें सुतळीचें किंवा चामड्याचें विणकाम ७ (मावळी) दोन-तीन पायल्या भात मावणारें वणुलें

**कारल्या**—वि कारल्याच्या आकाराचा एका जातीचा आंबा

**कारव**—स्त्री एक झाड व त्याचें काडें किंवा फोक हें झाड पाच-सहा हात उंच व बारीक असतें याचे फोक छपणाला, कुडाला, ओमणाला वापरतात [स करीर]

**कारवं**—न (गों) एक फुलझाड आंबोलीची निळी जात

**कारव(वा)ई**—स्त्री चातुर्याची व्यवस्था हुशारीचा कारभार, काटकसर, खोल कारस्थान गुप्त मसलत कारस्थान पहा [स कार्य]

**कारवणें**—अक्रि १ (राजा कु) खतावणें (शेत वगैरे) २ खत घातल्यानें फोफावणें (भाजीपाला वगैरे), जोरानें वर येणें ३ नासणें, कुजणें (फणसातील गरा वगैरे) ४ शिजताना बिघडल्यामुळें, वेचव पचपचीत होणें (भाजीपाला) ५ जळका वास येणें (दूध, खीर, भात वगैरेना) [कार=खत]

**कारवा**—पु (नृत्य) स्त्रीचा वेष घेऊन डोकीस पागोटें व कमरेस तलवार लावणारा सोंगाड्या. किंवा पुरुषाचा वेष घेतलेल्या स्त्रीचें सोंग, असें सोंग घेणारी व्यक्ति अशा सोंगाड्याचा नाच (क्रि० देणें नाचणें, नाचविणें) [हिं काहारवा, काहार= पालखीवाला भोई यावरून]

**कारवाद**—पु कारस्थानीपणा, युक्ति, शकल, कट (विशेषत वाईट गोष्टीविषयीं) करण्यातील चातुर्य [स कृ]

**कारवादी**—वि मसलती, गुप्त कट करणारा, कारस्थानी, फसव्या, लबाड (कुटिल कृत्यांत)

**कारवान**—न घोडे विकणाऱ्या अरबांचा तांडा, टोळी, तळ, अशा तळातील प्रत्येक व्यक्ति [तुर्की अर फा कारवान]

**कारवानी**—स्त्री कारवानाचा धंदा —वि १ कारवानसंबंधीं (घोडा माणूस वगैरे) २ (ल) धूर्त, चलाख, खोल (दव घेवीमध्यें)

**कारविणें**—अक्रि १ (कों) करवतीनें कापणें

**कारविण**—१ कारवणें पहा

**कारवी**—स्त्री कारव पहा

**कारस(सा)ई**—स्त्री १ रयतेला दिलेली तगाई ही सुगीच्या वेळीं धान्याच्या रूपानें परत करण्याच्या बोलीवर देतात २ किल्ल्याच्या घेरांतील (टापूतील) खेड्यातील लोकाकडून किल्ल्यावर असलेल्या सरकारी इमारतींच्या शाकारणीसाठीं, चूड व इरलीं करण्यासाठीं बसविलेला सरकारी कर त्यात गवत, नारळीच्या झावळ्या, पानें, कारव्या, बांबू वगैरे सामान असतें तसेंच

महालाचा अधिकारी फिरतीवर असताना त्याच्या उपयोगासाठीं लाकूडफाटा, जळण, फळफळावळ, भाजी वगैरे गावकऱ्यांनीं पुरवावयाचें सामान (एका जुन्या यादींत पुढील कारसाईंचा (वस्तूचा) समावेश केलेला आढळतो -इरलें, तवसें, काळा भोपळा, कोन, करादे, इरसाल फणसपोळी, आमसोल, दोरगुडे, सुडी, वासे, चिवली वगैरे) कुळाकडून गवत लाकडें फुकट घेण्याचा हक्क खोत वेठ पहा 'कारसाई किल्ले रायगड येथील शाकारणीबद्दल वगैरे गावगना नेमणूक आहे ते' -मसाप २ २ १५१ ३ गुप्त कट उलाढाली, कारस्थानें (क्रि० करणें, चालवणें) [स कृषि ?]

**कारस्थान**—न १ काटकसर, मितव्यय २ कट, गुप्त मसलत ३ राज्य किंवा कुटुंब यांतील व्यवस्था, बदोबस्त [स कार्य+स्थान]

**कारस्थानी**—वि १ काटकसरीचा, मितव्ययी २ खोल मसलत्या, धूर्त ३ कर्तबगार

**कारळा-ळे-तीळ**—पु खुरासणी, काळा तीळ याचें झाड दीड-दोन हात उंच असतें फुलाचा रंग पिवळा असून बीचा रंग काळा असतो याचें तेल जाळण्यास व खाण्यास उपयोगी आहे पेंड गुरांना घालतात [स कृष्ण+तिल हिं का करि=काळा]

**कारळें**—न कडू जिरें, हें औषधी आहे [का करि=काळें]

**कारा**—स्त्री १ तुरुंग, कारागृह, कारागार, बंदिशाला 'काय दिसे न तुम्हांस्तव रिपुनीं उघडुन ठेविली कारा।' -विक ६६ २ (ल) त्रासदायक धंदा काम संसार [स]

**कारा(रि)गिरी**—स्त्री १ कारागिरीचें कौशल्य, चतुराई कसब, कामाची उत्कृष्ट उठावणी करामत [फा कारिगरि]

**कारागीर-गिरी**—पु १ (कों) कारभारी 'अर्जुन तिथें कारागिरी।' -मसाप २ १ २३

**कारागृह**—न तुरुंग, बंदिशाळा, 'कारागृहीं अवतरले। श्रीकृष्ण गोकुळीं वाढिन्ल।' -दशावताराची भूपाळी ९ [स]

**कारात**—न कॅरट पहा सुमारें दोन रतींचें वजन, हिऱ्याचें वजन करण्यासाठीं वापरतात 'हा हिरा १६८० कारात वजन आहे' -मराठी सहावें पुस्तक पृ ११४ आवृ २ री [इ कॅरट अर किरात]

**कारार्थे**—न (गो) कार्ले, कारेतें

**काराना**—न (गो) करवंद

**काराफूल**—न (कु गो) स्त्रियांच्या कानातील कुडीं ल्वग [कर्णफूल]

**काराब**—न (गो) एक कानातील मोत्याचा दागिना

**कारावणें**—क्रि १ (कु) घासाघीस करणें २ पाण्याच्या पाटातील गाळ काढणें

**काराविणें**—कारविणें पहा

धाको २ २९

**कारिका**—१ अर्थबोधक श्लोक हा ३२ अक्षरी असतो 'अराड वेदांतिक कारिकांचें' -साप्र ५ १४ २ टीका, व्याख्या ३ टीकारूप श्लोकाची मालिका [स]

**कारिंगणा**—(गो) ब्राह्मी वनस्पति

**कारिगर-गार, कारागीर, कारेगार**—पु १ उत्तम काम करणारा, कसबी माणूस 'बहुत दिवस मनास लागले त्यास इकडे दगा कारीगर न मिळे।' -रा ३ १६८ २ चांगला कसबी सुतार, गवंडी चितारी, सोनार, न्हावी 'मिळेल तितका उत्तम कारागीर बोलवावा' -आगर ३ ५ -वि उपयोगी, कामी पडणारें गुणकारी इ० उत्तम 'तिनें वगा कग कारागीर काम केल तें!' -मदम ५५

**कारिंट-रीट**—स्त्रीन एक वेल व तिचें फळ हें काकडी सारखें ल्हान पण कडू असतें

**कारिंदा**—पु कारदा वेल व तिचें फळ करादा या वेलीचीं पानें किंचित वाटोळीं असून हिला वीत दीड वीत अंतरावर गांठी भरतात व प्रत्येक गांठीला करांद येतात, व खालीं जमिनींतहि लागतात फळ पूर्ण वाढल्यावर आंब्याएवढें होतें याचे दोन प्रकार आहेत-गोडा व कडवा [स करमर्द]

**कारिवणा-ना**—पु ब्राह्मी वनस्पति

**कारिवृद्धि-व्याज**—स्त्रीन (कायदा) ऋणकोनें किंवा धुळानें ठरविलेलें व्याज [स]

**कारिसवाणा**—वि केविलवाणा 'धर्म बैसविला कारिसवाणा।' -भाए १०९ [स कृश]

**कारी**—वि करणारा, घडविणारा, बनविणारा (समासांत जसें-कष्टकारी, नाशकारी इ०) कारक सारखाच हा शब्द असून याचीं पुष्कळ प्रकारचीं विशेषणें बनतात [स]

**कारी**—स्त्री (नाविक) राळ (गलबत नाव इ० च्या खालीं लावतात) तेलांत चंदरस वडवून तयार करतात ही फळ्या कायम घडतेवेळीं वाढीस लावून नंतर कापसाची पडी ठेवून घडतात

**कारी**—पु (कों) एक मासा

**कारी**—उद्गा (व) का ग ह्या अर्थी मुलीस हाक मारताना योजावयाचें संबोधन 'बरें सखचा कर चेय कारी।' -सारह ८ ४४

**कारीक-कारींव**—वि (राजा) खत घालून तयार केलेली (जमीन) [कार=खत]

**कारीगर गार, कारेगर-गार**—वि परिणामकारक, लागू कारिगर पहा 'हल्ला जाहली होती परंतु कारीगर जहाली नाहीं' -रा १४ ३५ [फा कार्गर, तुल० स कार्यकर]

**कारु-रू**—पु १ कसबी, कारागीर, शिल्पकार कलेवर निर्वाह करणारा माणूस २ समुच्चयानें बारा बलुतेदार, कारुनारु नारुकारु पहा [वै स कृ-कारु -ऋग्वे ९ ११२ ३]

कारुक—पु चितारी, कारागीर 'परम रुचिर चित्रें कारुकीं काढियेलीं' –नाहद ६ १२ [स कारुक]

कारुणा—पु (वै.) खाली कारिवणा पहा

कारुणिक—वि दयाळु, कृपाळु [स करुणा]

कारुण्य—न दया, कृपा, करुणा 'जाणूनि जीव साउलें। कारुण्यामाजीं पाउलें। स्पर्शूनि चाले।'–ज्ञा १३ २४८ [स] ०वृत्ति–स्त्री दयार्द्रपणा 'आपल्या अंगांत कारुण्यवृत्ति जागृत झाली ' –नीर ८१

कारुना—पु (हेट) कारिवणा-ना पहा

कारुनारु—पु अलुतेदार व बलुतेदार

कारें—न १ एक पाणेरी वनस्पति २ समुद्रांत टाका यांच्या सुरीच्या जाळ्यास लावलेले हुक्के व तरते लांकूड

कारेती—स्त्री कारल्याची वेल

कारेलें-ता—न (वों कु) कारलें

कारेवारे—पुअव (एकवचन कारावारा परंतु हा शब्द बहुतेक एकवचनी उपयोगांत आणीत नाहींत वर आणि वारा यापासून) धूळधाण, फडशा, सत्यानाश (पसा, जमीन वगैरेचा) (क्रि० करणें) [किर+वारा]

कारेळ-ळा, कारेळा तीळ, कारेळें—कारळा तीळ पहा

कारो—पु (गो) वाजऱ्याचें झाड, वाजरा, सुचरा

कारोट—पु (वों) वाताहत, विनाश, उच्छेद (शील धान्य गाव, घर इ० चा) [का कारु=ओकणें]

कार्कश्य—न शब्दातील कर्कशपणा, कर्णकठोरपणा [स]

कार्कीर्द-र्दी कार्कुनी, कार्खाना—कारकीर्द इ० मध्यें पहा

कार्गरी—स्त्री परिणाम यशस्विता. 'परंतु अडचण व पर्जन्य फार यास्तव कार्गरी जाहली नाहीं '–रा १४ ३५ [कारीगर पहा]

कार्चोबी—वि वल्बुत्तीदार खिल्लत पांच पारचे कार्चोबी दिला '–रा ७ ७० [फा कार्चोबी]

कार्चोबु—पु भरतकाम जरतारीचें, वेल्बुट्टीचें काम करणारा [फा कार्चोबु सिं कार्चोबु]

कार्टा-र्टी—पुस्त्री कारटा पहा 'ओंकारेश्वरावरच्या कारट्याच्या रडण्याच्या अंगीं इतका वेशरमपणा नसेल '–नाक २ ८८

कार्टा-र्टी-र्टें—पुस्त्रीन द्वाड मुलगा-गी-गें एखादे वेळीं हीं चोरांचीं द्वाड कार्टी प्रसंगीं विसरून जाऊन '–रत्न ५ ३ [कारटा पहा]

कार्ड—न १ (इ) लिहिण्याचें कोरें पत्र गंजिफा पत्ते यांतील एक पान २ स्वत चें नाव व पत्ता लिहिलेली चिठ्ठी [इ कार्ड] ०बोर्ड-पु (इ) पुठ्ठ्याचा जाड कागद [इ कार्डबोर्ड]

कार्त—पु (गो) पाव रत्तल वजन [इ क्वार्टर]

कार्तकादप—१ (गो) रात्रीस परवाना मिळविणें (धवाला) २ (ल) धरपट मोडणें [इ चार्ट+कापणें ?]

कार्तवीर्य—पु पुराणप्रसिद्ध सहस्रार्जुन याला परशुरामानें मारलें हरवलेली वस्तु याच्या नामस्मरणानें सापडते असा भाविक लोकांचा समज आहे व त्यासाठीं पुढील श्लोक रूढ आहे–'कार्तवीर्यार्जुनो नाम राजा बाहु सहस्रवान्। यस्य स्मरणमात्रेण गतं नष्टं च लभ्यते ॥' [स]

कार्तिक—पु खाटिक, मांसविक्रय करणारी एक जात –विल्सन [स कृत्–कापणें]

कार्तिक-र्त्तिक—पु ज्या महिन्यांत पौर्णिमेच्या दिवशीं कृत्तिका नक्षत्रीं चंद्र असतो तो महिना, चांद्रमासीय आठवा महिना, इं नाव्हेंबर महिन्याचा सुमारास येणारा महिना [स कृत्तिका] ०स्नान-न अश्विनी पौर्णिमेपासून कार्तिकी पौर्णिमेपर्यंत कृत्तिका नक्षत्र मावळण्यापूर्वीं पहाटेस करावयाचें स्नान, आंघोळ हें राधादामोदरप्रीत्यर्थ करतात ०स्वामी–पु देवाचा सेनापति, षडानन, शंकराचा वडील मुलगा, ह्याचा प्रसाद होणाऱ्याला सात जन्म ब्राह्मणजन्म येतो व जी स्त्री सिनी स्त्री याचें दर्शन घेईल तिला सात जन्म वैधव्य प्राप्त होतें (कारण तो ब्रह्मचारी आहे) अशी महाराष्ट्रांत समजूत आहे परंतु मद्रासेकडे अशी समजूत नाहीं, उलट तिकडे कार्तिकस्वामीला दोन बायका आहेत असें मानितात व त्यास सुब्रह्मण्यम् असें म्हणतात ०स्वामीचा हिमायती-च्या भिडेचा–पु केवळ ब्राह्मण जातींत उत्पन्न होऊन ब्रह्मकर्मादि विधि न करणाऱ्याला उपहासानें म्हणतात –चे दिवे–पुअव ह्या महिन्यांत लावण्यांत येणारे आकाशदिवे 'हिरभटीं स्नान केलें अग्निसेवें। कार्तिकाचे दिवे आकाशांत '–व १५

कार्तिकी—स्त्री कार्तिक महिन्यातील एकादशी

कार्ति(का)की—वि कार्तिक महिन्यासंबंधीं (सोमवार, एकादशी, पौर्णिमा इ०)

कार्नीस—स्त्री कारनीस पहा

कार्पण्य—न कृपणपणा, चिक्कूपणा, कंजूषपणा [स]

कार्पर्दाज—पु कार्यकर्ता, मुत्सद्दी 'परंतु कार्पर्दाज याचा अर्थ आपल्यास मान्य पडून '–रा ५ ३० [फा. कार्पर्दाज्]

कार्पास—पु कापसाचें झाड व कापूस [स]–वि कापसासंबंधीं

कार्मुक—पु धनुष्य 'वीरीं कार्मुकें वाहिलीं।'–एरुस्व ८ २६ 'एका दों न ढळेचि कार्मुक वरें हें नेटकें जों वळे।'–आसी ४२ [सं]

**कार्य**—न १ काम, उद्योग, कृति, क्रिया 'तया नाव धनजया। कार्य पैं गा।' –ज्ञा १३ ९६९ २ परिणाम, क्रिया, योग 'जे कार्य ना कारण।' –ज्ञा १५ ७८ 'चुन्यावर आसिडाचें कार्य झाल्यास कार्बानिक आसिड वायु बाहेर पडतो' –पदाव ११ 'तो कार्यावर दृष्टि देतो' ३ समारंभ, उत्सव उ० लग्नकार्य ४ (व्या) विभक्तींचीं रूपें, विकार ५ फिर्याद, खटला, मुकद्दमा ६ (वेदान) अकरा इंद्रियें व पाच विषय (आनंदगिरीचें मत) ७ (वेदांत) शरीर (पच ज्ञानेंद्रियें, त्यांचे पाच विषय, मन, बुद्धि व अहंकार) (शांकरभाष्य भगवद्गीता १३ २०) –वि करण्यास योग्य (वाप्र) ०उठणें–काम पार पडणें 'असें झालें असता किती कार्यें उठणारी आहेत पहा!' –नि ४४० ०उरकणें–१ काम पार पाडणें २ (ल) रतिसंभोग करणें **कार्यावर दृष्टि देणें**–आपल्या ध्येयाचा ध्यास घेणें, आपला उद्देश सिद्ध करण्याकडे लक्ष देणें, काम साधणें –**स लावणें**–योग्य कामीं उपयोग करणें 'त्यानें आपला पैका कार्यास लावला' सामाशब्द – ०**कर्ता**–वि १ लोकांचीं कामें करण्यास तत्पर २ स्वतः च्या हिमतीवर काम तडीस नेणारा ०**कारणन्याय**–पु हेतु व परिणाम यांच्या संबंधाचा नियम [स] ०**कारणभाव**–पु फळ व तदुत्पादक क्रिया यांचा संबंध 'ज्या दोन गोष्टींचें आधुनिक दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीवर अवलंबून नसतें त्या दोहोंत कार्यकारणभाव असतो' –न्याप ३४ 'घटाचा आणि मृत्तिकेचा कार्यकारणभाव आहे' ०**कारी**–वि कार्य करणारा, व्यापार करणारा, तटस्थ नव्हे तो ०**कुशल**–वि धंद्यामध्यें चतुर, कल्पक ०**क्रम-पत्रिका**–स्त्रीपु सभेंत व्हावयाचें काम व त्याचा अनुक्रम दाखविणारा कागद –सभा ७१ (इ) अजेंडा ०**त**–क्रिवि कांहीं कारणासाठीं, उद्देशामुळें ०**तत्पर**–वि कार्यांत निमग्न ०**दर्शक दिशा**–स्त्री (यंत्रशास्त्र) प्रेरणा ज्या दिशेंत कार्य करते ती दिशा –यस्थि ४ ०**दर्शक बिंदु**–पु (यंत्रशास्त्र) प्रेरणेचें कार्य ज्या बिंदुस्थळीं होतें तो बिंदु –यस्थि ४ ०**प्रयोजन**–न विवाह, मुंज वगैरे समारंभ किंवा सण याग व्यापक संज्ञा ०**भाग**–पु १ काम किंवा पत्करलेलें अंगावर घेत लेलें कार्य, करावयाचें काम, साधावयाचा उद्देश (क्रि० करणें उरकणें, उचलणें लोटणें) २ कामाचा अंश भाग ०**भार**–पु १ अंगावर घतलेलें कामाचें ओझें, जबाबदारी, जोखीम २ काम, व्यवस्था, कारभार [स] ०**लोभी**–वि कार्यसाधु काम साधून घेणारा 'न घालिन भिडेस मी जरिहि कार्यलोभी तिला।' –केका १० ०**वादी-वादु-साधु**–वि कोणीकडून तरी आपलें कार्य साधण्यासाठीं गोड बोलणारा ०**वाह-ही**–पु व्यवस्थापक, जबाबदारीनें कार्य करणारा, सस्थेचा चिटणीस वगैरे ०**व्यग्र-व्याकुळ-व्यावृत्त**–वि हातात घेतलेल्या कामानें बेजार झालेला, अडचणींत आलेला, वडलेला ०**शरीर**–न कारणशरीराच्या अनुषगानें योजावयाचा शब्द, स्थूल शरीर ०**संपादन-साधन**–न कामाचा उरक, काम तडीस नेणें, काम साधणें, सफल करणें ०**साधक**–वि कार्य साधणारा (घटक, माणूस, साधनें) ०**सिद्धि**–स्त्री शेवटास नेलेलें काम, फलसिद्धि, कामाची पूर्णता ०**क्षम**–वि काम करण्यात हुशार, निपुण, प्रवीण, कामाला प्रसंगीं उपयोगी पडणारा, काम करण्यास समर्थ, योग्य [स कार्य+क्षम=समर्थ]

**कार्याकारण**—वि आवश्यक कार्याच्या निर्वाहापुरता, जरूरीपुरता, प्रसंगापुरता [स कार्य+कारण]

**कार्याची वस्त-स्तु**—स्त्री कामाला उपयोगी पडणारी कोणतीहि वस्तु, पदार्थ, अनेक कामाला जरूरीची असणारी वस्तु (औषध, पदार्थ, माणूस)

**कार्यार्थी**—वि १ जो आपलें कार्य हळु हळु पण धिम्मेपणानें सिद्धीस नेतो तो, कार्यसिद्धीकडे लक्ष देणारा, हेतु सफल करून घेणारा २ स्वार्थसाधु [स कार्य+अर्थिन्]

**कार्यानुमेय**—वि परिणामावरून, फलावरून अनुमान करण्यास योग्य [स कार्य+अनुमेय]

**कार्श्य**—पु कृशता, रोडपणा 'जयाचे मनीं आलस्य। वरी अति कार्श्य।' –ज्ञा १३ ५१७ [स कृश–कार्श्य]

**कार्षापण**—वि जुन्या काळचें एक नाणें 'आपण कोणापासुन एक कार्षापणहि दक्षिणा म्हणून घेऊं इच्छित नाहीं' –चद्र ६९ [स कार्षापण]

**कान्हळ-ळा, कान्हेळ-ळा-तीळ**—काळा तीळ पहा

**कान्होड**—स्त्री (व ना) गाईचें वासरूं, कालवड पहा

**फाल**—न केळीचा गाभा कालें पहा

**काल**—न चालू दिवसाच्या मागील दिवस [स कल्य–कल्ल–काल]

**काल**—पु १ वेळ, समय (ज्याचें मोजमाप दिवस प्रहर इ० नीं होतें तो) २ हंगाम, मोसम, योग्य वेळ ३ सकटाची वेळ ४ यमराज, मृत्यु ज्यापासुन जिवाला धोका वाटतो अशी वस्तु प्राणी (साप वाघ इ०), एखादें सकट, मृत्यु, नाश, मृत्युसमय 'शिवाजी महाराजाचा काल शके १६०२ मध्यें झाला' ५ चागलें किंवा वाईट होण्यास कारणीभूत अशी परमेश्वराची इच्छा ६ भूत, भविष्य वर्तमान इत्यादींचा समय ७ (गायन) ताल कालाचीं तालोपयोगी प्रमाणें –अणु द्रुत, लघु गुरु, प्लुत [स काल] (वाप्र) ०**देशवर्तमान करणें-देश पाहून करणें-वर्तणें**–काल, स्थल परिस्थिति पाहून वागणें ०**साधणें**–अचूक, योग्य संधि गाठणें, योग्य काळीं

कालगुंत—स्त्री भोकें पाडलेली लोखंडी पट्टी ( सोनार, लोहार इ० ना उपयोगी ) कालगुत पहा

कालण—न ( राजा पुण ) कालवण [ कालवण अप ]

कालणें—अक्रि (लुम) कालवणें, मिसळणें, मिश्रित करणें

कालथा—पु उलथणें कलथा पहा

कालनेमीची मूर्ति—स्त्री ( गा ) कपटी माणूस [ काल नेमि या नांवाचा एक कपटी राक्षस होता त्यावरून ]

कालपी-साखर—स्त्री उत्तरहिंदुस्थानात कालपी गावीं तयार झालेली साखर ( खडीसाखर, पिठीसाखर या दोन्ही, विशेषत खडीसाखर )

कालमेल-मैल—स्त्री तगमग, अस्वस्थता, तळमळ ( दु ख, ताप यांपासुन होणारी )

कालमेलणें—अक्रि तळमळणें, तडफडणें ( ताप, दु ख यांमुळें )

कालमेह—पु काळ्या रंगाची लघ्वी होणें, प्रमेह पहा [ स काल+मेह ]

कालरा—पु ( इ ) पटकी, महामारी, अजीर्णामुळें शरी रांत वातदोष होऊन सुया टोचल्याप्रमाणें पीडा करणारा रोग, कुळीक, विषूचिका, वाखा, जरीमरी हा विकोपास गेल्यास दोन्ही पायांच्या खोटाना डाग द्यावा किंवा शुद्ध गधक अगर केशर लिंबाच्या रसातून द्यावें —योर १ ५१० [ इ कॉलरा ]

काललवण—न एक कृत्रिम व रेचक मीठ, पादलोण, मग्रीज बिडलवण पहा [ स ]

कालव—न शिपात असणारा एक समुद्रांतील प्राणी काल व त्याचा शिंपला, या प्राण्यास डोकें नसतें हा समुद्रकिनाऱ्या वरील खडकातहि सांपडतो

कालव(ह्‌)ड-डी—स्त्री लहान वासरू, गाय, गोजी [ स कलभगी–कलहडी–कलभडी–कलवडी –भाअ १८३२, का कडसु ]

कालवण—न १ भात, भाकर इ० कोरडे पदार्थ ज्याच्याशीं खातात असें ताक, दहीं, दूध आमटी, सांबारें, कढी पातळ भाजी (व )शिकरण, ( केळीं शिताफळें इ० ची ) वगैरे पदार्थ, पातळ तोंडी लावणें, कोरडगास, ( गो ) निस्त्याक 'दधि दुधें तकें। कढिया कालवणें विचीत्रें। —ऋ ८४ २ मिश्रण [ स विंचित् +लवण ]

कालवणें-विणें—उक्रि १ दोन पदार्थांचें एकत्र मिश्रण करणें 'जैसीं जवळिकेंचीं सरोवरें। उचंबळलिया कालवती पर स्परें।'—ज्ञा १० १२१ २ पित्तादिकामुळें पोटात ढवळल्यासारखें होणें [दि कलविय, का कलसु ] जीव-प्राण कालविणें-जीव घाबरा होणें 'भ्रमात मन कालवे, प्रखर तेजही मालवे।' (वाग्र ) चिटाळ कालवणें-झालेला विटाळ प्रगट न करतां चहूकडे दिवणें

कालवा—पु नदी, तलाव इ० चें पाणी नेणारा मोठा पाट 'कर्म म्हणे तुज सागर भासे, मज भीम कालवा रायां।'—मोकर्ण ३२ २५ [ स कुल्या, का कालिवे, इ कॅनॉल ]

कालवा—पु १ भात भाकर इ० चा कालवणाशीं कुसकरून बनविलेला काला, त्यावरून २ ( ल ) कालवाकालव, गर्दी 'सोडली पुण्याची जागा तोडिल्या धागा, भडकल्या पागा कालवा झाला '—ऐपो ४३३ [ कालवणें ]

कालवाकालव—स्त्री १ परस्पर विरुद्ध वस्तूची मिसळ, भेसळ २ ढवळाढवळ, विचका ३ घोटाळ्याचा वाद ४ पोटा तील अस्वस्थता ५ कोणताहि मनोविकार प्रबल झाल्यानें मन अस्थिर होणें, चलबिचल, 'रोम शहर जुलमी पोपच्या व फ्रेंच राजाच्या ताब्यात गेलेलें पाहून ग्यारिबॉल्डीचे मनात कालवा कालव होऊन जात असे '—ग्यारिबॉल्डीचें चरित्र [ कालवणें ]

कालसाव—( गो ) विजार [ पोर्तु ]

काला—न १ मिश्रण 'तेया दोन्हींचा काला कीजे।' —शिशु ७६ २ दहीं काला, ( सक्षेपानें ) गोपाळकाला 'प्रेमें काला पूर्ण मांडियेला।'—दावि ३८ 'आमुच्या शिदोऱ्या एकत्र करूनि। काला वांटिमी तू चक्रपाणी।' —ह ३६ ५७ ३ कोहळा, भोपळा याचा कीस तिखट, मीठ इ० घालून (साडग्यासाठीं) करतात तो ४ (गो ) वार मारण्याचा एक प्रकार ५ चिखल 'नीलोत्पलाचियें माळें। दोन्हलें कस्तुरिएचें काळें।' —शिशु ३७७ ६ पूट, रंगाचा पुन्हा पुन्हां द्यावयाचा हात 'इश्वरध्यानाचिया चोळा। मना काले दिजती वेळोंवेळा।' —माए ६८६ [कालविणें] ०कथला-पु ( ना ) भानगड, टला ढाल ०कित्ता-पु १ निरनिराळ्या जिनसाचा किंवा वस्तूचा समूह जमाव, ढीग (क्रि० भरणें ) २ (समुच्चयानें )नाना प्रका रच्या धान्याचीं पिकें किंवा बाजारात विक्रीस आणलेलें निरनि राळें धान्य (क्रि० नासणें, पिकणें, बुडणें, येणें, भरणें) ३ शेतात उसाच्या फडात, सुपारीच्या आगरात निरनिराळ्या प्रकारचें पेर लेलें मोगण, दुय्यम प्रतीचें पीक

कालानुकूल्य—न कालाची अनुकूलता, योग्य सधि, प्रसग, धारनिणी वेळ [ स ]

कालापकर्ष—पु कालाचा अपव्यय [ स काल+अपकर्ष ]

कालापाक—न प्रत्येक श्लोकात अर्थ पुरा करण्याऐवजीं क्रियापदाच्या कारकवृद्धीनें जोडलल्या चार श्लोकाचा समुच्चय, युग्मविशेषक, कुलक पहा [ स ]

कालावुल-ली-भूल-भुली—स्त्री ( ताप, पित्त, भूक वगैरेनें आलेली, झालेली ) कासाविसी, तळमळ, तगमग;

अस्वस्थता ' का धिखली इतकी गाये । घड भाकळ न पाहे । जो तियेचेया ग्लानी होये। कालभुग।' –ज्ञा १६ १४२ ' मग कालायुगी हाका दते येळे। होतोसी परि होळे मुखहिसी।' –तुगा ४०८३

फालायस—न पोलाद [ स काल+आयस् ]

कालावधि—स्त्री विशिष्ट वेळेची मर्यादा, काही काळ, काही वेळ, ' विचार बदलण्याला कालावधीची आवश्यकता मुळीच नसते ' –भा११० [ सं काल+अवधि ]

फालाष्टक—न आषाढ वद्यप्रतिपदा ते अष्टमीपर्यंतचा काळ या काळात काळभैरवाचे भक्त त्याची पूजा करतात उपवास पाळतात, व आठ ब्राह्मणाना जेवण घालतात [ स काल+अष्टक ]

कालाष्टमी—स्त्री कार्तिक वद्य अष्टमी, प्रत्येक महिन्याची वद्य अष्टमी, ( विशे ) कालाष्टकांतील शेवटच्या दिवस या अष्टमीचे दिवशी काळभैरवाची पूजा करतात [ पं ]

फालिक—वि कालासंबधी, मुदतीचे [ स ] ०वृद्धि—स्त्री ठरलेल्या मुदतीचे व्याज कायिकवृद्धि पहा

कालिका, कालिकाई-काली—स्त्री पार्वतीचे एक स्वरूप बगाल्यात हिची पुजा करतात [ स ]

कालिंग—१ ( गो ) कलिंगड पहा २ द्रव्याचा संचय

कालिंगड-ण—न कलिंगड पहा [ स कालिंगी ]

कालिंगडा—पु (राग ) ह्या रागास षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पचम, कोमल धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाती संपूर्ण संपूर्ण, वादी पचम, सवादी षड्ज, गानसमय रात्रीचा चवथा प्रहर

कालिंदी—स्त्री यमुना नदी 'कालिंदीचे हृदयशल्य फेडिले।' –ज्ञा १० २९० [ स ]

कालिपास—पु. ( शाप ) ( इ ) कॅलिपर्स, गोलाकार वस्तूचा आतील व बाहेरील व्यास मोजण्याचा पाटोव्या वपास [ इ कॅलिपर्स ]

कालिमा—स्त्रीपु १ काळेपणा २ ( ल ) डाग, कलंक (दोष, पाप इ० मुळें आयुष्यास चारित्र्यास लागणारा ) ३ लाज, शरम (अपराधी माणसाची) ४ काळवडलेपणा, निस्तेजता, प्रेतकळा ( रोग, अतिश्रम इ० मुळें येणारी ) ५ शरीराचा काळेपणा ( अतिशय उन्हामुळें आलेला ) [ स ]

काली—स्त्री १ पार्वती २ एक वनस्पति 'मेथिका, धातकी काली, उपलसरी, वाजपूरक याचा पिंड तेजाची वृद्धि करणारा होय ' –अश्वप २ ८

कालीन—वि कालविषयक, काळासंबधी, काळाचा ( सामा )एतत्कालीन, तत्कालीन

कालीफास—न (होमिओपाथी ) यारा क्षारांतील एक महत्त्वाचें औषध, हें मेंदूचे रोग, विषमज्वर, पक्षघात यावर विशेष उपयोगी आहे [ इ कॅलिअम-फॉस्फेट ]

कालीफ्लॉवर—स्त्री पुष्कोबी, फुलवर, एक भाजी [इ]

कालीमूर—न ( होमिओपाथी ) बारा क्षारांपैकी एक आमांश, सर्दी, बहिरेपणा, त्वग्रोग, प्रदर इ० वरील औषध [ इ ]

कालीय—पु कालिया सर्प ' गरुडीं कालीय तया ज्यावरि तू कोपगरळ ममदील।' –मोकर्ण ३० ११

कालीसल्फ—न (होमिओपाथी) बारा क्षारांपैकी धुपणी, देवी, गोवर व छातीचे सर्व रोग यांवर व बोगल्यादि रोगावर हें औषध घेतात –जीवनरसायन ४९ [ इ ]

कालू—पुस्त्री एक वाद्य, सनई, चौघड्यातील ग्मिक्यांसहि म्हणतात ' कालु कर्णे, वाजती पुढें भाग्याची चढती।पाहुन जीव माझे तडफडती।' –प्रला १३४ ' कालु कर्णे बाजे होती नौबत हत्तींवर चौघडे ' –ऐपो २३७

कालू-लूं—न कालव

कालें—न केळीचा गाभा, केळीच्या मध्यातून एक दांडा वर पानापर्यंत येऊन तेथून त्या दांड्याला केळीचे लोंगर(केळ्याचा घड ) येतें या दांड्याला ( केळीच्या पोटात असणाऱ्या भागास, बाहेर आलेल्या नव्हे ) कालें म्हणतात (वाप्र ) काल्यासारखा थड=केळीच्या गाभ्यासारखा थड्गार ( अग )

कॉलेज—न महाविद्यालय, पाठशाळा, उच्च शिक्षणाची संस्था [ इ कॉलेज ]

कालेत—स्त्री ( गो ) प्रकृति

कालेवेलें—न चाईट, विश्वासघातकी काम, मार्ग, प्रच्छन्न कृत्य कालवेल पहा

काल्हो—पु ( कु ) काग पहा

कालोवा—पु. मेळ, मिलाफ, ऐक्य ' जाला मृत्युभज्य कालोवा । भक्तिच्या घरीं ।' –अमृ ९ ३० [ कालवणें ]

काल्पक—वि ( कल्पक अप )योजना करणारा, युक्तिवान, चतुर [ स कल्पक ]

काल्पनिक—वि मनानें किंवा कल्पनेनें शोधून काढलेलें, कल्पित, नकली, बनावट, बसविलेलें, जुळविलेलें, अवास्तविक [ स कल्प् ]

काल्हूत—कल्हूत-द पहा

काल्हवड—स्त्री कालवड पहा

काव—स्त्री गेरू, एक प्रकारची तांबडी माती, हिचे लोखंडी काव व सोनकाव असे दोन प्रकार आहेत [ ते का काविन्तावडा ]

**काव**—स्त्री १ त्रास, कटाळा २ कावा, पपट 'एक घटीक काव करूनि जात होती पुजें घेउनी '–ऐपो ३५५ ३ (थे) ताप, कोप, राग [कावणें]

**कावकाव**—स्त्री १ (ध्व) कावळ्यांचें ओरडणें, २ (ल) कर्जदार, भिकारी यांचा मागणीचा, तगाद्याचा एक कल्लोळ, गोंगाट, आरडाओरड (क्रि० करणें) [ध्व]

**कावजोर्चे**—क्रि (गो) पाण्यात फार वेळ राहिल्यानें अग आंवडणें

**कावडी**—पु (कों) एक मासा

**कावड**—न (राव) (कथा८ अप) दार, दाराची एक फळी [स कपाट=क्वाड]

**कावड-डी**—स्त्री १ पाण्याच्या घागरी अथवा एखादा जड पदार्थ नेण्यासाठीं बाबूच्या दोन टोकानां शिक्याच्या रच नेप्रमाण दोन्या बांधून त्यात घागरी घालून नेण्याचें साधन 'साइनिया रजनमाची कावडी।'–ज्ञा १६ ७७ 'काष्ठाची ल्घु कावडी धरुनिया होतों बडाखालता।'–कचेबुच ११ [का काउ-ओनें वाहणें, का त कावडि, स कार्पट] २ विटीदांडू च्या खेळामध्यें ठराविक गुण ज्या बाजूच्या खेळाडूच होतील त्यांनीं आपल्यापैकीं एका दुपार खेळाडूकडून विटीचे ठराविक टोले मारून शवटीं विटी जेथें टोलली असेल तेथून दुसऱ्या बाजूच्या खेळाडूपैकीं एकेकानें सुर अथवा लगडी, खळग्याच्या जागेकडे घालावी परतु मध्यें तो गडी (थकल्यामुळें) जेथें थाबेल तथून विजयी बाजूच्या गड्यानें आणखी एक विटीचा टोला लगावला तर पुन्हा तथून सुर अथवा लंगडी सुरू करावी व याप्रमाणें हरलेल्या डावाची फेड करावयाची अशी पद्धत 'बाळूचे व सुनदाचे ९० झाले, शमराची कावड होती '–सुदे ६ कावडऱ्या–वि कावड वाहणारा

**कावडता(था)वड**—स्त्री १ (चमत्कारिक शब्दरचना) गिऱ्हाईक व दुकानदार यांच्यात पदार्थाच्या भावाविषयीं चढ उताराची घासाघीस होऊन शेवटीं ठरलेली किंमत रक्कम, भाव, अडचणींत आलेल्या व्यापाऱ्याशीं त्याच्या सावकारानीं केलेली कर्जाची तडजोड अगर तोंडमिळवणी, सरासरीची विभागणी, प्रमाणशीर वाटणी, अदलाबदल (वस्तु धदा काम इ० ची) एकदम दिलेली टोकळ रक्कम २ लुच्चेगिरीनें, धूर्तपणानें काम साधणें ३ कामातील शकल धूर्तता, कावा, खुबी ४ खाजणीभाजणी

**कावडल**—स्त्री कवडल पहा

**कावडी**—पु कापडी पहा

**कावण-वाण**—न १ (कों) लग्न वगैरे समारभाचा स्वयपाक वगैरे कामासाठीं घराबाहेर बांधलेली झोपडी किंवा झावळ्या वगैरेचा मांडव, तात्पुरता मांडव, गुन्हाळाकरिता घातलेला कुडाचा मांडव वगैरे २ पशूचा गोठा (उन्हाळ्यातील), कोंड वाडा, छप्पर [का कावण्ण]

**कावणें**—अक्रि १ फार सतावणें, रागावणें, रागावून तोंड सोडणें 'तेथ कायसी सेवगांसी गोठी। कावली पोटीं स्त्रीपुत्रें।' –एभा २३ ९५ २ कटाळणें, त्रासणें, वैतागणें (रागानें, दु खानें) 'दीनता त्याली, दु खानें कावली '–विक ८ ३ पिसाळणें (कुत्रें) ४ कष्टानें आतल्या आंत तडफडणें, तळमळणें 'सरुटीं मनुष्य कावे।' –दावि ४५५ 'तनू भववनिं त्रितापदवपावकें कावली।'–मम ६० ५ भयानें गांगरून जाणें

**कावती**—स्त्री (राजा) पाफळीचे रोप कवाता पहा

**काव(वा)र**—न १ (कों) पाचर, पुरी (भिंतीतील), सुग (जात्याचा) ढिला झाल्यास त्यात बसविण्याची पाचर किंवा लाकडी चीप २ (व) कावल, अतिशय शिजलेलें भाडें ३ (योगशास्त्र) गुदस्थानीं टाचू जोडणें, गुद व शिश्न यांच्या मधील शिवण 'अपान रध्रद्वया–।–मासारीं धनजया। पाय्णीं पिडूनिया। कावरु मूळ।'–ज्ञा १८ १०३६ ४ (नाविक) फळीच्या बाडींत दुसरी फळी गच्च बसती करणारी लाकडी पाचर ही कावर खाऱ्या व वरच्या दोन्ही फळ्यास चार अगुळें अतरावर दोन दोन भोंकें पाडून त्यांत मस्तूर भरून नतर ठोकतात हिचें पुढचें टोंक निमुळतें व रुंद असून वरचा माथा गोल व सपाट असतो ०मूळ–न गुद व शिश्न यामधील शिवणीचें मूळ

**कावरखा**—न (व) झाडावरचें बाडगूळ कावरख पहा

**कावरणें**—अक्रि (व) पिसाळणें कावणें पहा

**कावरा**—पु (व ना) (बैलगाडी) जुनावर मधोमध बसविण्याची एक पितळी वस्तु हिची नागासारखी आकृति असते व दोन्ही बाजूस मधोमध ल्हान आरशी असते या नागाच्या तोंडातून बैलाचा कासराहि घेतात

**कावरा-कावराबावरा**—वि भयभीत, फार गोंधळलेला, भय, आश्चर्य, राग यानीं चकित झालेला, घाबरलेला, बुजलेला [का कावु-ताप, शोक + बेवरू=घाम]

**कावरख**—न झाडावरचें बाडगूळ 'ससार हें कावरखें। झाड तैसें।'–ज्ञा १५ ५२ 'सदा सफळ आंब्याचा रूख। त्यावरी उपजे कावरख।' एभा २३ ३३ (ल)–वि क्षण भगुर आश्चर्यकारक [स किम्+वृक्ष?]

**कावरें-विरें**—न वेड, भ्रम 'लाविलें कावरें। प्रल्हादासी म्हैसासुरें।'–तुगा २८१ –वि वेडें, पिसाळलेलें, भ्रमा त्मक, आभासात्मक आश्चर्यकारक 'परीतें असो हें ऐसें। कावरें झाड उससे।'–ज्ञा १५ १०९ [कावरा]

**कावल-ली-ल्या**—न १ ( फॉ गो ) फार जुनें झालेलें किंवा नवें असून अतिशय हलकें असलेलें भाडें २ किडकी, ठिसूळ, जीर्ण झालेली तुळई, लांकूड ३ शिजून पातळ झालेलें भाडें, भांड्याचा तुकडा 'नरदह खोंवर जैसें फुटकें कावल।'-स्वादि ६ ४ ७६ -वि १ शिजलेलें, मोडीचें, निरुपयोगी (भांडें इ०) २ किडका, मोडका, किरकोळ ( खांब, तुळई ), फीकस्वाद (भाजी) [स कोमल, तुल गु कावलु]

**कावल(ळ)काठी**—स्त्री हलकी काठी, किरकोळ लाकूड, सिलपी, निरुपयोगी लांकडाचा तुकडा

**कावला**—पु. चर, पाण्याचा पाट कालवा पहा (अप पहा)

**कावली**—पु पाच-सहा इंच लांब व बराच रुंद, छातीवर व पाठीवर दोन दोन पख असणारा एक मासा, फेकिन

**कावळा**—पु १ काळ्या रंगाचा, लाबट व बळकट चोंचीचा, मास, किडे, गोचीड वगैरे खाणारा, कावकाव असा कर्कश शब्द करणारा एक पक्षी, काक २ अगस्त्याच्या फुलातील कावळ्याच्या आकाराची काडी ३ केळफुलाच्या दांड्यातील एक न शिजणारा निबर तंतु, हा काढून मग दांड्याची भाजी करतात ४ कावळी नावाच्या वेलीचें फळ ५ ( बैलगाडी ) गाडीवानाच्या चाब काच्या टोकाला असलेला गोंडा ६ (वे ) आमटी वाढण्याचें एक सारपात्र ७ (कों ) नारळीच्या झाडाच्या शेंड्यावरील कोवळ्या पानाचा झुबका -कृषि ७४८ ८ (जरतार) कावळ्याच्या चोंचीच्या आकाराचा एक चिमटा [स काक, ते काकि, सिं काऊ, हिं कव्वा, इ क्रो] (वाप्र) ०शिवणें-१ मृताच्या दहाव्या दिवशीं त्याच्या नावानें केलेल्या पिंडास कावळ्यानें स्पर्श करणें २ स्त्री अस्पर्श झाली असता रड्यान मुलाच्या समजुतीकरिता हा शब्द वापरतात ( कावळा शिवला म्हणजे पाप लागतें अशी समजूत ) 'भक्तिक्रम तुच्छ नरा, शिवला हा जेविं काक दाग मला।' -मोवन १२ ३७ -चें आयुष्य असणें-शंभर वर्षे म्हणजे दीर्घायुष्य असणें -च्या शापानें गाई मरत नाहींत-क्षुद्र माणसानें थोरामोठ्याना कितीहि दूषणें दिलीं तरी त्याचें काहींहि नुकसान होत नाहीं पांढरे कावळे जिकडे असतील तिकडे जाणें=देशत्याग करणें ( पोटांत ) कावळे कोकलणें-ओरडणें-फार भूक लागणें (गो ) कावळे म्हातारे जावप=पुष्कळ काळ लोटणें म्ह० १ कावळा सान्याचा गू खाईल पण कावळ्याचा कोण खाईल=ओंगळपणा, नीचपणा, हलकटपणा यानीं युक्त अशा माणसाबद्दल योजतात २ कावळा मोत्यांपोवळ्याचा चारा काय उपयोगी ? =गाढवास गुळाची चव काय ? ३ घरांत नाहीं शीत कावळ्यास आमंत्रण= अंगांत सामर्थ्य नसता बडेजावीच्या गोष्टी बोलणें, जवळ पैसा नसतां भरमसाटपणें देणग्यांची वचनें देणें. कावळ्यानें गू उठा वप=कावळ्यानें गू उठावण्यापूर्वी म्हणजे अगदीं सकाळीं कावळे बुक-न पत्रें, पावत्या, बिलें इ० चिकटवून ठेवण्याकरितां शिवणी पासून दोन घोटे रद्दीच्या कागदाच्या पट्ट्या काढून शिवून तयार केलेलें चिकटबुक -ळ्याचा डोळा-पु १ (राजा ) एका वनस्पतीचें फूल २ (ल ) फार पातळ ताक -चें गोत-न. एखाद्याच्या घरीं काहीं निमित्तानें जमलेला गोतावळा, अनेक नात्यागोत्याच्या माणसाची गर्दी, झुंड वगैरे

**कावळाड**—स्त्री (कु ) रुंद तोंडाची मातीची घागर

**कावळी**—स्त्री १ गोव्याकडे कुंपणात उगवणारें पुरुष-दीड पुरुष उंचीचें, चिंचेच्या पानासारखीं पानें असलेलें व भाटाच्या एवढीं जांभळ्या रंगाचीं फळें येणारें एक झाड याचीं फळें मुलें खातात. कावळे -वगु २ ४३. २ (गो ) एक औषधीवनस्पति ३ जोंधळ्यातील एक प्रकार -कृषि २७७ ४ (सोनारी ) विस्तवा तील मूस उचलण्याचा वाकड्या टोंकाचा चिमटा, साडसी ५ लाबट घडीची टोपी, हिला मागें जाड शेंपूट असतें ही रड्यान मुलें घालतात, नावेची टोपी ६ (कु ) खेळातील पराभव, हार

**कावळ्या आवय**—वि (गो ) सारखी हिंडणारी व इकडची बातमी तिकडे करणारी बाई

**कावा**—पु १ घोड्याची रग जिरविण्याकरिता त्यास घ्याव यास लावलेले फेरे, मंडळें, घिरटी, घेर घोडा भरधाव पळत असता त्याला वाटेल तसा वळविणें, फिरविणें मंडळावर धरणें, पुढें मागें भरधाव सोडणें (क्रि० देणें) 'वर्णाभवतें बहु उरगा भवतें जेविं गरुड कावे घे।' -मोद्रोण १५ २० 'घोड्याला दोन चार कावे दिल्हे मग निवळ झाला' 'घोडा पुढल्या काव्यावर फिरवावा' २ लुच्चेगिरी, ठकबाजी ३ गुप्तकट, मसलत, लुच्चेगिरीची योजना, कारस्थान (क्रि० करणें, बांधणें) ४ हुलकावणी 'गनीम यानीं कावे देत देत अतर्वेदप्रांतीं गेले' -भाव ११० ५ पिछेहाट 'वीरीं घेतला रणकावो। दखोनि धांवि मला झाल्यो।' -एरस्व १० ६२ [फा कावू=खणणें, तपासणें ?]

**कावादावा**-पु लुच्चेगिरी, सोदपणा, भेद (क्रि० बांधणें, करणें) 'मुलुख काव्यादाव्यानें सर करून' -पाव १७, [कावा द्वि]

**कावा-कव्हा**—पु क्षुद्र, कापी [अर कव्हा]

**कावाड**—न कवाड, दार, फाटक [स कपाट=कवाड, दे किवाडी]

**काविजा**—पु. खड्या, लोखंडी कामाच्या कारखान्यातील डाक लावण्याचें हातोड्यासारखें साधन

**काविश**—न लबाडी, धूर्तता, कावा, युक्ति [कावा]

**काविरडा**—वि (कों ) दुखणें वगैरेमुळें चिडखोर बनलेला, नाशिक, कावलेला.

**काविरें**—न १ वेड, भ्रम, धुंदी, भ्रांति 'त्याचें अज्ञान काविरें तुरे।'—विउ ११ ११८ भरलें क्रोधाचें काविरें।'—दा २ ६ ५ 'या लागीं मदाचें काविरें।' —मुक्तेश्वर हरिश्चंद्राख्यान (नवनीत पृ १८८) २ काहूर, अंधारी, काळोख —वि वेडगळ

**काविलथा**—पु कल्या, उलथें

**कावीड**—स्त्री (सोनारी) शेवटीं वाटोळी केलेली सोसडी तार

**कावीण-ळ**—स्त्री कामीण पहा 'कावीळ झाली म्हणजे सगळें जग जसें पिवळेंच दिसतें' —टि ४ ४ ९ ४ [स कामला]

**कावील**—स्त्री उसाच्या रसाची मोटी काहील

**कावीस**—? उसावर पडणारा एक रोग —शे ७ २२२

**कावेखोर-दार-बाज**—वि युक्तिबाज, धूर्त, आतल्या गाठीचा, स्वाड, वस्ताद गुप्त कट करणारा, कारस्थानी 'असली कावेबाज वकिली करण्यास दुसरें स्थळच नव्हतें काय?' —टि ४ ४ ५ १ [कावा]

**कावेडी**—स्त्री (ना) स्त्रियांच्या हातातील दागिने गळून पडू नयेत म्हणून दागिन्याच्या साख्याला लावलेलें एक साधन

**कावो**—पु गोळा —लाक २ ७९

**काचो**—पु पिठेहाट, कटाळा, त्रास

**काव्य**—न कविता, कवितेचा एखादा प्रसग, भाग, पद्य रचना —पु दैत्यगुरु, शुक्राचार्य 'प्रेमी द्रुपद गुरुसि जो समत जीवा तमाच काव्याहि।' —मोउद्योग १ २७ 'जो मुनि तयासि प्रिय काम दयाळु काव्य तो तारी।' —मोआदि ९ २८ [स कु=गाणें] ॰**कथा**—स्त्री पद्यात्मक कथा, गोष्ट हा शब्द मुख्यत रामायणाबद्दल योजतात [स] ॰**कळा**—स्त्री काव्य करण्याचें चातुर्य, काव्यकौशल्य, कवित्वशक्ति 'ज्याची काव्य कळा पाहोन।' —श्रीधर (नवनीत पृ २१५) ॰**चोर-चौर**—वि दुसऱ्याचें लिखाण चोरून आपल्या नावावर प्रसिद्ध करणारा ॰**पठक**—पुवि भाट अथवा कविता पाठ म्हणणारा 'हे काव्यपठक कोणी कोणी स्वत हि काव्यें रचीत।' —नि ४० ॰**समस्यापूरण**—न दुसऱ्यानें दिलेला अपूर्ण श्लोक पुरा करणें, दिलेल्या एका चरणास अनुरूप असे नवीन तीन चरण रचणें ॰**सुता**—स्त्री शुक्राचार्यांची कन्या, देवयानी

**काव्हणें**—कावणें पहा

**काव्हरा-वावरा**—कावरा पहा

**काव्हळी-ळा**—(व) आरडाओरड, गडबड, कागावा, गोंगाट 'मुग्गी थोडा वेळ दिसेना तेव्हा आईनें काय काव्हळी केली.' [स कोलाहल]

**काश**—पु कासे गवत, याची वाढ जोराची असते याचा शाकारणीकडे उपयोग करतात देठापासुन दोर करतात हे गवत म्हशींना जास्त आवडतें [स काश]

झाको २ ३०"

**काशश्वास**—पु श्रमयुक्त श्वासोच्छ्वास, धापा, उसासा; [स काश+श्वास]

**काशा**—क्रिवि (काव्य) कशाला ? कशाकरितां ? कशासाठीं ? 'कैलास काशा गिरी' —निमा ११८ 'या काशा जानकीशा।' —आसेतु २५ [कसा]

**का(कां)शा, कासाड, काशिया**—१ स्त्रीअव (व) कुदा गवताच्या ल्हान मुळ्या, दुर्वांच्या मुळ्या 'मशयाचा काशा गोळा करून' —भज १२२ एभा ३१ ३९२ हातीयेरा दुकाळ पडला। मग यासी नागर सापडला। सैन्य नागरावया आला। वीर काशिया काढित।'—एरुस्व १० ७४.२ कडव्याचे तुकडे, याचा उपयोग सरपणाकडे होता (एकवचन काशी—क्वचित उपयोग) [स काश] ॰**भरडणें**—बरळणें, बडबडणें, शिव्या देणें, शिव्या हासडणें

**काशाचा-ची-चें**—क्रिवि कशाचा—ची—चें 'महापुरुष काशाचे। थोर थोराहि।'—दावि ७ २ ६९

**काशानशीं**—क्रिवि कशासाठीं ? 'वादावाद समर्थांशीं काशानशीं करावा।' —तुगा १३८३ [कसा]

**काशानें-ला-स**—क्रिवि कशानें, कशाला, कशासाठीं 'निर्भयो जाले काशानें।' —दावि १२१ 'व्यर्थ कल्ह हा काशाला' —निमा १५ [कसा]

**काशिका**—स्त्री काशी, वाराणसी 'तो विश्वेश्वर राहे येऊनि भक्तार्थ काशिकेमाजी' —नरहरी गगारत्नमाला १५३ (नवनीत पृ ४४३)

**काशि(शिं)दा**—पु एक वनस्पति

**काशी**—स्त्री १ वाराणशी, बनारस एक शहर २ कलिंगड, दरबूज इ॰ लावण्याचा मळा, जागा, तें पीक, वेल (वाप्र) ॰**ची वाट दाखविणें**—ल्हान मुलाना कानाशीं हातानें दाबून धरून वर उचलणें व सुर्याची पिल्लें दाखविणें ॰**रामेश्वराचें अतर**—फारच मोठें अतर ॰**स गंगा नेणें**—गगेच्या पाण्यानेंच गगेचें तर्पण करणें, निरुपयोगी गोष्ट करणें. म्ह॰ १ काशीस गेला काशीदास, मथुरेस गेला मथुरादास=वारा पाहून पाठ देणारा, लुच्चा, कार्यसाधु, माणसास म्हणतात. २ काशी केली वाराणशी केली कपाळाची कटकट नाहीं गेली=वैतागानें यात्रेस गेल्यावरहि ससाराची कटकट न सुटणें ३ काशीस जावें नित्य वदावें=एखाद्या गोष्टीचा ध्यास घेतल्यानें केव्हा तरी ती गोष्ट घडून येईल असा विश्वास 'काशीस जावें नित्य वदावें असा निदिध्यास मुमुक्षूनीं धरावा' —आगर ३ ९ सामाशब्द—॰**कर**—पु १ काशीचा रहिवासी २ काशीयात्रा केलेला ३ (ल) अत्यंत लुच्चा माणूस, काशीकर गुड ह्याच्यापेक्षा नाशिककर शभरपटीनें लुच्चा असतो 'शभर काशीकर एक नाशिक्कर' ॰**गोत**—न सबध जात, जातगगा

(एखाद्या निर्णयार्थ भरलेली) ०चा कातवाल-पु काशी येथील काळभैरव, काशींत करिता पापाबद्दल हा शिक्षा करतो अशी समजूत ०चा पट-पु काशी येथे तयार होणारें व ज्यांत रामायण सीता प्रमुखांचीं चित्रें काढलीं आहेत असें वस्त्र, पट, कापड, हा फार मोठा असतो त्यावरून (स )-वि सर्वसाधारण, थट्टाखोर, श्रमदायक (गोष्ट, भाषण, भाजन, चरित्र) (कि० काशीगें, आणणें) ०चा सोटा-पु अडल लज्जा 'अशा वेषधारी गुरुपाशीवर न थके असतात तरी काशीने सादे असतात '-ज्ञा ५० ०फळ-न काळा-लालसर भोपळा, भगवफळ, पारडी, हा भोपळा खत कड वक्रखेदार असून त्या दिसतो, पांढरा, दोंडरी असतो वेलाची वाढ कमी, दुसऱ्या भोपळ्यापेक्षां याची भाजी कमी गोड असते ०माल-(तजा )मोहर ०यात्रा-स्त्री १ काशीची तीर्थयात्रा २ (सोंगट्याचा खेळ) कवड्यांचें दान दहा किंवा पंचवीस तीन वेळां लागोपाठ पडलें असतां तें पुरुष जातें त्याचें येथे म्हणतात ३ (यादवी ) अल्पवयी वधूवर एकमेकांस भेटलीं किंवा जवळ आलीं असतां येणें म्हणतात ०शिक्का-वि काशीच्या टांकसाळींत पाडलेला रुपया

काशी—स्त्री १ (व ) भात कापल्यानंतर जमिनींत राहि लेला त्याचा बुडखा २ काशा पहा

काशी—स्त्री १ (गो ) देवदारी रिकामा खोका, काश्याव पहा [पो कास्याओ, इं कास्केट ?]

काशी असणें—क्रि (व ) आश्रय असणें, आश्रयानें राहणें [स सकाशात]

काशीद, कासद—पु नेहमींचा पत्र पोंचविणारा दूत जासूद हरकारा -रा ८ २०१ -दिमरा १ ९० [अर कासिद]

कादर्यो—पु (गो ) लोखंडाची पळी [स कांस्य]

काश्याव—पु मोठी पेटी, दाव वाहण्याची पेटी [पो कास्याओ, तुल इं कास्केट]

काश्योत—न लहान पेटी डबी

काश्मिर(श्मी )री—वि काश्मीर देशांतर्वर्ती (केशर शाल लुंगर्डी इ०) -स्त्री वाग्देवता सरस्वती 'प्रभु काश्मिरीं मुकें। नुपजे हें कौतुकें।'-ज्ञा १३ ११६७ ०द्राक्ष-न काश्मीर देशाचे द्राक्ष ह्या द्राक्षाचे घुरक मोठे व विरळ असतात याला विलायती द्राक्षें असेंहि म्हणतात -कृषि ५१३ ०मूर्ति-स्त्री शुभ्र संगमरवरी किंवा स्फटिकाची मूर्ति

काश्मीर—न १ हिंदुस्थानांतील उत्तरेकडचा एक प्रांत २ स्फटिक शुभ्र संगमरवरी दगड 'मग काश्मीराचे स्वयम। का रत्नबीजा निघाले कोंभ।'-ज्ञा ६ २५३ 'काश्मीराचे चक धावती। -ह ३४ १५० ३ लोंकरीच्या कापडाचा एक प्रकार काश्मिरा ४ केशर 'चांदणें शोभे शुद्ध निराळीं। तैसी उटी आंगीं शोभती कीं इंद्रनीळा मयाची पाल्ली। काश्मीराची मुदा।' -ह ३ १५५

काषाय—वि तांबडें, भगव्या रंगाचें (वस्त्र) 'कीं बाह्य म्यवरें भगवें रंगलीं। तैसीं काषायें पांघुरलीं।'-भू २१ [स ]

काष्ट—काष्ठ पहा

काष्टक—न (शाप) कपकडा, (सेल्युलोज याला प्रतिशब्द)

काष्टा—पु धोतर नेसतांना त्याचा जो सोगा पाठीमागें खोंवतात तो, कासोटा (क्रि० घालणें, फेडणें) [स कच्छ+पट-कच्छट, द कच्छुडिया] काष्ट्याचा पळकट-वि एकपत्नीनष्ट्य अव्यभिचारी, स्त्री-पतिव्रता

काष्ठाम्ल—न (शाप) लांकडापासून निघणारें अम्ल इ ॲसेटिक ॲसिड

काष्टि-ष्टी-ष्टी—स्त्री (कु गो ) लंगोटी (उपहासानें म्हणतात) काष्टी नेसुक वस्त्र नुसती लंगोटी तर नसतां वई ना?' कांसोटी पहा [स कच्छ]

काष्टिन—न (शाप) पाळवलाच्या सावरीचें पातन केलें म्हणजे त्यांत हा सांपडतो इ क्रायसिन यास प्रतिशब्द

काष्ठ—न १ लांकूड 'मग तया काष्ठाच्या ठायीं।'-ज्ञा ७ ५६ 'प्रगटिला कारडिय कार्ष्ठी। वचनासाठी भक्ताच्या।' -एरुस्व १ ८४ -पु (ल ) उंच व लुकडा माणूस [स काष्ठ] (वाप्र ) ०घळणें-होणें-क्रि अशक्त होणें, दुर्बल होणें सामासिक शब्द-काष्ठें खाणें-अग्निकाष्ठ भक्षण करणें, चितेंत उडी टाकून मरणें 'तुजसारिखा असतां पिता। आम्हां वैधव्य आलें माता। तरी काष्ठें खाऊं आतां। तुजदेखतां।'-कथा २.२ ४९ सामाशब्द- ०कुट्ट-पु सुतार पक्षी [स] ०घटा-स्त्री ओढाळ गुराच्या गळ्यांत बांधावयाचें लांकडी ओंडणें लोढणें [स] ०तनु-पु. १ (शाप) (इ) कपकडा सेल्युलोस २ लाकडांतील तंतु ०पुतळा-ळी-पुस्त्री लाकडाची कळसूत्री बाहुली 'सूत्रधार न हालविता। काष्ठपुतळा नाचेना'-ह १ ६५ 'दयनाथ इ काष्ठपुतळी सूत्र तुझ्या हातीं।'-दप ८ ८ ०माळा-स्त्री तुळशीच्या काष्ठाची माळा 'काष्ठमाळा गळमाळा।'-दा १३ १० २ ०यंत्र-न अपराधी मनुष्याच्या हातापायांत घालावयाचा खोडा [स ] ०युद्ध-न घुडिवळांचा डाव 'काष्ठयुद्धांत सरशी होणें हें जसें खेळणाराच्या पटाईतपणावर नेहमीं असतें '-नि ९७१ ०वत्-वि भय आश्चर्य वगैरे कारणानीं लाकडाप्रमाणें निचेष्ट झालेला, लाकडासारखा ताठ 'मुलास दृष्टीनें पाहत। तों हातपाय झाले काष्ठवत।'[स] ०वेदिका-स्त्री लाकडी चौरंग, पाट, लाकडाचें उंच आसन 'पायऱ्याची काष्ठवेदिका तयार करण्यात यऊन '-ऐरापुप्र(बडोदें) ५ २९० ०स्वार्थ-पु लाकडें विकण्याचें काम 'येक काष्ठस्वार्थ करिती। येक गुभा येववादिती।'-दा ६ ९ ७

काष्ठा—स्त्री. १ वेळेचें माप; अठरा निमिषांचा काल, कलेचा एक-तिसांशाचा भाग. २ दिशा. 'नारें काष्ठा धुमती।' —दे. कृष्णजन्म ६८. ३ मर्यादा. 'देखोन पुंडलिकाची निष्ठा। नेगों चांगली पूर्ण काष्ठा।' —य ४६६. [सं.]

काष्ठिका—स्त्री. काठी. 'धन्य तीं गोधनें सांवळी काष्ठिका।' —तुगा २०८.

काष्ठौषध-धि—नस्त्री. औषधोपयोगी वनस्पति; त्यांचीं मुळें, पानें, फुलें वगैरे. [सं.]

कास—स्त्री. गाय, म्हैस वगैरे पशूंची दुधाची ओटी. 'सुरभीच्या कासेसी मुखें होऊनि वत्स लागावें।' —मो. ०घालणें—गाय, म्हैस वगैरे ओटी घालावयास लागणें; गाभण असतां जसजसे दिवस भरत येतात व ती विण्याची वेळ जवळ येते तसतशी तिची ओटी मोठी होत असते त्याला कास घालणें म्हणतात

कास, कांस—स्त्री १ धोतर, लुगडें यांचा कांसोटा, लंगोटी; काचा; (क्रि० घालणें, खोचणें; फेडणें). 'तेंचि तें कास गुरुराज याची।' —दावि ४२०. 'तुळसीहार गळां। कासे पितांबर।' —तुगा २.' भक्तंतासि बांधणें कांस। मग भक्तांसी काय उणें।' —पांप्र ३९.३४. २ (ल.) आश्रय, आधार. 'कामक्रोधलोभांची कास। न सोडीच पाळिली भाष।' —ज्ञा १६.४४८. [सं. कक्ष] ०कसणें—घालणें-बांधणें—१ कासोटा घालणें. 'हा सीतेलागीं जरि नत मी कशिनेंचि तथापि कास हा—सीते' २ (ल.) काम करण्याला तयार असणें; कंबर बांधून काम करण्यास तयार असणें, सकल्प करणें. 'आणि होय येवढी कास। कासिली जेणें।' —अमृ ७.१२९. 'तों पवन म्हणे हूं घाल खलांतिका दिसो कास।' —मोभीष्म ५.३६. —कासेस लागणें, कास धरणें—एखाद्या बलिष्ठ माणसाच्या आश्रयार्थ जाणें. 'तरी आम्हीं तुम्ही धरियेली कास।' —तुगा १६०७. 'भगवंताची कास धरावी आणिक आस कशास रे।' —सेस लावणें—आश्रय देणें, आधार देणें. 'आमुचें चाळकपण कृष्णासि आलें। कासें लाविलें जनार्दनीं' —एरुस्व १६.१६५.

कास—न १ (कों.) कुरण (गवताचें) [सं काश=गवत]

कास—स्त्री हलकी किंवा भारी जमीन ही बागाईत किंवा जिराईत करण्यासाठीं रयतेस दिलेली असते या जमिनीचे ल्हान ल्हान भाग पाडून ते लागवडीस आणतात, तथापि सरकारसारा मात्र त्या भागावर किंवा त्यांत उत्पन्न होणाऱ्या सरसनिरस पिकांवर न बसविता सबंध जमिनीवर बसविलेला असतो. केव्हां केव्हा निव्वळ बागाईत किंवा जिराईत जमिनीलाहि कास म्हणतात. 'कासबंदी व कासजमीन पहा. २ (कों) खाचराचा एक ल्हान भाग. खत वगैरे साठविण्यासाठीं राखलेला खाचराचाच भाग. ३ (माण.) दुसरीकडे पुरवणीसाठीं किंवा भरीसाठीं बक्षीस दिलेली जमीन. —पु १ (कु.) डोंगरावरील वरकस भागांत मशागत केलेली म्हणजे धान्य पेरण्यास योग्य केलेली जमीन. २ (कु.) रेताड जमिनीचें मोठें खाचर. [सं. कृष्=कसणें]

कास—विक्रिवि. १ (शिंपी) सरळ. २ सरळ कापलेलें कापड; याच्या उलट हराव, हरेफ=तिरकस.

कास—पु खोकला. [सं. कास]

कास—न. (गो.) शिकार.

कांस—स्त्री. १ कास १ पहा. २ कास २ पहा.

कांस—स्त्री. (गो.) फूत्कार, यातना. [ध्व.]

कांस—पु (गो.) बळ; आवेग; तिडीक.

कांस—स्त्री. (नाविक) काठीचा बुंधा खालीं दबण्यासाठीं दुरमीणास व काठीस अडकवावी लागणारी दोरी (याकाच्या दुरमीणास एक शेवट-टोंक अडकवून दुसरें शेवट काठीच्या बुंधास फेरा देऊन दुरमीणास दुसऱ्या योकतास अडकवून ठेवतात. [सं. कृष्=ओढणें]

कासई—न १ (व.) (स्त्रियाचें) काळ्या रंगाचें पातळ. २ सीमांतपूजनाचे वेळीं स्त्रियांना द्यावयाचीं मानाचीं लुगडीं.

कासकवळी—स्त्री. कंबरेची मिठी. 'दोघे आले कासकवळी।' —स्या ३.१३.६५. [कांस+कवळणें]

कासकुडा—स्त्रीअ थंडीचें कापरें; कापणें, कुडकुडणें; हुडहुडी. (क्रि० घेणें; देणें.) [कुस द्वि]

कासकूस—स्त्री. काचकूच; टंगळमंगळ; अळंटळं; धरसोड. (तन्हेवाईक शब्द)

कास(ज)री—स्त्री. ज्याची दोरी घोड्याच्या पाठीवरून शेपटीखालून गेलेली असते असा लगाम काजगी पहा.

कासजमीन—स्त्री. प्रतवारी न लावलेली सरसकट जमीन, हिच्या वरचा आकार एकंदर म्हणून बसविलेला असतो. हा टराविक नक्त असतो कासबंदीपद्धतीप्रमाणें कुटुंबाची सर्व मालमत्ता काय आहे हें कासजमिनीवरून समजतें कासबंदी आणि कास पहा.

कासंडी-सांडी—स्त्री एक प्रकारचें भांडें (धातूचें), चरवी, गुंडी [सं कास्य+हंडी]

कासणी-नी—स्त्री एक वनस्पति, एका झाडाचें पाडरें फूल. चिकरी [हिं]

कासणें—उक्रि १ काचणें, झिजणें. २ बांधणें; कसणें. (कास, कासोटा) 'कासे कासिली निजभक्ति।' —रास ४.३६. ३ कमर धरणें, कासेस लागणें. 'पोहणार आइता कासे लेवीं।' —ज्ञा १३.५४५

कासंदा—पु कासवदा पहा.

कासफोड—पु कासेफोड पहा.

**कासवंदी**—स्त्री १ निरनिराळ्या प्रतींच्या जमिनी ज्यात असतात अशा गावच्या जमिनीचे प्रतवार निरनिराळे तुकडे कर ण्याची पद्धत एकदर जमिनीचा मगदूर पाहून त्यावरून प्रत्येक तुकड्यावर प्रतवार उत्पन्नाप्रमाणे सारा बसविण्याची रीत वास पहा

**कासविघा**—पु कासवंदी गांवातील जमिनीच्या निरनि राळ्या तुकड्याचे प्रतवार सारा बसविण्याकरिता धरावयाचे एक परिमाण, सान्यासवर्धी किंमत काढण्याचें एक माप

**कासया**—क्रिवि ( काव्य ) कशाला ? कां ? कशाबद्दल ? कशाकरितां ? 'कासया वहावी चिंता मनीं मग जहाल । -विक ७ 'नाना साधनीं साक्षपें। कासया सिणावें । ' —दा ४ ६ २२ [कसा] ०चा-कशाचा? कोणत्या गोष्टीचा ? कोणत्या प्रकारचा ? 'प्रपच कोणें निर्मिला । कासयाचा उभारला।' —विपु २ १०१ ०ला-कशाला ? ' विस्तार करणें कासयाला । ' —दावि १८५

**कासर**—पु १ कोकिळ पक्षी २ रेडा ' देवीसमक्ष उरला त्रिभुवनदुर्जयहि काय कासर तो । ' —मोद्रोण ५ ७२

**कासरा**—पु १ बैलाना बांधलेली लगामासारखी दोरी, ही वेसणींतून ओवतात बैलाच्या शिंगाना बांधलेली दोरी २ आसूड, चाबूक-शास्त्रीको [स कश-कशा=दोरी, चाबूक] (वाप्र) कासरा भर किंवा दोन कासरे दिवस किंवा सूर्य येणें-राहाणें=क्षितिजा पासून कासऱ्याच्या लांबीइतका सूर्य उगवल्यानतर वर येतो किंवा मावळतांना राहतो त्यावेळीं, शेतकरी व खेडवळ लोकात म्हण तात, सकाळचा सात-आठ वाजण्याचा किंवा सध्याकाळचा पाच सहा वाजण्याचा सुमार

**कासरी**—स्त्री भाजी किंवा फळें यांची कापून वाळविलेली फोड, काचरी

**कासलाठो**—पु ( कु ) ( अव कासलाठे ) कलथा

**कासली**—स्त्री एक वनस्पति, हिनें सापाचें विष उतरतें असें म्हणतात हिच्या फळास मुद्रा म्हणतात, मुरुस वनस्पति ( ? )

**का(का)सव**—नपु १ कूर्म, पाण्यातील एक प्राणी, याची पाठ अतिशय कठिण असून पोट फार मृदु असतें काहीं कासवें जमिनीवर फिरणारींहि असतात २ हातास किंवा पायास होणारा, आत पाणी असलेला एक फोड, काट्याफोड हा काटा वगैरे टोंचल्यानें होतो ३ रांगोळीची किंवा पोतेची कासवासारखी काढ लेली आकृति [स कच्छप, प्रा कासवो-कच्छवो झेंद कश्यप, हिं कछुआ, सिं कछउ बच्छू व कान्छिन] म्ह० ( गो ) १ कास वाक कोंवो जमान=अंगरीं विरुद्ध परिस्थितींतील मनुष्य जामीन राहणें २ कासवा मामान गाड्रां ( =गाठें ) आवुल्ली=सगळा कारभार आटोपणें, आवरून धरणें ०दृष्टि-स्त्री दयादृष्टि, कृपादृष्टि ' प्रतिदिन इस दृष्टीं कासवाचेच देखा ।'—सारुह २ ४८ ०पृष्ठ-न ( काव्य ) कासवाची पाठ ' बहु कठोर म्हणे धनु जानकी । निपट कासव पृष्ठसमान कीं । ' -वामन सीतास्वयवर २४ -याचें तूप-न असभवनीय गोष्ट, मिथ्या कथा ( सशाच्या शिंगाप्रमाणें ) कासवी इरलें-नपु ( मावळी ) कासवाच्या पाठी सारखें केलेलें एक प्रकारचें गोल इरलें हें फक्त डोक्यावर धनात -च्याची पाठ-स्त्री कासवाची पाठ, पोटातलें म्हणून जो रोग होतो त्यावर औषधासारखा हिचा उपयोग होतो ०च्या रोग-पु १ बस्तिप्रदेश ताणला जाऊन त्याच्या अंगीं जें काठिण्य येतें तो रोग २ जनावरांचा एक रोग [ कासव+रोग ]

**कासव(धं)(विं)दा, कासिंदा**—पु एक झुडप याची उंची कमरइतकी असुन तराटयापेक्षां याचीं पानें बारीक फुलें पिवळीं असुन हंग दाभणासारखी जाड व लाब असते -वगु २ ४३

**कासवळ**—पु तिळाची एक जात

**कासश्वास**—पु कफ व दमा, श्वासावरोध [ स कास+श्वास ]

**कासळणें**—अक्रि ( कों ) धापा टाकणें, दम लागणें, ऊर्ध्व लागणें ( चढण चढण्यानें, धावण्यानें ) [ स कास ]

**कासा**—पु १ ( कों ) समुद्रात असलेला उघडा व सपाट खडक हा कधीं कधीं पाण्याच्या आंतहि असतो २ केऱ्याचा मध्यभाग -शर [ स कच्छप ]

**कासों**—न ( गो ) कासवाच्या आकाराचें, पसरट चिनी मातीचें किंवा लोखडाचें तोंड धुण्याचें किंवा लघवीचें तस्त

**कासाई**—स्त्री ( पोवाडा ) लुगड्यातील एक प्रकार कासइ पहा

**कासाकुळी**—स्त्री कासावीसी, तळमळ, तगमग, घाबर गुंडी [ स कास+व्याकुळ ]

**कासाची लागवड**—स्त्री ( कों ) बाग्याच्या लागवडीचा एक प्रकार -कृपि ६०९

**कासाडी**—स्त्री कासडी पहा

**कासादा**—पु कासवदा पहा

**कासार**—न सरोवर, तलाव, डोह ' म्या तुज अमृता श्रिपुढें मिरवावें स्वयश काय कासारें । ' —मोभीष्म १२ ५४ ' तया कासारीं राजहस पाहे । ' —र ९ [ स कासार ]

**कासार**—पु ( मूळ काचार, -कुरीनें ) बागड्या करणारा, भरणारा [ स काचकार ]

**का(का)सार**—पु १ एक जात व तींतील व्यक्ति, पितळ, तांबें, कासें वगैरेंचीं भांडीं घडविणारा व विकणारा ' चार शेर ताच्याला कां म्याला म्हणे कासार दत आधेली ।' —ऐपो ३७२ ०डा-पु कासारास निंदार्थानें म्हणतात ०थळ-न बागडी वाले, भाडीवाले कासार आणि पत्रकरी याच्या बसील कर.

०भट्टी–स्त्री गाडीवाले, भाडीवाले याच्या भट्टीवरील सरकारी कर ०भांडें–न (व) ताम्यापितळेचें भांडें ०भात–पु (राजा) जाडेभरडे व अर्धवट सडिक अशा तांदुळांचा, फडफडीत शिजलेला भात [स कास्यकार–कासभार]

**कासावर्णे**—अकि (कों) कासळणें पहा [कास]

**कासावयलें भूत**—न (गो) काजऱ्यावरचें भूत, पिंपळावरचा मुंजा

**कासाविसी**—स्त्री व्याकुळता, घाबरगुंडी, त्रास, तळमळ, अतिशय अस्वस्थता

**कासावीस**—वि व्याकुळ, घाबरा, फार क्षुब्ध, धडपडणारा, तळमळणारा (दु खानें किंवा तहानेनें वगैरे) 'बहु कासावीस झाला भक्तासाठीं।'–तुगा १०३ [स कास=खोकला, श्वास] ०होणें–क्रि (माग) धापा टाकणें, दम लागणें, जलद श्वास चालणें, जीव घाबरणें

**कांसाळ**—स्त्री (गो कासाळें) काशाची मोठी थाळ (ही गौवतीवरोवर वाजवीत असत) –वि टाळकुट्या [कास्य]

**कांसाळवत-कांसाळू**—न १ (कों) मोठया पानाचें अळू (भाजी), काळे पांढरे असा याच्या दोन जाती आहेत याच्या देठाची भाजी करतात व कायाचे साडगे करतात –कृषि ६४५

**कासिनी**—स्त्री कासणी पहा

**कासिंबर**—पु (काश्मीर अप) 'आले द्राविड गौड कोंकण कर्णाटा कोल्हार कासिंबरी।'–रामसुतात्मज द्रौपदी वस्त्रहरण २०२ अक्क

**कासिया**—अ कशाबद्दल, कासया पहा

**कासीणें**—सक्रि परजणें (शस्त्र) 'ते रतिरायाचे मार कासी।'–भाए ४४५ [स काश्=प्रकाशणें]

**कासीद**—पु जासूद कासीद पहा

**कासींद**—पु एक वृक्ष कासवदा पहा

**कासीस**—न हिराकस [स]

**कासुंदा, कासांदा**—पु कासवदा पहा

**कांसुल-ला-लें**—न (कु गो) स्वयपाकाची ल्हान पळी

**कासू**—स्त्री काश नावाच्या गवताची करमुणी कासुनि भूमि सारविती।'–वमा २१ [स काश]

**कासें**—न धन्ची धातु जस्त व तांबें याची मिश्र धातु कथील चार भाग व शिसें एक भाग याची मिश्र धातु याचे दोन प्रकार आहेत–पुष्पकासें व तैलक कासें पुष्पकासें हें औषधोपयोगी आहे [स कास्य, इ ब्राँझ]

**कासेन-नी**—क्रिवि कशानें? कोणत्या प्रकारें, कशाच्या योगानें 'वैरियें कासेन नाशति।'–गीता १२ ७४८

**कांसेफोड**—पु पायाचा किंवा हाताचा तळवा याम होणारा मोठा व पाण्यानें भरलेला पाढरा फोड, हा गुराच्या पायालाहि होतो, कुकडा, कोणा, कासव पहा [कासव+फोड]

**कांसोटा**—पु धोतर, लुगडें याचा पुढील सोगा किंवा टोक पाठीमागें खोंवनात तो, काछा. (क्रि० घालणें, मारणें, खोंचणें, माघणें, सोडणें) [स कच्छ+पट–कच्छट, कच्छुटिया–कच्छोटिका, तुल क कच्चे] –टेकार–वि लंगोटया, लंगोटबद 'कैसी कासोटेकारा भगवता। वरिपडी जालिसे।'–शिशु २११ –टयाचा-खबरदार, वळकट–चें पाणी प्यावयाजोगा–वि ज्याच्या हातुन व्यभिचार कदापि झाला नाही असा (पुरुष–स्त्री) –टयाचा हलका–वि विषयी, जारकर्मी

**कांसोटी**—स्त्री १ कच्छ, कासोटा 'मग रुद्र धावे पाठोपाठीं। तेणें सहज सुटली कासोटी।'–कथा २ ५ ६६ २ लंगोटी [कच्छ+पटी]

**कॉस्टिकम**—न इ (होमिओपाथी) मूळव्याध, मोतीबिंदु, अर्धांग, झोपेंत लघवी इ० वरील औषध

**कास्त**—पु ब्राह्मणातील एक जात व तींतील व्यक्ति

**कास्तकार**—पु शेतकरी [स कृष्+कृ]

**कांस्य-कार**—कासें व कासार पहा [स]

**काहडणें**—अकि काढणें पहा 'पाऊल मागें काहडीता तेथून।'–दावि १४१

**काहणी**—स्त्री कहाणी पहा 'तुका म्हणे करें काहण्या काय सागाल गोष्टी।'–तुगा १९५

**काहलि-हिली बंदर**—न काहली बदरचें मोतीं, हें हलक्या जातीचें व लालसर असतें काहली बदर हिंदुस्थानच्या आग्नेयीस आहे सिलोन?

**काहली, काहिली**—स्त्री आळस, सुस्ती, 'जेणें जेणें काहली केली। तेणें जीविका बुडविली।' [अर कहल=आळस, फा काहिली]

**काहवर्णे**—अकि त्रासणें, कावणें पहा 'कामक्रोध दीर फारच खदे जीव माझा काहवला'–पला १२

**काहवा**—पु गोंधळ, कोलाहल आरडाओरड 'येती गोकुळिंच्या समस्त युवती ऐकोनि तो काहवा।'–आनंदतनय, नवरसचरित्र ४१ ११८ [ध्व]

**काहविणें**—सक्रि कष्टी करणें, त्रास देणें 'तृष्णेचा तो काहो काहवितो'–तुगा ३८३३ [कावणें पहा प्रयोजक]

**काहळ**—काहाळ पहा 'शृंगें डिमडिमी काहळ मोहरी। झल्लरी मृदग ताल नानापरी।–जै १८ ३८

**काहाडणी, काहाडणें, काहाण, काहात, काहार, काहाली**—हे शब्द कढामध्यें पहा

काहातणें—अक्रि (व ) दपापणें कहातला पहा

काहार—पु. भोई, कोळी, कहार पहा 'काहारीं मग जाळियांत धरिला ता मत्स्यही चागरा'–मकक कृष्णकौतुक २ २६

काहार—पु कार दगड पहा जेथें पाण्याचा मार निर्माण होतो ( पूल वगैरे आणी ) तेथें हा उपयोगांत आणतात

काहार—पु फार त्रास कहर पहा 'पाडें पिटिलें काहारें।' –तुगा ६५४ 'यळी सर्वस्वें उदार। जेणें उभारिला कार। करूनि काहार। तो पाताळीं घातला।' –तुगा १२०१

काहाले—अ (खान ) कशाला ?

काहायणें, कावणें—अक्रि कष्टी होणें, त्रासणें कावणें पहा

काहाळ(ल)-ळी—नस्त्री (काव्य) एक चर्मवाद्य ढोल नगारा, भेरी शिंगासहि म्हणतात 'तेव वाजती दास काहाळा।' –शिशु १०२६ 'ढोल भेरी मृदंग काहाळी।' –मुसादि ३२ ३१ 'काहाळ ढोल मृदंग जाण। ह्यावरी हातसे हरिकीर्तन।' –भवि २५ ३२ [ स काहल ]

काहिणी—स्त्री काहणी, जोंधळ्यावरील एक रोग कहाणी, काणी पहा

काहिरा—वि जयस्वी, यशस्वी [ फा कहार=बलिष्ठ, विजयी ]

काहिल काहिली, काहली—स्त्री १ तापानें किंवा उन्हा मुळें अंगाची होणारी तगमग, तळमळ, त्रास ( क्रि० होणें )

काहिल-ली—स्त्री उसाचा रस कढविण्याची मोठी कढई हिचा तळ सपाट असतो [ स कटाह प्रा काहिल्लीआ ]

काहीं—वि १ किंचित् थोडें, अल्प लहान (संख्या किंवा परिमाण), थोडेसें ( वस्तु किंवा व्यक्तीपैकीं ) २ विवक्षित समु दायातून अंश अंशमात्र, थोडा किंवा काहीं भाग कित्येक, थोडा किंवा पुष्कळ, कमी किंवा जास्त 'आंबे काहीं खाल्ले काहीं लोकांस दिल्हे, काहीं ठेविले ' ३ फार नव्हे परंतु थोडेसें, अल्प प्रमाणांत केवळ उपाशीं जाऊं नको काहीं खा।' ४ एखादी अनिश्चित गोष्ट किंवा काम वगैरे 'तुम्हांपाशीं काहीं बोलावयाचें आहे ' –क्रिवि १ अवर्णनीय प्रकारचें, तऱ्हेचें, ज्याची फोड करतां येत नाहीं अशा तऱ्हेचें 'ब्रह्मप्राप्तीचें सुख काहीं विल क्षण आहे ' २ अर्थ स्पष्ट करण्याकरितां 'तो काहीं गवत खात नाहीं अन्न खातो ' ३ (निषेधार्थ) मुळींच नाहीं केव्हांहि नाहीं 'राहेन मी हें न घडेचि काहीं ।' ४ भलतेंच मनात नसलेलें अकल्पित काहीं करतां काहीं होणें ' ५ कोणतीहि युक्ति शक्कल 'कांहीं तरी करा ' [स किम्, किम्+हि] ०एक–वि १ थोडेसें कित्येक (मनुष्य वस्तु) २ (निषेधार्थ) एकहि मुळींच, तिळमात्रहि नाहीं 'पेंढाऱ्यांनीं काहींएक भांडें घरांत ठेविलें नाहीं '

०काहीं-वि १ अल्पस्वल्प, यथें थोडें तेथें थोडें, सान्या समुदायापैकीं काहीं व्यक्ती 'कांहीं काहीं दोनें घरीं आहेत काहीं काहीं वाईट आहेत '–क्रिवि २ (अनेक, बाहुल्य दाखविणाऱ्या शब्दाशीं जोडून ) अवर्णनीयप्रकारें, अतिशय कमालीचा, 'आम पावसानें काहीं काहीं दाणे केले ' ०कांहींचें काहीं–च्या काहींच-वि भलतींच भलतें, भलतेंसलतें, अवास्तव, बताल, बाष्कळपणानें, गैरलागू अमर्याद, अप्रासंगिक, बेताल, काहीं तरीच विलक्षण, अनपेक्षित 'एकदां जें आमचें गाडग फुटलें तें काहींच्या काहींच!' –पकोघ ०न-होतेला-नव्हतेला-क्रिवि जणू काहींच घडलें नाहीं अशा अर्थानें 'रात्रीं चाऱ्या करून दिवसास काहीं नव्हतेल्या गोष्टी सांगतो ' ०काहीं-वि थोडा अंश, थोडेसें 'आत्तु माला तो गलिया। कांहीं काहीं जें उरे।' –ज्ञा १८ ४१२ 'औषध घेतांच काहींकाहीं दिसू लागलें ' 'कांहींकाहीं मूळ घतला काहींकाहीं ध्यावयाचा आहे ' [कांहीं द्वि ]–क्रिवि भलतेंच, अवास्तविक, अनियमित, असबद्ध काहींबाही बोलतां मदवचनी ' –मराठी ६ वें पुस्तक पृ १०३ ०तरी-वि वाटेल तें, वाह्यात, असबद्ध

काहीन—वि (जरतार ) मध्यम तऱ्हेचें

काहीर—वि थकलेला, भागलेला, निःशक्त, विकल [ अर कहल=आळस, फा काहिली ]

काहील—स्त्री १ काहिल २ पहा –कृषि ४७४ २ थिरडें किंवा आंबोळ्या करण्याचा लोखंडी थाळा, तवा

काहील—वि निदनर, कुंठित, खंडित–बाड–समा १ १३८ [अर काईल ]

काहींसा—वि जाणीव होण्यासारखा, दिसण्यासारखा, मासमान ' हा काहींसा आहे ' =याच्यात काहीं पाणी, अर्थ आहे

काहींसा—क्रिवि १ काहीं अंशानें, थोडासा, किंचित्, अंशमात्र, अल्पसें ( नामें व विशेषणें याच्या अर्थाचें नियमन कर ण्यासाठीं हा शब्द योजितात ) 'काहींसा काळा पांढरा, गोड, आवड ६० ' २ अनिश्चितपणें, गैरमाहितपणानें, अनिर्णीतपणें ' हा काहींसें खातो, बोलतो, जाणतो, करतो '

काहुरा—पु (काव्य) अंधारें, दाट काळोख 'तों चंद्र गेला मावळोनि। काहुरा गगनीं कोंदला।' [ का करि, काल=काळा ]

काहून—अ (व ना ) काय म्हणून ? का ?

काहूर—न १ दाट काळोख, सामान्यतः अंधारी ( विशे षत दाट व काळेकुट्ट ढग आभाळांत आले असतां पडलेली) (क्रि० येणें उठणें ) २ (ल ) काळा डाग कलंक, कालिमा, मळ (क्रि० आणणें) ३ (ल ) मोठें संकट, कचाट, आपत्ति (क्रि० येणें, गुजरणें, आणणें ) ४ दुभाड, आळ ५ कहर या अर्थी चुकीनें योजतात ०काहूर–वि कावराबावरा [फा कहर]

फाहुल—स्त्री आरडाओरड, गोंधळ (मनुष्ये किंवा पशू याचा ).

फाहो—पु घोष, नाद, छद. 'तृष्णेचा तो फाहो काह वितो।'–तुगा ३८३३.

फाहोर—एक वनस्पति -नाको.

काद्यला-ले, काद्या, काद्यास—अ (व ना ) कशास? कशाला? 'तव भीमकीआ भण्तिलें । काद्या हानतु वस्तळें।' –शिशु १८०. 'येर काद्या मोलें वेंचूनि।'–ज्ञा १८.९४७ अहे ताचा समो फुटे। तरी काद्या होती भाटे । शास्त्रें तुझीं।–अमृ ९ ७० ०चा–कशाचा 'तया वधु कोण काद्याचा।'–ज्ञा ६. ९५ ०चें-क्रिवि कशाचें? 'काद्याचें निर्वाण माइलें।'–स्वानु २ १ २२ [कस्य+कृते, अर्थे]

काळ—पु काल व त्याचे सामासिक शब्द पहा १ यम, मृत्यु 'काळ करीत बैसला लेखा गा'–तुगा ४१४७ 'नवल नव्हे काळसा तो पमेला वाटला।'–विक २१ २ (काळ=मृत्यु यावरून ल.) अतिशय नाश करणारा, फडशा पाडणारा, माणूस किंवा वस्तु जसें –तुपास-तेलास-रांडास–काळ 'अग्निहोत्राचा सुकाळ। वडापिंपळासी काळ।'–एकनाथ 'ही मुलगी सर्वांस काळ आहे' ३ नाश, मृत्यु, अंत, शेवट 'जर आलेल्या सावकाराचा खचित काळ होणार असला तर कौल दे '–विवि ८ १ १७ [स काल] (वाप्र) काळाच्या तोंडीं घालणें - देणें-जाणें-पडणें-येणें-सांपडणें, काळाच्या दाढेंत जाणें-देणें–स्मशान दाखविणें, पाहणें, मारणें, मरणें, अति मोठ्या संकटांत, धोक्यात घालणें, आणणें, पडणें इ० म्ह० १ कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ=आपल्याचपैकीं एखादानें शत्रूस मिळून आपला नाश करावा यामर्थी २ खाण्याला काळ भूमीला भार=काम न करणारा, ऐतखाऊ 'खाया काळ भुईस भार जगला पापा कराया धणी।' –रामशास्त्र्याचा राघोबास उपदेश ओक–पुष्पवाटिका 'भाकड म्हैस उगीच खायास काळ' ३ मारल्याचा सुलाम पळल्याचा काळ=जबरदस्तास भिणारा परंतु गरिबास त्रास देणारा ४ काळ आला होता पण वेळ आली नव्हती=जिवावरच्या संकटांतून मोठ्या शिकस्तीनें सुटणें सामाशब्द- ०कंटक–पु १ मोठें संकट, अनर्थ, कचाट २ फार भांडखोर, कळ लावणारा, त्रासदायक माणूस ०कष्ट–पुअव प्राक्तन व यातायात, दैव व दगदग, भाग्य व प्रयत्न साधारणपणें षष्ठी विभक्तींत प्रयोग, जसें–काळकष्टाचा पैका-पदार्थ-प्राप्ति-मिळकत-भोग - काम इ० 'काळाकष्टाचा हक-माल कधीं जात नाहीं' ०कोळु–वि काळाला (यमाला) कवळणारा, खाणारा –नागा ७४३ (–शर) [काल+कवल] ०खर्ग–पु यमाचें खड्ग, तरवार 'तो काळखर्ग अकस्मात। गगनपंथें उतरत।' [काल+खड्ग] ०ज्वर–पु विषमासारखा मुदतीचा व भयंकर प्रकारचा ताप 'जया काळज्वर आंगीं बाणे।' –ज्ञा ४.२०० ०झोंप–स्त्री १ मृत्यूच्या वेळची झोंप, शेवटची झोंप. २ (ल ) प्रत्यक्ष मृत्यु 'मलाहि कधीं तरी या . रण- मंडळांत काळझोंप घ्यावी लागणार '–भा ११६ २ अति गाढ झोंप, तंद्री, मूर्च्छा ३ जींत असतां कांहीं संकट, अरिष्ट गुदरतें अशी झोंप ०टोला–पु मृत्यु 'झोला निरसेल काळटोला रे।'–आप २४ ०तिथि–स्त्री पुण्यतिथि, मृत्युतिथि (क्रि० यणें, भरणें ) ०धाड–स्त्री आकस्मिक व सर्व बाजूंनीं घेरणारा, अनिवार्य असा कहर, अनर्थ (आग किंवा चोर याचा), संकटाचा आकस्मिक हल्ला ०निद्रा-नीज–स्त्री काळझोंप ०पुरुष–पु १ यम किंवा त्यासारखा क्रूर त्याचा दूत २ भयंकर, आडदांड माणूस ३ (ल) पोलीसचा शिपाई 'येवल्याच्या काळपुरुषानें कृत्य उघडकीस आलें नव्हतें '–टि १ १. ३६९. ०पुळी-फोड-पुई–स्त्रीपुळी अग्निरोहिणी, चाळपुळी, काखेच्या आसपास किंवा पाठीच्या कण्यावर मांस विदारण करणारा फोड. यानें आत दाह होऊन वेदना व ज्वर हीं लक्षणें होऊन विस्तवानें भाजल्याप्रमाणें आग होते व सात, दहा किंवा पधरा दिवसांत रोगी मरतो हा रोग असाध्य आहे –योर २ ४२५. गुरानाहि अशाच तऱ्हेचा एक रोग होतो विष्णुकांत व करडीचें मूळ कांजींत वाटून त्याचा लेप केला म्हणजे काळपुळी जाते –योर२ २०७ 'घोखटें वर्णे काळफोड।'–दा ३ ६ १७ ०भैरव–पु काशी येथील ग्रामरक्षक देवता, काशीचा कोतवाल, शंकराचा एक अवतार. काळभैरवाचा सोटा–पु पोलीसचें कोतवालीचें काम 'तुझें माझें रक्षण करण्याकरितां काळभैरवाचा सोटा कोणाच्या हातीं आला आहे ' –भाऊ २२ ०मुख–न मृत्यु, मृत्यूचें तोंड 'जिवा कर्मयोगें जनीं जन्म जाला। परी सेवटीं काळमुखीं निमाला।'–राम १४. ०मृत्यु–पु आकस्मिक, पूर्ण आयुष्य भरण्यापूर्वी आलेलें मरण, आकस्मिक मृत्यु 'काळमृत्यु न बाधे जाण।'–गुच १४ २७. ०रजनी–स्त्री एक रात्रिचर देवता 'वेताळ मुंज्या काळरजनी।' –ह १३ ६८ ०रात्र–स्त्री भयकर किंवा प्रळयकाळची रात्र. 'काळरात्रीचीं कटकें । उठावलीं जैसीं।'–ज्ञा ११ १९९ ०रूप-रूपी-स्वरूप–वि यमासारखा भयकर अक्राळविक्राळ किळसवाण्या रूपाचा (माणूस) ०रोग–पु असाध्य, प्राणनाशक रोग ०वंचना–स्त्री १ कालाचा अपव्यय २ मृत्यूला फसविणें (योगी लोक ब्रह्मांडीं प्राण नेऊन मृत्यूपासून वाचतात अशी समजूत आहे) ०सर्प–पु १ यम, मृत्यु २ वेळ (सर्व भक्षक, काळरूपी सर्प ) काळाचा काळ–वि जो मृत्यूलाहि भीत नाहीं असा अतिशय भयकर, भुतासारखा (माणूस). –ळाचा फेरा–पु यमाची फेरी, कांहीं तरी अपरिहार्य किंवा भयकर अनर्थ, रोगाची साथ

काळ—पु १ वेळ, प्रसंग, समय २ दुष्काळ, कठिण प्रसंग ३ दैव, नशीब, परिस्थिति 'हल्ली आमचा काळ फिरला आहे'–विवि १० ५–७ ११६. 'मग नाहीं काळ अनुकूळ!' –मृ ७ ४(व्या) क्रियापदाच्या रूपांतील ज्याच्यावरून ती क्रिया कोणत्या वेळीं घडली असा जो बोध होतो तो [सं काल] (वाप्र) ०अनुकूल होणें–नशीब फळफळणें ०कंठणें–कसेंबसें काळ दवडणें, वेळ घालविणें, दिवस काढणें ०विन्मुख होणें–फिरणें, काळानें घेरणें–वेढा घालणें–नशीब किंवा दैव वांकडें होणें, वाईट दिवस येणें काळाची गांठ मारणें–कसा तरी घालविणें –ळानें ओढणें–घोळावणें–नशिबानें संकटांत किंवा मृत्युमुखीं पडणें –नें घेरणें–मृत्यु येणें 'विषमज्वर येऊन शेवटीं काळानें घेरलें'–विवि ८ ७ १२८ –नें मागें पाहणें–नशीब किंवा परिस्थिति प्रतिकूल होणें –नें हातीं धरणें–नशीब किंवा परिस्थिति अनुकूल होणें 'त्याला काळानें हातीं धरलें आहे' –ळावर दृष्टि ठेवणें–देणें–नशिबावर किंवा पुढें येणाऱ्या परिस्थितीवर, भविष्यावर अवलंबून राहणें, परिस्थिति पाहून वागणें 'तिची काळावर दृष्टि आहे' चालता काळ–भरभराटीचे दिवस, आयुष्य, हातीं घेतलेल्या कामांत ज्यावेळीं सारखें यश येत असतें असे दिवस याच्याउलट पडता काळ 'चालता चालता काळ, खायाला मिळती सकळ।'–भगून ११८ काळा काळ भविष्यति (सं काले काले भविष्यति)–केव्हां तरी होणें यासर्थी म्ह० (व) काळा आली बरवटया दुष्काळांत बरवट खाणेंहि मनुष्य खातो त्याप्रमाणें अडचणींत सांप दल्यावर मनुष्य हलकें काम करण्यास तयार होतो सामासिकशब्द– ०काळ–क्रिवि प्राचीन काळा पासून, पौराणिक काळापासून ०खंडा–पु १ बहुत दिवस वांचलेला दुर्जन माणूस, ज्यानें काळा नेंहि सहन केलें असा २ काडगा, निगरगट्ट ०गत–स्त्री १ काळ गति [कालगति] २ ठराविक काळाच्या पुढें गेलेला वेळ, वेळेचा अपव्यय (या अर्थी दिवसगत हाहि शब्द अधिक रूढ आहे) ०दुपाऱ्या–वि (निंदाव्यंजक) माध्यान्ह उलटल्यावर जेवणारा ०धात–स्त्री जगाच्या बरेवाईटपणास कारणीभूत असलेली काळाची शक्ति, काळवेळ 'यंदा काळधातच अशी आहे म्हणून शेती पिकली नाहीं' ०प्रसंग–पु वेळप्रसंग, संधिसमय, याला व्यापक संज्ञा जो काळप्रसंग पाहातो तो शहाणा '०वशें–क्रिवि कालांतरानें, कालानुसार, योग्य काल आल्यावर ०वार–पु अशुभ दिन, (जोशी किंवा शूद्र लोकांत) घातवार ०वेला–ळा–स्त्री १ शिवलिखीत भयामधील अशुभ वेळ वेळ पहा २ वेळ प्रसंग, काळप्रसंग पहा ३ मृत्यूची वेळ 'या परि ते काळवेळा। रायें राखिली तये वेळा।'–कथा १ २ १२१ ०वेळ–स्त्री १ वाईट किंवा संकटाचे दिवस, काळकाळ पहा 'काळवेळ साधून येत नाहीं' २ वेळप्रसंग, हंगाम, योग्य वेळ, संधि 'जें कांहीं करणें तें काळवेळ पाहून करावें' ३ सामान्यतः वाईट किंवा अशुभ वेळ ०शुद्धि–स्त्री शुभवेळ, पवित्र वेळ 'काळशुद्धि नि ग्रहीं। जीवदशा भूत जन्मीं।'–ज्ञा १३ १८८ काळाचा काळदडा–पु दांडगा, धटिंगण, म्हातारा, निरोगी, भक्कम, दणकट म्हातारा, अनेक संकटांतून निभावलेला माणूस काळांतरीं–क्रिवि (नास्त्यर्थी) भविष्यकाळींहि नाहीं, केव्हांहि नाहीं 'ही गोष्ट काळां तरींहि व्हावयाची नाहीं' २ थोडे दिवस गेल्यावर, कांहीं कालानें, 'हे कांहीं काळांतरानें हाईल असें वाटतें' –ळांतून ओढलेला–वि दुष्काळांतून जेमतेम वांचलेला; अतिशय दुबळा, अशक्त काळींवाळीं–क्रिवि योग्य वेळीं, जेव्हां जेव्हां पाहिजे असेल त्या त्या वेळीं, 'पर्जन्य तोहि उपकारार्थ। काळीं काळीं वृष्टि करित।'–निमा १ १८ [सं काले] काळें करून–क्रिवि थोड्या वेळानें, कांहीं कालानें, योग्य वेळीं, थोड्या वेळानें 'काळें करूनि सुख जोंवरि होय शेवटीं।'–र २७ काळेंचि–क्रिवि तत्काळ 'जे विशेषि विशारी होत। तें अपुनीत काळेंचि'–एभा २१ ११७ काळो काळ–क्रिवि १ बहुत प्राचीन काळापासून, अनादि काळापासून २ पुन्हां पुन्हां (नकारार्थी) 'माझी विनंति आपण ऐकावी, मी काळोकाळ मागायचा नाहीं'

काळ—पु (धारवाडी) लहान मुलें खेळांत सुपाऱ्या, चिंचोके वगैरे घेतात त्यास म्हणतात

काळ—पु (व) उडीद किंवा मूग यांचें जाडेंभरडें भूस

काळकाई—स्त्री पार्वतीचें एक भयंकर स्वरूप, कालीदेवी [सं कालिका]

काळगाई—स्त्री १ (वे) मिश्र पीक २ नांगरटी

काळगेला—वि काळसर शरीराचा वर्ण असलेला, काळेला याशिवाय काळ हें पूर्वपद असणारे रंग, वर्ण या अर्थाचे सामासिक शब्द काळा शब्दाखालीं पहा

काळजी—स्त्री १ चिंता, आस्था, कळकळ, अंत करणास होणारी व्यथा, फिकीर २ मनांतील भाव ०काटा–पु चिंता –चा धगड–वि अत्यंत निष्काळजी, बेगुमान (माणूस) [काळीज]

काळण—पु (कों) अनाचें मद्य करून विकणारी एक जात व तींतील व्यक्ति

काळपात—स्त्री (खान) पराकाष्ठेची विनवणी, काकुळत [कल्पांत]

काळपेरी—वि नाचणीचा एक प्रकार

काळवें—न मोठें व मधानें भरलेलें मधमाशांचें पोळें. ०माशी, कोळवंी–स्त्री वरील पोळ्यांतील माशी

**काळवीट-विट-व्हंट**—पु काळ्या पाठीचा हरिण

**काळसा**—पु नाकतोडे, टोळ, गांधीड इ० खाणारा एक पक्षी

**काळा**—पु १ (सांकेतिक) विन्सा, मिळावा. २ (काव्य) श्रीकृष्ण, विठोबा 'अपयशाचें रापर त्या काळयाच्या डाळक्यावर फुटलें' –नामना १३ ३ काळसर्प 'जागविला पुच्छीं त्वां दबुनि पद बहु सपूर्वकट काळा।' –मोउद्योग १२ २१ –वि १ कृष्णवर्ण, श्याम, काजळाच्या रंगासारखा, तशा रंगानें युक्त असलेला २ कपटी 'कृष्ण बाहेर काळा तसाच आतहि काळा आहे' –परिभौ २५ [स काल, मं जि काळो, काळार्दी=जिसी माणूस, पो जि काळी, फा कारा, सिं काल, का करि] काळपूर्वपद असलेले रंग, वर्ण या अर्थाचे सामासिकशब्द– **काळजिभ्या**–वि १ शिवराळ तोंडाचा, अनिष्ट बोलणारा, निमदळ, शिव्याशाप देणारा, अचकट विचकट बोलणारा २ ज्याचें वाईट भाषण खरें होतें असा ०**टिक्या**–वि १ काळे ठिपके असलेला (घोडा इ०) घोडयाच्या ७२ अशुभ चिन्हांपैकीं हें एक आहे –मसाप २ ५६ ०**तोंड्या**–वि १ दुर्दैवी, अपशकुनी, दुष्ट २ लज्जित झालेला, गांगरलेला, खजिल 'स्नेह कैसा सांडिला ध्रुवा आजी। काळतोंडा जाहलों जगामाजीं।' –चिंतामणिकवि ध्रुवाख्यान ३ (व) ओठावर काळे केस असलेलें(जनावर) ०**उदरा-उंद्रा**–(शिंपी) काळया उदरासारखा काळा कुळकुळीत ०**दात्या**–वि १ काळे दात असलेला (कर्मविपाकावरून असला माणूस पूर्वजन्मीं भाग होता अशी समजूत आहे) २ (ल) अशुभकारक, अनिष्टदर्शक, अपशकुनी (माणूस) ३ (ल) शिव्याशाप देणारा, शिवराळ, निंदक ०**ऊंबन-ळमन**–स्त्रीन अधारलेली, सर्द हवा, पाऊस, धडा यानीं युक्त पावाळी हवा [कादंबिनी] ०**बुंडी-बोंडी जोंधळा**–पु जोंधळयाची एक जात, याचें बोंड काळें असतें ०**मांजर**–पुन बाडेचोर, ऊद ०**मुखी**–वि १ काळया तोंडाचा, तोंडावर काळे केस असलेला (घोडा) हा अशुभकारक समजतात २ सामान्यत काळया तोंडाचा ३ (काव्य) दुष्ट, भयंकर, राक्षसी 'नागविले प्रतापी थोर थोर। दशवक्त्र काळमुख।' ०**मुखी गुंज**–स्त्री काळा ठिपका असलेली गुंज ०**मुऱ्या**–वि दुर्दैवी अभागी अधम, नीच ०**लोह**–न पोलाद, कालायस काळलोहें डव चिरें। वज्रवाटी बाधिलें।' –शिशु ५०९ ०**वस-सा-सें** पुन १ काळोख, अधार (कांहीं ठिकाणीं चुकीनें काळवसें असा शब्द वापरलेला आहे) 'महामोहाचा काळवसा।' –भाए १०२ 'कां काळ राहे काळवसा। तो आपणा ना आणिका।' –अमृ ४ ३६ 'निद्रेचे शोधिले। काळवखें।' –ज्ञा १२ ४९ 'अविद्येचे काळवसे। समूळ मेले तेधवा।' –भवि ९ १९६ शको २ ३१

२ काळेपणा, डाग ०**वट**–वि १ काळसर २ काळा, काळी (जमीन) [काळा+वत] ०**वटणें-वंडणें**–अक्रि १ काळें पडणें, मलिन होणें, (ऊन वगैरे लागल्यामुळे शरीर इ०) अपराध, भय यानीं चेहरा काळा ठिकर पडणें, काळानिळा पडणें, हिरवा निळा होणें २ शेत पीक यांचा फिक्टपणा जाऊन टवटवीत होणें, निसर्गाच्या स्थितीस येणें ३ (काव्य) काळा पडणें ग्रहणीं काळवडे वासरमणि।' 'चद्रबिंब विटाळलें। गुरुद्रोहें काळवडलें।' –कथा १ २ १५० ०**वटी-वण**–स्त्री कालिमा, डाग, कलंक, दोष ०**वंडी**–स्त्री (को) काळवटणें, काळवडणें पहा ०**वनी-वथरी**–स्त्री सयाद्रींतील दख्खनमधील अग्निगर्भ काळा खडक, हा ज्वालामुखीच्या रसाच्या थरातील उष्णता विसर्जन पावून झाला आहे –सृष्टि ३८ ०**वदन**–वि काळमुखी (घोडा) पहा –अश्वप ९४ ०**विंद्रे**–काळुंद्रा पहा **काळवें**–(राजा कुण्) सध्याकाळची काळोखी ०**सर**–वि काळवट, किंचित् काळया रंगाचा ०**सरणें**–अक्रि काळवटणें, काळवडणें पहा ०**सावळा**–वि काळासावळा, साधारण काळा (रंग) **काळा**नें आरंभ होणारे शब्द (वाप्र) **काळयाचे पांढरे होणें**– एखाद्याचे काळे केस पांढरे होणें, म्हातारपण येणें **पांढऱ्याचे काळे होणें**–म्हातारपणात तरुणपणाचे चाळे करणें, सचोटी सोडून देणें **काळया डोईचें मनुष्य**–न (जेव्हा इतर जीवांपेक्षा (प्राण्यांपेक्षा) माणसाची अद्भुत शक्ति वर्णावयाची असते अशावेळीं हा शब्द माणसाला लावतात) **काळया दगडावरची रेघ**–(वाप्र) टिकाऊ, अक्षय्य, अबाधित अशी गोष्ट, उक्ति, न बदलणारी गोष्ट 'ही आपली माझी काळया दगडावरची रेघ' –तोच १७९ सामाशब्द– ०**अवलख**–वि पाढऱ्या अंगावर काळे ठिपके असणारा (घोडा) ०**अभ्रक**–पु काळया रंगाचा अभ्रक ०**आजार**–पु हा भयंकर रोग आसाम व मद्रास इलाख्याच्या एक भागात होतो याने यकृत व प्लीहा फार वाढतात आणि रोज ताप येतो ०**उन्हाळा**–पु १ अत्यंत कडकडीत उन्हाळा, यामुळें सर्व सृष्ट पदार्थ रखरखीत भासतात २ कठिण आणीबाणीची, टचाईची वेळ, आयुष्याच्या भर भराटीच्या साधनाचा अभाव 'तु काळया उन्हाळयात मजजवळ पैका मागतोस काय?' ३ चैत्र व वैशाख हे दोन महिने ०**उंबर**–पु उंबरे झाडाची एक जात ०**कभिन्न-कभीन**–वि अत्यंत काळा, लोखंडासारखा काळा [स काल+का भिन्न=लोखंड] ०**किट्ट-कीट-कुट्ट-कुळकुळीत-मिचकूट**–वि अतिशय काळा (किट्ट कुट्ट वगैरे शब्द जोर दाखवितात) लोखंडासारखा किंवा शाईसारखा काळा काळा जहर पहा 'हा अमावास्येचा [काळाकुट्ट अधार' –चद्रम २ ०**कटवा**–पु काळा तीळ ०**करजत-करंद**–वि काळाकभिन्न, ०**करंद**–

फत्तर–पु काळा दगड 'कृष्णवेणीचें पाणी काळाकरद फत्तरांतून उसळया मारीत '–खया २९ ०फुडा–पु कुडयाच्या झाडांतील एक जात दुसरा तांबडा कुडा [म कुत्ज, ध कुटराज हि कुडा कौरैया, गु कडी] ०कुमाईत–वि काळ्या रंगांत तेरड्या रंगाची झाक असलेला (घोडा) ०कूम–पु (चांभारी) विशिष्ट पद्धतीनें कमावलेलें काळें कातडें ०खापर–वि खापरासारखा काळा ०गरु–पु काळ्या रंगाचा अगरु, धूप 'तत्काळ काळागरु धूप दावी।'–सारुह ८ ७९ ०गवर–पु एक शक्तिवर्धक वनस्पति ०गहिरा–वि काळा कुट्ट ०गुगळी–पु गुगळासारखा काळा मासा ०गुरा–पु एक लहान झाड ०गोरा–वि १ काळा व गोरा २ खराखोटा शुद्धाशुद्ध ०चापा–पु चाफ्यांतील एक भेद ०चित्रक–पु चित्रक (एक औषधी) झाडाची एक जात काळचो–पु (गो) नीचमनुष्य –ळाजनी वि एकरंगी असून डाव्या खाकेच्या जवळ किंवा छातीवर काळा ठिपका असलेला (घोडा) यामुळें धन्याला मृत्यु येतो अशी समजूत आहे अश्वप ९६ ०जहर–ठिक्कर–ढोण–वि काळाकभिन्न ०डगलेवाला–पु पोलीसचा शिपाई ०तित्तर–तीतर–पु रंगीबेरंगी तित्तर पक्षी ०तीळ–पु काळा तीळ पहा ०दगड–पु काळवत्री–वयरी पहा ०दाणा–पु एक वेल, हिचें कांडें व शाखा यावर बारीक कुसें असून पानें कपाशीसारखीं असतात फुलें फिकट निळया रंगाचीं घंटेच्या आकाराचीं, व मोठीं असतात फळ नरम असून आंत तीन पुडें व त्यात काळें बीं असतें याचा औषधाकडे उपयोग करतात –वगु ७ १ [स कृष्णबीज, नीलपुष्पी] ०धोतरा–पु काळसर–जांभळट धोतऱ्याचें झाड ०निळा–वि काळासावळा (रंग, चेहरा) ०फत्तर–पु १ काळवयरी दगड २ (ल) अत्यंत मूर्ख अडाणी माणूस ०बगळा–पु काळ्या पाठीचा बगळा ०बाळा–बाहाळा वि फिकट काळें किंवा काळें व पांढरे पट्टे अंगावर असलेला (पशु) ०बेंदरा–बेंद्रा–वि काळा व हेंगाडा, विद्रूप 'मी चांगट फाकडी रूपानें तू काळा बेंदरा'–पला ५ [काल+हेंदर]² ०बेरा वि काळाबेंदरा (अंगाचा वर्ण, स्वरूप कपडालत्ता वगैरे) ०बोळ–पु बाजारबोळ, एका झाडाचा वाळलेला चीक हा मुलांच्या पोटदुखीवर उपयोगी आहे ०भिल्ल–भील–भाग–बोख–वि काळाकभिन्न ०भोपळा–पु भोपळ्याची एक जात, तांबडा भोपळा, गंगाफळ ०माजा–पु मायफळ, माजूफळ ०मासा–पु पिचपापडा ०मुरूम पु काळ्या रंगाचा मुरुम ०शेंगळ–पु काळ्या रंगाचा एक मासा ०सावळा–वि कवळ काळाहि नाहीं व नवळ गोराहि नाहीं असा (रंग रंगाचा) साधारण काळा [स काल+श्यामल] ०सावा–पु साव्याची काळी जात ०सुरमा–पु डोळ्यांत घालावयाचें एक अंजन, (ब्लॅक सल्फेट ऑफ अँटिमनी)

काळे उडीद–पुअव माष एक द्विदल धान्य ०केस–पुअव (ल) तारुण्य व त्यांतील धुमधुमीचा काळ, याच्या उलट पांढर–करडे केस ०तीळ–पुअव काळ्या रंगाचे तीळ, श्राद्धपक्ष, नावगी वगैरे कार्यांत उपयोगी पडणारे तीळ काळेला–रा–वि काळसर वर्णाचा काळ्या पाठीचें खोबरें–न ज्या खोबऱ्याची पाठ काळी असतें तें, ही खोबऱ्याची एक जात आहे काळीनें आरंभ होणारे शब्द काळी–वि १ रंगानें काळी (स्त्री, साडी वगैरे) स्त्री –स्त्री म्हैस (कारण ती रंगानें काळी असते) ज्याच घरीं काळी त्याची सदा दिवाळी।' म्ह० (व) काळीकाळीउदर तिचा सैपाक सुदर–काळ्या स्त्रीस चढविण्या साठीं म्हणतात सामासिक शब्द ०काठी–स्त्री एक औषधी झुडूप ०काव–१ काळ्याकुट्ट रंगाची राग (क्रि० येणें, जमणें, उठणें विर॰, फाकणें) २ (ल) काळ्या रंगाच्या कुण ब्यांची (जेवण वगैरेस बसलेली) पंगत ०खजुरी–खजूर–खारीक–स्त्री एक औषधोपयोगी रानखारीक ही कडु, अग्नि दीपक व ज्वरनाशक आहे ०गुळी–स्त्री काळा रंग तयार कर ण्याच्या कामीं उपयोगांत येणारी नीळ ०चेट्टळ–टोळी–स्त्री चेट्टळचीच एक काळी जात ०चंद्रकळा–स्त्री काळें लुगडें, याचें उभार व आडवण सर्व काळें व किनार कोणत्याहि तऱ्हेची असते ०जिरी–स्त्री कडु कारळी ०तुळस–स्त्री काळ्या पानाची व मंजिऱ्याची तुळस, कृष्णतुळस ०तेरी–स्त्री काळ्या रंगाचें अद्, हें मुळव्याध नाशक अग्निदीपक, व शौचास साफ करणारें आहे –योर १ ४७ ०धार–वि दृश्य क्षितिज, समुद्रांत पहात असता ज्यापुढें दृष्टि पोंहचत नाहीं तो मर्यादाप्रदेश –शास्त्रीको 'त्याची हद्द काळेधारेशीं लागते' आहे '–बाल २ ११८ ०पानवेल–स्त्री काळ्या रंगाच्या विड्याच्या पानाची वल, हिचें पान स्वादिष्ट परंतु तिखट असतें ०प्रजा–स्त्री १ सामान्यपणें मजूरवर्ग २ वडोदे संस्थानांतील भिन्नासारखी एक जात (गु) काळी परज ०भिंत–स्त्री उत्तरदिशेस जेथपर्यंत मनुष्याचें गमन होतें तेथील सीमाप्रांत –शास्त्री ०भोपळी–स्त्री काळ्या भोपळ्याचा वेल ०माशी–वि १ मोठी, काळ्या रंगाची, व्रण, क्षत, मेलेलें जना वर यावर बसणारी माशी २ एका जातीचें गवत ०मिरची–स्त्री १ (हिं) काळ्या मिरच्या येणारी मिरचीची एक विशिष्ट जात २ काळीं मिरें ०मुष्टी–स्त्री जारणमारणातील मूठ (मार ण्याची) काळीमुष्टीची बाधा होतां।'–नव६ १५२ ०मुसळी–स्त्री एक औषधी वनस्पति व मुळी, मुसळीची काळी जात ०रात्र–ठिळी रात्र–स्त्री १ भयकर रात्र, भयाण रात्र 'ही काळीरात्र चालली आहे मी खोटें बोललों तर पाहून घेईल' [काळ+रात्र] २ हा शब्द क्रियाविशेषणासारखा सप्तम्यंत करूनहि योज तात जसें –काळ्या ठिळ्या रात्रीं जास्त माहितीसाठीं वदखालील

भरल्या पदराखालीं घगणें पहा ३ अमावास्या, मध्यरात्र, अशुभ भाषण, भूतपिशाचाचें आगमन ( असभ्य भाषण व शपथ याखेरीज ) वगैरेसंबधानेंहि सामान्य रात्रीस हा शब्द लावितात, अरिष्टसूचक रात्र ०वसू–स्त्री एक औषधी वनस्पति, हिचा दुसरा प्रकार पाढरी वसू ०वेल–स्त्री गुराच्या रोगावर उपयोगी पडणारी एक वेल ०साळ–स्त्री काळ्या रगाची साळ किंवा भात काळेंने आरभ होणारे शब्द– काळें–न १ डाग, कलंक, कालिमा, अपकीर्ति [काळा] (वाप्र) काळें करण–तोंड काळें करणें, तोंड लपवून जाणें, दृष्टिआड होणें, फरारी होणें ( दोष, अपराध वगैरेमुळें ) 'जा कर काळें ।' –कम २ ०तोंड घेऊन जाणें–पळून जाणें, पोबारा करणें 'काळें तोंड घेऊनि । गेला नेणो कोणीकडे ।'सामाशब्द– ०अक्रू–न काळी तेरी पहा ०अक्षर–न कागदावर लिहिलेलें मनोगत, अक्षरें लेख, पत्र इ०, यच्चयावत् अक्षरमात्र –शास्त्रीको 'हा पडित काळ्या अक्षराचा अर्थ करील' ०कमळ–न हें हिमालय पर्वतावर बर्फांत उत्पन्न होतें याला एक हजार पाकळ्या असून त्यांचा घेर एक हातभर असतो –तीव्र ४१ ०कृत्य–न कृष्ण कारस्थान, अन्याय ०खापर–न. अतिशय काळा माणूस अपकीर्ति, बद नाम झालेला, पराभव झालेला, आजारानें कृश, अशक्त झालेला माणूस ०गवत–न एक प्रकारचें गवत ०जिरूं–जिरें–न १ कडू कारळें २ शहाजिरें [ हिं काली जिरी, स कालाजीरक] ०ढवळें–न १ सशय, शका, अनिष्ट कल्पना, अदेशा २ काळें बेरें पहा ०तेरें–न काळी तेरी, काळें अळू पहा ०ताड–पु स्वत पासून पुढील पाचवा वशज ( आपल्या पणतूचा मुलगा ) –वि लाजिरवाणीं कृत्यें केल्यानें कलंकित झालेलें तोंड 'तुतें काळें तोंड दृष्टीआड कर' ०थर–वि काळ्या रगाचा गर,कार दगड किंवा काळवथरी धोंडा ०द्राक्ष–न एक प्रकारच्या काळा मनुका ०पाणी–न १ महासागर २ अकालीं किंवा अतिशय पडलेल्या पावसाच्या पाण्याचा दोष घालविण्यासाठीं बागेस दिलेलें विहिरीचें पाणी ३ (ल) हद्दपारीची शिक्षा व ती भोगावयाचें ठिकाण(ही शिक्षा झालेल्या इसमास हिंदुस्थानाबाहेर अदमानात ठेवतात ) 'अखेरीस जाल काळ्या पाण्यावर चागले' –भा १०४ ०पान–न काळ्या पानवेलीचें विड्याचें पान ०बुबुळ–न डोळ्याचा काळा भाग (बाहुली व कनीनिका) ०वेरें–भेरें–ळें–न १ अनिष्ट सशय, वाईट आकाक्षा, अनिष्ट कल्पना, कुशका, कपट (क्रि० येणें) 'हें काळेंबेरें तुझ्या मनात कोठून आलें?' –गीर ६१२ २ लुच्चेगिरी, डावपेंच, कारस्थान मिळकत करणें, दडपादडपी ०भिवरी–स्त्री काळवथरी पहा ०मांजर–नपु काडेचोर, ऊद ०मिरें–न काळ्या रगाचें मिरें ' मिरूं पहा ०मीठ–न १ पादेलोण २ खाऱ्या मातीपासुन उत्पन्न केलेलें मीठ –रें–न कडू कारळें

काळ–कूट–गुजारा–री–गुजराण–चक्र–त्रय–धर्म निर्वाह–पाश–महिमा–माहात्म्य–वंचन–ना–समता–साधन–स्वरूप–क्षेप– हे शब्द काल शब्दाखालीं पहा

काळाई—स्त्री १ कासार व इतर कांहीं लोकाची देवी, हिचें स्वरूप काली देवीसारखें असतें २ काळी जमीन ( शेतकरी लोकात रूढ ) 'यदा काळाईनें हातचें सोडलें' ३ काळवडी (अनिश्चित) पहा [स कालिका]

काळांचणी—स्त्री अत्यत काळजी, जाचणी, काचणी, आच

काळांचेरें–ळें—न जाभळ्या रगाचें एक रानफूल

काळांतर—न (गो) व्याज [स कलातर] म्ह० (गो) काळांतरा आसं मुद्दल नास

काळापात—पु १ लुच्चेगिरी, अफरातफर, दडपादडपी, दुरुपयोग 'तुमच्या रुपयाचा मी कांहीं काळापात करणार नाहीं' २ पसरून, ठकवाजी करून फरारी होणें 'तो काळापात करून देशोधडी झाला' [काल+आपत्ति]

काळाष्टक—१ कालाष्टक पहा २ काळभैरवाप्रीत्यर्थ आठ दपत्यें (जोडपीं) भोजनास सागणें –तीव्र परिशिष्ट २ पृ ४

कालिक—स्त्री काळसरपणा 'सागें पितळेची गधि कालिक ।' –ज्ञा ४ ६४ [स काल]

कालिका–काई—स्त्री काळकाई, पार्वतीचें, काली दवीचें भयकर स्वरूप [स कालिका+आई]

कालिंग–ण—न कलिंगड पहा 'तें पक्क कालिंगण देखिलें नयनीं । प्रीति करूनि भक्षिलें ।'

कालिंग असणें—(गो) द्रव्यसग्रह असणें

कालिमा—न १ कालिमा पहा 'परिसाची निवारी जडत्व कालिमा ।' –एरुस्व ३ १५ २ काजळ ३ काळोख, अधार 'कीं येरीही दिशा तिचेचि काळीं । कालिमा नाहीं ।' –ज्ञा ५ ८६ [स]

कालिया नाग—पु काळा साप 'का कालियानाग धुधुवातु ।' –ज्ञा १८ ७१२ [स काल]

काळी—स्त्री कालिका पहा [स काली]

काळी—स्त्री १ शेतीची जमीन (देशावरील शेतजमीन बहुतेक काळ्या रगाची असते यावरून) 'काळीनें पीक सोडलें' २ शेतात पिकणारें पीक 'काळी पिकली म्हणून पाढर वाचली' ३ लागवड करण्यासारखी जमीन, याचे उलट पाढर=वसतीची जमीन ४ (ल) शेतकरी वर्ग 'ही गोष्ट काळी–पाढरीला माहीत' –गागा २ [स काल=काळें] म्ह० (व) काळीवर

देत नाहीं पाउरी वर पर ( जागा ) नाहीं. =ज्यास देत नाहीं व परहि नाहीं, भणग, भिकारी अशा माणसाबद्दल योजतात •चा वसूल-पैका-चें उत्पन्न-पु शेतसारा, जमीन महसूल, साऱ्याहून मोहतर्फा वसूल निराळा •चुणकरी-स्त्री चुनखडीवरची काळी जमीन ही नापिक असते •जमा-स्त्री काळीचा वसूल •जमीन-स्त्री ही जमीन रंगानें काळी, भुसभुशीत, खचणारी व पाणी धरणारी असते.

**काळीज**—न १ (हिं) मूळ यकृत, पित्ताशय परतु रूढ हृदय, रुधिराभिसारक इंद्रिय. 'मेढोनि काळिजाला गेला तोडा पयादळ '-मोभारतीयरामायण २ (ल) अंत करण, मर्म, हृदयांतील नाजूक भाग 'कीं काळजीं घातली सुरी।' -राधि ४ ४१ 'तोंचोनि बोले कौरवरावो। काळिजीं घालिमी का घावो।' -मुसभा १७ ५०. [ हिं कलिजाह् ] (वाप्र) •उडून जाणें-**कांपणें-थरथरणें-थरारणें-धडकणें**-छाती धरधरणें, कांपणें, धडधड उडणें ( भीति, दु ख वगैरेमुळें ) •कठीण-वि ( संस्कृताच्या अनुकरणावरून अशुद्ध समास ) कठीण काळजाचा, निष्ठुर, कृपण, धाडसी, बेडर ( माणूस ) •**काढून टाकलें तरी विश्वास न येणें**-अविश्वासाची परमावधि •**काढून देणें**-आपल्यास अत्यंत प्रिय अशी वस्तु देणें, स्वत चें अंत करण देणें •**खाणें-फोडणें**-१ छळणें, गांजणें, बेजार करणें, मर्मभेदक बोलणें २ पश्चात्तापास, शोकास कारण होणें •**पाठीमागें असणें-टाकणें**-बेफिकीर असणें, निर्भय असणें •**फाटणें-दो जागां होणें, काळजाचें पाणी होणें**-भयानें, दु खानें विव्हळ होणें •**फुटणें**-धीर सोडणें किंवा ठाव सोडणें **काळजाला, भोंक-घर पडणें**-भयानें, आश्चर्यानें, दु खानें धावें दणाणणें, धक्का बसणें, हृदयाला झोंबणें -**जास फेस येणें**-अतिशय तडफेनें किंवा उत्कंठेनें गुतणें, फार परिश्रम करून थकणें **काळजीं घाव घालणें**-डाग देणें, अंत करणास धक्का बसेलसें करणें, मर्मावर आघात करणें **काळजीं काटा करणें-धरणें-साता काळजाच्या पलीकडे ठेवणें**-अतिशय प्रिय होणें, अति मूल्यवान समजणें, कोठें ठेवूं कोठें न ठेवूं असें होणें, अतिशय काळजी घेणें 'काळजाचे पलीकडे त्याला ठेव -नाम ना ११२ **काळजीं,काळजाला लागणें**-अंत करणात शिरणें, दु ख, वेदना उत्पन्न करीत जिव्हारीं खोंचणें, बोचणें, आत भिनणें (औषध, विष, वस्तु अन्न, निंदा, अपशब्द काम वगैरे ) या अर्थी किंवा आस्थेनें लक्षात ठेवणें या अर्थी उपयोग सामाशब्द **काळजाचा घड**-जिवाचा कलिजा, प्राणप्रिय माणूस •**चा चोका**-पु काळजाचें मांस, यकृत पित्ताशय (खाटिक लोकांत रूढ) **उफराट्या, उलट्या काळजाचा**-वि वाटेल तें साहस कर्म करण्यास तयार होणारा

**काळुखी-खुरी**—स्त्री १ काळोखी, अंधार 'काळुखी दाटली अपार नहीसी।' -नग ११ १५१ २ काळेपणा. ३ डाग, कलंक, कालिमा •रात्र-स्त्री अंधारी रात्र, चंद्रदर्शन न होणारी रात्र

**काळुगा**—पु काळ 'स्तुति महत्त्वाचें सळें। मढी एके काळुगेनि पोळें।' -ज्ञा ११ ३१

**काळुंद्रा**—वि फार काळा [ काळा ]

**काळुंद्रा-द्रा-द्रीं**—नपुस्त्री ( कु गो ) काळ्या रंगाचा लहान मासा

**काळुयाई**—स्त्री एक क्षुद्र देवी -कोया ५० -निवि ८ २ १४

**काळेली**—स्त्री काटळी, काळा साप पहा

**काळेश्वरी**—स्त्री कालीदेवी, दुर्गा

**काळो**—पु ( कु ) विंचवा

**काळोख-स**—पु अंधार, तिमिर, प्रकाशाचा अभाव (वाप्र) •**नेऊन दिवसास घाळत घालणें**-अघटित घटनेशीं झटणें, असंभाव्य गोष्टीसाठीं प्रयत्न करणें खपुष्प पहा म्ह० काळोखात केलेलें केव्हां तरी उजेडांत येतें-पापास वाचा फुटते •**मेट**-स्त्री अतिशय काळोख, दाट काळोख, काळोख मिट्ट •**पाख**-पु महिन्याचा कृष्ण पक्ष, अंधाऱ्या रात्रींचा पंधरवडा [ काळोख+पक्ष=पाख ]

**काळोखी-खी**—स्त्री १ ढगानीं, अभ्रानीं आलेली अंधारी, अस्तमानाची अंधारी, थोडासा अंधार २ पित्तादिकानें डोळ्यापुढें आलेली अंधारी ३ (ल) कलंक, डाग, अपकीर्ति ४ काळवंडी •रात्र-स्त्री अंधारी रात्र, चांदणें नसलेली रात्र

**काळोखें**—न काळोख

**काळोजी**—पु १ (ल) यमदूत [ काळा ]

**काळोटा**—पु १ काळ्या रंगाचें कबूतर २ काळ्या रंगाचें व दोनच पांढरे ठिपके असलेलें पाखरू [ काळा ]

**काळोतरी-त्री-थरी**—वि काळवथरी दगड पहा

**काळोंद्रा-द्रा**—वि काळुंद्रा पहा

**काळोधा**—पु (ल) यमदूत 'तुझ्या शरीराला काळोधा खाईल ' -नामना ४० [ काळा ]

**काळावेळो**—पु ( कु ) एका जातीचें भात

**काळोसा**—पु काळोख, अंधार 'उभ्या काळोशाचे आड। सातापाचा एक भीड ' -तुगा १५५ [ काळा ]

**काळ्यामाळ्या**—पुअव १ (क) स्वत च्या अंगाभोंवतीं, दोन्ही बाजूला आपले हात ताठ करून वरचेवर गरगर फिरण्याचा मुलांचा एक खेळ ( क्रि० घालणें ) २ वरील खेळ खेळणें ३ तेथल्या तेथेंच घुटमळणें [ काळा+माळा ]

**कांक्षणें**—अक्रि इच्छिणें, इच्छा, अपेक्षा करणें [स काक्षा]

**कांक्षया**—स्त्री कांक्षा, इच्छा, अपेक्षा 'न धरी चित्तीं तू कांक्षया।' –वेसीस्व १ २३ [स कांक्षा अप]

**कांक्षा**—स्त्री १ इच्छा, अपेक्षा २ घेतलेली शंका, केलेला प्रश्न ३ अदेशा, संशय, शंका 'कांक्षे नेघ सपक्ष ही क्षितिपती त्वत्स्नान सरक्षणें।' –भाराम २१ ४ कल्पना, विचार, विचित्र कल्पना किंवा मत [स कांक्ष्=इच्छिणें]

**कांक्षावणें**—अक्रि संशय, अदेशा घेणें, कुतर्क किंवा शंका धरणें

**कांक्षित**—वि इच्छित किंवा वाञ्छित, ज्याची आवड धरली आहे असें

**कांक्षी(क्षे)खोर**—वि १ आडवेढे घेणारा २ मनात कुतर्क, संशय घेऊन हरकत घेणारा, संशयी, अदेशखोर ३ तऱ्हेवाईक, एककल्ली, हुक्कीबाज, भ्रमिष्ट

**किं**—सना १ कोण? कोणचा? काय? हा शब्द बहुव्रीहि समासांत नेहमीं येतो, जसें– किंकर्तृक=कोणी केलेलें? कोण कारण झालेलें? किंप्रयोजक=कोणत्या कामाचा किंवा कोणत्या उपयोगाचा? किमर्थ, किंनिमित्त=कशाकरिता? कां? काय म्हणून २ किंवा, अथवा 'नातरि रसेंवीणु वाणी। किं चंद्रेंवीणु रजनी।' –शिशु ५२९ [स किम्]

**किंक**—स्त्री (कों) किंकाळी, आरोळी (क्रि० फोडणें मोकलणें) 'आस्वलामाधीं किंक फोडावी' [ध्व]

**किंकट**—पु (काव्य) एका किंवा अनेक हत्तींचा चीत्कार, आरोळी [स]

**किं(किं)कट**—वि (कीकट=बहार देश यावरून) रानटी ओसाड, नापीक (देश)

**किंकणी**—स्त्री १ ल्हान घंटा, क्षुद्र घंटा (बैलाच्या गळ्यातील) पट्टयामधील किंवा स्त्रियांच्या कमरपट्टा अथवा इतर दागिन्यामधील घुंगुर, घागऱ्या २ किंकाळी (क्रि० फोडणें मोकलणें) ३ पिलू या फळाचें बीं [स किंकिणी]

**किंकणेल**—न पिलू झाडाच्या फळाचें तेल

**किंकर**—पु १ चाकर, सेवक दास 'नाम साराचेंही सार। शरणागत यमकिंकर।' –तुगा २५२० 'वर्जितो राव किंकर' –ऐपो १४५ [स]

**किंकर-री**—स्त्री देवबाभळीचें किंवा वेड्या बाभळीचें झाड याचीं फुलें सुवासिक असून याच्यापासून गोंद व इतर पदार्थ होतात ककरी पहा

**किंकरी**—स्त्री दासी 'ज्या सर्व सांडुनि किंकरी। होउनि निकट आल्या।' –रास १ ११७६. [स]

**किंकर्र**—न १ (सुतारी) विंधणें, सुताराचें लाकडास भोंक पाडण्याचें एक हत्यार, उळी, पटाशी (वे) २ एक खेळणें, किरकिरें, फिरकी

**किंक्सा**—न (व) हळदीचें उटणें

**किंक(का)ळणें, किं(किं)काटणें**—अक्रि १ हत्तीनें चीत्कार करणें 'मस्त हस्त किंकाटती।' –दावि ४९६ 'श्वेतवर्ण हत्ती चौदंत। किंकाटत धावती।' २ आरोळी मारणें 'मग पाहता ते कृष्णउपासक। हरिनामें किंकाटती।' –ह ३३ ११७ [किंक]

**किंक(का)ळी**—स्त्री हत्तीचा चीत्कार, (त्यावरून सामान्यत) आरोळी (क्रि० फोडणें, मोकलणें)

**किंकाट**—पु (काव्य) (हत्ती किंवा घोडा याचा शब्द) 'हत्ती किंकाट करिताती।' –दावि २४४ 'सुटलें अश्वाचें किंकाट' –कथा २ २ ५८ [ध्व]

**किंकार**—पु माराचा टाहो 'मयोर नाचती किंकारीं' –मुसभा २ ३४ –वि चक्राकार –दार [ध्व]

**किंकिणी**—स्त्री कमरपट्टयाची घागरी, घुंगुर, कोणत्याहि किणकिण आवाज करणाऱ्या दागिन्याचें घुंगरू किंकणी पहा. 'मधुर शब्दाचिया किंकिणी। मोडपणें वाजती।' –एरुस्व १५. ७६ 'च्यापीं झणत्कारिती किंकिणी।' –वेसीस्व ३ ७३ [स]

**किंकिदिवी**—पु एक पक्षी –प्राणिमो ६२ [वै स]

**किंकीचें पान वाई किंकीचें पान**—(मुलींचा खेळ) दोन मुली समोरासमोर उभ्या राहून उजवा हात स्वत च्या कपाळावर लावुन डावा हात एकमेकींचे समोर धरून हें गाणें म्हणत वर्तुळाकार फिरतात

**किंक्रांत**—स्त्री मकर व कर्क संक्रांतीची कर (संक्रांतीपुढील दिवस) ही अशुभ समजतात [संक्रांत द्वि]

**किंख**—वि (गो) अतिशय थंड?

**किंग**—पु (व) कीड, रोग 'तेव्हांपासून माझ्यामागें किंग लागला'

**किंगरी**—स्त्री एक प्रकारचें शिंग, किनरी

**किंच**—न (कु) अल्प अंश, थोडेंसें [किंचित्]

**किंच**—क्रिवि पुन्हा एकदा, आणखी एकदा, आणि, शिवाय 'त्रिभुवनपूज्यतम प्रभु सत्यचि हें किंच तो असे न्याही।' –मोउद्योग ७ १६ [स किम्+च]

**किचकट-काड**—वि १ बारीक, रोड, पातळ (शरीर, वासा, खांब वगैरे) 'हे स्थित्यंतर युद्धकलेंत अलीकडे झाल्यामुळें उंचापुरा जवान आणि किचकट पोरहि सारखेंच' –नि ९७१ २ किरटें, वाचावयास कठिण, गिचमीड (अक्षर, लेख) ३ फार बारीक, चिरचिरें (लेखणीचें टोंक)

४ ( सामान्यत ) किचर, किचरट पहा ५ भानगडीचें 'श्री सिद्धारूढस्वामींच्या मिळकती मवधानें असला किचरट वाद उप स्थित झाल्याचें प्रसिद्धच आहे ' -सास २४१० [स कृच्छ्र]

**किचकाट**—न (कु ) गर्दी, गचडी

**किचकाड-डा, किचकाट-कडा**—वि किचकट पहा (प्राणी किंवा वस्तु )

**किचकिच**—स्त्री चिकटण, चिकटाई, चिकचिकाट [ध्व चिकचिक वर्णव्यत्यास ]

**किचकिच-चा**—क्रिवि ( ध्वनि ) रेवाळ वगैरे पदार्थ दाता खाली सापडले असता होणाऱ्या आवाजाप्रमाणें (क्रि० लागणें )

**किचकिचणें**—अक्रि १ वानरानें दात चावून शब्द करणें २ शब्द काढणें ( पिंगळयानें ) [ किचकिच ]

**किचकिचावणें**—क्रि ( गो ) हिणावणें, टाकून बोलणें (कु ) दात चावणें 'दात ओठ किचकिचावत हत ' [ ध्व. ]

**किचकिचीत**—वि किचकिच आवाज करणारा ( कच्चा भात, रेवाळ वस्तु )

**किचड**—नपु चिखल, रेंदा, राड, गारा [व हिं कीचड+र]

**किचविड-डीत**—वि किजविड-डीत पहा

**किचम**—स्त्री (गो ) खाज, वड्ड [का किच्च=आग ]

**किचमणी**—स्त्री (गो ) कटकट, धासाचीस दिरंगाई किचक टपणा, चेंगटपणा

**किचमणें**—वि ( गो ) त्रास देणारें, कुचवणा करणारें —न त्रास [प्रा कुचुवन]

**किचमिड**—किजविड पहा

**किचमुर्चें**—अक्रि ( गो ) खाजविणें

**किचर, किचरट**—वि वाईट त्रासदायक, पीडा देणारें छळ णारें, त्रासदायक गोष्टींनीं परिपूर्ण ( काम धदा, न वाचता यणारें अक्षर, दूरान्वयाचा व घोंटाळयाचा श्लोक, फार महत्त्वाची नाहीं परंतु घोंटाळयाची व त्रासदायक गोष्ट काम )

**किचवटणें-चंदणें-चिंदणें**—अक्रि अस्ताव्यस्त फेकणें, विसकटणें, नासणें, टोचून, ओरखडून, चोळवटून काढणें, चोळ वटणें, चिवडणें [ध्व ]

**किंचळणें**—अक्रि किंकाळी फोडणें आरोळी मारणें, चु चू, चिंव चिंव, कुई कुई करणें [ध्व ]

**किचाट-टी-चाटया, किचाड**—पु १ कचाट २ गल बला 'हाड पोर किचाड करते।' -ऐपो ३२ [स कृत्या का किचान]

**किचाटी**—स्त्री गर्दी, दाटी [स कृच्छ्र, का किच्चाड ]

**किंचित्**—क्रिवि ईषत, काहींसें, थोडें, अल्प [स ]

**किंचित्दान**—न चातुर्मासात रोज आठ मुठी तांदूळ व एक पैसा आहाणारा दान करतात तें [स किंचित्+दान ]

**किंचितज्ञ**—वि (प्र किंचिज्ज्ञ ) अल्पज्ञानी, तुटपुंज्या ज्ञानाचा 'परमा मा तो सर्वज्ञ । जीवात्मा ता किंचिज्ज्ञ ।' [स किंचित्+ज्ञ ]

**किंचित्ज्ञान**—न (प्र किंचिज्ज्ञान ) १ तुरळक माहिती, तुटपुंजें ज्ञान, अल्प ज्ञान २ अल्प समजूत, कांती बुद्धि [स किंचित+ज्ञान ]

**किर्चीकिची**—स्त्री बगळयाच्या ( पिंगळयाच्या ) चार आवाजांपैकीं एक, कीं २ पहा [ध्व ]

**किचीर**—वि किचर, त्रासदायक [का किच्च ]

**किच्च**—पु (बे ) १ त्रास २ आग, शकोटी [का किच्च]

**किच्च किचत**—क्रिवि ( क कुण ) किती ? कितीसें ? 'किच्च खाणार ? ' 'किचत वघायच ? ' [स कियत् ]

**किजबिज**—स्त्री ( ध्वनि ) किलबिल, चिंवचिंव, किलकि लाट (पोपट, चिमणी, मैना, पिंगळा वगैरे पक्ष्यांचा), त्यावरून किलबिलाट किलकिलाट [ध्व ]

**किजविजणें**—अक्रि किलबिलणें, चिंवचिंवणें ( पक्षी )

**किजबिड-डीत**—वि १ खरडलेलें, गिचमिडीत, न समजसें लिहिलेलें ( अक्षर, लेख ) २ ओबडधोबड, बोजड, विशोभित वेडेंवाकडें ( कोरींव काम )

**किंजल्क**—पु फुलांतील केसर किंवा तंतु [स ]

**किंजळ**—पु एक मोठा वृक्ष, किंदळ याचीं पानें लांब, असून लाकूड इमारतकाम व शेतीच्या औताला उपयोगी असतें 'त पाईरहि खैर किंजळ तिथें आईनही वाटती ।' -कक १२९ —स्त्री साळींतील एक भेद

**किजिलादोर**—वि ( गो ) भाडखोर

**किजील-किजिल्यासाव**—(गो ) भांडण [पो क्रिसिल्ह]

**किंजुरा**—पु (कों ) एक झाड (लॅ ) पेंटाप्टरा पनिक्युलाटा

**किट**—न ( गो ) नुकत्याच व्यालेल्या जनावराचें पहिल्या चार दिवसातील दूध; चीक

**किटकिट**—स्त्री किरकिर, कुरकुर, भुणभुण (क्रि० करणें ) 'खुशाल तासचे तास किटकिट लावीत बसाव ! ' फाटक-नाटयछटा १ [ध्वनि, स किट्-त्रासें, किट् द्वि ]

**किटकिट-टी**—पु ( गो ) जोराचा हशा [ध्व ]

**किटकिटप**—क्रि ( गो ) खिदळणें [ध्व ]

**किटकिटावचें**—क्रि ( गो ) आदल्या दिवशीं शिजविलेले पोह न विघडावे म्हणून फिरून शिजविणें [ध्व ]

**किटकिट्या**—वि किटकिट करणारा

**किटकुल-र**—पुन (व ) लहानसा किडा

**किटण**—न १ थर रूपानें जमलेला मळ घाण ( कुजलेलें शण, गवत, काटक्या इ० ), जुन्या लोखंडावर गज चढून राहिलेला

अवशिष्ट भाग, लोखंड गाळताना शगर नंतर त्याला चरणारी जळ, सामान्यत धातूवरील कल्क, मळ गज, तेलाची किटी, भाड्याला लागून राहिलेला जळका भगारा, दातावर जमलेला मळ २ कीट, कौल इ० जास्त भाजल्यामुळें त्यावर यणारे दग डासारखे काळे गोळे, खगर ३ तापलेलें लोखंड घणानें ठोकीत असता उडणारे जळके कण, ठिणग्या [का किट्ट, स कृष्ण–किट्ट]

**किटणें**—अकि १ मळानें खराब वनणें २ गज चढणें (धातु वगैरेवर) 'फार दिवस किटलेलीं जुनीं पानीं हत्यारें' –फाटक नाटयछटा ७ ३ त्रासणें, विटणें, नकोसें होणें विशेषत कान, दात क्वचित दात यासबधें उपयोग उदा० 'मागता मागता माझे दात किटल ' 'त्याचें गाणें ऐकून माझे कान किटले '

**किटना**—पु (जुनरी) वाघुर लावण्यासाठीं खुट ठोकण्याचा मोठा लाकडी हातोडा, मोगर

**किटली**—स्त्री चहादाणी [इ केटल]

**किटल**—न (कों) किटाळ

**किटा**—पु फोडलेलीं जळाऊ लाकडें

**किटाड–ण**—न किटण पहा **किटाणाची जमीन**–स्त्री दलदलीची, पाणथळ जमीन –भू ६७

**किटावर**—पु (गो) बुलबुल पक्षी

**किटाळ, किटळ**—न १ विस्तवाची ठिणगी, फुणगी (गवत, काटक्या जळत असता अथवा परशातून उडणारी) 'मधून मधून विस्तवाच्या ठिणग्या व किटाळें निघत ' –पाव्द ५७ २ आळ, दोषारोप सकट, अरिष्ट, हिणकसपणा 'मामिसें अक लिपत घेतो किटाळी। चेडूं नाहीं मजजवळी।' –ह ८ १४७ 'ह्यानें हें आमच्यावर उगाच किटाळ आणलें आहे ' –स्वप १४८ [का किडि=ठिणगी]

**किट्टर–किट्टरुं**—न (गो) ल्हान पाखरूं पक्षी

**किटेला कोमेला**—वि मळकटलेला, कोमेजलेला, मलिन व निस्तेज, मलूल व अवटरलेला (म्हातारीं माणसें, जुनाट झाडें, फळें याना म्हणतात) [किटणें+कोमणें]

**किट्ट**—न मळ, किटण, कीट, घाण, बुरशी, गज [स]

**किट्टव**—न (गो) ल्हान चिमणी

**किट्टाव**—स्त्री (गो) मोठी गाचीड

**किट्टी**—स्त्री (गो) ताव, गज

**किट्टी**—स्त्री जनावरावर पडणारी तावडी ल्हान गोचीड

**किट्टली**—स्त्री (वे) ठिणगी [किटळ]

**किडकलें**—न किड्क [कीटक]

**किडका–किडखाद**—वि कीड लागलेलें, किड्यानें खाल्लेलें (फळ पान), उत्तम भूमि शोधिली शुद्ध। तयें बीन पेरिलें किडखाद।' –दा ५ ३ ३ [स कीटक+खाद्]

**किडकालें, किडलूं**—न १ किडा, कृमि, कीटक २ ल्हान सरपटणारा प्राणी, साप इ०, किड्ड [स कीटक]

**किडकिडणें**—अकि खिळखिळें होणें, 'अस्थियत्र किडकिडी।' –भाए २०४ [ध्व]

**किडकिडीत**—वि सडपातळ, रोड, किरकोळ, काटकुळा, कृश

**किडकूल, किडकें**—न सर्पाचें वारीक पिल्लू, किड्डू [स कीटक]

**किडकोळ**—वि १ किड्यानीं खाण्यासारखा (लाकूड, फळ) २ किड्यानीं खाल्लेला ३ (ल) खरजुल [स कीटक]

**किडणें, किडेणें**—अकि कीड लागणें, किडखाद होणें, किड्यानें खाणें [किडा, तुल का केड]

**किडमिडीत–किडविड**—वि किजविड–विडीत पहा

**किडमाकडा**—वि चिक्कू, कद्रू –क्रिवि चिक्कूपणानें, कजूषपणानें

**किडमिडा**—वि अस्पष्ट, सदिग्ध (भाषण)

**किडमिडें**—न पिंगळाच्या (कुडबुडया जोशी) हातातील व माकडाचा खेळ करणाऱ्याच्या हातातील कुडबुड वाजणारें एक वाद्य, किडमुडें [ध्व]

**किडयाळें**—वि (गो) वाकडेंतिकडें, किचपीड

**किडरव–रूं**—न साप 'देखा एकी कुसीमाजीं किडरुवें। सामावीलि कीं।' –दाव १०४ [किडा]

**किंडला**—क्रिवि (राजा कुण) कशाला?

**किडयल–ळ**—स्त्री (कों) इसब, गजकर्ण [कीट+आवली]

**किडवळ**—वि किडलेलें [किडा]

**किडवळणें**—अकि १ (कों) किड्यानें खाणें, किडकें होणें (फळ वगैरे) २ शिजण्यात बिघडणें, कमजास्त शिजणें (भात वगैरे) [किडा]

**किडा**—पु एक क्षुद्र जतु, क्षुल्लक, वारीक प्राणी, जीव किड्यात अनेक जाती आहेत [स कीट, प्रा कीडओ, अप कीडउ हि प व कीडा] ०**मुंगी खाणें**–काहीं तरी खाणें, किरकोळ खाद्य, कोरडें खाणें (पोहे लाडू वगैरे) **किडे पडणें**–कुजून कृमि पडणें, नासणें, अपवित्र होणें, भ्रष्ट होणें, 'गुरुसेवा ज्यासी नावड। त्याच्या ज्ञानासी पडले किडे।' ०**मार**–पु एक वनस्पति **किड्याचा पुंजा**–पु (किड्यानीं खाल्लेला भुशाचा ढीग यावरून) रोगग्रस्त माणूस, किड्यानीं खाल्लेलें धान्य, कापड वगैरे

**किडामाकोडा**—पु क्षुद्र जीवजतु, किडे आळ्या वगैरे, [किडा+माकोडा=मुगळा]

पिडाल-ळ—न १ (पिद) विटाळ आगीच्या टिणग्या किटाळ यांचे १ पहा २ कुभाड, गरिष्ट, अपवाद, दुर्लौकिक, किटाळ यांचे २ पहा 'इयेनगामीं दास न धरीं । हे किडाळ बहुतीं परी । दिसतसे ।' -ज्ञा १ २३३ 'मजवरी रचिनी किडाळ । नाना शब्दजाळ तर्कांच ।'-एरुम्व १६ १२९ ३ लोखंडाचा कीट किंवा हिणकस लोखंड की अग्निमुळे किडाळ लोहानिदी चोपाळ ।' -ज्ञा २ १२८ 'जेगें परिसें नासे किडाळ । मग ते वर्णी मिरव गुडळ ।'-कथा ४ १३ १०२ -वि १ हाकलग, हिणकस वाईट, गिय २ खोटें [स कीट-किडाळ (आळ प्रत्यय) -ज्ञाम १८३४, का किड्=वाईट गाट]

किर्डी—स्त्री शेताची तिरडी

किडुकमिडुक—न बारीकसारीक दागिने, वस्तू मोडतोड, चारायुत; किरकोळ जिनगा, दागिन्याचे छुटे भाग [द्विरुक्ति]

किडूक—न १ लहानसा किडा, प्राणी २ लहान मुलांचा इल, एक दागिना [सं कीटक]

किर्डे—न (कों) निवाणु, एक लहानसा साप [किडा]

किडेमारी-रू-ऱ्या—वि चिक्कू, कद्रू, कजूप (माणूस) [किडा+मारणें]

किडेला—वि किडका, किडल्या 'किडल्या सावाचा ठह करुनि तोही पुरविला ।'-दत्तपदें ध्यानाष्टक पृ १

किण-णें—पुनरूी घा, घट्टे पडलेली चामडी, घर्षणानें शरीराच्या चामडीवर पडलेला वण 'नमस्कार करितां ते अव । सरीं । किण पडली चरणीं तेणें ।'-रादि ७ १०७ 'मुगुटघर्षणे करूनी । किणे पडलीं दिसती चरणीं ।' [स किण]

किणकिणी—स्त्री १ कारजाचा तुषार, पाण्याचा कण, फवारा २ (कों) (विरू) कणकणी तापाची शिरशिरी, कणकण, हुडहुडी, काटा

किणा—पु. १ घट्टा किण पहा २ क्षत, व्रण -वि घट्टे पडलेलें, क्षत पडलेलें

किणा—स्त्री एक झाड

किणॉ—वि (गो) बारीक आवाजाचा (मनुष्य)

किणी, किणॅ-ण्हे—वि घट्टे पडलेलें 'सर्वद नमितां जरी पद ललाट केलें किणें'-केका १६ 'दावी रडोनि झाले जे गध उगाळिता स्वहात किणी ।'-मोविराट १ १०६

किणेवचे—क्रि (गो) मार बसलेल्या जागचें रक्त एक वटून ती जागा निळसर दिसणें, रक्त साखळणें, घट्टा पडणें

किण्ण—क्रिवि १ किणकिण आवाजाचे २ रातकिड्याच्या किण्ण आवाजाप्रमाणें 'रान किण्ण करती ।'

किण्व—स्त्री कुजण्याची क्रिया करणारी एक वनस्पति (इं) यीस्ट

कित—पु १ संशय, विपरीत भावना, किंतु, शंका, 'माना किंत निवारिले । नानासंशयो छेदिले ।'-दा १ १ १२ 'यपं न मानावा किंत । हा पुरस्कार विख्यात ।'-दा ३ ९ ४२ २ कटाक्ष -दार [स किंतु]

कितवा—वि कवडा

कितवावा—वि कितव्या वळदचा, कोणत्या क्रमाकाचा, कितव्या पायरीचा 'हा मुलगा शाळेंत कितवावा आहे' [कितवा यांचे क्रमवाचक]

कितविनर्गी—पु (गो) दशा [?]

कितन—न (शाप) इं कगोन मॅगिरोन-गट्ट २ कर्बोनिक अल्काइड ०नाम्ल-न कार्बनिक अॅसिड

कितपत—क्रिवि किनीसें, कोणत्या प्रमाणानें परिमित, कोठवर [स कियत्+परिमित]

कितला-लो-लें—वि (गा गो) कवडा, किती

कितव—पु १ जुगार खेळणारा, जुगारी, जुवेबाज स्वाग्र यसह नरकातचि घुसतो स्त्री-मधुवर्गे कितवाचा । -मार्क ४२ ४१ २ (नाटय) नायिकेशीं विश्वासू नसून दुसऱ्याच स्त्रीवर अनुरक्त असणारा नायक ३ ठक, धूर्त माणूस -वि लुच्चा, कपटी, धूर्त

कितवा—वि कोणत्या क्रमाचा कितकावा पहा

किता—क्रिवि (राजा पुण) काय?

कितान-तन—न एक प्रकारचें तागाचें सणाचें कापड कतान-कतान पहा [अर कतान, कत्तान]

किताब—पु पदवी, सन्मानदर्शक सज्ञा -०धाला-पु पदवीधर 'युनिवर्सिटीचे किताबवाले तिच्या भजनांत दिसी सापडतील?'-नि ३ [अर किताब्]

किताब—पुस्त्री पुस्तक, लेख [अर किताब्] ०खाना-पु पुस्तकालय ग्रंथालय

कितायत-ती—स्त्री १ गोष्ट, खबर 'रानेरजवाड्याचा किताबती । दामाजीपताच्या खबरा वाचिती ।' -भपला ९ २ पदवी 'त्यास हवीरराव नाव -किताबती देऊन '-सभा ६२ ३ हे किताबत=पत्रव्यवहाराच्या शेवटीं लिहावयाची 'हे विनति' ०रेघ-स्त्री (कारकुनी भाषा) वह्यांच्या साऱ्या जिल्ह्यावर जी रेघ काढतात ती, यापासुन किताबती-लिहिणें-प्रकार-रीति इ० =लिल्ह्याच्या सर्व रुंदीवर लिहून मग दुसरीकडे वळणें, रेघ पहा

किति-तीं, कितिएक, कितियेक, किती, कितीक, कितेक कित्येक—वि कोणत्या सख्येनें किंवा प्रमाणानें परिमित कितीसें, काहीं, केवढें, थोडेसें, थोडें मत्वारिसीं हे किति येक वेडीं ।'-साब्द १ १३ [स कियत्, प्रा कित्तिय](वाग्र)

**किती केलेंतरी**-१ काहींहि केलेंतरी २ खरें पाहता 'किती केल तरी तो पडला आडमुठ्या !

**किती तरी**—वि पुष्कळ, अनेक

**किती(तीं)दा**—क्रिवि किती वेळा, पुष्कळ वेळा, अनेकदां

**कितीशीक-सक-साक**—क्रिवि (कुण) किती वेळा, अजमासें किती ? किनीसा (प्रश्नार्थक व नकारात्मक रचना)

**कितु-तू**—पु शंका, संशय, अंदेशा, डळमळीतपणा, कांक्षा कित पहा (क्रि० येणें) [स ]

**कितुकें**—वि किती 'पुढें दु ख कितुकें कळेना ।'—अफला १ [स कियत्]

**कितुला**—वि. केवढा ? किती ? 'गंधर्वांचा कितुला केवा ।' —मुविराट ४ १७ [स कियत्]

**कितें**—क्रिवि (गो) काय ? 'कितें आसा थैं' =तिथें काय आहे ०तर-क्रिवि काहीं तरी 'कितें तरी सागतलो' =काहीं तरी सागत आहे

**कितेव**—कितावत पहा 'हिशेबकितेब'—रा १५ २५४

**कित्तोक**—क्रिवि (व) मनात कितू आणून, संताप करून

**कित्ता**—पु १ आदर्शभूत म्हणून पुढें ठेवावयाचा, वळणदार अक्षरें काढलेला कागद, वळण २ हा शब्द एकाच सदराखालीं मोडणाऱ्या निरनिराळ्या बाबींच्या पुढें लावतात त्यावरून या बाबी एकाच सदरात येणाऱ्या आहेत असें समजावयाचें ज्याची खातीं किंवा ठोकळ नामनिर्देश एके ठिकाणीं केला असून बाकीचा विशेष तपशील किंवा माहिती दुसरीकडे लिहिलेली असते अशा बाबी किंवा गोष्टी ३ बाब, रकम, कलम, खातें ४ (ल) नमुना, ज्याचें अनुकरण करावयाचें असा मनुष्य, आचरण, तऱ्हा (क्रि० घेणें, उचलणें, गिरविणें) 'कर वळविला अंजें जें विष्णु धृत स्त्रीस्वरूप कित्ता तें' —मोआदि ३३ १६ ५ चिठ्ठी —क्रिवि सदरहू, उपर्युक्त, (इ) डिटो [अर कितआ] (वाप्र) ०घालून देणें—अमुक गोष्ट अमुक एका विशिष्ट प्रकारें करावी म्हणून लेखद्वारा किंवा स्वाचरणद्वारा सागणें, पुढें माडणें ०वळवणें-गिरवणें—नक्कल करणें, गिरविणें 'कर वळविला अंजें जें विष्णुधृतस्त्रीस्वरूप कित्ता तें ।'—मोआदि ३३ १६ **कित्त्या घर घालणें**—लिहिण्यास शिकविणें 'आपल्या इकडे मुलाला कित्त्यावर घालतात' —ग्यारिबाल्डी केळकरकृत सामाशब्द— ०इसम-पु. १ उपर्युक्त मनुष्य २ (हिशेबांत) स्वतंत्र, किरकोळ स्वरूपाची बाब, कोणत्याहि सदरांत न येणारी बाब ०खर्च-पु १ किरकोळ, बिनतपशिली खर्च २ हा खर्च भागविण्यासाठीं बसविलेला कर ३ उपर्युक्त खर्च. ०बाब—स्त्री अनियमित बाबी, कांहीं विशेष कारण नसतां बसविलेला कर ०वांटणी—स्त्री १ किरकोळ खर्चासाठीं बसविलेला कर, निरनिराळ्या प्रकारची तूट भरून काढण्याकरिता बसविलेला कर २ हिशेबातून काढून टाकलेली सरकारी वसुलातील एक बाब (वाटणीची टक्केवारी कमी करण्यासाठीं)

शाको. २ ३३

**कित्ता**—पु लहानसा मळा

**कित्ती-त्तेक**—किती-कितेक पहा

**कित्याक**—क्रिवि (कु कुण) का ? कशाला ? 'कित्याक हाव यों' =मी कशाला येऊ ?'

**कित्यावा**—वि कितीकावा, कितवा

**कित्येक**—वि कितीएक, काहीं, थोडे 'कित्येक दिवस लोटता देखा । घरा आला वैष्णव तुका ।'

**कित्लो**—वि (गो) किती ?

**किदरसाळ**—स्त्री (वे) भाताची एक जात

**किदरी रेघ**—स्त्री. (कारकुनी भाषा) बदाचे (अर्धा कागद) घडया घातल्यामुळें जे चार भाग होतात त्यापैकीं पहिल्या घराच्या मध्यापासून काढलेली रेघ रेघ पहा

**किद्वाळा**—क्रिवि (कु) केव्हा ? कोणत्या वेळीं ? [स. कियत्+वेला]

**किदी**—क्रिवि (भि) कधीं 'माय किदीहि मोठो वेहे ।' —भि ३५ [स कदा]

**किर्दे**—वि (गो) काहीं [स कियत्]

**किनई, किनी**—क्रिवि (बायकी) कीं नाहीं, किमानपक्षीं, निदान तरी, कमींत कमी 'मनुष्यानें किनई काहीं तरी धीर धरला पाहिजे हो !'—रजपूत कुमारी तारा पृ ४६९ [सं किम्+न+हि]

**किनखाप**-न, **किन्खाव**—पु सोनेरी, रुपेरी जरीच्या वेलबुट्टीचें काम केलेलें रेशमी कापड 'अंगीं किनखाप घातले ।' —ऐपो ३२ [फा कमख्वाब, कमखाब, किम्खाब] किनखापी-वि किनखापाचें 'आंगडें टोपडें किनखापी त्याला' —पाळणेसंग्रह पृ ९

**किनन**—न (शाप) (इ) किनोन मगलद्विप्राणिद आणि पातळ गधकाम्ल यांच्या योगानें गंधिलद्विभिनाचें प्राणिदी-करण होऊन किनन तयार होतें —शाको अ ३४१

**किनरा**—वि १ बारीक व उच (आवाज) २ नाकांतील आवाजाचें (बोलणें) [स किन्नर]

**किनरी**—स्त्री १ गाण्यामधील टीपेचा सूर २ एक तंतु-वाद्य [स किन्नर]

**किनरो**—वि (गो) नाकांत बोलणारा

**किनला, कॆडला**—क्रिवि (चि) कशाला ?

**किनवट**—स्त्री (गो) कमरेस होणारा एक रोग कनवट पहा [स कटि]

किनळ—स्त्री (कु) एक झाड, किंजळ पहा

किना-नें-न्हें—पुन घट्टा, घण पडलेलें कातडें, वण, क्षिण, किवन किण पहा (क्रि० पडणें)–वि बधिर, स्पर्शज्ञान रहित, किडे पडलेलें, ज्याला क्षत पडलें आहे असा, किवन्या पहा [स किण]

किनार-री—स्त्री १ काठ, कोर, पट्टी, बारीक कांठ (रंगीत किंवा साधा, रेशमी वगैरे वस्त्राचा) २ (विणकाम) रेशीम उकलून तनसळीवर तनतात व गुंडाळून काढतात त्यास किनार किंवा बर्धी म्हणतात [फा किनार्]

किनारा—पु तीर; कांठ, बाजू, गोट (समुद्र नदी, शेत पर्वत इ० चा) [फा]

किनो लाख—स्त्री लाखेचा एक प्रकार

किन्नर—पु स्वर्गांतील गायक जात, एक उपदेव, एक देव योनि, यांचें तोंड घोड्यासारखें असतें अशी समजूत आहे 'यर सुर सिद्ध किन्नर।' –ज्ञा ११५०६ [स]

किन्नर—पु (मोटर) मोटर गाडी साफसूफ करणारा, क्लीनर अप [इ क्लीनर]

किन्नरी—स्त्री १ किन्नर उपदेवाची स्त्री २ एक वाद्य विनरी पहा [स]

किन्निमित्त—क्रिवि किमर्थ ? कोणत्या कारणास्तव ? कशा साठीं ? [स किम्+निमित्त]

किन्ही—स्त्री जोंधळ्यावर पडणारा एक रोग काणी पहा

किन्हेरा—वि १ उच्च टीपेचा (आवाज, सूर, आलाप) २ नाकांतील, अनुनासिकयुक्त (भाषण) किनरा पहा

किन्ह्या—पु एक वनस्पति

किपळा-ळी—पुस्त्री (कों) कपचा, ढलपी, टवका, कपरी, (दगड वगैरेची) उडालेली चीप

किंपुरुष—पु देवांतील एक गायक वर्ग 'मुखा भासे दिसती पुरुष । शरीर पाहातां श्वापद वेष । ऐसे जे वानर राम दास । त्यांसि किंपुरुष बोलिजे।' –एभा १४५० २ (उपहासानें) हलका, कवडीमोल क्षुद्र मनुष्य [स किम्+पुरुष]

किफाइती-किफाईतवार-किफायतशीर-किफायती—वि नफ्याचा, फायदेशीर, किफायतकारक, लाभदायक [अर किफायत्]

किफाईत-यत—स्त्री नफा, फायदा, लाभ 'त्यापासून त्यास मोठी किफायत झाली' –नि ६१४ [अर किफायत्] ०सर्फा-पु फायदा ०सर्फेवार-वि फायदेशीर –वाडमा १४१

किंचरूं-रें-किमरूं-रें—नपु (कों) धुगुरें मच्छर ~ किमरें हें अनेकवचन आहे

किंबहुना—अ इतकेंच नव्हे, फार तर काय पण, फार काय सांगावें, फार कशाला, थोडक्यांत सांगावयाचें तर, 'किंब हुना भगदत्तें अत्युग्रा शक्ति सोडिली होती।' –मोभीष्म ९५१ प्रचारांतील एक संस्कृत म्हण० ही विशेष गोष्टींत अथवा विशेष अंशानें ज्या एखाद्या गुणाच्या अस्तित्वाचा बोलणारानें उल्लेख करावयास आरंभ केला आहे त्या गुणाच्या अतिशयत्वाचें विस्तृत वर्णन करण्याची अनवश्यकता दाखविते तसेंच एखाद्या गोष्टीची वास्तविक सत्यता, संभाव्यता इ० दर्शविण्यासाठीं बोललेल्या शब्दांपेक्षा ती इतकी अधिक असते कीं, त्यासाठीं अति शयकडक निश्चयात्मक, व्यापक शब्दांचा उपयोग करणें आवश्यक असतें किंवा केला तर अतिशयोक्ति केल्याचा दोष येईल अशी भीति असते अशा वेळीं हा उपयोगांत आणतात 'हा आईस भीत नाहीं, बापास भीत नाहीं किंबहुना देवास भीत नाहीं' 'त्या रस्त्याला लेखणी दिसत नाहीं, कागद दिसत नाहीं किंब हुना सूर्य दिसत नाहीं' [स किं=काय+बहुना=(बहु ची तृतीया) पुष्कळानें, येथें अधिकाची काय जरुरी आहे ?']

किबीन—स्त्री (नाविक) गलबताचा सुकाणूकडील (मागील) भाग, हा काहींसा कमानीसारखा गोल असून बाकीचा भिंती सारखा उभा असतो [इ केबिन]

किबीर—स्त्री (व) फिकीर, पर्वा 'अलीकडे मजुराला अनाची किबीर वाटत नाहीं'

किब्लागाही—वि वद्य, नामदार, 'किब्लागाही खान' –भापसबृ १३५ [फा किब्लागाह]

किब्लेगाह—वि १ मूळ अर्थ-प्रार्थनेकरितां ज्या दिशेकडे तोंड करावयाचें ती दिशा, त्यावरून २ वद्य 'किब्लेगाह नारायणराव साहेब' –खरे ७ ३५६५ [फा किब्लागाह]

किब्लेनुमा—न होकायंत्र दिशादर्शक यंत्र [फा]

किंभाव—वि (काव्य) काय किंमतीचा ? काय महत्त्वाचा ? कोणत्या सत्त्वाचा ? निजलोट शब्दाखालीं जास्त विवेचन पहा 'किंभाव वैरागरीचा सुभट।' [स]

किंमत-किम्मत—स्त्री १ मोल मूल्य, बदल द्रव्य, भाव, दर २ (शब्दश) योग्यता, महत्त्व, पर्वा 'फिर्यादीची आम्ही कांहीं एक किंमत समजत नाहीं' –विविध ३ १६५ 'प्रक्षेपकाचें हें एक मत म्हणून तरी त्याची कांहीं तरी किंमत असणरस' –मसाप २ २ १२८ पुढील शब्दहि प्रश्नार्थक किंवा निषेधार्थक वाक्यांत याचअर्थीं वापरतात– कया कवा, लेखा, पाड, प्राप्ति, प्राज्ञा, बखा, विसात, मजकूर, मदार, मामलत, मुदारा [अर कीमत्] (व्याप्र) ०चुकावणें-सक्रि मोल चुकतें करणें देणें, भावविणें समाशब्द– ०कापणी-स्त्री दुसऱ्यापेक्षां आपण स्वस्त देतों असें एका व्यापाऱ्यानें दुसऱ्यासबधानें सांगणें, भाव बिघडविणें,

–के ३ १२ २९ ०दार–वि मौल्यवान 'शालु, चादणी किंमत दार '–अप १२८, ०वार–विक्रिवि १ क्रमानें प्रत्येक जिनसाची किंमत दाखल केलेली (यादी, टिपण, हिशोब) २ किंमतीमागून किंमत ( कलमवार वगैरे यादी ) [अर कीमत+वार]

**किमती**—वि मूल्यवान, बहुमोल [फा]

**किमपि**—क्रिवि ( नकारार्थी प्रयोग ) मुळींच, बिलकूल, काहींच, थोडें सुद्धा, किंचिन्मात्र, [स किम्+अपि]

**किम(मि)या**—स्त्री १ हीन धातूचें ( विशेषत तांबें ) सुवर्ण बनविण्याची गूढ विद्या 'निधी दैवें लाभल्या हातीं। किमर्थ शोधाव्या किमयायुक्ती।'–नव २३ ९० २ (ल) ज्यापासून फार मोठा लाभ होतो असा धदा, व्यापार, यत्र [अर फा कीमिया] ०गर–गार–पु किमया करणारा, जाणणारा [फा]

**किमरू**—न (गो) चिलट, मच्छर, किंवरू पहा

**किमर्थ**—क्रिवि का? काय म्हणून? कोणत्या कारणाकरिता? कशासाठीं? 'मज असत्य किमर्थ म्हणसिल।' [स किम्+अर्थ]

**किमसान**—न पिवळें अगर सोनेरी रंगाचें कमावलेलें कातडें, चामडें ( जोडे, छत, पडदे यासाठीं )

**किमान, किमानपक्ष**—क्रिवि निदान, कमींत कमी, थोडयांत थोडें, कनिष्ठपक्षीं, काहीं नाहीं तरी [स किं+मान+पक्ष]

**किमान मर्यादा**—क्रिवि कमीत कमी, याच्या उलट कमाल मर्यादा

**किमूस-मेस**—न (गो) मच्छर, कीटक किंवरू पहा

**कियत्**—वि किती, कितीसें ( समासांत ) कियद्दूर=किती लांब, कियत्प्रमाण=किती प्रमाणाचा, कियत्संख्या=किती राशीचा?

**कियास**—कयास पहा 'त्याजवरून कियास करावा कीं' –रा ५ ५२ [अर]

**किर**—उद्गा पराजयदर्शक उद्गार 'वहिणी पाली वार। अवघ्या म्हणविते किर।'–व ५५३ [ध्व] ०खाणें–(व) टेकीस येणें, जिकीरीस येणें 'मुलाच्या अशा उधळपट्टीच्या खर्चानें बाप किर खाऊन गेला'

**किर-रू**—क्रिवि ( काव्य ) खरोखर, खचित, खात्रीपूर्वक 'इएचा किरू प्राणेश्वरू। पुण ऐसा नाहीं योगेश्वरू।'–शिशु ८४७ [स किल]

**किरकणें**—अक्रि १ किंकाळी फोडणें (हत्तीनें) २ दया यईल अशा प्रकारें गयावया करणें, रडणें ( भिकारी, मुल वगैरेनीं किरकिर करणें ३ त्रासणें, कुरकुर करणें 'भिक्षा मागता किरकों नये।'–दा १४ २ १८ [ध्व]

**किरकाडा**—वि काटकोळा, रोड, अशक्त

**किरकाँच्डें**—वि (गो) वाकडेंतिकडें

**किरकिटणें**—अक्रि खरकटें वगैरेनीं हात किंवा स्वयपाकाचीं भाडीं करवडणें, बरबटणें, हाताला अथवा भाडयाला (कणीक, भात वगैरे) चिकटलेला असणें

**किरकिर-कीर**—स्त्री १ ( ध्वनि ) पिरपीर, पुष्कळ वेळ पर्यंत चाललेला, त्रास उत्पन्न करणारा शब्द, आवाज (मूल, भिकारी इ०चा), कटकट. ( क्रि० करणें, लावणें, माडणें ) २ कानस घासण्यामुळें होणारा आवाज –क्रिवि कुरकुरत, मुळमुळ (क्रि० वाजणें, रडणें, करणें) [ध्व]

**किरकिरणें**—अक्रि कुरकुर करणें, किरकिर पहा

**किरकिरा-रो**—पु १ (गो) पाकोळा नावाचा मासे खाणारा पक्षी २ किरकिर करणारा मनुष्य

**किरकिरा-ऱ्या**—वि किरकिर करणारा, कुरकुऱ्या 'नेहमीं आईच्या कडेवर वागणारें पोर जसें किचकट व किरकिरें होत जातें '–नि ४२९

**किरकिरांत**—स्त्री किंक्रात याचें अपभ्रष्ट रूप

**किरकिरीत**—वि पिरपिरें, खटयाळ, चिडखोर (मूल)

**किरकिरें**—न १ मुलांचें एक करकर आवाज करणारें लाकडी खेळणें २ गोफणीमध्यें दगड ठेवावयाची मधली जागा

**किरकिसा**—पु (को) किडलेल्या लाकडाचा भुसा, पीठ, लाकडास कीड लागली असता खसखसीसारखा जो पदार्थ उत्पन्न होतो तो

**किरकी**—स्त्री १ नथेचा सोन्याचा आकडा, फासा २ बुगडीचें मळसूत्र ३ कठडयामधील कातीव लाकडी गज

**किरकीट**—स्त्री दात खाणें [ध्व]

**किरकीदार**—वि किरकीप्रमाणें पऱ्या किंवा वेढे असलेलें (पागोटें)

**किरकूळ-कोळ**—वि १ रोडका, काटकुळा, बारीक, लहानसा, छोटेखानी, पाहिजे त्यापक्षा कमी २ फुटकळ अथवा लहान प्रमाणात विकत घेतलेला किंवा दिलेला माल, धान्य, त्याचप्रमाणें असलेला व्यवहार ३ चिल्लर, मोघम, अनिश्चित स्वरूपाचें, कमी महत्त्वाचें (जिनस प्राप्ति, खर्च, बाब गोष्ट) ४ बारीक (आवाज स्वर) [कीर=पोपट+कोळ=घरटें] ०कागद–पु चिल्लर खर्चाचा कागद ०काम–न हलकें काम, क्षुद्र काम ०खरेदी-विक्री–स्त्री फुटकळ खरेदी-विक्री, याच्या उलट ठोक खरेदी–विक्री 'या शहरात मालाची किरकोळ खरेदी कधींहि होऊ नये'–मुव्या ५० ०नाणें–न सुर्टा, चिल्लर मोड ०प्राप्ति–स्त्री आवांतर मिळकत ०भाग–पु फुटकळ हिस्सा ०मंडळी–स्त्री सामान्य लोकांचा जमाव ०वसूल–पु अवांतर प्राप्ति

**किरकोळ**—वि किरकूळ पहा

**किरकोळी**—स्त्री किरकोळ वस्तूंचा ढीग

किरखाद—वि (कों) किरानें, पोपटानें किंवा कीण इत्यादि पक्ष्यानें खालेल्या [कीर+खाणें]

किरगी—स्त्री (गो) एक पक्षी [स कीर]

किरगी—स्त्री (वे) काडी, चिरडी [स चीर का किर=लहान]

किरगुणी—स्त्री (क) चिरडी, काडी, 'किरगुणी रद्दीला फार कमी आहे'

किरगें—स्त्री (गो लि) मुग, धान्य

किरचण—स्त्री (चि) बारीक सुरा, फोडी

किरट—वि (गो) गोचीड

किरटा—वि १ (कों.) कृपण, कद्रूप २ बारीक टाकाची लेखणी ३ अशा लेखणीनें लिहिलेलें गिचमिड, दुर्बोध (अक्षर) (निंदनें म्हणतात) ४ कृश, गरीब, भिकार, किरकोळ (इमारत, शाकूड) ५ कमजोर, भिकार, लहान (आवाज, उच्चार) ६ लहान, खुरटें, निःसत्त्व (फळें वगैरे) ७ अशक्त, कमजोर (दांत, चेहरा) 'त्याचा चेहरा लांबट व किरटा होता' –हाकाव २०८ ८ काटकुळा, ठेंगणा (माणूस) ९ (सामान्य पणें) नवीर्य, नःसत्त्व [का किर=लहान]

किरड-ड़ूं—न १ कीटक २ लहान साप 'जी किरडू तरी कापडाचें। परि लहरी येत होतिया साचे।'–ज्ञा ११ ५४ 'इतर किरडें आणि फणिपाळ।'–रावि २५ ७१ [दे करोहि, कों चि का किर=लहान]

किरडावणें—अकि (व) साप चावणें

किरडी—स्त्री प्रेताची तिरडी, ताटी

किरडुव—न किडा 'अविवेक किरडवें तत्त्वता। अविद्या भ्रांति जड देवता' –रावि १५४ [किरड]

किरण—पुन १ प्रकाशरश्मि, सूर्य, चंद्र इत्यादि तेजस्वी पदार्थांपासून निघालेली प्रकाशशलाका, प्रकाशाची रेघ २ सूर्याचें ऊन 'किरणें कैंची नुगवता अर्क।'–रावि १४० [स] •चक्र–न किरणाचें मंडळ (सूर्याभोंवतालचें) सूर्याची अंशु माला ' 'किरणचक्रीं विराजे तमारी। चौरें वारिती हरीवरी।' [स] •जाल–न किरणांचें जाळें, रश्मिजाल •परावर्तक दुर्बिण–स्त्री जीमध्यें स्वस्त पदार्थांच्या किरणांचें परावर्तन होऊन तो आपणास दिसतो ती दुर्बिण (इं) रिफ्लेक्टिंग टेलेस्कोप •प्रतिरोधक–पु ज्यामधून प्रकाशकिरण पार जाऊ शकत नाहीं असा •वक्रीभवन–न प्रकाशाचे किरण एका पदार्थांतून दुसऱ्या कमी अधिक घट्ट पदार्थांतून जातांना कांहींसे वाकडे होऊन जातात ती क्रिया •विसर्जन–न किरण निघून जाण्याची क्रिया (इं) रेडिएशन •शलाका–स्त्री किरणाची रेघ, स्तम्भ, ओळ (इं) पेन्सिल ऑफ रेज

किरण—न सरी, नेम, निशाण पक्का •साधणें–क्रि (कों) बरोबर, नेमकी सरी मारणें, बरोबर नेम मारणें

किरणें—सकि पसरणें, विस्कटणें 'त्रिकुटें तिकुटें भरुत्या मदनांतिल उग्र गरल तें किरती।'–कुमक ७७ [स कॄ=विस्कटणें, पसरणें]

किरदार—न हिशेब वगैरेच्या पुरवणीपत्राच्या माथ्याला लिहिलेलीं महिना आणि वर्ष अथवा थोडेसे शब्द, पूर्वीच्या भरलेल्या पत्राचा विषय पुढें चालविण्याकरितां मिळवून आणलेला कागद. [फा]

किरप—पु (गो) बारीक माशांचा जमाव [स कृमि]

किरपण-पाण—वि (राजा कुण) लहान, बारीक

किरपण-पीण-मिरपण—(गा) पु कृपण, कद्रूप माणूस [सं कृपण]

किरपाण—वि कृपाण, खड्ग, शीख मनुष्य जवळ बाळगतो तें शस्त्र [स कृपाण]

किरम—पु (व) जंत [स कृमि]

किरमाड-डी-डें—वि (क) कृपण, चिक्कू, कद्रु 'परवाच्या सभेंतमगाचे साफर किरमाड म्हाइसराया चे डोक्यावर फुटणारें असो कीं, हावऱ्या कॉंग्रेसच्या डोक्यावर फुटणारें असो' –के २० ९ ३० 'त्या किरमाड्या माणसाकडून तुम्ही काय गरज पुरी होणार ?'

किरमाणी-ओ(वो)वा—पु चार ओवा, हा इराण देशांत पिकतो याची रुचि कडवट असते एका रशियन वैद्यानें याचें सत्त्व काढून सँटोनाइन नांवाचें औषध (१८३० मध्यें) तयार केलें हें जनावर १ ते ३ गुंजांपर्यंत साखरेशीं मिसळून रात्रीं देतात व सकाळीं सुंठीचा काढा अथवा एरंडेल देतात [फा किरमान+ओवा]

किरमिजा-मीजी-मेजी—वि किरमिज (रस) सबंधीं, एक प्रकारचा रंग, हा एक प्रकारच्या किड्यापासून तयार होतो हा लाल असतो •दाणा–पु किरमिज रंगाचा किडा, गोळा, गाळी, दाणा [स कृमिज, फा किरमिज्, इं क्रिमसन]

किरमीज मेज—न एक प्रकारचा किडा [स कृमिज फा किरमिज्]

किरमें—न (कु गो) पडसें, ढेंकूड [स कृमि ?]

किरली—स्त्री (कु) हात अगर पाय यात काटा गेल्या मुळें पडलेला घट्टा, घर, भोंवरी

किरली—स्त्री (चि) मुक्ती दिसू लागलेली बारीक लहान काकडी

किरव—पु (कु) खाऱ्या पुळींतील सुईच्या अग्रापेक्षांहि लहान जंतु [स कृमि]

किरघट—स्त्री (कु) कणवट

किरवण—न चित्रकाम, चित्राचें क्सब 'किरवणमूचगा। विस्मयोत्कर्पे सारगा।' -राला ३७ [स कृ-करणें]

किरव(वि)र्णे—उक्रि लाकूड, धातू माती वगैरेवर चित्र, आकृति वगैरे कोरणें

किरवत—पु सावतवाडीकडे राहाणारी ब्राह्मणातील एक पोटजात व तींतील व्यक्ति [स क्रमवत कृमिवत?]

किरवा-वें—पुन १ डोंगरात किंवा सपाटीवर आढळणारा एक खेंकडा याचा रग काळसर पाढरा असतो २ गाठ फास -शर

किरवि(व्या)जर्णे—अक्रि भात भाजी वगैरे बरोबर न शिजल्यामुळें नासणें, खराब होणें, अर्धकच्चें भाजणें

किरवितणें—क्रि १ (दात) वाजविणें किरकिर आवाज करणें २ (ल) मागणें, तोंड वेंगाडणें 'आणि पक्वेंद्दसाठीं मुद्रा मयाप्रति। दात किरवितसा बैसे।' -स्वानु ३ ३ ४३ [ध्व]

किरविल—पु सर्प, किरड् 'किरविल जैसा पसरला।' -वसीस्व ४ ९९ [स कृमि किंवा कीर+आवली?]

किरवें—न १ (कों) काष्ठादिकास घासण्यासाठीं तयार केलेलें माशाच्या खरखरीत पाठीचें हाड २ खेंकडा येकागी करूनि किरवें धरूनि आणिलें।' -दावि ३५६ ३ किरिरें पहा

किरसाण-न, किसान—(हिं) शेतकरी 'रयत, किरसान याजवर महाराजाची दया' -विक्षिप्त २ ११९ [स कृष्-कृषाण]

किरळ-ळी—नस्त्री १ जोंधळ्याच्या कोंवळ्या मुरव्यात उत्पन्न होणारा एक विषारी किडा हा खाल्ला असता गुरू मरतें त्यामुळें गुराला होणारा रोग (क्रि० लागणें) 'अरे सख्यारे हा गदन अनिवार। ज्यार फार करी किरळ।' -प्रश्न ९४ २ जोंधळा, बाजरी याची कापणी झाल्यावर शेतात राहिलेले त्याचे धस, सड -नपु ३ नवीन कोंब फुटलेली हरळी ४ (क) भरत येणाऱ्या जखमेचा आतील भाग (क्रि० बाधणें, येणें, धरणें फुटणें) -न ५ नेहमीचें झाड व तिचें फळ ६ अंकुर, ज्वानी, जामदारपणा, 'नातु कोंवळें किरळ।' -ययादी १ २९१

किरळी—स्त्री १ पायाचा एक रोग, भोंवरी किरली पहा २ किरकोळ, बारीक, ल्हानपणाची अवस्था कवळी किरळी नव्हती तुमची पाहिली पचविदी।' -पला १०४

किराईत-ताइत्री—नस्त्री काडचिराईत, याच्या काडे चिराईत व पान चिराईत अशा दोन जाती आहेत हें झाड हात-दीड हात उच असून पानें लहान व लांबट असतात चव कडू असून याच्या पानें फुलें, फळें, मुळें, काडे हीं पौष्टिक, ज्वरनाशक व सारक आहेत आम्लपित्तावर याचा काढा करून त्यांत मध घालून देतात [स किरात, चिरातिक्ता, हि चिरायता, ब चिरता, चिराता, गु करियातु, इ चिरेटा, लॅ स्विर्टिया चिरेटा] ०फुलकी-स्त्री चिराइताची ल्हान जात

किराची—स्त्री तोफेच्या मागची दारूगोळ्याची पेटी

किरांटी—स्त्री (गो) पोपटाची एक ल्हान जात [का कीर]

किराड—पु शूद्राची एक जात [स किरात, सिं किराडु]

किराण—न १ उडी, उड्डाण किलाण पहा (काहींच्या मतें खालीं डोकें वर पाय करून मारलेली उडी) (क्रि० मारणें, टाकणें, साधणें) 'उड्डाणें किराणें घेती गगनीं।' -मुवन १५ १५७ 'घेतलें किराण अंतराळ जानसे।' -दावि ४९६ २ सधान, निशाण, नेम (क्रि० साधणें, बाधणें, चुकणें) ३ शुभग्रह युति, संधि, योग्य समय [स किल्-खेळणें]

किराण—पु (कुण) उगवत्या अगर मावळत्या सूर्याचे मद किरण (क्रि० पडणें, राहणें) [स किरण]

किराणा—पु लवग, मिरीं, मिरच्या, गूळ, तूप साखर इ० माल, वाणसामान [स क्री=विकतघेणें, सिं किर्याणो]

किरात—पु १ अरण्यवासी एक जात, भिल्ल ही जात शिकारी वर निर्वाह करते तो भेटला गुहक नाम किरात वाटें।' -वामन भरतभाव ५० २ किराइताची एक जात

किराती—स्त्री भिल्लाची बायको, भिल्लीण 'आलिंगिली पुनरपी प्रमदा किराती।' -आश १९

किरामोरा—न (गो) पोपट, मोर वगैरे पक्षी किंवा त्यांचीं चित्रें [कीर+मोर]

किराया—पु भाडें 'दोन नावा तीनशें रुपयाची किराया करून पटण्यास आलों' -पदमव ७३ [अर किराया=भाडें, तुल स क्री=विकत घेणें]

किरार—न (गो) (वाघ वगैरेची) उडी, फाळा किरण पहा

किरावणें—क्रि (गो) पोपटासारखें बोलणें [कीर]

किराळ—पुन किरळ-ळी अर्थ १, २, ३ पहा

किराळणें—क्रि (कों) कावळ्यासारखा कर्कश आवाज काढून ओरडणें, कर्कश आवाज काढणें, किंकाळणें [किराळी, ध्व]

किराळी—स्त्री (कों) किंकाळी, किंचाळी, कर्कश आरोळी, हत्तीची किंकाळी [ध्व]

किरिरें—न (कों) शिक्यावर भाडें पडू नये म्हणून शिक्याच्या वर फास बांधतात तो

किरिस्तार—पु (गो) खिस्ती जात व तींतील व्यक्ति [पो क्रिस्ताओ, इ क्रिश्चन]

किरी—स्त्री १ क्षयरोग २ (ल) कीड 'मग समारीं देनें चितनें लागना किरी निद्रेनें।' -मायभा ३ २९ [कीड-किरी?]

किरीट—पुन डोक्यावरचा मुकुट •कुंडलें—न (अव) मुकुट व कानांतील भूषणें, पौराणिक नाटकांतील देवाच्या व राक्ष साच्या सोंगांचीं शिरोभूषणें प्रथम मातीचा मुकुट (किरीट) तयार करून त्यावर कागदाचे थर चिकटवून त्याचा ठसा घ्याव याचा नंतर त्याला सोनेरी वर्ख लावावयाचा त्याच्या मागें मोरांच्या पिसांची ताटी लावली म्हणजे तो सुशोभित दिसे कुंडलें अशींच करीत असत [स]

किरीटी—पु अर्जुन 'हा तर्कांचिये दिठी। गोचर नोहे किरीटी।' –ज्ञा २ १४८ [स किरीट]

किरीम-किर्म—पु (कों कुण) जंतु, किडा (फळ, पोट, दात यांतील) [स कृमि]

किरीम(किर्मे)घातलें—न (कों कुण) कृमीपासून उत्पन्न होणारा पेटका, उन्मादवायु [स कृमि+वात]

किरु—क्रिवि निश्चयें करून, खात्रीनें 'इमेचा किरु प्राणें शुद्ध।' –शिशु ८४७ 'मज विदग्धता विणद्ध' –भाए ८३ [स किल]

किरोटा—पु १ रानटी पोपट, वठ न फुटलेला राघू २ (कों) करटा [कीर+टा]

किर्डेचें—क्रि (गो) दात खाणें

किर्द—स्त्री १ रोजनिशी २ रोजच्या जमाखर्चे लिहिण्याची वही ३ लावणी (जमिनीची) 'पावसाळा, कौल देऊन आज्ञा केली तर रयत उमेद धरून किर्दी करितील' –रा ६ १४८ ४ लागवड केलेली जमीन [फा कर्द्=काम] •आबादानी–स्त्री लावणी सचणी 'गावीं राहून वसाहत करून किर्द आबादानी करणें' –रा १६ ५५ •महामुरी-मामुरी–स्त्री लावणी सचणी, लागवड, वसाहत 'त्यांणीं तर्थे किर्द महामुरी केली' –रा १५ २०२ [फा कर्द्+अर मअमुर=आबाद] •सार–वि लागवडी खालील, लागवडीला योग्य (जमीन) [फा कर्द्+सार]

किर्दवा—पु पीक, लागवडीचें उत्पन्न [फा कर्द्]

किर्रट—स्त्री (गो) कनवटी

किर्मीजी—किरमिजी पहा

किर्मीर—वि चित्रविचित्र 'अत्यंत किर्मीरित कांति झाली।' –सारुह ६ २६ [स किर्मीर]

किर्मुचें—सक्रि (गो) १ अंकुर तोडणें २ नखानें खरूज खाजविणें

किर्मूज—स्त्री (गा) लालसर रंग किरमिजी पहा

किर्यां—न (कु) पडसें, शेंबूड किरमें पहा

किर्रें—वि १ कर्कश, शहारे उत्पन्न करणारें (रातकिड्याचा, पक्ष्याचा आवाज) यावरून २ निबिड अरण्य अथवा दाट झाडी या अर्थानें योजतात, कारण तेथें नेहमीं रातकिड्यांचा, पक्ष्यांचा आवाज व झाडांचा करकर आवाज होत असतो 'मोठमोठे वृक्ष वाढून किर्रे झाडी झाली आहे' –पाब्द १ ३ पडून गेलेला, भागलेला 'मी अगदीं किर्रे झालों' [ध्व]

किर्ल(ल्ल)—पु (गा) बांबूच्या मुळाला फुटलेले नवीन अंकुर यांची भाजी करतात •कातर्ने–न (गो) झाडावरील फळें, पाला काढण्यासाठीं दोंडास कोयती लावलेली काठ, काठी, बांबू आंकडी किर्लुं(ल्लुं)चें–क्रि (गा) मोड येणें

किर्ली—(क) पायांत कांटा जाऊन झालेला जाड दडदडीत भाग, घट्टा, भोंवरी, (गो) मोड, अंकुर

किलकिल-किलाट, किल्किलाट—पुस्त्री १ (ध्वनि) पक्ष्यांची चिवचिव त्यावरून २ गडबड, गोंगाट (माणसाचा) 'कोठें गर्णी हा फावला एकांत। सदा किलकिल भोंवतीं बहुत।' –तुगा १११ 'अधीं सभ्रम किल्किलाट करिती, शोभा दिसे फार ते।' –आसेतु १० [ध्व]

किलकिलणें—अक्रि किलकिल आवाज करणें, गोंगाट करणें, चिवचिवणें (पक्ष्यांचें) [ध्व]

किलकिला-लीत—वि अर्धोन्मीलित (डोळे, दार, कळी इ०), अर्धे उघडलेलें, किंचित् उघडलेलें (क्रि० होणें, करणें)

किलकिलावणें, किलकिला लावणें—उक्रि (कों) थोडेंसें उघडणें, किंचित उघडणें (डोळे, दार इ०)

किलकिलें—वि अर्धवट उघडलेलें

किलच, किलीच-चा—स्त्री १ कडीपाटाच्या फळींमधून बसविलेल्या लाकडी चिलप्या, ढलप्या 'गरुडपाचूच्या किलचा पाट।' –मुसभा २ २८ २ तुकड्याचा कडीपाट करण्याकरितां एका कडीपासून दुसऱ्या कडीपर्यंत घातलेले फळीचे आडवे तुकडे (जास्त लाब अधिक चांगल्या फळ्याच्या ऐवजीं) ३ हिऱ्याचा लांब तुकडा ४ कापसामधील गवताची काडी, धाग इ०

किलचण-न—स्त्री (व) लहान चिलपी किलच पहा

किलचबंदी—स्त्री १ किलचाची तक्तपोशी २ तक्तपोशी, वरील प्रमाणें केलेला कडिपाट –वि किलचाचा केलेला (कडिपाट)

किलची-चण—स्त्री १ किलच अर्थ १ पहा 'शुद्ध पाचूच्या किलच्या वरी। अभेद जोडिल्या भळाकुसरी।' –ह २ १९ २ जास्त किलचाचा टोंग [दे किल्चि]

किलप्या—स्त्रीअव १ थप्पडा थापट्या, थापट्या •देणें–(ल) थोबाड फोडणें 'थोमुखात देणें 'क्रोध आला हकीमाला किलप्या द्यायचा हुकूम गडयारें।' –रामाचें जुनें गाणें

किलचिल—पुस्त्री १ किल्किल पहा २ की ३ पहा

किलबिलण-किलबिलाट—किलकिल, किलकिलणें पहा

**किलवणें**—क्रि हलविणें (जमीनींत गाडलेला वासा, वगैरे) [स कड्]

**किलवाणा-णी-णें**—वि १ केविल्वाणा पहा दीनवाणा, रडवा (स्वर, भाषण, माणूस) 'हे नरभूषण दायक अन्य दरिद्र फिरें जरि तो किलवाणें।'—किशुक ३८ 'मी तरी तुझा अनाथ दीन। येथें दिसतों किल्वाण।'—भवि ४७ ९१ 'बापूनें किल वाणी तोंड करून म्हटलें'—वाळ २ ७० २ हलका, लहान, क्षुल्लक, कुरूप (कपडा, दागिना, इमारत), दुर्दैवी, कृपण, नीच (मनुष्य, त्याची वागणूक, कृति) [केविल्वाणा पहा]

**किलागों**—पु (गो) बारीक मासा

**किलाण**—न १ उडी, उड्डाण, झडप (क्रि० मारणें, टाकणें, घालणें, साधणें) २ उड्या मारणें, खिदळणें, धिंगाणा घालणें (लहान मुलाचें) (क्रि० मांडणें, माजवणें) किराण पहा [स किड्=खेळणें, हिं कलान]

**किलाफ-फा**—पु सशय, वैर, कपट, वैषम्य, विरोध, किल्मिष 'हर प्रयत्न करून जनकोजी शिंदे यास भेदून त्याचें चित्तातील किलाफ काढून त्याचे हातीं मुल द्यावें'—भाव ३७ [अर खिलाफ]

**किलावर**—पु खेळण्याच्या पत्त्यातील एक काळा रंग [इ क्लब]

**किलाचा**—पु (हिं) महातास पाय अडकविण्यासाठीं हत्तीच्या गंडस्थळावरून खालीं सोडलेली दोरीची रिकीब, हत्तीचा गळपट्टा, कलावा पहा 'पायावरती चढोन किलाव्यात बसले'—आयाइ ११ [फा कलावा]

**किलिसात**—पु (तना) किल्ली

**किली**—स्त्री किल्ली पहा 'हातास न येता किली। सर्वही अप्राप्त।'—दा ७ २ १३ 'त्याची किली तूज अधीन आहे।'—सारह १४

**किलेमाणी**—वि जात्याच्या खालच्या तळीच्या खुंट्या भोंवतीं फिरण्यासाठीं वरच्या तळींत ज्यास वेढी बसविली आहे असें जातें [स कील+म माणी=मायणी, वेढी] ०**करणें**—क्रि वरीलप्रमाणें किलेमाणी बसविणें 'जात्याला किल्माणी केली'

**किलोड**—स्त्री (व) मांजराची झोंबी, लढत

**किलकारी**—स्त्री चीत्कार, हर्षाची आरोळी, गर्जना [किल्कारणें ध्व]

**किल्बिष(ल्मि)ष**—न १ पाप दोष, 'देशा किल्बिषापासूनी। पुढें पळशाप तें गमुनी।'—यथादी ३ ९२३ २ (ल) घाण, मळ [सं किल्मिष]

**किल्ल**—पु (गो) कोंब (झाडाचा वगैरे) किरळ पहा

**किल्ला**—पु गड, दुर्ग, कोट, भोंवतालीं चर, तट, बुरूज इ० करून राहण्यासाठीं तयार केलेलें सुरक्षित स्थळ, गढी [अर. कल्लाह्=शिखर, किल्ला=कोट] (वाप्र) ०**नेसविणें**—किल्याभोंवतालचें रान पेटविणें **किल्ल्यावर चढविणें**—डोंगरी किल्ल्यात कैदेंत ठेवणें 'किल्ल्यावर चढवा आनंदीबाईला'—ऐपो १६५. सामाशब्द— **किल्लावर्ताळा**—पु शेतकऱ्यांनीं किल्ल्यावरील शिबंदीला धान्य पुरविण्याऐवजीं त्याच्यावर पट्टी बसविली जात असे तो **किल्ले कोट**—पु साधारणरीत्या किल्ला, किल्ले वगैरे मजबूत ठिकाणें ०**जात**—क्रिवि सर्व किल्ले 'किल्लेजातचा बदोबस्त'—वाडसमा ३ १६ [अर किल्ला+जात] ०**दार**—पु दुर्गाधिपति, किल्लेकरी, याची नेमणूक राजधानींतून, मुख्य सरकारकडून होई व त्याला पगार तेथून मिळे, किल्ल्यावरील शिबंदी त्याच्या दिमतीस असे त्याचें कामपहा —इऐ २२ २४ [अर किल्ला+दार] ०**नशीन**—वि किल्ल्यावरील, किल्ल्यावर कैद झालेला 'मन्सबदार किल्लेनशीन वसन्तगड'—रा १५ ९५. 'रघुपतराव नारायणाचा पक्ष केला, ते किल्लेनशीन केले'—मदवा १ ७८ ०**बंद**—वि किल्ल्यास वेढा पडल्यामुळें अडकलेला 'किल्लेबंद झाले असता परिणाम नाहीं'—मराचियोशा ३७ **किल्ल्यानिहाय**—अ किल्लोकिल्लीं, प्रत्येक किल्ल्यावर, 'किल्ल्याकिल्ल्यानिहाय तोफा करविल्या'—म्दरु १ १४५

**किल्लाण**—पु पक्ष्याचा किंवा मुलाचा कलकलाट, गोंधळ. [ध्व]

**किल्ली**—स्त्री १ चावी, कळ 'झाला हुकूम तोफखान्याला किल्ली जिवबादादाचे हातीं।'—ऐपो २३५. २ एखाद्या कठिण गोष्टीचें स्पष्टीकरण किंवा उलगडा, एखाद्या शास्त्राचा सारभूत प्रास्ताविक भाग ३ (ल) हिकमत, कळ, युक्ति, मेख 'विषय विडा देऊन भुलविताील लढवून हरकिल्ली।'—पला १०४ 'पेशवाई चालविण्याची किल्ली नानासाहेबाखेरीज इतरास सापडली नाहीं'—अस्तभा ४ ४ (छापखाना) फर्मा आवळण्याचें साधन [स कील, फा किलीद, म जि किलो] ०**फिरविणें**—कावेबाज युक्ति काढून मयविणें, चिथविणें, गुप्तपणें बंदोबस्त करून ठेवणें

**किल्ली**—स्त्री (गो) काटा रुतून पायाच्या तळव्यास होणारा फोड, भोंवरी किरली पहा

**किल्हाण**—न उड्डाण किराण, किलाण पहा

**किल्ह**—न (व) सर्पाचें पिल्लू किरड पहा

**किंव-फाकड्त**—न १ कींव, करुणा, दया काकुळत पहा

**किंव**—स्त्री (गो) दुखी, तळफ

**किंवरा**—स्त्री (व) निंदा —वि निंद्य

किर्वचणें—उक्रि १ (का) इकडेतिकडे फेकून, टोचून, बोटें घालून, चिवडणें, विसकटणें, नासणें, कुसकरणें २ (क) चाचपणें (?) 'असा किवचून काय घेतोस ?' [विचकणें]

किवटा—वि कृपण, चिक्कू, (बाल भाषेंत) किंवण

किवड—पु (सांकेतिक) पोलीस शिपाई —गुजा

किंवडा-डू, किवढ्या—पु (तंजा) बहिरा [का किवी=कान, कीव्ड=बहिरा]

किंवण—स्त्री कींव, करुणा, दया [कींव]

किंवण(न), किवान, किंवोण-न, किव्येण—न १ (राजा) पशूच्या अगावरील किडे पडलेले क्षत, मण हा रोग गुराच्या पायाच्या गेळयात किंवा कानात होतो 'भागींचें घोडें किंवणानें मेलें' २ तें बरें करण्याचा मंत्र [स कृमि+मण] ०उचकवप-(गो) घाण उघडी करून दाखविणें

किंवण्या-ण्या—वि किंवण पडलेला, क्षत पडलेला [किंवण]

किंवदन्ती—स्त्री उडत बातमी, बाजारगप्प, अफवा, आवई [स किम्+वदन्ति]

किंवा—उक्रिअ वा, अथवा अथवा पहा [स किम्+वा]

किंवाटो—पु (गो) संताप, जळफळाट

किविल्वाणा, णी, णें—वि केविलवाणा-णी-णें, दीन, बापडा 'का गा किविलवाणा केलों दीनाचा दीन।' —तुगा ४५४ 'ऐसें तयाचें किविलवाणें' —दावि ४५८ [कींव]

किशमिश—नपु किसमिस पहा

किशी—स्त्री (कु) नारळाची शेंडी

किंशुक—पु पळसाचें झाड 'वसती जैसें किंशुक फुले। तैसे शोभले दोघेहि। —जै १९ ८ 'पावे कुसुमित किंशुक घन वनपिहितादिपालसादृश्य।' —मोभीष्म ५ ४७ [स]

किशोर—पु बाल, ल्हान मूल, पधरा वर्षांच्या आतील मुलगा कायद्याच्या दृष्टीनें अज्ञान मुलगा नऊ पासून सोळा वर्षांपर्यंत किशोर अवस्था म्हणतात —योर १ ८८ 'तू तों तरुण किशोर। पाचा वरुषाचा पोर।' —वामन नृसिंहदर्पण ५६ [स]

किशोरी—स्त्री मुलगी

किष्कु—पु एक प्राचीन मापनाचें परिमाण हें ३४२ इंचाचें होतें —छम १९९

किसकिस—स्त्री (गो) दुखणें, कळा निघणें, पोटात घावणें [ध्व]

किसकिसॉ—पु (गो) झाडें पोखरून खाणारा एक किडा

किसगणती—स्त्री १ गणना, गुमान, पर्वा चाड, फिकीर (मनुष्य, वस्तु, काम, पैसा यासंबधीं), खातरजमा २ क पदार्थ (नास्त्यर्थी प्रयोग) 'हा सरदार त्याच्या किसगणतींत नाहीं' 'हा कामात मोठमोठे थकले मग हा किसगणती ?' [हिं किस+गनती का=कोणत्या गणनेचा]

किसणकाम—न १ (ल) बारीक नाजूक, कटाळवाणें काम २ कीस काढण्याचें काम [किसणें+काम]

किसणी—स्त्री १ कीस काढण्याची क्रिया, अथवा कीस २ कीस काढण्याचें हत्यार चार पाय असून त्यांवर भोकें पाडलेला लोखडाचा किंवा पितळेचा पत्रा बसविलेलें एक हत्यार [किसणें]

किसणें—उक्रि १ कीस काढणें २ किसणीवर खवणें (खोबरें काकडी इ०) [स कृष्=ओढणें, घासणें] ०किसून दळणें—बारीक दळणें

किसपट—न कसपट, बारीक, सूक्ष्म कण (लाकडाचा, गवताची काडी), केसपट चिलपीचा बारीक तुकडा, कुसळ [स कृश]

किसपणें—न (गो) साफ करणें, पालीश करणें

किसमत—स्त्री (हिं) भिस्ती लोक मसकेच्या खालीं जें कातडें वापरतात तें

किसमिस—स्त्री १ बेदाणा, खिसमिस २ त्रासदायक आणि कटाळवाणें भाषण, कुरकुर, भाडणाचें बोलणें [किसणें द्वि]

किसमूर-मोर—स्त्री (गो) कोशिंबीर

किसर—न १ (कों) केसर, किसपट, २ भात इ० धान्याचें कुसळ

किसवती—स्त्री आब्याच्या किसाचें लोणचें [कीस]

किसळचें—अक्रि. (गो) विनसणें

किसा-स्सा—पु १ गोष्ट, हकीकत, इतिहास बखर 'याप्रमाणें किसेबिनहे सागतो' —खरे ४३५४ २ तंटा 'याप्रमाणें किस्सानिर्गत होऊन स्वारी माघारी फिरली' —होके ४ [अर किस्सा]

किसान—पु १ शेतकरी, खेडवळ माणूस २ हलक्या प्रतीचा माणूस, सामान्य प्रतीचा माणूस, 'तेथें अपूजल्र तू किसान मजला दृष्टीपुढें दीसतें।' —चित्रगुप्त २६ [हिं किसान, फा किसान, स कृष्-कृषाण] ०काम—न १ शेतकी, शेत काम २ (ल) कमी दर्जाचें काम, फिरकोळ काम, हलक्या प्रतीचा धदा

किसार—न शल्य, कसपट —शर सोहिमद

किसूळ—पु बारीक आणि किरकोळ तांटें, देठ पातीं (कोवळें किंवा रोगट गवत भाजीपाला वगैरेचें) [स कृष्]

किसूळ—स्त्री (गो) लाकूड साफ करण्याचा रधा

किस्कनड—स्त्री (गो) भानगड, तिस्कनड

किस्कूट—(क) रधा, सुतारी हत्यार किसूळ पहा

**कुडण**—न १ कुपण, वई 'कृतीं याच्या गुसा केलेसे कुडण । याचे नारायण येऊ नेदी ।'—तुगा ३५७ २ आवाड, घाडगें, परसू, परडें ३ कुपण, वई घालण्याची क्रिया [स कुड्य=भित] **कुडणावळ**—स्त्री कुपण घालण्याची क्रिया व तिची मजुरी

**कुडणें**—उक्रि १ कुपण घालणें, भिंतीसारखा कुड घालणें २ बंद करणें, बुजविणें (रस्ता, मार्ग) ३ कैदेंत टाकणें, वर्दीत टाकणें, घालणें ४ अडथळा, आडकाठी, अवरोध करणें ५ (ल) दाबणें, दडपणें, ओशाळणें ६ मनात कुढणें, तळमळणें, खेद मानणें, खिन्न होणें ७ अवटरणें, दुखणें, ताठणें (पुष्कळ वेळ एके ठिकाणी बसल्यानें शरीर, अवयव इ०) [स कुण्ड्=रक्षण करणें, कुड्य=भित]

**कुडत(ता)न**—न छत्तीस अथवा चवाळीस कवळ्याचा विड्याच्या पानाचा गठ्ठा (पाचशे पानाची एक कवळी) [फा कुर्ता]

**कुडतरणें**—क्रि (माण) कुरतडणें

**कुडता**—पु १ कुटका, तुकडा २ कुडचा पहा

**कुडता-ती-तें-कुडताण**—कुडतें पहा

**कुडताळ-ळा-ळें**—न संकुचित, अरुंद जागा —वि अरुंद, संकुचित (जमिनीचा तुकडा) [कुडता] °ळ्यांत येणें-संपुटात येणें (धंदा, व्यापार)

**कुडती**—स्त्री १ उंची, जाडी (क्षेत्रफळासंबंधीं) —क्रिवि २ उंचीच्या अनुरोधानें, जाडीच्या अनुरोधानें कडीपाटाची कडी वगैरे (वस्तु) (क्रि० लावणें, बसवणें, ठेवणें)

**कुडती**—स्त्री जाकीट, कमरेपर्यंतचा कोट [फा कुर्ता]

**कुडती**—स्त्री १ परटाची मोगरी, ही लाकडी असते २ (कु) (सुतारधंदा) किंकऱ्याची ठोकणी ३ (कों) चौरस लाकडी ठोकळा, आतें इ० ना उपयोगी [सं कुट्ट=कुटणें, कुट्टी पहा]

**कुडतुडणें**—सक्रि कुरतुडणें

**कुडतूम**—पु (कु) गुण्या, काटकोन (सुताराचा)

**कुडतें**—न (खा व) सदा [फा कुर्ता=सदरा]

**कुडथळ**—स्त्री जिला पाटाच्या पाण्याची सोय नाहीं अशी जमीन

**कुडथळ**—न (शेतजमीन) अपुरी जमीन, ठिकें, दळें नोंदणी केलेल्या प्रमाणात कमी येणारी जमीन [कुडता] **-ळीविघा**-पु ल्हान बिघा, पूर्ण बिघ्यापेक्षा थोडा कमी बिघा (सामान्य बिघा वीस पाडाचा)

**कुडनाड्या**—वि (माण) भूत, समंध इ० ना कोपविणारा व शमविणारा (मांत्रिक) [स कूट+नाडी]

**कुडपण-णें**—न ल्हान, जाड काठी, दांडू, लाकूड, हात-दीड हात लांब व मनगटाइतका जाड लाकडाचा तुकडा [कुटका]

**कुडपणें**—अक्रि १ अवटरणें, मुरडणें (पानें इ०) 'सर्वांची पानें कुडपून गेलीं' —मराठी ६ वें पुस्तक पृ २४३ २ आवृत्ति २ टाकणें, सोडणें 'कुडपियला देस आता करू नका घळ ।'—ब ६०४ 'कुडपीयेला देश आता येऊ नेदी दुसरी ।'—तुगा २९८.

**कुडबुड-डां**—क्रिवि कुडबुडण्याच्या आवाजासारखा (आवाज) [ध्व]

**कुडबुडणें**—अक्रि १ कुडबुड आवाज करणें (कुडबुडयाचा) २ (ल) अस्पष्ट रीतीनें बोलणें, कुरकुरणें [ध्व]

**कुडबुडा-बुडा-बुड्या जोशी**—पु हातात कुडबुडें घेऊन भविष्य सांगून भीक मागणाऱ्या जोशाची (अब्राह्मण) एक जात व त्यातील व्यक्ति

**कुडबुडें**—न डौराहून ल्हान वाद्य, जिच्या टोकास चिकण मातीची किंवा मेणाची गोळी बसविलेली आहे अशी दोरी मध्य-भागीं बांधलेली आहे असें एक चर्मवाद्य हें सरवदे, कुडबुडे जोशी, पांगुळ, भिक्षेकरी हातात घेऊन वाजवीत भिक्षा मागतात [ध्व]

**कुडमुड**—स्त्री (ना) काकडीची किंवा मुळ्याची कोशिंबीर.

**कुडय**—स्त्री (कु) एक जातीचें भात

**कुंडय, कोंडय**—स्त्री (गो) शिंपी (जात)

**कुंडल**—न १ कानातील एक दागिना २ वलय, कडें (धातूचें) [स]

**कुंडला**—पु तपकीर घोटण्याचा दगडी अथवा मातीचा खल —न (कु) मातीचें भाडें [स कुंड+ल]

**कुंडलिनी**—स्त्री (योगशास्त्र) शरीरातील मणिपूर चक्राचे ठिकाणीं सर्पाच्या आकृतिरूपानें राहणारी प्राणरूप शक्ति 'शक्ति करी उजगरा । कुंडलिनीये ।'—ज्ञा ६ २२१ [स]

**कुंडली-ळी**—स्त्री १ सूर्य, ग्रह, नक्षत्र यांची दशा दाखविण्याकरिता चौरस, त्रिकोनी अथवा वर्तुळाकार भाग पाडलेली आकृति हिचे तनु धन, सहज, सुहृत्, सुत, रिपु, जाया, मृत्यु, धर्म, कर्म, आय व्यय असे बारा भाग किंवा कोष्टकें असतात, राशीचक्र २ प्रक्षिप्त वाक्य दाखविण्यासाठीं काढलेला कंस व इतर रेषा ३ (गो) ल्हान कुंडी ४ (खा) वर्तुळाकार व मध्यें भोंक असलेली चापट चकी, (भोंक पाडण्यासाठीं) ५ कुंडलिनी पहा 'हें असो तें कुंडली । हृदयाभातु आली ।'—ज्ञा ६ २७४ —पु सर्प 'त्या मणि प्रकाशीत वारुळीं । बैसले किती थोर कुंडली ।' (नवनीत पृ ४२१) कडी, मर्तुळ, वेटाळें व यासारख्या इतर अनेक वस्तू —वि ज्याच्या कानात कुंडलें आहेत असा [स]

कुडव—पु. १ (कु गो) सामान्यत आठ शेर अथवा दोन पायलींचें माप देशावर आठ पायली धान्याचें माप, कोंकणात राजापुराकडे चार पायली, २ एक प्रस्थाचा एकचतुर्थांश, एक पक्का पावशेर –भभप १ १३०, पातळ औषधें मापण्याकरितां मातीचें, कळकाचें, लाकडाचें किंवा लोखंडाचें, विस्तारानें व उंचीनें चार अंगळाचें भांडें –योर १ ३८ 'तो निजबोधाचे कुडवाकारीं। भरील वखारी श्रवणाच्या।' –एभा ३ ८७१ [स] ०भरणें–(कु) माप भरणें, पूर्ण होणें, मरण ओढवणें उदा० मेल्या म्हशीस कुडवभर दूध

कुडवली—स्त्री १ (हेट) भात शिजविण्याचें मडकें २ (कु) एक प्रकारचें मडकें [सं कुड]

कुडवळ—पु. (गो) एक पक्षी

कुडवा—पु भितीच्या तळाचा वगोरा, निराळ्या रंगानें दाखविलेला वीतभर उंचीचा भाग (क्रि० घेणें, ठेवणें) ०घेणें–(व) जमीन सारवतांना जमिनीपासून कांहीं उंचीपर्यंत भिंत सारवणें [कूड]

कुडवाळी—पु (गो) कुळवाडी लोक 'ठिकठिकाणीं दिसणारे कुडवाळ्याचे समाधानी व साधेभोळे चेहरे' –सह्याद्रीच्या पायथ्याशीं १२०.

कुडवी—पु. कुडव पहा ०भारा–पु झोडलें असतां कुडवभर भात निघेल अशी पेंढी

कुडरू—न समुद्रकांठच्या डोंगरातील कुरण

कुडसर—स्त्री (कों) नाचणी (धान्य) –कृषि २८४

कुडसारो—पु (कु) कापणीनंतर राहिलेलें भाताचें सड, धस

कुडा—पु हें रानझाड सहा–सात हात उंच असून पान वडाच्या पानासारखें लांबट असतें याच्या बिडया करतात शेंग बारीक व लांब, असून बीं लांबट यवासारखें व कडू असतें, मुळाचा औषधीसारखा उपयोग होतो त्याच्या पाकास कुडेपाक म्हणतात कुड्याच्या पांढरा व काळा अशा दोन जाती आहेत बींची उपधान्यात गणना होते तें कृमिनाशक आहे कोंवळया शेंगाची भाजी करतात [स कुटज]

कुडा—पु १ भाताची एक जात २ स्त्रियांच्या कानांतील एक दागिना, कुडें

कुडा—वि १ दुष्ट, शबल, कपटी, विश्वासघातकी 'विवेकें कुडी कल्पना पालटीजे' –राम ४० २ (काव्य) वाईट; खोटा (पैसा) 'कुडा आपुला दाम असता पराशीं। वृथा भांडणें ख्यात हे गोष्ट कैशी।' –हरिराज मुद्राराक्षसाचें भाषांतर ४७ (अकक) ३ (काव्य) मिथ्या, अशुद्ध, खोटा, वाईट, नुकसानकारक, घातकी 'नृपातें कुडा मंत्र योजावयातें।' –वामनविराट ७ १३० 'तेही विषयसुखाची गोडी। गोड वाटे परी ते कुडी।' –दा ३ १० ६७ [स कूट] ०भाव–पु द्वेष, मत्सर, अविश्वास, संशय, कपट, दुष्ट कल्पना, विकल्प

कुंडा—पु (गो इट) धान्याचा कोंडा, भूस

कुंडा—पु १ मोठी कुंडी (कुलशाडाची, चांभाराची कातडें भिजत घालण्याची, रंगाऱ्याची), उगाळ्या रसाचें मादण, भांग, तपकीर इ० तयार करण्याचें पात्र 'जवळच पटांगणाची कहाळी लावलेला कुंडा ठेवला असतो –पेरापुत्र ८ ४४५ २ माडी काढण्यासाठीं माडाला बांधलेला भोपळा [स कुड]

कुडाक—न (गो) कानांतील कुडें (सोन्याचें अगर हिऱ्या–मोत्यांचें), अव कुडकां [कुडल]

कुडाण—न (कों) कुडण, गुराचा उन्हाळी गोठा, कुड लेली जागा ०करणें–(कु) कुंपण घालणें, झाकणें [कूड]

कुडाण—न (कु) ढोल वाजविणें

कुडामेढींचा—वि कुड व मेढी यांचें, चव्रमौळी, फाटकें तुटकें, मोडकेंतोडकें (खोपट, झोपडी, वाडा) [कूड+मेढ]

कुंडालें—न (माण) पातेल्यासारखें मातीचें भांडें [कुंड]

कुडावा—पु १ (काव्य) कूड, कांवी, शिल्प्या वगैरेवर माती लिंपून केलेली भिंत [कुड] २ (ल) रक्षण, थारा, पाठपुरावा 'करी सकळीं सेवकाचा कुडावा।' –राम ६७ 'धावोनि त्याचा करी कुडावा।' –निगा ११८ 'तें कुडाविला जाणा कस। पति तुमचा।' –कथा २ २ ५१ [स कुण्ड=रक्षण करणें]

कुडावा—पु (कु) एक खाण्यास योग्य पक्षी

कुडावेडा—वि दुष्ट हेतूनें वेड पांघरणारा [कुडा+वेडा]

कुडाळ—पु एक प्रांत हा कोंकणात सावंतवाडी संस्थानातील एक तालुका आहे ०देश–(प्राचीन रचना) उत्तरेस देवगड तालुका, दक्षिणेस गोंव्यांतील पंचमहाल, पूर्वेस सह्याद्री, पश्चिमेस अरबी समुद्र हा प्रांत –आद्यगौडब्राह्मण, वर्ष २, अंक ३–४ पृ ३० –चा सत–पु कुडाल कोटांत जोगण प्रभु पडला तो, त्या स्थळास ब्राह्मण असेंहि म्हणतात ०देशकर ब्राह्मण–पु या प्रांतातील आद्यगौड ब्राह्मण ०माप–या देशातील विशिष्ट माप, कोकणातील सर्वसामान्य मापापेक्षा हें निराळें आहे चार शेर=एक पायली, दोन पायल्या=एक कुडव, वीस कुडव=एक खंडी, चार खंडी=एक मुडा

कुंडिका—स्त्री पाणी भरण्याचा लाकडी माठ

कुडिया—पु दुध्या भोपळ्याचा एक प्रकार ज्यास कमंडलूच्या आकाराचें फळ येतें असा भोपळा

कुडिया कुडथा—पु (ना) जनावरांना होणारा एक रोग, मानमोडी, फेपरा

**कुडी**—स्त्री. १ झोंपडी. यावरून. २ देह; शरीर; आत्म्याचें घर; (रागानें किंवा निंदेनें) कलेवर; प्रेत. 'कुडी वाढे कुबुद्धि वाढे।' –दा १५.९.७. 'दिली कुडी टाकोनी।' –तुगा ३६१. 'कुडी साहेबाची घेऊन।' –ऐपो १४७. ३ लांकडाची झिलपी, ढलपा. ४ वनस्पतीच्या मुळाचा लहानसा तुकडा, अंकुर (सुंठ, गाजर, लसूण, हळद, आलें यांच्या कांद्याचा). ५ एक प्रकारची पाभर. ६ भाताचें काड; काटकुटी. ७ कोडी; वीस संख्या. ८ (बे.) पाल्वी. ९ (कु.) गवताची गंजी. [सं. कुटी; कुडी=देह] **कुडींत जीव धरून रहाणें**–१ मरणोन्मुख होणें. २ कसें तरी जगणें. ०**तशी पुडी**–शरीर तसा आहार.

**कुंडी**—स्त्री. १ भांग, तपकीर घोटण्याचें भांडें, पात्र. २ फुलझाडें लावण्याचें मातीचें भांडें. ३ स्नानाकरितां, धुण्याकरितां पाणी सांठविण्याची दगडाची अगर लांकडाची मोठी डोणी. ४ (कों.) (सोनारी) पाणी ठेवण्याचें भांडें, पातेली. ५ (आट्यापाट्या) कोंडी पहा. ६ (ना. गोंडी) चौपडा (नागपूर येथील अजबखान्यांत या नांवाचें वाघ आहे). [सं. कुंड]

**कुडु(डू)क**—पुन. १ सोन्याच्या तारेंत मोतीं गुंफून केलेला कानांतील एक दागिना. २ (ल.) एक झाड व त्याचें फळ.

**कुडुकें**—न. (माण.) धान्य सांठविण्याचें लहान कणगुलें. [कूड]

**कुडुपणें**—न. १ पुराणें; दांडकें; ढोलपाटा; सोडगें. २ टेंगणा व मजबूत, धट्टाकट्टा, काटक माणूस.

**कुडूक-वाणा-वाणी**—वि. खिन्न; खट्टू; रडतोंड्या; असंतुष्ट; मलूल. 'त्याची मर्जी कुडूकवाणी झाली.' [सं. कूट]

**कुडें**—न. १ कुडी अर्थ ४ पहा. २ कुडा. कुडूक अर्थ १ पहा. ३ द्वेष; मत्सर; संशय; अविश्वास. ४ कपट; दुष्ट व्यूह; वाईट कचाट; कुलंगडें. 'ज्याचें कुंड त्याजपुढेंच राहे।' –सारुह ८.४८. 'वाटे कुडें ऱ्यां केलें।' –जै १.५२. ५ (ल.) संकट. 'निर्दाळावा तरी कैसें रीतीं। तयाच्या भक्तीस मैनावती। आहे तरी राजाप्रती निवेदावें कुडें भावें।' –नव १४.१५०. –वि. खोटें. 'जैसें कां कुडें नाणें। खऱ्याचेनि सारखेपणें।' –ज्ञा ४.८६. ०**पावडें–कपट**–न. १ दुष्ट विचार; अंतस्थ बेत; कारस्थान. 'नावडीची साखर आळणी आसे काहीं कुडेंपावडे।' –सला ७५. 'माझ्या मनांत कांहीं कुडें पावडें नाहीं.' २ जादूटोणा; मंत्रतंत्र; जादू, चेटूक; कुवेडें. ३ छक्केपंजे; दुष्ट कारस्थान; कावा. [कुडें द्वि] ०**शहाणपण**–न. कावेबाजपणा; कुटिल धूर्तता.

**कुडेपाक**—पु. कुड्याच्या पाळाचा तयार केलेला पाक. हा औषधोपयोगी आहे.

**कुंडेपारस्ट**—वि. (गो.) कोंड्यापेक्षां कमी दर्जाचा.

**कुंडो**—पु. (कु.) कोंडा.

**कुड्डा-कुड्डो-कुरडो**—१ (गो.) आंधळा. २ (शोभेची दारू) खापरी पेरें; शोभेच्या दारूचें झाड वगैरेस असलेलें दारू भरलेलें खापरी नळकांडें.

**कुड्डी**—स्त्री. (बे.) (सोंगट्यांचा खेळ) उडतपगडें या डावांत फाशांच्या एका दानास हें नांव देतात.

**कुड्डुचर्के**—न. (गो.) बगळ्याच्या जातीचा एक पक्षी.

**कुंड्डूक**—स्त्री. (गो.) एक प्रकारची भाजी.

**कुड्मळ-मुळ**—पु. कळा; उमलणारी कळी; कमळ. 'ऐक्य भावाची अंजुळी। सर्वेंद्रिय कुड्मुळीं।' –ज्ञा १५.२ [सं. कुड्मल]

**कुडया-ढ्या**—वि. कुढणारा; मनांतल्या मनांत जळणारा; घुम्या. [कुढ(ढ)णें]

**कुंडया**—पु. कुंडा; मोठी कुंडी

**कुडयाठ-कुर्याट**—न. (कों. राजा.) डोंगराच्या उतरणीवरील भातशेतीचीं खाचरें; हीं सुमारें १०।१५ हात रुंद व १५।२० हात लांबीचीं असतात. ह्यांत भात वगैरे पिकें करतात.

**कुढंग**—पु. लुच्चेगिरी; खोडी; चाळा; टवाळी. [सं.]

**कुढणें**—अक्रि. मनांतल्या मनांत त्रासणें; खेद पावणें; घुमेपणानें रागावणें; कष्टी होणें. 'परी या कृपेच्या वोरसें। कुढावयाचेंचि दिसे।' –तुगा १९०२. [हिं. कुढ (ना); का. कुढि= कढणें; सं. कुष्ट–कुट्ठ–कुढ; गु. कुट (वुं)]

**कुढा-ढ्या**—वि. मनाचा कुढा; कपटी; खोटा; खिन्न; कुरठा; मत्सरी.

**कुढाण**—स्त्री. कजकट घाण.

**कुढापा**—पु. १ मत्सर; द्वेष; संताप; चुरस. (क्रि० धरणें; ठेवणें; करणें). २ मनांतल्या मनांतील जळफळ, तळमळ. (क्रि० धरणें; करणें). [कुढा]

**कुढावणें**—सक्रि. रक्षण करणें. [सं. कुण्ड्=रक्षण करणें]

**कुढावणी**—स्त्री. विवेचन; स्पष्टीकरण. 'आपुलिया स्वरूपाची कुढावणी। करिते झाले स्वानंदें।' –स्वानु १२.४.८५.

**कुढावा**—कुडावा अर्थ २ पहा. 'तुका म्हणे देवा माझा करावा कुढावा।' –तुगा ११८८.

**कुढें-पावडें-कपट-शहाणपण**—कुडें-पावडें पहा.

**कुणकुण**—स्त्री. १ हळू आवाजांत बोलणें; गुणगुणणें; पुटपुट; गयावयां करणें. २ अफवा; उडत बातमी. (क्रि० करणें; लावणें) [ध्व. सं. क्वण्=शब्द करणें]

**कुणकुणणें**—अक्रि. कुजबुज करणें; हळु हळु बोलणें; गयावयां करणें. [ध्व. सं. क्वण्=शब्द करणें]

**कुणकुण्या**—वि. कुरकूर करणारा; गुणगुण करणारा; गयावयां करणारा. [कुणकुण]

कुणगा—पु. १ कुटुंबांतील पैशाचे धंधु इ० जे अनेक अधिकारी त्यांतील एकानें इतरांस न समजूं देतां चोरून सांठविलेला पैसा, द्रव्य; गुप्तधन. २ धोतराचा सोगा; कासोटा. ३ (कों.) भोंवतीं बांध घातलेला भातशेताचा एक भाग. (वि.) शेतांतील वाफा. [ का. कुंगु=नि शब्दता, शांतता ]

कुणगी-गो—स्त्रीपु. (कु. गो.) शेताचा एक भाग, तुकडा. 'येक कुणगो पेरची उरला.'

कुणगेकरी-दार—पु. ज्यानें कुणगा केला आहे असा माणूस. [कुणगा+करी+दार]

कुणज—न. एक वनस्पति-नामको.

कुणट—न. (कों.) पोह्यातील बारीक कण; तूस. [सं. कण]

कुणप—न. १ प्रेत. 'तिचें आलिंगुन कुणप । रुद करी दीर्घ विलाप ।' –पांप्र १.१५८. २ देह. 'हें कुणप श्रीधातुक' –ऋ ५३. [सं.]

कुणबट-ड—पु. १ कुणबी या शब्दाचें निंदाव्यंजक रूप २ शेतकरी. 'बळिभद्र हा कुणबट । केली चोखट रणभूमी ।' –एरुस्व १०.७६. 'तरि त्या सेतीचा कुणबटु बरवा।' –दावि ३५०. ३ अडाणी. 'कुणबट कुळवाडी । तैसा आन मान देवमांडी।' –ज्ञा १३.८११.

कुणबाऊ—वि. कुणब्यास योग्य; कुणब्याप्रमाणें ओबड धोबड; ग्राम्य, खेडवळ (रीत); हलकें; भिकार; दरिद्री (कपडा, पोषाख इ०) [कुणबी]

कुणबाव-बावा, कुणबावा—पु. १ कुणब्याचें काम, शेती; शेतकी. 'कुणबाव निर्मिला देवानीं' –दावि ३४७. २ सरकाराला ठराविक रक्कम-सारा देण्याचें कबूल करून वंशपरंपरा जिंदगीप्रमाणें धारण केलेली वतनी जमीन, अशा तऱ्हेची पद्धत, अशा जमिनीचा वावयाचा धारा. [कुणबी]

कुणबावेदार—वि. कुणबावा करणारा.

कुणबी—पु. कुणबावा करणारा; शेती करणाऱ्या जातीपैकी एक; शेतकरी. शेतीचा धंदा करणारा. म्ह० १ कुणबी इळ्या इतका वजू. २ कुणबी मेला भुतानें, बामण मेला वातानें, सोनार मेला पित्तानें. ३ कुणब्यासारिखा दाता नाहीं, कुदल्यावांचून देत नाहीं. ४ कुणबी सारिखा दाता नहीं और मारे बिगर देता नहीं. [सं. कुलपति, कुळंबी, कुणबी] ०दोक-वि. (शूद्रोदक 'या संस्कृत शब्दाच्या अनुरोधानें बनविलेला शब्द) =कुणब्यानें आणलेलें, स्पर्श केलेलें, उपयोग केलेलें (पाणी, भांडें, कोणतीहि वस्तु). [कुणबी+उदक] ०माळी–पु. शेती करणाऱ्या सर्वसामान्य लोकांसंबंधीं शब्द; शेतकरी लोक; खेड्यांतील लोक. ०हिशेब–पु. कुणबाऊ हिशेब खेडवळ, हेंगाडा, ठोकळ पद्धतीनें केलेला हिशेब (खड्यांनीं, बोटें मोडून इ० केलेला).

कुणबीक—स्त्री. कुणब्याचें काम; शेतकाम. 'जातिधर्म, आनुवंशिक संस्कार यांचे जोरावर कुणब्यानें निरक्षर असतांहि कुणबीक पूर्णत्वाला नेली.' –गांगा १८६. [कुणबी]

कुणबीण—स्त्री. १ कुणब्याची बायको. २ दासी; मोलकरीण.

कुणभवा-भावा-भवेदार—कुणबावा वगैरे पहा.

कुणी—न. १ (राजा.) द्विदल धान्यांतील हलका दाणा; –स्त्री. २ लांकडाची मेख; खुंटी; पाचर; चाकाच्या आंसाची खीळ; शेतकऱ्याच्या अनेक उपकरणांतील खुंटी; खीळ. ३ (वि.) जमिनींत लहानसा खळगा करून त्यांत कांहीं अंतरावरून सागरगोटे, सुपाऱ्या, चिंचोके, दिडक्या वगैरे टाकून खेळतात तो खळगा. [?]

कुणी-कुण्णी—सना. कोणीहि. 'कोणाला न पुसे कुणी।' –विक १२.

कुणे(ण्ये)ट—न. (कों.) कुणट पहा.

कुणो—पु. (गो.) कोंडा.

कुण्णाटी, कुण्णाठो—वि. (गो.) हेवेखोर.

कुण्णाठाय—पु. (गो.) हेवा.

कुत—न. (गो.) लिंग.

कुंत—पु. भाला. 'करीं घेऊनियां कुंत । म्लेंच्छ संहारीन सत्य।' –ह ७.२२३. [सं.]

कुतका—पु. १ भांग घोटण्याचा वगैरे वसा. २ (ल.) धक्का; दवका, ठोसा; तडाखा. ३ सोटा. 'तमाम पागे पतके बेरोजगारी घेऊनि कुतके।' –ऐपो २५२.

कुतकुल्या—क्रीअव. (कु.) गुदगुल्या.

कुतंगळ-ळू, कुतुंगळ-ळू—न (ल.) षंढ; क्लीब; नपुंसक –वि. १ नाजूक; अशक्त; दुर्बल (मनुष्य, पशु). २ (माण.) आळशी म्ह० घर कुतुंगळु कणगीला पडलें इदं-घराण्यांतील माणसें अशक्त दुर्बल आहेत तरी खाण्यांत हुशार आहेत या अर्थी.

कुतडा-डें—पुन. (राजा. व.) ज्वरादिकामुळें काम करण्यास असमर्थ अशा माणसास निंदेनें म्हणतात; जिवावर आलेली गोष्ट; 'तूं गेलास तर काम होईल पण तुला तर कुतडें आलें आहे.' [कुथणें] ०भरणें–कुचराईपणा करणें. 'तुला कुतडा भरला काय!'

कुतनी—स्त्री. गर्भरेशमी व पट्टे असलेलें कापड. 'कुतनी कनकाचळ गुर्जरिचे कटिबंध सुशी तिवटे पटणी।' –किंशुक २८. [अर. कुत्न]

कुतप-तुप—पु. सूर्योदयापासून आठवा मुहूर्त; मध्यान्हकाळ; पितृयज्ञ करण्यास योग्य वेळ. [सं. कुतप]

**कुतरओढ-तोड-बोढ**—स्त्री (तिनिराळी कामें किंवा फर्मे यांच्या भारामुळें झालेला) त्रास, दगदग, तारांबळ, तिरपीट, भेधा [कुत्रा+ओढणें]

**कुतरघाई**—स्त्री १ तातडी, लगबग, पराकाष्ठेची घाई (क्रि० करणें, लागणें, मांडणें) २ उतावळी, गर्दी, घाई, धांदल (क्रि० करणें, होणें) [कुत्रा+घाई]

**कुतरखाड-मूत (वगैरे)**—कुतर या शब्दाच्या समासांबद्दल 'कुत्र्याच्या' या शब्दामध्यें पहा

**कुतरा-री-रें**—कुत्रा-त्री-त्रें पहा.

**कुतर्क**—पु वाईट कल्पना, वेन, विचार, मूर्खपणाची कल्पना मसलत, युक्ति, वन [स कु=वाईट+तर्क=कल्पना]

**कुतर्की**—वि कुतर्क लढविणारा, कुत्रांडी

**कुतलें**—न (गो) कापलेलें पीक ठेवण्याची जागा

**कुतल**—पु 'हेम मस्तकींच नीळ कुतळ।' –एरुस्व ७ ८ [स]

**कुताव**—पु (गो) वडी होड [पो कुत, द कोट]

**कुती**—स्त्री पेटी, पेटारी 'अमृताची कुती' –दिमरा १ १०१ [स कृती]

**कुंती**—पु भाला धारण करणारा योद्धा, भालाईत 'जीस अमुख सद्य गमे द जें भेदूनि हृदय कुंती तें' –मोउद्योग ७ ४३ –स्त्री पांडवांची माता 'विदुराचि भेटल्यावरि भेटे सर्वांसराज कुंतीतें।' –मोउद्योग ७ ४३

**कुतुक**—न कौतुक 'जें कांहीं करितें कुतुक तें देखावें दृष्टिनि नयनांहीं।' –मोभीष्म १० ३७ [स कौतुक]

**कुतुगल-ळ**—वि कुनगल-ळ पहा

**कुतू**—पु मुलांच्या भाषेंत कुत्र्यास म्हणतात

**कुतूहल**—न नवल, कौतुक, क्रीडा, करमणूक [स]

**कुत्त**—न (वे) सकट [का]

**कुत्तरचाल**—स्त्री कुत्र्यासारखें जवळ जवळ पाय टाकून भरदीनें चालणें

**कुत्ता**—पु (हिं) कुत्रा 'कुत्ता जाने चमडा जाने' –रर्म जीरावाचे कुंद्र १६४

**कुत्तेखानी-खाशी-खासी घशी घाशी**—स्त्री (हिं) १ हांजी हांजी, लांगूलचालन २ हलक्या दर्जाचें काम कावाड कष्ट, थोड्या लाभासाठीं केलेली निकृष्ट चाकरी

**कुत्तेमल्हार**—न (हिं) बेसुमार गाणें, वाईट गाण्यास हा शब्द लावतात

**कुत्तेवाघूर**—न ०रस कुत्र्याचा बाप (कारण तो कुत्रे लावतो) शको २ ३५

**कुत्तेवान**—पु १ (हिं) श्वानाध्यक्ष, कुत्र्याची व्यवस्था पहाणारा अधिकारी २ शिकारी 'कुत्तेवान चित्तेवान। साकर वानी पहिल्वान।' –नव ११ ६८

**कुत्रा**—पु १ श्वान, सारमेय, कुक्कुर सर्व चतुष्पाद प्राण्यांमध्यें कुत्रा हा मनुष्याशीं सलगी असलेलें ए० महत्त्वाचें जनावर आहे हा माणसाळलेला प्राणी आहे कुत्रा चोर व परकी माणसें यांपासून घराचें रक्षण करतो शिकार करण्याच्या कामीं त्याचा उपयोग होतो २ (ल) वाईट, हलकट माणूस ३ चिताळ नांवाचा एक मासा [प्रा कुत्त-त्ती] **कुत्री**—स्त्री १ शुनी, सारमेयी, कुत्र्याची मादी २ एक औषधी वनस्पति व तिचें बोंड, हिच्या फुलास व पानास वाईट वास येतो कांहींच्या मतें लोखंडी नावाची वनस्पति **कुत्रें**—न १ कुत्रा-त्री २ (ल) भाडखोर व निराळ माणूस ३ रहाट थांबविण्यासाठीं केलेली योजना यास दोन पट्या असतात, एक चपटी असून तिचें एक टोंक रहाटाच्या विरुद्ध बाजूस खिळ्यांत भक्कम बसवितात व दुसऱ्या टोंकांत धारदार चपटी अशी लोखंडी कांब बसवितात दुसऱ्या टोंकाला मध्यें एक खाचा असतो, तो खाचा रहाटांत टाकला कीं गति बंद होते ४ गवताचा एक प्रकार व त्याचें फूल, तुरा, बोंड हें वस्त्रास लागलें असतां चिकटून बसतें ५ लहान कुसळयुक्त रानटी वनस्पतीचें बीं ६ दार, झडप लावलें असतां उघडूं नये म्हणून अडकविण्याचें एक अडकवण, आडसर, चक्राचे दांत उलट फिरूं नयेत म्हणून दात्यांत अडकविण्याचा धातूचा तुकडा ७ (वरील कुत्र्याच्या साम्यावरून) कोपर, खादा, मनगट, गुडघा, घोटा, कंबरचा खवाग याचा सांधा (वाप्र) **(कुत्रा) कोल्हेकुणी बसणें**-(माण) पुढील दोन पाय उभे करून मागें ढुंगण टेकून बसणें **(कुत्रा)मुंडा घालून बसणें**-(माण) कुत्र्यानें मांड्यांत तोंड घालून बसणें **०कुत्रा हाल खाईना**-अतिशय वाईट स्थिति येणें **कुत्रा, कुत्रें होऊन राहाणें पडणें**-आर्जवानें, खुशामतीनें नोकरी करणें **कुत्रीं मारीत फिरणें, हिंडणें**-रिकाम टेकडे भटकणें **कुत्री वाफेला येणें**-(माण) कुत्री माजावर येणें सभोगोत्सुक होणें **०शिरणें**-(माण) (बायकी) स्त्री विगळशी होणें (लहान मुलांच्या भाषेंत) **कुत्रासारखी होणें**-(व) रोड होणें **कुत्रें आपल्या पायाला डसलें म्हणून काय आपण त्याला डसावें?** –शिवराळ माणसाच्या तोंडीं लागूं नये या अर्थी **-कुत्र्याचे पाय मांजरावर आणि मांजराचे पाय कुत्र्यावर घालणें**-भलभलत्या लटपटी करणें (आपलें काम साधण्यासाठीं, केवळ गमतीसाठीं) **–च्या मोतीनें मरणें**-हालहाल होऊन मृत्यु येणें **–ला तोंडीं लावला तर डोक्यावर चढतो**-(व) हलकट मनुष्याशीं स्नेह ठेवला तर तो डोईजड बनतो **–ला हाड रहटलें म्हणजे हाडुक टाकतें**-निगरग,

कोडग्या माणसाबद्दल योजतात कुत्र्यासारखें फिरणें, हिंडणें–रिकामटेकडें भटकणें म्ह० १ धर्माच्या द्वारीं कुत्रें आडवें आलें २ ये रे कुत्र्या खा माझा पाय–नसतें भांडण उगाच आपल्या अंगावर ओढून घेणें या अर्थी ३ (गो) कुत्र्याचे पालखींत घातलें तरी हाडूक दिसतां कुत्रें उडी मारतां=जन्माची सवय परिस्थिति आल्याबरोबर उभी राहते समासशब्द– कुत्र्याचा पाय–पु रानतेरड्याचें फूल –ची चार–स्त्री एक प्रकारचें गवत –ची झांप–स्त्री अत्यंत सावध झोंप –ची चळ वळ–स्त्री कुत्र्यासारखी चळवळ, हालचाल कुत्र्याचें कुचकु वर्णें–कुत्र्याचें गुरगुरणें, भुंकणें –चें छत्र–न कुत्र्याचें मूत, छत्री, अळंबें –चें जिणें–न दैन्यावस्था, हीन स्थिति, निकृष्ट स्थिति –चें झाड–न एक कांटेरी झुडुप याचें फळ चकचकीत, तांबडें व रसाळ असतें –चें तोंड–न (ल) फटकळ माणूस, निंदा करणारा, अश्लील भाषण करणारा माणूस –चें दांत–पुअव (मुलांच्या भाषेंत) दुध्या भोपळ्याच्या बिया –चे पाय–मांजराचे पाय–पुअव चिडविडीत अक्षर. –चें भोकमर–भोकावर–क्रिवि कुत्र्याचें भुंकणें ऐकूं जाईल एवढ्या मजलीवर (गाव इ०) –चें मूत–१ न कुत्र्याची छत्री, अळंबें २ (ल) एकलकोंडा, दुसऱ्याच्या अंगावर खेकसून येणारा, तुसडा, चिरड खोर, सदा चिडचिड करणारा माणूस म्ह० (व) कुत्र्याचें मूत सडयास ना सारवणास –चें विष–न कुत्रा चावला असतां मनुष्य भाभावल्यासारखें करतो त्याला ज्वर येतो, डोळे व त्वचा पिवळी होते कालांतरानें उन्माद येऊन कुत्र्याप्रमाणें भुंकतो व चावतो यावर उपाय –काळ्या उंबराचें मूळ व धोतऱ्याचें फळ हीं दोन्हीं तांदुळाच्या धुवणांत वांटून पिणें किंवा कस्तुरी व वाभ ळीच्या पानाचा रस गाईच्या तुपाशीं घेणें अथवा शतावरीचा रस गाईच्या दुधांतून पिण्यास देणें –योर २ ७०८ –चें शेपूट–चि शेपडी–नस्त्री (हें नेहमीं वाकडें असतें, सरळ रहात नाहीं यावरून ल) सुधारण्याचा कितीहि यत्न केला तरी व्यर्थ जाऊन पूर्वीच्या वळणावर जाणारा, हलकोडगा, दुष्ट, द्वेषी माणूस म्ह० कुत्र्याचें शेपूट नळींत घातलें तरी वाकडें–मूर्खांच्या मनावर उप देशाचा कांहींहि परिणाम होत नाहीं, देहस्वभाव जात नाहीं

कुत्रापि—क्रिवि कोठेंहि, जेथें तेथें [स कुत्र+अपि]

कुत्सा—स्त्री अपकीर्ति, निंदा 'साधूत पावले जरि तरि न गवीरात कर्म कुत्सादी।' [स कुत्स्=निंदा करणें]

कुत्सित—वि १ गर्हित, निंदित, नीच २ कपटी, लबाड, कुत्रिमयुक्त ३ दुर्गंधियुक्त, कुजलेला •कुल्पना–स्त्री वाईट कल्पना, विचार

कु(कु)थणें—अक्रि १ जोरानें टोकतांना, शौचास बसतांना, ओझें वजन उचलतांना मोठ्यानें कण्हणें २ आरंभिलेलें कार्य बिकट झाल्यामुळें खेद करणें 'पायगींनें उठे आणि पदार कुथे' ३ बळानें कार्यसिद्धि करण्याचा यत्न करणें, जाडजाड बोलणें, गुरगुरणें 'हें जे मिळोनिया मेळे। कुथती वीरवृत्तीचेनि बळें।' –ज्ञा ११ ४५१ [स कुन्थ्=क्लेश भोगणें]

कुंथाकुंथी—स्त्री श्रम, खटपट 'आतां कायसी कुंथा कथी।' –ज्ञा १५ २४७ 'सांतेची शुद्धि तव किती। यालागीं घायेंसी कुंथाकथी।' –भारा किष्किंधा १७ ५४ [कुथणें]

कुथाडणें—सक्रि (खा व) कुथविणें, चोपून काम करून घेणें, बडविणें, ठोकणें

कुंद—पु १ चमेलीच्या वेलासारखा वेल व त्याचें फूल याला फुलें आश्विन–कार्तिकांत येतात तें रानमोगरीसारखें पण किंचित लांबट असतें २ गुरांचा क्षयरोगासारखा एक रोग ३ छपराची दोन पाखीं मिळतात त्या ठिकाणीं होणारा कोन, रस्त्याचा कोपरा, कातरा ४ रुमाल किंवा शालजोडी इ० च्या कोपऱ्यांत काढलेली झाडाची नक्षी, वेलबुटी ५ कुबेराच्या नऊ निधीं पैकीं एक ६ कण्हेरीचें झाड ७ एक प्रकारचें गवत

कुंद—वि चोंदलेलें, बुजलेला (नळ, गुडगुडीची नळी इ०) कोंदट, थांबलेली, थबकलेली, स्थिर झालेली (हवा, वारा), (त्यावरून) चोंदल्यामुळें बंद किंवा बसूर वाजणारा (वाद्य, गळा, स्वर, हवा) [कोंदणें]

कुदई—स्त्री (खा) कुदळी, टिकाव [स कुद्दाल]

कुदकणें—सक्रि यथेच्छ कुदलणें, मारणें, ठोकणें, लाथा बुक्यांनीं तुडविणें [कुतका]

कुदंड–खे र, कुदंडी–ड्या—कुभांड पहा.

कुदणें—न (गो) पिसाऱ्याशीं वासरूं असतांना घोडी जे अंगविक्षेप करतो ते —अक्रि १ उडी मारणें २ (कु) खेळणें ३ (गो) कवायत देणें, अंगात येणें [हिं कूदना, सिं कुडणु]

कुद्या—पु (खा) त्रास, दगा [कुदणें]

कुंदम(र)—पु डिक –दो १० २१५ –नामको

कुदरत—स्त्री सामर्थ्य, ईश्वरी शक्ति, प्रकृति, निसर्ग [अर कुद्रत]

कुदरती—वि नैसर्गिक, स्वाभाविक

कुदरापादरा—वि खुदरापादरा पहा

कुदलणें—उक्रि १ धसफस, निष्काळजीपणानें, धुवडा धडेल असें वागविणें, वापरणें (जनावर किंवा वस्तु) २ (खा ना) बडविणें

कुदव(वि)णें—उक्रि १ बडविणें, कुटणें, ठाकणें, मारणें २ धसफसपणानें वागविणें ३ (राना) खळविणें [कुदणें]

कुदळ–ळी–ळें—स्त्री १ खणण्याचें एक हत्यार, खनित्र, यास एका बाजूस लोखंडी टोंक व दुसरीकडे दांडा बसविण्याचें

छिद्र असतें हिचे पानकुदळ, सुवकुदळ, तोंडकुदळ, वेडगें असे चार प्रकार आहेत २ (ल) दाडगा, भाडखोर ३ (व) धीमा, जलद काम न करणारा माणूस [स कुद्दाल, तु का गुद्दली] ०पक्षी-पु (अलिबागी) करकोचा पक्षी हा साधारण माण साच्या कमरेइतका उंच असतो समुद्राजवळ एरलोंडा राहातो याचें मास एसाया ल्हान वकन्यादृतकें निघतें तें खातात ०भारती-वि (व) ऐंदी

कुदळणें—उक्रि कुदळीनें खणणें

कुंदळणें—खुंदळणें पहा

कुदळा—पु (कों) मोठी कुदळ, याच्या तोंडाम विळत किंवा पळीव असुन दाडा कोनाकृति असतो

कुदळ्याचा—वि कुदलीनें खणून केलेला (नागरानें नव्हे)

कुंदा—पु १ एक प्रकारचें गवत, हें हरळीसारखें असतें याच्या मुळ्या जाड असुन त्या जमिनींत फार खोल जातात, त्या काढ ण्यास फार त्रास पडतो 'कुदा गोंगडी हराळी।' —गीता २ ५२८६ २ एक फुल्झाड [स कुरर, कुरव] ०काढणें-१ ठेचणें मारणें, चोपणें २ गवत खणून काढणें

कुंदा—पु कुडा, भाग इ० घोटण्याचें दगडी किंवा मातीचें भाडें 'शाभवी आलासे घेऊन। कुदा कुल्का सिद्ध करून। आस नावरी वैसला।' —नव २२ १४६ [कुड]

कुंदा—पु (माळ्वी) कोयडा

कुंदा—पु वदुकीचा दस्ता [फा कुन्द]

कुदा—पु ठेचा —शर

कुंदा—पु (कुस्ती) गळखोडा, आपला एक पाय जोडी दाराच्या मानेवरून, बगलेंतून घालून आपल्या दुसऱ्या पायाच्या गुडघ्याच्या लवणींत आपल्या पायाचा पजा धरून हातानें जोडीदाराला मानेवरून घातलेल्या पायानें चीत करणें

कुंदा—पु खवा

कुदांड—पु कुभाड पहा —वि दाडगा, भाडखोर, धस मुसळा

कुदाडी—स्त्री १ उद्धटपणा, दाडगाई —वि २ कुदाडया कुभाडखोर, कुदाडखोर

कुदान—न वाईट दान, अशुभ दान, जें घेतलें असता पाप लागेल असें दान [स]

कुंदावा—पु (व) वायु कोंडणें, गुबारा, अवष्टभ. [कुद]

कुदाळ—पु कुदळ पहा

कुदिन—पु अशुभ दिवस, अमगल दिवस दुर्दिन [स कु=वाईट+दिन=दिवस]

कुदिन—पु पृथ्वीच्या दैनंदिन भ्रमणाचा काल [रा कु= पृथ्वी+दिन=दिवस]

कुदी—स्त्री (रा ना) उडी (क्रि० मारणें, खाणें) [हिं गु]

कुंदी—स्त्री १ (धोवी) कपड्याच्या घड्या घट्ट बसण्या साठीं मोगरीनें ठोकण्याची क्रिया २ कपडे धुताना मर्दणें, घासणें, वडवणें वगैरे क्रिया ३ (ल) खुप मार, कुटा, दुर्दशा (क्रि० करणें, काढणें, गाजवणें) 'कुंदी करिल रविपुत्र कसें।' —दव नायकटिचध ६ 'कुंदी करील तेव्हा कसे टिकाल।' —अफला ६०. [ध्व] ०पाक-पु ठोकाठोकी, कुटाकुटी

कुदृष्टवादी—पु (कायदा) न्यायाधिशाच्या निकाला सवधीं असतुष्ट राहाणारा वादी 'त्यात जर कुदृष्टवादी पराजय पावला तर त्याला दड करावा —मिताक्षरा–व्यवहाराध्याय आणि मयुखदायविभाग पृ ७०

कुंदेणें—अक्रि (राजा) कुद नावाच्या रोगानें पछाडणें (जनावरें)

कुद्दा—पु (व) काठीचा ठोसा कुद्दावून भरणें-क्रि गच्च भरणें, दाबून भरणें 'दोन्ही पोतीं कुद्दावुन भरलीं'

कुद्वा—पु आदर्शभूत पुढारी 'कुद्वा उमराय नहत निशान' —इम ६५ [अर कुद्वा]

कुद्रत-ती—स्त्री कुदरत-ती पहा

कुद्रंपाद्रं—वि कुजकट, लागण्यासारखें (बोलणें) —फाटक नाट्यछटा

कुद्रव्य—न निषिद्ध पदार्थ 'जया का सदोखा। कुद्र व्यासी।' —ज्ञा १७ १६२ [स]

कु(कुं)द्रू—पु कुरडू नावाची रानभाजी, कुजीर.

कुधण न, कुंधाण-न—वि सशयी, मत्सरी, खुनशी, कुरटी, हिरवट, विषण्ण, आतल्या गाठीचा [कुडणें] कुधा णकी—स्त्री कुधणाची अवस्था, मत्सर, द्वेष

कुंधा—पु गवत, काशा, कुदा पहा कुंधा काढणें-क्रि (ल) मार देणें

कुधांड-डी-ड्या, कुधाडखोर—कुभाड पहा

कुधाण(न)काकडा—वि मत्सरी, सशयी, खुनशी

कुधान्य—न ज्या धान्याचा देवास नैवेद्य, वैश्वदेव करीत नाहींत तें, उदा० हरीक, उडीद, मसुर, लाख, चवळी, बाजरी इ०, इतर धान्यासाठीं अठराधान्यें पहा [स]

कुन—स्त्री (गो) नागराचा दाडा घट्ट बसविणारी पाचर कुणी पहा

कुनी—स्त्री खुटी, मेख कुणी अर्थ २ पहा

कुनी—स्त्री अजिराचें लहान कलम —कृपि १६८

कुनीति—स्त्री १ अनीतीची वागणूक, वर्तणुक, पापाचरण २ बेबद राज्यव्यवस्था, अव्यवस्था, बेकायदेशीर अमल ३ अयोग्य कायदे, अहितकारक नियमपद्धति [स]

कुन्हा—पु १ मर्म, खोड, दोष, मत्सर, गुन्हा, वेड 'त्याचे कुन्हे ध्यानात येण्याकरिता अशहिदा पुराणी तुम्ही लिहिली '–रा ७ 'तहाचे मजकूर तुम्हास सांगितले त्यांतील दगावाजीचे कुन्ह आहेत ते '–रा १२ ८७ २ कुपथ्य –शास्त्रीको (क्रि० धरले, ठेवणें ) [ अर कुन्ह् ]

कुन्हारणें—क्रि (प) मारणें, ठोकणें 'त्याला तुप न्हारलें ' [कुन्हा ]

कुन्हेयाज-धारेव—वि कुनबी, मारकरखोर

कुप—पु ढीग, रास, जगलांतील लाकडाचे ढीग [त कुप्प= ढीग, का, कोप्पे=रास ]

कुप—पु कूप पहा 'जन्मावरि दरिद्रें पीडिला । त्यासि धान्याचा कुप सांपडला ।'–ह २ ९२ [स कूप]

कुप कुप—पु (ना) कुपण, वई, वडान 'मग तयाचिया कुडुरा । कुप कीजे ।'–ज्ञा १३ २१८ 'शेतिंनां कुप कांगी खुर दरडी न पाहे ।'–तुगा ३४९ 'होतें निर्भय आश्रित अवलंबुनि तुज जसे कुपा सरडे ।'–मोसौप्तिक २ ३६ [स कूप]

कुपट-ड—स्त्री १ शेत वगैरेची हद्द, काठ, बाजू २ (कों) शेकोटी, पावटे, वगैरे, मुइमूग, चवळी यांच्या शेंगा भाजण्यासाठीं केलेला विस्तव.

कुपण, कुंपण—न १ जागा बंदिस्त करण्याकरितां लावलेले कांटे किंवा घातलेला कुड वगैरे २ सर्व बाजूंनी कांटे लावून अगर कूड घालून बंदिस्त केलेली जागा, आवार म्ह० १ सरडाची धाव कुंपणापर्यंत २ कुंपणानें शेत खाल्लें=ज्याचे हातीं रक्षणाचें काम त्यानेंच नुकसान केलें [स कूप]

कुंपणी-सरकार—स्त्री इ कंपनी, ईस्ट इंडिया कंपनी (इंग्रजांची ), ही हिंदुस्थानात व्यापारी सनद घेऊन १६०४ मध्यें आली पुढें हिनें हिंदुस्थानचें राज्य कमावल्यावर तिला कुंपणी सरकार अशी संज्ञा मिळाली [इ कंपनी]

कुपथ-कुपंथ—पु १ आडवाट, भलताच रस्ता, दुर्मार्ग, २ (ल) पाखंड मार्ग 'शास्त्रइं चालतां कुपंथें ।'–मुक्तेश्वर (नवनीत पृ १८०) [स ]

कुपथ्य—न रोग्यास जे पदार्थ खाल्ले असता अपाय होण्याचा संभव असतो अशा पदार्थांचें सेवन, अपथ्य, वावड्या पदार्थांचे सेवन 'जैसा ज्वरित कुपथ्य सेवें । साडी जीवा '–कथा २ ७ १४८ [स कु+पथ्य]

कुपराण—न कुफराण पहा

कुपरिणाम—पु अनिष्ट फल, वाईट परिणाम, शेवट [स]

कुपरी—स्त्री वाईट संगत –शर

कुपरी—स्त्री (कों) (तेलीधंदा) ही त्रिकोनाकृति लुगी असते ही ढोकाच्या खालच्या टोंकाशीं भोंक पाडून त्यांत गवळवितात व या कुपरीच्या खालील टोंकात आडवी खिळी घालून त्या भोंकातून दोरीचे वेढ देऊन नाड्याला जोडतात

कुपा—पु १ विशेष प्रकारची बाटली, मोठी कुपी, शिशा २ गारेसारखा एक दगड याची रांगोळी करतात [स कुतुप, का कोप्पे=लहान भांडें ]

कुपाटी—स्त्री (व) कुंपण –गागा २०१ [कूप]

कुपातर—पु (गो) पूड होण्याजोगा दगड कुप्पा पहा

कुपात्र—पु १ (दान घेण्यास) अपात्र, अनधिकारी मनुष्य, 'ते आपुलेनि कुपात्रपणें । पृथ्वियां आच्छादिलें मी म्हणे ।'–ऋ ७४ २ वाईट भांडें [सं ]

कु(कुं)पास—पु (क) कपास

*कुपिका—स्त्री कुपी, बाटली 'तव दये शब्द कुपिकेतळीं ।' –ज्ञा ७ १८५ [स कूप]

कुपित—वि रागावलेला, कोपलेला, क्रुद्ध, क्रोधाविष्ट, सतापलेला [स कुप्=रागावणें ]

कुपित-त्त, कुपित्थ—न १ अपचन २ पोटांतील न पचलेलें अन्न ३ आतड्यात राहिलेल्या मळाच्या गाठी ४ पोटात असलेला द्वेष, कपट [स कु+पित्त]

कुपिया—वि गुप्त [हिं छुपिया]

कुपी—स्त्री. बाटली (कांचेची), शिशी 'मयाराक नरें जशी मग कधीं कातें कुपी ओंकिली ।'–केक १३ [स कुतुप, का कोप्पे=लहान भांडें] कुपीतली गोष्ट–स्त्री गुप्ति गोष्ट

कुपीन-न—स्त्री लंगोटी, काचा (क्रि० नेसणें) [स कौपीन ]

कुपुत्र—पु वाईट मुलगा, मातापितरांस दु:ख देणारा, कुलास कलंक फासणारा पुत्र [स ]

कुपेथर—वि पाढरट, नरम, ठिसूळ भाग असलेला, कुप्पा दगडासारख्या थराचा (दगड, धोंडा ) [कुपा+थर]

कुप्पा—पु. १ मोठी बाटली २ गारेसारखा ठिसूळ एक दगड याची रांगोळी करतात –वि दाडगा, धिप्पाड

कुप्पा—पु. (तंजा ) केर, कचरा, धूळ 'कुप्पुराव=केरो पत ' [ता कुप्पे]

कुप्पी—स्त्री. बाटली कुपी पहा

कुप्य—न हीण धातु, हलकी धातु, सोनें, रुपें याखेरीज जस्त, कथिल इ० धातु [स ]

कुफर—पु स्वामिद्रोह, निमकहरामी 'त्याणी सर्कारलक्षें काहीं एक कुफर न करिता चालवयाचा तहनामा ठरविला ' –मराचियोशा ६७ [अर कुफ्र]

कुफराड-राण-णा, कुफ्राण—न १ तोहमत, आळ, कुभाड 'त्यावरि अजि कशीं कुफराणें ।'–आक ३० २ अधर्म,

कापरशाही, रगडी, 'पुढें धर्म उच्छिन्न होऊन तेरावे सदींत कुफ्राण माजल '-ऐस्फुले ६५ (क्रि० यणें, उठणें, घालणें, करणें) ०दार-कुफराडी पहा 'हा सोम ठाकूर कुफराणदार '-मराअ६

कुफरांडी-ड्या-णा-णी-ण्या—वि आळ घेणारा, तोहमत्या, कुभाडखोर 'नामदेवासी बोलिला काय। गातोसी काय कुफ्राणा।'-भवि १० १७६ [कुफ्राण]

कुफळ—न (कों) कुभा नावाच्या झाडाचें फळ

कुफार—पु लु०चा, हरामखोर बखेडखोर माणूस 'जकार नामक म्हैसूर हस्तगत करावा सगळ्या कुफार तो आहे ' -खरे ५२०२ [अर कुफ्फार, काफीरचें अव, कफ्र=नास्तिक]

कुफ्तगारी—स्त्री एक प्रकारचें नक्षीकाम -नामको

कुब—वि (वे) आडाणी

कुबट—वि १ कुजकट, सडका, वासट, कुरसट २ (ल) निंदक,कुजक्या मनाचा कुबणें-अक्रि कुजकट वास यणें, कुरसटणें

कुबड—न पाठीवरील आवाळू गड्ड बाधस्याचें आलेलें पोंक, पाठीच्या कण्याचें बुड (क्रि० निघणें, काढणें) [स कुब्ज, प्रा कुज्जो, कुब्बड, सिं कुबो, प कबड़ा, हिं आरिसा कुजा, ब कुजो]

कुबडा-ड्या—वि १ कुबड निघालला (माणूस) २ (थट्टेनें) कुबडाभाई

कुबडी—स्त्री १ एक प्रकारची पाणगोगलगाय, कुरडी २ वैराग्याची हात टेकण्याची किंवा काकोटीस घेण्याची दुबेळ क्याची काठी ०काढणें-क्रि काहीं वाकडेपणा व्यग काढणें

कुबया-यो—पु (कों कु) कुभा नावाचें एक रानझाड

कुबरी-जमीन-रान—स्त्रीन ल्हान टेंकडयाच्या पाय थ्याची नापीक, बरड जमीन, हींतील माती धुपून जाऊ नये म्हणून हीस आडवे बाध घालतात हींतील लागवडीस कुबरीची लागवड म्हणतात कुमरी पहा

कुबल—वि १ (व) कठिण, अडचणीचें, बळकट, भक्कम कुबलगड भीरिका कुडेगडाचें चोंगुलपण।'-ऐपो ८ [फा कुबाल=बाधणारा]

कुबलणें—उक्रि ठोकणें, मारणें, बडवणें

कुबळ—न (कों) एक काटेरी रानझाड ह्याच्या फाया कुप णाला लावतात याचीं फळें खातात 'कुबळ भळा तोरण चिमर व घाणेरी या काटेरी झुडपाखेरीज '-खया ३३

कुबळ--न १ (कु) आमटी २ (कु) (पत्त्याचा डाव) लाल बदाम

कुबा—पु कुबडी अर्थ १ पहा खुबा

कुबा—पु कुभा नावाचें झाड 'अजन, कुबा हेल वगेरे इमारतीचे उपयोगी झाडें '-खेया ४४

कुबार—पु (कों) एक प्रकारचा मासा

कुबीन--न रेशमाची एक जात -मुऱ्या ९७

कुबुद्धि—स्त्री वाईट इच्छा, विचार, बुद्धीचा दुष्टपणा [स] -वि वाईट विचाराचा, बुद्धीचा

कुंबेकुरूड—पु कुरुडकुभा पहा

कुबेटणें—अक्रि (वे) पाडास यणें

कुबेटा—वि (वे) पाडाचा

कुबेर—पु १ देवाचा भाडारी, यावरून २ (ल) श्रीमत माणूस 'कुबेराचें धन मार्कंडेयाचें आयुष्य (असणें)=पुरास्वास्थ्य असणें [स]

कुबोल—पु अपश०द 'कुबोलाचीं सदटें। सूति काढें।'-ज्ञा १६ ४०४

कुब्ज-क—वि कुबडा 'आणि आपुली माये। कुब्ज जरि आहे।'-ज्ञा १८ ९२७ 'कपटरूपें कुब्जक। वाळवेश धरोनिया।' [स]

कुब्बल—वि दृढ, मजबूत बळकट, भक्कम, कुबल पहा

कुब्या—पु बडवलेला-काटलेला बैल

कुभ—पु १ घागर, घडा 'देवें अमृतकुभ जोडला।'-ज्ञा २ २५२ २ कुभराशि (अकरावी राशि) ३ हत्तीचें गडस्थळ 'भवेभकुभभजना।' -ज्ञा १० ५ ४ कुभिपाक नावाचा नरक 'काळदड कुभयातना थोरा।'-तुगा ७०२ ५ धान्य मोजण्याचें एक माप, वीस द्रोण म्हणजे एक कुभ (मनु ८ ३२० वरील टीप) ६ (गो) वीस खडींच माप [स] (वाप्र) ०फळ गळयास लागणें-(कु) सकटात सापडणें सामाशब्द- ०कामला-स्त्री काविळीची शेवटची अवस्था [स] ०कार- पु कुभार [स] ०पाक-पु एक नरक कुभ अर्थ ४ पहा 'कुभपाक लागे तयासि भोगणें।'-तुगा २८ ०पुट-न एका मातीच्या घागरीस चाळीस भोंकें पाडून ती अर्धी कोळशानें भरावी व वर औषध ठेवावें तोंडावर एक परळ झाकून मातकापड करून तोंड लिंपावें व सावलींत वाळवावें, मग घागर चुलीवर ठेवून परळांत निखारे घालून खालीं जाळ लावावा तीन दिवसानीं औषध काढून घ्यावें -योर १ २१० ०मेळा-पु कुभ राशीस गुरु येतो तेव्हा हरिद्वारास भरणारी जत्रा ही वर्षभर असते -तीप्र ३१ ०विवाह- पु मुलीच्या जन्मकाळीं तिला वैधव्य प्राप्त होण्यासारखे अनिष्ट ग्रह असतील तर अरिष्टनिरसनार्थ, तिच्या लग्नापूर्वी तिचा घटाशीं विवाह करतात तो ०संभव-पु अगस्ति ऋषि [स] ०स्थळ-न हत्तीचें गडस्थळ 'गज हाणीत मुसळें। विदारित कुभ स्थळें।-एरुस्व १० ५५

कुभक—पु (प्राणायाम) पूरकानें आत घेतलेला वायु रेचक होईपर्यंत कोंडून धरणें 'प्राण व अपान या दोहोंचाहि निरोध झाला म्हणजे तोच प्राणायाम कुभक होय '-गीर ६७८ [स]

**कुंभकर्ण**—पु १ रावणाचा भाऊ, एक राक्षस हा फार झोंपाळू होता यावरून २ (ल) अत्यंत झोंपाळू माणूस, गाढ व पुष्कळ वेळपर्यंतच्या झोंपेस कुंभकर्णी झोंप म्हणतात

**कुभक्त**—वि ढोंगी, भोंदू [स कु+भक्त] **कुभक्ति**—स्त्री ढोंगीपणा, भोंदूपणा, कृत्रिम उपासना, दांभिक भक्ति [स कु+भक्ति]

**कुंभडळी**—स्त्री (गो) बवडळ झाड

**कुभंडी**—वि कुभांडी

**कुंभणें**—सक्रि रोधणें, कोंडणें 'इंद्रेंनि कराचा प्राण पूर्ण। तो कुंभूनि राखावा जाण।' –एभा १४ ४२० [कुंभ]

**कुंभा**—पु १ एक पक्षी २ एक रानझाड याच्या पानाचे द्रोण करतात व सालीचे दोरखंड करतात हें झाड मोठें होतें व फळ पेरूफळासारखें गोड असतें ३ धातरा, एक औषधी झुडूप, याची फुलें शर्कराला वाहतात पानें औषधोपयोगी आहेत यास दुधाणी, दोतवड, दोताड हींहि नांवें आहेत [स कुंभ]

**कुभांड, कुभांड-आभांड**—न १ तोहमत, आळ खोटा आरोप, लबाडीची टाळाटाळ (क्रि० आणणें, मांडणें, घालणें, रचविणें, करणें, उठविणें) २ कारस्थान, कट, वाकडी व छळदायक मसलत, बनावट पुराव्याचा डोलारा 'त्यानें निराळेंच कुभांड रचून बादशहाच्या मनांत भरवून दिलें,' –उप काल [स कु+भांड] **०खोर कुभांडी-ड्या, कुभांडी आभांडी-ड्या**-वि १ कुभांड रचणारा २ तोहमत आणणारा, कपटाचें कारस्थान करणारा

**कुंभातर**—पु (गो) एक पक्षी कुंभा पहा

**कुंभार**—पु १ मातीचीं भांडीं घडून त्यावर उपजीविका करणारी एक जात व तींतील व्यक्ति २ एक प्रकारची माशी, कुंभारीण [स कुंभकार] म्ह० १ (गो) कुंभाराक मडकीं धडना=जिन्नस उत्पन्न करणाऱ्याला त्याचें दुर्भिक्ष असतें कारण चांगलीं मडकीं सर्व विकावयाचीं असतात व स्वतः वापरावयास फुटकें तुटकें घ्यावयाचें अशी प्रवृत्ति असते २ (गो) कुंभाराक जवाहीर=अनधिकाऱ्यास अधिकार देणें अयोग्य माणसाला मौल्यवान वस्तु देणें ३ कुंभाराची सुन कधीं तरी उकिरड्यावर येईलच=जी गोष्ट निश्चितपणें व्हावयाची ती गोष्ट आज ना उद्यां होणारच ४ कुंभार कुंभारीण सुखी असेल तर मडक्याला काय तोटा=नवरा–बायको सुखी असतील तर मुलांना काय तोटा ५ कुंभारणीनें कुंभारणीशीं कज्जा केला आणि गाढवाचा कान पिळला=दोघांच्या भांडणांत तिसरा घुसला असतां त्याला मिळणारें प्रायश्चित्त **०काम**-न गाडगीं-मडकीं (समुदायानें) लग्नकार्याच्या वेळचीं सुगडें इत्यादि कुंभारानें करावयाच्या ... **कुंभारकी**-स्त्री कुंभाराचा धंदा **०कुकुड-कुकडा**-पु भारद्वाज पक्षी कुकुडकुंभा पहा **०क्रिया**-स्त्री शूद्र मेला असतां कुंभार जी त्याची उत्तरक्रिया चालवितो ती **०खाणी**-स्त्री कुंभाराची मातीची खाण **०गचंडी**-पु गचडीकाम करणारा कुंभार **०घाणी**-स्त्री १ कुंभारानें मळून तयार केलेली माती २ उसाच्या चिपाडांत राहिलेला रस काढण्याकरितां उपयोगांत आणलेल्या कुंभाराच्या घाणीवरील कर ३ कुंभाराच्या घाणीसाठीं दिलेली उसाचीं चिपाडें **कुंभारडा**-पु (तिरस्कारानें) कुंभारास म्हणतात **कुंभारणी**-स्त्री कुंभाराची बायको **०वाडा**-पु कुंभाराची आळी, कुंभारांची वस्ती **–राच्या देवी-माता**-स्त्री टोंचलेल्या देवी, गोंस्तनी देवी

**कुंभारा**—स्त्री (कों) कुंभारीण माशी –वि (कों) १ जिला आकार, रंग पिकल्याप्रमाणें आला आहे परंतु जी भरोसर पिकली नाहीं अशी (सुपारी) कुमारी पहा २ कुंभारानें बनविलेली (घट इ०) ३ कुंभाराविषयीं, कुंभारकामासंबंधीं

**कुंभारीण**—स्त्री १ कुंभाराची बायको २ कुंभारीण नांवाची माशी

**कुभाव**—पु १ वाईट स्वभाव, संशयीवृत्ति, अविश्वासी स्वभाव २ मत्सर, द्वेष, खोटी बुद्धि, वरवरचा कुडा भाव

**कुंभिनी**—स्त्री पृथ्वी 'असें आतळ कुंभिनीवर' –मुक्तेश्वर नवनीत १८८ 'फरशधरें अति पराक्रमें कुंभिनी केली निःक्षेत्री।' –ऐपो २६५ **०प्रदक्षिणा**-स्त्री पृथ्वी प्रदक्षिणा 'जो करील कुंभिणीप्रदक्षणेस स्वतर्थी।' –होला ३९

**कुंभी**—स्त्री (खा) उथळे सुर्चीं (खांबाच्या खालची), तळखडा हा दगडी चौकोनी असतो [कुंभ]

**कुंभी-भ्या-व्या**—स्त्रीपु कुंभा अर्थ २ पहा

**कुंभीपाक**—पु एक नरक कुंभपाक पहा 'त्यासी कैंचा परलोक। अंतीं होय कुंभीपाक।' –गुच १६ १३६

**कुंभीर**—पु लांब नाकाचा मगर, सुसर [स]

**कुभे**—स्त्री दोष 'म्हणजे यात हुस्न–कुभेह कोणती आहे ती ध्यानात येईल' –रा ५ ८४ [अर कुब्ह्]

**कुंभेर-री**—स्त्री १ (कों) गवताची किंवा धान्याची पेंढी, कवळाची ...पी २ कुंभारीण माशी

**कुभोजन**—न कदन्न जाडयाभरडया अन्नाचें भोजन, कुग्रामवास कुलहीनसेवा, क्रोधमुखी भार्या, कुभोजन या चार वाईट गोष्टींपैकीं एक

**कुमक**—स्त्री मदत, उपराळा, साहाय्य (सैन्य, पैसा इ० चें), मदतीस आलेलें सैन्य द्रव्य इ० 'इभजास कुमकेस प्रसंगीं बरोबर घेउनियां।' –ऐपो ३९६ [तु कुमक्]

**कुमकणें**—अक्रि टोंकणें, चोपणें, चदडणें [ध्व]

**कुमकपत्र**—न शिफारसपत्र पत्र पहा

कुमका—पु (को) ठोसा, तडाखा, बुक्कीने केलेला प्रहार [ध्व]

कुमकुमा—पु पातळ काचेचा, गुलाल भरलेला गोळा, गुलालगोटा (होळी अगर इतर समारंभात हा एकमेकाच्या अंगावर फेकीत असत) [अर कुमकुमा, तुल स कुंकुम]

कुमकुमीत—वि (कु) गुबगुबीत, लठ्ठ

कुमटका, कुमटपिका—वि (राजा कु) कुमेटका पहा

कुमंडल, कुमंडलु—पु कमंडलु

कुंमडा—पु (ना) तांबडा भोपळा [हिं कुम्हडा]

कुमति—स्त्री वाईट बुद्धि, दुष्ट बुद्धि 'सदा चालिज धर्मपथ। सर्व कुमति टाकोनि।' [स] -वि वाईट बुद्धीचा दुरात्मा

कुमंत्र—न वाईट सल्ला [स]

कुमंत्री—पु वाईट सल्ला देणारा माणूस [स]

कुमर-री—पुस्त्री कुमार-री पहा 'हे रचिले आधि बुद्धि गर्ते द्रुपदकुमरें।' -ज्ञा १ ९४ 'तव रायाचा ज्येष्ठ कुमर।' -एरुस्व ६ ३९ [स]

कुमरावळी—स्त्री उद्भव, परंपरा 'कुमरावळी ते दोन्हली ऐशी।' -शिशु ९८ [स कुमार+आवली]

कुमरी—स्त्री जमीनीचा एक प्रकार कुमरी पहा -कृषि २८६

कुमरी—स्त्री घोड्याचा एक रोग -अश्वप १ १४८

कुमलणें—क्रि कुमकणें पहा

कुमलें—पु १ (कु) मिराशानें धारण केलेल्या जमिनीचा खंड, भाग २ (गो) नारळ सोलण्याचें भाल्यासारखें एक हत्यार उल्कड ३ एक प्रकारची मापाची पद्धत

कुमाईत-यत—वि खास रंगाचा, दाढी, आयाळ, शुड्य, पाय कान हे काळे असून बाकीचें शरीर तांबूस असणारा (घोडा) 'परम रागाट कुमाईत। घदकश्याम स्थिर चालत।' -ह २२ ४५ 'अबलक पंचकल्याणी कुमाइत।' -ऐपो १३९ [अर कुमैत]
०अयलक-वि अर्धे शरीर तांबडें व अर्धे पांढरें असा (घोडा)

कुमा(धा)न्न—स्त्री (गो) कुमारीण माशी (सपक्ष कीटक)

कुमार—पु १ पांच वर्षांखालील अतीव मुलगा युवराज होण्याच्या पूर्वीचा मुलगा २ राजपुत्र (विशेषत युवराज) ३ कार्तिकस्वामी 'ज्याच्या भयें होय कुमार नागी।' -सारुह ३ १२८ [स]

कुमार—पु (गो) कुंभार

कुमारिका-री—स्त्री १ अविवाहित मुलगी, तरुण मुलगी 'जैसी कुमारीहातीं दिसती शंखें।' -ज्ञा ९ १७७ २ कोरफड
०आसव-न कुमार्यासव, कोरफडीच्या रसापासून तयार केलेलें आसव हें खोकला, क्षय, उदर मूळव्याध इ० वर उपयोगी आहे [स]

कुमारी—स्त्री (कु) पाखरानें खाल्ली कोंवळी सुपारी कुमारी पहा

कुमार्ग—पु १ वाईट रस्ता २ (ल) शास्त्रविरहित लोकविरहित निंद्य, अनीतीचें आचरण कृत्य वागणूक [स]

कुमार्गी—वि शास्त्रविरुद्ध मार्गानें चालणारा, दुराचारी [स]

कुमाव—पु (गो) पायखाना, संडास [पो, तुल इ कमोद]

कुमुद—न पांढरें कमळ, चंद्रविकासी कमळ 'सांग कुमुददळाचेनि ताटें।' -ज्ञा ५ १०७ [स मुद=हर्षणें] -दिनी-स्त्री १ कमलिनी श्वेतकमल २ कमळाची वेल ३ श्वेतकमळें असलेलें तळें [स]

कुमुद्वती—स्त्री (संगीत) दुसऱ्या श्रुतीचें नाव [स]

कुमेटका—वि (राजा कु) अर्धवट पिकलेला, पिकण्याच्या मध्यमावस्थेंतील (आंबा फणस इ०)

कुमेत-द—वि कुमाईत पहा 'हुजुरच्या कुमेद नरमाथा हिंसती।' -प्रला १२६

कुमेर—स्त्री (गो) पावसांत पेरण्यासारखी जागा, वरड जमीन भाजून कडधान्य पेरणें कुमरी, कुमरी पहा

कुमैत—वि १ कुमाईत पहा २ (ल) संशयी हुशार 'परंतु ती आगेमागे कुमैत तिजला कोणाचा विश्वास नाहीं' -खरे १ ३१० [अर. कुमैत]

कुर्ये—न (कु गो) पेजतील शीत

कुयटारु—वि (को) कुईटानें आकारलेलें

कुयरा-री-रें कुयला-ला-लें—कुइ शब्दें पहा

कुयाडें—१ कुडें पहा २ (को) पिकलेले आंब उकडून त्याचा बाटासकट रस काढून त्याला मीठ तिखट मोहरी इ० लावून फोडणी देऊन तयार केलेलें तोंडीलावण

कुयोग—पु नक्षत्र, अनिष्टग्रह, वातवार, काळ वेळ वगैरेंचा अशुभ योग [स]

कुरकळण-णा—उळकरण-णा यांच्या वर्णविपर्यासानें बनलेले शब्द

कुरकुचो—स्त्री करकाचीग करकाचा [स क्रौंच]

कुरकुट—पु एक पक्षी, कुकडकुंभा भारद्वाज, 'कुरकुट पहोत काग पती फार राहो।' -प्रग १३

कुरकुट(ड)णें—अक्रि १ कुरतडणें, दातानें तोडणें २ रागावणें, नमानें वाढ़ो

कुरकुटांवचें—अक्रि (गो) अपहार करणें

**कुरकुटी**—स्त्री (गों) किरकिरी (तापाची), तट्टारे, कुड कुडी [ध्व]

**कुरकुर**—उद्गा १ कुत्र्याच्या पिल्लांना बोलावण्यासाठीं ह्या मुखें म्हणतात २ कुत्रा माणसाला डिवचण्यासाठीं नाकावर हात टेंकून केलेला शब्द [सं कुर्=शब्द करणें, दे कुरकुरिअ, ध्व]

**कुरकुर**—स्त्री चिरचिर किरकिर, तक्रार (क्रि० करणें, लावणें,) [सं कुर्=शब्द करणें]

**कुरकुरणें**—अक्रि १ कुरकुर करणें, कुरकुटणें, किरकिर, चिर चिर करणें २ पोटात गुरगुरणें 'पोटांत कुरकुरतें' ३ कुत्र्याचा आवाज करणें 'जो सुकरामधें कुरकुरितो।' –दा ११ १ २३ [सं कुर्=शब्द करणें]

**कुरकुर, कुरकुर**—स्त्री कुरकुर घुमघूम –क्रिवि कुरकुरीनें, घुमघुमीनें

**कुरकुरा**—स्त्री पोटांतील गुरगुर [ध्व]

**कुरकुरी**—स्त्री (व) घोड्याचा एक रोग हा पोटांत होतो

**कुरकुरीत**—वि कुरकुरीत, चुरडताना कुरकुर आवाज होणारा, कुडकुडीत [सं कुर्=शब्द करणें]

**कुरकुला**—पु हा एक चिरालात, सदे जमिनींत येणारा रोपा आहे याची भाजी अळवाप्रमाणें पण गुळगुळीत होते –वगु २ ५१ [सं कर्करि]

**कुरकुला-ली-लें, कुरकूल**—पुस्त्रीन नाना प्रकारचे जिन्नस ठेवण्यासाठीं कळकाच्या कामीचीं केलेलीं बुरडी, पाटी, टोपलें, करंडी, पेटारा वगैरे पात्रें साधनें हीं लहान मोठीं अस तात (खेळण्यासाठीं भाजी धुण्यासाठीं वगैरे)

**कुरंग**—पु हरिण, काळवीट [सं] ०नयना-नैना-नी-स्त्री हरणासारखे काळेभोर डोळे असलेली स्त्री (एक सौंदर्याचें लक्षण) 'यावरी वाटे कुरंगनयनी।' –महिपति (नवनीत पृ २४४)

**कुरंगिणी**—स्त्री हरिणी 'शाळवितों जैसें पाडस कुरंगिणी। पीडिलीया वनीं तहानभूकें।' –तुगा १६०५

**कुरग**—स्त्री (व) एक प्रकारचें गवत

**कुरगई**—स्त्री (वे) गाडीचा एक भाग

**कुरगी**—स्त्री शेतीचें एक औत –मामको

**कुरगोट्या**—स्त्री (गोट्या) ज्यामध्यें निकलेल्याच्या पाठीवर बसावयास मिळतें असा गोट्याचा डाव टोपरगोट्या, ।, कोंडडाव पहा

**कुरघोडी**—स्त्री १ दुसऱ्याला पाठीवर घेण्यासाठीं ओणव होणें २ एकापुढें एक पाच सहा जण ओणवे उभे राहून अगदीं माग च्यानें पुढच्याच्या पाठीवर थाप मारून जाऊन बसण्याचा खेळ (क्रि० करणें) 'गिवाय कुरघोड्या वेगळ्या' –अफला २५ (ल) छी थू करणें; पायाखालीं तुडविणें मात करणें, वरचढपण गाजविण 'स्वार्थ साधण्याकरितां व दोष एकमेकावर कुरघोडी करण्याच्या विचारांत होते' –स्वप ४ (चेंडू) एका बाजूचे गडी ओणवे राहून दुसऱ्या बाजूचे त्यांच्या पाठीवर बसतात व आपल्या हातीं एक करून चेंडू वर उडवितात, नंतर तो चेंडू ज्या बाजूचे गडी झेलतील त्यांना हाय भाग अगें समजून त्यांना दुसऱ्या बाजूच्या गड्यांच्या पाठीवर बसावयास मिळतें

**कुरचोंण**—उक्रि (राजा) कुरतडणें, कुरकुरणें पहा

**कुरचा**—पु (राजा) घोचकुरा (क्रि० काढणें, घेणें)

**कुरनूक**—वि ठिसूळ, ठिसूळ (कांच, लाकूड इ०) [कुर= कुरकन् मोडणारा, ध्व]

**कुरद्या**—अ क्या क्या, क्या पहा

**कुरंटक**—पु कोरांटीचें फूल [सं]

**कुरटा-ठा**—वि १ कुरंग, खुजा 'हे लोक शरीरानेंच कुरटे आहेत असें नाहीं' –मुपनि ८२ २ मनांत कुढणारा 'कुरटें कुतर नाठाळ।' –दा २ ३ २३

**कुरटा-ठा**—पु १ घरटें (पक्ष्याचें) 'तृणापक्षिणीना कुरटा गोल्ला।' –विपू १ १०१ २ कोठा, कोठी, घर 'ना तो अन गाच कुरटा।' –शिशु ४१ 'तू धनुर्विद्येचा कुरटा।' –क्या १ ११ १०७

**कुरडई**—स्त्री तांदुळाच्या पिठाचा तळावयाचा वर्तुळाकार पदार्थ, (तजा) कुरवाडी [ध्व]

**कुरड रोग**—पु पित्तदोषामुळें मुलांच्या भडामध्यें हा होतो त्यासाठीं त्या मुलाच्या कानावर वेध करावा कुरड उजवीकडे असल्यास डावीकडे व डावीकडे असल्यास उजवीकडे वेध करावा –योर २ २४१ [सं]

**कुरडा**—पु १ (राजा कु) संकुचित डोळा –वि अशा डोळ्याचा (माणूस) [का कुरुड=आंधळा, तुल० अर कुर= आंधळा]

**कुरडा**—वि (गो) अधळा **कुरडेपण**—न (गो) अधळे पणा [का कुरुड=आंधळा तुल० अर कुर=आंधळा]

**कुरडु-डू**—पु १ स्त्रियांचा कानांतील एक दागिना व तो घालण्याची जागा –वि २ एक रान झुडुप पाढऱ्या माटाच्या जातीची भाजी, हिची उंची दोन हात पानें पातळ व वीं फार असतें याच्या पानाची कुणबी लोक भाजी करतात ह्याचें फूल गिळसर मंजिरीसारखें असतें तांबड्या फुलाच्या कुरडूला देव कुरडू म्हणतात वगु २ ५१ [सं मुरडी]

**कुरडुकें-डुकें**—न कोरडिकें पहा

**कुरण**—न १ गवतासाठीं राखलेली जमीन, गायरान २ (ल) चरण्याची भक्ष्य मिळण्याची जागा, लाभदायक वस्तु [सं कु+अरण्य]

कुरणे-ण्या--पु कुरणावर देखरेख ठेवणारा अधिकारी

कुरणेकरी--पु फार दिवसाच्या दुखण्यानें अशक्त झालेला माणूस

कुरणो--पु (कु ) अर्धा कापा व अर्धा बरका फणस

कुरतुडणें--उक्रि दातानीं किंवा नखानीं बारीक तुकडे करणें [ ध्व ]

कुरंद-दी--कुरुद-दी पहा

कुरंदी-धी--स्त्री ( कों ) ल्हान कोयती, खराळी [ का. कुरचिगे ]

कुरनिसा(शा)त, कुरनीस--स्त्री नम्रपणानें केलेलें अभिवादन, सलाम, प्रणिपात 'कुरनिसा करिति जन वाड्यामधे आउनी।'-ऐपो २०१ [ तु कोर्निशात ]

कुरपण-पाणी-पाणी--न ( कों गो ) पाटी किंवा टोपलीस दोऱ्या बाधून शिंकें करतात तें, शिंकाळी, ह्यान भांडी वगैरे ठेवतात, आवे उतरण्यासाठीं टोपलीस दोऱ्या बांधून शिंकें करतात तें, परडी [ ? ]

कुरपें--न ( खा ) खुपऱ्या ( डोळ्यातील )

कुरवाण-न--न दवास दिलेला बळी, उतारा 'मी तुझ्या एका शब्दाकरिता हा माझा देह कुरवाण करीन '-स्वप ४३० [ अर कुर्बान् ] कुरवानी-स्त्री बळी, ओवाळणी, बळी देण्याची क्रिया, उतारा

कुरखुर--स्त्री १ कुणकुण, कुरकुर, कुरकुर, रागाची गुर गुर, कटकट ( क्रि० करणें, लावणें, होणें ) २ तटा, कलह, धुसपूस 'वसाहतवाल्याची व इंग्रेजाची कराच्या बाबतींत कुरखुर होऊन '-नि ७११ [ ध्व ]

कुरखुर--पु ( वे ) धनगर [ ता का कुरुब=धनगर ]

कुरखु(मु)रणें--अक्रि १ धुसपुसणें, रागावणें, चरफडणें २ पोटात कुरकुरणें-कुरमुरणें [ ध्व ]

कुरमणें--अक्रि १ धुमसणें २ (ल ) क्रोधादिकानें धुमपुसणें ३ पोटात कुरखुरणें 'पोटात कुरमतें '

कुरमाईत--क्रिवि ( व ) थोडें थोडें, हळु हळु 'कुरमाईत कुरमाईत पोट दुखतें '

कुरमुड-डें--न ( व ना ) कोथिंबीर

कुरमुर--स्त्री १ कुरखुर पहा 'सल्गी धरी पयोधर। सहातें कुरमुर सर्व।'-तुगा १२७ २ पोटातील गुरगुर ( क्रि० उठणें, निघणें, राहाणें ) [ ध्व ] कुरमुरणें-क्रि धुमसणें, कुरखुर करणें

कुरमुरा-री--पु भाजलेले पोहे, कुरमुरे, मुरमुरे, हरभरे तांदूळ इ० भाजून कुरकुर वाजण्यासारखे केलेले असतात ते [ ध्व ] ०खाणें-क्रि ( ल ) इच्छेविरुद्ध गोष्ट झाली असता निरुपायानें मनांतल्या मनात चरफडणें

कुरर-री--स्त्री टिटवी [ स ]

कुरली--स्त्री हाताचा एक रोग, हातावरील गळू यानें बोट सुजतें आणि आखडतें ह्यावर खेकड्याच्या बिळातील मातीचा लेप देतात [ सं कुनीरक ]

कुरली-ल्ले, कुळी--स्त्रीन ल्हान खेकडा, कर्कट हा मृगाच्या पावसात उत्पन्न होतो [ स कुलीरक ]

कुरवंडणें--उक्रि कुरवंडी करणें, ओवाळणें, ओवाळून टाकणें ( मूर्ति, मूल इ० वरून )

कुरवंडा--वि ( कों ) उथळ, थोडें पाणी राहणारें ( उचट खाचर ) याच्या उलट ओंडण, खोल

कुरव(वं)डी--स्त्री कुरडई पहा 'तिया वाटिती कुरवं डिया। पर्पटसी।'-ऋ ८२

कुरवंडी--स्त्री १ ( काव्य ) ओवाळणी, आरती, माण साभोवतीं अथवा देवाभोवतीं दिवा वगैरे ओवाळतात ती, अरिष्ट नाहींसें होण्याकरिता तांदूळ, मीठ इ० नवरा नवरी याच्याभोवतीं ओवाळितात ती 'सर्पचि मद्दु साडिजे। कुरवडी करुनी '-ज्ञा ६ ३८१ 'कुरवडी त्यावरुन इंद्रपुरी टाकिली।'-वेसीस्व ७ ७० 'आवडला जीवा मना। करुनि कुरवंडि।'-रास १ ४५८ २ यावेळीं म्हणावयाचें गाणें ( क्रि करणें )

कुरवड्या-कुरोड्या--स्त्री ( क ) शेवग्यातून पाडलेले साडगे

कुरवा--स्त्री (नाविक) गलबताच्या पुढील खायास आतील बाजूस पालवीं लागणारीं ४ अशा आकाराचीं लाकडें

कुरवाळणें--उक्रि ममतेनें ल्हान मुलादिकाच्या अंगावर हात फिरविणें, गोंजारणें 'ऐकोनि सतोषिला अजनदन। कुर्वाळी वदन सौमित्राचें।' [ का कूरु=प्रेम करणें ] कुरवाळा-पु कुर वाळण्याची क्रिया 'नावेक केला कुरवाळा।'-कथा १ ८ ३५

कु(रु)रसी--स्त्री १ खुर्ची २ सांबाचें उथळें [ अर कुर्सी ]

कुरळ-ळित--वि वेगळलेले, वाकडे, मोकळे सुटलें असता ज्याचें वेटोळें होतें असें, सुशोभित ( केश ) 'भाळीं कुरळित केश रुळती।' [ स कुरल-कुरुर, का कुरुळु=केंस, केंसाची वाटोळी बट ]

कुर(रु)ळी--स्त्री १ दशा, धोतरजोडा, पचेजोडी याच्या मध्यें दोन भाग करण्याच्या ठिकाणीं किंवा लुगडें वगैरेमध्यें शवटीं पदराच्या ठिकाणीं आडवीं सुतें न भरता निव्वळ उभीं सुतें (ताणा) असतात ती जागा करळी पहा २ खिनगी, चेष्टा ( क्रि० करणें) चेतवणी (हत्ती, घोडे इ० ना त्याची शक्ति दाखविण्याकरितां ) ( क्रि० काढणें ) ३ एखादी गोष्ट छडा लावून शोधणें ( एखाद्या

माणसाच्या आयुष्यातील-त्यावर आरोप करण्यासाठी आधार म्हणून ) [स कुरल] ०फणेची-स्त्री कोंबीची एक जात

कुराईत—वि (ना) थोडें थोडें

कुराड—स्त्री (गो) कुऱ्हाड

कुराडें—न सायक, शस्त्र, अस्त्र कुहाड-डा पहा कुऱ्हाड 'भजुर्नी योजिलें कुराडें । मग्नातुरय तेजस्त्री ।' -मुआदि ३२ २० [कुऱ्हाड]

कुराण-न—न मुसलमानांचा प्रख्यात धर्मग्रंथ [अर अल्कुर्आन्]

कुरापत—स्त्री १ कुस दोष, व्यंग, खोडी, कुचेष्टा, कुरापती, २ जखमेवर टोचणें (क्रि० करणें) ३ भांडण उकरून काढ ण्याला काढलेलें निमित्त, कळ काढणें (क्रि० काढणें, करणें) म्ह० वाकडी वात, कुराडी कुरापत [स कु+आपत्ति?]

कुरापती—वि कुरापत काढणारा, दोष उकरून काढणारा

कुरी—स्त्री १ उपद्रवकारक, त्रास देणारें भूत, रोग इ० चा उपद्रव न व्हावा म्हणून अमुक एका वेळीं अमुक एक उपाय करावा असे जे नियम ठरविलेले असतात ते, तो उपाय कर ण्याची वेळ, त्यावेळीं यावयाचा बळी, त्या वेळची क्रिया 'भुताला कुरीवर बसविलें ' 'भुताची कुरी चुकली म्हणून उप द्रव होतो ' २ (सामान्यत) ठराविक वेळ 'कुरीवर दाणा दिल्हा असता घोडा चांगला रहातो ' ३ एक झाड ४ पाभर, धान्य पेरण्याचें यंत्र (चाडें व नळ्याविरहित), कुरगी ५ अर्धा बिघा (जमीन मोजण्याचें माप) ६ दलदलींत राहणारा एक पक्षी [का कुरी=मेंढी] कुरीचें भात-न (क) कुरीनें पेरून आलेलें भात

कुरीति—स्त्री वाईट वर्तन, वाईट तऱ्हा, रस्ता, मार्ग, दुरा चार, दुर्वर्तन [स]

कुरु—पु एक देश

कुरुंग—पु डोळ्याच्या कोंपऱ्यात असणारा तांबडेपणा, हें निर्धनतेचें एक लक्षण समजलें जातें कुरुद, कुरूम पहा

कुरुचीमुरुची—क्रिवि १ पर्यायानें, ढोकळ मानानें, आड मार्गानें, अव्याप अडपझडप, अवातर रीतीनें (मिळविणें संपा दन करणें) २ काटकसरीनें, बेतावेतानें (खर्चणें) ३ हळू हळू थोडें फार (पोट दुखणें, ताप येणें) [ध्व]

कुरुंज—पु (गो) जनावराच्या पोटातील रोग

कुरुठा—१ कुरुग-ठा २ अर्थ २ पहा 'याचा पहिला कुरुठा इंद्रियें । -ज्ञा ३ २६८,४ १६६ -वि २ शहाणा 'जो कां तुम्ही शिक्षापिला। विद्या देऊनि कुरुठा केला।' -ज्ञा १ ६५

कुरुद—पु १ एक प्रकारचा तांबूस रंगाचा, जातें, निसणा यांच्या उपयोगी पडणारा दगड हा हिंदुस्थानात फार सापडतो हें हिऱ्याच्या खालोखाल कठिण द्रव्य आहे शुद्ध कुरुद अल्युमिना मातीचा बनलेला असून त्यांत चुना व शिरता यांचे अंश अस तात माणीक, नीळ हीं प्रसिद्ध रत्नें कुरुदाचीं आहेत २ डोळ्याच्या पांढऱ्या भागावरील तांबडा ठिपका कुरुंग पहा -न एक प्रकारचें गवत [स कुरुविंद, का कुरुद कल्ले, इं कोरंडम्] ०कुरुंदी-वि कुरुंद दगडाचा

कुरुंदी—स्त्री एक्दान कोयती कुरुदी पहा

कुरुपणें—अक्रि करपणें, क्षीणणें, वाढणें, चढणें 'मग योसळोनि दर्पे। कामादी पित्त कुरुपे।' -ज्ञा १६ ३९४

कुरुक्षेत्र—न भारतीय युद्धाचें रणक्षेत्र येथें कौरवपांड वांचें महायुद्ध झालें [स]

कुरुळ—वि कुरळ पहा [का कुरुळु=केंस, केंसाची वर्तुळा कारवट]

कुरू—पु राग, घुस्सा (क्रि० येणें)

कुरू—स्त्री (गो) खुण [का कुरुपु=चिन्ह, खुण]

कुरूप—पु व्यंग असलेला चेहरा -वि नकटेपणा, व्यंग इ० दोषांमुळें वाईट दिसणारें माणसाचें रूप, चर्या, विरूप, वाव ळटपणा [स कु+रूप]

कुरूप—नपु खडा अगर कांटा टोंचून (हाता-पायाला) आंत झालेलें क्षत, घर, भोंवरी, व यासारखें कठिण आवाळू [का कुरुव-कु=गळू जखम, क्षत]

कुरूम—पु डोळ्याच्या पांढऱ्या भागावर येणारें मांस कुरुंग पहा -न जहाजाच्या नांगराचा दोर सासळदड कुरूप १ पहा

कुरूळ—कुरळ पहा

कुर्रे—क्रिवि (काव्य) निश्चयानें -शर (शुभानंद उद्योग ५ १४)

कुर्रो(र्रों)डी—स्त्री कुरवडी पहा 'साकरेची बीजें कुर्रोडी।' -शिशु १८ 'केंगी स्वर्गसंसाराची कुर्रोंडी।' -ज्ञा ६ २८.

कुर्की—स्त्री (गो) एक जातीची मासळी

कुर्कुट—पु कोंबडा 'काक कुर्कुट जंबुक मार्जार।' -दा ८ ७ २६ [स कुक्कुट]

कुर्फूर—न (गो) कोनाडा, ल्हान कनेल

कुर्गुदली—स्त्री (गो) अंगाची कवळी (?)

कुर्टे-ठें—कुरठा-ठा अर्थ २ पहा 'कठीण कर्कश कुर्टें साडावे।' -दा १४ ४ १ [का कुरुडु=ठेंगु]

कुर्टेल—वि (व) खुरटलेला, खुजा 'पोरगा जरा कुर्टेला दिसतो '

कुर्डें—कुरड अर्थ २ पहा ०वाळ्या-पुअव वायकांच्या कानातील एक दागिना 'कुर्डेंवाळ्या मडवीवाळ्या चाडे छवी दार।' -अफला ५५

**कुर्ईकटारना**—पु एक प्रकारचा मासा
**कुर्ईकापु**—पु (कु) घुबड
**कुर्ती**—स्त्री (कों) माशाची एक जात, हे मासे आश्विन-कार्तिकात पकडतात
**कुर्दे**—वि क्रुद्ध (अप) रागावलेला, क्रोधाविष्ट 'त्रिंबक राव कुर्देसन झाला।' -ऐपो ८८
**कु(र्नि)र्नीस सा-सात-सी**—कुरनिसात पहा 'त्याला कुर्निसात करायला सांग' -स्वप १३९
**कुर्पण**—कुरपण पहा
**कुर्वाण-णी**—कुरवाण-न पहा
**कुर्मा-में**—पुन (चि) वारीक ताप, जीर्ण ज्वर ०**करी**-वि तापकरी, रोगी
**कुऱ्यात**—न (कों) घराच्या भोंवतालचें परडें (पेरलेलें)
**कुर्र**—उद्गा गोट्याच्या खेळातील एक शब्द कुरगोट्या पहा
**कुर्रजांवचें**—क्रि (गो) राग यणें
**कुर्रा**—पु १ अभिमान, ताठा, तोरा, अकड २ मत्सर, द्वेष, चुरस, कुन्हा (क्रि० धरणें, ठेवणें) **कुर्रेदार-बाज**-वि १ नखरेबाज, अकडबाज, बुद्धिमान, हुषार 'मनुष्य कुर्रेबाज, हा येथें असल्यास मारवाडचे सरदार लगामी लावील' -ओरा १०.२ सोंगट्या खेळणारा [अर कुर्आ=फैज+फा बाझ]
**कुर्ली**—कुरली पहा [स कुलीरक]
**कुर्वी-वें**—पुन (चि) काटकोणाजवळ विशाल कोन कर णाऱ्या आकाराचें लाकूड (उभा खांब डळमळूं नये म्हणून बसव तात)
**कुऱ्हय**—स्त्री (गो) टपाल
**कुऱ्हा(ऱ्हे)**—वि. (काव्य) कुबडा, वाकडा 'आणि आपुली माय। कुब्ज जरी आहे। तरी जीवें ते नाहे। स्नेह कुऱ्हें कीं।' -ज्ञा १८९२७ 'पांगुळ कुऱ्हें आणी पावडे।' -दा ३६४१ [तुल कुब्ज स कुब्ज]
**कुऱ्हा-बाज-दार**—कुर्रा पहा
**कुऱ्हाड-डा-डी-डें**—स्त्री १ लाकडें फोडण्याचें एक लोखंडी हत्यार परशु, परशु २ कुऱ्हाडीच्या आकाराचा बाणातील एक प्रकार 'अग्निमुखबाण सोडी कुऱ्हाड।' -जै ४३२७ [स कुठार=कुऱ्हाड, का कोडली, गु कुहाडो-डी] (वाप्र)-**डीचा घाव खोड्याचें कपाळीं**-जो दुसऱ्याचें वाईट करतो त्याचें वाईट होतें दुसऱ्याकरिता तयार केलेल्या खड्यात स्वत च पडणें **आकाशाची कुऱ्हाड**-महत्संकट, दैवी आपत्ति (क्रि० कोसळणें) ०**पाजविणें**-कुऱ्हाडीला धार लावणें म्ह० १ आकाशाची कुऱ्हाड कोल्ह्याचे दातावर=एखाद्या चांगल्या माणसावर संकट कोसळणें २ कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ =कुऱ्हाडीचा दांडा लाकडाचाच असतो व कुऱ्हाडीनेंच लाकडें तोडलीं जातात यावरून सामाशब्द- -**डी शिळा**-पु चापट व लांब लोखंडी शिळा दीड इंचापासून एक फुटापर्यंत असतो. -**डी दांडा**-पु शत्रूस मिळून स्वजनाचें वाईट करणारा, विश्वास घातकी, देशद्रोही -**डी जमीन**-स्त्री १ कुऱ्हाडीनें साफसूफ केलेली जमीन (शेतीची) २ साफसूफ करण्यापूर्वीची, मुळखुंडें व झुडखें असलेली शेतजमीन **कुऱ्हाड्या लगाम**-पु कुऱ्हा डीच्या आकाराचे दाते असलेला उच लगाम (हा माजलेल्या घोड्याला घालतात)
**कुऱ्हाडा**—पु चापाचीं मळसूत्रें उकलावयाचें हत्यार, चावी (इ स्क्रू ड्रायव्हर)
**कुल**—वि १ सर्व, साग्र 'कुल वजिराला खबर दिली।' -ऐपो १० [अर कुल्ल] समासात कुलजमा-खर्च-वसूल-इनाम-कानू-बाब शिवाय काहीं समास पुढील दिले आहेत ०**अक(ख)त्यार**-पु सर्व सत्ता 'फौजेमध्यें कुलअकत्यार' -ऐपो १०६ [अ कुल्ल्+अखतियार] ०**अख़त्यारी**-पु १ सर्वाधिकारी २ -वि सर्व सत्ता असलेला ०**अधिकार**-पु सर्व सत्ता 'पाटलाना गावापुरते मुलकी, दिवाणी, फौजदारी वगैरे कुल अधिकार असतात' -यागा ४६ ०**कारभारी**-पु सर्वाधिकारी ०**कुल्ला-कल्ला**-पु सर्वाधिकारी, पूर्ण अधिकार दिलेला मनुष्य, अनियंत्रित अधिकाराचा प्रधान, घरातील मुख्य कारभारी, खासगी कारभारी 'कुलकल्ला त्रिंबकजी डेंगुळ अगदिं राहिले दिड वोट।' -अफला ४१ [अर कुल्कुल्लान] ०**बाब-कानु**-सर्व कर आणि पट्या आणि बाजाराचे सर्व हक्क घेण्याचा अधि कार (अथवा सर्व बाबी आणि सर्व कायदेकानू व रिवाज) दिले आहेत अशा अर्थाचा (इनामदाराच्या) सनदेंत आणि सरकारी कागदपत्रांत येणारा शब्द ०**मुखत्यारपत्र**-न (कायदा) एखा द्यानें स्वत च्या सर्व हक्काबाबत अमलबजावणीचीं कामें कोर्टात व इतरत्र करण्याकरिता दिलेलें अधिकारपत्र, (इ) पॉवर ऑफ ॲटर्नी
**कुल**—न १ वंश, गोत्र, जाति, कुटुंब, पुत्रपौत्रादि वंश परंपरा 'शुद्ध करीत दोहीं कुळां। जेवीं प्रवाह गंगाजळा।' -एरुस्व १४२५ २ सजातीय समुदाय, थवा, कळप ३ किनारा, थडी, तट [स] सामाशब्द- ०**कज्जल**-पु आपल्या कुटुंबास काळोखी फासणारा मनुष्य [स] ०**कंटक**-वि आपल्या कुटुंबास पीडा देणारा [स] ०**कलंक**-पु १ कुलकज्जल २ आपल्या कुलावरील लांछन, डाग [स] ०**कुठार**-वि आपल्या कुटुंबाचा नाशकर्ता [स] ०**क्रम**-पु कुलाचार, कुटुंबातील रूढी, वंशपरंपरा 'एव मीचि कुलक्रमु। शब्दब्रह्माचा।' -ज्ञा ९२७७ [स] ०**गुरु**-पु कुलपरंपरेचा उपाध्याय कुलोपाध्याय [स] ०**घातक-घ्न**-वि आपल्या कुलाचा नाश करणारा [स] **कुलज** वि चांगल्या कुळात जन्मलेला, मोठ्या कुळातील,

अभिजात, कुलीन [स] ०तारक-वि कुळाचा उद्धार करणारा [स] ०तारण-वि कुळाचा उद्धार करणारा [स] ०तिलक-वि स्वत ज्या कुळाला भूषणभूत असा [स] ०दीपक-दिवा-पु स्वत ज्या कुळाला भूषणभूत माणूस कुळास मान्यता, कीर्ति, मिळविणारा माणूस 'जो यादवकुळीचा कुळदिवा।' -ज्ञा ८ २५० [स] ०देवता-दैवत दैवत्य स्त्रीन पूर्वज कुलपरंपरेनें ज्या देवाची देवीची पूजा करीत आले ती देवता, कुळस्वामिनी, कुळस्वामी [स] ०धर्म-पु कुळात पूर्वीपासून चालत आलेले ठराविक दिवशीं ठराविक प्रकारचे धार्मिक विधी, आचार [स] ०ध्वंस-पु कुळाचा नाश करणें अथवा नाश, वाताहात, धूळधाण [स] ०नारी-पु कुलीन स्त्री, कुलांगना, कुलवधू उत्तम कुळात उत्पन्न होऊन तदनुरूप सदाचारादि गुणसंपन्न असलेली स्त्री [स] ०नाश-पु निसवलेला किंवा धर्मबाह्य मुलगा [स] ०पति-पु १ कुळाचा मुख्य २ विश्वविद्यालयाचा मुख्याधिकारी (इ चॅन्सेलर) 'विद्यापिठाचे कुलपतीहि हीच भाषा वापरतात' -केले १ ३३९ [स] ०परंपरा-स्त्री बाप, आजा, पणजा किंवा पुत्र, नातू पणतू इत्यादिरूप वंशपरंपरा, वंशावळ, पिढी [स] ०परंपरागत परंपरायात-वि पूर्वजापासून किंवा वडिलांपासून आलेलें, पिढीजात, वंशपरंपरा [स] ०परिपाठी-टी-स्त्री कुलपरंपरागत आचार, चाल [स] ०पर्वत-पुअव कुलाचल व सप्तपर्वत पहा [स] ०पालक-वि कुलाचें संरक्षण करणारा, कुळातील कर्ता पुरुष [स] ०पुरुष-पु पूर्वज कुळातील एक पुरुष ज्याच्या कुळात जो उत्पन्न झाला तो त्याचा [स] ०भूषण-मंडण-न कुलतिलक पहा [स] ०मर्यादा-स्त्री कुलाचा संप्रदाय शिष्टाचार, मान घराण्याच्या अब्रूचें रक्षण [स] ०रीत-रीति-स्त्री कुलाचार, कुलीन घराण्यातील आचारविचार, रीतभात 'दु ख परासि न द्यावें सत्य वदावें क्षमा न सोडावी। जोडावी कीर्ति असी कुळरीति तुम्ही कधीं न मोडावी।' -मोउद्योग ८ ६ [स] ०वधू स्त्री-स्त्री १ कुलनारी पहा २ चांगल्या गुणांनीं आपल्या कुळास भूषणभूत झालेली स्त्री 'दिनत्रय सत्य जाण। होईन तुमची कुलस्त्री।' -गुच ३३ ६९ [स] ०ज्ञान-वत-वि कुलज्ञ पहा [स] ०वृद्ध-पु कुळाचा स्थापक, मूळपुरुष [स] ०संप्रदाय-पु कुलपरंपरागत आचारविचार, रिवाज, संप्रदाय [स] ०स्वामी-स्वामिनी-पुस्त्री १ कुलदेवता पहा २ कुलगुरु [स] ०हत्या-स्त्री कुलध्वंस पहा [स] ०हीन वि हलक्या कुळात उत्पन्न झालेला, हीनकुळी, कमजात कमअस्सल [स] ०हीनसेवा-स्त्री हलक्या कुळांत जन्मलेल्याची चाकरी, कुग्रामवास, कुभोजन, क्रोधमुखी भार्या यांपैकीं ४ थी स्थिति [स] ०क्षय-पु सर्व कुळाचा नाश, वंशनिर्मूलन [स]

कुलक—न एकान्वयी जे अनेक श्लोक असतात त्यांचा समुदाय, एकच अर्थ पूर्णपणें व्यक्त करणाऱ्या चारापेक्षा अधिक श्लोकाचा समूह, गट कालापाक, युग्म, विशेषक पहा [स]

कुलकर्णी—पु गावच्या सरकारी वसुलाचा हिशोब ठेवणारा (शेतसारा व इतर बाबी याचा), शिवाय इतर सरकारी कामाचें दप्तर याचेजवळ असतें हा पाटलाच्या हाताखालीं काम करतो याच्या हिशोबात एकंदर गावच्या जमिनीच्या क्षेत्रफळाची नोंद असते कामाबद्दल यास इनामें असत प्राचीन ग्रामसंस्थेतील एक अधिकारी, हा बहुधा ब्राह्मण असे म्ह० सोनार शिंपी कुलकर्णी आप्पा यांची संगत नको रे बाप्पा [स कुल=गाव+करणिक]

कुलकुल-लाट—स्त्रीपु कलकलाट, गोंगाट (शाळेतील खेळण्यातील, भांडणातील, मुलांचा, पक्ष्यांची चिवचिव, किलबिल, चीलचिल, कावळ्यांची किरकिर, काव काव [ध्व] ०कुलकुलणें-अक्रि १ कलकलाट करणें (पक्ष्यांनीं किंवा मुलांनीं) २ आनंदानें बेहोष होणें [ध्व]

कुलकुलो—पु (गो) हिवताप

कुलकुली—स्त्री १ घोडा किंवा घोडी यांना परस्परांबद्दल होणारी तीव्र कामेच्छा, माज २ -अव आनंदातिशय (क्रि० येणें, होणें)

कुलग—पु लिंगायत लोकांमधील एक आश्रम व त्या आश्रमातील व्यक्ति -नामको

कुल(ला)गडें—न १ भानगड, घोंटाळा, अडचण, कचाट, लचांड (क्रि० घेणें, करून घेणें) २ कुटिल कारस्थान, हिकमत ३ (वों) (यंत्रातील) चतुराईची व भानगडीची योजना, (मसलन किंवा बेत यामधील) चातुर्य किंवा शहाणपणाची योजना, युक्ति (क्रि० करणें)

कुल(लु)गा-गों—वि १ लहान आणि गुबगुबीत (कुत्रें, घोडा) २ ठेंगणा व मजबूत बांधेसूद अंगाचा (माणूस). [फा कुल्ग=एक मोठें कोंबडें, करकोचा, ससाणा] ०कुत्रें-न लहान व केसाळ कुत्रं

कुलच-ज कुलुंच—वि दुडकत चालणारा, रेंगाळणारा, धीरेधीरे चालणारा (घोडा) चालताना ज्याचे मागील पाय एकमेकांस घासतात व त्यामुळें स्वारी करण्यास नाईद असा (घोडा) -अश्वप १ १०३

कुलचा—पु एक प्रकारची रोटी 'शीरमाल, खमीरी, कुलचा वगैरे नावाचे रोट्यांचे प्रकार असतात' -गृशि २ १९ [फा]

कुलच्या—पु एक प्रकारचा मासा -प्राणिमो ८१

कुलज—न एक प्रकारचें धान्य

कुलंजन—पु कोळंजन पहा

कुलटा—स्त्री व्यभिचारिणी स्त्री [स]

कुलडा-ल्डा—पु (हिं काशी) मातीचें पात्र, पेला, यात बाजारात पेय पदार्थ घालून विकतात, पाणी पिण्याचें मातीचें भांडें

कुलथा—पु (व) कुळीथ, हुलगे [स कुलित्थ]

कुलपणें—अक्रि लगडणें, लगडत चालणें

कुलपाद—वि (गो) जायबंदी, जखमी

कुलपी-ल्पी-ल्फी—वि बदिस्त, कुळ कललें (मळसूत्र इ०) [कुलुप] —स्त्री तसराळ्यासारखें चिनी मातीचें एक भांडें 'कुल्फ्या झाकणीसुद्धा' –रा २३ १११ ०गोळा-पु (ल्करी) बाँब, दारू, खिळे चाकूचीं पातीं इ० पोटात घातलेला तोफेचा स्फोटक गोळा. ०चुडा-पु खिळीची बांगडी 'हातामधि घाल करकरीत कुल्पी चुडे।' –पला ७८ ०विडा-पु सुपारी, वेलदोडे इ० सामान घातलेला, केळीच्या पानात गुडाळलेला व चोयीनें टाचलेला १०।१२ विडयाच्या पानाचा, समारंभात आलेल्या पाहुण्याना देण्यासाठीं तयार केलेला विडा 'नेउन द्या तयासी कुल्पी विडे।' –प्रला २१७

कुलफा—स्त्री (माळवी) घोळाची भाजी

कुलवणें—सक्रि (क) कोलवणें, उडविणें, भिरकावणें (विटी)

कुलक्षण—न अशुभदायक चिन्ह, स्वरूप, खोड, खुण, व्यंग कुलक्षणी-वि अशुभकारक, अनिष्टसूचक चिन्हानीं, लक्षणानीं युक्त, अवलक्षणी [स कु+लक्षण]

कुला-ल्ला—पु नितंब, टिरी, टुंगण (ग्राम्य) कुला बाहेर पडणें-गुदभ्रंश (अंगेर) होणें, अंग बाहेर पडणें कुल्ले थोपटणें-आनदानें टिऱ्या बडविणें कुल्ल्याला पाय लावणें-पळून जाणें, सु बाल्या करणें कुल्ल्याचा कुल्ला येणें-लठ्ठ होणें मातीचे कुल्ले लावल्यानें कोठें लागतात ?–निसर्गदत्त वस्तूप्रमाणें कृत्रिम वस्तु टिकत नाहीं या अर्थी म्ह० रिकामा सुनार कुल्ले तासी-

कुला(ळा)गना—स्त्री १ कुलीन स्त्री २ आपल्या उत्तम गुणानीं कुलाला भूषविणारी स्त्री 'माकडाच्या गळा रत्न कुळांगना।' –तुगा ३१२२ [स कुल+अंगना]

कुला(ळा)गर—न (गो) पोफळीची बाग [स कुल+आकर]

कुलागार—पु एककलह पेटवून किंवा घराची अब्रू गमावणारीं कृत्यें करून कुळास डाग लावणारा पुरुष, कुळबुडव्या माणूस [स कुल+अगार]

कुलाचल—पु पुराणप्रसिद्ध सात पर्वत सप्तपर्वत पहा [स कुल+अचल]

कुलाचार—पु कुळातील पूर्वापार चालत आलेल्या रूढ चालिरीती, आचारविचार [स कुल+आचार]

कुलाचारी —वि कुलाचार पाळणारा 'कुलाचारी तुजविण हरी कवि सरती।' –[सं]

कुलाचार्य—पु कुलोपाध्याय, कुलगुरु पहा [स कुल+आचार्य]

कुलाप—न. (कु) कुलुप पहा

कुलाव—पु टोपी, आच्छादन, 'टोपीस हिरा मोतीं मानी काचे कुलाव घालोन' –इमं [अर कुलाव्=समाण्याची टोपी, फेटयातील टोपी]

कुलावा-पा—पु १ बिजागरीप्रमाणें उपयोगी पडणारी कडी २ समुद्रात गेलेली जमिनीची दांडी, चिरटी, भूशिर (अशी दांडी मुबईस व आंग्र्याच्या कुलावा किल्ल्याच्या जागीं आहे) ३ लोंबणारी कडी, हलगी (पाळण्याची) ४ करवतीची वाकडी लाकडी पकड, मूठ [अर कुलाऽ=माकडा] कुलावी-वि आंग्र्याच्या कुलाब्यासबधीं (रुपया वगैरे) कुलावेदार-वि दस्ती, हातात धरण्याजोगी कडी वगैरे असलेलें, 'वरती झाकणी कुलावेदार कुल्पी मत्न्यूत' –रा २२ ३५ [अर कुलाव=पकड]

कुलाभिमान—पु चांगल्या कुलात जन्म झाल्याबद्दलचा अभिमान, कुळाचा अभिमान [स कुल+अभिमान]

कुलाभिमानी—वि कुलाभिमान असणारा [स]

कुलायिका—स्त्री पक्षिशाळा [स]

कुलाल, कुल्लाळ—पु कुंभार 'परि ते कुलालमतिचे गर्भ। उमटले कीं।' –ज्ञा ९ ७४ [स कुलाल]

कुलावतंस—पु कुळाचें, जातीचें भूषण, अलंकार [स कुल+अवतंस]

कुलास—पु (गो) कलमी आंब्याची एक लावट जात

कुलिंजन—न कोळंजन पहा

कुलित्थ—पु कुळीथ, हुलगे, द्विदल धान्यातील हें गरीब लोकाचें धान्य आहे याच्या वेलाची उंची एक हात, पानें काहींशीं उडदाच्या पानासारखीं, शेंग वाकलेली व चपटी, बीचा रंग तांबूस असतो काळ्या व पांढऱ्या रंगाचेहि कुळीथ असतात याचें उक्डून काढ तयार करतात –वगु २ ५२ [स]

कुलियात—क्रिवि तमाम, सर्व, सर्वथा 'दोही दौलती कलियात तुम्ही आम्ही मिळून सांभाळावी' –रा ५.२३ [अर कुल्लियात्]

कुलिवेल—स्त्री एक झुडुप

कुलिश—न वज्र कुलिश होई इद्राचें' –जे ३९ ६४ [स]

कुली—पु मजूर, बिगारी, हमाल, गुलाम [इ, ता कुलि=मजूर]

कुली-ल्ली—क्रिवि कुल, तमाम, सारस्त्रीं 'कुली वजीर मुत्तेद करून उभे कले –चिग्रगुम ६५ [अर कुलि]

कुलीटान—न एक प्रकारचें कापड -मुव्या १२३
कुलीन-ळीण—वि चांगल्या कुळांतील, खानदानीचा, श्रेष्ठ कुळांत जन्मलेला व तदनुरूप सत्क्रिया आचरणारा [स कुल-कुलीन]
कुलुकलू—अक्रि (गो) मोठ्यानें ओरडणें [ध्व]
कुलुंगा—अक्रि कुरंगा पहा
कुलुज—पु कुल्प पहा
कुलुञ्जी—न कायाचें थीं -मुव्या १०९
कुलुली, कुलोली—स्त्री १ कुलकुली पहा 'अस व कुलील आलेल्या येडकावानी काय करतायसा ?'-तोथ ९३ २ खाज, आवेग ३ आरडाओरडा, आरोळया मारणें ४ बोंब मारणें, ओरडणें ५ कोल्ह्याची हुकी, कुई (क्रि० टोकणें, करणें) [स कल्लोल]
कुलुलु—क्रिवि कुत्र्याला 'यू यू' म्हणून बोलाविण्याचा शब्द [ध्व]
कुलूप-फ—न ताळें, टाळें, दरवाजा किंवा पेटी इ० बंद करण्याचें साधन 'कपाडकुलुफाचें वरू वचन।'-दावि १४३ [अर कुफ्ल]
कुलेत—स्त्री (गो) घडी, जाकीट
कुलो—पु १ कुगण, कुल्ला २ कुलो हाक [स]
कुलोच्छेद—पु १ कुलघ्न पहा २ तळपट, सत्यनाश [स]
कुलोद्धार—पु कुळाचें रक्षण, तारण -वि कुळाचा किंवा जातीचा उद्धार करणारा [स कुल+उद्धार]
कुलोपाध्याय—पु कुलगुरु पहा [स]
कुल्कुल्ला—पु कुल (सर्व, साप्र) मध्यें पहा
कुल्डई—स्त्री (खा) कुरडई पहा (खाण्याची)
कुल्फी-गोळा—कुल्पी व त्याच्या पोटांतील शब्द पहा
कुल्या—स्त्री नदीचा पाट, कालवा, शेतीकरितां काढलेला पाट, नाला, चर समासांत-घृतकुल्या, मधुकुल्या, क्षीरकुल्या, तक्रकुल्या (खादाड लोकांच्या भाषणांत) [स]
कुल्लस—वि कुल्च-ज पहा
कुल्ला—पु उभी टोपी, फेट्याच्या आंत घालतात ती जरीची टोपी [अर कुल्ह=डोकें, कुलाह्=टोप]
कुल्ला-ल्हा-ल्लाणा-ल्हाणा—पु कुला पहा
कुल्लाल-ळ—पु कुलाल पहा 'कुल्लालाच्या हातें घगाच्या उत्पत्ति।'-तुगा २०१२
कुल्ली—कुली-ल्ली पहा
कुल्ली—पु (गो) खेकडा [स कुलीरक]
कुल्हडा—पु मातीचें लहान पात्र कुलडा पहा
कुल्हा(लाह)पोश—पु टोपीवाला, इंग्रेज 'तरी आम्ही आपले दोस्तीवर नजर देऊन कुल्हापोशाची तर्वीचे कामावर नमूद जालों असो'-रा १०.१८२ [फा कुलाहपोश]
कुवत—स्त्री सामर्थ्य, शक्ति, बळ, जोर 'हुजुरात वगैरे असतां त्याची काय कुवत आहे ?'-ख १३१ [अर कुव्वत]
कुवती—स्त्री (गो) हिरव्या रंगाचा लहान मासा
कुंवया—पु (कु) नारळाचें सोडणें येचताना खालीं पड णारा भुगा
कुंवर—पु १ पांच वर्षांखालील मुलगा २ (हिं) युवराज, राजपुत्र ३ दासीपुत्र -शर [स कुमार]
कुंव(वा)रकांडें—न (वों) कटिकुवर, कोरफड [स कुमारिका]
कुंवरा-री—पुस्त्री (राजा, कु) कोंवळा फणस कुवरा-री पहा
कुवरें—न (वों) एक जातीचा मासा
कुंवला—पु १ (राजा) कुयलीचा वेल व तिची शेंग २ लहान मुलाच्या गळ्यांतील सोन्याचा एक दागिना ३ कुवरा-री पहा
कुंवली—स्त्री १ (राजा) खाजकुयलीचा वेल व त्याची शेंग, हिच्या खाजरी व गोडी अशा दोन जाती आहेत २ आंब्याची कैरी कुइरी पहा
कुवला—पु (गो) कोंवळा फणस कुवरा-री पहा
कु(कुं)व(वा)सा—पु आश्रय 'अर्जुन मैत्रियेचा कुवासा।' -ज्ञा ६ १२५ [स कु+वस्=राहणें]
कुंवळ—पु १ (राजा) कोळ, चिंचा भात वगैरे कुसकरून तयार केलेलें पाणी, मिश्रण २ सरबरीत ताकभात ३ (कु) साधी आमटी ४ (गो) ओली चटणी ५ दोष, व्यंग, न्यून (क्रि० काढणें) [कुवळणें]
कुवळणें—सक्रि (राजा) चिंचा, भात, गूळ वगैरे पाण्यांत कुसकरून एकजीव करणें, कोळणें, गुरगुट करणें
कुवळा—पु कांटेकुवळा नावाचें एक झाड
कुवळायचें—क्रि (गो) मऊ करणें, पिकविणें
कुवा—पु (हिं) विहीर, आड [स कूप, कूपक, प्रा कुवओ, ध कुया, सिं खुहु, प खुह्, कुआं, काश्मी खुह्, ने कुवा]
कुवा—पु (वों) पाण्यांत कुजलेला झाडाचा पाला [सं कुथ्=कुजणें]
कुवा-वों—१ (गो) नागिणीचें झाड, लांकूड, हें कठिण व सरळ असतें म्हणून याचा तारवाच्या डोलकाठीकडे उपयोग करतात याचीं फळें नागाच्या फणीसारखीं तांबडीं लाल असतात -वगु २ ४२ पुननेवा २ डोलकाठी

**कुंवाक-की-कु**—स्त्री (कु) पाणकोंबडी [स कृस्वाकु]

**कुवाकर**—स्त्री एक पक्षी [ध्व]

**कुवाड**—स्त्री (भि) कुऱ्हाड 'लाकडें रोंडता रोंडता तिया कुवाड पायाम् पोडी' =लाकडें तोडता तोडता त्याची कुऱ्हाड पाण्यात पडली —भि १५ [स कुठार]

**कुवाड-डें**—न १ कोडें, कूट प्रश्न 'बोलता वेदासि कुवाड।' —विपू २ ३९ हें अर्जुना सकळकुवाडें। ज्ञा ४ १४३ 'आपल्या कवित्वाचा कुवाडा।' —मुआदि १ ६९ 'अनुभव हें कुवाडें। उकलावें।' —दा ७ ४ ३७ २ कुवेडें, मन्त्रतन्त्र, चेट्रक —वि दुर्घट गूढ **कुवाडे पोवाडे**—पुअव चुगल्या, चाहाडया (क्रि० सांगणें)

**कुवाद**—पु उलटा अथवा निरर्थक वाद, घासाघीस, काक्षा, तकार (क्रि० धरणें, करणें, घेणें) [स कु+वाद]

**कुवादी**—वि वितंडवाद घालणारा

**कु(कु)वार**—वि दहा ते बारा वर्षांच्या खालचा अविवाहित 'तुला काहीं कुवार राहण्याचा प्रसंग येत नाहीं' —धनुर्भंग नाटिका ३१ [स कुमार]

**कुवारकांडें-फोड, कुंवारी**—नस्त्री कोरफड [स कुमारी]

**कुवारखांब**—पु (वे) आडें तोलून धरणारा उभा खांब, धारण

**कुवारसवाशीण**—स्त्री (कों) काहीं देवताच्या उद्देशानें कुमारिकेला जेवावयास बोलावून तिची पूजा इ० करून दक्षिणा देतात ती [स कुमारी+सुवासिनी]

**कुवारी-रीण**—स्त्री कुमारी, कुवार 'कुवारी करती विभाव। तोचि मनीं हर्ख होय।' —वसा १६ [स कुमारी]

**कुवासना**—स्त्री वाईट इच्छा, मनाची वाईट ओढ [स कु+वासना]

**कुवासा**—पु १ आश्रय कुवसा पहा 'तु माझा कुवासा।' —पच ३२ २ कैवारी 'परतो भक्तीचा कुवासा। भवग्राहिंच्या आशा। बाधतसे दिवसा। स्तुनी लागी।' —ज्ञाप्र ४८

**कुंचाळो-हाळो**—पु (कु गो) कोळ्या

**कुविद्या**—स्त्री वाईट विद्या, पिशाच्च्योपासना, जारण मारण, मन्त्रादि चेट्रक इ० बद्दलची विद्या [स कु+विद्या]

**कुवीट**—वि धुरट, वाईट कुईट पहा

**कुवें-व्यें**—न १ गुराच्या वागरास सडी म्हणून जो रोग होतो त्यावर उपाय म्हणून त्या-च्या तोंडावर डाग देतात तें (क्रि० काढणें) २ ज्यायारा सडविण्याची क्रिया कुपाल पहा [कुवें]

**कुवेकाठी**—स्त्री (नाविक) दालदाणी

**कुवेडें**—न १ दृष्टिदोषादि निरसनार्थ मन्त्रावाचून सांगितलेली इतर क्रिया, उपचार तोडगा, टाणाटोणा, चेट्रक यावरून २ वाकड्या मार्गानें काढलेली युक्ति, मसलत ३ कोडें, गूढ (क्रि० घालणें, उघडणें) [स कु+विद्या ?]

**कुवेळ**—पुस्त्री अशुभ काळ, अवेळ, अकाळ [स कु+वेला]

**कुश**—पुन होमहवन, यज्ञयाग श्राद्धकर्म वगैरेच्या कामीं उपयोगी पडणारे दर्भ [स]

**कुशब्द**—पु अशुभ किंवा अभद्र शब्द किंवा भाषण, शिवराळ किंवा निंदा करणारा शब्द [स कु+शब्द]

**कुशल**—वि १ सुखरूप, खुशाल, कल्याणकारक (रोग, दारिद्र्य वगैरे विरहित) २ बुद्धिवान चतुर, पटु, वाकबगार [स कुश=दर्भ+ला=कापणें, स कुश्=प्रकाशणें] ०**पट्टी**-स्त्री राजपुत्राच्या जन्मासारख्या प्रसंगीं पाटील वगैरे गावकामगारावर जी पट्टी बसविण्यात येते ती [कुशल+पट्टी=कर] ०**प्रश्न** पु वदन, अभिवादन, दोघे ओळखीचे भेटले असता, कसें काय ? अशा अर्थानें प्रश्न विचारावयाचे वेळीं उपयोग [स] ०**बुद्धि**-वि कुशल अर्थ २ पहा ०**क्षेम**-पु आरोग्य व सौख्य, खुशाली व सुख, आयुरारोग्य [स] —**लार्थ**-पु क्षेमसमाचार हा शब्द फक्त पत्रात येतो जसें—'स्वकीय कुशलार्थ लिहून पाठवावा' [कुशल+अर्थ=हकिगत].

**कुशल-ळ**—न क्षेम, कल्याण [स]

**कुशसार**—न दर्भोदक 'गोमूत्र गोमय क्षीर। दधि घृत कुशसार।' —गुच २८ ११७ [स]

**कुशस्थळी**—स्त्री द्वारका [स]

**कुशा-स**—पु १ (खा) नांगराचा लोखंडी फाळ २ खणावयाची चापट व लहान पहार, हिचा दांडा गोल असतो [कुश]

**कुशाग्रबुद्धि-मति**—स्त्री दर्भाग्राइतकी तीक्ष्ण बुद्धि, अत्यंत तीक्ष्ण बुद्धि, —वि तीक्ष्ण बुद्धीचा [स कुश+अग्र+बुद्धि]

**कुशाद**—वि १ विस्तीर्ण, प्रशस्त, मोकळें (स्थळ, जागा) 'रान मैदान जागा कुशाद पाहून' —खरे ४ १८४३ २ (ल) स्वच्छ व मोकळें (लिखाण) [फा कुशाद]

**कुशान**—न (व) आउतास चिकटणारा काडीकचरा [स कुश्-कुषित+तृण]

**कुशावर्त**—पु एका कुशीवरील भोंवरा (घोड्याला), हें अशुभ लक्षण मानतात [स कुक्षि+आवर्त]

**कुशावर्त**—न गंगेच्या उगमाजवळचें एक तीर्थ [स. कुश+आवर्त]

**कुशासन**—न दर्भासन [स]

कुशिल्लॉ—वि. (गो.) कुजलेला. [सं. कुथ्=कुजणें, म कुसणें]

कुशी—स्त्री. कूस, शरीराची एक बाजु, पोट 'तरी आगुनी प्रतीती—। कुशी न निघे।' —ज्ञा १४.४०. 'जेहूनिजन्मली कुशी। तेहूनि आवडे रायासी।' —एरुस्व १ १६. [सं कुक्षि, प्रा. कुच्छि]

कुशीचा—वि वावग्या किंवा चोरट्या रीतीनें फायदा मिळणारा (धंदा)

कुश्चल-श्चीळ—वि. १ वाईट, खोटें, वेढग, गैरचाल, अपवित्र, मलिन 'तुका म्हणे कुचाळ मनीं। विटंबपणीं पडली तीं।' —तुगा ३३३४. २ कुत्सित, तिरस्काराहें; द्वेष्य, ओंगळ, घाणेरडें; चिळसवाणें, भ्रष्ट (माणूस, स्थळ, वस्तु) 'तुंदा या मतिमंदा त्यजुनी निंदा कुचळ धंदा हो।' —आप ३०. 'तरील खादाड आळशी। कुश्चीळ कुटीळ मानसीं।' —दा २.१.३१. [सं कु+चल्—चाल] ॰ठाय—पु (काव्य) वाईट, घाणेरडी, चिळस आणणारी जागा

कुश्किका—स्त्री. घोड्याचा एक अवयव, कुरांचा मध्यभाग —अश्वप १.६२ [सं]

कुष्ट-ष्ठ—न १ कोड, रक्तपिती, महारोग, पांढरें कोड. कोडाचे एकंदर १८ प्रकार आहेत. कोड उत्पन्न होण्यापूर्वी तेथील चामडें अतिशय गुळगुळीत किंवा खरखरीत होतें तेथें घाम फार येतो, किंवा मुळींच येत नाहीं चामडें बधिर होतें. तेथें मग व्रण होतात व उशिरां बरे होतात अपथ्यानें ते पुन्हा उद्भवतात रक्ताला काळसरपणा येतो —योर २ ३४०. हिरडा, करंजाची साल, मोहऱ्या, हळद, बावच्या, सैंदेलोण यांच्या चूर्णाच्या लेपानें कोड जातें —योर २ ३४७ २ कोष्ठरोगभंजन [सं कुष्ट]

कुष्ठाण—स्त्री कुजलेल्या, नासलेल्या पदार्थाची घाण, कुज कट वास [कुजट+घाण]

कुष्ठाळें—न (खा) कुलूप

कुष्ठी-ष्ठी—वि. १ रक्तपित्या, कोड झालेला, कोड्या २ घाणेरडें [कुष्ट]

कुष्टपिष्ट—नअव व्यंगें, दोष, उणीवा (क्रि॰ काढणें बोलणें, सांगणें) केव्हां केव्हां कुष्टपिष्ट असाहि एकवचनीं प्रयोग करतात

कुष्मांड—पु कोहळा [सं कूष्मांड] ॰नवमी—स्त्री कार्तिक शुद्ध नवमी या दिवशीं ब्राह्मणास दक्षिणेसहित कोहळ्याचें दान करतात

कुष्मांड—१ रचलेली गोष्ट, खोटा आरोप, कुरापत, कुभांड (फसविण्याकरितां, नाश करण्याकरितां) (क्रि॰ करणें, काढणें, उठवणें, योजणें, रचणें) 'सद्दयाचीं कुष्मांडें। उचलीतसे पाखांडें।' —सिद्धांतसंहिता ४ १६२ २ भूत किंवा पिशाच्च [कुभांड अप]

कुष्मांड्या—वि. खोटा आळ घेणारा, कुभांड्या.

कुस—वि. (गो.) थोडें, चिमूटभर. [कूस, सं. कुश]

कुसक—क्रि. (गो.) कुजणें.

कुसकट, कुसका—१ कुजकट, कुजका पहा. २ (हेट.) भुसा.

कुसकर-रा-पूर—पु (भाकरीचा) बारीक चुरा; बारीक चुरा करण्याची क्रिया (भाकर, गवरी वगैरे) [कुसकरणें]

कुसक(कु)रणें—सक्रि भुगा करणें, चुरणें, चेंदारणें, तुडविणें. (हातानें, पायानें-राप वस्तु), तुकडे करणें (फुलें वगैरेचे), ओरबडणें आणि चुरगळणें. 'नाना कुचेष्टा मजशीं करिती। उरीं कठोरीं दड कुसकरिती।' [सं कुश+कृ]

कुसकी साळ—स्त्री. (गो.) (ल) मचाळ माणूस

कुसकुरां—पु. (गो.) कचरा (लुगडें वगैरे वरील), [कुसर]

कुसकुशीत—वि. (गो.) जीर्ण.

कुसकूट—वि (गो.) अगदीं थोडा (पदार्थ वगैरे)

कुसक्या काष्टीचा कुणबी—पु उपहासानें, निंदेनें, तिरस्कारानें कुणब्यास म्हणतात.

कुसंग-ति—पुस्त्री. वाईट संगति, दुष्ट संगत, जिच्यामुळें अपकीर्ति, दुष्ट वासना उत्पन्न होते अशा लोकांचा सहवास [सं]

कुसगोम—वि कुशीवर गोम असणारा (घोडा). [कूस+गोम]

कुसट-टाण, कुसणें—कुजट-टाण, कुजणें पहा.

कुसडा-डो—वि १ (राजा.) कुजका, सडका २ (गो) तुसडा ॰घोणस—पु (कों.) घोणस, सापांतील एक जात, याच्या दंशानें झालेली जखम हळु हळु कुजत जाते.

कुसडॉ—वि एक प्रकारची मासळी

कुसडॉ-डो—स्त्री एक वेलीची जात, एक प्रकारची वनस्पति

कुसंतान—न ज्यामुळें अपकीर्ति किंवा दुःख प्राप्त होतें अशी संतति म्ह॰ कुसंतानापेक्षा निसंतान बरें ' [सं]

कुसघुणा-घुणा—पु (क.) शेवटचें अपत्य, ज्यामुळें कुक्षि धुतली जाते तो [सं कुक्षि+धू=धुणें]

कुसपट—न १ खुसपट, क्षुद्र दोष २ भांडणाचें मूळकारण ॰काढणें—क्रि दुसऱ्याच्या मनाला त्रास होणारी गोष्ट हुडकून काढणें

कुसंवा-वी—पुस्त्री कुसुंबा-बी पहा

कुसवांडी—वि दोन्हीं बगलेवर पांढरे ठिपके असलेली (म्हैस) [सं कुक्षि+पाडु]

कुसंबीरी—स्त्री धोशिबीर 'दोहीं विभागीं कुसबीरी पत्रशाके।' —ऋ ८३ [सं कुस्तुंबरी]

**कुसभोंवरा**—कुशावर्त अर्थ १ पहा

**कुसमडणें-कुसमरणें, कुसमारणें**—सक्रि कुसकरणें, दावणें, चुरडणें (फुलें, वस्त्र)

**कुसमी, कुचमी**—स्त्री (व) खिसगणती

**कुसमुस**—स्त्री १ धुसफूस, मुसमुस, कुरकुर, जळफळ 'ऐसा आनदच्यारी दिवस। सर्वेचि माडिली कुसमुस।'–दा ३ ४ २४ २ (काव्य) व्यर्थ श्रम, फुकट तळमळ, खवडव 'जेथें नाहीं समजावीस। तेथें अवघी कुसमुस।'–दा १८ ५ ६ 'विष याचा विसरू पडे। इद्रियाची कुसमुस मोडे।' [ध्व]

**कुसमुसणें**—अक्रि १ कुरकुर करणें, आतल्या आत जळफळणें २ फुदणें, हुदके देणें 'कळता धरण्यास कुसमुसिती।'–दावि १५० 'मुखासी लाविता निश्चित। कुसमुसती आतल्या आत।' [ध्व]

**कुसर-री**—नस्त्री १ कौशल्य 'नाना प्रमेयाची परी। निपुणपणें पाहता कुसरी।'–ज्ञा १ ८ 'नट नाटय कळा कुसरी।'–दा १ २ २१ २ कपट [स कुशल]

**कुसर-री**—स्त्री कस्तुरमोगरा, मधुमाधवी नावाची वेल हिचीं पानें मोठीं असून फुलें जाईच्या फुलापेक्षा मोठीं व पाढरीं असतात –वगु २ ३

**कुसर-सूर**—पु १ सूड (क्रि० काढणें) २ दश, डाव, द्वेष (क्रि० धरणें) [फा कुसूर] ०खोर-वि आकसखोर, सूड उगविणारा (माणूस)

**कुसरी**—स्त्री (कु) एक झाड

**कुसरी**—पु (कु) एक प्रकारचा मासा

**कुसरी**—स्त्री १ (काव्य) श्रेष्ठत्व, सुरेखपणा, सौंदर्य २ चतुर, शहाणी स्त्री, सुगरण ३ कुटिल स्त्री, चेटकी, जादुगारीण –वि १ कुशल २ कपटी 'तो महा दुष्ट दुराचारी। चतुर्भुज जाहला कुसरी।'–कथा २ २ ९८ ०चें काम-न नाजूक सुरेख, सुबक असें नक्षीचें काम

**कुसरोण-कुसरूड, कुसिरडा**—स्त्रीपु (वैद्यक) मुरूम, पुळा 'कुसरूड हे कोदावासी होण्यापूर्वी आपली बाल्यत्वाचा सात घेळ टाकितात'–मराठी शहाणें पुस्तक पृ २५२ (१८७१) [स कुश, म कूस=तीक्ष्ण टोक]

**कुसरुडणें**—अक्रि सुरवटाचे केंस अगास लागल्यानें अगाची आग होणें, विकृति होणें [कुसरूड]

**कुसली**—स्त्री (व) तिफणीच्या दांड्यास लाविलेलें मध्यें भोंक असलेलें, लोखडी अणकुचीदार पातें, शेतकी हत्यार [सं कुश+ल]

**कुसवळ**—न अतिशय पावसानें पिका जमिनीतील ओलीनें झालेला पिकांचा नाश (क्रि० पडणें) [कुसणें]

**कुसवळ**—स्त्री (वे) कुसें असलेलें एक प्रकारचें गवत, कुसळी गवत [कूस]

**कुसवा-सावा**—पु गर्भाशय, कूस (मातेची) मूल चागलें किंवा वाईट निपजलें असता मुलाच्या आईच्या सबधानें वापरतात उदा० इचा कुसवा चागला, तिचा कुसवा वाईट, मुलें जगत नाहींत 'महाराष्ट्रमूनें ज्या वीरकन्याना जन्म दिला तिचा कुसवा आज वाझ झाला काय?'–के २१ ६ ३० [स कुक्षि, म कूस, तुल० फा कुस=योनी, लॅ कोक्सा, ग्री कुक्सोनी कूस पहा]

**कुसवाण**—न (कु) मासळीचें खत [कुसणें]

**कुसहा**—वि (ना) तिखट

**कुसळ**—न १ धान्याचें किंवा गवताचें कूस, टोंक, सड, वस, तृणाग्र हें फार बारीक व अणकुचीदार असतें २ केरकचऱ्याचा कण (क्रि० वोचणें, शिरणें, लागणें, अडकणें, मोडणें) 'कुसळें वोरडीं। वारेनें जाती वरडीं।'–ज्ञा १३ ५६६ [स कुश] म्ह० दुसऱ्याच्या डोळ्यातलें कुसळ दिसतें पण आपल्या डोळ्यातलें मुसळ दिसत नाहीं

**कुसळ, कुसळण, कुसळी**—१ स्त्री चेटकीण, लबाड बायको मत्रविद्येनें दुसऱ्याच्या घरचें लोणी इ० आणणारी स्त्री, २ सुगरण स्त्री, चतुर स्त्री [कुशल]

**कुसळी**—वि कुसें असलेलें, ज्याच्यापुढें बारीक अणकुचीदार धस असतात असें (भात, गवत)

**कुसा**—पु कुसवा पहा

**कुसा**—पु (व खा) कुशा पहा

**कुसा**—पु १ ढेंकळें (नागरट जमीनींतील) उलथींपालथीं करण्याचें लोखडी हत्यार २ या हत्याराचा लोखडी भाग ३ (खा) खोदण्याचें एक हत्यार, लहान पहार

**कुसा**—पु (कों) करडा रग कुसुंबा पहा [कुसुर?]

**कुसीद**—न ऋण, कर्ज, उसनी वस्तु 'कुसीद घ्यावें पाहान।'–अ ८ २४ [स कुसीद]

**कुसुंडी**—स्त्री (गो) केळ्याची एक जात

**कुसुंब-बा**—पु १ करडईचीं वाळलेलीं फुलें २ त्याच्यापासून केलेला रग करडई पहा ३ एक झाड –वि कुसुंबी पहा [स कुसुभ]

**कुसुंबकरडई-डी, कुसुंबेकरडी**—स्त्रीपु करडई, कुसुंबा पहा

**कुसुंबा**—पु १ अफूच्या बोंडांचा काढा, बोंडांचा अर्क, हा प्याला असतां कैफ यतो २ भागेंत मिरें इ० घालून वाटून तें पेय करतात तें

**कुसुंबा-बी**—वि कुसुंब्यासबधीं (रग व रगविलेलीं वस्त्रें) कुसुंब्याच्या रगाचें (पातोळें, पदर इ०) 'आपण जरी कुसुंबा शाला नेसुनि कढियेचे हरवा।'–अमृत १०१ [स कुसुभ]

कुसुम—न. १ फूल; पुष्प. 'तियें कुसुमें मुगुटीं मुगुटीं ।' –ज्ञा ९.१८. २ स्त्रीरज; विटाळ. [सं.] ०चाप, शर–पु. मदन; पंचबाण; पुष्पधन्वा.

कुसुमाकर—पु. १ फुलांची खाण, आगर. २ वसंत ऋतु. 'ऋतूंमाजीं कुसुमाकर । वसंतु तो मी ' –ज्ञा १०.२८३. [सं.]

कुसमो—पु. (गो.) बारीक केर. [कुस]

कुसूं—न. १ सांधा कसवयाचा असतां एका लांकडाचा भाग दुसऱ्या लांकडांत गाळण्याकरितां तासून तयार करतात तें. चवकटीच्या उखळींत बसण्याकरितां दाराच्या लांकडास जें टोंक पुढें आणलेलें असतें तें. उखळांत बसण्याकरितां खांबास खालीं टोंक ठेवतात तें. २ घर, बाग, शेतें इ० च्या भोंवतालची आवाराची भिंत, तट. ३ (कों.) धान्याचें, दाण्याचें कुंभळ. [सं कुस्; किंवा कुस्=जोडणें; का. कुसि=कुसूं.]

कुसुम, कुशून—पु. टिपूचें कवायती पल्टण. 'गाविल्यांनीं दोन कुशुन व दोन रिसाले टिपूकडील लढाई करून गारत केले.' –रा ७.१२८. [तु. कुशुन]

कुसूर-सुरी—स्त्री. १ भांडण. 'पाटलामध्यें व आम्हांमध्यें कुसूर पडून... ' –रा १५.३३. २ चूक; दोष, अपराध; उणीव कसूर पहा. 'कुसूर माफ असावी.' [अर. कुसुर=चुकी.]

कुसूर, कसुरी—स्त्री. (राजा.) रानजाई; एक झाड.

कुसृष्टि—स्त्री. दुष्ट, वाईट कल्पना, युक्ति, मसलत, विचार. [सं. कु+सृष्टि]

कुस्करणें—कुसकरणें पहा. 'मज हृदयीं धरूनि समस्त। कुस्करिती निजबळें।' –ह ७.१५४.

कुस्करी—स्त्री. (यमक साधण्याकरितां आणि विरुद्ध अर्थ दाखविण्याकरितां मस्करी पासून साधलेलें रूप) भांडण, तंटा. म्ह० मस्करीची होते कुस्करी=थट्टेचें भांडण होतें. [मस्करी द्वि]

कुस्काट, कुस्कुट—(कु गो.) कुसें व निरुपयोगी गवत, कुस असलेलें गवत; कसपट; कुसकरलेलें किंवा सहज भुगा होणारें गवत. [म. कुस+कट प्रत्यय]

कुस्कुरांव—न. (गो.) एक प्रकारची पोळी.

कुस्त—वि. थकलेलें; क्षीण झाल्यामुळें दुखणारें (शरीर) 'मार खाऊन अंग कुस्त झालें.' –मदमं १८६. [फा. कुश्त= ठार करणें, कत्ल करणें]

कुस्तमकुस्ता—पु. (ना.) झोंबाझोंबी; झुंज. [फा. कुस्ती]

कुस्ती, कुस्त—स्त्री. झोंबी; मल्लयुद्ध; अंगयुद्ध; बाहुयुद्ध [फा. कुस्ती] ०बाज–वि. कुस्त्या खेळणारा.

कुस्तुमसांव—(गो.) थंडी. [पो.]

कुस्पट—कुसपट पहा.

कुस्पष्ट-स्पिष्ट—न. खोड; वर्म; न्यून, उणें; चूक; दोष. (क्रि० काढणें; निघणें). [सं. कु+स्पर्श-स्पृष्ट]

कुस्मड—न. (माण.) मोठा आरोप; आळ; कुमांड; कुस्मांड पहा.

कुस्मस्थळ—न. (गो.) १ कुंभ. २ मर्मस्थान. [सं. कुसुंभ=कमंडलु ? +स्थळ]

कुस्मां(स्तां)ड—न. (प्र.) कुष्मांड. कुमांड; कुफांड; आळ. (क्रि० धरणें; काढणें; रचणें; उठवणें). [तु० सं. कुस्म्=दोष ठेवण्यासारखें हंसणें]

कुस्वभाव—पु. वाईट स्वभाव. याच्या उलट सुस्वभाव. [सं. कु+स्वभाव]

कुहक—वि. कपटी; ठक; दांभिक. 'म्हणोनि अगा ये कुहका । कपटिया मनमोहका ।' –रास ३.३२०. [सं.]

कुहजक—वि. कुजलेलें. कुहिजक पहा.

कुहडें—न. १ कोडें; कूट. २ कुवेडें पहा. [सं. कुहू=अचंबा वाटविणें]

कुहणें—अक्रि. कुजणें; घाण, वाईट होणें. 'कुहिलें पिशित जैसें । श्वानाचें का।' –ज्ञा १३.५२१. [सं. कुथ्; प्रा. कुह=सडणें]

कुहना—स्त्री. दंभ; ढोंग; भक्तीचें, पवित्रतेचें अवडंबर; बोकेसंन्यास. [सं.]

कुहर—न. १ गुहा; गिरिकंदर. 'भ्रमानें राहे रे गिरिकुहरिं हा निश्चित हरि।' २ (ल.) विवर; खांच; खळी. 'तैसी अंत करण कुहरीं उपजली।' –ज्ञा ७.१२५. 'जननीच्या जठरकुहरीं । प्राणी असे नवमासवरी ।' ३ कोठार; आगर. 'जें भुलीचें कुहर । वायुतत्त्वाचें अंतर ।' –ज्ञा १३.११५.

कुहर—न. धुकें. 'अरुणोदयीं दाटे कुहर। निबिड पडे अंधकार।' –एभा १९.५३७. [हिं. कुहर, कुहा=धुकें, दंव; सं. कुहेडिका=धुकें]

कुहा—पु. थंडी, दमसरपणा; दमटपणा; सरदी (हवा; जमीन इ० ची). [हिं. कुहा=दंव, धुकें ?]

कुहा—पु. (हिं.) विहीर; कुवा. 'एकाधें अधम आंधळें। जेवि कुहा लोटिजे बळें।' –कर २८. 'दुपाउलीं अवचितीं। कुहामाजीं पडिला।' –ज्ञा ८.७०. [कुवा]

कुहाड-डा—पु. वेदना. –शर ?

कुहार—न. कोठार. कुहर अर्थ ३ पहा. [सं. कुहर]

कुंहाळो, कोवाळो—पु (गो.) कोहळा पहा.

कुहिजक—वि. कुजकें; कुजलेलें. कुजका पहा. 'बहुकाळ ठेविलें सुवर्ण । त्यासि म्हणे कोण कुहिजक।' –एभा १३.७७०.

कुहिजट—कुजट पहा.

कुहिजणें—१ कुजणें पहा. 'तरी कुहिजलें उष्टें खातां।' –ज्ञा १७.१५४. २ (ल.) चेंगाळणें. 'डोळे कुहिजलें मादु पातां।' –शिशु १०४. [सं. कुथ्; प्रा. कुह=सडणें]

कुहि(ही)ट—वि. वासट; नासकें; कुजट; कुरसट (पदार्थ). 'हृदयाची जुनी जर्जरी। कुहिट जाली।'–दा १.९.१७. २ (ल. व.) वाईट स्वभावाचा; कुरठा; खुनशी. ०खोवरें–न. कुढया; खुनशी माणूस; खवट खोवरें. [सं. कुथ्; प्रा. कुह]

कुहिटला—वि. (ना.) कुहिजला; कुजलेला; नासका; घाणेरडा. [कुहिजणें]

कुहिटार—न. १ गवत किंवा विगलेलें झांप (छपराकरितां); केंवळ; झांवळ्या. २ जुनें केंवळ. –वि. केंवळी; गवती छपराचें. 'देशांत धावे घरें, कोंकणांत कुहिटार घरें.' [सं. कुथ्; प्रा. कुह; तुल. सं. कुटिर]

कुहिटारू—वि. गवतानें किंवा झांवळ्यांनीं शाकारलेलें; कुहिटार पहा.

कुहिना-हीन—वि. संशयी; मत्सरी; कुरठा; कुधाण पहा. [सं. कु+हीन]

कुहिरा-री-रें, कुहिला-हिली—कुहरी-ली पहा. 'काळें तेंचि धवळें। देखणें तेंचि आंधळें। अर्थ तेंचि सगळें। कुहिऱ्या केंळ केवीं होती।'–एभा १०.७३९. 'यांनीं येथें कुहिली लावली असती.'–तुफान ४७.

कुही—कुई पहा.

कुही—वि. डोंगरी. 'सर्कारांत कुही शेळीचें प्रयोजन आहे.' –समारो १.९७. [फा. कोह=पर्वत; कोही=डोंगरी]

कुहीटुळी—स्त्री. कुजकी घाण. 'बाळपणींची कुहीटुळी। बाहेर घाली।'–ज्ञा ६.२१६. [कुहीर]

कुहु—अ. कोकिळेचा शब्द; त्याचें अनुकरण. [ध्व.]

कुहू—स्त्री. अमावास्या. 'तें राहु गिळी सूर्यासी। सूर्यचंद्रासी कुहू करी।'–एभा २३.८२८. 'कीं तममय कुहूची यामिनी।' –द १६.३२. 'कीं कुहूचें काळोखें भरिलें'–रावि ६ ६४. [वै. सं. कुहू=अमावास्या]

कुहेंडें—न. कोडें; कूट प्रश्न. कुहडें पहा. [सं. कुह्=अचंबा वाटविणें]

कुह्या—पु. पावसाळ्यांत हातापायांच्या बोटांच्या सांध्यांतून पडणाऱ्या भेगा, सतें. कुहे (अव.) मुख्यतां योजतात. [सं. कुथ्; प्रा. कुह=सडणें]

कुळ—न. कुल पहा. 'जो यादव कुळींचा कुळदिवा।' –ज्ञा ८.२७०. –पु. १ शेताचा गेडकरी; कूळ. तेलगूंत कुळ म्हणजे शेतकरी असाच अर्थ आहे. 'कुळाला घरोघर घेऊन आलों आहें.'–नामना १०२. २ (मुलकी) सरकारसारा भरणारा; मालगुजार. ३ (कु.) कुलदेवता; कुडाळदेशकर ब्राह्मणांच्या प्रत्येक गोत्राच्या घराण्याची पाटावर पुजलेली कुलदेवता. शिवाय कूळ पहा. [सं. कुल] ०दिवा-दीप-वि. कुळदीपक; कुळाची अभिवृद्धि करणारा. 'जो यादव कुळींचा कुळदिवा।' –ज्ञा ८.२७०. 'तैसा वंशीं कुळदीप नसतां।'–संवि २६.३०.

कुळई—स्त्री. रानांत सर्वत्र होणारी एक पालेभाजी; फोडशी.

कुळक—न. इच्छा; हेतु? 'म्यां देखिलें नाहीं पुत्रमुख। हेंचि राहिलें असे कुळक।'–कथा ३.१५.५४. शल्य? [सं. कीलक?]

कुळक—स्त्री. (राजा.) कुळीक; चालरा; पटकीचा एक प्रकार; मोडशी फार झाल्यामुळें ओक, हाग व्हावयाजोगी होणारी विकृति.

कुळकट-त—नस्त्री. कुळाची किंवा आपल्या स्वतःची आद्यंत हकीकत (मुख्यतः पापाची, गुन्ह्याची, अथवा मूर्खपणाची); वंशवृत्त. [कुळ+कथा]

कुळकणी—स्त्री. कुशलता; चातुर्य. 'झुंजती कुळकणी जाणिती।'–ज्ञा १.११३.

कुळकणें—अक्रि. कुळक, पटकीचा आजार होणें.

कुळकर—पु. (कु.) कुलदेवतेची पूजा करणारा; पुजारी अधिकारी. [कुल]

कुळकरण—न. १ कुळकर्ण्याचें काम, अधिकार. २ (घाटी) कुत्रा; ढुंगण.

कुळकरणी—पु प्राचीन ग्रामसंस्थेंतील एक प्रमुख अधिकारी. बलुतेदार. कुलकर्णी पहा. म्ह० सोनार शिंपी कुळकर्णी आप्पा, यांची संगत नको रे बाप्पा. [सं. कुल+करण]

कुळकाविणें—सक्रि. कुळीक उत्पन्न करणें, आणविणें. [कुळक]

कुळकुळणें—अक्रि. १ जळजळीत होणें. 'विस्तव कुळकळला.' [सं. कुल्=जळणें द्वि.] २ (गो.) कुळकुळणें=घाबरणें; भिणें.

कुळकुळीत—वि. १ काळ्या रंगाचें आधिक्य दाखविण्यासाठीं योजिलेला शब्द; उ० काळा कुळकुळीत. [वै. सं. कुल्=जळणें द्वि.] २ (गो.) मातलेला; रट.

कुळकोटी—स्त्री. कुळकथा (वाईट अर्थानें); कुळकट पहा. 'अवघी कुळकोटी आहे मज ठावी। विश्वास गोसावी कोण शोभा।'–च ५२९.

कुळघटणी—स्त्री. कुळकर्ण्यानें गांवांतील प्रत्येक कुळाचा ठेवलेला हिशेब, हकीकतीचा तक्ता. यावरून वार्षिक रयतवार जंत्री तयार करतात. [सं. कुल+घट्]

कुळचा—पु. घुळका; ओंजळ. [घुळका वर्णविपर्यास]

कुळंजन—कोळंजन पहा.

कुळडाळ-दाळ—न. शेतकरी, कुळें वगैरे. 'मृताच्या घरचे नोकर लोकांस व कुळडाळांस मेजवानी देतात.'–आगर ३.१५९. [कुळ द्वि; कुळ+डाळ]

कुळणी—स्त्री विशेष प्रकारचे धातूचें, मातीचें भांडें, (गो) कुळणें=मातीची काहील, धान्य भाजण्याचें मडकें [स कुल्=जळणें]

कुळपट—न १ गुप्त दोष, वर्म, व्यंग, खोडी २ दोष, चूक, गुन्हा (क्रि० काढणें, निघणें)

कुळपटा-पाट, कुळपुटा-टी—पुस्त्री धलपी, कपरा, चीप, तुकडा

कुळपट्या—वि कुळपटें, वर्में, खोडी व्यंगें वगैरे काढणारा, गुप्त फोडणारा [कुळपट]

कुळबट-बाऊ-बावा कुळंबी हिशेब—वि 'कुण' मध्यें पहा

कुळबागडी—स्त्री मल्लयुद्धांतील एक प्रकार 'कळविकळ कुळबागडी। अगुरा चौपर चरण ओढी।' —कथा २ ११ ११७

कुळंबीण—स्त्री कुणब्याची बायको, कुणबीण पहा

कुळव—पु नांगरलेली जमीन सपाट करण्याचें एक शेतकीचें अवजार यानें जमीन भुसभुशीत करतात व गवत इ० काढतात 'नांगर, कुळव, पाभर चालवितांना लहान लागली की, प्यावयाचें पाणी या ठिकाणचेंच' —खेया ७ (क्रि० हाकणें हाणणें) [स कुल] ०मोड्या-पु कुळव हाकणारा ०पाळी-स्त्री कुळवाची पाळी, शेतावरील कुळवाची एक फेरी (क्रि० घालणें)

कुळवण-णी—स्त्री जमीन साफ करण्याचें काम 'कर्म कुळवणी। न लग धर्मपाळी दोन्ही।' —तुगा ३६० [स कुल]

कुळवंत-वान—वि श्रेष्ठ कुळांत जन्मलेला, कुलीन घराण्यांतील [स कुल] कुळवती—स्त्री कुलवंत, कुलीन, कुळवान स्त्री, 'कुळवती मदें तारुण्याचा कुळवति अहंकार न करीं।' —सारुह ७ १५२

कुळवाड—स्त्री उदीम, शेतकी, कुळवाडी पहा ०की-स्त्री शेतकी ०पण-न शूद्रपण ०समजाव(वि)शी-समजूत-स्त्री अडाणी किंवा शेतकरी लोकांस समजेल अशा रीतीनें त्यांच्याच भाषेंत समजावून सांगणें ०हिशेब-कुणबी पहा

कुळवाडी—पु १ कुणबी, शेतकरी 'गाणगापुरीचा कुळवाडी। मार्गी उभा कर जोडी।' —दत्तपदेंपृ १३० २ शूद्र पांढरपेशा नव्हे असा, हलक्या जातीचा —स्त्री शेतकी, उदीम, कुणबावा, 'कुळवाडी रिणें दाटली।' —ज्ञा १३ ५६५ 'कुळवाडी त्याचीच वाढते।' —ययादी १८ २३२७ 'तळीं विहिरी कुळवाडी करणें। का तें लावणें द्राक्षी आम्रवनें।' —स्वाउ ५ ३ ५० ३ रोजगार व्यापार, व्यवसाय 'वाढिन्नली सर्वं सुखाची कुळवाडी।' —ज्ञा ६ ४४८ —एभा २३ १४० 'पुंडलीक पाटील केली कुळवाडी।' —तुगा २४७ ४ देखरेख 'कुळवाडि याचि आशा। चाळीत असे।' —ज्ञा ३ २४६ [स कुल+वाडी (=देशी वृत्तिवाचक प्रत्यय)] ०कर-वि शेतकी करणारा 'आणि मना ऐसा भावरी। कुळवाडी करुं।' —ज्ञा १३ २८,

कुळवारी—स्त्री शेत करणाऱ्या कुळाचा तक्ता, यादी (गाव अथवा जिल्ह्याचा) कुळवार पहा

कुळवीणें—सक्रि कुळवानें जमीन साफ करणें कुळवणी करणें [कुळव]

कुळवें—न (राजा) रान तोडून प्रथमवर्षीच तेथें नाचणीचें पीक काढतात असें शेत [स कुल]

कुळाकुड—न वाईट लाकूड 'तुका म्हणे कांचें राहे कुळाकुड। अवगुण तो नाहं ज्याचा तया।' —तुगा ३४०१ [कु+लांकूड]

कुळागत—न खेड्यांतील स्थायिक अथवा वतनदार घराणें (समासांत) कुळागत-आचार-धर्म-व्यवहार संप्रदाय [कुळ+आगत]

कुळागर—न १ (गो) पोफळीचा बाग, २ घराजवळचा बाग, परसू 'त्याच्या सभोंवतीं घनदाट भाटांनीं व कुळागरांनीं वेढलेलीं लहान लहान घरें' —सह्याद्रीच्या पायथ्याशीं पृ ८९ [कुल+आगर]

कुळाचळ—पु कुलाचल, सप्तपर्वत पहा 'कनक कलश कुळाचळा। हेळणा करिती हेळाची।' —मुआदि ४६ ४ [स कुलाचल]

कुळार—न (गो) माहेर 'तिवां कुळार ना' [कुळागर]

कुळारग—पु १ खेड्यांतील जमीनदार, वतनदार (समुच्चयानें), शेतसारा देणारीं कुळें, वतनदार कुळाचा वर्ग, समुदाय २ (गो) देणेदाराची यादी, जन्ती —स्त्री १ कुळापासून येणें असलेली रकम 'आमची दहा रुपये कुळारग बुडाली' २ कुळांना आगाऊ दिलेला पैसा ३ त्यांना आगाऊ पैसे देणें, पैसे वसूल करणें इ० व्यवहार, प्रकार 'आम्ही दहा हजार रुपयांची कुळारग केली' कुळारगी असेंहि रूप आढळतें ४ (क) कुळाकडे विशिष्ट हक्कानें असलेली कायमची जमीन 'कुळारग व खासगी मिळून पाच बिघे जमीन आहे' कुळारग वार-वर्ग पहा —वि (राजा) सरकारच्या अधिकाराखालीं शेतकऱ्यांनीं कुळांनी वसविलेला (गांव), याच्या उलट खोतीचा (गाव), कुळाकडे असलेली (जमीन) खोतीची नव्हे अशी [कूळ+आकर-१ आगर-आरग] ०गाव-न कुळारगी गाव, ज्यांतील सर्व जमिनी कौलदारांनीं धारण केल्या आहेत व ज्याची वहिवाट गावकऱ्यांच्या संमतीनें गावकामगार पाहतात तो गाव ०पट्टी-स्त्री कुळवार पट्टी ०वार-वर्ग-क्रिवि प्रत्येक कुळामागें, दर कुळागणीक

( खेड्यांतील शेतकऱ्यांच्या ). ( याद करणें, वसूल करणें-घेणें, पट्टी, वांधा, हिशेब, बाकी, शेतें इ० शीं योजला जाणारा शब्द).

**कुळावा**—पु. ( कु. ) लग्न जमविणारा मध्यस्थ. ( हेट. ) म्हाला. [ सं. कुल ]

**कुळावी**—पु. ( गो. ) कुळदेवतेचा भक्त. [ सं. कुल ]

**कुळाक्षरी**—पु. सर्वाधिकारी; कुलाखत्यारी. १ 'धाकले नाना कुळाक्षरी त्याच्या मोहरले फुलशहर.' -ऐपो १३३. [ फा. कुल+अख्त्यार ].

**कुळिंजन**—पु. कोळंजन पहा.

**कुळिपु**—वि. कुलवंत; कुळ पावन करणारा. 'हा नोहेचि कुळिपु। ययां नाहीं माएबापु।' -शिशु ८६१. [ सं. कुल+पू ]

**कुळिया**—पुअव. दिवे. 'भेरगुंडे कुळिया चहुंकडे।' -भाए ४४२. [ सं. कुल्=जळणें ]

**कुळिवंत**—वि. कुलवंत पहा.

**कुळी**—स्त्री. कुल; वंश; गोत्र, जात; घराणें. या शब्दाचा उपयोग मर्यादित करतात. लग्नकार्याच्या वेळीं जातीचा कुलीनपणा, थोरपणा पहाण्यासाठीं कुळीचा विचार करतात. [ कूळ ]

**कुळी**—स्त्री. एक पालेभाजी. [ सं. कुली ]

**कुळी**—स्त्री. ( राजा. ) गुळणी; चूळ.

**कुळी(ळि)क**—स्त्री. १ मोडशी; कॉलरा; पटकी. कुळक पहा. 'कुलिक तरळ कामिणी।' -दा ३.५.२५. २ ( ल. ) अजीर्ण; तिटकारा. 'शांभवेची कुळिक।' -भाए १७६.

**कुळीक**—स्त्री. ( वे. ) खोड.

**कुळीत**—न. रयतेपासून किंवा कुळापासून यावयाचा पैसा ( खंड वगैरे ). [ कूळ ]

**कुळीत-थ-द**—पु. हुलगा; कुळथी; एक द्विदल धान्य; हें कोंकण, मद्रास, बंगलोर, कोचीन इकडे पिकतें. याला फार पाऊस नको. हें हलक्या जमिनींत पिकतें. गुरांना व माणसांना खावयास उपयोगी. याला गरिबाचें धान्य म्हणतात. -शे ११.२८. [ सं. कुलित्थ ]

**कुळुक**—स्त्री. गंडांतर. 'त्याला किनई आठव्या वर्षी कुळुक होती.'

**कुल्हमसुपारी**—स्त्री. सुपारीचे काप, कत्रण, खांडें. [ ? ]

**कुक्षि-क्षी**—पु. १ बाजू; कूस; काखेच्या खालचा आणि कमरेच्या वरचा भाग ( आंतील किंवा बाहेरचा ). 'करनि सडा संमार्जन गोपी कुंभ घेऊनि कुक्षीं।' -होला १६.२ पोट; पोटाची पोकळी; ३ गर्भाशय ४ ( तरवारीचें ) म्यान. -दार. ०घात-पु. कुक्षींत उठणारा वायगोळा; पेटका; वायु ( पेटका उत्पन्न करणारा ). [ सं. कुक्षि. कुसवा पहा. ]

**कुक्षिंभरि**—वि. अधाशी; खादाड; वराडी. [ सं. कुक्षि= पोट+भृ=भरणें ]

**कू**—न. की पहा.

**कूं, कू**—अशी. एखादी व्यथा झाली असतां मनुष्याच्या तोंडून निघणारा दुःखोद्गार ( चूं, हूं, इस्, उस्, हुश् याप्रमाणें ). ( क्रि० म्हणणें; करणें ). हाय पहा. [ ध्व. सं. कु=कूं कूं शब्द-करणें ).

**कूआ**—पु. कुवा पहा. [ सं. कूप; हिं. कुआ ]

**कूक**—स्त्री. बांग; साद; आरव ( कोंबडा इ० ची ). [ ध्व. ]

**कूकणें**—अक्रि. आरवणें; ओरडणें; शब्द करणें. 'जो नारायणु नाभीकमळीं कूके।' -दाव ३६८. [ कूक ]

**कूकू**—उद्गा. कुत्र्यास बोलावण्याचा शब्द; यूयू. [ ध्व. ]

**कू(कु)च**—न. १ प्रयाण; मजल (सैन्याची); तळाची उठावणी; तळ हलविणें. 'हल्ली हैद्राबादेहून नवाबाची चार कुचें टिपूच्या मोकावल्यावर जाहलीं.' -ख ८.४३२५. 'तेथून कुच केलें कटकाला।' -ऐपो ११. २ ( सामा. ) प्रयाण; गमन; प्रस्थान; निघून जाणें. (क्रि० करणें). 'हेळापट्टण लक्षुनियां पंथ। कुच मुक्काम साधीतसे।' -नव १६.१०२. ३ ( ल. ) मृत्यु. [ फा. कुच् ] ०दरकूच-वकूच-क्रिवि. मजल दर मजल; सारख्या मजला करीत. 'आम्ही आपले दोस्तीवर नजर देऊन कूच-वकूच रवाना होऊन गेलों असों' -पया ४८६. **कुचाचा नगारा वाजविणें**-पळणें; कूच करण्याची सूचना देणें.

**कूच**—वि. ( हिं. ) निरर्थक; निरुपयोगी. उ० कुचकामाचें कुचकामाचा पहा.

**कूचट**—क्रिवि. मजल दर मजल. 'सोडिला दखन कूचट आले नीट काम मोठें जबरा केलें।' -ऐपो ४३५. [ फा. कूच् ]

**कूंचा**—कुंचा पहा. 'ब्रह्मतेजाचा कूंचा ढळे। मुगुटावरी।' -शिशु १११.

**कूज**—स्त्री. नाश; विलय; कुजणें. [ कुजणें ]

**कूंजणें**—अक्रि. शब्द करणें (पक्षी वगैरेंनीं). 'जे कूंजते कोकिल वर्नी।' -ज्ञा ६.४५०. [ सं. कूजन ]

**कूंजद**—स्त्री. दोन्ही बाजूंना तीळ लावूनतयार केलेली पोळी. -गृशि २.२३.

**कूट**—न. १ मिरपूड, मिरें. मोहऱ्या, मेथ्या इत्यादि कुटून केलेली पूड ( लोणचें वगैरे करितां ). २ सडलेल्या तांदुळांतील बारीक कण, भूस, चूर्ण. ( ल. ) ३ नाश; पीठ; नायनाट. 'कानसुलां गालीं। आगें कूट जालीं।' -शिशु १७०. 'ब्रह्मस्वविषाची करी कूट। ऐसा त्रिलोकीं देव नसे।' -ज्ञे १.८३. [ कुटणें ] ०काढणें-क्रि. यथेच्छ ठोकणें, बडविणें.

कूट—न (कु) मासाचा तुकडा

कूट—न (तंजावरी) अर्धवट पातळ भाजी, रस्सा [का कुड]

कूट—स्त्री लबाडी, कपट, निंदा 'न साहावे तुम्हा या जनाची कूट।'—तुगा ३१३ [स कूट] ०खाणें-कुटणें-क्रि निंदा, चुगली करणें 'कूट खाती मागें पुढें। जाती निरयगावा पुढें।'—तुगा ९९१ ०शासन-न बनावटहुकूम, आज्ञापत्र, सनद [स] ०साक्षी-वि खोटी साक्ष देणारा ०साक्ष्य-न खोटी साक्ष [स]

कूट—न १ कोडें, अंकगणितातील अवघड प्रश्न, गूढार्थ, गूढ श्लोक, उखाणा २ गुप्त मंडळ, कट, जूट, एकमतानें केलेलें मसलत, एकोपा, (सामासात) त्रिकूट ३ वधुवराच्या पत्रिकेचा विचार करताना (वर्ण, वश्य, योनि, खेचर, गण, कूट, नाडी वगैरे) ज्या ३६ गुणांचा विचार करावयाचा असतो त्यापैकी एक. [स कूट] ०तान-स्त्री (संगीत) स्वरक्रमात फेर करून तयार केलेली तान ०प्रश्न-पु कोडें, गूढ (धार्मिक, वेदांत इ० विषयक) —गागा १३६ [स कूट] कूटस्थ-वि १ विस्कळित झालेल्या कुटुंबाचें, घराण्याचें मूळ (पुरुष स्त्री, वगैरे) (कायदा) प्रत्येक वंशाचा पहिला ज्ञात असलेला (पुरुष) २ सर्व एकसारखा, सर्वत्र आणि सदोदित एकच एक असणारा, अविनाशी, निर्विकार (ईश्वर, आत्मा, आकाश) ३ देहाविच्छिन्न (ब्रह्माचा कल्पित) भाग 'येचि देहीं कूटस्थ।'—एभा १० ३२८ ४ मायेच्या संगतीनें असणारें चैतन्य, आत्मा 'आणि कूटस्थु जो अक्षरु। दाविला पुरुषप्रकारु।' ज्ञा १६ ४३ ५ सर्व भूतांच्या मुळाशीं असणारें प्रकृतिरूप अव्यक्त तत्त्व (त्यास अक्षर असें म्हणतात). —गीर ८०८

कूट—न १ पर्वत शिखर मलयकूट 'कूटतुल्य ही वर्फ पाथरे।'—नवनीतपृ ४२१ २ धान्याची रास [स कूट]

कूट—(गो) हळकुंड, हळकुंडाचा तुकडा कुडें कुट पहा [कुटका ?]

कूटी—स्त्री (महानुभावी) निंदा, खोटेपणा, अपवाद कूट पहा 'तान्हयातें पाशीं करावे। जाणतयातें भल्या धरावे। ऐसें जर माया घेतले जावे। तर कूटी पावे।'—ज्ञाप्र ११०६ [स कूट]

कूड—पु १ वांबूच्या कामट्या, कारवी, रिपाड, तट्या इत्या दींवर चिखल लिंपून तयार केलेली भिंत (क्रि० घालणें) 'तों तृणाचें कूड घातलें।'—ह १६ १०० [स कुड्य, प्रा कुड्ड] २ कृपण, वई (कांट्यांचें, झाडाचें) म्ह० रिकामा न्हावी कुडाला तुम्बी लावी

कूड—स्त्री १ शरीर, देह, प्रेत (आत्म्यापासून भिन्नता दाखविण्याचें वेळीं किंवा रागानें अथवा निंदेनें उपयोग करतांना) २ (गो) देह (अंगात येणाऱ्या माणसाचा) [स कुडि]

कूड—स्त्री (गो) खोली [स कुटि]

कूड—न खोटें, कपट, लबाडी, कूट. 'नेणें कूड कदापि भी।'—भाक २० —वि (कों) लबाड, खोटा, विश्वासघातकी, कावेबाज, आतल्या गाठीचा [स कूट, प्रा कुड, गु कुड]

कूत—पु १ भर, जोर, आवेश (रोग, पाऊस, वारा, ऊन, भाडण याचा) २ (ल) एखाद्या कामाविषयीं उतावीळ, जोराची उत्कंठा, उकळी, खाज, (सामासात) घायकूत (क्रि० येणें, होणें, जिरणें, मुरणें) ३ (राजदरा) खरजेचा भर (क्रि० येणें, मोडणें) ४ अदाज ?—शर [स कु=आवाज करणें—आकूत]

कूप कुप—पु कुंपण (आवाराचें), कुडण, वई 'तेया सोनकेतकीचें कूप। चहूंकडे।'—शिशु २५२ 'कल्पतरु तोडोनि केला। कूप शेता।'—ज्ञा ११ ५३९ म्ह० कूप जर शेत खाऊं लागला तर मालधनी काय करील ?=रखवालदारच जर चोरूं लागला तर मालक काय खाईल ? [स कूप]

कूप—पु १ खणलेला खड्डा २ (सामा) विन पायऱ्याची विहीर, आड (समासात) अधकूप, जलकूप, धान्यकूप, शौचकूप. 'वापी कूप आराम। अग्रहारें हन महाग्राम।'—ज्ञा १८ ९९ 'छाये माकड विरे। धावे कूपीं काय भेटे।' —तुगा १७७९ [स] ०कच्छप-मंडूक-पु १ (राजदरा) विहिरींतील कासव किंवा बेडूक यावरून २ (ल) घरकोंबडा, आपलें घर हेंच जग समज णारा, बाह्य जगाविषयीं अज्ञानी, आकुंचित दृष्टीचा माणूस [स] ०मंडूक-न्याय-पु विहिरींतील कांसवाचें किंवा बेड काचें जग म्हणजे त्या विहिरींतीलच संकुचित भाग, जागा, तिच्या बाहेर काय आहे याची त्याला मुळींच कल्पना नसते त्याप्रमाणेंच जो मनुष्य आपला गाव किंवा देश सोडून कधीं बाहेर गेला नाहीं त्याला आपलाच गांव किंवा देश चागला असें वाटतें व इतर गाव किंवा देश यांना तो तुच्छ लेखतो 'असें प्रति पादन करणें म्हणजे हिंदुधर्माच्या व्यापक स्वरूपाबद्दल कूपमंडूक न्यायानें आपलें अज्ञान प्रदर्शित करणें होय'—टि ४ ३८८ ०यन्त्रघटिकान्याय पु रहाटगाडग्याच्या पोहऱ्याची सदो दित पालटणारी स्थिति रहाटगाडगें फिरू लागलें म्हणजे रिकामे पोहरे खालून पाण्यानें भरून येतात, त्यातील पाणी ओतलें जातें व ते रिकामे होऊन पुन्हा खालीं जातात आणि पुन्हां भरून वर येतात अशीच माणसाची स्थिति (सुखांतून दुःखात व दुःखातून सुखात) पालटली जाते चक्रनेमिक्रम, उत्कर्षामागून अपकर्षाचा क्रम [स]

कूप—न (गो) १ दगडाची पूड, शिरगोळ्याची पूड, रांगोळी २ दग

**कूपरी**—स्त्री आळ, आरोप 'आपणयावरी साकारपणाची कूपरी।'—भाए ६१७ [स कू+परी–प्रकार]

**कूपिका**—स्त्री कूपी, बाटली, सुरई 'तिची वर्णिता रूप रेखा। 'ती सौंदर्याची कूपिका।'—कथा १ ३ ३७ [स कूप लघुत्व]

**कूय**—स्त्री (गो) हुकी, कोल्हाची कूई [ध्व]

**कूर**—(गो) लघुत्वदर्शक प्रत्यय उ० फन्कर, घटकूर

**कूर**—(तजा) रास, ढीग [स कूट] –वि (तजा) तीक्ष्ण धार असलेलें [स क्रूर]

**कूर्च**—पु १ घोडयाच्या खुराचा वरचा भाग —अश्वप १ ६३ २ दाढीचे केस 'भवते इद्रनीळ विरुढती सानट। तर ते कूर्च वरवट। उपमी नते।'—ज्ञाप्र ४६५ ३ पैतृक कर्मांत पितरांना व देवाना उदक देण्यासाठीं व इतर धार्मिक विधींत दर्भाची विशिष्ट आकाराची मुष्टि करतात तो ४ कूर्चा पहा [स कूर्च=दर्भमुष्टि]

**कूर्चा**—स्त्री (शाप) मृदु अस्थि, मृदु अस्थींचें वेष्टण (इ) कार्टिलेज 'हाडाच्या शेवटीं कूर्चेचें म्हणजे मृदुअस्थींचें वेष्टण असतें'—मराठी ६ वें पुस्तक (१८७५) पृ २५४ [स कूर्च]

**कूर्चिका**—स्त्री घोडयाच्या कूर्चाच्या मागील भागाचें ठिकाण –अश्वप १ ६३ [स कूर्च]

**कूर्पास, कूर्पासक**—पुन बायकाच्या अगातील चोळी, चडी 'कूर्पासका आड दडोन थाकें।'—सारुह ७ १२५ [स कार्पास+क?]

**कूर्म**—पु १ कासव 'का कूर्मे जियापरि। उवाइला अवेव पसरी।'—ज्ञा २ ३०१ २ विष्णूच्या दशावतारातील दुसरा अवतार 'शेष कूर्म धा‍ड्‍राव जाले।'—दा २० ८ २२ ३ पंच उपप्राणापैकीं एक 'नाग कूर्म कृकल देवदत्त। पाचवा धनजय जाण तेथ। याची वस्ती शरीरात। ऐक निश्चित् सागन।'—एभा १२ ३२१. ४ जांभईच्या वेळेच्या वायूच्या विशिष्ट स्थितीचें नांव 'आणि जंभई शिक ढेंकर। ऐसैसा होतसे व्यापर। नाग कूर्म कृकर। इत्यादि होय।'—ज्ञा १८ ३४१ 'नेत्राची पातीं झांकतीं उघडतीं। तो कूर्म।'—यथादी १८ १००३ ५ डोळ्यांमधील तावडा टिपका (कुमरी पहा) [स] ०**आसन**—न (योग) योगशास्त्रांत सांगितलेलें एक आसन याचे चार प्रकार आहेत पैकीं पहिला प्रकार–वज्रासनाप्रमाणें बसावें परंतु पाय फुल्यापाशीं न घेतां ते घोटे जमिनीला टेकतील व घोटे साफ दिसतील असे दोन्ही बाजूंना बाहेर काढावे हात बगलेवर टेकून आंगठे बगलेंत भरावे व हातांना धोक न देतां चारी बोटें बाहेर स्पष्ट दिसतील अशीं छातीला टेकून ठेवावीं याने पायाचे घोट, मांड्या, वष्ट दांघ चांगला व्यायाम होतो दात कुंडे टांचेवर टेकणें किंवा जमिनीवर टेकणे असे दोन प्रकार आहेत [स] ०**दुग्ध**—न (कासविणीचें दूध) असभाव्य गोष्ट (खपुष्पाप्रमाणें) [स] ०**दृष्टि**—स्त्री कृपा, कृपादृष्टि, मेहेरबानी (कारण कासविणीस आचळें नसल्यानें तिच्या नुसत्या मायेच्या दृष्टीनेंच तिचीं पिलें वाढतात) 'कूर्म दृष्टीनें सामाळी।'—वि कृपादृष्टि दाखविणारा [स] ०**पृष्ठाकार**—वि बाह्य गोल (भिंग वगैरे) (इ) कॉन्व्हेक्स [स] ०**लोम**—न कासवाचे केंस–अशक्य गोष्ट [स]

**कूर्स**—पु शिक्षणक्रम –सह्याद्रीच्या पायथ्याशीं (टीप) २९१ [पो, इ कोर्स]

**कूल**—१ वंश, जात, देवक इ० अर्थीं कुल पहा २ तीर, काठ 'श्रीगोदावरीच्या कूलीं।'—ज्ञा १८ १८०२ [स कूल]

**कूल**—न (गो) सोनाराची मजुरी [का कूलि]

**कूल**—न (कर्ना) लाकडात भोंक पाडून त्यात बसविण्यासाठीं तयार केलेलें लाकडाचें टोंक, खुंटी, कुसू

**कूली**—कुली पहा

**कूश**—स्त्री कूस पहा

**कूष्मांड**—कुष्मांड पहा

**कूस**—स्त्री १ शरीराची एक बाजू, बरगडीची, काखेखालची बाजू २ उदर, गर्भाशय 'ता तू देवकीकुसीचा सेजारी।'—शिशु ११२ [स कुक्षि, प्रा कुच्छि, कुक्खि कोक्खि, हिं कोख, गु कुख, प कुक्ख, सिं कुखि कुसवा पहा] ३ (ल) जागा, अवकाश (खोटें बोलण्यास, फसवण्यास, लबाडीस, गैरमिळकतीस) 'मोजणी झाल्यामुळें शेतात बेकायदा कूस राहिली नाहीं' 'चिठ्ठर खर्च कच्चा लिहिल्यामुळें चिठ्ठरात कूस राहिली नाहीं' 'ह्या भाड्याला कूस आहे' (सामा) जागा किंवा अवकाश असा अर्थ 'पोटभर खाल्लें, पाणी प्यायला कूस राहिली नाहीं' ४ भरलेली जागा, साधलेली सधि (खोटे हिशेब करून, खऱ्या खर्चापेक्षां जास्त रक्कम खर्ची टाकून, माल जमा करून, दुसऱ्याची व्यवस्था करताना कांहीं रक्कम गिळकृत करून इ०), घतलेलें माप किंवा केलेला हिशेब यांत फारशी लबाडी अशीं न लागतां थोडासा कमी–अधिकपणा करणें, थोडी कसर, बर्तावळा ५ गुरें इ० प्रसवल्यानंतर योनिद्वारें निघणारा कुजका अंश (वाप्र) ०**भरणें**–एखाद्या पदार्थानें पोट भरणें 'गाईच्या दोन्ही कुसी भरल्या' ०**घालणें**–(कु) खेळांतील नियम मोडल्याबद्दल खेळगड्यास बाहेर टाकणें **कुशीस होणें**–एका अगावर निजणें म्ह० माजर करी एकादशी उंदीर मारून भरी कूसी=उपास करणें आणि ओ धईपर्यंत खाणें सामासाब्द–०**गोम**–**भोंवरा**–स्त्री घोड्याच्या कुशीवर असलेली गोम, भोंवरा हा अशुभ मानितात. ०**निदुरणीचा–निदयणा–धुणीचा–धुवणा–धुणा**–पु स्त्रीच्या अनेक मुलांपैकीं शेवटचा मुलगा

कुसगुणा पहा [कुस+निवुरणें=कुसणें] ०फुटप-(गो) संतति होण्यास सुरवात होणें

कूस—न कुसळ, टोंक, 'आपली लेखणी ते किती नम्रपणानें चालवीत व निंच कूसहि कोणास बोचू नये याविषयीं ते किती जपत असत' -नि ९०९ [स कुश]

कूस-से—पु अव (व) पलंगाचे बाजूचे उभे दांडे

कूंस—न (कों) कुसु अर्थ १,२,३ पहा 'कवाडाचें कूस मोडलें

कूहुरी—स्त्री केंरीसारखा सोन्याचा अलंकार कुहुरी पहा 'स्याली राखडि मूद वोरखडि ते शोभे तळीं कूहुरी।'-अनंत-सीतास्वयंवर ४५

कूळ—स्त्री (गो) नारळीच्या हीराचें केलेलें जाळें

कूळ—न १ गोत्र, वंश, जात, कुटुंब 'आमचे कुळांत मोरोपंत नावाचे प्रसिद्ध कवी होऊन गेले' म्ह० कुळास खोड संतानास वेड (नसावें) २ स्मरात ठेवावयाचें देवक (मराठे जातींत हें असतें) प्रत्येकाच्या कुळांत चाल असेल त्याप्रमाणें कळंब, मारवेल, वड इ० झाडाची खांदी आणून ती तुळशी वृंदावनांत लावतात व तिची पूजा करतात (बाप्र) ०उद्धरणें-१ कुळाची कीर्ति वाढविणें २ (उप) कुळांतील माणसाला (विशेषत जवळच्या नातलगावरून) शिव्याशाप देणें कुळाला डाग लावणें-कुळाला कलंक लावणें सामाशब्द- ०कट-कत-कथा-कहाणी-स्त्री १ कुळाची कथा किंवा गोष्ट, कूळकट हा शब्द मुख्यत्वें वाईट अर्थानें योजतात कुळकथा म्हणजे कुळाची कहाणी, कैफियत, इतिहास २ (ल) कटाळवाणी, कटकटीची हकीकत, माहिती ०कट सांगणें-ग्रसायाच्या वर्शा तील (मागची किंवा चालू) विंगें, दोष सांगणें ०करंटा-वि कुळांतील हतभागी, अधम, कुळाचें नाव घालविणारा, मुख्यत्वें चिक्कू ०करण-णी-कुळकरण पहा ०गति-स्त्री गोत्र वंश याची परंपरा, अनुक्रम, वंशवेल-विस्तार ०टि(ति)ळ(ल)क-पु वंशाचें भूषण, कुळाला भूषणभूत अशी व्यक्ति [स] ०पर्वत-पु (काव्य) कुलाचल व सप्तपर्वत पहा ०बुडव्या-वि स्वत च्या कुटुंबाचा नाशक, कुळकलंक ०वंत-वान-वि कुलीन, अभिजात, कुळवंत, चांगल्या कुळांत जन्म पावलेला ०शीळ-न कुळ आणि शील, वडिलांची परंपरा व व्यक्तीची वागत, कुळांतील आचारविचार, चालरीत, स्थितिरीति लग्न जुळवितांना ज्या बाबी पहावयाच्या त्यांतील एक, यावरून कुळशीळाचा-कुळशीलघान-वि कुलीन, अभिजात

कूळ—न १ कौलदार, खंडकरी, पट्ट्यानें जमीन धारण करणारा (सरकाराची किंवा शेतमालकाची) २ धनकोचा (सावकाराचा) ऋणको, आरोपीचा जामीन, वैद्याचा रोगी, वकिलाचा पक्षकार, आश्रयदात्याचा पोष्य, ज्यानें ज्याचें द्रव्यादि देणें आहे तो, आश्रित (म्हणजे रिणको, जामीन, रोगी इ०) ३ सामान्यत सरकारास सारा देणारा असामी, असाम्या इतर अर्थ व सामासिकशब्द 'कुल' शब्दामध्यें पहा ४ (गो) गिऱ्हाईक, इसम, व्यक्ति सामाशब्द-०घडणी-स्त्री प्रत्येक कुळाची जमीन, साधनसामुग्री, लाग, लागवड व सारा इत्यादि दाखविणारें, कुळकर्ण्यानें तयार केलेलें सरकारी पत्रक, तक्ता ०जमा-स्त्री १ गाव किंवा जिल्ह्यातील कुळापासून येणाऱ्या साऱ्याची रकम २ सावकारानें कुळास किंवा शेतकऱ्यास कर्जाऊ दिलेली रक्कम ०झाडा-पु गावातील खंडकरी किंवा कौलदार यांचा तक्ता ०पट्-पट्टा-पु कौलनामा, खंडपत्र ०पैसा-पु कूळजमा अर्थ १ पहा ०भरणा-पु (व्यापक) शेतकरी किंवा कुळें, यांच्या उलट अडाणकवाड ०रुजुवात-स्त्री १ कुळानें सरकारी खजिन्यात भरलेल्या पैशाची चौकशी करून रुजुवात घालणें २ अशा रीतीनें काढलेला निर्णय (क्रि० करणें, घेणें, पहाणें) ०वर्ग-पु १ कुळघडणीच्या अनुरोधानें कुळें अथवा रयत यांच्या जमीनजुमल्यासंबधानें किंवा त्यांचेकडून येणें असलेल्या पैशाबद्दलचें वर्गीकरण दाखविणारें वार्षिक पत्रक-तक्ता २ एकाच कुळाचें वरीलप्रमाणें पत्रक-तक्ता (समासात) कुळवर्गपट्टी-जमाबंदी-वसुलबाकी इ० ३ कुळारग पहा ०वार-क्रिवि कुळाच्या अनुक्रमाप्रमाणें दर किंवा दर कुळागणिक यांच्या उलट थळवार (समासात) कूळवार पावत्या-पाहणी-फाजील-वसुलबाकी-रुजुवात, त्याचप्रमाणें कूळवार-पत्रक-खाता ०वारी, कुळवारी-स्त्री कुळाचा तगा

कूक—पु, घाटी, गळा, घसा, कंठनाल [स]

कृकर-ल—पु १ ढेंकरेच्या वेळचा वायु पंच उपप्राणांपैकीं एक कूर्म पहा 'आणि जांभई शिंक ढेंकर। ऐसैसा होतसे व्यापार। नाग कूर्म कृकर। इत्यादि होय।'-ज्ञा १८ ३४१ 'नागकूर्म कृकल देवदत्त।'-एभा १२ ३२१ 'शिंका ज्या करिता येती। कृकल म्हणोनी त्यास म्हणती। -यथा १८ १००४ [स]

कृच्छ्र—न १ एक प्रायश्चित २ शारीरिक दु ख, कष्ट, तप 'मांडेनि उदेदें संपूर्ण। तपसाधन कृच्छ्रादिक।'-एभा १७ ४२० ३ मूत्रकृच्छ्र, मूत्रावरोध ४ पहिले दिवशीं एकदां जेवण, दुसरे दिवशीं सायंकाळीं जेवण, तिसरे दिवशीं न मागतां आपोआप मिळेल तें खाणें व चौथे दिवशीं उपोषण याप्रमाणें क्रमानें १२ दिवस करण्याचें व्रत 'अथवा एकांतरा कृच्छ्री।'-ज्ञा १७ ३६४ कृच्छ्राचे १ पाद, २ अर्ध, ३ पादोन, ४ अति, ५ कृच्छ्राति कृच्छ्र ६ सांतपन, ७ तप्त, ८ शीत, ९ पराक इ० प्रकार आहेत [स] ०चांद्रायण-न चंद्रकलेप्रमाणें चढउताराने जेवणांतील घांस

खाण्याचें कृच्छ्प्रायश्चित्त 'कृच्छ्रचान्द्रायणें झालीं वेडीं।'-एभा १२ २७ कृच्छ्रें करून-क्रिवि नाखुषीनें, कष्टानें (देणें करणें इ०)

कृत—न चार युगांपैकीं पहिलें, कृतयुग, सत्ययुग [स]-वि ज्यानें केलेलें आहे या अर्थानें समासाच्या पूर्वी जोडतात उ० कृतभोजन=ज्यानें जेवण केलेलें आहे असा, कृतविवाह=जो विवाहित आहे असा, कृतापराध=अपराधी, गुन्हेगार, याचप्रमाणें कृतस्नान-प्रमाण-निग्रह-प्रस्थान-प्रसाद-यज्ञ कृताभ्यगत-कृतातिथ्य -कृतनिग्रह इ० याशिवाय कांहीं सामासिक शब्द पुढें दिले आहेत ०कर्मा-वि निपुण, हुषार कुशल [स] ०कार्य-वि ज्यानें आपलें काम संपविलें आहे असा, यशस्वी, विजयी, कृतार्थ, प्राप्तयश कृतकृत्य पहा [स] ०काल-वि १ निश्चित ठराविक काळाचा, मुदतीचा, मुदतबद्द (गहाण, निक्षेप, याज्यासबधानें). २ अमुक मुदतीपर्यंत चाकरी करण्यास जो आपणास बांधून घेतो असा (चाकर) [स] ०कृतार्थ-वि कृतकृत्य, सिद्ध अर्थ झाला आहे ज्याचा असा [स] ०कृत्य-वि १ कृतकार्य, ज्यानें संसारासबधीं सर्व कृत्यें पार पाडून त्यापासून मिळणारें सुख अनुभविलें आहे तो, पुण्यकृत्यानें ज्याचा जन्म सार्थकीं लागला आहे तो २ आरंभिलेलें दुर्घट काम ज्यानें तडीस नेऊन समाधान प्राप्त करून घेतलें आहे तो, ज्यानें आपल्या श्रमाचें फळ गाठलें तो 'म्हणे कृतकृत्य झालों देवदर्शनें।' -सवि २६ २८ 'त्यालाच जाणता आणि कृतकृत्य म्हणतात' -गीर १६३ -न अशक्य किंवा अपूर्व कृत्य, अगदीं अचाट कृत्य, मोठ्या बुद्धिमत्तेचें काम 'त्या अदत्तापासून तुम्हीं पैसा काढला हें मोठें कृतकृत्य झालें' काव्यात कृतकृत्यार्थ(-वि) असें रूप येतें ०कृत्यता-स्त्री कृतार्थपणा, यशस्वितेचा अभिमान, 'त्याच्यात सुस्ती, कृतकृत्यताबुद्धि पंडितमन्यता, वगैरे दोष असल्यामुळें '-नि ३ [स] ०घटस्फोट-वि घटस्फोट करून जातीबाहेर टाकलेला [स] ०निश्चय-पु दृढ निश्चय निग्रह निर्धार -वि दृढनिग्रही, ज्यानें निश्चय केला आहे असा [स] ०परिश्रम-श्रम-वि ज्यानें फार मेहनत केली आहे असा [स] ०पुंख-वि १ सोडला जाण्याच्या बेतात असलेला (बाण) २ (ल) निघण्याच्या बेतांत आहे असा [स कृत+पुख=पिसें लावलेलें बाणाचें मूळ] ०पुण्यपुंज-वि ज्यानें पुष्कळ पुण्य साठविलें आहे किंवा ज्यानें पुण्यकृत्यें केलीं आहेत असा (पुरुष) [स] ०प्रतिष्ठित-वि ज्यानें मान्यता, प्रतिष्ठा संपादन केली आहे असा [स] ०बुद्धि-वि निश्चयी 'ऐसे दृढनिग्रही कृतबुद्धी।'-दा ११० ११ [स] ०मुष्टि-वि ज्यानें मूठ वळली आहे असा [स] ०युग-न कृत अर्थ १ पहा, सत्ययुग ०संकल्प-पु दृढ निश्चय -वि दृढ निश्चयी [स] ०संस्कार-वि जो संस्कारानें पावन झालेला किंवा ज्याचा विशेष संस्कार झाला आहे असा [स] ०साक्षी-पु (कायदा) साक्ष देण्याकरिता नेमलेला, साक्षी पहा [स]

कृंतक—वि कुरतडणारे, कुरतुडणारे [स कृत्-कृन्त्=कुरतडणें] ०प्राणी-पु एक प्राणिवर्ग, या वर्गांतील प्राणी शाकतृणाहारी असतात यांना कुरतुडून खाण्याची सवय असते उ० ससा, उंदीर, खार इ० -प्राणिमो २५

कृतकपुत्र—पु (कायदा) मानलेला, पाळलेला मुलगा, विकत घेतलेला मुलगा [स]

कृतघ्न—वि १ निमकहराम, उपकार न जाणणारा, बेइमान, हरामखोर याच्या उलट कृतज्ञ २ केलेलीं कृत्यें किंवा उपाय व्यर्थ पाडणारा, कार्यविध्वसक [स कृत+घ्न] कृतघ्नता-स्त्री उपकाराची जाणीव नसणें, निमकहरामी

कृंतन—न १ कापणी २ नखांनें, दातांनीं कुरतडणें [स कृत्-कृन्त्=कुरतडणें]

कृतज्ञ—वि उपकार जाणणारा, निमकहलाल, इमानी [स] कृतज्ञता-स्त्री उपकाराची जाणीव [स]

कृताकृत—वि १ बेपर्वा, उदासीन, आवश्यकहि नव्हे व अयोग्यहि नव्हे असा (केल्या तरी चालतील, न केल्या तरी चालतील अशा गोष्टींसबधीं) [स कृत+अकृत] २ निष्काळजीपणानें, अनास्थेनें केलेलें, कांहींहि आस्था नसून केलेलें किंवा मुळींच गाळलेलें, अर्धवट, अपूर्ण 'त्याचे घरीं आचार कृताकृत आहे' -न केवळ संभवनीय स्थिति, घडण्याची किंवा न घडण्याची संभवनीयता ज्यात सारखी आहे अशी स्थिति अल्प स्वल्प सत्व, अस्तित्व 'यदा दुभत्याचें कृताकृत दिसतें' [कृत+अकृत]

कृतांजलि—वि हाताची ओंजळ पसरलेला, ज्यानें दोन्ही हात जोडले आहेत असा, अगदीं नम्र, आज्ञाधीन [स]

कृतांत—पु १ मृत्यु, यम, काळ 'जैसें महाप्रळयीं पसरलें। कृतांतमुख।' -ज्ञा १ ८८ 'काळ्या कृतांत धुधुकारें।' -तुगा ५१ २ दैव नशीब ३ सिद्ध केलेला निर्णय, सिद्धांत [स]

कृतान्न—न शिजविलेलें अन्न, (विशेषत) भात [स]

कृतार्थ—वि १ ज्यानें आयुष्यातील साध्य किंवा हेतु साधला आहे असा, ज्यास कांहीं करावयाचें उरलें नाहीं असा २ कृ कृत्य, तृप्त, समाधान पावलेला, संशय फिटलेला (धर्मशास्त्र इ० सबधीं) [स कृत+अर्थ]

कृतावस्था—स्त्री आपला हेतु तडीस नेल्याची स्थिति, आपल्याकडून आटोकाट प्रयत्न केल्याची स्थिति [स]-क्रिवि आटोकाट, शेवटपर्यंत कमींत कमी किंवा जास्तींत जास्त

कृति—स्त्री १ कर्म, काम, कृत्य, कांहीं कार्य करण्याचा व्यापार २ क्रिया, रीत, पद्धत, युक्ति, प्रकार (उद्योग, धंदा

६० था ) 'दयी पर्यांच्या कृतीत व यत्नात कांहीं एक सुधारणा कोणास सुचविता आली नाहीं ' –सेंपू १.१० 'औषधाची कृति.' ३ सेटच्या वर्ग, द्विपात ४ केलेले काम, साधलेली गोष्ट, कार्य ' रघुवंश हीं कालिदासाची कृति ' ५ ख्याति, पराक्रम 'साण्डव पृथ्वीचे भूप मिळाले साधाया झाल्या कृती।'–ऐपो १७८. –वि कुशल, हुशार ' व्यसनीं सहाय होउनि आम्हांला होय जो परम कृती।'–मोद्रोण११.१५ [स] सामाशब्द– ०प्रधान–वि ज्याने कृतींना प्राधान्य दिले आहे असा (कादंबरी) (इं०) नॉव्हेल ऑफ इन्सिडेंट्स, याच्या उलट मतिप्रधान –विचावि १६१ कृतीचा–वि कृत्रिम, करणीचा, बनावट 'कृतीचीं मायाळे अद्भुत गळा, पुढ करतो।' –सिद्धान्ताखि, मराठी ६ वें पुस्तक पृ १२५ (१८९६) 'हीं कृतीचीं फुलें, पण खरोखरी फुलांसारखीं दिसतात '

**कृतोपकार**—पु १ केलेला मोठा उपकार, कृपा, मेहेरबानी [सं] कृतोपकारा–वि ज्यानें उपकार किंवा अनुग्रह केला आहे असा

**कृत्ति**—न चामडें, कातडें, मृगचर्म [स] ०वास–वि कातडें पांघरणारा (महादेव, शंकर) 'दिसे कृत्तिवासा शिवा वाम भागा।' –नागारत्नमाला (नवनीत पृ ४२४)

**कृत्तिका**—स्त्री सत्तावीस नक्षत्रांपैकीं तिसरें ह्या नक्षत्रांत सात (सहा ?) तारा आहेत त्याची आकृति देशी वस्तऱ्यासारखी दिसते [स ]

**कृत्य**—न १ काम, कृति, कार्य (इं ) ॲक्ट 'प्रेषितांचीं कृत्यें '–बायबल (नवा करार) २ भूमितींत करावयास सांगितलेली रचना, कृतिसापेक्षसिद्धांत, वस्तुपाठ (इं ) प्रॉब्लेम [स कृ=करणें]

**कृत्या**—स्त्री. १ नाशासाठीं आणि मंत्रतंत्रासाठीं बळी देऊन जिला प्रसन्न करून घेतात अशी स्त्रीदेवता, उग्र देवता, राक्षसी 'सर्वांहि चमू प्रेषा राजा भीमक्षयार्थ कृत्यासी।' –मोभीष्म ५ ३२ ' झाली उमा त्या जन्मेचीच कृत्या।' –मोअंबरीष २५ २ (ल ) भांडखोर, कज्जेदलाल कैदाशीण स्त्री [स ]

**कृत्याकृत्य**—न चांगलें व वाईट काम, योग्य व अयोग्य कर्म, कार्याकार्य [स कृत्य+अकृत्य]

**कृत्रिम**—न खोटेपणा लबाडी, कपट, कावा ' कृत्रिम अवघेचि खुंटलें।'–दा१९ ९५ –वि १ बनावट, करणीचें कृतीचें सामासात–कृत्रिम–वेष–रूप इ० २ मनुष्यानें केलेलें, नैसर्गिक नव्हे असें अनैसर्गिक सामाशब्द– ०नाणें–न खोटें नाणें, कमी किंमतीचें नाणें ' असलें कृत्रिम नाणें करून घेतकऱ्याचें व नेटिव्ह व्यापाऱ्याचें म्हणजे, आपल्या बहुतेक सर्व प्रजेचें नुकसान करण्यास कोण त्यादि दुसऱ्या देशांतील सरकार तयार झालें असतें असें आम्हास वाटत नाहीं ' –दि १ १५१ ०पुत्र–पु मानलेला मुलगा, दत्तक मुलगा हा आपल्या मातापितरांचें और्ध्वदेहिक करणारा, वारसदारांतींल एक आहे [स ]०पुत्रिका–स्त्री मुलींच्या खेळांतील बाहुली 'आणा चिरें सरस कृत्रिमपुत्रिकांसी।' –वामन विराट ५ १२३ ०भूमि–स्त्री खोटा, फळ्या, पत्री, यांतील चोपून तयार केलेली जमीन [ग ] ०मित्र–पु १ उपकारामुळें झालेला मित्र फायद्यासाठीं झालेला दोस्त २ (ल) खोटा मित्र [स] ०युद्ध–न १ डावपेचांचें युद्ध, गनिमी कावा २ लटकी लढाई [स ] ०रुपाया–पु १ खोटा रुपाया; बनावट रुपाया २ ज्यांत सोळा आण्यांची चांदी निश्चित नाहीं पण जो सरकारी कायद्यानें सोळा आणे किंमतीचा मानला जातो असा रुपाया (इं )टोकन कॉईन 'हिंदुस्थानांत हल्लीं कृत्रिम रुपायाचा प्रसार आहे ' –भारतीय चलनपद्धति ९१ ०वन–न बाग, आगर, राई, उपवन, उद्यान [स ] ०शत्रु–पु १ आपल्या कृत्यांनीं तयार केलेला शत्रु २ बाह्यतः शत्रुत्व पण आंतून मित्रत्व असा माणूस [स ]

**कृत्रिमी**—वि १ खोटा, कावेबाज, बेइमानी, ढोंगी 'मी कांहीं लबाड कृत्रिमी नव्हे ' –बाळ २ ६८ २ बनावट, मुद्दाम केलेला, काल्पनिक, करणीचा, कृत्रिम पहा

**कृत्स्न**—वि १ झाडून सर्व, सगळें २ पूर्ण, भरपूर, भरएक; संपूर्ण [स ]

**कृदंत**—न (व्या ) धातूवरून अथवा क्रियापदावरून साधलेला शब्द; धातुसाधित [स ]

**कृदंतकाळ**—पु १ कृतांतकाळ २ कठिनकाळ, कृतांत पहा [स कृतांत+काळ ]

**कृदांत**—पु कृतांत (अप ) 'न बाधे काय कृदांतक्षोभ।' –दावि २१६ [स कृतांत]

**कृपण**—वि १ कंजूष, चिक्कू, कवडीचुंबक ' अगभोगांकडे। पाहतां कृपणु आवडे।' –ज्ञा १३ ३०९ 'कृपण तयासी बोलिजे पडे उपाधि ठाईं।' –तुगा ४२८ २ गरीब, दरिद्री, दीनवाणा, कविलवाणा (मुद्रा, चेहरा, भाषण) [स ]

**कृपा**—स्त्री १ दया, मेहेरबानी करुणा २ दानविलेली दया, केलेला अनुग्रह ३ अनुकूल वृत्ति, अनुग्रहबुद्धि, सद्भाव ४ (भक्ति) ईश्वरी कृपा, अनुग्रह ' अवे तुझी कृपा जोडे। तरी मुक्तही वदलास पडे।' –ह १ २७ कृपाघन, कृपारस, कृपावृष्टि असे कृपापूर्वपदघटित समास पुष्कळ आहेत पैकीं कांहीं पुढें दिले आहेत– ०कटाक्ष–दृष्टि–पुस्त्री १ दयादृष्टि, दयनें, अनुकंपनें पहाणें २ कृपा, मेहेरबानी दाखविणें, फरणें ' कृपादृष्टी दासाकडे पाहे। –दत्ताची आरती [स ]०विलग्न–वि दयनें पाझरणारा, दयार्द्र, कृपाळु ' सखीसीं असें बोलता सारसाक्षी। कृपाविलग्न हा होय संसारसाक्षी।' [स ] ०निधि–पु अत्यंत कृपाळु, कृपेचा ठेवा, कृपासागर [स ]०पात्र–न १ ज्याच्यावर दया

करणें योग्य आहे असा (दरिद्री, गरीब माणूस), दयार्ह २ ज्याच्यावर कृपा आहे असा [स] ०वंत-वान-वि १ दयाळु, मायाळु २ ज्यास दया आली आहे असा कृपावलोकन-न मेहेरनजर, दया -वि कृपेनें पाहणारा, कृपादृष्टि, सहानुभूति दर्शविणारा [स] कृपाळ-ळा, कृपालु-ळु-वि मायाळु दयाळु, कृपावंत, उपकारी, अनुग्रही कृपेची नौका-स्त्री (काव्य) देवाची नाव, दया, कृपा 'कृपेची नौका करूनी । तारीं मज भवसागरीं ।' -रावि १ १४२

कृपाण—न तरवार, खड्ग, खंजीर [स] कृपाणी-स्त्री लहान तलवार.

कृपाणिकास्थि—पु (प्राणि) तरवारीसारखा ज्याच्या हाडाचा सांगाडा आहे असे प्राणी, (इं) पॅरस्पॅनॉइड

कृमि—पु १ किडा, आळी, कीटक, लहान जंतु 'जे त्रैविध्य आदी ब्रह्मा । अंतीं कृमी ।' -ज्ञा १८ ५७५ २ (प्राणि) या वर्गांतील प्राण्याचें शरीर वेटाळ्याचें असतें हे सरपटणारे असून नारू जंत आळी या जातीचे आहेत ३ किरमिजी रंग, कोचिनील ४ (अव) जंत (पोटांतील) ०घ्न-नाशक-घातक-हर-हारक-वि कृमींचा नाश करणारें, पोटांतील कृमी नष्ट करणारें (जंत पाडण्याचें औषध, जंताचें औषध) [स] ०वाताळें-न पोटात जंतामुळें होणारी वातविकृति ०शूल-पु एक रोग, जंतामुळें पोट दुखणें 'कृमिशूलें तळमळी तें । तयावरितें ।' -गीता १३ २४९६

कृमी—वि ज्याला जंतविकार झाला आहे असा [स]

कृश—वि १ रोडका, दुबळा, सडपातळ, बारीक २ नाजूक, पातळ (वस्तु). [स]

कृशर, कृशरान्न—न खिचडी [स कृसर]

कृशांग-गी—वि रोडक्या शरीराचा, किडकिडीत, सडपातळ बांध्याचा-ची, स्त्री कृशांगी असणें हें एक सौंदर्याचें लक्षण समजलें जातें 'पोरें सदैव रडती क्षुधितें कृशांगें ।' -वामन (नवनीत पृ १४०) 'शून्यदृष्टी क्षणभर पिळी भचला ती कृशांगी।' -मधुकर १९१९ [कृश+अंग]

कृशान, कृशानन कृशानु —नपु अग्नि विस्तव 'खालीं चेतविती महा कृशानन ।'-रावि १ १३० कृशान प्रवेशेल शुष्क इंधनी ।' [स कृशानु]

कृष(षि)क कृषिजीवि कृषीवल-ळ—विपु शेतकरी कुणबी, शेत करणारा नाना कृषीवळु आपुलें । पाघुरवा परिलें । -ज्ञा १३ २०६ 'कृषीवळें खणलीं भगणें ।' -सुषमा ३ १०८ [म] ०शास्त्र न वनस्पतींची लागवड, जोपासना समग्र पशूंची निपज व त्यांची वाढ, त्याचा उपयोग इ० विषयाचें विवेचन करणारें शास्त्र, शेतकीचें शास्त्र

कृषि(षी)—स्त्री शेती, शेतकी, शेतकाम 'किंबहुना कृषी जिणें ।' -ज्ञा १८ ८८१ 'वैश्यें करावें पशुरक्षण । कृषी करावी धर्में करून ।' -जै ८ २३ [स कृष्]

कृषिकर्म—न शेत नांगरणी, नागरटी, जमीन कमणें [स]

कृषिवर्त—पु (गो) पोर्तुगीज पूर्वकालीन सरकारास ग्राम संस्थाकडून मिळणारा कर [स]

कृष्ण—पु १ विष्णूच्या दशावतारांपैकीं आठवा अवतार, गोकुळांतील गोपाळकृष्ण, देवकीपुत्र, वासुदेव २ अर्जुनाचें एक नाव -वि १ काळा, पाण्यानें भरलेल्या मेघासारखा, सावळा २ कपटी [स] ०करणें-क्रि काळें करणें, तोंड फिरविणें, नाहींसें होणें सामाशब्द- ०कनक-पु काळा धोत्रा ०कावळा-पु डोम कावळा, ज्याची मान पांढरी असते असा कावळा (श्रीकृष्णानें ह्या कावळ्याच्या मानेला दहीं फासलें अशी दंतकथा आहे त्यावरून) ०कृत्य-न वाईट, कपटाचें, नीच, काळेंबेरें कृत्य [स] ०गुजरी-स्त्री एक प्रकारची लुगड्याची जात ०ग्रंथी-स्त्री सोडण्यास कठिण अशी गांठ (श्रीकृष्णानें गोकुळांत एका गवळ्याच्या दाढीची व त्याच्या बायकोच्या वेणीची गांठ बांधली होती त्यावरून) [स] ०तालु-तालुका-टाळू-ताळू-वि ज्याची टाळू काळी आहे असा (घोडा), हें अशुभ चिन्ह मानितात ०तुळस-स्त्री.काळी तुळस ०धत्तूर-पु काळा धोत्रा [स] ०पक्ष-पु १ काळोख्या रात्रीचा पंधरवडा, वद्य पक्ष, ज्यामध्यें चंद्राच्या कला उत्तरोत्तर कमी होत जातात तो पक्ष २ (ल) उतरती कळा, क्षय, ऱ्हास ३ ज्याकडे दोष आहे असा पक्ष, बाजू 'आस्तिक व नास्तिक, शुक्लपक्ष व कृष्णपक्ष अशा जोडप्यांतील तटें एक तर स्वल्पजीवि असतात ' -आगर ३ २०२ ०पक्ष-शुक्लपक्ष-पु १ घट आणि वाढ, क्षय आणि वृद्धि २ खोटेपणा व खरेपणा, वाईट आणि चांगलें ०पक्षी-पुअव (ना) विदुर जातीचे लोक ०मणी-पु विवाहित स्त्रियांनीं घालावयाचा काळ्या मण्यांचा गळसर [म] ०मत-गौरहारी पहा ०मृग-पु काळ्या रंगाची मृगाची एक जात ०मूर्ति-स्त्री अतिशय काळा माणूस, काळाकुळकुळीत माणूस ०मृग-सार-पु काळवीट 'शरभापुढें टिकेना सिंहहि मग काय कृष्णसार धिर ।' -भाद्रोप ११६७ [स] ०मृत्तिका-स्त्री बंदुकीची दारू ०वर्ण-पु काळा रंग ०वर्ण होणें-काळें होणें, एखादी वस्तु, मरणानें किंवा अन्य तऱ्हेनें दृष्टिआड होणें (एखाद्याचा अत्यंत तिरस्कार आला असतां योजितात) 'त्या गुलामाचें ज्या दिवशीं कृष्णवर्ण होईल तव्हा मी येईन ' ०वस्त्र-न काळें वस्त्र [स] ०वाळा-पु काळ्या रंगाचा वाळा ०विलास-क्रीडा-पुस्त्रीअव १ श्रीकृष्णाच्या गोकुळांतील क्रीडा, खोड्या, लीला, पुंडावा २ (ल) पर्वाच्या खोड्या, खेळ ३ व्यभिचार,

सुरतविलास ०सट्ट-वि मानेवरील केंस काळे, आवाज मेघ-गर्जनेप्रमाणें, गंभीर श्वास, कृष्णसर्पास रखा, गति उत्तम आणि धाडसी असा ( घोडा ) -अश्वप १ २३

**कृष्णागर-गरु**—पु एक प्रकारचा चदन 'कृष्णागरमल यागर परिमळ । देवदार वृक्ष तेथें ।'-ह २३ १०० [स कृष्ण+अगरु]

**कृष्णाची गाय**—स्त्री इंद्रगोप, पावसाळ्यात आढळणारा, ल्हान, तावड्या रगाचा, पुष्कळ पायाचा किडा ह किडे समुदायानें राहतात

**कृष्णाजिन**—न काळविटाचें किंवा सामान्यत हरिणाचें कातडें, मृगाजिन 'नाहीं नाहीं चर्मासनु । कृष्णाजिन व्याघ्राबर।' -तुगा ३४२ [स कृष्ण+अजिन]

**कृष्णार्पण**—न १ कृष्णभक्तीनें ब्राह्मणास अगर देवळास जमीन दान देणें २ स्वत्व न ठेवता केलेलें दान ( क्रि० करणें ) [स ]

**कृष्णावतार**—पु विष्णूचा आठवा अवतार [स कृष्ण+अवतार ]

**कृष्णावर्त**—वि शरीरावर एखाद्या ठिकाणीं शखाप्रमाणें भोंवरा असलेला (घोडा), हें शुभ चिन्ह मानतात -अश्वप १ ९१ [स कृष्ण+आवर्त ]

**कृष्णावळ**—पु कायाला विनोदानें म्हणतात कारण तो उभा चिरला म्हणजे शखाकृति व आडवा चिरला म्हणजे चक्राकृति दिसतो व शख, चक्र हीं कृष्णाचीं आयुधें आहेत 'भाग स्त्रीचें मूत्र मळ । लाधुनि म्हणती कृष्णावळ' -तुगा २८२४ [स कृष्ण+वलय=कृष्णावळ ]

**कृष्णावळा**—पु घोड्याच्या पायाच्या आतील बाजूस होणारें आवाळू [स कृष्ण+म आवाळू]

**क्लृप्त**—वि १ शोधून काढलेलें, नवीन निर्माण केलेलें, रचलेलें, बनविलेलें २ निपुण, तरबेज 'न तुजविना आत्ममतें क्लृप्त तुज असे ।'-आप १७ [स क्लृप्]

**क्लृप्ति-प्त**—स्त्री १ युक्ति, कला, चातुर्य; शोध, शकल, कल्पना, हेतु साधण्याची चतुराईची योजना 'कोणी रासायनिक शोध लाविले किंवा कोणी क्लृप्ति काढल्या '-सेंपू २ (प्रस्तावना) ११ २ कल्पना, मसलत, युक्ति, उपाय, तजवीज, तोड (मनामधील) ३ (युद्ध, गुतागुतीची यत्राची) कळ, रचना, तें चालविण्याची रीत, त्याचा उपयोग करण्याची हिकमत [स ]

**के कें**—क्रिवि (चि) कोठें 'माता कें जाइल सावडा । आम्हा पासौनी ।'-शिशु १४१ 'तये वेळीं तू कवणें कें । देखावाशी ।'-ज्ञा १ २२९ 'तो कें आथी म्हणोनिया ।' -गीता २ १४३० [सं क्व]

**के, कें**—क्रिवि कसें 'परदेवा कें नादणें । आपुलेनि आंगीं।' -ऋ ४२ 'पुर्णचंद्रेसीं उपमिजे कें कळाभाग ।'-स्वानु १० १ २१ [स कथ]

**के कें**—सना काय 'तव कें नारदु भणे ।'-शिशु १२६ [स किम्=काय ]

**केउता-ती-तें**—अ १ कोठें ? 'चैतन्य गेलें नेणो केउतीं।' -शिशु ८२८ 'रांडे शिनळी केउती जाति होतीस ?'-पच १ ३० 'केउता गेला रे मुरारी ।'-निगा ४५ २ कोठला, कोठील 'तेथ केउता प्रसगु । मोक्षाचा तो ।'-ज्ञा १६ ४५३ [स कुत्र] ३ कशाला 'केउता कल्पतरूवरि फुलौरा ।'-ज्ञा १० ११ ४ कसा, कशी, 'मज सांडूनि केउती । गोवळाप्रती जातेसी ।' -एभा १२ १०१ 'प्रळयानळा देता खेंव । पतग वांचे केउता ।' -मुविराट ६ ५४ ५ कोणता, कसला 'अनगा केउता हाथि एरू ।'-शिशु २६५ 'इच्छा केउती पुढारीं ।'-मुसभा ६ ११७ ६ केव्हा [स कियत्+उत, प्रा के+उत ?]

**केउलवाणा-णी-णें**—वि दीनवाणा, केविलवाणा पहा, 'येती शरण तुला जे केउलवाणे न ते जना दिसती ।'-मोभीष्म १ ४५

**केऊं**—उद्गा कुत्र्याचें केंकाटणें, कयव 'चोरटें सुनें मारिलें टाळें । केऊ करीं परि न सडी चाळे ।'-तुगा ८८६ [ध्व ]

**केकटणें, केकणें, केकावणें**—अक्रि १ दु खानें ओरडणें, आर्तस्वर काढणें, भोंकणें, भुकणें ( कुत्रें, पारड० नीं ) 'तें कोल्हें केकटून केकटून उड्या मारून मारून '-माकु ३ २४ २ किंकाळणें, मोठ्यानें रडणें [ध्व ]

**केकरट्टा**—वि ( गो ) अर्धें पिकलेलें ( भात )

**केकत-ती**—नक्रि १ घायपातीचें फूल व झाड, केकताड हें उष्ण प्रदेशांत होतें हें कुपणाला लावतात याच्या पातींचे उभे व सरळ तंतु निघतात, त्यांचीं टिकाऊ वस्त्रें विणतात याच्यापासून दोरखंडेंहि करतात [स केतक]

**केकत-ती**—न केतक-की पहा

**केकतड-ताड**—न १ घायपात २ ताडाची एक जात, केकत पहा केकतडाचे सळ-पुअव (चांभारी) दोर, चामड्याची पिशवी शिवण्यासाठीं कातड्याऐवजीं घायपाताचे दोर उपयोगांत आणतात त; तोडा, पट्ठळी

**केकताट-ड**—स्त्री केकतीचें झाड, कुपण, वई

**केकया-यी**—स्त्री १ कैकेयी, भरताची आई २ ( ल ) भांडखोर, कैदाशीण, कजाग स्त्री [स ]

**केंकरा-री-रूं**—पुस्त्रीन मेंढीचें पोर कोकरा-री-रू, पहा

**केंकरें**—न (राजा) फावडें खोरें, केगरें

**केकसणें**—अक्रि खेकसणें, वसकन् भागावर जाणें. [ध्व ककणें-केकसा ]

**केकसा, केकसा मावशी**—अक्रि १ केकया-यी अर्थ २ पहा कर्कशा, कजाग स्त्री २ भेसूर, किळसवाणी स्त्री [स कैकस =राक्षस, प्रा केकस, तुल० का केक्स=अपमानाची भाषा ]

**केका**—स्त्री मोराचें ओरडणें, टाहो, ध्वनि [ स ] **केकावली**-स्त्री मोरोपंत कवीनें केलेली १२१ कवितांची आवली, माळ यांत परमेश्वराचा धावा केला आहे उदा० 'सदाश्रितपदा सदाशिव मनोविनोदास्पदा। स्वदास वशमानसा कलिमलांतका कामदा।' -केका १ [ केका+आवली ]

**केकाण**—न समुदाय 'घेऊनि इंद्रियाचीं केकाणें।' -ज्ञा १८ ४६४

**केकाणें**—न दोरखड -शर ?

**केंकाणें**—न १ केकाण नावाच्या देशांतील घोडा, घोड्याचा एक प्रकार 'जालोरीचे केंकाणे थोरू।' -शिशु ५३७ २ एक देश -अश्वप १ ३७ ३ दौड, धाव ? -शर

**केंकावणें**—न केंकणें पहा '(कुत्रा) दु खानें शब्द करतो त्यास केंकावणें म्हणतात '-मराठी ३ रें पु (१८७३)पृ १२१ [ ध्व ]

**केकी**—पु मोर [ स ]

**केंकें**—उद्गा केंकटणें, केंकणें ( क्रि० करणें ) [ ध्व ]

**केगद-दी**—स्त्री केवडा, केतक-की पहा [ स केतक, का ता केदगे ]

**केगया, केगामती**—केकया-यी अर्थ २ पहा

**केगरें**—न फावडें, खोरें केरें पहा

**केगाद**—न १ ( कु ) केवडा, केगद पहा

**केचित्**—वि कांहीं, कांहीं लोक [ स कश्चित ( अव ) ]

**केचिन्मत**—न एकदेशीय मत सर्वांस मान्य नसणारें मत कांहीं लोकांचें मत [ स ]

**केज-जें**—न १ ( माण व ) मालाच्या मोबदल्याचें धान्य, नारळ इ० पदार्थ उदा० माळणीपासुन भाजी घेऊन धान्य रूपानें दिलेली किंमत ( क्रि० घालणें ) 'आदरासी मोल नय लावू केजें।' -तुगा ३४०४ 'मागच्या आठवड्यांत वाणीं घतलींत त्याचें केजें घाला ' २ मोबदला, मालाची देवघेव [ स क्रय, प्रा केज्ज ] **केजयास कापूर होणें**-भारी किंमतीचा पदार्थ हलक्या किंमतीस विकला जाणें

**केजणें**—उक्रि ( कों ) नारळ, धान्य इ० देऊन त्याबद्दल मासळीचा झुडा, अगर भाजीपाला घेणें [ केजें ]

**केंजणें**—अक्रि ( तंजा ) विनविणें हा जी हा जी करणें

**केंजळ**—अक्रि किंजळ अर्थ १ पहा

**केटर**—वि ( व ) अगानें खिरवाळ 'ती गाय केटरी आहे '

**केटली**—स्त्री चहादाणी किटली पहा 'सुशीलेनें चहाची केटली आणली होती ' -सुदे ११० [ इ केटल ]

**केटा**—वि ( माण ) खिडका, कुजरा, सुमार ( माल ) [ का केड=वाईट, घाण, तुल० स कीटक ]

**केड**—वि कद्रू, कृपण, चिक्कू -शिल्पवि ६३१

**केंड**—न हरिकातील फोल, धान्यावरील आवरण

**कॅंड**—पु निकृष्ट माशाची एक जात, हा काळा असतो

**केंड**—पु १ जळलेल्या गवऱ्याचा ढीग २ ( गो ) ज्वाळा [ का केंड=जळता निखारा ]

**केड करणें**—उक्रि ( बे ) नासणें, नास करणें [ का केडिसु= नाश करणें, बिघडविणें ]

**केडगा**—वि ( क ) कळ, भाडणें लावणारा 'त्या केडग्या पोराच्या नादाला लागू नका ' [ का केडिसु ]

**केंडणार**—वि ( गो ) अवहेलना करणारा [ केंडणें ]

**केंडणी**—स्त्री अवहेलना केंडणें पहा

**केंडणें**—उक्रि १ अडवणें, रोधणें, अडथळा करणें २ ( राजा कु ) दोषारोप ठेवणें, दूषण देणें, तुच्छ लेखणें, टोंचून बोलणें 'कोणाही केंडावें हा आम्हा अधर्म।' -तुगा ४२४५ ३ धुडकावुन देणें, हिडीसफिडीस करणें, अव्हेर करणें, लाथा डणें 'जरि केंडिला तरी हिरा स्तविलाचि शिरीं चढे न शिरगोळा।' -मोआदि २७ ४४ ४ ( सर्व अर्थी ) कोंडणें (उदा० अडवुन ठेवणें, बाधुन टाकणें, रिंदून ठेवणें ?) ५ ( व ) खुरणें, बरोबर वाढ न होणें [ का केडिसु केडु ]

**केडला**—क्रिवि ( चि ) केव्हां [ स कियत्+वेला ]

**केंडलावणें**—( कु ) वेडावणें [ स कटु ]

**केंडशी**—स्त्री धुरशी, धुरा [ का कडु=नासणें ]

**केढवळ केढोळ**—पु पुष्कळ काळ, किती वेळ, फार वेळ 'त्यास जाऊन केढोळ झाला अझून येत नाहीं ' -क्रिवि पुष्कळ काळपर्यंत 'मी केढवळ येऊन बसलों ' [किवडा+वेळ] ०चा-वि किती वेळचा केव्हांचा बऱ्याच कालापूर्वीपासून तो केढोळचा येउन बसलेला आहे '

**केणा-णी**—पुस्त्री केना नावाची शेतांत उगवणारी भाजी, याचीं फुलें निळीं-जांभळीं असतात ह्यांना कातरपानें येतात **केणाकुरडूची भाजी केण्याकुजऱ्याची भाजी**-स्त्री केणा आणि कुजरा या दोन हलक्या पालेभाज्या आहेत त्यावरून भिकार अन्न कण्याकोंडा पहा केण्याकुनिऱ्याची भाजी भोग।' -दावि २९ घागरी-मडक्यांत कांहीं दाणे पहा, दळा त्याची भाकरी कर, कणी कुरड्डची भाजी कर ' -सपतशावारची कहाणी पृ ३२

केणी—केणें पहा १ माल 'तरी तैसी एप काहीं। सावियाचि केणी नाहीं।' –ज्ञा ६ ३८१ २ वस्तु प्रकार ३ बाजारांत विकायास आलेल्या जिनसावरील देशमुख–देशपांडे वगैरे वतनदारांचा कर उदा० पत्रेकेणी, पांकेणी, हा कर वसूल करणारा तो केणी (आडनाव) –भाअ १८३३ पृ १३२ [सं क्रयण, प्रा किण, प्रेंजि कीन=विकत घेणें]

केणें—न वासनाभोंवतीं बांधावयाची सुताची किंवा रेशमाची दोरी, केवणें पहा 'तेया ध्वनितांचें केणें सोडुनि।' –ज्ञा ६ २९२ [केवणें]

केणें—न १ बाजारांत विकावयास आलेला पदार्थ, व्यापार विषयक पदार्थ, (विशेषत धान्य, फळें, भाजी वगैरे) 'इयां पाटणीं जें केणें उपटे।' –पाटणचा शिलालेख 'विकतें देखोनि सुखाचें केणें।' –शिशु ४७ 'तु मोक्षद्वीपाचें केंण भरून। जासी कैलास राजपट लुटून।' –शिली १४ १५५ २ बाजारांतील मालावरील सरकारी कर ३ (सामा) माल, जिन्नस, व्यापाराचा पदार्थ 'द्वारकेमाजीं शब्द केणें।' –एरुस्व ३ १७ 'काय लाभ झाला काय होतें केणें।' –तुगा ६०२ 'व्यास वाल्मीकी व्यापारी। कीर्तन केणें उभाणिती ॥' –भवि २९ ५५ ४ (क) वर्तावळा, घर लावणें ५ (मावळी) पैसा, द्रव्य 'एक घरीं केणें आलें' =सर्व पैसा एके ठिकाणीं जमा झाला

केत—पु १ (राजा) झाडाचा नार, गाभा २ झाडांतील लून लांकूड –शिल्पधि ६६१

केत—पु १ केतु ध्वज 'सुवर्ण केत ' –मुवन १२ ५१ २ इच्छा, हौस 'श्वशुरप्रमुख सासू कृष्ण आराधि केतें।' –मराधा ७८ [स केतु]

केतक—न १ केवडा, केवड्याचें कणीस २ कणसाचें एक पान–पात ३ डोक्यांतील एक सोन्याचा दागिना [स] ०पान–न केतक अर्थ ३ पहा –काचें कणीस–न केतकीचा सबध तुरा, कणीस

केतकद—स्त्री (वों) केतकीचें झाड, केवडा –न केतकीचें लाकूड

केतकी—स्त्री केवड्याचें झाड केतक पहा [स]

केतकी—स्त्री (वों) एक प्रकारचा पक्षी, चाभारीण पक्षी

केतणें—न (घे) गूळ उकरण्याचें उलथणें [का कितु=उपटणें]

केतन—न ध्वज, पताका, निशाण [स]

केतपत—क्रिवि कितपत

केतु—पु १ (ज्यो) नवग्रहांतील नववा ग्रह २ एक दैत्य याचें शिर विष्णूनें मोहिनीरूप घेऊन उडविलें राहु पहा ३ निशाण ४ धूमकेतु, शेंडे नक्षत्र 'उदेला केतु जेंवीं।' –ज्ञा १६ ३१९ [स]

केतुला–ली–लें केतुला–ली–लें—वि (काव्य) केवढा? किती? कसला? कितीसें? 'तें सैन्य सांगों केतुलें।' –शिशु १०३१ 'हे ओठ हात गोटरें। की केवढें पां केतुलें।' –ज्ञा १३ १२ 'वृश्चकविषाचा केतुला केवा।' –मुआदि ८ १९ [स कियत्क]

केतें–पान—न चलहांची गंजिफांच्या खेळांत चारी हुकूम एकास आल्यानें होणारी जीत (सोंगि अव्वा ३) –शार

केथवर—क्रिवि (प्रां) कोठवर? कोठपर्यंत? किती लांब?

केंद्रावणें—अक्रि (कु) केकावणें

केदार—नपु १ शेत २ मळा ३ पाटाचा वाफ 'बाऊस पुरता केदार।' –भाग्र १ ६६ ४ केदारेश्वराचें स्थान, बद्रिकेदार [स] ०खंड–पु शेतबाध; पाणी अडविण्यास बांधलेला धवारा 'केदारखंडबंधन आज्ञापुनि धाडिला तुम्हीं म्हणती।' –मोआदि २ १९

केदार—पु एक वृक्ष –शे १ २५७

केदार–रा—पु (संगीत) एक राग ह्या रागांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल मध्यम, तीव्र मध्यम, पंचम तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात आरोहांत ऋषभ व गांधार वर्ज्य व अवरोहांत गांधार वर्ज्य जाति औडुव–षाडव, वादी मध्यम व संवादी षड्ज गाण्याची वेळ रात्रीचा पहिला प्रहर ह्या रागाचे प्रकार–चांदणी केदार, जलधर केदार, मलुहाकेदार इ० 'मूर्तिमंत केदार वदन तू आणिलास जैसा वाहोनी।' –प्रला २३६ [स]

केंदाळ—न (क) पाण्यांत वाढणारी एक वनस्पति, एक प्रकारचें गवत 'नदींत केंदाळ वाढलें आहे'

केंदी—वि (गो कु) केवढा. [सं कियत्]

केंदोळ—(गो) केढवळ पहा [स कियत्+वत्]

केंद्र—न (गणि) १ दीर्घवर्तुळांतील ज्या दोन बिंदूपासून परीघावरील कोणत्याहि बिंदूपर्यंत अंतराची बेरीज सारखी येते अशा बिंदूपैकीं प्रत्येक, (इ) फोकस २ वर्तुळाचा मध्यबिंदु नाभि (इ) सेंटर ३ (ज्यो) ग्रहाच्या कक्षेच्या प्रथमबिंदूपासून त्याच चवथ्या सातव्या अथवा दहाव्या अंशापर्यंतचें अंतर पतनकेंद्र, द्वितीयकेंद्र शीघ्रकेंद्र मदकेंद्र पहा ४ समीकरणविषय [स तुल० ग्री केन्ट्रान इ सेंटर] ०च्युति–स्त्री (ज्यो) केंद्रापासूनचें अंतर, दीर्घवर्तुळाच्या मध्यापासून एका केंद्राच्या अंतरास बृहदक्षाच्या अर्धानें भागिलें असता येणारें गुणोत्तर (इ) एक्सेंट्रिसिटी –सूर्यमाला २२ [स] ०पराङ्मुख–वि केंद्राकडून दूर जाणारे, केंद्रोत्सारी (ह्याच्या उलट) केंद्राभिमुख–वि केंद्राकडे जाणारे

(इ) कॉन्सन्ट्रेटिंग केंद्रीकरण न एकीकरण, ऐक्य 'लोक मताचें केंद्रीकरण करण्याकरिता राष्ट्रीय सभा आहे' -नि २ ९१. केंद्रोत्सार-गति-स्त्री केंद्रापासून दूरदूर जाणारी किंवा एखाद्या पदार्थास दूर नणारी गति -शिल्पवि ७४२ केंद्रोत्सारक-वि मध्यबिंदूपासून दूर जाणारें (इ) सेंट्रिफ्युगल

केद्रा, केंदवा—अ (कु) प्र केधवा, केव्हा

केधवां—क्रिवि (काव्य) केव्हा, कधीं, कोणत्यावेळीं 'तुम्हे श्रीमुख साजिरें। तें मी केधवा देखेन।' -तुगा २८२ 'सुका म्हणे धीर नाहीं माझ्या जीवा। भेटसी केधवा पांडुरंगा।।' -तुगा ८४६ 'निकरें हाणी न दिसे सोडी हार केधवाचि धरुनि करें।' -मोकर्ण ३८४२ [स कदा, प्रा कइह]

केन—न आक्त ? -शे ७ १७ -नामको

केनशी—स्त्री १ (कों) कुरशी कुरा केंडशी पहा २ लोणा -रा ११ २०१

केनसावण—अक्रि (कों) कुरसणें, कुरशी येणें (अनादि पदार्थास)

केना—(वाई) केणा पहा -मसाप ३ ३ २४६

केनाळ—न (गो) एक प्रकारचें भाताचें बीं, काळासो, करगुर, कोळपा

केनी—केना, केणा पहा

केनी—केनशी पहा

केप—नस्त्री १ बंदुकीच्या घोड्याचा ज्यावर आघात होऊन बार उडतो ती ताम्याची लहान टोपी २ दिवाळीत मुलांच्या पिस्तुलांत घालावयाची दारू भरलेली कागदी चकती [इ कॅप]

केप-पू—न (गो) लाल माणिक [का केंपु=लाल (रंग)]

केपगुजवरी—स्त्री एक फळझाड, ढोलाचा -वागेचा माहिती १६२ [इ]

केपरा—पु १ शेतातून पाटारात भात नेत असता येणारा सुट भरून निघावी म्हणून दिलेली सुट, भत्ता २ विक्रीसाठी स्वल्या सरकारी पिकाची नुकसानभरपाई करण्यासाठी (माग साठी गाभावर) मिळविलेला प्र्री -विल्सनकोश पृ २०२

केपरें-री केमरें-री केयूर-मूर—न (कों) घुघुरें किडा या एक जातीच्या नाशा असून त्यांमुळें झाळ्याजवळ उड तात त्यामुळें डाळ वसात

केपळ-मळ—न १ भिंतीवर अथवा छपरावर लोंबणारी, हागरीं काडणारें गवत(मूर, घुराळ्यापासून) २ पायवी शिवी ३ (ल) सोकर, भटकत म्हातारा बाई

केपळ-पना-पळी केमळ-मना—पुस्त्री १ पाग वा जुनें गवत शाकार जीर्ण शाकारासाठीं केव्हां केव्हा हे घालतात घरावरील गवत, पेंढा एका पावसानंतर पूर्ण निकामी होतो ती केंबळ २ (माण) उसाचा जुना पाला अगर खपलीचें जुनें शाकार, काड ३ लाल रंगाचें गवत, ताबोळी, ताबेटी

केंबळी—वि केंबळानें शाकारलेलें गवताळ (घर)

केंबळ्याघुडा-ड्या—वि घुडा जातीचें भात

केंबें—न (गो) द्रव्य, संपत्ति ?

केम—न यंत्राच्या विशिष्ट प्रकारच्या गतीचें दुसऱ्या प्रकारच्या गतींत रूपांतर (उ० वाटोळ्या गतीचें मागें पुढें होणाऱ्या) करावयाचें साधन [इ कॅम्]

केमटा—वि हलकट, हिमटा, चिक्कू, कृपण केड पहा

केमण—स्त्री (वे) काव, हुरमुज, गेरु [का केंपु-लाल +मण=माती]

केमशी—स्त्री कुरशी केंन्शी पहा

केमसा-शी—पुस्त्री (वायकी) पुरुषाला अथवा स्त्रीला वायका एक शिवी देतात ती

केय—न (व्या) केळ [कळमधील ळचा य उच्चार होतो]

केयडो—पु (गो) एक जातीची मासळी

केयूर—न दडामधील कडें, वेळें बाजूबंद 'जैसा केयूरा दिसीं वसु। सुवर्णाचा।' -ज्ञा १३ १०६५ [स]

केर—पु (गो) मोठा उंच रथ उदा० म्हाळसेचा केर

केर—पु (गो) मासळी

केर—स्त्री (गो) दोन डोंगरामधील लावट शेतजमीन, पावसाळी हंगामाची शेतजमीन

केर—पु १ कचरा, गवताच्या काड्या, धुरळा, शेण माती, गवत पानें इ० चा बारीक सारीक अंश २ गाळ, रेंदा निरुपयोगी पदार्थ, अवशिष्ट भाग -न ३ (कों) बारीक कण, गवत काडी, चमचट तुकडा इ० (सामरेंतील, धान्यातील कापसातील) (भाग) ०फिटणें-कचऱ्याप्रमाणें उडून जाणें, नाश होणें 'तंव भेडासी कवण मातु। काचया केर फिटतु।' -ज्ञा १ १३४ ०फेडणें नाश करणें ०वारा करणें-क्रि घरातील निरनिराळीं कामें करणें ०वारा करून टाकणें-क्रि १ (ल) धमफस करून काम बिघडविणें, नासणें, खराब करणें २ तिरस्कारानें नाकारणें (उपदेश वगैरे) सामाशब्द- ०कचरा-पु केराप्रमाणें निरुपयोगी पदार्थ यास समुच्चयानें म्हणतात ०कतवार-पातर-पु अडगळ गाळगाळ, केरकचरा [केरद्वि] ०कसपट-कस्तान-किरंच-न केरकचरा गवतकाडी; गाळ माळ ०कोंडा-पु कर व कोंडा पराची झाडलोट करणें वगैरे नारकी हलकी नोकरी (उदरभरणाकरितां केलेली) ०कान-खड्ड-पु घराजवळ केर सांचविण्याचा कोपरा कान ०डोर-न घरापासून लोंबणारें जाळें, गवताच्या काड्या, जळमट (चाल्यांना डाकायला लागतात म्हणून) ०पट्टी-स्त्री करणावळ, केर काढण्यासाठी

साधनाने ज नेमतात त्याचा रचे वारण्यासाठीं वसविलेला कर ०पाणी-पोतेरें-न झाडलोट पाणी भरणें सारवणें, सडासंमार्जन वगैरे यायकांचीं रोजचीं कार्यें ०भार-पु केराचा ढीग ०सुणी-सोणी-स्त्री १ केर झाडण्यासाठीं शिंदीच्या पातीची अगर नारळीच्या हिराची केलेली झाडणी, साळवण, मळाची २ आवदी स्त्री, आळशी स्त्री -वि नेहमीं घाबुन झापनी घालविलेला (घोडा) दबकगाडया पहा [सं केर+गवाहनी] म्ह० १ केरसुणीच्या काडया मोहाेर फळ नाहीं २ केरसुणी पाहून जात आणि दिवा पाहून यत -ममाप४ ४७७ ०सुणीकार-रू-पु झाडलोट करणारा नोकर 'तव गोरभटु नामें केरसुणीकारु।' -पव १२६ केराचारी-केरासमान-वि टाकाऊ कवडी किंमतीचा (माउ)

**केरणें**—अक्रि खाणें १ -शर

**केरवळ्या(कोणाच्या)**—पुअव ग्रह माध, कोणफळ सोडून व उकडून त्यात मीठ घालून वाटून त्याच्या लाटयांत खोवल्याचा कीस, गुर्दसुमाचे दाणे यांचें पुरण भरून तळून काढतात -गृशि १४७५

**केरवा**—पु एक चिनी मातीचें भांडें 'केरवा नांवाचें चिनी मातीचें पात्र आहे त्यांत एक मुबईमण गुलाबपाणी असतें' -मुव्या ११९ [फा कहरुवा]

**केरवा**—पु केरवा नाच कारवा पहा

**केरवा**—पु तबल्याचा एक बोल याच्या मात्रा ४ धागे न धिनक धीं धाग न तिनक धीं

**केरवा**—पु १ घागदयाचा एक प्रकार २ पिंवळा रत्नमणि, तृणमणि [फा कहरुवा]

**केरा**—वि (व) १ तिरप्या नजरेचा, चकणा २ वाकडा [स कक्र-तिरवा]

**केरावण**—अक्रि (कों) धान्य वगैरेमध्यें केरकचरा मिसळणें [स कर]

**केरावाऱ्यात-निर्शी**—क्रिवि १ धाणींत केरांत (याव रून ल) २ वाऱ्यावर, गमावलेला, गेलेला, उडून गेलेला [केर+वारा]

**केरी**—स्त्री १ केर, काडया (नागरानें उपटून निघालेल्या) केरकचरा (पाण्याच्या ओघावरोवर आलेला भरतीवरोवर आलेला) २ जमीन भाजल्यावर राहिलेलें कवळ वगैरे शेतातील धस सुर पिकावरोवर वाढलेलें तण पाचोळा ३ (कों) माडाच्या पात्याची विणलेली पाटी [केर]

**केरी**—स्त्री एक प्रकारचा विहिरींतील मासा -मसाप २४७

**केल ळ**—न १ काटीचें दुबेळकें दोकें भाग २ दुबेळें दुबेळक्याचा काटा ३ मोडलेल्या फांदीचा झाडाच्या खोडावर राहिलेला भाग ४ काठीला लाविलेली आंकडी

**केन(ळ-य)टॅ-डॅ, केल्हॅ**—न (कों गो) माकडाचें पिल्लू माकड [पा केल्दा] म्ह० करायला गेला गणपती तों झालें केलडें

**केल्डॅ**—न (नाविक) कपीसारखें पण साधारण लांवट चाक

**केलमल**—पु (पैशाडी) रुपयांना सांकेतिक शब्द -गुजा ४२-४३

**केलाडु**—न (कों) लहान मूल लेकरू

**केलि**—स्त्री (काव्य) खेळ, करमणूक, क्रीडा, विलास, विहार 'जगन्मीलनाविरल-केलिप्रिय।'-ज्ञा १८६ 'सिंधूंत तरेल कशी जी कली केलि-हेतु नाव सरी।'-मोर (नवनीत पृ ३००) ०कलह-पु प्रीतिकलह, लाडझगडा, खेळांतील विनोदाचें भांडण [स केल=खेळणें-केलि-ली]

**केलें**—न कर्म, कृत्य 'न देखे आपुलें केलें। परापवाद स्वयें बोले।' -एभा २३ २७४ 'आपल्याचें केलें कोण वारी।' व १५ [स कृ, म करणें-केलेलें] ०न केलेंसें करणें-निष्काळजीपणानें, कुचरपणानें एखादें काम करणें

**केलेला पुरुष**—पु अनुभवी व सरावलेला माणूस, प्रौढ

**के(कें)व**—स्त्री करुणा, याचना कींव पहा [कीव]

**केवट, केवटपण**—न किरकोळीचा व्यापार, किरकोळ विक्री-व्यवहार [सं क्री=विकत घेणें]

**केवटळ**—स्त्री ओढा किंवा नदी यांच्या काठीं असून जींत डोंगराच्या वरच्या प्रदेशातून गाळ वाहात येऊन बसतो अशी जमीन घडवा मळई -कृपि १६ [केवटा]

**केवटा**—पु गाळानें बनलेली जमीन, बारीक गाळ, माती 'ही जमीन नदीच्या केवटयाची असावी' -बागेची माहिती ३ -शे ९ १०७

**केवटा**—वि अति कृपण, चिक्कू, चिकट

**केवटा-टी-ट्या**—वि मोठ्या दुकानातून खरदी करून किरकोळ भावानें जिनस विकणारा किरकोळ, लहान व्यापारी, धाऊक खरेदी करणारा, केवणी [ववट]

**केवडा**—पु १ केतकीचें झाड व त्याचा तुरा, कणीस हिंदुस्थानात पाणथळ जागीं केवडा होतो पांढऱ्या जातीस केवडा व पिंवळया जातीस केतकी म्हणतात केतकीस फार सुवास यतो, त्याचें तेल व अत्तर काढतात २ बायकांच्या वेणींतील लांबट चौकोनी सोन्याचें फूल ३ अगरख्याची काखेंतील कळी ४ वेणीचा एक प्रकार (क्रि० घालणें काढणें उतरणें) ५ जोंधळयावरील एक रोग -शे ९ ३२ [स केतकी, हिं केओडा, केवडा गु केवडो] केवड्याचा साप-पु स्त्रीपुरुषाच्या स्वरूप-देहयाला म्हणतात -चें कणीस न केतकीचें फूल

**केवडी**—स्त्री केतकी, केवडा पहा

**केव(व्ह)डा-ढा**—वि किती, पुष्कळ, मोठा ?, किती प्रमाणानें, अशानें ? (प्रश्नार्थानें किंवा मोघम रीतीनें उपयोग) एव्हडा (कमातील मजकूर) पहा [स कियत् वृद्ध, प्रा केवड] **केवढयाचा-नें**-कितव्याचा, कितव्यानें, कितकावा पहा **केव(व्ह)ढ्या नदां**-क्रिवि केवढया मोठया आवाजानें

**केवण**—स्त्री मुरुडशेंगेचें झाड, साधारणपणें हें पुरुषभर उंच असतें याचीं पानें मोठीं नसतात शेंगा मुरड घातल्याप्रमाणें असतात झाडाच्या सालीचीं दोरखंडें करतात —वगु २ ५६

**केवणें**—न १ कापडाचा गठ्ठा बांधण्याची दोरी ( रेशमी अगर सुती ) केणें पहा २ साठा, संचय, पुंजी केवा पहा

**केवन्या-न्यो**—स्त्रीअव ( कु गो ) न्यून, उखाळ्यापाखाळ्या [ स किम्+ऊन-न्यून ]

**केवल-ळ**—वि १ शुद्ध, स्वच्छ, मिश्र नसलेलें, निर्भेळ 'हें भांडें केवळ चांदीचें आहे ' २ ज्यास दुसऱ्या कोणाचेंहि साहाय्य नाहीं असा, एकटा, फक्त, मात्र 'केवळ तांदूळ असल्यानें भोजन होत नाहीं ३ निवळ, नुसता, शुद्ध 'तो केवळ भोळा नाहीं कीं ठकला जाईल ' —क्रिवि १ बरोबर रीतीनें, नियमित रीतीनें, नियमानें, निश्चितपणें 'केवळ नाहीं म्हणवत नाहीं ' 'केवळ तूंच यावें नलगे, तुझा भाऊ आला तर कामास येईल ' २ अगदीं, निखालस, हुबेहूब, सादृश्यामुळें तद्रूप दिसणारें 'ही नगरी केवळ लंका दिसते ' ३ बिलकूल, मुळींच 'दक्षिणेंत केवळ असामी नाहीं दुसरा।'—ऐपो २३६ —वि निश्चळ, अकर्ता 'तो पुरुष स्वतंत्र असून निसर्गतः केवळ म्हणजे अकर्ता आहे '—गार १६२ सामाशब्द— **०उष्णमान**-न मूल शून्यांशापासूनची उष्णतेची तीव्रता ( इं ) ॲब्सोल्यूट टेम्परेचर **०प्रयोगी**-वि उद्गारवाचक (अव्यय), जीं अव्ययें वाक्यांत असतां ज्यावरून वक्त्याचे अथवा सांगणाराचे हर्षशोकादि जे मानसिक विकार अथवा उद्गार यांचा उद्बोध होतो त्यास-त्याचा वाक्यांतील इतर शब्दांशीं कांहीं संबंध नसतो म्हणून केवलप्रयोगी अव्ययें अथवा उद्गारवाचक अव्ययें म्हणतात **०नैय्यायिक-वैय्याकरण**-पु नुसता न्याय अथवा व्याकरण जाणणारा **०व्यतिरेकी**-वि ( न्याय ) केवळ नास्तिपक्षानें संबद्ध असलेला अभावाचा संबंध असणारा, याच्या उलट केवलान्वयी, अन्वयव्याप्ति पहा [ स ] **केवलेश्वरवादी**-वि फक्त ईश्वराचें अस्तित्व मानून धर्म हा ईश्वरप्रणीत आहे हें मत न मानणारा

**केवल(विल-वुल)वाणा-णी**—वि दीन, ज्याबद्दल कींव, दया उत्पन्न होईल असा, बापुडा, विव्हळणारा ( स्वर, मुद्रा इ० ) 'का मातेनें टाकिलें तान्हें। तें अनाथ दिसे केविलवाणें।' 'वधु नको मजकडे केविलवाणा '—एफ [ स कृपालु प्रा किवालु म केविल ( कींव )+वाणा ]

शको. २ ३९

**केवला**—पु ( गवंडी, व ) भिंतीचा पुढील अगर मागील भाग, टोंक, चादईचा शेवट

**केवला**—वि ( क गो ) ( नद भाषा ) एक ही संख्या ( इसम, रुपाया इ० ) 'केवला हरवला ' =रुपया हरवला [स केवल ]

**केवल्यावावल्यो**—स्त्रीअव ( कु ) चेष्टा, टिवल्याबावल्या [ बाहुली द्वि ]

**केवशान**—क्रिवि ( गो ) कोठून

**केवा**—पु १ साठा, संग्रह पुंजी, डबोलें २ ( नदभाषा, क ) रोख रक्कम, रोकड 'गरीबांना केव्याची जरूरी असते ' ३ महत्त्व, सामर्थ्य, प्रौढी, पाड ( निषेधार्थी प्रयोग ) किंमत पहा 'सतभजनी माझा सद्भावो। केवा कोण पाहा भक्तीचा।' —एभा ११ १५५३ 'तक्षकविषाचा केतुला केवा।'—मुआदि ८ १९ 'परि केवा काय तिचा शत्रु दलाचा अफाट विस्तार' —विक ६७ [ स की-कय ? ]

**केवि(वीं)**—क्रिवि ( काव्य ) कसें, कोणत्या रीतीनें, कशासारखें, कोणत्या प्रकारानें ? 'तो केवि मार्गी इथें। क्षेमी होए।' —ऋ ७ 'श्रुतिहिहि म्हणे सदा स्तविल आमुची केंवि धी।' केका २७ [ स कथम् ]

**केवी**—स्त्री ( कीं गो ) कवा अर्थ १,२ पहा

**केवी**—पु ( राजा ) उपरी-ऱ्या शेतकरी, परगांवचें कूळ, याच्या उलट गावरी, वतनदार

**केवूं**—पु कसा, कशी ? केवीं पहा 'प्राणेश्वरा त्यजूनी केवूं। वाचूं म्हणतसे ते नारी।'—गुच ३० ९०

**केवेळीं**—क्रिवि केव्हांहि 'वाचा केंवेळीं न वचती।'—ज्ञा ४ ६० [ स कियत्+वेला, प्रा के+वेला, म केवेळ ]

**केव्हडा**—पु केवडा पहा

**केव्हां**—क्रिवि १ ( प्रश्नार्थक ) कोणत्या वेळीं ? कोणत्या प्रसंगीं समयास २ ( जोरानें उच्चारला असतां ) कोणत्याहि वेळीं, कधींहि ( निषेधार्थी प्रयोग ) 'मी केव्हां गेलों नाहीं ' ३ केव्हां केव्हां 'जुनीं वस्त्रें मी तुला केव्हां देतें खरें ' ४ किती काल झाला असताना, 'तो केव्हां आला हें मला ठाऊक नाहीं ' केव्हां व कधीं यांच्यामध्यें भेद आहे केव्हां यानें नुकत्याच होऊन गलेल्या काळाचा बोध होतो व कधीं यानें कोणत्या तरी बऱ्याच पूर्वीच्या काळाचा बोध होतो सामाशब्द— **०कधीं**-क्रिवि कधीं कधीं, कांहीं कांहीं प्रसंगीं, मधूनमधून **०च**-क्रिवि अगदीं त्याच क्षणीं, लगेच (मागल्या काळाबद्दल गत कृत्याकडे संबंध) 'घोडयास गवत घातलें तें त्यानें केव्हांच खाल्लें ' **०चा**-वि पुष्कळ काळपर्यंत, किती वेळचा (गलेल्या, असलेल्या, बसलेल्या व वाट पाहिलेल्या माणसाबद्दल योजतात) 'तो केव्हांचा येऊन

बसलेला आहे ' ०केव्हां, केव्हांना, केव्हां, नाहीं केव्हां. **केव्हांतरी**-क्रिवि कधींकधीं, मधूनमधून; वेळेनुसार. **०शीक-सक-साक**-क्रिवि. ( कुण. ) १ केव्हाहि ( निषेधार्थी ). २ केव्हांच. **केव्हांसा**-क्रिवि. ( व. ) कोणत्या वेळेच्या सुमारास. ' तो केव्हासा गेला ?

**केव्हेळी**—क्रिवि केव्हां तरी.

**केश**—पु. केस, वाल, रोम; लव. ( याचें अव. केश असेंच होतें ). 'केश म्हणिजे मस्तकींचे ।' –एभा १८२०. [सं. तुल० फ्रें जि. केश ] वाप्र व म्हु० १ हातास ( मनगटास ) काय केश आले ? =मी काय म्हातारा, अशक्त, दुर्बल झालों ? २ केसाच्या अंबाड्या होणें-केस पाढरे होणें; वृद्धावस्था येणें. ' आमच्या केंसांच्या अंबाड्या होत चालल्या, आता आम्हांला इंग्रजी शिकून काय करावयाचें आहे ? ' ३ सुटलेले केश पाटीला शरण (आहे त्या स्थितींत राहावें लागणें ) अनन्यगतिक, हतभागी माणूस. सामाशब्द- **केशटयो**-पुअव (गो ) झिपऱ्या. ( लघुत्वदर्शक ) **०तोड**-केसतुड पहा. 'काखमाजरी केशतोड ।'–दा ३ ६.१७ **०धरणी**-स्त्री. केशाकेशी; झोंटधरणी. एकमेकांचे केंस धरून केलेलें युद्ध, मारामारी. 'वीरा झाली केशधरणी ।' –जै ७५ ७५ **०पाश-जाल**-पु केशाच्या जटा, बांधलेले, वेणी घातलेले केश, पुष्कळ केस. **०पुळी**-स्त्री (गो.) करट. **०बंध(संयुक्त हस्त)**-पु ( नृत्य ) पताकहस्त करून ठेवणें **०वपन**-न केशाची श्मश्रू करणें, केस काढणें, हजामत ( विशेषत विधवांच्या बाबतींत योज तात ). ' विधवांनीं केशवपन केलें नाहीं तर त्यानें या राजकीय प्रश्नाचा उलगडा होण्यास यत्किंचितही मदत होण्याचा संभव नाही.' –टि ४ १८६ **०वाहिनी**-स्त्री. (प्राणिशास्त्र) केसासारखी सूक्ष्म नलिका, सूक्ष्म प्रवाहसाधन (इं ) कॅपिलरि. **०विचरणी**-स्त्री. केश विंचरण्याची फणी **०संवाहन**-न. केस धुवून पुसून साफ करणें. **केशाकर्षण**-न. (शाप ) अत्यंत बारीक छिद्राच्या नळींतून द्रव पदार्थाचें होणारें आकर्षण. ( इं ) उदा० ' काप साच्या वातींत तेल चढतें तें केशाकर्षणाच्या साहाय्यानेंच होय ' **केशाकेशी**-केश धरणी पहा. 'तुम्हीं ही शब्दांची केशाकेशी चालविली आहे ' –नाकु २०३ **केशांत**-पु घोड्याच्या कपाळावरचा भाग –अश्वप १ ६१. **केसानें गळा कापणारा-काप्या**-वि मधुन गोड बोलून विश्वासघात करणारा, गळा शब्द पहा.

**केशर**—न जाफरा, काश्मीर या देशांत होणारें एक ततुमय सुगंधी द्रव्य, याचा उपयोग लाडू, जिल्बी इ० खाद्यपदार्थांस रंग व सुवास देण्याकरितां करतात. याला कुंकुम, अग्निशेखर, काश्मीरज, पीतक, कादिमर, रुचिर, वर, पिशुन, रक्त, शठ इ० नावें आहेत. याचीं झाडें नेपाळ, काश्मीर इकडे होतात. हें झाड लहान असून लागवडीनंतर दोन तीन महिन्यांनीं यास फुलें येतात. यास तीन पाकळ्या असून आंत तंतु असतात, तेंच केशर. रंग तांबूस असून तंतू लांब असले म्हणजे तें उंची प्रतीचें केशर होय. –वगु २.५७. २ एक झाड. याचा रंगाकडे उपयोग करितात. कपिला. [ सं. ]

**केशरा**—पु. मरेन किंवा मारीन या पूर्वनिश्चयाचें चिन्ह म्हणून लढाऊ शिपाई जो केशरी रंगाचा पोशाख अंगावर घालतात तो. विशेषत· रजपूत योद्धे केशरा घालीत ( क्रि० करणें; घेणें ). [ केशर ]

**केशरी**—वि. १ केशरासंबंधीं; केशरयुक्त; केशरी रंगानें रंगविलेलें; केशरी वस्त्र परिधान केलेलें ( केशरी बर्फी, केशरी पातळ इ० ) २ केशरी पोषाख करून जिवावर उदार झालेला ( योद्धा ) –स्त्री. १ केशराची उटी. २ केशरमिश्रित पक्वान्न, पदार्थ ( केशरीभात, मिठाई इ० ). ३ एक फूलझाड. **०गंध**-न. कपाळादिकास लावावयाकरितां केशर, कुंकु, रवे इ० चें जें गंध करतात तें **०भात**-पु केशर, साखर, बदाम, लवंगा इ० घालून केलेला भात

**केशान्या**—वि १ रेषा असलेला ( आंबा ). २ केशरा पहा.

**केशव**—पु विष्णूच्या चोवीस नावांपैकीं पहिलें. ' केशव हा शब्दहि केश म्हणजे किरण या शब्दापासून निघाला . . ...' –गीर ६०७ [ सं. ] **०करणी**-स्त्री. १ विष्णूचा पराक्रम. २ परमेश्वरी लीला 'केशवकरणी अद्भुत लीला नारायण तो कसा । तयाचा सकल जनावर ठसा ।' –राला १३. **०माधव**-पु १ विष्णूच्या चोवीस नावांपैकीं पहिलें व तिसरें नांव २ (ल.) कुरसलेल्या पदार्थांतील बारीक किडे, अशुद्ध पाण्यातील किडे.

**के(कें)स**—केश पहा. (काहीं वाप्र) **०काढणें**-श्मश्रु करणें. **०नखलणें**-केंसांतून नखें ( बोटें ) फिरवून ( फणीप्रमाणें ) केंस व्यवस्थित करणें, जटा काढणें. ' वेणी विंचरली केंस नखलून । अलंकार चढविले हिऱ्याचे कळसकाप कुंचलून ।' –भला २२७. **केसानें गळा कापणें**-विश्वासघात करणें, गोडगोड बोलून फसविणें ' चाडाळानों, हरामखोरानों दगा करून आमचा सर्वांचा केसानें गळा कापलात अँ ! ! –कांचनगड. **केसानें चरण झाडणें**-सेवा करण्याचा कळस करणें, अगदीं हलकी सेवा करणें.' पाहिन क्षणभरी । चरण झाडीन केशीं । ' –धावा, नवनीत ट ४४९. **केसास धक्का लागूं न देणें**-उत्तम प्रकारें संरक्षण करणें, उपद्रव होऊं न देणें. ' तुझिया ढका न लागो साधुपिपी· स्निग्धमृदुला केशा ।' –मोकर्ण ५०.३. म्हु० १ (गो.) केश· राचो पार ना तर घोडयांक कोण विचारता=मोठमोठ्याची दाद नाहीं तर गरिबाची काय कथा ! २ केस काढल्यानें मढें हलकें होत नाहीं. =थोड्याशा मदतीनें काम भागत नाहीं. ३ हजार घोडक्या आणि एक केसकरीण=निराधार अशा पुष्कळ निराश्रितांमध्यें

थोडीशी मालमत्ता बाळगून असणारा ४ ज्यानें केसकरणी गिळल्या त्यास थोडकीचा काय पाड सामाशब्द- ०करीण-स्त्री सकेशा विधवा ०टी-स्त्री १ घाणेरड्या, विसकटलेल्या केसाच्या झिपऱ्या २ (तिरस्कारार्थी प्रयोग) केंस केशटयो पहा ०तूड-तोड-नपु केस तुटल्यानें होणारा फोड, गळू ०पिक्या-वि म्हातारा 'हा केंसपिक्या सयाजीरावाचा वडील भाऊ' -विवि ८.२ ३० ०पुळी-(गो) केसतुड पहा ०भर-क्रिवि थोडें सुध्दा 'मग एवढीं जड पारडीं उचलली असता खादा केसभरहि इकडे कीं तिकडे कलत नाहीं' -नि

**केस**—स्त्री १ कज्जा, खटला 'कोर्टांत ही केस चालू असल्यानें त्यासंबधीं लिहिता येणार नाहीं' २ (छापखाना) अक्षराचे खिळे (टाईप) ठेवण्यासाठीं लहान लहान खण असलेलें टाइपाच्या उचीइतकीच खणाची उची असलेलें खोकें, यांत दोन भाग असतात अशीं दोन खोकीं मिळून एक केस होते त्यापैकीं एकीस अपर (वरची) व दुसरीस लोअर (खालची) केस म्हणतात सामान्यत कोणतीहि वस्तु ठेवण्याची पेटी, डबी वगैरे ३ रुग्ण, आजारी मनुष्य 'या डॉक्टरकडे आज प्रथमच केस आलेली दिसते ४ मृत्यु विशिष्ट रोगानें आलेलें मरण 'शहरात रोज प्लेगच्या केसी २५ होत असत [इ केस]

**केसणा-णी, केसना नी**—क्रिवि किती? केवढा? 'परमाणुची केसनी थोरीं।' -दाव ३८८ 'विरडिया पाड तो केसणा। तू देखणा निजदृष्टीं।' -एरुस्व १६ ७५

**केसपट**—न केर, बारीक कण कसपट पहा [केस+पट]

**के(कें)सर**—पुन १ फुलातील तंतु 'का कमळावरी भ्रमर। पाय ठेविती हळुवार। कुचुंबेल केसर। इया शका।' -ज्ञा १३ २४७ २ आंब्याच्या कोयीला असणाऱ्या शिरा -न १ भाताचें लोंगर, कणीस, लोंबी २ मजरी मोहोर,(तुळस आंबा इ०चा) ३ कसपट, केर, बारीक कण, केसपट ४ सिंहाची, घोडयाची आयाळ -अश्वप १ ६२ ०वोंडी-स्त्री केसर, एक प्रकारचें झाड याच्या बोंडात केशरी रगाचा गर व बिया असतात

**केसरणें**—अक्रि मोहोर येणें 'वसत ऋतूतें फळझाड केसरतें

**केसरिया**—केशरा पहा

**केसरी**—स्त्री १ पाचेचें झाड व त्याचें फूल २ भाताचें लोंगर घोंस -पु सिंह ऐसें कलुप्रकेसरी।' -ज्ञा १७ ४२३ 'कुरगकेसरीची सपत्ती। चैत्यजनुक जे गा नेती। -एरुस्व४ १७ [स केसरी]

**केसरी-ऱ्या**—वि १ केशरी वस्त्रानीं आच्छादिलेलें केशरी रगाचा पोशाख घातलेला केशरी-रा पहा २ रेषा असलेला (आबा)

**केसरी, केसारी, केसाळी**—स्त्री १ दृष्ट लागू नये म्हणून (अस्वलाच्या) केसाची केलेली दोरी जनावराच्या गळयात बाधतात ती २ केसाची दोरी [केस+सरी]

**केसरीबोंड**—न केसरबोंडीचें बोंड

**केसार**—पु (गो) बगळयाच्या जातीचा एक पक्षी

**केसारीण**—स्त्री केसाच्या दोरीचा गळफास लावून मनुष्यास मारणारी स्त्री (अशा स्त्रिया असतात अशी दतकथा आहे) [केस]

**केसाळ-ळा-ळू**—वि अगावर पुष्कळ केंस असलेला [केस]

**केसा(सो)ळी**—स्त्री (व ना) आगवळ, वेणी घालताना जी लहान दोरी वेणीच्या टोंकाला बाधतात ती केसरी केसाळी पहा

**केसाळीण**—स्त्री (तजा) सकेशा विधवा स्त्री

**केसुरडी**—केसरी पहा

**केस्ताव**—न (गो) भाडणतटा

**केस्तोड**—केसतुड पहा

**केहरवा**—पु १ केरवा, कारवा पहा २ (ताल) ह्यास मात्रा चार व विभाग दोन असतात केरवा पहा

**केंही**—क्रिवि कोठें? 'दुरी केंही न वचावें।' -ज्ञा ३ ८९ 'केंहीं न माये तेने सतोसे।' -उपा ७७७ [स क+हि]

**केहेठीं**—क्रिवि (चि राजा) कोठून? 'तुम्हीं केहेठीं आलेत?' -लोक २ ६१ [स कुत +स्थानात्]

**केळ**—पु (गो) पिंपळाच्या जातीचें एक झाड

**केळ**—स्त्री केळीचें झाड हें पुष्कळ दिवस टिकणारें, कदरूप आहे त्याला मोठीं पानें येतात त्याच्या अनेक जाती आहेत गोवें कर्नाटक वसई इकडे याचें पीक फार कच्च्या केळयाची, व केळफुलाची भाजी होते सोपटाची राख कोष्टी व धनगर लोक सूत रगविण्याकडे वापरतात पानाचे दाडारे वाळवून त्यापासून उत्पन्न होणारा क्षार कोंकणात परीट लोक साबणाप्रमाणें वापरतात -वगु २ ५७ वैष्णव लोक कपाळास जी अक्षत (काळा टिकला) लावतात ती हळकुड उगाळून त्यात सोपटाची राख कालवून करतात केळीच्या मुठेळी, तांबळी, वसराई वलची सोन राजेळी, म्हैशेळी इ० जाती आहेत आगाशीकडे केळीं वाळवून तयार करतात त्यास सुकेळीं म्हणतात 'फेइन केळयाची सालडी।' -विउ ४ ६२ 'धिवर निरन्धर्नी केळ पोसल्यें।' -प्रला २२९ २ केळीचें फळ ३ ब्राह्मणी पागोटयावरील कपाळपट्टीवरचा भाग, जिनी ४ स्त्रिया लुगडयाच्या निऱ्या पोट जवळ खोवून केळयाच्या आकाराचा भाग करतात ता [स कदली, प्रा कयल-केल] (वाप्र) **केळें खाणें-सासरखाणें**-(ल) खोटें बोलणारा मूर्खासारखी बडबड करणारा वगैरेना औपरोधिक शब्द योग, गू खाणें, झक मारणें तू किंवा तो तर आपल्या घरचा

राजा असे याच अर्थाचे कांहीं वाक्प्रचार आहेत सामाशब्द- ०खांड-न न मरणारें केळें, बांझकेळें यानी भाजी करतात ०फूल-थांड-कमळ-न केळीच्या कोंवयापासून निघालेलें फूल हें कडू, तुरट, मादक, अग्निदीपक, उष्ण, वीर्यवर्धक नाशक आहे याची भाजी करतात केळंबा-भा-पु १ केळीचें पोर, पासांबा, नवीन फुटलेला कोंब, केळीचें रोप (क्रि० फुटणें) २ भवेणीचा पोगा पोगावा, काल ०घंड-घडी-केळघली-स्त्री (कों) केळफांचा घड, लोंगर, त्यांच्या दांड्यांचा झुबका 'बारा महिने नेहमीं केळवडी पिकत '-पाब्द ११ ०घत्तर निरी-स्त्री परवटणाची सर्वांत वरची निरी 'केळवत्तर निरी झळंकली।' -शिशु ४१ ०घली-स्त्री पिकलेली केळीं मोदकपात्रात साली सकट उकडून काढून, तीं सोलून, कुस्करून त्यांत साखर नारळाचा खव इत्यादि घालून या पुरणाचे मोदकासारखें पक्वान्न तुपांत तळून करतात ते -गृशि १ ४६४ ०घा-पु (कों) केळबा भा- पहा केळीचा कांदा-पु कळीचा गड्डा, हा वातनाशक व स्त्रियांच्या प्रदर रोगावर औषधी आहे -योर १ ४६ केळ्याचा हल्धा-पु राजळी केळीं मोठालीं तीन.पेऊन सुरावीं व त्यांत साखर, तूप मिसळून, थोडें चुलीवर आटवून तें ताटात ओतावें व त्याच्या वड्या पाडून त्यावर बदामची पसरावें -गृशि १ ४२३

केळचें—क्रि (गो) यद्य करणें

केळडें—न केलडें पहा 'बाघ पडला यावी केळडें गांड दावी '-लोक २ ७१

केळवण—स्त्रीन गडगनेर पहा [का केळे=स्नेह, एरी ? +वण]

केळवण—न (राजा) काळजी, काळजीपूर्वक सभाळणें [का केळ=लक्ष देणें, काळजी ठेवणें ?]

केळवणें, केळावणें—सक्रि १ (काव्य) केळवण करणें, गडगनेर करणें 'कन्या नेली निज मडपासी। हर्षेनेशी केळ वला।'-एरुस्व १४५१ केळावला वर असें शिशुपाळ राजा। -अक कृष्णकौतुक ३० -अक्रि २ (ल) सजणें, नटणें, शोभि वंत दिसणें, मिरवणें 'भीमाकरीं ले केळवली। गदा नोवरी सगुणाथिली।'-मुसभा १५११२ -सक्रि सजविणें, शृंगारणें 'केळवती व्यभिचारणी। दैन्यवाणी पतिव्रता।'-तुगा ४१४९

केळविणें—उक्रि काळजीनें सांभाळणें जोपासना करणें [का केळ]

केळवली—स्त्री १ केळवलेली, केळवण झालेली नवरी 'आतरी केळवली नोवरी।'-ज्ञा १३ ५५१ २ (ल) सुखी

केळा—पु कल्हा, मडकें, मातीची घागर [स कलश, का केळ=मातीची घागर]

केळांबा, केळ्या आंबा—पु १ आंब्याच्या झाडाची एक जात याला केळीच्या फळाकारमें लांबट फळ येतें २ त्याचें फळ [केळ+आंबा]

केळी—स्त्री धातूची अथवा मातीची लहान कळशी, घागर, केळा, चिंदगी [का केल] म्ह० केळीवर नारळी घर चंद्रमौळी =मातीच्या लहान मडक्यावर एक नरोटी आणि मोडकें-ज्यात चांदणें पडतें असें-झोपडें (अत्यंत दारिद्र्याचें चिन्ह)

केळी—स्त्री जोंधळ्याची एक जात

केळी—स्त्री केळीचें झाड (हें रूप दशावर आढळतें) केळ पहा ०कंद्रंब-स्त्री कदंबाची एक जात -शे ११ २०८

केळें—न केळीचें फळ केळ पहा

केळें—न (कु) अर्धवट पिकलेली चिंच

कै, कैं—क्रिवि (काव्य) केव्हा ? कधीं कई पहा 'आतां कमठा कैं वारी। मोक्षाची हे।'-ज्ञा १८ ६८ 'कैं वाढावें जीवन। कैं पर्गी शयन।'-तुगा २७१७ [स कदा, प्रा कइ, हिं कैं]

कैं कैं—क्रिवि कोठें ? 'हरि मागिला जुझीं राणे। कैं गेले होत।'-शिशु ९१५ 'रामसखा मज भेटेल कैं कैं।' [स क्क]

कै, कैं—वि कित्येक, अनेक

कै॥—(संक्षेप) कैलासवासी

कैक—वि पुष्कळ, कित्येक [कतिपय एक प्रा कइअक= निकर, समूह ?]

कैकट-ड—कीकट पहा 'आणि देश कैकट फक्काळा।' -यथादी १७ २३५ -वि १ भयंकर, खाईट, किडयाचा (देश) २ मगधदेशासंबंधीं (मगधामध्यें म्लेंच्छांचें ठाणें बसल्यामुळें तो धर्मकृत्यास अयोग्य असा मानला गेला आहे) 'मग म्लेंच्छाचे वसौटे। दागाणें हून कैकटे।-ज्ञा १७ २६४ [स कीकट]

कैकाड—न कैकाडी लोकांचा समूह एक जात

कैकाडी—पु एका जातीचें नांव यातील लोक दुरड्या, टोपल्या इ० विकून व भिक्षा मागून उदरनिर्वाह करतात महारा ष्ट्रात याच्या चार पोटजाती आहेत -१ चोरकैकाडी, किंवा फिरस्ते किंवा ढोंटलमोर २ गावकैकाडी किंवा मुडी, टोपल्ये ३ खुबडी किंवा कुचीवाले ४ माकडवाले किंवा लाल बाजार वाले, कैकाडी ही गुन्हेगार जात आहे -पु कैकाडी माणूस [स कीकट-राजवाडे] कैकाडीण—स्त्री १ कैकाड्याची, कैकाडी जातीची बायको 'प्रथमचि मी तव दादा कैकाडीण झालें।' -भज ४० २ कैकाडीण भाडखोर स्त्री ३ (प्रेमानें) गवाळ, केस पिंजारलेल्या मुलीस म्हणतात

कैकायी-ई—कैकाडीण पहा 'कैकायी कैकायी दुरील माना देश।'-भज ४० [कैकाडी]

कैकाळ—कळिकाळ पहा 'कैकाळाचें धाक नाहीं अवघीं विघ्नें नीवारी।'–ऐपो ३५०

कैकेयी, कैकै—स्त्री १ (काव्य) दशरथ राजाची पत्नी 'कैकेयी आनंदली थोर।'–रावि ३ ९५ २ (ल) शिरजोर, दुष्ट, कजाग, इनी स्त्री [स केकय]

कैंगटीला येणें—क्रि (क) मेटाकुटीस, जेरीस, जिकी रीस येणें 'माझा जीव अगदीं कैंगटीला आला' '

कैंगैयाबहिंगैया, कैंगयाबहिंगया–कैंगया—क्रिवि समूळ नाश झाला, वाताहात झाली बहुगया बहुगया पहा

कैचण—न (व ना) काडी-कचरा, पाचोळा (विस्तव पेटविण्याकरतां), केरकचरा किल्चण पहा 'दारापुढें कैचन पडलें होतें

कैंचा-ची—वि (काव्य) १ कोणता? २ कोठचा? कोठील? कसला? 'कैंचा धर्म कैंचें दान। कैंचा जप कैंचें ध्यान। –दा २ ५ ११ मालिक भपी बोलिला नसता। तरी आम्हांसी कैंची रामकथा।'–दा १६ १ १८ 'धृतराष्ट्र म्हणे आतां कैंचा आनंद राजया मातें।'–मोसभा ७ ८९ [स क्वचित्?]

कै(कैं)ची—स्त्री. १ कातर २ (वास्तु) धीर देण्यासाठीं एक मेकास तिरपे दोन वासे जोडून केलेली रचना कैचीचे प्रकार – साधनकैंची, गळपट कैंची, एकखांबी, दुखांबी इ० ३ तुळया इ० घरावर चढविण्याकरता दोन वाशास दोरी बांधून जी कातरी सारखी रचना करतात ती ४ जास्त वजनाचे पदार्थ तोलण्याचे काटयासाठीं लाकडाच्या तीन दांडयांची केलेली तिवटी ५ (कु) घराच्या मोराव्याच्या बाजूचें लाकूड ६ दारू भरलेल्या २४ बाणांची जुडी, दारूच्या बाणांचा समुदाय 'पन्नास हजार फौज सातशें कैंची उटावर वाण।'–ऐपो २५५ कैंचीत धरणें-क्रि पेंचात धरणें, अडचणींत गांठणें [तु कैची]

कैछा—पु हलवायाचें उपकरण करछा पहा

कैतव—न कपट, लुच्चेगिरी, लबाडी 'त्याचें कसें कैतव साहमी गे।'–सारुह ७ १२५ [स]

कैताळ—न करताळ, झांज [का कै=कर, हात+स ताल=टाळ]

कैद—स्त्री १ बंदी, नियंत्रण, बंधन, तुरुंगवास २ शिरस्त, कदर, अमल ताबा –पया ११८ 'त्याची कैद कठीण' ३ मर्यादा, नियमन (सरकारचें, धार्मिक सामाजिक चालींरीतींचें) ४ (कों) निर्भत्सणें, धमकावणें, एकसारखे दोष पहाणें –वि बंदिस्त, कैदेंत पडलेला (चोर) [अर कैद्] ०कानू–स्त्री १ सरकारी कायदे, हुकूम यांना सज्ञा २ बंदोबस्त अमल 'दिल्ली म्हणजे बादशाही तख्ताची जागा, तेथील अमर्यादा करून फौज दरवर्षी पाठवून कैदकानू तुम्ही आपली बसविली '–पाब १५० [अर कैद्+कानू] ०खाना–पु बंदिशाळा, तुरुंग, कारागृह [अर कैद+खाना] ०खोर–वि (कों) तिरसट, टोंचून बोलणारा, कांचेंत ठेवणारा [अर कैद+फा खोर] ०दगा–पु फसवणूक, फसवेगिरी 'मग यास का कैददगा म्हणावा हरीं इमान हटऊन तग करून बडोयास घालविले '–रा १९ ८४. [अर कैद+दगा] ०वार–क्रिवि शिस्तवार, हुकुमात, नम्रपणें, नियम पाळून शिस्तीनें –सभासद ९ –वि शिस्तबद्ध, नियमित, व्यवस्थित 'ब्राह्मणीराज्य कैदवार एकापेक्षां एक मसलती।' –ऐपो २३१

कैदकाळ-ळू—वि (व) निष्ठुर 'असा कैदकाळू मालक नाहीं पाहिला ' [कैद+काळ]

कैदाशी(सी)ण—स्त्री कैकाडीण, कजाग, नाठाळ, भांडखोर स्त्री [अर कैद्=युद्ध]

कैदी—वि १ बंदिवान, तुरुंगात असलेला २ परतंत्र, ताब्यात असणारा ३ (कों) कैदखोर, खट्याळ, खाष्ट, चिडखोर, तिरसट [कैद]

कैनै—न एक वाद्य –दहु ३९ [हिं कैन=बांबूची काठी]

कैपख—पु कैपक्ष पहा 'ऐसें का कैपखें। बोलिलासी।' –ज्ञा १७ ३५ [कै=कोणता+पक्ष-पख]

कैपंजी—स्त्री (गो) हातानें धरावयाची पणती करपजी पहा [का कै=हात+पंजी=पणती]

कैपत—स्त्री एक प्रकारचा पितळी दिवा कैपजी पहा

कैपत—स्त्रीन दुष्ट, खट्याळपणाची योजना, गुप्त कट, खोडसाळपणाचा कट, मसलत, कारस्थान 'नानाप्रकारच्या कैपती करून लोकांचीं घरें बुडविलीं ' (क्रि० करणें, रचणें, काढणें, चालवणें, मांडणें) [अर कैफियत] ०खोर–कैपती– वि दुष्ट प्रकारचें कारस्थान करणारा, कुभांडी, कपटी, कारस्थानी 'काना कैपती आंधळा हिकमती '

कैपक्ष—पु १ कैवार, पक्षपात 'म्हणती एकाचा कैपक्ष करीं।'–ज्ञा ९ १६८ 'देवाचा कैपक्ष घेणें '–सुर्योदय ३३३ २ बाजू पक्ष 'विरक्तें वोढावा कैपक्ष। परमार्थाचा।'–दा २ ९ १४ [कै=कोणता+पक्ष]

कैपक्षी—वि कैवारी 'देव अनाथाचा कैपक्षी।'–दा ४ ८ २७ 'कैपक्षी रघुनाथ माझा।'–दावि ५३

कैफ—पु १ धुंदी, उन्माद, गुंगी, निशा 'सुरसेप दारुचे कैफ धुंद लढवेती।'–ऐपो ११० 'इंग्रजी विद्येच्या अव्वल कैफांत आमच्या विद्वानांनीं सुधारणेच्या नव्या दिशा काढल्या ' –टि ४ १८३ २ मादक आमली पदार्थ, द्रव्य (भांग, गांजा, इ०) ३ मादक गुण, निंगण्याची शक्ति [अर कैफ्]

**कैफियत, कैफत, कैफयेत, कैफेत**—स्त्री १ वर्णन, हकीकत, वर्णिा, लेखी जबानी, सदरयाचा तपशील २ काम, खटला, उद्योग, व्यवहार, मुकदमा ३ (कायदा) दावा लावल्यावर विरुद्ध पक्षाचे दाव्याबद्दल जें लेखी म्हणणें कोर्टांत दाखल करतात तें ४ खरा दस्तैवज, लेख, अधिकारपत्र, लेखी हुकुम उ० आपल्या मृत्यूनंतर दत्तक घेण्यासबधी नवऱ्याचा बायकोस लेख, आज्ञापत्र [अर कैफीयत्]

**कैफी**—वि १ मादक पदार्थांचे सेवन करणारा (माणूस), गजेकस, दारुबाज २ गुंगी आणणारें, मादक (पेय) [फा]

**कैमर्थ्य**—न अनुपयुक्ततेचा, वैयर्थतेचा, अनुचिततेचा दोष (वादविवादांत, ग्रंथांत, कामांत, इ०) निरुपयोग, कांहीं जरुरी नसणें 'पर्जन्याबाचून जर धान्य पिकतें, तर पर्जन्यास कैमर्थ्य येतें' [स किं+अर्थ=उपयोग]

**कैमुतिकन्याय**—पु अर्थन्याय, एखादी दुष्कर गोष्ट होईल त्याचा होईल असा अर्थ असला म्हणजे त्याला म्हणतात कुन्हाडीने लाकूड तुटतें, मग गवत सहजच तोडता येईल [स किमुत+न्याय]

**कैरव, कैरविणी**—नस्त्री चद्रविकासी पांढरे कमळ 'साधक प थे करी ती कैरविणी तो सुधांशु गौरविती।' —नवनीत [स]

**कैरा, कैरा**—वि १ घैरे डोळ्या, मांजऱ्या, घान्या डोळ्याचा (घोडा), कैराडोळा असणें हें अशुभचिन्ह आहे २ ज्याचें बुबुळ घारें आहे असा (डोळा) ३ घाऱ्या, करड्या रगाचा 'चितार भिंगारें खैरें। गोरें सेंबरें आणि कैरें।'—ह १०.१९२ [हिं]

**कैरा**—वि १ तिरळा, चकणा (डोळा) 'तारसें धुळें कार्णें कैरें।'—दा ३ ६ ४२ २ चकणा डोळा असलेला [स केकर=तिरवा ते केकरमु]

**कैरी**—स्त्री १ कच्चा आंबा, लहान आंबा कुयरी २ (ना) कप शीचें हिरवें बोंड [तुल० का काई=हिरवें, कच्चें+री]

**कैल**—न शेतांतील धान्याचें मान, माप, वांटणीपूर्वीची राशीची मोजणी कैली पहा [अर कैल=माप, का कयी=हात, ते कैल=हात]

**कैलास**—पु कुबेर, शकर याच्या निवासस्थानाचा पर्वत हा हिमालयांत आहे महादेवाचा लोक (विष्णूचा ज्याप्रमाणें वैकुंठ तसा) [स] म्ह० कैलास कपाळे तों गाणें कान फाटेस्तुर लेणें (कर्कश, बेताल, बेसुर गाणें आणि भपकेदार बहुमोल पायाख अलकार घालणें यावरून बेढगळ व अशाव्य, काम, भपका, ढोले जग दखावा) ०येणें **मिळणें, उतरणें, प्राप्त होणें**—कांहीं तरी मोठा लाभ होणें **कैलासाला डोकें लागणें**—अस्मान ठेंगणें होणें, गर्वानें अतिशय फुगून जाणें **कैलासवासी**—वि (मृत्यु पावलेल्या माणसाबद्दल त्याचें दर्शक म्हणून कागदोपत्रीं—विशेषत मृत मनुष्य शिवभक्त असल्यास—उल्लेख करताना योजतात) परलोकवासी, मृत

**कैली**—वि मापी आकार, खडी, पायली, शेर इ० धान्यें वगैरे मोजण्याच्या प्रमाणदर्शक शब्दामागें हा शब्द लावतात याच्या उलट वजनी 'ताद्दूळ कैली कोठीमापें पांचमण'—रा १५. २३४. [अर कैल=माप, का कैगो=हातानें] ०माप—न मापानें मोजून घ्यावयाचें परिमाण याच्या उलट वजनी माप

**कैली**—स्त्री (गो) फुटक्या मडक्याचा तुकडा, खापर [का केल=मडकें]

**कैवजा**—क्रिवि किती, अनेक प्रकारें 'येथें आलियानें रुजु होण्यास वस्वास येईल म्हणोन कैवजा लिहिलें'—रा १ ५३ [कै=कई किती अनेक+अर वज्ह]

**कैवर्त-र्त्य**—पु कोळी, मासेमाऱ्या, भिस्ती, पाणक्या 'किरात कैवर्तक दुष्ट भारी।'—वामन (नवनीत पृ १३६) [स]

**कैवल्य**—न १ सायुज्य, मोक्ष, मुक्ति, जीवात्मा व परमात्म्या यांचें ऐक्य 'तें कैवल्य पर तरवता। पातलें जगीं।'—ज्ञा ३ १५१ 'मागा पडती सतपाय। सुख कैवल्य तें काय।'—तुगा २११७ २ केवळपणा, एकटेपणा 'कैवल्य म्हणजे केवळपणा, एकटपणा किंवा प्रकृतीशीं सयोग नसणें असा असुन'—गीर १६२ [स] ०दाता—पु (मोक्ष देणारा) ईश्वर, गुरु, ईश्वराचें एक अभिधान 'सुखानद आनद कैवल्यदानी।'—राम ३६ ०निधान-धाम—न मुक्तिसदन, मोक्ष 'मुमुक्षूस कैवल्यधाम।'—यथार्थ १ ४६ २ मोक्षाचें स्थान, जो परमेश्वर तो 'हुंबरती गाय तयांकडे कान। कैवल्यनिधान देउनि ठाके।'—तुगा २४१ ०पद—न सायुज्य मुक्ति, कैवल्यधाम ०पद **येणें—मिळणें-प्राप्त होणें**—अलभ्य लाभ होणें, फार चांगली गोष्ट मिळणें ०**वाटणें**—(व) कौतुक वाटणें

**कैवाड**—न गुप्त कट, कारस्थान, हिकमत, मसलत, खोल विचार, (विशेषत दुष्टपणाचा), कुभांड, घोताड (क्रि० रचणें) 'ज्या कर्मीचेनि कैवाडें। यश श्री उदड जोडे।'—एमा २५ २२३ 'मृत्यु न म्हणे हा करामती। कैवाड जाणें।'—दा ३ ९११ [कुवाड, कुवेडें] **कैवाडी**—वि १ धूर्त शहाणा, गुप्त मसलती

**कैवाड**—नपु (काव्य) एका पक्षाचें समर्थन, कैवार, अभिमान कैवार बद्दल वुकीनें 'एकाच्या कैवाडें। उगवे बहुतांचें कोडें।'—तुगा २७४ 'श्रीरामाचेनि कैवाडें। कालिकाळ पळता पुढें।'—भाग किष्किंधा १६ ३० [कैवार] **कैवाडी**—वि कैवारी

**कैवाडू**—न कारस्थान, कोडें, कैवाड पहा 'तेथचा उगवे कैवाडु धर्मजातासी।'—एभा ६४०

**कैवार कैवर**—पुन १ वर्तुळ काढण्याचें हत्यार, कपास (इ) कंपास २ वर्तुळ (कपासानें काढलेलें) ३ परिघाची रेषा ४ व्यास मापण्याचें हत्यार, (इ) कॅलिपर्स [का कैवार]

**कै(कैं)वार**—पु दयेमुळें केलेला पक्षपात, बाजू घेऊन ती पुरी करणें, साह्य, मदत करणें, पक्ष उचलणें, कड, बाजू घेणें कैवाड पहा (क्रि० घेणें, धरणें, करणें) 'तेवेळीं आपुल्याचेनि कैवारें।' –ज्ञा ४ ५१ [स कृपाकर–कींवाकर–कींवार, वीं वारस्य भाव कैवार –राजवाडे भाअ १८३२, तुल० ते का कैवारमु, कैवा रिंचु= स्तुति करणें]

**कैवारी**—वि कैवार घेणारा, साह्यकर्ता 'आला भक्तकाज कैवारी।' 'कैवारी देवाचा। नाथ अनाथाचा। स्वामी माझा।' –पु (खि) १ सत्याचा आत्मा २ पवित्र आत्मा (त्रिविधैक्य देवातील एक) ३ सबोधक (नवा करार) 'मी न गेलों तर कैवारी तुम्हांकडे येणार नाहीं' –योहा १६ ७

**कैसरचांदणी**—स्त्री घोड्याला होणाऱ्या चांदणी नांवाच्या रोगाचा एक प्रकार –अश्वप २ १०४

**कैसा, कैसिआ**—क्रिवि (काव्य) कोणत्या जातीचा किती, कसा, कसला 'तरि मानिया वैरिणी। तिआ कैसिआ।' –शिशु ८१९ 'निपधरायाशीं तुल्यरूप कसा।' –र २ . [स कीदृश, प्रा कइस, हिं कैसा]

**कैसेन–नीं**—क्रिवि कसें, कशाच्या योगानें, कशानें ? 'तो देव कैसेनि म्हणावा।' –विपु ५ २५ 'कैसेनि घडे जी सार्थक।' –दा ३ १० ६८ [कसा]

**को–ऑपरेटिव्ह**—वि परस्पर सहाय्यक, सघशक्तीचें, सघटित, (काम, धदा इ०) ०**सोसायटी**–स्त्री परस्पर सहाय्यकारक मडळी, सस्था [इ]

**कोइटारू**—वि (कों) कोइटानें शाकारलेलें, कोइटाचें छप्पर असलेलें [कोईट–कुईट]

**कोइंडा**—पु (माण) चाबकाचा लाकडी दांडा, मूठ कोयंडा पहा

**कोइ(ई)ल**—पु कोकिळा. [स कोकिल, प्रा कोकिल]

**कोइ(ई)ल**—स्त्री भिंगरी, हातानें फिरवावयाचा भोंवरा

**कोई**—स्त्री आंब्याची कोय, बाठा कोय पहा

**कोई**—स्त्री कोथींची भाजी [?]

**कोईकमळ**–न पांढरें कमळ

**कोई कोई**–स्त्री भीतीमुळें फोडलेली किंकाळी, कुईंकुईं (क्रि० करणें, होणें) [ध्व]

**कोईट**—न (कों) शाकारणीचें गवत कुईट पहा

**कोईन**—स्त्री (कों) नदीच्या प्रवाहांत मासे पकडण्यासाठीं बांबू टाळे, दगड यांचा बांध घालून त्याला लावलेल्या टोपल्या, पायगीर, बोक्षी, (राजा कुण) कीव (क्रि० बांधणें) खोईण पहा

**कोईल**—स्त्री (कों) विटीदांडू खेळतांना जी जमिनींत खळगी खणतात ती, गली [कोली] ०**डाव**–पु विटी मारण्याची पाळी, कोलण्याची पाळी

**कोऊ**—(बे) लक्षा(तोबा)चा खेळ, वर्तुळाकार बसलेल्या गड्याच्या मागें नकळत लडू टेवून खेळतात तो खेळ [ध्व]

**कोक**—न १ कुबडा २ कुबड, पोंक. ३ (ल) पुगीर उचवटा, फुगा 'सुचइपाचा आर्धी झोंक, त्यामधीं ठेवी कोक नोक, झोंकें भर पुरली।' –प्रला १११ [का कोक्कि–क्के, कोंकु= वांक, वाकडेपणा, पोंक]

**कोक**—पु चक्रवाक पक्षी 'मी कोक झालों निका।' –आसेतु २६ 'प्रार्थावा पुनाहीं स्वपिता स्वमुखार्थ तपन कोकांहीं।' मोसभा ६ ७७ [स]

**कोक**—न १ (ना) भोंक, छिद्र, बीळ, भगदाड २ (गो) भोंक, जखम [खोंक]

**कोक, कोकशास्त्र**—न कामशास्त्र, रतिरहस्यशास्त्र हा ग्रंथ कोक कवीनें केल्यामुळें या ग्रंथास कोकशास्त्र हें नाव पडलें यांत सभोगाचें, वशीकरणाचें, कामविकाराबद्दलचें व स्त्री–पुरुषाच्या गुणावगुणाचें वर्णन आहे कित्येकांच्या मतें चक्रवाक पक्ष्याच्या (कोक) परस्पर मीलनोत्सुक्तेवरून हा ग्रंथ लिहिला आहे (दिवसा चक्रवाक नर व मादी एकत्र असून रात्रीं त्यांचा वियोग होतो अशी कविकल्पना आहे) 'कोकीं नाहीं ठेलें। भारतीं म्हणितलें।' –ज्ञा १३ ८३० 'कोकशास्त्रींची अधिष्ठात्री।' –एभा ११ ५१९ 'नातरी कोकशास्त्राचे पुस्तकांत। वाचिलें जैसें वेदांत।' **कोकशाळा**–स्त्री नाटकशाळा 'कोकशाला नाटकशाला दासी यांचा घ्याल मुका।' –राला ८५

**कोकटहोळी**—स्त्री होळीच्या आदल्या दिवशीं मुलें होळीचे खेळ खेळतात ती [कोकटणें ?+होळी]

**को(कों)कड**—स्त्रीन खोकड पहा

**कोकडा**—वि (व) वाकडा, वाकलेला, कुबडा 'पोट दुखीनें कोकडा झाला' [का कोंकु=वाक]

**कोंकण**—न १ मुंबई इलाख्यांतील एक प्रांत सह्याद्रीच्या पश्चिमेकडील प्रदेश सध्याचे ठाणें, कुलाबा व रत्नागिरी हे तीन जिल्हे, सावंतवाडी सस्थान आणि गोमतक यांचा कोंकणांत अतर्भाव होतो (त्याचे, कुमचे इ०) **वैल कोंकणांत जाणें**–१ शक्तिहीन होणें २ वयपरत्वें दुर्बल होणें, अशक्त होणें ३ नपुंसक होणें 'माझे हात का कोंकणांत गेले ?' =मी काय अशक्त झालों ? [का कोंग्+कण्=मावळ दिशा, कुगु=मावळणें, किंवा कोंकु=वांक, वाकडेपणा ?] ०**धार**–स्त्री करकोची पक्षीण ०**दुधी**–पु (गो) दुध्या भोपळा ०**पट्टी**–स्त्री कोंकण किनारा, कोंकण पहा ०**स्थ**–पु महाराष्ट्र ब्राह्मणांची एक

पोटजात; चित्पावन ब्राह्मण. [मं.] ०स्थी–वि. चित्पावन ब्राह्मण-जातीसंबंधी; कोकणस्थांचा ( वेष, व्यवहार, कारभार इ० ).

**कोंकणा**—पु. (गो.) सर्वसाधारण हिंदु लोकांना क्रिस्ताव लोक हा शब्द लावतात.

**कोंकणी–ण्या**—वि. १ कोकणसंबंधी. २ कोंकणचा राहणारा; याच्या उलट घाटी. ३ ( निंदाव्यंजक ) कोंकणस्थ.

**कोंकणें**—अक्रि. १ ओरडणें; भुंकणें ( कुत्रा ) २ आरवणें ( कोंबडा ); ओरडणें; किंचाळणें ( पोपट; कावळा ). 'कोंबडा कोंकतो, पैसा मागतो।' –भिकारीगाणें. [ध्व.; प्रा. कोक्क= बोलावणें ]

**कोंकणें**—न. एक रानवेलीचें फळ.

**कोंकतारी, कोंकतर**–स्त्री. ( गो. ) पाणकोंबडा. [सं. कोक]

**कोक(ग)दम्या येणें**—अक्रि. श्रमामुळें बेजार होणें; कासावीस होणें. [ ? ]

**कोकनद**—न. तांबडें कमळ. 'नेणति हे परलोक, विलोक न कोकनदासम पाणिपदें।' –आविश्वा २२. [ सं. ]

**कोंकंब–बी, कोकम**—पु. रातंबा; अमसोलाचें झाड. हें झाड कोंकणांत सर्वत्र आढळतें. याची उंची साधारणतः पांच–सहा पुरुष. याच्या फळाला कोकंब अथवा रातांबा म्हणतात. बियापासुन तेल काढतात, त्याचा आमांशावर व थंडीनें अंग फुटतें त्यावर उपयोग होतो. आमसोलें हीं पित्तनाशक म्हणून पथ्यकारक आहेत. **कोकंबेल**–न. कोकंबाच्या बियांचें तेल. हें पोटांतहि घेतात व आंगाला बाहेरून चोळतात. [ कोकंब+तेल ] ०साल–सोल–स्त्री. वाळलेली. १ कच्ची आंब; [illegible] दप शीचें [illegible] कोकंबाचा [illegible]

**कोकमार्ग**—पु. कोकशास्त्र पाळणारा एक पंथ; कोकशास्त्र मानणारा एक वर्ग, लोक. **कोकमार्गी**–वि कोक मार्गाचा अनुयायी. कोक पहा [कोक+मार्ग]

**कोंकर**—न. माशांची एक जात, विशिष्ट मासळी, हे दिवाळीच्या सुमारास पकडतात.

**कोंकरचाल**—स्त्री. कोंकरासारखी चाल, गति ( घोडयाला योजतात ). कुकरचाल पहा. [ कोंकर+चाल ]

**कोंकरा–रूं**—पुन. करडूं; मेंढीचें लहान पिलूं (नर जातीचें)

**कोंकरी**–स्त्री. मेंढीचें मादी जातीचें पिलूं [ ध्व. कोंकों ]

**कोकलणें**—अक्रि. १ ओरडणें; भोकांड पसरणें; उपाय नसल्यामुळें हाका मारीत बसणें. २ तक्रार करणें, एखाद्याच्या नांवानें हाका मारणें. –सक्रि. तुडविणें, बडवणें; रडावयाला लावणें; कोंकों करावयास लावणें. [ प्रा. सं. कों+कल् ]

**कोंका**—पु १ मोना; केळीच्या गाभ्यांतून केळफुलासह जो कोंब बाहेर पडतो तो; केळफूल, पोफळीचा मोहोर अथवा फुलें ज्यांतून बाहेर पडतात तो. पोफळीच्या कोक्यापासून कागद तयार करतात. २ कानफाटे गोसावी वाजवितात ती शिंगी; लहान एकतारी. ३ बगळा; कंक. ४ एक प्रकारचा शिंपींतील मासा. [ सं. कोक ]

**कोका**—पु. एक झाड, याच्या एकंदर ५० जाती असून पैकीं हिंदुस्तानांत ६ आढळतात.

**कोंका–की**—पुस्त्री. पागोटयाच्या वरील चोंच ( कोकी ); पागोटयाच्या (पगडीच्या) कमळाच्या वर असलेला हा भाग कागदाचा करून त्यावर कापडी पटया शिवतात. [ फा. कुका; तुल० का. कोक्कि=वांक ]

**कोंकाट**—पु. १ कोल्हीण पक्ष्याचा शब्द. २ (ल.) कलकलाट; गोंगाट; गलका. [ ध्व. ]

**कोकाटी**—स्त्री. हस्तिदंताचा भोंवरा. याला भोंक असल्यानें याचा गुंगुं असा आवाज होतो. २ एक पक्षी; कोंकाट पहा. [कोंकाट]

**कोकाटया**—वि. कोंकाट करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा; गोंगाट करणारा. [ ध्व. कोकाट ]

**कोकाश्री**—पु (जुनी) कोंबडयासारखा तावूस रंगाचा एक पक्षी. मांसाहारी लोक याचें मांस खातात. [ ध्व ]

**कोकादर, कोंकतारी**—स्त्री (गो.)पाणकोंबडी. [ ध्व. ]

**कोंकारणी**—स्त्री. ( गो. ) कोंबडयाची आरव. [ ध्व. ]

**कोंकारचें**—अक्रि. ( गो. ) कोंबडयाचें आरवणें. [ ध्व. ]

**कोकारा**—पु (राजा) आरोळी; मोठयानें मारलेली हांक.

**कोकारा**—पु. (गो. ) लहान मासा.

**कोंकारी**—स्त्री. (गो. कु.) १ पाणकोंबडा. २ एक मासा. [ ध्व. कों. ] [illegible]

[illegible] आवाज होणें (पक्षी,

**कोंकावणें**—अक्रि. १ हूं, गुं, इ० आवाज होणें ( पक्षी, भोंवरा इत्यादिकांचा). २ भोकणें; केकाटणें (कुत्र्यानें). ३ केकावणें ( केका ). 'मोर कोकावती ते।' –अक रसकल्लोल ५. [ध्व]

**कोकिल–ला, कोकि(की)ळ**—पुस्त्री. मंजुळ शब्द करणारा एक पक्षी. ह्याचा आवाज फार मधुर असतो. मादी आपलीं अंडीं कावळयाच्या घरटयांत ठेवून देते म्हणून याला संस्कृतांत परभृत, अन्यभृत म्हणतात. कोकिल वसंत ऋतूंतच फक्त गातो. **कोकिलाव्रत**–न. अधिक आषाढांत कोकिळेचा शब्द ऐकल्यानंतर जेवण्याचें बायकांचें एक व्रत.

**को(कों)की**—स्त्री. १ पागोटें, इरलें, इत्यादीवरील बोंडें टोंक, चोंच, राघू; कोंब. कोंका पहा. २ डोळयांतील फूल, [कोका] ०दार–वि. कोकी असलेलें ( इरलें, पागोटें )

**कोंके**—न (गो.) दमा. [ ध्व. ]

**कोंकेणें**—अक्रि. ( राजा. ) ओरडणें; आरवणें. कोंकणें पहा.

**कोंकेर**—न. (गो.) पाथरवटाचें हत्यार ( दगड काढण्याचें ).

**कोंकेरी**—स्त्री. एक पक्षी; पाणकोंबडा. कोंकारी पहा.

कोको—पु हें झाड दक्षिण अमेरिका व वेस्ट इंडीजमध्यें होतें याच्या बियापासून कोको (पेय) व चाकोलेट करतात झाडाचीं फळें डेंगेसारखीं, अर्धाफूट लांब असतात यीं लावल्या पासून ६ वर्षांनीं फळें येतात [मूळ मेक्सिकन शब्द (ककौ), –स्पॅनिश–इं ]

कोंक्या—वि कोंकणस्थास निंदाव्यंजक नाव 'तुम्ही हल्लीं पुण्याहून कोंक्या, परांजपे आडनावाचा आणला आहे ना?' –विक्षिप्त ३ १८ [कोंकण]

कोंग—न १ ढोंग, सोंग (दारिद्र्य, दु ख, वेड इत्यादींचें) (क्रि० घेणें, करणें, लावणें) 'जो न्यायासनावर चढला कीं दुष्यंत राजाप्रमाणें त्या गांवचाच नाहीं असें वळानें कोंग मात्र करतो' –नि ६२५ [का ]

कोंग—न कुबड, कुबडया कोंक पहा [का ]

कोंगल्ल—वि (गो) वाकडेतिकडें, वांग [का कोंक–ग]

कोंगळी—स्त्री विळा, कोयती [का कोंग=वाकडी विळी]

कोंगा—पु (गा) १ पाणथळ शेतांत राहून भाताची नासाडी करणारा प्राणी २ एक ल्हान मासा [ध्व ]

कोंगा, कोंगाडा–डी—पु १ कर्नाटकांतील एक जात –देहु ६६ २ (ल) मूर्ख माणूस –वि (क) रोंग्या, रोगी, कुबडा [का कोंग]

कोंगाडी—वि सोंगाड्या, ढोंगी, बहुरूपी कोंगी पहा 'कोंडाण्यास कोंगाडयाचें सोंग घेऊन ' –सूर्य ५६ [का ]

कोंगाळा—वि (कों) लांब, वाकडे चिंचेचे आकडे ज्यास आहेत असें (चिंचेचें झाड) [का ]

कोंगाळें—न (कों) लवट, वाकडी चिंच (फळ व झाड) कोंगाळी चिंच, चिंचेचा आकडा [का कोंग=वाकडें]

कोंगी–ग्या—वि कोंग करणारा, ढोंगी, सोंग करणारा, सोंगाडया [का ]

कोंगूळ—स्त्री (कु गो) कोकिळ

कोंगें—न मधाचें लावट पोळें [का कोंगे=आकडी]

कोंघ—कोंग पहा

कोंच—पु (कों) आवेहळदीचा कांदा, गड्डा

कोंच—पु बसावयाचा पलंग, बाक, बैठक [फ्रें कोशर इं कोच]

कोंच—स्त्री १ खोंक, एखाद्या अणकुचीदार पदार्थानें झालेली जखम, खोंच २ अणकुचीदार टोंक [खोंच खोंचणें, हिं कोंचना]

कोंच—स्त्री पगडी, इरलें इ० चें टोंक (कों) कोंका अर्थ १ पहा

कोंच—न (राजा) जाम्या दगडांत कातळावर उगवणारें व कांट्याप्रमाणें टोंचणारें बारीक गवत, वेल [स कूर्च प्रा कुच्च]

कोंचकोंच—वि (व) थोडेंथोडें 'तुप कोंच कोंच वाढ' [का कोंच=थोडें, तुल० स कुच्=थोडा होणें, करणें] हाको २ ४०

कोंचक(का)ई—स्त्री मोठे व जून झालेले आवळे उकडून त्यांतील बिया काढून टाकून त्यांत मीठ, हिंग, जिरें वगैरे घालून केलेला पदार्थ, किंवा वाळवून वडया तयार करतात ती [का कोच्चु=तुकडे करणें, पूड, चूर्ण+काई=फळ ]

कोंचका—पु (व) कोंपरा 'असा कोंचक्यांत का बस लास?' [कोंचकी]

कोंचकिंदर—न (को) १ अडगळीची जागा, घाणेरडया गर्दीच्या जागेबद्दल योजतात २ गळाटा, अडगळ ३ अडचणीची, संकोचाची अवस्था, स्थिति, गर्दी, गोंधळ असणें [कोंचा+कंदर?]

कोंचकी—१ (वास्तु) कोंपरा, कोन (घरांतील, खोलीचा इ०) २ दिखाऊ चादर [कोंच]

कोंचकी—स्त्री १ कोंकी अर्थ १ पहा २ पागोटें 'मृदुतर शिरमे त्या कोंचक्या कोरदारा' सारद ३ ४० [कोंच] ०दार–वि कोंचकी असलेलें (पागोटें इ०)

कोंचकील—वि अरुंद, कोंदट चिंचोळी (जागा) [कोंचकी]

कोंचट, कोंचा—वि संकुचित, कोंदट, अपुरी (खोली), अरुंद, ल्हान तोंडाचें (भांडें, वस्तु) [स कुच्]

कोंचणें—उक्रि १ (राजा) कुरतडणें, तोडणें (नखें, दांत, चोंच इ०नी) २ (व) जोरानें दाबणें 'त्यानें टोपलींत कोंचून फळें भरलीं' ३ (बे) खिळयानीं बोचणें ४ (बे) भाजी चिरणें [का कोच्चु=कापणें, हिं कोंचना, गु कोचवु]

कोंचंबणें—अक्रि (व ना) कुचंबणा होणें, संकोचणें, विरमणें, लाजणें [कुचंबणें]

कोचमन–मिल, कोचमीन—पु गाडीवान, गाडीहांक्या, सारथी, सूत 'गाडींत बसलें असतां कोचमिलास स्वत ज्या पदवीस चढवून जातीनें सारथ्य . ' –नि ९७ 'कोचमीन (महाराजाचा) मराठेजातीचा होता' –विक्षिप्त २ ११८ [इं कोच=गाडी+मॅन=(हांकणारा) माणूस]

कोचर—स्त्री (व) आखूड शिंगाची म्हैस

कोचळा, कोचाळा, कोचाळें—पुन (व ना) पक्ष्याचें घरटें. कोंचाळें पहा

कोचा—स्त्री हळद –देहु १८४ चोरा हळद –मुक्या १४४

को(कों)चाळें—न १ वर्तुळ, कोंडाळें (बसलेल्या लोकांचें) (क्रि० घालणें, घालून बसणें, उडणें, मोडणें, काढणें) २ भोंवऱ्यासारखा एक खेळणें [का कोंचे=तट, भोंवतालची भिंत+म आळें]

कोंचाळें—कचाळें पहा

कोंचिंदा—पु एक वनस्पति, हिला पाती येतात, त्यांची भाजी (पोटांतील) जंतुनाशक आहे

**कोच्निन(नी)ल**—पु. एक किडा. हा मूळचा मेक्सिको व पेरू या देशांतील असून त्याची उत्पत्तिनिवडुंगावर होते. याच्या रुपेरी व काळा अशा दोन जाती आहेत यापासून किरमिजी रंग करतात -प्राणिमो १०४. [कोकम=किरमिजी रंग (फळ), लॅ. कोक्किनम्=किरमिजी रंगा; फ्रें कोचर्नल; इं. कोचिनील]

**कोची**—स्त्री. अणकुची; टोंक, कोंच पहा.

**कोची**—स्त्री. (नंद भाषा) (क.) चोळी, काचोळी. 'कोची अंगात घाल' [काचोळी अप]

**कोचोक**—पु (गो.) कैर; उकिरडा.

**कोच्या**—पु (व) टोसा; गुद्दा; हुरी [कोंचणें]

**कोंजट, कोंजा**—कोंझट-कोंझा पहा.

**कोजळणें**—अक्रि (कों.) १ कोजळीनें आच्छादिलें जाणें, काळ्या किटानें युक्त होणें (नारळ, फळ, इ०). २ कोजळी धरणें (दिव्याच्या वातीनें) [कोजळी]

**कोजळी**—स्त्री. १ जळत्या वातीचा शेंड, कोळी, काजळी. २ जळणाऱ्या पदार्थांची ठिणगी. ३ राख (भवन काढल्या इ० ची). ४ धुरामुळें होणारें जाळें, जळमट (छपरावर वगैरे) [सं. कज्जल]

**कोजळी**—स्त्री. (कों.) काळजी पहा.

**कोंजळी**—स्त्री. ओंजळ, पसा (दोन हातांचा).

**कोंजा, कोंझड-डा, कोंझा**—वि. (कों.) १ सोल्कट बोलणारा (माणूस) २ खोल गेलेला व बारीक (डोळा). ३ (ल) तुमडा; तिरसट [सं कुंचित, प्रा. कोंचिअ]

**कोजागर-री**—पुस्त्री आश्विनी पौर्णिमा; या दिवशीं रात्रीं लक्ष्मीप्रीत्यर्थ मध्यरात्रीपर्यंत द्यूत वगैरे खेळून जागून नंतर लक्ष्मी व चंद्र यांची पूजा करून दूध वगैरे पितात [सं. कोजागर्ति=कोण जागतो असें लक्ष्मी विचारून जागणाराला संपत्ति देते अशी समजूत.]

**कोट**—पु १ किल्ला; गढी. 'किले गड कोट। दवलत खानाच्या हवाला' -ऐपो १३. २ गावाचा अगर किल्ल्याचा तट ३ सैन्याचा व्यूह 'कोट बांधून पिंजरा केला।' -ऐपो १३. ४ (पत्ते) बोलल्लेल्या भिडूनें स्वत च सात दस्ते (हात) करणें; खेळीनें आपले सात किंवा सर्व हात करणें (क्रि० देणें करणें) [सं. कोट, कोट्ट] ०गिरी-स्त्री. वेढा 'असता खंडेया महार (-रर) फोडता दळव्याची कोटगिरी।' -ऐपो ६९

**कोट**—कोटी पहा 'पाच कोट रुपये' ०कल्याण-न १ भरपूर, पूर्ण कल्याण, पराकाष्ठेचा लाभ. 'असें केल्यास मातें कोटकल्याण करण्याविषयीं जी तिची इच्छा आहे ती कमी होईल.' -पाव्ह ८८. २ पराकाष्ठेची तृप्तता, भरपूरपणा. 'शेर भर दुधांत आमचें कोटकल्याण होतें'-

**कोट**—पु एक प्रकारचा अंगरखा. [इं लॅ. कोट्ट पासून; तुल० सं. कोट=किल्ला?]

**कोट(ट्टि)गा**—वि. कोडगा; निर्लज्ज, निढावलेला. 'सबळा प्रति जो कोटगा।' -प्रेमराज ३.१०७. 'स्नेयेंहि कथितों नेम तिळहि लाज मी कोटिगा।' -केदा १७. [का. कोट्टि=निर्लज्ज]

**कोटगा**—पु. १ दोरीनें फिरवावयाचा भोंवरा. २ बांधे लोकाचा कोटंबा.

**कोटंबा-टुंबा**—पु. १ खंडोबाच्या भक्ताचें लांकडी चौकोनी भिक्षापात्र; खंडोबाचे भक्त त्याची पूजा करतात. 'हरय कोटंबा लागातें। घोळ वाजवूं अनुहातें।' -तुगा ४४४६. २ लांकडी डोणी, कोटंबी; कायवट (लांबट, चौकोनी, व खोलगट). जनावरांस चूण, भुस वगैरे खाणें घालण्याचें लांकडी पात्र. [प्रा. दे. कोट्टिंब=डोणी; म. कोटा]

**कोटंबी**—स्त्री. ल्हान कोटंबा, डोणी, कायवट.

**कोटंबें**—न कोळवें, रहाटगाडग्याचें पाणी ज्या डोणग्यांत पडतें ते डोणगें [कोटंबा]

**कोटर**—न झाडाची ढोली. 'लोटेतो तरुकोटरीं स्तुनियां लोटें तरीही रहा।' -मराठी ६ वें पुस्तक पृ १२४ (१८९६) [सं.]

**कोटरान**—न (ना.) निर्जन प्रदेश, भयाण रान.

**कोटव**—पु (कों.) एक ल्हान मासा.

**कोटसा**—वि. कोठेंसा? कोणत्या जागीं? [कोठें+असा]

**कोंटा**—पु (देश.) कोपरा. [सं. कोण? म. कोन+टा]

**कोटि-टी**—स्त्री. १ शंभर लक्ष, एक करोड; कोट. 'जागजागीं आहेत वीर कोटी।' -र १०. २ (वादविवादांत) निरुत्तर करण्यासारखें खुबीदार उत्तर; भाषणाची मोठ्या युक्तीनें रचना; खुबीचें भाषण. ३ शब्दांत, वाक्यात कांहीं फरक करून किंवा एकाच उच्चाराचे पण भिन्न अर्थांचे शब्द घेऊन अर्थाच्या गमती करून अलंकार-चमत्कार दाखविणें. हें एक भाषा कौशल्य समजलें जातें श्लेष पहा 'अहो विद्वत्ताग्धुर कोट्यांची गुनवळें गेलीं दहापांच घशांत' -नाकु ३.३४. ४ विशिष्ट वर्ग, प्रकार, 'रजोगुणाची कोटी। लोभिष्ट पोटीं खरी पुत्रा।' -एभा १३.४५. भेद. 'गुरामध्यें दोन मोठ्या कोटि-म्हशी आणि गाई' ५ काटकोन त्रिकोणाची उभी बाजू, लंब रेषा, कर्णाखेरीज एक बाजू. ६ थोर योग्यता, दर्जा, श्रेष्ठपणा, शौर्य, सद्गुण, विद्या यामध्यें अतिशय प्रवीण असलेल्याच्या स्तुतिदर्शक सन्मानदर्शक संज्ञा. 'खऱ्या साधूची कोटी याच्या उलट असते' ७ धनुष्याचें टोंक; चंद्रकलेचीं टोंकें ८ कल्पना, विचारसरणी. 'परंतु ही कोटी इतिहासदृष्ट्या टिकेल असें आम्हास वाटत नाहीं' -टि ४.११६. ९ पराकाष्ठा; कळस; उच्च शिखर. 'परकोटी.' ०उभविणें-ध्वजा

उभारणें 'तरी यशाची उभऊनि कोटी।' –नव १ ,७७ ०क्रम–पु १ युक्तिवाद, शकल, खुबीदार विवेचापद्धति, ?' त्मक भाषण 'ह्राच कोटिक्रम स्वीकारलेला आहे' –मीर १५७ २ पेंच ०क्रम लढविणें–तोड काढणें, युक्ति योजणें ०ज्या–स्त्री (त्रिकोणमिति) कोभुजज्या काटकोन त्रिकोणातील लघुकोनाच्या लगतची बाजू व कर्ण यांचें गुणोत्तर कोज्या आणि भुजज्या यांच्या वर्गांची बेरीज १ भरते (इ ) कोसा ईन ०ध्वज(लावणें, उभारणें)–पु नवकोट नारायण होणें, अफाट सपत्तीचा दखावा करणें, कोट्याधीश होणें ०भोज–वि कोट्याधीश 'धनेश्वर नामें कोणियेक ब्राह्मण। तो वस्तुवित्तेसि सपूर्ण। कोटिभोज पै।' –कथा २ १५६ ०श –वि कोट्यावधी 'या कामाला कोटिश रुपये पडतात' [स] ०स्पर्शज्या–स्त्री (त्रिकोणमिति) कोटिज्या व भुजज्या यांचें गुणोत्तर कोस्पर्शज्या (इ) कोटॅन्जंट

**कोटीर**—पु डोकीवरचा मुकुट 'मस्तकीं कोटीर झळ कत।' –जै १४ ५६ [स कोटिर, कोटर]

**कोटें**—न १ पक्ष्यांचें घरटें, कोठें २ रेशमी किड्याचा कोशेटा [स कोट्ट, कोट]

**कोट्टा**—पु (तजा) बीं, कोय, बाठा [ता का कोट्टे]

**कोट्य(ट्या)धीश**—वि नवकोटनारायण, मोठा श्रीमत करोडपति [कोटि+अधीश]

**कोट्य(ट्या)वधी**—वि कोटीच्या मापानें मोजण्या सारखा, अपार, अगणित, अनत [कोटि+अवधि]

**कोट्यानकोटी**—वि अगणित, अतोनात 'जन्मत हृदय माझें जन्म कोट्यानकोटी' –रामदासकरुणाष्टक (नवनीत पृ १७०) [स कोटि+अनुकोटि]

**कोठ**—पु १ किल्ला २ किल्ल्याचा तट कोटपहा ३ कोठी पहा [स कोष्ठ, प्रा कोट्ठ]

**कोठ**—पु १ मोठीं व वाटोळीं चक्दळें पडणारी रक्तपिती २ गजकर्ण, नायटा [स कुष्ट]

**कोठचा**—वि १ कोठल्या गावचा स्थळाचा ठिकाणाचा कुठचा पहा २ कोणता, कसचा [कोठें]

**कोठडी**—स्त्री १ घरातील खाली (विशे) सामान ठेव ण्याची कोठी दालन, भाग हरिविजयग्रथ भाडार। छत्तीस कोठड्यांचें परिकर।' –ह३६ २१६ २ (व) कपाट फडताळ [स काष्ठ प्रा कोट्ठ हिं कोठरी]

**कोठणें**—क्रिवि (प्र) कोठून? कोणत्या ठिकाणाहून?

**कोठदार**—वि (चामारी) विशिष्ट प्रकारचा मारवाडी जोडा, हा मारवाडी कुणबी घालतात

**कोठनीस**—पु कोठावळा, कोठीवाला, कोठीवरील अधि कारी [म कोठी+फा नवीस]

**कोठपर्यंत–पावेतों–वर**—क्रिवि कुठवर, कोणत्या ठिकाण–मुद्या–पदा–मजलपर्यंत? (स्थळ किंवा वेळ यासबधीं). [कोठें+पर्यंत इ०]

**कोठपो**—पु (क) भाताची पेज गाळण्याचा ?? चौकोनी कोटग, भाडें, कायवट कोटवा पहा

**कोठं(ठ)रा**—पु कोटवा पहा

**कोठंबी, कोठमी**—स्त्री पाण्याची डोणी, हद्दा [प्रा दे कोट्टिव]

**कोठर्या–वा**—पु (वों गो) कोठ्या, एक प्रकारचें पर देशी गलबत हें गुजराथेकडील खारवी मुसलमान वापरतात याच्या व दक्षिणी गलबताच्या बाधणींत फरक असतो यांचें धाकटें शीड व कलमी हीं लहान असतात [स कोष्ठ, प्रा कोट्ठ, कोट्य]

**कोठला**—वि कुठला कोठचा पहा

**कोठलेलें**—वि (कु) बरेच दिवस साठ्यास पडून राहिलें असल्यामुळें जुनें झालेलें (कापड)

**कोठ(ठा–ठि)वळा**—पु कोठनीस पहा 'दाटी पुढील दारीं मागिल दारीं आहे वाग्मिये कोटवळा।' –प्रला १६७, [कोठ–ठा–ठी+वाला] म्ह० खरचणाराचें खरचतें, कोठावळ्याचें पोट दुखतें

**कोठा**—पु १ कोठार सग्रहालय, वखार, आगर, साठवण (धान्य, पाणी, इ० ची) २ पोट, पक्वाशय ३ (शिवणकाम) छातीपोटाचा भाग (शिवावयाच्या कपड्याचा) ४ बदुकीतील दारु काडतुसें पाणी इ० चा कप्पा, साठा ५ पक्ष्यांचें घरटें ६ (व ना) गुराचा गोठा ७ हुडीच्या ज्या घरात रकमेचा आकडा लिहितात तो ८ निळीचा रग तयार करताना निळीचीं झाडें ज्यात भिजत टाकतात तो हौद ९ पानाच्या डब्यातील पानें ठेवण्याचें पुड १० कोष्टक, सदर, स्तभ, रकाना ११ (जविया) जवियाच्या खेळात आपल्या हातातील जवियानें जोडादाराच्या बरगडीच्या खड्यातून (शिंपींतून) वेगीकडे फाडत यणें [स काष्ठ, प्रा कोट्ठ]

**कोठार री**—नस्त्री १ धान्यागार, कोठडी, खोलींतील किंवा भिंतीतील वळद वखार, साठवणीची जागा 'कीं विश्वबी जाचें कोठार।' –ऋ ३८ 'तेलातुपांचिया कोठारा।' –ज्ञा १६ ३९५ २ पक्ष्याचें घरटें [स कोष्ठागार, प्रा कोट्ठार]

**कोठारली**—स्त्री (कु) घोणीच्या वर्गांतील एक लहान प्राणी

**कोठारी**—पु कोठनीस पहा

**कोठारें**—न. १ कोठार पहा २ मूस बाहेर जाऊं नये म्हणून त्यावर लावलेल्या कवड्यांच्या पेंढ्या [ कोठार ]

**कोठायणें-यिणें**—उक्रि कोठें जातां किंवा कोठून आलात असें विचारणें [ कोठें ]

**कोठिंबा, कोठिंबी, कोठिंबें**—कोटंबा पहा [प्रा दे कोट्टिंब]

**कोठी**—स्त्री १ धान्यागार, सामानालय, वखार, खजिना, हौद, रांजण 'पाण्याची कोठी एक मातीची'—पेरापु विवि २९७ २ कारखाना, पेढी, दुकान, खोली ३ सैन्याची दाणागोटयाची बेगमी 'लष्कराची कोठी चालली-उतरली-आली-लुटली' ४ नळाचें पाणी साठवून ठेवण्याची, किंवा बंदुकींतील दारूची दारू रहावयाची जागा ५ शरीरांतील भाग (हे ७२ आहेत) 'आतां बाहत्तर कोठ्यांतील शुद्धि पिंडामध्यें'—मोल ६ साळी वगैरे ठेवण्या करतां केलेली बांबूची लांबट व मोठी कणगी लोखंडी पत्र्याची पाटी, पींप ७ मिठागरातील चौकोन, खाचर ८ एक प्रकारचें गलबत ९ (वाद्य) भोपळा १० सरकारी वाडा, मोठ्या सरदार जहागीरदाराचा इमला, रेसिडेंटची कचेरी (इ) रेसिडेन्सी 'साहेबानीं महाराजास-देवासकराचे कोठीवर तुम्ही का गेला होता-म्हणून विचारलें'—विक्षिस ३ १७१. [कोठ-ठा] ॰करा-पु वखारींतील तांदुळांच्या नासधुसीबद्दल अजमास करून जास्त वसूल केलेलें धान्य. ॰भाडें-न रयतेनें किल्ल्यावर धान्य नेऊन देण्याऐवजीं त्याच्यावर बसवलेला कर ॰महाल-पु सरकारी धान्याची वखार, कोठार ॰वाला-पु १ कोठवळा पहा २ पेढीवाला, सावकार, व्यापारी

**कोठील**—वि कोणत्या ठिकाणचा? कोठचा? [ स कः ]

**कोठून, कोठोन**—क्रिवि कोणत्या ठिकाणापासून-स्थळा-वेळेपासून, कुठून

**कोठें**—न (कों) पक्ष्याचें घरटें कोटें पहा

**कोठें**—क्रिवि. १ कोणत्या ठिकाणीं २ (जोर दिला असतां) कोणत्याहि स्थळीं, कोणीकडेहि, कोठेंहि 'मीं तेव्हां पासून एथेंच आहे मी कोठें गेलों नाहीं' ३ (चुकीनें) कधीं, केव्हां 'मी कोठें ग गेलों, उगीच का बोलतेस?' म्ह॰ 'कोठें इंद्राचा ऐरावत आणि कोठें शामभटाची तटाणी'=अत्यंत थोर व अत्यंत क्षुद्र अशा दोन वस्तूंची तुलना कशी होणार? ॰कोठें-मोठें-क्रिवि काहीं काहीं ठिकाणीं [ कोठें द्वि ]

**कोठ्या**—पु कोठी (अव) अर्थ ७ पहा कोठा पहा

**कोड**—पुन महारोग, रक्तपिती [स कुष्ठ, प्रा कोड्ढ, कोढ, हिं कोढ, गु कोड]

**कोड**—स्त्री खंडी, वीस (२० ही संख्या) कोडी पहा

**कोड**—न १ (काव्य) कौतुक, लळा, लाड, पुरवाळणें (मूल, देव, प्रिय वस्तु इ॰), आवड, मौज, नाजूक रीतीनें वागविणें, काळजीनें जपणें कौतुक शब्दाबरोबर बहुधा योजतात 'सकल शास्त्रा चाळीतां कोडें।'—ऋ ३८ 'जयातें अव्यक्त म्हणों ये कोडें।'—ज्ञा ८ १७९ 'पुत्र पहावयाचें चाडें। अण्डें भेदूनि पाहतां कोडें।'—मुआदि ४ ३५ 'मुक्तरत्नमाळा कोडें। रामरथा घातल्या॥'—वसीस्व १ ६८ २ (काव्य) हौस, उत्कट इच्छा, हांव, उत्कंठा (त्यांत हेकेखोरपणा, हट्ट, तन्हे-वाईकपणा गर्भित असतो) ३ (काव्य) खेळाडूपणा, चैनी स्वभाव, आनंदीपणा, मजा, गमत 'एक करताळिया वाज वुनि। कोडें नृत्य करिती त्याजपुढें॥' ४ आश्चर्य, आनंद मनल, उत्पन्न करणारी गोष्ट 'ज्याच्या शरीरबळाचें कोड। एकला लक्षांवरी दे झड।'—एभा १७ ११९ ५ कोडें, कूट प्रश्न, गूढ 'कोडद्वोड घालिती बुद्धिमंद।'—दावि २२७ ६ (ल) संकट, कष्ट 'कोडें थोडें तो करी नीर गोळा।'—अकक हरिराज मुद्गलार्यांचें भाषांतर ३० ॰पुरविणें-कौतुकानें हौस पुरविणें, लाड पुरविणें, पाहिजे असलेली वस्तु देऊन आनंदित करणें 'आवडी धरूनि करूं गेलों लाड। भक्तिप्रेमकोड न पुरेचि।'—तुगा ८७६ ॰कौतुक-तिक-न लाड, प्रेमाचें लालन, उपचार (क्रि॰ पुरविणें) [ प्रा दे कुड्ड, सिं कोड्ड ]

**कोड**—न कायदेपुस्तक, कायद्यांचा, नियमांचा संग्रह 'लष्करी कोड कुणालाच नाकबूल नाहीं'—के २२।७।१९३०. 'पिनलकोड' [ इं ]

**कोंड**—पु १ (कों) गोल कुंपण, वई, गावकुसू 'इंद्रिय ग्रामींचें कोंड।'—ज्ञा ३ २४२ २ शपथ घेणाराच्या भोंवतीं काढलेलें वर्तुळ ३ (गोट्या) गोटीकरितां केलेलें वर्तुळ, गल ४ वर्तुळाकार वस्ती, खेड्यातील एक स्वतंत्र वस्ती (ही एकाच जातीची असते), आळी, वाडी ५ एकाच्या वहिवाटींतील जमीन, शेत ६ (राना कु) नदींतील डोह, (गो) डबकें, पोंड, कुंड ७ कोंडमारा, गुदमरा 'बहु पाहतां अंतरीं कोंड होतो।'—राम करुणाष्टकें ७ —स्त्री कोंडी, बंद केलेली जागा किंवा घर, तुरुंग ॰डाव-पु (गोट्या) कोंडीचा डाव, यांत निरनिराळीं घरें व रेघा मारून खेळ खेळतात याच्या उलट भगलडाव, यांत विशिष्ट गली सांगून खेळ खेळतात ॰पडणें-संकट येणें [ स कुण्ड, प्रा कोंड ]

**कोंडका**—पु लाकडाचा ओंडका, गाठ कोंडकें पहा

**कोंडकी**—स्त्री १ बगीच्यांत पाणी साठविण्याकरतां केलेला लहानसा खड्डा, हौद २ मिठागर ३ भाताचें खाचर (बांध घालून तयार केलेलें), कोंडकें पहा. [ कोंड ]

**कोंडकें**—न १ (कों) डोंगरांतील आडवळणाची जागा, गुहा, दरी 'पर्वताच्या कोंडक्यांत गाव असल्यामुळें'—खेया

३७ २ बाध घातलेला वाफा ( पाणी राखून ठेवण्यासाठीं ) ३ कोंडका, कोंडकी पहा ४ खिटी, कुत्रे कोरडिकें पहा ५ (ओतकाम) भांडें चरकावर धरण्यासाठीं लावण्याचा लाकडी ठोकळा [ कोंड ]

**कोडगा**—पु भोंवरा, कोटगा पहा

**कोडगा**—पु लाथा, बुक्क्या इ० चा मार, हग्या मार (क्रि० देणें ) -वि १ मार खालेला, मारलेला, लत्तखोर. २ निर्लज्ज, निसवलेला, कोटगा, निगरगट्ट [ का कोड्डि=बेशरम, तुल० कोडण=माकड ] म्ह० लत्तकोडग्याची बलाय दूर, खाता पायपोस जाजा दूर -गेखाऊ-वि जो नेहमीं हग्यामार खातो पण दुर्गुण सोडीत नाहीं असा -गेला-वि कार्हीसा कोडगा, हट्टी

**कोंडण**—स्त्री कोंडण्याची जागा, गोठा, कोंडवाडा [कोंड]

**कोंडणी**—स्त्री ( काव्य) कोंडलेली अवस्था, गुतून, अडकवून पडलेली, बंदिस्त स्थिति, गुतून, बांधून पडणें ( शब्दश व ल ) ' पेश विचाराच्या धालुनि कोंडणी । काय चक्रपाणी निजलेती ।' [ कोंड ]

**कोंडणें**—उक्रि १ चोहोंकडून प्रतिबंधात आणणें, अडकून धरणें, अडविणें, बंद करणें (माणूस खोलींत घालून, नदीस बांध घालून इ०) २ (ल) घोटाळयात घालणें, आणणें, गागरविणें, कुंठित करणें, निरुपाय करणें ( वाद इ० मध्यें ) [ कोंड ]

**कोडत**—न न्याय देण्याची जागा, न्यायालय, कोर्ट 'कोडता तुनहि मराठी भाषा काढण्याचा सरकार यत्न चालवीत आहे हें अगदीं गैर आहे '-नि ४ [ इ कोर्ट ]

**कोडतसाव**—पु ( गो ) पैलू

**कोडता-तें**—पुन १( वे )( शेती ) हातानीं ढेंटें ( ढेकळें ) फोडण्याचें हत्यार २ ( सुतारी ) ( वे ) लाकडी ठोकणी, हात वडा [ का कोडति ]

**कोडपणें**—अक्रि ( ना ) मारणें, शिक्षा करणें

**कोडबा**—वि कोडवी वल्हवणारा कोडवी पहा

**कोडरॉ**—पु (गो ) नदीकिनाऱ्यावर उगवणारें गवत

**कोडवी**—स्त्री (कों ) उलडी असलेली मोठी होडी [ प्रा कोट्टिंब ]

**कोडबुळें-बोळें कोडथळें**—न भाजणीच्या पिठाचें तेलात तळून वर्तुळाकार केलेलें खाद्य [ का कोड=शिंग+बळ्ळी= वेली ? ]

**कोडबो-वो**—पु भात ( धान्य ) ठेवण्याचें, होडीसारखें लाकडी पात्र कोटवा पहा

**कोडम**—न ( व ) कोनाकार लाकूड

**कोंडमार-रा**—पु १ कोंडून ठेवून मारणें, लहान खोलींत घालून गुदमरविणें २ भांडणात, वादात, चढाओढींत, प्रतिपक्षीयानें केलेली अडवणूक, कोंडी ३ संकटात, अडचणींत आणून नकोसें करणें, ४ चहूंकडून कोंडल्यामुळें होणारी अवस्था, अगतिकत्व, कुचंबणा [ कोंडणें+मारणें ]

**कों(कुं)डय**—स्त्री ( गो ) शिंप्याची जात

**कोंडली**—स्त्री ( चंद्रपुरी ) गाडगें, मडकें

**कोंडलें**—न ( कु ) पातळ पदार्थ राहण्यासाठीं सभोंवार भात इ० पदार्थ लावून जें ताटात ( जेवताना ) आळें करतात तें, कुंड [ स कुंड ]

**कोंडवरा**—वि ( राजा ) खोल, खोलगट ( भांडें इ० ) [ का कोडे, हिं कोडना=खोदणें+वरा प्रत्यय ]

**कोडवॅलॉ**—वि ( गो ) कडू

**कोंडवाड**—नस्त्री ( कों ) गुराचा गोठा कोंडवाडा पहा

**कोंडवाडा**—पु गुरें कोंडण्यासाठीं केलेली कोंडी, गावात अगर शेतात शिरून नासाडी करणारीं गुरें कोंडून ठेवण्याची सरकारी जागा, गधेघाट, ह्याच्या सुटकेसाठीं मालकाला रोजचा त्याचा खर्च व दंड भरावा लागतो [ कोंडणें+वाडा ]

**कोडवादीनें**—क्रिवि प्रत्येक वस्तूची किंमत न ठरविता सरसकट कोडीची किंमत ठरवून ( देणें, घेणें ) [ कोडी+वादी ]

**कोडवाव**—स्त्री कोरडी, कोरडवाहु जमीन, केवळ पाव-साच्या पाण्यावर अवलंबून असलेली जमीन, पाणथळ किंवा बागाईत नव्हे अशी जमीन [ कोरड+वावर ]

**कोडवाळ**—स्त्री ( गो ) कडू मासळी, कडुवाळ [ कोड= कडू+वाळ=वाळलेली ( बोंबील ) ]

**कोडवी**—स्त्री ( कु ) एक प्रकारचें झाड

**कोंडळ**—स्त्री एक क्षुद्रप वनस्पति

**कोंडळी**—स्त्री लाकडी फावडें, धान्य मळताना पातींतून उडून गेलेलीं कणसें गोळा करण्याचें साधन

**कोंडळें**—न कडें, वर्तुळ, कोंडाळें ' मग जमदग्नीनें विचा रिलें। मृत्तिकेंचें कोंडळें केलें।' -कालिकापुराण २२ २६ [ कोंड+ आळ ]

**कोंडा**—पु १ धान्याचें भूस, सालपट, तूस इ० ' देवा कल्पा अथवा कोंडा । '-तुकाराम (नवनीत पृ ४४८ ) 'कार्णि म्हणे वायुपुढें जरि काय टिकत असेल कोंडा या।' -मोभीष्म १० ४४ २ (ल) ताप निघाल्यानतर अंगावरील निघणारा एक प्रका रचा भुसासारखा पदार्थ, सालें मळ ३ खपली, पापुद्रा ४ चिवा; एक लहान प्रकारच्या वांबू [ का कोंडे=ओंडा, तुरा ? ]-ड्याचा मांडा करणें-१ अगदीं निकृष्ट परिस्थितींतूहि चागलें कार्य करून दाखविणें, साध्या गोष्टींच्या मदतीनेंहि चागल्या गोष्टी करणें

२ (त) अडून न बसणें, वाढ करून घेणें, समाधानी राहाणें ३ सुमणपणा अंगीं असणें ०पाऊस-पु. पावसाची भुरभुर, रिपरिप केवळ तुषारयुक्त पाऊस पडणें ०पाणी-न अन्नपाणी 'नका देऊं तिळमात्र कोंडापाणी।' -ऐपो २३५ ०भांडा-पु १ कोंडा भूस इ० पदार्थ २ (ल) कोरडें, नीरस, वाळलेलें अन्न कदन्न

कोंडा—१ कोयडा (दाराचा) पहा २ (तंजा) मल्याळी तऱ्हेची वेणी व तिचा साज [ता]

कोंडाळणें—अक्रि १ गरगर फिरणें सैरावैरा धावणें कोंडलेल्या जागेंत इकडे तिकडे फिरणें, वाहणें (वारा) २ घिरट्या घेत जाणें, घाताहात होणें, उधळणें (गवताच्या काड्या धूळ) ३ भोंवरे करीत वाहणें, गिरक्या घेत जाणें (नदी) ४ घोंटाळणें गागरणें (मन) ५ घुंडमार्गे जाणें सैरावैरा धावणें (निबिड अरण्यातल्या प्रमाणें) ६ (ना) कोंदणें गुदमरणें [कोंडणें प्रयोजक]

कोंडाळें—न १ वर्तुळ वटोळें, वाटोळी जागा, आळें २ माणसांनीं वर्तुळाकृति बसणें भोंवतीं बसणें ३ थालिपीठ, कोंडाळें ४ (गो) आळें [कोंड+आळें]

कोंडिसवाणा-णी-णें—वि सुंदर मनोहर कौतुक वाणें, ल्हान, लाजिरवाणें 'ऐसी मूर्ति कोंडिसवाणी इणा। करूनि होसी विश्वरूपा।' -ज्ञा ११ २९१ 'परि लेंकरुभावें बोबडें बोलणें। मायबापा कोंडिसवाणें।' -दाव ४०७ 'ठसिलें सुंदरें कोंडिसवाणी।' -वेसीस्व ७ ७७ [स कुटमम, कोंडिस+वाण]

कोंडी—स्त्री विसाची संख्या खडी (कापड लोखंडी पत्र वगैरे इ० मोजताना योजितात) 'इगोंनी तरवारा उत्तम कोटी' -पेद ८५२ [तुल० स कोटि त कोडिग-२०]

कोंडी—स्त्री १ कोटी शंभर लक्ष 'जे यपझाताचिया कोडी। -ज्ञा ६ ४६५ तयें तेहतीस कोडी। देवाची वसे पर वडी। -कथा ७ ११ १०८ २ अनेक पक्ती 'आनंदें डोलति कोडी। विमानांचिया। -ऋ ३६ ३ प्रकार तऱ्हा कोडीभें असल्यातु कळबु। जयें मिरती गगना। -धवळे १५ ४ (भूमिति) उंची ओळी कोटी पहा [स कोटी]

कोंडी—वि रक्तपित्या कोडयालेला महारोगी ०खाना-पु रक्तपितीवाल्याचें वसतिगृह [कोड]

कोंडा—स्त्री १ कोंडलेली जागा कोंडवाड २ अ झण्यांना दंडिणा देण्याचे वेळीं त्याना बसण्याकरितां कलेलें आरार रमणा लमात कोंडी करून दक्षणा देतात ३ (आट्यापाट्या) गडी पर्वे दोन्हीकडून अडवून धरतात ती पाटी (पाटीवरचा गडी व मुरदुया यानीं अडविलेली) ४ नदीच्या चघाऱ्याची जागा ५ (कों) मीठ बनविण्याची ल्हान मिठागरें [कोंडणें]

कोंडी—स्त्री (व) (ताजार) सरीचा अथवा हुडीचा भाग

कोंडीव—वि १ कोंडलेलें, बंद केलेलें (पाणी, वारा, आग) २ बंदींत ठेवलेला (माणूस, प्राणी) [कोंडणें]

कोडुळें यडुवळ—न (व) कडबुळें कोडबोळें पहा

कोडू—स्त्री (गो) चिरीमिरी, बानगी

कोडू—पु. (बे) कात

कोडें—न १ (काव्य) अडचण, कोंडमारा, पेंच, संकट 'कोडें साकडें संकट। नाना प्रसार सग्पट।' -दा ४ ३ ६ २ कूटस्थळ गूढ प्रश्न 'आजि फिटलें माझें कोडें'। -तुगा २२४० ३ कुबडें, आडुटाणा [स कूट] ०उलगडणें-समजणें, कळणें, शंकानिरसन होणें 'तुम्हांस कोडें हें उलगडलें, तर येथेंच काम झालें' -टि ४ ५७ ०धर्म-न कपटवृत्ति कुकर्म 'कासया करावे कोंविमे। सत्यधर्म त्यजूनी।' -भवि १४ १४

कोड—न १ पगती (मातीची) दिवेलावणें २ डांक लावण्याच्या वेळीं उपयोगांत आणावयाचा समईवजा दिवा [स कुण्=मडकें का कोडें-खापरी भाडें]

कोडें—न (कों) पाणसाप (बेडूक खाणारा) [कोंड]

कोडिवड—न (कुलावा) नवीन तांदुळाच्या कोंड्याचे ल्हान पापड (केळीच्या सोपणाच्या किंवा कोहळ्याच्या पाण्यात पीठ भिजवून करतात ते) [कोंडा]

कोडेल—वि (व) कोड आल्यासारखें अधूनमधून, तुरुक तुरुक एकसारखें नसणारें [कोड]

कोंडा—पु (गो) १ बांबू २ जमीन मोजण्याचें माप कोंडा पहा

को(कां)डोळें—न १ थालिपीठ (भाजणीचें) २ कोंडाळें पहा

कोड्या-ढ्या कोढी—वि कुष्ठरोगी, रक्तपित्या 'जैसा कोढी आपुला हातीं। वारवार रक्षित।' -मुरा २६० म्ह० कोढ्याचा कोढी होईल न होईल पाच डाग तरी धऊन उमेल [कोढ]

कोंड्या-ढ्या—पु माडी ताडी ठेवावयाचा भोंपळा हा ताडीच्या माडाला टांगून ठेवितात [कुडा]

कोंड्या—पु एक झाड

कोंड्या गुरूम—पु भुसभुशीत ठिसूळ मुरूम [कोंडा+मुरूम]

कोढ—पु रक्तपिती कोड पहा

कोढ—न गावठाण कोंड पहा

कोंद—न १ कोंदण २ (ल) खोल 'होळे कोंदनी जाती। -भाग्र ८२३ [कोंदण]

कोंढा—सर्व अर्थी कोंडा पहा

कोढी—स्त्री (ना) हद्दी, हुरामदी [कुढा]

**कोंढी**—स्त्री १ मिठागर, खाचर २ कुडी, कोंडी पहा.

**कोण**—सना १ प्रश्नार्थक सर्वनाम, अज्ञात माणसासंबंधानें विचारताना योजतात २ कोणती, किती 'तेथें या कावियाचा गरिब गुण किती ? प्रौढिही कोण येणें ? ।'—आसी ३२ ३ किती तरी, फार अतोनात 'त्याचें मत वळवावयास मला कोण प्रयास पडले ?' ४ काय ? 'तुम्ही हा उद्योग करता याचा विषय कोण ?' [स क पुन, प्रा कोउण, अप क्वुण-क्वण]

**कोणाचा कोण**-(अज्ञात माणसासंबंधीं माहिती व त्याच्या नात्यागोत्यासंबंधानें माहिती विचारताना ) लावचा नातेवाईक, बळेनें संबंध जोडलेला (य कथिन, फालतू माणसासंबंधीं योजतात) म्ह० कोणाचा कोण पितळाचा होन, सावरला तर शोधतो कोण ? ०एक-सना १ कोणी तरी एक २ विशिष्ट किंवा एखादा माहीत (मनुष्य, वस्तू) ०चा-ता-वि १ दोन वस्तूंपैकीं कोठला २ जो तो, विवक्षित 'तुम्हाला या घोड्या तून कोणता पाहिजे तो घ्या' ०जाणें कोणास ठाऊक, माहीत, न कळे बुवा ०ताका-चाका-पुशीन हवा तो, पाहिजे तो कोणताहि (एकवचनी व अनेकवचनी प्रयोग) 'दोन्ही बरे सारखे आहेत, कोणताका घेईनास' ०त्या झाडाचा पाला-कसपट्या प्रमाणें लेखणें 'नवरा म्हणजे कोणत्या झाडाचा पाला !'—यु ३५ ०त्या तोंडानें-नाकानें-न शरमता, न लाजतां उघड पणें, उजळमाथ्यानें कसा (प्रश्नार्थक) 'तो या गावचा दणे दार आहे तेव्हां तो कोणत्या तोंडानें येथें येईल ?' 'मागें तशी प्रतिज्ञा करून आता त्याकडे कोणत्या नाकानें जाऊ ?' ०त्यासी-कोणास ? 'येणें कोणत्यासी रोस दिलें।'—व ५०३ ०पदार्थ-य कथिन्, निंद्य, त्याज्य, क्षुद्र 'को पदार्थ स्त्रियांच्या जाती। अपवित्र दुष्टिणी। पति असता व्यभिचारिणी।'—पला ४३ ०य-(गो) १ कोणीहि २ कसाहि ०सा-वि कोणी तरी, फलाणा, बोलणारास माहीत नसलेला 'तुम्हाला कोणस हाक मारतो आहे' [कोण+सा=सारखा]

**कोण**—पु कोपरा, कोन 'तुझ्या स्वरूपाच्या निजस्थानीं। आकाश लपे एके कोणीं।'—भारा बाल ११ १७० 'तुजा प्रताप बसला लपोन जाऊनि काय कोणात ?'—भक्तमयूरकेका पृ ४ [स कोण] ०पा-पु (बे) कोपरा, कोना ०पिका-पोक-वि कोपऱ्यांत अगर घरांत पिकलेला (आंबा, फणस इ०) याच्या उलट वरपिका (झाडावर पिकलेला) ०बिंदु-पु कोनाच्या बाजू ज्यात मिळून कोन झालेला असतो तो बिंदु —महमा ३

**कोणगें**—न (दों) मोठ्या पानीवर लागलेलें मधाचें पोळें कोंगें, कोनगें पहा

**कोणप**—न १ कुणप, प्रेत २ (ल) तुच्छ, गलिच्छ वस्तु 'वरीतें कदमला कोणपा या।'—आसी ३८ [सं कुणप=प्रेत]

**कोणाक**—सना (कु) कोणाला

**कोणी**—प्रश्नार्थक सना कुणी, कोणी एक ? कोणीतरी ? कोणीहि ? 'नये ज्वाळ वीशाळ सनीध कोणी।'—राम १२१ —वि कोणी एखादा, वाटेल तो, हवा तो 'कोणी ब्राह्मण सांगा, आमची हरकत नाहीं' म्ह० १ कोणी कोणाचा गुरु कोणी कोणाचा चेला २ कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नाहीं (अदाधुदी, गोंधळ या अर्थीं) [कोण] ०एक-वि कोणता तरी, कोणीहि, अमुकच नव्हे असा, हवा तो ०कडून-कडून-क्रिवि १ कोणत्या ठिकाणाहून-दिशेहून-बाजूकडून ? २ कसेंहि, कोण त्याहि प्रकारें ०कडे-क्रिवि कोणत्या बाजूला, दिशेला, ठिकाणीं **कोणीका**-सना हवा तो, पाहिजे तो 'कोणीका औषध देईना। गुण आल्याशीं कारण' ०तरी-सना १ कोणीहि, कुणी तरी २ य कथिन्, नालायक, भिकार

**कोणे**—न खोली अंतर्गृह [का] ०कोणीं-क्रिवि प्रत्येक कोपऱ्यात, अडचणींत कोनीं पहा

**कोणें**—न गुराच्या कानात होणारा एक रोग यामुळे गुराच्या कानातून पाण्यासारखा पू वहात असतो

**कोणेएक, कोणेक**—कोणीएक पहा 'कोणेक विरळा यातें वरती तत्वज्ञ पति अनाथाचा।'—भक्तमयूरकेका पृ १४

**कोण्या**—सन कवण्या ? कोणत्या ? 'विरक्तें असावें काण्या गुणें'—दा ९ ९ १

**कोण्हा**—प्रश्नार्थक सर्वनाम कोणास, कोणाला ? 'सागानें काणे कोण्हा।'—रामदासी २ १७८

**कोण्ही**—कोणी पहा

**कोत**—स्त्री (फा) कुवत, शक्ति [अर कुव्वत]

**कोत, कात, त**—पु १ भाग, त्याचें फळ 'घायीं कोत न जिरे।'—ज्ञा १३ ७३८ 'पार्थीचा कोत न जिरे।'—एभा १२ २५० २ (व) वेळूचा, बांबूचा कोंब, चिनें —न (कों) माडाच्या किंवा ताडाच्या पोयीचे अग्र, गाभ्याचें टोंक (टोंक कापून नंतर त्यांतून रस गाळण्यासाठीं तेथें मडकें लावतात) [स कुन्त=भाला, का कोत] ०कांती-स्त्री भाला, एक शस्त्र 'लावुळ सागर कमरें। पातकाती ईट तोमरें।'—स्या ३ ११ १४ ०वार-घर-पु भालाईत 'सेने सावळे कोतेघर।'—एरुस्व ७ १३

**कोतमीर-रीर**—स्त्री (कुण) कोथिंबीर पहा

**कोतल**—वि १ (व) रिकामें, राखीव २ जरूरीपेक्षा जास्त —पु कातवाली घोडा सुशारलेला घोडा (मिरवणुकीचा) 'कोतल नर कोतवाल धारण मगनमस्त किए करिते।'—एपो २०० 'स्वारींत कोतल वर कोणी आरूढ न हासा'—ऐरापुत्र ९ ५१० [हि]

कोतवार—पु कोतवाल अर्थ ३ पहा

कोतवाल—पु. १ मराठी साम्राज्यातील नगररक्षकाचा मुख्याधिकारी, शहरचा मुख्य सरक्षक अधिकारी, फौजदार, पोलीस सुपरिंटेंडेंट, कोंकणात सब-इन्स्पेक्टरला कोतवाल म्हणतात हल्लींच्या याच्या कामापेक्षा मराठी राज्यात याला कज्जे तोडणें, बाजारातील वस्तूंचे भाव ठरविणें, खरेदी-विक्रीचे दस्तऐवज नोंदणें इ० कामें असत २ (बडोदें, काशी) गावात जेवणाचें अथवा इतर समारभाचें आमत्रण करणारा अधिकारी, बोलावणेकरी 'निमत्रणें करण्यास कोतवालास यावी,-ऐरापुप्र ६ ४५९ ३ (व) सरकारी काम करणारा गावमहार ४ नित्योपयोगापेक्षा ज्यास्त सग्रह केलेला पदार्थ कोतल पहा ५ स्वारी इ० पुढें शोभेकरिता चालविलेले घोडे, कोतल कोतवाली घोडा 'कोतवालतेजी धावा घेती।' -ऐपो ११ ६ (ल) शोभेसाठीं वापरावयाचे अलकार, कपडे इ०, ठेवणींतला पदार्थ, वस्तु [स कोट्टपाल, प्रा कोट्टवाल फा कोतवाल] म्ह० १ उलटा चोर कोतवालाला दडी २ (गो) कोतवाला आर्थी चोरा बोंब सामाशब्द- ०घोडा-पु मिरवणू कीपुढ शृगारून चालविलेला घोडा, कोतल, कोतवाल [हिंदी] ०चावडी-स्त्री कोतवालाची काम करण्याची सरकारी जागा, कचेरी, हपीस

कोतवाली—स्त्री १ कोतवालकचेरी, कोतवालाचा कारभार, खातें २ शहरजकात, बाजारपट्टी ३ (बा) पोलीसचौकी, नाकें, चावडी 'महा महिने पायात बिडया ठोकून एकेक महिना एकएक कोतवालीवर त्यास बसविला' -विक्षिप्त १ ८८ ४ कोतवालाचा खर्च भागविण्यासाठीं बसविलेले कर -वि कोतवालासबधीं, फौजदारी —चा पोषाख-पु सणासुदीस घालावयाचा उची पोषाख, ठेवणींतील पोषाख ०पिंजरा-पु कैदखाना, तुरुग 'कोणास बेशुद्ध होईपर्यंत मार देण्यात आला व कोतवाली पिंजऱ्याची भरती करण्यात आली' -विक्षिप्त १ ७३

कोता—वि जरूरीपेक्षा आखुड, अपुरा, लांडा, थोटक लहान, तुटका, कमती, तुटपुंजें, सकुचित 'हें प्रमाणहि येथें कोतेंच पडतें।' -नि २१२ 'आमचें ज्ञान किती कोतें आहे पहा' -गीर २४६ [फा कोताह् सि कोताही] कोताई-ही-स्त्री आंखुडपणा, अपुरेपणा, कमताई, तोटा, कोतेपणा 'वसूल घेण्यास सक्ती करितां कोताही केली नाहीं' -ऐटि ५ ११ [फा. कोताही]

कोतार—न (कु) वैर, भाडण

कोतियाळ—वि कोयता (शस्त्र) घेतलेला (वीर) 'येक धावनी आगळे। लाहागळे कोतियाळ। परराधर॥' -शालिका १२७ [कोयता]

कोती—स्त्री वरी(धान्य)ची एक जात, हिचा दाणा पाढरा असतो

कोते-अंदेश—वि अदूरदृष्टि, अविचारी 'आपण खाविंद समीप असता कोते-अदेशानीं उपद्रव यावा हें ठीक नाहीं' -दिमरा १ २२७ [फा कोताह्+अदेश]

कोतिक(का)र-द—पु भालाईत कोतकार पहा 'पैले कोतिकारा। जवळिकें चाला।' -शिशु ५६४. 'कोंतिकारा सुन्ला पलु।' -उषा १६०८ सेले सावळे कोतेकर। धनुर्धर पायाचे।' -एरुस्व ८ १३ [स कुत+कार]

कोतो—पु (कु) पाणी काढण्याच्या लाटीचा कोळंब अडकविण्याचा बाबू, माणगा [का कोट=बाबूची नळी]

कोच—पु (तजावरी) खुडगा, घोंस [का ता कोत्तु]

कोत्ता—पु (तजावरी) गवडी [ता कोल्लुक्कार]

कोथ—न (शाप) सडणें, कुजणें (इ) डिकांपोझिशन -शिलपवि १०१ १०२ [सं कुथ्=कुजणें]

कोथंबरी-बिरी-बीर, कोथिंबरी-बिरी-बीर, कोथमीर, कोथरीब—स्त्री १ धन्याचें रोप हें उगवून कोथिंबीर होण्यास १५ दिवस लागतात धने करावयाचे असल्यास ५-६ महिने लागतात कोथिंबीर कोंवळी असताना तिचीं पानें व दाडे भाजीपाल्यात घालतात याचा एक विशेष स्वाद असतो धने मसाल्याच्या उपयोगी आहेत (बा) सावार २ धने [स कुस्तुबरी, प्रा कुत्थुभरी] ०भात-पु (कों कु) भाता(साळी)ची एक जात ०देवी-स्त्री (अव कोथिंबिऱ्या) देवीच्या रोगाचा एक प्रकार ०बाळी-स्त्री कानांत घालावयाच्या बाळ्याचा एक प्रकार याला कोथबिरीच्या दाण्याच्या आकाराचे मोत्यांचे घोस जोडलेले असतात 'कोथिंबिरी टोपण घोंसबाळ्या।' -सारह ६ २४ 'फुलें इल कोथिंबिरी घोंसबाळी।' -अक्क भस्मासुराख्यान ३१ 'थोंड बाळया कोथिंबिरीवाळया बहुत सुदर।' -कफरा ५५

कोथळा—पु १ मोठें पोतें, थैला (धान्याचा, दारूचा) 'माझ्या हातातल्री चुड इथल्या कोथळ्याला लावली की पुरे!' -सूर्योदय १७६ २ मोठा माणग्याचा कणगा, पालटें (धान्य ठेवण्याचें), मध्यें रद व वर निमुळतें, सामान्यत एका प्रकारच्या बरणीसारखें, धान्य वगैरे ठेवण्यासाठीं केलेलें मातीचें भांडें 'जैसें धान्यें कोथळेयामध्यें सांटविती।' -ऋ ७१ टीप ३ पोट (पक्वाशय), पोटांतील कोठा, पोटांतील कोठ्याभोंवतालचें मांसाचें आवरण ४ शरीरांतील कोणतीहि पिशवी, कोश जसें-अन्नाचा कोथळा, मूत्राचा कोथळा, मळाचा कोथळा 'पोटीं दक्षिणभागीं मळाचा कोथळा।' ५ भोत (उशीचा), खोळ, अभ्रा ६ पोट, भोंसकल्यामुळें पोटातून बाहेर पडलेलें आतडें, ७ जनावरें वितांना बाहेर पडणारी आंतडीं, गुह्यभाग.

८ कवच, घड 'मस्तक कहनिया भित । रायेठ भूमी पाडिल' –मुक्त १४४९ [स कोष्ठ+क, प्रा कोत्थल]

**कोथळी**—स्त्री १ लहान कोथळा, राजण, माती ही वगैरे इतर बहुतेक अर्थ कोथळ्याप्रमाणे २ (व) हावरी अथवा तिळाच्या झाडांची गंजी ३ (व ना) महालक्ष्मीचा मुखवटा बसविण्याकरता केलेली मातीची वाटोळी व पोकळ उच बैठक, खापराचे धड

**कोथळी**—स्त्री मुंबई ६ मणांची गोणी ६७२० सुरती भाराचे वजन –मुव्या १०५

**कोथा**—पु (कु) पाणी काढण्याच्या लाठीच्या कोंच 'ज्याची काठी, ओकतीची काठी कोतो पहा

**कोथेमेथे**—न (को) धने, हिंग, मेथी इ० जिनसांचा समुच्चय [कोथिंबीर(धने)+मेथ्या]

**कोथेर-रे**—न एक प्रकारचे गवत

**कोंद**—स्त्री भाजलेले तीळ कुटून त्यांत गूळ घालून तयार केलेले पुरण, लाडू इ० 'तिळाच्या कोंदची पोळी' –पाक ५४

**कोंद**—पु (व) तांदुळाचा कोंडा [कोंडा]

**कोंद(दा)ट**—वि चोहोंकडून हवा येण्यास प्रतिबंध असलेली, आडोशाची, कोंडमाऱ्याची (खोली, जागा) [कोंदणे]

**कोदंड**—न १ धनुष्य 'आता कोदंड घऊनि हातीं। आरूढ पा इयें रथीं।' –ज्ञा ३ १८९ २ (ल) भूकादंड, मुदई ३ (ल) मोठे संकट (रावणाच्या छातीवर शिवकोदंड पडल्याने तो कासावीस झाला त्यावरून) रामकोदंड पहा [स]

**कोदंडे**—वि उद्धट, दांडगा, भांडखोर, बेपर्वा

**कोंदण**—न १ अलंकारावर रत्ने बसविण्यासाठी केलेले घर, बैठक जेडा 'सौंदर्य हे साधुवृत्तीच्या कोंदणात अधिकच सुंदर दिसते' –नीति ८६ २ रत्ने बसविण्यासाठी कापलेली सोन्याची तार किंवा पत्रा [कोंदणे, तुल० का कुंदन=सोन] ०पट्टी–स्त्री कोंदण बसविण्याकरिता तयार केलेली सोन्याची पट्टी, पत्रा

**कोंदणे**—उक्रि १ जोराने आत भरणे, दाबणे, कोंबणे, खच्चून ठासून भरणे (धुराने घर, मेघाच्या गडगडाटाने आकाश, आनंदातिशयाने मनुष्य इ०) 'इहीं दोहींचि परि ससार । कोंदला असे ।' –ज्ञा १५ ४७६ 'सव अगधारें कोंदली सृष्टी।' –मुआदि ३६ ५४ 'नादें अंबर कोंदलें' –भूपाळी ३० २ बंद होणे, छिद्र भोंक बुजणे 'पडशाने नाक कोंदल'

**कोंदया**—पु (व) कुड (भाडे) [कोंडी?]

**कोदरणे**—क्रि (व) उकरणे [म कु=पृथ्वी+दृ=विदारणे]

**कोंदरा**—वि (नदभाषा) चारगा 'ता दन (मनुष्य) कोंदरा आहे'

घको २ ४१

**कोंदा**—पु हलके व घाणीचे काम, कायाडकष्टाचे काम, कुचेष्टाशी बहुधा अव प्रयोग–कोंदे (क्रि० करणे, निपटणे, उपसणे, करणे, पडणे अक्रि) उदा० 'बाळतपणाचा–दुखण्याचा–पोराचा–म्हाताऱ्याचा–संसाराचा–चाकराचा कोंदा मी उपसतो' [क्षुद्र?]

**कोंदाकोंदी**—स्त्री दाटी, खेचाखेच, भीड, गर्दी 'माझा रीचि कोंदाकोंदी।' –ज्ञा १५ १५६ [कोंदणे]

**कोंदाट**—स्त्री विपुलता, पूर्णता, दाटी 'कर्पूरकेळीचीं गर्भ पुटें। उकलता कापुराचेनि कोंदाटें।' –ज्ञा ११ २५० –वि कोंदट पहा

**कोंदाटणे**—उक्रि गच्च भरणे, एके ठिकाणी गर्दी करणे, ठासून भरणे, कोंबणे 'तेजें कोंदाटलिया दिशा। जयाचेनि।' –ज्ञा १ १३९ 'कोंदाटलें पुढें परब्रह्म सावळें।' –तुगा २२४० –अक्रि कोंदणे पहा [कोंदणे]

**कोंदा(द)वणे**—अक्रि १ (कुण राजा कु) गुदप्रक्षालन करणे २ कोंदा उपसणे, करणे कोंदा पहा

**कोंदी**—स्त्री कोन, भिंतीची सांध किंवा जोड बहुधा सांधी कोंदी असा जोड शब्द येतो [कोंदणे]

**कोंदुणे**—अक्रि (कु) धुणे धुणे कोंदावणे अर्थ १ पहा

**कोद्रव कोद्रू**—पु एक प्रकारचे हलके धान्य, हरीक हे सर्व धान्यातील हलके धान्य असून गरिबांशिवाय दुसरे कोणी खात नाहीत हे कितीहि निकस जमिनीत पिकते [स कोद्रव]

**कोन**—पु १ कोपरा २ प्रसूति, बाळतपण (ह्या प्रसंगी स्त्री घराच्या कोपऱ्यात–बाजूला जाते यावरून) 'तिचा कोन चांगला म्हणून लवकर बाळंतीण होती' ३ बाळंतिणीचीं वस्त्रें, खाटलें, भांडीकुंडी इ० सामान, बाळंतें ४ (चे) ठेवण्याची, राहाण्याची जागा देवाचा कोन '=देवघर ५ (यत्र भूमिति) दोन रेषा तिरकस येऊन एका बिंदूत एकत्र होतात ती आकृति याचे लघुकोन, काटकोन विशालकोन असे प्रकार आहेत (इं) अँगल [स कोण] (वाप्र) ०होणें निघणें–(व) बाळंत होणें, प्रसूत होणे (विप्र) **कानीं निघणें, कान येणें**–बाळंत होणें हे प्रयोग सर्वमान्य आहेत 'मग ते गरोदर होऊनि कोनीं निघली' –पच ४३ तजावराकडे **कोन्नी–घेणें जाणें**–असें म्हणतात [फ्रें. जि मुनि] सामाशब्द– ०**कोपरा, कोना कोपरा**–पु १ सांधीकोंदी, एका कडेची बाजू अडगळ, सहज लक्षात न येणारी जागा वस्तु कोठें कोनाकोपऱ्यास पडली असेल ती पाहून आण' २ देऊळ पुढें आलेला फुगीर (भाग) भिंतीला कोठें कोनाकोपरा वाढला असेल तर छाटून टाक [कोन+कोपरा] **कोन्याकोपऱ्याचा**–वि १ सांधीकोंदींतला, काटलेतरी २ (ल) क्षुद्र, हलका **कोनटा**–पु १ (व ना) कोपरा.

२ घरांतील अंधारी जागा [ कोन हिं. कोठा ] कोनडा-ढ, कोनाडा-डें-पुन सामान ठेवण्याकरतां भिंतींत ठेवलेलें छिद्र, जागा, देवळी, गोखला ०पट-न ( कोनचें हीनत्वदर्शक रूप ) १ कोपरा २ ( ल ) एकीकडची, एकांताची जागा, आड बाजू ०पडा, कोनपा-पु कोनपट पहा ०पालट-पु १ दुखणेकऱ्यास आराम पडण्यासाठीं निजण्याची जागा बदलणें २ ०व्यालेल्या गाईनें आपल्या पिलानें स्थलांतर करणें [ कोन+पालटणें ] ०पिका-पीक-वि कोणपिका पहा ०फळी-स्त्री ( कों ) दोन भिंतींच्या कोपऱ्यांत बसविलेली फळी ०बिंदु-पु ( भूमिति ) त्रिकोणाचा शिरोबिंदु ( इ ) व्हर्टेक्स कोणबिंदु पहा ०मापक-पु कोन मापण्याचें हत्यार ( इ ) प्रोट्रॅक्टर ०वासा-पु ( गो ) घराच्या दोन पाख्यांच्या सांध्यावर आढ्यापासून छपराच्या कोपऱ्यापर्यंत घातलेला मोठा वासा ०वृत्त-न ( ज्यो ) ईशान्य किंवा वायव्य वेधवलय किंवा वेधवृत्त

कोन—पु ( व ) कोंडा पहा

कोन, कोनफळ—पुन एक कंद व त्याची वेल ( हा कांदा गोराडूसारखा असतो )

कोनगें—न ( गो ) दरींतील तुटलेल्या कड्याला लागलेलें मधाचें पोळें, कोंगें, मधाच्या पोळ्याची एक जात, कोणगें

कोनट, कोना-न्या—पु ( कों ) कुणब्यास निंदाव्यंजक शब्द [ कुणबट ]

कोनटोपर—न ( व ) कानटोपी, कान्होलें [ कान+टोपडें ]

कोनसो—पु ( गो ) कोपरा, कोन [ कोन ]

कोना-न्या—पु १ कोपऱ्याचा घडीव दगड २ घराच्या आढ्यावर किंवा कोनवाशावर घालण्याचें चापट कौल ३ कोन वासा [ कोन ] कोनात्मक-वि कोनसंबंधीं कोनाचें कोनात्मक अंतर-न कोनाचें अंतर वर्तुळाच्या भागामध्यें मोजावयाचें अंतर, वर्तुलखंड

कोनीक—सना ( कु हर ) कोणाला ? [ कोण ]

कोनें—न हत्ती उंट, रेडा, गाय इ० जनावरांच्या पायास, कानास किंवा एखाद्या सांध्यांत होणारा एक रोग कोणें पहा [ कोन ]

कोनें बांधणें—क्रि ( माण ) अबाडीच्या झाडाची झुडपें, विंडे बांधणें [ का कोने=झाडाची फांदी, कांडकी ]

कोन्टा—पु ( ना ) कोपरा कोनटा पहा 'तो कोन्टयांत बसला'

कोन्हें—न मधाचें पोळें कोनगें पहा

कोप—पु १ दुसऱ्याच्या अपराधामुळें आपल्या अंतःकरणाची होणारी रागीट वृत्ति राग; क्रोध 'तुमच्या कोपें काटें जावें।' —तुगा ११६५ २ प्रकोप पहा 'पित्त-वात कोप'

कोपट-वि कोपिष्ट; रागीट, चिडखोर कोपास चढणें-रागावणें, क्रोध येणें, संतापणें 'गांगेय कोपा चढला कसा रे।' —वामन. भीष्मप्रतिज्ञा १० [ स ]

कोप—पुन १ पुजलेली, गळलेली, किडलेली, भगाची जागा ( फळ, काष्ठ, पाषाण इत्यादींची ) २ ( सामा ) दोष, विकार, व्यंग [ स कुप् ]

को(कों)प-पी, कोपट—स्त्री १ झोपडें ( शेतांतील गवत पानांचें ), झोपडी, कुटी; मांडव, मडपी 'तैसी जीवथी कोपटी धरूनि ठाके।' —ज्ञा ११ ७८४ 'कोपटें आणि पत्रळारें।' —एभा १४ २१२ २ ( ल ) घर 'तेणें हुरहुरां जळति कोंप टिभा। स्वर्गादिकांचिआ।' —शिशु ९१३ 'लावि आंत टाऊनि कोपट।' —मृ ४४ 'म्हणौनि मठाचे दारिं कोंपि करूनि असावें' —पच १२८ ३ ( ल ) शरीर 'काय कष्टउपचार। कोंप मोडकी जर्जर॥' —तुगा ६८२ [ का तुळु कोप्प=झोपडी, खेडें ]

कोपणें—अक्रि रागावणें 'परिकोपेल त्रिभुवनपति।' [ कोप ]

को(कों)पर—पु भुजा आणि हात यांच्या मधल्या सांध्याचें मागील टोंक [ स कूर्पर, प्रा कोप्पर, गु कोपरियु ] ( वाप्र ) कोपराढोपरानें करणें-( बायकी ) कसें तरी करून कष्टानें, आयासानें ( घरकाम ) करणें कोपराढोपरानें चालणें, जाणें-मोठ्या नेटानें संकटांतून तरून जाणें, कसेंबसें काम पुरें पाडणें ( कमजोर, अशक्तता असतांना ) कोपरापासून हात जोडणें-अति कळकळीनें विनविणें कोपरापासून नमस्कार-१ वरील अर्थ २ संबंध नसावा अशा अर्थी 'असल्या नाटक्यांना कोपरापासून नमस्कार असो' म्ह० १ मऊ सांपडलें म्हणून कोपरानें खणूं नये किंवा २ मऊ-नरम लागलें म्हणजे कोपरानें खणणें=गरीब मनुष्य सांपडला म्हणजे त्याचा फार फायदा घेणें सामाशब्द-०कात्री-स्त्री वांकड्या पात्याची कात्री शस्त्रक्रियेंत हिचा उपयोग असतो ०ख(खि)ळी-स्त्री १ कोपरानें मारलेली ढुसणी, ढुसकणी ( क्रि. मारणें, येणें ) २ कोपरानें पाडलेला खळगा ( हा गुराख्यांचा खेळ असतो अशा खळग्यांत तीं पोरें गोट्यांनीं खेळतात ( क्रि० पाडणें ) ३ ( ल ) लेखांत, भाषणांत उगाच दुसऱ्यावर घेतलेलें तोंडसुख, जातां जातां, सहजासहजीं एखाद्या विरुद्ध बोलणें ०घुसणी-स्त्री ( गोट्याच्या खेळांतील एक शब्द ) कोपरानें गोटी गलींत घालणें कानघुसणी पहा ०मोड वि ( व ) कोपरासारखी मोडलेली ( जागा ) ०वाळी-स्त्री ( व ) बाजूबंद, एक दागिना [ कोपर+वाळा ]

कोपर-रा-री, कोहोपरा—पुस्त्री ( व ना ) भाकरीचें पीठ मळावयाची मोठी परात ( तांब्यापितळेची ), थाळी, सनकी, पितळी लहान कोपराला कोपरी म्हणतात ( कु ) कोपरो=हंडा, रुंद तोंडाचें भांडें [ स खर्पर ]

**कोपरवरास-ग्रास**—न. १ तांबें व पितळ यांची मिश्र धातु. २ (कु.) टीनची धातु. कोपरवरासचा डबा=केरोसिनचा (टिनचा) डबा. ३ जर्मनसिल्व्हरला म्हणतात. [इं. कॉपर+ग्रास]

**कोपरा**—पु. लहान लोखंडी कढई. कोपर-रा पहा.

**को(कों)परा**—पु. १ कोन; उपदिशा. २ (वास्तु.) दोन भिंतींच्या सांध्यांतील दर्शनी काटकोनांतील चौरस दगड. [सं. कूर्पर; प्रा. कोप्पर] ०धरणें-(वायकी) १ रुसणें. २ चिडावळशी होणें.

**को(कों)परी**—स्त्री. १ तळहातापासून कोंपरापर्यंत ४० अगर जास्त वेढे देऊन सुंभ इत्यादि दोरीची केलेली गुंडाळी. २ गोट्यांच्या खेळांतील एक संज्ञा, डाव लागला म्हणजे नियमित स्थळापासून गोटी कोपराकोपरानें उडवीत गलीमध्यें आणून टाकणें. ३ नखुरडें. ४ कोपराजवळ येणारी सूज; एक रोग. ५ कोपरापर्यंतों बाह्या असलेली बंडी, अंगरखा. 'अंगांत रेशमी कोपरी.' -हाकांप २११. [कोपर]

**कोपल-फल**—न. एक प्रकारचें तेल, व्हार्निश. 'रोगणाचा उपयोग करणें झाल्यास कोपल रोगणाचा उपयोग करावा' -मॅरट २५. -सेंपु २.७५.

**कोपळी, कोपई, कोपी**—स्त्री. (व.) कटिरी झुडप.

**कोपळें**—न. (व.) कोपळी तोडण्याचें हत्यार.

**कोपायमान**—वि. रागावलेला; संतप्त. [सं. कुप्यमान]

**कोपिष्ट, कोपी**—वि. ज्यास लवकर राग येतो असा; शीघ्र संतापी.

**कोपी**—स्त्री. शेतांतील झोपडें; खोपट. कोपट पहा. 'आश्रमाची स्थान कोपी गुहा।' -मुग २७२५. [का. कोप्प-प्पी]

**कोपीन-न**—नस्त्री. लंगोटी. (क्रि० नेसणें). 'नेसोनि कोपीन शुभ्रवस्त्र जाण।' -मुग २८३०. [सं. कौपीन]

**कोफता**—पु गोळा (स्वयंपाकांतील). 'खेम्याचे कोफते म्हणजे गोळे करून...' -गृदि २.१०. [फा. कोफ्ता=कुटलेला गोळा (मांसाचा)]

**कोंब**—पु. १ कोम, झाडाचा धुमारा (केळीच्या कांद्यापासून निघणारा पालवा). 'बाळाचे कंद निघाले कोंब। तेंसुं रसकळीनें कांब।' -मुभा २.८ २ अंकुर; मोड. 'विपरीत ज्ञानाचा कोंब फुटे।' -विउ २.७ ३ (गो.) पालवीचा वाढलेला दांडा. [सं. कंपी; का. कोंबु=शिंग, फांदी]

**कॉंबट**—वि. कोमट, उबट, सोमट, शिशिर उष्ण, मावळलेला. (शरीर, वस्तु, इ० स स्वस्तात, हातमध्ये योजीत नाहींत) [सं. कोष्ण, कवोष्ण !]

**कोंबडसाद-पहाट**—स्त्री. कोंबडा आरवण्याची वेळ, पहाट.

**कोंबडसादीं**—क्रिवि. (गो.) कोंबडा आरवण्याच्या वेळीं; अगदीं पहाटे [कोंबडा+साद]

**कोंबडा**—पु १ एक पाळीव पक्षी; मुरगा. याचा रंग चित्रविचित्र असून डोक्यास तुरा असतो व गळ्यास कल्ले असतात. याचें मांस खातात. २ फुगडीचा एक प्रकार. गाणें- 'जिजीबाईचा कोंबडा आला माझ्या दारीं, घालीनचारा पाजीन पाणी' इ० म्ह० १ (म्हातारीनें, शेजारणीनें) कोंबडा झांकला म्हणून उजडावयाचें (तांबडें फुटावयाचें) रहात नाहीं. २ कोंबडा नेला डोंगरा म्हणून का दिवस उगवत नाहीं. =जी गोष्ट व्हावयाची ती शुल्लक अडथळ्यानें टळत नाहीं. स्वाभाविक परिणाम व्हावयाचाच.

**कोंबडी**—स्त्री. कोंबड्याची मादी ही बाराहि महिने अंडीं घालते व एकवीस दिवसांत अंडीं उबवून पिलें बाहेर काढते.

**कोंबडें**—न. १ कोंबड्याचें लहान पिल्लूं. २ टगांतील तांबूस पट्टे; पाऊस पडण्याचें चिन्ह. (वाप्र.) दाणे टाकून कोंबडें झुंजविणें-मुद्दाम पदरचें खर्चून भांडणें लावणें. ०आरणें-न. कोंबडा आरवण्याची वेळ. **कोंबडेरात-रात्र**-स्त्री. पहांटे चार वाजण्याची वेळ.

**कोंबडा**—पु नंदाभोंवतीं पडलेलें खळें.

**कोंबणें**—उक्रि. १ ठासून भरणें; गच भरणें; ठासणें. २ चडडणें; डुबलणें.

**कोंबणें**—अक्रि. कोमेजणें; वाळणें; निस्तेज होणें.

**कोंबणें, कोंबवणें**—अक्रि. कोंब, अंकुर फुटणें; मोड येणें. [कोंब]

**कोंब(या)रा**—पु कोंब, अंकुर. 'मुळीं मुसाराना निपनी मारा। घेऊनी फुटनी कोंबारा।' -ज्ञा १५.१८४.

**कोंब(म)री**—स्त्री. (गो.) कोंब पहा.

**कोंबरो**—पु. (कु.) मासीचें एक भांडें. [सं. मर्पर; म. खापर]

**कोयलें**—न आरि काढण्याकरतां काठीला जाळें योजतात तें; पळ; झोळ, झोळी, झोला.

**कोयलेयारक, कोयस्नाक**—न. टिन धातु. कोपरवरास पहा. कोपलेयारकचा डबा=राकेलचा, टीनचा डबा.

**कोयवा**—पु (वास्तु) चुना, माती, कांकेट, शिमेंट, सेटींच्या लेप्या इ० चें मिश्रण. यानें भुई, गच्ची तयार करतात.

**कोंवा**—पु. (गो को) कोंबडा. -शिशु

**कोंवा**—पु (को) अंकुर, कोंब पहा.

**कोवाया**—स्त्रीअ (व) कच्चा करताना मादा-पिंडा.

**कोवाळ**—पु (चि.) १ कांगे काम न करणारा मुलगा, मुलगा, इ० निरुपयोगी मनुष्य. २ नरम वस्तु. -मसाप २.१०७.

२ घरांतील अंधारी जागा. [ कोन हिं. कोठा ] कोनडा-डें, कोनाडा-डें-पुन. सामान ठेवण्याकरतां भिंतीत ठेवलेलें छिद्र, जागा; देवळी; गोखला. ०पट-न. ( कोनचें हीनत्वदर्शक रूप ) १ कोपरा. २ ( ल. ) एकीकडची, एकांताची जागा; आड बाजू. ०पडा, कोनपा-पु. कोनपट पहा. ०पालट-पु. १ दुखणेकऱ्यास आराम पडण्यासाठीं निजण्याची जागा बदलणें २ व्यालेल्या गाईनें आपल्या पिलाचें स्थलांतर करणें. [ कोन+पालटणें ] ०पिका-पीक-वि. कोणपिका पहा. ०फळी-स्त्री. (कों.) दोन भिंतीच्या कोपऱ्यांत बसविलेली फळी ०बिंदु-पु. ( भूमिति ) त्रिकोणाचा शिरोबिंदु (इं) व्हरटेक्स. कोणबिंदु पहा. ०मापक-पु कोन मापण्याचें हत्यार. (इं) प्रोट्रॅक्टर. ०वासा-पु (कों) घराच्या दोन पाख्यांच्या सांध्यावर आढ्यापासून छपराच्या कोपऱ्यापर्यंत घातलेला मोठा वासा. ०वृत्त-न. (ज्यो.) ईशान्य किंवा वायव्य वेधवलय किंवा वेधवृत्त.

कोन—पु ( व ) कोंडा पहा.

कोन, कोनफळ—पुन. एक कंद व त्याची वेल (हा घाडा गोराडूसारखा असतो ).

कोनगें—न. ( गो. ) दरींतील तुटलेल्या कडयाला लागलेलें मधाचें पोळें; कोंगें; मधाच्या पोळ्याची एक जात; कोणगें.

कोनट, कोना-न्या—पु. ( कों. ) कुणब्यास निंदाव्यंजक शब्द. [ कुणबट ]

कोनटोपर—न. (व.) कानटोपी, कान्होळें. [ कान+टोपडें ]

कोनसो—पु ( गो. ) कोपरा; कोन. [ कोन ]

कोना-न्या—पु १ कोपऱ्याचा घडीव दगड २ घराच्या आढ्यावर किंवा कोनवाशावर घालण्याचें चापट कौल ३ कोन वासा. [ कोन ] कोनात्मक-वि. कोनसंबंधीं, कोनाचें. कोनात्मक अंतर-न. कोनाचें अंतर. वर्तुळाच्या भागामध्यें मोजावयाचें अंतर, वर्तुलखंड.

कोनीक—सना ( कु हेट ) कोणाला ? [ कोण ]

कोनें—न हत्ती, उंट, म्हैस, गाय इ० जनावरांच्या पायास, कानाला किंवा एखाद्या सांध्यांत होणारा एक रोग. कोणें पहा. [ कोन ]

कोने बांधणें—क्रि ( माण. ) अंबाडीच्या काड्याची जुडगी, पिंडे बांधणें [ का कोने=शाडाची फांदी, काटकी ]

कोन्टा—पु ( ना ) कोंपरा कोन्टा पहा. 'तो कोन्टयांत बसला.'

कोन्हें—न. मधाचें पोळें. कोनगें पहा.

कोप—पु. १ दुसऱ्याच्या अपराधामुळें आपल्या अंतःकरणाची होणारी रागीट वृत्ति. राग, क्रोध. 'तुमच्या कोपें कांटे जावें।' —तुगा ११६५ २ प्रकोप पहा. 'पित्त-वात कोप' कोपट-वि कोपिष्ट; रागीट; चिडखोर. कोपास चढणें-रागावणें; क्रोध येणें; संतापणें. 'गांगेय कोपा चढला कसा रे।' —वामन. भीष्मप्रतिज्ञा १०. [ सं. ]

कोप—पुन. १ कुजलेली, गंजलेली, किडलेली, नगाची जागा ( फळ, काष्ठ, पाषाण इत्यादींची ). २ ( सामा. ) दोष; विकार; व्यंग [ सं. कुप् ]

को(कों)प-पी, कोपट—स्त्रीन. १ झोंपडें (शेतांतील गवत पानांचें ); खोंपटी; कुटी; मांडव, मंडपी. 'तैसी जीवेंसी कोंपटी घरूनि ठाके।' —ज्ञा १३.७८५. 'कोंपटें आणि धवळारें।' —एभा १४.२३२. २ ( ल. ) घर. 'तेणें हुरहुरां जळति कोंपटिआं। स्वर्गादिकाचिआ।' —शिशु ९१३. 'लावि आत ठाऊनि कोंपटें।' —मप्र ४४. 'म्हणौनि मठाचे द्वारिं कोंपि करुनि असावें.' —पंच १.२८. ३ (ल) शरीर 'काय करूं उपचार। कोंप मोडली जर्जर॥' —तुगा ६८२. [का. तुल० कोप्प=खोपटी, खेडें]

कोपणें—अक्रि. रागावणें. 'परि कोपेल त्रिभुवनपति।' [कोप]

को(कों)पर—पु भुजा आणि हात यांच्या मधल्या सांध्याचें मागील टोंक. [ सं. कूर्पर; प्रा. कोप्पर; गु. कोपरियु ] (वाप्र.) कोपराढोपरानें करणें-( बायकी ) कसें तरी करून कष्टानें, आयासानें (घरकाम) करणें कोपराढोपरानें चालणें, जाणें-मोठ्या नेटानें संकटांतून तरून जाणें; कसेंबसें काम पुरें पाडणें (कमजोर, अशक्तता असताना) कोपरापासून हात जोडणें-अति कळवळ्यानें विनविणें. कोपरापासून नमस्कार-१ वरील अर्थ २ संबंध नसावा अशा अर्थी. 'असल्या नादक्यांना कोपरापासून नमस्कार असो.' म्ह० १ मऊ सांपडलें म्हणून कोपरानें खणूं नये. किंवा २ मऊ-नरम लागलें म्हणजे कोपरानें खणणें= गरीब मनुष्य सांपडला म्हणजे त्याचा फार फायदा घेणें. सामाशब्द—०कात्री-स्त्री. वाकड्या पात्यांची कात्री. शस्त्रक्रियेंत हिचा उपयोग असतो. ०ख(खि)ळी-स्त्री. १ कोपरानें मारलेली ढुसणी, ढुसकणी. (क्रि. मारणें; येणें ). २ कोपरानें पाडलेला खळगा. (हा गुराख्याचा खेळ असतो. अशा खळग्यांत तीं पोरें गोटयांनीं खेळतात. ( क्रि० पाडणें ). ३ ( ल ) लेखांत, भाषणात उगाच दुसऱ्यावर घेतलेलें तोंडसुख; जाता जातां, सहजासहजीं एखाद्या-विरुद्ध बोलणें. ०घुसणी-स्त्री. (गोटयाच्या खेळांतील एक शब्द) कोपरानें गोटी गर्तीत घालणें. कानघुसणी पहा. ०मोड-वि. (व ) कोपरासारखी मोडलेली (जागा) ०वाळी-स्त्री. (व.) बाजूबंद; एक दागिना. [ कोपर+वाळा ]

कोपर-रा-री, कोहोपरा—पुस्त्री. ( व. ना. ) भाकरीचें पीठ मळावयाची मोठी परात ( तांब्यापितळेची ); थाळी; सनकी, पितळी. लहान कोपराला कोपरी म्हणतात. (कु.) कोपरो= हंडा, रुंद तोंडाचें भांडें. [ सं. खर्पर ]

**कोपरवरास-ग्रास**—न. १ तांबे व पितळ यांची मिश्र धातु. २ (कु.) टीनची धातु. कोपरवरासचा डबा=केरोसिनचा (टिनचा) डबा. ३ जर्मनसिल्व्हरला म्हणतात. [इं. कॉपर+ग्रास]

**कोपरा**—पु. लहान लोखंडी कढई. कोपर-रा पहा.

**को(कों)परा**—पु. १ कोन; उपदिशा २ (वास्तु.) दोन भिंतींच्या साध्यांतील दर्शनी काटकोनांतील चौरस दगड. [सं. कूर्पर; प्रा. कोप्पर] ०धरणें-(बायकी) १ रुसणें. २ विटाळशी होणें.

**को(कों)परी**—स्त्री. १ तळहातापासुन कोंपरापर्यंत ४० अगर जास्त वेढे देऊन सुंभ इत्यादि दोरीची केलेली गुंडाळी २ गोट्यांच्या खेळांतील एक संज्ञा, डाव लागला म्हणजे नियमित स्थळापासुन गोटी कोपराकोपरानें उडवीत गल्लीमध्ये आणून टाकणें. ३ नखुरडें. ४ कोपराजवळ येणारी सूज; एक रोग. ५ कोपरापावेतों बाह्या असलेली बंडी, अंगरखा 'अंगांत रेशमी कोपरी.' -हाकांध २११ [कोपर]

**कोपल-फल**—न. एक प्रकारचें तेल, व्हार्निश. 'रोगणाचा उपयोग करणें झाल्यास कोपल रोगणाचा उपयोग करावा' -मॅरट २५. -सेंपू २.७५.

**कोपळी, कोपई, कोपी**—स्त्री. (व.) कटिरी झुडप.

**कोपळें**—न. (व.) कोपळी तोडण्याचें हत्यार.

**कोपायमान**—वि. रागावलेला; संतप्त. [सं. कुप्यमान]

**कोपिष्ट, कोपी**—वि. ज्यास लवकर राग येतो असा; शीघ्रसंतापी.

**कोपी**—स्त्री. शेतांतील झोपडें; खोपट कोपट पहा. 'आश्रमासी स्थान कोपी गुहा।' -तुगा २७२५ [का. कोप्प-प्पी]

**कोपीण-न**—नस्त्री. लंगोटी. (क्रि० नेसणें). 'नेसोनि कोपीन शुभ्रवस्त्र जाण।' -तुगा २८३०. [सं. कौपीन]

**कोफता**—पु गोळा (स्वयंपाकातील). 'खेम्याचे कोफते म्हणजे गोळे करून...' -गृशि २ १०. [फा. कोफ्ता=कुटलेला गोळा (मांसाचा)]

**कोंब**—पु १ कोम, झाडाचा धुमारा (केळीच्या कांद्यापासुन निघणारा पासंवा) 'बाळाकें वंदा निघाले कोंब। तैसे रत्नमणींचे खांब।' -गुसभा २ ८. २ अंकुर; मोड. 'विपरीत ज्ञानाचा कोंब फुटे।' -विउ ३ ७ ३ (गो.) पालखीचा वांकलेला दांडा. [सं. कंबी; का. कोंबु=शिंग, फांदी]

**कोंबट**—वि. कोमट, उबट, सोमळ, किंचित् उष्ण, साधारण ऊन. (शरीर, वस्तु, इ० स लावतात, हवेसंबंधीं योजीत नाहींत) [सं. कोष्ण; कवोष्ण?]

**कोंबडसाद-पहाट**—स्त्री. कोंबडा आरवण्याची वेळ; पहाट.

**कोंबडसादीं**—क्रिवि. (कों.) कोंबडा आरवण्याच्या वेळीं; अगदीं पहाटे [कोंबडा+साद]

**कोंबडा**—पु १ एक पाळीव पक्षी; मुरगा. याचा रंग चित्रविचित्र असून डोक्यास तुरा असतो व गळ्यास कल्ले असतात. याचें मांस खातात. २ फुगडीचा एक प्रकार. गाणें- 'जिजीबाईचा कोंबडा आला माझ्या दारीं, घालीन चारा पाजीन पाणी' इ० म्ह० १ (म्हातारीनें, शेजारणीनें) कोंबडा झांकला म्हणुन उजडावयाचें (तांबडें फुटावयाचें) रहात नाहीं. २ कोंबडा नेला डोंगरा म्हणून का दिवस उगवत नाहीं. =जी गोष्ट व्हावयाची ती क्षुल्लक अडथळ्यानें टळत नाहीं. स्वाभाविक परिणाम व्हावयाचाच.

**कोंबडी**—स्त्री कोंबड्याची मादी ही बाराहि महिने अंडीं घालते व एकवीस दिवसांत अंडीं उबवून पिलें बाहेर काढते.

**कोंबडें**—न. १ कोंबड्याचें लहान पिल्लूं. २ ढगांतील तांबुस पट्टे; पाऊस पडण्याचें चिन्ह. (वाप्र.) **दाणे टाकून कोंबडें झुंजविणें**-मुद्दाम पदरचें खर्चून भांडणें लावणें. ०**आरणें**-न. कोंबडा आरवण्याची वेळ. **कोंबडेरात-रात्र**-स्त्री. पहांटे चार वाजण्याची वेळ.

**कोंवडा**—पु. चंद्राभोंवतीं पडलेलें खळें.

**कोंबणें**—उक्रि. १ ठासुन भरणें; गच्च भरणें; ठासणें. २ वदडणें; कुचलणें.

**कोंबणें**—अक्रि. कोमेजणें; वाळणें; निस्तेज होणें.

**कोंबणें, कोंबवणें**—अक्रि. कोंब, अंकुर फुटणें; मोड येणें. [कोंब]

**कोंब(वा)रा**—पु. कोंब, अंकुर. 'मुळीं सुवासना निघती आरा। घेऊनी फुटती कोंवारा।' -ज्ञा १५.१८४.

**कोंव(म)री**—स्त्री. (गो.) कोंब पहा.

**कोवरो**—पु. (कु) मातीचें एक भांडें. [सं. खर्पर; म. खापर]

**कोवलें**—न. आंबे काढण्याकरता काठीला जाळें बांधतात तें, घळ, झोल; झेलगें; झेला.

**कोवलेवारक, कोवरवाक**—न. टिन धातु, कोपरवरास पहा. कोवलेवारकचा डबा=राकेलचा, टीनचा डबा.

**कोवा**—पु (वास्तु.) चुना, माती, काक्रीट, सिमेंट, शेळीच्या लेंड्या इ० चें मिश्रण. यानें भुई, गच्ची तयार करतात.

**कोंवा**—पु. (गो. कों.) कोंवडा. -शिपु.

**कोंवा**—पु (कों) अंकुर; कोंब पहा.

**कोवाया**—स्त्रीअ. (व.) कलकल करणाऱ्या बाया-स्त्रिया.

**कोवाळ**—पु (चि.) १ फारसें काम न करणारा मुलगा, म्हातारा, इ० निरुपयोगी समुदाय. २ टाकाऊ वस्तु. -ममाप २.१०७.

कोंची, कोंव—स्त्री: एक पानांचा गड्डा; भाजी; ही युरोपियांनीं आणलेली असून हिचे तीन-चार प्रकार आहेत. जिचा गड्डा जड ती उत्तम. ही थंडीच्या दिवसांत तयार होते हिला जमीन चांगली लागते. हिच्या हाळी (लवकर होणारी) व गरी (उशीरां होणारी) अशा दोन जाती आहेत. करम, करमाची भाजी असेंहि म्हणतात. (गो.) कोंबू. [पोर्तु. कोउवे; इं. कॅबेज]

कोंची—स्त्री. १ लहान कोंब. कोंब पहा. २ (गो.) कोंबडी पहा.

कोंचीट—न. फाळ नसून बोंडशी असलेला बाण, तीर.

कोंबू—न. एक वाद्य. -देहु १८.

कोंबेर्णे, कोंब्रेवणें—अक्रि. (राजा. गो.) कोंब येणें; अंकुर फुटणें. कोंवणें पहा. [कोंव]

कोंबो—पु. (कु) कोंबा; कोंबडा पहा.

कोंभ(म)—पु अंकुर. कोंब पहा. 'कां रत्नबीजा निघाले कोंभ।' -ज्ञा ६.२५३. 'प्रथम कोंभरिया उपक्रम।' -सिसं ४ ७६.

कोंभ—पु स्तंभ, खांब. 'डोळे फिरवी गरगरां दात खाय करकरा कोंभाचि कचकावला।' -भज १२८. [कोंब]

कोंभ—पु झाग, वन; अरण्य. एकांतजागा; सांधीसुंदी. 'उदेजेति परविर्वी। कळि कोळिगा राहिला कोंभीं।' -ऋ ९०.

कोंभणें—क्रि. अंकुर येणें; कोंब येणें; कोंवेणें; उत्पन्न होणें 'तेव दोर्देडीं जैसें। आकाश कोंभलें।' -ज्ञा ११.२६६. [कोंब]

कोंभ(भा)रा—पु कोंब पहा.

कोंमा—पु. (व. ना.) टोंसा, गुद्दा; कोपारखळी.

कोंमा—पु (कों.) माडाचा रोपा. [कोंब]

कोम—हा शब्द व यानें आरंभ होणारे शब्द कोंब खालीं पहा

कोम—स्त्री. १ कागदपत्रांत विधवेच्या नांवापुढें व तिच्या नवऱ्याच्या नांवामागें हा शब्द योजतात. जसें-जानकीबाई कोम रामजीपंत. ज्या जातींत पाट लावण्याची चाल नाहीं अशा ब्राह्मण जातींत हा शब्द वापरतात व ज्या जातींत पाट लावतात अशा कुणबी व शूद्र जातींत कोम ऐवजीं 'जवजे' हा शब्द वापरतात कोम च्या अर्थाबद्दल बराच मतभेद आहे. कित्येकांच्या मतें जवजे, वल्द, बिन यासारखाच याचा अर्थ होतो. म्हणजे 'ची बायको,' व कित्येकांच्या मतें 'जिचा नवरा अमुक' असा अर्थ होतो. २ जात [अर. कौम्=जात, कुटुंब]

कोमजणें—अक्रि. सुकणें; वाळणें (फूल), झडणें, अशक्त होणें; क्षीण होणें. [कोमजें]

कोमट—कोंवट पहा.

कोमटी—पु १ कर्नाटकांतील वैश्य जात व तींतील माणूस. २ (ल.) सोंवळें-ओवळें नसणारा, अधार्मिक, नास्तिक. 'मेरा कोमटी आहे निव्वळ।' [का]

कोमडा-डी-डें—कोंबडा पहा.

कोमणें—अक्रि टाळून भरणें; कोंवणें पहा.

कोमणें, कोमाइ(य)णें—अक्रि. कोमजणें पहा. 'कोमुन जातां तरी मला तूं फेकुन दिधलें असतें।' -टिक ३९. 'म्हणोनी कृपा आटल्लिा। दिसतसे अति कोमाइला।' -ज्ञा २.४; -संवि ११.१७. 'कोमाइलें श्रीरामवदन। तों देतां देखिला लक्ष्मण।' [सं. कुम्लान; प्रा. दे. कुम्मण=म्लान]

कोमल-ळ—वि. १ मृदु; सुकुमार; नाजुक; सुंदर. २ गरीब, सौम्य; हळव्या मनाचा. ३ मृदु; मधुर; रमणीय (शब्द, नाद, आवाज). 'रामनाम जपे कोमल.' 'कोमलच्या उलट कठोर. [सं.] ०चित्ताचा किंवा चित्ताचा कोमल-वि. कोंवळ्या, हळव्या मनाचा; दयार्द्र मनाचा, अंतःकरणाचा. ०ऋषभ-पु (संगीत) पाच विकृत स्वरांपैकीं पहिला स्वर; विकृतस्वर पहा. ०गांधार-पु. पांच विकृत स्वरांपैकीं दुसरा स्वर. ०धैवत-पु. पाच विकृत स्वरांपैकीं चौथा स्वर. ०निषाद-पु पाच विकृत स्वरांपैकीं पाचवा स्वर. ०मध्यम-पु कोमल मध्यम व शुद्ध मध्यम हे ध्वनीनें एकच आहेत. नामभेद मात्र आहेत. मध्यम शब्द पहा. ०स्वर-पु. (संगीत) शुद्ध स्वरापेक्षा ध्वनीनें नीच स्वर. हल्लींच्या संगीत पद्धतींत कोमल स्वर पाच मानतात. (कोमल) ऋषभ, गांधार, मध्यम, धैवत, निषाद.

कोमलणें-मायणें-मावणें-मेजणें—अक्रि. १ कोमेणें; कोमाइणें; कोमजणें; निस्तेज होणें. 'ब्रह्मादिमुखें कोमायें।' -भाए १७५. 'बहुत कोमावली पहावेना दृष्टिं उभयांला।' -ऐपो ३९९. २ द्रवणें, सद्गदित होणें. 'माझें तोंड उतरलेलें पाहून हा फारच कोमावला.' -वाळ २.१८. [कोमल]

कोमल्टो—पु. (गो.) कोंबडा.

कोमार—न. १ तरुणपण; कौमार्य. २ उत्साह, हौस. [कौमार्य] ०काडप-(गो.) हौस उत्पन्न करणें. ०काढणें-(कु) कोणत्याहि गोष्टीस प्रवृत्त होणें. ०येणें-(कु.) ताफ्यांत येणें.

कोमाळणें, कोम्हाळणें—अक्रि (व) प्रेमानें अंगावरून हात फिरविणें, कुरवाळणें, गोंजारणें. 'कोम्हाळलें म्हणजे कुत्र्याला बरें वाटतें.' [कोमल]

कोमेणें—कोमणें, कोमजणें पहा. 'वदनेंदु कोमेला कळाहीन वाटे सुखसंपत्ती।' -पला ४४

कोमेतुला—पु समुद्रांतील एक प्राणी. सपक्ष, सकेश तारा. -प्राणिमो १३९

कोय—पु (आगरी) डोंगर. 'कोयाला चमकल्या विजा.' [फा. कोह्=पर्वत]

कोय—स्त्री. १ आंब्याच्या फळांतील बाठा, बाठी; आठी, अठळी; बीज. २ वरील बाठींतील गर; बाठीच्या पोटीं असणारा

दोन अवयवरूपी अंश ३ (ल) अडकुली ४ ताडफळाच्या गिरावरील कवची ५ आंब्याच्या अर्ध्या बाठीची भिंगरी [?]

**कोयकमळ**—न श्वेतकमळ, कुवलय [स कुवलय, हिं कुई+कमळ]

**कोयकोय, कायकोय**—स्त्री. कुत्र्याचें किंवा त्याच्या पिलांचें भुंकणें, ओरडणें, क्याव क्याव करणें [ध्व]

**कोयका**—पु गुन्हेगार जातींतील पोलीस या अर्थाचा शब्द –गुजा ४२ ४३ ०नाई-पु पोलीस शिपाई

**कोयंडा**—पु (राजा) आंब्यातील कोय [कोय]

**कोयंडा**—पु १ दाराची कडी अडकविण्याचें गोलाकार अडकण, वाकवून दुहेरी केलेला खिळा २ कडींत घाला वयाचा खिळा, अडसर, आकडा, हुक ३ (क) लाख आसुडाचा लाकडी दांडा ४ फासा (नथ, डूल इ० चा) ५ कोल दांडा (मनुष्याला शिंगा गुराला घालण्याचा) हातास बांधून त्यामध्यें घातलेला ६ (कु) एका खेळांतील वाकडी काठी (गुराखी हा खेळ खेळतात)

**कोयंडी**—स्त्री १ गुरें दावें चावून तोडतात म्हणून एका दांडयास दोन कान्या लावून बांधण्याची केलेली व्यवस्था २ शिंगा व्हाती म्हणून हात वगैरेना कळ लागण्यासाठीं ज्या टिपऱ्या लावतात त्यांपैकीं प्रत्येक

**कोयंडी, कांयडो**—स्त्रीपु (गो) विहिरीच्या दोराचा फास

**कोयंडें**—न कुवडें पहा

**कोयदेयार**—न (गो) विटीदांडूचा खेळ

**कोयंडो, कायडो**—पु (गो क) दांडू [कायडा]

**कोयतट**—न आंब्यातील कोयीला तिरस्कारार्थी म्हणतात [कोय+ट प्रत्यय]

**कोयतपट्टी**—स्त्री जी जमीन नांगरटी करण्यास योग्य नसल्यानें हातांनींच कमवितात तेव्हा कोयत्याच्या सख्येप्रमाणें अशा जमीनीवर पट्टी बसवितात ती [कोयता+पट्टी]

**कोयता**—पु लाकूड तोडण्याचें एक हत्यार, विळा (गो) कोयतो 'मी हिवाने मेगे घे मारो कोयता।' –मन ८ [का कोय=कापणें कोदित=विळा]

**कोयताल**—न (वे) शेताच्या कडेची जमीन

**कोयती**—स्त्री लहान कोयता कोंकणात भात कापण्याच्या कोयतीला करवतीसारखे दांत असतात तिला दांती कोयती असेंहि म्हणतात

**कोयतें-तूल**—न (राजा) लहान कोयता, कोयती

**कोयतेवाल**—स्त्री ज्या वालाच्या शेंगा कोयतीच्या आकाराच्या असतात ते, तरवारबळ

**कोयनळ, कोळिंदर**—पु (कों.) दोन खांबावर खुंट्या मारून त्यावर एक आडवें लाकूड मारतात त्यास कोयनळ म्हणतात कोयनळावर कोळ्याची एक बाजू टेकलेली असते [कों]

**कोयनाटकी**—स्त्री कोयीची केलेली भिंगरी, कोकाटी, कोय

**कोयनाटकी**—वि (कोयीनें तुष्ट होणारा) कंजुष, कृपण [कोय+नटणें]

**कोयनेल**—न तापावरचें एक औषध, सिंकोना सालीचें सत्त्व [इ क्वीनीन]

**कोयपाणी**—न गुठळ्या व पाणी (चोयापाणी) झालेलें (शितडापाण्याचें) दहीं [कोय+पाणी]

**कोयम**—न (कु) एक पक्षी

**कोयमे**—न (खा) ताक करावयाचें मडकें कोळवें पहा.

**कोयर**—पु (गो) केर, उकिरडा ०सिताडो-पु शेण पोतेरें

**कोयरी**—स्त्री १ चांदीच्या पत्र्याची, सपाट अगर पसरट आकाराची, साधी अगर नक्षी केलेली अशी डबी ही मधोमध कापलेल्या आंब्याच्या छटासारखी दिसते हींत हळदकुंकू ठेवण्यासाठीं दोन-तीन पुडें असतात, हळदकुंकवाचा करंडा, डबी, कुयरी २ (अव कोयऱ्या) झीक व टिकली यांचें कोयरीच्या आकाराचें विणकाम ३ आवघाटी कोयरीच्या आकाराचीं टोपणें, मणी, घागऱ्या जींत ओंविली आहेत असा दागिना, कमरपट्टा, माळ इ० **कोयरीची माळ**-स्त्री. चांदीच्या कोयरीच्या आकाराच्या मण्याची माळ घोड्याचा दागिना

**कोयल**—न (व) नांगरतांना सुटलेली जागा

**कोयल-याळ, कोईळ**—स्त्री. कोकिळा. 'मजूल शब्द जसि टाहो करिति कोयाळ।' –अफला ५४ 'वटामधीं कोयाळ मधुर बोलेग रंग गोरटा।' –होला १०४ [स कोकिल, प्रा कोइल, हिं कोयल]

**कोया**—पु १ एक पक्षी २ या पक्ष्याचें केविलवाणें ओरडणें, ध्वनि, शब्द ०**कोया करणें-करीत हिंडणें**-१ कींव यण्याजोगी याचना, विनवणी करणें (अन्न इ० करितां) २ कंगाल होऊन भटकत फिरणें [ध्व]

**कोयाडें**—न पिके व मोवट आंबे उकडून गीर काढून त्यात पाणी पूठ व मसाला वगैरे घालुन केलेला पदार्थ, आंब्याचें तोंडीलावणें [कोय]

**कोयार**—पु (व) बेलफळ कोरून केलेला भोंवरा. [कोय+आर=भोंवरा]

**कोयाळ**—स्त्री १ कोयीचें केलेलें वाद्य, पुंगी, पिपाणी २ आंब्याच्या कोयीची भिंगरी, कोकाटी –वि कोय अथवा बाठा धरलेला आंबा [कोय]

कोयाळणें—अकि (कों) (आंब्यानें) बाठा धरणें, आया कोयीनें युक्त होणें [कोय]

कोयी—स्त्री (न्हावी) डोक्यातील केंस काढण्यासाठीं आंब्याच्या कोयीस दातें पाडतात ती कोय

कोर—स्त्री १ कडा, धार, कडेची रेषा, किनारा, पदार्थाच्या कडेचा सूक्ष्म व एकसारखा धारादार अवयव २ (वस्त्राचा) काठ, काठाची पट्टी, (जरीची) किनार, फीत, इ० ३ -पुस्त्री (भाकरी-पोळीचा) चतकोर (चन्द्रकोरप्रमाणें चतकोराला कड असते त्यावरून किंवा सं कोर=भाग यावरून) ४-स्त्री नखाच्या मुळाशीं असलेल्या चन्द्राच्या कोरेप्रमाणें रेषा व तेथें होणारें नखुरडें ५ रुपयाच्या एकतृतीयांशाचें एक नाणें ६ (शिंपी) खाद्यांत लावण्याचा तिकोनी तुकडा, हुर्डा -शिकशि २ १४२, १४४ ७ (ना) हजामतीचा एक प्रकार, कोर धरणें पहा ८ हद्द, मर्यादा 'तैसें जी न वडवडी। पराची कोर न सांडीं।' -ज्ञा १३ ८५३ [हिं गु कोर, तुल० सं कोर=भाग, द्रा ओरम=कड, लॅ ओरा=काठ] ०धरणें-कपाळावरील केंस चन्द्राच्या कोरीप्रमाणें ठेवणें, राखणें, तशी हजामत करणें ०दार-वि देखणी दार 'मृदुतर धिरमे त्या वोंचरया कोरदारा।' -साहह ३ ४० ०दृष्टि-स्त्री तिरपी नजर, चोराची नजर, चोरून पहाणें, न्याहाळणें 'कोरदृष्टीनें असावें पहात।' -कथा १ ६ १९६ ०पट्टी-स्त्री वस्तुटी व कशिदा काढलेला काठ, ही कापडास स्वतन्त्रपणें जोडतात ०भर-वि चतकोराएवढी

कोर—स्त्री मत्सर, द्वेष, वरकस [अर कुन्दा] ०धरणें-द्वेष करणें 'मानकन्यानें कोर धरली।' -ऐपो २८७ ०वंद-वि चिडखोर, शत्रिक ०वंदी-स्त्री वरकस, द्वेष

कोर—स्त्री शिपायांची तुकडी, रांग [इ कोअर] ०वदी-स्त्री एका ओळींत सैन्याची रचना करणें 'त्या बाबा फडक्याची कोरबदी न्यारी।' -ऐपो २८१

कोरक—न एक भाजी -शर (ना पृ २०८)

कोरका—पु (नदभाषा) स्टाप, हुंडी, वही, कागद

कोरका—पु (व) (भाकरीचा) तुकडा, कोर 'मला भाकरीचा कोरका वाढ'

कोरकांगुणी-गोणी—स्त्री एक प्रकारचें धान्य कांगुणी पहा [कोर+कांगुणी]

कोरकांडें—न (कों) कोरफड (स) घृतकुमारी, कन्याकुमारी [स कुमारी-कुवार-कोर+कांड]

कोरकापी—स्त्री (सों) सुताराचें नक्षी कामांतील एक हत्यार [कोरणें+कापणें]

कोरकू—स्त्री (व) मेळघाटांतील एक रानटी जात, पहाडी जात

कोरकें—न कोरडें अन्न 'तळणवळण केलें कोरकें सिद्ध जालें।' -साहह ६ ७२

कोरखडी—स्त्री एक प्रकारचा खडू हा शिंपी लोक कापडावर खुणा करण्यासाठीं वापरतात

कोरगिरी—कोरबदी पहा

कोरगू—पु खेड्यातील एक वलुत्या, प्रवाशांची वडदास्त ठेवण्याचें काम याच्याकडे असे कोरभू पहा

कोरट—स्त्री कातलेलें पण कच्चें (न उकललेलें) रेशीम [हिं कोरा=साधें रेशीम?]

कोरट—न कोर्ट, न्यायकचेरी 'कोरटकचेरी' [इ कोर्ट]

कोरंटा-टी—पुस्त्री एक फुलझाड कोरांटा-टी पहा -श ५ २८

कोरटाण—स्त्री (कों) कोरेपणाची घाण, वास (कपडे, मडकीं वगैरेस येणारी) [कोरा+घाण]

कोरड—स्त्री १ तोंड अथवा घसा यास पडलेला शोष (आजार, उपास, भय वगैरे प्रसंगीं), तोंड वाळणें, कंठशोष (क्रि० पडणें, येणें) २ (सामा) शुष्कपणा, ओलेपणा नसणें (क्रि० पडणें) [का कोरगु=वाळणें, शुष्क होणें] ०पळणें, वाळणें-क्षुधेनें व्याकुळ होणें (जेवणास उशीर झाला असतां)

कोरड—स्त्री (तजावरी) अंगण, घरापुढील उघडा ओटा [इ कोर्ट-कोरट]

कोरडक—न (कों) खालीं लोंबणारें कोळिष्टक, जळमट (घराच्या आढयाला, भिंतीला असणारें) [?]

कोरडणें—अकि (काव्य) कोरडें पडणें, वाळणें 'कोरडली आहे वात। आणि कोण जाईल बाजारात।' 'बोलायाचें पुष्कळ शक्ति न कोरडे ओंठ।' -अनततनयकृत मासें मुडल (हृदयतरंग २) [कोरड]

कोरडणें—न (बे) ओझें आवळतांना दोरी ज्यावरून ओढून घेऊन बांधतात तो लोखंडी मणी, पुंगी कोरडिकें पहा [का कोरडु=लाकडाचा तुकडा]

कोरडवट—स्त्री १ जिराईत, कोरडवाहू जमीन, सुकी जागा २ (क्र) जमीन, भूमी (नदी, समुद्र, सरोवर यांच्या विरोधी शब्द), सुकी [कोरडा+वत्]

कोरडवाय-वायू-वाही-वाहू—वि विहीर किंवा पाट बंधाऱ्याच्या पाण्याविरहित फक्त पावसाच्या पाण्यावर पिकणारी जमीन, जिराईत, कोरडवट -शेतकी शेतकरी ३ २ -शे ८ १९९, १७४, ७ २२० [कोरडा+स वह् किंवा स वात(?)]

कोरडा—वि १ अनार्द्र, शुष्क, जलरहित, आर्द्रताविरहित 'ते रडे भरतही तथा रडे जोंवरी नयन होति कोरडे।'-वामनभारत भाग १६ म्ह० कोरड्याबरोबर ओलेंहि जळतें=अपराध्याबरोबर

निरपराधी गरीबहि चिरडला जातो २ नुसतें, कोरड्यास बरोबर काहीं नसलेलें, दूध, दहीं, वगैरे पातळ पदार्थांचें कालवण नसलेलें (अन्न) ३ नक्त (जेवणाशिवाय मजूरी), उक्त 'मला कोरडे तीन रुपये मिळतात' ४ (लक्षणेनें निरनिराळ्या ठिकाणीं हा शब्द योजतात —जसे) औपचारिक, शुष्क, पोकळ, वरकाती, निष्फळ, बिनदृशिलाचा, बिनफायद्याचा, निरर्थक, ओला (विशेषत ओलाव्याचा) याच्या उलट 'किं वेदांतज्ञान वाचून। कोरडी व्यर्थ मतिशून्य।' 'बारा वर्षें पढत होतों परंतु कोरडा' कोरडा—आदर, मान, प्रतिष्ठा—ममता—बोलणें—व्यवहार —श्रम इ० पहा ५ व्यर्थ, फुकट 'हिंडणारा कोरडा। तैसा जया' ज्ञा १३ ६८९ 'काहीं लाभावाचून कोरडी खटपट कोण करतो' ६ (ल) वाम म्ह० 'कोरड्या अंगीं तिडका, थोडक्या डोईं लिखा' सामाशब्द— ०अधिकार—पु १ नुसता पोकळ, नावाचा अधिकार २ बिनपगारी अम्मल, हुद्दा, बिनावेतन काम ०अभिमान—पु पोकळ मिजास, रिकामा डौल, अज्ञानी अहंकार ०आग्रह—पु वरवरचें आमंत्रण, इच्छा नसताना बाह्यात्कारें बोलावणें पैठणी आग्रह ०आदर—पु औपचारिक सन्मान मनात काहीं पूज्यभाव नसता बाह्यात्कारें केलेला गौरव (विवाहादि समारंभात) शाब्दिक सन्मान ०खडक—पु १ अतिशय कठीण, टणक खडक खडक पहा २ (ल) अडाणी ३ कोरडा पाषाण पहा ०ठांक—वि (अतिशयितता व्यक्त करण्यासाठीं) अतिशय शुष्क, कोरडी (नदी, विहीर तलाववगैरे) [कोरडा+ठाक=चिंदुकण] ०डौल—पु रिकामा दिमाख, खोटा बडिवार मोठेपणा ०दरमहा—पगार—मुशारा—पु नक्त वेतन (जेवणाशिवाय) ०द्वेष—पु विनाकारण मत्सर ०धंदा—पु आत घट्याचा, बिन नफ्याचा उद्योग ०पाषाण—पु १ कठीण, टणटणीत दगड २ (ल) उपदेशाप्रमाणें आचरण न करणारा असा माणूस, चांगल्या गोष्टीचा परिणाम न झालेला माणूस म्ह० लोकां सांगे ब्रह्मज्ञान। आपण कोरडा पाषाण ०ब्रह्मज्ञानी—वि भोंदू ढोंगी स्वत ब्रह्मज्ञानाचा अनुभव नसलेला पण लोकांना त्याचा उपदेश करणारा मनुष्य ०मान—पु पोकळ, रिकामा, काम न करता मिळणारा, दिलेला मान, कोरडा—आदर पहा ०विचार—पु १ निष्फळ, निरर्थक चौकशी शोध २ निष्क्रिय बडबड, विचार ०विश्वास—पु वरवरचा विश्वास ०व्यवहार—पु १ कोरडा धंदा पहा २ रिकामा, निष्कारण उद्योग ०सत्कार—पु १ पोकळ, वरवर सन्मान २ गैरफायद्याचा मानमरातब, निरर्थक बडेजाव ०सा—वि वाळल्याप्रमाणें, शुष्कप्राय ०स्नेह—पु वरवरची प्रीति, पोकळ मैत्री कोरडेकष्ट ०श्रम—पु (अव) बिनफायदा, निरर्थक श्रम, व्यर्थ मेहनत कोरड्या टाकाचा हिशेब—हिशोर—हिसाब—पु ज्यात यत्किंचितहि फेरबदल करण्यासाठीं लेखणीचा टाक शाईत बुडविला गेला नाहीं असा स्वच्छ, शुद्ध, बिनचुक लिहिलेला जमाखर्च, तक्ता, चोख हिशेब (क्रि० देणें, करणें) कोरड्यास—ला, कोरडेशास—ला, कोरड्याशास—ला—क्रिवि (कोरडा—याचें विभक्तीरूप) भाकर इत्यादि कोरडी खाववत नाहीं म्हणून त्याबरोबर घेण्याकरिता (तूप, वरण वगैरे पातळ कालवण), तोंडी लावण्यास (गो) कोरड्याक —न कालवण, तोंडीलावणें 'आज कोरड्याशास काय केलें? —कढी केली, भाजी केली' कोरडी—वि शुष्क, वाळलेली, कोरडा पहा सामाशब्द— ०आग—स्त्री भयंकर मोठी आग याचे उलट, ओली आग =अतिवृष्टीनें होणारें नुकसान म्ह० कोरडी आग पुरवते पण ओली आग पुरवत नाहीं =पाठीवर मारलेलें चालतें पण उपासमार झालेली सोसवत नाहीं ०ओकारी—स्त्री १ घशात बोटें घालून मुद्दाम काढलेली ओकारी सकाळीं तोंड धुताना घशात बोटें घालून काढलेले खाकारे (क्रि० देणें, काटणें) २ ओकारी येतेसें वाटणें (क्रि० येणें) पोटात ढवळल्याप्रमाणें होऊन मळमळ सुटते आणि धुंकी पडते, हृदयात पीडा होते, ओकारी येते परंतु अन्न पडत नाहीं, अशा वेळीं म्हणतात —योर १ २५७ ०सवाशीण—स्त्री जेवणाखेरीज ओटी भरून कुंकू लावून जिची बोळवण करतात अशी सवाशीण ब्राह्मणेतराच्या घरीं अशी ब्राह्मण सवाशीण बोलावितात ०फिटाळ—स्त्री १ (शब्दश) कोरडी ठिणगी २ (ल) तोहमत, आळ (क्रि० घालणें, ठेवणें, घेणें) ०किरकिर—स्त्री विनाकारण कटकट, तकार, पिरपीर, भुणभुण, निष्कारण त्रास ०खाकरी—स्त्री कोरडी ओकारी पहा (क्रि० देणें, काढणें) [खाकरणें] ०चाकरी—स्त्री १ वेतन, मजुरी घेतल्याशिवाय चाकरी, निर्वेतन सेवा २ रोख पैसा घेऊन जेवणाशिवाय चाकरी, कोरडा दरमहा ०जांभई—जांभळी—स्त्री श्रमामुळें आलेली (झोंपमुळें नव्हे) जांभई ०दारू—स्त्री बाय बाराची दारू, बायबार ०प्रतिष्ठा—स्त्री औपचारिक मानसन्मान हातीं पैसा नसता अगर अंगात कर्तबगारी नसता मिरवलेला डौल कोरडा मान पहा ०भिक्षा—स्त्री तांदूळ, गहू वगैरे धान्याची भिक्षा (शिजविलेलें अन्न माधुकरी शिवाय) ०ममता—माया—स्त्री वरकाती दाखविलेलें प्रेम, लोकाचारास्तव दाखविलेला सभ्यपणा ०मेजवानी—स्त्री अन्नाशिवाय मेवामिठाईची आणि फळफळावळीची मेजवानी, उपहार. ०मैत्री—स्त्री वरवरचें प्रेम, अंत करणापासून प्रेम नाहीं अशी मैत्री —ड्या गाथा—स्त्री अव बनावट बातम्या, गुमडा, कंड्या [कोरडी+गाथा] कोरडें—वि वाळकें, निष्फळ, शुष्क कोरडा—डा पहा सामाशब्द— कोरडें खाणें—आवश्यक वस्तूंचा अभाव भासणें, आवश्यक म्हणून इच्छिलें त्यामुळें त्रास होणें (निषेधार्थी रचना) 'मी काय त्यावांचून

कोरडे खातों '=लें नाहीं म्हणून मागें नडते की काय? ०अंग—न. वांझपणा; घात कुस. ०काम—न. १ विटाळदेशगीं व पांचवे दिवशीं न्हाऊनशुद्ध होण्यापूर्वी करावयाचें काम 'चौथ्या दिवशीं बायका कोरडें काम करतात.' २ वेळ घालविण्याकरितां केलेलें सटरफटर काम. ०तप—न. श्रद्धाहीन, भक्तिहीन तपश्चर्या, आराधना. 'जळो जळो त्याचा प्रताप। काय चाटावें कोरडें तप। जैसें विगतधवेचें स्वरूप। यौवन काय जाळावें।' ०बोलणें, भाषण—न. वरकांती, मनापासून नव्हे असें भाषण, बडबड. ०ब्रह्मज्ञान—न. आचरण नसतां सांगितलेला वेदांत, परमार्थविद्या; बकध्यान, भोंदूपणा, ढोंग ०वैर—न. निराधार द्वेष, मत्सर. ०वैराग्य—न. विषयाचा खरा तिटकारा आल्यागेरीज दाखविली जाणारी पोकळ विरक्ति; साधूपणाचें ढोंग, निवृत्तिमार्गाची बतावणी. ०सुख—न. उपभोगाशिवाय सुख, नावाचा आनंद

**कोरड्या अंगीं तिडका**—१ गर्भ नसता बाळंतपणाच्या वेदना भासविणें. २ ढोंग, भोंदूपणा.

**कोरडा**—पु १ कातडी चाबूक, असूड २ तडाखा, मार, फटकारा. [अर कोर=नवी दोरी] ०ओढणें-(पाठीवर)—चाबूक लगावणें; मारणें.

**कोरडिकें-डीक, कोरडुकें, कुरडूक, कोरड्डकें-ड्डगें, कोडकें, खाडका-कें**—न. १ अडसर; अडकण (गज, दाराचे कुत्रे, कुसे, तसेच कुळव, पाभर याचें एलें किंवा कोयंडा याचे कुरूं). २ अर्धगोल किंवा अंतर्गोल लाकडी मणी, पुली (यातून दोर ओढून घेऊन शेतकीचीं अवजारें बांधतात) दोर तुटूं नये म्हणून हीं बांधतात ३ सुत काढण्याच्या रहाटास बसविलेलें (चाण्याच्या शेवटीं) एक लाकडी चाक या चाकाला एक खोट जाईल असें भोंक असून त्यांत खोट घालून ते फिरविलें असतां रहाट फिरतो. ४ सनगर लोकांचें बिन चाकाचें सूत वळण्याचें हत्यार (कों.) कोरीटक (वरील तिन्ही अर्थ वस्तुत एकच आहेत परंतु स्थलपरत्वें त्याचे तीन भेद मानतात.) याचीं भिन्न भिन्न रूपें आढळतात [का. कोरडु]

**कोरडीक**—स्त्रीन बैल्याला बांधलेला दोर. बैल—स्त्री २ पहा. कोरडिकें ४ पहा.

**कोरण**—स्त्री. खोबण, खांच; (खिडकीच्या झडपांच्या खालच्या पट्टींतील) कोरून काढलेला भाग [कोरणें]

**कोरण-णें**—न. कोराम, कोरडी भिक्षा. 'कोरणें मागुन झोळी भरली।' —भज ४२ 'मी कोरण भिक्षा मागत जातों काशी तीर्थांत।' —ऐपो १६०. [कोराम]

**कोरणी-णें**—स्त्रीन १ कोरणें-धातुसाधित नाम कोरण्यांची क्रिया, खोदणी. २ कोरण्याचें हत्यार, शस्त्र (मूर्ति घडविण्याच्या, कान कोरण्याच्या कामीं उपयोगी, नालबंदी घरनाना घोड्याचें खूर कोरण्याचें, माळीच्या चिणाच्या कामीं लागणारी करणी. ही पितळी, लोखंडी किंवा लाकडाची असून मुठमुठीत, दाभोंवार चपटी व निमुळती गोलट मारलेली असते चुनाळयाची कोरणी त्याला शामशीनें अडकाविलेली असते; ही काडीसारखी पण टोंकाला चापट असते. 'कान—दांत कोरणी—णें. [कोरणें]

**कोरणें**—उक्रि. १ एखाद्या पदार्थावरील थोडा थोडा अंश नाजुक रीतीनें काढणें, पोखरणें; खोदणें; नक्षणें (आकार देण्यासाठीं किंवा आंतील भाग काढण्यासाठीं) २ कान, दांत यांतील मळ काढणें. ३ नक्षीकाम करणें. ४ (ल) एखाद्याचें द्रव्य त्याला नकळत थोडेंथोडें युक्तीप्रयुक्तीनें बळकाविण्याचा व्यापार, उद्योग. [का. कोरे=खोदणें, भोंक पाडणें, तुल० इं. कार्व्ह] (वाप्र.) **दांत कोरून पोट भरणें**—अतिशय कंजुषपणा करणें. म्ह० दांत कोरून पोट भरत नाहीं.

**कोरणेल**—पु. कर्नल (अप) इंग्रजी फौजेवरचा एक मोठा अंमलदार. [इं. कर्नल]

**कोरनाड**—वि. (तंजा.) या पेठेच्या साड्या व लुगडीं (रेशमी, जरीचीं). [का. कोरे=रमग्रसंगीचें वस्त्र, भारी वस्त्र+नाड=देश, पेठ]

**कोरप**—न १ (कों.) गोवऱ्यांची आगटी, हागरें. २ चंदुकीचा काना.

**कोरपा**—वि (व) वाळून शुष्क झालेला (पदार्थ) [करपणें]

**कोरफड**—स्त्री एक औषधी वनस्पति. ही वनस्पति पाण्याशिवाय जगते, हिंदुस्थानात सर्वत्र होते. हिच्या पाती जाड असून त्यांतील गर कडू असतो. जुन्या पात्या सुकल्या म्हणजे आंतून नव्या पात्या फुटून ही वनस्पति नेहमीं ताजी राहते, म्हणून हिला कुंवारी, कुमारी, कुवारकांडें म्हणतात. हिच्या रसापासुन कडू (काळा) बोळ तयार करतात —वगु २ ६१ —न कोरफड, कोरफडीपासुन तयार केलेला पदार्थ, औषध. [सं कुमारी, गु कुंवार, कों. कुवारकांडें, कोरफड, कुवारी+फड]

**कोरंब**—वि (राजा) झडलेला; झिजलेला; रांपलेला, जीर्ण, अशक्त; जर्जर (काष्ठ, शरीर इ०) [का. कोरे=झडणें, कमी होणें तुल० स कोरित=कुरतडलेलें लहान केलेलें]

**कोरवी**—स्त्री (कों.) झिंगा, एक प्रकारचा मासा. [का. कोरव]

**कोरवू-भू**—पु गांवांतील एक बलुतेदार ही धनगर जात आहे कोरवूचीं नांवें पुष्कळ आहेत. पैकीं प्रवाशाची बरदास्त ठेवणें, त्याचीं ओझीं वाहणें, रयतेपासुन सरकारदेणें-घेणें वसूल करणें इ०. [द्रा कुरुव, कुरुव] ०गिरी—स्त्री. कोरवूचें काम व अधिकार

**कोरम**—पुन सभेस आरंभ करण्यासाठी अवश्य ठरविलेली सभासदांची संख्या, गण [इ]

**कोरमणा**—स्त्री (क) इशारत [कोरणें, गो कोरमेनचें= पोखरणें]

**कोरमा**—पु एक मांसयुक्त खाद्य -गृशि २ ५१ [उर्दू]

**कोरयोनचें**—कि (गो) पोखरणें

**कोरवट**—वि नव्यासारखें, कोरें कोरवाण पहा

**कोरवडे**—पुअव (व) उडदाच्या पिठाचे वडे यात कोहळ्याचा कीस घालतात 'सहित पापडे व यिकवडे, आणिक कोरवडे।' -अमृतसुदाम १४

**कोरवण**—न घरशाकारणीचें गवत

**कोरवाण-न**—न १ अगदीं नवें, कोरें दिसणारें कापड २ हलक्या किंमतीचें खादी इ० कापड -वि १ (विणकाम) मागा वरून काढलेलें परंतु पाजणी न केलेलें (वस्त्र अगर ताणा) हा अर्थ कोष्टी लोकात रूढ आहे २ (सामा) अगदीं कोरें कर कोत, ताजें, नवें (कापड, मातीं भांडीं, दागिने वगैरे) [कोरें+ वाण]

**कोरवान**—वि कपाळावर केंसाची कोर ठेविली आहे किंवा ठेवण्याचें वय झालें आहे असें (दहाबारा वर्षांचें मूल) कोर पहा, कोर धरणें पहा [कोर+वान]

**कोरशाण-साण**—कोरवाण पहा

**कोरळ**—पु एक वृक्ष, याच्या पानाची भाजी करतात -गृशि १ १८८ [का करले]

**कोरळा**—पु (कुलाबा) समुद्राच्या करेला मासे खाऊन राह णारा, पिवळ्या पायाचा व चोंचीचा, एक पांढऱ्या रंगाचा, पक्षी शिकारी याचें मांस खातात

**कोरा**—वि १ ताजा, नवा, नवीन, अद्याप केलेला, न घडलेला; न उपभोगलेला, न वापरलेला (कागद भांडें, वस्त्र, घमारा दुकान इ०) २ (ल) ज्याला सत्ता किंवा रावता नाहीं, असा, नवशिका (माणूस) ३ न सुधारलेला, बदललेला काहीं परिणाम, फायदा ज्यावर होत नाहीं असा, संस्कारहीन (शिक्षण शिवण वगैरे ही) 'इ. बारा वर्षे पढत होता परंतु कोराचे कोरा' ४ कमनशीबपणा, याद किंवा कांहीं परिणाम झाला नाहीं असा (व्यवहार, व्यापार, माल) [फा कोऱ्हा=नवें मडकें, हिं कोरा, तुल० करा, कऱ्हा] ०करकरीत-वि करकरीत पहा

**कोराटा-टी, कोऱ्हाटा-टी, कोऱ्हांटकी**—पुस्त्री. एक फुलझाड, याला पांढरीं, पिवळीं, पिवळीं, नीळीं, पांढरीं या जातींची फुलें येत त झाड ३।४ हात उंच असतें सर्वांगास काटे असू। फुलाला वास येत नाहीं या फुलांत मध फार असतो दासो २ ४२ -वगु २ ६३ 'गुलाबाचीं फुलें रम्यें दिसे तैसीच कोऱ्हाटी।' -किंक १७२ [स कुरटक]

**कोरान्न**—न न शिजविलेलें धान्य (हिरवे तांदूळ, गहूं इ०) अशी भिक्षा, कोरडी भिक्षा पहा (क्रि० करणें, मागणें) 'काय समर्थाची काता। कोरान्न मागे।' -ज्ञा १२ ८५ 'नित्य करून कोरान्न। मेळवून आणी कण।' -ह २९ ११ ०कर-करी-करीण-पुस्त्री कोरान्नाची भिक्षा मागणारा-री 'दारा न ये कोरानकर।' -एभा २३ ९३ [कोरें+अन्न]

**को(कों)राळ जमीन**—स्त्री (डाग प्रांतातील) तांबडसर अशी निकस जमीन ही टकडयाच्या पायथ्याशीं असते कोराळें पहा

**कोराळें**—न डोंगरातील कडा 'एऱ्हवीं फोडी कोराळें। पाणी जैसें।' -ज्ञा १६ ११७ २ डोंगरातील कोरीव लेणीं ३ दगड, खडकाळ जमीन [का कोर=टोंक, कापलेला भाग+आळ प्रत्यय?]

**कोरी**—स्त्री. भिकार जमीन ही दुसऱ्या जमिनीबरोबर कसली असता त्यावर सरकारसारा बसत नाहीं कोराळ जमीन पहा [तुल० स कुमारी, प्रा कुआरी, म कुंवारी-कोरी] ०सवा-शीण-स्त्री (हवसाणी) विवाहित परंतु ऋतु प्राप्त न झालेली सवाष्ण -मसाप १ ११

**कोरीटक**—कोरडिकें पहा

**कोरीव**—वि १ कोरलेलें, खोदलेलें, पोखरलेलें २ खव-लेला, मगज बाहेर काढलेला (नारळ इ०) ०कातींव-वि कोर-लेलें व कातलेलें (ल) सुबक, सुरेख, सुंदर, चांगल्या आका-राचें [कोरणें+कातणें] ०ठोकळा-पु चित्रें छापण्याचा ठसा (इ) ब्लॉक

**कोरो(ऱ्हो)टा-कोऱ्हटा**—कोरवडे पहा

**कोरोटें**—न (गो) शेतातील तण कोरळ पहा [का करले]

**कोरोली**—स्त्री (गो) करवली पहा,

**कोर्ट**—न १ न्याय देणारी सभा न्यायकचेरी, न्यायसभा, सरकार दरबार २ न्यायाधीश ३ सर्व जज्ज आणि माजिस्ट्रेट आणि त्यांचेच खरीज करून दुसऱ्या ज्या मनुष्यास पुरावा घेण्याचा कायद्यावरून अधिकार आहे असे सर्व इसम हायकोर्ट-वरिष्ठ न्यायाधिशी [इ] ०फोर्ट-वि (ना) अज्ञानांचें पालन करणारें खातें कोर्ट ऑफ वॉर्डस् 'मुलाची इस्टेट कोर्टफोर्ट झाली' (कोर्ट ऑफ वॉर्डसच्या ताब्यात गेली) ०फी स्टँप-पु कोर्टांत काम चालविण्याकरितां दाखल करावयाच्या कागदांस लावावे लागतें तें तिकिट ०मार्शल-पु लष्करी न्यायकचेरी-सभा 'त्याचा इन्साफ कोर्ट मार्शल करून करावा' -के १७ ५ ३०.

कोर्स—पु अभ्यासक्रम, (मार्ग, पद्धति) 'कॉलन फोर्म' 'पुणें येथें ज्योतिषशिक्षण कोर्स सुरू केला आहे' –के १० ६ ३० [इ]

कोल्हर-री—वि लाकूड इत्यादिकाचें कोरलेलें बाहुलें [तुल० स कुहनी]

कोल—न कर्जफेडीकरितां जप्त केलेलें उत्पन्न, मालमत्ता शेतातील पीक, इ० जप्तीचामाल, कबज (क्रि० धरून ठेवणें, सोडणें) [अर कौल=करार]

कोल—वि (कों) गरीब, अशक्त, दुबळा (दुःखानें, दारिद्र्यानें, चालण्यानें, युद्धानें); असमर्थ [का काले=वाळणें, झिजणें]

कोल—पु डुक्कर ०पुतरा-पु डुक्कर, कुत्रा वगैरे क्षुद्र प्राणि 'ते होती शत जन्म कोल्पुतरे गोमायु गोपुच्छहीं' –भिमा ११९ [स कोल=डुक्कर+पुत्रा का कोला=कुत्रा]

कोल, कोलण-णी—स्त्री विटीदांडूच्या अगर गोट्यांच्या खेळातील गली कोली पहा

कोलकर—पु. (माण) मेवेकरी, शिपाई, तराळ पहा –मागा २९ [का कोल्‌कार=शिपाई]

कोलकाठी—स्त्री एक खेळ, दांडपट्टा 'देवेंसी कोलकाठी धरू। अम्हांसि झोंबीलेंवीं करू।' –ज्ञा ११ ५४८ 'खेळों कोलकाठी पुढें धावसील वेगें।' –निगा ९५ [का कोलु=काठी]

कोलखंड—न (गो) मोठें पोट

कोल(लां)गडें—न (कों) कुलगडें पहा

कोलंगी—स्त्री अग्नीची ठिणगी (क्रि०उडणें)[प्रा द कोल्ल= कोलीत, का कोळ्ळि=कोलित]

कोलगें—न (गो) कुत्री कोली पहा [प्रा दे कोगुग-कोल्हें]

कोलडें—न १ एक प्रकारच्या गवताचें बीं हें कबूतरें खातात २ एक प्रकारचें बारीक धान्य

कोलणें—सक्रि १ (विटीदांडू) गलीवरची विटी दंडूनें उडविणें 'रावबानें प्रथम कोलले व त्याची विटी झेलली गेली' –सुदे ६ २ आपणावरची जबाबदारी दुसऱ्यावर टाकणें(कामाची, देण्याघेण्याची इ०) 'पैका मागावयास लागले, म्हणजे बाप लेकरावर कोलतो लेक बापावर कोलतो' 'निकड कार्य करण आल्या दुसऱ्यावर कोलत्यें।' –प्रला १५० ३ लोटणें, भिरकारणें, दूर फेकणें, नाकारणें, हडहड करणें, उडविणें ४ पराजित करणें (वादविवादांत) [का कोलु=काठी] कोलून मारणें–१ हातानें झुगारून देणें, उडवून फेकणें, घर धरणें, उचलणें २ एका अंगावरून दुसऱ्या अंगावर वळविणें

कोलता—पु (ना) निखारा कोलित पहा

कोलती, को(लि)लीत-लेती—स्त्री १ मशाल, जळतें, पेटलेलें लहान लांकूड 'पैं कोलिताही कोपे घेतें। आगीचें हिरवें पण असे।' –ज्ञा १८ ७९० २ (ल) द्वेष-मत्सर-दुष्ट बुद्धिनें रचलेलें कुभांड, खोटा आरोप (क्रि० वर टेवणें) म्ह० पिशाचाचे हातीं कोलीत ०लावणें-(ल) कलागत लावणें 'लावूनि कोलित। गाशा करितील घात।' –तुगा १००७ ०फांकणें-न आलातचक्र पेटतें लांकूड गरगर फिरविलें असतां जो कंकणाकृति आकार दिसतो तो

कोलदंडा, कोलदांड-डा—पु १ द्वाडकुत्र्याच्या गळ्यांत बांधतात तें दांडकें अगर गज (क्रि० बांधणें) २ (शिक्षेचा प्रकार) दुकिडवें बसवून हातांमध्यें पाय सांपडवून व हात बांधून कोपरांत पुढ्यें पाय्या मधून घातलेला दांडा 'जावाई हाचि कोलदांड। कालें घातलासे विनड।' –स्वादि २ ३ ३८ 'कोलदांडे घालुनियां एकसरी। झाडासीं टांगितांति हारोहारीं।' –शकला २७ [का कोलु=काठी+दंड]

कोलदेव—पु (कुलाबा) करकोचा किंवा दुदळपक्षी

कोलन—पु. (प) आगदीं लहान खड्डा [का कोळ=डबकें, तळें]

कोलनवाटर—न एक औषधी थंड सुवासिक बाष्पभावी पाणी जर्मनींतील कोलन गांवावरून हें नाव पडलें 'कोलनवाटर भडकलेलें माथें थंड करतें' –के १६ ४ ३० [इ कोलन+वॉटर=पाणी]

कोलनाडो, कॉलाडो—पु (गो) कोलदांडा पहा

कोलंबी—स्त्री (कलाबा) या नावाचा एक मासा 'ही सगीत कोलंबी तडतड नाचती पाई' –सगीत घोटाळा ६

कोलबोल—पु कौल 'मुल्खास कोलबोल देऊन बंदोबस्त करणें' –ऐच ८९ [फा कौल+म बोल]

कोलभाड—वलभाड पहा

कोलमा(म)डणें—अक्रि १ अडखळविणें, ठेंचकळणें, मागें ओढणें, दुसऱ्या बाजूवर पडणें, वळणें, वळविणें, उलटणें २ खालीं कोसळून पडणें, पाडणें (सोसाट्याच्या वाऱ्यानें झाड) [का कोले=मार+माडु?]

कोलमाडा—पु १ एका बाजूवरून दुसऱ्या बाजूवर जाणें, एका कुशीवरून दुसऱ्या कुशीला वळणें (क्रि० देणें) २ उलटणें, ठेंचाळणें, अडखळणें, कोलांटी खाणें, मागें ओढणें, कलाटणी (क्रि० देणें) ३ (ल) लावणीवर टाकणें, टाळाटाळ करणें, दिरंगाई करणें (क्रि० देणें) [का कोले+माडु?]

कोलवणें—कोलणें प्रयोजक पहा 'परंतु पठाण हे मुसलमान व त्यांजवर हत्यार उचलण्यांत हिंदु मजूर प्रमुख, ह्यांचा

फायदा घेऊन हा तटा हिंदुमुसलमान तटयाच्या वळणावर कोल चून देण्यात आला ' -सास २ ६४

**कोलवा**—पु (राजा गो) घरावर घालावयाचा गवताचा जुना शाकार, सुपारी, नारळ इ० चा चूड

**कोलवाकोलव, कोलाकोल-ली**—स्त्री १ टोलवा टोलवी, एकमेकावर टाकणें (धदा इ०), इकडून तिकडे व तिकडून इकडे असें (क्रि मारणें, उडविणें) २•चुकवाचुकव, अनास्था, टाळाटाळ [कोलणें द्वि]

**कोलवें**—न (व) अगदीं लहान खोली, कोचकें 'घरात एखादा मोठा दिवाणखाना नाहीं, मारीं कोलवींच कोलवीं' [हिं कोल, कौल]

**कोलस्विंदर**—न एक झाड

**कोला**—कोल्हा-ल्हें पहा

**कोला**—पु (बे) कुत्रा

**कोला**—पु (व) जळता निखारा [का कोळ्ळि, तुल० स क्रोधिन्, प्रा कोहिल्ल, हिं कोयला इ कोल, ग्री कोहेल]

**कोलाटी**—पु (काठीच्या साहाय्यानें) दोरीवरील नाच व इतर कसरतीचीं कामें करणारी एक भिक्षेकऱ्याची जात [का कोलु=काठी+अटिग=खेळणारा]

**कोलाटी**—स्त्री एक विशेष प्रकारची उडी ही उडी विशेषत कोल्हाटी लोक मारतात (विप्र) **कोलाटी उडी**

**कोलाडा**—पु (वाई) हरळीसारखें गवत

**कोलावण**—स्त्री जहाजावरील जकात -शर ? [स कोल=बोट+वण प्रत्यय]

**कोलाहल**—पु मोठा गलबला, गोंगाट, कल्कलाट, ओरड, गोंधळ [स]

**कोलिता**—वि रक्षणकर्ता [स कुल्=आज्ञाप्रमाणें वागणें]

**कोलिसें**—न १ रेशमासारखे पाढऱ्या अगाचें कोळी वगैरे किड्यानीं बनविलेलें जाळें किंवा घरटें यांचें वदुकीला वेष्टन करतात २ तोडयाच्या बदुकीस रेशमाचें दिलेलें वेष्टन [कोळी+सारी ?]

**कोली**—स्त्री विटीदाडू गोटया इ० खळण्यास जी खळी करतात ती गल कोल पहा

**कोली**—स्त्री (गो वे) कुत्री कोलीं

**कोलीस**—न एक कुडींत वाढणारी वनस्पति

**कोलु**—पु (कना) कोल्दाडा पहा -स्त्री विटी

**कोलु**—पु घाणा

**कोलू**—पु (गो कु) घरावरचें जुनें शाकार (कुडतें, गवत इ०) कोलवा पहा 'नळे वक्तशीर न मिळाल्यामुळें घरावर कोलू घालावा लागला'

**कोलूक**—न (गो) कुत्रें

**कोलेती**—स्त्री खाजकोल्ती नावाची वनस्पति

**कोलो**—पु (म्हान की) कोल्हा 'एक कोलो आयो'

**कोल्ल**—स्त्री (गो) विटी •दार-पु (गो) विटीदाडू

**कोल्लमशक**—पु हा शक खिस्ती शकाच्या आठशेंचोविसाव्या वर्षी सुरु झाला, हा मलबारात चालू आहे

**कोल्ली**—वि (गो) १ रागीट २ नादी, लहरी [स क्रोधिन्, प्रा कोहिल्ल]

**कोल्हरी**—स्त्री (काव्य) सोंग, मिष, बतावणी ओडवरी, कोल्हारी पहा

**कोल्हा ल्हें**—पुन १ कुत्र्याच्या वर्गातील प्राणी हा कुत्र्या वर्णाचा व मळ केसाचा असून रात्रीचा हिंडतो याला द्राक्षें वगैरे फळें आवडतात कर्कश ओरडणारा, फार धूर्त पण भित्रा जबुक, शगाल 'कीं कोल्हेया चादणीं। आवडी उपजे।' -ज्ञा ४ २३ २ (ल) धूर्त माणूस, चोरटा माणूस [दे प्रा कोल्हुअ] **म्ह०** १ अडलें कोल्हें मगळ गाय=सकटात सापडलेला दुष्ट मनुष्य हि सकट घालणाराची स्तुति करतो तुल० अडला नारायण गाढवाचे पाय धरी २ एक कोल्ह सतरा ठिकाणीं व्याल ३ कोल्ह काकडीस राजी=ज्या वस्तूवर आपला मुळींच हक्क नाहीं ती आपणास अगदीं थोडी मिळाली तरी क्षुद्र माणूस खूप होतो अल्पसतोषी (वाप्र) **कोल्हाकोल्हींचें लग्न**-ऊन असताना पाऊस पडू लागला असता म्हणतात **कोल्ह्याचें तोंड बघणें,-नागवें कोल्हें भेटणें**-शुभ शकुन घडणें अकल्पित मोठा लाभ होणें **कोल्ह्याचें शिंग**-(गो) सशाचें शिंग. (ल) अशक्य गोष्ट साध्य होणें, वशीकरणकला अवगत असणें (पुढील समासातील पहिलें पद 'कोल्हें' आहे) •कुई-स्त्री कोल्ह्याची आरडाओरड, हुकी (ल) क्षुद्र लोकाची निरर्थक विरुद्ध बडबड, क्षुद्र आरडाओरडा 'बाहेरच्या जगाला विसरून जगाची कर्कश कोल्हेकुई कोण ऐकत बसणार ?' -प्रेमसन्यास •टेंकण-णें-न (विशेषत चतुर्थी विभक्तींत बसणें किंवा येणें बरोबर उपयोग) **कोल्हे टेंकण्यास बसणें**-कोल्ह्याप्रमाणें दबकून बसणें **कोल्हें टेंकण्यास येणें**-१ वयामुळें अशक्तता प्राप्त होणें २ मावळण्यास येणें (सूर्य, दिवस) कोल्हा मागल्या पायावर बसला असता जमीनीपासून जितक्या उचीवर असतो तितक्या उचीवर सूर्य मावळताना क्षितीजापासुन असला म्हणजे म्हणतात •भुक-भोंक-स्त्री १ कोल्ह्याची हुकी, ओरडा, कोल्हेकुई २ मोठी पहाट, प्रभात [कोल्हें+भुकणें] •शाही(ई)-स्त्री उच्छेगिरी 'असला कोल्हेशाई प्रश्न कशाला ?' -नि १२६ •हूक-स्त्री १ कोल्ह्याची हुकी, कोल्हेकुई २ (ल) मोठमोठ्यानें आरडून हल्ला करणें

**कोल्हा**—पु. (व.) गुरवंट.

**कोल्हाट, कोल्हांट**—न. कोल्हाटयांचा खेळ; डोकें खालीं करून एक चक्कर मारून पुन्हां पायांवर उभें राहण्याची उडी. कोलांटी पहा. ०उड-न. कोलांटी उडी. ०खेळ-पु. कोल्हाटयाचा खेळ. -टयाचें शूरत्व-न. धीटपणाचा भाव. धाडसाचा देखावा.

**कोल्हांटी-ण-टिन**—पुस्त्री. १ दोरीवर कसरत करणारी भिक्षेकऱ्यांची एक जात, भोरपी, नाडेभोरपी, डोंबारी. 'जीवभोपावो कां जैसा। कोल्हाटियांचा।' -ज्ञा १८.६०६. 'आली कोल्हाटिन खेळाया। सगुण गुणमाया।' -मज ३५. २ कोल्हाट; कोलांटी; कसरतीचा खेळ; नाच. [का. कोलु=काठी+आटिग=खेळया]

**कोल्हापुरी**—वि. करवीर प्रांतीय; जसें-कोल्हापुरी जोडा, साप, इ०. [सं. प्रा. कोल्लपुर] ०माप-न. (कोल्हापुरी माप फार मोठें असतें यावरून) अतिशय मोठा जोडा, वहाण, इ०.

**कोल्हार**—पु कुंभार.

**कोल्हार**—न. (महानु) गुहा; कपाट. 'ब्रह्मविद्येचें कोल्हार।' -भाए ६६२. [का. कोल्हार=खिंड, बिकट मार्ग]

**कोल्हारा**—पु एक रानभाजीचें झाड. कोरळ पहा. [का. कोळर]

**कोल्हारी-ल्हेरी**-वि. कुंभारी (चिनी मातीची) कृत्रिम, घनावट. 'कोल्हेरीचे वारू। न येती धारवीं धरूं।' -अमृ ७.४. 'अथवा कोल्हेरीचे असिवार।' -ज्ञा ९.१७२. 'कां कोल्हेरीचे असिवार।' -रयो ८.३१५ [सं. कुलाल-कौलाल; प्रा. कोलाल=कुंभारासंबंधीं; मातीचें पात्र] ०वेताळ-पु. शेतांतील बुजगावणें; भुताचें चित्र 'आतां कोल्हारीचे वेताळ। तैसे निर्जीव हे आहाती।' -ज्ञा ११.४६६.

**कोल्हाळ**—पु गलका; कोलाहल पहा. 'आणि भयासुर रणकोल्हाळ। सुभटांचे।' -ज्ञा १.१३२. 'कोल्हाळ माजविला रणतुरीं।' -मुआदि ४४ ९१.

**कोल्हाळ**—न. एक खाद्य? -शर.

**कोल्ही**—स्त्री. जोंधळयाची एक जात. याचा दाणा वर दिसून येत नाहीं. [कोली]

**कोल्ही**—स्त्री. कोल्ह्याची मादी. -वि. कोल्ह्याच्या रंगाची मेंढी (तोंड, पोट, पाय काळे बाकी सर्व अंग पांढरें असलेली), 'ही मेंढी कोल्ही आहे.'

**कोल्हू**—पु ऊंसाचा चरक, तेल्याचा घाणा. [हिं.]

**कोल्हें-ल, कोल्हें**—न गोपळयाच्या आकाराचा विड्याचें टेवण्याचा भाताण्याचा (पेंढ्याचा) मुडा, भांडें. [का. कोळवी=तेल इ० टेवण्याचा नळा]

**कोवणें**—अक्रि. १ जुनें होणें; (मडकें इ० ची वाईट अथवा कोरेपणाची) घाण नाहींशी होणें; कोरेपणा जाणें. २ (ल.) रुळणें; सरावणें; निर्ढावणें (वाईट गोष्टींत).

**कोवरी**—स्त्री. फणसाची कुयरी.

**कोवसप**—क्रि. (गो.) मुरणें; कोवणें पहा.

**कोवसा**—वि. १ आधार, आश्रय. (क्रि० देणें; करणें). २ कैवारी; आश्रयदाता; कवसा पहा. 'जो भक्तांचा कोवसा।' -दा २.७.४. [कः+वस्=आच्छादणें]

**कोवळणें**—सक्रि. आलिंगिणें. कवळणें पहा.

**को(कों)वळसर**—पु. १ जरा कोंवळा (नारळ; सुपारी, इ०) २ लहानसर; अपक्व; नाजूक. [कोंवळा]

**को(कों)वळा**—वि. १ लहान; कच्चा; अपक्व; हिरवा. २ ताजा. (कोंवडीचें अंडें, इ०) याच्या उलट निबर. ३ (ल.) सौम्य. (सकाळ, सूर्यकिरण, ऊन). ४ कच्ची, अडाणी; अप्रगल्भ (ग्रहणशक्ति, समजूत). अर्धवट; कोता; अप्रौढ, पुरतेपणाचा नव्हे असा (सल्ला मसलत, विचार). ६ कमी बळकट; नाजूक; कोमल [सं. कोमल; सीगन. कोवळो. मॅस. जि. कोवलो] ०किरळा-वि. लहान आणि नाजूक (अंकुर फुटलेला). [कोंवळा+किरळ] ०दुपार, ०दोनप्रहर-स्त्रीपु. दोनप्रहर होण्याच्या आधींचा काळ नुकतीच सुरवात झालेली दुपार, मध्यान्ह.

**को(कों)वळीक**—स्त्री. १ कोंवळेपणा; (अप्रौढतेतील) नाजूकपणा, अशक्तपणा. (अपक्वपणातील). २ तारुण्याचा बहर; टवटवीतपणा. ३ मृदुपणा. 'आणि महाबोधीं कोंवळीक। दुणावली।' -ज्ञा १.३४. 'कोंवळीक घाली सिरणें, शिरस पुर्णेसी।' -भाए २६. -वि. कोंवळी.

**कोंवा**—पु कोंका; किंनरी (कानफाटयाची), एकतारी. [का. कोवी]

**कोंवारीण**—स्त्री. कुंवारीण पहा. (बायकी) ऋतु न झालेली आठ अगर त्याहून कमी वयाची मुलगी जिला मोडणारा अगर देवीच्या पूजेत (नवरात्रांत) बसवितात व जेवावयास घालतात.

**कोविद**—वि. पंडीत, ज्ञाता, सुज्ञ; कुशल 'सांगो काय तुज तुझ्या पौत्राचें युद्ध कोविदा राया।' -मोभीष्म ३.४९. [सं.]

**कोविदार**—पु एका जातीचें झाड; कोरल, कांचन; सिमु. 'तुळसी करवीर कोविदार।' -ह १०.१५९. 'तुळसी, कोविदार सुंदर। कनकवेलि, नागवेलि, कोमलांकुर।' [सं.]

**कोवी**—स्त्री. (कों.) पोखारलेला नारळ; घेलें. [का. कोवि=पोकळ नळी]

**कोव्हरी**—क्रिवि. (ना.) कुठवर; किती वेळपर्यंत; कोठपर्यंत? [कोठार]

**कोव्हाळा-ळें**—पुन कोहळा, याची भाजी, साडगे इ० करतात कोहळा पहा

**कोव्हाळी**—स्त्री कोहळ्याचा वेल

**कोश**—पु १ खजिना, साठा, संग्रह, तिजोरी, खाण वखार २ देहामधील अन्न–प्राण–मन–विज्ञान–आनंदमय असे जे कोश आहेत त्यांपैकी प्रत्येक, आत्म्याचें आवरण ३ शब्द विषय संज्ञा इ० चें संग्रहयुक्त विवेचन करणारा ग्रंथ, निघंटु (इं) डिक्शनरी, शब्दसंग्रह उदा० शब्दकोश, ज्ञानकोश चरित्रकोश, इ० ४ आवरण, पटल, पापुद्रा, अस्तर ५ म्यान (तरवारीचें) ६ काळी–कीटक अंड स्थितींतून कीटस्थितींत येऊन शरीराभोंवतीं रेशमासारखें मऊ आवरण करतो तो, कोशेटा ७ कळी 'अंतरी फाके। हृदयकोशु।' –ज्ञा ६ २०९ ८ दिव्य करून लावलेला निकाल, न्यायदानांतील दिव्य (अग्नि, पाणी, विष, वजनाचा काटा, उकळणारें तेल, कुलदेवतेवर पाणी घालणें–ब्राह्मणांच्या चरणावर पाणी घालणें किंवा त्याचें तीर्थ घेणें इ०) शपथ, प्रतिज्ञा 'पीयारीं कृतनिश्चयाचा कोश।' –ज्ञा १३ ६०४ ०कार–पु १ रेशमाचा किडा, कोळ्याच्या वर्गांतील प्राणी २ कोशस्थितींत असलेला, कोशवासी किडा, फुलपाखरू ३ शब्दार्थकोश रचणारा कोश तयार करणारा संपादक ०कीट–कीटक–पु कोशकार (अर्थ १।२) पहा कोशकिडा हा आपल्या भोंवतीं कोशेटा करून आपणासच कोंडून घेतो 'एन्हवीं कोशकीटका चिया परी। तो आपणपयां आपण वैरी।' –ज्ञा ६ ७२ –वि १२ १६१ ०गृह–न भांडार 'कीं कोशगृहीं प्रवेशोनी।' –रावि १ ७१ ०पान–न देवाचें तीर्थ पिणें दिव्याचा एक प्रकार शपथ घेणें, दिव्य करणें ०पिणें–शपथ घेणें 'शरीर वाचा मानस। पियारीं कृतनिश्चयाचा कोश। –ज्ञा १३ ६०४ ०वृद्धि–स्त्री संपत्तीची वाढ, भरभराट, समृद्धि 'होम हवनें होय कोशवृद्धि॥' ०शुद्धि–स्त्री दिव्यानें निरपराधित्व सिद्ध करण्याची क्रिया

**कोश**—पु दोन मैल अंतर कोस पहा [स क्रोश प्रा कोस]

**कोश**—पु (कु) फरक अंतर, कास पहा 'दोन काटयाच्या मापांत थोडासा कोश राहिला'

**कोशरें, कोशेर**—न एक प्रकारचें जाडेंभरडें रेशीम [कोश]

**कोशा**—वि काळसर रंगाची (गाय बैल)

**कोशा**—पु डोक्याला बांधावयाचा रेशमी रुमाल पगा (कोशाच्याच्या रेशमाचा) [स कौशेय, प्रा कोसअ=रेशमी वस्त्र]

**कोशागार**—पु तिजोरी जामदारखाना, भांडारगृह खजिना [स कोश+आगार]

**कोशाध्यक्ष**—पु खजिनदार, द्रव्यसंग्रहावरील अधिकारी [स कोश+अध्यक्ष]

**कोशिक**—न कोशेटा 'कासया करिसी रुदन। आपण आपणा केलें बंधन। कीटक करी स्वभुवन। कोशिक जैसें।' –कथा ५ ७ ८ [स कौशिक]

**कोशिंदा**—पु कोचिंदा वनस्पति

**कोशिंब**—पु एक झाड, हें मोठें असतें याच्या बियांचें तेल निघतें तें खाण्यास, दिव्यामध्यें जाळण्यास केसांना व देशी औषधांत वापरतात याच्यापासुन पुष्कळ लाख उत्पन्न होते बीला कोशिंबी म्हणतात [स कोशी+आम्र कोशाम्र, प्रा कोसंब, म कोशी+आंबा]

**कोशिंबरें**—न तांदुळाचा एक प्रकार, कोथिंबरें भात

**कोशिंबीर–बरी–कोशिंबिरिका**—स्त्री कच्च्या फळाची दह्यांत कालवून केलेली चटणी, रायतें, तोंडी लावणें 'या कोशिंबिरिका अनेक रचिल्या देवी तुला तोषदा।' –निमा १ १४ 'कोशिंबिरी आंबेरायत।' –नव १ ११८ [स कुस्तुंबरु फा कोस्तुंबरी]

**कोशिंबेल**—न. कोशिंबीचें तेल

**कोशीस**—स्त्री प्रयत्न, मेहनत (क्रि० करणें) 'इकडील दौलतीविषयीं कोशीस करीत जावी।' –रा ८ ५ [फा कोशिश]

**कोशेटा–टी–कोशेरा**—पुस्त्री १ फणस व इतर फळांतील आठळीचें टरफल २ कणाची खपली, साल, कातडें ३ काळी व इतर कांहीं किड्यांचें जाळें, कोश, किड्याचें घर [कोश+ॅ]

**कोष**—पु कोश पहा [स] समासांत अंडकोष, बीजकोष इ० ०वृद्धि–स्त्री अंतर्गळाचा रोग, अंडवृद्धि

**कोष्ट**—कोष्ठ पहा

**कोष्टक**—पुन १ कॉलम, रकाना कोष्ठक पहा २ किंमत, वजन, मापें इ० परिमाणदर्शक संज्ञांचें परस्परप्रमाण दाखविणारी यादी [स] ०की गुणाकार–पु गुण्य राशीचे जितके अंक तितक्या कोष्टकाचा गुणाकार सम संख्यांक पंक्ती करून गुणण्याचा प्रकार घांवरा गुणाकार, बैठा गुणाकार कपाटसिंधु पहा.

**कोष्टम**—न (व) झेंगट, लफडें, धोकें 'तुमच्या मागें अद्याप कांहीं कोष्टम लागलें नाहीं'

**कोष्टी**—पु १ एक विणकर जात, याचा धंदा सूत कातणें व विणणें, साळ्यापेक्षां यांची जात निराळी २ (ल) काळी–किडा हा तंतु काढून जाळें विणतो [कोश कोशेगी]

**कोष्टी**—स्त्री (गो कु) बकऱ्याची, डुकराची इ० मानाची सागोती सागोतीची पुडी [कु]

**कोष्ठ**—न कोड (एक त्वचेचा रोग) [स कुष्ट]

**कोष्ठ**—पु १ पोट कोठा २ धान्याचें कोठार, कोठी ३ खोली, दिवाणखाना ४ आम, रुधिर, मूत्र इ० देहांतील स्थानें, आमकोष्ठ मूत्रकोष्ठ इ० ०क–न हिशोबाकरितां काढलेल्या आडव्या उभ्या रेषांचीं घरें, प्र चौक, तक्ता, घर, रकाना, कॉलम, कोष्टक

[सं.] •बंधक–वि. मलावरोध करणारें; स्तंभक. [सं.] •शुद्धि–स्त्री. शौचाला साफ होणें; कोठा शुद्ध होणें; (पुष्कळ रेच झाल्यानंतर).

**कोष्ठ, कोष्ठकोळं(ळां-ळिं)जन**—न. एक औषधी वनस्पति. ही काश्मीरकडे होते. ह्याच्या मुळया औषधी आहेत. शिवाय त्यापासुन अत्तर व केसांचा कलप तयार करतात [सं. कुष्ठ+कुलंज, हिं. कोलिंजन]

**कोष्ण**—वि. किंचित उष्ण; कोमट; कुवट. [सं.]

**कोस**—पु. अंतर दाखविणारें रस्ता मोजणीचें माप; साधारणतः दोन मैल. इंग्रजी ४५५८ यार्ड. एक चतुर्थांश योजन. (याचें निरनिराळया ठिकाणीं गजाच्या लांबीप्रमाणें अंतर निरनिराळें असतें). साधारणपणें चार हजार हातांचा कोस भरतात. [सं. क्रोश; प्रा. कोस]

**कोस**—स्त्री. (व.) सापाची कात. 'साप कोस टाकतो.' [सं. कोश]

**को(कों)स**—पु. चतुष्कोण, त्रिकोण, इ०. विवक्षित आकार तंतोतंत नसून त्यांत वाकडेपणा आल्यामुळें होणारा न्यूनाधिक भाव; कोच (ताणलेलें कापड, हातरुमाल, शेत, भिंत, रस्ता, कुंपण इ०. ना येणारा). आधिक्य, वाढ. (क्रि० येणें, असणें, होणें, जाणें, निघणें, काढणें, जिरणें, जिरवणें). 'या जागेला फार कोस आहे.' [का. कोंडा=वाकण, वळण]

**कोसपेणी**—स्त्री. कोसांची मोजदाद.

**कोसंब**—कोशिंब पहा. 'कोसंब अंजीर खराड।'–वालिका २३.१५

**कोसम्योंवें**—कि (गो.) पाण्यामुळें (लाकूड) कुजून जाणें. [कुसमणें]

**कोसरा**–पु कोळी, किडा. कोसला पहा. 'गगनीं लागला कोसरा। कोण पुरवी तेथें चारा।'–तुगा ३३०९

**कोसला**—पु १ रेशमाचा किडा. 'जैसा स्वयें बाधोन कोसला मृत्यु पावे।'–दा ८.७.९. २ रेशमाचा किडा किंवा कोळी यांचा कोशिटा ३ ह्या कोशिटयाचा तोंडाच्या बेंदुकीच्या भोंवतीं असलेला वेढा [सं कोश+ल]

**कोसली**—स्त्री (ना.) मकरसंक्रांतीच्या दिवशीं तिळकूट किंवा साखर इ० घालून तयार केलेली करंजी, मिष्ट पदार्थ, कोसल्या तळून किंवा तटून करतात [सं. कोश+ली]

**कोसळणें**—अकि. १ एकदम पडणें, तुटून, मोडून पडणें, ढासळून पडणें, ढासळणें; विस्कळणें (भिंत, निंदिर, रास इ०) 'वाजी एकदम जागच्या जागींच कोसळला.'–स्वप ८८. २ पडून तुकडे होणें (अभ्र इ०). ३ (ल.) जोरानें वेगानें खालीं येणें, पडणें, (पाऊस). ४ आधार सुटून, विघुस्त होऊन, धपादन गरगर खालीं पडणें (वाऱ्यानें फळें, फुलें). ५ फिसकटणें, प्रतिकूल होणें; निष्फळ होणें (बेत, मसलत). ६ केव्हां केव्हां वरील अर्थी सकर्मक क्रियापदासारखा उपयोग करतात. [का. कोसरु=आधार सुटणें, सोडणें]

**कोसाई**—स्त्री. घोड्याचा एक रोग त्याच्या दोन्ही मांड्याखालीं गांठी येतात. –अश्वप २.२८३.

**कोसीस**—कोशीस पहा.

**कोस्टी**—स्त्री. (कु.) शिकार करून मारलेल्या सावजाचे घालण्यांत येणारे वाटे. कोशी २ पहा.

**कोस्त**—पु (गो.) कलमी आंब्याची एक जात. [पो. कोस्ता]

**कोहं, कोहं-कार**—उद्गा पु 'मी कोण;' मी कोण अशा अर्थाचा ध्वनि; मूल जन्मल्यानंतर तें प्रथम जो आवाज करतें तो. गर्भांत असताना मूल ईश्वर आणि आपण एकच आहों असें समजून सोऽहं (तो मी) असें म्हणत असतें पण बाहेर आल्यानंतर ईश्वराला विसरून 'कोहं' मी त्याहून निराळा आहे काय ? या अर्थी 'कोहंकोहं' मी कोण मी कोण, असा या मायोपाधींत सांपडल्यामुळें उच्चार करतें. सोऽहं पहा. 'तें अज्ञान एक रूढे। तेणें कोहंविकल्पाचें मोडे।'–ज्ञा १५.३४२. 'गर्भी म्हणे सोहं सोहं। बाहेरी पडता म्हणे कोहं।'–दा ३.१.४७. 'कोऽहं कोऽहं रडूं लागला।'–अमृतकटाव ५३. [सं. कः+अहम्]

•भाव–पु. कोऽहं म्हणत असतांना बालकाची मनस्थिति. वरील अर्थ पहा. [सं.]

**कोहक, कोहंक**—न. कुहर; विवर; गुहा; डोंगर; पर्वत. 'कोहकीं वसती।'–कृ ७९ (टीप). 'कोणें एके नगरा बाहेरी कोहकीं। चंडरव नामें कोल्हा असे।'–पंच १.३०. [सं. कुहर; प्रा. कोहु]

**कोहकणें**—अकि. (व.) वाळणें; सुकणें, रोडावणें. 'मागील दुखण्यापासुन तो कोहकून गेला.' [सं. कोथ, प्रा. कोह=जीर्णता]

**कोहटळी**—स्त्री कुजकी घाण, घाणीची जागा. 'मग बाळ पणींची कोहटळी। धुंडूनि घेतसे॥'–स्वानु ९.४.७२. [सं. कोथ, प्रा. कोह=सडकी+स्थल]

**कोह(हे)डें**—कुहडें पहा.

**कोहळा-ळी-ळें, कोहाळा-ळी-ळें, कोहोळा-ळी-ळें**—पुस्त्रीन. १ कोव्हाळा-ळी-ळें एक प्रकारचा भोपळा; फळ आणि वेल. हा एक वेल असतो. याचें फळ, लहान भोपळया-एवढें हात दीड हात लांब असतें याचा पाक पौष्टिक असून पोडीचें माडगें करतात २ (व. ना.) तांबडा भोपळा याची भाजी करतात [सं. कुष्मांड; प्रा. कोहालिआ] म्ह० आवळा देऊन कोहळा काढणें. =थोडीशी लालूच देऊन मोठें घबाड साधणें. लहानाच्या मोबदल्यात मोठें मिळविणें.

**कोहळी-ळें**—स्त्रीन कोयळी, करडा 'राक्षण कोहळीं घागरी वहुवसा।' –दा ४ ७ ९ 'तो आत होतीं सात कोहळीं।' –रावि २७४ [स कोथ, प्रा कोह=थैली, थैला]

**कोहळें-हाळें-होळें**—न वेलाचें वशिंड [स कुष्माड, प्रा कोहलिआ]

**कोहोपरी**—स्त्री (व) परात, थाळी कोपरी पहा

**कोळ**—न तिळाच्या झाडाची तीळ झाडून घेतल्यानतरची लहान पेंडी 'झाडिलीं कोळें झाडी। तया न फळे जैवीं वोंडी।' –ज्ञा १३ ५८५ 'तीळ नाहीं म्हणून कोळ साटविले घरात घालुन ओघा।' - पला ८७ 'नपुसकें तुम्ही निर्बळें। जैसीं तिळाचीं शुष्क कोळें।' –पाप्र २२.२७ [कवळ]

**कोळ**—पु १ ज्यात (पाणी, ताक इ०) चिंच, आवे भात इ० कालवून करतात तें दाट पाणी, कुवळ, कोळलेलें पाणी २ चिंच कोळल्यानतर तिचा टाकाऊ भाग, चोथा [कोळणें]

**कोळ**—पु १ जळालेला पदार्थ (क्रि० होणें) २ राख, वाळलेली, करपलेली अवस्था 'डाहाळी जळुन कोळ जाती गळुन पडे भिंतीवर आंबा।' –सला ५७ 'कागद जळून कोळ झाला' =अगदीं राख झाली [प्रा दे कोल्ल=जळकें लाकूड, का कोळ्ळि=कोलित] **वाळून कोळ होणें**–अगदीं वाळून शुष्क होणें, झडणें (वनस्पति, पानें), कोमजणें, आकसणें करपणें (वनस्पति, जनावरें)

**कोळ**—पु गहाण, कर्जाची फेड न केल्यामुळे कर्जाइतकी जिंदगी (कर्जदारासुन अगर दुसऱ्या कोणापासुन) घेऊन अड करून ठेवणें, गहाण माल (क्रि० पाडणें) [अर कौल=करार]

**कोळ**—पु (कों) खाडीचा फाटा, पोहडी, ओहर [का कोळ्ळ=खोल जागा, भगदाड, दरी]

**कोळ**—पु रानडुक्कर, कोळ पहा –वि मस्त मातलेला [स कोल]

**कोळउंदीर-धुंदूर**—पु घूस [स प्रा कोल]

**कोळऊ**—स्त्री कोल उवा, अगावरील ऊ (म्हैस, डुकर इत्यादींच्या) कोळवू पहा

**कोळकांदा**—पु (गो) एक जगली औषधी कादा

**कोळख**—स्त्री (गो) ऐरणीचें लाकूड

**कोळखंड-खादा**—नपु (कों) वेलाचें वशिंड [कोहळें+खांदा]

**कोळखण**—स्त्री (गो) सोनाराची सामान ठेवण्याची कोळंबी, लाकडी पात्र

**कोळगंड**—पु कोळयाला (कोळी जातीला) तुच्छतेनें म्हणतात (न्हावगड शब्दाप्रमाणें) [कोळी+गड]

**कोळ(लि)गा**—पु भ्रमर 'उदैजेति परियेंसीं कळि कोळिगा राहिला रोंभीं।' –ऋ ९० [स कुलिंग?]

**कोळंगा**—पु जळजळीत निखारा [का कोळ्ळि]

**कोळंगी**—स्त्री ठिणगी, मूल, काजळी

**कोळंगें**—न (वे) ताऱ्याचें किंवा पितळी पींप हें लहान मोठ्या आकाराचें असतें [का कोळगा]

**कोळजणें**—अक्रि जळून राख होणें (विस्तवातुन काढलेलें कोलीत, निखारा) उन्हानें करपून काळें होणें, पडणें, कोळपणें पहा

**कोळंजन, कोळांजन, कोळिंजन**—न कोष्ठ कोळजन, अबेहळदीसारखें झाड, पानाचा वास मधुर, मुळयाचा रग पाढरा, चव तिखट गड्डे व फळ औषधी मज्जातंतुपौष्टिक व कामोद्दीपक आहे ही वनस्पति हिंदुस्तानात सर्वत्र उत्पन्न होते [स कुलिंजन]

**कोळणें**—उक्रि कुस्करणें, (पाण्यात) हातानें चुरडणें, गर काढणें, पिळणें (चिंच, आंबा), सार, सत्त्व काढून घेणें [कोळ]

**कोळदांडा**—काळदांडा पहा

**कोळपणी**—स्त्री कोळप्यानें वेणणें, पेरलेल्या जमीनींतील तण काढणें, खुरपणी

**कोळपणें**—उक्रि कोळपणी करणें –शे ८ २२३

**कोळपणें**—अक्रि करपणें, काळवडणें, वरवर जळून काळें होणें, उन्हानें काळें पडणें (झाड, शरीर), चुलींत पेटलेले निखारे राखेनें झाकले जाणें, लाकूड जाळ न होता काळें पडणें (सामा) धुमसणें, जळणें 'करीना शात कात ही कात म्हणुन कोळपत्ये।' –प्रभा २१८ [का कोळ्ळि=कोलित]

**कोळपाट**—पु (तजा) पोळपाट

**कोळपुटी, कळपुटी**—स्त्री (गो) माशाच्या डाक्याचे तुकडे करून त्याचें केलेलें पक्वान्न

**कोळपें-पा**—नपु वीतभर पीक उभें असता उपयोगात आणावयाचें आऊत, यानें पिकाच्या दोन ओळींमधील जमीन हलविणें, भुसभुशीत करणें, आतील तण काटणें, पिकास मातीची भर देणें हीं कामें होतात खानदेशात, देशावर व कर्नाटकात दोन तऱ्हेचीं कोळपीं आढळतात याचे दाते एकापासून आठापर्यंत असतात सातारयाकडे मिरच्याच्या कोळप्यास डुबें कोळपें व उसाच्या कोळप्यास ताफेचा कोळपा म्हणतात दोन बैलाच्या एका जुवावर पिकाच्या मानानें दोन दोन चार चारहि कोळपीं ठेवितात –दे ७ १७ २०२ [का कोळ=फाळ, दात]

**कोळंब**—पु (गो) कोंडवाडा

**कोळंब-बा**—नपु तावडें जाडें शाकारणीचें गवत, तावट, तांवट

**कोळंब-ब्या**—पु (कुलाबा कु) एक प्रकारचें भात

**कोळंचा**—पु पाणी भरण्याचा पोहरा खापरी भांडें, मडकें कोळवें पहा [प्रा कोल्व, का कोळवि=पोकळ नळी]

**कोळंबी**—स्त्री (कों) झिंगा मासा

**कोळंबी**—स्त्री (गो) १ गुराना पाणी पाजण्याच्या उपयोगाची दगडी किंवा लाकडी कुंडी, हिचा उपयोग कपडे धुण्याकडेहि करतात २ (सामा) लाकडी पात्र कोळवें पहा

**कोळंबें**—न (कों गो कु) १ मातीचें, रुंद तोंडाचें भांडें, फुल्झाडाच्या कुंड्याकरिता, जनावराना पाणी पाजण्यास व अबोण ठेवण्यास याचा उपयोग करतात २ रहाटाच्या लोट्याचें पाणी ज्यात पडतें असें रहाटाच्या मध्यें असलेलें लाकडी पात्र, डोणी याचीं दोन्हीं तोंडें बंद असून एका तोंडाजवळ खालच्या बाजूस भोंक असतें व त्यातून पाणी पाटांत पडतें ३ विहिरींतून ओक्तीनें पाणी काढण्याकरिता सुगमाडाच्या बुडख्याचें किंवा धातूचें पात्र केलेलें असतें तें, पोहरा ४ कुंडींतील अथवा पाटांतील पाणी बाहेर फेंकण्याकरिता सुपाच्या किंवा पावडयाच्या आकाराचें भांडें असतें तें, शेल्णे ५ (चाभारी) चामडें भिजविण्याचें चाभाराचें खापरी अथवा दगडी पात्र, कुंडी, कोटमी [प्रा कोल्व=भांडें, का कोळवि–वे–वि=पोकळ नळी]

**कोळमँ, कोळंम्या**—न (गो कु) लहान कोळंबी कोळवें पहा

**कोळमुटचें**—अक्रि (गो) कल्हई नसलेल्या भांड्यात पदार्थ ठेवल्यानें त्यास कळक येणें

**कोळमूळ**—न (गो कु) उभट व वाटोळें भांडें (कढी, ताक वाढण्यास उपयोगी पैकीं कांहींना मागें मूठ असते) पाळें

**कोळयो**—पु (गो) भाताचें बीं

**कोळवण**—न वसई कल्याण याच्या, उत्तरेकडील प्रदेश, उत्तर कोंकण यात विशेषत काळी लोकांची वस्ती आहे [कोळी+वन]–णी–वि कोळवणमधलीं (भाषा, वेष इ०)

**कोळवा**—पु (व) वाळवून ठेवलेल्या पालेभाज्या [कोरवणें]

**कोळवाड–वाडा**—स्त्रीपु गावांतील कोळी लोकांची वस्ती, वाडी [कोळी+वाडा]

**कोळविणें**—अक्रि कोळणें पहा

**कोळवू**—स्त्री (बैल किंवा रेडा इ०) जनावराच्या अंगावरील गोचीड किंवा गोमाशी कोळऊ [स कोल+ऊ]

**कोळवें**—न शेराचा एकअष्टमांश भाग अथवा चिपट्याचा एक द्वितीयांश भाग, अदपाकाचें माप 'कधिं ऐकरी चिपटीं कधीं निपट कोळवीं चोखवी कधीं पाहिलीं।' –राला १०९ [स कुडव=पावशेर]

**कोळवें**—न (कु कों) १ टेंगण्या घरात आत जातांना वर डोकें न लागावें म्हणून कमानीसारखा आकार आणून उंच वाढविलेला पाखडाचा भाग २ वाघईला लागून काढलेली खोली, घराची पडवी हिचा उपयोग भाड्याची खोली, स्वयपाक घर, न्हाणीघर वगैरे कामाकडे होतो म्ह० कोळव्याचा वासा घडी घडी लागे=नेहमीं ज्याचा संबंध येतो त्याला दुखवून चालत नाहीं

**कोळवें**—न (कों) बैलाचें वशिंड

**कोळशी**—स्त्री १ काजळी (जळल्या वातीची किंवा मशालीची), कोजळी जळकीवात २ जोंधळ्यावरील एक रोग यानें दाणे काळे पडतात ३ नाचणीची एक गर्वी जात, हिचे दाणे काळे असतात –कृषि २८३ [प्रा कोल, का कोळ्ळि, म. कोळसा]

**कोळशी**—पु (गो) एक जातीचा मासा

**कोळशीट, कोळशेटें, कोळष्टक, कोळिष्टक**—न कोळ्याचें जाळें [कोळी+कोशीट]

**कोळशी(सी)ण**—स्त्री एक प्रकारचें लहान औषधी झुडुप अंगावरील कोळी चुरडला असता याच्या पाल्याचा रस लावतात

**कोळसंडणें**—अक्रि धुमसणें, वाहेरून अगदीं जळून काळें होणें (परंतु आतून न जळणें) [कोळसा]

**कोळसन–सुना–सून**—नपु (मावळ) एक कोल्ह्या कुत्र्या सारखें जनावर आपला शत्रु जवळ आल्यास त्याच्या तोंडावर आपलें मूत शिंपडून त्यास हा आधळें करतो व मग खातो असें म्हणतात कोळसिंदा–सुदा, कोळिष्णा पहा

**कोळसर, कोळा**—कोंवळसर कोंवळा पहा

**कोळसा**—पु एक पक्षी

**कोळसा**—पु १ विझलेला निखारा 'तरि करि तसाच आतहि उगाळिता कोळसा प्रयास करा।' –मो सशयरत्नमाला २० (नवनीत पृ ३५०) म्ह० १ कोळसा किती उगाळला तरी काळाच २ कोळसा घासला तरी आत काळें=वाईट गोष्टीपासून कधीं चागलें निपजावयाचें नाहीं दुष्ट मनुष्य अत करणानें व आचारानें सारखाच असतो वाईट तें वाईटच कोळशाचे प्रकार–(अ) (सोनारी) हा कोळसा, फणस, खैर, बाभळ, किंजळ या लाकडाचा व न पिचणारा असतो (आ) (दारूकाम) दारूकरिता शर, तूर, आघाडा वगैरे झाडाचा हलका व लवकर पेट घेणारा कोळसा वापरतात कृति–प्रथम मातीच्या घागरीत लाकडाचे तुकडे भरून लाकडें जळून निखारे पडू लागले म्हणजे घागरीचें तोंड बंद करतात, त्यामुळें लांकडें विझून त्याचा कोळसा तयार होतो नतर ता सावलीत सुकवून त्याची बलगाळ पूड करतात [वैसं कुल=जळणें, का कोळ्ळि, प्रा कोळ्ल, ग्री कोहल, इ कोल]–कोळशातील माणिक–अंतरसाल–नकी अतिशय काळा माणूस –गल्प्रि २२४

**कोळसा**—न (कु) ज्याचा फाळ झिजला आहे असा नांगर [कोयसें पहा]

**कोळसॉ-सो**—पु (गो) चोवीस शेराचें माप

**कोळसिंदा-शिंदा-सुंदा, कोळिसरा, कोळिस्ता-स्त्रा-स्रॅ**—पुन एक वन्यपशु, एक आखुड शेपटीचा, लांब कानाचा ल्हान प्राणी हा आपल्या शेपटीवर मुततो व तें मूत वाघाच्या डोळयात शिंपडून त्याला आंधळा करतो व ठार मारतो असें म्हणतात कोणी याला माजरासारखें, कोणी कोल्ह्यासारखें मानतात कोळसन-सुना-सुन पहा.

**कोळसुंदा, कोळसा, कोळिस्ता, कोळिस्त्रा**—पु एक झुडुप, कोरांटीतील एक जात, हें शेताच्या बाजूस किंवा चोहोळाच्या काठीं येतें याची उंची २।२॥ फूट असते याच्या कोंवळया पानाची भाजी करतात पानें लांबट असुन,त्यास खालीं एक काटा असतो याच्या बीस तालीमखाना म्हणतात –वगु २ ६७

**कोळसुंदा**—पु चटुकीची मासी, मोहरी ह्यांच्याकडे बघून गोळीचा नेम धरतात.

**कोळसें**—न (कु) नागराचा फाळ बसविण्याचा लाकडी ठोकळा

**कोळसेमुडें**—न कोळसे वाहाण्याकरितां केलेला मात्येणाचा मुडा [कोळसा+मुडा]

**कोळा**—पु (कु) मोठा डास

**कोळावें**—न कोळी लोकाचा दरवडा, धाड –नामको [का कोळ्ळे=छापा, दरवडा]

**कोळिता**—पु कोळमुदा पहा

**कोळिश्रय, कोळिस्रा, कोळिसरा**—पु १ एक रेशमाचा किडा 'जसा कोळिश्रयाचा बंध। तो तयासचि करी बद्ध।' –कथा १ ५ २ रेशमाच्या किडयाचें कोशीट, कोश हा औषधी असतो

**कोळिष्णा**—कोळसर, कोळसिंदा पहा

**कोळिसरा-स्त्रा-स्रॅ**—पु न एक प्रकारचा झुरळासारखा प्राणी

**कोळिसरी**—स्त्री एक झुडुप, गवताचा प्रकार कोळमुदा पहा

**कोळी**—पु जळत्या किंवा जळलेल्या वातीची काजळी [प्रा कोल, का कोळ्ळी]

**कोळी**—पु एकप्रकारचा पाण्यात राहणारा पक्षी ०ण–स्त्री कोळी पक्ष्याची मादी

**कोळी**—पु १ एक जात व तींतील माणूस हे मासे पकडण्यात पटाईत असतात हे मासे विकण्याचा व नावाडयाचा धंदा करतात याच जातींतील दुसरे लोक डोंगरात, अरण्यात राहून शिकार व चोरी करून उदरनिर्वाह करतात प्राचीन ग्रामसंस्थेंत कोळयाकडे पाणी पुरविण्याचें काम असे, धीवर ही एक गुन्हेगार जात समजली जाते पण याच्यापैकीं फक्त महादेवकोळी (राजकोळी) व गुजराथकोळी याच दोन पोटजाती गुन्हे करतात २ कोळी नावाचा किडा, हा आपल्या अंगातून सूत काढतो व त्याचें जाळें बनवितो [प्रा कोलिअ] ०ण–स्त्री १ कोळी जातींतील बाई २ कोळी किडयाची मादी ३ शिमग्याच्या सणात कोळणीचें सोंग आणतात त्यात स्त्रीवेषात नाचणारा पुरुष ०लांकडी–स्त्री जंगलातून तोडून आणलेल्या लाकडावरील कर, दस्तुरी. ०वडा–पु कोळवाडा पहा ०ष्टक–न कोळशीट, कोश. **कोळयाचें सूत**–न १ लांब सूत २ (ल) लांबच लांब, निरस व कंटाळवाणें भाषण

**कोळुसांटा**—पु (वे) एक प्रकारची वनस्पति

**कोळू**—स्त्री (गो) जनावराच्या अंगावरील ऊ [कोळ]

**कोळें**—न १ बैलाचें वशिंड, कोळसड २ गवताचा लंबवर्तुळाकार (अंडाकृति) मुडा किंवा पुडा यात भात किंवा भाताचें रियाणें ठेवतात गवताची पुरचुंडी (पावटे इ० ठेवण्याची) –शे ७ २८ [कोहळें] ०भर–वि कोळयात राहतील इतके 'कोळें-भर पावटे सुमारें दीड पायली होतात'

**कोळे रोग**—पु सुपारीवरील एक रोग

**कौकवित, कौटल-ळ, कौटाल-ळ, कौटाल्या, कौटाळणॅ, कौटाळी-कौटाळीण-कौवटाळीण, कौटिल्य, कौटोळ, कौठ, कौठी, कौंडळ, कौडा, कौडागहूं, कौडाळ, कौडी, कौडीचुंबक, कौडींटंक, कौडीपूत, कौंड्या ऊद, कौड्या घोणस, काडया साप**—हे शब्द 'कव' खालीं पहा

**कौटाळीण**—कवटाळीण पहा 'हे कौटाळीण निर्धारीं। नसतींच दैवतें उभी करी।' –ह २ ४१

**कौटाळ्यविद्या**—स्त्री (कुण) (अडाणी लोकाचा पांडित्यप्रदर्शक प्रयोग) कौटाळ, जादू, जारणमारण, चेटूक [कवटाळ+विद्या]

**कौटिल्य**—न १ वाकडेपणा, वक्रता २ (ल) कपट, दुष्टपणा, कवटाळ, ठकबाजी 'राणीचें आनंदीबाईच्या सवाई निष्ठुराचरण व कौटिल्य, सद्गुणींचा मत्सरी स्वभाव' –नि ५४४. ३ चाणाक्षपणा ४ चाणक्य ऋषि–चंद्रगुप्त मौर्य राजाचा मंत्री याचा अर्थशास्त्र ग्रंथ प्रसिद्ध आहे

**कौंतिक**—पु भालेकरी [स कुंत=भाला]

**कौंती**—स्त्री भाला, एक हत्यार [स कुंत, हिं कौंत]

**कौतुक**—न १ आश्चर्य, कुतूहल, जिज्ञासा, नवल, आश्चर्य, विस्मय, प्रियता, आनंद किंवा जिज्ञासा उत्पन्न करणारी कोणतीहि गोष्ट (मनुष्य, वस्तु कृत्य गोष्ट, देखावा इ०) 'त्याचें बोलण्याचें कौतुक वाटतें' 'ज्या पदार्थाचें ज्यास कौतुक नाहीं त्यास ता

मुळो २ ४३

देऊं नये.' २ प्रेम; ममतेनें, आनंदानें धरणें; लाड करणें; कुरवाळणें (मूल किंवा वस्तु); अतिशय प्रीति, अभिमान धरणें; लालन पालन; नाजुक रीतीनें वागविणें; फार काळजी घेणें. (क्रि० (कौतुकानें) राखणें, ठेवणें). ३ मौज; खेळ; विनोद; प्रदर्शन; गाणें नाचणें. इ० 'उत्तर निज गुरगांतें धावा अरणासि कौतुक पिटाळी।' –मोविराट ४.८१. ४ मनोरंजन; करमणूक; ख्याली-खुशाली. [सं.]

**कौतुकी**—वि. खेळ्या, मौज करणारा, आनंदी; उल्हासी.

**कौतुकेंकरून, कौतुकें-कानें**—क्रिवि. सहज; लीलेनें 'तेंचि आवडतिये भूमिके। आरूढलियाहि कौतुकें।' –अमृ ७.२६०. [सं.]

**कौतूहल**—न. कौतुक अर्थ १.३.४. पहा. कुतूहल पहा. [सं.]

**कौत्सित्य**—न. कुत्सितपणा; दुष्टपणा; कपटभाव. कुत्सित (वि.) पहा. [सं.]

**कौदरी**—स्त्री. चवेणीचें झाड.

**कौन**—वि. (दलाली) नऊ ही संख्या.

**कौनवौ**—वि. १ चमत्कारिक; भीतिदायक; भयंकर; दिडिस परंतु अगम्य व अनिश्चित असा (पदार्थ, माणूस वगैरे); २ काण्णूवाण्णू पहा. [कोण+वाऊ?]

**कौपीन**—नस्त्री. १ लंगोटी; छाटी (क्रि० नेसणें). 'मुळीं मुंडलें मुंडन। वेंदी वंदाची कौपीन।' –तुगा ४०२०. २ कफनी 'माझ्या खोलींत दुसरी एक कौपीन आहे ती घालून इकडे ये.' –सुर्योदय १५९. [सं.]

**कौबेरी**—स्त्री. उत्तर दिशा. [सं कुबेर]

**कौंभणें**—क्रि कोंब फुटणें; हिरव्या येणें, कोंभणें पहा. 'कैवल्यद्रुमु कौभेला।' –भाए ३. 'ते पुनरपी कौभेली।' –कमुरा ३९.१. [कोंब]

**कौमार-त्व**—न. बालपण; पांच ते दहा वयापावेतों वय; कुमारपण. 'एथ कौमारत्व दिसे।' –ज्ञा २.१०९. [सं.]

**कौमुदी**—स्त्री. १ चांदणें; चंद्रप्रकाश २ व्याकरणावरील एक ग्रंथ. (भट्टोजी दीक्षिताचा सिद्धान्त कौमुदि). 'त्यानें कौमुदी म्हटली आहे.' [सं.]

**कौमोदकी**—स्त्री. विष्णूच्या गदेचें नांव. 'कौमोदकी प्रिय गदा स्मर अंतरंगे।' –ध्यानमा ८. [सं. कुमुद]

**कौल**—न घराच्या छपरावर आच्छादनासाठीं घातलेलें मातीचें पन्हळ (चपटें, नळीवजा, मंगळोरी) (वाप्र.) घरावर कौल राहूं न देणें-एखादें कुटुंब समूळ नष्ट करणें [सं. कीलक-कीलअं-केलुं-कवेलु-कौल?] म्ह० घरावर नाहीं कौल आणि रिकामा डौल=पोकळ श्रीमंती.

**कौल**—पु. १ वचन; आश्वासन; अभय. २ जमिनीची लागवड करण्यास किंवा व्यापार करण्यास सरकार जें अभयपत्र, करार, कबुलायतीचा कागद देतें तो. हा जमाबंदीतील नेहमीचा शब्द आहे. मालक, सरकार किंवा जमीनदार कुळाला ज्या कांहीं सवलतीच्या अटी देतो किंवा त्याच्याशीं जे करार करतो त्यास कौल म्हणतात. कौल केल्यानंतर सारा इ० वाढत नाहीं. पडीत जमिनीबद्दल साऱ्याची सूट घेण्याकरितां कौल देण्यांत येतो; सरकारी करारनामा; कबुलायत; कौलनामा. 'तुम्हांस चि रा. माधवराव नारायण याचा कौल.' –रा १२.१३७. –शिच ४५. 'बंदरोबंदरीं कौल पाठवून आमदरफ्ती करावी.' –मराभा २१. ३ परवाना; अभयपत्र (शत्रूला आपल्या प्रांतांतून जाण्यासाठीं दिलेलें); माफी देणें; सूट देणें. 'दगेखोर गनीम आपण जेर झाले असें जाणून दगाबाजीनें कौल घेतो, म्हणून जवळ येवों देऊं नये.' –मराभा ३६. ४ ईश्वरी वचन; ईश्वराची आज्ञा मिळविणें; प्रश्न, शकुन; प्रसाद; देवाजवळ गाऱ्हाणें सांगून त्यावर अमुक उपाय करावा किंवा नाहीं हें विचारतांना देवाच्या अंगास लावावयाचें तांदूळ, सुपाऱ्या इ०; देवाची संमति. 'इंद्रियांचे पेटें मला कौल देतीं।' –तुगा ४०८. 'या मनोदेवतेस कौल लावावा.' –गीर १२३. [अर. कौल्. सर्व भाषांतून थोड्याफार अपभ्रंशानें आला आहे] (वाप्र.) कौलास येणें-शरण येणें; ठहू करण्यास कबूल होणें. 'झाले मोंगल बेजार मग लागले, आले कौलाला।' –ऐपो २३६. सामाशब्द- ०अहद-पु. वचन; कौल. 'त्यावरून त्यां त्याजला कौलअहद दिधला.' –रा ६.५७०. [कौल्+अहद] ०करार-पु. लेखी करारमदार; कबुली; ठराव; वचन, आश्वासन, अटींना संमति. [कौल+करार] ०करारदाद-पु वचन. 'हजरतसाहेबाचा तरी कौलकरारदाद आपल्यास आहे कीं तुमचे जागीरपैकीं एक चावर कतोदगी करणें नाहीं,' –इम ६७. ०नामा-पु. १ सरकारनें शेतकऱ्याला करून दिलेलें करारपत्र, लेखी करार, कबुलायत. २ (कायदा) भाडेपट्टा. (इं) लीज, ०पत्रक-न. कमी साऱ्यानें ज्या जमिनी केल्या त्याचा हिशेब, (गावचा). ०प्रसाद-पु १ (कों.) गुरवानें देवतेचें अनुमोदन मिळविण्याकरतां तिच्या अंगाला लावलेले कळे, फुलें वगैरे खालीं पडून प्रश्न विचारणारास दिलेलें उत्तर' अथवा प्रसाद. २ कौल मागतांना लावलेलीं फुलें वगैरे. कौल अर्थ ४ पहा. (क्रि० लावणें; लागणें).

**कौलव**—न. (ज्यो.) अकरा करणांतील तिसरें करण. [सं.]

**कौला**—पु. १ एक भाजी, कौल्याची भाजी कोंकणांत प्रसिद्ध आहे. हें झुडुप वीतभर उंच वाढत असून रानांत पावसाळ्यांत उगवतें. याची भाजी श्रावण्या सोमवारीं अवश्य खावी असें म्हणतात. [सं. कलाय]

**कौला-लें**—पुन (हिं) एक मोठया जातीचें नारिंग याची साल आतील फळापासून सुटी निघते सालीस कडवट वास येतो

**कौलागम**—न मन्त्रशास्त्र [स कौल=शाक्तपंथ+आगम]

**कौलाफोक**—वि कोंवळा आणि सरळ (झाड, वनस्पति, रोपटा), तरुण व ताठ (मनुष्य-सौंदर्यलक्षण) [कोंवळा+फोंक]

**कौलार**—न कौलें घातलेलें छप्पर

**कौलार-रू**—वि कौलें घातलेलें (छप्पर, घर) [कौल+आर प्रत्यय]

**कौला लसलसीत**—वि कोंवळा लुसलुसीत, नाजुक, नवीन ताजा, कोंवळा, जोमदार आणि टवटवीत (झुडुप, फळ) [स कोमल+लस्-लसित]

**कौलाघण**—स्त्री १ सरकारी कौल, परवाना मिळविण्यास द्यावयाची फी, किंमत, फी २ (नाविक) गलबताचा नोर, गलबतावुन जाण्यायेण्यास पडणारें मूल्य [कौल]

**कौलिक**—वि वशपरपरागत, वडिलोपार्जित, कुलासबधी वारशानें आलेलें [स कुल]

**कौलिक**—पुवि १ शाक्त पंथातील एक व्यक्ति, अथवा तो पंथ शाक्त 'पूजिता मातीचां मोदळा। कौलिक पावला ईश्वर कळा।' २ (सामा) मान्त्रिक, वाममार्गी, चेटक्या [स]

**कौलिक**—पु व्याध, पारधी 'एके दिनीं कौलिक पार धीतें। —वामन व्याधाख्यान १ [स कोल]

**कौली**—स्त्री सरकारपासून कौल घेऊन प्रथमत लागवडीस आणलेली जमीन —वि सरकारातून ज्याचा कौल घेतला आहे असें (शेत, झाड इ०) [कौल] ०मक्तेदार-पु कौलानें शेत करणारा याच्या उलट थळकरी

**कौल्ह**—स्त्री जुनाट पाणथरी रक्तातरत्वचाग्रथी कठिण होणें

**कौशल-ल्य**—न १ कुशलता, तरवेजपणा, चातुर्य पार गतता २ सुख, कल्याण, सुरक्षितता, निश्चितता [स]

**कौशा**—पु रक्षक, पाठीराखा, सूड उगविणारा, वाली, कड घेणारा, कशा, कोवभा पहा

**कौशि(शी)-कानडा**—पु (सगीत) गायनशास्त्रातील एक राग, कानडा ह्या रागात षड्ज, तीव्र ऋषभ कोमल गांधार, कोमल मध्यम, पचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात जाति सपूर्ण-सपूर्ण, वादी मध्यम सवादी षड्ज, गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर हा कानडयाचा एक प्रकार आहे

**कौशेय**—वि रेशमी (वस्त्र सूत) [स]

**कौंस**—पु कंस, वर्तुळाच्या परिघाचा कोणताहि भाग परिघाश। [अर कौस=धनुष्य]

**कौ(कौं)सल-साल-ल्य**—न गुप्त मसलत, कट, अनिष्ट, कपटी योजना, क्पटाळ, क्वसाळ (क्रि० करणें) 'म्हणे काय कौसाल केलें सतीनें।' —रामसुतात्मज (द्रौपदी वस्त्रहरण १९२) —वि १ कसबी, कुशल (माणुस, योजना, इ०) 'नाना कौसाल रचना। केली धर्माचिया स्थापना।' —कालिकापुराण १६ ६६ २ कपटी, कुभाडखोर 'तुकयाबधु स्वामि कानडया कौसाल्या रे।' —तुगा १४० [स कौशल्य ?]

**कौंसल**—पु मन्त्रिमडळ, कायदेमडळ, कौन्सिल [इ कौन्सिल] ०दार-पु कौन्सिलचा सभासद, नामदार 'पुढें वाढता वाढता तो मद्रास येथें कौंसलदार झाला' —नि ६१२

**कौन्सिल, कौंसिल**—न कायदेमडळ, मन्त्रिमडळ, कारभारीमडळ, परिषद, सभा **कौन्सिलर**-पु कौंसिलसभासद, मन्त्री, नामदार [इ]

**कौसुंभ**—वि १ कुसुब्याच्या रगानें रगलेला २ कुसुब्या सबधीं [स]

**कौस्तुभ**—पु समुद्रमथनातील चौदा रत्नापैकीं एक, श्री विष्णूच्या कठातील मणि, अलकार 'कौस्तुभाहोनि निर्मळें। लेणीं दिधलीं।' —ज्ञा ९ ३८९ 'कठीं कौस्तुभमणि विराजित।' —तुगा १ [स]

**कौस्तुभी-की**—स्त्री घोडयाच्या गळयाखालीं लोंबणारी पोळी, गलर्लोबीका —अश्वप १ ९९ [कौस्तुभ]

**कौळा-ळी**—क्वळा-ळी पहा

**कौळिक**—स्त्री कावीळ हा रोग झाल्यास रक्तीला भ्रात पडते 'जाणिजे कौळिक।' —भाए ७४६ [कौळ]

**कौळिक**—पु कोळी, भिल्ल, व्याध, निषाद 'मातियेचा द्रोण केला। तो कौळिका भावो फळला।' —एभा १ ४३ [स कोल]

**कौळी**—स्त्री एक झुडुप, कावळी [स काकनासा, म कावळी]

**कौक्ष**—वि ओटीपोटासबधीं, पोटासबधीं, कुक्षीसबधीं. [स कुक्षि]

**'क्यच**—न (वे) लाकडाचा नार, गाभा [का केच्चु]

**क्याट**—न (क) एक प्रकारचें रेशीम (लुगडयाच्या व्यापारात रूढ) 'हल्लीं जोहोंकडे लुगडयाला क्याट वापरतात' [क्तान ?]

**क्याट**—पु (कुण बायकी) पत्त्याचा डाव, जोड [इ कार्ड-कॅड-कॅट ?]

**क्याटलाग**—पु ड्तिरीपत्रक (शाळेंतील विद्यार्थ्यांचें) कॅटलॉग पहा

**क्याटी**—न बावन तोळयाचें वजन 'क्याटीचें वजन बावन तोळे असतें' —मुव्या ११९ [?]

**क्यातखुरपें**—न (बे) दांते व पाठीकडे धार असलेला कोयता, खुरपें [का कत्ति=कोयता+खुरपें]

**क्यांप**—कँप पहा

**क्यावला**—उद्गा (काशी) काय (हें) संकट! [हिं क्या+वलाय]

**क्यारट**—कॅरट पहा

**क्यारी, क्यारडी**—(गुज) १ भातजमीन, खाचर २ पुष्पवाटिका, वाफा (बागेंतील फुलांचा) (ह्याच्या भोंवतीं फरसबंदी करतात) [स केदार, हिं क्यिारी, क्यारी]

**क्याल**—न. (कु) केळीचें काल, गाभा काल पहा [स कदल, प्रा कयल]

**क्यास**—पु तर्क अदाज कयास पहा 'काय मनुष्यमात्र करितील हें क्यासात येत नाहीं' —पया २५९ [अर क्यिास्]

**क्रकच**—पुन करवत [स] ॰नासिक-वि करवतीसारख्या नाकाचा (एक मासा) ॰मक्षिका-स्त्री (प्राणि) झाडाच्या पानाला व फांदीला भोकें पाडून पानांवर अंडीं घालणारी माशी (इं) सॉफ्लाय.

**क्रतु**—पु १ यज्ञ 'म्हणूनि समूळ हा उचितु। स्वधर्मरूप क्रतु।' —ज्ञा ३ १२९ २ (प्रामुख्यानें) अश्वमेध यज्ञ ३ सप्तर्षीपैकीं एक ऋषि [स क्रतु, तुल॰ग्री क्रतोस्, झेंद ख्रतु]

**क्रदंतकाळ**—कृतांतकाळ पहा

**क्रंदन**—न रडणें आक्रंदन पहा [स]

**क्रम**—पु १ वर्ग, अनुक्रम २ व्यवस्था, मांडणी, पद्धत, काहीं नियमानुसार चालणें, मोड ३ प्रगति, पुढें जाणें, चालणें, क्रमण ४ विधि, नियम ५ (संगीत) स्वराचा आरोह ६ परंपरा, सरणी; संप्रदाय [स] सामाशब्द- ॰त्रैराशिक-पुन सरळ त्रैराशिक [स क्रम्=जाणें] ॰पाठी-वि. वेदसंहितेंतील दोनदोन पदांचा अनुक्रम धरून एक वाक्य तयार करून पठण करणें व पठण करतांना मागील पद पुढील पदास जोडणें, याप्रमाणें अध्ययन करणारा उ॰ 'अग्निमीळे। ईळे पुरोहितम्। पुरोहितयज्ञस्य।' इ॰ ह्याप्रमाणें जटापाठी, घनपाठी, शाखापाठी असे अध्ययन करणाराचे दुसरे वर्ग आहेत [स] ॰प्राप्त-क्रमागत पहा ॰योगी-क्रमाक्रमानें ब्रह्मप्राप्ति करून घेणारा योगी 'हे मज मिळतिये वेळे। तया क्रमयोगिया फळे।' —ज्ञा १८ ११३४ ॰मार्ग-रुळलेला, नेहमीचा मार्ग, धोपटमार्ग, सनदशीर मार्ग 'क्रांतिमार्ग क्रममार्गापेक्षा नेहमींच वाईट असतो असें नाहीं, पण बहुधा तो वाईट असतो' —सुदे १११ ॰मुक्ति-स्त्री देवयान मार्गानें मिळणारा मोक्ष 'म्हणून या मार्गास क्रममुक्ति नाव आहे' —गीर २९५. ॰श-क्रिवि ठराविक पद्धतीनें, क्रमानें, व्यवस्थितपणें [स] ॰संख्यावाचक विशेषण-न अनुक्रमानें संख्या दर्शविणारें विशेषण जसें- पांचवा, सहावा, इ॰

**क्रमागत-यात**-वि क्रमानें प्राप्त झालेला, असलेला, वंशक्रमानें, वारसानें मिळालेला (बाग, जिंदगी) [स] क्रमानें, क्रमाक्रमानें-क्रिवि १ एकगारखें, नियमितपणें, सुव्यवस्थितपणें, व्यवस्थित प्रगतीनें २ एकामागून एक असा प्रमाणें, ओळीनें, नंबरवार **क्रमिक**—वि १ दर्जावार नेमलेलें, अभ्यासासाठीं लावलेलें (पुस्तक इ॰) 'शिकविल्या गेलेल्या क्रमिक पुस्तकांची यादी मिळत नाहीं' —केले १ १४३ २ क्रमागत पहा

**क्रमण**—न गति, गमन, पुढें जाणें, पुढें पुढें सरणें, चालणें, प्रगति, [स]

**क्रमणें**—उक्रि १ (वेळ, काळ) आनंदात काढणें, घालविणें, करमणें २ आक्रमण करणें, पुढें जाणें, चालणें, ओलांडणें, पलीकडे जाणें, उल्लंघणें 'क्रमी ध्यानाचे चवरें। सांपडे तंव।' —ज्ञा ६ ५८ ३ मरणें 'सवसारें जालों अतिदुखें दु खी। मायबापें सेखीं क्रमिलिया।' —तुगा ६५३ [स क्रम्=जाणें]

**क्रमुक**—पु सुपारीचें झाड —शास्त्रीको [स क्रमुक=पोफळ, सुपारी]

**क्रमोत्क्रम**—पु व्यवस्था आणि अव्यवस्था, योग्य व अयोग्य रचना, जुळणी —क्रिवि. सुलट्या व उलट्या क्रमानें [क्रम+उत्क्रम (व्युत्क्रम)]

**क्रय**—पु. १ खरेदी, पदार्थ विकत घेणें, विकत घेतांना दिल्ला पैका २ विक्री, घेतलेला पैका —न (गो) विकून आलेली किंमत [स क्री=विकत घेणें] ॰लेख्य-न देवघेवीचें पत्र, लेख, खरेदी-विक्रीखत [स] ॰विक्रय-पु १ देवघेव, खरेदीविक्री, सौदा, व्यापार २ व्यापार, उदीम [स]

**क्रय्य**—वि खरेदीविक्रीला योग्य, विकण्यासाठीं बाजारात आलेला, विकावयास काढलेला (पदार्थ) [स]

**क्रव्य**—न १ कच्चें मांस २ मांस [स]

**क्रव्याद्**—वि १ हिरवें मांस खाणारे (वाघ, सिंह इ॰) राक्षस, पशु वगैरे मांसभक्षक २ (ल) दुष्ट, राक्षसवृत्तीचा [स]

**क्रांत**—क्रिवि १ व्याप्त, उल्लंघिलेला, आक्रमिलेला (समाक्रांत) २ चालून गेलेला, हल्ला केलेला चोरक्रांत, दोष्क्रांत, राजक्रांत इ॰ आक्रांत पहा ३ व्याकुळ, विव्हळ, व्याप्त (दु ख इ॰ नीं) 'एकें तिये दु खें। क्रांतें भूतें॥' —ज्ञा १५ ४९० —स्त्री (क्रांतीचें संक्षिप्त रूप) चाल, हल्ला, धाड (मुख्यत्वें चोर, शत्रू, टोळ यांची) [स क्रांति] ॰दर्शी-वि त्रिकालज्ञ दीर्घदर्शी, ज्ञानी 'त्यनौनि जिये मार्गीं केली भिक्षा। क्रांतदर्शी॥' —ऋ ६ 'एष मोहरे गा क्रांतदर्शी।' —ज्ञा ४ ८८ [स]

**क्रांतणें**—उक्रि १ पादाक्रांत करणें, चालून जाणें, आक्रमणें (देश, रस्ता) २ व्याकुळ होणें (भूक, तहान, दु ख, श्रम, कोप, कर्ज, दारिद्र्य यामुळें)

क्रांति—स्त्री १ क्रमण, पुढें जाणें, प्रगति २ चळवळ, चढ, उलथापालथ, फेरफार (समासात) राज्यक्रांति, धर्मक्रांति ३ विषुववृत्तापासून खस्थ पदार्थाचें अंतर (हें याम्योत्तर वृत्तावर मोजलें जातें), अपम ४ सूर्याचा गमनमार्ग (क्रांतिवृत्तावरून) ५ अधिकाऱ्याचा जुलूम, नोकरशाहीचा जुलूम [स] ०कक्ष-पु क्रांतिवृत्त [स] ०कारक-वि चळवळ्या, बंडखोर, प्रचलित राज्ययंत्र उलथून पाडणारा (माणूस, गोष्ट) 'पुण्यातील क्रांति कारक तरुणांनीं त्यांना मुख्य नेमलें' -इप ९३ ०ज्या-स्त्री क्रमज्या, क्रांतीची ज्या ०पात-पु विषुववृत्ताला क्रांतिवृत्त छेदितें तेथील बिंदु, संपातबिंदु [स] ०पातगति-स्त्री. अयन चलन, अयनगति, विषुवायन [स] ०मंडल-वलय-वृत्त-न सूर्याच्या गमनमार्गाचें वृत्त, कक्षा, सूर्याची भूमध्यरेषेच्या उत्तरेकडील २३॥ अंश व दक्षिणेकडील २३॥ अंश जाण्याची मर्यादा, तींतील बिंदु साधले म्हणजे जें वृत्त होतें तें 'ज्या गमनमार्गांतून वार्षिक गतीनें भूगोल सूर्याभोंवतीं फिरतो किंवा सूर्य भूगोलाभोंवतीं समोरच्या राशींतून फिरतोसें दिसतें त्या गमनमार्गास क्रांतिवृत्त म्हणतात' -सूर्य १२ ०मार्ग-पु बंडखोरीचा मार्ग, राज्यक्रांतिकारक चळवळ 'क्रांतिमार्ग क्रम मार्गापेक्षा नेहमीच वाईट असतो असें नाहीं पण बहुधा तो वाईट असतो.' -सुदे १३१ ०साम्य-न क्रांतीमधील साम्य (सूर्य, चंद्र किंवा ग्रह यांच्या) ०सूत्र-न याम्योत्तरवृत्ताची रेषा [स]

क्रॉप—पु केसाची विशिष्ट कापणी, इंग्रजी पद्धतीची हजामत (क्रि० राखणें, ठेवणें) [इं]

क्रॉस—पु १ आडवी व उभी ल्हान रेष, फुली २ क्रूस खिस्त्याचें पवित्र चिन्ह, खिस्ती धर्माची खूण, क्रुस ३ क्रूसाच्या आकाराचा दागिना [इं]

क्रिकेट—पु चेंडूफळीचा विलायती खेळ 'जो साऱ्या दिवसभर मागून गेला आहे त्याला क्रिकेटच्या बॅटचे टोले मारण्यात किंवा चेंडूच्या पाठीमागें पळत सुटण्यात मौज कोठून वाटणार?' -आगर ३ १६१ [इं] ०मॅच-स्त्री चेंडूफळीच्या खेळाचा सामना [इं]

क्रिप्त, क्रिप्तन—पु (शाप) हवेंत अति सूक्ष्म प्रमाणांत असणारा एक वायु (इं) क्रिप्टॉन

क्रिमि-मी—पु जंतु किडा कीटक [स कृमि]

क्रियमाण—त्रिवि १ चालू क्रिया (जी केली जात आहे अशी), हातांतील काम, गोष्ट २ पुढील, भावी कार्य (जें व्हावयाचें तें), ज्याचा आरंभ करावयाचा तें कार्य ३ पूर्व जन्मींचें नें संचित असतें त्याचें बरेंवाईट फळ या जन्मीं भोगावयास लागतें तें, किंवा पुढील प्रारब्धाचें कारणरूप चालू जन्मांतील बरीवाईट कृति, क्रियमाण प्रारब्ध [स कृ]

क्रिया—स्त्री १ कर्म, काम, कृत्य, करणी, कृति 'असेल माझी क्रिया बरी।' -वेसीस्व ३ ६४. २ और्ध्वदेहिक कर्म, प्रेतसंस्कारविधि, उत्तरकार्य, क्रियाकर्मांतर (क्रि० करणें) 'करूनि क्रिया पित्याची गेला तो श्रितभवाब्धिसेतुकडे।' -मोवन १० ८३ ३ धार्मिक विधि ४ कोणत्याहि धर्माचे, कामाचे विशेष मुद्दे, गोष्टी, इतिकर्तव्यता ५ (शपथ, दिव्य, साक्षी, कागदपत्र इत्यादिकावरून) खरें ठरविणें, सिद्ध करणें, शपथ, दिव्य, साक्ष, प्रमाण, पुरावा 'क्रिया बरी तुम्हां न बजे पाबुनि।' -तुगा १८ 'क्रिया शहाजीची आम्हांला।' -ऐपो १४ ६ (वैद्यकी) औषधोपचार ७ (व्या) क्रियापद, धातूचें अर्थ स्पष्ट करणारा व्यापार, ८ (संगीत) ताल धरण्याचा प्रकार, ह्यात दोन प्रकार आहत-सशब्द व निःशब्द ९ (सामा) परिणाम 'रासायनिक क्रिया' [स कृ=करणें] (वाप्र) ०जागणें-धरणें-एखाद्याचे उपकार जाणणें, आठवणें ०टाकणें-सोडणें-सांडणें-विसरणें-एखाद्याचा उपकार विसरणें, कृतघ्न होणें सामाशब्द-०कर्मांतर-न क्रिया अर्थ २ पहा [स] ०कलाप-क्रिया अर्थ ४ पहा ०कौशल्य-न क्रिया करण्याची हातोटी, कामांतील कुशलता, वाकबगारी ०द्वेषी-वि (कायदा) खटल्यात ज्याची साक्ष अपायकारक होते असा (साक्षीदाराच्या पांच प्रकारापैकीं एक) ०नष्ट वि १ कृतघ्न २ स्वतःचें वचन न पाळणारा, खोटा 'नव्हे क्रियानष्ट तुम्हां ऐसा।' -तुगा १९११ ०परता-स्त्री (संगीत) अभ्यासतत्परता [स] ०पाल-वि १ (कायदा) अज्ञान, अप्रौढ (माणूस), देणें, घेणें इ० व्यवहार करण्यास ज्यास कायद्यानें प्रौढत्व प्राप्त झालें नाहीं असा, (इं) मायनर २ असमर्थ, नालायक (माणूस-दवपेवींत) ०भ्रष्ट-वि १ वचनभ्रष्ट, वचन, शपथ न पाळणारा २ कृतघ्न, उपकार न जाणणारा ३ नित्यनैमित्तिक कर्में न करणारा, धर्मभ्रष्ट ०रूप-न क्रियापदाचें वचन, पुरुष, काल इ० भेदानें बदलणारें रूप ०वाचक-पु (व्या) क्रियाबोधक, क्रियासंबंधीं [स] ०वाद-क्रिया, विकार इ० गोष्टी आत्म्यावर आपली छाप बसवितात असें प्रतिपादणारें एक मत, वैशेषिक व जैन तत्त्वज्ञान यांतून हा वाद सांपडतो याच्या उलट अक्रियावाद, हा वेदांत सांख्य योग, बौद्धमत यांतून दिसतो ०वान-वंत-वि शास्त्राप्रमाणें विहित आचरण करणारा, नित्य नैमित्तिक नियम पाळणारा वेदज्ञाहून शतगुणें बहुत। जो वेदार्थ करणार पंडित। त्याहून अनुष्ठानी क्रियावंत। शतगुणें आगळा।' इ ३४१०० ०श्रय-पु (व्या) कर्ता (क्रियापदाचा), क्रियेचें प्रधान कारक ०सादृश्य-न (शाप) क्रियांतील सारखेपणा, समता (इं) ॲनॅलॉजी

क्रियांगराग—पु (संगीत) शास्त्रांतील नियम कायम ठेवून विविधनेमानें विवादी स्वराचा उपयोग ज्या रागांत केला जातो असा राग [स]

**क्रियापद**—न (व्या ) ज्या शब्देंकरून कोणत्याहि क्रियेचा, व्यापाराचा अथवा स्थितीचा बोध होतो तें, वाक्यातील क्रिया वाचक पद [स क्रिया+पद]

**क्रियाविशेषण ( अव्यय )**—न (व्या ) ज्या शब्दाच्या योगानें क्रियेच्या गुणाचा अथवा प्रकाराचा, किंवा अमुक एका विशिष्ट अवस्थेचा बोध होतो तो शब्द जसें- 'तो हळू चालतो ' कांहीं क्रियाविशेषणें मूळ नामाचीं विभक्त्यन्तरूपें अस तात उदा० बुद्धया [स क्रिया+विशेषण]

**क्रियोपन्यास**—पु प्रमाणाचें प्रतिपादन, पुरावा दाखविणें [स क्रिया+उपन्यास]

**क्रीड**—न ध्येय, अंतिम हेतु, आद्यतत्त्व 'जुन्या पक्षानें राष्ट्रीय सभेचे अंतिम हेतु किंवा क्रीड कायम ठरवून '–टि ३ २६३ 'आमचें क्रीड ज्यांना मान्य असेल त्यांनीं आमच्या कॉंग्रेसमध्यें यावें '–सुदे ६३ [इ क्रीड]

**क्रीडणें**—अक्रि (काव्य) खेळणें, मौज करणें, विलास करणें 'धन्य धन्य तें नंदाचें आंगण। जेथें क्रीडे मनमोहन।' –ह ५ १७७ 'गोपबालक गडी बलिराम। क्रीडती हरिसवें अभि राम।' [क्रीडा]

**क्रीडन, क्रीडा**—नस्त्री १ खेळ, मौज, विलास, लीला, मनोरंजन, करमणूक २ परमार्थाखेरीज जो व्यवहार तो ३ मैथुन, सुरत 'क्रीडा करी तुजसवें ललना पलंगीं।'–र ३ सामाशब्द- ०कलह–पु खोटें भांडण रुसवा लुटुपुटूचें अथवा विनोदाचें भांडण, चित्तविनोदार्थ कलह ०कोप–पु प्रणयकोप, खोटा राग [स] ०कौतुक–न चित्तविनोद, करमणूक, गमत [स] ०पाश–पु फासा, अक्ष (खेळण्याचा) ०मृग–पु १ करमणुकीसाठीं बाळ गिलेलें जनावर ( हरिण, वानर ) 'पढविलें पाखिरूं ऐसें न बोले। यापरी क्रीडामृगही तैसा चले।'–ज्ञा ११ १७० २ (ल ) काठीचा घोडा, खेळवणा ३ (ल ) दुसऱ्याच्या कह्यांत वाग णारा माणूस हाटाखालचें मांजर, लाळघोट्या माणूस ०स्थान– न खेळण्याची, करमणुकीची विलासाची जागा, उद्यान, अंत पुर, राणीवसा स्त्री 'तुझें आवडतें क्रीडास्थान। तें मधुवन मोडिलें।'

**क्रीत**—पु १ क्रीत पुत्र विकत घेतलेला मुलगा, बारा वारसां पैकीं एक २ दासांतील एक भेद –वि १ विकत घेतलेलें, खरीद केलेलें २ विकलेलें [स]

**क्रीतानुशय**—पु ( कायदा ) विकत घेतलेली वस्तु विक णाऱ्याला परत करणें पसंत न पडलेल्या खरेदीचा व्यवहार मिताक्षरा –व्यवहाराध्याय पृ २८३ [स]

**क्रीम**—पु कृमि, किडा 'चौखाणीमाजीं चौऱ्यासी लक्ष योनी। ते क्रीम जाणावे सर्व मिळोनि।'–स्वानु ७ ४ ३४ [सं कृमि]

**क्रुद्ध**—वि रागावलेला, कुपित [स] ०दृष्टि–स्त्री (नृत्य) दृष्टीमध्यें कठोरता व निश्चलता ( पापण्या आणि बुबुळें निश्चल ठेवून ) दाखविणें, क्रोधाचा भाव दाखविण्यासाठीं हिचा उपयोग करतात [स]

**क्रुम**—न १ ( रसा शाप ) एक मूल धातु-द्रव्य २ (चांभारी) गाय, म्हैस यांचें पाढऱ्या रंगावर कमाविलेलें कातडें ३ एक विशिष्ट प्रकारानें कमावलेलें कातडें [इ क्रोम]

**क्रुमाम्ल**—न ( शाप ) एक अम्ल हा हिरव्या रंगाचा घन पदार्थ आहे (इ ) क्रोमिक ॲसिड

**क्रूझर**—न एक लढाऊ गलबत, आपल्या युद्धाचीं जहाजें सरक्षिण्यासाठीं व शत्रूचा नाश करण्यासाठीं युद्धकालीं क्रूझरें ठेव तात [इ]

**क्रूडाईल**—न खाणींतील अशुद्ध तेल, कच्चें, गाळ तेल 'ऑईल इंजिनांतील क्रूड ऑईल वापरण्याचा प्रघात बरेच जणास विदित असेल '–सास २ ११२ [इ क्रूड+ऑइल]

**क्रूर**—वि १ निर्दय कठोर, कृपाहीन, निष्ठुर २ भयंकर, उग्र, भीतिदायक ३ प्रचंड धडाक्यानें जाणारी, वाढणारी ( आग इ० ) ४ अमानुष, फाजील, रानटी ( वर्तन, कृत्य ) ५ हिंसक, हिंस्र ( प्राणी ) [स]

**क्रूस**—पु १ वधस्तंभ, म्हणजे ज्या खांबावर प्रभु येशूख्रि स्ताला खिळून मारलें तो कॉस पहा 'येशूला जेथें क्रूसावर खिळलें होतें तें ठिकाण शहराच्या जवळच होतें '–योहा १९ २० २ येशूख्रिस्ताचें मृत्युसूचक चिन्ह +, ख्रिस्ती धर्मचिन्ह ३ आत्मयज्ञाची तयारी ४ ख्रिस्ताबरोबर व ख्रिस्ताकरता दु ख सहन करणें [इ क्रॉस]

**क्रेतव्य, क्रेय**—वि १ विकत घेण्यास योग्य २ विक ण्यास योग्य [स]

**क्रेता**—वि १ विकत घेणारा २ विकणारा [स]

**क्रेन**—स्त्री ( जड वजन उचलण्याची ) यारी [इ]

**क्रेप**—न एक प्रकारचें रेशमी कापड (बहुधा काळें) –वि कुरळें, चुण्या, आढ्या असलेलें ०हेअर–पुअव ( नाट्य ) एक प्रकारचे केंस कृत्रिम, काळया, पाढऱ्या, करड्या रंगाच्या दाढी, मिशा, भिवया करण्याकरितां या केसाचा उपयोग नाटकांतून केला जातो भूमिकेच्या सजावटींत ही आधुनिक सुधारणा आहे –पाश्चात्य नाटकें [इ]

**क्रोटन**—नस्त्री निरनिराळ्या रंगाच्या पानांचें एक सुंदर झाड लावणी [इ]

**क्रोड**—पुस्त्री एक कोटी ( संख्या ) [स कोटि, हिं इ क्रोर]

**क्रोड**—नपु १ छाती, ऊर २ डुक्कर 'तया क्रोडरूपें हिरण्याक्ष मेला।' –वामन नृसिंहदर्पण १५ ३ क्रोडपत्र, ग्रंथामध्यें असलेली न्यूनता, दोष, (अर्थ इ० ची) भरपाईसाठी ग्रंथाखेरीज ज्या दर कागदावर लिहून ठेवतात ते कागद, शुद्धिपत्र, पुरवणी दुरुस्ती [स] ०पत्र–क्रोड अर्थ ३ पहा

**क्रोडीकरण**—न. १ आलिंगन २ समावेश, विषयीकरण [स]

**क्रोडीं**—क्रिवि कोट्यवधि (रुपये)

**क्रोध**—पु राग, कोप, संताप, दुसऱ्याचा अपराध न सोसून त्याला शिक्षा करावी अशी मनाची वृत्ति होते तो 'जरी कोणी तुजला क्रोध दावी। जपुनि तेथें त्वां शांति आदरावी।' ०दृष्टि–वि रागीट नजरेचा 'दृष्टीं धरूनि वेताटी। केली परम क्रोधदृष्टि।'–९ ६३ ०मुखीभार्या–स्त्री रागीट मुद्रेची बायको, केदारीण, चार अनिष्ट गोष्टींपैकीं एक (बाकीच्या तीन–कुग्रामवस्ती, कुलहीनसेवा, कुभोजन) [स]

**क्रोधणें, क्रोधावणें**—अक्रि रागावणें, कोपणें, संतापणें 'रावण क्रोधावला अत्यंत।' [क्रोध]

**क्रोधा**—वि (संगीत) नवव्या श्रुतीचें नाव [स]

**क्रोधाग्नि**—पु भयंकर संताप, कोपानल [स] ०शिखा टाकणें–संतापानें बोलणें, बेफामपणें बोलणें

**क्रोधायमान**—वि रागावलेला, क्रुद्ध 'व्यवसायी सांगता जाऊन। अवली होईल क्रोधायमान।' [सं क्रुद्धमान]

**क्रोधिष्ठ-ष्ट क्रोधी**—वि रागीट, शीघ्रकोपी, कोपिष्ट

**क्रोमाइट**—स्त्री (शाप) क्रोमियम व लोखंड यापासून होणारी धातु, कृत्रिम लोह, रंग व रंगीत चित्रें करण्याला लागणारे क्रुमयुक्त पदार्थ करण्याकडे याचा उपयोग करतात [इ]

**क्रोश**—पु एक कोस (अंतर) पहा 'अनादि पंचक्रोशक्षेत्र।'–ज्ञा १८ १८०३

**क्रोष्ट**—पु कोल्हा, जंबुक 'घे पंचानन पांच क्रोष्टा दे मानवेल दितिकंठ।'–मोसभा ४ १९ [स]

**क्रौंच**—पु. करकोचा पक्षी [स]

**क्रौन**—पु १ मुकुट २ (ल) राजा –वि १ (मुद्रण) वीस गुणिलें पंधरा इंची आकाराचा (छापण्याचा कागद) २ लोखंडाचा एक प्रकार 'कमानीसाठीं ताणाच्या सळ्या क्रौन, बोलिंग लोखंडाच्या असाव्या'–मॅरट २१ [इ]

**क्रौर्य**—न क्रूरता, निर्दयपणा, निष्ठुरपणा, पाषाणहृदयता [स]

**क्लब**—पु १ मंडळ, संघ, मेळा, क्रीडास्थान, बैठकीची जागा (अप) कल्प–ब २ (पत्ते) किलावर, फुलावर रंग [इ]

**क्लांत**—वि दमलेला, थकलेला, भागलेला [स]

**क्लांति**—स्त्री थकवा, ग्लानि [स]

**क्लार्क**—पु कारकून, लेखक, गुमास्ता [इं]

**क्लावर**—पु (तजा) हिरा, माणिक [?]

**क्लास**—पु वर्ग, इयत्ता, प्रत [इ]

**क्लिन्न**—वि १ ओलें झालेलें, भिजलेलें २ विरलेलें, मुरलेलें (पाण्यात) [स]

**क्लिष्ट**—१ अवघड, दुर्बोध, कठिण, बेजार करणारें (काम, पुस्तक, विषय, मार्ग) 'हा मार्ग डोंगर, ओढे, इ० कानीं मोठा क्लिष्ट आहे' २ ओढून ताणून आणलेला, कष्टानें जुळविलेला (अर्थ, विचार योजना, स्पष्टीकरण) 'या ग्रंथाचा अर्थ लवकर ध्यानात येत नाहीं, मोठा क्लिष्ट आहे' ०अर्थ–पु (क्लिष्टार्थ) १ ओढून ताणून केलेला अर्थ २ दुर्बोध अर्थ ०कल्पना–स्त्री सरळ नाहीं अशी, ओढून ताणून काढलेली, कशीबशी जुळविलेली, सहज न समजणारी कल्पना, विचार, तर्क ०विषय–पु दुर्बोध, कठिण विषय

**क्लीनर**—वि साफसूफ करणारा (अप) किलनर (विशेषत) मोटार धुवून पुसून साफ करणारा क्लिनर पहा [इ]

**क्लीब**—१ नपुंसक, षंढ 'न भजंति सुयशस्काम क्लीबा आरोग्यकाम चिबुडाला।'–मोभीष्म १ ६४ २ (ल) अपराक्रमी, पौरुषहीन, बायकी, स्याड ३ खोजा, जनानखान्यावरील नोकर [स]

**क्लेद**—पु १ घाम, घर्म २ आर्द्रता, ओलावा [सं.]

**क्लेदन**—वि १ ओलें होणें, दमटणें, भिजणें २ वितळणें, विरणें ३ द्रवामुळें होणारी संयोगशिथिल अशी अवस्था, मऊ, सरबरीत होणें सप्तोपचार पहा [स]

**क्लेश**—पु त्रास, दुःख, श्रम, काच, यातना, व्यथा (सामान्यत अनेकवचनी प्रयोग) [स] ०काल–पु त्रासदायक, संकटमय काळ, प्रसंग 'जरि क्लेशकाल पातला बहुत। तरी धैर्य न सोडावें यथार्थ।' ०दान–न आजारी माणसाचें पुष्कळ दिवसाचें दुखणें (पाप) जावें म्हणून उडीद, तेल इ० चे दिलेलें दान

**क्लेशणें**—अक्रि त्रासणें, दुःख पावणें, छळणें, पीडणें 'अन्य क्लेशें क्लेशत आहे। तो येक धन्य संसारीं।'–मुआदि ३ ६५ [स क्लिश्]

**क्लेशी, क्लेशित**—वि दुःखी, पीडीत, कष्टी, व्यग्र 'बहु क्लेशी झाल्या श्रवणिं पडता हें द्विजसत्या।'–वामन, यज्ञपत्न्याख्यान ५० [स]

**क्लैब्य**—न १ नपुंसकत्व, हिजडेपणा 'हा क्लैब्यपणा तुला शोभत नाहीं' २ (ल) भीरुता, अपौरुष [क्लीब]

**क्लोरोडाईन**—न (वैद्यक) पोटदुखी व जुलाब यांवरील एक इंग्रजी औषध यात क्लोरोफार्म, अफूचें सत्त्व इ० द्रव्यें असतात हें बाजारांत आयतें तयार मिळतें [इ]

**फ्लोरोफॉर्म**—पु. (वैद्यक) हें इथिल अल्कोहल किंवा ॲसिटोनवर विरंजनचूर्णाची क्रिया झाली म्हणजे मिळतें. हें मधुर वासाचें, इचकर चवीचें, रंगहीन व गुंगी आणणारें द्रवरूप औषध आहे. रोग्यावर शस्त्रक्रिया करतांना गुंगी आणण्यासाठीं हें देतात, बेशुद्धीचें औषध. [ इं. ]

**क्वचित्**—क्रिवि. १ कोठें तरी, कांहीं थोड्या ठिकाणीं, सर्वत्र नाहीं असें. 'सडकावर एकटा धावून जाणारा क्वचित आढळतो.' २ केव्हांकेव्हां, कांहींवेळा. 'एवच पक्षीं क्वचित् असें लिहितो क्वचित् असें लिहितो तस्मात् उभयपक्षीं करावें' [ सं. ] म्ह० क्वचित् काणा भवेत्साधु =एक डोळा किंवा चकणा माणूस बहुधा लबाड असतो.

**क्वणत्-न्**—वि मधुर आवाज करणारी (किंकिणी, नुपुर इ०) 'केयूरें भुज-पारिजात फुलें, माजीं क्वणत् किंकणी।'—र (गजेंद्र मोक्ष) ६३. [ सं ]

**क्वणित**—न. मधुर आवाज (नुपुर, पैंजण यांचा) [ सं ]

**क्वथन**—न. कढणें; काढा [ सं ]

**क्वाकर, कुवाकर**—स्त्री. एक पक्षी. [ ध्व. ]

**क्वाचित्क**—वि. विरळ, दुर्मिळ; तुरळक, क्वचित असणारा (पदार्थ, गोष्ट इ०). [ सं ]

**क्वाडका-र्क**—पुन. कोरडिंक पहा.

**क्वाड्रेट**—पु (मुद्रण) मजकूर जुळतांना, परिमाण संपविण्याचे जागीं ओळ अर्धी होऊन मजकूर संपला तर ती ओळ भरून काढण्यासाठीं टाईपाच्या उंचीपेक्षा कमी उंची असलेले व ज्या जातीचा टाईप असेल तितक्याच जाडीचे व रुंदीचे शिशाचे तुकडे प्र हे एक एम्, दोन एम् असे वेगवेगळे ५–६ एम् पर्यंत मोठे, व अर्धा, पाव एम् पर्यंत ल्हानहि असतात —मुद्रणदर्पण १०५ [ इं ]

**क्वाथ**—पु. औषधाचा काढा, कढविलेला पदार्थ [ सं. ]

**क्वापि**—अ कोठेंहि [ सं. ]

**क्वार-री**—स्त्री कुंवारी; कुमारी पहा. 'तेव्हा ते मातेनें सकरुणकरें क्वारि धरली।'—साछद ७ १७१ [ सं कुमारी ]

**क्वारंटी**—न. सासर्गिक सांथीच्या रोगानें दूषित असलेल्या ठिकाणचा मनुष्य गावाबाहेर कांहीं दिवस ठेवण्याची व्यवस्था, क्वारंटाइन 'बसले क्वारंटी। परगांवीं जाण्यास पाहिजे, सुभेसाहेबाची पासचिठ्ठी।'—भापो ११३. [ इ क्वारंटाइन ]

**क्वार्तेल**—न. (गो) लष्कराची बराक [ पोर्तु क्वार्तेल ]

**क्विनाईन, क्विनिन**—नस्त्री. कोयनेल पहा.

# ख

**ख**—न. व्यंजनमालेंतील दुसरें व्यंजन, आणि मागच्या क व्यंजनाचा महाप्राणोच्चार करणारें व्यंजन. अक्षरविकास-खि. पू. तिसऱ्या शतकांतील पहिल्या व इ. स. पहिल्या शतकांतील दुसऱ्या अवस्थेंत खचे दोन अवयव (र+व) दिसत नाहींत, एकच पहिला दिसतो. दोन अवयव सातव्या शतकापासून दिसतात. —न. १ आकाश, (समासांत) खगोल; खग्रास २ शून्य, पोकळी. 'तेंवा मी गीता वाखाणी। हे खपुष्पाची गुंफणी।'—ज्ञा १६.३९.

**खा**—(संक्षेप) खरेदी खत, खान

**खइग, खइरात, खइसा, खई, खईन, खईर, खईस**—हे शब्द खै मध्यें पहा.

**खई**—क्रिवि. (कु.) कोठें

**खउचट, खउट, खउडा, खउर्ण, खऊट, खऊंरा, खऊंट, खऊंद**—हे शब्द खवचट, खवडा इ० शब्दांबद्दल लिहितात करितां हे शब्द 'खव' मध्यें पहा.

**खउर**—क्षौर (अप.) पहा. [ सं. क्षौर, प्रा. खउर, ]

**खंक-ख**—वि १ दरिद्री, द्रव्यहीन, निर्धन, निष्कांचन. 'नाना तेवढ्यानें खंक झाला नाहीं.'—अस्तभा ७१. २ क्रौर्यादि गुणांनीं जो द्वाड तो, क्रूर; निर्दय; रानटी; द्वाड. ३ कृपण, चिक्कू ४ तापट, तडकदार (घोडा) ५ अशक्त, दुर्बल [ हिं खुख=गरीव, खाक=रक्षा; ]

**खकडे**—क्रिवि (कु.) कोठें. [ तुल खा. कुठडे, खई=कोठें+वडे ]

**खंकर**—पु १ विस्तवावर भाजलेले कणकीचे गोळे, गाकर. २ कृपण, कद्रू ३ क्रूर, निष्ठुर अंत करणाचा, कठोर हृदयाचा, निर्दय माणूस [ खंक+करणें ]

**खंकर**—पु खडा, गोटी, खडा, कंकर पहा [ कंकर ]

**खकरनिखर**—वि. चांगलें वाईट [ निखर द्वि ]

**खकाण-न**—वि १ घाणेरडी; अस्वच्छ (जागा, पदार्थ, इमारत, मुलुख, जमीन इ०) २ वाईट, खराब, दरिद्री, गचाळ 'तो अत्यंत खकान माणूस आहे' [ अर खाक=धूळ, रक्षा ]

**खकाण, खकाणा-ना**—नपुस्त्री. १ केर, (पुस्तकावर-लाकडी सामानावर साचलेली) धूळ (क्रि० बसणें; येणें, उडणें, उधळणें) २ (तबाखूची, तपकिरीची, मिरच्याची) पूड (नाकात, तोंडात गेल्यानें त्रास देणारी); (क्रि० उधळणें) ३ (खा. माण) गाळसाळ, केरकचरा; धुरळा (माप करतांना मापातील धुरळा वजा करतात त्याबद्दल हा शब्द वापरतात). [ अर. खाक=धूळ ]

**खंकारणें**—उक्रि १ खोकणें खाकरणें, घशातील कफ काढणें, वेडका काढून टाकणें २ खिंकाळणें पहा ३ खाकरून लक्ष्य वेधणें [ ध्व ]

**खकाळ, खंकाळा–ळ्या**—वि १ दुष्ट, उग्र 'वेताळ खकाळ लागला। ब्रह्मगिन्हो सचरला।' –दा ३ २ २८ २ तिरसट, कुरठा, रागीट, द्वाड ३ पाणीदार, चलाख, तापट (घोडा, तट्टू) खक पहा ०तट्टू–वि अडेलतट्टू माजूरी ०भवानी–स्त्री अवदसा 'आलीच ही खकाळभवानी' –मु ७१

**खका(खा)ळणें**—अक्रि घोड्याचें ओरडणें, खिंकाळणें पहा

**खंक्या, खणख्या**—वि बेपर्वा, उद्दट, धटरकार, ताडफाड करणारा, दांडगा [ खक ]

**खखणपाळ खणखणपाळ**—वि (गो) दरिद्री, ठणपाळ पहा [ ध्व ]

**खग**—पु १ पक्षी 'आता मोहूनि ठेलीं दुर्गें। का यष्टित घरिलें खगें।' –ज्ञा १३ ५८३ 'या बळि खग प्रभु–पुढें सर्व बळी अन्य टोळ खग दीन।'–मोसभा १ १०७ २ आकाशातील ज्योती (सूर्य नक्षत्र ग्रह इ०) [ स ख=आकाश+ग=गमन करणारा ] ०नायक–पति–पु पक्ष्यांचा राजा, गरुड, विष्णूचें वाहन 'ध्वजस्तंभीं ज्याचे खगपति सदा राहत असे।' –प्रारुह ८ १२० [ खग+पति ]

**खंग**—पु १ न्यूनता, कमीपणा २ खड, व्यत्यय, अडथळा, प्रतिबंध 'म्हणऊनि अभेदें जो भक्तियोगु। तेथ शका नाहीं नये खगु।' –ज्ञा १० ११० –वि अशक्त, रोगानें खगलेला [ स क्षयिक, प्रा खइग, म खगणें, ]

**खगणें**—अक्रि १ क्षीण अशक्त होणें, वाळणें, झिजून जाणें, कृश होणें (श्रम, रोग इ० मुळें) २ (ल) दरिद्री होणें 'कृपीबलें खगलीं भणगें।' –मुसभा ३ १०८ [ स क्षयण, प्रा खइण, खग पहा ]

**खग(गा)र**—पु पक्की भाजलेली वीट [ अर खाक्, म खक ]

**खगार–ळ**—वि १ अशक्त, दुर्बल, जाया झालेला, वयोमानानें क्षीण झालेला (माणूस, प्राणी, झाड) २ वाईट, नापीक फलहीन (दश, शेत, पीक वगैरे) [ खग ]

**खगा(ग)ळणें**—उक्रि १ घुगीं पाण्यात खळबळणें, जारानें हालविणें, स्वच्छ करणें २ भांडीं विसळणें, स्वच्छ करणें [ हिं खगालना ]

**खगेंद्र खगेश्वर**—पु गरुड, खगनायक पहा [ खग+इंद्र, ईश्वर ]

**खगोल**—पु १ आकाशकटाह नक्षत्रखचित अतरिक्ष, भूगोलाच्या भोंवतालचे तारे ज्या गोलाच्या अंतर्वक्र पृष्ठास डकलेले आहेत असे दिसतात तो आकाशातील गोल (ग्रह, तारे, इ०) याच्या उलट भूगोल २ (ज्यो) ज्योतिष (शास्त्र) ३ कंकणाकार गगन ४ (ल) ग्रहादि जाणण्यासाठीं केलेलें गोलाकार यंत्र ०विद्या–स्त्री ज्योतिषशास्त्र [ स ]

**खग्राशा–स्या**—वि १ उसनवारी घतलेले पैसे, विश्वासानें स्वाधीन केलेला माल खाऊन फस्त करणारा, लुच्चा, ठक, लुबाडणारा, हरामखोर २ खादाड, अधाशी, अतिशय उधळ्या ३ तोटा यणारें (काम), बुडीत (धदा) [ खग्रास ]

**खग्रास**—पु १ ग्रहणामुळें झालेला पूर्ण ग्रास (चद्र, सूर्य, ग्रह, इ० चो) २ (ल) नायनाट, स्वाहाकार, चापणें गिळकृत, फस्त (क्रि० करणें, होणें) –वि पूर्णपणें ग्रासलेलें, तावडींत सापडलेलें [ स ] ०करणें होणें–(व्यथा, जाळपोळ इ० मुळें) नि शेष होईल असें करणें

**खच**—पु डीग, दाट थर, रास (फळें, फुलें, केरकचरा इ० चा) –स्त्री गर्दी, दाटी [ स खच् ? ]

**खचका**—पु सणसणीत रपाटा, सपाटा कचका पहा [ ध्व ]

**खंचणी**—स्त्री खाच, खावण, पन्हळी [ स खच्=जडवणें ]

**खचणें**—उक्रि १ (काव्य) (रत्नें वगैरे दागिन्यात) बसविणें, जडणें, जडविणें कोंदणात बसविणें 'जो धीर वीर हीर प्रवर प्रकरें करोनिया खचिला।' २ (दागिने, सुवर्ण वगैरे रत्नानीं) जडविणें, मढविणें, रत्नें बसविणें, दागिने जडावाचे करणें 'जैसा ब्रह्मकटाह खचिलें माणिकीं। –ज्ञा ११ १३३ ३ एके ठिकाणीं कोंबून घट्ट भरणें, ठासणें, ठेचणें, वरून ठोकून–आपटून घट्ट बसविणें, कोंबणें, विणून बसविणें –अक्रि १ खालीं जाणें, बसणें, धसणें (नरम, भुसभुशीत जमिनींत–इमारत, पाया इ०) 'दीर्घ काल खचली होती पारतन्त्र्यभारीं।' –विक ६ २ कोसळून पडणें, खालीं यणें, ढासळणें अधोगतीस जाणें, विनाश होणें 'गगनीहूनि खचलें बिंब।' –मुआदि २० ५ 'पुण्य सरता स्वर्गाहून खचला।' ३ (ल) समूळ नाहींसें होणें, गळणें, सुटणें (धैर्य, आशा, उमेद इ०) ४ (ल) फसणें, फिसकटणें, कांहींच्याकांहींच होणें, विफल होणें (मसलत विचार) ५ मरणें 'शाहूमहाराज शिव झाला। अवतार खचला।' –ऐपा ९५ ६ अवसान गळणें, भीतीनें माघार घेणें ७ मूर्च्छित होणें 'दारुण–शरप्रहारें एका काळींच वीर त खचले।' –मोकर्ण १० १८ [ स खच ]

**खचता पाया**—पु १ खालीं जाणारा पाया २ (ल) पिछेहाट, माघार, उतरती कळा, क्षय, ऱ्हास, अपकर्ष (कीर्ति, वैभव, संपत्ति इ० काचा)

**खचर**—न खेचर पहा [ फा खच्चर ]

**खचरट**—वि त्रासदायक, कटाळवाणें, पीडाकारक, खडतर (खडकाळ, चिखलाचा रस्ता, नापीक दश, घाटाळ्याचें

काम, दुर्बोध लेख, गूढ अर्थाचा ग्रंथ इ० संबंधीं सदृश्यणें योजतात) [ खरचट ? ]

खचरटाण—स्त्री. वाईट घाण ( विष्ठा इ०कांची). [कचरट]

खचरण—स्त्री. १ ( तेलंगणांत ) ताडपत्रावर लिहिण्याची लोखंडी अणकुचिदार लेखणी; चरे पाडण्याचें, कोरण्याचें हत्यार २ खांचखळग्याचा, वेडावांकडा रस्ता. [ खचणें ]

खचरा—पु १ लांकडास खांच पाडण्याचें सुताराचें हत्यार; अरुंद पात्याचा रंधा; खतावणी; फावडी. २ खांच, खोबण [सं खच्]

खचवणें—सक्रि. दमी करणें; खालीं दाबणें (खचणें प्रयोजक ). 'खचविलें काळें । उगवा स्वल्पाहि जाळें ।' –तुगा ३५५ [ सं. खच् ]

खचळणें—अक्रि. खचणें पहा.

खंचाॅ, खैंचाॅ—वि. ( गो. ) कुटचा; कोठील [सं. क]

खचाटणें—उक्रि. १ ( गवत कापतांना होणाऱ्या 'खचखच' आवाजावरून, किंवा मनुष्याला फार श्रम झाल्यावर तो आवाज करतो त्यावरून ) तोडणें; खाकटणें; सपदिशी कापणें; सपासपा तोडणें. २ वेगानें, आवेशानें धसफस करून खेंचणें, ओढणें, पकडणें, बांधणें; ओरडणें, ( सामा. ) मोठ्या आवेशानें किंवा धसफशीनें कांहीं करणें (याचा उपयोग अनिर्बंध करतात), कांहीं क्रियापदांच्या मागें खचाटून हा शब्द लावला म्हणजे त्याचा अर्थ जास्त जोरानें असा होतो. जसें :–खचाटून ओढणें, बांधणें, आवळणें, ताणणें, खेंचणें, झाडणें, जेवणें, भरणें वगैरे. उत्सुकता, तडकाफडकी, आवेश, नेट, वेग इ०चा बोध या शब्दावरून होतो; या शब्दाचा उपयोग कचकाविणें, रगडविणें, रपाटणें, दपटणें इ० शब्दांच्या अर्थाशीं जुळण्यासारखा करतात. [ध्व खच्]

खचित—वि. जडित; बडलेला, बसविलेला; (समासांत) रत्न–मणि–मौक्तिक–खचित. 'रत्नखचित मुगुट शोभतो बरा ।' –गणपतीची आरती. [सं खच्, खचित]

खचि(ची)त—क्रिवि. निश्चितपणें; खरोखर; खात्रीपूर्वक, [सं. खलु+चित्]

खचितार्थ—पु. (कप्राप्त समास). प्रस्थापित निष्कर्ष, पक्का निकाल–निर्णय, संशोधनाचा निष्कर्ष; पडताळून पाहिलेली गोष्ट; निश्चित गोष्ट [खचित+अर्थ]

खचिती—स्त्री ( व. ) पक्केपणा; निश्चिती; निश्चितार्थ; ठर लेली किंवा निश्चित गोष्ट. [खचित]

खची, खच्ची—स्त्री. कापणी, छाटणी, बडवणी. ०करणें–सक्रि. १ बडवणें (पशूंचें अंड); २ कापणें; तोडणें (वृक्ष इ०). ३ (ल ) कमकुवत करणें; 'राष्ट्रास परकी आपत्तींत शिक्षण देणें म्हणजे त्याची खच्ची करण्यासारखेंच आहे. –टिव्या २७. –वि. १ अंड बडवलेला (पशु). २ (पुन्हां वाढावा फुटावा म्हणून ) छाटलेला, कापलेला ( वृक्ष ). [ अर. खसी ]

खर्चो—स्त्री. (गो.) केंकड्यासारखा मासा. –मसाप ३.२४७.

खचीत—वि. निश्चित; खचित पहा.

खच्च, खच्चून—क्रिवि. गच्च, दाटीनें; कोंबून, खेंचून (माणसांची गर्दी, कोंबलेल्या वस्तु इ० संबंधीं योजतात ). 'या गलबतांत माणसें खच्च भरलीं आहेत.' [खचणें]

खंज—वि लंगडा; लंगडत चालणारा. 'जयापुढें खंजन खंज जाले ।' –सारुह ५.१०९. [सं.]

खंजन, खंजरीट—पु. एक पक्षी; काळी चिमणी; ही सारखी शेंपूट हालवीत असते. 'तथापि ते निंदिति खंजनाला ।' –सारुह॰२.९६. [ सं. ] खंजरीट नयना–स्त्री सुंदर डोळे असलेली स्त्री. 'कामधुरंधी खंजरीट–नयना ये उभि राहे ।' –देप ८५. [ सं. ]

खंज(जि–जे)री—स्त्री. डिमरी, लहान डफडी; सुमारें पांच इंच रुंद व अर्धा इंच जाड अशी फळी घेऊन तिचें टोंकावर ज्यासाचें कडें बनवितात व त्या कडयाचें एक तोंड चामडयानें मढवितात. जंगम गोसावी इ० लोक गाणीं म्हणतांना ताल धरण्याकडे हिचा उपयोग करतात. 'श्रीहरी वाजवी खंजरी ।' –रासक्रीडा २१. 'सुरताल पखवाज खंजिरी मंजरींत वाररी ।' –राला ३१. [ फा. खंजरी ]

खंजवायु—पु ज्याच्यायोगें शरीराचे अवयव वेडेवांकडे उडूं लागतात तो वायु. –बालरोगचिकित्सा पृ. १९.

खजानची–जी—पु कोशाध्यक्ष; खजिनदार; तिजोरीवरील अधिकारी, 'थाकटयास खजानचीचें काम सांगून :...' –रा ५.४२. [अर खझानची] ०गिरी–स्त्री. कोशाध्यक्षाचें काम, हुद्दा; खजिनदारी; -रा ३.१५३.

खजानपूर—वि. ज्याची गंगाजळी सदोदित भरलेली आहे असा; समृद्ध; श्रीमान, खाजानपूर असाहि शब्द आढळतो. 'खजानपूर शाही तें कळतच आहे.' –रा १२.७०. 'शिंदे केवळ खजानपूर सर्दार द्रव्यदृष्टी होते.' –भाव ५६.

खजा(जि)ना—पु १ भांडार; तिजोरी, कोश; द्रव्यनिधि; 'खजानाहि पूर्ववत्प्रमाणें नाहीं.' –दिमरा १.१६५ 'ऐवज सत्वर खजानेदाखल करणें.' –जोरा ७. २ सरकारी जमा; राज्याचें उत्पन्न; दौलत; सरकारी उत्पन्न ( विशेषतः जमीन महसूल ); ३ संग्रह; निधि; सांठा, खाण. 'विज्ञानरिचतीचा भरिला खजाना ।' –स्वानु १०.२.२५. ४ कारंजाला पाण्याचा पुरवठा करणारा त्याजवळच बांधलेला हौद, कारंजाचा हौद. 'कारंजाचे हौद खजीने धुवुन करा निर्मळ स्वकरीं ।' –होला ८०.११७. ५ मिठागराशीं राखलेला पाण्याचा, सांठा. ६ ( सामा. ) नळांतील वाहतें

पाणी साठविण्याचा-उंच चढविण्याचा उच्छ्वास, बुरूज ७ चटु कीची कोठी कोठा, पेट, कान्याजवळचा भाग, यात दारू राहते, खेळण्यातील दारू उडविण्याची-बार करण्याची उखळी, एक तऱ्हेचा गरनाळ ८ तलवार अडकविण्याकरिता पट्ट्यास असणारें अस्तण [अर खमीना, खिझाना, खझान]

खजाळ—वि १ नेहमीं भांडणारा, भाडखोर, भांड्या, खवचट, कलहप्रिय, कज्जेखोर २ विषयलंपट, कामुक [खाज]

खजाळी—स्त्री कुचाळी, खोडी, चेष्टा, पुरापन, कुचोद्य पणा [खाज]

खजि(जी)न(ने)दार—पु कोशाध्यक्ष, खजिन्यावरील अधिकारी खजानची पहा [फा खझानदार]

खजिरी—स्त्री रेशमावर छापण्याची एक तऱ्हा [अर खजरी]

खंजीर, खजर-री—पुस्त्री एक शस्त्र, ल्हान कट्यार, [अर खजर, तुल० स खड्गाजीर-खज्जीर-खजीर 'जरि खड्ग वगिमेद।'-विश्वकोश-भाग १८३२]

खजील—वि लज्जित, ओशाळा, खेदयुक्त, शरमिंदा [अर खजल्=लाजाळु नम्र]

खजुरा—पु (व) धाकरपाळें [हिं]

खजुरा-री(दोरा)—वि खजूरी पेडाचा किंवा पट्टाना वळून केलेला, जाडा (दोरा)

खजुरिया—पु उसाची एक जात याचा रंग खजुरासारखा असतो [स खर्जूर]

खजुरी—स्त्री १ खजुरीचें झाड, हें सिंधीच्या झाडाप्रमाणें वाढतें याचीं वाळवलेलीं फळेंखारका होत बियांचें तेल औषधा पयोगी आहे २ खजुरासारखें एक रानगी झाड [स खर्जूर, प्रा खज्जूर]

खजूर—पु खजुरीच्या झाडाचें फळ, खजुरीची बी •छडी-स्त्री रेशमी वस्त्रावर काढलेली खजुराच्या पानाप्रमाणे आकृति, वळणाची, नक्षी

खज्जाळी—वि (व) मलिन, हलकट

खझ—क्रिवि (राजा) मोठें? खझधो=खाटा, ... पोरगं? ... तुल० हिं कझाग [अ न]

खट—न थाट जलसा, मग, ... फाद —स्त्री दशा, पण 'पणी गडला खटी पड या गादी खावड दुखम।' -भारत ७७ [स खट्=मरणे]

खट—पु (संगीत) गायनातील एक राग हा रागात षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, तीव्र गांधार कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, तीव्र धैवत, कोमल निषाद, तीव्र निषाद हे स्वर येतात जाति संपूर्ण-संपूर्ण वादी कोमल धैवत, संवादी कोमल गांधार गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर

खट—स्त्री १ (व) कुधा झालेली शेतजमीन, वखरण्यात न आलेली जमीन 'या शेतात खटा फार पडल्या' २ अंगावर, पदार्थांवर चढलेले घाणीचें कीट, मळ, कारकचरा (क्रि० पडणें, जमणें) [स खट=गवत, घाण, क्षत] (वाप्र) •फाडणें, टाकणें-(घाण काढणें) १ सपाटून, जोरानें मारणें २ तासडपणें काढणें, खरडपणें काढणें खटीं खापरीं लागणें, जाणें, मिळणें-१ आजारामुळें अंग घाणेरडें, खरबरीत होणें २ (ल) संपुष्टात येणें, नष्ट होणें (धंदा, कारखाना, काम), उधळणें, नाहींसें होणें, धुळीस मिळणें (दौलत), नेस्तनाबूद होणें, जमीनदोस्त होणें (इमारत, गाव) याप्रमाणें खटीं खापरीं लावणें, मिळविणें

खट—स्त्री १ (विटीदांडू) विटीला दांडूनें टोला मारताना दांडू जमीनीला लागला तर 'खट' असें म्हणतात २ (खटखट) आवाज, खट् असा ध्वनि 'कोण दाराभोंवतीं खटखट करितें' -कथा १६ [ध्व]

खट—न रसायनशास्त्रांतील एक मूलद्रव्य (इं) कॅल्शिअम

खट—वि खटयाळ, खोडकर, द्वाड, दुष्ट 'ठस टोंचस खट नट।'-दा २ १ ३२ २ (माण) निर्लज्ज, हलकट ३ क्याद 'ही खट एकदा पुरोगानुन निघाली असता बरी' -नि ५२८ ४ (गा) पिशाच्च, दुर्जन 'तुका म्हणे ल्टपा। भाइ वत नलग खटपा।' -तुगा २९०४ म्हणे० खटास खट भेट, जिवाचें पारणें फिटे [स शठ]

खटखटदू—क्रिवि (ध्वनि) खटखट असा आवाज 'हे दार खटक-खटक असें वाजतें'

खटखण-खन-खर—क्रिवि खटकन, खटदिशीं, खटकन, खट दिशीं, त्वरित, तात्काळ, खट शब्द होई असें (क्रि० निघणें, उमटणें, उपटणें, डाळें उपटणें, झोंप न लागणें)

खटखणें—अक्रि टाचणें, बोचणें 'ही गाढ विरहिणीच्या मनात कोंटाप्रमाणें खटकली' -पेद्र ६५ [ध्व खच-ट]

खटकर्म—न १ षट्कर्म-वेदाध्ययन, वेदाध्यापन, यजन, याजन, दान व प्रतिग्रह हीं ब्राह्मणाची सहा (षट्) कर्मे दान, निर्वाहाचीं सहा कर्मे, कृषिवृत्ति (नाटकांतील दाणे वेचणें) प्रतिग्रह भिक्षा, कृषि वाणिज्य व गोरक्षण [स षट्+कर्म] २ (ल) त्रासदायक, ... निंदा करणारें, तिरस्कार करणारें काम [स खट+कर्म]

खटका—पु १ खटका, पायाचा 'खट्' असा आवाज २ ... लगा ... ३ (व ह) ... स्वर ... आल्या त्याच्या मागच्या आणि पुढच्या स्वराच्या ... दोन स्वरांपासून उत्पन्न होणारा मिश्र स्वर ४ अडकण, खुंटे,

फोयशा वगैरे वसविताना खट् असा आवाज करणारें मळसूत्र अडसरण, त्याचा होणारा 'खट' असा आवाज, नाद, ध्वनि, [ध्व ] ०मुख(हस्त)-पु (नृत्य) करंगळी व अनामिका ही बोटें तळहाताकडे वाकविणें, अंगठा उभा ठेवून त्यास तर्जनी व मधलें बोट चिकटविणें ०वर्धमानक(संयुत हस्त)-पु (नृत्य) खटकामुख हातावर खटकामुख हात ठेवणें

**खटका**—पु (ल) मनात ठेवलेला, आलेला संशय, अंदेशा, विकार (क्रि० येणें, मनात राहणें)

**खटका-कें**—पुन (जेजुरी) खंडोबाच्या पूजेचें गाय उगाळणें, पाणी देणें इ० कामें करणारा धनगर

**खटकूळ**—न १ कर्ज फेडण्याला अगर सारा देण्याला दिग जिग करणारें, कटकटीवाचून ऋण देत नाहीं असें कूळ, असामी, खडकरी, ऋणको २ खर्चाला मागें घेणारा माणूस, चिकट [स खट-खट+कुळ]

**खटखट**—स्त्री १ कटकट, त्रास, धडाका, कटाळवाणें काम २ मोठ्यानें चाललेलें भांडण, कज्जा. 'सदा खटखट आणि लम्पट।'—दा ३ ३ ७ ३ बडबड, बोलण्याची पिरपिर

**खटखटणें**—अक्रि खटखटें वाजविणें, खटखट, कटकट करणें, थ वाज करणें [खटखट]

**खटखटा**—क्रिवि खटखट आवाज होतो असें खट खटायचें—(गा) खटखटणें पहा

**खटखटाळणें**—क्रि आग्रह करणें, मागें लागणें, खटाळणें पहा

**खटखटी**—स्त्री एक झाड हें २।३ पुरुष वाढतें याची फळें गोड असतात —वगु २ ६९

**खटखटीत**—वि १ कोरडा, वाळलेला खडखडीत, वाळल्यामुळें कडकडीत झालेली (एखादी ओली वस्तु) २ स्पष्ट, निर्भीड, निस्पृह (भाषण वक्ता), (प्र ) खडखडीत पहा

**खटखटें**—वि १ शेतातील पक्षी इ० उडून जावे म्हणून केलेलें खटखट आवाज करणारें लाकडी यंत्र २ (ल) ससारोप योगी रोजगार, धंदा, मजूर इत्यादि ३ (गो ) गुळाचा अति टणक असा हलवा, किंवा गूळ-खोबरें याचा अति टणक असा हलवा, चिकी, गुडदाणी [ध्व ]

**खटखट्या**—वि १ कटकट लावणारा, भांडण करणारा, भांडखोर २ एक प्रकारचा पक्षी [खटखट]

**खटंग**—न (प्रा ) खाट, बाज [स खट्वाग प्रा खटंग]

**खटंगनटंग**—वि (व) वरावाईट, कसातरी 'तिला भवरा चांगला मिळाला नाहीं तरी तिनें खटंगनटंग ससार रेटलाच' [खटंग्ट]

**खटगळ्या खाणें**—क्रि (व) घाटेस जाणें, खोडी काढणें 'माझ्याशीं तो अशा खटगळ्या खातो म्हणून तर त्याचें माझें जमत नाहीं'

**खटगुळ**—वि खोडकर, मारकळ (पशु) २ खपवट पहा [खटकूळ ?]

**खटणें**—अक्रि १ थांबणें, अडकला होणें (काम, धंदा इ० मध्य), रमून वसणें (माणूस) 'खटे तेथ पिल्लें तिचीं थाड तात। उडो लागली तों मुखें ती मनात।'—अर्वाचीन ४९९ २ (ल ) धरणें, दृढरूप होणें ३ (ल ) हात पेटून कोणाचें न ऐकणें, मागें राहणें, पट उभें राहणें ४ खलेल असणें, खडणें (पोशा) [खुरणें]

**खटणें**—उक्रि खाणें या अर्थी ग्राम्य टेडवळ शब्द

**खटनट**—स्त्री काळजी, त्रास, उपद्व्याप (पालन-पोषणाचा, अन्नाच्छादनाचा) (क्रि० काढणें, सोडणें) कटकट, भांडण तंटा —वि १ टाकाऊ नासलेला, वाईट साईट ओंगळ-धोंगळ, नासका २ लुच्चा, ठक, दुष्ट 'खटनट येकवटिले। चोरट पापी।'—दा १९ ३ ८ [खट+नट] म्ह० खटनट त्याला गिल्हाईक भट **खटनट्या**—वि भांडखोर, घासाघीस करणारा

**खटपट**—स्त्री १ त्रास, दगदग, मेहनत, यातायात, उलाढाल, घालमेल, नाना तऱ्हेचीं लहानमोठीं कामें (क्रि० करणें, घालणें) म्ह० खटपट करी तो पोट भरी २ भांडण-तंटा, खटखट, किरकिर ३ त्रासदायक, दगदगीचें, यातायातीचें काम म्ह० खटाटोपो भयंकर (घटाटोपा०) [स घटपट ?]

**खटपटणें**—क्रि भाडणें, कज्जा करणें 'ऐसीं शास्त्रें खटपटती। एकाचें एक न मानिती'—ह २७ ३५ [ध्व, का कटपिटे]

**खटपट्या-टी**—पु स्वयंपाक्याच्या हाताखालचा, अवांतर कामें करणारा माणूस —वि १ मेहनती, उद्योगी, बारीक-सारीक मोठ्या कामात उत्सुकतेनें हात घालणारा; सर्वत्र खटपट करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा २ भांडणी, कलहक, कुशल, छातीचा, धडाडीचा, उलाढाल्या

**खटमल**—पु (व ) ढेंकूण [हिं, स खट्वा+मल, प्रा खट्टमल]

**खटमार**—स्त्री अपानद्वारीं किंवा कानात लाकडी खुंट्या ठोकण्याची शिक्षा 'खटमार म्हणजे जपविण्यात बरकड मार त्याचे आश्रित।'—अफला २५

**खटरपटर**—स्त्री सटरफटर, चिल्लर निरनिराळ्या वस्तूंची रास, समूह

**खटराग**—वि त्रासदायक, न पटणारा, कंटाळवाणा (माणूस, धंदा, काम ) —स्त्री १ व्याद, पीडा, लचाड, लगाबर (क्रि० लागणें, मागें लागणें, घालविणें ) २ घरातील जड-बोजड वस्तु घोड्याचें सामान, बाडबिछाईत (जेव्हां अवजड, त्रासदायक असेल तेव्हां म्हणतात )

**खटला-लें**—पुन १ भांडण तंटा, बेबनाव, भेद २ जमीनजुमला, घरदार, गुरेंढोरें, जिंदगी ३ परिवार, इतमाम,

त्वाजमा, वाडविछाईत, प्रवासी सामानसुमान 'नागोपतानें आपलें सर्व खटलें रवाना केलें होतें' —विक्षिप्त १ ३० ४ कुटुंब पत्नी, कारभारीण ५ उद्योग, पोटभरण्याचा व्यापार, व्यापार धंदा, उदीम 'हा सराफीचा खटला आज तीन वर्षे करतो' 'तो वारा खटलें करून पोट भरितो' ६ त्रासदायक काम भानगडीचें, गुंतागुंतीचें काम, मुद्दा, प्रकरण, बाब, लचाड, देवपेवींत लडथड 'फितुराचे खटल्यात तू पडू नको कारण त्यात पुष्कळ खटले आहेत' ७ (कायदा) फिर्याद, न्याय मिळवि ण्याकरिता कोर्टांत चालविलेला दावा, कज्जा 'हायकोर्टाचे जज्ज सुद्धा त्याचेसमोर चाललेल्या खटल्यात इतकें लक्ष घालीत नस तील' —नाकु ३ १ [का कटले=फिर्याद, परपरा पद्धत] (वाप्र) ०ओढणें–ससार व्यवस्थित चालविणें ०तुटणें–सक्त सुणें सामाशब्द–०खोर–वि १ भाडखोर, कज्जेदलाल 'खटलेखोर तो मनुष्य मुरुख।' —ऐपो २६९ २ (क) कुशल, धाडसी, हिक मती, योजक ०वाईक–वि कुटुंबवत्सल, जमीनजुमला, परि वार असलेला, संसारात गढलेला

**खटवणी**—न मिरीं, मीठवगैरे असलेलें भाजीचें पाणी कट पहा [प्रा दे खट्ट=कढी+वणी=पाणी]

**खटवें**—न १ स्त्रियांच्या पायातील लहान जोडवें २ पायाच्या बोटात घालण्याचें दोन वेटयाचें चांदीचें वळें [ध्व खट]

**खटाई**—स्त्री १ आंबटपणा, आंबटाई २ आंबट रस, आंबटपणा आणणारा पदार्थ (खाद्य किंवा रासायनिक पदार्थां तील) चिंच किंवा आंबट पदार्थांचें पाणी (भांडी स्वच्छ निघण्या करिता), ३ आंब्याच्या वाळलेल्या फोडी [प्रा दे खट, हिं खटा=अम्ल आंबट, खटाई=आंबटपणा, अम्लता]

**खटाई**—स्त्री कापणी, कटाई पहा ०काढणें–(य ना) खोड मोडणें, खरडपट्टी काढणें खटी मोडणें

**खटाखट–टां**—क्रि वि फटफट, चटचट आवाज होऊन (रुपये देतांना, चापट मारतांना, तोंडात, मुस्कटात देतांना) [ध्व]

**खटाटोप**—पु १ मोठें अवडंबर, तयारी, बेत, चळवळी २ मोठा डौल (पवित्रपणा, विद्या इ०चा) 'त्या तपस्व्याचा खटाटोप मात्र पहावा, आत कांहीं ऐवज नाहीं' ३ गोंगाट गोंधळ व गडबड. 'दमनकातें खटाटोपें येतां देखिलें।' —पंच १ १६ ४ थाट, दरारा ५ पसारा, उलाढाल (कामाची, धंद्याची) ६ (ग्रामा) मेहनत, यातायात, दगदग 'विषयेलागीं कुसुम सेज। खटाटोप करावया।' —नव २० १७९ 'त्या दाव्यावर इतका खटाटोप पेडून आणण्याचें प्रयोजन नाहीं' **खटाटोपी–प्या**—वि पोकळ प्रदर्शन करणारा, दरचाची इच्छा धरणारा, खटाटोप करणारा म्ह० खटाटोपो भयकर प्रवडपण पोकळ इत्य, विस्मय कारक पोकळपणा, (थोड्या कार्याला फार खटपट जेव्हा केली जाते तेव्हा ही म्हण वापरतात मूळ शब्द फटाटोपो भयकर। असा आहे तो पुढील सस्कृत श्लोकात आढळतो–' निर्विषेणापि सर्पेण कर्तव्या महती फणा। विषमस्तु न वा लोके फटाटोपो भय कर ॥' म्हणजे विष नसलेल्या सापानें नुसता फटाटोप केला (फणेचा विस्तार केला) तरी तो लोकाना भयंकर त्रासदायक होतो), कार्य थोडें पण खटपटीचें अवडबर फार [ध्व हिं खटाटोप, तुल० स फटाटोप]

**खटाड**—वि (व) कुळ्याच्या अगर पडघाळाच्या खटांनीं व्यापलेलें शेत [स खट]

**खटांबा**—पु (क) १ आंबट आंबा २ रानआंबा [खट्टा+ आंबा]

**खटाय**—स्त्री (गो) खवाई, वेढेपणा [स शठ]

**खटारणें खटावणें**—अक्रि. मरणें (सांकेतिक भाषेंत रूढ) —उक्रि नाश करणें, उध्वस्त करणें (देश, गाव वगैरे) [स. खट्वा, म हिं खाट=तिरडी]

**खटारा**—पु १ सामाडा, कवच, सामानाशिवाय भाग, सरजामाखेरीज जिनस (घर, गाडी, पालखी, जहाज हीं सामान, बल, दोरखंड इ० च्या शिवाय असता) 'एक मार्गी झालें पुरें। एकाचें आणिलें खगरे।' —एरुस्व १२ २७ 'गाडीचा खटारा मात्र त्याचा, बैल आमचे' २ धूड, अवजड वस्तु, निरुपयोगी मोठा पदार्थ (मोठें घर, पशु इ० पाळण्याचें सामर्थ्य नाहींसें झाल्यावर) 'एवढा घराचा खटारा कोण्ही शिवावा बरें!' 'हा केवढा हत्तीचा खटारा हा।' ३ मोठा गाडा, बैलगाडा, छकडा, पालखी, मेणा 'एक खटाराभर सामान सहज भरेल' ४ (वों) बैल रहाटाला चालत नसेल तर त्याला शिकविण्यासाठीं एक लाकूड पुरून त्याला जाखड जोडून तयार करतात तो. [स शकट]

**खटारा–य्या**—वि म्हातारा, रोडावलेला, अशक्त, निरु पयोगी (माणूस जनावर)

**खटाल(ळ)णें**—उक्रि १ आग्रह करणें, निकड, तगादा लावणें, सतवणीस बसणें २ सूचना करून आठवण देणें, उद्बोधन करणें ३ पुढें ढकलणें

**खटास**—स्त्री आंबटपणा (फळ वगैरेचा) [हिं]

**खटासप**—क्रि. (गो) खाऊन टाकणें

**खटिया**—स्त्री (काशी) खाट, बाज [खाट]

**खटीत**—वि सटलेला, सुटलेला, पडीत, पडलेला (मूळ, मयूर, वाळी) 'खटीत असा पोरगें स्त्रियांची यादी तयार केली' —धुव्या प्रस्तावना ६ [खटणें=पोरगें]

खटी—स्त्री (गो) खोड (क्रि० मोडणें) -वि द्वाड, खाट खट पहा [खट]

खटूं—न. खटवें पहा

'खटेली—पु (कु) जमिनीचा मालक, कुळाच्या उलट

खटोली—स्त्री (व) लहान खाट, पलंग [हिं खटोला]

खट्टर—वि (गो) खट्टर

खट्टा—पु १ कमरेचा सांधा, पाठीचा खोबळ्याचा मणका, कमरेचें हाड (जड ओझें वाहिल्यानें, किंवा बराच वेळ ताठ बसून लिहिल्यानें जें दु ख किंवा ताठरपणा येतो त्यास अनुलक्षून याचा उपयोग करतात) 'ओझीं वाहतां वाहतां त्याचा कमरेचा खट्टा मोकळा झाला ' २ (व्यापक) अति ताठरपणा, स्वत ची शक्ति किंवा महत्त्व याविषयीं घमेंड (क्रि० मोडणें, मोकळा करणें, तोडणें, जिरविणें, उतरविणें, पुरविणें) 'कामदार अमलदाराचा खट्टा तोडला'—गापो १०८ 'म्या त्याचा खट्टा मोडला। =ताठा नाहींसा केला या अर्थानें या शब्दाचा पुढील शब्दांशीं संयोग करतात —कमरेचा-पाठीचा-मानेचा-मनगटाचा-हातापायाचा-ढिंवतापाचा-गळ्याचा-बाईचा-पायाचा-उन्हाचा-पक्षीचा-वान्याचा-पडशाचा खट्टा मोडला-मोकळा-ढिला झाला (ताठरपणा, कणखरपणा, आवेश इ० इंद्रियाचे व अवयवाचे गुण, शारीरिक रोग, त्यांना अनुलक्षूनहि निरनिराळ्या अर्थानें हा शब्द लागतो)

खट्टा—वि १ आंबट (फळ) २ (ल) असंतुष्ट, नाराज झालेला (क्रि० पडणें) ३ उतरलेला, कमी झालेला, निस्तेज, फिका (रंग) ४ निरुत्साह, नाउमेद [हिं] ०अनार-पु एका जातीचें डाळिंब, हें औषधी आहे याचे दाणे आंबट असतात ०बार-पु फळाचा, पिकाचा दुसरा हप्ता-बहर, आंबट बहर त्याच्या उलट मिठ्ठा अथवा गोड बार=पहिला बहर

खट्टा—पु (खा) खगारा -भारे ७ १-४ [हिं]

'खट्टाई—खगाई पहा

खट्टी—वि १ अतिशय आंबट (फळ) २ तुसडा, तिरसट (मनुष्य, स्वभाव) ३ (ल) असंतुष्ट, नासलेला, नाखूष 'मर्जी खट्टी जाहली।'—मफला ११ [हिं]

खट्टू, खट्टू—वि खट्टी अर्थ ३ पहा [हिं]

खट्टू—खट्टें पहा

खट्या, खट्या—खडा अर्थ १, २ पहा ०बैल-पु थक लेला बैल

खट्याव(वि)णें—अक्रि मरणें [खाट]

खट्याव(वि)णें—क्रि निरुत्साही, निराश उदास होणें; निकड लावून गळचेपीस लावणें, निकड-तगादा लावणें खट्याळणें पहा [खट्ट]

खट्याळ, खटयाळ-नाटयाळ—वि १ खट, तुसडा, तिरसट, द्वाड, दुष्टि खोडट उपद्व्यापी (स्वभाव, वागणूक) 'खटीं भालें खट्याळगें। तिवों नये रिपों दोरें।'—तुगा २०४ २ खोडकर, दुष्ट, छप्पन ढिल्याचा (घोडा, गाय) [स खट, खट+आळ, तुल० का केट=वाईट, का केटु=खोडी, केटु+आळि खोडयाळ]

खट्याळणें—उक्रि १ चेतवणें, भरीस घालणें, तातड लावणें, क्षोभविणें २ (ल) आठवण देणें (वचनाची), स्मरण देणें, खटाळ(ळ)णें पहा

खट्वा—स्त्री खाट, पलंग, बाज [स] ०मरण-न खाटेवर आलेलें मरण मरणकाळीं माणसाला काबऱ्यावर उतरण्याची चाल आहे. पण एखादा मनुष्य खाटेवरच मेला तर तें हिंदुधर्म शास्त्राप्रमाणें निषिद्ध मानतात

खट्वांग—न खाटेचा खूर, शंकराचें एक आयुध —वि (गो) हटवादी, जाडें प्रस्थ

खड—स्त्री १ (राना) पाऊस पडल्यानंतर उगवलेलें कोवळें गवत २ गाय, म्हैस इ० ना खाण्यासाठीं ठेवलेला दाणा, कडबा, गवत, चारा, वैरण इ० ३ (चि) खाणें (पुष्टिकारक) खुराक-२३६९ ४ (ल) दाढी, तोंडावरचे केस 'खड भरित परि पुर्ण। मोवळ पिंगट वर्ण।' —लिबु २ १९ ३९ [स खट, दे प्रा खड, हिं गु खड=गवत अर खद्=गाल]

खंड—पु १ दंड, चढाई करून आलेल्या शत्रूनें गावावर बसविलेली पट्टी, खडणी 'खड काय मल्ज मागतो।'—ऐपा १४ —पया १२८ २ लढाईंत कैद केलेल्या शिपायाबद्दल त्याच्या सुटकेसाठीं द्यावयाचा पैसा ३ कामाचा ठराव (ठरवलेली रक्कम), मक्ता, करारानें ठरलेली रक्कम अमुक कार्यास अमुक द्रव्यादिक असा ठराव ४ धान्यरूपानें अगर पैशाच्या रूपानें मालकी हक्काबद्दल घेतलेला कर, फाळा, सारा (सरकारी खाती) 'आमच जमिनीचा खड १७५ रु आहे' ५ ठराव, निवाडा 'तुका म्हणे केला। खड दोघांचा विटला।'—तुगा १४१८ [का कडणें (कडु घातु पासून)=तोड निकाल ठराव, नौल] सामासिक शब्द—

०कमाविशी-वीस-स्त्री गावच्या इनामदाराला दड धरण्याचा व तो वसूल करण्याचा मिळालेला अधिकार ०करी-पु कूळ, खडानें शेत करणारा ०काम-न अमुक द्रव्य व अमुक काम अशा रीतीनें ठरवून घेतलेलें काम करारानें घेतलेलें काम नेमून घेतलेलें काम ०खुरई-खडगुन्हेगारी पहा ०खोती-स्त्री इजारा ०गुन्हेगारी-स्त्री (गुन्हेगारापासून घेतलेली-ला) दड, जप्ती, धरपकड वगैरेला सामान्य संज्ञा 'या राज्यांत उगाच खडगुन्हेगाऱ्या भराव्या लागतात' [खड+फा गुन्हागारी] ०चिठ्ठी-स्त्री मक्तेपत्र मादेचिट्ठी ०दाल्दी-स्त्री सार्तीत पाण्यात

कोळ्याने काठ्या रोवण्याच्या हक्कासाठीं दिलेला पैसा [ दालदी=कोळी ] ०दारू-स्त्री दारू विकण्याचा मक्ता ०फडशी-स्त्री सरकारच्या वतीनें वसूल केलेला दंड ०फुरोई-खंड गुन्हेगारी पहा ०बकरी-रें-स्त्रीन घाटावर चरणीस-विकोस आलेल्या शेळ्या मेंढ्यांच्या कळपातील एक शेळी-मेंढी सरकारी कर म्हणून घेणें, कळपावरील जकात ०भट्टी-स्त्री भट्टीवरील कर ०मक्ता-पु करार, हक्क, इजारा, मक्त्यानें दिलेली जमीन खंड मक्ता-करार यांस व्यापक संज्ञा ०शिंदी-स्त्री ज्यापासून ताडी काढतात त्या ताडीच्या झाडावरील कर

**खंड**—पु १ खळ, अडथळा, विराम (काम, काळ, धंदा यामध्यें) व्यत्यय 'सूर्य कधींच उजेड देण्यात खंड पाडीत नाहीं ' २ तुकडा, भाग 'मग तळवे तळहात शोधी। उर्ध्वींचे गड भेदी।'–ज्ञा ६ २३२ ३ विषयाचा, ग्रंथाचा भाग, अध्याय प्रकरण ४ जंबुद्वीपातील नवखंडांपैकीं एक खंड, नवखंड पहा पृथ्वीवरील प्रदेशाचा एक मोठा भाग, अनेक देशांचा समुदाय 'पृथ्वींत आशिया खंड सर्वांत मोठें आहे ' प्रदेश, प्रांत, जिल्हा उ० बुंदेलखंड ५ एक काव्यरचना, मोठें काव्य, कथागीत ६ (व) द्विदल धान्य चाळताना खालीं पडणारे धान्याचे बारीक कण निरुपयोगी धान्याचा अंश ७ (नृत्य) अनेक करणांचा समुदाय ८ (संगीत) ज्यामध्यें पहिला विभाग नियमानें पांच मात्रांचा असतो असा एक दक्षिणेकडील तालप्रकार [सं ] (वाप्र) **खंडे-खंडे, खंडविखंड करून टाकणें**-तुकडे करणें, मोडणें, तोडणें, फोडणें सामाशब्द- **खंडक**-पु (नृत्य) चार करणांचा समुदाय **०गुणन**-न गुणकाच्या अवयवांनीं गुणणें **०पद**-न (बीजगणित) मूळगत, करणीगत पद (इं) सर्ड **०प्रलय**-पु तात्पुरता जलप्रलय, सामान्य जलप्रलय, याच्या उलट ब्रह्मप्रलय **०मंडल**-न वर्तुळाच्या परिघाचा अंश, भाग –वि फुगीर **०विखंड**-पु तुकडे तुकडे 'कुशब्द बोलोनिया उदंड। हृदय करी खंडविखंड।'–मुमभा ५ ८७ **०वृष्टि**-स्त्री थोडासा पाऊस, मधूनमधून पडणारा पाऊस [सं] **खंडशः**—क्रिवि १ तुकडे तुकडे करून २ भागशः **०श्रेढी**-स्त्री (गणित) खंडितश्रेढी गळयाचा तुटलेला क्रम, त्रुटित संख्यामालिका **०ज्ञान**-न १ भागशः, पायरी पायरीनें, क्रमाक्रमानें दिलेलें मिळविलेलें ज्ञान याच्या उलट अखंड ज्ञान २ अर्धवट ज्ञान ३ नाशिवंत वस्तूंचें ज्ञान जीवात्मा व परमात्मा यांच्या ऐक्याबद्दलचें अपुरें ज्ञान, पूर्ण ज्ञान अथवा अभेद ज्ञानाच्या उलट 'खंडज्ञान उपदेशितो।'–विपू १ १२ 'दृहीच स्याळमाल। हें खंडहि गरज्ञान।'

**खडक**—पु १ मोठा दगड पत्थराची जमीन, दगडाची रांग, कातळ, शिळा, धोंडा, खडपा, पाषाण 'ज्वालामुखींतून पातळीत रस बाहेर येऊन त्याचे थरावर थर बसतात या थरातील उष्णता निघून गेली म्हणजे त्याचेच खडकाचे थर बनतात '–सृष्टि (खगोल) ३८ २ कातळाचा समूह, शिला ३ मोठा खडक; कातळ ४ (ल) कठोर अंतःकरणाचा, पाषाणहृदयी माणूस 'खडकाशीं धडका घेऊन काय फळ ' म्हं० खडकावर पेरलें व्यर्थ गेलें –वि १ वाळून कोरडा ठणठणीत झालेला, खडखडीत (धुतलेलें कापड, काठ), 'हीं काठें खडक झालीं आहेत ' अगदीं कोरडी, आटलेली (विहीर, तळें गाई-म्हशींची कांस, किंवा एखाद्या स्त्रीचें स्तन) ३ स्वच्छ, चकचकीत (प्रभात, उषा) ४ तीन, कडक (ऊन, भूक) याशिवाय आत्यंतिक, पूर्ण, तीन या अर्थीं वापरतात कित्येक वेळीं 'कडक' शब्दाबद्दलहि योजतात [सं काठ=खडक, दगड, काठक तुल० ब्र खड्, किंवा सं कटक, प्रा कटग=पर्वतभाग, माची] (वाप्र) **०लागणें**-नफा किंवा सुपरिणामाची आशा धरली असतां निष्फळ होणें 'त्याचे घरीं रुपयासाठीं गेलों होतों परंतु तेथें खडक लागला ' **खडकावर पोट भरणें**-कोठेंहि पोट भरणें सामाशब्द- **०खडक**-खडक (–वि) पहा.

**खडकूण-कम-कर**—खटकन पहा

**खडकणें**—अक्रि वाळणें, वाळून कडकडीत होणें (धुतलेलें कापड, ओलें सरपण) [खडक]

**खडकणें**—अक्रि गति कुंठित होणें 'वाघ मार्गावर ओरडताच माणसें जेथील तेथेंच खडकलीं ' [खडक]

**खडकत**—स्त्री खडकाळ जागा –वि खडकाळ [खडक]

**खडकतेरें**—न (को) खडकांत होणारें तेरें, अळू –कृपि ६४५

**खडकपान**—न मुलाम्याची थाळी खड्गपात्र पहा 'घरात दारिद्र्य मटरा विधें हें तर बाहेर उघडेंच दिसतें हातात खडकपात्रें, कानात ताडपत्रें।'–श्री भिल्लणनाटक इतर अर्थांसाठीं खड्गपात्र पहा

**खडकशेपू**—स्त्री एक वनस्पति

**खडक(का)ळ-ळी**—स्त्री १ दगडाळ, खडकाचा किंवा कठिण पृष्ठभाग, मैदानाचा भाग, जागा, पाषाणयुक्त जमीन, कातळमय पृष्ठभाग २ (ल) गोंधळाचा मुद्दा, कठिण गोष्ट, शंकास्थान समजावयास कठिण स्थळ –वि दगडाळ, धोंड्यांनीं युक्त [खडक+सं आल्य किंवा आळ प्रत्यय]

**खडकळ-काळी**—स्त्री दगडाळ काळी जमीन ही नेहमीच्या काळ्या चिकण जमिनीपेक्षा कमी सुपीक असते, तरी हींत ओलावा चपला राहतो व कमरपाट अड जात नाहीं

**खडका**—१ जवळ येणाऱ्याची चाहूल (माणसाच्या पायांची इ०) ओळखीचा आवाज, काहीं ध्वनि २ खडाजंगीचें भांडण, भटका 'त्याचा व आमचा खूप खडका उडाला.' ३ (व) खूप

खाणें, खाण्यावर टडाका 'आज पुरणपोळीवर खडका आहे'. [ध्व] ०घेणें, काढणें-मनोसा घणें (जवळ यणाऱ्या माण साचा, वस्तूचा) ०घडका-पु भाडाभाडी, खडाजंगी, कलागत

खडकावणी-वून—कडकावणी-वून पहा

खडकाय(वि)णें—उक्रि मध्येंच थांबविणें, स्तब्ध करणें खडकणें पहा

खडकाय(वि)णें—उक्रि रागें भरणें कान उपटणें, उपडणें खरड काढणें, कडकाविणें पहा

खडकी—स्त्री एक प्रकारचें हलकें वस्त्र (विशेषत तांबड्या रंगाचें)

खडकी-मीठ—न सैंधव (इ) रॉकसाल्ट -पदाव १ १०४ [खडक+मीठ]

खडकील-कूत-कूळ—वि (प्रा) खडकाळ.

खडकुती—स्त्री सूर्याच्या खडतर उन्हानें पदार्थ करपून जाण्याची अवस्था, जळून जाणें 'आम लागला सेती। धान्यें बणऱ्या आणी खडकुती।'-दा ३ ७ ४२ [कडका]

खंडकुली—स्त्री जलाशय -शर?

खडकूत—पु जनावरांच्या खुरांना होणारा एक रोग, खुरकूत

खडक्या—वि. (नाशिक) निर्भीड, धसमुसळ्या, स्पष्टवक्ता, तोंडावर स्पष्ट बोलणारा [खडकावणें]

खडक्या—पु (व) निजामशाहींतील तांब्याचा पैसा 'खडक्या दक्षिणा वाटली' [खडा]

खडखड-डा—क्रिवि १ बैलगाड्या वगैरेंचा खडकाळ रस्त्यावरून चालतांना होणारा जो आवाज तसा आवाज करीत कोरें कापड, कागद इ० हलविलें असता होणारा आवाज काढीत २ स्पष्टपणें, साफ तडकाफडकीं, तोंडावर (बोलणें उत्तर देणें) ३ झराझरा, झपाझप, सपाट्यानें (धावणें, जाणें) [ध्व]

खडखडणें—अक्रि १ खडखड आवाज होणें, तडतडणें फडफडणें, खरखरणें, चरचरणें वाजणें इ० 'म्हशीचीं शिंगें गातडीवर खडखडत आहेत' [ध्व हिं खडकना] खडखडून उठणें-बोलणें-सांगणें-जाब देणें-रागानें, आवेशानें, स्पष्ट, बेधडक बोलणें वगैरे [खडखड]

खडखडविणें—उक्रि १ मोठ्यानें सांगणें, खरडपट्टी काढणें, रागें भरणें, 'त्या कुळाला जेव्हां खडखडविलें तेव्हां त्यानें रुपया दिले' २ खडखड वाजविणें, आवाज करणें [खडखड]

खडखडाट—पु (अतिशय खडखड) १ मोठ्यानें खडखड करणें, कडकडणें, तडतडणें २ (ल) (रिकाम्या भांडयाच्या आवाजावरून) दुर्भिक्ष, दुष्काळ, ठणठणाट, आत्यंतिक अभाव (पैशाची पिशवी, धान्याचें कोठार, विहीर यांतील-पैसा, धान्य, पाणी इ० चा) ठणठण 'त्या विहिरीमध्यें पाण्याचा खडखडाट झाला आहे' [ध्व खडखडाट, हिं खडखडाहट]

खडखडीत—वि १ कोरडा व टणटणीत, वाळून कडक, शुष्क झालेला (भिजलेली पण नंतर वाळलेली वस्तु, पदार्थ), कडकडीत (धुतलेलें कापड), कडकड, सळसळ वाजणारें (कापड) २ जोमदार, निरोगी उत्साही, मजबूत, टणटणीत (वयातीत, पोक्त माणूस) पुन्हा सशक्त, जोरकस (आजारातून उठलेला) ३ धसमुसळा, स्पष्टवक्ता, चोख व्यवहार करणारा, ४ थोपट, खरें, उपडउघड (भाषण, व्यवहार, चोकशी) ५ (कु) नाजूक नसणारें, खडबडीत, खरखरीत पहा [ध्व खडखड]

खडखडया—स्त्रीअव दरवाजातील पट्यापट्यांचें कलमदान (इ) पॅनेल 'खडखडया गोलची कलेल्या उभ्या गजांस पितळी बिजागिऱ्यांनीं जोडाव्या' -मॅरट ७२ [ध्व]

खडग—क्रिवि खडखडीत वाळणें या अर्थाच्या धातूशीं (धान्य, कापड इ० संबंधीं) योजतात

खडगळ-गूळ—वि १ खडकाळ, दगडाळ २ (ल) खडगूळ, कठिण, त्रासदायक, खडतर, खवट ३ नाठाळ, द्वाड, खट्याळ (गाय पशु) ४ तिरसट, हिरवट, तुमडा, कुरटा, तिडतिडा [खडक]

खडगुत—न (व) दाणा, चारा, वैरण [प्रा दे खड= तृण, घास, हिं खड=गवत, खड+गूत]

खडंगूळ—खडगळ अर्थ २ पहा

खडछाया—स्त्री (ज्योतिष) मुख्य छायेच्या सभोंवती असणारा फिका किंवा पांढऱ्या रंगाचा भाग (इ) पेनम्ब्रा

खडंजा—पु उभ्या विटांचा थर [हिं खडा]

खंडजाई—स्त्री एक क्षुद्र देवता 'खडजाई देवी म्हणे तूं अखडी।'-सप्र ५ ३२ [स खडजा+आई]

खडण, खडीण—वि १ त्रासदायक, ओढाळ, नाठाळ, खट्याळ, (जनावर इ०) म्ह० खडण गुरा बहु दुध २ दूध काढतांना फार त्रास देते अशी (गाय, म्हैस), वास 'खडिणा गाय दुभती। वैरी तरी मित्र होती।' ३ खट्याळ [प्रा खडणा= खट्याळ गाय]

खंडण-न-णा-ना—नस्त्री १ मोडणें, तोडणें २ निरुत्तर करणें खोडून काढणें ३ रावट, भग 'या पोटाकारणें गा झालों पागिगा जना। न सेरेची मायबाप भीक नाहीं खडणा।'-तुगा ३४९ ४ खड पडणें थांबणें 'मही लोटला आरजाचा पाट। खडणा नाहे परम अचाट।'-नव ९ १५६ [स खंडन, (खण्ड्= तुकडा पडणें)]

खंडणी—स्त्री १ करभार (मांडलिकांनीं सार्वभौमाला द्यावयाचा), दुसऱ्यानें आपणांत उपद्रव न करावा किंवा अनुकूल

असावें म्हणून देण्यात येणारें द्रव्य. २ दंड; गुन्हेगारी; बसवि लेली वर्गणी; जबरीनें घेतलेला पैसा, वस्तु. ३ ठरविल्यानंतरचा चालू सालचा वसूल; सारा, कर. ४ मेंड; फाळा; धान्य रूपानें मालकाला सारा देणें. ५ (खंडणें याचें धातुसाधित नाम) मक्ता करणें; किंमत किंवा अटी ठरविणें. ०तशरीफ-पु. धारा नक्की केल्यानंतर गांवकामगाराला दिलेलें इनाम; पाटलाचें वेतन. ०दार-वि. खंडणी देणारा; खंडकरी. [खंड, खंडणें]

खंडणूक—स्त्री. १ कामानें वेताद; कामाचा मक्ता; विशिष्ट कामाबद्दल विशिष्ट पगार मिळण्याबद्दलचा ठराव, बोली वगैरे. २ (क्व.) मक्ता; इजारा (सारा, जकात इ० चा). ३ किंमत, अटी ठरविणें. [खंड]

खडणें—अक्रि. पडणें; गळणें; झडणें (झाडाचीं पानें) 'स्वराज्याच्या कोंदणांतील एक एक तेजस्वी हिरा कसा खडत चालला आहे पहा.' —स्वप १२४. —न. पानें गळालेलें झाड.

खंडणें—उक्रि. १ तुकडे करणें; तोडणें, मोडणें; तुटणें (हें क्रियापद निश्चित अर्थाचें नाहीं. तोडणें, मोडणें यातील बारीक भेद या क्रियापदानें दर्शविला जात नाहीं). 'तें आदि नाहीं खंडलें। समुद्रीं तरी असे मिनलें।' —ज्ञा २ १५४. 'जे चर्म सात्वरीचें खडी तो सिंद उग्रकर्मा तें।' —मोकर्ण ९.१४ २ नाश करणें, पावणें. 'काय हें खंडईल कर्म।' —तुगा ६९८. 'तुका म्हणे कृपावंता। माझी चिंता खंडावी।' —तुगा १७००. ३ खोडून टाकणें; निरुत्तर करणें, कुंठित करणें (वादांत). 'वी न्यायें बौद्ध खंडिले कविनें।' —मोकर्ण ८.३२. [सं. खंडन]

खंडणें—अक्रि. १ मक्ता करणें; करार करणें, ठराविक पैसा घेऊन ठराविक काम, पार पाडणें; अथवा इजाऱ्यानें कांहीं एक काम पत्करणें, दुसऱ्यास देणें. २ किंमत निश्चित करणें; अटी व किंमत ठरविणें (धिरत, भाड्यानें घ्यावयाच्या वस्तूची). ३ *फिटणें; फेडणें (कर्ज); अटी पूर्ण करणें, स्वत वरची जबाबदारी* पार पाडणें; फल भोगणें. 'तुरें कर्म खंडिल सहन।' —रावि ४० ·१००. ४ ठरविणें, निश्चित करणें. 'येका मळेयाचा येकात स्यानीं। लोमेन ठाणें करूं खंडुनी। तेणें मंदिर बांधोनी। वासु केला।' —शिपु २.१२.८०. ५ खंडणी बसविणें; वसूल करणें. [खड खंडणी] ०दंड-पु. खडगुन्हेगारी पहा. दंड; गुन्हेगारी; जप्ती [खंड+दंड]

खंडनीय—वि. मोडण्यास योग्य, मोडण्या-खंडण करण्या जोगा. [सं.]

खडतर-—न. (कों.) जुना, पुजका साप (नागलीचा)

खडतर—वि. कठिण; त्रासदायक, कंटाळवाणें; खरपाळ, ग्रस्त; दुष्ट; उग्र (मनुष्य, देव, मार्ग, भेव इ०). 'खाली दृढ पणीं खडतर देवता। संचारली भाता निर्धो नये॥' —तुगा २०१. [सं. खरतर] सामासिकशब्द- ०औषध-न. तीव्र, अमोघ, रामबाण औषध. ०दैव-नशीब-प्रारब्ध-न. दुर्दैव; दुर्भाग्य. ०दैवत-न. उग्र, दुराराध्य, कष्टसाध्य दैवत (मुंजोबा, नरहरी, वीरभद्र, काली इ०). ०बीज-न. १ वाईट बीं, मूळ; वाईट कुळ; हीन कुळ; २ (ल.) तिरस्करणीय, दुष्ट, घातकी माणूस. ०वेळ-स्त्री. १ कठिण, दुर्घट प्रसंग, योग, वेळ (दुपारची, तिन्हिसांजची). २ कुयोग (ग्रहाचा, राशीचा) ०शब्द-पु. कठोर, खोंचदार, टोंचणारा, बोचक शब्द, भाषण. ०साल-न. वाईट वर्ष; अवर्षण, दुष्काळ, लढाई, रोग, सांथ यांनीं युक्त असें वर्ष. ०हत्यार-न. भयंकर, तीक्ष्ण हत्यार, शस्त्र (संगिनीला तिच्या जखम करण्याच्या स्वरूपावरून म्हणतात.).

खडतरणें—अक्रि. १ खडखड आवाज होणें (दगडावरून, खडकावरून गाडी गेली असतां); खडबडून उठणें. 'तेणें सुरानिद्रेचिये सदनीं। जागरोनी खडतरला।' —सुसभा १५.१६४. २ मोठ्या आवाजानें लागणें, आपटणें, बोचणें, हाणणें, खोंचणें, भेदणें (बाण, दगड, बंदुकीची गोळी इ०). 'कृपवाक्शर काळजांत खडतरले।' —मोआदि २६.४७. 'एक खडतरला बाण। गगना गेला गर्जेपण॥' —एरुस्व १०.१६.

खडतरणें—अक्रि. (काव्य) खडतर, खचरट होणें.

खंडन—न. १ तोडणें; तुकडे करणें; नाश करणें. खंडण पहा. २ (ल.) अडथळा करणें; अडविणें. ३ (ल.) कुंठित करणें. (समासांत) वाद-मत-ग्रंथ-अभिमान-मान-खंडन. [सं.] खंडन(चिबुक)-न. (नृत्य) दांत एकमेकांवर आपटणें; संतापदर्शक अभिनय. ०मंडन-न. सिद्धासिद्ध करणें; खोडून काढणें व स्थापणें; बाजूनें व विरुद्ध बोलणें.

खडप—पु. १ खडक; खडकाळ पृष्ठभाग; खडकाचा थर; रास. २ (ल) भाकऱ्याचा ढीग; खाकरण्या भाड्याचा ढीग. —न. सूत्रभर काडगरांची, ताटाची पेंटी, 'खडप' पहा.

खडपा—पु १ मोठा खडक. २ खडकाचा सुटलेला कडा, भाग, सुटका, खडकाळ चढण; टेकाड, दरड. 'तिन्हींही अवघट खडपे असले तरी त्यांवर तीं (घरीं) सहज चढून जातात.' —मराठी ३ रें पुस्तक पृ ११७ (१८७३).

खडखड—स्त्री. १ विशिष्ट आवाज (उंदीर गवतात-गडक्यात गेल्यावर करतो तो). २ (ल) कटकट; धावाधाव; भांडणतंटा. ३ गडगड. ४ खडखडीताणा (जमीन वगैरेचा). गदरड या अर्थानेंहि हा शब्द हमाल वगैरे लोक वापरतात. [ध्व.] ०गुंटा-पु रिकाम्या भांड्यात घडी पातली असतां होणारा गडगड असा आवाज; रक्तवाहून अस्पर्श अभाव; फटका; फसा; रिकामा (विहीर, फडताळ, कोठार यांची).

**खडघडणें**—अक्रि. १ खडघड आवाज करणें. २ (काव्य) घोटाळणें; गोंधळणें; भिणें; क्षोभणें. गडबडणें पहा. 'खडबडी कनकाद्रि।' [खडघड]

**खडघडाट**—पु. खडबड असा मोठा आवाज; गोंधळ.

**खडघडीत**—वि. अतिशय खरखरीत; खरबरीत; खांच खळगे असलेली, (गो.) ओबड-धोबड; खरमरीत; खरबरीत व खडबडीत हे शब्द अनुक्रमें अधिकाधिक खरखरीतपणा दाख वितात.

**खडघडून**—क्रिवि. गडबडून; खडबड आवाज ऐकून किंवा करून. 'ती खडबडून जागी होते आणि उठून बसते.' -मोर ८३२. [खडबडणें; तुल० सं. खटखटयित्वा]

**खडबुडणें**—अक्रि. १ भेदरणें; अतिशय गोंधळणें. २ खळ बळणें; सळसळणें. [ध्व. खडबड]

**खंडमंड**—स्त्री. (ना.) फिटंफाट; फिटाफीट. [खंडणें द्वि]

**खंडमेरू**—पु. १ ढीग; नियमितपणानें कमी होणारी रास (तोफगोळ्यांची); समप्रमाणांत उतरणारी संख्या. २ (संगीत) नष्ट व उद्दिष्ट ह्यांतील इच्छित गोष्टी सुलभतेनें काढतां येण्याची रीति

**खंडलेतुटलें**—न. भागीदारी तुटणें; सरकत मोडणें; लहय डीच्या व्यवहाराची देऊन घेऊन केलेली मोकळीक, सोडवणूक.

**खडवण**—न. १ खडकाळ जमीन. २ (राजा). कडा, तुटलेला खडक, धुळकेदार चढण. ३ बारीक खडे. [खडे+वण प्रत्यय]

**खडवा**—स्त्री.अव. (प्र.) खडावा; (एक खडव) पायां तील लाकडी जोडा; पादुका. [ध्व. खड्]

**खडवा**—पु. खोडवा पहा.

**खडवा**—पु. पर्वत; डोंगर; खडक. 'परिसाचा खडवाचि जोडला।' -ज्ञा ११ ५३९.

**खंडवा**—पु संबंध कोरडें असणारें नदीचें पात्र [सं. खंड]

**खंडयाडा**—पु बैलाच्या कामाबद्दल त्याच्या धन्याला दिलेलें धान्य [खंड]

**खडविणें**—उक्रि. औताला बैल जोडणें, जुंपणें. [हिं. खडा= उभा]

**खडवें**—न. (राजा.) डोंगरावरची, वळणाची-नागमोडी वाट; घाटाचा टप्पा. खडवा पहा.

**खडवें**—न. जोडवें; खटवें पहा.

**खंडश**—खडविखंड पहा.

**खडशिंग**—न. खडशिंगीचें फळ.

**खडशिंग-शेरणी**—स्त्री सागवानाच्या जातीचा एक मोठा वृक्ष; याचें लांकूड तांबूस रंगावर, बळकट व इमारतीच्या उप योगी असतें.

**खडशेंग**—स्त्री. (व.) आवईची शेंग.

**खडस-सा**—वि. खणखणीत; दणकट; टणक; धटाकटा (म्हातारा माणूस).

**खडस, खडसपट्टी**—स्त्री. खरडपट्टी; खोंसडपट्टी; धमकावणी; गडकावणी; खरड काढणें (एखाद्याच्या गर्वाची, अह- ंकाराची, तोऱ्याची). (क्रि० काढणें). [खडसणें+पट्टी]

**खडसणी**—स्त्री. १ तोडणें; छाटणें; काटाकाट करणें (झाड). २ (ल) ताससडपट्टी; नाडपट्टी भोसडपट्टी. (क्रि० काढणें) [खडसणें]

**खडसणें**—उक्रि. १ फांद्या तोडणें. २ ओबड-धोबड रीतीनें कसें तरी तोडणें ३ (ल.) कठोरतेनें बोलणें; जोरानें, खोंचदार, ठसेलेसें बोलणें; कानउघाडणी करणें, ताकीद देणें; खरड काढणें. ४ बजावून सांगणें, संभाळ, विसरशील असें अनेक प्रकारें सांगणें. [कां. कडिसु=कापणें]

**खडसपट्टी**—स्त्री. (व) डोंगराळ प्रदेश. 'खडसपट्टीतले राहणारे.'

**खडसं(सां)वळ-ळी**—१ आवईची वेल, ब्राह्मीचा वेल; कोयतेवाल, खरसानळी पहा. (तंजा.) खडसमुळी. २ महाबळे- श्वराच्या आसपास सांपडणारी एक वनस्पति (हिच्या मुळ्या खातात). [सं. खड्गशिंबी]

**खडसमुळी**—स्त्री. (तंजा) वरील खडसंवळी अर्थ १ पहा. 'कुहिरी आवई खडसमुळी।' -अमृत ६२.

**खडसर**—वि. खडकाळ.

**खडसा**—पु. (राजा) नांगराचा मुख्य अवयव, नांगर- बुंद, ज्याला फाळ बसवितात तो भाग.

**खडसाविणें**—उक्रि. १ तासडपट्टी काढणें. २ ताकीद देणें; बजावणें, खडसणें पहा.

**खडसून-हडसून**—क्रिवि हडसून-खडसून पहा.

**खडस्तन**—वि. (गो.) मोठें, बडे, जाडें.

**खडळ**—पु खडा 'आणि घांसाआंतील हरळु। फेडितां लागे वेळु। तें दूषण नव्हे खडळु। सांडावा कीं।' -ज्ञा १३.३३५.

**खंडळमंडळ**—स्त्रीन. १ अनियमित होणें, पडणें; मधूनमधून, प्रसंगोपात्त उद्भवणें असा स्वभाव, गुणधर्म, मधूनमधून पडून येणें (काम, वृत्ति, स्थल, काल इ० संबंधीं). (क्रि० करणें; लावणें; मांडणें; चालवणें). 'पाऊस खंडळमंडळ पडूं लागला.' -क्रिवि. १ मधून मधून, केव्हां केव्हां, प्रसंगवशात्, टंगळ मंगळ करून. २ येथें तेथें, थांबून, अडखळत. ३ संदिग्धपणें; अनि- श्चितपणें, नकारार्थी. -वि. (व.) तुटक तुटक. [सं. खंडल द्वि]

**खडा**—पु १ लहान दगड; गोटी, गोटा, धोंड्याचा बारीक तुकडा; दगडाचा लहान खंड. २ कळी (चुन्याची); तुकडा

(गोंद, डिंग, कात, गडीसाखर इ० चा), अलंकारातील, अंगठीतील मणी, रत्न 'एकच खडा निरडक झाली लागला' -विवि१० ५-७ १२७ ३ मळाचा लहान पण कठिण गोळा, (सामा) गडा, गाठा, पिंड ४ गुळाची लहान दप [स खड, सिं खड़ा](वाप्र) ०उडणें-(गुडगुडी ओढताना तींतील खडा वर उडतो त्यावरून) संरस्वी सपणें, नष्ट होणें (इ०प वस्तु) ०टाकून टाच घेणें-(पाण्याची खोली ठोकळमानानें खडा टाकून पाहतात यावरून) एखाद्या कामाचा कल जाणवयाचा असतां सहजपणें एखादा शब्द टाकून कामाची माहिती काढणें, आपलें काम होईल कीं नाहीं याचा अनमान पाहणें **खडा न खडा माहिती असणें** एखाद्या कामांतील बारीक सारीक सर्व गोष्टी माहीत असणें ०फुटणें-खडक फुटून पाण्याचा ओघ सपाटून बाहेर येणें 'नदीचा खडा अजून फुटला नाहीं' **खडे खाणें**-रस्ता खाणें, रद करणें, त्रास सहन करणें (दगडाच्या कामांत) ०चावविणें-चारणें-त्रास देणें, सतावणें बेजार करणें ०घासणें-फाडण (नांवानें)-१ दुसऱ्याची निंदा करणें, तक्रार करणें २ (नावाशिवाय) दुष्ट कट करणें, दगदग करणें ०मोजणें-खडे माडून हिशाब करणें (कागदावर लिहिता येत नसल्यामुळें) **खड्या खड्यानीं डोकें फुटणें**-भाऊ बारीकसारीक गोष्टींमुळें दिवाळखोर बनणें भिकस लागणें (एखाद गोष्टीमुळें नव्हे) **खड्यानीं डोकें फोडणें**-दगडानीं मारून गाईला ठार केलें असता प्रायश्चित्तादाखल त्या व्यक्तीचा दगडानीं डोकें फोडून वध करणें **खड्यासारखा निवडणें**-१ एखाद्या कुचकामाचा म्हणून बाजूला सारणें, करणें, निरुपयोगी ठरविणें २ चटकन वेगळा काढणें, ओळखणें 'राहता राहता सुशिक्षिताचा वर्ग राहिला व त्यास गोरे यानीं शत्रू म्हणून खड्यासारखें निवडून काढलें आहे' -ज्ञानप्रकाश ५ **खड्या सारखा बाहेर पडणें**-निरुपयोगी म्हणून बाजूला सरणें

**खडा**—पु पात्याच्या शिवून तयार केलेल्या छत्रीस ज्या काडीवना काठी खासून लावतात त्या प्रत्येकी [स खड]

**खडा**—वि (हिं) १ ताठ उभा २ कायमचा, सततचा 'त्याचे दरवाजावर खडा पहारा असतो' ३ पोटीं तपशिलाच्या रकमा न लाविता लिहिलेला पुरा न केलेला (हिशब) ४ अनिश्चित ठवलेला, पडून राहिलेला जो स्वीकारला नाहीं किंवा परत दिला नाहीं असा (चेक वगैरे) [हिं]

**खडा**—पु रुद पात्याची दुधारी सरळ तरवार खड्ग, खांडा पहा 'खडा पग सुरे तिक्ष्णा कटार लावून।' -ऐपो १०९ [स खड्ग] ०ईत-वि खड्गधारी, खडा धारण करणारा

**खडाखड डा**—क्रिवि १ खडखड, फटफट तडतड इ० आवाज करून २ न अडखळत, फाड्कन फडाफड (वाचन भाषण) [ध्व]

**खडाखड-डी**—क्रिवि १ जागच्याजागीं, तत्क्षणीं २ साफ हतोय, हटकून; तडकाफडकीं (येणें, देणें, घेणें, उत्तर देणें) 'एक्य जाले खडाखडी।' -दावि १११

**खडागुंडा**—पु रत्न, हिरकणी [खडा+गुंडा]

**खडा घाट**—पु १ उभी चढण, छातीवर येणारा, उभट घाट (डोंगराचा रस्ता) २ अपुरा, आखड-धोपड घाट (भांड्याचा आकार), डौल, ठेवण

**खडाचढ(ट)**—स्त्री पोटात पित्ताचा खडा बनून होणारें दुःख 'खडाचढ पित्ताने भ्रमे। या नाव आध्यात्मिक।' -दा ३ ६ २९

**खडाजंगी**—स्त्री १ जोराचें भांडण, लढाई, सफेजंगी, खडे जगी २ कडाक्याचें भांडण, बोलाचाली [खडा=उभ्यां+जंग= युद्ध] ०मचणें-क्रि (व) भांडण जुंपणें

**खडाटी**—वि (गो) खडकाळ, दगडाळ (जमीन, शेत) [खडा]

**खडाड**—पु. खडखडाट, खडाखड पहा [ध्व]

**खडाडणें**—अक्रि मोठा गंभीर आवाज करणें, खडखडणें, गडगडणें, कडकडणें, खरखरणें [ध्व खडाड]

**खडाडता**—स्त्री खळखळ, क्षोभ 'एऱ्हवीं आयुष्याचें सूत्र विघडता। भूताची उमगे खडाडता।' -ज्ञा ७ १८२ [ध्व]

**खडाण**—वि १ हुशार, चलाख, समजस्या २ नाठाळ, त्रासदायक खाषाळ (जनावर) खडण पहा 'खडाणे आला पान्हा।' -ज्ञा १३ २०४ 'खडाणे धनूसी दुग्ध किंचित।' -रावि ४ ३८ 'खडाणा गाई न वळती।' -दा १३ १६

**खडाप**—पु (कु) खडक, खडपा पहा

**खडा मसाला**—पु आख्खा मसाला 'न वाटता फक्त स्वात बांधून जसाच्या तसा जो टाकतात त्याला खडा मसाला म्हणतात' -गृशि २ ५२

**खडारधाणी खडारी**—स्त्री (संगीत) एक गायनपद्धति ध्रुवपद गाणारा प्रसिद्ध राजा सम्मुखसिंग खडार गावीं राहात असे म्हणून त्याच्या ध्रुवपदगानपद्धतीस म्हणतात [खडार]

**खडाराणी**—स्त्री (बडोदें) राजाच्या गैरहजरींत त्याच्या खडाशी (कट्यार तरवार) जिचें लग्न लागतें अशी राणी -अहेर बहुमान पोशाखाचा नियम ४१ [खडा+राणी]

**खडारें**—न (व) रीठ पडके घर, मोडकळीस आलेलें घर 'घराचें खडारें झालें' [स खड म खिंडार]

**खडाल**—क्रिवि (व) फडाफड, भडाभड, स्पष्ट 'तो खडाल इंग्रजी बोलतो' 'त्यानें खडाल सांगितलें'

**खडावा**—स्त्रीअव, खडाव खडाय लाकडाची पादुका खडवा पहा लाकडी तळावर कापडी किंवा कातड्याची पट्टी ठाकून नेहमीं घालण्याचें पायतण कोठेंकोठें करतात साधारणत

गन्याची, स्वामी इ० नावाचा वापरतात. [सं. खाट+पद्; हिं. खडाव-ऊं; का. खडाव] पायाला खडावा असणें-तळ पाय सपाट नसून मध्य भाग पटांग यांच्या मधील भाग जमिनीस टेंकत नाहीं असा पोकळ पाय असणें; हें शुभचिन्ह मानतात.

खडाष्टक—न. १ अतिशय द्वेष; हाडवैर (क्रि० बाळगणें; धरणें). २ (फल ज्यो.) षडाष्टक; वधुवरांपैकीं एकाच्या राशीपासून दुसऱ्याची रास सहावी व दुसऱ्याच्या राशी पासून पहिल्याची रास आठवी आली म्हणजे त्या दोघांत खडाष्टक येतें यावरून वैर हा अर्थ. खडाष्टकाचे दोन प्रकार आहेत -(अ) प्रीतिषडाष्टक=प्रीति दाखविणारें खडाष्टक. (आ) मृत्युषडाष्टक=वैर दाखविणारें; पैकीं प्रचारांत दुसरें घेतात. [सं. षट्+अष्टक]

खडाळ—वि. दगडाळ; खडाटी पहा. म्ह० दोंत खडाळ पायरी सोंवाळ. [खड+आळ प्रत्यय]

खडाळणें—अक्रि. खंड पाडणें; सोडून जाणें; खंडित करणें [सं. खंड]

खडाळी—स्त्री. (ना.) खार (जनावर); चाणी; खडी. खड्ळ पहा

खंडाळी—स्त्री. खंवडाळी पहा.

खंडाळें—न. खणाळें; खणांचा ताणा [सं खंड+आलय, खणाळें अप.]

खडिंगा—पु. उभ्या विटांचा थर. खडंगा पहा. (क्रि० देणें, लावणें).

खंडित—वि खंडानें घेतलेलें; मक्त्यानें घेतलेलें; ठराव करून दिलेलें (काम). [खंड=मक्ता]

खंडित—वि. १ तुटलेलें, मोडलेलें, भग्न 'एकें हातीं दंतु। जो स्वभावता खंडितु।' -ज्ञा १.१२. २ मध्यें अडथळा आणलेलें, तहकूब केलेलें. ३ उडवलेलें, निरुत्तर केलेलें (शंका, प्रश्न इ०) [सं. खंड] ०पांडित्य-न. तुटपुंजी विद्वत्ता; थोतें ज्ञान

खडित—वि. (व्यापार) नक्त; ठोक. '१५ रुपयांचे वर किंतीही किमतीपर्यंत मागितल्यास एक रुपया खडित अडत घेऊं' -मुंव्या १८४ [खंड]

खडिया—पु उसाची एक जात, हा टणक असतो. -कृषि ४५२.

खडी—स्त्री. १ लिहिण्याच्या धूळपाटीवर घांसण्यासाठीं अथवा भिंतीला रंग देण्यासाठीं अथवा भिंतीसाठीं लागणारी माती, चिरण-पांढरट दगड, खडीचा दगड, खडूची माती. -पदाव ३७. 'खडीचा रंग चुन्यासारखा तयार होतो.' २ कापडावर नक्षी काढण्यासाठीं केलेलें मिश्रण (गोंद, अभ्रक), ८० चिकट रंग. ३ या मिश्रणानें काढलेली नक्षी, आकृति, खणावर, चढकथावर खडी काढून घेतात [सं खडी=खडू]

खडी—स्त्री. मापणाचें दुर्गे निशाणश्रद्धेपासून आहे किंवा काय हें ठरविण्यासाठीं करावयाचा विधि; देवभक्त निशाण पाहण्यासाठीं गड, तांदूळ यांची एकीवेगी करून पाहतात, ती समसंख्या आल्यास बाधा आहे व विषम आल्यास नाहीं.असें समजतात.

खडी—स्त्री. १ लहान दगड; सडकेवर घालण्याची गिट्टी. रस्त्यावर घालण्यासाठीं मोठे दगड वारीक फोडून त्यांची खडी करतात. २ (कु.) लाकडी तुळईतालीं बसविलेला दगड. [खडा]

खडी—स्त्री. (माण.) १ उंचवटा; टेकडी. २ घालाटी; सह्याद्रीच्या पश्चिम बाजूची पायथ्याची डोंगराळ जमीन, घाटाखालील कोस-दोन कोस डोंगरवट जमीन.

खडी—वि खडा पहा. १ उभा-भी-भें. २ खरा-री-रें. ३ स्पष्ट; खडेतोड. ०किंमत-स्त्री. स्थिर, ठोक किंमत. 'सोन्यारुप्याची खडी किंमत.' ०सट-वि (माण) स्पष्ट; खडेतोड. खडींखापरीं-खडींखापरीं पहा. ०चाकरी-स्त्री. सततची, एकसारखी, विश्रांति नाहीं अशी नोकरी. ०चोट-क्रिवि त्याच जागीं, त्याच क्षणीं; खडाखडी. ०ताजीम-स्त्री. सन्माननीय पाहुण्यांचे आगमनप्रसंगीं त्यास पद्धतशीर दिलेलें उत्थापन; पुरी ताजीम; याच्या उलट निम ताजीम. 'गुरुजीस पाहून व त्यास खडी ताजीम दिल्यानंतर.'-परिभौ ४७. ०तैनात -स्त्री. खडी चाकरी पहा. ०दुपार-स्त्री. ऐन मध्यान्हकाळ ०फौज -स्त्री. सतत तयार-नोकरींत असलेली फौज. ०रेघ-स्त्री. मोडी लेखनांतील एक प्रकार; खडे पहा. ०हुंडी-स्त्री. न पटविलेली; न स्वीकारलेली हुंडी. खडी हुंडी राखणें-हुंडीचा स्वीकार न करितां किंवा खोटी न म्हणतां ती आगळ राखणें.

खडी—खडीखाखर पहा.

खडी-खडीखपार-खाप—स्त्री. (खा.) मार; चानी.

खंडी—स्त्री. १ वजनाचें, जिन्नस मापण्याचें एक प्रमाण; एक मोठें माप. निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळी खंडी आढळते मुंबईकडे सामान्यत. २० मणाची खंडी असून विशिष्ट पदार्थांना ८ मणाची असते पुण्यास २० मणांची खंडी असते. २ (सामा.) पुष्कळ मोठी रास, प्रमाण याअर्थी. जसें-खंडीभर पोरें-मेंढ्या-काम-बोलणें. 'याचीं वनें निस्तारीं अठरा खंडी प्रकारें काव्य गाईन,' -वमा २ ३ जमिनीचें माप-१२०बिघ्यांचे ४ वीस संख्या (मेंढ्या, बकरीं इ० संबंधीं) 'त्या धनगराचीं २ खंडी शेरडें आहेत '[द्रा खंडि, का कंडुग] (वाप्र) ०लावणें-फसविणें, ठकविणें; युक्ति करणें. ०वर पेंढी होणें- २१ वें मूल होणें. ०गणती-खंडोगणती-१ खंडीखंडीनें, खंडीनें मोजता येण्याजोगें. २ (ल) अतिशय, पुष्कळ; अमाप. ०भर, ०वारी-क्रिवि. खंडीच्या मापानें, खंडीखंडीनें; खंडीनें मोजण्या इतकीं पुष्कळ. म्ह० १ खंडीस नवटकें (नवटकें=एकअष्टमांश

शेर )=फार अल्प प्रमाण, (सगळ्यापैकीं फार थोडें काम) 'अजून खंडीस मनटकें नाहीं.' (कामाचें–पिकाचें–देवघेवीचें–संपत्तीचें प्रमाण)=अद्याप फारसें कांहीं झालें नाहीं, अजून व्हावयाचें फार आहे. २ (व.) खंडीस १९ कडो फोल (वीस गोष्टींत १९ खोट्या गोष्टी) थापाड्या, थाताड्या, गप्पीदास, आठ हात लाकूड नऊ हात ढलपी या तऱ्हेच्या मनुष्याबद्दल योजतात.

**खंडींखंडीं पंडित**—वि. सर्व विषयांतील परंतु अर्धवट ज्ञान असलेला. [ सं. खंड ]

**खडीखाप**—वि. ( रूपंडावातील एक संज्ञा, त्यावरून ) फरारी; लपलेला ( नोकर; थायको; चोर ) –स्त्री. ( खा. ) खार

**खडीचा दगड**—पु अभ्रकाच्या जातीचा मऊ खडक; याचे पेले, वाडगा, नक्षीकाम, मूर्ती वगैरे करतात (इं) सोपस्टोन खडी पहा.

**खडीण**—वि (काव्य) खडण पहा.

**खडीसाखर**—स्त्री. खडे जमलेली साखर ही उंसाच्या रसापासून करतात, मिश्री, साखरेचे जे स्फटिकासारखे खडे बनवितात ते हिचे दोन प्रकार आहेत–पत्री व साधी. पत्री औषधाला वापरतात. साधारणत खडीसाखरेचा उपयोग औषधाकडे करतात [ सं खंड; म खडा+साखर, तुल० इं शुगर=साखर+कँडी (खंड) खडा] **खडीसाखरी भाषण**–न वायफळ पण गोडगोड भाषण 'लार्ड कर्झन यांचीं खडीसाखरी भाषणें त्यांच्या कृतीच्या विरुद्ध असतात ... ' –टि २.५३,

**खडु-डू**—स्त्री. १ एक प्रकारची चिक्कण माती; शाडू, पांढरी माती २ लिहिण्याचें किंवा फळ्यावर घासण्याचें मिश्रण खडी पहा ३ –पु एक प्रकारचा खनिज दगड, चुना व कॅर्बानिक ॲसिडवायु यांच्या कृत्रिम रासायनिक संयोगानें खडू बनतो तसेंच पृथ्वीवरील चुनखडीशीं हवेंतील कॅर्बानिक ॲसिडवायु संयुक्त होऊन त्यांच्या संयोगापासून खडू होतो. –वि गढूळ खडूळ पहा 'जैसें तोडिजे खडु पाणी। पारकेया।' –ज्ञा १६ ८९. [ स खडी ]

**खडु(ड)वा**—पु पर्वत, खडक 'परिसाचा खडुवाचि जोडला।' –ज्ञा ११.५३९.

**खडुळ**—न. गढूळ पाणी 'सरिता घेऊनि येती खडुळें।' –ज्ञा ११.५५७. –वि १ गढूळ, डहुळ 'नदनदींचें खडुळ। मानससरोवरींचे महूंचळ।' –शिशु ६४४ २ आरक्त, लाल ( डोळा ) [ खडु ]

**खडुळणें**—उक्रि. १ गढूळ होणें २ गढूळ करणें, लाल करणें ( डोळे ) ३ ( गो. ) अंगावर येणें; बेफाम होणें, खवळणें

**खडू**—स्त्री इतर भाग अथवा बाजू तासून काटण्यानें राहिलेला लाकडाचा अथवा दगडाचा पुढें आलेला भाग ( जोखड, दाराच्या झडपा, पुतळा, नक्षीकाम इ० तील उठावदार भाग इं० चा ) –वि. दाढी, मिशा फुटले नसलेला; खाडू.

**खडूली**—स्त्री. ( गो. ) अंगण.

**खंडूशाही**—वि खोट्या जरताराची ( लड ).

**खडे**—स्त्री. ( हिशेब ) धंदावरील पहिला डाव्या हाताकडील एक रकाना सोडून पुढील उजव्या हाताकडील तीन रकानेभर ओढलेली रेघ. रेघ पहा.

**खडे**—क्रिवि. ( कु ) कोठें.

**खडेकंकर**—पुअव. रत्न, हिरे वगैरेंना व्यापक, मोघम संज्ञा.

**खंडे करणें**—क्रि ( क ) बोटानें वेडावणें, वेडावण दाखविणें.

**खडेखडे**—क्रिवि ( ना. ) उभ्या उभ्या; हातासरशी. [ हिं खडेखडे ]

**खडे घाट**—पु नदीवरील कपडे वगैरे धुण्याचा घाट, व तेथील धुणें–वाळविणें ( कपडे वगैरे ). २ ( ल. ) पहिलें, ओबडधोबड काम. ३ (ल ) अतिशय स्वच्छता; धुतलेल्या कापडाप्रमाणें स्वच्छता. 'त्याचा नेहमीं खडेघाट असतो.' –वि. ( खड्याघाटाचा ) अतिशय निर्मळ, स्वच्छ, तेजस्वी; चकचकीत.

**खडेजंगी**—खडाजंगी पहा.

**खडेदोनप्रहर**—पुअव. ऐन दुपार, मध्यान्ह.

**खडेफोड**—वि. कठिण, त्रासदायक, दगदगीचें (धंदा, काम). [ खडा+फोडणें ]

**खडेबंद**—पु रोजखर्डा; कच्चाखर्डा, कच्चा जमाखर्च [खडा +फा. बंद ]

**खडें रान**—न ओसाड, खडकाळ प्रदेश. [ खडा+रान ]

**खंडेराव**—पु १ शंकराचा अवतार, पुष्कळांच्या मतें भैरवाचा किंवा स्कंध, कार्तिकेय याचा अवतार, जेजुरीचा खंडोबा. २ (ल ) उत्तेजन देऊन, चढवून भर घालून, काम करण्यास प्रवृत्त झालेला माणुस, घोड्यावर बसवलेला [ सं. खंडण; तुल० का खंडेय=एक तरवार+राव, खंडा+राय, सं. स्कंध+राव ] ०करणें–घोड्यावर बसविणें, चढविणें, प्रवृत्त करणें ( एखाद्या कार्यास ).

**खडेसाखर**—स्त्री खडीसाखर. 'तिनें ... आपल्या वहिणीचीं आसवें पुसलीं आणि आपले तोंडातला खडेसाखरेचा खडा तिचे तोंडात घातला –नि १४८.

**खंडेश्वरी**—स्त्री तरवार [ खड+ईश्वरी ]

**खडोखड-डी**—क्रिवि खडखड-डा अर्थ २ पहा. [ खडा द्वि ]

**खंडोबा**—पु खंडेराव पहा ( ग्राम्य ) सोळा (अठरा) गुणांचा खंडोबा–पु अतिशय खोडकर, दुर्गुणी मनुष्य–पशु –चा कुत्रा –पु खंडोबाचा वाघ्या, उपासक –ची कोठी–स्त्री.

खंडोबाचें निशाण, काठी. हे यांत्रेत धाटामाटानें मिरवितात. या काठीला तांबडे व पिवळे कापड गुंडाळून वर टोंकाला मोराची पिसें चवरीसारखीं लावलेलीं असतात —ची तळी-तळई-स्त्री. तारळ; विड्याचीं पानें भंडार वगैरे पितळींत ठेवून एळकोट म्हणून उचलतात ती. (क्रि० भरणें). 'खंडोबाची तळई खरी भरा हो.' —चंद्रप ६१.

**खडोळी**—स्त्री. (व.) खार; चानी.

**खड्ग**—पु. १ तरवार. २ गेंडा व त्याचें शिंग. ०पात्र-न १ गेंड्याचें हाड किंवा शिंग हें पवित्र मानलें असून याचीं भांडीं करतात. २ सोन्याचा मुलामा दिलेली चांदीची, पितळेची अथवा तांब्याची वांगडी-कडण [स.] ०पात्री-वि. गेंड्याच्या शिंगाचें केलेलें. 'मुद्रिका अखावी खड्गपात्री ।' —गुच २६ २४४. 'ही दवी खड्गपात्री आहे.' ०मृग-पु गेंडा. ०लता-तरवार 'आत्मज्ञानाचिया खड्गलता । छेदुनियां भवावस्था '—ज्ञा १५. २६६.

**खड्गूळ**—वि. (व.) खोडकर 'कृष्णा फार खड्गूळ आहे.'

**खड्डा**—पु खळगा; खांच; गर्ता; खणलेली खोल जागा. [सं. खन्=खणणें, प्रा. खड्डा=खाण]

**खड्डा**—पु (ना.) पुठ्ठा, पुष्टिपत्र, कार्डबोर्ड.

**खड्डी**—स्त्री (गो)१ पातळ भिंत. २ डोकें 'खड्डेस्वरण' =मागुनटीवर बसणें.

**खड्डुल-डूस-खड्डेल**—वि. (गो.) टकल्या.

**खडूपसुख**—न (गो.) त्रास, दगदग. -वि त्रासिक; श्रमी.

**खड्या**—पु समुद्रातील एक मोठा तांबडा मासा

**खड्या**—पु. ध्वाळण्याचें हाक देण्याचें, एक हत्यार. याला मूठ असते ती हातात धरतात व दुसरीकडे तिरपें टोंक छिनी सारखें असतें तें प्रथम विस्तवानें लाल केलेलें असतें त्यानें कथील लावतात.

**खड्या**—पु पाण्यावरचा एक पक्षी हा पांढरा असून मासे हुडकून खातो.

**खड्याखार**—पु टाकणखार, टाकणखाराचा एक प्रकार.

**खड्या नाग**—पु १ बचनागासारखी एक विषारी वनस्पति २ नागाची एक जात ह्याच्या अंगावर कवडुलें असतात. हा विषारी असतो.

**खड्या वाघ**—पु चित्ता, ह्याच्या अंगावर ठिपके असतात [खडा+वाघ]

**खड्याळ**—वि (गाय) खट्याळ पहा. 'खड्याळे गायीस दूध किंचित। परि लत्ताप्रहार देत बहुत ।' —मोल

**खड्ली**—वि. (माण) पांढऱ्या अंगावर काळे ठिपके असलेली (मेंढी).

**खण**—पु १ खणाळ्यांतील एका चोळीपुरता तुकडा; किंवा कापलेला भाग. हा दीड हात (१८ तसू, २७ इंच) लांबीचा असतो. जरीकाठी, बुटीदार, चौकटीदार इत्यादि खणाचे प्रकार आहेत. २ खोल्यांचा, जागेचा एक भाग, दोन खांबांमधील अथवा दोन तुळ्यांमधील अंतर. हें पांच ते सहा फुटापर्यंत असतें ३ इमारतीचा एक भाग; चव्हा; सोपा, (कु.) खोली. ४ होडींतील दोन वाडक्या फळ्यांतील जागा. या फळ्या बसण्या-साठीं असतात ५ पेटींतील, कपाटांतील, लिहिण्याच्या टेबला-तील एक भाग, कप्पा. 'या कपाटाला चार खण आहेत.' ६ स्थान, भूमि. 'जेथ निरंतरासि खण ।' —ऋ ४२. 'देहादिकाहुनि परतें । खण नाहिं ज्याच्या चित्तातें ।' —दास १ ३८४. ७ इमारतीचा-घराचा मजला, खणोखण पहा ८ (नाविक) मालठेवण्याची जागा. ९ कोठार; तळघर 'मस्त हुडे दुर्गांचे खण ।' -ऐपो ९. १० (छापखाना) खिळे ठेवण्याच्या चौकटींतील कप्पा.

**खण**—पु मकरसंक्रांतीला स्त्रिया पांच सुगडांना कुंकू लावून वाटतात त्यास म्हणतात. [सं क्षण]

**खण**—पु एखादा खाद्यपदार्थ न खाण्याचा नियम (पोळीचा, खिरीचा, भाताचा खण), एखाद्या देवतेप्रीत्यर्थ धरलेला निर्बंध. (क्रि० धरणें) [सं खंड]

**खण**—पु (राजा.) खाण [सं. खनि] म्ह० (गो.) खण तशी माती नी आवें तशी धुनी.

**खणकत**—स्त्री. (राजा.) कुळकट, कुळकथा; स्वत च्या घरच्या अथवा पूर्वजासंबधीं गोष्टी, कथा [खाण+कथा]

**खण-कन-कर-दिशीं**—क्रिवि. खणखण असा आवाज करून [ध्व]

**खणकरी**—पु खणण्याचें काम करणारा. 'तंव विदुरें धाडिला खणकरी ।' —कथा ५ १२४. [खणणें+करणें]

**खणका**—पु १ खणदिशीं होणारा आवाज, खडाजंगी, भांडण, गोंधळ, आरडाओरड, गलबला (पुढीलप्रकारचा)-तोफेची सरबत्ती, मेघगर्जना, हत्याराचा खणखणाट, रागाचा झपाटा, रागानें पाय आपटणें, खडसावणें, कडाडणें. २ कणका, कनका पहा. [ध्व खण] ०दणका पु खडाजंगीचें भांडण.

**खणकाविणें**—उक्रि जोरानें बोलणें, खरडपट्टी काढणें, दरडाविणें; रागानें बोलणें, शिव्या हासडणें, धमकावणें [ध्व. खणका]

**खणणी**—स्त्री हलक्या किंमतीचें कापड. खंडणी पहा

**खणकुदल**—स्त्री १ अतिशय टोंचणी, तगादा, जाचणी, जोराचा आग्रह, पाठीस लागणें, जाच करणें (क्रि० घेणें) २ निश्चयाचा, निर्धाराचा बेत, निग्रह, हट्ट, जबरदस्त व्यासंग (एखादा विषय साध्य करण्याचा, थोडें सोडविण्याचा) (क्रि० घेणें) [खणणें+कुदळ]

**खणंक**—न खणखणाट, खडाजंगी (शस्त्रांची) खणका पहा 'झालें मोठेंचि त्या रणीं खणंक।'-मोकर्ण ३१ ५१ [ध्व]

**खणक्या**—वि १ खमक्या, कणक्या, खणखणीत, रोख ठोक्या, दांडगा २ झपाटयाचा, आवेशी, उत्साही [खणका]

**खणखण-णा**—क्रिवि घणघणा, दणदणा, खणखण आवाजानें, घटा, चर्मवाद्य इत्यादिकांचा आवाज करून 'खण खण खण खण वाजे ढोल रे।'-दावि ४३१ 'खणखणा हाणी खडगा प्रल्हादासी।' [ध्व]

**खणखणणें**—अक्रि खणखण शब्द होई असें वाजणें आवाज करणें, दणदणाट होणें [खणखण]

**खणखणाट**—पु मोठा खणखण आवाज, दणदणाट, घण घणाट असा सारखा मोठा ध्वनि 'आकाशीं खणखणाट होत। असभाव्य।'-कथा १ १३ १२१ [ध्व]

**खणखणीत**—वि १ मोठी गर्जना करणारें (आवाज, घटा) खणखण वाजणारें २ निरोगी, धडधाकट (म्हातारा) ३ खडखडीत, स्पष्टवक्ता, मनमोकळा (माणूस), उघड-उघड, स्वच्छ, सरळ, प्रामाणिक (भाषण, व्यवहार) ४ खडखडीत वाळलेला (धुतलेला कपडा), कडकड वाजणारें, सळसळणारें (कोरें कापड) [ध्व खणखण]

**खणखापडी**—स्त्री खणपट पहा

**खणणें**—उक्रि १ खोदणें, उकरणें २ गजणें, खाणें, जळण (धातु वगैरे), चरणें, आतून चावणें, शोषणें (गळू वगैरे) ३ (ल) (भांडण) उकरून काढणें, ओवास आणणें, तोंडून काढणें (मतप्रदर्शन, शाबासकी वगैरे) ४ पोखरणें (पाण्यानें भिंतीचा पाया) (गो) 'मोव यय खणचें' ५ उकळणें जुलमानें काढणें, खणून काढणें (पैसा, गुह्य) ६ जोरजोरानें काढणें (ओकाऱ्या, खोकला वगैरे) 'तो रडें खणून काढतो' ७ अडून बसणें 'त्यानें त्या पदार्थामाठीं खणलें' =तो त्या पदार्थासाठीं अतिशय अडून बसला [स खन्, फेंजि खन्]

**खणती**—स्त्री १ खणण्याची क्रिया, खोदणें, उकरणें (क्रि० लावणें, करणें) 'पुण्याला खणती लावून सर्व द्रव्य होळकरानीं नेलें' २ ठुमठुमणें, शोषणें, जळजळणें, कुरतडणें, आग होणें (जखम, खत याची) ३ (ल) टोंचणी, जाचणी, ससेमिरा, सततचें ठुमणें लावणें, मागें लागणें (क्रि० घेणें) ४ जोराचा, निश्चयाचा दृढ व्यासंग, हव्यास (अभ्यासाचा) ५ शोधण, ओढ (क्रि० लावणें) [खन्]

**खणतें, खणतोड**—न कुदळ, पहार वगैरे जमीन खोदण्याचें, जमिनींत भोंक पाडण्याचें हत्यार [स खनित्र, प्रा खणित्त]

**खणपट**—स्त्री निग्रहानें, निश्चयानें पिच्छा पुरविणें, आग्रह, हट्ट, निग्रह (रुकार मिळण्यासाठीं, लहान मुलाचा हट्ट, रुसवा, एखाद्या गोष्टीचा, अभ्यासाचा पिच्छा) (क्रि० घेणें, घेऊन बसणें) 'त्यानें खणपट घेतली तेव्हां तें कार्य सिद्धीस गेलें' **खणपटीस लागणें-बसणें-येणें**-पिच्छा पुरविणें, शेवटास नेणें [खणणें]

**खणपट**—न तरवारीस किरकोळ डागिन्यास वगैरे निंदाव्यजक शब्द

**खणपडें**—न ओल्या जमिनींतील ढेंपें काढण्याचें लांकडी औत [स खन्+पत्र]

**खणपी**—वि (गो) खणणारा

**खणपूट-स**—न १ टोंक, टिलपी, सल, धस, ज्यानें फाटलें जाईल असा पुढें आलेला भाग (क्रि० भरणें, जाण शिरणें, लागणें). २ झाडाचा खुट, ओंडका, यावरून मूठ (तरवार, चाकू, भाला, झाडू वगैरेची), चोरणाच्या पायाचा खुट ३ (सामा) एखाद्या जिनसाचा अवशेष, थुडका, अवशिष्ट भाग

**खणाखण-णां**—क्रिवि खणखण आवाज करून, होऊन खणखण पहा [ध्व]

**खणाखणी-जंगी**—स्त्री परस्पर मोठा कज्जा, हातघाईची लढाई, भांडण, तंटा, खडाजंगी पहा 'मोठी होती खणाखणी।'-ऐपो ८५. [ध्व]

**खणाण**—पु खणखणाट, विशिष्ट आवाज [ध्व खण]

**खणाणणें**—अक्रि खणखण असा आवाज होणें, करणें, खणखणणें

**खणाणां**—क्रिवि खणखण आवाज करून, खणदिशीं खोंचून 'लागला हृदयिं बाण खणाणा।'-आता १६

**खणाळें-खणोरें**—न. वायकाच्या चोळयाच्या खणाचा एक तागा, तीन-चार खण होतील एवढा कापडाचा तुकडा [खण+माल्य]

**खणिया**—स्त्री पटांगण 'तेय खणियाची सोवानी। काई साधो।'-शिशु ६४६ [खण]

**खणीक**—वि हट्टी, खोडयाळ 'मोठा, खणीक दधिघटा ग्राशीत घटघटा।'-अमृत ४६ [खणणें]

**खणीखापडी**—स्त्री खणपट पहा

**खणीचा कोळसा**—पु दगडी कोळसा, खाणींतील कोळसा (इ) कोल्ला हा प्रथम बनविलेला प्रतिशब्द

**खणील**—स्त्री आवण काढणी, उपटणें (भाताचें रोप दुसरीकडे लावण्यासाठीं), खणती.

**खणुवाल**—वि १ खणखणीत, खण असलेला, खणखडीत 'अप्रवृत्तीचे खणुवाळें। फाक निघती सरळे।' –ज्ञा १५.१५५ २ कठिण, निष्ठुर 'तैसा कर्माऐल होवाडु । खणुवाळा होय।' –ज्ञा १८ १८५ [खण]

**खणोखण**—वि अनेक खण किंवा मजले असलेलें 'खणो खणींची मंदिरें उभारिलीं राये।' –शिशु १ ८ २० [खण+खण]

**खण्णी-खण्णूक**—स्त्री खडणी, खडणूक पहा

**खत**—न हाताचा लेख, दस्तैवज, कर्जरोखा, कबूलखत, गहाण खत फरोक्तखत पहा 'या जमिनीबद्दल काहीं खतें तुमच्याजवळ आहेत काय?' [अर खत्]सामाशब्द– ०किताबत–स्त्री पत्र पत्रव्यवहार 'खतकिताबतीनें खबरगिरी करावयासही याद होत नाहीं' –रा ३ ९० ०खतूत–न कागदपत्र [अर खुतूत, खत्चें अव ] ०खूत–न खतपत्रें खतखतूत पहा 'विश्वासु ठेवो घेऊनि जात। खतखूत हारवलें।' –एभा २३ १२८ ०पत्र–न दस्तैवज, खरेदी विक्रीचा–कागद ०फाडणें–अक्रि १ करार कागद फाडणें २ (ल) संबंध तोडणें 'जन्ममरणाचें उठवीं धरणें। खत फाडणें विषयाचें।' –एभा ११ १४९२ ०वेजा–वचनचिठ्ठी, प्रामेसरी नोट 'त्यापैकीं तुम्ही आपणास खत–वेजा दोनशें दिधले, बाकी सेंभर दान उरले' –रा १५ ५७ [फा खत+वजा=ऐवजी]

**खत**—न उत्तम पीक यावें म्हणून शेतात घालावयाचें केर कचरा-शेणकूट वगैरेचें कुजलेलें मिश्रण, राब [दे प्रा खत=गोवर] खतणें–अक्रि मलीन होणें, खराब होणें, साचणें 'जो तुम्हारी हरि नामासी । पाप त्यापाशीं खतलें।' –एभा ५८९ ०मुताचा–वि खत घातलेला–ले (शेतवगैरे) ०मूत–न राब ०मूत एक असणें–एकाच कुळातील वंशातील असणें (गुरे वगैरे) ०मूत ओळखणें–दुधावरून गाय-म्हैस ओळखणें ०वड, खताड–न १ उकिरडा २ गू मळ –वि १ मलमूत्राची, उकरड्याची (जागा) २ खतमूत घातलेलें (शेत) ०विणें–सक्रि खत घालणें (शेतात)

**खत**—न १ व्रण, डाग, जखम 'याउनि एकेंचि इतर होता तत्काळ या परासु खतें।' –मोशांति ७ २८ 'त्याच्या वेस खतावरी। ते तुरुतुरी दुखवूनि।' –तुगा ३१९६ २ ओढलेली रेघ, लेखणीचा फटकारा ३ (सुतार धंदा) लाकडावर आखण्या करिता केलेली आखणी, 'तीन सुतावर खत मार.' [स क्षत] ०खशी–रेघ, आकृति

**खत**—पु डोळ्यावर लेप देण्यासाठी तव्यावर लाकडी घत्यानें खलून अनेक औषधांचें तयार केलेलें मिश्रण खत्ता पहा [ध्व]

**खत**—न न्हावी कापतो ते दाढीचे केस [अर खत=दाढी, मिशा]

**खंत**—स्त्री १ खेद, खिन्नता (क्रि० वाटणें) २ नैतिक किल्मिष, खोडकरी, खोड, आग, चीड, तिटकारा ३ मानसिक दुःख, हुरहुर, झुरणी (क्रि० घेणें, देणें, धरणें) 'त्या मुलाने आईची खंत घेतली' [स खिद्=खेद पावणें, खिन्न होणें] ०खोड–स्त्री जनावराचें व्यंग, उणीव, दोष (खंती वगैरे जोगा) [स क्षत+खोड] ०खार–वि नेहमीं खंत घेणारा, बडबडा, चोखंदळ, दोषदर्शी.

**खंत**—स्त्री जमीन खोदण्याची कुदळ, खनित्र [स खन्]

**खतखत**—पु १ द्रवपदार्थास अग्नि सूर्य वगैरेंची उष्णता लागल्यामुळें त्यातून आवाज निघण्याची अवस्था २ (ल) उद्दीपक कारणामुळें उत्पन्न होणारी उत्कंठा, आवेश 'खतखत मनीं होती।' –अक हरिराज मुद्गलांचें भाषांतर ४८ 'तो बडेबाकडे बोल लागताच यांस बोलण्याविषयीं खतखत आली' –क्रिवि (खतखता) खदखद आवाज करून, आवाजयुक्त रीतीनें [ध्व खदखद्]

**खतखतणें**—अक्रि १ शिजताना, उकळताना वगैरे खदखद असा आवाज करणें (चुन्यात पाणी टाकलें असता, पाणी उकळत असता) २ उकडणें, तप्त होणें ३ उत्कंठित होणें, अधीर बनणें

**खतखताविणें**—सक्रि उकळी आणणें, खदखद करण्यास लावणें, खतखतणें प्रयोजक

**खतखतें, खतखतलें**—न (कु गा) दोन–चार भाज्यांची एकत्र केलेली पालेभाजी, सर्व प्रकारच्या भाज्यांची मिसळ

**खतखतें, खताखता भात**—पु (कु) ताकात पुन्हां शिजविलेला शिळा भात

**खतडला**—वि (व) बावळट, दृष्टीपुढें नकोसा वाटणारा, 'खतडल्या बानाचा माणूस' [खत]

**खतम**—वि समाप्त, पूर्ण, खलास 'लढाई खतम झाली' –होबै ८४ (क्रि० करणें) [अर खात्म] ०करणें–क्रि पुरें करणें, संपविणें

**खतमी**—स्त्री वदाळी बीज –मुवया १५५ [अर]

**खतरा**—पु १ भय, धोका, संकट २ शंका, संशय, घोटाळा [अर. खत्र्=खत्रा]

**खतरी**—स्त्री रेशमी कापड विकणारी जात आणि व्यक्ति खत्री पहा [स क्षत्रिय]

**खतलें**—वि धरणेकरी –दको

**खतवट-टी**—स्त्री पाथरवटाचा लहानशी गुण्या

**खता**—स्त्री १ संकटाची हुरहुर, चिंतायुक्तभीति २ तोटा, नुकसान ३ दोष अपराध, उल्लंघन 'खन्दार खता, पाणे गाईंस दाना नाहीं' –रा ८ ४४ 'अत पर नवाब खता करितील

कदाचित् कालक्रम दुर्बुद्धी निर्माण जाली तर केलें पावतील ' –इम १९६ ४ संशय, विल्मिष, किंतु, मळ 'मग नि शेप खता फिटे । मानसींचा । ' –ज्ञा ४ २०८ [अर खता=चूक, दोष] म्हृ० 'दया उधार खता रोकडी'=दया दाखविल्याचें फळ कालातराने मिळतें पण अपराधाबद्दल तावडतोब शिक्षा होते

**खता**—पहा खत्ता पहा

**खताईण**—स्त्री (छत्तीसगड) मोलकरीण

**खताखानत**—स्त्री लगाडी 'काहीं खताखानत जाली नाहीं, खामगांवकर मरे जाले' –रा ६ १११ [अर खता+खियानत्]

**खताम**—न घोड्याच्या गुडघ्याला होणारा एक रोग –अश्वप २ २८८ [स क्षत]

**खताली**—पु (व) रायपुराकडील मजुरी करणारे लोक –स्त्री खताईण पहा

**खतावणी**—स्त्री १ रोजकीर्दीतील निरनिराळया रकमा खातेवार ज्या वहींत नोंदतात ती वही २ रोजचा जमाखर्च खातेवार माडण्याची क्रिया [अर खत्त] ०चर घालणें–(कार कुन लोकात) कठिण कामावर लावणें

**खतावणी**—स्त्री सुताराचें लाकडावर रेघा मारण्याचें एक हत्यार [स क्षत=रेघ, अर खत्=रेघ]

**खतावणें-विणें**—अक्रि उकिरड्यासारखा होणें, कुजणें, घाण येऊ लागणें –सक्रि शेत किंवा जमीन खत घालून तयार करणें [खत]

**खतावणें-विणें**—सक्रि कीर्दीतील रकम खतावणींत वार झाल्याबद्दल रोजखर्ड्यावर खात्याचीं नावें नोंदणें उदा० स्वारी राजमडळ, शिलकबद खासगत इ०, खातेवार करणें, खात्यात घालणें 'रोजकीर्दी जमा धरुनी सकळ । खताविला काळ वरावरी । ' –तुगा १८६४.

**खतावणें-विणें**—उक्रि भिंतीवर रेघा, आकृती काढणें

**खंतावणें**—स्त्री १ चिळस, वीट येणें २ हुरहुर, खुरखुर लागणें, वाटणें, तळमळणें [खत]

**खंती**—स्त्री १ अस्वस्थता, अशाति (क्रि० धरणें, घेणें) २ (काव्य) चिंतायुक्त शका, उत्कठा 'जिवलगाची खंती । जेणें काळें वाटे चित्तीं । ' –दा २ ५ १९ रामा मज तुझी बहु खती । ' ३ कटाळा, तिरस्कार बहु एकांतावरी प्रीति । जया जनपदाची खती । ' –ज्ञा १३ ६१३ ४ खिन्नता 'म्हणूनि करू लाहे खती ' –ज्ञा१८ ८० सर्व अर्थी खतें पहा –वि १ हुरहुर लागलेला, अस्वस्थ खिन्न 'तें ऐकून भोज राजा फारच खती होऊन माघारा फिरला –सिंहासनबत्तिशी १२ २ साशक, चिंतातुर [स खिद्–खत]

शको २ ४६

**खंती, खंतें, खंतोड**—पु खणती वगैरे पहा

**खतीब**—पु मशिदींत खुद्बा पढणारा, प्रवचनकार, धर्मप्रचारक [अर खतीब्] खतिबी–धर्मोपदेशकाचा धदा, खतिबाची वृत्ति, पेषा [अर]

**खतू**—वि (व) फारच अशक्त, दुर्बल 'मुलगा दिसायला खतू दिसतो ' [खत]

**खतें**—न (कों) खतनी शत [स क्षेत्र, प्रा खेत्त, हिं खेत]

**खतेला-ली-लें**—वि १ भरलेला, ग्वतलेला, लिप्त, व्याप्त, साचलेला 'कीं आधारें खतेलें अबर । ' –ज्ञा १६ ७७ 'कलियुगीं घोर पाप हें खतेलें । स्वधर्म साडिलें चहू वर्णी । ' –ब २८९. २ मळलेलें, घाणेरडें 'पहा दर्पण खतेलें । ' –दावि ४४९ [खत]

**खतोड**—वि भरपूर खत घातलेलें (शेत वगैरे) खतवड पहा

**खतोड-डा**—पुस्त्रीन १ खतवड, पाथरवटाचा लघुकोनयुक्त गुण्या २ एक प्रकारची पहार [स क्षत, अर खत्री=भाला]

**खतोंडें**—न (व) खट वाहण्याकरिता गाडीला बांधलेलें तुन्हाट्याचें साधन, कुरकुल वगैरे [खत]

**खतोपला**—वि (व) द्रोही, मत्सरी. [खती]

**खंतोस**—पु (व) मत्सर, हेवा ०खोर–वि मत्सरी

**खत्ता**—पु अफू, तुरटी, हळद, लिंबाचा रस इत्यादि एकत्र करून ताब्याच्या भाड्यात खलून केलेलें मिश्रण हें डोळे आले असता डोळ्यास व डोकें दुखत असल्यास डोक्यास लावतात.

**खत्ता**—स्त्री तोडणें, कमी करणें, कमीपणा आणणें, नुकसान, अपाय 'त्याचे इज्जतीस खत्ता न करता निरोप देऊ ' –रा ६ ३६२ –वि भग्न, नष्ट 'अवधान अगदीं खत्ता जाहलें' –याव ४१ [अर खत्अ किंवा खता]

**खत्ता**—स्त्री. खता पहा

**खत्रड, खत्रूड**—वि १ दुष्ट, त्रासदायक खडतर आणि खचरट पहा २ कृश, रोड, रोडका मरतुकडा, पाप्याचें पितर, बुळा, नामर्द, अजागळ (मनुष्य, पशु) ३ खट्याळ, खोडगा, ओंगळ, ह्री नादान, कुचकामाचा (बायका, मुलें) [खरतर–खडतर?]

**खत्रप**—न (प्रा) खत (शेताचें)

**खॅत्रपाळ**—पु (गो) क्षेत्रपाळ, विशिष्ट स्थानाचें रक्षक दैवत, स्थानदेवता [स क्षेत्रपाळ]

**खत्रा**—पु १ धोका, भीति 'मार्गांचे खत्र्यामुळें पाठविली नाहीं' –दिमरा २ १९४ २ शका, घोटाळा, कुतर्क, सशय (क्रि० बाळगणें) 'ज्याच्या मनात खत्रा असेल त्याचें कळेना, एक बाप असेल त्याजकडून तरी दुसरी गोष्ट घडणार

नाही.' –रा १०.५२. २ भयपळा; हरकत. [ अर. नशा=भीति, धोका ]

**खत्री**—पु. एक हिंदु जात; या जातीचा माणूस. हे पीतांबर, मधू इ० विणण्याचें काम करतात. [ सं. क्षत्रिय ]

**खंदक**—पु. १ किल्ला किंवा गांव यांच्या भोंवतीं खणलेला चर. यांत पाणी सोडतात. २ मोठा खळगा; खाई. ३ (ल.) पोकळ; अभावयुक्त सामग्री. 'तुम्ही पण अगदींच कसें करंट पॉलिटिक्सचे खंदक आहांत हो!' –नाकु ३.७६. 'अकलेचा खंदक' [ सं. खातक; अर. खंदक ]

**खद्‌का**—पु. १ खदखद अशी उकळी, कढ. ( क्रि० येणें ). २ (ल.) उमाळा (प्रीतीचा, ममतेचा); हुंदका; आवेग (रडण्याचा, हंसण्याचा); उबळ; झटका (दमा, खोकला इ० चा); जोराचें उधाण ( खळज इ० चें ) ( क्रि० येणें ) [ ध्व. ]

**खदखद**—स्त्री. १ खतखत; उकळणाऱ्या पदार्थांचा आवाज. २ ( ल. ) आवेश; चेतना. [ ध्व. ]

**खदखद-दां**—क्रिवि. १ हं: ! हं: ! हंसण्याचा प्रकार. 'येक खदखदां हांसती। सावकाश।' –दा १८.९.१३. २ उकळणाऱ्या पदार्थांचा आवाज होतो तसा आवाज करून.

**खदखदणें**—अक्रि. खदखद असें उकळणें, शिजणें; खदखद आवाज होणें. 'पेस खदखदून पांच-पांच, सहा-सहा हात उंच होई.' –पाव्द ११२. [ ध्व. ]

**खदणा**—स्त्री. खोदणी. 'तेथुसें अरिराए खदणी। विक्रम सेतु।' –शिशु १०३६. [ सं. खन् ]

**खंदणें**—अक्रि. अपमान करणें; अवमानणें. –शर. खंदोस पहा.

**खंदणें, खदणें**—सक्रि. खणणें; खोदणें.

**खदरी**—वि. (कुभार, धनगरी) काळ्या-पांढऱ्या रंगाचा. 'ही मेंढी खदरी आहे.' [ सं खदिर ]

**खंदल**—न. ( गो. ) एक वन्य फळ.

**खदलबदल, खदलाबदला, खदलामुबादला**—स्त्रीपु १ अदलाबदल; बदलाबदल, देवघेव. (सामा.) व्यापार. २ बदला देणें ( सैन्य, चाकर ) [ बदल द्वि. ]

**खंदस्त**—वि. १ चलाख; हुशार, जोमदार. याच्या उलट जड; रेंगया; रेंगाळणारा. २ कडक; निश्चयी; निर्भय. याच्या उलट मऊ, गयाळ, मूर्ख. ३ तापट; पाणीदार (माणूस, जनावर). [ फा. खंदा=हास्य ]

**खंदस्त-स्ती**—स्त्री. वैर; शत्रुत्व. स्पर्धा. 'बहु कृपण बहु खंदस्ती' –दा ५.७.३५ [ खंदा ]

**खंदळाखंदळ**—स्त्री. धुडवाधुडव; गडबड; धांगडधिंगा. भात खंदळाखंदळ क्षणभर बहुतच केली.' –भाव १५३.

**खंदा**—पुस्त्री. मत्सर; द्वेष; आकस. खंदोस पहा. ( क्रि० लावणें; करणें ).

**खंदा**—वि. १ अतिशय पाणीदार; तडख ( घोडा ); तापट; रागीट; साहसी, धाडसी ( माणूस ); खोडकर; स्वैर ( मूल ). [फा. खंदा=हास्य. ०मुल सं. स्कंद्=उडणें, उडी मारणें] ०तट्टू –पु. आवेशी; धाडसी (मनुष्य, मूल). ०धार–पु. अतिशय पराक्रमी मनुष्य.

**खंदा**—पु. ( वे. ) उसाचें पाचट.

**खंदा**—वि. ज्ञानी; शहाणा. [ फा. कुंदा, कंदा ? ]

**खंदाडी-डे**—स्त्री. खांदाडी पहा.

**खदान**—स्त्री. ( व. ) खाण. 'मुरमाची खदान सांपडली.' [ स. खनि ]

**खंदारा**—वि. १ ( संगीत ) खंदारी वाणी (गायनांतील एक तऱ्हेची वाणी ) गाणारा. खंडारवाणी, खंडारी पहा.

**खंदारी**—वि. कंदाहरी; कंदाहारचा ( उत्तम घोडा इ० ).

**खंदारी वाणी**—स्त्री. गाण्यांतील एक तऱ्हेची वाणी. [ खंडारी पहा ]

**खदिर**—पु. खैर; खैराचें झाड. ०सार–पु. कात. 'सर्व सारांचें शुद्ध सार। तो मी होईन खदिरसार।' –एभा १२.५५१. [ सं. ] **खदिरांगार**–पु. खैराचा निखारा. 'अथवा निधान हें प्रगटलें। म्हणोनि खदिरांगार खोळे भरिले।' –ज्ञा ९ १४९.

**खंदील**—पुन. कंदील पहा.

**खदुळण. खदूळ**—गढूळणें, ( गो. ) खदोळ. गढूळ पहा.

**खंदे**—न. एक लहान पक्षी.

**खंदोस**—पु १ शत्रुत्व: वैर. मत्सर: धुरस; हेवा. २ मत्सरयुक्त स्पर्धा. ( क्रि० बांधणें; धरणें: बाळगणें; लावणें; चालविणें). [ सं स्कद्=बाहेर पडणें, गळणें. हेटाळणें ? ]

**खद्दक**—वि. ( व ) खगव. 'तो माणूस फार खद्दक आहे.'

**खद्योत**—पु काजवा; शेपटीमध्यें प्रकाश असणारा किडा. 'येऱ्हवी भानुतेजीं काय खद्योता। शोभा आथी।' –ज्ञा १.६७. 'खद्योतें फुलविलें रविपुढें-ढुंग।' –तुगा २०६७. [ सं. ]

**खद्रुड**—खरड, खरूड पहा.

**खनक**—न ( गो. ) खदक शब्दाचा अपभ्रंश.

**खनका**—खणका पहा.

**खनतोडा**—पु फूटभर लांबीचा लोखंडी दस्ता. याच्या टोकास टांकीसारखें हत्यार असतें. हे मांगांचें घरफोडीचें हत्यार आहे. खतोंड पहा.

**खनन**—न. १ खणणें, खोदणें. २ पुरणें ( प्रेत ). [ सं. खन्=खणण ] ०दहन–न. पुरणें आणि जाळणें ( प्रेत ). [ सं. ]

**खननीय**—वि. खणण्यास योग्य. [ सं. ]

खनपट—खणपट पहा.

खनपट—स्त्री. (व.) १ शोवाड; कानफट पहा. 'खनपटींत दे.'

खनपट—पु. (व.) क्षुद्र अलंकार; दागिना (तिरस्कारसूचक) 'दोन खनपट आहेत अंगावर.'

खनपूस—खणपूट-स पहा.

खनवादी—वि. मांत्रिक; मंत्रतंत्र करणारा 'वीं मोक्षनिधी। धाडोळिते उपडे। खनवादी जे।' –ऋ २४.

खनाळ—न. गुहा; कडेपाट; एकांत स्थळ. 'खनाळामधे जाऊन राहे। तेथें कोणीच न पाहे।'–दा १५.२.१३. [सं. खनि+आलय]

खनि—स्त्री. १ खाण. २ (ल.) कोठार; सांठा; आगर. उ० सुखखनि=सुखाची खाण, सौंदर्यखनि. [सं.] ०खोदनशास्त्र–न. जमिनीच्या पोटातील खनिज द्रव्यें शोधून व खणून काढण्याचें शास्त्र. या शास्त्राची व्याप्ति भूगर्भांतील खनिज पदार्थ शोधून काढण्यापुरतीच नसुन भूपृष्ठावरील पदार्थांचें खनन करण्याचाहि या शास्त्रांत अंतर्भाव होतो.

खनिज—पु खाणींतील पदार्थ. धातु, खडू, गार, रत्नें, चिकण माती, स्लेट, टांकणखार इ० पदार्थ खनिज होत. (इं.) मिनरल 'वनस्पतीचा अगर प्राण्याचा एखादा अंश खडकात गुरफटलेला असला म्हणजे त्याला खनिज म्हणतात.'–मृ ५४. –वि. खाणींत असणारा; खाणीतील खणून काढलेला. ०कोटी–स्त्री. खाणींतुन काढलेल्या पदार्थांचा वर्ग; (इं.) मिनरल किंगडम. ०डांबर–न. उघड्या हवेंत पेट्रोलिअम ठेवलें म्हणजे तयार होणारा पदार्थ –पदाव १.१०१. ०विज्ञान-शास्त्र–न. पृथ्वीच्या पाठीवर सांपडणाऱ्या द्रव्यांच्या जाती व वर्गीकरण, तीं द्रव्यें सांपडण्याचीं ठिकाणें, त्याचे गुणधर्म व उपयोग यासंबंधीं सामान्य माहितीचें या शास्त्रांत विवेचन केलेलें असतें.

खनित—वि. खणलेलें. [सं.]

खनित्र—न. खोरें; फावडें; खणण्याचें कोणतेंहि हत्यार. 'महापातक कंदखनित्र' [सं.]

खंन्या—उद्गा. (व.) तुच्छतादर्शक शब्द. 'मी काय त्याला काढून देणार आहे खंन्या?' [अ. खन्नस=सैतान?]

खप—पु. १ विक्री; व्यय; खर्च, वासलात, वाटेस लावणें, गपविणें (जिन्नस, माल); भक्ष्य, उपभोग्य पदार्थांचा जो विक्रया दिकेकरून विनियोग तो. २ काबाडकष्ट, मेहनत, श्रम; खपणें 'बाराहि महिने शेतांत खप करावा तेव्हां पोटापुरतें धान्य पिकतें' [सं. क्षप्?]

खप—पु. खत (फळझाडासाठीं).

खपक्या—वि. खमक्या; हुषार; चलाख; जोरदार.

खपखप—स्त्री. (गो.) धडकी. (वाप्र.) ०आयलों–(गो.) धडकी भरली. खपखचें—(गो.) धडकी भरणें.

खपट—न. १ मांसाचा खवला. २ त्यासारखा सोन्याचा अगर रुप्याचा दागिना ३ कणकेचा गारुर, आरोळी. ४ डोळ्यावरचें कातडें. (इं.) मेंब्रेनला हा प्रथम प्रतिशब्द योजला गेला. 'पक्षी खपटें सईल करून डोळे चपटे करितात.'

खपटी—स्त्री. गुळाची किंवा दुसऱ्या वस्तुची कढवून खाण्यासाठीं केलेली वडी [खपट]

खपड—खप्पड पहा.

खपणें—अक्रि. १ काम करणें; मेहनत, कष्ट करणें. 'इंग्लंडसारख्या देशात सार्वजनिक कामासाठीं अहोरात्र मोठमोठे लोक खपतात ते ह्या करितांच.' –टि ४.१४८. २ विकलें जाणें; खप होणें; विकत जाणें; गिऱ्हाईक मिळणें (माल इ० ला). 'बाजारात नासका माल खपत नाहीं.' ३ (ल.) खर्चणें; व्यय होणें; संपणें. 'घरातलें धान्य सर्व खपलें' ४ वाटेस लागणें; मरणें. 'दुसरे दिवशीं हरिच्या दृष्टिपुढें अर्जुनाग्रें खपला।' –मोकर्ण १.२. ५ आवडणें; सोसणें. 'ती सवत तुला खपणार नाहीं' –कोरकि २९. [सं. क्षपणम्; क्षप्=घालविणें]

खपता—वि. (ग्रा.) भयंकर; तापट; क्रूर. [अर. खिफ्फत=भारदस्तपणाचा अभाव]

खपती—वि. १ निश्चयी; निर्धारी; आग्रही; आपला उद्देश शेवटास नेणारा; चिकट. २ खंदा; चलाख; हुषार; जोमदार (कामाला). ३ तापट बुद्धीचा, तल्लख, पाणीदार. [खपणें]

खपती—वि. १ रागीट; तामसी; चिडखोर; दीर्घद्वेषी. २ (ना.) वेडा. खती पहा. [खपता]

*खपन*—न. (गो.) प्रेत झांकण्याचें पांढरें वस्त्र, धवट. कफन पहा. ०खायरा–वि. प्रेतावर टाकलेलें सामान खाणारा. ०फुटो–वि. (गो.) प्रेतावरील वस्त्र नेणारा. खपुनचें–क्रि. (गो.) प्रेत वस्त्रात गुंडाळणें.

खपरल—न. (व.) कौल; खपरेल पहा. [खापरी]

खपरी—स्त्री. १ अणकुचीदार, धारेचा दगडाचा तुकडा, चीप, कपरा (टाकीनें पाडलेला). २ खापर; फुटलेल्या भिंगाचा तुकडा, ठिकरी; खापरी. (क्रि० निघणें; जाणें; उडणें). [कपरी]

खपरेल—न. (हिं.) १ दोन्ही बाजूंस वळविलेलें चपटें कौल. २ किंवा तशीं कौलें घातलेलें छपर; घर. 'घराच्या अगदीं वरच्या भागावर पर झांकण्याकरितां खपरेल करावें लागतें.' –मराठी ३ रें पु पृ. ६२ (१८७३). [खापर–री; सं. खपरेल]

खपरेल–ली–वि. कौलारू.

खपला—पु. १ निराळा झालेला तुकडा; कपरा (साल, कातडें, कवच इ० चा); खलाटा; कपची; खापुडी; पापुद्रा;

खवला. २ गव्हांतील एक प्रकार. हा देशावर व कर्नाटकांत होतो. [ खाप=तुकडा ]

**खपली**—स्त्री. १ लहान कपचा; तुकडा. 'दांतीनें खपली फोडिली। ते मागुती नाहीं जडली।' –दा ८.६.१०. २ खवला; पापुद्रा ( फोडाचा ). ( क्रि० काढणें; उचटणें ). [ खाप=तुकडा ] ०काढणें–( ल. ) जुनें भांडण उकरून काढणें.

**खपल्याण**—न. खपला गहूं पहा.

**खपवणें-विणें**—सक्रि. १ संपविणें; कमी कमी करणें. २ ठार मारणें. 'त्या बहुतांहीं घात्यकि भगवंदनहि तो खपविला हो।' –मोमौसल १.५५. 'गंगाधरशास्त्री जात होता देवाला। मधीं खपविला रस्त्याला।' –ऐपो ३१०. [सं. क्षप्–प्रयोजक]

**खपवा**—पु. बाहीचें मागील तोंड. [ फा. कफ=हात ]

**खपा-प्पा**—वि. १ नाखूष; रुष्ट; रागावलेला. 'याजमुळें नबाबाची मर्जी खप्पा.' –रा ५.२०४. 'घासी मिया याजवर नबाब खफा आहेत.' –रा ५.१६. २ नावड उत्पन्न झालेला; विन्मुख (एखाद्या विषयापासून); कंटाळा आलेला. [अर. खफा=रागावलेला] ०मर्जी–स्त्री. इतराजी.

**खपाट-टा-टी, खपाटी**—नपु. १ रिकामें पोट. 'कोणाची अभाविणें खपाटें वळलीं आहेत,' –नि ५१०. 'पोटास खपाटा बसला–लाला.' २ खबदड; पोकळ भाग; खळगा; भोंक; भेग; खळद; बीळ. **खपाटें**–न.अव. ( चि. ) गालफडें; कानशिलें इ०. **खपाटें, खपाटया बसणें**–न. उपास इ० पासून पोटाला खळगा पडणें, पोट बसल होणें. [ सं. कपाट ]

**खपाटा**—पु (नाविक) किनाऱ्यापर्यंत आगबोटींतील माणसें किंवा माल घेऊन जाणारा–येणारा पडाव, होडी. ही होडी त्या त्या आगबोटकंपनीची असते.

**खपाटा घेणें, खपाटीस बसणें-लागणें**—आपली विनंति मान्य करून घेण्याकरिता पाठीस लागणें; आग्रह धरणें, पिच्छा पुरविणें; गळ घालणें; खनपटीस बसणें पहा.

**खपाटून**—क्रिवि. चचकावून पहा. विशेष जोरदार अर्थ या शब्दानें व्यक्त केला जातो.

**खपाटो**—पु. ( कु. ) एक प्रकारचा मासा.

**खपाटया-ट्या**—वि. काम साध्य करण्याची चिकाटी असलेला; पिच्छा पुरविणारा; हातीं घेतलेल्या कामाचा निश्चयपूर्वक शेवट करणारा; वादविवादांत दुसऱ्यास चकविण्याचें सामर्थ्य बाळगणारा.

**खपी-खप्पी, खप्पीदास**—वि. १ उद्योगी; मेहनती; नेहमीं कामांत चूर असणारा. २ काम करण्यांत हुषार; चलाख, तडफदार. ३ रागीट, तामसी, कडक. ४ धूर्त; पक्का; बिलंदर. ५ खमंग; न लाजणारा किंवा न भिणारा; वस्ताद [ सं. क्षपीन= बलात्काराने हरण करणारा ?; खपणें ]

**खपीष-खफीफ**—वि. १ लाजलेला; ओशाळा झालेला; फजित; खजील; मानखंडित. 'पेशीसाहेबांचें साल–जाबमध्यें तोंड उतरून गेलें व खफीफ बहुत जाहले.' –पदमव १०५. २ रद्द; नापसंत केलेला; उतरून गेलेले. 'गोसावी अनुपगीर सर्वांनी दुश्मन जाले व खपीष जाले.' –दिमरा १.८५. ३ हलकें. [ अर. खफीफ् ]

**खपुष्प**—न. ( आकाशाचें फूल ) असंभाव्य किंवा अशक्य गोष्ट दर्शविण्यासाठीं योजतात. या अर्थाचे पुष्कळ शब्द आहेत. उदा० सिकतातैल ( वाळूचें तेल ), मृगजल अथवा मृगतृष्णा, मृगजलस्नान, कूर्मलोम, कूर्मदुग्ध, वंध्यापुत्र, अंधविलोकन, बधिरश्रुति; मूकगायन. 'गंधर्वदुर्ग कायी पाडावे। काय शशविषाण मोडावें। दोमावें मग तोडावें। खपुष्प कीं।' –ज्ञा १५. २१५. [ सं. ख+पुष्प ]

**खपेटोणपे**—पु अव. खवेटोणपे पहा.

**खप्ती**—वि. ( ना. ) पिसाट; वेडगळ; खुळचट. [ अर. खब्ती=वेडा; हिं. खप्ता. ]

**खप्पड**—वि. सुरकुत्या पडलेला; चिपकलेला ( गाल किंवा चेहरा ); क्षीण; म्लान. 'खप्पड झाले गाल, आतां विठ्ठलवारीस चाल।'

**खप्पा**—खपा पहा.

**खप्पी**—खपी पहा.

**खप्याची पट्टी**—स्त्री. (कुस्ती) कुस्तींतील एक डाव; आपला हात जोडीदाराच्या गालफडावरून घेऊन त्याच्या गळ्याची घाटी हाताच्या पोटरीनें दाबून त्यास घुसमटवून चीत करणें; गळ्याची टांग. [ अर खफाह=गुप्त ?; गळा दाबणें; खफाह+पट्टी= बांधणें ]

**खप्या**—वि. १ खपणारा; अतिशय मेहनत करणारा; सर्व काल कामांत कंठणारा. २ सदां कामांत गुंतलेला; उद्योगी; व्यासंगी. [ खपणें ]

**खफगी**—स्त्री. १ फजिती. २ नाराजी. 'नबाबाचे चित्तांत सर्दाराविषयीं रुस्वा व खफगी आहे.' –रा ५.१८१. ३ दु.ख. 'होळकरावर हे नौबत गुजरली सबब खफगीस जागा.' –रा ७. –खलप १.२७. [ फा. खफगी=राग ]

**खफीफ**—वि. हलका; बिन महत्त्वाचा; नीच. खपीष पहा. [ अर. खफीफ ]

**खवखवणें**—अक्रि. १ खवखव असा आवाज करणें (रिकामें मडकें ठोकलें असतां, पंचपात्रांत आवाज केला असतां अथवा कुजक्या नारळाचा आवाज होतो तसा. ) २ कफानें किंवा दोंबहानें दाटणें ( गळा, नाक ); बदबदणें. [ ध्व. ]

**खबखबीत**—वि. बदबद, खबखब, गवगव असा आवाज करणारा (जड पदार्थांनें ठोकलेल्या रिकाम्या भांड्याप्रमाणें किंवा पचपचीत नारळाप्रमाणें). [ध्व.]

**खबद्ड-डी, खबदाड**—नस्त्री. १ ओबडधोबड पोखर अथवा खळगी; मुख्यत्वें गुहेसारखी किंवा तिरकम गुहा; कपार; दरी. २ घळींतील अथवा ओघळींतील खोल खळगी. ३ भगदाड (भिंतींतील), ओबडधोबड आकृतीचें मोठें भोंक (खडक, झाड, फळी यांमधील); भुयार; बीळ.

**खबद्डी**—वि. उंचसखल व खाचखळगे असलेली, खडब डीत (जमीन)

**खबर**—स्त्री. १ बातमी; संदेश; वार्ता २ समाचार; माहिती (परक्या गावची) ३ गप्पासप्पा; वृथा गोष्टी, निरर्थक भाषण (अनेकवचनी प्रयोग) 'हा गांवात उगीच खबरा सांगत बसतो.' 'खबरांची झाली दाटी आणि कामाला लागली काटी.' [अर. खबर्] (वाप्र.) ०घेणें– सुड घेणें, शिक्षा करणें. सामाशब्द– ०गीर–(हिं.) १ बातमी देणारे हेर; चार, २ पालनकर्ता; आश्रयदाता. ०अ(ए)खु(कु)धार–स्त्री. बातमी पत्र. जयपुराकडील खबरएकुधार पादशहासी आली कीं...' –दिमरा १.१८२. खबगिरी–स्त्री. विचारपूस. 'खबगिरी करावयासही याद होत नाहीं.' –रा ३.९०. 'आपण आमची खबगिरी व परामर्ष पूर्वीपरीस अधिक असा केला.' –ऐस्फुले ४९. [फा. खबरगीरी]

**खंबरखुंट**—वि. (प्रां.) खंबीरखुंट पहा.

**खबरदार**—स्त्री. संरक्षण; मजबुती. 'तरी तुम्ही किल्ले झांडी वगैरे जागाची खबरदार मजबुतीनें उत्तम प्रकारें करणें.' –रा ३. २१३. खबरदारी पहा. –वि. १ चतुर; तरतेज; कुशल, निष्णात, फरडा. 'तो कारकून जावसाल करण्याविषयीं खबरदार आहे.' २ खाऊन पिऊन सुखी; संपन्न; समर्थ. ३ मजबूत, धडधाकट; चांगल्या स्थितींतला. ४ सावध, हुशार. 'नाना फडनवीस म्हणतो भाऊला तुम्ही मोर्चाला खबरदार।' –ऐपो १८१. –उद्गा. लक्षांत ठेव! ध्यानांत धर! सावध रहा! (न राहशील तर संकटांत पडशील) [फा. खबर्दार्]

**खबरदारी, खबदारी**—स्त्री १ काळजी; संभाळ, चांगल्या स्थितींत ठेवणें; बंदोबस्त, सावधगिरी, हुशारी, 'पंधरा हजार मावळे ... किल्ल्याचे खबरदारीस नेमून.' –मराचिम ५ २ निश्चय; खंबीरपणा (मनाचा) ३ मजबुती; कणखरपणा; टिकाऊपणा (लांकूड, कापड, वस्तु इ० चा) 'त्या लांकडाची खबरदारी या लांकडांत नाहीं.' –शास्त्रीको.

**खबरबगर-बात**—स्त्री. (हिं.) बातमी, समाचार; वार्ता; वर्तमान. 'आमची खबरबगर पेत जावी.' –रा ७.८९७. [खबर द्वि; =खबर+बात]

**खबरी**—स्त्री. (गो.) निंदा. (क्रि० करणें).

**खबऱ्या**—वि. १ बातमी देणारा. २ गप्पा मारणारा.

**खंबऱ्या**—वि. १ चतुर; चलाख; हुशार; शहाणा; तत्पर; उत्साही; २ मजबूत बांध्याचा; धष्टपुष्ट; राकट; दणकट; बळकट; मजबुत. [खंबीर]

**खबळ**—स्त्री. (प्रां.) खळगा; खोल खड्डा; दरी; एकीकडची जागा; खबदाड; गुहा.

**खबा**—पु. खाव. [हिं; सं. स्तम्भ]

**खंबाई(य)त-ती**—वि. खंबायत गावासंबंधीं; खंबायत येथील (लुगडीं). 'नेसलि खंबाइत जरतारी।' –अमृत १०२. 'खंबाइती भरजरी नेसवुनि' –अमृतसुदा १३. (सामा). उंची वस्त्र. 'सुप्रसन्न देवी खंबायत नेसविती।' –वसा ५३.

**खबाड**—न. १ खबदाड पहा. २ पाण्याचें ओबडधोबड टाकें; डबकें. 'डोहो डबकें खबाडीं टाकीं।' –दा १६.४.१०. पोकळी; खोलकें. 'तोंडाची खबाडी जाली' –दावि ७१.

**खंवाड**—न. (गो.) लचाड

**खंबारी**—स्त्री शिवण नांवाचें एक झाड; शिवणी.

**खबा(व)ळणें**—उक्रि. १ अधाशीपणानें खाणें; गिळणें. २ (ल) निरर्थक खर्च करणें; उधळणें; उधळेपणानें खर्च करणें. गोष्टी-वाता खबाळणें-गप्पा, वाता झोंकणें; बडबडणें. 'तो तेथें वाता खबळीत बसला आहे.' [अर. खिवाल=समृद्धि, म. खबाला]

**खबाला**—वि. ऐसपैस; मोठें; टोलेजंग. [अर. ख्याल]

**खबाला**—पु १ अधाशी पणानें खाणें. २ (ल.) उधळेपणाचा खर्च, व्यय (अन्न, पैसा, वस्तु इ० चा). ३ व्यापारांतील मोठी बूड; तोटा; टोकर ४ तुकडे; फुटतूट; मोडतोड (गाडी; वाटली; मडकें इ० ची) ५ (सामा) [अर. खिवाल] धूळधाण; नाश.

**खबाला-ल्या**—वि १ गप्पीदास; बडबड्या. (समासांत.) वाता–गोष्टी खबाल्या. २ खादाड; अधाशी. (समासांत) 'भात–लाडू–पोळी–खाऊ–खबाल्या.' [अर खिवाल]

**खंबावती**—उ गायन शास्त्रांतील एक राग. ह्या रागांत षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात अवरोहांत ऋषभ वर्ज्य, जाति संपूर्ण-षाडव, वादी गांधार व संवादी धैवत. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर

**खबाळणें**—नि (व) खवळणें; मनावर होणें; श्रम होणें. 'हा तावडा बैल फार खबाळतो.' [खवळणें]

**खंबाळें-ळें**—न. उंची वस्त्र; खंबायती वस्त्र (जरीचें). 'मिळोत का खंबाळें। अथवा गाधडीही नेसावी।' –अमृ ११५. [खंबायत]

**खंबिरी**—स्त्री. १ मजबुती; बळकटी; भक्कमपणा (इमारतीचा). २ बंदोबस्त. ३ कायमपणा; निश्चिती (वचनाची). [खंबीर]

**खंबीर**—पु निश्चितता; निखालसता; पोक्तपणा, संदिग्धता याच्या उलट. 'तुमच्या बोलण्याचा खंबीर असल्यास आम्ही उद्योग करितों.' –वि. १ मजबूत; भक्कम; दणगट; बळकट (इमारत, पदार्थ). 'माहाभूतांचा खंबीर केला। आत्मा घालून पुतळा जाला।' –दा २०.७.१८. २ (ल.) धिम्मा; निग्रही; दृढ निश्चयाचा (मनुष्य), निखालस; ठाम (भाषण); कायम (हुद्दा). ३ (व्यापक.) मोठें; वजनदार; अवजड (बोजा). ०खुंट–वि. १ अढळ; कायम; ठाकठिक, निश्चित (माणूस; हुद्दा; धंदा). २ दणकट; मजबूत.

**खंबीर**—न. (प्र.) खमीर. आंबवण; फुगवण; आंबवण्याची क्रिया. [खमीर अप.]

**खबुतर–त्तर–द्र**—न. कबुतर पहा. ०खाना–पु. १ कबुतरखाना पहा. 'पुण्यांतील पेशव्यांचा खबुतरखाना तालीमखाना बनला आहे.' २ (ल.) (कबुतरांचें खुराडें कधीं कधीं गच्च भरलेलें व कधीं कधीं रिकामें असतें यावरून) कधीं फायदा कधीं तोटा होणारा धंदा, व्यवसाय, उद्योग. [फा.] ०बाज–वि. शिकविलेलीं कबुतरें बाळगणारा. (अप.) खबुदबाज.

**खबू-ब्बू**—वि. (ना.) म्हातारा; बुढ्ढा (उपहासार्थी).

**खबूक**—वि. अगडबंब; लठ्ठ, धिप्पाड (माणूस). खंबीर पहा.

**खबूस**—पु. गलबतावरील भटारखाना; कबूस पहा.

**खबेटोणपे**—पुअव. दुसऱ्याच्या मर्जीचें रक्षण व्हावें, आपल्याला मोठेपणा मिळावा किंवा एखादें अंगीकृत कार्य पुढें चालावें यासाठीं सोसावयाचीं अनेक प्रकारचीं दुःखें; धक्केचपाट, टक्के टोणपे; आघात; अडचणी; निंदा; कुचेष्टा. (क्रि० खाणें, घेणें; सोसणें).

**खबेड**—वि. १ मनधरणी करण्यास कठिण; मन वळविण्यास कठिण; हट्टी; हेकेखोर; पाषाणहृदयी. २ खडबडीत; कठिण, अप्रिय; खडतर; खचरट पहा.

**खब्या**—पु खबदड; ओबडधोबड बीळ, विवर.

**खंब्या**—स्त्रीअव. (विणकाम) सूत खालींवर करून त्यास पेच (सांध) पाडण्याकरितां उपयोगांत आणलेल्या लांकडी बारीक व सरळ काठ्या. या विणताना जागजागीं ताण्यांत सरकविलेल्या असतात [खांब]

**खब्बू**—खबू पहा.

**खम**—न. ठाण. 'हल्लीं ज्याप्रमाणें एखादा बी. ए. चड्डी, काचा भिडवून आखाड्यांत खम ठोकून उभा राहिला असता लोकांस भवंचा वाटेल ...' –नि ४६०. [फा. खम्=गांठ, घडी, फांस ?]

**खमका(खा)विणें**—उक्रि. खाकाविणें; धमकाविणें; दरडाविणें; दरडावून सांगणें; कानउघाडणी करणें. २ जोरानें ओढणें, बांधणें, धरणें, आवळणें; मुख्यत्वें खमकावून असा प्रयोग येतो व तो पाहिजे त्या क्रियापदाशीं योजतात. जसें–खमकावून ओढणें–बांधणें–धरणें–तासणें–चालणें. कचकून, कचकावून पहा.

**खमक्या, खमखा**—वि हुशार; चलाख, जोरदार; आवेशी; तल्लख; पाणीदार; जहाल. याच्या उलट मऊ; साधाभोळा; मूर्ख; नामर्द; जड. खपाट्या पहा.

**खमखम**—स्त्री घुमघुम पहा.

**खमखमीत, खमंग–क**—वि. १ मसालेदार; स्वादिष्ट; चमचमीत; चवदार (भाजी, खाद्यपदार्थ, वास इ०). २ (ल.) वस्ताद; धूर्त; पक्का. 'तुला कोणी खमंग भेटावयास पाहिजे म्हणजे गुर्मी उतरेल.' खमंग काकडी–स्त्री. एक तोंडीलावणें; कोंवळ्या काकडीच्या बारीक फोडी करून त्यांना मीठ लावून नारळाचा खव व मिरच्यांचे तुकडे चोळतात आणि त्यांत भाजलेल्या भुईमुगाच्या दाण्यांचें कूट मिसळून त्यावर लिंबू पिळतात.

**खमंगाई**—स्त्री. स्वादिष्टता; चरचरीतपणा; झणझणीतपणा (मसाल्यानें आलेला). [खमंग]

**खमंचा**—पु एक खाद्यपदार्थ; तुपावर भाजलेले पोहे, शेंगदाणे, फुटाणे, खोबऱ्याच्या चकत्या इ० सर्व पदार्थांचें मिश्रण तुपाची फोडणी करून, गूळ, मिरच्यांचे तुकडे, कोथिंबीर, मीठ, तिखट हळदीसह तींत टाकावें व ढवळून कढई उतरावी; खातांना, त्यांत लिंबू पिळावें. –गृशि १.४५६.

**खमणकाकडी**—खमंगकाकडी पहा.

**खमणें**—अक्रि. गडप होणें; नाहींसें होणें; जिरणें. [सं. क्षम्, म. शमणें]

**खमणें**—अक्रि धैर्यानें, निमूटपणें सोसला किंवा सहन केला जाणें (दुःख, अपराध). [सं. क्षम्]

**खमध्य**—पुन. १ याम्योत्तरवृत्त. २ खस्वस्तिक; शिरोबिंदु; क्वचित् अधःस्वस्तिक, अधोबिंदु. [सं.]

**खमयसी**—स्त्री. (इंट. नाविक) पावडा किंवा रोयली टांगून ठेवण्याची दोरी.

**खमशेड**—वि (व.) बळकट; जोरदार.

**खम(म्म)स**—वि. पांच ही संख्या. [अर. खम्स्] खमसी (सै)न–वि. पन्नास; ५० ही संख्या.

**खमसीन**—पु मिसर देशांत वाहणारा उष्ण वारा. –सूपनि. २२९.

**खमाज-स**—पु. ( संगीत ) एक राग. ह्या रागास षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात आरोहांत ऋषभ वर्ज्य जाति षाडव-संपूर्ण, वादी गांधार व संवादी निषाद. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर. ०थाट( राग )-पु. एक थाटाचें नांव. याचे पुटील सात स्वर असतात–शुद्ध षड्ज, शुद्ध ऋषभ, शुद्ध गांधार, शुद्ध मध्यम, शुद्ध पचम, शुद्ध धैवत, कोमल निषाद.

**खमाटणें**—उक्रि. गच्च ओढून बांधणें. ( सामा. ) खमाटून असा प्रयोग येतो. ओढणें–बांधणें–तापणें–खेचणें–आवळणें–या क्रियापदांशीं योजतात. **खमाटून धरणें**–घट्ट अथवा जोरानें धरणें. **खमाटून जेवणें-खाणें**–सपाटून; ओ येईपर्यंत जेवणें. कचकावून, खचकावून, रगडून, सपाटून पहा.

**खमाट्या**—वि. १ अडमुठा; दांडगा; कचन्या. २ राकट; दणकट; धिप्पाड; घटिंगण. [ खमाटणें ]

**खंमाल, खम्माल**—वि. खंबीर पहा. १ बळकट; मजबूत; भक्कम (इमारत, पदार्थ). २ जंगी; अवजड; भक्कम; (ओझें, गट्टा).

**खमाविशी**—स्त्री. ( कर्ना. ) सरकारच्या प्रत्यक्ष नजरेखालीं कसलेली जमीन. ०दार–पु. सरकारी जमिनीवर देखरेख करणारा अधिकारी कमाविशी पहा. –विल्सन कोश.

**खमीर**—न. १ अंबवण; ताडी अथवा तसले फसफसणारे पदार्थ. 'रोटींत खमीर मिसळलेला असल्यानें ती आठवडाभरहि टिकूं शकते.' २ किण्व, यीस्ट. ३ अंबवण किंवा सुरामंड तयार करणें; फुगवण. [ अर. खमीर् ]

**खमीस**—पु. एक प्रकारचा सद्रा; शर्ट; कुडतें. [ पोर्तु. कॅमिसा ]

**खय**—१ स्त्री. गर्व; ताठा; अभिमान. ( क्रि० मोडणें, जिरविणें. २ अडेलपणा; रग.

**खय**—न. ( खा. ) शेतांतील धान्याचें खळें. [ खळें ]

**खँय**—क्रिवि. (कों. गो कु.) कोठें ? [ सं. क्व; हिं कहाँ; गु क्यों ] ०सर–( कु ) कोठें ? ०च्यान-सून–( कु. ) कोठून ?

**खॅयणॅं**—न. ( गो. ) खेळणें; खेळण्याची वस्तु. [ खेळणें ]

**खयर**—पु. खैराचें झाड खैर पहा.

**खय्या**—पु (व.) रिवाज; रीत; प्रघात. 'नवा खय्या पडला.'

**खर**—पु. गाढव. 'खरी टेंको नेदी उढे । तानौनि फोडी नाकाडें ।' –ज्ञा १३.७०५. 'बाइल म्हणे खर मरता खरी बरें ।' –तुगा ८७३. [ सं. फा.]

**खर**—स्त्री. १ कचरा; घाण; अनेक प्रकारचा मळ. २ शेत प्रदेशांतील पांढरा सांका; खपरींतून पडणारे मीठाचे कण. ३ आकाशांतील पांढरे, कापसासारखे ढग; पातळ पसरलेलें अभ्र. ४ आकाशांतील संध्याकाळचा रंग, आरक्त रंग ५ जमीन भाजण्याकरितां टाकलल्या टहाळांवरील जुनें गवत, पानें, काटक्या; शेणकूट इ० चा कचरा; राब. ६ सूक्ष्म किंवा बारीक खडी. ७ विहिरींतून खणून काढलेली माती; गाळ इ०. ८ रस करतांना राखेंत अथवा मातींत पडलेले सोन्या–रुप्याचे कण. ९ नदीच्या तळची वाळू; पाण्यांतील गाळ, घाण; ( गो. ) पाण्याचा तळ. १० ( नाविक ) माल भिजूं नये म्हणून बांकांवर पसरलेलीं लांकडें. ११ ( सोनारी ) कोळशाची बारीक पूड; ही पाण्यांत घोटून तिचा थर मुशीच्या आतून देतात. १२ ( कु. ) दंव. [ सं. ]

**खर**—वि. १ तीव्र; तिखट; कडक; प्रखर; कढत ( मिरच्यें, ऊन, थंडी ). २ ( कों. ) ज्याची पाणटाळ फारच उतरती आहे असे ( घर, वाडा वगैरे ). (कों.) उमट ( नांगर इ० ). ३ झोंबणारें; बोचणारें; कडक ( भाषण, शब्द ). 'खर दुर्वाक्यशरशतें भेदित होतासि जेधवा मर्म ।' –मोकर्ण ४९.९. ४ जास्त ( वजन किंवा माप ). जसें–एका ठिकाणचा शेर दुसऱ्या ठिकाणच्या शेरापेक्षां जास्त असतो. ५ दाट; घट ( चिखल, लगदा इ० ). [ सं. ]

**खरकट, खरकटवड-वडा-वाडा, खरकटवळ-खरकटावळ**—स्त्रीपु. १ ज्या जागीं जेवण झालें आहे त्या जागेचें अवशिष्ट, उष्टीं पानें, घाण इ०. खरकटें पहा. जिकडे तिकडे खरकटें पडलेलें असणें. २ ( ल. ) ( खरकटवाडा ) तुंबलेलें काम. [ खरकटें+वड, वळ, वाड ]

**खरकटणें**—उक्रि. १ ओबडधोबड लिहिणें; कुऱ्या-मांजराचे पाय लिहिणें; रेघोट्या ओढणें; घाईघाईनें लिहिणें; मरकटून लिहिणें. २ घाईनें चोळणें, पुसणें, झाडणें, सारवणें, ३ रांगणें; खरडत जाणें. [सं. खर+कट प्रत्यय]

**खरकटणें**—अक्रि. १ खरकटें होणें (अन्न, भांडीं, हात इ०). २ ( व्यापक ) भरणें; लेपाटलें जाणें; गढूळ होणें; लिडबिडीत होणें, 'काम कोघलोभें खरकटलें ।' –द १९.५. 'मी सारवण घालतें आहे, हीं वळें न उचलल्यास टोणानें खरकटतील.' [ खरकटें ]

**खरकटणें**—अक्रि. भुर्रत जाणें; सुजटणें.

**खरकटा**—वि. ( स्वच्छ व अस्वच्छ यांतील औपचारिक भेद दर्शविणारा शब्द. ) १ शिजविलेलें, पकविलेलें, किंवा शिजविल्या पकविल्या शिवाय, पाण्याशीं मिसळलेलें ( तांदूळ, भाकरी, पीठ, दुधाशीं किंवा एखाद्या फळाच्या रसाशीं मिसळलें तरी तें खरकटें होत नाहीं). २ ज्याला असलें खरकटें अन्न लागलें आहे, चिकटलें आहे, अथवा ज्याचा स्पर्श झाला आहे असें ( हात, स्वयंपाकाचीं भांडीं, जागा, पदार्थ, इ०). खरकट्या अन्नास सोवळ्यानें शिवलें तर चालतें, ओवळ्यानें शिवल्यास तें विटाळतें. ( सापा-

रणनः ब्राह्मणांत असा जास्त परिपाठ ). सोवळ्याओवळ्याचा भेद न मानणाऱ्या ब्राह्मणेतरांमध्येंहि शिजविलेल्या अन्नास खरकटेंच म्हणतात.

**खरकटें**—न. ( हिं. ) खरकट्या अन्नाचा दोष, शिजविलेल्या अन्नाचा ( भाकरी, भात इ० चा ) कण, चाराचुरा. मात्र हें शिजविलेलें अन्न पाण्यांत मिसळण्यापूर्वी तळलेलें किंवा भाजलेलें नसलें पाहिजे, त्याचप्रमाणें शिजविण्यापूर्वी ज्या अन्नांत पाणी, मीठ अथवा नुसतें पाणी मिसळलेलें आहे असल्या अन्नाच्या अवशेषालाहि खरकटेंच म्हणतात. २ (देशस्थांत रूढ) न भाजलेल्या पदार्थांचा स्वयंपाक, निर्लेप नसणारें अन्न. ३ (ल.) अपुरा व्यवहार, देवघेव ( पैशाची ); विनहिशेबी धंदा. लडथड; भिजत घोंगडें. ' मागलें खरकटें काढून टाका मग दुसरा पैका देईन.' ४ अपूर्ण राहिलेली व श्रमदायक गोष्ट, काम. लोंबा पहा. (वाप्र ) ०सांवडणें–खरकटें गोळा करणें; खरकटें काढणें. **खरकट्या हातानें कावळा न हाकणें**–(कदाचित् हाताचें खरकटें कावळ्याला मिळेल म्हणून) परक्यास थोडी सुद्धां मदत न करणें. (कंजूष माणसास ही म्हण लावतात ).

**खरकटेल**—वि. ज्याला खरकटें ( शिजलेलें अन्न, भात, कणीक, पीठ इ० ) लागलेलें आहे असें ( कापड, भांडें, हात, इ० ). [ खरकटा ]

**खरकणें**—अक्रि. १ खर असा आवाज होऊन घसरणें, निसरणें; घसरत जाणें; जोरानें खालीं सरणें, जाणें. 'झाडावरून त्याचा पाय खरकला.' ' मी खरकत तिकडे गेलों, पडलों.' २ दुंगणानें सरकत जाणें, घसरत–घसरत जाणें; खुरडणें ३ झपाटयानें व मोठ्या आवाजानें वाहात जाणें ( नदी, पूर ), पाटीमागें जाणें; कमी होणें; ओहोटीस लागणें ( समुद्र ); झटकन नाहींसें होणें(वाऱ्यानें ढग ); झडणें ( मास, शरीर ); उतरणें; म्लान होणें; पडणें ( तोंड, चेहरा, माणूस ); एकदम दबणें, खालीं बसणें ( सुज ), भिणें; घाबरणें; चरकणें, धास्ती धरणें. ' चोर म्हणतांच राजश्री खरकले. ' [ खर ]

**खरकन–कर–दिशीं**—क्रिवि. १ खर अशा आवाजानें युक्त. २ चटकन, एका क्षणांत, निमिषांत. 'औषधानें कळ खरकन राहिली.' ' गंगेचें पाणी खरकन उतरलें. '

**खरकचाण, खरकचाण मेहेरबान**—वि. ( विनोदानें ) अकिंचन, अत्यंत दरिद्री, कफल्लक. [ध्व. खरक+चाण=शंकराचें लिंग]

**खरका**—पु. १ कातडीची खडबडीत आणि फुटीर स्थिति ( थंडीच्या दिवसांत ), खरबरीतपणा. २ कोरडेपणा व खपल्या पडलेली स्थिति ( वरा झालेला गोवर, देवी इ० ची ) ( क्रि० उठणें; येणें). ३ दु:खकारक मानसिक स्थिति; दुखावलेल्या भावना; मनाला बसणारा धक्का (रागाच्या खडकावण्यानें) (क्रि० बसणें). ४ टोकर; तोटा; गोता ( व्यापारांत ). ५ पिकाचें नुकसान; नासाडी. जसें–पावसाचा–हिंवाचा–उन्हाचा–उंदराचा खरका. ( पिकावर, धान्यावर ). ( क्रि० पडणें; होणें ). ६ शंका; संशय; भीतीची अथवा दु:खदायक शंकेची आकस्मिक कल्पना; धोर. ( क्रि० येणें; पडणें; राहाणें; उडणें ). ७ आकस्मिक व जबर कंड, खाज. जसें–खरजेचा–देवीचा–गजकर्णाचा खरका. ( क्रि० सुटणें ). ८ राजविण्याचा जबर झटका, आवेग, लहर. ( क्रि० लावणें ) ९ वाहावत जाणें; मोठ्या आवाजानें खडखडून पुढें जाणें (गाडा). १० (ल.) चलती; सपाटा; भरभर (व्यापारधंद्याची ). [खरकणें. ध्व. खर] (वाप्र.) ०देणें–खरडपट्टी काढणें; खडसावणें; जोरानें धमकावणें; ताकीद देणें. ०मारणें–झोका मारणें; गोता देणें ( लबाडीनें हिशेबांत इ० ).

**खरकाटणें**—अक्रि खरकटणें पहा.

**खरकावणें**—अक्रि खरकन आवाज होऊन खालीं अथवा बाजूला कोसळणें; घसरणें; घसरत खालीं पडणें. [ खरक ]

**खरकाविणें**—उक्रि. १ चमकाविणें खडसाविणें; खरडपट्टी काढणें; खमकावणें. २ खरखर आवाज होईल असें ओढीत नेणें ( ओढणें या क्रियापदाशीं जोडून अगर स्वतंत्रपणें योजतात ). ३ ढकलणें; पुढें ओढीत नेणें (एखादा जड व आवाज होणारा पदार्थ ). [ ध्व. खरक ]

**खरकुटणें**—अक्रि. खरकटा होणें; खरकटणें(–अक्रि.) पहा.

**खरखटणें**—अक्रि. मलिन होणें; खरकटणें पहा.

**खरखर**—स्त्री. १ डोळे आले असतां होणारी वेदना, टणका; डोळ्याचा एक रोग. ' त्याचे डोळ्यास खरखर लागली.' २ (ल.) पश्चात्ताप; पस्तावा; अनुताप. ३ दु:खदायक विचार; काळजी; चुटपुट. (क्रि० लागणें). ४ घशांत होणारा घरघर आवाज ( कफामुळें ). ( क्रि० लागणें; सुटणें ). ५ कंड; खाज; खाजविण्याचा झटका. ( क्रि० लागणें; येणें ). [ ध्व. खर ]

**खरखर–रां**—क्रिवि १ घरघरा किंवा फरफरा ओढल्या जाणाऱ्या पदार्थांचा अगर माणसाचा होणारा आवाज करून, होऊन. ( क्रि० ओढणें; चालणें; जाणें ) २ घशातील घरघर आवाजानें, आवाज करून. ( क्रि० वाजणें ). ३ कठिण; राकट; खरबरीत ( स्पर्श ). ( क्रि. लागणें ). [ ध्व. खर ]

**खरखरणें**—अक्रि. खडखड असा आवाज होईल असें ओढलें जाणें ( जहाज वाळूवरून, फांद्यांसह झाड रस्त्यावरून ); खरखर आवाज करणें; खडाडणें; खराटणें किंवा वाजणें. २ घरघरणें ( कफानें घसा ). ३ टसटसणें, ठणकणें; दुखणें ( डोळे). [खरखर]

**खरखरमुंडा–डा**—पु १ मुसलमान जातींतील भिक्षेकऱ्यांचा एक वर्ग, व्यक्ति. हे लोकांनीं भिक्षा द्यावी म्हणून आपल्या छातीवर, हातावर, डोक्यावर, दंडावर जखम करून लोकांकडून

आपली कींव करून घेऊन भिक्षा मिळवितात. 'मलंग भडंग कलंदर। खरखरमुंडे।' -दावि ४७४. २ भिक्षा मागतांना डोक्यावरवरचा एक सोवती, मुंडा पहा. ३ (ल.) निष्कांचन, अनाथ, कफल्लक माणूस.

**खरखरा**—पु. खरखर पहा. १ कसोटीचा खरखरीत दगड. २ डोळ्यांचा ठणका. ३ तळमळ; चुटपुट; घोर; काळजी; हुरहुर (क्रि० फिटणें; जाणें; फेडणें). 'लागे स्मरुनि अनादृत विदुर-वचन मानसा खरखरा हो।' -मोशल्य ४.५३. 'परि कधि येईल वृद्ध मित्र हा मनामधें खरखरा।'-राला १०. ४ असंतोष, रुसवा; नाखुषी. ५ चडफड, तळमळ; तडफडणें; उसासणें (रागावलेल्या, अथवा महत्त्वाकांक्षी माणसानें). (क्रि० येणें, लागणें; राहाणें). ६ कंडू; खाज; खाजेचा उमाळा. (क्रि सुटणें होणें; लागणें). ७ घशांत दाटलेला कफ. ८ (क.) घरघर वाजणें. (क्रि० होणें; वाजणें; लागणें). ९ धास्ती; भीति, धका. (क्रि० घसणें). [ध्व. खरखर]

**खरखराट**—पु. खरखर असा अतिशय मोठा व कर्कश आवाज; खडखडणें; खरखरणें; खळखळणें इ०. [खरखर]

**खरखराविणें**—उक्रि. खरखरत, खडखडत जाण्यास लावणें (खरखरणेंचें प्रयोजक)

**खरखरीत**—वि. खरबरीत; ओबडधोबड; वाळलेलें; शुष्क, राकट; मृदुता किंवा गुळगुळीतपणा ज्यास नाहीं असें (लांकूड, दगड, वस्त्र इ०). [खरखर]

**खरखा**—पु. अंगावरील पुरळ; अंगाला सुटणारी कंड खरका पहा.

**खरग**—न. (व.) शेतांत पिकामध्यें पडलेलें ढिगळ.

**खरंगटणें**—उक्रि. १ ओबडधोबड रीतीनें भरडणें, वाटणें (दोन दगडांमध्यें दाबून, कुटून) २ चेचणें; चिरडणें (मिरीं, मिरच्या इ०); भरडणें.

**खर(रं)गणें**—उक्रि. चांगलें तळणें; खमंग होईपर्यंत तळणें; खरपूस भाजणें. -अक्रि. उन्हानें लाल होणें, सुजणें (डोळे, गाल, तोंड इ०). [खर]

**खर(र्गो)गोश-स**—पु. ससा. 'तेथें खर्गोस निघाला, त्याचे पाठीं कुत्रे लागले' -ऐस्कुले २१ [फा.]

**खरगोळ**—पु. एक वृक्ष.

**खरच-णें, खरच वेंच, खरची**—खर्च पहा.

**खरचटणें**—अक्रि. चोळवटणें; खरंगटणें; घासणें; कातडी निघणें.

**खरचाणी**—स्त्री. लहान व दचदर मासाची एक जात.

**खरचिंच**—न. (राजा.) आंत दाणा नसलेली भाताची लोंबी, लोंगर; पळिंज; पोल; बिन दाण्याचें कणीस.

**खरज**—पु. १ (संगित) नीच स्वर; घोगरा आवाज. २ खरज स्वर वाजविण्याजोगा विण्यास लावलेला घोर. खर्ज पहा. [सं. षड्ज]

**खरजाई**—स्त्री. खरजेची देवता. हिचा अंगारा लावला म्हणजे खरूज जाते अशी समजूत आहे. [खरूज+आई]

**खरजुडा-ला**—वि. खरजेनें व्याप्त; ज्यास विशेष खरूज असते असा (माणूस). [सं. खर्जू]

**खरजुवप**—क्रि. (गो.) खाजविणें. म्ह० (गो.) खरजुता एक ठय खरपितां एकठय=खाज येते एके ठिकाणीं पण खाजवितो दुसऱ्याच ठिकाणीं. (वडयाचें तेल वांग्यावर काढणें).

**खरजू**—स्त्री. (गो.) खाज. [सं. खर्जु]

**खरट**—पु. (प्रा.) १ वाळू, खडी. २ खडा लागुन होणारें क्षत (माणसाच्या, जनावराच्या पायाला, तळव्याला). करट पहा. [ध्व. खर+(व)ट प्रत्यय ?]

**खरटणें**—अक्रि. वाढ खुंटणें. खुरटणें पहा.

**खरडणें**—अक्रि. खरडणें पहा.

**खरंटा**—पु खराटा पहा.

**खरंटा**—पु. एक क्षुद्रप.

**खरटिवाळा**—पु. एक रणवाद्य. 'तेथ वाजती ढोल काहाळा। तुररिआं तोंडी खरटिवाळा।'-शिशु १०२६.

**खरड**—स्त्री. १ घाई-घाईनें लिहिलेला, कागद अथवा लेख, भाकृती, खर्डा, भाराखडा. २ रेघोटया; चिरखुडया. ३ खरडपट्टी; पाणउतारा; निर्भर्त्सना. (क्रि० काढणें; निघणें). ४ धातु शुद्ध करताना तिचे भोंवतीं जमणारी रास व माती (ही धातूपासून खरडून काढलेली असते म्हणून हा शब्द); खरडून काढलेला भाग. ५ (गो.) टकल. ६ (गो.) केसांत सांचणारा मळ. [सं. क्षर्; प्रा. खरड=लेपणें;ध्व. खर ?] सामाशब्द- ०घाशा-वि. (उपहासार्थी) सरासरी लेखन जाणणारा; परंतु त्यांतील मर्म न जाणणारा (कारकून). २ अकुशल; बिनकसबी (लेखक, न्हावी, सुतार). [खरडणें+घासणें] ०निशी-स्त्री. १ गिचमिड; वेडेंवांकडें लिखाण, लेखन. २ खर्डेघाशी ०नीस-निशा-वि. वाईट लेखक. (खरड+नवीस) ०पट्टी-स्त्री. १ खरड पहा. कडाक्याची निर्भर्त्सना; दटावणी; जोराची चापणी; बोडंती; भोसडपट्टी; दोष किंवा अपराध दाखवून रागानें झाडलेला ताशेरा. (क्रि० काढणें; निघणें). २ तोटा, नुकसान सोसावयास लावणें. (क्रि० काढणें; निघणें).

**खरड**—पु. १ खाणींत असंस्कृत स्थितींत सापडणारें रत्न. २ ओबडधोबड खडा. खरट पहा. ०घरड-वि. दगडाळ; नापीक (जमीन).

रणतः ब्राह्मणांत अगा आस्त परिपाठ ). सोवळ्याओवळ्याचा भेद न मानणाऱ्या ब्राह्मणेतरांमध्येंहि शिजविलेल्या अन्नास खरकटेंच म्हणतात.

**खरकटें**—न ( दि. ) खरकट्या अन्नाचा शेप; शिजविलेल्या अन्नाचा (भाकरी, भात इ० चा ) कण, चाराचुरा. अन्न हें शिजविलेलें अन्न पाण्यांत मिसळण्यापूर्वी तळलेलें किंवा भाजलेलें नसलें पाहिजे, त्याचप्रमाणें शिजवण्यापूर्वी ज्या अन्नांत पाणी, मीठ अथवा नुसतें पाणी मिसळलेलें आहे असल्या अन्नाच्या अवशेषा साहि खरकटेंच म्हणतात. २ (दक्षस्थान रूढ) न भाजलेल्या पदार्थांचा स्वयंपाक, निर्लेप नसणारें अन्न. ३ (ल.) अपुरा व्यवहार, देवघेव (पैशाची ); बिनहिशेबी धंदा. लडथड; भिजत घोंगडें. ' मागलें खरकटें काढून टाका मग दुसरा पैका देईन.' ४ अपूर्ण राहिलेली व त्रासदायक गोष्ट, काम. लासा पहा. (ग्राम्य ) ०**सांघडणें**–खरकटें गोळा करणें, खरकटें काढणें. **खरकट्या हातानें कावळा न हाकणें**–(कदाचित् हाताचें खरकटें कावळ्याला मिळेल म्हणून) परक्यास थोडी सुद्धां मदत न करणें. (कंजूप माणसास ही म्हण लावतात ).

**खरकटेल**—वि. ज्याला खरकटें ( शिजलेलें अन्न, भात, कणीक, पीठ इ० ) लागलेलें आहे असें ( कापड, भांडें, हात, इ० ). [ खरकटा ]

**खरकणें**—अक्रि. १ खर असा आवाज होऊन घसरणें, निसरणें; घसरत जाणें; जोरानें खालीं सरणें, जाणें. 'झाडांवरून त्याचा पाय खरकला.' ' मी खरकत तिकडे गेलों, पडलों. ' २ ढुंगणानें सरकत जाणें, घसरत–घसरत जाणें; सुरडणें ३ झपाट्यानें व मोठ्या आवाजानें वाहात जाणें ( नदी, पूर ); पाठीमागें जाणें, कमी होणें; ओहोटीस लागणें ( समुद्र ); झटकन नाहींसें होणें (वाऱ्यानें ढग ), झडणें ( मास, शरीर ); उतरणें; म्लान होणें, पडणें ( तोंड, चेहरा, माणूस ), एकदम दबणें, खालीं बसणें ( सुज ), भिणें; घाबरणें; चरकणें; धास्ती धरणें. ' चोर म्हणतांच राजश्री खरकले. ' [ खर ]

**खरकन–फर–दिशीं**—क्रिवि १ खर अशा आवाजानें युक्त. २ चटकन, एका क्षणांत, निमिषांत. 'औषधानें कळ खरकन राहिली ' ' गंगेचें पाणी खरकन उतरलें. '

**खरकयाण, खरकवाण मेहेरबान**—वि. ( विनोदानें ) अकिंचन, अत्यंत दरिद्री, कफल्लक. [ध्व. खरक+बाण=शकराचें लिंग]

**खरका**—पु. १ कातडीची खडबडीत आणि कुरूप स्थिति ( थंडीच्या दिवसांत ), खरबरीतपणा. २ कोरडेपणा व खपल्या पडलेली स्थिति ( बरा झालेला गोवर, देवी इ० ची ). ( क्रि० उठणें, येणें). ३ दुःखकारक मानसिक स्थिति, दुखावलेल्या भावना; मनाला बसणारा धक्का (रागाच्या खडकावण्यानें) (क्रि० बसणें). ४ टोंकर; तोटा; गोता ( व्यापारांत ). ५ पिकाचें नुकसान; नासाडी. जसें–पावसाचा–हिंवाचा–उन्हाचा–उंदराचा खरका. ( पिकावर, धान्यावर ). ( क्रि० बसणें; होणें ). ६ शंका; संशय; भीतीची अथवा दुःखदायक शंकेची आकस्मिक कल्पना; घोर. ( क्रि० देणें; वाटणें; राहाणें; उडणें ). ७ आकस्मिक व जबर बंड, रोग. जसें–खरजेचा–देवीचा–गजकर्णांचा खरका. ( क्रि० सुटणें ). ८ खाजविण्याचा जबर झटका, आवेग, लहर. ( क्रि० लावणें ) ९ खडाडत जाणें; मोठ्या आवाजानें खडखडत पुढें जाणें (गाडा). १० (ल.) चलती; झपाटा; भरभर (व्यापारधंद्याची ). [खरकणें. ध्व. खर] (ग्राम्य.) ०**देणें**–खरडपट्टी काढणें; खडसावणें; जोरानें धमकावणें; ताकीद देणें. ०**मारणें**–झोका मारणें; गोता देणें ( लबाडीनें हिशेबांत इ० ).

**खरकाटणें**—अक्रि. खरकटणें पहा.

**खरकायणें**—अक्रि. खरकन आवाज होऊन खालीं अथवा बाजूला कोसळणें; घसरणें; घसरत खालीं पडणें. [ खरक ]

**खरकाविणें**—उक्रि. १ चमकाविणें खडसाविणें; खरडपट्टी काढणें; धमकावणें. २ खरखर आवाज होईल असें ओढीत नेणें ( ओढणें या क्रियापदाशीं जोडून अगर स्वतंत्रपणें योजतात ). ३ ढकलणें; पुढें ओढीत नेणें (एखादा जड व आवाज होणारा पदार्थ ). [ ध्व. खरक ]

**खरकुटणें**—अक्रि. खरकटा होणें; खरकटणें (–अक्रि.) पहा.

**खरखटणें**—अक्रि. मलिन होणें; खरकटणें पहा.

**खरखर**—स्त्री. १ डोळे आले असतां होणारी वेदना, ठणका; डोळ्याचा एक रोग. ' त्याचे डोळ्यास खरखर लागली.' २ ( ल. ) पश्चात्ताप; पस्तावा; अनुताप. ३ दुःखदायक विचार; काळजी, सुटपुट. (क्रि० लागणें). ४ घशांत होणारा घरघर आवाज ( कफामुळें ). ( क्रि० लागणें, सुटणें ). ५ कंड; खाज; खाजविण्याचा झटका. ( क्रि० लागणें; येणें ). [ ध्व. खर ]

**खरखर–रां**—क्रिवि. १ घरघरा किंवा फरफरा ओढल्या जाणाऱ्या पदार्थांचा अगर माणसाचा होणारा आवाज करून, होऊन. ( क्रि० ओढणें, चालणें; जाणें ) २ घशातील घरघर आवाजानें, आवाज करून. ( क्रि० वाजणें ). ३ कठिण; राकट; खरबरीत ( स्पर्श ). ( क्रि. लागणें ). [ ध्व. खर ]

**खरखरणें**—अक्रि. खडखड असा आवाज होईल असें ओढलें जाणें ( जहाज वाळूवरून, फांद्यासह झाड रस्त्यावरून ); खरखर आवाज करणें, खडाडणें; खरारणें किंवा वाजणें. २ घरघरणें ( कफानें घसा ). ३ ठसठसणें, ठणकणें, दुखणें ( डोळे ). [खरखर]

**खरखरमुंडा–डा**—पु १ मुसलमान जातींतील भिक्षेकऱ्यांचा एक वर्ग, व्यक्ति. हे लोकांनीं भिक्षा द्यावी म्हणून आपल्या छातीवर, हातावर, डोक्यावर, दंडावर जखम करून लोकाकडून

आपली कींव करवून घेऊन भिक्षा मिळवितात. 'मलंग भडंग कलंदर। खरखरमुंडे।' –दावि ४७४. २ भिक्षा मागताना हिज ड्यावरोबरचा एक सोबती, मुंडा पहा. ३ (ल.) निष्कांचन, अनाथ, कफल्लक माणूस.

**खरखरा**—पु. खरखर पहा. १ कसोटीचा खरखरीत दगड. २ डोळ्यांचा ठणका. ३ तळमळ; धुटपुट; घोर; काळजी; हुरहुर (क्रि० फिटणें; जाणें; फेडणें). 'लागे स्मरुनि अनादृत विदुर–वचन मानसा खरखरा हो।' –मोशल्य ४.५३. 'परि कधि येईल वृद्ध मित्र हा मनामधें खरखरा।' –राला १०. ४ असंतोष; रुसवा; नाखुषी. ५ चडफड; तळमळ; तडफडणें; उसासणें (रागावलेल्या, अथवा महत्त्वाकांक्षी माणसानें). (क्रि० येणें, लागणें; राहणें). ६ कंडु; खाज; खाजेचा उमाळा. (क्रि सुटणें होणें; लागणें). ७ घशांत दाटलेला कफ. ८ (क.) घरघर वाजणें. (क्रि० होणें; वाजणें; लागणें). ९ धास्ती; भीति, धका. (क्रि० बसणें). [ध्व. खरखर]

**खरखराट**—पु. खरखर असा अतिशय मोठा व कर्कश आवाज; खडखडणें; खरखरणें; खळखळणें इ०. [खरखर]

**खरखराविणें**—उक्रि. खरखरत, खडखडत जाण्यास लावणें (खरखरणेंचें प्रयोजक)

**खरखरीत**—वि. खरबरीत; ओबडधोबड; वाळलेलें; शुष्क, राकट; मृदुता किंवा गुळगुळीतपणा ज्यास नाहीं असें (लांकूड, दगड, वस्त्र इ०). [खरखर]

**खरखा**—पु. अंगावरील पुरळ; अंगाला सुटणारी कंड खरका पहा.

**खरग**—न. (व.) शेतांत पिकामध्यें पडलेलें टिगळ.

**खरंगटणें**—उक्रि. १ ओबडधोबड रीतीनें भरडणें, वाटणें (दोन दगडांमध्यें दाबून, कुटून). २ चेचणें; चिरडणें (मिरीं, मिरच्या इ०); भरडणें.

**खर(रं)गणें**—उक्रि. चांगलें तळणें; खमंग होईपर्यंत तळणें, खरपूस भाजणें. –अक्रि. उन्हानें लाल होणें, सुजणें (डोळे, गाल, तोंड इ०). [खर]

**खर(र्गो)गोश-स**—पु. ससा. 'तेथें खर्गोस निघाला, त्याचे पाठीं कुत्रे लागले' –ऐस्कुले २१. [फा.]

**खरगोळ**—पु. एक वृक्ष.

**खरच-णें, खरच वेंच, खरची**—खर्च पहा.

**खरचटणें**—अक्रि. चोळवटणें; खरंगटणें; घासणें; कातडी निघणें.

**खरचाणी**—स्त्री. लहान व रुचकर माशाची एक जात.

**खरचिंब**—न. (राजा.) आंत दाणा नसलेली भाताची लोंबी, लोंगर; पळिंज; पोल; बिन दाण्याचें कणीस.

**खरज**—पु. १ (संगित) नीच स्वर; घोगरा आवाज. २ खरज स्वर वाजविण्याजोगा विण्यास लावलेला घोर. खर्ज पहा. [सं. षड्ज]

**खरजाई**—स्त्री. खरजेची देवता. हिचा अंगारा लावला म्हणजे खरूज जाते अशी समजूत आहे. [खरूज+आई]

**खरजुडा-ला**—वि. खरजेनें व्याप्त; ज्यास विशेष खरूज असते असा (माणूस). [सं. खर्जू]

**खरजुवप**—क्रि. (गो.) खाजविणें. म्ह० (गो.) खरजुता एक ठय खपितां एकठय=खाज येते एके ठिकाणीं पण खाजवितो दुसऱ्याच ठिकाणीं. (वडयाचें तेल वांग्यावर काढणें).

**खरजू**—स्त्री. (गो.) खाज. [सं. खर्जु]

**खरट**—पु. (प्रां.) १ वाळू; खडी. २ खडा लागून होणारें क्षत (माणसाच्या, जनावराच्या पायाला, तळव्याला). करट पहा. [ध्व. खर+(व)ट प्रत्यय ?]

**खरटणें**—अक्रि. वाढ खुंटणें. खुरटणें पहा.

**खरडणें**—अक्रि. खरडणें पहा.

**खरंटा**—पु. खराटा पहा.

**खरंटा**—पु. एक क्षुद्रप.

**खरटिवाळा**—पु. एक रणवाद्य. 'तेथ वाजती शंख काहाळा। तुररिआं तोंडी खरटिवाळा।' –शिशु १०२६.

**खरड**—स्त्री. १ घाई-घाईनें लिहिलेला, कागद अथवा लेख, आकृती, खर्डा, आराखडा. २ रेघोटया; चिरखुडया. ३ खरडपट्टी; पाणउतारा; निर्भर्त्सना. (क्रि० काढणें; निघणें). ४ धातु शुद्ध करतांना तिचे भोंवतीं जमणारी राख व माती (ही धातुपासून खरडून काढलेली असते म्हणून हा शब्द); खरडून काढलेला भाग. ५ (गो.) टकल. ६ (गो.) केसांत सांचणारा मळ. [सं. क्षुर्; प्रा. खरड=लेपणें;ध्व. खर ?] सामाशब्द– ॰घाशा–वि. (उपहासार्थी) सरासरी लेखन जाणणारा; परंतु त्यांतील मर्म न जाणणारा (कारकून). २ अडाणी; बिनकसबी (लेखक, न्हावी, सुतार). [खरडणें+घासणें] ॰निशी–स्त्री. १ गिचमिड; वेडेंवांकडें लिखाण, लेखन. २ खर्डेघाशी. ॰नीस-निशा–वि. वाईट लेखक. (खरड+नवीस) ॰पट्टी–स्त्री. १ खरड पहा. कडाक्याची निर्भर्त्सना; दटावणी; जोराची चापणी; चोहती; मोसडपट्टी; दोष किंवा अपराध दाखवून रागानें झाडलेला ताशेरा. (क्रि० काढणें; निघणें). २ तोटा, नुकसान सोसावयास लावणें. (क्रि० काढणें; निघणें).

**खरड**—पु १ खाणींत असंस्कृत स्थितींत सापडणारें रत्न. २ ओबडधोबड खडा. खरड पहा. ॰धरड–वि. दगडाळ; नापीक (जमीन).

खरडणें—उक्रि. १ ओरखडणें; ओरबडणें, गलथरीतपणें चोळून काढणें; पासटणें. २ गुरपणें; उपटणें (गवत, तण, इ० खुर- प्यानें). ३ निष्काळजीपणानें, खरखरीतपणें (खरखर वाजत); हजामत करणें, भादरणें. ४ ओबडधोबड रीतीनें, कसें तरी, कच्चें, घाईनें लिहिणें, टिपणें, टांचणें. 'जन्माच्या कर्मी कुडें कोटी आठवली ती मुद्दा शिळी, पण तिच्या जिवावर चार पानें खर डली.' —नाकु ३.४५. ५ संक्षिप्त टांचण करणें; सारांश, मुद्दे लिहून काढणें. ६ धसाफशीनें ओढणें, मागणें, दळणें इ० ७ खेचणें; घुरणें; ठेचणें, खरांगटणें पहा. ८ खरड काढणें; पाणउतारा करणें. ९ (ल.) समूळ उच्छेद करणें, खरडून काढणें. 'शत्रूस तेथून खरडून काढला.' —अक्रि. (प्राणी). डुंगणावर सरकणें, चालणें; खरचटणें; फरफटणें; सरपटणें [खरड]

खरडणें—अक्रि. खुरटणें; मुर्दत जाणें; वाढ खुंटणें. 'हें झाड मुईशीं खरडतें.'

खरडा—पु १ खरडून काढलेलें अन्न, खरवडें (स्वयंपा- काच्या भांड्यांतून). २ भरडलेल्या, भाजलेल्या, मिरी, मेथ्या इ० कांचा चुरा. (क.) तिखट (ओल्या मिरच्यांचें). ३ गिचाड कागद. (गिचमिड लिहिलेला, ओळीस ओळ लागलेला); डाग पडलेलें लिखाण; अक्षर वळविण्याकरितां किंवा घटविण्याकरितां लिहिलेला बंद; खरडें. ४ आराखडा; कच्चें टांचण; कच्चा मसुदा; रोजनिशी; टांचणवही; टिपणवही; चोपडी; व्यापारी, धंदेवाले लोक हिशेबाच्या दोन वह्या ठेवतात—(अ) कच्चा खरडा व (आ) पक्का खरडा. कच्च्या वरून पक्का लिहितात ५ ओबड धोबड, खेंगटेमेंगटे मोतीं; गोलबंद नसणारें मोतीं, हलक्या मोत्याचा दाणा; असल्या मोत्याचा खडबडीतपणा. ६ खर- बुजाची एक जात ७ देवी व गोंवर यांमुळें आलेली पोटांतील कडकी, उष्णता. ८ चित्ता; बिब्या वाघ. 'होती कोंवडी ती म्याली खरड्यानें.' —मसाप १.१.२. ९ (कों.) भाताच्या लहान भरलेल्या ओंब्या, साळीच्या लहान, भरदार कणसांचा समुदाय. १० गुरांनीं खरडून खावयाजोगें म्हणजे फक्त खुरपतां येण्यासारखें आंखूड गवत ११ तुपांत तळलेलें (जायफळ, घडि शेप, मुरडशेंग यांचें) चूर्ण हें रेच बंद होण्याकरितां घेतात. १२ तुटवडा; कमीपणा; टंचाई (खरडाचें लागेल इतकी). (क्रि० लागणें; पडणें). 'पाण्याचा खरडा लागला अथवा पडला' =विहिरीचें पाणी इतकें थोडें उरलें आहे कीं, तें (नरोटीनें) खर- डलें पाहिजे. तसेंच धान्याला खरडा लागला.=पिकाचा तुटवडा पडला. १३ (ना.) पुरचुंडी; पुष्टीपत्र (कार्डबोर्ड). १४ (सोनारी) चांदीच्या सुताच्या एका टोंकास दिव्यावर धरून रवा किंवा गोलाकार करतात ती कांडी (ही घुंगुरांच्या कामीं उपयोगी पडते). [खरड] खरडेघाशी—स्त्री. निव्वळ कारकुनी. खरडे घासणारा—वि. निव्वळ कारकून. गरडघाशा पहा. खरडे घासणें—१ लिहिण्याचें कष्टदायक काम करणें. २ (निष्काळजी- पणानें) लिहिणें; गरडणें; भरकटणें.

खरडी—स्त्री. १ जोराची गरडपट्टी; निर्भर्त्सना (क्रि० काढणें; निघणें). २ एक चर्मवाद्य; एक प्रकारची टिमकी. ३ कापसाचा एक धागा; मांजाच्या सुतांचा बारीक दोरा; काथ- वटी. ४ (कु.) पुन्नाग (उंडी) झाडाचें कोंवळें किंवा शुष्क- लेलें फळ; उंडी. ५ (कु.) बैलगाडीचा वेग थांबविण्यासाठीं लावलेला चाकाच्या मागच्या दांडा किंवा अडणा. ६ (कु.) सोललेली पण न सुकलेली सुपारी. ७ (क.) (भजनी मंडळ) मृदंग इ० घायास लावलेली कणीक खरडण्याचें एक हत्यार. 'खरडीनें कणीक घास.' [खरडणें]

खरडूं—न. (कु.) कचें पोर; बारीक फ

खरडें—खरडा अर्थ ३, ४ पहा.

खरडेयजा मोतीं, खरडयाचें मोतीं—न. हलकें मोतीं. खरडा अर्थ ५ पहा.

खरड्या—वि. १ ओबडधोबड प्रकारें लिहिणारा, हजामत करणारा. २ निव्वळ खरडेघाशा, कारकुंडा, न्हावडा. —पु चित्ता; खरड्या वाघ. खरडा अर्थ ८ पहा. [खरडणें]

खरणी—स्त्री. घोडयास होणारा एक रोग, यांत घोड्याच्या दोन्हीं नाकपुड्यांतून वाफा निघतात दुर्गंधी सुटते, नाकपुड्या ताणल्या जातात, घोडा पाणी पीत नाहीं व अगदीं कृश होतो. या रोगास घोणानुरोध असें म्हणतात. —अश्वप २.१२७. [सं. क्षरण; प्रा. खरण]

खरणें—अक्रि. १ लववींतून खर जाणें. २ वीर्यस्खलन होणें (मनुष्य, पशु इ० चें). [सं. क्षरण; प्रा. खरण]

खरतड—वि. १ खडतर पहा २ स्पष्ट, निर्भीड. ॰बोहणी— स्त्री. (ना.) लाभदायक बोहणी.

खरतडणें—अक्रि. १ खडतरणें पहा. २ शरीरास लागणें, जखम होणें. [खरतर]

खरतर—वि. तीक्ष्णतर 'अन्योन्यासि विदारिति ते खरतर- नखर सिंह शावकसे.' —मोभीष्म ३.५१. [सं.] ॰शरवृष्टि— (काव्य) बाणांची अतिशय जोराची वृष्टि, वर्षाव. [सं.]

खरतुडी—स्त्री पांढरीं फुलें आणि खाण्याजोगीं मुळें अस- णारी एक वनस्पति ही पावसाळ्याच्या आरंभीं महाबळेश्वराकडे आढळते.

खरदडला—वि. (ना.) खडबडीत. [खर]

खरदळणें—सक्रि. खडविखड करणें;, खंडळणें. 'तुमतें बाणीं नि काढेनु तरी। ऐसें खरदळितुसें।' —शिशु १००३.

**खरनखर**—क्रिवि. सरतेशेवटीं. अखरनखर पहा.

**खरप**—स्त्री. भांडयाच्या तळाची जळ; मस; काजळ. [सं. खर्परी=एक प्रकारचें काजळ; करपणें ]

**खरप**—पु. ( ना ) शस्त्रें पाजळण्याचा एक दगड, निसणा. [ सं. क्षर्; प्रा. खर ]

**खरंप**—स्त्री. ( राजा. ) आंतडयांतील तिडीक, वेदना.

**खरपट-ड**—न. १ खडपा; पर्वताचे मोठे खडक परंतु प्रायः जे भाजलेल्यासारखे दिसत असतात ते. २ मुरूम, दगड यांनीं बनलेली जमीन; कातळवट जमीन. ३ डोंगरावरील सपाटी. ४ फोड ( क्रि० येणें; उठणें ). -वि. मुरुम व दगड यांनीं कठिण झालेली ( जमीन ). [ खरपट ]

**खरपट-ड**—न. १ ( रिकाम्या विहिरीच्या बाजूला अथवा तळाला भांडें आपटल्यानें होणारा आवाज, त्यावरून ) भडच णीची, दुःखाची, हालाची ओरड, हाकाटी ( अवर्षणामुळें आणि त्यामुळें पीक न आल्यास उत्पन्न झालेल्या दुष्काळामुळें, तसेंच तळीं, विहिरी यांच्या कोरडेपणामुळें). २ दुष्काळ; अवर्षण (क्रि० पडणें). 'एखादे सालीं खरपड पडलें...म्हणजे तितक्यानेंच त्यांची नुकसानी होते.' —वाळ २.१२८. 'खरपड पडलें अति दारुण । दोन पायल्यांची झाली धारण ।' [ सं. क्षर्+पत् ]

**खरपड-डी**—स्त्री. टोळांची एक जात; खरपुडा पहा.

**खरपडी**—खापुडी पहा.

**खरपणें**—अक्रि. खरडून, ओरखडून, जोरानें काढणें; खर डणें; खरवडणें. [ सं. क्षर्; प्रा. खर ]

**खरंपणें**—अक्रि. (राजा) खरंप ( आंतडयाचा ) रोग होणें

**खरपर**—वि. खाष्ट; कडक. 'येथिल दैवत रे बहु खरपरे कर्तृत्व गुणा असा।' —आमहाबळ ४४.

**खरपवप**—क्रि. ( गो. ) खाजविणें. [ खरपणें ]

**खरपळी-पुळी**—स्त्री. खरपुडी; सालपट, थापटी ( वाळ लेला चिखल, गवरी इ० ची ).

**खरपा**—पु. बारीक सूत ओढण्याची पट्टी. —शर.

**खरपाउणें**—न. ( चे. सुनारी ) लांकूड तासण्याचा रंधा.

**खरपी**—स्त्री. १ भाजून दळलेल्या अगर वाटलेल्या धान्याचा एक पदार्थ. २ जळक्या भांडयाच्या बुडाची खरवड; मस. [ सं खर्परी=एक प्रकारचें काळें ]

**खरपुंचें, खोपुंचें**—क्रि. ( गो. ) खरपणें; ओरपणें; ओर खडणें; खाजविणें.

**खरपुट**—न. जनावराच्या पायाचा खुर. 'पुढिलें नखपुटें ठेवी कुंभस्थळीं दिग्गजाचां।' —शिशु १००५. [ सं. क्षरपुट ]

**खरपुडा**—पु. टोळांची एक बारीक जात. हे जमिनीवर व कोवळ्या पिकांवर पडतात.

**खरपु(पो)डी**—स्त्री. १ वेगळा झालेला, सुटलेला तुकडा ( झाड, भिंत, त्वचा इ० चा ); खपली ( जखमेची ); पोपडा; साल; जळक्या भाताचा भांडयास लागलेला लेप. २ बगला; करकोचा. ३ खरपुडा पहा. ४ खरतुडी पहा.

**खरपूस**—वि. १ खमंग; पिंवळसर व पिंगट रंग येईपर्यंत व खुमखुशीत, रुचकर होईपर्यंत भाजलेला, तळलेला (पदार्थ). २ (ल.) खडखडीत; स्पष्ट; खसखसीत; निर्भीड; दणदणीत (हुकूम); निक्षून केलेलें ( भाषण ) ठाम; खणखणीत ( हुकूम ). ३ कडक; खरमरीत (उपाय, योजना). 'व्रतें आचरे खरपुसें ।' —ज्ञा १६.९१. ४ चलाख; हुषार; साहसी (माणूस, स्वभाव ). ५ परिपक्व ( मसलत, विचार ). ६ बोचणारा; झोंबणारा; तीक्ष्ण. 'पावोनि तैं स्पर्शी । मलयानिळु खरपुसु । येणें मानें पशु । कुरवाळणें ।' —ज्ञा १३.२८९. —क्रिवि. फार; अतिशयितपणें (जोर देण्यासाठीं योजतात ). उदा० **०तापविणें**-लाल होईपर्यंत उकळणें, कढत करणें, तसेंच **०भाजणें,तळणें, बोलणें, सांगणें** इ०. **०ताकीद करणें**-निक्षून सांगणें; बजावणें. **०समाचार घेणें**-१ यथायोग्य पारिपत्य करणें; उट्टें काढणें. २ बेदम ठोकणें; बदडणें.

**खरपें**—न. मातीचें ढेकूळ, डिखळ. 'जे सात्त्विकाचेनि वडपें । गेलें आध्यात्मिक खरपें ।' —ज्ञा ६.४९०.

**खरब**—न. (व.) खडकाळ जमीन. खरवड पहा. 'गांवाला लागूनच खरब आहे.' खराब पहा. [ अर. खराब् ]

**खरंबटी**—स्त्री. खरमाटी पहा.

**खरबट्ठर**—वि. (व.) मन वळविण्यास कठिण. 'तो. खरबट्ठर माणूस सांपडला.' [ खरतर, खडतर ]

**खरवड**—वि. १ खडबडीत; चढउताराची ( जमीन ). २ कांहीं पदार्थ चिकटून, लिडबिडून खडबडीत झालेलें ( भांडें, हात, अंग इ० ).

**खरवडणें**—अक्रि. ( अन्न, कणीक, भात इ० नीं ) गदळ होणें; खरवटणें. करवटणें पहा.

**खरवडी(टी)त, खरवडा, खरबुडीत**—वि. ओबडधोबड; उसीरवाचोर; भसाड म्ह० भळी ना वळीचा आणि खरवडपा होईचा.

**खरवा**—स्त्री. ( कु. ) डोकींतील मेलेली त्वचा

**खरवा-वी**—पुस्त्री. ( कु. ) गोड्या पाण्यांतील एक मासा.

**खरबुजी**—स्त्री. खरबुजाचा वेल. खरबूज पहा. -वि. खरबुजाच्या आकाराची ( तरकारीची हवी, मणी, सुनाळें इ० ). **०चेहरा**-पु. देवीच्या वणांनीं युक्त असा चेहरा; ओबडधोबड, कुरूप माणूस.

खरबूज—स्त्री. खरबुजीचा वेल व त्याचें फळ. कलिंगडा-प्रमाणें याचा वेल वाढतो, व त्याचें फळ वाटोळें, तांबुस रंगावर असतें. ह्या खरबुजाचा आंतील भाग हिरवट असतो त्यास तरटी म्हणतात. फळाची भाजी, रायतें, कोशिंबीर वगैरे करतात. याच्या ८ जाती आहेत व सामाशी, अकरमाही, बारमाही असे काही प्रकार आहेत. 'तयापाशीं होतीं खरबुजें दोन। तीं केलीं गुरुसी अर्पण।' –शनि २८०. [फा.]

खरमंजरी—स्त्री. अघाडा; अपामार्ग झाड. [सं.]

खरमरा-त्या—वि. १ कठोर; खरखरीत; कठिण. २ प्रखर; खरखरीत. 'तैय उन्हाळा भागीं खरमरा।'–ज्ञा १६.३९५. ३ हुशार; चपापटा; चलाख; खणखणीत. म्ह० 'राऊत असे खरमरा तर घोडा चाले तरतरा'

खरमरीत—वि. १ तीक्ष्ण; तिखट; झणझणीत; जलाल (मिरीं); प्रखर (ऊन, आग). निर्भीड; खणखणीत, खडेतोड (भाषण, टीका); खडकदार; अचंचल (उपाय, साधन); स्पष्ट; गडखडीत (बोलणारा माणूस).

खरमसळी—स्त्री. एक भाजी. खरमांबळी पहा.

खरमस्त—वि. १ पाणीदार; चलाख, ताघट (घोडा). २ घमेंडखोर; गर्विष्ठ; दुर्वेल उड्या मारणारा. [फा.]

खरमस्ती—स्त्री. १ माज; मद; मस्ती; रग (घोड्याची). २ गर्व; घमेंड; दिमाख; डौल. (क्रि० मोडणें; जिरविणें, पुरविणें). ३ (गो.) खर्मस्ती=अति हट्ट, दांडगाई.

खरमा(म)टी—स्त्री. एक झाड. हें उंच व बारीक असतें; ओमणाच्या उपयोगी पडतें.

खरमाल—स्त्री. (हेट. नाविक) शिडाची दोरी टांगून ठेव-ण्याची जागा.

खरव(वा)ई—स्त्री. (तांबट, सोनार) भांड्यांना विशिष्ट आकार देण्याचा किंवा भांडीं ज्याच्यावर ठोकतात असा लांबट व चौरस गज, पहार. याला टोकाशीं वळण देऊन उभट ऐरणी-प्रमाणें सोय केलेली असते.

खरवट—वि. खडबडीत; खरवरीत.

खरवड—स्त्री. १ पदार्थ शिजत अगर आटत असता तळाला कठिण झालेला आणि भांड्यांस चिकटून राहिलेला खरडा, जळ-कट भाग, (भाताचा, तुपाचा, दुधाचा); खरपुडी. 'प्रतारासी करी झगडा। तया घाली खरवडी कोंडा।' –कथा ५.२४९. २ अशा रीतीनें चिकटून राहिलेला आणि खरडून निघण्याजोगा भात. म्ह० कामाला मरावें खरवडीला जपावें=१ कामाला कुचर पण खाण्याला अखेरपर्यंत. किंवा २ खूप काम करून शक्य तों काट-कसर करावी (उद्योगीपणा आणि काटकसर असावी). ३ (ल.) खरडपट्टी; निर्भर्त्सना, ताशेरा; ओढंती. (क्रि० काढणें). 'त्याची ज्यां भली खरवड काढली.' ४ (ल.) संप-तीचा शेष; किडुकमिडुक; गडंगनेर जाऊन उरलेला अवशेष. ५ निरुपता दासविण्यासाठीं उपहासानें योजतात. उदा० 'सोदा बेटा शहाण्याची खरवड–गाणाराची खरवड.' ५ (निंदाव्यंजक). अर्क; गाळ; अतिशय खोडसाळ, त्रासदायक माणूस. 'तो सर्व गांवाची खरवड आहे.' ६ (कु.) नारळाची खव, नरड. [सं. खरदन; म. खरडणें; किंवा प्रा. खरड=लेपणें, लपेटणें] घराची खरवड–खराब, पडकें, मोडकें गैरसोयीचें घर. (अशा मोडक्या घरास तुच्छतेनें म्हणतात). 'मेलं घर आहे का घराची खरवड!' –फाटक नाट्यछटा ३.

खरवड—पु. (कु. गो.) अति ल्हान मासा, मासळी.

खरवड्या न्हावी—पु वाईट हजामत करणारा हजाम; अकुशल कारागीर.

खरवडणी—स्त्री. (कु.) खरवड अर्थ १ पहा.

खरवडणें—न. जिनें पदार्थ खरडून काढावयाचा ती वस्तु (शिंप, कलथा इ०). –उक्रि. खरडून काढणें; घासणें; साफ करणें; निरपणें; खवणें (शिंप, नरवणी, नरड इत्यादिकांनीं). [खरवड]

खरवत-ती—स्त्री. एक खरखरीत पानाचें झाड.

खरवत-ती—स्त्री. (गो. कु.) (सुताराची.) करवत; अर कस. [करवत]

खरवशिंगाळा—पु. समुद्रांतील शिंगाळा माशाची एक जात.

खरवस, खरस—पुस्त्री. १ जनावरानें वीवळे (व्याल्या-नतरचें) दूध तापवून त्यांत गूळ घालून तयार केलेलें खाद्य. [सं. क्षार+रस]

खरवस, खरस—पु. तहानेपासुन अथवा फार बोलण्यामुळें तोंडाच्या कोंपऱ्या कोंपऱ्यांत जमणारा पांढरा फेंस; चिकटा. ०तोंडीं येणें–अतिशय दमणें; श्रांत होणें. 'विस्मरणाची खरस तोंडीं।' –एरुस्व ११.५५. 'भाऊसाहेब यांचे तोंडास हाणा! हाणा! हेंच करीत असतां खरस आली.' –भाव १५१. [सं. क्षर-क्षार=रस]

खरविसर—वि. (प्रां.) चढउतार; उंचसखल. [सं.]

खरविणें—उक्रि (कों) खोल व भरपूर खोदणें; पूर्ण साफसूफ करणें; उपसा काढणें (विहीर, डवकें, गटार यांचा).

खरशिंग-शिंगळ-गूळ-गळी, खरसांबळी(ळें),खर-समुळी—स्त्री. एक वेल; मेंढशिंगी; ही मोठी व गांठाळ असून पानें कडुनिंबाच्या पानासारखीं असतात. शेंगा पाऊण हात लांबीच्या असून खाण्याच्या (भाजीच्या) उपयोगी असतात. हिच्या लाकडाचे मृदंग व तबले करतात. शेंगेस खरशेंग म्हणतात. [सं. मेषशृंगी]

खरशी—स्त्री. गोड्या पाण्यांतील एक मासा.

**खरशी-सी**—स्त्री खरवस-खरस पहा 'हातपाय जाहले गोळा, मुखा खरशी आलीसे।' -कथा ६ १५५१

**खरस**—१ खरवस पहा २ (गो) धाप, दमा

**खरसांवळी**—स्त्री एक वेल, आवई, कोयते वाल

**खरसिंग**—न एका प्रकारचें शिंगाचें वाद्य 'खिनखिनितीं तुरिआ। खरसिंगेंसी।' -शिशु ५२४

**खरसुचें**—अक्रि (गो) खरस येणें, दम लागणें

**खरळखोंचर**—पु १ छिद्र, खाच खळगा २ (ल) दोष -वि (कों) खाचखळग्याची, ल्हान ल्हान खळग्यांनीं युक्त [खळी+खोंचर]

**खरळा**—पु बोयट व जाड धारेचा विळा

**खरा**—वि १ सत्य, खोटें नव्हे असें म्ह० खऱ्याला काय मरण आहे २ अस्सल, अकृत्रिम, बनावट नसलेलें शुद्ध ३ चांगलें, हिणकस नसलेलें, बिन भेसळीचें (नाणें मौल्यवान वस्तु) ४ सच्चा, विश्वासु, प्रामाणिक, निष्पाप, लबाड नसलेला ५ बरोबर, सरळ, दोरीसुत (तयार केलेला, बसलेला खांब, तुळई) 'दहा खांब खरे झाले तितक्यावर महालें चढवा ६ संपूर्ण, बरोबर, पुरेपूर, चालीस अनुसरून, वर्तावळ्यासह किंवा वाढीसह जसें-पचोतरी आणि सळईसह कटऱ्याची किंवा शेंकडा पाढीमागें १०, १५, २०, सहित आण्याची खरेदी ७ ठाम, निश्चित, कायम (करार इ०) (क्रि० करणें) ८ न्यूनतारहित, पुरेपूर (वजन, परिमाण) -क्रिवि बरें तर! निदान एवढें तरी असु दे! निदानीं 'तु त्याला बोलाव तर खरा, तो येओ न येओ' [स खल्ल, गु खरू?]

**खरा**—पु १ एखाद्या भस्मांत भिजत घालून तांबडा केलेला किंवा कुंकू तयार करण्याकरितां सालपट काढलेला हळदीचा तुकडा, तुकडे, गधाचा रवा जसें-हळकुंडाचा खरा, कुंकवाचा खरा, खडा २ पुनकुळी, कातरा, उष्णतेमुळें तोंडांत येणारा फोड ३ पोहती वगैरे दाग्यांचे दाते प्रत्येकीं ४ खडा 'निश्चयाचा खरा। गांठीं घांपसीरा' -ज्ञा १४ १२८ [खडा स खर ध्व खर] (वाप्र) ०करून देणें-खरा व अस्सल आहे म्हणून सिद्ध करणें चांगलेपणा पटवून देणें म्ह० खऱ्याखोट्यामध्यें चार बोटं अंतर आहे =डोळा व कान यांच्यामधील अंतर सामासिक शब्द- ०खुरा-खोरा-वि निश्चयेंकरून जो खोटा नव्हे तो, खराखुरा, अगदीं वास्तविक, सत्य, न्याय्य विश्वासु खराखुर पहा ०खोटा-वि खरा आणि खोटा **खरातोंडा, खऱ्या तोंडाचा**-वि खरा आणि खात्रीचा, सचा आणि अस्सल प्रामाणिक आणि मोकळ्या मनाचा, खरा आणि वास्तविक (माणूस, वस्तु, वर्तन)

**खराई**—स्त्री १ सत्यता, खरेपणा, वास्तविकता. २ प्रामाणिकपणा, इमान, नेकी ३ शुद्धपणा, अस्सलपणा ४ नीटनेटकेपणा, बरोबरपणा, दुरुस्तपणा [खरा+ई प्रत्यय]

**खराई**—स्त्री वीर्यांश, धातुरोगांत जाणारी वीर्याची खर खर पहा [स क्षर् म खर]

**खराखर-रां**—क्रिवि ओढलेल्या, फरफटत नेलेल्या पदार्थापासून आवाज होऊन, आवाज करून खरखर पहा

**खरागणें**—सक्रि १ उन होणें 'नातरी खर,गलेया पायें। डोळयाची दृष्टी जाय।' -ज्ञाप्र २१९ २ (कु) करपणें

**खराच-चा**—पु (सांकेतिक) पखोडीचें एक हत्यार -गुजा

**खरांट, खराट**—न १ राडेरोडे गाळसाळ, अवशिष्ट सामान २ (कु) टक्कल खरड पहा -वि १ नापीक, अनुत्पादक, अफल (जमीन, प्रदेश) २ पर्णहीन, खराटलेलें, बोडकें (झाड, झुडप) ३ पडलेल्या इमारतीचे, गाळसाळ उरलेलें (सामान=विटकरीचे, कोळाचे, चुन्याचे तुकडे, राडेरोडे, माती इ० इमारत बांधल्यावर उरलेलें) [खराटा]

**खराटणें**—अक्रि खराटा होणें, पानें झडणें, गळणें (झाडा झुडपाचीं)

**खरा(रां)टा**—पु १ नारळी, पोफळी इ० च्या हिराची अगर माडूच्या पात्याची किंवा तुकड्याची केलेली केरसुणी 'तुझा खाडआ खराटेनी। दानवप्रतापु वरू फेडौनी।' -शिशु १५८ २ झिजलेली (नुसता बुडखा राहिलेली) हिराची केरसुणी ३ पानें गळलेलें झाड, वठलेलें झाड ४ (ल) दुष्काळ, पूर्ण अभाव, तूट, तोटा 'तेसें आपणपें नाहीं दिठे। जयातें स्वसुखाचें सदा खराटें।' -ज्ञा ५ ११७ [स क्षर् प्रा खर+यष्टि? -भा अ १८३४] (वाप्र) ०फिरणें—अक्रि सर्व नाश होणें, विध्वस होणें 'तथें खराटा फिरला आहे' ०फिरविणें-नांगर फिरविणें, विध्वस करणें, सत्यानाश करणें (दत्त, ग्राम संपत्ति इ०चा)

**खराड**—पु जोरानें फाटणें, तरकणें, कडाडणें, गडगडणें [ध्व]

**खराडा**—पु (कु) गुराची प्रसूतीपासून शुश्रूषा करणारा गावठी वैद्य

**खरांडी**—स्त्री (व) खार, चानी

**खराटी**—स्त्री १ (गा) अवाटीच्या धाराचा दार बदलण्याचें साधन २ (खा) विहिरींतून पाणी वर काढण्याची कणी [ध्व]

**खराणा**—वि (कों) गरम उष्ण (दिवस महिना यांशीं योजून अव प्रयोग) जसें-खराणे दिवस=उन्हाळ्याचे दिवस (उन्हाळ्यांतील तीन महिन्यांच्या दिवसांस म्हणतात [स खर]

खरादणें—सकि. कातणें. 'एक तोळा खरादलेली अगर कातरलेली थीवर्धनी सुपारी.' –ऐरापु प्र. २.३९. [अर. खराद= कातकामाचें येत्र]

खरादी—पु. कातीव काम करणारा; अरकशी. [अर. फा.]

खराब—वि. १ नापीक; उध्वस्त; ओसाड (जमीन, प्रदेश) 'इकडे मुदस्तांच देण्यामुळे सेर्टी खराब होती.' –ख्रे २.८५०. २ दुर्गुणी; विकृत; बिघडलेला; वाईट (वस्तु, माणुस) [अर. खराब्] ०करणें-(रुपये-पैका-पैसा)=व्यर्थ उधळणें ०हाल-वि. दुर्दशाग्रस्त; विपन्न 'येथे आम्ही खराब-हाल आहों.' –जोरा ४.

खराबा—पु. १ नापीक, टाकाऊ जमीनीचा, शेताचा तुकडा, रेताड, ओसाड जमीन. २ (नाविक) उथळ पाण्याच्या तळाशी असलेला खडक; समुद्रांतील खडक. हा गलबतांना नडतो. ३ नुकसान; तोटा. 'फार दिवस लष्करास ताकीद केल्यानें खराबा होईल' –रा ६.५९१. 'मोंगलाचा खराबा करावयाचा तिलहा त्यानीं केला.' –सूर्यप्र १४६. ४ (कुलाबा). अलिबाग तालु क्यांत अष्टागर प्रांतांत गांवठाणास स्वतंत्र जागा राखून ठेवण्यांत आलेली नसते. बागायतीच्या जागेंतच थोडी राहाण्यापुरती जागा बांधून खातेदार राहातो. या घरखालील जागेला खराबा म्हण तात. व ती जमीन महसुलांतून १९२८ पर्यंत वगळली गेली होती –के ४.१२.२८. [अर. खराब् फा. खराबा]

खराबी—स्त्री. नुकसानी; तोटा; हानि; दुर्दशा; दलाली. 'तुमच्या लष्करची खराबी इराणीस कळली.' –पाव ३२. 'लुच्चे लोकाच्या नादीं लागल्यास फार खराबी होईल' –विक्षिप्त १.७२. [फा.]

खरारणें—अकि खरखर आवाज करणें; जोरानें फाटणें, खरखरणें, खराड पहा [ध्व ]

खरारा—पु १ घोडयाला खाजविण्याचें, त्याचें अंग साफ करण्याचें एक साधन. २ घोडयाला खरारा करणें, खाजविणें, मालिश करणें. [ध्व. खर, हिं ] (वाप्र.) **खरारा खाजवीत नगारा वाजवीत**-कांहीं तरी करीत (येतो, फिरतो) **गाढवाचा खरारा**-मूर्ख माणूस. –क्रिवि खडखडत; ओरखडत, खरारा वाजविण्याप्रमाणें आवाज करून. खराड, खरारणें पहा.

खराली-ळी, खराळ—स्त्रीपु (कों.) लहान कोयती, गवत कापण्याचा लहान विळा.

खराव—पु १ (क) खालीं आलेल्या, तोकडया पडलेल्या, अशा खांब इ० स उंच करण्यामाठीं खालीं अगर वर जो लाकडाचा तुकडा देतात तो. 'ह्या खांबास चार आगळें खराव दिला म्हणजे सर्वांबरोबर येईल' २ ही खराव देण्याची क्रिया. ३ ह्या खराव देण्यामुळें वाढलेली (खांब इ० ची) उंची. 'खांबास चार आगळें खराव देतांच बाहालासाठी चार बोटें गराव ओंडा.' [हिं. गडा= उभा; खडाव ?]

खरावणें—अकि. कायम, स्थिर, निश्चित होणें; वाढणें; टिकणें (वारा; उष्णता; पाऊस इ०). 'वारा खरावल तेव्हां गलबत चांगलें चालेल.' खरावणें पहा. [खरा]

खरावणें—अकि. आरक्त, लाल होणें (डोळे). 'त्याचा डोळा खरावला आहे.' [खर]

खराविणें—उकि. विसरूं नये किंवा उलट खाऊं नये म्हणून एखादी गोष्ट पुन पुन्हां समजावून सांगणें; जोरानें, ठसठशीत, मनावर ठसेलसें बोलणें, खरमरीत ताकीद करणें; जोरानें वजावणें; वारंवाईनें व छानून विचारणें. [खरा करणें]

खराविणें—उकि. (राजा.) चांगला साफ करणें; सपाटून खोल करणें (पाण्याचा पाट, विहीर, तळें वगैरे). [सं. क्षर्; म. खर]

खराळणें—अकि. (व.) गडगडणें; खरखरणें; आवाज करणें, वाजणें. खरारणें पहा. 'आभाळ खराळतें.' 'पोट खराळतें.' [ध्व.]

खराळा—पु. १ (व. ना.) खरारा. २ गाडी वगैरे वाहनाचा दुरून ऐकूं येणारा आवाज. [खरारा]

खरिदी—स्त्री. १ विकत घेण्याची क्रिया. २ विकत घेतलेला माल. ०छाप-पु. छापांच्या विक्रीवरील सरकारी कर. खरीद पहा.

खरिपी-फी—वि. १ खरीप पिकासंबंधीं. २ खरीप पीक येणारी (कोंकणासारखी जमीन, प्रांत). [खरीप]

खरी—स्त्री. (कों.) कातळावर माती टाकून बनविलेली शेतजमीन; साधारण सपाट कातळावर, बाहेरील माती ६–१० अंगळें जाड इतकी पसरून कुडयाठा प्रमाणें तयार केलेल्या लहान लहान तुकडयाचा समुदाय. ही भातजमीन असते. हिची दरसाल भाजावळ करावी लागते, किंवा कुटी वगैरे खत घालावें लागतें. [खरीव]

खरी(रे)द-दी—स्त्री. क्रय. खरिदी पहा. 'त्याला बाजारातुन कांहीं जिन्नस खरेदी करावयाचे होते' –कोरकि ९२. –वि, विकत घेतलेलें, क्रीत. [फा. खरीद] **०फरोक्त-क्ती**-पुस्त्री. क्रयविक्रय, विकत घेणें–विकणें. 'खरेदी–फरोक्तास समुद्रांत हिंडतात.' –वाडसमा २.६६. 'माल घेऊन यानेस येऊन खरीदी–फरोख्ती करणें.' –रा ७ १०६. **०खत, पत्र**–न. विक्रेत्यापासुन विकत घेणारानें मालकीहक्कासंबंधीं लिहुन घेतलेला कागद; विकत दिल्याबद्दलचा लेख. ०दार–वि. विकत घेणारा. 'परंतु त्या घरास कोणी खरीददार होत नाहीं.' –रा १२.१८२.

खरीदणें—उकि. खरेदी करणें; विकत घेणें.

खरीप-फ—पु १ कार्तिकांत तयार होणारें पीक; पहिलें पीक; पावसावरील पीक; गुजराथेत याला चौमासी पीक म्हणतात.

'अश्विन मासी गारा पडल्या, खरीफ बुडालें.' –रा ३.१६४. २ खरीपाच्या हंगामांतील धान्य; पूर्वधान्य (मूग, मटकी, बाजरी इ०). [अर. खरीफ्]

**खरीप**—न. १ खडेरोडे, गोटे इ० भर घालण्यासाठीं वापरतात तें; खडी, लहान दगड वगैरे. २ पडलेल्या इमारतींचे लहान सहान दगड, विटा, कौलें, माती इ० सामान; विहीर, खड्डा, यांतून खणून काढलेला वरच्यासारखा माल, डबर (कों.) ३ उथळ जमीन; सपाट जमीन. –स्त्री. पडित जमीनीची लागवड. खरी पहा. [खर]

**खरुखरा**—अ. खरोखर. 'मनमुराद धन खरुखरा।' –अमृत ५३.

**खरूज**—स्त्री. १ कंडू, खाज सुटणें, इ० चा रोग; एक त्वचेचा रोग; ह्या रोगाचे किडे कातडीखालीं अगदीं ल्हानसा खळगा करून राहतात. त्यांत मादी अंडीं घालून तेथेंच मरते. अंडीं लवकरच उबून नवे जीव तयार होतात. ही क्रिया होतांना फार खाज सुटते व खाजवून खाजवून तेथें लहान लहान फोड येतात, ते फुटले म्हणजे हे नवे जीव कातडीवर येतात. खरूज सांसर्गिक रोग आहे –प्राणी आणि आरोग्य ६१. खरजेवर औषध–आडुळशाचीं कोंवळीं पानें व हळद हीं तुळशीच्या रसांत अगर गोमूत्रांत घाटून तो लेप तीन चार दिवस द्यावा. –योर २.३६९. २ (ल.) द्वाड. [सं. खर्जू] **कांडळून–खाजवून खरूज काढणें**–आपल्यावर संकट अथवा अनर्थ ओढवून घेणें; भांडण उपस्थित करणें; शत्रूस जागें करणें.

**खरूस**—पु. कुणबी स्त्रियांच्या डोरलींतील एक चांदीचा राखडीसारखा दागिना.

**खरूस**—पु. खरवस (कोंवळ्या, नव्या दुधाचा); चीक. [खरस]

**खरें**—पुअव. १ उष्णतेमुळें जिभेवर येणारे कांटे, पुरळ खरा पहा. 'खरे पडसा आणि खोकला। या नाव आध्यात्मिक।' –दा ३.६.३३. २ कोयती किंवा खराळी हिचे दाते.

**खरें**—उद्गा. (कु. हेट) गप्प रहा.

**खरें**—वि. (व.) दाट, घट. –विवि ५९.३–४.

**खरेंच**—क्रिवि. खरोखर; अर्थात; बरोबर. 'अरेरे! खरेंच, तिकडे जायला मी विसरलों.' [खरा]

**खरेंचा**—वि. खरोखरचा; खरा; वास्तविक. ह्याच्या उलट उडपुडचा. [खरा]

**खरोखर–रीं–रें, खरूखर**—क्रिवि. निश्चितपणें, नि संशय वस्तुतः; निखालस; खात्रीनें.

**खरोखरा**—वि. (खरा याच्या अर्थाला जोर येण्यासाठीं द्वि.) अगदीं खरा; न्याय्य; आधारभूत. खराखुरा पहा.

**खरोटा**—पु. (कातखांडी) एक खवल्या मासा.

**खरोड**—स्त्री. खरवड पहा.

**खरोडा**—पु १ पोटांत पडलेली आग (उपास, ताप यांपासून). (क्रि० पडणें). २ (खरवडण्याची जरूरी भासते अशी स्थिति) दुष्काळ; खडखडाट; खरड, संपुष्टांत येणें. 'दाण्याला–कोठाराला–पाण्याला–विहिरीला खरोडा लागला.' ३ खरवड (भांडीं, इ० कांची). ४ खरचटून, घांसून निघालेली कातडी. (क्रि० काढणें; निघणें). [खरडणें]

**खरोष्ण**—वि. १ अतिशय उष्ण. २ जहाल; तीव्र, तीक्ष्ण [सं. खर+उष्ण]

**खरोस**—पु. खरवस (दुधाचा) पहा.

**खर्कशा**—पु. तंटा; कलह; गर्गशा. 'तुळाजी आंग्रे हमेश मुंबईकरांशीं खर्कशा व मुखालिफत करूं लागले.' –रा ७.३५६५. [अर. कर्कशा]

**खर्क(र्ख)णी**—पु. (गो) सुपाच्या गोळा करण्याचें पात्र; वांबुच्या सऱ्याचें गोलाकृति पात्र.

**खर्खर–रा**—स्त्रीपु. १ खुरखुर; खत; हुरहुर; उत्कंठा; खरखरा पहा. २ मनातील शंका. 'सखेर खुर्खुर खुंटले।' –दा १४.४. ३१. [ध्व. खरखर. फा. खार्खार=अस्वास्थ्य]

**खर्खरीत**—वि. (गो.) खडबडीत; खरखरीत पहा.

**खर्ग**—न. तरवार; खड्ग पहा. 'पाणिग्रहण ब्राह्मणांसी। खर्गलग्न क्षत्रियांसी।' –एरुस्व ४.४३. 'शांती खर्ग हातीं। काळासी ते नागवती।' –तुगा २४१८. [सं. खड्ग]

**खर्च**—पु. १ व्यय; वेंच, उपभोग, विनियोग. विनियोग केल्यामुळें संपण्याची क्रिया. 'या लग्नास हजार रुपयांचा खर्च झाला.' 'दादा समयाचा मंडपांत लावल्यामुळें खर्च झाला, परंतु आणखी दोन असाव्या.' २ उपयोगी लावलेला, व्यय केलेला पैका, सामुग्री, सामान. ३ (कायदा) दाव्याला लागलेली रकम; पदरमोड. ४ (हिशेब) दुसऱ्याकडे रोख अगर अन्य रूपानें गेलेली रकम. जमेच्या उलट बाजू; जावक रकम. ५ (ल.) लढाईत पडणें; मृत्यु येणें. 'चार पुरुष खर्च झाले.' –रा ३.५१७. [अर. खर्चु; फा. खर्च] (वाप्र) **खर्चास शेंडी फुटणें**–ठरविलेल्या अंदाजाबाहेर खर्चाची रकम जाणें; खर्च वाढणें. **खर्ची पाडणें–घालणें**–खर्च झालेला दाखविणें. 'बिलें मुदतदीर करून त्याचा खर्च पाडून रकम आदा करणें.' –ऐरापुविवि २३९. **खर्चीपाडणें**–(कोंकणांत) तो आपणास पाहिजे ती गोष्ट बोले असें करणें. म्ह० खर्चणाराचें खर्चतें आणि कोठावळ्याचें पोट दुखतें=आपण स्वतः औदार्य दाखवावयाचें नाहीं तें नाहीं आणि दुसरा कोणी औदार्य दाखवीत असला तर त्याच्या आड यावयाचें. सामाशब्द– ०पट्टी–स्त्री. १ सरकारी कामगारांचा किंवा मोठ्या लोकांचा गांवांत मुक्काम असता

त्याचा खर्च भागविण्यासाठीं बसविलेला कर. २ गोसावी लोकांची टोळी आली असतां त्यांचा किंवा एखादी नैमित्तिक गोष्ट घडली असतां ती भागविण्यासाठीं बसविलेली वर्गणी. ०बुडीत-पु ज्याचा मोबदला मिळत नाहीं असा. उदा० –भोजनखर्च. 'लग्नांत बुडीतखर्च नुसता एक हजार रुपये आला.' ०वेंच-पु १ एकंदर खर्चास सामान्यपणें संज्ञा; खर्च वगैरे. २ मालाची मूळ किंमत व त्यावर इतर झालेला खर्च. [फा. खर्च+वेंच] ०शिलक-स्त्री. खर्चल्यानंतर राहिलेली बाकी; हातांत शिलक

खर्चक, खर्चीक—वि. १ उदार; सढळपणें खर्च करण्याचा ज्याचा स्वभाव तो; दाता. २ फाजील खर्च करण्याचा ज्याचा स्वभाव असा; उधळ्या. [फा. खर्ची]

खर्चणें—सक्रि. १ खरचणें; वेंचणें; व्यय करणें; खरविणें; घालविणें. २ पैसा देणें; खर्च होईल असें करणें. ३ उपयोगी लावणें चालविणें (बुद्धि, शहाणपणा). ४ हरण करणें; घेणें. 'मुर्च्छित करि भीमा त इतरांचे तो पळें असुं खरचिता।' –मोकर्ण ४५.४.

खर्चा—पु (ना.) वाटखर्च. खर्ची पहा.

खर्चाटी-डी—स्त्री. (गो.) लहान खर्ची.

खर्चाळू—वि. १ (नवीन) ज्यांत अतिशय खर्च होतो अशी 'सक्कर धरणासारख्या खर्चाळू योजना ...' –टिळक हायस्कूल मासिक, जानेवारी १९३०. २ खर्चिक; खर्च करण्याचा ज्याचा स्वभाव आहे.

खर्ची—स्त्री १ योजलेल्या कामासाठीं घेतलेला आगाऊ पैसा; वाटखर्च. 'मंगु हैवती म्हमे स्वार पीटावा। त्याहा कागद खर्ची बढावा॥' –प्रला १४०. २ खर्चण्यासाठीं लागणारा पैसा. 'ही दर मुक्कामीं खर्ची धाडी दियाला।' –पेपो ४२३. ३ कामगारांना आगाऊ दिलेली रक्कम (ॲडव्हान्स या इंग्रजी शब्दाला प्रतिशब्द). ४ वेश्येस संभोगाकरितां घावयाचें द्रव्य. ५ पोटगी; उपजीविकेसाठीं रक्कम, तरतूद. –वि. १ रोजच्या उपयोगी किंवा चालू कार्यापुरता उपयोगी; सामान्य; खासगी; साधारण. खासाच्या उलट. 'खासे व खर्ची मुदपाकाकरितां चुली.' –स्वारीनियम (वडादे) ७४. 'खर्ची पानें.' २ खर्चलेला, लढाईंत पडलेला. ३ खर्चानें पिळून निघालेला; खर्चाच्या अडचणींत सापडलेला. 'मी ह्या कामांत खर्ची पडलों.' –मोल. [फा.] ०पडणें-खर्च होणें. ०पाडणें-खर्च करण्यास, पावयास लावणें; खर्चात टाकणें.

खर्ची—स्त्री. (ना.) चोप; मार.

खर्ची—स्त्री. (गो. कु.) एक मासळीची जात. हा मासा रेतींत फिरणारा, हिंडणारा, चवदार, सफेत रंगाचा असून याचें तेल पायावर वापरतात.

खर्ज—पु. (संगीत) गायनातील एका सप्तकाचें-सुराचें नांव. खरज पहा. 'खर्जास मागें ध्वनि एक सारी।' –अर्वाचीन २३४. [सं. षड्ज; ध्व. खर]

खर्जू-खोरजू—पु. (गो.) खरूज; कंडू. [सं. खर्जू] खर्जूवाळा-वि. खर्जुडा.

खर्जूर—पु. खजुरीचें झाड व तिचें फळ. खजूर पहा. [सं.] खर्जूरासव-न. खजूर ३२० तोळे घेऊन १०२४ तोळे पाण्यांत शिजवून गाळावा. नंतर धूपानें सुवासिक केलेल्या घागरींत भरून त्यांत योग्य प्रमाणांत शेरणी व धायटीचीं फुलें घालून घागरीचें तोंड बंद करून ती १४ दिवस जमिनींत पुरून ठेवावी, म्हणजे आसव तयार होतें. हें क्षय, सूज, पंडुरोग कावीळ, पांच प्रकारचा संग्रहणी, गुल्म याचा नाश करतें. –योर १.५८३.

खर्जुरी—स्त्री. खजुरी; खर्जूर. [सं.]

खर्डा—पु. १ कच्चें टिपण; मसुदा. खरडा पहा. 'या ग्रंथाचा खर्डा मंडालेच्या तुरुंगांत प्रथम लिहून काढला.' –गीर ८६. २ कार्डबोर्ड; पुट्ठा. ०चा खर्डा-वि (ना.) लांबलचक.

खर्डुल—स्त्री. (गो.) टक्कल पडलेली स्त्री. [खरड]

खर्ण, खर्न—न. (गो.) ईश्वरी कोप. [सं. क्षरण]

खर्पर—पु १ मातीचा परळ. २ खापर, माठाच्या खालचा भाग; भिक्षापात्र किंवा शेगडीप्रमाणें उपयोगी पडणारें खापर. खापर पहा. [सं.] ०सूत्र-न. एक कृत्रिम धातु [सं.]

खर्पा, खर्पा यांगडा, खुर्वी—पु एक लहान मासा.

खर्बूज—न. खरबूज पहा. [फा. खर्बुस]

खर्मकर्म—न. व्यंग; वर्म; दोष; चूक; दुष्कृत्य; विंग; काळेंबेरें. (सामा. अव. प्रयोग) खर्मकर्मे, (क्रि० काढणें; सांगणें; उच्चारणें; बोलणें), 'तुला लोकांचीं खर्मकर्में काढावयास कोणी सांगितलें?' [सं. कर्मवर्म]

खऱ्याचें खांड—न. खोटें बोलणारा मनुष्य. [खरा+खांड=तुकडा]

खर्व—वि. १ खुजा; बुटका; ठेंगणा. २ (ल.) अगदीं बालक; अडाणी; अजाण. 'खर्व मी दास, कीं सर्व चिंतालया।' –आसेतु ३१. –वि एक हजार कोटी; दहा अब्ज संख्या. [सं.]

खर्व—वि. घोड्याचा एक प्रकारचा रंग; खिसमिससारखा रंग. –अश्वप १.३०.

खर्वट—न. बाजार भरत असलेलें गाव. 'खेट, खर्वट, ग्रामीं, पुरीं। भिक्षा करावी यथाप्राप्त।' –एमा २३.४५७. [सं.]

खर्वंड—न. (गो.) खरवडून काढलेला, तासून काढलेला भाग; खरवडण्यास योग्य असा भाग; खवळ. 'नुल्याचें एक खर्वंड पासून मेळूंना.' [खरवडणें]

**खल**—पु. १ चूर्ण करण्याचें धातूचें किंवा दगडाचें पात्र. 'चूर्ण करील तुम्हाला धर्म वता भंगदेश हा खल हो ।'–मोमीष्म १.२१. २ (खान.) सोनाराची पाणी ठेवण्याची दगडी, कुंडी. ३ खलात चूर्ण करणें, कुटणें. (क्रि० करणें) 'चौसष्ट दिवस पिंपळीचा खल करावा, तेव्हां चौसटी पिंपळी होती.' ४ (ल) चर्चा; घोटणी (क्रि० करणें). –वाग्यवृत्ति ५२८१. [सं खल]

**खल**—वि. दुष्ट, दुर्जन; नीच; पापी, हलका. [सं.]

**खल**—पु. धान्य मळण्याचें खळें. [सं.]

**खलक**—वि (गो) १ प्रस्न. २ लचांड

**खल(ळ)क**—वि. १ फितुरी; कारस्थानी 'क्लिष्टेक खलक उगवावें। राजकारणांमधें ॥' –दा १ ९.१८ 'खळक समजो जास्ती (=शिक्षा) केल्यावेगळ सोडणार नाहीं' –रा ८ २५ २ नीच जातीचा; गैरमातबर. 'गोरगरीब खलक चीजवस्त घेऊन सोडुन दिले.'–मराचियोशा ७२ [अर. खल्क्; तुल० सं. खलएव खल्क]

**खल(ळ)क**—पु १ लोक 'उदमी खळक कुल बारवेशाकडे जातील.' –रा ८.२२. २ (गो.) झुंड; थवा. [अर. खल्क= लोक, सृष्टि] ०दुनिया–स्त्री सारें जग, विश्व, तमाम जग [अर. खल्क+फा. दुनिया]

**खलकत**—न. (व.) जमाव, मडळी. 'त्याच्या घरीं खलकत जमलें आज.' [अर. खिलकत्=लोक, जग]

**खलखंदा**—पु. कुटुंब, अनुयायी, जमीनी, घरें, गुरें वगैरे, आश्रित, मालमत्ता; (सामा) ससाराचा मोठा खटला. [फा]

**खलखंदा**—पु. खेलखाना पहा.

**खलखलणें**—अकि. धडफडणें; तडफडणें; चिडणें. [ध्व, हिं खलखलाना]

**खलखला**—वि. त्रासलेला, चिडलेला [ध्व]

**खलखलाविणें**—उक्रि खोडया इ० करून त्रास देणें; सळो का पळो करून सोडणें, त्रासविणें

**खलखाना**—पु खेलखाना पहा.

**खलणें**—क्रि. १ खलात घालून मळणें, चूर्ण करणें, बारीक करणें; घोटणें. २ (ल.) विचाराचा विषय मनात घोळून घोळून दृढ करणें. [खल]

**खलवत, खल्वत**—नस्त्री एकांत, गुप्त मसलत, कारस्थान, दुसऱ्याशीं एकांतीं केलेला विचार, बेत, डाव (क्रि० करणें) 'वाडयात सुभ्याची खलवत,' –ऐपो २२१ 'दोन घडीपावेतों खल्वत केली' –पदमव ७४ [अर. खल्वत्=गुप्तता, एकांत] ०खाना–पु एकांताची खोली, घुसळखाना

**खलबत्ता-त्ता**—पु खल आणि बत्ता; घोळणें, उखळी आणि दस्ता. [खल+बत्ता; का. कल्बत्ते].



**खलबल**—स्त्री. १ खळबळ; गलबल; आरडाओरड. २ दंगा; धुंदाळी. ३ मनाचा क्षोभ; उद्वेग. [ध्व. हिं.]

**खलबलणें**—अकि. १ आरडाओरड, दंगा करणें. २ मन भडकणें, क्षुब्ध होणें. [खलबल]

**खलयज्ञ**—न (शेतकऱ्यांचा विनोदी शब्द) धान्य मळावयाच्या वेळीं खळ्यावर घालावयाचें जेवण, या जेवणांत कोंबडीं, बकरीं इ० मारतात. [सं. खल; म. खळें+यज्ञ]

**खलल**—खलेल पहा.

**खलवी**—वि. खललेलें; खलून तयार केलेलें; खलांत घोटलेलें (औषध इ०). [सं. खल]

**खलश**—पु १ खंड; अंतर. 'आमची दोस्ती आणि इतेहाद पूर्वीपासुन जो आहे त्यात खलश न यावा.' –रा ५.३०. २ संशय; किल्मिश [फा. खलिश्]

**खला**—अ. (वे.) कोण?

**खलाटी-ठी**—स्त्री. १ गांवाखालीं असलेली शेतजमीन, भातजमीन; शिवार. २ खालाठी; सखल जमीन. 'मुरुडची खलाटी लहान आहे.'

**खला-मला**—पु. खरीमैत्री; स्नेह. –जोरा ११९. [अर.]

**खलाली**—स्त्री. (कु. नाविक) १ समुद्रांतील उथळ पाण्याच्या तळाशीं असलेला खडकाळ भाग. २ खडकावर समुद्राचें पाणी आपटल्यामुळें होणारा आवाज, पाण्याची ओढ. [ध्व.]

**खलाशी-सी**—पु. १ नावाडी, नाखवा; गलबतावरील तांडेल सोडून इतर नोकर; जहाजावरला मजूर. २ तोफखान्यात तोफा ओढण्यासाठीं ठेवलेला नोकर; गोलंदाज 'तीन हजार खलाशी संगें राव पगार खाई।' –ऐपो ४६४. [अर. खलासी]

**खलास**—वि. १ सरलेला, खर्चल्यानें नाहींसा झालेला; वेंचलेला; खतम. २ दौवटास गेलेला, संपलेला; पूर्ण झालेला, समाप्त. ३ मुक्त, सुटलेलें, मोकळें झालेलें. 'बहुत खुश्वक्त जाले कीं जबर्दस्ताच्या चुगालापासुन गरिबाचें वतन खलास जालें.' –रा २० ४९ [अर खलास्=मोकळें]

**खलिता, खरिता**—पु १ थैली; लहान पिशवी. 'साखर खलिते दोन सेर' –रा ३ ३२८. २ जिच्यांत अमीरउमरावास पाठविलेलीं पत्रें बंद करतात ती रेशमी पिशवी. 'दामाजीपंतानें रसद पाठविली। खलितीं ओतिली अर्जदास्त।' ३ पत्र; राजपत्र, आज्ञापत्र 'आँ मुकदम्याविषयीं पार्शी पत्रें खरिता तयार झाला म्हणजे पाठवून देऊ.' –रा ५ ३८. [अर. खरीता]

**खलिफत**—स्त्री. खिलाफत, खलिफाचें काम व हुद्दा. [अर. खिलाफत्]

**खलिपा-फा**—पु १ मुहम्मद पैगंबराच्या गादीवर येणारा धार्मिक, राजकीय आणि सर्वाधिकार असलेला (विशेषत:) सुन्नी

पंथाचा मुसलमान राजा; मुसलमान धर्मगुरु. २ वस्ताद; तालीम मास्तर. ३ धार्जव्याचा मुख्य. ४ (ल.) (हिं) आचारी, शिंपी इ० [अर. खलीफ]

खली-ल्ली—स्त्री. पेंप; पेंड. [सं. खल; हिं. खली]

खलीकडे—अ. (व.) कोठें? 'तो बैल खलीकडे गेलाया.' [सं. क]

खलीत—वि. खंडित; थांबलेला; थांबविलेला; खड्कुय केलेला; खळलेला. [सं. स्खलित]

खलीन—पु. लगाम. 'आस्तिक शपथ अहीचें धीं हरिचें आवरी बल खलीन।' —मोविराट १.६९.

खलेटला—अ. (वे.) कुठला?

खलेती—स्त्री.पत्राची पिशवी.खलिता पहा.'दामाजीपंताच्या नावें अर्जदास्त। लिहून खलेती मुद्रा केली।' —तुगा ४४३६ 'खलेती लक्षान देखोनि नयना। संशय मना वाटतसे।' —भवि ४०.१३१.

खलेल—स्त्री. (खलल). १ खंड. २ प्रतिरोध; व्यत्यय. अडथळा; हरकत. 'तुम्ही मुताबीक होऊन अंमलास खलेल कराल तरी न करणें.' —रा ८.१८०. ३ दांडगाई; उद्धट, उनाड, वर्तणूक; खलेल माणसाची वागणूक. ४ स्वैरता, हट्टीपणा; अडेल-पणा (मूल, चाकर, घोडा यांचा). ५ सुसंडेपणा; खाष्टपणा, द्वाष्टपणा. —वि. १ दांडगा; उर्मट; उद्दाम; भांडखोर. २ खाष्ट, द्वाष्ट; तुसडा; दोष काढणारा; निंदा करणारा; ३ हट्टी; दुराग्रही; अटीचा; स्वैर; खळखळ करणारा (मूल, चाकर) अडणारा (घोडा) 'खलेल घोडे उडती टणाटण।' —ऐपो २२३. [अर. खलल]

खलेली—स्त्री. खलेल पहा.

खलेले—अ. (वे.) कोणीकडे?

खलौर, खलुरिका—स्त्री. रणांगण; युद्धभूमि. 'अनंगा-चिआं खलौरी।' —शिशु ५५४. [सं खल=स्थान]

खल्वत—खलवत पहा.

खल्ल(उदर)—न. (नृत्य) चवड्यावर उभें राहून श्वास रोधून पोटात भराची पाडणें (रोग, भूक लागलेली वगैरे दाखवितांना) [सं. खल=खळगा]

खल्लक—वि १ निष्कांचन, दरिद्री. 'हल्लक झाले खल्लक माल मवाशानें लुटें।' —पला ४.३७. २ कृश, रोड; हडकुळा [दे. प्रा. खल्ल=रिकामें; तुल० अर. खलास; कफल्लक?]

खल्लड—वि. क्षीण; खप्पड; सुरकुतलेली (मुद्रा, चेहरा) 'कांग पाठि लागसी हरी तुला खल्लड म्हणत।' —पारिभौ ३०.

खल्लाळ—पु. १ पाण्याचा खळखळाट. २ खळखळणारा प्रवाह; लाट. 'मिळती काष्ठें लोटतां पूर। आदळे दूर होती खल्लाळीं।' —तुगा ७१२. —माणा ९ ५५९. [ध्व. खळाळ]

खल्ली—स्त्री. पाय, पिंढऱ्या, माळ्या व हाताचा सांधा यांना ओढ पाडणारी वातविकृति —योर १.७६३. [सं.]

खल्वाट—न. १ टक्कल, टकलेपणा २ टक्कल पडलेलें मस्तक, डोई —वि. टकल्या; टक्कल पडलेला; डोईस केस नसलेला. 'खल्वाट चढविणें अतिशय झाला।' —वामन स्फुट (नवनीत) पृ. १३६. म्ह० खल्वाटो निर्धनः क्वचित्=टक्कल असलेला मनुष्य क्वचित् निर्धन असतो, प्रायः श्रीमंत असतो कोठें कोठें गमतीनें 'खल्वाटो निर्धनः सचित।' (=टकल्या हा खचित दरिद्री असतो) असेंहि म्हणण्याचा प्रघात आहे. [सं.]

खवखव—स्त्री. १ अद्रक, सुरण इ० पदार्थ खाल्ल्यानें तोंडास किंवा जिभेला सुटणारी खाज किंवा सुरसूर, खाजऱ्याची विकृति. २ (ल) भुकेमुळें पोटांत तोडणें. ३ पश्चात्तापाची बोचणी लागणें. ४ तीव्र इच्छा, वासना (विशेषतः मुरताची). 'इंद्रियाची खव-खव सतत वाढल्या प्रमाणावर असल्यामुळें... कधींहि तृप्त होत नाहीं.' —गीर १०५. ५ लोभ, हावरटपणा. ६ मस्ती; मुरमुरी; खुमखुमी (वादविवादाची, लढण्याची). 'बडखोरावर सूड उगवि-ण्याला ...त्याचे हात खवखव करीत होते.' ७ उत्कंठा, उत्सुकता; चेतना, उद्बोधन; जागृति (सामग्री, सन्निधान इ० कारणामुळें होणारी). 'तो गाऊं लागताच याला खवखव सुटली.' ८ (विस्त-वाची) धगधग [सं. क्षु-क्षव, क्षिप्=थुंकणें, बाहेर टाकणें?]

खवखवणें—अक्रि १ धगधगीत, धडाडून, पेटणें (विस्तव). २ चेतणें; उद्दीपित होणें; उन्माद येणें, उतावीळ, अधीर होणें (विषयवासना, लोभ, स्पर्धा यांनीं) ३ इच्छा करणें; आशाळ भूतपणें वाट पाहणें; छंद घेणें; लुलुपणें. ४ मनात जळणें, डांचणें; भाग होणें. —सक्रि १ खाज सुटणें; खवखव करणें; डाचत असणें. २ (गो) स्फूर्ती येणें. म्ह० खाई त्यास खवखवे. [खवखव]

ख(खं)वचट-ड—वि. १ खवट; खाजरा; खवरा; कांहींसें खवखव आणणारें; दुर्गंधयुक्त; नासकें. २ (ल.) तुसडा; एकांड्या; रद्द, कुत्सित, नष्ट (माणूस, भाषण इ०) खवट पहा.

ख(खं)वट—वि १ उग्र वासाचा, रुचीचा, घुरट, घोटांत जातांना घसा जाळणारा, तोडणारा (तलकट, सळकला पदार्थ), २ नासका; कुजका (नारळ इ०). ३ कडू; मनास बोचणारी, झोंब-णारी (भाषा, मनुष्य) [सं क्षप् प्रा खव, तुल० का. कहुदु=दुर्गंध (तेल इ० चा.)] ०खोंड—न. (ल) तुसडा, द्वाष्ट, कुजकट, क्षुद्र मनाचा मनुष्य.

खंवटाण—स्त्री खंवट, उग्रट वास, घाण. [खंवट+घाण]

ख(खं)वटेल—वि. खवटाण, वासट, घुरट खवट पहा.

खवट्टणें,खवटेचप—क्रि. (गो.) तळलेले पदार्थ वाईट होणें, वास लागणें [खवट]

**खवडव**—स्त्री. १ चिडविणें; वेडावणें; खिजविणें; खोडया करणें. ( क्रि. करणें ). २ एखाद्याच्या पश्चात् त्याची केलेली निंदा

**खवडवो**—वि खवडव करणारा; चिडविणारा; गांजणारा; त्रास देणारा; खिजविणारा; खोडकर.

**खवडा**—पु १ डोक्यांतील फोड ( खरजेसारखा ); डोक्यांत होणारी खरूज; चाई; उंदरी रोग. (अव. प्रयोग) खरजुडले, नासके होके. कफ, रक्त व कृमि यांचे प्रकोपामुळें, डोक्यांत एक प्रकारचे सूक्ष्म व्रण होतात, त्यांना बारीक अशीं पुष्कळ छिद्रें असतात, त्यांपासून लस वाहते त्यांना खवडे म्हणतात. -योर २.४१८. २ गुरांच्या अंगावरील खरूज, करपलीचा खवला. ३ खवडे नाहींसे करण्याकरितां गुरांच्या विशिष्ट अवयवावर (ढुंगणावर किंवा गाला वर ) दिलेला डाग; डागणें. [ सं क्षम् प्रा. खव ? ] ( वाप्र. ) ०उडणें-उडविणें-खवडा करणें अर्थ २ पहा. ०करणें-करून टाकणें-१ नासणें; विघडविणें, भंगविणें; निष्फळ करून टाकणें फजीती करणें, टर उडविणें, अपमान करणें; खवडे काढणें ०जिरविणें-ताठा उतरविणें; रग मोडणें.

**खवंडाळणें**—उक्रि. १ उठविणें; क्षोभविणें; चेतविणें, खिजवणें. २ फाजील खोडया, चेष्टा करणें; टवाळी करणें. ३ भांडण काढणें; चिडविणें. [ खवदळणें ]

**खवंडाळी**—स्त्री. १ खिजवणी; चेतवणी; उठावणी; खोडी. ( क्रि० करणें ). २ त्रास; चीड; क्षोभ. ३ दोष, बिंग; कुरापत. ( क्रि० काढणें ).

**खवण**—न. १ आकाश. २ पडसाद; प्रतिशब्द. [ख+वाणी]

**खवणणें**—उक्रि. ( कों. ) खरवडणें; खवणें; कीस काढणें, पोखरणें ( नारळ, खरबूज ) [ खवणें ]

**खवणलें**—न. वेड, उत्कंठा -शर.

**खवणा**—पु १ (जैन) नग्न, दिगंबर जैनयति. 'एऱ्हवीं तरी खवणेयाच्या गावीं । पाटाउवें काय करावीं । ' -ज्ञा ४.२२. २ पिशाच, भूत. 'खवणियाच्या अंगा । जेणें केला वळघा । तो न करि तांचि उगा । घरीं होता । ' -अमृ ६.५९. [सं. क्षपण; प्रा. खवण]

**खवणा**—पु नारळ इ० खवण्याचें साधन. याची बैठक लांकडी असून टोंकास दाते पाडलेली एक लोखंडी चकती असते खवला. -वि. तीक्ष्ण; ( माणूस )घाण्या, द्वाड; बोंचणारा ( माणूस, भाषण ). [ सं. क्षु-क्षव, प्रा खव, क्षवण-खवण ]

**खवणी**—स्त्री. १ खरवडणें. २ खरवडण्याचें साधन. खवणा पहा.

**खवणी**—स्त्री. एक झाड.

**खवणें**—उक्रि. १ ( नारळांतील खोबरें, गीर ) खरवडणें पोखरणें. २ तोंड किंवा जीभ खवखवणें, चुरचुरणें, मिरमिरणें ( अळूं, सुरण इ० पदार्थांमुळें ). [ सं. क्षवण; प्रा. खवण]

**खवंद. खवंदल**—न. १ व्रण; क्षत; मुख्यत्वें खाजविण्यापासुन झालेलें क्षत. ' धका खवंदासी लागतसे । ' -तुगा २९६४. २ फोडाची खपली; खपुडी. ३ खवडा, खांडूक.

**खवदव**—स्त्री. १ त्रास; काळजी; श्रम; चिंता. २ दगदग; खटपट; उपद्व्याप. ३ धांवपळ; गडबड; धामधूम. ४ खवडव पहा. [ खवखव+दवदव ]

**खवदवणें**—अक्रि. (कों.) सहन न होणें; जाचणें; खवखवणें पहा.

**खवदवणें**—अक्रि. गडबड, खटपट करणें; त्रास घेणें [खवदव ]

**खवदव्या**—वि. उलाढाल्या; गडबड करणारा; लहानसहान कामें झपाटयानें उरकणारा; खटपटया. [ खवदव ]

**खवदळ**--पु. १ ( गो. ) खंदळ; गलगा; खवदव अर्थ ३ पहा. २ ( गो. ) उलथापालथ.

**खवदळणें, खवंदळणें**—उक्रि. १ ( समुद्र, वारा, इ० ), डवळणें; क्षुब्ध होणें; गढूळ करणें ( द्रव पदार्थ ). 'ती जमीन समुद्रासारखी खवंदळून दोन्ही बाजूंनीं ज्वलित कुंडांत पाणी पडे.' -वाको १५१२. २ हिंदळणें; हिसके बसणें; हादरणें ( गाडींत बसलेला माणूस ). ३ (ल.) खिजविणें; चेतविणें; राग आणणें; क्षुब्ध करणें. -अक्रि. १ रागावणें; खवळणें. 'समुद्र खवंदळला आहे.' २ पोटांत ढवळणें; डाचणें; डवचणें; कालवणें [ खवळणें+ढवळणें; खदळणें; सं. क्षव+स्खलम ? ]

**खवदोळ**—वि. ( गो. ) गढूळ.

**खवना**—वि. खवणा पहा.

**खवय्या**---वि. ( हिं. ) चवीनें खाणारा; खाण्याचा शोकी; चोखंदळ. 'शिवपुरीचे सदा खवय्ये । ' -ऐपो २६६. २ पोटबाबू खादाड. [ सं. खाद; म. खाणें हिं. खाव ]

**खवरट, खवरा**—वि. थोडासा तिखट व खवखव करणारा ( अळू, सुरण ); खाजरा. [ खवणें ]

**खवल-लें**--न. १ शिताफळावरील नक्षीसारखा आकार, वरील खडबडीत भाग. २ ( माशाच्या, सापाच्या अंगावरील ) खरखरीत पृष्ठभाग. कवच ३ खपली; खवंद ( क्षतावरील ). 'बाहेरी भूतांचीं वाचही खवलें । नेणताचि पडिलीं । ' -ज्ञा ८.६२. ४ कापसासारख्या अभ्राचा वेगळा तुकडा; लहान अभ्रें. [ दे. प्रा. खल्ल=साल, कातडें ]

**खवला**—पु १ खवणी (नारळ खरवडण्याची). २ सापाच्या अंगावरील ठिपका, खवण, पापुद्रा, बुट्टी; कवची. ३ खवले पाडण्याचें हत्यार ( मातीच्या सापावर ). ४ ठोका; घाव; डाग. ५ खवंद; खपली. खवल पहा.

**खवला**—पु. (ना.) दही इ० स्निग्ध पदार्थांचा गोळा; रवडी.

**खवला-ळा**—पु. (कु.) खवले असलेला रुपेरी रंगाचा एक मासा, हा तीस इंच लांबीचा असतो. [सं. प्रा खवल]

**खव(ला)ली**—पुस्त्री. १ खवणी (नारळाची) २ मासे धरण्याचें एक प्रकारचें जाळें.

**खवले(ळ्या) मांजर-मार्जार**—पुन. एक रानटी जनावर, रानमांजर. हें मुंग्या खातें. याच्या अंगावर खवले असतात, हें डोंगरांत विळांत राहातें. हें शेपटानें माणसासहि मारूं शकतें.

**खवंस-सें**—वि. (गो.) निरुपयोगी; हलकें; कमी प्रतीचें.

**खवसणें, खवसुचें**—क्रि. (कु. गो.) मरणें. [सं. क्षप्; प्रा. खव=नाश करणें]

**खवसान**—स्त्री. (व.) नाकांतील वळवळ; ठसका. खव टाण पहा. 'मिरच्यांची खवसान सुटली.'

**खवसेला**—वि. १ (व.) घाणेरडा; अशुचि. 'इतका दिवस वर आला तरी तूं खवसेलाच! स्नान कर!' २ क्षुधित; खवखवलेला. 'किती दिवसांचा खवसेला होता कोणास कळे!' खवटेल पहा.

**खवल**—न (कु.गो.) १ माशाच्या अंगावरील कवच; खवला २ (गो.) फोडावरील खपली. (गो.) ३ सारवलेल्या जमीनीवरील शेणाचा पोपडा. -स्त्री. (कु) भात ळ खवल्यानंतर करवंटीस चिकटलेला पातळ पापुद्रा, कातळी. खवल पहा.

**खवळ**—स्त्री. (ना.) जमीनींत किंवा भिंतींत पडलेली खोल भेग; तडा; चरा. [सं. खल=खळगा]

**खवळणें**—अक्रि. संतापानें माथें फिरणें; चवताळणें; खवदळणें. 'पुच्छछेदें क्षद्दिसा चापच्छेदें करूनि बहु खवळे।' -मोमीष्म ६.५४. 'जैसा महाकाळु खवळला।' -ज्ञा १.१४८. २ हालचाल करणें; उठणें (पित्त), डवचणें. ३ चेतना येणें; संवेदना होणें; जागें होणें (इंद्रिय). [प्रा. दे. खवलिअ=क्रुद्ध; तुल० का क्वळे= क्षुब्धता; भोंवऱ्याप्रमाणें फिरणें]

**खवळनी**—स्त्री. (व.) उत्तेजन. [खवळणें]

**खवळा**—पु. (कों.) माड, सुपारी, ताड इत्यादिकास भेदून साप, सावळ्या, इत्यादि फुटतात ती जागा; डोडा.

**खवळी**—स्त्री. (कों.) एक-प्रकारचा मासा. खवला पहा.

**खवळी**—स्त्री. लहान खपली, सालपट, करवंटी. खवल पहा

**खवळ्या**—वि. खवल असलेला.

**खवा**—पु दूध आटवून तयार केलेला घट पदार्थ, मावा; नारळाच्या दुधाचाहि खवा होतो. [?]

**खवा**—पु. (गंगथडी) हट्टीपणाची लहर; दुराग्रह. (क्रि० घेणें). [खवणें]

**खवा, खवाट-टा**—पुनपु. १ खांद्याचा व हाताचा सांधा. २ खांदा. 'पहारे पडा उभी कंचुकी फाटली। फाटखवे छातीमध्यें दाटली।' -प्रला १८६. [प्रा. दे. खवय=स्कंध]

**खवाजसुरी**—स्त्री. (व.) खाजसुरी पहा.

**खवार**—वि. (व.) दरिद्री; निष्कांचन. 'रांडेच्या पायीं ग्वार झाला.' [फा. ख्वार=दीन]

**खवारी**—स्त्री. अप्रतिष्ठा; अवकृपा; अवज्ञा. 'मनस्वी लोकांच्या सुद्धी ऐकोन त्याचें निदर्शन जे खवारी जाली.' -रा ८.१२८. [फा. ख्वारी=नीचपणा; दु.उ]

**खवाशी-सा**—स्त्रीपु हत्तीवरील अंबारी किंवा हौदा याचे मागील मानकरी, खिजमतगार बसण्याची जागा; खवासखाना. 'बैसोनि गुरुभाऊ खवासित।' -दावि ३६२. 'आपा-बळवंतराव खवाशित चौरी मिजाजित वारीत।' -ऐपो २००. [अर. खवासी]

**खवास**—पु १ उमराव; मानकरी; राजासन्निध असणारा थोर घराण्यांतील मनुष्य. हा बहुधा मालकाच्या विश्वासांतला किंवा आवडता असे. २ हुजऱ्या; सेवक; खिजमतगार; नोकर. ३ गुलाम; बंदा नोकर. [अर. खवास्; तुल० तुर्की, खिवुस= सरकारी संदेश नेणारा. (यावरून) इं. शोस] ०खाना-खवाशी पहा. [फा.] ०निशस्त-वि. खवासखान्यांत बसलेला. 'तेव्हां खवासनिशस्त यांनीं जोडगोळी मारली.' -वाड कैफि २१.

**खवाळ**—न (कु.) माशाच्या अंगावरील खवला. खवल-ळ पहा.

**खंविरडा**—वि. खवरट-खंवरा पहा.

**खवीस**—पु. १ मुसलमानाचें भूत, पिशाच्च. २ (ल.) रागीट, द्वाड, ३ (ल.) दुष्ट, मायेफिरू, द्वाड, खुनशी, दीर्घद्वेषी माणूस. [अर. खबीस=दुष्ट; पिशाच]

**ख(खं)वट-खोबरें**—खवट-खोबरें पहा.

**खवेंच्या-या**—खव्या पहा.

**खवें**—वि (नंदभाषा) कमी किंमतीचें, हलकें; स्वस्त. 'हें लुगडें कांहीं खवें पडलें आहे काय?'

**खशाफशा-खशा-मशा**—वि. १ डौलदार, सुवाच्य नव्हे असें (अक्षर), अव्यवस्थित, फरकटत घसफस लिहिलेलें, केलेलें. २ असें वाईट अक्षर ज्यावर आहे असा (कागद, पुस्तक, पदार्थ). -क्रिवि. अव्यवस्थितपणें; गिचमिड; कसें तरी. [ध्व.. खस्-फस्; प्रा. दे. खसफस=खिसकणें]

**खशी**—खसी पहा.

**खए, खंए**—न. (गो.) एक प्रकारचें झाड व त्याचें फळ, याच्या तेलास खेंडेल तेल म्हणतात, हें खरजेवर फार गुणकारी असतें.

**खट**—वि. १ खाट; द्वाट; घुरकुन्या; खडबड्या; सदां खडसावणारा. २ वाईट; त्रासदायक; जिकिरीचा ( खत्तर, खडतर या शब्दांच्या अनेक अर्थांप्रमाणें सढळपणें योजतात. जास्त अर्थासाठीं ते शब्द पहा ). ३ वाईट; शठ; खडतर ( नशीब, दैव ). ४ बेवंद; गैरशिस्त; स्वैर ( वर्तणूक, वर्तन ). [कष्ट, शठ?]

**खस**—पु. १ वाळा. एक प्रकारचें सुगंधी गवत. याच्या मुळांचे उन्हाळ्यासाठीं पडदे करतात, अत्तर काढतात. २ एक प्रकारचें अत्तर; वाळ्याचें अत्तर. [ अर. खस्; फा. खस् ]

**खस**—पु. १ ढीग; रास; डोंगर ( पडलेलीं पानें, धुरळा, केर-कचरा इ० चा ). २ ( ल. ) वैपुल्य; रेलचेल, लयलूट, विपुलता. [ खच ]

**खस-फन-कर-दिनीं-दिशीं**—क्रिवि. खस असा आवाज होईल अशा रीतीनें; धसमुसळेपणानें. ( क्रि० ओढणें; खेचणें; तोडणें; धरणें ). [ ध्व. ]

**खसक(का)विणें-खसकावून-खसकून**—कचकाविणें-कचकावून पहा.

**खसका**—पु. आवाज होणारा प्रहार; धक्का. कचका पहा. [ ध्व. खस् ]

**खसखशी(सी)त**—वि. १ खडखडीत; स्पष्ट; निरालस, भीडभाड न धरतां केलेली; खरपूस; साफ; धडधडीत ( सूचना, ताकीद, भाषण ). २ निश्चित; ठाम; धडाडीचें; उत्साहपूर्वक ( वर्तन, उपाय ). ३ धोपटमार्गी; सरळ व्यवहारी; खडखडीत बोलणारा ( माणूस ). ४ खरखरीत; भरड; खडबडीत; मऊ विसविशीत नव्हे असा ( कागद, वस्त्र ). –क्रिवि. ( गो. ) जोरानें ( घासणें इ० ); खसाखसां. [ ध्व. ]

**खसखस**—स्त्री. अफूचें बीं. हें मोहरीपेक्षां बारीक असतें खसखस वाटून अंगास लावतात. हींत मादकपणा नसून उलट चव दार असते. हिचें तेल काढतात. पेंड गोड व पौष्टिक असते. [ सं., अर. खशखश, फा. खसूखस, का. कसकसे ] ०मांडा–पु ( वे. ) खसखस वर लावून तयार केलेला मांडा, अनरसा. –शींचें झाड–न. अफूचें झाड. –शींचें फूल–न. अफूच्या झाडाचें फूल. –शींचें बोंड–न. अफूच्या झाडाचें बोंड.

**खसखस-सां**—क्रिवि. खसखस असा शब्द होईल अशा रीतीनें ( किंवा खरखरीत गवत कापणें, लिहिणें इ० ). 'खसखस दोन वंद लिहून टाकले.' **खसखस पिकणें** ( खसूखस्. अशा आवाजानें) मोठ्यानें व पुष्कळ हंसणें; चर्चेत असताना रंगेलपणें हंसणें. [ ध्व ]

**खसखसणें**—अक्रि. खसखस आवाज करणें (साप, जनावर इ० नीं ). [ ध्व ]

**खसखसाट**—पु. मोठ्यानें खसखस आवाज ( गवत कापण्याचा ). ( चुकीनें खडखडाटबद्दल ) अभाव; तोटा; दुष्काळ. 'त्याचे जवळ रुपयांचा खसखसाट आहे.' [ खसखस ]

**खसखसावून, खसखसून**—क्रिवि. १ जोरानें आवळून. २ कचकावून पहा. ( क्रि० घासणें, चोळणें, धुणें, भाजणें इ० ) ३ चपलतेनें; झटदिशीं; जलदी. ४ क्रिया पुष्कळ वेळ चालली असता योजतात. ( क्रि० चावणें; लिहिणें ). [ खसखस ]

**खसणें**—अक्रि. खचणें पहा. [ हिं. खसना ]

**खसणें**—अक्रि. खोकणें. [ हिं. खास ]

**खसपुदडा**—वि. १ घाणेरडा; नेभळा; गचाळ ( माणूस ). २ वाईट; भिकार; घाणेरडा ( जिनस ). [ खस+पुदडा. . अशिष्ट प्रयोग ]

**खसबस-सां**—क्रिवि. विशिष्ट आवाजानें ( उदा० कुजबुजणें, गवतात सळसळणें, अंधारांत चाचपडणें अशा वेळीं होणाऱ्या आवाजाप्रमाणें ).

**खसबसाट**—पु. सामान्य कुजबुज; सळसळ; खसखस; फसफस. [ ध्व. ]

**खसरा**—पु ( व. ) जमाबंदीचा कागद. 'खसरा सरकारांत आहे.'

**खस(सा)लत**—स्त्री. प्रकृति; तबियत; स्वभाव ( विशेषतः कठोर, द्वाड, उग्र ); कदर. ०काढणें-भोगणें-सोसणें-त्रास, कष्ट सोसणें, काढणें ( तुसड्या माणसाचा ) [ अर. खस्लत ]

**खस(सा)लती**—वि. खाष्ट, कठिण, कठोर स्वभावाचा, प्रकृतीचा. [ अर. खस्लीत ]

**खसवस-सां**—क्रिवि. कठोरपणें; तिटकाऱ्यानें; चुरशीनें ( बोलणें ). [ ध्व. ]

**खसाई**—स्त्री शीग; कबाब, एक मांसाचा खाद्य पदार्थ. –गृशि २.९.

**खसाखस(सां), खसासां**—क्रिवि. ( खसाखसचा आत्यंतिक भाव ) विशिष्ट आवाजानें, खसखसां ( उ० गवत कापणें इ० ना आवाज होऊन )

**खसाटणें**—उक्रि. १ दांडगेपणें आवाज होईल असें कापणें. खचाटणें पहा २ ( व ) फरफटत नेणें, ओढणें. 'खसाटत नेलें' ३ खरचटणें. 'खाचावर जरा खसाटलें इतकेंच.' ४ ( व. ) खरड काढणें. खसाटलें तेव्हा आला वाटेवर.'

**खसार**—वि ( व ) टिसूळ

**खसासित**—वि. कठोर, खाष्ट, स्पष्ट. खमखसीत पहा. 'ऐसें सबाह्य खसासित। जयाचें गा।' –ज्ञा १६ ३४४.

**खसी**—स्त्री. १ खच्ची करण्याची क्रिया. २ तोडण्याची क्रिया; तोड. –वि. १ खच्ची केलेलें. २ तोडलेलें. [ अर. खसी]

**खसु**—पु श्वास 'फुन खसु न धर '–शिशु ६६६ [स कासु=रोग, दे प्रा खसु]

**खसुचित्य**—न अडाणीपणा, मूर्खपणा, अज्ञत्व 'काहीं पुस्तकें चाळावीं लागतात कीं खसुचित्व प्रगट करून तक्रेत लागेल अशी लेखणी चालविण्याबद्दल बारद्वीच्या दरबाराचा आम्हास एखादा चाद मिळाला आहे '–नि ८८७ [स ]

**खसूस**—वि निश्चित खचित विशेष निखालस, नि सशय 'अशी खसूस खात्री होईल तरच दिल पाहिजे '–खाअ बडोदे १३७ [अर खसूस=विशेष]

**खसूसीयत**—वि स्नेहपूर्ण, स्नेहांकित (एक मायना पदवी) खसूसीयत-दस्तगाहु लक्ष्मण आप्पाजी –रा १२ ११२ [अर खुसूसीयत्=मैत्री]

**खस्त**—वि १ कत्तल केलेलें नाश केलेलें तुकडे केलेलें धूळधाण केलेलें जमीनदोस्त 'धीरां खस्त करीतसे । '–एरुस्व ९ ४० 'स्त्री मुखिवांतें पती राक्षसाचा । बळें खस्त केला मुखा अस्तु वाचा । –सुरामा ४ ३१ २ (ल ) भग्न नाउमेद गोंध छळेला ता आपल ठिकाणीं मरून खस्त झाला ' 'अवसान खस्त ' ३ जमीनदोस्त नष्ट खराब 'तुम्ही आम्ही मिळून इंग्रजास खस्त करीन टाकू –पया १९८ (मरून खस्त हाणें–लढाई इ० त मरून फेरकचऱ्याप्रमाणे होणें मातीला मिळणें 'मरन खस्त होईन परतु दास होणार नाहीं –सुर्दप्र १८६ –न १ घाण दाट चिखल ( गटार नाला यामधील ), रेंदा गाळ २ नुकसान, तोटा, खराबी ( क्रि० खाण ) [फा खस्त= जखमी, रोगी ]

**खस्त**—स्त्री श्रास त्रत्र खस्ता पहा

**खस्तावस्त खस्तावस्त**—वि ओढाताणीचें, बावळ 'अनुमानाचें खस्तवस्त । बोलोंचि नये। '–दा १९ २ ४ [ खस्त द्वि अस्ताव्यस्त ]

**खस्ता**—स्त्री १ काळजी चिंता २ श्रम त्रास उपद्व्याप (मुले दुःखकारी याचा) (क्रि० काढणें खाणें भोगणें सोसणें ) 'त्याला तिच्या फार खस्ता खाव्या लागत ' –८ [फा खस्त=जखमी, रोगी स कष्ट ? ]

**खस्तापुरा**—स्त्री पुरीचा एक प्रकार –गृशि २ ३७

**खस्ता**—वि खस्त असलेली चिखली, गदळ गाळ साठ लेली भारी जिच्यावर समुद्राच्या लाटा मधून-मधून येऊन आपटतात किंवा जिच्यावर गावांतील घाण मळ टाकतात अथवा जिच्यावर पावसानें घाण वाहून येते ती जमीन [ खस्त ]

**खस्थपदार्थ**—पु आकाशातील वस्तु पदार्थ तारका गोल इ० [स खस्थ+पदार्थ ]

**खस्वस्तिक**—न आकाशांतील आपल्या डोकीवरचा बिंदु, क्षितिजावरची रूढ किंवा उभी रेषा आकाशाच्या दृश्य गोलार्धाला ज्या बिंदूत छेदिते त्याला खस्वस्तिक म्हणतात –सूर्य १९ (इ ) झेनिथ अध स्वस्तिक याच्या उलट [ स ख+स्वस्तिक ]

**खहर**—पु ( गणित ) ज्याचा छेद शून्य आहे असा अपूर्णांक अनत सख्या [ स ]

**खळ**—स्त्री १ बटाट्याचें सत्त्व, गहू तांदूळ उडीद, साबू दाण्याचें पीठ इ० पासुन डकवण्यासाठीं, वस्त्रास ताठपणा यावा म्हणून किंवा कागद चिकटविण्यासाठीं तयार केलेली पेज चिकी, राप कोळ गोंद २ ( कोष्टी ) कपडा विणण्यापूर्वी सुतास बळकटी येण्यासाठीं तांदूळ ज्वारी, मका किंवा बाजरी यांचें पीठ शिजवून त्याची लापशी करून ती सुतास कुंचल्यानें लावतात अथवा जींत सूत बुडवून काढतात ती ३ धारणें करण्यासाठीं गुळ वण्यात शिजविलेलें पीठ ४ (गो ) अम्लयुक्त खारट पाणी, खार (लोणच्याचा ) [ स खल्=एकत्र करणें ? ] म्ह० परटाची खळ, ब्राह्मणाची खळ ( बायको ) लागलीच आहे ०गट–न १ पातळ व भिकार कालवण ( पीठ भाजीपाला, चिंच इ० मिसळलेलें ), ( निंदाव्यजक ) २ ( ल ) कोणतेंहि अतिशय पातळ व आंबट, खारट कालवण आंबटी, सांबारें

**खळ**—पु १ तडकुबी खड, (कामाचा गमतीचा) (क्रि० पडणें ) ०ख भी चालू न, खळ पाडू नको ' २ उशीर, खोटी [स स्खल् ]

**खळ**—स्त्री पक्का हट्ट आग्रह छद नाद हट्टीपणाची लहर ( क्रि० घेणें ) 'आणिला ही रूपा वळ । करूनि खळ हरिदासीं।' –तुगा २२०१ 'त्या पोरानें खाऊसाठी खळ घतली '

**खळ**—वि दुर्जन नष्ट वाईट नीच दुष्ट खल पहा 'साधु निंदक परम खळ । आम्हास करिसी तू विटाळ ॥ ' 'जड होती खळ दुष्ट लोक। '–तुगा १५ [स खल ]

**खळं**—न खळें पहा १ शेतांतील धान्य मळणीची जागा गाळ २ ( को ) अंगण उघडी जागा सामाशब्द– ०उदुगल-कना ) खळ झाडणें ०पुर्जी स्त्री खळ्यावरचें धान्य मापतांना प्रत्येक मोठ्या राशींतून घेतलेले लहान ढीग मराठा अमदानींत ही सरकारी दस्तुरी समजली आहे ०यज्ञ खळयज्ञ पहा ०घट–न शतमाल तयार होऊन खळ्यावर धान्याच्या राशी पडू लागतात तो हगाम काल –गागा ९ ०घटणी–स्त्री मळणीकरितां धान्याच्या पेंढ्या एकत्र जमा करणें ०घळ–न रास काढून नेल्यानतर खळ्यावर इकडे तिकडे पडलेलें धान्य हा गांवच्या महाराचा हक्क आहे ०वाडा स्त्री अनेक शेतकऱ्यांचीं खळीं असलेली गांवाच्या बाहेरची कुंपण घातलेली जागा, खळ्याचा

समुदाय. 'खळवाडेकडे गेला निघोनि।' -दावि २८. [ गाव+वाडी ]

**खळक**—पु (राजा.) चिच, आमसोल इ० चें अतिशय आंबट पाणी (निदार्थी शब्द) खळगट पहा. [ खळ ]

**खळ-कन-दिनीं-दिशीं**—क्रिवि. खळखळ, घळघळ, झुळझुळ; छनछन, झणझण, खणखण अशा आवाजानें (बांगड्या, किल्ल्या इ० चा शब्द). [ ध्व. खळ् ]

**खळका**—पु १ बांगड्या, मडकीं, घाटल्या इ०चे तुकडे २ खळखळाट; मोठ्यानें खळखळणें (पाण्याचें). ३ (ल ) भांडण, तंटा; कचकच; गलगा, गोंगाट; कोलाहल [ ध्व. खळ् ]

**खळके-थळके**—पुअ भांडणतंटा; कचाकची (एकवचन) खळकावळका=भांडण; कटकट.

**खळखळ**—स्त्री. झुळझुळ, घुळघुळ, असा आवाज (ओढ्याचें पाणी इ० चा). 'नदीचा खळखळ शब्द न जुमानता पलीकडे जाऊं लागला.' -पाव्द ७७ छनछन. खणखण, झणझण असा आवाज (बांगड्यांचा), खडखड, डबडब, खडखड असा आवाज (वाळल्या नारळाचा).

**खळखळ**—स्त्री. (ल.) १ कटकट; खटखट; वाचावाची 'खळखळ खटासीं न करावी।' -दा १४.४. आढेवेढे. 'तो म्हैस दूध देण्याविषयीं अलीकडे खळखळ करते.' २ वटवट, बडबड. ३ दगदग; उपद्व्याप, त्रास; कष्ट; श्रम. ४ गडबड, घालमेल. 'नाना प्रसंगीं खळखळ।' -दा १७.४.१२.५ (गो) हंसणें, खिदळणें याची गर्दी. (वाप्र ) ०करणें-एखाद्या गोष्टींत विशेष नाखुषी दाखवून ती न करण्याचा हट्ट करणें, येणें, किंवा ती गोष्ट करण्यास फार आढेवेढे घेणें. 'एखाद दिवशीं ... यश मंतरावानें ... एखाद्या गोष्टीबद्दल फार खळखळ केली तर तिला कसेबसेंच होऊन ...' -यशस ०करून-पुष्कळ खटखटीनें.) म्ह० दगडाचे पेव घालताना खळखळ, काढताना खळखळ.

**खळखळ(ळां)**—क्रिवि. खळखळ आवाजानें. 'जें तद्रूप पहातचि हातें वर्षाघुनें खळखळा तें।' -मोभीष्म २.१२. [ ध्व ]

**खळखळां रडणें**-ढसढसा रडणें. 'स्मरला विदुरकथितवचन धातदा ता रडुनियां खळखळा तें।' -मोशल्य ४ २६.

**खळखळणी**—स्त्री. खळखळणें पासून धातुसाधित नाम. खळखळणें पहा.

**खळखळणें**—अक्रि. १ खळखळ आवाज करणें बांगड्या, तोरड्या इ० नीं खळखळ शब्द होई असें वाजणें. २ वाऱ्यानं सळसळणें (पानें पाचोळा); खडखड करणें (उंदीर इ० नी आढ्यातून, कौलातून). ३ जोरानें वाहणें (ओढा, नदी) ४ (अकर्मक क्रि.) पोटांत खळखळ आवाज होणें. [ ध्व ]

**खळखळणें, खळखळाविणें**—उक्रि. १ आवाज होईल अशा रीतीनें धुणें, घासणें, खंगाळणें, विसळणें. २ खळखळ मोजणें (रुपये). खणखण, खळखळ करण्यास लावणें (नाणें), गुळगुळणें. [ ध्व. खळखळ ]

**खळखळाट**—पु १ (खळखळचा अतिशय) मोठा खळखळ आवाज करणाऱ्या दोन वस्तू एकमेकींवर आपटल्यानें होणारा आवाज. २ ओहोळ; ओढा. 'अशुद्ध नदीचे गडगडाट। धुमती डागाचीवाट।' -मुआदि ३२.५५. म्ह० उथळनदीस खळखळाट फार. [ ध्व. ]

**खळखळी**—स्त्री. (कों.) ओढ्याचा खळखळ शब्द (दगडगोट्यावरून वहात जातांना होणारा). म्ह० उथळ पाण्याला खळखळी फार [ खळखळ ]

**खळखळीत**—वि. १ खळखळणारा; आवाजदार; खळखळ आवाज काढणारा. २ फडफडीत, कोरडा; ज्यांतील शीतनशीत मोकळें झालें असा (भात); वाळलेली (द्विदल धान्याची शेंग). ३ स्वच्छ, साफ. मळ किंवा पाणीयापासून मुक्त (चांगलें धुतलेलें कापड, भांडें, समुद्राच्या पाण्यानें धुतलेला खडक, यांच्या बद्दल योजतात) ४ डुळडुळीत, गळगळीत (कालवण, ताक). [ खळखळ ]

**खळगा**—पु खाच, खालगा; भोंक; गर्ता; खोलगट जागा; [ सं खड ]

**खळगा**—पु १ धाब्याच्या उपयोगी माती; पिवळी, कुंभारी माती. २ (चांभारकाम) चिकण माती; खळीच्या ऐवजीं हिचा उपयोग करतात. ०लावणें-चिकणमाती सारविणें. [ सं. खट= माति, जमीन ]

**खळगा**—पु १ कळगा; फुटलेल्या कडगुल्याचा अथवा घागरीचा तुकडा, खाच. २ (ल ) ढिसळलेली, मेगाळलेली माती (नदीच्या काठची); मातीची भींट; ढिराळ. [ कळगा ]

**खळगी**—स्त्री लहान खळगा; खाच, चीळ. [ खळगा ]

**खळगें**—वि लहान १ -हंको.

**खळचें, खळप**—क्रि (गो.) थांबणें, चुकणें; खळ पडणें. [ खळ ]

**खळणी**—स्त्री. (गो ) खळ; खड [ सं. स्खलन ]

**खळणें**—उक्रि खळ लावणें, देणें (कपड्याला), बुडविणें (कागद, तुरटीच्या पाण्यात) [ खळ ][१]

**खळणें**—अक्रि १ मध्येंच थांबणें (वारा, पाऊस, उद्योग, कामधंदा इ०) 'मनुष्याच्या शरीरांतले व्यापार जसे कधीं खळत नाहींत' -नि ५८ २ गतीला अटकाव होणें, मार्ग खुंटणें (प्रवाहाचा). 'बारा वर्षांत तिच्या डोळ्याचें पाणी खळलें नाहीं.' -टप ५६ ३ हात आखडणें; थोपविणें; कांहीं वेळपर्यंत राहणें, थांबणें (माणूस) ४ वीर्यपात होणें (माणूस, पशु यांचा) 'तो घोडा हमेशा खळतो.' [ सं. स्खलन; प्रा. खलण ]

**खळखळणें**—सक्रि १ पाण्यांत घालून जोरानें हलविणें (धुतांना, कपडे इ०) एकदोनदां पाण्यांत बुडविणें, पिळणें २ जोरानें धुणें (भांड्यांत हात घालून घांसावर जोरानें पाणी टाकून, चोळून) पुष्कळ पाण्यानें व जोरानें धुणें ३ (ल) क्षुब्ध, अस्वस्थ, व्यग्र करणें, उत्तेजित करणें —अक्रि १ मोठ्यानें आवाज करणें, हालचाल करणें (उगळणारें, आदळणारें, उचमळणारें पाणी वगैरे तसा) 'आठवण होताच त्यांचें काळीज खळखळलें म्हणून सांगू ?'—स्वप ५८ २ अस्वस्थ, बेचैन, क्षुब्धावस्थेंत असणें, भडकणें (दया, एखाद्याचें मन, जीव) ३ पोटांत खळबळ होणें, आवाज होणें ४ (अकर्तृक क्रि) पोटांत कालवणें, दयेनें मन कळवळणें [खळखळ]

**खळखळा**—पु गडबड, अस्वस्थता (पोटांतील) २ लोकांचा दंगा, बंड, धुमश्चक्री ३ हालचाल, वादळ, उसळी (समुद्राची, भांड्यांतील पाण्याची) खळखळणें पहा

**खळखळाट, खळखळी**—पुस्त्री. १ उसळणाऱ्या, आपटणाऱ्या, डुचमळणाऱ्या पाण्याचा आवाज २ गडबड, धुमश्चक्री [ध्व]

**खळखळाविणें**—सक्रि खळखळणें (उक्रि) पहा

**खळखळीत**—वि मोकळ्या मनाचें, परखुटी, अघळपघळ साचें, खुलाशाचें (भाषण, वळणवळण, माणूस) [खळखळ]

**खळखट**—पु हट्टी, दुराग्रही माणूस, चिकट व फार त्रास देणारा भिकारी 'हा अगदींच खळखट दिसतो' [खळ=हट्ट]

**खळभट**—पु धान्याच्या खळ्यावर मळणी चालू असतां तेथें भिक्षा मागून निर्वाह करणारा ब्राह्मण निरक्षर ब्राह्मण, विद्येचा पोकळ डौल दाखविणारा माणूस ग्रामपंडित [खळें+भट]

**खळमळ**—पु १ नवीन कापडाची खळ, मळ इ० २ (मळाची द्वि) घाण, रेंदा, गाळसाळ, केरकचरा 'नद्यादिकांस एकदां पूर येऊन गेला म्हणजे खळमळ धुवून जाऊन पाणी स्वच्छ होतें' [खळ+मळ, तुल० सं किल्मिल]

**खळव**—पु. १ कामामध्यें, गतीमध्यें खंड खळ २ झऱ्याचें, पाटाचें वाहतें पाणी वर बंद केलें असताहि जो थोडा प्रवाह पुढें वहात असतो तो [खळ]

**खळवटणें**—क्रि (गो) नाक फेंदारणें

**खळवटणें**—उक्रि १ भोंवतालीं अनेक जागीं पडलेलें एकत्र करणें, जमा करणें, गोळा करणें (विशेषत भांड्यांत), (घराच्या) सर्व साधीकोपऱ्यांतून खरडून काढून एकेठिकाणीं आणणें 'चोरांनीं सर्व घरांतील पदार्थ खळवटून नेले' २ एखाद्या पदार्थाच्या प्राप्तीसाठीं सर्व स्थळें शोधणें, धुंडाळणें, चाळाचाळ करणें 'सर्व घर खळवटलें तेव्हां आंगठी सांपडली' ३ वेंचणें, गोळा करणें (फळें) ४ शेत कापणें. ५ (ल राजा) प्राण गोळा होणें व्याकुळ होणें 'जीव गळवटला' [खळें+वटणें]

**खळवटणें**—उक्रि खळवळणें पहा —अक्रि १ बंद राहणें, थांबणें, खोळंबणें (काम, गति) २ बांध घातला जाणें (ओढा वगैरेस) [सं. स्खल्, प्रा खल+वट]

**खळवाद**—पु हट्टीपणाचा, रिकामटेकडा वाद, वितंडवाद, काथ्याकूट (क्रि० करणें, घेणें, सांगणें) [खळ+वाद]

**खळवादी-द्या**—वि १ वितंडवादी, दुराग्रही २ हेकट, हट्टवादी, तंटेखोर [खळवाद]

**खळविणें**—उक्रि १ थांबविणें, थोपविणें, तहकूब करणें २ अडवणें, आवरणें [खळणें]

**खळा**—पु खळगा पहा

**खळाखळ-ळां**—क्रिवि खळखळ करून, खळखळ अशा मोठ्या आवाजानें खळखळ-ळां पहा

**खळाळ**—पु (खळखळचा अतिशय) १ गर्जना, घोष, मोठा ध्वनि (खडकावर फुटणाऱ्या लाटांचा) नाद निघणाऱ्या दोन वस्तूंचा एकमेकांवर आदळतांना होणारा आवाज, घणघण, खणखण, छनछन इ० २ ओढ्याच्या, नदीच्या पाण्याचा खळखळाट 'शुष्क जळाचे चळाळ। धारा धावे खळाळ।'—दा ११ ७ ४ ३ खळखळणारा ओढा, प्रवाह 'खळाळाच्या लगबगी। फेडूनि खळाळाच्या भागीं।'—ज्ञा १५ ३८६. 'अशु द्वांचे खळाळ। वाहती रणीं।'—कथा १ ६ १४७ ४ खळबळ 'रजोगुणाचेनि खळाळ। स्वर्गु गाजे।'—ज्ञा ७ ७८ [ध्व खळ]

**खळाळ-ळां**—क्रिवि १ मोठ्यानें गर्जून, खळखळाटानें (लाटा, धबधबा) २ ढळढळां, खळखळां, सळसळां (अश्रु वाहणें) असेच अनेक अर्थ होतात उदा० खळाळ खपल्या पडतील पोपडे निघतील इ०

**खळाळणें**—अक्रि खळखळणें, मोठा गंभीर आवाज करणें, दीर्घ आवाज काढणें, गर्जना करणें, आरडणें, ओरडणें, आदळणें, खडकणें इ० [ध्व खळाळ]

**खळाळी**—स्त्री १ खळाळ, खडकावरून प्रवाह चालला असतां होणारा आवाज म्ह० उथळ पाण्याला खळाळी फार २ वरील प्रकारें आवाज करणारा ओढा 'आयता खळाळीं पडिले।'—दा ३ ७ १० ३ (ल) खळबळ, क्षोभ 'पाखांडाचा खळाळी।'—भाए ११०

**खळी**—स्त्री १ खड्डा, खाच, खळगी, खोलगा, पोंचा 'मधुस्मिताची खळी कपोलीं उल्ह तिच्या पडली।'—विक ४१ तोफ चमेलीचे खळियांत येऊन आचरीचे घाटास राहिली'—भाव ४१ २ (गो) लहान ओढा, पाट, गटार [सं खल=खाच] (वाप्र)

०खणणें-१ ( कोणत्याहि पदार्थासाठीं ) अडून बसणें. २पायानें जमीन उकरणें (जसें घोडा खाद्य शोधण्यासाठीं खुरानें जमीन उकरतो तसें). **खळीस येणें**-त्वेष चढणें; इरेस पडणें. ' झुंजार खळीस येतो तसे इरेस पडून मारामार केली ' -भाव ४२. **खळ्या खांदीत बसणें**-( डोईफोडे किंवा इतर भिकारी यांचा सोळंखा केल्यास भिक्षा न दिल्यास ते आपल्या सांखळदंडानें जमीन उकरतात त्यावरून ) हट्टवादीपणा, दुराग्रह करणें; खनपटीस बसणें; तगादा करणें.

**खळी**—स्त्री. १ गुरटी. २ कापडाला लावण्याची खळ. [ खळ ] .

**खळें**—न. १ धान्याचीं कणसें झोडण्यासाठीं, मळण्यासाठीं केलेली जागा (शेतांत अगर अंगणांत). 'झोडा भारे, खळें भरेल। भाताची मग रास पडेल ॥ '—मराठी पहिलें पुस्तक. पृ ५० (१९३२)(खान. ) शेतांतून माल कापून आणल्यावर तो साठवून ठेवण्याची जागा; तळवें. २ (ल.)(बायकी) लहान मुलांनीं अन्न वगैरे खातांना केलेला अन्नाचा लादा, काला, गिचमिड. ३ सूर्य-चंद्र यांच्या भोंवतीं पडलेलें अभ्राचें कडें ( तळें पहा ). चार मैल उंचीच्या विरल अशा ढगाचे बिंदू बर्फमय असतात, त्यांतून चंद्रकिरण येत असतां त्याचें वक्रीभवन होऊन खळें पडतें. कधीं एकांत एक असें २ अगर ३ खळीं पडतात. ४ (राजा.) अंगण (घरापुढील). [सं. खल, बं. खल; उरि. खला; हिं. खला, गु. खलवाड ](वाप्र.) ०**खुरवतणें**-(माण.) खळ्यात पाणी शिंपडून, बैल तिवड्यास जुंपून त्याच्याकडून खळ्यातील जमीन घट्ट करणें; खळें चोपणें. सामाशब्द- ०**तळवें**-न. १ मळणी करावयाची जागा (खळें) आणि धान्य साठवावयाची जागा (तळवें) २ (ल.) खळ्यावर इकडेतिकडे पडलेलें आणि तळव्यावर पडलेलें धान्य. ' खळें तळवें सगळें अर्धेल्यास देऊं नये, अर्धे आपण घ्यावें व अर्धें त्यास द्यावें.' ०**भट**-खळभट पहा. ०**वाडी**-स्त्री. अनेक खळ्यांचें आवार. खळवाडी पहा. ०**वेसकर**-पु. खळ्यावर काम करणारा महार; याच्या उलट गाववेसकर.

**खळोती**—स्त्री. खळ्यावर शेतकऱ्यांपासून धान्य घेण्याचा बलुतेदारांचा हक्क.

**खळ्या**—वि हट्टी; दुराग्रही. खळभट पहा. ' हा अगदींच खळ्या दिसतो, पैसा दिल्याशिवाय हलायचा नाहीं. ' [खळ]

**खळ्याचा**--वि. खळ्यावर मळलेला, याच्या उलट बडव्याचा=बडविलेला. [ खळें ]

**खळ्याची मेढ**—स्त्री. तिवडा.

**खां**—उद्गा. खान; सरदार; मुसलमानांनील एक मोठी पदवी. ०**साहेब**-पु. खान; बडेखान. ' त्यावेळच्या दरबारला खांसाहेबांनीं हैद्राबादेहून मुद्दाम एक कलावंतिणीचा ताफा आणिला. ' -विवि ८.११.२०५.

**खाइर-रा**—वि. ( काव्य ) खाणारा. ' नेणें मांसखाइरें। काळे गोरें। '—ज्ञा १८.५५४. ' कोणाचा तूं पालखाइऱ्या। ' —रावि २५४०. [सं. खादित; प्रा. खाइअ]

**खाई**—स्त्री. १ सती जाण्यासाठीं केलेली खांच, चिता; निखाऱ्यानें भरलेली खळी. ' ओंयऱ्याची करीन दिळा उंबऱ्याची करीन खाई। ' —वसा ६८. ' अमृतसंजिवनी विजविली खाई। ' —तुगा ३७८९. २ खांच; खंदक; चर; खड्डा. [सं. खन्=खात, खातिका; प्रा. खाइआ ]

**खाई**—स्त्री. नाश; क्षय; ऱ्हास. ' परि ऐलीकडिले मुखीं खाई। हों सरली जगाची। ' -ज्ञा ११.४४०. [सं. क्षी-क्षायिक; प्रा. खाइअ]

**खाई**—स्त्री. १ ( बालभाषा ) खाऊ, गोड पदार्थ. ( कों.) २ स्तन; थाना [ सं खादित; प्रा. खाइअ ]

**खाई-न-खाई**—क्रिवि. कांहीं झालें तरी; निश्चयेंकरून; जरूर; खचित; हमखास. ' आम्ही श्रावणमासीं खाईनखाई येतों.' -रा ३.१४१. [फा. खॉही-न-खॉही]

**खाई(ही)श**—स्त्री. इच्छा. " रघोजी येथें यावा हे खाईश आम्हांस नव्हती. ' -रा १.२२. [फा. ख्वाहिश]

**खाऊ**—पु. १ ( बालभाषा ) कांहीं गोड खाण्याचा पदार्थ; खाई; खाद्य; मिठाई. ' खाऊ मजला आणीत होता। ' -नव २४. १७३. २ लांच, बक्षीस. -वि. १ ( समासांत तिरस्कार्थी ) खाणारा; खादाड; खाबू. ' अफीम-भांग खाऊ. ' २ (ल.) घेणारा; सोसणारा, भोगणारा. ' मार-खेटरखाऊ ' ' प्राणखाऊ ' (समासांत) शेण-लाच-कोडगे-खापर-माती-हुज्जत-हुरमत-पैसे-माल-बट्टा-व्याज-भाड-दम-खाऊ. [सं. खाद्; प्रा. खाअ.] (वाप्र ) **खाऊची गोष्ट**-नशीब उघडणें; नफा; फायदा ( व्यापार धरा यात ). सामाशब्द- ०**इतमाम**-पु. मुलीच्या खाजगी खर्चासाठीं मुलूख तोडून देणें. -स्वप ३७९. ०**खादाड**-वि आधाशी; अतिशय खाणारा. **खाऊं गिळूं, खाऊडाऊ, खाऊ डाऊं**-स्त्री. एकसारखी, फार, सतत जाचणी, गाजगूक. ( क्रि० करणें; लावणें ) [मी खाऊ-गिळूं-यापासून] ०**घेवडी**-स्त्री अति आधाशी, खादाड बाई. ०**निंदक**-वि. खाल्ल्या घरचे वासे मोजणारा; कृतघ्न. ०**पासरी**-वि. १ अधाशी, खाबूनंदन. २ फक्त खाण्याला तयार, इतर कामीं निरुपयोगी; उदरपरायण. [खाण+पासरी]

**खाऊन**—स्त्री. कंबख्तीची वेळ. ( क्रि० येणें ). ' त्याची खाऊन आली. '

**खाक**—वि. जळून राख झालेला; धुळीस मिळालेला, पूर्णपणे नष्ट झालेला ' परशत्रू होईना खाक, ' –ऐपो ४१७. ' पाऊस नाहीं म्हणून शेतें जळून खाक झालीं. ' –स्त्री. राख, धूळ; माती. ' गवताची जळून खाक होते. '–पाव्ह ५५. [ अर फा खाक्=धूळ]

**खाक, खांक**—स्त्री. (गो.) खांकला [सं कास, प्रा. खास; किंवा ध्व. खॉ, खॉ करणें ]

**खा(खां)क**—स्त्री. काख; बगल काख पहा. ' खाकेस घेऊनिया श्वान । ' –यथादी ३ ८०३. [सं. कक्षा प्रा. कक्ख, हिं कांख; फ्रें जि खक, काख ] काख शब्दाखालीं सर्व वाक्प्रचार व म्हणी पहा ०म्हं (व.) खाकेंत खरला अन् महादेव पावला सदोदित मूल कडेवर घेऊन फिरणाऱ्या व काम न करणाऱ्या स्त्रियेला लावतात.

**खांकचें**—क्रि. ( गो. ) खोकणें.

**खांकट-टा**—पु. (को.) झाड, पेरू इ० वृक्षाचें कोवळें फळ

**खाकटणें**—सक्रि. दाहगाईनें ओरबडणें, मोडणें, खचणें छाटणें ( झाडापासून त्याच्या फाद्या, पानें इ० )

**खाक(खु)डचें**—क्रि ( गो. ) चांचरणें.

**खांकमांजरी**—काखमांजरी पहा.

**खाकर**—पु १ सागाच्या वाशाचें निमुळतें टोंक २ (ना ) वासा. [ स खक्खर ]

**खा(का)कर**—पु ( राजा. ) ओरखडा; जखम.

**खा(खां)कर**—वि वयानें जीर्ण झालेला ( प्राणी, वनस्पति ) शुष्क; क्षीण. ' खाकर झाले वृक्ष सर्व । ' –एभा १२ ३ –न. वठलेलें झाड; वाझ फळझाड ' भम माजनवृक्ष खाकर । स्मशान भूमि अकाळ मेघ निर्धार । ' –पाप्र २२ ७९

**खांकर, खांकरा**—पु घोड्यास चाल शिकविताना जो खुळखुळा वाजवितात तो, खुळखुळ्याची काठी । ' जैसा वाद टपलाणी । तरट खाकर झणार्णी । ' –एभा ( पाठभेद ) २ २१६ [ सं. खक्खर=भिकाऱ्याची काठी; ध्व खॉं+कृ कर ]

**खांकर-रा**—पु गाजर, बटी, गोवऱ्याच्या ढगाऱ्यावर भाजलेले कणकेचे जाड रोट.

**खा(खां)करणें, खाकेरणें**—उक्रि. १ घसा साफ करणें, कफ वर आणण्यासाठीं खाकरा काढणें; वेडका काढणें. ' ना शाखाचेनि कीर नावें । खाकरोंही नेणती जीवें । ' –ज्ञा १७.९३. –अक्रि. १ खकारणें, शब्द करणें, खाकरणें; घशातील कफ बाहेर आणण्यासाठीं प्रयत्न करणें २ नाक्रू काकू करणें. [ ध्व. खा ! खा ]; खात्कृ–खात्करोति–खाक्करइ–खाकरतो. –मसाप २ २३८. ]

**खांकरवसा-वासा**—पु. खडसावणें, खरडपट्टी; ताशेरा ( जोराचा ). ( क्रि० घालणें; सारणें, करणें; काढणें ). खाकरवासा पहा.

**खाकरवासा**—पु. ( वाळलेला व उंच वासा ) १ वठलेलें उंच झाड, वनस्पति. २ ( ल. ) वार्धक्यानें, अशक्तपणानें बाहेर निघालेला पाठीचा कणा. ' पाठीचा खाकरवासा निघाला. ' [ खाकर+वासा ]

**खा(खां)करा, खाकेरा**—पु. १ कफाचा वेडका ( खाकरून काढलेला ); खाकरण्यानें सुटलेला कफ ( क्रि० काढणें; टाकणें ). ' वदनीचा खांकरा टाकला. ' [ ध्व. खॉं; सं. खक्ख्=हंसणें ! ]

**खाकरी**—स्त्री. दाणे काढून घेतलेलीं कणसें ( विशेषत. बाजरीचीं ).

**खाकरी**—स्त्री ( व. ) चिलमींत ओढण्याची तमाखूची मुक्टी, मूड [ अर. फा. खाक ]

**खाक(का)री**—स्त्री. वेडका, कफ काढण्याची क्रिया; घसा साफ करणें; ओकारी ( कफ काढण्याची ) ( क्रि० काढणें ).

**खांकरेजणें-रेजणें**—अक्रि तयार होणें; फुटणें, उद्भवणें. ' तेथ प्रवृत्तीचेनि वृद्धिलोभें । खाकरेजती शुभाशुभें । ' –ज्ञा १५. १५९. [ खाकरणें, सं. कक्षा. खाक ]

**खाकस**—( व. ना. ) खसखस पहा.

**खाका**—पु. १ भिंतीवर, जमीनीवर काढावयाच्या आकृती, चित्रें वगैरे पहिल्यानें ज्या कागदावर काढतात तो कागद. २ कच्चा मसुदा; आराखडा; खर्डा. [ फा. खाका ]

**खाका**—पु. वाणा; तऱ्हा; वृत्ति. खाक्या पहा. [ फा. खाका=आराखडा ]

**खाका**—वि. ( कों. कुला. ) नारळाच्या सर्व भागाच्या दाढ्यांपैकीं ज्या दांड्यावर पानें नसतात तो. [ खाक ]

**खाकावणें**—अक्रि. गरजणें, ओरडणें. [ ध्व. खा ]

**खाकी**—स्त्री हौनता. ' आम्हास खाकी यावी असा समय येऊन वातखाला ( ? ) आहे. ' –रा ६.५२१. –वि. राखेसारखा; धुळीसारखा; मातीसारखा ( रंग ) [ अर. फा. खाक=राख. फा. खाकी] ०गोसावी-साधू-पु अंगाला राख फासणाऱ्या गोसाव्याचा एक पंथ; त्या पंथातील व्यक्ति. हे कृत्रिम गंगाजळाच्या ( पाण्यात गोपीचंदन कालवलें म्हणजे तें गंगेच्या पाण्यासारखें दिसतें ) कावडी घेऊन हिंडतात. –गागा १३२. २ ( ल. ) सापट, रागीट, हातचा राख घालणारा माणूस.

**खांकुड**—वि. ( गो ) गागरट.

**खांकाटा**—पु खांकट-टा पहा.

**खांकोटी खाखोटी**—कांखोटी पहा.

**खाकोरणें**—उक्रि. ओरखडणें; ओरबाडणें. खाकरा पहा.

**खाकारा**—पु ओरबाडा; ओरखाडा; बोचकारा.

**खाको खो|ळें**—न. मस्तकावरचा अर्धा भाग; कवटी; खोपटी; डोकें ( दगड, काठी यानें मारण्याच्या, फोडण्याच्या, रक्त वाहण्याच्या संबंधानें अथवा तिरस्कारार्थी योजतात). (क्रि० फोडणें; फुटणें ). खोकें, खोकाळें पहा.

**खाक्या**—पु. प्रघात; वाणा; ठराविक वर्तनक्रम, स्वरूप, युक्ति. 'असा नेहमींचा खाक्या असे' -सूर्योदय १३९ [ फा. खाका=आराखडा, खर्डा ]

**खाक(खे)रणें, खाखकरा, खाखेरा**—खाकरणें-खाकरा पहा.

**खाखा**—स्त्री. १ अनावर क्षुधा; पोटांतील भुकेची आग. (क्रि० करणें; सुटणें) २ अधाशीपणा; हावरटपणा; वराडीपणा. [ खाणें ]

**खाखा**—पु. मौक्तिकभस्मास लागणारी बारीक मोत्यें; गाळ.

**खाखाइणें**—अक्रि. वाजणें; कर्कश वाजणें. ' निशाण आहा टिल्या भेरी । खाखाइल्या रणमोहरी । '-एरुस्व ८ २०. 'रणतुरें खाखाइलीं अपार ।'-हरु २४.१२. [मूळ शब्द ख=ध्वनि पासून खखणें असेल व त्याचा उच्चार चुकीनें ' खाखा ' असा रूढ झाला असावा. ]

**खाखाई**—स्त्री. खाखा; खवखव; सडकून लागलेली भूक ( क्रि० सुटणें; होणें ). [ खाणें द्वि. ]

**खाखात**—वि. खा खा करीत उठलेला. ' खांखातें प्रेतें । खाएं गिळी करिते । '-शिशु ९०२. ' भयानकें खाखातें । महा प्रळयो जेथें ।' -ज्ञा १.१३१. [ खाणें द्वि ]

**खाखात**—वि. कर्कश. -ज्ञा १.१३१ [खाखाइणें-टीप पहा]

**खाखावणें**—अक्रि. सपाटून भूक लागणें; खाखा सुटणें [ खाणें द्वि ]

**खांखोटा**—खांकट-टा पहा.

**खागडा**—पु. ( सांकेतिक ) छप्परबंद जातीच्या टोळीचा नाईक.

**खागें**—न. अंतिम स्थळ, ठिकाण; शेवटची जागा ' मग मी एकुलाणीचें खागें । '-ज्ञा ९.४७०.

**खागें**—न खाद्य; खाजें, भातुकें. 'हे कथा कैसी सांगे । हो काम अन्नविषेचें खागें । '-ज्ञाप्र १९. 'देह काळसर्पाचें खागें । ' स्वानु ३.४.१५. (-हंडो व -शर याचा अर्थ खडे (मंडल) असा देतात). [ खाजें ]

**खा(खां)च**—स्त्री. बाणाचा टप्पा, पल्ला; शरपात [खेंचणें]

**खा(खां)च**—स्त्री. १ खड्डा; खळगा; खोंचा. २ (ल.) व्यापारांतील बूड, तोटा. ( क्रि० येणें; होणें; पडणें; बसणें ) [ खचणें; का. कच्चु=खोंचा, खळी ] ०खच ख(ळ)-खळगा-खोपळा-स्त्रीपु. खांचखड्डा; खाचखळी; खालगी विळ (व्यापक रीतीनें ) ( सामा. ) खाच. ' चालतें समयीं खांचखळगा पाहून चालावें. ' म्ह० जिकडे गेली बाला तिकडे खासा खवळा. ०खोंच-स्त्री. चढउतार; उंचसखल; विषमता ( भिंत, जमीन यांची ) ' भिंत रचली मात्र आहे, परंतु तिच्या खांचाखोंचा काढिल्या नाहींत. ' २ वाढ व घट; न्यूनाधिक्य; कमजास्तपणा. वारीकसारीक दोष ( हिशेब, नक्कल, मसुदा, यांत ). ' ह्या मसु-द्यात खाचखोंच असल्यास काढून तो साफ लिहा.' ३ गायनांतील खटके; आवाजांत चढउतार; उच्चनीच स्वर. ४ मर्म; वर्म; विंग. ' यांतील वारीक खाचाखोंचा मला पूर्ण माहीत आहेत. ५ भाषणांत, लेखनात अलंकार ज्यांमुळें साधतो ती शब्दयोजना.

**खांचण**—न. ( गो. ) फुलांची वेणी गुंफल्यावर घट्ट रहावी म्हणून आधीं खोंचतात तीं फुलें किंवा पानाची घडी. [ खोंचणें ]

**खांचणी**—स्त्री खोवण, कोरणी; खंचणी पहा.

**खांचणें**—उक्रि. १ कमी करणें, काट मारणें. 'तैसा दानपुण्यें खाची । गोत्रकुटुंबा वंची । परी गारी भरी स्त्रियेची । उणी हों नेदी ।' -ज्ञा १३ ७९४. २ खंडण करणें. ' म्हणोनि ते बुद्धि खंचूं । मत-वाद हे खाचूं । '-ज्ञा १३.१०४९. -अक्रि. श्रमणें; दमणें; थकणें. ' उच्चैश्रवा खांचे । खोलणिये ।'-ज्ञा ९.३२६. [खांच, खचणें ]

**खाचर**—न. ( व. ) एक प्रकारची बैलगाडी. ' मोर्शीवरून उमरावतीस जाण्यास भाड्याचें खाचर मिळतें.'

**खा(खां)चर**—न. १ खळगा; खांच; खळी; खड्डा. २ पाण्याच्या जोरदार प्रवाहामुळें जमीन धुपून पडलेला नाला, घळ; ओहोळ ३ ( कों. ) डोंगराच्या बाजूवर अगर पायथ्याशीं तसेंच कातळावर तयार केलेला शेतजमीनीचा तुकडा. ४ अळूं, भाजी इ० लावलेली आहे अशी पाण्याची खोलवट जमीन, खांचरी; उंसाचा मळा. ५ ( सामा ) भातजमीन. ६ खडबडीत वस्त्र; जाडें-भरडें वस्त्र, धोतर, लुगडें [ खांच] ०खळगा-खुचर-पुन. खाचखळगा पहा.

**खॉचरी**—पु ( गो ) एक प्रकारचें भाताचें बीं.

**खांचरी**—स्त्री. १ ( कों. ) लावणीसाठीं तयार करावयाची भाताच्या रोपांची खोलगट जमीन; मोठें खांचर. २ उंसाचा ल्हान मळा [ खाच]

**खांचविणें**—उक्रि खोवण पाडणें, खोवणींत बसविणें. 'ह्या पटया खांचवून बसीव.' [ खांचणी ]

**खांचा**—पु खांड; कंगोरा; खोवण; खांच; माप; खोंगा; (सुरी, काठी, झाड, विहिरीची बाजू यांना पाडतात तो.)(क्रि० येणें; पाडणें; काढणें; करणें ). [ खांच ]

**खांचाड**—न. ( खांच याचा अतिशय ) वांकडातिकडा व मोठा खड्डा, खाच. [ खांच ]

**खांड**—पु. (गो.) लहान दगडी पूल; साकवा. [ खाड ]

**खांडँ-णँ**—न. (गो.) शेतामाठीं शेतांत गांठून ठेवतात तें खारें पाणी. [ सं. खाड=एक प्रकारचें मीठ, क्षार ]

**खाड-कन-कर-दिनीं-दिशीं**—क्रिवि. ( खाड! अशा आवाजानें, मोडणाऱ्या, पडणाऱ्या झाडांच्या आवाजाच्या अनुकरणावरून ) विशिष्ट आवाज होऊन. ( क्रि० मोडणें; वाजणें; पडणें थोबाडीत मारणें. )

**खाडखडखड**—स्त्री. खमखम, फगफग आवाज. ( भांड्यांत वेरराचा, पाला पाचोळ्यांत कीटकांचा ) [ ध्व. खाड+खडखड ]

**खाडखाड**—क्रिवि. खाड! खाड! अशा आवाजानें युक्त 'खाड खाड उठली टापा।' –संग्रामगीतें ५.१७. [ ध्व. ]

**खाडगा**—पु (कु) कसाई; खाटीक.

**खांडचोर-री**—खाणचोर-री पहा.

**खांडणावळ**—स्त्री. खणणावळ, खणण्याची मजुरी [ खांडणें ]

**खांडणें**—उक्रि. १ मोडणें; जोरानें तोडणें; छेदणें; छाटणें; खापणें; काटणें; खंडणें. 'समिधा तो खांडुलागला।' –वसा ६१. २ खणणें; खोदणें. 'उपनिषदर्थांची माळी–। माजीं खाडिली' –ज्ञा १८.३५. ३ (ल.) कुरतुडणें; चावणें; खुडखुड करणें (गिळलेली माशी). ४ (राजा.) जेवण्याचें पान अथवा द्रोण करण्यासाठीं पोफळीच्या झाडाची पोय, विरी, पानें कातरणें, छाटणें. ५ खांडवीच्या वर्फीच्या वगैरे वड्या, खापा पाडणें. ६ (ल.) निरास करणें. 'मा तर्कांचें खुरपें। खाडे कोणा।' –अमृ ६.२४. ७ (ल.) अडविणें. 'सर्प वाट खाडिली' –वसा ५९. ८ वेगळें करणें; पृथक् करणें. 'कां चाचूचेनि साडसें। खाडिजे पय पाणी राजहंसें।' –ज्ञा ९.४४. [ सं. खडन ] **खडा खाडणें**–( वांगेंऊं किंवा करडई यांनीं ) खड थान किंचित कुरतडणें, चावणें. म्ह० आडवें आलें तें खाडून काढावें.

**खॉडप**—न. (गो.) चुडतांच्या किंवा कुडांच्या भिंतीची केलेली खोली.

**खाडयॉ, खाडियॉ**—वि. (गो) दाढीवाला. [ खाड ]

**खाडवें**—न. ताडामाडावर चढतांना पायांत अडकविण्याचा दोरीचा फांस, पायडा. (वाप्र.) **अडव्यास खाडवें बोलणें**–(ल.) चांगल्याच्या मोबदला वाईट बोलणें; आदराबद्दल अनादर दाखविणें. ( आडव्या झाडाला खाडवें लागत नाहीं पण तें वापरावयाचें–यावरून ).

**खाडा**—पु १ खंड; खळ; तहकुबी ( कामात, गतींत ). 'त्या कामास चार दिवस खाडा पडला.' २ तहकुबीचा एक दिवस, एक पाळी; रिकामा वेळ. 'त्या महिन्यांत तुझे चार खाडे झाले.' ३ खळगा-गी; खाच; खोलगा; खालीं गेलेली किंवा दबलेली जागा. ४ (ल.) खडखडाट; अभाव ( गवत, पाणी, पाऊस यांचा ). [ सं. खात, किंवा खंड ] (वाप्र.) **खाड्यांत उतरणें-घालणें-पाडणें-टाकणें ( माणसास )**–दारिद्र्यांत, तोट्यांत, हलाखींत घालणें. **खाड्यांत घालणें ( पैशास-डागिन्यांस-गहाणास )**–लबाडीनें आत्मसात करणें; गिळणें, दाबणें. **खाड्यांत पडणें**–तोटा येणें; नाश होणें. सामाशब्द– **०दिवस-तिथा-वेळ-काळ**–वि. रिकामा दिवस इ०.

**खॉडॉ**—पु. (गो.) खोडा; बंधन.

**खांडा-डें**—पुन. रुंद पात्याची, दुधारी, सरळ व वाटोळ्या टोंकाची तरवार. खंडा पहा. 'तुभां खाडेआं खरटिनीं। दानव प्रतापु केरू फेडीनी।' –शिशु १५८. 'वोडन खाडे घेतलें करीं।' –एरुस्व १२.१२६. **०ईत**–वि. खांडा बाळगणारा; खाडेकरी ( शिपाई ).

**खांडा**—पु. १ शस्त्राच्या, हत्याराच्या धारेस पडलेली खांच, चरा, कातरा, दांत. २ खचखड; घळ; चर; ओहळ. [ सं. खड ]

**खाडाण**—वि. दूध न देणारी, नाटाळ ( गाय ). खडण, खडाण पहा.

**खांडार**—न. ( खांड याचा अतिशय ) मोठें भगदाड; भेग; चीर; खिडार. [ खाड ]

**खांडावा**—पु खंड; तुकडा. 'याणीं मध्यें वेलादक घोडी घालून अगदीं खांडावा तोडला.' –भाव १२९. [ खंड, खाड ]

**खा(खां)डी**—स्त्री. दाढी. खांड पहा.

**खाडी**—स्त्री. नदींत जेथवर समुद्राच्या भरतीचें पाणी येतें तेथवरचा भाग, थोकण, ओहोळ [ सं. खन्–खात किंवा क्षार-री ].

**खांडी**—स्त्री. १ खिंड. २ शरीरावरील खवंद. ३ दातांतील खिंड. 'तसे खांडीहूनि लाळे। पडती पूर।' –ज्ञा १३.५६७. [ खंड ]

**खांडी**—स्त्री. खांडा; तरवार. 'लखलखितें खांडीं' –शिशु १०३८. [ खंड ]

**खांडूं**—न. ( हेट. कु. गो. ) खाडवें; दोराचें अगर वेलीचें वेटाळें. याचा उपयोग माडावर चढण्याकडे करतात. खाडवें पहा.

**खाडू**—वि. १ खट्याळ; नष्ट ( घोडा, माणूस ). २ मिशा, दाढी नसलेला. ३ ( सांकेतिक, औपरोधिक ) पावणेआठ, नपुंसक; षंढ; तुवर. ४ (व.) वृद्ध कपि; निखाडू. ५ (व.) ( निंदाव्यंजक ) परीक्षेंत अनेकदा नापास झालेला विद्यार्थी; ढ. [ खाड ]

**खांडू(डु)क**—न. १ गळूं; गलंड; गांठ 'खाडुक जाल्या किडे पडती।' –दा १ १०.५२. २ फुटलेलें गळूं; वाहणारें क्षत. ३ झाडावरील उटंगळ; उठावूं. ४ खवडा; डोईंतील फोड. [ स. खंड किंवा कंडू ? ] **खांडु(ड)केला**–वि खाडकांनीं ग्रस्त, व्यास.

**खाडूस**—न. १ अडकाठी; अडथळा; प्रतिबंध; व्यत्यय; बाध; अड; नड; लोढणें; व्याधि; उपाधि; त्रास. २ (ल.).

**खांची**—स्त्री. खाच; झाडावर चढतांना पाय टेवण्याची जागा, वेळका. 'पाय घसरुनी पडेल। अथवा खांची उपटी उपडेल।' -निगा ४४. [खांच]

**खाज**—स्त्री. १ कंडू, कंड; चिणचिण; हुळहुळ. (क्रि० सुटणें, निघणें). २ सुरसुरी; खुमखुमी; प्रबळ इच्छा; उत्कंठा (एखाद्या गोष्टीची) ३ याद; कसर (कारभारी, मुनीम इ० ची) ४ (कु) अधाशीपणा. [सं. खर्जू; फ्रें. जि. खज, खांज; का. कज्जि.] ०जिरविणें-खोड, खुमखुमी, रग मोडणें.

**खाज**—न. (व.) खोबऱ्याचा कीस, खसखस व साखर यांचें मिश्रण करंज्या, मोदक इत्यादींत घालतात तें. करंज्याचें पुरण; सारण. 'खाजी करंज्यांत खाज घातलेलें असतें.' [सं. खाद्य, प्रा. खज्ज] -स्त्री. (गो.) चुरमा. खर्जाचे लाडू; चुरमी लाडू.

**खॉजें**—न. (गो.) दांडू लगावण्याचा एक प्रकार.

**खाजकुइ(यहि)री-ली, खाजकोयरी, खाजकोलती-कुवली**—खाजरी कुइरी पहा.

**खाजगत, खाजगी-चाला**—खासगत, खासगी पहा.

**खाजण-न**—न. १ (कों.) खाऱ्या खाडीच्या पात्रांत, जेथें ओहोटीच्या वेळीं फारसें पाणी रहात नाहीं व बारीक रेव व चिखल असतो अशी जागा. २ अशा क्षेत्राच्या (एका बाजूस डोंगरपायथा असल्यामुळें ती बाजू खेरीज करून बाकीच्या) तीन बाजूंकडे मजबूत बांध घालून तयार केलेली भातजमीन; खारी शेतवाडी. ३ मीठ तयार करण्याचा वाफा. ४ (कु) नदींतील गाळानें बनलेली जमीन. ५ (सामा.) खारी, दलदलीची जमीन. [दे खंजन, गु. खाजण] ०फॉंयडा-पु (कों.) खाजणांत आढळणारा एक पक्षी. [तुल० सं. खंजन, प्रा. खंजण=खंजरीट पक्षी] **खाजणी**-वि. खाजणामध्यें उत्पन्न केलेलें किंवा खाजणसंबंधीं (पीक, जमीन).

**खांजणी**—स्त्री. पाढे इत्यादींचा मिळवणीचा एक प्रकार; एक प्रकारची बेरीज. ही पूर्वी शाळेंत शिकवीत. [सं. खंडन] ०भांजणी-स्त्री. १ बेरीज आणि वजाबाकी, गुणाकार आणि भागाकार (अनेकवचनी प्रयोग). 'मी खाजण्याभांजण्या शिकलों.' २ (ल) देवघेवीमध्यें नफातोटा सोसून एकमेकांचे विचारें केलेली सरासरी सोड. ३ अडचणींत सापडलेल्या गिऱ्हाइकास वगैरे त्याजकडून येणाऱ्या रकमेंत दिलेली सूट. ४ (ल) क्षय वृद्धि; उत्पत्ति-संहार. 'खांजणीभांजणीचें समजावें। मूळ तैसें।' -दा १५.४.१८. [सं. खंडन+भंजन]

**खाजणें**—उक्रि. खाज उत्पन्न करणें, सुटणें, सवसवणें; कंडू सुटणें; खाज आणणें. (खाज सुटणाऱ्या सुरण, अळूं इ० पदार्थां मुळें). 'हाताला अळूं खाजतें.' -अक्रि. अंगाला खाज सुटणें; खाजवावेंसें वाटणें. [सं. खर्जन]

**खाजदार-री**—खासदार-री पहा.

**खॉजनॉ**—पु. (गो.) एक जाड लोखंडी नळी; त्या नळींत दारू भरून काढलेला बार.

**खाजघोडा**—वि. (कु.) खादाड. [खाज+शिवी]

**खाजरा**—वि. खाज उत्पन्न करणारा; खवखवणारा; खवरा (अळूं, सुरण इ० भाजी).

**खाजरी कुइरी-ली**—स्त्री. हें लहानसर झाड असून याचीं पानें मोठीं व काळसर असतात. झाडांना शेंगा येतात. पानें व शेंगा यांना कुसें असतात व तीं अंगास लागल्यास अंगाची आग होते (याला संस्कृत नांव आत्मगुप्ता अगर कपिकच्छु असें आहे). याच्याउलट गोडी कुयरी.

**खाजलॅं**—न. (गो.) खाद्य; खाणें.

**खाजव**—स्त्री. खाज, कंडू. (क्रि० सुटणें; येणें; होणें; मोडणें). [खाज]

**खाजवाखाजव**—स्त्री. १ परस्पर खाजविणें; सर्वत्र खाजविण्याचा व्यापार. २ त्रास, चीड; क्षोभ आणणें; चेतव; भांडण उपस्थित होण्यासाठीं मुद्दाम केलेली चेष्टा; लावालावी. [खाजविणें]

**खाजविणें**—उक्रि. १ कंडू शमनार्थ अंग चोळणें, खरडणें. 'प्रेमें वृक्षांनीं मृग खाजवावे। जेथें, मृगा दाकुनि काय जावें।' -नरहरी गंगारत्नमाला. (नवनीत पृ. ४१७.) २ त्रास, चीड, क्षोभ आणणें; कलह उत्पन्न करणें; आग लावणें; हंबचणें; चिडविणें. [सं. खर्ज] (वाप्र.) **खरखर-रा खाजविणें**-जोरानें खाजविणें; ओरबडणें. म्ह० खाजवील त्याला खरूज भोगील त्याला संपदा. **खाजवून अवघणा आणणें**-आपल्या हातानें आपल्या जिवाला त्रास करून घेणें. **खाजवून खरूज काढणें**-(खरूज झालेल्या जागीं खाजविल्यानें खपली धरलेली असली तरी ती निघून खरूज वाढते यावरून) मिटलेलीं भांडणें पुन्हां उकरून काढणें, उगीच कलह उत्पन्न करणें. **खाजवून पान्हा आणणें**-कोणेएकास कांहीं उत्तेजन देऊन कामास प्रवृत्त करणें.

**खाजा**—खाजी, खाजें पहा. -हिंदु ११.२.३०. ०**करंजी**-खाजी करंजी पहा. 'सगभे शुभ्र खाजा करंजा।'-जै १४.५६.

**खॉजॉ**—वि. (गो.) नपुंसक. [खोजा]

**खाजाळ्टा-ळू**—वि. १ भांडखोर; कळीचा नारद; खजाळ पहा. २ विषयी; कामुक. ३ खाज उत्पन्न करणारा. खाजरा पहा. ४ नेहमीं अंग खाजविणारा; (गो.) खाजाळो. [खाजण]

**खाजाळूं**—न. खाजरें अळूं. [खाज+अळूं]

**खाजिवरा**—वि. (राजा.) खाजरा पहा.

**खाजी**—स्त्री ( हिं ) एक मिठाई, पक्वान्न, खाजीकरंजी [ सं खाद्य, प्रा खज्ज ] ०**करंजी**-स्त्री हा एक करंजाचा प्रकार आहे खाली एक व वर एक अशा दोन पापड्यामध्ये करंजाचेंच सारण घालून सभोंवतीं मुरड घालावी व तुपात तळाव्या –पाक ५८ 'फेण्या खाजी करंजी मृदुतर लुचया शर्करेमाजि घोळी।' –विंदुदाम ३४.

**खाजुकाली**—( वे ) खाजरी कुइरी पहा

**खाजुकें-गें**—न खाऊ, भक्ष्य खाजी, खाजें पहा

**खाजुळी**—स्त्री वचनागासारखी एक वेल

**खाजूर**—पु (गो राजा ) खजूर [स खर्जूर] ०**माड**–पु ( गो ) खजुरीचें झाड

**खाजें**—न ( ना ) लग्नातला एक विधि ?

**खा(खां)जें**—न १ पचखाजे, खारीक, खोबरें, खसखस, खिसमिस, खडीसाखर हे ख नें आरंभ होणारे पाच पदार्थ पचखाद्य पहा 'होळीमध्यें खाजें आहे। तें तू विचारुनी पाहे।' –रामदास होळीपचक २ वाणसौदा, वाण्याकडील सामान ३ खाजी नावाची मिठाई 'घ्या धास मुहूर्ते येथें वाढितें खाज्या।' –प्रला १५४ ४ ( कु ) हरभऱ्याच्या पिठाच्या लाबट गोळ्या गुळाच्या पाकात करतात त्या (खाज्या) ५ एखाद्याच्या आवडीचें खाणें, खाद्य उदा० मेंढरू हें लाडग्याचें खाजें, उदीर माजराचें खाजें 'आणितो हिमांशुचि जेविं खाजें चकोराचें।' –ज्ञा ६ २९ 'स्त्री म्हणिजे मेंढिएचें खाजें गा।' –सूत्रपाठ आचार, उत्तरार्ध २५३ 'ऐसें शरीर बहुताचें मूर्ख म्हणे आमुचें। परतु खाजें जीवाचें। तापत्रें बोलिलें।' –दा १ १० ६० ६ ल्हान मुलाचा खाऊ, भातुकें, मिठाई –वि चमचमीत, आवडतें, सुग्रास ( भोजन ) 'नहो एची शुद्ध भाडण। तम्हीं तु नाहीं खाजें जेवण।' –शिशु १२० [ स खाद्य, प्रा खज्ज ] ०**करु–कार**–वि (गा महानु ) हलवाई, खाजें करणारा 'भाडारी खाजेकरू।' –शिशु ३५४ [ खाजे+कर ]

**खाजोळा**—वि ( कु ) खादाड 'हो माठा खानोळा आसा' [ स खाद्य, प्रा खज्ज+अळ प्रत्यय ]

**खाजोळा**—वि ( कु ) खाजरा अगास खाज आणणारा 'हो सुरण खाजोळो आसा.' [ खाजणें ]

**खाट**—वि १ खाष्ट, द्वाष्ट, तिरसट, रानवट (मनुष्य, प्राणी) २ कठिण, कठोर, निष्ठुर, करडें ( वर्तन, भाषण ) [ खाष्ट, तुल० कानडी काट=पीडा ]

**खाट**—पु ठसका, भपकारा, खकाणा ( मिरच्या इ० उग्र जळणाऱ्या पदार्थांचा ) 'मिरची घरांत टेविली तर काहींच होत नाहीं पण तीच अग्नींत पडल्यास तिचा खाट उठण्यास आरंभ होतो' –दयानद सरस्वती १५६ [ का काट ? ]

**खाट**—स्त्री चारपाई, बाज, बाजलें, खाटलें, काथ्यानें विणलेला पलग [स खट्वा, प्रा खट्टा, तुल० का कट्टु=बाधणें, ता कट्टिल=पलग, इ कॉट] (वाप्र ) **खाटेवर चढणें**–पूज्य माणसा विरुद्ध किंवा उपकारकर्त्याविरुद्ध उलटणें, कृतघ्न बनणें सामाशब्द– ०**खटलें–खडबड**–नस्त्री (व्यापक) बाडबिछायत,सामानसुमान, चबूगबाळें, प्रपच ०**खिळया**–वि खाटेस,बिछान्यास खिळलेला, सदोदित आजारी असलेला 'तो गा! जन्माचा खाटखिळया!' [ खाट+खिळणें ] ०**खोली**–स्त्री (खाट आणि खोली न सोडणें) खाटखिळया होणें (क्रि० करणें) ०**पसारा**–पु फाफट पसारा, पसरण, ( सामान्यत वस्तूचा ) अस्ताव्यस्त कारभार, गोंधळ ( क्रि० करणें, माडणें, घालणें, –कर्माची षष्ठी, होणें, पडणें –कर्त्याची षष्ठी ) ०**मार**–पु खाटेस बाधून फटक्याचा दिलेला मार 'खाटमार ऐकिलात कोठें' –अफला ६५ 'खाटमारें मोठा कठिण। नाहिं कुठें ऐकिली तऱ्हा।' –ऐगो ३६० [खाट+मारणें] ०**बाईक**–खाटलेंबाईक पहा ०**वाक(ख)ळ** स्त्री १ खाटखिळयाचें घेतलेलें सोंग, आजारीपणाचें टोंग ( क्रि० घेणें, निजणें, निजून पडणें ) २ ( ल ) उपेक्षेनें, बेपर्वाईनें, निष्काळजीपण वागविण

**खॉट**—स्त्री ( गो ) लाथ, टाच [खोट] **खॉटांवचें**-क्रि ( गो ) लाथा मारणें

**खाटक-की खाटीक**—पु १ पशूना मारून त्याचें मास विकणारी जात, बकरीं, मेंढरें याची सागुती विकणारी एक हिंदू जात व तींतील व्यक्ति, कसाई (स्त्री–खाटकीण) २ ( ल ) निर्दय पुरुष [ स खट्टिक ] **खाटकी माल**–पु मास, सागुती

**खांटयॉ**—पु ( गो ) सोनाराचा ल्हान घण, हातोडा

**खॉटलॉ**—पु ( गो ) बुरडी टोपली

**खाटलें**—न १ ल्हान बाज, खाट २ ( कुण ) सप्तर्षी ( आकाशातील तारकापुज, त्याच्या आकृतीवरून ) ३ बैलगाडी ४ वाडविछाना [ खाट ] **खाटल्यावर जाणें**–१ मातृगमन करणें २ खाटेवर चढणें पहा (ना )(वाप्र ) ०**टाकणें**–आजारी पडणें [ खाट ] ०**बाजलें**–न १(कुण ) सप्तर्षी ( आकाशातील तारकापुज, त्याच्या आकृतीवरून ) २ बायकाच्या लुगड्या वरील समविषम चौकटींची नक्शी ०**बाईक–कुजवणारा**–वि अथरुणाला खिळलेला, खाटखिळया पहा

**खाटवा**—पु खाट, बाज [ स खट्वा ]

**खाटवावडी**—स्त्री एक प्रकारचा पतग, वावडी

**खाटसरी**—स्त्री (विणकाम) वस्त्राचा विणलेला भाग ताठ राहण्यासाठीं केलेली काठ्या वगैरेंची हातमागांतील योजना, कर्नर खाटसरी, काटोसो पहा

अडथळा करणारा, जाचणारा, त्रास देणारा, व्यत्यय आणणारा माणूस, मुद्दा, विषय. ' घरामध्ये सुनेला सासूचें खाइस. ' [खंड]

**खांडें**—न. नदीच्या पात्रातील कोरडी जागा; खांडडोह. [खंड]

**खांडें**—न (गो.) शस्त्र ठेवण्याची पिशवी. ?

**खांडें**—न. तरवार, खांडा. ' सारथियाचा तोंडीं सुनि खांडें । ' –शिशु १०४७. [खंड] **खांडेकरी**–कर–पु. तरवार बाळगणारा शिपाई खांडाईत. ' तीन शत उभे खांडेकर । ' –कथा ४.६.१७५. **०धुआवन**–न. (महानु.) (तरवारीस पाणी देणें). एक प्रकारचा कर; खंडणी. ' खांडेधुआवन मागे अंतराळीं । ' –शिशु १६२.

**खांडें**—न (व.) सुती जाड लुगडें (निंदाव्यंजक). ' एक खांडें घेतलें आहे नेसायला ' [खंड]

**खांडेनवमी**—स्त्री. नवरात्र उत्सवांतील शेवटचा दिवस. या दिवशीं शस्त्रांची पूजा करतात व कुणबी लोक कोंबडीं, बकरीं यांचा बळी देतात. [खांडा]

**खांडोरें**—न. (खांडचें लघुत्व) खांड अर्थ १, २, ३ पहा

**खांडोळी**—स्त्री. एक पक्वान्न खांडवी–व पहा.

**खांडोळें**—न. १ खंड; तुकडा; भाग. २ छाटलेला तुकडा; खंड (जिवंत साप, किडा, प्राणी यांचा). [सं. खंडल] (शस्त्रानें) **खांडोळीं करणें**–तुकडे तुकडे करणें.

**खाड्या खार**—पु. काडीखार; पापडखार. [सं खंड+क्षार]

**खाण**—स्त्री. १ खोल खड्डा; खळी; चळद २ दगड, धातु, रत्नें इ० काढण्याकरितां खोल खणलेली जागा. ३ घर, निवासस्थान (मुंग्या, इतर किडे यांचें) ४ (ल) मूळ, उगम, थळ, उत्पत्तीचें ठिकाण; जात, हरा ५ आगर; निधि; सांठा; खनि, समृद्धिस्थान. [सं. खनि] म्ह० खाण तशी माती (बीज तसा अंकुर या अर्थानें)=जशीं आईबापें तशीं मुलें. ' जिचे उदरीं तव उत्पत्ती । तिची निवडली ऐशी जाती । म्हणोनि खाणतंशी माती । आह्मणा लोकीं प्रसिद्ध । ' –मुक्तेश्वर. सामाशब्द– **०करी**–पु. खाणींत खणणारा, खाणीवाला. ' ज्यास अद्यून खाणकऱ्यांनीं हात लाविला नाहीं अशा डोंगरांच्या पोटांतून सोनें व संगमरवरी दगड निघतील. ' –मराठी ६ वें पुस्तक पृ ८२. (१८७५). **०गत**–स्त्री. खाणीपासून सरकारला मिळणारें उत्पन्न **०चोर**–पु खणून घर फोडणारा चोर; याच्या उलट दरोडेकरी, वाटमाऱ्या. इतर अर्थासाठीं खानचोर पहा. **०चोरी**–स्त्री घर फोडून केलेली चोरी. खा(न)चोरी पहा. **०वट**–स्त्री. कुळी; वंश; जातगोत. खानवटा पहा.

**खाण**—न. १ (क) खाणें; अन्न. ' खाण चागलें तर शरीर बळकट. ' २ जेवण या शब्दास जोडूनहि वापरतात. ' तुमचें जेवणखाण झालें कीं ? ' [सं. खादन; प्रा. खाण] म्ह० १ खाण थोडें मचमच फार–थोडक्या गोष्टीचा सर्वत्र गवगवा करणें. २ (गो.) खाणजेवण करीय आसूं अर्थ अपुर्बाय करी=देणें घेणें करोंहि असलें तरी प्रेमाचा शब्द असावा.

**खाणखूण**—स्त्री. खूणखाण पहा.

**खाणणें**—सक्रि. खणून काढणें; हत्याराच्या साह्यानें उकरणें. खणणें पहा. ' विञ्च खाणून यमुनेंत टाकीन ' –भाव ३०. ' जरी बहु जनामयद्रुम समूळही खाणिला । ' –केका ४४. २ अजीबात नाहींसा करणें; निर्मूलन करणें. ' रामराम जप जपोनि दोष खाणिला । ' –आप ८. [सं. खन्]

**खाणपद**—न. (गो.) घुमट नांवाच्या वाद्यांतील एक चीज. ' हें वाजतूग झालें कीं खाणपद म्हणा. ' [सं. खंड+पद]

**खाणवट**—स्त्री. चोळीची पाठ. [खंड+पट]

**खाणवें**—न. (गो.) जमीनीवर पीठ सांडूं नये म्हणून जात्याखालीं घालावयाची वाकूची चटई. [खंड]

**खाणाजंगी**—स्त्री. खानाजंगी पहा.

**खाणावळ**—स्त्री. पैसे दिले असतां जेवण मिळण्याची जागा, दुकान; हॉटेल; भिशी; (गु.) विशी. २ तेथील जेवणाबद्दलचे पैसे. ३ सार्वत्रिक, एकवट जेवण (सार्वजनिक भोजनालयांतील). [खाणें+वळ प्रत्यय]

**खाणी**—स्त्री. (खाण याचें लघुत्व) खाण अर्थ २, ४ पहा. १ योनी; जन्म ' बहु या प्रपंचें भोगविल्या खाणी । ' –तुका १५४५. २ उत्पत्तिस्थान, उगम. ' तैसी कर्मजाताचि हे खाणी । ' –ज्ञा १८. ३५२. (समासांत) पाप–पुण्य–गुण–ज्ञान–धर्म–खाणी. [खाण] सामाशब्द– **खाणीचा–खानदानीचा**–वि. चांगल्या कुळीचा, बीजाचा, वंशाचा, पैदाशीचा, कुलवंत. **०पुरळ**–स्त्री. गुजराथेंतील काळसर शेतजमीन. पाऊस पडल्याबरोबर हींत सर्वत्र भोकें पडतात –कृषि १४.

**खाणीव**—वि. खणलेलें, खाणींतलें; खणून काढलेलें. ' खाणीवा घुडिवा तोडीवा। त्रिगुण गुणांच्या सोलिवा । ' –एरुस्व १४.१०४. [सं. खन्]

**खाणें**—उक्रि १ भक्षणें, जेवणें. २ हरामखोरी करणें; गिळंकृत करणें; लांच खाणें; हरामखोरीनें किंवा लबाडीनें आत्मसात् करणें. ३ गिळणें, गट्ट करणें, ग्रासणें; चट्ट करणें ४ घेणें; फस्त करणें (इमारत सामानसुमान संपवितें तसें). ' त्या घरानें हजार रुपये खाल्ले ' ५ सोसणें; सहन करणें (मार, उष्णता, थंडी). ' त्यानें एक छडी खाल्ली. ' ६ आंत घेणें (हवा), ७ घेणें (शपथ), ८ ग्रासून टाकणें, पूर्णपणें वश करणें. (औषध, मनुष्य). ९ पराभव करणें. ' काशीकरानें रगनाथशास्त्र्यास एका क्षणांत खाऊन टाकलें. ' १० गाळणें, टाकणें, सोडणें (बोलण्यांत अथवा लिहिण्यांत अक्षरें) ११ चावणें; डसणें. ' साप खाई पोट रितें ' =दुसऱ्यास चावल्यानें

सापाचें पोट भरत नाहीं. (धुत्रीं, विषारी किरडें, किडे, जिवाणूं यांच्याहि चावण्यास लावतात.तसेंच शारीरिक अस्वच्छतेबद्दल योजतात. 'मळ खातो, उवा खातात, पिसा खातात.'=उवा, पिसा ह्या माझा डोकें (डोकर्णें, डोसकें, शीर) खातात म्हणजे चावतात, त्रास देतात). ११ तोडणें; टोचणें; मनाला बोचणें (पाप,गुन्हा,मन, पाप बुद्धि). 'कीं पापियासि निज पातक जेवि खातें ।' १२ (ल.)कुरतुडणें, इवचणें; तोडणें ( वाईट अन्न, पित्त, मानहानीचें भाषण ). १४ एखाद्या जोखमीच्या कामानें एखाद्याचा नाश करणें; 'या कंत्राटानें त्याला पुरें खाल्लें.' १५ खर्च करणें. 'तूं माझा अर्धा तास खाल्लास १६ मारणें; वळकावणें. 'वजिरानें उंट खाल्ला.' १७ भोगणें, सेवणें ( विसावा, चैन ). –अक्रि. १ भक्षणें; भक्षणें आणि जगणें, अन्न घेणें, घालणें ( भोजन करणें असा या क्रियापदांचा अर्थ होत नाहीं 'जेवणें' पहा ) २ दुखणें ( डोकें, डोसकें, डोई, शीर, माथा, कपाळ इ० ) –अकर्तृक क्रि. (ला. शीं जोडून) कोणी खातो, तोडतो अशी भ्रांत भावना वेदना, होणें. [ सं. खादन; प्रा. खाण, सिं खाइणु; तुल० फा. खाईदन=कुरतडणें ] (वाप्र) खाईन खाईन करणें–अघाशीपणा करणें; खाण्यास धाधावलेला असणें; खा खा करणें. खाऊन ढेकर देणें–दुसऱ्याच्या वस्तूचा अभिलाष धरून ती आपलीशी करणें, गिळंकृत करणें, आत्मसात करणें. खाण्यामुळें हीनशक्त होणें–खाण्याच्या अभावामुळें अशक्त होणें. खाण्यां तुटणें–क्षुधा किंवा पचनशक्ति कमी होणें. खायाप्यायाचे दिवस–तारुण्यातील आनंदाचे व उल्हासाचे दिवस; आयुष्यांतील सुखाचे दिवस जीव-प्राण-खाणें–दुसऱ्यास फार त्रास देणें. दांत ओंठ खाणें–अतिशय रागावणें म्ह० १ खाई त्याला खवखवे (खव खवणें म्हणजे घशात कंड सुटणें यावरून )=जो वाईट काम करतो त्याच्या पोटात तें डाचत असतें असा अर्थ; चोराच्या मनांत चांदणें. २ खाईन तर तुपाशी नाहीं तर उपाशी=मी म्हणेन तें ऐकलें तर ठीक आहे, नाहींतर मी रुसून बसणार असा हट्ट घेऊन बसणें याअर्थी.

खाणें–न. खाद्य; अन्न, खाण्याची वस्तु. ०जेवण–न १ (सरसकट) खाद्यपदार्थ; खावयाचा माल; अन्न. २ खाण्याची क्रिया,भोजन. 'त्या गावात खाण्याजेवण्याची सोय आहे काय?' ०पिणें–न. ( खाणें व पिणें ). १ खाणें जेवणें पहा. २ सुखानें असणें. 'हे त्याचे खाण्यापिण्याचे दिवस !'

खाणोरा-री–वि. १ अधाशी, खादाड, पोटबाबू. 'पुत्र पत्नि बंधु सोयरीं खाणोरीं' –तुगा १५८९. २ चोखंदळ चवीनें खाणारा. [ खाणें ]

खाणोरी. खाणोरीचोर–पु. दरोडेखोर; चोर, घर फोडणारा; काळीजखाऊ. 'मज निद्रिस्थातें खाणोरियें । हृनौनि धाकों. २. ५० नेति' –ऋ ५५. 'दरवडेकरी खाणोरी ।' –दा २.३.३१. 'परिचे घरीं चोरी आपणचि खाणोरी ।' –दावि २३४. खानचोर पहा. [ खाणें ] ०चोरी–खानचोरी पहा.

खाण्णी, खाण्णीभाण्णी–खांजणी पहा.

खात–पुन. १ शेतांत घालावयाचें खत. 'खात मृत भस्म मिळोन । पुन्हा पृथ्वी ।' –दा १५.४.८. २ केरकचरा (खतासाठीं उपयोगी ); गाळसाळ; उकिरडा; मळ, ( कु. ) चिखल. [ खत ]

खात–पु खड्डा; खळी, खाच; बीळ. 'त्या मृत्यूचें खणोनि खात' –एभा २९.२२२. [ सं. खन् ]

खातकाम–न. (व.) लोहारकाम-धंदा. [ खाती=लोहार ]

खातकुली–स्त्री. (गो.) १ गुदगुली. २ (गो.) राजद्रुद्री.

खातकुलांवचें–क्रि. गुदगुल्या करणें.

खातड-ण-र–स्त्री. ( कु. गो. ) १ चिखल, पाणी जमीनीवर ओतलेली जागा. २ उकीरडा. [खात ] ०वासी– उकिरड्यात राहाणारा. 'तुका म्हणे खातडवासी । अमृतासी नोळखे ।' –तुगा ३४८५. खातडांवचें–( गो. ) सुक्या जमीनीवर ती कुंभेपर्यंत पाणी ओतणें.

खातर–स्त्री. (प्रां.) भोंक; भगदाड ( भिंत, कुंपण यांतील ). [ सं. खात=भोंक ]

खातर–स्त्री. १ गुमान, पर्वा; विचार, चिंता ( सामान्यतः निषेधार्थी). 'पैका गेल्याची त्यास खातर नाहीं.' २ खात्री; विश्वास; भरंवसा; निशा 'हा मनुष्य विश्वासु असी आमची खातर आहे.' ३ पसंती; मर्जी; मन. 'आमचे खातरेस वाटेल तें करूं.' ४ विचार. 'स्वामीची खातर जरूर जाणून...' –रा १.१३२. ५ आस्था. 'त्यातही श्रीमंताचे सरकारात या संस्थानची यास खातर अधिक.' –रा ७.३७. ६ सत्कार; मान ७ आश्वासन. ८ (ल.) ( ना. ) मनस्वी त्रास; खोडमोड. 'सायकलीवरून हिंडलों पण माझी चांगलीच खातर झाली.' –शभ. करिता, साठीं. माझ्याखातर' 'त्या खातरहि तें मला कर्तव्यच आहे.'–तोबं २२. [अर. खातिर] (वाप्र ) ०करणें–खात्री करणें; पटविणें; आश्वासन देणें. ०पडणें–आवडणें, पसंत पडणें. खातरस येणें–पसंत पडणें. सामाशब्द– ०खा. खातीरखा–वि. १ स्नेहाचा, चांगलें इच्छिणारा, हितेच्छु(केवळ पत्रव्यवहारात) २ यशस्वी. 'कित्येक उमद उमद मनसुबे खातीरख्वाह होतील.' –रा १.५३. ३ समाधान. 'बहुत खातरखा केली.' –रा १०.२६५. –क्रिवि. १ इच्छेप्रमाणें. 'इंग्रेज पल्टणें पुण्यासमीप आली त्याचें पारिपत्य खातरखा न जालें' –दिमरा १.४०. २ यथास्थित. 'बंदोबस्त ही खातरखा आमचे स्वामी करितील.' –रा १.१३२. ०जमा–स्त्री. १ खात्री, विश्वास; निशा; संशय, आशंका, संदेहनिवृत्ति. ( क्रि०

करणें ) 'एवच दादासाहेब खातरजमेशीं जात नाहींत ' –भाव ८४ २ हिंमत 'एक वेळ रुढाई खातरजमेची यावी ' –ख ११ ६०८४ ३ गुमान, हिशेब, पर्वा –वि स्वस्थ 'तुम्ही खातर० जमा असणें '–रा १५ २१ [फा खातिरजम्अ] ०जामीन-दार–पु खातरीदार पहा ०तसल्ली–स्त्री समाधान 'सर्वांची खातरतसल्ली होऊन जमाव जालाच असेल ' –दिमरा १ ३१ [अर तसल्ली=समाधान] ०दारी स्त्री १ खात्री, हमी (माणूस, चिन्ह यांची) २ विश्वास, निश्चा [फा खातिरदारी] ०दास्त–स्त्री खातरजमा, इच्छा 'त्याची खातरदास्त पुरेल तेथें जावें ' –ख ९ ४५६५ ०नशीन–वि श्रुत –खरे ७ ३५६६ [फा खातिर्निशीन] ०निशा–स्त्री मनाचें समाधान संदेहनिवृत्ति 'अशी माची खातर निशा झाली ' –बाळ २ १६ [फा खातिर निशान]

**खातरा**—पु खातरजमा पहा 'त्यात स्वारी समागमें कार्य भागी याचा खातरा श्रीमतांनीं पुरविला '–ख २ ८१५ [अर खातिरा=विचार]

**खातरा**—पु १ खत २ खाचरा, खळगा, खड्डा, खातर पहा

**खातरी**—स्त्री १ खातर अर्थ २ पहा २ जामीनकी, हमी, खातरदारी, खातरीपत्र (जामिन देणाऱ्या मनुष्यास अथवा वस्तूस लावतात) 'तुम्ही वाणाची खातरी या रुपये घेऊन आ ' **खातरीचा**–वि पसंत पडलेला, मनाला आवडलेला ०दार–वि जामीन हा खातरी देतो, विश्वासुपणाबद्दल शिफारस करतो पण कोणत्याहि प्रकारची जबाबदारी घेत नाहीं ०पत्र–न हमीपत्र शिफारसपत्र, प्रशंसापत्र सर्टिफिकीट ०लायक–वि विश्वसनीय

**खातऱ्या**—वि खातर खणणारा अथवा त्यातून शिरणारा घरफोड्या, खाणोरी [खातर=भोंक]

**खातवट–ड**—पु. उकिरडा 'राधवणी चुलीपुढे पडे उन्मादती खातवडे । ' –ज्ञा ०३ ५६२ –वि १ पुष्कळ दिवस खतावलेली (जमीन) २ खत घातलेलें (शेत) [खात–खत]

**खातवणा**—वि १ (खाणारा) खादाड, पोटबाबू 'पैशास शेर वांगी मागतो मोठा गेला खातवणा !' २ चोपदळ (निदार्या) ३ (राजा) पान, सुपारी, तंबाखू भांग इ० सेवन करणारा [खाणें]

**खाता**—वि खाणारा, भक्षणारा (ग्राम्य) ०जेवता–पिता मरणें–क्रिवि खाण्यापिण्याची ददात न पडता अथवा रोगानें खितपत न पडता मरणें, सुखात, ऐषआरामांत मरण येणें **खाती पिती द्धणें**–(व) न्हाण येणें म्ह० १ खात्याला न खाता देवू शकत नाहीं २ खातीचे गाल आणि न्हातीचे बाल झाकत नाहींत=विद्या, संपत्ति इ० झांकून रहात नाहींत, खरें आहे तें बाहेर आलेंच पाहिजे सामाशब्द– ०**जेवता–पिता**–वि खाऊनपिऊन सुखी खाण्याची ददात नाहीं असा 'खातें जेवतें घर पाहून मुलगी यावी ' ०तीळ–पु खाण्या जोगा तीळ गोडा तीळ ०निंब–पु खावयाचा निंब; कढी निंब **खाते गोते**–वि भोजनभाऊ, आश्रित 'आम्हासारख्या उदड मिळतिल भवताले खातेगोते '–सला ६ **खातेंतोंड**–न खाणारें तोंड, पोसावें लागणारें माणूस (स्त्री, मूल, चाकर) 'माझ्या घरीं दहा खातीं तोंडें आणि मणभर दाणा ' **खात्या नाराचें दैव**–न (सुखी स्त्रियेचें भाग्य) स्त्रियास आशीर्वाद देण्याची एक प्रकारची शब्दयोजना [खाणें+नार+दैव]

**खाताड–डें**—न १ गावाबाहेरील उकिरड्याची जागा, उकिरडा, खातवड २ सरकडें ३ (गो) नासकें पाणी साठल्या मुळें झालेला दुर्गंधिमय चिखल –वि खातवड पहा

**खाती**—पु (व ना) लोहार, घिसाडी 'गावा खातीयें औथें मिळौनि कामठा घालीति । –चक्रधर सिद्धांतसूत्रें ८९ म्हणनी शस्त्र खातियें कलें । '–मुमादि १६ २२३ 'पावकातें, पिटी जैसा खाती । '–ज्ञमुरा १४ ५७ [स क्षत्ता]

**खातीर**—स्त्री १ दिलासा, खातरजमा, खात्री खातर पहा 'मिर्जाची बहुत खातीर केली ' –दिमरा २ ४० २ समजून 'पाटील यावानीं खातीर करून साप्रत ठेवून घेतलें आहे ' –दिमरा २ ३७ खातर पहा –शअ (गो) साठीं, स्तव, कारणें, करितां 'हा पोंद्याचे पाड जिणें पोटाखातीर ध्यौचउणें ' [अर खातिर]

**खातुस**—वि खताचा वास मारणारी (भाजी) [ख–खात]

**खातुस**—वि (गो) आंबट (तोंड इ०) [खट्टा]

**खातें**—न १ रोजकीर्दीवरून तयार केलेला खतावणीवर दिसणारा किंवा खतावणीवरून काढलेला आणि केलेला हिशेब (व्यक्तीचा किंवा काम, धंदा यात घातलेल्या भांडवलाचा) जमा खर्चाची नोंद २ असा स्वतंत्र हिशेब दाखविणारा कागद, वही खतावणी, हिशेबाची वही ३ (ल) टप्पा, पोटोंच, आटोका, आवाका, प्रांत, हद्द (सत्ता, अमल, शासन अंतर्भाव याची) 'किल्ल्याचे खात्यात मुलुख आहे ' 'हा गाव मुंबईखात्याखालीं मोडतो ' ४ प्रांत, कार्यक्षेत्र, कचेरी, काम, प्रकरण, कामाचा विशिष्ट भाग जसें–बिगार–खैरात–खर्च–गाव–मुल्की–लष्करी–पैमाश न्याय–खातें ५ किनखाप किंवा इतर रेशमी कापडाच्या तुकड्याभोंवतीं गुंडाळावयाची दोरी, नाडी ६ खातेदारानें धारण केलेला जमीनीचा तुकडा ७ उधारीचा जमाखर्च, देणें घेणें 'त्याचें आमचें खातें आहे ' [अर खत्त=ओळ, लिहिणें, किंवा अर. खित्ता=मर्यादा, क्षेत्र] (ग्राम्य) ०ठेवणें–देण्याघेण्याचा व्यवहार चालू ठेवणें सामाशब्द– ०दार–पु १ कुळ खेरीज करून दुमाला नसणाऱ्या जमीनीचा प्रत्यक्ष कबजा धारण करणारा याचे दोन

भेद-पहिला, जुन्या शर्तीचा म्हणजे गहाण खरेदी देणें वगैरे हक असणारा, दुसरा नव्या शर्तीचा म्हणजे सदरहु हक नमाणारा. -गांगा १३. २ व्यापाराकडे, धाण्याकडे खातें असणारा; व्यापाऱ्याचें कुळ. ०पोतें-न. (विकत देण्याघेण्याचा) व्यवहार; काम; जमा खर्च. [ खातें=हिशेब+पोतें=पैशाची पिशवी, खजिना ] ०पोतें बरोबर होणें- १ जमा व खर्च, नफा व तोटा बरोबर होणें, तोंडमिळवणी होणें; रमारमी होणें. २ मालमत्तेपासून किंवा मुलांबाळांपासून मुक्त होणें, नागवलें जाणें (चोरांनीं मालमत्ता चोरल्यानें व मृत्यूनें मुलेंबाळें हरण केल्यानें). ०बाकी-स्त्री परस्परांच्या खात्यांवरून हिशेब होऊन देण्याघेण्याचा राहिलेला शेषांश; हिशेबाच्या वहींतील अखेरची शिल्लक (जमेकडील किंवा नावेंकडील). ०मिळवणी-स्त्री. (ताळेबंद काढतांना केलेली) खात्यांची मिळवणी; सदर मिळवणी करण्यासाठीं दाखल केलेली बाब. ०वही-स्त्री. निरनिराळया माणसांचीं खातीं जींत लिहून ठेवलेलीं असतात ती वही. ०धारक-वि. दुकानदाराकडे ज्याचें खातें आहे असा खातेदार.

**खातें**—न. कोनाडा; देवळी. 'तेय पटिमाळेचां पूर्वीली सीरा खातें । तेय गणेशु ।' -भ्र १०६. [सं. खन्=खणणें]

**खातेड**—स्त्री. (गो.) खातड पहा.

**खातेरें**—न. खातर, खाचर. १ घाण, केरकचरा, खत इ० ची रास; गाळ; घाण. 'मोऱ्यांतील खातेरें वगैरे पदार्थांस.' -मगर ३.१७१. २ उकीरडा; केराची खांच. [ खात, खातर ]

**खातोंड**—न. (गो.) घाण पाणी साठलेली जागा, कुंडी, डबकें खातड, खाताड पहा. [सं. खात+कुंडी ]

**खातोर**—शअ. (भिल्ली) करितां; साठीं म्हणून; खातर पहा. 'तिया खातोर बेन आंगलें ती वाडीटाकी '=काठी वाढेल म्हणून दोन बोटें ती तोडून टाकली. -भिल्ली २०. [ अर. खातिर ]

**खात्रड**—स्त्री. (कु.) दलदल; ओल; चिखल झालेली जागा. खातड पहा.

**खात्रा**—खातरी पहा.

**खातसाण**—स्त्री. (गो.) घाण.

**खाद**—स्त्री. १ खाद्य; अन्न; खाणें; भक्ष्य; आहार. २ चांगलें खाणेंपिणें, पौष्टिक अन्न. ३ कुरतुडणें (उंदरांचें); (पक्ष्यांनी फळें) चोंचावणें, टोंचे मारणें. ४ (शेताच्या पिकावर धाड घाल णाऱ्या गुरांचें) अधाशीपणानें खाणें. ५ (गांवकामगारांनीं लोकांपासून) उकळणें; लुटणें; (सरकारी कामगारांनीं) लाच खाणें; चावणें. 'या गावामध्यें पाटलाची शंभर रुपये खाद आहे.' ६ कुरतुडलेला जिनस, चोंचावलेलें फळ, खाण्यानें पीक उकळलेला पैका-माल इ०. ७ जळ (आटवितांना विस्तवानें खाणें). [सं. खाद्य; तुल० फा. खा=(समासांत) चघळणें, कुरतुडणें ] म्ह० १ खाद तशी लात=खाण्यासारखी शक्ति. २ कारकुनाचें लिहिणें उंदिराची खाद=कोणत्याहि व्यवहारांत कारकुनानें काढलेली आपली कमर. ३ खाद आहे तर लाथ आहे. ४ खाद हरी व्याध.

**खाद**—स्त्री. खाज; कंडू. (क्रि० सुटणें). [ खाज ]

**खांद**—स्त्री. (कों. कु.) झाडाची मोठी फांदी. [ खांदी ]

**खांद**—पु. १ खांदा; बाहुटा; (मनुष्य, पशु यांच्या) पाठीचा वरचा, मानेच्या पाठीमागचा भाग (ओझें वाहणें इ० वेळीं उपयोगांत आणतात). 'पालखीला खांद घातला-दिल्हा.' 'खांद आला-सुजला' २ (ल.) सरावानें, अभ्यासानें झालेला राबता, परिचय किंवा संबंध (पाहुण्यांच्या उपद्रवाची). (क्रि० पडणें). 'आल्यागेल्याचा खांद नेहेमींचा' -खरादे. २०१. ३ शेतीच्या तात्पुरत्या कामासाठीं आणलेला बैल; टोणग्याच्या मेहनतीबद्दल द्यावयाचें धान्य, कडबा, भाडें. ४ स्पर्धा; चढाओढ. ५ ओझें वहाण्यामुळें खांद्यास पडलेले व्रण, घट्टा, किंवा तशी स्थिति. (क्रि० पडणें; येणें). 'बैलास खांद आला आहे.' ६ (ल.) आधार; आश्रय. 'खांदु मांडिजे धृती। त्रिविधा जया।' -ज्ञा १८.७३१. [सं. स्कंध; प्रा. खंध] (वाप्र.) ०आवळणें-(चांभारी) चामडें टांगल्यावर उलटें करावें लागतें त्यावेळीं खाल व हिरडा मधल्या भागांत रहावा म्हणून कातडयाच्या मानेजवळ दोरीनें आंवळतात. ०चोरणें-जुंवाखालीं खांदा न देणें, चुकारपणा करणें. याच्या उलट खांद देणें **एखाद्याशीं खांद बांधणें, करणें**-बरोबरी करणें, टक्कर देणें, मारणें; स्पर्धा चालविणें. ०शिवणें-(चांभारी) चामडें उलटें केल्यावर त्याचें एक तोंड उघडें असतें त्यास शिवावें लागतें, तें शिवणें. ०सोडणें-(चांभारी) खांद शिवल्यावर दोरी सोडून टाकणें. सामाशब्द- ०करी-वि. १ तिरडी अथवा प्रेत खांद्यावर वाहून नेणारा. २ (क.) ओझे-करी; खांद्यावरून सामान नेणारा. ०कार-वि. (गो.) पालखी, प्रेत इ० ना खांदा देणारा. ०कुद्दा-चा-पु. १ खांद्यावर भोंवरा असलेला घोडा. २ खांद्यावरचा भोंवरा; घोडयाचें एक अशुभ लक्षण. ०जोड-पु. (माण.) कानाच्या मागल्या बाजूस असणारा एकच भोंवरा. हा (धन्याच्या) धाकटया बंधूस वाईट. ०जोड-स्त्री. ज्याचा खांदा दुसऱ्याशीं जुळतो असा माणूस, जनावर इ०; खांद्यांचा मेळ. ०जोडी-ड्या-वि. खादजोड पहा. ०पाडणें-संवय लावणें. ०ब(प)खाल-स्त्री. खांद्यावरची पखाल 'सांघीजेती चंद्राचा खादवखालीं।' -शिशु ३०६. 'घामाची खांदवखाल।' -भाए ३९६. [सं. स्कंध=खांदा; पयस्+खल=पाण्याची कातडी पिशवी ] ०बटा-पु. खांदा; त्या लगतचा भाग ओझें वाहतांना योजतात. 'माझा खांदवटा दुखून आला.' ०बडा-पु. १ शेतीसाठीं तात्पुरत्या आणलेल्या

बैल वगैरेच्या मेहनतीबद्दलचा मोबदला. खांद अर्थ ३ पहा. २ वरील प्रकारची रीत. (क्रि० करणें). **खांदया**-वि. बैलाच्या जोडीचा. **खांदला**-स्त्री. ओझें वगैरे वाहण्याची क्रिया कांहीं सहन करण्याची संवय, अभ्यास, सराव.

**खांदचोर, खांदयेकर**—पु. घर फोडणारा चोर; खाण-चोर पहा. ०**चोरी**-स्त्री. घरफोडीची चोरी; खाणचोरी पहा.

**खांदडणें**—उक्रि. खांद्यावर घेणें; खांदाडणें पहा.

**खादगी**—स्त्री. १ खाद्य; खनाखोरी. (क्रि० खाणें). २ खाद अर्थ २ ते ६ (थोडयाफार फरकानें) पहा. ३ माणूस, पशु यांचा मेहनतीचा-रोजचा आहार; चंदी; खाण्याकरितां दिलेली नेमणूक, धान्य, पैसा या रूपाची पोटगी. 'खाली खादगी दे आणि बायको घेऊन जा.' 'घोडयानें खादगी खाली ती खावी.' ४ (व.) खाण्याचा सपाटा. 'उंदराची खादगी कळत नाहीं.' [सं. खाद्य]

**खादडखादी**—वि. खादाड; अधाशी. 'बधिरा कुबडा पंगु आरडा खादडखादी बादर छंदी।'—अमृत(पुरवणी) ८. [खादाड+खादी]

**खांदणी बांधणी**—स्त्री. (खोदणें व बांधणें) जुने घरें फोडून त्यांतील माती वेलाला चढविणें. अशानें वेलास आधार मिळतो [सं. खन्-खादणें+बांधणें]

**खादणें**—उक्रि. खाणें. 'मागां बाळपणीं येणें श्रीपती। जैं एकवेळ खादली होती माती।'—ज्ञा ११.१८२. 'पांडुरंगें पाहा खादलीसे रडी।'—तुगा १२१८. [खादन]

**खादणें**—उक्रि. खणणें; खोदणें [सं. खन्]

**खाददळवी**—वि. खादाडांचा सेनापति; पुष्कळ खाणारा; अधाशी, घस्मर. 'खाददळवी याचले.'—ख २७११. [खाणें+दळवी]

**खादनिंदक**—वि. खायनिंदक पहा.

**खादरा**—वि. १ खाणारा; २ (ल.) सोसणारा; भोगणारा. (समासांत) (कुत्सितार्थानें प्रयोग) अफीम-भांग-लांच-खेटर-मार खादरा. [खाणें]

**खांदल(ळ)णें**—सक्रि. डोक्यास विश्रांति देण्यासाठीं डोकी-वरचें ओझें खांद्यावरून नेणें, खांदणें. [खांद]

**खांदा**—पु. खांद. १ बाहुटा (बाहुमूलापासून ग्रीवामूला-पर्यंत) २ जूं ठेवण्याची जनावराच्या शरीरावरील जागा. ३ फांद्या फुटतात तो झाडाच्या खोडाचा भाग. ४ खांद्याचें काम; धाव (खांदकरी लोकांत रूढ). ५ ओझें वाहून नेण्याची पाठीच्या वरची अगर खांद्याची जागा. ६ परिचय, संवयीनें झालेली गोष्ट; झालेला अभ्यास; रावता; सराव. (क्रि० पडणें). ७ (कु.) लांब फांदी (झाडाची). ८ (नाविक) गलबताचा विस्तार कर-ण्यासाठीं रोजाच्या पुढील टोंकास लांकडें जोडतात तीं प्रत्येकी. पडण व खांदे यांच्यावर फळया जोडतात. [सं. स्कन्ध; प्रा. खन्ध; हिं. खांदा; गु. खांदो; हिं. कंधा-कांधा; पं. कन्धा; बं. कांध] (वाप्र.) ०**टाकणें**-(बै.) जुंवास जनावर जुंपल्यानंतर जूं न ओढतां जनावरानें खालीं बसणें. **खांदाडणें**-सक्रि. १ खांद्यावर ओझें घेणें. २ (ल.) एखादें काम अगर जबाबदारी अंगावर घेणें; तोंडणतंटा उकरून काढणें, पत्करणें. **खांदाडीं घालून नेणें**-खांद्यावर वाहून नेणें. **खांदाडीभर**-खांद्यावर मावेल एवढें ओझें. **खांदाडीस बसणें**-१ दुसऱ्याच्या खांद्यावर बसणें. २ (कों.) झाडाच्या फांदीवर जाऊन बसणें. **खांदाडीस मेसा देणें**-पंधुगवाळे आटोपणें. ०**मेसा देऊन काम करणें**-आंगमोडून, झटून काम करणें. **खांदा देणें**-प्रेताला खांद्यावरून वाहून नेणें. ०**येणें**-अति श्रमानें बैलाची मान सुजणें. **खांद्यापालीं पदर**-उंडगी, निर्लज्ज, विनयाचा अभाव असलेली स्त्री (पदर पहा). **खांद्यावर(मेसा, गाठोंड)देणें**-नोकरींतून-कामावरून बडतर्फ करणें; पंधुगवाळ्यानिशीं घालविणें. (डोकीवरचें) **खांद्यावर येणें**-दुस्सह ओझें (कर्ज १० चें) दिल्याघेतल्यामुळें हलकें होणें. **खांद्यास लागणें**-तिरडीला खांदा देणें. सामा‍शब्द-०**खांद**-पुस्त्री. (खांद्याशीं खांदा) स्पर्धा; बरोबरी; तोलासतोल; तोडीस-तोड. **खांदाड**-न. १ मोठी फांदी. २ मोठा खांदा. **खांदाडा**-पु. (राजा.) मोठी फांदी (झाडाची). **खांदाडी**-स्त्री. १ अर्धें पुढें व अर्धें मागें असें खांद्यावर वाहून नेण्याचें पडशी सारखें ओझें खांद्यावर घ्यावयाच्या सोईनें बांधलेलें ओझें. २ ओझें घेतांना खांद्यालाच म्हणतात. 'हजारों जुने पंडित आपापले ग्रंथ खांदाडीस मारून दूरदूर देशीं पळाले.'—नि १०३३. **खांद्याचा बैल**-पु. ओझें वाहणारा बैल.

**खांदा**—पु. (व.) हप्ता; तुकडा. 'कर्जाचे खादे पाडले.' [सं. खंड]

**खांदो-दो**—पु. (गो.) लग्नानंतर पंधराव्या दिवशीं सासरीं व तिसाव्या दिवशीं माहेरीं करण्यांत येणारा लग्नविषयक विधि.

**खादाखाद**—स्त्री. परस्पर कटकट, घासाघीस; एकमेकांना चावणें, खाणें. [खाद द्वि]

**खांदाज-जी**—खादान-नी पहा

**खादाड**—वि. अधाशी, पुष्कळ खाणारा; हांवरा. ०**कुर-कुला-भा(मा,)वसा**-पु. खूप खाणारा. ०**मावशी**-स्त्री.खादाड स्त्री.

**खांदान, खानदान**—पुस्त्री. थोर कुलशील; कुलवान घराणें; कुलीन वंश 'शाबास तुमचे खान्दानाची असे.'—रा ११. १२३. **खानदान, खांदानीचा**-वि. १ कुलीन; चांगल्या घरा-ण्यांतील, कुलांतील, खान्दान. 'बहुत दिवसांचे खानदान लोक होते.'—भाव ११४. २ (ल.) हुशार; चतुर; चाणाक्ष (कारकून, शिपाई). [फा. खानदान]

खांदानी, खानदानी—स्त्री. उच्च, श्रेष्ठ घराणें; कुलीन घराणें. खांदान पहा. 'पुरातन खानदानींतील मनुष्यांचें बहुत प्रीतीनें पालन करीत जावें.' –ऐस्फुले ५४. [फा. खानदान्]

खादिम—पु. (हिं.) नोकर; चाकर. [अर.]

खादी—स्त्री. खाद. १ चांगलें खाणें; पौष्टिक अन्न. २ (ल.) पैसे खाणें; लांच घेणें. 'बाळासाहेब अगदीं जरूरीपुरतेंच इनामदारीचें काम पहात, त्यामुळें नेमलेल्या लोकांत खादी फार चाले.' –हाकांप ११५. –वि. धष्टपुष्ट; खादीचा. [खाद]

खादी—स्त्री. १ जाड, हातानें कातलेल्या सुताचें व हातमागावर विणलेलें कापड. 'परम पवित्र खादी हीच स्वदेशाला संपन्न करील.'–के १६.४.२०. २ (सामा.) साधें, जाडेंभरडें कापड.

खांदी—स्त्री. (गो.) चोरी. ०मारप–चोरी करणें.

खांदी—स्त्री. १ झाडाची फांदी; डहाळी; शाखा. २ खांदा पहा. [.सं. स्कंध; म. खाद] ०देणें–बैल अगर रेडा नांगरटीच्या कामासाठीं मोबदला घेऊन देणें म्ह० (गो.) खांदी मेळली म्होण झाड हुमदंक जायना=बोट शिरकलें म्हणून हात घालण्याचा प्रयत्न करूं नये.

खादीचा—वि. खाऊन पिऊन पुष्ट झालेला, पोसलेला (माणूस; पशु). खादीचें शरीर–न. भरदार, गोंडस, नितळ, पुष्ट, गोटीदार शरीर. [खाद]

खादू—वि. १ खादाड; खाबू; पोटवाबू; पोटपुजारी. 'कार्य करणारे थोडे पण खादू फार.' २ लाच खाणारा; हरामखोरी करणारा. [खाद] ०नंदन–पु. खादाड माणूस. [खाद+नंदन]

खांदेकरी-चाईक—पु १ खांद्यावरून ओझें नेणारा, वाहणारा; हमाल. २ प्रेत वाहणारा; खांदा देणारा. [खांदा]

खांदेपालट—नस्त्री. १ खांदा बदलणें; ओझें एका खांद्यावरून दुसऱ्या खांद्यावर घेणें २ एकमेकांना साहाय्य करणें, देणें [खांदा+पालटणें]

खांदेरी—स्त्री. एक रानझुडप.

खांदेला-ली—वि. १ खांद झालेला; ओझें वाहिल्यानें खांद्यास घट्टा अगर मण पडलेला (पशु, माणूस). २ खांदा देणारा, प्रेतवाहक.

खांदोडा-डी—पुस्त्री. खांदवडा पहा .' कर्ज मिळण्या इतकी पत नसली किंवा कर्ज न काढतां निभण्यासारखें असलें तर ते दुसऱ्या कुणब्याशीं खादोडी करतात '–गांगा १४५

खांदोर—पु एक प्रकारचें गाणें.

खांदोल—स्त्री. खांद्याची बरोबरी (वाहक किंवा बैल यांच्या) [खांदा]

खांदोली—वि. ज्याचा खांदा दुसऱ्याच्या खांद्याशीं जमतो असा (बैल, भारवाहक)

खाद्य—न. खाण्याच्या उपयोगी पदार्थ; अन्न; खाण्याचा जिन्नस; भक्ष्य, भोज्य पदार्थ –वि. खाण्यास योग्य; भक्ष्य; भोज्य; खाण्याचा (पदार्थ). 'तयाचिपरी खाद्याखाद्य। न म्हणे नियानिद्य।' –ज्ञा १८.५६०. [सं. खाद्=(खाणें)–खाद्य]

खाद्या—वि (ल.) खाणारा; सोसणारा; भोगणारा. खादरा पहा.

खांद्या—वि. १ खांद्यावर वाहून नेणारा. २ ओझें वाहणाराचा–विशेषत. प्रेतवाहकाचा–सहसोबती. ३ प्रेतवाहक. [खांदा]

खाद्रम्मा—वि. (कों) खादाड; अधाशी. [खादर+अम्मा]

खान—न. १ खणती 'ईश्वरीं खान घेतलें।' –गीता २. ३४२५. 'स्वहिता घातलें खान।' –तुगा ३२५७. २ खणतीची चोरी. खाणचोरी; घरफोडी. 'मी माझें करीत होतो जतन। भीतरिल्या चोरें घेतलें खान।' –तुगा ३७०. खाणोरी खानचोर पहा. [सं. खन]

खान—न. १ खाणें, खाद्य; अन्न. 'खान पराचें पान पराचें।' –विक ५. २ ताट, थाळा. 'मेजवानी मिठाईचे खाने' –रा ७. २११. [म. खाणें; तुल० फा. खुवान=थाळा]०पोश–पु. तबकावरचें आच्छादन, वस्त्र, रुमाल. 'खानपोश् जदोजी जवाहार–जडीत मोत्याची झालरचे आणून ठेविले.' –पदमव ९७. [फा. ख्वान्पोश्]

खान—पु १ सरदार; अमीर, राजा. २ मुसलमानी पदवी. मुसलमान सरदारास ही पदवी असते. विशेषत. फारसी किंवा पठाणी वंशांतील थोरांना असे. पुढें हलक्या मोंगलांनाहि वापरूं लागले. उ० मीरखान, याकुबखान इ० [फा.]

खानका—पु हिंदूंच्या मठाप्रमाणें मुसलमानांची एक धार्मिक संस्था. 'खानका नांवाच्या धार्मिक संस्था मुसलमानांच्या असतात.' –धका ८२. [फा. खान्काह्]

खानगी—स्त्री. दासी, वेश्या, नायकीण. 'सलाबतजंग ... दोन जनाने, हत्ती व कांहीं खानग्या घेऊन गेले होते.' –रा १. १९७ [फा. खानगी=वेश्या]

खानगी—स्त्री. भोजनाची नेमणूक, शिधा, अन्न वगैरे; उपजीविका; वृत्ति दुसऱ्या अर्थासाठीं 'खादगी' पहा.

खानगी—स्त्री. (कुरीनें) खानदान पहा. वंश, कुळ; विशेषत. पिढीजात आचरण अथवा स्वभावाविषयीं योजतात. –वि खाजगत, स्वत चें, राजाचें 'हा कारखाना खानगीच्या ताब्यांत आला.' [फा खानगी=घरगुती] ०कामदार-कारभारी—पु. खाजगी खात्याचा कारभारी.

खानचोर—वि (शब्दाची व्युत्पत्ति जशी लावण्यात येते तसा तसा अर्थ बदलतो) १ अट्टल, बिलंदर (चोर). [कांहींच्या मतें वरील शब्द खाण=वंश,+चोर असा साधला आहे] २ घरफोड्या चोर;

गुपचुप घर फोडून चोरी करण्याकरितां आंत शिरणारा [फा खान =घर+चोर यापासून साधितात ], ३ खांद किंवा न्यायचोर ( खाण =खाणणें+चोर=घराची भिंत फोडून अथवा खोदून आंत शिरणारा ] हे सर्वसामान्य अर्थ आहेत खानोरीचोर (खणनी लावून चोरी करणारा) पहा दरोडेखोर व गाटमान्या यांच्या उलट

**खानचोरी**—स्त्री घर खणून केलेली चोरी, खाणचोर पहा

**खानजाद-दी, खानजादीचा**—वि गोदान-नी पहा

**खानडोह-हो**—पु खाउ डोह पहा

**खानदान-नी**—खांदान-नी पहा 'निदान खानदान मनुष्य याप्रमाणें कमास येतें ' -भाव १०५

**खानदेशी**—वि खानदेशासंबंधीं ' कन्हाडी कन्हाडी बहु खानदेशी । ' -साहह ६ ४१ [ खान+देश ]

**खाननीस**—पु खानगीकडील कारभारी, चिटणीस [ फा खान=घर+नवीस ]

**खानपटा**—पु कुळ, वंश, कुळी, चिजवट [फा खान=घर]

**खानवटा**—पु खायाचा सांधा ' त्यानें माझा खानवटा दुखविला पण म्यां त्याचा खानवटा उपटलाच ' [ खांदा]

**खानवटा-ठा, खानिवटा**—पु १ उन्हाळ्यांत गुरें बांध ण्यासाठीं वर टाळे किंवा गवत घालून तयार केलेली जागा, २ कोंडण, गोठा कावण, ह्यांत आजारी गुरें वगैरे बांधतात [ फा खाना=घर+वटा प्रत्यय ]

**खानसा**—पु खवय, सराव, ( प्र ) खादसा पहा

**खानसामा**—पु आचारी, स्वयंपाकी, भोजनव्यवस्थापक, बबर्जी [ फा खान्सामान्]

**खाना**—पु १ जागा, स्थान, घर ( समासांत ) तोफखाना दारूखाना, किताबखाना इ० २ लहान पेटींतील कप्पा, खण, पुड ३ घराणें, कुळ ४ खातें [फा खान] ०खराब-बा-पु सत्यनाश ' बददुवा दिल्ही कीं या दोषाचा खाना खराब ' -मदरु १ ११८ ०जंगी, खानेजंगी-स्त्री १ खडाजंगी, भांडण, खणाखणी २ वाताचाली, बाचाबाची ३ गृहकलह, यादवी ' हे सर्व आप सांची खानाजंगी करून ' -दिमरा १ ८८ ' सादतखान तर खानेजंगीत जखमी होऊन दुसरे दिवशीं मृत्यु पावले ' -पेच २२ [फा ] ०जाद-वि दासीपुत्र, लेकवळा ' फुलाजीचा खानजाद तुळाजी ' -रा १७४ [फा खाना+झाद् ] खान तलाशी-स्त्री झडती [ फा खानातलाशी ]

**खानेसुमार-री**—स्त्री १ गांवांतील माणसांची, घरांची इतर गोष्टींची गणती, मोजणी, शिरगणती ( क्रि० करणें ) ही गणती साधारणतः दर दहा वर्षांनीं होते यावेळीं सांस्कृतिक पाह णीच्या अनेक गोष्टी नमूद करण्यात येतात २ गणतीचा आंकडा नोंद, शिरगणतीचा तक्ता, नोंद ३ शेतीसंबंधीं ( गुराढोरांची ) गणती ४ सरकारी नोंद (घरें, माणसें इ० ची ) [ फा खाना+ शुमारी ]

**खानोटा**—पु घराणें, कुळ, खानवटा पहा

**खानोरीचोर**—पु १ घरफोड्या खानचोर पहा (कांहींच्या मतें हा शब्द 'खाणें' या पासून झालेला, यावरून) खाण्यापिण्याच्या पदार्थांची चोरी करणारा, किरकोळ चोऱ्या करणारा ( हा व खांडखोड, न्यायरीचोर इ० अनेक शब्द अनिश्चितार्थी योजितात

**खॉस, खॉणी**—न ( गो ) भट्टी [ पो फोर्नो, इ फर्नेस]

**खापी, खापीभापी**—खांजणी, खांजणीभांजणी पहा

**खा(खां)प**—स्त्री १ रास, छीन, छुबी ( तपासूनी किंवा विळ्याच्या घावांची ) २ माडाच्या किंवा तसल्या इतर झाडावर चढण्यासाठीं त्याच्या खोडाला पाडलेली खांच, खालवट ३ फोड, काप, फाक ( फळाची ) ४ खांड, लहान तुकडा ( सुपारीचा ) ५ घट्ट तोळा, वडी ( सांखळलेल्या रक्ताचा, ओल्या खजुराचा, दही किंवा दूध यांचा ) ६ लहान ढलपी, तुकडा, खपला ७ (गो.) कणसें ठेवण्याच्या उपयोगी पडणारा खळगा [ स क्षप् ? म काप] ०कडी-स्त्री सुपारीचीं शिजवलेलीं खांडें, खापा, कांचऱ्या

**खाप, खापटी**—स्त्री. (गो ) लहान, चपटा कांटेदार मासा -मसाप ३ २४७

**खापटी, खपटी**—स्त्री १ गुळाची थापटी, लहान पोळी, कान्हवला २ ( सामा ) एखाद्या पदार्थाची थापटी, वडी

**खापट्टल**—न ( गो ) लहान खापटी

**खापणें**—उक्रि १ खापणी करणें २ वरून दडपण ठेवून दाबणें ( कापसाचे गठ्ठे, गवताचीं ओझीं, पेंढ्या इ० दबला जाणारा माल ) ३ ( क ) उभ्या तोडणें, निमुळतीं करणें, तासणें (टेकडीच्या कडा, बाजू ), खरडणें [ खाप ]

**खापणी**—स्त्री १ सरकारसारा, दंड, खंड, पट्टी, गांवखर्च इ० संबंधीं जो पैक्याचा ठराव त्याची कुळांवर केलेली हिस्सेवारीची वाटणी २ त्या वांटणीचा प्रत्येक वाटा ३ खोडावर खांचा पाडणें, करणें खाप अर्थ २ पहा [ खापणें ]

**खापर**—न १ धान्य भाजण्यासाठीं, भाकरी, खापरपोळी करण्यासाठीं उपयोगांत आणावयाचें रुंद उतरतें किंवा चपटें मातीचें ताट, परळ इ० २ मडक्याचें खालचें अर्धे ( शिजेसाठीं, शेगडीसाठीं) 'नाचतया पुण्यगिरी । चिद्भैरवाच्या खापरीं । ' -ज्ञा १८ १०४० ३ (प्रसंगविशेषीं सामा ) कोणतेंहि भांडें (धातूचें, मातीचें-घागर मडकें वगैरे ) ४ (स प्रा ) श्राद्धांतील पिंडदानासंबंधीं सामानानें भरलेलें टोपलें ' पिंडदान साहित्याचें टोपलें घ्यावें लागतें त्यास खापर म्हणतात ' -तीप्र १३० ५ मडक्याचा एक तुकडा ' येमपुरी नागवी केली । खांडीं खापरा सकट । ' -शिशु १६१ ' कीं नामें स्पर्शमणि स्पर्शे परि काय

करिल खापर मी।' –मोरुशयरत्न माला (नवनीत पृ ३५१) ६ (व) कौल (घरावर घालण्याचे) ७ (बायकी) नापसत व्यक्ति, विन किमतीचा माणूस (कित्येकवेळां हा शब्द निरर्थकपणेंहि उपयो गांत आणतात) ८ अपयश ९ डोक्याची कवटी [स खर्पर, प्रा खप्पर, हिं प खप्पर, उरि खपरा, व खावरा] (वाप्र) ०डोक्यावर-डोईवर-शिरावर फोडणें-दुसऱ्यावर आप राध, आळ घालणें, एखाद्या निरपराध्यावर दोष लादणें ०डोक्यावर फुटणें-विनाकारण अपराधी होणें, दोष येणें ०डोक्यावर येणें-संकटात येणें –तांत मुतून तोंड पहा– फजिती झाली असताहि फुशारकी मारणारास म्हणतात सामाशब्द– ०खु(खुं)टी–स्त्री मडक्याचा तुकडा ०तोंड-ड्या–वि निपण तूचा मुलगा, मूळपुरुषापासून सहावी पिढी (निंदार्थी प्रयोग), त्यावरून दुर्दैवी, दळभद्र्या, पाढऱ्या पायाचा, काळतोंड्या [खापर पणत्वड] ०पणजा–पु पणजाचा आजा, निपणजाचा बाप, चालूपिढी पूर्वीचा सहावा पुरुष ०पणतू-पणतोंड-पण त्वंड-पुन निपणतूचा मुलगा, पणतूचा नातू ०पोळी–स्त्री तांदुळाच्या पिठाची, खापरावर भाजलेली पोळी, घिरडें ०पोळें– न पोळी करण्याचें खापर ०सूत–न (सोनारी) एक धातु, एक काल्पनिकधातु, जस्त 'तांबें आणि खापरसूत। येकवटली असे घात। तयाचा मृत्तात। पितळ होय॥' –कालिका पुराण २८ २१ ०सुती–वि खापरसुतानें केलेला दमडी इ० पदार्थ –राची घागर–स्त्री मातीची घागर, कुंभ खापऱ्या–वि १ दुर्दैवी, भद्रकपाळ्या, क्षुद्र अशा अर्थानें अनियंत्रितपणें योजतात 'म्हणे खापऱ्यासी पडली गाठी। आता नव्हे सुटी सर्वथा।' २ (कु) शिंदीचें (माणसाचें) पिशाच खापरी २ पहा ०काळजाचा– वि (गो) चांडाळ वृत्तीचा –खापरासंबंधीं ०नारळ–पु पातळ दळाचा, खोबऱ्याचा नारळ

खापराळ—स्त्री (कों) केळीची एक जात

खापरा—स्त्री १ मडक्याचा तुकडा, खापर अर्थ ४ पहा 'परिस स्वर्णत्व तें न दे खापरिस।' –मोकृष्ण ४७९१ २ (ल) पायरीचा चापट कठिणपणा ३ (ना) चैत्री पौर्णिमेला दवीला ज्या मातीच्या पात्रात तेलात भिजविलेल्या चिंध्या पेटवून ओवाळतात तें पात्र, खापरी ओवाळण्याचा विधि ०चोर, खापऱ्याचोर–वि १ (कों) अट्टल चोर, बिलंदर चोर २ हलक्या चोऱ्या करणारा, बारीकसारीक वस्तु (खापरीसारख्या) चोरणारा, खिशात टाकणारा, खानोरीचोर पहा

खापरी—पु (गो) (निंदाव्यंजक) नीग्रो, काफरी लोक 'आफ्रिकेंत खापऱ्यानी सुरू केलेलें बंड –सह्याद्री १६२ [पोर्तु काफ्रे, अर काफीर]

खापरेपण—न (गो) निष्ठुरपणा, निर्दयपणा

खापरोळी—स्त्री (हेट कु) खापरपोळी

खापलणें—उक्रि १ तोडणें, छाटणें, जोरानें छेदणें, शस्त्रानें तोडणें २ सप्पा उडविणें, कापून काढणें (सैन्य) [खापणें, खाप खापर?]

खांपा—(गो) १ धाडसी, निष्णात २ नावाजलेला ३ बिलंदर पूर्णतेस पोंचलेला

खॉपॉ—पु (गो) खोपा, आगवळ ०भरप–वेणींत फुलें भरणें

खापार—न (कु) खापर पहा

खापी—स्त्री (गो) सरंग्यासारखी एक ल्हान जातीची पांढरी मासळी

खापुलें—न (गो) खापरीण (निग्रो) स्त्री

खापेकड—न (कों) रहाटगाडग्याच्या माळेमध्यें लोटे बांधण्यासाठीं सुमारें दीड वीत लांबीचे जे लाकडाचे तुकडे घाल तात ते प्रत्येकी ह्याला दोन बाजूस दोन व मध्यें सारख्या अंतरावर दोन अशा चार खापा असतात बाजूच्या खाचा खापेकड माळेंत अडकविण्यासाठीं व मधल्या शिकारी अडकविण्यासाठीं असतात बहुधा खापेकडें सागाचीं करतात [खाप+स काष्ठ]

खांब—पु १ इमारतीचा भार सहन करणारें, उथळ्यावर उभे केलेलें अगर जमिनींत पुरलेलें लाकूड, स्थूणा, सोट, स्तंभ, धीरा, आधार २ (ल) केळीचा खुंट ३ (ल) घरातील किंवा समाजाचा नेता, कर्ता पुरुष, आधारभूत गोष्ट 'अवघ्या लोकानीं हिंमत टाकिली खांब बुडाला दौलतीचा।' –ऐपो १३४ (समासांत) –घुसळ–मलखांब ४ (ओतकाम) समईचा मधला भाग ५ (बीडकाम) चरकाच्या दोन्ही बाजूच धिरे [स स्तंभ, प्रा खंभ, का कंब्रु] (वाप्र) खांबाला डीक पाहणें–अशक्य गोष्टीची अपेक्षा करणें उदा० कद्रू माणसापासून द्रव्याची अपेक्षा करणें, गारगोटीपासून दुधाची इच्छा करणें सामाशब्द– ०खांबोळी– स्त्री मुलांचा एक खेळ ह्यात सर्व मुलें एक एक खांब धरून राहतात व पुढें एकमेक आपापला खांब सोडून दुसरा पकड तात, ह्यावेळीं मध्येंच चोर झालेल्या गड्यानें दुसऱ्याला पकडलें तर तो (पकडला गेलेला गडी) चोर होतो खांबट–न ल्हानसा खांब, किरकोळ, भक्कम नव्हे असा खांब, वासा खांबणी, खांबला खांबली, खांबुला, खांबा–स्त्रीपु १ (राजा) घर इ० चे पोटमाडणीचे जे ल्हान खांब ते प्रत्यकीं, दुवळकें, कामेरा २ आखुड पुरलेला खुंट 'खपरेल करावयास खांबण्या ओमण इतकें सामान लागतें' –मराठी ३ रें पुस्तक पृ ६२ (१८७३) ०सूत्र–न खांबसूत्राचा खेळ, कळसूत्री बाहुल्यांचा खेळ 'संसार म्हणजे खांबसूत्र। चौऱ्यांशी लक्ष पुतळ्या विचित्र। त्याचा सूत्रधारी ईश्वर। त्याचिया इच्छे

' वर्तिजे।' –एरुस्व १२.२४. 'खावसुत्रींची बाहुली। तेणें पुरुषें नाचविली।' –दा ८.१.१०३. ०सूत्र पुतळी–स्त्री. कळसूत्री बाहुली चालविण्याचा खेळ व ती पुतळी. ०सूत्री–वि. १ कळसूत्री बाहुल्यांचा खेळ करणारा. 'नाचती जैसा खावसुत्री। अनेक तन पुतळ्या नाचवी यंत्रीं।' –एरुस्व ११.६४. 'तुका म्हणे दोरी खावसुत्र्या हातीं।' –तुगा ३८१३. २ खावसूत्राबद्दल.

खावगा—पु. शय्यागृह; निजण्याची खोली. 'बाहे सुंदर खावगे नवगजा सिद्धाच होत्या परी।' –सारुद ३.४५. खावगा पहा. [फा. ख्वाबगाह्=शय्यागृह; तुल० सं. स्वप्-स्वाप+गृह]

खावड—वि. उंचसखल. [हिं.] ०खुबड–वि. खाचखळग्याची; चढउताराची (जमीन).

खावंडी—वि. एक प्रकारचें भात, तांदुळाची एक जात.

खावरी—स्त्री. (व.) दुगल्यासाठीं वापरावयाचें मातीचें मडकें. [खापरी]

खांवला—पु १ लहान खांब. २ (विणकाम) गोमीच्या मध्यें जे तांबडे अगर हिरवे तार असतात ते प्रत्येकी. [खांब]

खांवली—स्त्री. १ लहान खाब. २ (गुऱ्हाळ) वाईनसळां तून जमिनींत निघून गेलेल्या व वाईनसळास हालूं न देणाऱ्या खुंट्या-मेखा; चरकाचें दाखन व कायवट यांना जोडणारा भाग.

खावान—न. बागेंतील फुलाचा ताटवा; वाफा. [फा. खायबान]

खांबी—वि. (गो.) खांदा मारणारा, देणारा.

खावू—वि. १ पोटवानू; खाखा करणारा; खादाड; अधाशी; खाणोरी. २ पैसे खाणारा; लांच घेणारा. [खाणें]

खांवो—पु. (गो.) खळ्यातील मळणीचा खाब; तिवडा. (मव.) खावे. [खांब]

खांवोटी—स्त्री. लहान खांब; खाबट पहा. [खांब]

खांवोळ-ळी-ळें—नस्त्री. १ भिंतींतील खाणासाठीं ठेवलेली जागा. २ उत्सव वगैरे समारंभाच्या मंडपातील खांबास आच्छादावयाचें वस्त्र. ३ तुळईखालच्या खांबाच्या टोकावर दोन आडव्या लांकडी तुकड्यांची + अशी मांडणी; चाफा; टिरवें. [खांब+ओळ]

खाव्‌गा—पु. शय्यागृह. 'खाव्‌गामध्यें नवाब बरामद आले.' –रा ७.८३. [फा. ख्वाब्गाह्; खावगा पहा]

खांब्या—वि. खळ्यावर मळणी करीत असणाऱ्या बैलांपैकीं तिवड्याजवळचा, पहिलाच बैल. [खांब]

खांब्याखुरान—वि. (गो.) हाडापेरानें. [खांब+खुर]

खामखा-माखा, खामखास-माखास, खामाखाम-खाय, खामोखाम-य—क्रिवि. खचित; नक्की; खात्रीन, निश्चयानें; कांहीं झालें तरी; इच्छा असो नसो; जरूर; मुद्दाम; हटकून; (मुद्दामें) हमखास. 'जो स्नेहकार्य-मनुष्य मनुष्य संपादणें तें कार्य खामखा करावेंच करावें.' –रा ८.१७५. 'येऊन खामखा येके मोर्चावरी या चौ रोजांत ...' –पेद ३.१८. [फा. ख्वाह्‌म ख्वाह्]

खामतमा—स्त्री. फाजील हाव. –चित्रगुप्त ८. [फा. खाम्‌तमअ]

खामन(ण)खुजा—वि. खुटगा; खुजा; ठेंगणा. [सं. क्षाम; प्रा. खाम=क्षीण, दुर्बळ. तुल० फा. खाम्=अपक्व+मन्+खुजा!]

खामपट्टी—स्त्री. एकंदर गांवांतील शेतजमिनीवर सरकारनें बसविलेल्या ठाकळ शेतसाऱ्याची वांटणी; कुळवार वांटणी. [फा. खाम्=कच्ची+पट्टी]

खामसा—पु. (गो.) जार.

खामी—स्त्री. १ तोटा; नुकसान; घस; उणीव (व्यापार इ० मध्यें). 'आज सतरा वर्षें सुदावंत त्याची खामी करवितात तरी मोडत नाहींत.' –मराचिथोशा ५६. २ (गु.) दोष; व्यंग; अपराध. ३ (व.) लाज; शरम; कमीपणा. 'मत.पर पादशाहीस खामी आली.' –चित्रगुप्त ३४. ४ वाईट अवस्था; दवघाई. 'बिन्मुख होऊन श्रीमंत आगिले चंदुकडून खामींत।' –ऐपो ३९८. [फा. खामी=नुकसान]

खामोश—क्रिवि. १ स्तब्ध; शांत; अचल. 'नवाब निजाम अलीखां व भोंसले ताहाल (अद्याप पर्यंत) खामोश याचा सबब काय न कळे.' –रा १०.१८२. [फा. खामोश्] ०करणें–शांत राहाणें; शांति राखणें. 'तेसमयीं बाजीराव याणीं खामोश करून आपले खाजगत डेन्यांत गेले.' –होके ३. खामोशी–स्त्री. स्तब्धता; शांतता. [फा.]

खाय—स्त्री. १ खाडें; खड्डा; खाच. २ अळावा. [सं. खाति; प्रा. खाइ]

खायखाय—स्त्री. खादाडपणा; वखवख; खाखा होणें (भुकेनें व्याकूळ झाल्यास म्हणतात). (क्रि. सुटणें; येणें; मोडणें; होणें). २ (ल.) (खान.) खोडकी; खोड. [खाणें] म्ह० (व.) खाय खाय मसणा जाय. =अधाशाला म्हणतात खायला उठणें–एखाद्यावर हल्ला, गहजब करणें. [खाणें]

खायनिंदक—वि. कृतघ्न; खाल्ल्या घरचे वासे मोजणारा; बेइमान. [खाणें+निंदा]

खायला-लो—वि. (राजा. कु.) खालचा; तळचा; बुडाचा.

खायलाटी-टी—स्त्री. (राजा.) खलाटी

खायरा-यिर—वि. खाणारा. 'रामा! ते कपि सत्वहीन असतां पालाफळें खायरीं।' –निमा १.५०. [सं. खाद; प्रा. खाअ]

खायी—स्त्री. खाच, खंदक. खाय पहा. खायींत उडी टाकणें–संकट ओढवून घेणें.

खार—पु १ लवण, मीठ ( खनिज अथवा वनस्पतिजन्य, स्वाभाविक अथवा कृत्रिम ); संचळ, सैंधव, सजागी, तुरटी इ० क्षार. २ अघाडा, माठ, पोकळा इ० वनस्पती जाळल्यावर राहिलेली राख भिजवून तें खारवणी गाळून त्याची वाफ करून काढलेला अशुद्ध क्षार. ३ खारटपणा. ४ लोणच्यांतील द्रवरूप पदार्थ. 'झोंबतो मर्मि जसा बहु खार.'–कमं २.५६. ५ ( ल ) खरानी; नुकसान; तोटा. –स्त्री. १ आंब्याचा मोहोर, धान्याचीं फुलें इ० जळून जाण्यासारखें अभ्रावून पडणारें दंव. खारी धुई ( क्रि० येणें, पडणें ). २ हवेंतील अतिशय गारवा; धुई; वादल हवा ( क्रि० सुटणें; पडणें; होणें ). ( खार ही वामळेपासुन भिन्न आहे, वामळ हिंवाळा व पावसाळा यामध्यें मोठा पाऊस पडल्या नंतर पडते आणि खार फक्त हिंवाळ्यातच पडते ). ३ क्षारापासुन येणारा ओलसरपणा, दमटपणा, लोणा ( भिंतीवर, जमिनीवर ). ४ खर; पावसाच्या शेवटीं संध्याकाळीं आकाशांत दिसणारे तांबडे ढग. ५ समुद्र हटवून, हटून मिळालेली जमीन, खारट; खाजण. ६ खारी दलदल, जमीन, भाताची खारी जमीन ७ ( ल. ) तोटा; नुकसान. –न. १ सुकविलेले खारे मासे. २ (गो ) शेतास खत मिळण्यासाठीं समुद्राचें किंवा खाडीचें शेतांत साठविलेलें पाणी. –वि. खारट; क्षारयुक्त [ सं क्षार; प्रा. खार ] ( याप्र ) ०खाणें–(ना.) द्वेष करणें; पाण्यांत पाहणें. खारणें–अक्रि. क्षारयुक्त होणें; क्षारानें विकृत होणें (जमीन, शेत), लोणचें इ० च्या अंगीं मीठ इ० चा क्षार मुरल्यामुळें त्यानीं क्षाररसविशिष्ट होणें. '–सक्रि क्षारयुक्त करणें. ०पाडणें–( कों ) समुद्राच्या भरतीखालील जमिनी शेतीच्या उपयोगी करणें. ०लागणें–पडणें–लावून घेणें–१ नुकसान होणें, संकट येणें, चट्टा बसणें 'आपल्या या शहाणपणामुळें आज आमच्या खिशाला चांगलाच खार लागला.' २ कालिमा येणें, शितोडा उडणें. ०लावणें–नुकसानींत आणणें सामाशब्द–०कट–वि. १ खारट, क्षारयुक्त २ (ल ) खुनशी; मत्सरी, आकसखोर ( माणूस ) ०जमीन–स्त्री क्षारयुक्त जमीन; खारवट जमीन खारगें–न ( नंदभाषा ) मीठ 'खारग्याशिवाय कोणतहि पदार्थ गोड होत नाहीं' खारट–वि. क्षारयुक्त. '' खारट खारट मीठ, खारट घोट ' =अतिशय खारट. –न. खाजण. खारट तुरट–वि १ थोडेसें खारट व थोडेसें तुरट; चवदार, रुचकर, स्वादिष्ट ( खाद्य ), २ थट्टेचें, विनोदपर, चुरचुरीत ( भाषण, निबंध ) ३ पाणीदार, निश्चित, दमदार (कृत्य, वर्तन) खारटाई–स्त्री खारटपणा खारटाण–वि. खारट जमीन. खारणी–स्त्री ( क. )( सोनारी ) क्षाराच्या साहाय्यानें तयार केलेलें, चांदीत मिसळावयाचें हीण. 'चांदींत खारणी मिसळलेली नाहीं.' ०वट–स्त्री. खारीजमीन; खाजण. –वि. खारट (जमीन, शेत ) ०वडा–पु कुरडया घालून राहिलेला जो चीक त्याचे घातलेले सांडगे, वडया. ०पाणी–न. खारट पाणी. ०वांगी–स्त्री. खाजणांत होणारें वांग्यांचें झाड; व त्याचें फळ. खारवांगें. ०संध–पु ( सोनारी ) धातूंना सांधावयाचा डाक; क्षारमिश्रित कस्तूर. ( खार+सांधा ) ०सळई, सोळी–स्त्री. खारसंध घोटण्याचा दगड, डाक देण्यासाठीं टाकणखार उगाळण्याची सहाण ०स्तान–न. ( गो. ) खारटपणा.
दाको. २. ५१

खार—स्त्री. एक जनावर; चानी; खडी. [ प्रा. खार ] –पु सापाची एक जात.

खारकी बोर—न. ( ना. ) खारकेएवढे बोर; नागपुरी, पेवंदी बोर.

खारखंडा—पु. ( निंदेनें ) खाजणांतील शेती करणारा वर्ग. [ खार+खंड ]

खार(री)ज—वि बाहेर; हद्दपार. –रा १०.२२. [ अर. खारिज् ]

खारडें—न. ( चांभारी ) करडाचें कातडें.

खारवा—पु गुजराथेंत होणारें, गडद लाल रंगाचें कापड, खादी. याचा गादी, उशी इ० करण्याकडे उपयोग करतात. [ हिं खारुआ; फा. खारा=एक प्रकारचें कापड ]

खारवा-वी—पुस्त्री. नावाडी ( एक हिंदु जात व तींतील व्यक्ति); हे नावाडयाचें, घरें शाकारण्याचें, आगरें करण्याचें इ० कामें करतात. २ (गो ) कोळी; गाबीत. [फा. खार्वा] म्ह० खारवी गेला पोंय आबा वाढून थय.

खारवी—वि खारव्या ( कापडा, रंगा ) संबंधीं.

खारवीणशी झगडप—क्रि. ( गो. ) मासळीवालीसारखें लाज-लज्जा सोडून मोठयानें भांडणें.

खारवें—न. खारव्या रंगाचें लुगडें, अलवण.

खारस्ता-स्ती—वि. खाष्ट, तुसडा, निंदक. [फा खारिस्त]

खारा—न ( खान ) लोणचें ठेवण्याचें विशिष्ट आकाराचें मडकें –वि. १ खारट २ खाजणात तयार होणारें ( भात ). ३ खारट पाण्यात जगणारा ( मासा ), ४ खाडीवरून, खाजणावरून वाहणारा (वारा) ५ जड, क्षारयुक्त (पाणी) [खार] ०वारा–पु. दिवसा समुद्राकडुन जमिनीकडे वाहणारा वारा.

खाराईत—पुस्त्री. गुजराथी रंगाऱ्याची एक जात व तींतील व्यक्ति, खारवा करणारा 'गुर्जर रंगारी खाराईत ।' –भवि ८०. ६४.

खारांऊ-व—न शेंदरी, हलक्या किंमतीचें, तांबडें सुती, लुगडें–कापड, खारवा पद्धा.

खाराखीर-खिरी, खाराखेर-खोर—स्त्री. १ बारीक तपास, छडा, पाहणी, बारीक चौकशी; सामान्यत रिकामपणाची, वाईट हेतूनें केलेली चौकशी; रिकामी उठाठेव २ क्षुल्लक

गोष्टीबद्दल दुराग्रह; तक्रार; घासाघीस, ओढाताण; वादविवाद; बारीक कीस काढण्याचा वादविवाद; विनाकारण दोष काढणें; छेडणें; खोचून बोलणें; चिरडीनें, तुसडेपणानें बोलणें; भाडफाटे फोडणें. ३ असमाधानाची चडफड; कांहींहि पसंत न पडणें; मनींस येण्यास कठिण. ४ चोळणें, उडविणें इ० कारणानें मालाची होणारी दुर्दशा. 'तूं माझ्या मालाची खाराखिरी करूं नको.'

**खाराण**—न. ( गो. ) उन्हाळ्यांत विहिरींतील पाणी आटल्यावर हातराहाटाचा पोहरा भरून येण्यासाठीं विहिरींत पाडलेलें डबकें [सं. क्षर्]

**खाराणी**—स्त्री. मुतेरें; मुतलेलें वस्त्र. 'कन्हणी एक निजला असे । तो आतुर्णी मुती । मग स्वामीचेनि भ्रमें म्हणे मी दारां गेला ... चडला तव लटकें । खाराणी ती साचः तें धुतलियावीण न फिटे।' -चक्रधर सिद्धांतसूत्रें ५१. [ खार ]

**खारावणें**—अक्रि. १ क्षारयुक्त होणें; खारें होणें. २ खाडी, खाजण यावरून वाहणाऱ्या वाऱ्यामुळें डोळे तांबडे होणें. [खार]

**खारी**—स्त्री. एक मेली माप; १६ द्रोण; खंडी. [सं.]

**खारी**—स्त्री. एक जनावर. खार पहा.

**खारी**—स्त्री. १ अभ्रें, मळभ, हवेंतील गारवा; थंडाई; सर्दी; ( क्रि० सुटणें; पडणें; येणें ). म्ह० ( व. ) १ आभाळाला आली खारी अन उद्योल म्हणते मी कामाची झाली ? २ घाण्यावर टाकण्यासाठीं वापरावयाची चिवळट माती; चिकणमाती, हिच्यामुळें घरांत पावसाचें पाणी गळत नाहीं. ३ ( व ) गांवाच्या जवळचें शेत; खारी जमीन.

*खारी—स्त्री. ( नेमाडप्रांतीय ) गुरांचा एक रोग, पायखुरी, लाळ.

**खारी**—स्त्री. (बाग ) थाळा.

**खारी**—स्त्री ( बे. ) ( गुऱ्हाळ ) रस कढवितांना तो हलविण्याचें लांकडी अगर लोखंडी कलथ्यासारखें साधन.

**खारीक**—स्त्री. १ अपक्व स्थितींत वाळलेला खजूर, ह्याची झाडें रुक्ष व थंड प्रदेशांत (अफगाणिस्थान, अरबस्थान येथें) होतात फळ वाळलें म्हणजे खारीक होतें. वरील कवच गोड व पौष्टिक असतें. आंतील बीं औषधी असतें २ रानटी खजुरी.

**खारीक**—पु खाजणांत धान्य पिकविणारी, आगरी जात व त्या जातींतील व्यक्ति; खारपाटा पहा. [ खार ]

**खारीज**—वि. ( हिं. ) काढून टाकलेला; बडतर्फ; फेटाळलेला, बहिष्कृत; नष्ट. ( क्रि० करणें ) 'अबदालीस खारीज केलें आहे.' -दिमरा २७७. 'नोकरीवरून खारीज केल्याबद्दल बादशाही फर्मान निघालें.' -बन १८५७. २१४. [ अर. खारिज्=बाह्य ]

**खारीज**—पु. ( गो. ) काल्वा; मोठा पाट.

**खारी धुई**—स्त्री. खाऱ्याधुक्याचा थेंब; दंव; खारा अर्थ ५ पहा.

**खारी पुरी**—स्त्री. १ तिखटमिठाची पुरी. २ मेवेदार सलोनी, मांसाच्या पुरीचा एक प्रकार. -गृशि २.१९.

**खारी माती**—स्त्री. १ समुद्रकिनाऱ्यावरची, खाजणांतील माती. २ (लिलांव) लिलांव केलेला जिन्नस (ह्याचा एकदां लिलांव झाल्यावर तो हलक्या किंमतीचा असला तरी परत घेतला जात नाहीं यावरून) माळावरचा धोंडा पहा. ३ ( समुद्रांत ) फुटलेल्या गलबतांतील वहात आलेला माल, जिन्नस ४ लोणा आलेली जमीन. ५ क्षारयुक्त म्हणून नापीक झालेली शेतजमीन. ६ शाडू; धान्यावर घालावयाची माती; बरण्या वगैरे चिनीमातीचीं भांडीं जीपासून करतात ती माती.

**खारीव**—वि. १ खारलेलें (लोणचें, जमीन इ०). २ क्षारयुक्त; खारट [ खार ]

**खारू, खारेडी**—स्त्री. खार; खारोटी; चानी.

**खारें**—न. खार. १ ( कु. गो. ) खारावलेली मासळी. २ शेताचा कस वाढण्यासाठीं त्याला बांध घालून त्यांत समुद्राचें पाणी खत म्हणून घेतात तें. [ खार ]

**खारेपाट**—पु. (कों.) समुद्रकांठची खारवट जमीन; खाजण.

**खारें मीठ**—न. खाणींत सांपडलेलें मीठ; हें समुद्राच्या पाण्यापासून तयार होणाऱ्या मिठाहून निराळें असतें.

**खारोड्या**—स्त्रीअ. (व.) बाजरी भाजून, भरडून तींत मीठ, तिखट घालून भजांप्रमाणें केलेल्या वड्या (थालीपिठाप्रमाणें). [ खार+वडया ]

**खारोणी**—न खारें पाणी. -वि. ( ना. ) खारें; खारट. [ खार+पाणी ]

**खाल**—स्त्री खाल १ चामडें, अंगाचें कातडें; साल. (मराठींत क्वचित प्रयोग, फक्त मारणें, छडीनें मारणें यासबंधांत योजतात ). ( क्रि० काढणें ). 'वैराग्याची खाली काढिली।' -ज्ञा १.२५१ 'खाल काढून टाकिती। या नांव आदिभूतिक।' -दा १.७.७१. २ जनावराचें कातडें. [सं. खल्ल; प्रा. दे. खल्ला=चामडें; गु हिं. खाल; सिं. खल]

**खाल**—स्त्री. भोंत, खोळ. 'इया शृंगारूनिया खाला। मांडिलियां पैं।' -ज्ञा११.४६५

**खाल**—क्रिवि. ( राजा. ) खालीं; अधोभागीं. ( वाप्र. ) ०च्या मानेनें **चालणें-पाहणें**-नम्र, विनयशील, मर्यादेनें वागणें; लाजेनें खालीं मान घालून चालणें. 'ती खालच्या मानेची बायको.' -निचं ९१. **खालवणें, खालावणें**-अक्रि. १ नम्र होणें; खालीं होणें; वांकणें 'तैसें जीवमात्रां अशेषां।

खालावती ते।' –ज्ञा ९ २२५ २ दुर्दशा होणें, गरीबी येणें –उक्रि नाश करणें 'सूर्यकुळीं अवतार धरी रिपू खालवी। –लहुकुशाख्यान मराठी ५ वें पुस्तक पृ १६४ (१८८५) **खालींवर**–क्रिवि उलथापालथा, उफराटा सुफराटा, खालतीं वरतीं (खालीं+वर) ०**वर आंथरणें**-घालून निजणें-पांघरणें–थिछान्यातील पांघरूण अर्धे अगाखालीं आणि अर्धे अगावर घेऊन निजणें ०**वर दृष्ट-नजर ठेवणें-करणें**, ०**वर पहाणें**–सर्भोवतीं न्याहाळून, बारकाईनें, चौकस बुध्दीनें पहाणें ०**वर पाय पडणें**–पाऊल अडखळत पडणें, चुकणें ०**वर मन होणें**–मन डळमळीत होणें, धरसोड करणें, घुटमळणें **खालघिणें**–सक्रि खालीं करणें, खालाविणें पहा 'जेथ खालविजे सीविका' –ऋ २१ 'जलधर हनुवटी खालवूनी।' –अर्वाचीन ७० **खालसवणें-सावणें** –अक्रि पडणें, बसणें, बुडणें, ढासळणें आत येणें (परिस्थितीमध्यें), नक्षा उतरणें (गर्वांत, अभिमानांत) [खालीं] सामाशब्द– ०**चा-ला**–वि १ तळासवर्धी, तळचा, बुडाचा २ हाताखालचा, तावेदार, आज्ञांकित, कमी दर्जाचा ३ पूर्वेकडचा, गगमोहरा पहा सामाशब्द– ०**चा थर** (**वर्ग**)–१ हलका वर्ग, कमी प्रतीची, दर्जाची वस्तु २ (ल) अशिक्षित वर्ग, 'पूर्वीसारखी ही चळवळ वरच्या वर्गांत (सुशिक्षितात)च राहिली नसून चळवळीचीं पाळेंमुळें अगदीं खालच्या थरापर्यंत जाऊन भिडलीं आहेत' –के १६ ९ ३० ०**ची मांडी**–स्त्री नहगी (घोड्याची) –अश्वप १ ७४ ०**चें(लें) पोट**–न ओटीपोट, बस्तिप्रदेश ०**च्या मानेचा-ची**–वि नम्र, विनयशील **खालट**–वि खालमर, नीच (देश प्रात) ठेंगणा, बसकट, बदखल, थबगट (वस्तु) **खालणें-नें**–क्रिवि खालून, खालच्या भागातून, बुडापासून **खालतड**–क्रिवि (व) पूर्वेकडेस **खालता**–क्रिवि १ खालीं खालतीं खालच्या बाजूस 'धरून केशीं मग खालता हा।' –सारुह १ ८३ २ पूर्वकडे गगमोहरा पहा **खालती**–स्त्री (व) पूर्वदिशा **खालतीं-तें**–क्रिवि खालीं **खालतीं येणें**–तोटा येणें, कमी पडणें, बुड येणें 'त्या व्यवहारामध्यें मी पाचशें रुपयास खालतीं आलों' **खालपट**–वि १ काहींसा खालीं, उतरता, उताराचा २ सखल उताराची (जमीन) ३ थबकट, बसकट, चपटा **खालमान्या**–वि (व) गागतोंड्या, दृष्टीस दृष्टि न भिडविणारा पण दडपून सोड्या करणारा, आतून डाव करणारा तुल० खालीं मुंडी पाताळ धुंडी **खालला**–वि खालचा

**खाल्दार**—वि पाढऱ्या रगाचा असून त्यात काळे वेंग मिश्र असलेला (घोडा) हा अशुभ होय –अश्वप १ १०४

**खाल(लि)सा**—पु १ साक्षात् सरकारापासून धारण केलेली अथवा जिच्या वसुलाचा सरकार एकटेंच मालक आहे अशी जमीन, गाव, अथवा प्रात २ खोताच्या अभावीं सरकारनें वहिवाटलेल्या जमिनी, जहागीर किंवा इनाम नसलेली जमीन 'नैजानें कुल विसादी लुटून खालसा केली' –रा १५.१३ ३ सरकारजप्त जमीन, गाव ४ संस्थानाच्या अमलातील नसून इग्रजसरकारचे अमलाखालील गाव, जमीन 'मोंगल अमलात सापडलेला महाराष्ट्र खालसा महाराष्ट्रापेक्षा अधिक दुर्दैवी' –के १७।५।१९३० ५ मिरासी खरीज सरकारच्या वहिवाटीला असलेली कीर्दसार जमीन –गागा १३ ६ मुसलमानी अमदानींतील जमावदी खातें –वि १ खास सरकारी (जमीन, सैन्य, तोफखाना इ०) २ संस्थानी नव्हे असा (प्रात, जमीन इ०) ३ सरकारजमा, जप्त [फा खालिसा] ०**मुलुक**–पु इग्रज सरकारचा प्रात

**खालसा**—पु. शीख जातींतील एक पथ

**खालस्ती**—वि आकसखोर, खुनशी, द्वेषी [फा खल्श]

**खॉलॉ**—पु (गा) पान, पानाचा तुकडा

**खाला**—क्रिवि खालीं पहा 'हें असो पावो उचलिला। मदसुख न ठेविती खाला।' –ज्ञा १८ ७३६

**खालाट-टी-ठी**—स्त्री १ सखल प्रदेश, सह्याद्रीच्या पायथ्यापासुन पश्चिमेकडे समुद्राच्या किनाऱ्याकडे जाणारा उतरता प्रदेश, याच्या उलट वलाटी २ (को) अगदीं समुद्रकिनाऱ्यावरील जमीन, किनाऱ्याच्या आतील आणि घाटाकडे चढत जाणाऱ्या जमीनीस वलाटी म्हणतात ३ स्वराच्या ु ू या उकारी खुणा (या अक्षराच्या खालीं जोडतात म्हणून) याच्या उलट वेलाटी ((ि ी) या खुणा किंवा चिन्हें अक्षराच्या वर येतात म्हणून) [खालीं+ठाय] ०**वेलाटी**–स्त्री उताराचा व चढावाचा प्रदेश ०**कर**–वि खालाटीचा रहिवासी

**खालाडीभात**—न (को) तुकल्याच लागणीस आणलेल्या जमीनीमध्यें केलेलें भात शिवार तोडून भाजावळ करून खालाडी भात करतात'

**खालारा**—शअ (काव्य) खालीं, खालतीं –क्रिवि खालीं, खालती, उतरणीकडे 'जैसे खालारा धावें पाणी।' –ज्ञा १८४८१ [खाल]

**खालावणें**—अक्रि १ कमी होणें, पडणें, हलके होणें, उतरती कळा लागणें (वारा पाऊस, कन्ह संपत्ति इ०स) 'कन्ह अमलीं खालावें म्हणज जाऊ' २ खालच्या किंवा खराब स्थितीप्रत जाणें, खालीं येणें 'त्या व्यापारात लाख रुपये तोटा आल्यापासून तो सावकार खालावला' खालवणें पहा [खालीं]

**खालावि(व)णें**—उक्रि (काव्य) खालीं आणणें, खालीं करणें नम्र करणें 'रावणाची हे दुर्दशा। आम्ही खालाविल्या दिशा।' [खालीं]

**खॉलासणी-खालासी**—स्त्री. (गो.) सुताराचे वाकसासारखें एक लहान तासण्याचें हत्यार; हें एका हातानें वापरतात.

**खाली**—वि. १ रिकामा; रिता. 'गडकरी याणीं राजमंदिर म्हणून खाली न ठेवावें.' –मराभा ३२. 'ब्राह्मणांचीं घरें खाली करवितात.' –रा ७.१०६. २ वृथा; वायां. 'एक गोळा खाली न जाय असा मारितो' –ख ६.२५१५. ३ रिकामा; न गुंतलेला; न अडकविलेला; बिन उद्योगाचा. 'खाली घरीं बसून बंदोबस्त होणें ही गोष्ट निराळीच आहे.' –ख ६.२०४६. ४ मोकळें 'सावनूर खाली पडते.'–ख ८००. [प्रा. खल=रिक्त; अर. खाली; हिं. सिं. खाली] (वाप्र.) ०करणें–रिकामें करणें. ०मैदान होणें–अरक्षित मोकळा प्रांत होणें. –पया २१७. सामाशब्द– ०खटला–पु. बाजारबुणगें; सामानसुमान इ० बाडबिछाईत, वस्त्रपात्र, चीजवस्त (सैन्याचें). ०चिठी–स्त्री. (नाविक) गलबतांत सामान भरण्याचा किंवा रिकामें करण्याचा परवाना. ०पण–न. (व.) रिकामपण; फुरसत ०पिली–वि. निष्कारण; निराधार; व्यर्थ; रिकामा; पोकळ; उगीचच्या उगीच. ०वार–पु. वाय बार. (क्रि० मारणें; टाकणें) ०मैदान–ज्यांत खडें लष्कर नाहीं असा प्रांत; रिकामें ठिकाण; मोकळी जागा. 'खाली मैदान पाहून हैदराचा उपद्रव होईल.' –ख ८००.

**खालीं-लें**—शअक्रिवि. खालतीं, अधोभागीं; तळाशीं, बुडाशीं. 'ते माडीवर राहतात आम्ही खालीं राहतों.' २ (ल) खालच्या दर्जांत, पदवींत. ताबेदारींत, हुकमतींत. 'सर्व भाषा संस्कृत भाषेच्या खालीं.' ३ आटोक्यांत; टप्प्यांत, पोटोंचेत 'सुरतेखालीं अठ्ठावीस गांव आहेत.' (समासांत) कामा–खेळा–कष्टा–मेहनती–मस्करी खालीं=काम इ० करीत असतां. 'कामाखालीं दिवस जातो.' विचाराखालीं–अभ्यासाखालीं–प्रघाताखालीं–नित्याखालीं पडणें=विचाराखालीं येणें. ४ कांहीं एका प्रतिष्ठित किंवा अप्रतिष्ठित नावाखालीं. (क्रि० विकणें; मोडणें) 'श्रीवर्धनी 'सुपारीचे खालीं मुरुडची सुपारी विकते' [सं. खात–खाल–खालीं सप्तमी सं भूतकालवाचक ?] ०पडणें–संबंध लागणें; वहिवाटींत, राबत्यांत पडणें २ रद्द होणें; निरुपयोगी होणें. ३ शांत होणें. 'कर्ज फेडल्याशिवाय माझा जीव खालीं पडणार, नाहीं.' ०येणें–कमी होणें. 'चांदीचा भाव खालीं आला.' –के १० ६.३०. ०राहणें–बाकी, शिल्लक राहणें. 'वीस आंबे होते पैकीं पांच खाल्ले, खालीं राहिले पंधरा.' ०घर होणें–अतिशय काळजी लागणें. म्ह० खालीं मुंडी पाताळ धुंडी=गोगलगाय पोटांत पाय या अर्थी. (वाप्र.) एकाखालीं एक–एकाखालतीं दुसरें; खालोखाल, एका बरोबर दुसरें (चांगल्या बरोबर वाईट या अर्थी). 'हीं दहा टाणें एकाखालीं एक सगळीं देऊन टाकिलीं.' नांवाखालीं–नावाच्या जोरावर. 'मोठ्या नांवाखालीं सारें पचून जातें.' हाताखालीं–१ कबज्यांत (घेणें अन्यायानें). 'त्यानें पुतण्याचे पैसे हाताखालीं घातले.' २ हुकमतींत असणें. 'त्याच्या हाताखालीं दहा शिपाई आहेत.' घराखालीं–घरालगत, जवळ, पलीकडे. 'आमच्या घराखालीं बाग आहे.' (जीव)

**खालील**—वि. १ तळासंबंधीं; अधोभागासंबधीं. २ ताबेदार; आज्ञांकित, हाताखालचा. ३ हलक्या दर्जाचें; निकृष्ट. [खालीं] खालीलाकडे–पूर्वेकडे; गंगमोहरा पहा.

**खालून**—शअक्रिवि. खालच्या भागापासून किंवा बाजूनें.

**खाले**—क्रिवि. (काशी) खालीं. 'घेतां लांच चढे दुनी गडबडे, कोणी न खाले पडे।' 'तूं ये तरी खाले' –होला ५३. [खालीं]

**खालें**—शअक्रिवि. खालीं. 'उतरे रथयाखालें करुनि असे तुमुल युद्ध राया तें।' –मोकर्ण ४८.५५ [खालीं]

**खालोखाल**—क्रिवि. कांहीं अंशीं खालीं; किंचित न्यून; योग्यतेनें किंचित कमी (गुण, वय, आकार यांत). [खालीं द्वि.]

**खालौता-ती**—क्रिवि. खालतीं; खालीं. 'मुखें करुनि ख लौतिं.' –रास १.६७५.

**खाल्लाकडन**—क्रिवि (माण.) सपाटीच्या बाजूनें, सखल भागाकडून [खालीं+कडून]

**खाल्ला, खाल्लेला**—खाणें या क्रियापदाचें भूतकाळवाचक रूप. खाल्ल्या घरचे वासे मोजणें–कृतघ्नपणा करणें, कृतघ्न होणें. (ज्याचें अन्न खावें, त्याला जर वाईट स्थिति आली आणि त्याला घर विकण्याचा प्रसंग आला, तर घराची किती किंमत येईल हें पाहण्याच्या दृष्टीनें त्याचे वासे मोजणें म्हणजे त्याचें वाईट चिंतणें). 'शिवाजीस माणसाची परिक्षा चांगली होती' त्यामुळें त्यानें हातीं धरलेल्या माणसाच्या पुत्रपौत्राकडूनहि...खाल्ल्याघरचे वासे मोजण्याचें नीच कृत्य घडलेलें नाहीं.' –निबंधचंद्रिका. ०वासे मोजणारा–पु. कृतघ्न; उपकारकर्त्यावर उलटणारा.

**खाल्लेंघालें**—वि. संतुष्ट. 'मन सदां खाल्लेंगालें आहे.' –बाळ २.१८१. [खाणें+घाणें]

**खाल्ल्या**—(चाग.) खालीं पहा.

**खांवक**—न. (गो.) खाऊ; खाण्याचा पदार्थ. 'मांका खांवक दी.' [खा]

**खावगॉ**—वि (गो.) अधाशी; खा खा करणारा. [खा; हिं. खाव]

**खांवचीं**—वि. (गो.) खावयाची; खाण्याची (वस्तु; पान इ०). 'खांवची पान' =विड्याची पानें.

**खावचें**—क्रि. (गो.) १ खाणें २ (ल) नागविणें.

**खाघट, खावाड**—वि. १ अधाशी; खादाड. २ लांचखाऊ [खाणें]

**खावटी**—स्त्री १ जेवणखाण, भोजन, खाणेंपिणें २ पोटगी, अन्नवस्त्र, खाण्याबद्दलचे पैसे ३ अन्नसंग्रह, खाद्यपदार्थांचा साठा [खाणें]

**खावटें**—न (गो कु) खाऱ्या शेताचा समुद्राकडील तुटलेला बांध, फुटलेल्या बांधाची मधली तडा, फूट, भेग

**खावड**—स्त्री (गो) (गुराचें) खाणें, खाद्य.

**खांवडें**—न १ नांगरलेल्या किंवा पेरलेल्या शेतांतील विन नांगरलेली अथवा विन पेरलेली जागा, लागवडीच्या शेतांतील ओसाड जागा २ लेखांतील न लिहिलेली-कोरी सोडलेली-जागा ३ (मामा) रिती जागा, तुकडा, भाग ४ चालू कृत्यांत खंड (पावसाची सर इ० मध्यें) [सं खड]

**खावणी-नी**—स्त्री १ मनोधर्म, मनोगत 'वी जाणतुसि खावनी। वल्लभाची।' –ऋ ३४ २ हेतु, उद्देश 'आता याचें सिपनेयांची खावणिया। माते पुसा पा।' –शिशु ६९५

**खावणें**—उक्रि (व) गमावणें, दवडणें

**खावं(विं)द**—पु १ यजमान, सरकार, महाराज, स्वामी, शास्ता 'आम्हीं जो आवसाल सांगतों तो खावंदाचे मर्जीस येत नाहीं' –भाव ६ २ मालक, धनी 'बावाजी पाटील निमे मोकदमीचा खावंद' –चंद्रचूड दप्तर १ २० [फा खावंद्]

**खावंदड**—स्त्री (व) दुखापत [खवद]

**खावंदी-विंदी**—स्त्री खावंदगिरी 'इमाचे दौलतीवर देखील मालकीयत व खाविंदी राहील' –दिमरा १ १०७ [फा खावंदी] ०गिरी–स्त्री स्वामित्व, धनीपणा, साहेबी 'खावंदगिरी कशी असते व सेवा कशी हें पुरें ठाऊक नाहीं' –रा १४ ४३

**खाव(ऊ)निंदक**—वि कृतघ्न खाल्ल्यावरचे वासे मोजणारा [खाणें+निंदक]

**खावराडिवरा**—वि १ भांड येईल त्याची व्यवस्था लावणारा, राग्ण्यास, फस्त करण्यास सदा तयार २ चलाख हुषार, तल्लख, आवेशी, साहसी, उत्साही ३ (चुकीनें) खावराबावरा ४ (व) मारकांडा, रागीट, तापट, कडक [खाणें+डिवरा]

**खावरायावरा**—वि भय, राग अथवा आश्चर्य यांनी गांगरलेला कावरायावरा (अप) पहा

**खावान**—वि (खान) खाण्याचें, खाण्यालायक (वस्तु पदार्थ इ०) 'खावान तेल'=गोडें तेल [खाणें]

**खासत-द**—स्त्री (व ना) खोड, सवय स्वभावदोष [अर. खासियत]

**खासा**—वि (गो) औरस, खरा [खास]

**खासानिशीं**—क्रिवि (खासचा विविध प्रयोग) जातीनें, खुद्द स्वतः 'मग माऊसाहेबानीं निश्चय केला कीं, या उपरि गिलचा खासानिशीं मारीन' –भाव २१६ [अर खास्]

**खाशी**—उद्गा शाबास! सुरेख! वाहवा! छान! उत्तम! नामी! [अर खास्सा]

**खाशी**—वि निवडक, खास पहा ०पंगत–स्त्री निवडक, उच्च प्रतीच्या लोकांची किंवा धन्याची पंगत, किंवा त्या मंडळीचें जेवण म्ह० (गो) खाशा पत्तीक सुठी पिठो=मोठ्याच्या नावाचा कांहींच फायदा न मिळणें ०मंडळी–स्त्री उच्च वर्गाचे लोक, प्रतिष्ठित लोक, यजमान व त्याचें कुटुंब ०स्वारी–स्त्री १ यजमान, धनी, राजा २ खाशा लोकांची मिरवणूक ३ (थट्टेनें) स्वतः, मी [अर खास]

**खाशी**—स्त्री (हिं) खोकला खास पहा [सं कास]

**खाष्ट-ष्टी**—वि १ द्वाड, दुष्ट, तामसी, त्रासदायक २ क्रुर कुऱ्या, सदोदित निंदा करणारा (माणूस, स्वभाव) ३ कठिण, अवघड (काम, अभ्यास) [स कष्ट?]

**खाष्टं**—न खाच, वेडावाकडा खळगा, खड्डा

**खास**—क्रिवि १ खचित, निखालस, खात्रीनें, निश्चयपूर्वक २ बरोबर तंतोतंत ३ खुद्द, स्वतः, जातीनें –वि १ राजा किंवा राज्यासंबंधीं, सरकारी २ स्वतःचें, खाजगी, जातीचें (समासांत) खासपथक, खासपागा ३ शुध्द, अस्सल, खरा, चांगला ४ विशेष, विशिष्ट ५ निवडक, थोरथोर, उच्च सामान्य सामासिक शब्द राजकीय अथवा सरकारी या अर्थाचे व कांहीं स्वतःचे किंवा जातीचे या अर्थाचे खासकोठी–खास–खजाना–सरंजाम–आमदार–हुजुरात–जामीन–इमाम–नेमणूक इ० [अर खास्] विशेष सामाशब्द ०आमदानी–स्त्री नियमित पीक, उत्पन्न याच्या विरुध्द शिवाई आमदानी=जादा पीक ऐन अमदानी हा शब्दहि कधींकधीं या अर्थानें योजतात ०खबर–स्त्री १ खात्री लायक बातमी २ सरकारी बातमी ०खेल–वि सेनाखासखेल, सेनापति 'एक सेनापती जन्मला। खासखेल सयन।' –ऐपो ७९ ०गत, खाजगत–वि १ स्वतःचा, आपला, जातीचा, खाजगी 'आमचा खासगत वाडा पुण्यास आहे' २ मालक स्वतः जमाखर्च लिहीत असल्यास हा शब्द तो आपल्या नावामागें लावतो –क्रिवि जातीनें, खुद्द 'मी खासगत त्यांसच रुपये दिले' ०गत राजश्री–(जमाखर्च) मालकाच्या नांवा मागें लावतात ०गाडी–स्त्री राजाची किंवा स्वतःसाठीं मुद्दाम काढलेली (स्पेशल) आगगाडी 'त्याशाच्या स्वाऱ्या खासगाडीनें अगर मोटारीनें जाण्याच्या असल्यास' –हुकुमाची दिकार (बडोदें) ० ०जमीन–स्त्री १ जमीनदार गुदस्तीत असलेली जमीन २ जिचा वसूल प्रत्यक्ष सरकार वसूल करतें अशी जमीन ०नीस, खासनवीस–पु खानगी कारभारी, सरकारी हिशेबनीस, (इ) प्रायव्हेट सेक्रेटरी ०निशी–स्त्री स्वतःचें काम 'बाजी मुरार यांचे नावू हे खासनिशी करून राहिले,' –मराचिम १ ०पंगत–

स्त्री ज्या पक्तींत यजमान जेवावयास बसतो ती पंगत, राजाची अथवा सरदाराची पंगत, थोरथोर लोकांची पंगत २ उच्च जात, शिष्ट वर्ग ३ निवडक मडळी ०पथ(त)क–न एखाद्याचें स्वत चें, खासगी घोडेस्वाराचें पथक, ज्याच्या निशाणाखाली हे घोडेस्वार चाकरी करितात आणि ज्याच्या खर्चानें ते ठेविले असतात त्याचें पथक, खाशाचें पथक ०पथ(त)की–वि खासपथकासबधी–(स्वार, शिपाई, घोडा) ०पागा–स्त्री राजानें अथवा राज्यक र्त्यानें स्वत ठेवलेली आणि त्याच्या हुकमांतील घोडेस्वारांची टोळी, घोडदळ ०पाग्या–पु १ खासपागेवरचा अधिकारी २ खासपागेंतील घोडा किंवा स्वार ०बंदी–स्त्री खेड्यांतील कांहीं घराण्यांत वाटेल तशी वाटून दिलेली जमीन व प्रत्येकीचा कांहीं ठोकळमानानें ठरविलेला सारा ०बरदार–बारदार–बालदार–पु राजा, सरदार किंवा मोठा माणूस यांची बदूक वगैरे नेणारा सेवक 'हिंमत बहादुर खासे बालदार'–ऐपो ३३२ ०बातमी, वर्तमान–स्त्रीन सरकारी खबर ०बारगीर–पु राजा किंवा सरदार यांचा शरीरसरक्षक स्वार ०माल–स्त्री वाळू चिकणमाती यांच्या मिश्रणानें बनलेली जमीन ही सखलवल्यास चागलें पीक देते ०विघा–पु खासबंदी गांवातील कुळाच्या जमिनीचा धारा ठरविण्याचें माप, मोजणीमाप ०महाल–पु १ खाजगी महाल २ विवाहित पत्न्याचा महाल, राणीवसा याच्या उलट खुर्द महाल (रखेल्याचा महाल) ०स्वारी–स्त्री राजा किंवा सरदार याचा लवाजमा, मिरवणूक जिलीब, त्याचप्रमाणें स्वत राजा, अथवा सरदार खाशी स्वारी पहा

खांस, खासखांस, खासणी, खासर, खासरी— खाच खाचखोच इ० शब्दाऐवजीं चुकीनें योजलेले शब्द

* खासदार–पु 'कौन्सिल ऑफ स्टेट' या वरिष्ठ कायदेमडळाचा सभासद ०दारी–स्त्री खासदाराचें काम किंवा अधिकार [खास]

खासदार–खाजदार–खास्तार—पु १ मोतद्दार, घोडे वाला, पाग्या 'पांडवघरचा खासदार हा, तो कमाघरची दासी।'–राला पृ ४३ 'असा प्रभुहि सेवक भजसि खास दारापरी। –केका ७. २ शरीरसरक्षक, हुजुरातींतील एक असामी ३ पूर्णपणें अंकित किंवा अधीन म्हणून मानलेल्या माणसास थट्टेनें किंवा सलगीनें म्हणतात (चाकर, बायको, सोवती, भक्ताधीन देव इ०) [फा]

खा(खां)स-सी—स्त्री (हिं) ढास, खोकला [स कास= खास, प्रा खास]

खास(ज)गी—स्त्री राजाची किंवा एखाद्या गृहस्थाची जातीची स्वत ची जिंदगी, व्यवहार (राज्याचा, सस्थेचा नव्हे असा) 'त्या राजानें खाजगीचे लिहिण्याकडे पचवीस कारकून ठेविले आणि राज्याचे लिहिण्याकडे हजार ठेविले आहेत'

खासगीचा–वि स्वत चा, जातीचा, खासगत (पैका, कारकून, खर्च इ०) ०वाला–लें–पु खासमंत्री, दिवाण, राजा किंवा सरदार यांची खाजगी रोकड ठेवणारा, खजिनदार, सस्थाना तील राजाकडील रोकड ठेवणारा, खाजगीकडचा मुख्य अम लदार, खानगीवाले

खा(खां)सडा—पु १ जोडा, पायपोस (जोडा मारण्याचे प्रसगीं योजतात) २ प्रहार, आघात, मार, (मुख्यत्वें माऱ्याचा) (क्रि० मारणें, बसणें) 'दोन खांसड मारतांच चोरी कबूल झाला' खासडेमार–पु फाल्गुन वद्य प्रतिपदेची (धुळव डीची) जोडाजोडी, खेटरा-खेटरी

खा(खां)सणें—अक्रि १ खोंकणें, ढास लागणें २ (व) मानराचें ओरडणें 'मानर खासतें' [खास हिं खासना]

खास(च)र—न (व ना) ओझीं वाहण्याच्या कामाचा मोठा गाडा, छकडा 'भरतीच खासर आहे भाऊसाहेब! हें तर हलुहलूच चालणार!'

खासा—वि १ चांगला, नामी, उत्कृष्ट, शेलका, उंची, अभिजात, श्रेष्ठ 'पांडव म्हणती तुज खासा।'–दत्तपदें पृ ४१ 'शिवाजी अगाचा खासा आहे'–सभासद ३० २ राजा, अमीरउमराव, सरदार यासबधीं 'खासियाचे पलग।'–ऐपो १५ ३ मुख्य, प्रधान, श्रेष्ठ, नायक 'अहो खासा राहे यदुतिलक अवापरिसरीं।'–सारुह ७ ८८ ४ औरस, कायदेशीर, नीच उत्पत्तीचा किंवा लेकवळा नव्हे असा, (गो) सख्खा –पु. १ मोठया व्यक्तीचें प्रत्यक्ष नाव न घेता सकेतानें सुचवितांना–नोकरलोक धन्यास–वापरतात (अनेकवचनीं) 'खासे कोठें आहेत?' खासे कोठें गेले?' २ पति नवरा 'हसाबाई! तुमच्या खाशाची शिस्तच मोठी कडक!'–स्वप ४६ [अर खास्स] ०कागद–पु दौलताबाद येथें तयार होणारा, लिहिण्याचा उत्तम कागद, याच्या उलट खर्ची कागद ०लोक–पु अमीरउमराव, सरदार, दरकदार, उच्च पदवीचे लोक, मानकरी, शेतकऱ्यापासून हक्क वसूल करणारे हकदार. ०स्वारी–स्त्री खासस्वारी पहा [हिं खास सवारी]

खासाड—न (प्र) खावाड, वेडेवाकडें, मोठें भगदाड, खड्डा [खाच]

खासावीस—वि (गो कु) घाबरा कासावीस पहा

खास्त—क्रिवि १ निखालस, खात्रीनें, खास २ बरोबर, ततोतत खास पहा [खास (अप)]

खास्त—स्त्री आकस, खुनस द्वेष, छळवाद, (क्रि० धरणें, करणें) 'हा माझी खास्त करतो' [अर खिस्सत्=दुष्टपणा]

खास्तीस लागणें, पेटणें–त्रास देणें 'माझ्या खस्तीस पेटला, लागला'

**खास्त-स्ती**—स्त्री. १ संत; झुरणी ( क्रि० घेणें; धरणें; करणें ). 'आई गेल्यापासून पोरानें खास्त-स्ती घेतली. २ मनांत अढी धरून दोष काढणें; एकसारखी तिरस्कारानें निंदा करणें; राग भरणें. (क्रि० करणें; लावणें; मांडणें; बांधणें; चालवणें). [ अर. खिस्सत ]

**खास्त-स्ती, खास्तखोर-खास्तीखोर**—वि. रागीट; द्राष्ट; तुसडा निंदक; सदोदित चिडून कुरकुर करणारा. २ आकस-खोर; खुनशी; दावा धरणारा; मत्सरी. [ अर. खिस्सत ]

**'खास्त-स्ती**—पु बाणाचा किंवा तोफेच्या मान्याचा टप्पा. 'श्रीमन्महाराज उभयतां बाणाचे खास्तीवरी उभे राहून...' –पया ३९३. 'खासा मालोजी शिंदे बाणाची खास्त निघाले होते' –भाव ६३. [ फा. खास्तन्=उभें रहाणें, उठणें ]

**खाळ**—पु. गटार; मोरी; पाण्याचा स्वाभाविक किंवा कृत्रिम पाट; कालवा; नळ; खांच; खाई. ०**कुवा**–पु घाण पाण्याचें टाकें, डबकें; तारदखाना ( इं. सेसपूल् ). 'मोऱ्यांतील खाळकुव्यांतील पाण्यांत चुना घातल्यानें जंतू मरतात.' –मेंपू १.१९७. खोळ पहा.

**खॉळ**—स्त्री. ( गो. ) घोंगडीची खोळ.

**खाळणें**—न. नकसगाराचें एक हत्यार.

**खाळा**—पु. गलबला; गोंगाट; गडबड ( क्रि० मचविणें ).

**खिकावणें**—अक्रि. १ हसणें; चावणें. २ खिकाळणें पहा. [ ध्व. ]

**खिका(खा)ळणें**—अक्रि. खेकाळणें. १ घोड्याचें ओरडणें; हिंसणें. २ मोठ्यानें खोखो हसणें; मौजेनें हीही हसणें. [ ध्व. ]

**खि(खी)क्या-ख्या**—स्त्रीअव खोखो; निंदेचीं उपहासाचीं भाषणें, बोलणीं; उपहास, चेष्टा करणें. ( क्रि० घालणें; करणें ). 'तो सर्वदां दुसऱ्याची खिख्या करीत बसला असतो.' 'ऐशा करूनियां खोक्या धिःकारें बोल्ली।' –निगा ३१५. [ ध्व गु खिखि=हंसणें ]

**खिखि**—स्त्री. खदखदा हास्य; हीही हास्य. –क्रिवि. खद-खदां हास्या( ध्वनि )चें अनुकरण, फिदिफिदी. [ ध्व. ]

**खिच**—पु. खिचडी. 'जें काळाचा खिच उशिटा' –ज्ञा ८. १४४. [ प्रा. दे. खिच्च=खिचडी ]

**खिचकट**—स्त्री. ( गो. ) खेचाखेंच. **खिच-खींच्च**–वि (गो.) गच्च. **खिचचें**–उक्रि. गच्च धरणें.

**खिचकुला**—पु. मुलें व मुली मिळून भातुकली खेळतात तो खेळ.

**खिचट-टें**—न. खिचडी; मिसळ. 'तेथ सुखदु खाचें खिचटें। जेविजे एकेचि ताटें।' –ज्ञा १४.२७३. [ खिच ]

**खिचडा**—पु. १ करड तांदूळ इ० भरडून, शिजवून गुरास खावयास घावयाचें खाद्य. ( क. ) २ सजगुऱ्याचा सडून केलेला भात. ३ तांदूळ व डाळ यांचें शिजविलेलें मिश्रण. ४ ताबुताचे दिवसांत फकिरास घालावयाचें मिश्र धान्य. मिसळ. ५ दाटी; गर्दी. [ खिचडी ]

**खिचडावणें**—सक्रि. शिजविणें; चिडविणें.

**खिचडी**—स्त्री. १ तांदूळ व डाळ ( बहुधा मुगाची ) यांची मिसळ ( शिजविलेली किंवा बिन शिजविलेली ) २ पंचमेळ (निर-निराळीं धान्यें किंवा भिन्नभिन्न नाणीं इ० यांची ); खिचडमि-चड; गोतांबील; 'श्रीमंतानीं मोहरा–पुतळयांची खिचडी वाटली.' ३ ज्यांतील जमीनीचा एक भाग धारेकऱ्यानें व एक भाग खोतानें धारण केला आहे असा गांव. ४ गर्दी; दाटी. 'यात्रे-मध्यें अनेकजातीय मनुष्यांची खिचडी असल्यें, यामुळें विटाळ होतो.' [ दे. प्रा. खिच्च; हिं. खिचडी; सिं. खिचणी; गु. खिचडा; तुल० मं. कृसर ] ०**वांगी**–अव. तुरीच्या डाळीचें पीठ, चण्याचें पीठ व वांगीं यांची भाजी. –गृहि १.४०. ०**खिचडी**–स्त्री. अंदाधुंदी; गोंधळ. [ खिचडी द्वि. ]

**खिचडें**—न. एकत्र शिजविलेल्या, भरडलेल्या तांदुळाचें आणि कोंड्याचें जनावरांना घालावयाचें आंबोण. खिचडा अर्थ १ पहा.

**खिचणें**—अक्रि. मागें हटणें, सरणें; एका बाजूला अथवा मार्गाबाहेर होणें. २ ( ल. ) ( वचन अथवा उद्देश यांपासून ) फिरणें; चळणें. [ सं. कृष्–कर्ष्; हिं. खिचना ]

**खिचमिड**—वि. खरडलेलें; मरकटलेलें; गिचमीड. [ खिच द्वि ]

**खिचरट**—वि. खचरट पहा.

**खिचवट(ड)णें**—उक्रि. १ वरवर उकरणें ( जमीन ). २ खाजवणें. ३ चिडविणें; खिजविणें. 'स्वनाश न कळे कसा खिचवटूनि काळानना?' –मोकृष्ण पू. ७७.१०.

**खिचविणें**—उक्रि. मागें अथवा बाजूला सारणें; वाटेंतून अथवा मार्गांतून ढकलून अथवा सारून देणें. [ खिचणें ]

**खिचीं**—स्त्री. १ खिचडी पहा. २ चिखल; किचड. 'चौमेरीं लोळवितांति घडे। तेय खिची घोरी जाली।' –शिशु ५५५. ३ पीठ, डाळ इ० घालून केलेली पातळ पालेभाजी. ४ ( ल. ) दाटी; खच. [ खिच ]

**खिचकट**—स्त्री. ( गो. ) गर्दी. किचकट पहा. **खिचकटा-वचें**–क्रि. ( गो. ) गर्दी करणें.

**खिच्पेट**—स्त्री. ( गो ) अडगळ.

**खिज**—स्त्री. ( ना. ) खिजविणें; खिजविण्याचा शब्द. [ खिजणें ].

**खिजगणती**—स्त्री. गणती; गोजदाद; पर्वा ( निषेधार्थी प्रयोग). [ हिं. खिसगनती ]

**खिजणें**—अकि. १ चिडणें; रागावणें. 'ब्राह्मण देखुनियां खिजतो।' –देप १८३. २ खजील होणें. [ सं. खिद्; प्रा. खिज्ज, सिं. खिजणु; हिं. खिजना ]

**खिजमत, खिजमतगार-गारी-खिजमतदार**—खिदमत ६० पहा.

**खिजमती**—स्त्री. बायकांच्या हातांतील कंकण; एक दागिना. खिसमती पहा. 'गोठहातसर जंव खिजमत्या मिनेदार करीं सुद्दे।' –प्रला ११८ [ अर. खिदमत किंवा फा. खिसमत=दैव ]

**खिजरणें, खिजरियेणें**—कि. ( व. ) चिडणें. 'खिजरला काय म्हणून?' [ खिजणें ]

**खिजवणी**—स्त्री. चिडवणी; चेतवणी; खिजविणारी भाषा, हावभाव, क्रिया. [ खिजणें प्रयोजक ]

**खिज(जा)व(वि)णें**—सकि चिडविणें; राग आणणें; चेतविणें, त्रास देणें. 'म्हणउनि खिजवीतो रुक्मिणीतें हरी तो।' –वामन रुक्मिणीविलास ४. [ सं. खिद्; प्रा. खिज्जिअ; हिं. खिजाना; म. खिजणें प्रयोजक ]

**खिजाणा**—वि. हताश; नाखूष; खट्टू; निराश; शरमिंदा. खिसाण-णा पहा. [ खिजणें ]

**खिजान**—पु. घोड्याचा एक वातरोग. 'खिजान म्हणजे शरीर वाळतें व केंस जातात. रात्रीस नाकांतून श्वास चालतो.' –अश्वप २.१८७.

**खिजीपडन**—कि. ( खान. ) हट्ट घेणें; खिजणें. –भात्रि ७.१–४.

**खिटखिट**—स्त्री. किटकीट; त्रास. [ सं. खिट् द्वि. ]

**खिटखिटणें**—अकि बारीक व कर्कश आवाज करणें; किटकिटणें; टकटकणें. [ ध्व. सं खिट् ]

**खिटी**—पु १ लांकडाचा तुकडा; धलपी; उघडून अलग होण्यासाठीं किंवा लावून घट्ट बसण्यासाठीं दोन वस्तूंत बसविलेला लाकडी तुकडा, पाचर, खुंटा, कोयंडयांत कडी बसविल्यावर घालण्यांत येणारें अडकण, फिरकीची खीळ; अडसर म्हणून घातलेली चीप; लांकडी दट्ट्या; कठड्याचा लहानसा गज, चाकाची खीळ. २ दाराचा लहानसा लाकडी अडसर, कुत्रें. ३ ( ल ) अडथळा; अंतर 'सरल स्नेहामधें पडलि खिटी।' –प्रला १६७. [सं. खिट्] ( कामात ) ०घालणें–मध्यें अडथळा आडकाठी आणणें.

**खिड**—स्त्री १ दोन टेकड्यांतील चिंचोळी वाट; अडचणीचा, रस्ता; दरी. २ भोंक; वाट; दार, खिंडार; भगदाड (भिंत, कुंपण यांतील ) ३ गाळलेला भाग ( मजकुरांतील, ग्रंथांतील ). ४ ( ल. ) फट; संबंध; पळवाट. ५ खांड (धारेवरील). 'वस्तऱ्याला खिडी पडतील.' [ सं. खंड; का. किंडी ]

**खिडकबाळी**—स्त्री. बायकांचा कानांतील एक दागिना. [ खिड+बाळी ]

**खिडकी**—स्त्री. १ गवाक्ष; वातायन; जाळी; झरोका; बारी; मागचें दार; दिंडी; फाटक; बेसकट; पक्षद्वार ( गुप्तदार ); हवा व उजेडाकरितां केलेलें लहान दार. 'त्या खिडकीस एक लहानशी दुसरी खिडकी होती' –धर्माजीरावाचें कुटुंब पृ. ५१. २ ( ल. ) क्षुल्लक, लंगडी सबब; पळवाट; सुटण्यास जागा, सवड. ३ (गो.) देवळाच्या गाभाऱ्याच्या दोन्ही बाजूंस गज किंवा गरादे लावून तयार केलेल्या पडव्या. [ सं. पक्षद्वारं खडक्किका–त्रिकांडशेष; सं. खडक्किका; प्रा. खडुक्की अथवा खडक्किआ, खडकी; का. किडकी; हिं. खिडकी; ते. किटिकी ] ०दार–वि. चौकडीदार; पोफळी, खिडकीच्या आकाराची वेलपत्ती काढलेलें; एकाआड एक रंगाच्या चौकडीचें व जाड सुतांनीं स्पष्ट मर्यादा दाखविणारें ( कापड ) [ हिं. खिडकीदार ]

**खिडकुली(लें), खिडुकली(लें)**—स्त्रीन. १ दोन टेकड्यांतील लहान खिंड. २ भिंत, कुंपण यांतील लहान भगदाड, भेग, भोंक. [ खिड ]

**खिडगोंडी**—स्त्रीअव. गळ्या; बोळ; अरुंद रस्ते; खिंडी आणि गोंडी ( घळी ) ( व्यापक अर्थानें ). [ खिड+गोंडी ]

**खिडशिडी**—स्त्री. ( गो. ) प्रेत वाहून नेण्याची शिडी; निसणी; तिरडी.

**खिंडार-रें**—न मोठें भगदाड; भोंकसा; भोंक; दोन डोंगांतील चिंचोळी वाट २ भग्नावशेष, मोडकेंतोडकें, पडकें घर, गाव वगैरे ) –वि. मोडकळीस आलेलें; जमीनीस मिळालेली ( गाव, इमारत ) [ खिड ]

**खिंडी**—स्त्री. भेग; भगदाड; अरुंद रस्ता; गोंड; घोल. 'राजद्वार नव्हे द्वारा। धर्म खिंडी।' –ऋ ६०. 'मज निवावा खिंडियेरें वाडि पाहों दे।'–पंच ५ ७. [ खिड ] ०त गांठणें–ऐन अडचणींत पकडणें.

**खिडुकमिडुक**—न किडुकमिडुक पहा. मोडकेतोडके व बारीक सारीक दागिने.

**खिडें**—न एक प्रकारचें पोलाद.

**खिंडोर**—स्त्री खिंडार; दरी; भगदाड; मोडकळीस आलेलें घर. 'तरी त्या खिंडोरा आत। सदा दगडमाती राखत।' –एभा १३.१२८. [ खिड ]

**खिडू टोपलू**—न ( व. ) किलण न लावलेलें वेळूचें टोपलें.

**खिण**—पु क्षण; थोडा वेळ 'बारा तास बत्तीस घडया खिण एक नाहीं उशीर।'–ऐपो ३५१. [ सं. क्षण; प्रा. खण; पं. छिण; सिं खिण; हिं. छिन; गु खण ]

**खिण**—न. (गो.) चामडीस पडलेला घट्टा. [सं. किण; प्रा. किण]

**खिणखिण**—क्रिवि. बारीक व तीव्र आवाजाचा; किटकिटा. [ध्व]

**खितखित करणें**—क्रि. खंत घेणें (मुलानें) [ध्व]

**खितखितणें**—अक्रि. गदमदणें; उकडणें, चिकचिक वाटणें

**खितखितलो**—पु. (गो.) मुलींच्या खेळांतील भातुकली; खाऊ

**खितपण(णी), खितपीण(णी)**—स्त्री. झिजणी; क्षीणा वस्था; ग्लानीनें किंवा दुःखानें क्षीण होणें; खाटेस खिळणें. (क्रि० घेणें अथवा खितपतीस लागणें). [सं. क्षि=झिजणें+तप्=तापणें]

**खितप(पि)णें, खिद्व(य)णें**—अक्रि. झिजणीस लागणें, क्षीण व्हावयाजोगें बहुत दिवस दुखण्यानें पडणें; अशक्त होत जाणें. 'मागावें सखि! तपतां देवा! देवू नको मृतीस खित पता।'—मोकृष्ण पू. ३९ ४०. [सं. क्षि=क्षयपावणें+तप्=तापणें]

**खिताव**—पु किताब, पदवी. —दिमरा २.९९. [फा.]

**खिति**—स्त्री. पृथ्वी. 'ऐसें पापें दाटली खिती।'—खिपु १. ८.३८. [सं. क्षिती]

**खिद्खिद्-दां**—क्रिवि. फिदिफिदीं; खदखदां; खोखो, खिखि; मोठ्यानें आवाज करून (हसणें, खिदळणें वगैरे) [ध्व.]

**खिद्खिदणें**—अक्रि. फिदीफिदी हंसणें. [ध्व.]

**खिद्खिदणें**—अक्रि खद्खद् शिजणें, खदखदणें. [ध्व.]

**खिद्(दा)डणें**—अक्रि. दंगामस्ती करणें; हुंदडणें; उडणें; बागडणें; दंगल माजविणें; खोकळणें. —सक्रि. धूम पळावयास लावणें; पळवून लावणें; (कं.) रागें भरणें; खरडपट्टी काढणें. 'खिदडल्याशिवाय तो ताळ्यावर येणार नाहीं.' [ध्व.]

**खिद्(दा)डा**—पु दंगल, आरडाओरड; नाच; हुतुतु (क्रि० घालणें). [ध्व]

**खिद्(ज, स)मत**—स्त्री. १ सेवा; चाकरी; कर्तव्य; नोकरी; तैनात. 'माझे आजास व बापास खिजमत होती ते मजकडे सांगावी.'—दिमरा १.१८५. २ खुशामत; आर्जव. [अर. खिद्मत्] ०गार-दार-द्दार-पु मोठ्या माणसाचा हलक्यासलक्या कामांचा चाकर (अंग रगडणें, जोडे नेणें, हातावर पाणी घालणें इ०); सेवक; परिचारक; हुजऱ्या. 'तुळाजी खिजमतदार झाला बोलता।'—ऐपो १७०. ०गारी-दारी-स्त्री. खिद्मतगाराचें काम, हुद्दा. [फा.]

**खिद्(दा)ळणें**—अक्रि. खिदडणें पहा. [ध्व.]

**खिद्क्षण**—वि. (व.) थकलेला. 'तो चालण्यानें खिदक्षण झाला.' [सं. खिद्+क्षि=क्षीण]

**खिन**—पु क्षण; थोडावेळ. 'खिनभर थट्ट नको गलबला।'—पांडवांची लावणी (मसाप १.५) [सं. क्षण]

दाको. २. ५२

**खिनानतीर**—पु घोड्याचा एक रोग; अंगावर फोड होणें, सांधे ढळणें, शरीरांतून पिवळेंपाणी निघणें, नाकांतून निळें पाणी येणें, त्यास घाण येणें व माशी घसणें. हीं लक्षणें होतात. —अश्व २ १८७.

**खिन्न**—वि. दुःखी; त्रस्त; कष्टी; पीडित; श्रमी; खेदयुक्त; मलूल [सं. खिद्-खिन्न]

**खिन्नट**—वि. (गो.) अशक्त; कृश; क्षीण [क्षि-क्षय]

**खिन्नावणें**—अक्रि. खिन्न होणें; कष्टी होणें. 'तेव्हां त्या सुसुंदरी अतिशयें खिन्नावती मानसीं।'—निमा १.४०. [खिन्न]

**खिपणी-णें**—खितपणी-णें पहा.

**खिफ्त**—स्त्री. अपमान; अप्रतिष्ठा; फजिती. 'नबाबास सरदारांवर खिफ्त बसली.'—रा ५.१८. [अर. खिफ्फत्=अपमान] **खिफ्ती**-वि. अपमानित; हेवेखोर; द्वेषी. 'श्रीमंत भाऊ यास खिफ्ती मुसलमान यानें दरबारांत हुल कटाराची चालविली.'—पेद १.१२.

**खिपतण**—स्त्री. पटसण; पलखत; हट्टानें वाटेंतच घातलेली बैठक; एखाद्या हट्टी मुलास वाटेंतून एकीकडे करतांना किंवा उचलतांना त्यानें अडून बसणें, भोंवतीं भोंवतीं घोटाळणें, सोडून जावयास नाखूष असणें; चिकटणें. (क्रि० घेणें). [सं. क्षिप्त+पण]

**खिपतणी-णें**—खितपणी-णें पहा. [खितप वर्ण व्यत्यास]

**खिपरीं बसणें**—क्रि. (छ) १ (खिपरी=भोंवतीं) भोंवतीं घुटमळणें, चिकटणें. २ खितपत राहणें (ताप, आजार, पिशाचबाधा यांनीं)

**खिपली**—स्त्री. (ना.) खपली.

**खिम(म्म)ट, खिमाट**—न. (कों) घुसकारलेला भात; मऊ केलेला भात; चिकचिकीत शिजविलेला भात; दाट, घट्ट पेंज. 'मूल वर्षाचें झालेंना? त्याला थेवढें भाताचें खिमट घालीत जा.' [खिमा]

**खिमा**—पु सुरीनें अतिशय बारीक केलेलें मांस व त्याचा केलेला एक पदार्थ [अर. कीमा]

**खिमावर्त**—पु घोड्याच्या तंगडी(नेवरा)वर गुडघ्यावरील बाजूस असलेला केसाचा भोंवरा. [म क्षेम+आवर्त]

**खियाल**—ख्याल पहा.

**खिरकटणें**—अक्रि सरपटणें; भुईसरपटें जाणें. [ध्व.]

**खिरकटलें**—न (तिरस्कारानें); फार पातळ झालेली खीर; तांदुळाची सळसळीत खीर. [खी अल्पार्थी]

**खिरखिड**—स्त्री ज्यापासून राळ उत्पन्न होते असें एक भरदार मूळ.

**खिरखिर-रां**—क्रिवि. करकरां; मडमडां; जड वस्तु भोंईत नेतांनां होणारा आवाज करून [ध्व.]

खिरखिराविणें—सक्रि. खरखराविणें; खरखर, खडखड शब्द करावयास लावणें. [ ध्व. ]

खिरखिरें—न. लहान मुलांचें खेळणें; खिरखिरें पहा.

खिरंगटणें—अक्रि. खुरटणें; कमी होणें. 'परी तें खिरंगटलें असे जाण। वैराग्येंवीण वाढेना।' –एभा ११.४२७.

खिरचें—सक्रि. (गो.) खिरपळणें. [सं. क्षर्]

खिरटणें—अक्रि. रोगादिकामुळें मनुष्य, पशु इ० ची वाढ खुंटणें; खुरटणें.

खिरटा—पु. किडक्या दातांतील किंवा दाढेंतील कृमींचा एक रोग (अव. खिरटे). [सं. कृमि-किर-ट ?]

खिरंटा-टें—वि. खुजा, खुजट; वाढ खुंटलेला; ठेंगणा.

खिरड—न. १ एक मासा. २ गोचीड.

खिरडणें—अक्रि. १ मागें सरणें, हटणें; जिकला जाणें. 'आठवितां मन खिरडे।' –ज्ञा १६.४२१. 'दैव खिरडूनि साडिला।' –दा ५.९.४५. २ सुरडून चालणें. 'कैसी सर्वांगें सुंदरी। खिरडली हे।' –शिशु ८३१. 'दांचा उतल्या खिरडत चाले।' –ह २१.१७३. [सं. क्षर्]

खिरण—स्त्री. तंबोरीवर काढलेली काळी वर्तुळाकार आकृति.

खिरणा—पु. एक झाड.

खिरणी—स्त्री. १ राज(य)णीचें झाड. याचें पान बकुळीसारखें व फळ कडूनिंबाच्या निंबोळीसारखें असून आंत चीक असतो फळ मधुर असतें. लांकूड कठिण व चिवट असल्यामुळें रंगारी लोक रंगीत कापड बडविण्यास याचे दांडके घेतात २ खिरणी फळ. –कृषि ७६६. ३ खरबुजाची एक जात. 'शेरें शीताफळें हीं खरबुजें खिरणी सुंदरें तूत बोरें।' –साह्य ३.४९. [सं. क्षीरिका] ॰वाळ्या–स्त्री. बायकांच्या कानांतील एक दागिना. 'खिरणीवाळ्या पोंवळ्याच्या वाळ्या.' –अफला ५५.

खिरणें—न. चाळणी; गाळणी. 'पाटीचें खिरणें.' [सं. क्षरण]

खिरणें—सक्रि. १ गाळणें; चाळणें. –अक्रि गळणें; मधून जाणें; पाझरणें; स्रवणें (मुख्यत्वें धातु, वीर्य, किंवा मूत्र यांसंबंधी). 'कोंदलें असत न खिरे। कवणे काळीं।' –ज्ञा ८.१५ २ झुरणें; झिजणें. ३ वीर्यपात होणें; बेजार होणें. [सं. क्षरण]

खिरणें—अक्रि खिरणें. [सं.=क्षरणें, अपभ्रंश]

खिरतुपडी—स्त्री. (सोंगट्यांचा खेळ) तुप्पी; आपली खेळण्याची पाळी झाली तरी शत्रुपक्षाची सोंगटी मारल्याबद्दल पुन्हां खेळावयास मिळालेला डाव (क्रि० खाणें; खेळणें). [खीर+तूप] ॰खाणें–(ल.) चांगला मार मिळणें, खाणें; झोडपलें जाणें

खिरपण-णी, खिरपिणी-पीण, खिरपणें-पिणें—खितपणी-णें पहा.

खिरपिटया—स्त्रीअव. रेघोटया; फरकाटया; गिचमीड लिखाण. [सं. क्षर्]

खिरवड—स्त्री. (गो.) शेत बाढण्याची निमण; तिरडी.

खिरवड—स्त्री. (गो.) कटकट; कंटाळा.

खिरसाळ—स्त्री. भाताची एक जात [सं. क्षीर+शालि]

खिरा—पु. १ कांकडीची एक जात. याचा रंग हिरवट पांढरा व लांबी ३–९ इंच असते याचे वेल ६ फूट वाढतात. २ एक झाड. ३ घोड्याचा एक रंग. –अश्व १.२८. [अर. खियार=कांकडी]

खिराडी—स्त्री. (ना. व) खारनांवाचा प्राणी. [खराडी]

खि(ख)राडी—स्त्री. १ विहिरींतून पाणी काढावयाचें लोखंडी चाक. मराडी अर्थ २ पहा.

खिरापत—स्त्री. १ कथेच्या शेवटीं श्रोत्यांना वावयाचा प्रसाद; पूर्वी पळीभर दूधसाखर देण्याची चाल होती तीस अनुसरून. ओंडल्याच्या शेवटीं मुली खोबऱ्याचा कीस, साखर यांचा किंवा हरभऱ्याच्या डाळीचा प्रसाद देतात ती. (ल.) २ सढळ हातानें दिलेली देणगी. ३ (ल.) उधळपट्टी. (क्रि० करणें, होणें). ४ (ल.)(गो.) जड्. (प्राणी). [सं. क्षीरपत्र, फा. खैर+आफियत्?] ॰काढणें–क्रि. (ना.) दिवाळखोरी करणें; सळो का पळो करून सोडणें.

खिराळें—न. (कों.) भडसराचें भिंतींतील भोंक. खिळोरें पहा. [खील+आलय]

खिरी—स्त्री. पोलादाची एक जात. [हिं]

खिरीट—पु एक मासा.–प्राणिमो ८१.

खिरीपुरी—स्त्री. १ चैनीचें जेवण, राहणी. (क्रि० खाणें) २ श्रीमंती थाटानें मेजवानी देणें. (क्रि० वाटणें; देणें; वाढणें). [खीर+पुरी]

खिरोटी—स्त्री. (चंद्रपुरी) खोळ. [सं. कील]

खिरोंचें—सक्रि (गो.) खिरपळविणें. [सं. क्षर्]

खिल(ला)त—पुस्त्री. सन्मानाचा पोषाख; राजा खुष होऊन आपल्या हातानें आवडत्या माणसास जो पोषाख देतो तो. (या पोषाखाबरोबर त्या त्या दर्जाप्रमाणें जवाहीर, घोडा, हत्ती, शस्त्रें इ० देत असत) 'बक्षीगिरीचा खिलत.' –दिमरा १.८६. [अर. खिलअत्] ॰फाखरा–पु बहुमानाचा उंची पोषाख. 'खलाअत फाखरे मुम्ताज होऊन.' –वाड १४०.

खिलवत—न. १ खल्वत; एकांत, गुप्त बैठक. २ खल्वतखाना; खाजगी बैठक [अर. खल्वत्]

खिलाई—स्त्री. (व.) खावटी, खुराक, खाद्य. 'म्हशीचें दूध खिलाईवर अवलंबून आहे' [हिं; सं. खाद]

**खिलाडी–डू**—वि. १ खेळण्यांत पटाईत. 'आम्ही हिंदु लोक ... म्हणण्यासारखे खिलाडू होतो किंवा नाहीं याचा फारच संशय आहे.' –आगर ३.१६१. २ खेळकर; आनंदी; उत्साही; हसून खेळून वागणारा. ३ (ल.) थट्टेखोर; गमती. 'तन्हेबाज ती आधीच खिलाडु नवऱ्याच्या गोष्टी ऐकून।' –पला ७८ [सं. खेल्]

**खिलाप(फ)त**—स्त्री. १ खलिफाई; खलिफाची पदवी, काम, मुहम्मद पैगंबराचें प्रतिनिधित्व. २ इस्लामी साम्राज्य. [अर खिलाफत्]

**खिलाफ**—वि. विरुद्ध, प्रतिकूल; उलट 'श्रीमंताची खिलाफ मर्जी करून नवाब ... जातील तर गोष्ट दुरापास्त पडेल.' –रा ३.४५६. [अर. खिलाफ्]

**खिला(ल्ला)र**—न कळप; तांडा (गाई–म्हशींचा). 'जिये गांवीं खिल्लारें। कामधेनूंचीं।' –ज्ञा ९.३२१. 'त्यास पुसे हें कोणाचें खिल्लार।' –ह २९.१८५.

**खिला(ल्ला)री**—पु १ गोप; गवळी, गुराखी; गोवारी 'मी खिल्लारी नंदाचा।' –मुसभा ९ ५१. 'नंदाचे घरचा खिल्लारी।' –ह ३४.२. २ गुरें विकणारा लमाण. –वि गाई, बैल याची एक जात. ०धनगर–पु गाईम्हशी आणि शेळ्यामेंढ्या यांचा कळप राखणारा. याच्या विरुद्ध मिरका धनगर.

**खिलावणें**—न १ खेळ, क्रीडा. २ खेळणें. ३ (ल.) प्रीतिपात्र. 'तुम्हीं तर माझें खिलावणें।' –प्रला १६७. [स. खेल् हिं. खिलौना]

**खिल्ली**—स्त्री. (व) १ चेष्टा, फजीती. २ विनोद, थट्टा. [हिं.; सं. खेल्]

**खिव–खेम**—स्त्री. (गो) आलिंगन [स क्षेम]

**खिशाण–णा–णी, खिसाणा**—वि निराश; लज्जित, खिन्न, दु.खी; कष्टी, श्रमी. [सं. खिद्, हिं खिसाना]

**खिशी**—स्त्री. साडगे; कुरडया, पापड्या, वडे इ० पदार्थ तयार करण्याकरिता शिजविलेलें पीठ (क्रि० घेणें; शिजविणें) [शिजताना खिस! अशा होणाऱ्या आवाजावरून, ध्व.]

**खिसकणें**—अक्रि. (माण) रागावणें, रागानें बोलणें. [ध्व]

**खिसखिसा, खिसखिस**—वि तिडतिडा, तुराडा, चिरडखोर, सदां कुरकुरणारा [ध्व]

**खिसखि(खी)स**—स्त्री. किरकीर, कटकट, चिरडखोरपणाचा आक्षेप, निंदा; गर्हणा, खरडपट्टी. –क्रिवि. खदखदा; खोखो; फिदीफिदी. (क्रि० करणें, हंसणें). [ध्व]

**खिसखिसणें**—अक्रि. १ कचकचणें, दात खाणें (माकडाचें) २ निंदणें; खडसावणें, खरडपट्टी काढणें. [ध्व]

**खिसगणती**—स्त्री. किसगणती (अप); खातर; पर्वा. 'येथील हायस्कूलचे हेडमास्तर व सरकारचे रिपोर्टर हेहि 'एलिफास' साहेबाच्या खिसगणतीस नाहींत.' –नि ६३४. [हिं. किसगिनती स. किम् अस्य+गणना]

**खिसणें**—अक्रि. १ बाजूला होणें; वाटेंतून एकीकडे सरणें; बाजूला सरून जागा करणें. २ दांत खाणें (माकड रागानें करतें). (त्यावरून) ३ रागानें अथवा चिडून अंगावर जाणें. ४ खिजणें; रुसणें. [सं. खिद्; हिं. खसना]

**खिसमत–गार–दार**—खिद शब्दाखालीं पहा.

**खिसमती**—स्त्री. स्त्रियांच्या हातांतील कंकण, हें दुहेरी असून त्यावर पितळी बेगड चिकटवितात, खड्गपात्र. 'चुडे खिसमत्या मोठ्या.' –स्त्रीगीतमाला पृ. ६५. [अर. किस्मत=दैव]

**खिसमीस**—स्त्री. बेदाणा; द्राक्षाची एक लहान जात; यांत बी नसते. [फा. किश्मिश]

**खिसा**—पु. १ कप्पा; कसा; अंगरख्यास पिशवीसारखा भाग असतो तो. २ (ल.) पडदा, कुड; खण; गौण, अंतर्भूत गोष्ट अथवा बाब. 'हें माजघर एक दिसतें परंतु यांत तीन खिसे आहेत.' 'या मामलतेचे पोटीं चार खिसे आहेत.' 'त्या कामामधें खिसे पुष्कळ आहेत.' ३ (ल.) मनांत किंवा पोटांत ठेवलेली गोष्ट; दाबून किंवा दडवून ठेविलेला मुद्दा (सांगण्यातील). (क्रि० राखणें). [फा. कीसा, सीसा] (वाप्र.) ०कातरणें–भामटेगिरी करणें; लुबाडणें; फसविणें. ०गरम करणें–खूप पैसे मिळविणें. **खिशांत टाकणें**–लाविणें, चोरणें. **खिशांतली गप**–स्त्री. निव्वळ थाप ०भरित–वि. खिसा भरून. 'वरी खिसेभरित होन त्यासि अर्पितसे.' –अमृतधुव १५. ०खोकला–पु भांडण-तंटा; बेजबाब वाद [खिसा+खोकला]

**खिसा**—पु. १ बोलाचाली; तंटा, उपसर्ग; त्रास. 'सनखेविषयींचा जाब बोलून खिसा झाला.' –होकै २. २ (व.) गत; स्थिति, अवस्था. खिस्सा पहा. [अर. क्स्सि]

**खिसाणा**—पु खदखदा हास्य; खिदखिदणें. (क्रि० करणें; मांडणें, चालणें). [ध्व]

**खिसारत, खिसारा**—पुस्त्री. १ नुकसान; तोटा. 'यांत फौजेचा खिसारा बेमुबलग होतो.' –रा ५ १९८. 'आपण पंधरा सोळा लाखाचे खिसारतींत आलों.' रा –१.१९२. २ कारवाई, फसवणूक 'असे नाना प्रकारचे खेळ–खिसारे आहेत.' –व ७.३२५८. ३ (ल) फितूर 'सर्कारच्या फौजेंत खिसारा फार पडला आहे' –रा ६.३१५०. ४ गुंतागुंत, कंटाळवाणेपणा; लाबलचकपणा (कामाचा, व्यापाराचा). (क्रि० पडणें); तमेंच गुंतागुंतीचें, कंटाळा आणणारें काम. (क्रि० पडणें). [अर. खिसारत=नुकसान]

खिसारा—पुढी भाग, हिस्सा (कामाचा, रस्त्याचा) [फा खीसा]

खिस्त—स्त्री १ हप्ता २ हप्त्याची किंवा हप्त्यानी फेड, हप्ते वदी ३ हप्त्याची मुदत, अवधि 'खिस्त भरल्यानतर रुपये राहिले तर व्याज पडेल' ४ पैसे कर्जाऊ घेण्याचे अनेक प्रकार हा शब्द दर्शवितो जसें-प्रत्येक सध्याकाळीं थोडें थोडें मुद्दल परत करणें व त्यावरील व्याज देणें, दररोज व्याजाबरोबर मुद्दलाचा कांहीं भाग देणें आणि अशा रीतीनें सर्व मुद्दल फिटेपर्यंत सर्व रकमेवरचें व्याज देत जाणें, दररोज इतकी रकम आणि इतक्या मुदतीपर्यंत देणें कीं दररोजच्या फेडींची बेरीज केली असतां ती मुद्दलापेक्षां अर्ध्यानें, चौथ्या हिश्शानें इत्यादि जास्त होईल, दर रोज सकाळीं कर्ज घेऊन रोज सायकाळीं व्याजमुद्दलासह फेडणें इ० ५ (ल) कामाचा हिस्सा, खिसा अथवा लक्ष पुरविण्याची भिन्न बाब असलेले घोटाळ्याचे अनेक अर्थ या शब्दाचे रूढ आहेत त्रास, त्रासदायक काम 'हें खिस्तीचें काम आहे' 'हा खिस्तीचा रोजगार' 'हा खिस्तीचा स्वयपाक' ६ (ल) विशिष्ट गोष्ट, बाब, रकम, निमित्त, खोटी सबब 'हा पाटील हजार खिस्तीनें छळतो' ७ (गो) आक्षेप [अर किस्त] ०बंदी—स्त्री कर्जाची हप्तेबंदी, हप्त्यानीं कर्ज देण्याचा करार [अर किस्तबदी] खिस्ती खांदा-पु १ खिस्त अर्थ ४ पहा (क्रि० करणें, लावणें, देणें, घेणें, वागणें) २ खादवडा [खिस्त द्वि]

खिस्तीचा-वि १ पुष्कळ खिस्ते, भिन्न बाबी, रकमा लागणारा, यावरून २ (ल) त्रासदायक, खडतर, कष्टाळवाणें (काम, गोष्ट)

खिस्तक—नस्त्री विजारीची दोन मांड्यामधील गुह्यभाग झाकणारी पट्टी [अर किस्तक]

खिस्ताई खिस्तांईचा-व्यापार-व्यवहार-धंदा-काम—स्त्रीपु दररोज किंवा अल्प मुदतीनें कर्ज घेण्याचें आणि व्याजासह तें फेडण्याचें काम, खिस्त अर्थ ४ पहा

खिस्ती—पु गुजराथी ब्राह्मणाची एक जात व तींतील व्यक्ति, जबू -वि १ खिस्तीच्या पद्धतीपैकीं कोणत्याहि पद्धतीनें पैसे कर्जाऊ देणारा, व्याजबट्टा करणारा (सावकार) 'विठोबा खिस्ती मजकारण।'-भवि १६ ३३ २ त्रासदायक, किचकट, खडतर (गोष्ट) ३ -स्त्री सावकारी, व्याजबट्टा 'अर्थी ब्रह्मक्रिया खिस्तीचा व्यापार।'—तुगा ३०६१ [खिस्त]

खिस्त्या—वि खिस्ती (-वि) पहा

खिस्मतगार—खिदमतगार पहा 'खिस्मतगारी करणार।' —नव ११ ६९

खिळ—पु खीळ, प्रतिबधक वस्तु, खुंटी वगैरे 'तोंडींचा खिळ् नव्हतो दुरी। नारोव्हळ न घडे करीं।'—एमा १२ २९

खिळखिळा, खिळखिळणा, खिळखिळीत—वि ढिला, शिथिल, डगमगणारा (सांधा, सांध्याच्या अधूपणामुळें माणूस, वस्तु) (क्रि करणें) [स कीलक, स्खल्?]

खिळखिळॉ-ळो—पु (गो) खुळखुळा, खेळणें [स खेलू]

खिळखिळी—स्त्री सांध्याचा ढिलेपणा, शिथिलपणा —वि (गो) निसळीच्या मागोमाग झालेली मुलगी [स स्खल्]

खिळण—स्त्री १ खिळेबदी, डांबणें, न हालेसें करणें. २ (ल) डामणी, चिकटून रहाणें, खिळून राहाणें (घर, बिछाना, खुर्ची इ०शीं), सांध्याचा किंवा शिराचा ताठरपणा (अर्धांग वायूनें आलेला), दाराशीं घेतलेलें धरणें (तगादादार, गळग्रह, भिकारी यानीं), हट्ट, पाठपुरावा, छंद (एखादी गोष्ट करण्याविषयीं मुलाचा), हटवाद, दुराग्रह (प्रार्थनेत), हट्टास पेटणें किंवा बसणें (क्रि घेणें, धरणें, खिळणीस येणें) [खिळणें]

खिळणें—सक्रि १ खिळेबदी करणें, डामणें, न हालेसें करणें, पक्के करणें, चिकटून राहीसें करणें, जखडून टाकणें, 'कार्दे बाणवरी खिळू। वारयातें।'-ज्ञा ११ ४६१ 'गज खिळोनी केले अचळ।'-मुआदि २३ १३९ २ खीळ किंवा अडसर लावणें, घालणें ३ (ल) रोखणें, अडकविणें 'खिळण पडा' 'मत्री महासर्पे खिळिती।'-दा ९ ८ ३७ ४ चावणें (विशिष्ट लहान कीटकाच्या चावण्याच्या आणि दश धरण्याच्या सबंधीं) ५ (व) पावसाचे थोडेसे शितोडे पडणें ६ (व) उभ्या पिकातील मधलीं झाडें वाळणें [स कील्]

खिळनी—स्त्री, अटक, अडसर, खिळा, खीळ 'नातरी शृगारा खिळनी बाधिली।'—शिशु १८८ (क्रि० बाधणें) [स कीलन]

खिळपट—पु शेतांतील-रस्त्यांतील दगडांचा पोकळ ढीग, वरडा [खिळा]

खिळविणें—सक्रि खिळणें प्रयोजक पहा

खिळा—पु १ खीळ, मेख, लोढणा, लोखडाची अणकुची दार वस्तु २ गाय म्हैस यांच्या स्तनांतून दूध बाहेर निघण्यास आतील प्रतिबध करणारा मळ, हा जनावर व्याल्यानतर काढावा लागतो ३ रचलेल्या दगडांचा ढीग, वरडा, एखादी शंक्वाकृति रचना ४ जमिनींतून नुकताच बाहेर येणारा अकूर ५ तीन अथवा चार गांवांच्या सीमा एकत्र मिळण्याचें ठिकाण ६ छापण्याचा ठसा, टाइप ७ (माण) गाडीच्या जोखडांतील भोकात (बैलास दुसरी कडे खांदा वळवितां येऊ नये म्हणून) बसविण्याची खुंटी, दांडा, शिवळ खिळ्याचे प्रकार-स्क्रू, टेकस, कुन्हाडी, तारेचा [सं कीलक, प्रा खीलओ, गु. खिलो, ब ओरि खील, खिल]

म्ह० खिळ्यासाठीं नाल गेला, नालामार्टी घोडा गेला, घोडयासाठीं स्वार गेला, एवढा अनर्थ खिळ्यानें केला=शुल्लक चुकीपासुन परंपरेनें मोठा अनर्थ गुदरतो. ०जोडणार-पु. ठसे, टाइप जुळविणारा, कंपाझिटर. ०पट्टी-स्त्री. १ घराचें लोखंडी काम. 'घर तर झालें खिळापट्टी व्हायाची आहे.' २ कपाळावर लाविलेल्या तांबड्या गंधाच्या दोन ओळी व त्यांत सुपारी जाळून तिचा किंवा कस्तुरीचा लाविलेला टिळा. त्यावरून **खिळेपट्टी करणें**-लोकांच्या घरीं जेवणें. 'आज कोठें खिळेपट्टी झाली?' ०माणी-वि. लोखंडी खुंटी व तिच्या भोवतीं लोखंडी मायणी असणारें (जातें). किलेमाणी पहा. **खिळारें**-खिळोरें पहा.

**खि(ळि)ळी**—स्त्री. १ (विणकाम) हत्येच्या चौकटीच्या दोन्ही बाजूंच्या दोन खुंट्या; (सामा.) दाराचा अडसर, खिळा, मेख. २ खीळ पहा. (खिळी हा शब्द खीळ शब्दाबद्दल कोंकणांत वापरतात). ३ (गो.) दाराची कडी. (कु) खिटी; आडणी 'खिळि लाउनि धरला वाडा।' -आप ८६. [स. कीलक]

**खिळीव**—वि. डांभलेला; न हालेसा केलेला [कील]

**खिळेखुरदा**—पु. तोफेंत किंवा गोळ्यांत भरलेले खिळे, लोखंडी तुकडे, दगड इ० [खिळे+खुरदा]

**खिळेछाप**—पु शिसाचे अक्षराचे ठसे, टाईप. याच्याविरुद्ध शिळाछाप, लिथोग्राफी.

**खिळेपट्टी, खिळेमाणी**—खिळा पहा.

**खिळोटी**—स्त्री. (ना.) दार लावण्याचा खिळा, अडसर.

**खिळोट्या**—वि. (व.) एखाद्याच्या कामात खीळ (अडचण) घालणारा. [खिळा]

**खिळोरें**—न. (राजा. कों.) दरवाजाचा अडसर राहण्यासाठीं बाजूच्या भिंतींत ठेवलेले दोन कोनाडे, मोठीं भोकें; अडसराचें कुलंगडें. (क्रि० घालणें). [खिळा]

**खीच**—स्त्री. खिचडी. खिच पहा.

**खींच**—वि. (गो.) गच्च.

**खीचपुरी**—स्त्री. खिचडी. 'मनपवनाची खीचपुरी। वाढ्नियां।' -ज्ञा १८.१०४०.

**खिस्सा**—पु. किस्सा पहा. कर्मकहाणी; अवस्था, स्थिति; तऱ्हा; गोष्ट; गत. 'ठगाच खिस्सा लिहिला तो प्रमाण काय.' -वाडसमारो ३.६९. 'नवे नवेच खिस्से काढून धारामतीस गेले.' -रा ६.३१६५. [अर. किस्सा]

**खीज**—स्त्री. रुसवा; चिरड; चीड; इतराजी. (क्रि० येणें.) [सं. खिद्]

**खीट**—न. १ गुरांच्या गळ्यांत बांधलेली काष्ठघंटा, लाकडी गोळा, घाट २ लहान लाकडी गुंडी. खिटी पहा.

**खीण**—पु. (कु.) क्षण. खिण पहा. [सं. क्षण]

**खीण**—पु. (गो.) घड्या; वण. खिण पहा. [सं. किण]

**खीमा**—पु खिरापतीसारखा किंवा तिच्यापेक्षांहि बारीक किसलेला पदार्थ. खिमा पहा. [अर. कीमा]

**खीर**—स्त्री, दुधांत गव्हले, तांदूळ, साखर इ० घालून आटवून केलेलें पक्वान्न; गोमतरांत रताळ्याचे तुकडे, तांदुळाचें पीठ, गूळ इ० पदार्थ खिरींत घालतात. खिरीचे प्रकार-गव्हल्यांची, फणोल्यांची, नखोल्यांची, मालत्यांची, बोटव्यांची इ० [सं. क्षीर; प्रा. खीर; सीगन खील; सिं. खीरु; पं. हिं गु. खीर, ओरि. खीरी] (वाप्र.) **खिरींत तूप पडणें**-चांगल्या पदार्थाशीं दुसऱ्या चांगल्या पदार्थाचा संयोग होणें. म्ह० १ पोर पोटांत खीर ताटांत=मूल होण्यापूर्वीच त्याच्या उत्सवाणाची तयारी; यावरून (ल.) अतिशय उतावळेपणा. २ जेथें खीर खाल्ली तेथें राख खावी काय? =जेथें फुलें वेचलीं तेथें गवऱ्या वेचाव्या काय?• सामाशब्द- **खिरींत सराटा**-पु. चांगल्या माणसांतील वाईट माणूस, समाजांतील त्रासदायक माणूस; समाजकंटक; उपाधि; व्याद; कांटा; (बायकी भाषा) विरूप माणूस; चांगल्या नाजूक वस्तूंतील वाईट व भसाडी वस्तु; एकचित्त मंडळींतील प्रतिकूल व्यक्ति. **खिरींत हिंग**-पु. चांगल्या मनुष्यांतील, वस्तूंमधील वाईट माणूस, वस्तु.

**खीरम्या**—पु. उंची वस्त्र.

**खीळ**—स्त्री. १ दरवाजाला लावण्याचें, लोखंडाचें किंवा लांकडाचें केलेलें आडकण; अडसर; खुंटी, शंकु. २ शिडीच्या पायऱ्या प्रत्येकी. ३ लांकडांचा सांधा जोडावयासाठीं मारलेला खिळा. ४ खिळा. ५ स्तनाग्रांतील दुग्धप्रतिबंधक मळ. (क्रि० बसणें; फोडणें) ६ हाडाचा सांधा; खुबा; जसें-कोपराची-ढोपराची-दांताची-मनगटाची-पायाची-खीळ. ७ (व.) गर्द अथवा खांड्क यांच्या तोंडावर जमलेली पुवाची गोळी, खडा. खिळा पहा. ८ शिनंळ. [सं. कीलक] (वाप्र.) ०फोडणें-जनावर व्याल्यानंतर त्याच्या स्तनांतून दुधाच्या चार धारा काढणें. ०बसणें-घालणें-अडथळा आणणें. म्ह० चालत्या गाडीस खीळ=सुरळीतपणें चालत असलेल्या कामात विघ्न आणणें.

**खुकारा**—पु धुत्कारा; जोराची हांक; हरळी. [ध्व.]

**खुखु**—क्रि. जलद व हलकें हास्य; खीखी हासणें. (क्रि० हंसणें; करणें) -क्रिवि. खीखी हसण्याचा आवाज; फिदीफिदी. [ध्व.]

**खुजट-ड**—वि. काहींसा खुजा; अकालीं वाढ खुंटलेला; खुरट; टेंगणा. 'तूं उभा ना बैठा। दिघडु ना खुजटा।' -ज्ञा ११.२७७. 'वामनरूपातें मानिती खुजड।' -दावि २२९. [सं. कुब्ज; प्रा. खुज्जो, खुज्ज; म. खुजा] ०पण-न. टेंगणेपण.

'सर्वेचि खुजटपण सांडिलें।' –एरुस्व २.१६. ०हाड–न. लहान मुलाचें हत्र हद्द वाढणारें हाड. याच्या उलट उफाड्याचें हाड.

**खुजरत**—खुदरत पहा.

**खुजस्ते**—वि. शुभ; कल्याणकारक. [ फा. खुजिस्ता ] ०अख्तर–वि. सुदैवी; चांगल्या नशिबाचा, नशीबाचा –रा ८.७७. ०फर्जाम–वि. सद्गतीस पोंचलेला. –रा १५.२५१. ०बुनियाद्–वि. कल्याणकारक पायाचें; औरंगाबाद शहराचें गौरवपर नांव शाहुरोजनिशी ३८. ( हें औरंगाबादेचें नांव औरंगजेबाच्या हयातींत प्रचलित होतें ).

**खुजा**—वि. ठेंगणा; ठेंगु; बुटका; ऱ्हस्व; वाढ खुंटलेला. 'नादब्रह्म खुजें।' –ज्ञा १५.१३. 'मेरुही मजशीं खुजा,' –आसी ४१. [ सं कुब्ज; प्रा. खुज्ज, खुज्जो; तुल० फा. गुज्ज ] ०वड–वडवृक्ष पहा.

**खुजा–जो**—पु. १ लांब व निमुळत्या मानेचें पाणी ठेवण्याचें मातीचें भांडें; चंबू; सुरई. 'तावे, जांब, खुजे, प्रशस्त तिवया, ताटें नवीं तासकें।' –सारुह ३४३. २ ( गो. ) ( सोनारीधंदा ) सोनें शुद्ध करण्यास लागणारें कांचेचें भांडें, मूस. [ सं. कु=पृथ्वी+जा; फा. कूझा; इं क्रूझ ]

**खुंट**—पु. १ खालीं राहिलेला भाग; खोड; काड; सोट, बुंधा ( झाड, झुडप, शेपूट, केरसुणी, हजामत झाल्या नंतरचे केंस इ० चा ) 'समूळ फोडियेले खुंट।' –एरुस्व १०.७६. २ ( मासे मारण्यासाठीं समुद्र किंवा नदी यांत ) रोंविलेला खांब, खांब. ३ ज्यामध्यें फाळ बसवितात तें नांगराचें टोंक; खुळसा; बोळसा. ४ गाय, म्हैस यांच्या आचळांतून दूध येण्यास प्रतिबंध करणारा मळ ५ गोफण, जाळें, शिंकें करण्याकरितां दोरीचे दोन पदर अथवा पेड तिरकम बाहेर ओढले जातात त्यांपैकीं शेवटचे तंतु पुन्हा याच रीतीनें बाहेर काढले जाऊन वळले जातात, अशा शेवटच्या तंतुपैकीं प्रत्येकास खुंट म्हणतात. ६ दूध न देणारा जनावराचा सड, मुका, आंधळा सड. ७ पृथ्वीचे चार कोपरे, 'हिंडे देश कोण खुंट चारी।' –तुगा ११८. 'चार खुंट जहागीर. ८ दणकट शरीराची गाय, म्हैस, जनावर किंवा स्त्री. 'काळवीट खुट खरे,' –ऐपो २४२. ९ मध्यम आकाराचा केळीचा कोंब, खोड, मोना ( मोठ्या केळीस चिकटलेला किंवा निराळा काढलेला ). १० चार रस्त्यांचा चौक, चौहाट; अड्डा. ११ रस्त्याचें टोंक, शेवट. १२ (ल ) कुटुंब; घरदार; त्यापैकीं एक व्यक्ति, वंशाची शाखा; वंशातील मूल; वंशाचें फल, संतान १३ घुगडीचें मळसूत्र ज्यांतून जातें तो भाग, घुगडीचा, छज्जांचा कानातील भाग. १४ अंगरख्याच्या बाहीच्या चुण्या जींत एकत्र करतात ती पट्टी अथवा गजासारखी शिवण. १५ ( ल ) आधारस्तंभ, आश्रयदाता. १६ ( आंधळ्या कोशिंबिरीच्या खेळांत ) आंधळ्याचें सोंग घेणाराचे डोळे झांकणारा मुलगा; भोग्या. १७ ( गो. ) कुंपणाची काटी. १८ ( कों. ) तुकडा. १९ खोखोच्या खेळांतील न हालणारा गडी. 'होऊनियां खुंट बसा जपून.' –भोगऱ्यांची कविता, मराठी तिसरें पुस्तक खेळ ५ पृ. ४८. २० ( ढोरधंदा ) अत्यंत आखूड सळ. २१ कांठ, कोपरा. 'खटितां कुंप कांटी खुंट दरडी न पाहे।' –तुगा ३४९. २२ स्वारी; उतारू ( गाडीमधील ) २३ खांब; मेढ. 'मग परमस्नेहाचा खुंट उभवोन । गरके घालिती त्यासवें।' –नव २४.१५५. २४ जनावरास बांधण्यासाठीं जमीनींत गाडलेला लांकडी खुंटा; दांडकें. २५ वाघूर लावण्यासाठीं ठोकलेल्या लाकडाच्या मेढी; खुटला.' –वि. ( गो. ) ताठ; नीट [ सं. कुट्-कुंट्=स्तम्भित होणें; प्रा. खुंट; तुल० का. कुंट्ठ=लंगडा ] ( वाप्र. ) ०होणें–हट्ट धरून खुंट्या सारखें ताठ व स्तब्ध बसणें. ०ळणें–भात इ० चा एक एक दाणा लावण्यासाठीं जमीनींत खुंटीनें, किंवा काठीनें टोचा, भोंक पाडणें, टोवण. **खुंटास खुंट उभा राहणें–होणें**–एक जातो तोंच त्याच्या जागीं दुसरा येणें; गेलेल्याची जागा नवीन येणारानें भरून काढणें; खंड पडल्याची जागा भरून काढणें. **खुंटास खुंट घेणें**–जशास तसें करणें; उसनें फेडणें. **खुंटासारखा उभा राहणें–असणें–खुंटणें**–खुंटाप्रमाणें ताठरणें, ताठ उभा राहणें. म्ह० आजा मेला नातु झाला खुंटास खुंट उभा राहिला. खुंटावरचा कावळा=घरदार, वतनवाडी, बायकामुलें नसलेला, वाटेल तेथें राहणारा माणूस. सामाशब्द-०कन–कर–दिनीं–दिशीं–क्रिवि. तीव्र व हलक्या आवाजानें; खाडदिशीं ( दोन काष्ठांचा परस्परांना लागून होणारा शब्द ) ( क्रि० वाजणें ). चुटकी, टाळी यांच्या होणाऱ्या आवाजांप्रमाणें शब्द होऊन ०कळी–स्त्री. बगलकळी; अंगरख्याच्या पाठीमागचा त्रिकोणी तुकडा. बगलेंतील पेशकळी आणि आगा असे दोन तुकडे व खुंटकळी मिळून अंगरख्याची एक बाजू होते. **खुंटण**–न. खुंट अर्थ १–२ पहा. ०पान–न. ( राजा. ) केळीच्या गाभ्यापासुन निघणारें शेवटचें आणि कोंक्याच्या पूर्वी येणारें आखूड पान. ०बरा–पु खुंटी, खुंटा पहा. ०बावली–स्त्री. १ ( राजा. ) एक प्रकारची बाहुली २ उंचीवरचा पदार्थ काढण्यासाठीं चवड्यांवर उभें राहणें ( क्रि० करणें ). अशा रीतीनें खुंटबावलीवर उभें राहणें. ३ ( निंदेनें ). काम न करणारी व खुंटासारखी तिष्ठत रहाणारी स्त्री. ०बाळी–स्त्री. स्त्रियांचें एक कर्णभूषण. 'खुंटबाळ्या साध्या बाळ्या त्याजवर।' –अफला ५५. ०भाजी–स्त्री. विशेष विस्तार व्हावा म्हणून पुन्हां पुन्हां अग्रें खुडून राखिलेली भाजी; खुंटापासून किंवा मुळापासुन निघालेला कोंब व त्याची भाजी. ०रोग–पु. १ पुष्कळ दिवस खुंटास बांधून ठेवल्यामुळें पशूंना येणारा रोडकेपणा किंवा होणारा आजार. २ ( ल ) अशा बैठेपणापासून होणारा

आजार, रोग. ०रोगी–वि खुररोग झालेला खुंटला–पु (व) गाडीच्या दोन बाजूस (आंतील सामान बाहेर पडूं नये म्हणून) लाविलेले खुट प्रत्येकी ०सार–वि (गो) खुटासारखा

खुटकणें–कि हटकला किंवा थांबविला जाणें खुडकणें पहा

खुटकाविणें–खुडकाविणें पहा

खुटखुट–स्त्री १ विशिष्ट प्रकारचा बारीक आवाज (बिळांत किंवा गवतांत खुसखुसणाऱ्या उंदरांचा, एकमारमा आणि हलकेंच थाप मारण्याचा किंवा ठोठावण्याचा, कडकड चावण्याचा किंवा तोडण्याचा) २ पोटात होणाऱ्या बारीक वेदना, चावल्या सारखें वाटणें, गुरगुरणें, तिडीक, कळ 'दोन पटका पोटांत खुट खुट चालली आहे' [खुट्] खुटखुट–टां–क्रिवि वरील प्रकारचा आवाज होऊन खुटखुटी–स्त्री १ (ताठपणाच्या अथवा तडक स्वभावाच्या मनुष्याचें) उतावळेपणे, फुगणें, जोराचा श्वास २ हाव, कंडू, आग, सोस

खुटखुटणें–अक्रि १ खुट! खुट! असा शब्द हाईसें वाजणें २ किंचित् स्फुरणें, हुसणें (पोट किंवा दुसरें थोट यात), खुदखुदणें, तडतडणें, उडणें, ठकडकणें 'खरूज खुटखुटती' =खरजेनें विकार पावलेलें अग तडतडतें (खरूज तडतडत नाहीं) [खुट्, ध्व]

खुटखुटीत–वि १ खुटखुटीत, आटोपशीर, लहान आणि दुमदार, आटोपता, मत्सर, लहानसर (घर, शरीर, काम, ससार) २ खुसखुशीत, कुरकुरीत, खरपूस, कुरकरीत, खुसखुशीत; कडक व वाळलेलें 'हा पदार्थ सुका असल्यामुळें खुटखुटीत लागतो'

खुंटचें–सकि (गो) तोडणें, खुंटणें (नारळ, पानें इ०)

खुटण, खुटणभर–न नागरणीचा सामान्य पल्ला किंवा प्रमाण, बैलाच्या शक्तीचें प्रमाण याच अर्थी अऊटभर किंवा औट भर असेंहि म्हणतात औटभर पहा [स कुट् म खुटणें]

खुंटणावळ–स्त्री धान्यें, भाजी खुटण्यासाठीं तीं तोडण्यास लावलेल्या लोकांची मजुरी [खुटणें]

खुंटणी–स्त्री एक वनस्पति

खुंटणी–स्त्री बोटांनीं पिळवटून काढणी, तोडणी [खुटणें–धातुसाधितरूप]

खु(खुं)टणें–सक्रि बोटांनीं पिळवटून अथवा नखांनीं तोडून काढणें, तोडणें, खुडणें (भाजी, द्विदल धान्याची शेंग कणसें इ०) 'कणसें खुंटिती कृपीवळीं।'–मुआदि ४९ ११४ [स कुट्]

खु(खुं)टणें–अक्रि १ गतींत रोध होणें, गति कुंठित होणें, बंद पडणें, थांबविला, अडकविला, रोखला जाणें, स्तम्भित होणें, थांबणें, थबकणें 'कीं क्षुधातृषादि आर्ति। खुंटलिया।' –ज्ञा ३ ५९ २ (ल) कुंठित, निरुत्तर, गतिहीन, थक होणें, दाबली जाणें, दडपणें (उत्कंठा, आशा) ३ वारंवार हटून बसणें, दुराग्रहपूर्वक किंवा निश्चयपूर्वक खिळणीस येणें, खिळण येणें, हट्टास पेटणें, समजुतीला दाद न देणें, अडून बसणें ४ तुटणें 'दोर खुटला तो पडि होऊन गेला।'–ऐपो १७ ५ कमी येणें, कमी होणें, अपुरें पडणें 'दोन मण गुळांत दहा शेर खुटला' [स कुट्=अडथळा करणें, तुल० का खुटु=लगडणें]

खुटन–न (माण) नागरताना औत फिरण्याची नेमलेली जागा, पल्ला खुटण पहा

खुटयाळें–न (गा) खुंटाळें, अनेक खुंट्या बसविलेली एक पट्टी [खुंटी]

खुटवळ–पु (कु) ववळ तोडल्यावर जमीनींत राहिलेला खुट. [खुंट]

खुटवा–पु (नाविक) बंदरांत वरवा करण्यास आलेल्या गलबतावरील किंवा आपल्या हद्दींतील समुद्रात नांगर टाकणाऱ्या गलबतावरील जहाज, सरकारी कर (हा दहा टनावरील जहाजावर असता) [खुटणें=थांबणें]

खुंटविणें–सक्रि अटकाविणें, अडविणें, रोखणें, थबकविणें, कुंठित करणें, गतीत विरोध करणें [खुटणें प्रयोजक]

खुटा–पु (व) खुटा

खुंटा–पु १ डांभ, मेख, दांडकें २ जात्याचा लाकडी दांडा (दळताना हातात धरावयाचा), जात्याची खीळ, खुंटी, खुंटेल, वल्ह्याचा दांडा, तसल्या आणीक वस्तु ३ (सोंगट्यांचा खेळ) दुफाशी खेळात, उभे पडलेल्या दोन फाशापैकीं एक –शास्त्रीको. ४ मोठी खुंटी [म कुट्–कुंठ=कुंठित करणें, का गूट=मेख] (वाप्र) ०गाडणें–पाय रोवणें ०बळकट–खबरदार–असणें–बळिष्ठ भक्कम आश्रयदाता असणें खुंटाच्याखालीं घालणें–विद्या शिकण्यासाठीं पतोजीच्या हाताखालीं ठेवणें (पाय) ०वणें–विणें–अक्रि १ थांबविला, खिळला जाणें २ स्वतःस बळकट बसविणें, अढळ रहाणें ०विणें–सक्रि १ जमिनींत घट्ट बसविलेल्या खुंटास पायाचा तळवा बळकट बांधून आणि खुंटाच्या शेवटावर पाचर ठोकून आखडलेला किंवा ताठलेला पाय सरळ करणें २ (मंत्रानें, पिशाच्च वगैरे) बांधून टाकणें, त्यांची उपद्रव शक्ति कमी करणें ०हलवून (किंवा हलवून खुंटा) बळकट करणें–एखाद्या गोष्टीचा निकाल आपले विरुद्ध झाला असता पुन्हा तीच गोष्ट अयोग्य वेळीं किंवा अयोग्य रीतीनें काढून पूर्वीचा प्रतिकूल निकाल पक्का करून घेणें खुंट्याच्या जोरानें दावें ओढणें–उड्या मारणें–आपला आधार भरभक्कम आहे अशा समजुतीनें बेपरवाईनें वागणें म्ह० खुंटावरचा कावळा–सनरा पिंपळावरचा मुंजा या अर्थी सामाशब्द–खुंटाड–न खुंटापर्यंत तोडलेलें झाड, निरुपयोगी खुंट, मोठ

[खुंट-निदार्थ्यंजक] ०ड्या-वि विनोदानें यॅग्नर लोकांस म्हणतात, कारण त्याच्या कपाळास कस्तुरीची उभी रेघ लाविलेली असते म्हणून. ०पळी-स्त्री. भक्कम व आखूड काठी. ०प्रा-पु खुंट; ठोंब; उभा सोट. ०फळी-स्त्री. १ गुराखी मुलांचा एक खेळ. २ (तुळजापूर गांवीं) घोड्यांवरील जकात, खुंट्यामागें घ्यावयाचा कर. 'त्या स्थानीं (तुळजापूर गांवीं) यात्रा येते तीस कर द्यावा लागतो त्यास खुंटाफळी म्हणतात' –तीप्र २०७. खुंटारा–पु (कों.) १ खुंट. २ पाण्याचा रहाट किंवा तेल्याचा घाणा यास बैल जुंपून त्यास फिरण्यास शिकविण्यासाठीं खुंटा पुरून जें यंत्र करितात तें; खटारा. ३ (गो.) झिजलेला, खराब व जुना खराटा, खराट्याचा बुडखा. खुंटारो–पु (गो.) विस्तार नसलेला किंवा आखूड तुकडा ०घणी–स्त्री. (गो.) मासे धरण्याचा एक प्रकार. ०वरो–पु (गो कु) जुनी वाढवण; झिजलेली केरसुणी. खुंटावळी–स्त्री. मुका वळविण्याची भक्कम आणि आखूड काठी, दांडकें. खुंटाळा–स्त्री. (निदार्थ्यजक) वांझ स्त्री. खुंटाळें–न. खुंट्यांचा सच. खुंटाळ्या–पु १ न्हावी; (निंदाव्यजक). न्हावगंड. २ खुंटाड्या पहा.

खुटाण—न (कु.) विडीचें थोटूक. [खुट]

खुटाला—पु सुतांची गुंतागुंत काढण्याचें एक यंत्र [खुंट]

खुटी—स्त्री. खडखड आवाज होणारी जनावराच्या गळ्यांत बांधलेली लाकडी लोळी, घंटा. [खुंट]

खु(खुं)टी—स्त्री. १ लांकडी मेख २ लहान लाकडी खुंट, सोट थस, खुळका; खड. (क्रि० मारणें). 'तीन रात्र खुंटी बांध लीसे।' –व ५२. ३ (कों.) शिवेची खूण, खूट, क्षेत्रमर्यादा. ४ (सुतारी धंदा) दोन लाकडाचा सांधा जोडण्यासाठीं मारलेली पाचर ५ (खान) वस्त्राच्या रुमणीची मूठ ६ (छापखाना) फर्मा आवळण्यासाठीं ज्या काड्या ठोकतात, त्या ठोकण्याचें साधन. ७ (खडी काढणें) ठसे उठविण्यासाठीं वरून दाबण्याचा लांकडी दांडा. ८ वस्त्रें वगैरे ठेवण्यासाठीं भिंतींत बसविलेला लहान खुंटा. ९ (गो) एक दैवत १० (कों.) हमालाच्या ज्या टोकांत नागरखुंट व लुमणी घालतात तेथें ती बाहेर पडूं नये म्हणून हमालाला भोंक पाडून त्यामध्यें घालावयाचा लांकडी तुकडा, खिटी [खुट] (वाप्र) ०उपटणें–घालवून देणें, (कामावरून अथवा अधिकारावरून) काढून टाकणें, पदच्युत करणें ०(आंत)ठेचणें–मारणें–राखणें–थांबविणें, अटकविणें. ०पिरगाळणें–पिळणें–पिळ घटणें–मारणें–१ प्रयत्नात किंवा बेतांत अडथळा आणणें, एखाद्याचें बहुतेक पुरें झालेलें काम नासविणें, बेत हाणून पाडणें २ खिजविणें, भांडण लावणें, भांडण करण्यास उत्तेजन देणें. ३ आपल्या योजनेच्या किंवा आरंभिलेल्या कार्याच्या विरुद्ध दुसऱ्या कोणी खटपट केली असतां ती सफळ होऊं नये म्हणून अगोदरच आपण सावधगिरीनें तजवीज करून ठेवणें खुंटीस अडकणें–लटकत होणें, थांबलें असणें, राहणें; भिजत पडणें. खुंटीस गाठोडें–गयाळें लागणें–वादविषयक मालमत्तेचा निकाल न होणें, ती न्यायनिविष्ट असणें, व्यवस्था लागण्याच्या तयारींत असणें; तिकडे लक्ष्य असणें; प्रवेश होणें; घोट शिरकविणें; केवळ उतारकरू असणें; पडशी खुंटीवर तयार ठेवणें, हुद्द्यावर भरापी कायम न होणें; घटकोपटकीं वहतर्याची वाट पहाणें. म्ह० (गो.) खुटीक चेपें दवरप=आपण हजर आहों, अशा अर्थाची खूण म्हणून खुंटीला चेपें (टोपी) लावून ठेवणें.

खुटुखुटु—क्रिवि हळू हळू; मंद गतीनें; जडपणानें, रखतखडत, रेंगाळत (चालू काम, घोड्याची चाल).

खुंटे-खुटले—पुअव बैलगाडीच्या बाजूच्या धोकट्यांना भोकें पाडून बसविलेलीं उभीं लांकडें. खुंटेउपट, खु(खुं)टी उप(पा)टद–स्त्री. घोड्याच्या ७२ दोषांपैकीं एक खोड. असल्या अपशकुनी घोड्याच्या मालकाला आपल्या कामांत अपयश येतें, हा दोष म्हणजे रोम (केस) उलट फिरलेली किंवा उजव्या गुडघ्याखालील उलटा भोंवरा होय –मश्वप १.९९. –वि. ज्या चाकराच्या पायगुणानें यजमानाचा तोटा (अधिकार जाणें इ०) होतो किंवा कांहीं वाईट होतें अशा चाकरासहि हा शब्द लावतात. २ उपरी, चार दिवस राहणारा (उतारू, वाटसरू.) ३ सुटे उपाड असणारा (घोडा) [हिंदी] ०खळाळ–वि. १ खुंट्यास, बांधलें असतां त्या भोंवती खळखळ करणारा, गडबड करणारा (घोडा, बैल) यावरून २ (ल) रानोमाळ हिंडणारा, भटकणारा; भटक्या. ०गाड –वि १ डाव्या गुडघ्याखालीं भोंवरा असणारा (घोडा). हें शुभचिन्ह असून यामुळें धन्याची चाकरी स्थिर होते २ (व.) उपद्व्यापी, व्यर्थ खटपट करणारा. [हिंदी] ०वाळी–स्त्री वायकांचें एक कर्णभूषण, खुटवाळी.

खुटेकर—पु धनगरांच्या जातींतील एक प्रकार. धनगरांत खुटेकर, हटकर, सेगर व सणगर असे चार प्रकार आहेत –थोमारो २.

खुट्ट—न जलद आणि वद्द आवाज; यत्किंचित् आवाज (दोन काठ्या, परस्परांवर आपटल्यानें झालेला) [ध्व.]

खुट्टी—स्त्री शौचकूप. [हिंदी]

खुट्यार दवरप—क्रि (गो.) परवा न करणें.

खुंट्या—स्त्रीअव. (बैलगाडी) पाचरा कळीचीं बाहेरील टोकें व पातें वगैरे भक्कम करण्यासाठीं योचा उपयोग होतो. [खुंटी] खुंट्यावरचा अथवा खुंटीवरचा कावळा–पु १ उपरी; उतारू, वाटसरू. २ कोणीतरी, अनोळखी माणूस; कोण? कोठला? ३ (ल) अल्प सुख किंवा दुःख, क्षणिक गोष्ट; पाण्यावरचा बुडबुडा. खुंट्याचळ–खुंट्याळें–न. (गो) खुंटाळें

खुड—उद्गा. कोंबड्या, फायले इ० ना हांकलून देतांना उच्चा रावयाचा शब्द; हट्! [ सं. क्षुर; प्रा. खुर; ध्व. ]

खुड—स्त्री. छाट; काट ( कोंवळया हरभऱ्याच्या शेंड्यांची ); ( याची भाजी करतात ). [ खुडणें ]

खुडकणें—अक्रि. १ स्नायूंच्या संकोचानें आखडणें; खिळ-स्याप्रमाणें वाढून ताठ आणि जड होणें ( अवयव ). २ अडकणें; थांबणें; थबकणें. 'योढिजती मग खुडके। मृगु जैसा।' –ज्ञा १४. १४८. ३ खुटणें. ४ ( व. ) पडून जाणें. 'चल खुडकं येथून.' [ सं. क्षुद्रक=घोटयाचें हाड; प्रा. खुडक्क=उगें रहाणें, ताठणें ]

खुडका—पु. झिडकारणी; हेडसावणी; खडसावणी ( क्रि० देणें ). [ खुड ! ]

खुडकाविणें—सक्रि. १ खुड असें म्हणून पक्ष्यांना हांकलून देणें, यावरून २ (ल.) झिडकारणें; जोरानें हांकलणें; धुत् करणें; हेडसाळणें ( तिरस्कारानें ) [ खुड ! खुड ! ध्व. ]

खुडखुड—स्त्री. प्राणांतिक आचका, आंसडा, वळवळ. 'खुडखुड केली आणि प्राण सोडला.' [ध्व.] खुडखुडां–क्रिवि. विशिष्ट प्रकारचा ( पोटांतील खुटखुटण्याचा, कापण्याचा, थरथर-ण्याचा; दांताच्या कडकडण्याचा; मरणाऱ्या पक्ष्याच्या फडफड-ण्याचा; मरणाऱ्या किंवा जखमी मनुष्याच्या धडपडण्याचा इ० ) आवाज होऊन ( क्रि० वाजणें; करणें ) खुडखुडणें–अक्रि. १ थंडीनें कुडकुडणें. २ ( पोटांत थोडेसें ) खुटखुटणें. ३ खुटखुट असा आवाज होणें. [ ध्व. ]

खुडखुडी—स्त्री. हींवतापाची हुडहुडी, कंप, कांटा. [ध्व.]

खुडखुडीत—वि. १ खुटखुटीत पहा. २ हलका व आटोप शीर; सुटसुटीत व लहानसर; चपळ व हलक्या अंगाचा. ३ खड-खडीत; टणक आणि मजबूत ( म्हातारा ); कडक आणि सुक-लेला; कडक व कुडकुडीत; चुरचुरीत व कुरकुरीत ( पूर्वी ओली असून चांगली वाळलेली वस्तु ) ४ आटोपशीर; डुमदार; ( शरीर, घर, काम ).

खुडगा-गी—पुस्त्री. (कों.) गाडीच्या साटीचे खुंटे प्रत्येकीं; करळी.

खुडणी—स्त्री. धान्याच्या कणसाची तोडणी, वेचणी, काटणी. [ खुडणें ]

खुडणें—सक्रि. बोटांनीं पिळवटून किंवा नखांनीं तोडून काढणें; तोडणें; खुटणें; ( सामा. ) नखांनीं तोडणें. 'जैसी वरिवरी पालवी खुडीजे।' –ज्ञा २.३०५. [ सं. कृतन; खुड्=तोडणें; म. खुंटणें; प्रा. खुड ]

खुडणें—खुडकणें पहा. वाकणें; खुरकडून वसणें. 'खुडित मस्तक हस्त पदां नमी।' –अकक हरिराज–मुद्गलाचार्य विरचित रामार्याचें भाषांतर ११. 'भारद्वाज चाप परदुःखानें खुडती।' –ऐपो ३११.

खुडत(तु)डणें—अक्रि. १ खुडणें अर्थ १ पहा. २ दांतांनीं कुरतुडणें, तोडणें. 'तूं दांतांनीं नखें खुडतुडं नको.'

खुडन्—स्त्री. (व.) संवगत झाल्यावर धांड्याचीं कणसें कापून घेणें. [ खुडणें ]

खुडबुड—स्त्री. विशिष्ट आवाजाचें अनुकरण ( गवतांत किंवा गाडग्यात उंदीर वगैरेच्या खडबडीचें ) [ ध्व. ] खुडबुडणें–अक्रि. खुडबुड आवाज करणें, होणें.

खुडबुडाट—पु. मोठी खुडबुड. [ खुडबुडचें आधिक्य ]

खुडमुळ—न. फुलाची कळी. [ सं. कुड्मल ]

खुडसणा—स्त्री. १ पश्चात्ताप; अनुताप; खेद; हुरहुर रुख-रुख ( मनास लागलेली ); ( क्रि० लागणें; राहणें ). २ उत्कट इच्छा; हांव. 'ज्या खुडसणी धरली होती ती आज फिटली.' [ सं. खुड्=तोडणें ]

खुडसणी—स्त्री. १ खुडणी. २ छाटणी. ३ खडसावणी, झिडकारणी. [ सं. खुड=तोडणें ]

खुडसणें—सक्रि १ (कों.) नखांनीं खुडणें, तोडणें. २ खड-सणें; छाटणें (झाडें). ३ (ल.) खडसावणें; खडकावणें; झिडकारणें.

खुडसाविणें—सक्रि. १ खुड म्हणून पक्ष्यांना हांकलून देणें; त्यावरून. २ ( ल. ) धुतकारणें, झिडकारणें. [ खुड्; ध्व. ]

खुडा—पु. खंदक; खड्डा. 'ऐसा अज्ञानु अनाथु बापुडा। पडिला भवखुडा।' –कृ ५५.

खुडा—पु. शेंडा ( रोपट्यांचा ). [ खुडणें.] ०करणें–लहान रोपाचीं पानें खुडणें.

खुडा-डे—वि. १ स्नायूंच्या संकोचानें आजारी असलेला; ताठरलेला; आखडलेला; जडपणा आलेला ( संधिवात, फार श्रम किंवा बैठक मारून बसल्यामुळें ). २ ( ल. ) उल्लंघनीय; अल्पे. 'तया संसार हा खुडा।' –गीता २.१८६५. [ सं. क्षुडक= घाट्याचें हाड. तुल. का. कुड्ड=वसणें ? ]

खुडी—स्त्री. १ पावसाळ्यासाठीं गलवतावर बांधलेलें छप्पर. २ गोठा ( गुरांचा ); खुराडें ( पक्ष्यांचें ); विशेषतः वासरांचा लहान गोठा, छप्पर. ३ तबेल्यातील घोड्याचें मूत सांचविण्याचा खड्डा, मोरी, कुंडी. ४ खाण, विजवट ( उंटाची ). ५ ( ना. ) शौचकूपातील दगडी पायरी. [ का. कुड्ड=वसणें ] ०पोहरा–स्त्री. (मोंगलाई) गुरांचा गोठा; पक्षांचें खुराडें.

खुडी—स्त्री. १ (पुणें.) झाडावरून आंबे खालीं काढण्याचा लहान झेला. २ (मराठवाडा) कणसें कापीत असतांना कणसांचा घातलेला ढीग, अडी–ढी. [ खुडणें ]

खुडी—वि. कजाग; दुष्ट; दांडगी; कुडी ( स्त्री ). 'तोंडाळ मोठी खुडी।' –अमृत ९७. [ कुडी ]

खुंडी—स्त्री. १ एका शेवटास शिवून दुमडलेली खोळ; खोपा; घोंगता; झोळी ( बाजारांत विकावयाचें धान्य ठेवण्या-

साठीं ). २ जोंधळ्याची एक जात; ही चाऱ्याकरितां करतात. [खुडणें]

खुडीव—वि. खुडलेली ( भाजी इ० ). 'खाणीवा खुडिवा तोडिवा ।.... शाका वाढिती स्वानुभवा ।' —एरुस्व १४.१०४. [खुडणें]

खुडुकणें—अक्रि. अडकणें. [का. कुडर=बसणें]

खुडूक—स्त्री. कोंबडी आपलीं अंडीं उबवते ती वेळ व तिची कृति. (क्रि० बसणें). —क्रिवि. १ आपलीं सर्व अंडीं घातल्याच्या स्थितींत (कोंबडी). २ पाय पोटाशीं घेऊन त्यांना हातांनीं मिठी मारून बसून. [सं. खुडक=घोटयाचें हाड; किंवा ध्व. या काळांतील कोंबडीचा मृदु व हलका स्वर त्यावरून; तुल० का. कुडुरु=बसणें]

खुडूक—न. सर्व पानें नाहींशीं झालेला झाडाचा सोट, थुंथा. [खुडणें]

खुडें—न. खुराडें; कबूतरखाना.

खुण—खूण पहा. ०मारणें-संकेत किंवा इशारा करणें. 'मारती खुण सरल्याच्या लोकांला ।' —ऐपो २१.

खुणखुण—स्त्री. १ किंचित् मानसिक अस्वास्थ्य; संताप; खेद; हुरहुर; खंत. २ कुणकुण; कुजबुज; कुरकुर; कुरबुर. ३ (अनिश्चित) खुमखुम. [सं. क्वणु; ध्व.] खुणखुणणें-अक्रि. १ खुणखुण शब्द होईसें वाजणें (वाद्यें) 'खणखणती टाळ खुणखुणिती घागरिया ।' —दावि १६३. २ कोंधानें नाकांत बोलणें; आंतल्या आंत चडफडणें, धुसफुसणें.

खुणस-सी, खुनशी—खुनस पहा.

खुणा—स्त्री. १ ( राजा. ) आठवणीचें, ओळखण्याचें चिन्ह. २ हातानें, बोटानें किंवा डोळ्यानें केलेला संकेत. 'मला इतक्यांत यद्दिनायानें खुणा केली' —दिवि ८.११.२०७. [का. खुण] ०मुद्रा-स्त्री. खूण, चिन्ह; मुद्रा (ठसा यास व्यापक अर्थानें)

खुणाविणें, खुणविणें—सक्रि. खुणेनें, संकेतानें दर्शविणें; आज्ञा करणें, सांगणें; मान हालवून, डोळयाच्या इशारतीनें, हाताच्या इशाऱ्यानें किंवा सूचनेनें कळविणें. 'कौशिक देशी ऐकतां मात । खुणावित श्रीरामचंद्रा ।' —रावि ८.८७. [खूण]

खुणी—वि. खुनी. [फा. खून=रक्त]

खुतखावणी—स्त्री. धनीण; यजमानीण. 'वाढितातीं नवजणी । खुतखावणी जाणोनी ।' —एरुस्व १४.१०१. [फा. खुद्=स्वतः+खाविंद=मालक]

खुतखुत—स्त्री. १ खदखद ( उकळण्याचा आवाज ). २ हुरहुर; रुखरुख; मनाची टोंचणी. ३ ( राजा. ) सर्वांचा धुसफुसाट. ४ ( राजा. ) गर्दी; दाटी; भीड; पुंजका. (क्रि० पडणें). [ध्व.] खुतखुतणें-अक्रि. ( पुन्याची कळी भिजतांना किंवा पाणी कढतांना ) खुत, खुत, शब्द होणें; खदखदणें.

खुतखुतला—पु. ( कु. ) मुलांची भातकुली.

खुतखुता, खुतखुता भात—पु. ताकांत पुन्हां शिजविलेला शिळा भात. [ध्व.]

खुतणी-नी—स्त्री. अर्धरेशमी व अर्धसुती आणि वर पट्टेपट्टे असलेलें कापड. कुतनी पहा. [अर. खुतन]

खु(खुं)तणें—अक्रि. १ हटानें बसणें; दुराग्रहपूर्वक चिकटणें; कांकरणें; आशंकणें; गुंतणें. ओढतें घेणें. 'आतां प्रमदे खुंतलें असे ।' —भ्र ८७. २ गुंतणें; ध्यान धरून बसणें. 'तेवि तुझे ठायीं नयन । खतले त्यासि हाचि निरोधु ।' —रास ३.४५४. [सं. कुठ-कुहं]

खुतपुत—स्त्री. १ खुरखुर; हुरहुर. ( क्रि० करणें; लागणें ). २ सतातणी, हट्ट; त्रास ( लहान मुलांचा ). (क्रि० करणें; लावणें; लागणें ). [ध्व.]

खुत(द)बा, खुत्बा—पु. १ मुसलमानांत दर शुक्रवारीं, मशिदींतील नमाजानंतर किंवा राजाच्या तख्तारोहणानंतर पाच ( मुहम्मद पैगंबर व त्याचे चार उत्तराधिकारी ) साधूंची आणि विद्यमान राजाची स्तोत्रें ( प्रवचनें ) म्हणतात तीं; त्यावरून. २ ( ल. ) गलबला; कलकल; कचकच. [अर. खुत्बाह्]

खुतला—वि. तटस्थ; कुंठित; निश्चय करून बसलेला. 'बकु जैसा खुतला । मासेयासी ।' —ज्ञा १८.६५४. [खुतणें]

खुतु-त्—न. शिरस्त्राण. 'अंगांत जिरे खुदु घालून ।' —मदरु १.५२. [फा. खुद्]

खुत्कन्, खुद्कन्—क्रिवि. खुत्, अशा आवाजानें एकदम ( हंसणें ). [सं. क्षु=शिंकणें; खुत्=शिंकण्यासारखें अल्प हंसणें]

खुद-द्—पु ( ल. ) ( बायकी ) पति; नवरा. 'एकदां मैत्रेयी को होईना, खुद दादाला विचारलें दिसेल' —गाढवांचा गोंधळ (प्रफुल्ला १२.७.२४). —सना. स्वतः. —वि. १ स्वतःचा; मालकीचा; खासगी; जातीचा; आत्मीय; खासगत. २ (जोर व दुजोरा देण्यासाठीं ) खास स्वतःचा. 'घर खुद माझें.' ३ ( ल. ) विशेषतः राजाचा. —क्रिवि. स्वतः; जातीनें. [फा. खुद्] सामाशब्द- ०अख(यरित)त्यार-पु स्वेच्छा. 'हें सलाहानें झालें किंवा खुदयख्तियारानें ?' —रा ५ ५१. [फा. खुद्+इख्तियारी] ०असामी-पु १ स्वतःच्या नावानें; हिंमतीनें पुढें येणारा मनुष्य २ स्वकर्तृत्व, स्वोर्जितत्व. ०खर्च-पु खाप राजाचा अथवा दुसऱ्या एखादाचा खासगी खर्च. याच्या उलट-सरंजामी खर्च किंवा डौल ( लष्करी खर्च, राज्याचा खर्च, सरकारी खर्च इ० ). ०खातें-न. (जमाखर्च) लिहिणाराचें स्वतःचें स्वतंत्र खातें. ०खासा-विक्रिवि. ( मी, तूं, तो, इ० ) स्वतः; जातीनें. [फा. खुद्+खासा] ०खुद-क्रिवि. स्वतः च; आपण होऊन. ०गर्ज-वि. मतलबी; स्वार्थी. ०गर्जी-स्त्री. स्वार्थ; मतलबीपणा. 'खुदगर्जीवर नजर देऊन,' —ख ५.२५७०. ०जातीनें-क्रिवि.

स्वतःच. ०निसबत–वि. १ स्वतः संबंधीं. २ स्वतःवर अवलंबित; स्वांकित; (खुदनिसबत याचा अर्थ आणखीहि खुद या उपसर्गाप्रमाणें करतात). म्ह० काम सरकारनिसबत दावा खुदनिसबत=काम सरकारचें पण त्यांतील दोष मात्र स्वतःचे. ०निसबतीचें मंत्रिमंडळ–न. (कायदा) (आजचें) प्रिव्ही कौन्सिल. ०पसंती–दी–स्त्री. १ स्वतःची मान्यता. २ (ल.) अहंमन्यता; गर्व. 'बाईचा प्रकार खुदपसंतीचा आहे.'–मदबा १.१८८. ०सनद–स्त्री. स्वतः राजाकडून किंवा मुख्य अधिकाऱ्याकडून मिळालेली सनद.

खुदकी—स्त्री. घोडयाची दुडकी चाल. यानें वर बसलेल्या माणसास आंचके बसतात. [ हिं. ]

खुदखुद—स्त्री. १ (घोडयाची) रग; चमक; खुमखुम, पाणी. २ उचंबळणें; ऊन; तृष्णा; आग; हांव; सोस (स्पर्धा, महत्त्वाकांक्षा, अभिमान यांची). ३ हुरहुर; अस्वस्थता. –स्त्रीपु (येणारा–जाणारांची पुष्कळवेळ चाललेली व त्रासदायक) गडबड; गजबज; (लहान मुलांचा) हुई; टकळी; चेवताळणी. [ध्व खदखद ?]

खुंदण—न. (ना.) तुडविण्याची क्रिया. खुंदणें–क्रि तुडविणें. [ सं. कंदन; हिं. खुंदलना ]

खुदवळणें—क्रि. (कु.) खुवळणें पहा.

खुदरत—स्त्री. शक्ति; सामर्थ्य; क्षमता (निषेधार्थी प्रयोग) [अर. कुद्रत ]

खुदरती—वि. पिवळया रंगाचें कापसाचें (सुत). –देहु १५२.

खुदरोपांदरा—वि. १ बदफैली; कामुक; बीभत्स; घाणेरडा; अभद्र; २ निंदक; अर्वाच्य; शिवराळ (भाषण किंवा बोलणारा). ३ (व्यापक) वाईट; भिकार; गलतान; निरुपयोगी (जनावर, वस्तु). [ पादणें द्वि. ]

खुदल(ळ)णी—स्त्री. दांडगाईची वागणूक; हिडीसफिडीस [ खुंदलणें ]

खुं(खु)दल(ळ)णें, खुदडणें—उक्रि. १ दांडगाईनें वागविणें; तुडकणें; कुदलणें; ठोकणें; मारणें; लत्ताबुक्यांनीं जर्जर करणें; ओढाताण करणें; कचकावून आणि बेपर्वाईनें वापरणें, वहिवाटणें (वस्तु, पशु). 'मग त्या खुदळिलें चरणीं।' –कथा ३.१६.८५. 'त्या मुलाला मास्तरानें चांगलाच खुंदलून काढला.' २ दामटणें; पिगळणें; ताकदीबाहेरील काम देणें; खराब करणें; चेंदामेंदा करणें. ३ कुंदलणें; खुदडणें; गुधडणें; तुडविणें; मळणें (कमविण्याचा गुना, चिखल). ४ हलविणें; हादुळणें; हिसके देणें (खटारा गाडी, घोडा इ०). [ सं. कंदन ]

खुंदला(ळा)—पु. दाबिल्यावस्था; क्षीणता; क्षीणभाग खुदमा पहा. [ खुंदळणें ]

खुदा—पु. प्रभु; ईश्वर; अल्ला. [फा.] खुदाई–वि. ईश्वरी. 'खुदाई आज्ञेवर मनुष्य विचार करील ऐसें म्हणतां नये.' –ऐटि २.९१. ०प–तआला, खुदाताला, खुदायताला–पु. तेजोमय ईश्वर; परमेश्वर. ०तर्सी–स्त्री. ईश्वरास भिणें; ईश्वरभीरुता. 'खुदातर्सी फकिरी तौरानें राहतात.' –रा १.६३. [फा. खुदा+तर्स=भीरु] ०यवंद, ०वंत–द–पु. १ प्रभु; खावंद; मालक; धनी. २ (संबोधनार्थी) सरकार ! महाराज ! [फा. खुदावंद] ०वंत न्यामत–वि. श्रीमंत. 'खुदावंत न्यामत रावसाहेब पंडितप्रधान.' –रा १०.१६५. [फा. खुदावंद्–इ–निआमत]

खुदाई—स्त्री. १ खोदाई; खोदण्याची क्रिया. 'खाणीच्या खुदाईचें क्षेत्र वाढत जातें त्याप्रमाणें...दुसरा खड्डा...खणतात.' –पदाव १.९२. २ खणतीची मजुरी. [ खोदणें ]

खुदुखुदु—स्त्री. खदखदां हास्य. (क्रि० करणें).–क्रिवि. मोजेनें; आनंदानें; प्रेमानें (हसणें); खदखद; खदखदां. (क्रि० हांसणें); [ध्व.]

खुद्द, खुद्द जातीनें—खुद पहा.

खुद्रकखुद्रक—क्रिवि. दुडक्या चालीनें; खुद्रुक असा शब्द होई अशा प्रकारें. [ध्व.]

खुद्रा—पु. १ (बे.) भाताची एक जात. २ माशांची एक जात.

खुनकी—स्त्री. (व.) थंडाई; गार वारा. 'वाळयाच्या ताटीनें खुनकी चालते.' [फा. खुनुक=थंड, खुनुकी=थंडी]

खुनचा—स्त्री. (साबणाचा कारखाना) साबणाचा घट्ट रस ओतण्यासाठीं जस्ताचें, कड्या असलेलें भांडें. [फा. खवानचा, खुनचा=परात]

खुन(न्न)स—पुस्त्री. आकस; खुनस; दंश; द्वेष; सूडबुद्धि. (क्रि० धरणें; करणें; बाळगणें). [फा. खून=रक्त] ०खोर–रा–वि. (व.) खुनशी. 'भयंकर खुन्नसखोर माणूस.'

खुनसी–शी—वि. आकसखोर; मत्सरी; खुसी; दंशी; द्वेष्टा. [ सं. क्षुहनशील; हिं. खुनसी; फा. खून=रक्त ]

खुनी—वि. १ ज्यानें खून केला आहे असा; वध करणारा. 'खुन्ये पडून गेले.' –वाडसमा ३.८८. २ घातक; हिंसक; मारेकरी; क्रूर. ३ खुनासंबंधीं (मुकद्दमा, चौकशी, साक्ष, कयास इ०) [फा. खून=हत्या; खूनी] ०आरोपी–वि. ज्यावर खुनाचा आरोप आहे असा. ०मूळव्याध–स्त्री. रक्ती मूळव्याध; हिच्या उलट मोडाची मूळव्याध.

खुनी—स्त्री. (पाणरहाट) आऱ्याला कोनाचा मारलेला गोल्टा [ कुणी ? ]

खुने(न्या)रा(री), खुन्या—वि. घातकी; हिंसक; खुनी. [फा. खून ]

खुन्ना—वि. (क.) गिड्डा; बुटका; खुजा. [ क्षुण्ण ? ]

खुपकला—पु. एक सुगंधी द्रव्य. –मुंम्या १०९.

**खुपणी**—स्त्री. टोंचणी; सुरसुर; जाचणी. [ खुपणें ]

**खुपणें**—अक्रि. १ टोंचणें; बोंचणें; दुःख देणें; पीडा करणें (कांटा, केस, शस्त्र यांनीं). 'यथार्थ तरी खुपणें। नाहीं फवणा।' –ज्ञा १६.१२०. २ दुखावणें; सलणें ( डोळा इ० ). ३ (ल.) डोळ्यांत किंवा मनांत कांट्याप्रमाणें, शल्याप्रमाणें बोंचणें, सलणें. 'अंतरीं मृदु लोणी तैसा। कोणाही सहसा खुपेना॥' –भाराबाल ११.२४६. ४ अनुतप्त होणें; पश्चात्ताप होणें. ५ मनांत डांचणें; मनाला खाणें; अस्वस्थता उत्पन्न करणें. 'परि तुम्हा बोल होता खुपत। हृदयाभाजीं।' –कथा ५.११.१६१. [ सं. क्षुभ्; प्रा. खुभ किंवा खुप्प+निमग्न होणें ? ]

**खुपरा**—पु. ( डोळे आले किंवा खुपरी झाली असतां त्याची ) खुपणी; ठणका. ( क्रि० येणें; जाणें; होणें; फोडणें ). –वि. १ ठणकणारा; खुपणारा ( खुपऱ्या झालेला डोळा इ० ). २ खुपऱ्या डोळ्याचा ( माणूस ). ३ स्वभावतः ठणकणारा; खुपणारा ( डोळा ). [ खुपणें ]

**खुपरी**—स्त्री. १ खुपरा (–पु.) पहा. (क्रि० भरणें; लागणें). २ डोळ्याचा एक रोग; डोळ्याची पापणी उलटून पाहिली असतां त्यावर दिसणारी बारीक, लाल, दाणेदार पुटकुळी. हा रोग चिकट व हट्टी आहे. ३ खाऱ्या जमिनीवरचा शिंपल्यांचा थर. [ खुपणें ]

**खुपसा**—वि. १ अमास्वर्चांत एखादी बाब लुच्चेगिरीनें घुसडून देणारा; खुपसणारा; घुसडणारा. २ जें जें आपल्या हाताशीं येईल तें तें खिशांत टाकणारा किंवा अपहार करणारा; भुरटा चोर. ३ (ल.) बालंट घेणारा; कुभांडी. [ खुपसणें ]

**खुपसणें**—उक्रि. १ ( एखाद्या पदार्थांत हात वगैरे ) जोरानें घालणें; घुसडणें; कोंबलणें; भोसकणें; शिरविणें; दडपणें. २ खोचणें; प्रविष्ट करणें; दडून शिरकविणें; आत घालणें. [ प्रा. खुप्प= बुडणें ]

**खुपसदशमी**—स्त्री. जळतें लाकूड कणकेंत किंवा भाकरीच्या पिठांत खुपसून ( मग तें निर्लेप समजून ) त्याची केलेली दशमी, पोळी.

**खुपसुरत**—खुबसुरत पहा.

**खुपिया**—पु. ( ना. ) गुप्त पोलीस.

**खुफिया**—क्रिविवि. गुप्त; अंतस्थ; कुफिया. 'परंतु खुफिया मुनशीवेगास रसद पावती केली.' –दिमरा २.१५. [ फा. खुफ्या=लपविलेला ]

**खुंब, खुंब**—पुन. लोक; राष्ट्र; देश. जात; कुल. 'कादुकायदे अठरा खुंब जागे जागे चौधरे नेमून दिले.' –मदद १.१५. 'माळीखुंब, साळीखुंब;' [ अर. कौम=लोक, राष्ट्र ]

**खुबचार**—पु. डावपेंच. 'फक्त बाळमपेंच खुबचार मार लई होती।' –ऐपो ११०. [ फा. खूब=चांगलें; सं. चार ]

**खुबचें**—अक्रि. ( गो. ) रागानें फुगणें.

**खुबड**—न. १ सांधा; संधि. २ (राजा. कु.) कुबड; पाटीचें पोंक. ३ (संदिग्धपणें) पाठ; कणा; पाटीचा वरचा मणका (ज्यावर ओझें घेतलें जातें तो); मानेचा कांटा. ०मोडका–वि. मोडक्या ठीचा किंवा अपटलेल्या मानेचा. ०मोडणें–अक्रि. एखाद्याची मान आखडली जाणें. पिळली जाणें, ताठर होणें, अवटलली जाणें (ओझें, संधिवात व म्हातारपण यामुळें). –सक्रि. लडवडविणें; अंगा उडविणें; गोंधळविणें; कुंठित करणें; पायरगुंडी उडवणें. [ खुबा ]

**खुबडी**—स्त्री. १ खुराडें. २ पाण्यांतील गोगलगाय ( किंवा एक प्रकारचा मासा, कालव ) व तिची शिंप; एक प्रकारचा शंख. खुबा पहा.

**खुबलणें**—उक्रि. कुबलणें; चोपणें; मारणें; खुंदलणें. कुबलणें पहा. 'त्याला खुबच खुबलून काढला.'

**खुब(प)सुरत**—वि. अतिशय सुंदर; देखणा, उत्तम; सौंदर्यशाली; लावण्यपूर्ण, मनोहर. [ फा. खुब=सुंदर+सुरत=रूप ] खुपसुरती–सुर्ती–स्त्री. सौंदर्य; लावण्य. 'मुखचंद्राची काय वर्णुं खुपसुर्ती।' –अकूंचा पाळणा ( पाळणे संग्रह ) २०.

**खुबळणें**—उक्रि. ( मांडीवर, हातावर घेऊन ) इकडेतिकडे हालविणें; वर फेंकणें; झेलणें (मुलास). –अक्रि. १ (मूल मांडीवर) चळवळणें; वळवळणें. २ गचके खाणें; हादुळले जाणें ( गाडीमध्यें किंवा घोड्यावर ) [ खुबा ]

**खुबळें**—न. खळबळ, जोराचा हट्ट; अडवणूक, विघ्न.

**खुबा**—पु १ शरीराचा मुख्य बर दिसणारा उंचवटा; सांधा ( खांद्याचा संधि, कमरेचा खवाटा–गोफा, मनगट, घुंटा इ०; मुख्यत्वें पहिले दोन ). 'वाघाच्या पाठीमागच्या खुब्यांत शिरला.' –सूर्योदय ४. २ (ल) उंचवटा; टेंगूळ; बाहेर आलेला टोंकदार भाग. (जमीन, झाड इ० चा) ३ एक प्रकारचा पाण्यांतील प्राणी; कालव खुबडी अर्थ २ पहा. या [illegible] मासे खातात व त्यांच्या शिंपी भाजून खाण्याचा चुना तयार करतात. ४ शिंपल्याची एक जात. ५ (गो.) कोपर. [ सं. कूपक, गुल्फ ]

**खुबाट**—न. ( राजा. ) खुबा; कमर

**खुबी**—स्त्री. १ नीटनेटकेपणा; चकपकपणा; छब; रम्यता, चांगलेपणा. २ वैशिष्ट्य; विशिष्ट गुण; उत्कृष्टता; ध्यानांत ठेवण्याजोगें चिन्ह ( स्वभावाचें, प्राण्याचें, एखाद्या कारागिराच्या कामाचें ). ३ रहस्य; तात्पर्य; मर्म, खोंच; मख्खी ( एखाद्या गोष्टींतील) [फा. खूब=सुंदर] ०दार–वि. १ सुरेख, नामी; मोहक; [illegible]दार; मजेदार. २ युक्तीप्रयुक्तीचें; कौशल्ययुक्त.

**खुर्वी**—स्त्री. लहान मासा; शिप. खुवडी व खुवा अर्थ ३ पहा.

**खुवुट**—पु ( वं. ) लहान खुवा ( जमीनीचा उंचवटा ). ' खुवुटाची ठेंच लागली. ' [ खुवा ]

**खुवेनाळ**—स्त्री. ( जनावराच्या ) खांद्यामधील खवंद, क्षत. ( क्रि० पडणें ). [ खुवा+नाळ ]

**खुम**—स्त्री. ( गो. ) रीत; चाल; रिवाज; [ अर. कौम ]

**खुमखु(खु)म-मी**—स्त्री. १धमक; रग; ताठा; मस्ती ( भांडणांतील शेरास सव्वाशेर मिळालेल्यांची ) २ पुन्हा भांडण, मारामारी सुरू करण्याची वाट पहाणें व त्याकरितां उसळणें. ३ खाज, प्रबळ इच्छा (लढाई, भांडण, सूड, वैभव यांची). ' हातांला तुझिया जरी खुमखुमी होती तरी ते सुके । '–केक ४२. ( क्रि० मोडणें; जिरवणें; येणें; सुटणें ). [ प्रा. खम्मखम्म ]

**खुमणॉ**—पु ( गो. ) टोमणा.

**खुमणें**—न. १ ( गो. ) तोंड; तोंडवळा; चेहरा. २ (ल.) नायकीण.

**खुमाच**—पु. चंग कांचन गंजीफांतील चौथा रंग किंवा उतरत्या पांजवांतील रंगांपैकी पहिला. –स्त्री. १ वस्त्रादिकांची सफाई, सुत, पोत. २ बंगला, घर इ० वस्तूंचा सुरेखपणा; नीटनेटकेपणा; छबदारी; देखणेपणा; धवधवीतपणा; तेज; सौंदर्य ( रंग, रंगीत पदार्थांचा ). [ खुमास ]

**खुमारी-ई**—स्त्री. १ उत्कृष्टता; नामीपणा; लज्जत; गोडी; स्वाद; चवदारपणा; रुचि; उत्तेजक किंवा संतोषदायक गुण (मुख्यत्वें खाद्य व पास यासंबंधीं); खुमाच अर्थ २ पहा. 'या आमच्या साध्या वनभोजनांत कांहीं विशेष खुमारी यावी...' –पाव्ह ४६. २ मौज; मजा; आकर्षक दृश्य; सौंदर्य. ' दाखवी किती थरकाउन गेंद खुमारी ।' –प्रला २०७. ३ खुवी; मर्म. ४ ( गो. ) ईर्षा. [ अर. खुमार् =दारूचा कैफ, निशा. ही मन उल्हसित करते, त्यावरून मन उल्हसित करणाऱ्या पदार्थाच्या चवीस म्हणतात ]

**खुमासी-सी**—स्त्री. खुमाच अर्थ २ पहा. –वि. खुमास नांवाच्या गंजिफांच्या बाजूसंबंधीं. खुमाच अर्थ १ पहा.

**खुमास**—पु. खुमाच पहा. –स्त्री. १ खुमाच अर्थ १,२ पहा. २सुंदरपणा;चकचकपणा;गोंडसपणा,सौंदर्य;शोभा(सामान्यत वस्तु, रूप याचा ). खुमारी पहा. [ हिं. खमस =गरम ] ०दार-वि सुंदर; उत्तम; ( तंबाखूचा एक प्रकार, लज्जतदार पण कडक ).

**खुर**—पु. टांच; टाफ; शफ; कित्येक जनावरांच्या पावलावर टणक त्वचा असते तो भाग; (सामा.) पाय; तंगडी. 'घोडे याचा खुर विजातो ।' –शिशु ५५७. खूर पहा. [सं.] **खुरकी**–स्त्री. (को.) खुरासालची वाढ आणि टांचेजवळचा शिंगासारखा पदार्थ; गेळें ( वासराच्या जन्माच्या वेळी असणारा ). **खुरकतणें-खतणें, खुरकतणें-खुतणें**–अक्रि. खुरकुतांचा विकार होणें ( गुरांस ). **खुरकूत, खुरखूत, खुरगुटी**–पु. गुरांच्या पायांस होणारा एक रोग. हा खुराच्या बेचक्यांत होतो. ०**तोडी**–वि. लाथाळ ( गाय ). ' ते खुरतोडी तुसधी । पोपी कवण । ' –ज्ञा १३.६३७. **खुरनिसात, खुरनिशी**–नमन. कुर्निसात,पहा. ' तो मलकाजमानीकडे जाऊन खुरनिसात करून अदबशीर उभा राहिला. ' –भाव २०. ०**पट्टी**–स्त्री. ( चांभार ) खुरें काढण्यासाठीं कापलेली पट्टी. ०**मांडी**–स्त्री. गुडघे मोडून पाय माघारे नेऊन त्यांच्या बोटांवर घातलेली मांडी. राजदरबारीं हें आसन घालून बसण्याची रीत आहे. २ खुर डिंबी (चुकीनें) पहा. ०**मुंडी**–स्त्री. १ निरनिराळ्या प्रसंगीं शेळया, बकरीं मारण्याचे वेळचे माहारांचे हक्क. २ पाय आणि डोकें एकत्र बांधणें; गुडघ्यांत डोकें खुपसून बसणें; डोकें व पाय एके ठिकाणीं आणून निजणें; अंगाचें गाठोडें करून निजणें ( माणूस, पशु यांनीं ). ' हा हातपायांची खुरमुंडी करून बसला. ' ' तापानें–हिवानें–रोगानें माझी खुरमुंडी केली–करून टाकली किंवा मी करून निजलों. '( क्रि० वळणें ); **खुरमुंडीस येणें-घालून बसणें**–(ल.) जेरीस येणें; पराजित होणें; हताश होणें. **खुरमुंडी करणें, करून टाकणें**–जेरीस आणणें. [खुर+मुंडी=डोकें ] ०**संधी**–पु. घोड्याच्या कुर्चिकेच्या खालचा अवयव. –अश्वप १.६२.

**खुर**—पु. ( व. ) पांढरें कोड; पांढऱ्या कोडाचा चट्टा चांदी. [ फा. खुर=कोड ]

**खुरक(कु)टणें**—अक्रि खरकटणें; भात, पीठ किंवा शिजलेलें अन्न किंवा खरकटें यांनीं ( भांडें, हात ) लिडबिडलेला असणें; खरकटा (पहा) होणें. [ खरकटा ]

**खुरक(कु)टणें**—अक्रि. सरपटत जाणें; खुरडणें पहा.

**खुरक(कु)टेल, खुरक(कु)टला**—वि १ खरकटेल पहा. २ गदळ, घाणेरडा; ओंगळ ( माणूस ). [ खरकटा ]

**खुरक(ख)तणें, खुरकु(खु)तणें, खुरकुटणें**—अक्रि. १ चुरा होणें; मोडणें ( नीट न भाजलेली भाकरी ); २ ( क. ) खुटणें ( झाडें वगैरे ).

**खुरका, खुरकणी**—पुस्त्री. तिटकारा; हेडसावणी; झिडकारणी. ( क्रि० देणें, बसणें ).

**खुरकाटा**—पु ( व. ) हकालपट्टी.

**खुरकाविणें**—सक्रि. तिटकारणें; झिडकारणें, हाकणें. [ ! ]

**खुरखु(खु)र-रा-री**—पुस्त्री. १ ( आशेनें लागणारी ) तळमळ; खुरखुर; उत्कंठा; चुटपुट; (अतिशय तोटयामुळें होणारें) दुःख; क्षोभ; आवेग. २ उतावीळ; अधीरपणा; खाज; उत्कटेच्छा;

खुरखुर; स्त्री. १ (गो. खुरखुरी) धमक; हौस. [ध्व. खरखर] ०उठणें-(माण.) घोड्याच्या पोटांत रोग होणें.

खुरखुरणें—अक्रि. १ (मारण्यासाठीं हात, बोलण्यासाठीं जीभ) शिवशिवणें; उत्कंठित होणें. 'दुष्ट दैत्यांचे हात पहा खुरखुरती' -(अकूर) पाळणेसंग्रह २१. २ उतावीळ किंवा अधीर होणें (जाण्यास, करण्यास). [ध्व.]

खुरखुराट—पु. (खुरखुरचा अतिशय) अतिशय खुटखुट; तळमळ; हुरहुर; हांव; उतावीळ.

खुरग(गु)टणें—अक्रि. १ खुजट होणें, वाढ खुरटी होणें; खुरटणें. २ खुरडत चालणें; ढुंगणावर सरपटणें. [खुरगुटी]

खुरचा—क्रिवि. चुरा; तुकडे. [फा. खुर्दा; सं. क्षुद्र; हिं किर्चे] ०पाडणें-खांडणें, तुकडे तुकडे करणें. 'सांभाळ ब्राह्मणा अधिक बोलल्यास तर खुरचा पाडीन.'

खुरचांपा-फा—पु. चांफ्याच्या झाडाचा एक प्रकार; पांढरा चांफा; डोंपरचांफा. खुरचांपें-न. त्याचें फूल. चांफा पहा.

खुरची, खुर्चा, खुरशी, खुर्शी—स्त्री. १ चार पायांचें मागें पाठ असलेलें, लांकडी उंच आसन. 'थरथर कांपति कांपती वयस्कर उभे टाकुनी खुरशी।' -ऐपो ३०४. २ खांबाखालील उथळे, कुंभी; ठेप. ३ खुरजी पहा. ४ शाळेंतील मुलांच्या शिक्षेचा एक प्रकार; भिंतीस पाठ टेकून व अर्धवट उभे राहून (गुडघे, मोडून) हात गुडघ्यांवर ठेवणें. (क्रि० देणें). [अर. कुर्सी]

खुरजी, खुर्जी—स्त्री. १ (सराफाची पैशाची) थैली; कसा; हमीण. २ विशिष्टप्रकारचा गालीचा. [अर. (अव.) खरज, (एव) खर्जीत]

खुर(रं)ट—वि. १ खुजट; ठेंगणा; वाढ खुंटलेला. २ थबकट; बसकट. [सं. खुर्=कापणें] खुर(रं)टणें-खुरडणें-अक्रि. खुरटणें; वाढ खुटली असणें, भुईत जाणें. खुरटपाय-पु गिड्डा; आंखुड पाय (धन्यास व इतरास अशुभकारक). 'ह्याचा खुरटपाय जेथें जाईल तेथें वाटोळें करील.' खुरट्या पायाचा, खुरंटपायी, खुरंटपायल्या, खुरढेपायाचा-वि. अभागी; कपाळकरंटा.

खुरडणें—अक्रि. ढुंगणावर सरपटणें; भुईसरपट जाणें. [ध्व]

खुरडिंची—स्त्री. (कडाक्याच्या वादप्रसंगीं) एक बैठक. शरीराचा तोल पुढें टाकून गुडघ्यांवर, नळीवर किंवा पायाच्या बोटांवर बसणें. [खुर+सं. डिंब=युद्ध]

खुरडी—स्त्री. करवंटीतून काढलेला खोबऱ्याचा तुकडा. [खुरडणें; सं खुर्=कापणें ?]

खुरत(तु)डणें—अक्रि. (नखें, दांत यांनीं) कुरतडणें; खुडणें.

खुरद-दा, खुरदेकरी, खुरदेसानक—खुर्द, खुर्दा पहा.

खुरदमा—पु. १ (ओढाताण, कोंडे, अतिशय धम इ० मुळें) अवयव शिथिल व्हावयाजोगी दुर्दशा; बेजारपणा. २ खरवडलेली, गुरडलेली, धुरडलेली स्थिति; खुरदा; चूर (पशु, वस्त्र, गाडी यांचा, कचकावून किंवा बेपर्वाईनें वापरल्यामुळें झालेला) (क्रि० घालणें; करणें). [फा. खुर्दा=तुकडा]

खुर(रं)दळणें—उक्रि. १ तुडविणें; तुडवून खराब करणें. २ (ल.) विरढणें; कुसकरणें; निष्काळजीपणानें, बेपर्वाईनें वापरणें; चोळामोळा करणें; खुंदळणें. [सं. खुर+दलन]

खुरदळा, खुरं(रं)दळा—पु. १ खुरदमा पहा. २ चक्काचूर (मडक्यांचा); चुरा; भुगा (भाकरीचा). ०होणें-क्रि. (माण.) जमीनीवर जोरानें पाऊस पडून माती निघणें.

खुरपण—न. १ खुरपलेलें गवत, तण. २ (व.) खुरपें पहा

खुरपणी—स्त्री. खुरप्यानें गवत काढण्याची क्रिया; निंदणी. [खुरपणें]

खुरपणें—उक्रि. १ खुरप्यानें तण, गवत; काढणें; निंदणें. २ खुरप्यानें खडबडीत जमीन साफ करणें. 'दुर्वा खुरपिला स्वहस्तें मळा।' -महिपतिस्तोत्रमाला, पांडुरंगस्तोत्र. ३ चौवळ्या भारळांतील खोबरें हातानीं खरडणें. [सं. क्षुर्=खुरपणें]

खुरपी—स्त्री. १ (तव्यावरील भाकरी पोळी उलथण्याचें) उलथणें, कालथा. २ दूध, पाक इ० ढवळण्याचा मोठा कलथा. ३ एक प्रकारचें फावडें, हें खुरप्याहून थोडेसें निराळें असतें. ४ खुरपें.

खुरपें-पा—नपु. १ खुरपण्याचें हत्यार; लहान बांकदार विळा (गवत, तण काढण्याचा). २ (सामा.) शस्त्र. 'मा तर्कचें खुरपें। खांडे कोणा।' -अमृ ६.२४. 'धर्में धेनू खुरपें। खुटलें जैसें।' -ज्ञा १६.३२९. ३ खोरें; फावडें. ४ (साबण कारखाना) साबणाचा द्रव हलविण्याचा लांकडी दांडा. ५ (चांभारी) चामडें ओढण्याचें किंवा ताणण्याचें हत्यार. [सं. क्षुरप्र; प्रा. खुरप्प] ०लावणें-फार पैसा ओढणें. 'त्यानें आतांशी खुरपें लावलें आहे.'

खुरवाण, खुर्वाण—न. १ आहुति; बली; उतारा, ओवाळणी. 'जीव प्राण तुवर खुर्वाण।' -प्रला २०४. 'खुरवाण प्राण हा तुझ्या हवाला केला.' २ अतिशय आसक्त, अनुरक्त झालेला माणूस, वस्तु. कुरवाण पहा. [अर. कुर्बान]

खुरखुराट—पु. खडबड, खडखुडाट पहा.

खुरसेटी—स्त्री. १ एक प्रकारचा मासा, कालव. खबडी पहा. २ गोगलगाय.

खुरव्यां—न. (कु.) मुंग्यांची एक जात

खुरम-मा, खुर्मा—स्त्री. खारीक (मोठी). [फा.] ०रोटी-स्त्री. खारका घातलेली पोळी; रोटीचा एक प्रकार. -ग्रंशि २.३०.

खुर(रा)म(आलात)—पु. (राजा. दर्यावर्दी) जहाजाच्या नांगरास बांधण्याचा मोठा दोर; हा समुद्रांत सोडतात, त्यामुळें नांगर समुद्राच्या तळास जातो.

खुरखडा—पु. पक्ष्यांचें खुराडें.

खुरखत—वि. (व.) साफ; तयार. ०करणें-(व.) मळणीचें खळें शेणें करून त्यावर बैल फिरवून त्यांच्या खुरांनी जमीन घट्ट बसवणें. खळें खुरवतणें पहा.

खुरशिंग-गी—स्त्री. एक मोठें झाड.

खुरसणी(सणी)-ओवा-तीळ-हळद—खुरासनीमध्यें पहा.

खुरसानी कोहळें—न. (व.) तांबडा भोपळा. [हिं. खोरासानी+कोहळा]

खुरा-ऱ्या—पु. १ नालबंद, सोनार, घिसाडी इ० चें ठोकण्याचें साधन; एक प्रकारची ऐरण; वटांग; संघ. वर्तुळाकार दागिन्यांस तोंड बसविण्यास किंवा पैलू पाडण्यास जमीनींत, लांकडांत किंवा अन्यत्र उभा करण्याचा इंग्रजी 'टी' आकाराचा पोलादी तुकडा. 'लाटा खुरा ही मायाच आकारही सुवर्णाचे' -यथा १२.५१३. २ (खुरा, खुऱ्या नव्हे) जोडा, वहाण, यांची टाच; टांचेखालचा भाग. ३ टांचेखालचे तुकडे ०लावणें-टांच लावणें. [खुर]

खुराक—पु. १ अशक्त माणसास किंवा जनावरास त्याच्या पुष्टयर्थ तूप, साखर, दूध इ० पुष्टी आणणारा आहार, खाद्य. २ रतीब; खाणें. [फा. खुराक्] -काचा-वि. १ लठ्ठ; मांसल; गुटगुटीत (चांगल्या खाण्यापासून). २ रोज खुराक खाण्याची संवय असलेला. खुराकी-वि. रतीब, आहार, यासंबंधीं. जसें-खुराकी सामान, जिनस. -स्त्री. १ खाण्याची नेमणूक; शेर; भत्ता (पैका किंवा अन्न). २ (क.) अन्नाचा प्रकार, प्रमाण.

खुराट—पु. ठुंठ; खराटा. 'कुवासना ढोलांची पडे उडी। समूळ सशेंडी खुराट।' -एभा १०.५१८. [खुरट]

खुराटणें—अक्रि. खुरट होणें, वाढ थांबणें. खुरटणें पहा.

खुराड-डें—न. १ पटें; खोंप; कबुतरखाना (यांत प्रत्येक पक्ष्यास एक एक लांकडी खण असतो). २ गोठा; लहान गोठा (वासरांसाठीं). ३ (ल) लहान घर. 'त्यानें घराच्या मागील बाजूस गुलामांकरितां म्हणून बांधून ठेवलेल्या खुराडांत त्यांना वस्तीकरितां जागा दाखवून दिली.' -उपाग्रंथमाला (माझी पण) तीच गत १२. ४ (कुरडी) भाजी ठेवण्याची लहान कुरडी, करंडी. [सं. कुटीर; प्रा. कुडीर!]

खुरापत—स्त्री. कुरापत अर्थ १ पहा.

खुरास(सा)णी-नी—स्त्री. खुरासनी तीळ, कारळा, रामतीळ. हें खरीपाचें पीक हलक्या, भुसभुशीत जमीनींत होतें. तयार होण्याचा हंगाम दिवाळी. याचें तेल खातात, पेंड गुरांस व खतास उपयोगी आहे. याचें फूल पिवळें, बीं काळें व लांबट असतें. -वि. खोरासान प्रांतांतील (ओवा, तीळ. हळद इ०). [फा. खुरासानी] ०ओवा-पु. हा खोरासानांत पिकतो. हा चपटा, बारीक व किंचित् तिखट, असून औषधाच्या फार उपयोगी आहे. ०हळद-स्त्री. एक प्रकारची हळद.

खुरी—स्त्री. एक लहान जंगली झाड.

खुरी—स्त्री. १ झाडावरून आंबे, फुलें काढण्याची लांब दांडीची जाळी; झेलणी. २ नखीप्रमाणें पुढें येणारा (वासरांच्या इ०). खुराचा पुढील भाग; गेळा. ३ (व.) गुराचा एक रोग; पायखुरी; हा रोग गुरांच्या खुरास जसा होतो तसा तोंडासहि होतो त्यास तोंडखुरी म्हणतात. ४ फांकलेल्या खुराचा एकभाग. ५ पाभर; तिफण. [खुर] ०मुंडी-स्त्री. १ (दुखण्यांतून माणूस. उठल्यावर नवसाप्रीत्यर्थ) देवापुढें बकरें, मेंढी मारून व तिचे खुर आणि डोकें देवास वाहण्याची क्रिया. २ खुरमुंडी पहा. [खुर+मुंडी]

खुरीस, खुरूस—पु. (गो. कों.) (ख्रिश्चन धर्मीयांचा) क्रूस; क्रॉस. [इं. क्रॉस]

खुरुंदळणें, खुरुंदळा—खुरंदळणें, खुरंदळा पहा.

खुरूप—न. घर करून बसलेल्या कांट्यानें झालेलें ठणाणं; भोंवरी; कांटा बोचण्यानें आलेली सूज. कुरूप पहा.

खुरें—न. (ना. खुरो.) पायतणाची टांच. खुरा(ऱ्या) पहा.

खुरेटी—स्त्री. (कों.) गोगलगाय. खरवेटी पहा.

खुर्ची-र्शी—खुरची पहा. 'फिरंगी व आपण मिळून खुर्शीवर शहाजादेस बसवून तमाम सरदारांनीं नजर न्यांज केले.' -ख ८.४२२५. [अर. कुर्सी]

खुर्द—वि. १ कनिष्ठ; अधिक लहान; एकाच नांवाचीं दोन गावें असल्यास लहान गांवास म्हणतात; याच्या उलट मोठ्यास बुद्रुक म्हणतात. २ लहान; छोटा; धाकटा (वयानें), याच्या उलट वयानें मोठ्यास बुद्रुक म्हणतात. [फा. खुर्द; सं. क्षुद्र. पेहेलवी-खोर्द, खुर्द; 'खोर्द अवेस्ता'=लहान अवेस्ता] ०गुजरूस-वि. लहानथोर. 'हें सर्व खुर्दगुजरूस यांस माहीत आहे.' -वाडकैफीयत १००.

खुर्द(र्दा)सानक—स्त्री. १ भुक्त अन्न. २ (ल.) हातांतून गेलेलें परत न घेतां येणारें इनाम, जमीन, वतन. सानक पहा. [फा. खुर्दन्=खाणें+सानक=ताट]

खुर्दळ—पु. कंदन; खुंदळाखुदळी; धुडवणी. 'रणीरण खुर्दळ माडला।' -पेपो ८६. [सं. खुर+दल]

खुर्दा—पु. १ रुपाया. इ० मोठ्या नाण्याबद्दल हलकीं नाणीं, पैसे; तांब्याच्या नाण्यांची, ववकयांची मोड; परचुरण; चिल्लर.

(क्रि० करणें). २ फुटलेल्या, छिन्नभिन्न झालेल्या वस्तूचे तुकडे (मडकीं, भांडीं इ० चे). ३ (हांदुळणें, गचके बसणें यापासुन झालेला) शरीराचा चेंदामेंदा. खुर्दमा अर्थ १ पहा. जसें–'अंगाचा किंवा शरीराचा खुर्दा.' ४ (ल.) मोठ्या माणसांच्या जमावांतील मुलांचा समुदाय. ५ (ल.) नाश. 'सैन्याचा खुर्दा झाला.' [फा. खुर्दा; सं. क्षुद्र] खुर्देफरी–पु. मोड देण्याकरितां तांब्याचीं नाणीं ठेवणारा माणूस, खुर्देवाला.

**खुर्निसा, खुर्निसात, खुर्नीस**—स्त्री. कुर्नीस, कुर्निसात् पहा.

**खुर्पी**—स्त्री. (खा.) खुरपें पहा.

**खुर्सदगी**—स्त्री. आनंद; संतोष. 'मंजूर दर्याफ्त जाला व खातेरेस बिस्यार बिस्यार खुर्सदगी जाली.' –भाऐपयाव ४६. [फा. खुर्सन्द=संतुष्ट]

**खुर्सावेल**—स्त्री. (गो.) सुदर्शन वेल. [खुरसी+वेल]

**खुल**—पु. (पाणी, दूध इ० चा) चुळका. (भर याबरोबर उपयोग). 'खुलभर दूध घेतलें.' –सोमवाराची कहाणी पृ. ११. [सं. क्षुल्ल; प्रा. खुल्ल=लहान]

**खुलगा**—पु. (कों.) रेघा; खुळगा पहा.

**खुलणें**—अक्रि. उघडणें; याचे लक्षणेनें पुढील कांहीं अर्थ होतात. १ (ल.) फुलणें; उमलणें; प्रसन्न होणें (अंतःकरण, स्वभाव). 'दोन पदें ऐकतांच तो खुलला आणि गाऊं लागला.' २ उदयास येणें (दैव, नशीब). ३ स्पष्टपणा, तकतकीतपणा, सारखेपणा मिळणें, होणें; (रंग). ४ उघडणें; थांबणें (पाऊस). ५ बुद्धिगम्य, स्पष्ट, कळेसा होणें (बेत, इंगित) ६ शोभणें; साजणें; साजेसें होणें. 'हें पागोटें त्या शालजोडीस खुलतें.' ७ पुढे येणें; आपल्या सर्व गुणांनीं व बुद्धीनें चमकून पडणें. 'बादाचा तडाखा चालला म्हणजे हा खुलतो.' [अर. खलास्=मोकळा प्रशस्त. हिं. खुलना]

**खुलपी**—स्त्री. (सोनारी) गोल घुमट व त्या मधोमध उभें शिखर राखून सोन्याच्या अगर चांदीच्या पत्र्याचें ताइता प्रमाणें तोंडाशीं बसवावयास केलेलें टोपण. [कुलूप?]

**खुलवर**—स्त्रीन. लांच; लाडव. –स्त्री. १ चोरीच्या, लबाडीनें मिळविलेल्या, वस्तूंचा गुप्त सांठा. २ मालकांपैकीं किंवा भागीदारांपैकीं एखाद्यानें (स्वतःच्या खाजगी उपयोगासाठीं) सर्वसाधारण मालमत्तेचा आपणासाठीं चोरून ठेवलेला भाग (पैका, जिन्नस यांचा). ३ (कों.) घरांतील कर्त्या माणसाच्या न कळत पुरून ठेविलेलें द्रव्य; असल्या प्रकारचा गुप्त सांठा करणें. 'केली खुलवर शेवटीं सुभर देतील दग कर्जाचे डोंगर दावितील करून वर त्या बघा।' –पला ८५. (क्रि० करणें). [खुला] खुलवरचा–वि. लबाडीनें मिळविलेला. 'टाळकच गांदणुक म्हणती असेल खुलवरचा।' –पला २९.

**खुलविणें**—उक्रि. खुलणें प्रयोजक.

**खुला**—वि. १ मोकळा; उघडा; बंदिस्त नसलेला (माल, जागा, गळा). २ बोडका; अनाच्छादित (अंबारीविरहित हत्ती, खोगिराशिवाय घोडा, पलाणाखेरीज उंट). ३ रितें; खाली; मोकळें (भांडें, घर, जागा). ४ मनमोकळा; कुढा नसलेला. ५ (ल.) अनिश्चित; अनियंत्रित; स्वतंत्र इ० लाक्षणिक अर्थ; जसें–खुली मुदत=अनिश्चित न ठरविलेली मुदत; खुली चाकरी=मनास येईल तेव्हां सोडतां येण्यासारखी चाकरी. ६ स्पष्ट; उघड; खडखडीत; साफ (भाषण). ७ (चंद्रपुरी) फोड; तुकडा; काप. ८ (व.) वाळविलेली फळभाजी; ठसन्या. [अर. खलास्=मोकळा; हिं. खुला] ०कागद–पु. मोकळा कागद; बंद न केलेलें पत्र. ०कारभार, व्यापार, धंदा, काम–पुन. मोकळा, उघडा उघड, प्रामाणिक, सचोटीचा, चोख कारभार किंवा व्यवहार. ०पदर–पु. सदाचारी; निष्पाप वर्तन (विवाहित स्त्रीच्या बाबतींत). 'माझा खुला पदर आहे कोण खार लावितो!' ०व्यापार–पु. आयात मालावर जकात न घमविणें. (इंग्रजी 'फ्री ट्रेड' या शब्दास प्रतिशब्द). ०हिशेब–पु. स्वच्छ, विन भानगडीचा, सरळ, विन लबाडीचा, हिशेब, जमाखर्च.

**खुला**—पु. कवडीच्या जातीची मोठी, उंच व पांढरी शिंप.

**खुलाड–डें**—न. खुराडें पहा.

**खुलावट**—स्त्री. सजावट; शोभा; सौंदर्य; उठून दिसणें. [खुलणें]

**खुलाविणें**—उक्रि १ खुलविणें; प्रसन्न करणें; अनुकूल करणें; २ उमलविणें; खोलता, मोकळ्या मनाचा, आनंदी करणें. ३ शोभिवंत करणें. [खुलणें प्रयोजक]

**खुलास**—वि. १ मोकळें; प्रशस्त; बंदिस्त नसलेलें (प्रदेश, स्थळ). २ मुक्त, अनियंत्रित. ३ अकपट; मनमोकळा; निष्कपटी. [अर खलास्=मुक्तता] खुलासाचा–वि. १ मोकळा. २ (ल) भांत बाहेर नसलेलें; मोकळें (भाषण). 'खुलासाचें बोलणें बोलत नाहीं.'

**खुलास–सा**—पु १ मनमोकळेपणा. 'खुलासा बलकट माला.' –पया ३७५. २ शुद्धभाव. 'चित्तांतील खुलासा व अहवाल जाहीर व्हावा.' –रा ७.९२. [अर. खलास्=मोकळेपणा]

**खुलासा**—पु १ अर्थ; मतलब, उद्देश, हेतु; आशय; धोरण; अभिप्राय (भाषण, लेख यांचा). (क्रि० काढणें; निघणें). २ निवाडा; निकाल; निर्णय. ३ स्पष्टीकरण. ४ सार, निष्कर्ष, साराश. 'त्यांत खुलासा हाच कीं अतर्वेदींत मन्हाटे न आणावे.' –रा ६.२०८. [अर.]

**खुलासा**—पु. १ निश्चिन्ती. 'खुलासियानें आमत आवें.' –ख १.१९९. २ पेचमुक्त. 'सरकारांचा सरंजाम खुलासा, यांचा

सरंजाम सुटलाच नाहीं ' –ख २ ८४५ ३ मोकळेपणा, खुलेपणा [अर खलास्]

**खुली**—वि मोकळी खुला पहा ०कैद—स्त्री १ बेड्या शिवाय कैद २ नजरकैद, इकडेतिकडे फिरण्यास मोकळीक अस लेली कैद, ढिला निग्रह खुली मुदत, खुली चाकरी खुला पहा

**खुलें**—वि ( जरतारी धंदा )रेशमावर तार विरळ गुडाळली असलेलें

**खुलौरी**—स्त्री रंग, शोभा, खुलावट ' आनंदाची खुलौरी दाखली । ' –भाए ९० [ खुलणें ]

**खुल्द मकान**—वि स्वर्गस्थ, स्वर्गास जाण्यास योग्य, कैलासवासी औरंगजेबास हें उपपद लाविलेलें आढळतें [फा खुल्द्+मकान ]

**खुश**—वि आनंदित, संतुष्ट, तृप्त प्रसन्न [ फा खुश् ] सामाशब्द– ०खत-खात–न सुरेख अक्षर, सुंदरलिपी [ फा खुश्+खत ] ०खबर–स्त्री चांगली, आनंदाची बातमी [ फा ] ०खरिदी–स्त्री आग्रह, जुलूम विरहित, आपखुशीनें खरेदी, बिन जुलमी व्यापार ०खुर्मी–स्त्री आनंद, समाधान ते पोहोंचून खुशखुर्मी हासल जाहली '–रा १० ११८ [ फा खुश्+खुर्रमी ] **खुशबो-बोई-खुशबोय**–स्त्री सुगंध, सुवास, अत्तर ' खुश बोई अत्तर लावु राजसा ' –सला ७८ [फा खुशबो ] ०मर्जी– स्त्री १ मान्यता, अनुकूलता, खुशी २ चांगली वृत्ति, स्नेहभाव, आनंदीपणा ' नवाबानीं खुशमर्जीनें आम्हांस पत्रें पाठविलीं ' –ख ७ ३४५३ –वि १ मान्य असणारें, कबूल करणारा २ चांगल्या वृत्तीच्या [ फा खुश्+अर मर्जी ] ०मसकरी–ऱ्या– पु १ थट्टामस्करी करणारा, विनोदी, थट्टेबाज २ विदूषक, राजाजवळील गमत्या ३ तोंडपुज्या, स्तुतिपाठक [ हिं ] ०मिजाजी–वि ( गु ) आनंदी ०मौज–स्त्री क्रीडा, गमत, खेळ, करमणूक ०मौजा–जी–वि गाणें–बजावणें, हांसणें– खिदळणें, थट्टामस्करी वगैरेंत आनंद मानणारा, ख्यालीखुशालींत भागणारा, रंगेल [फा खुश्+मजाह् ] ०रंग–वि आनंदी, चैनी विलासी [ हिं ] ०रजावंत–द–वि रुकार देणारा, राजी, कबूल, मान्यता असणारा [ फा खुश्+रजामंद ] ०रजावंती– दी–स्त्री मान्यता, कबुली, राजी, अनुमति, खुशीची संमति [ फा ] ०वख्त–ख्ती–स्त्री १ उल्हासाचा काल, आनंददायक प्रसंग, प्रसन्न मनाचा काल ' धारांचा खुशवख्त पाहून अर्जी चावी ' २ सुखावह समाधानकारक स्थिति, अवस्था, प्रसंग ०वख्त– वि १ सुखी खुशाल, संतोषदायक स्थितीचा, काळाचा, प्रसं गाचा २ सुखी, आनंदित ' नवाब बहुत खुशवख्त होऊन ' –रा ११ ५९ ३ आनंददायक, सुखकर 'शाम पुष्पाची सुखवख्त।' –सला ११ [ फा खुशवख्त ]
दादा २ ५४

**खुश्की**—स्त्री १ जमीन, भूभाग, ( याच्या उलट जलवे ष्टित प्रदेश, द्वीप, बेट ) २ भूमिमार्ग ( याच्या उलट जलमार्ग ) ३ कोरडी जमीन (कृत्रिम रीतीनें भिजविलेली नव्हे ) ४ जमीनी वरील जकात, स्थलमार्गानें येणाऱ्या मालावरील जकात [ फा खुश्की तुल स शुष्क ]

**खुशाद**—वि मोकळा, खुला ' हात खुशाद होईल ते समयीं मागती लोक ठेवावयास उशीर काय ? ' –रा १ ४६३ [ फा कुशाद् ]

**खुशामत-द**—स्त्री रुचेल असें प्रिय भाषण, स्तुति, हाजी हाजी, आर्जव, थुंकीझेलणी, तोंडपुजेपणा ( भाषेचा, क्रियेचा ) [ फा खुश्+ आमद् ] म्ह० ह" खुशामत ताजा रोजगार=खुशाम त्याला पैशाची रोजगाराची पचाईत नसते सामाशब्द– ०तलबी– स्त्री स्तुतिप्रियता ' पाटीलबाबाची मर्जी खुदपसंती व खुशा मत तलबी बहुत ' –दिमरा १ २५९ ०दोस्त–वि स्तुतिप्रिय ' खुशामतदोस्त असू नये म्हणजे आत्मस्तवावर प्रीती नसावी ' –ऐस्फुले ४८ **खुशामती-दी**–वि खुशामत करणारा, तोंड पुज्या ' खुशामति गुलाब हा चटक चुटक्या वाजवी । ' –गाणें ( काशीकडील ) ' हिंदुस्थानी माणूस ब्राह्मणापासोन अतिशूद्र व मुसलमान पावेतों दगाबाज, मात्रागमनी, बेइमान, खुशामदी व तत्काळच निर्दय, प्राण घेणार पोटच्या संतानापावेतों ' –एस्फुले १०३ [ फा खुश्+आमदी ]

**खुशाल**—वि. १ सुखी, सुखसंपन्न, संपत्ति व स्वास्थ्य अस णारा, आनंदी ' ह्या फौजा गेल्या म्हणोन इंग्रज व मोंगल फार खुशाल जाहले ' –ख ९ ४५२६ २ सुखरूप, निरोगी, चांगला, बरा –क्रिवि सुखानें, सुखेनैव, बेलाशक, सुखामत, भय, धोका, चिंता, आशंका याशिवाय [फा खुश्+हाल=स्थिति, स कुशल] ०चंद–देखडा–वि निष्काळजी, चैनी, क्रीडासक्त, खेळाडू, विषयलोलुप रिकामटेकडा, खुशमौजा, रंगेल, गुलहौशी

**खुशालणें**—अक्रि आनंदणें, सुखी होणें ' कां न तो खुशालेल अतरीं । ' –विक ३३ [ खुशाल ]

**खुशाली**—स्त्री १ संतोष, स्वस्थता, सुख २ निरोगी व सुखी स्थिति, क्षेम, कुशल, समाधान, आनंद, आनंदितपणा ' त्याजव रून खुशाली करी '–रा १ ५५ ३ मौज, गमत, क्रीडा [खुशाल] ०व खुशाली–स्त्री विशेष आनंद, आनंदीआनंद, संतोषच संतोष ' खुशाली–व–खुशाली रूमदाद जाहली ' –पया ३८६.

**खुशी**—स्त्री १ आनंद, संतोष, समाधान ' त्यांत खुशीची खबर आहे ' –ख ७ ३५८६ २ मर्जी, इच्छा ' मासे खुशीस आले तर जाईन ' –वि १ आनंदित, संतुष्ट, तृप्त ' तो गाणें एकून खुशी झाला ' २ तयार इच्छु [ फा खुश् ] खुशींत गाजरें खाणें–मूर्खपणानें, क्षुद्र कृत्यानें आनंद प्रदर्शित करणें

–चा सौदा–पु. गैर जबरदस्तीची, मर्जीची, इच्छेची गोष्ट, मामला; वाटल्यास करावी न वाटल्यास न करावी अशी गोष्ट.

**खुदक**—वि. सुका, वाळलेला, 'खुरक मेव्याचे.खोन.' –रा १०.२९६. [फा. खुरक; तुल० सं. शुष्क] ०साली–स्त्री. खुदकी; अवर्षण, दुष्काळ. 'साल मजकुरीं खुदकसाली आहे.' –रा २२.५२.

**खुदकी**—स्त्री. १ जमीन. खुशकी पहा. 'खुदकीचे तमाम सर्दारांनीं इमेमास तर्फी करून खुदकींतून त्याजला खेरीज करावें.' –रा १०.१८१. २ अवर्षण; दुष्काळ. 'कपर्दिक खुदकीमुळे जागिरीपैकीं हातीं लागत नाहीं.' –दिमरा १ ८३.

**खुदनमत**—वि. आनंददायक; संतोषकारक. 'रात खुदनमत.' –पया ३८४. [फा. खुश]

**खुदनुदी**—स्त्री. आनंद. 'मुफावीजा मर्हूम केला तो पोंहचून खुदनुदी हासल जाली.' –रा १०.१२९. [फा. खुश्नूदी]

**खुदनुमा**—वि. दिसण्यांत चांगलें; उचित. 'मरुवारनवीस तेथें जाणें जाहिराण्यांत खुदनुमा दिसत नाहीं.' –रा ५ १०४. [फा.]

**खुदबो–बोई, खुशर्थई, खुदमर्जी, खुदमस्करी–ऱ्या, खुदखस्त**—खुश पहा.

**खुदबो(दय)ईदार**—वि. सुगंधी. खुशबो पहा. 'चिकणी सुपारी तुसती व खुदबोईदार करून ठेवीत जावी.' –पया २८१. [फा. खुश्–बो–दार]

**खुष, खुषकी, खुष–खत–बोई–मर्जी–रजावंती–वक्त, खुषामद, खुषी, खुष्की**—हे शब्द खुशमध्यें पहा.

**खुषी(षि)रंग**—पु. संतोष; आनंद, खुशरंग पहा. 'जिवा होईल खुषिरंग।' –ऐपो १२१.

**खुस, खुसकी, खुसखत**—खुश पहा.

**खुस–कन–कर–दिशीं**—क्रिवि. खुदकन पहा. हळूच; आनंदानें; रंगेलपणें; मन मोकळेपणानें; गालांतल्या गालांत (हंसून). [ध्व.]

**खुसखुरणें**—अक्रि. हातानें खुसकरणें, चुरडणें. खुसकरणें पहा.

**खुसखुसणें**—अक्रि. आवाज होणें; खसखसणें; खजवजणें [ध्व.]

**खुसखुशी(सी)त**—वि. मऊ व कोरडा; कुरकुरीत; कुडकुडीत; खमग, खरपूस भाजलेला. [ध्व.]

**खुसप(पु)ट**—न. १ गुप्त दोष; व्यंग; न्यून, चीड येण्याजोगें किंवा अप्रतिष्ठा व्हावयाजोगें वर्म, चुका; गुंजावीस; बारीकसारीक दोष. (क्रि०. काढणें) २ (अव.) अल्प, क्षुद्र, संदिग्ध टीका, शेरा, भाषण; गोडीगुलाबीनें व निकाल लागेल अशा रीतीनें जास्त महत्त्वाची गोष्ट पुढें माडण्यासाठीं बोलणें (विनंति, खरडपट्टी); हातीं घेतलेल्या कामापासुन परावृत्त करण्यासाठीं काढलेल्या अडचणी; आक्षेप. ३ भांडणास कारण किंवा निमित्त; कळ; कुरापत; खोडी. (क्रि० काढणें; निघणें). ०खणें–मांडणें–(भांडण उकरून काढण्यासाठीं) एखाद्याचे न कळत झालेले अपराध, चुक्या, व्यंगें थोडीनें पुढें मांडणें, ठेवणें. [कसपट, कुसपट; सं. कुशपत्र ?]

**खुसपट्या**—वि. खुसपटें काढणारा; छिद्रान्वेषी; लोकांचे फक्त दोष काढणारा, दोषदर्शी. [खुसपट]

**खुसपणें**—उक्रि. खुपसणें पहा. (खुपस वर्णव्यत्यास).

**खुसवुसणें**—खुसखुसणें पहा. 'अगबाई! इथं खुसवुसलं काय बरं!' –चेंद्रम २१. [ध्व]

**खुसूप**—न. दृश्य; प्रसंग. 'ऐसीं खुसुपें देखोनि।' –गीता २.२३२२.

**खुसूस**—अ. विशेषतः. –रा ५.५२. [फा.]

**खुस्तार**—क्रिवि. (गो.) खर्चानें. 'फुलु खुस्तार खॉजनें' =फुलक्या खर्चानें मजा करणें. [पोतु. ई. कॉस्ट]

**खुळ**—न. वेड, खूळ पहा. ०कट–गट–वि. वेडा; बावळा; मूर्ख; वेडपट; वेडसर. [खूळ] ०चांट–झंवा–वि. (ग्राम्य) जडबुद्धीचा; वेडझंवा; टोणपा; मंदधी. ०चट–पट–पट्या–वि. १ खुळा, वेडा. २ वांकड्या हातापायांचा; अपंग. ३ खुरटा; वांकडा; खुजट (अवयव). ०सट–सर–वि. बावळट; मूर्ख; वेडसर.

**खुळ–कन–कर–दिन–दिशीं**—क्रिवि. खुळखुळ असा आवाज होऊन. खुळखुळ पहा. [ध्व.]

**खुळपट–ट्या**—खुसपट–ट्या पहा.

**खुळखुळ–ळां**—क्रिवि. खुळ! खुळ! अशा आवाजानें (पायांतील घागऱ्यांचा, ओढ्याच्या झुळझुळ वाहणाऱ्या पाण्याचा, वाळलेल्या नारळाचा, चूळ खळखळण्याचा इ०). खुळ! खुळ! असा आवाज काढीत. 'झोटिंग वायोस्वरूप असती। सर्वेच खुळखुळां चालती।' –दा १०.४.२५ [ध्व.] **खुळखुळणें**—क्रि. १ खुळखुळ आवाज करणें, होणें, वाजणें. २ चूळ भरून टाकणें.

**खुळखुळा, खुळखुळणें**—पुन. १ आंत खडे असल्यामुळें खुळ खुळ वाजणारें, मुलाचें एक खेळणें. 'दांतांचा खुळखुळा झाला =दांत हलूं लागले. २ घोड्यास रंगणावर धरतांना वाजविण्याचें एक साधन. ३ तागाच्या झाडाप्रमाणें पुरुषभर उंचीचें, तागाप्रमाणें फुलें असणारें एक झाड; ही फळें वाळल्यावर खुळखुळ! वाजतात. घाटसपें असें यास दुसरें नांव आहे. –वगु २.५४. **खुळखुळा**–वि. खुळ! खुळ! आवाज करणारें (काठी, सोटा, भागराळें इ०). ०डिंगळा–पु. एक झाड; याचीं फुलें अर्धे पिंवळीं

असून याच्या येगेचा आवाज खुळ । खुळ । असा होतो. खुळखुळाविणें-उक्रि. १ खुळ । खुळ । शब्द करणें. २ तोंड धुणें; चूळ भरणें. खुळखुळी काठी-स्त्री. खुळ । खुळ । शब्द करणाऱ्या खिळखिळ्या लाविलेली काठी. [ ध्व. ]

खुळखुळें—न. (कु.) निरशीनंतर जन्मलेलें मूल.

खुळगा, खुळगट—पुन. (कों.) रेडा; हेला; माहिष. 'यमें करळीला सळ खुळगासा उठिला।' –वामन (कंसवध) २.२.

खुळखुळ—स्त्री. खुळखुळण्याची क्रिया. (क्रि० करणें).

खुळखुळ-ळां-क्रिवि. खुळ । खुळ । असा आवाज करीत

खुळखुळणें, खुळखुळाविणें-अक्रि. तोंडांत पाण्याची चूळ खळखळ वाजविणें; गुळणा करणें; खुळाविणें. [ ध्व. ]

खुळा—पु. रेडा. खुळगा पहा.

खुळा—वि. १ वेडा; यावळा; मूर्ख; वायचळलेला; खुळचट. २ थोटा; अपंग; वांकड्या हातापायाचा. 'एन्हवीं असता हातीं घुळा।' –ज्ञा १३.४५६. [सं. क्षुद्र, खुल; तुल० का. ते. कुळ= वेडा ] सामाशब्द– ०ऊंस, रानऊस-पु. औषधी उंसासारखें झाड; औषधी ऊंस. ०चा पाऊस-पु. १ खुशामतीमुळें फुशारून गेलेल्यानें केलेली भरमसाट उधळपट्टी, वेसुमार औदार्य. २ कामाची बेपर्वाई; भरमसाट कारभार. ०पैसा-पु. राजापूरप्रांतीं चालणारें एक जुनें तांब्याचें नाणें; एका रुपयास हे सातशें मिळत. ०मधुरा-पु. १ विषमज्वर; वेडा मधुरा. यांत माणूस वेड्यासारखी बडबड करतो. २ (ल.) वेडा माणूस. ०घेडा-वि. खुळा आणि वेडा; विक्षिप्त व वायचळलेला; ठोंब्या. 'खुळें वेडें पोटचें, निंबपोल होतचें.' खुळॉय-स्त्री. (गो.) वेड लावणारी गोष्ट; गम्मत इ० खुळावणें-अक्रि. वेडें होणें; मूर्ख बनणें, वेड लागणें. [ खुळा ] खुळी-स्त्री. (गो.) पायाची टांच. खुळें-वि. १ वेडें; मूर्ख. २ थोटें; अपंग. 'न धरे तैसे स्नेह खुळें। सर्वत्र होय।' –ज्ञा १८.९५७. ३ शक्तिहीन, दुर्बळ. खुळेश्वर-वि. विलक्षण मूर्ख; मूर्खांचा राजा. [ खुळा+ईश्वर ]

खुळ्या—पु (कों.) रेडा; हेला; खुळगा पहा.

खुजा—पु (तंजा.) फिरकीचा तांब्या. [ खुजा ]

खूट—स्त्री. १ उणीव; तूट; न्यूनता; वजनांतील कमीपणा २ खुट; उंसाच्या चरकाच्या चुडाच्या (मळसूत्री खाचाचे) भागाचा जादा तुकडा. [ खुटणें ]

खूट, खूंट—पु. १ (कों.) नांगराचें खोड; कोळसा; फाळ भरण्याचें लांकूड. २ अंगरख्याच्या बाहीखालील चुण्या करून त्यावर पट्टीसारखी शिवण केलेली असते ती. खुंट पहा. ३ (कु.) वेलीचा आधार, खांब. इतर सर्व अर्थी खुंट पहा. ०आगुल-स्त्री (व.) मधली आगूल. ०गय-स्त्री. (व.) वर खुंट देऊन बसविलेली गय.

खूड—स्त्री. हरभऱ्याच्या झाडाचे तोडलेले कोंवळे शेंडे. खूड फारणें-हरभऱ्याचे शेंडे खुडणें. 'हरभऱ्याचें झाड कोंवळें असतें तेव्हां त्याची खूड करतात.' –कृषि ३१३ [ खुडणें ]

खूण—स्त्री. १ चिन्ह, ज्यानें एखादी गोष्ट जाणली जाते किंवा समजली जाते तें लक्षण; ठिपका; निशाणी; व्यंजन; संकेतचिन्ह. 'हेचि खुणे सांगतसे।' –नव १२.१८८. २ (विशेषतः) क्षेत्रसीमाचिन्ह; शींव. ३ संकेत; इशारा (डोकें हालविणें, हातवारे, नेत्रसंकेत इ० क्रियेनें दिलेला). सूचना; सांकेतिक सूचना; उल्लेख; पर्यायोक्ति. (गुप्तरूपानें आपला अभिप्राय दुसऱ्यास समजावा म्हणून केलेला) ४ वर्म; मर्म; लक्षण. 'या खुणा तूं कहीं। चुकों नको।' –ज्ञा ९.१३४. [सं. क्षुण्ण; फा. खून] (वाप्र.) ०धरणें-ध्यानांत ठेवणें. ०पाळणें-आज्ञा पाळणें; मनोगताप्रमाणें वागणें. 'नव्हे तयाची खूण पाळिली।' –ज्ञा १८.९१४. म्ह० दादाची खूण वहिनी जाणे=एखाद्याचें मर्म त्याच्या जवळच्या माणसास ठाऊक असणें. सामाशब्द– ०खाण-स्त्री. खुणा, संकेत, मनोगत, सूचना, चिन्हें यांस व्यापक शब्द. खूण पहा. ०गांठ-स्त्री. १ (एखाद्या गोष्टीची) आठवण होण्यासाठीं किंवा ती सोडून देण्यासाठीं वस्त्रास किंवा त्याच्या पदरास मारिलेली गांठ. २ (ल.) खात्री. म्ह० विश्वास कीं खूणगांठ. ०मुद्रा-स्त्री. इशारा, चिन्ह, निशाणी, मुद्रा, ठसा, अंक इ० मोघम शब्दाबद्दल आणि व्यापक अर्थानें योजतात. एखादी खूण किंवा सर्व खुणा. खूण पहा.

खुण-न—स्त्री. (कु.) मासे पकडण्याचा बांबूच्या विळांचा सांपळा; हा मृदंगाच्या आकाराचा असतो. खोइन पहा.

खूद—पु. भंडाऱ्यांचें ताडी ठेवण्याचें अरुंद गळ्याचें मडकें.

खूद—क्रिवि. खुद; स्वतः; खासगत इ० खुद पहा.

खून-ण—पु. १ मनुष्यवध; हत्या; घात; मनुष्यास ठार मारणें. २ रक्त, रक्तपात; (या मूळ अर्थानेंहि योजतात). ३ (कायदा) खात्रीनें मरण येईल असें कृत्य करून ठार मारणें. [फा. खून=रक्त; प्राणनाश] ०चढणें-१ मनुष्यवधामुळें उन्माद चढणें; वेड लागणें. हा उन्माद खुनी इसमास सूड घेणाऱ्या देवतांनीं सुडाच्या प्रतिकारार्थ पाठविला असतो अशी समजूत आहे. ०खराबा-पु कचल, नासधूस; लूट व धूळधाण किंवा जाळपोळ इ०. ०माफ-स्त्री-पुखी खुनाच्या शिक्षेपासून मुक्तता. खूनमाफ-वि. खुनाच्या शिक्षेपासून मुक्त. ०मान्या-वि. (गो.) खुनशी.

खूप—स्त्रीपु. १ खुपरी अर्थ १,२ पहा. ठणका; वेदना. (क्रि० भरणें). 'माझ्या डोळ्यांस खूप लागली आहे.' २ खुपरी रोग. (क्रि० होणें) [ खुपणें ]

खूप-ब—वि फार, पुष्कळ, अतिशय 'देवानें खूप शाह्य साल्हे' –क्रिवि चांगल्या रीतीनें, नामी रीतीनें, सुरेख प्रकारें, पक्कवीतपणें, निपुणपणें, दमदपणानें 'ती खूप बसली आहे' 'त्याला खूप मारलें' –उद्गा भले! वाहवा! [फा खूब] ०तराशी–क्रिवि उत्कृष्ट रीतीनें, डौलानें शोभा वाढेल अशा, श्रीमंती थाटानें, उत्तम तऱ्हेनें [फा] ०वजा–क्रिवि उत्तम रीतीनें 'मुगा तुम्ही यास खूबवजा ताकीद करून रवाना करावें' –रा १ ५१

खूब—वि सर्व रंग एकाच प्रकारचा असून ज्या कानाचा रंग निराळा असलेला (घोडा) –अश्वप १ ३२

खूम—पु लोक, राष्ट्र जात, कुल, समाज 'तरी कसबे मजकुरी कुलखूम असतील त्याजवर पट्टी करून रुपये द्यावे' –वाडबावा २ ७१ २ गावातील प्रतिष्ठित माणूस मामणी [र कौम] ०दार–वि प्रतिष्ठित मनुष्य [फा कौमदार=कुटुंब वा जात असणारा] ०धार–वि जातवार; लोकवार (क, प)

खूम—स्त्री (गो) विधि, पद्धत, चाल 'ववठात गे या वर दवाची भेट घेतली पाहिजे अशी खूम होऊन पडली आहे' खुम पहा

खूर—पु खुर पहा १ टाप, शफ पचनस पशूवाचून इतर पशूंचे जें पाऊल तें २ शफाचे दोन भाग ३ पलंगाचा, खाटेचा, खुर्चीचा पाय ४ चुलीच्या वरील मातीचे गाळे प्रत्येकी, तुळशीवृंदावनावरील चार उचवट कोपरे प्रत्येकी ५ खुरकी, खुरमध्ये पहा ६ गाय, म्हैस यांचा खड म्ह० जेथें गाय व्याली तेथेंच खूर खाडावे=सवऱ्याला सेवल्या तेथें तोंड यावें एक खुराचा–वि सबंध किंवा न फुटलेल्या खुराचा, एकगळी (घोडा वगैरे) दोन खुराचा–वि फुटलेल्या खुराचा, गळे असलेला (बैल वगैरे) ०मुडी–खुरमध्ये पहा ०पका–पु जनावराचा एक रोग –दो ६ १०८

खूल—स्त्री धूळ 'महत्त्वाची खूल धरी।' –भाए ६०२

खूश—वि आनंदित, संतुष्ट तृप्त खुश पहा 'आपण खूश दिलीस असावें' –दिमरा १ २१० [फा खुश]

खूळ—न १ वेड, अमिष्टपणा, खूळ छंद, वेडी समजूत (क्रि० लागणें) २ (चडखोर लुटारू दरोडेखोर इ० ची) टोळी, जमाव ३ गोंधळ व दंगल, जाळपोळ व लुटालूट (चंडखोर किंवा लुटारूची धाड यामधील) दंगल, भांडण उपद्रव, त्रास (क्रि० मातणें, माजणें, उभें राहणें उठणें, मांडणें, घालणें, लावणें, उठवणें) 'हिंदुस्थानात एक नवीनखान मात्र खूळ राहिलें आहे' –भाब ४७ ४ अडचण, आडकाठी उपाधि पीडा (माणसें, वस्तु, प्रसंग यांच्यासबंधीं अनियंत्रितपणें योजतात) (क्रि० पाडणें, पडणें) ५ (सामा) वड 'किल्ला दिल्यानें खूळ करतील' –रा १२ १६८ ६ गुराचा एक रोग –नाको

[का कूळ=वेडा] ०पिसणें–(वड, खूळ, दंगा) वाढत जाणें ०लागणें–१ वेड लागणें. २ (ल) नाद व्यसन लागणें

खे॥—(सं केतिक) १ खोटी २ पोटीज

खेऊओ—शर्मी, वर्जी गेलो पहा 'माते वदन मेभी पळती भैसी।' –शिशु ८८९ [स क्षम, सम्मी]

खेंक—स्त्री (का) खोदाण, दाब (क्रि० लागणें) [खाकणें]

खेंकचें—अक्रि (गो) ओशाळणें

खेंकटें—न १ उलाढाल, यत्न, मसलत, युक्ति, उपाय, उपजीविकेसाठीं अधिकारानें पद्धतीनें काम किंवा त्याचा 'गवार चारविण्यासाठीं हजार खेंकटीं करावीं लागतात' २ अडचण, अड, नड, त्रास, कचाट कुभांडें, उपाधि, व्याधि, पीडा (कुटुंब, कारखाना, मनुष्य यांची) ३ तुफान, धांदल. ४ गोंधळ, गुंतागुंत घोटाळा (कामाचा) (क्रि० करणें, होणें, उलगडणें, निस्तरणें) 'त्या माझ्या कामाचें खेंकटें केलें परंतु त्यानें माझ्या कामाचें खेंकटें उलगडलें किंवा निस्तारिलें' ५ रोगाची साथ, पीडा, उपमा 'खोकल्याचें–पडशाचें–तापाचें–खेंकटें' [स संकट–पकट–खकट–खेकटें] ०खोर–खेंकट्या–वि हिकमती, उलाढाल्या, (पोटासाठीं) खेंकटीं करणारा खेंकटयास मैकटे–शराव सध्या शर

खे(खें)कड–डा खेकडें—नपु एक प्राणी, किरें चिमेरा, चिमोरें, चिंगोरी, कर्क–ट हा दशपादवर्गीतील प्राणी आहे [स कर्कटक]

खें(खे)कड–डा—वि १ वयस्क, जख्ख, खोकड, जीर्ण २ तुसडा, खाष्ट हिरवट [खेकणें, खेकडा] ०चाल्या–वि खेकड्याप्रमाणें चालणारा, तिरप्या चालीचा ०मेकडा–वि १ अव्यवस्थित वेडावांकडा; गदळ ओंगळ, नेमळा २ कुरूप, वेडौल वाईट (मनुष्य वस्तु) [खेकडा द्वि]

खेकडी—स्त्री १ खेकड्याची मादी २ थोल्याची एक लहान जात

खेंकणें—अक्रि १ दात खाऊन कचकचणें, वेडावणें (रागाव लेल्या माकडानें) २ फुरें करणें (घोडयानें) ३ (ल) रागानें, चिरडीनें वस्सकन अंगावर जाणें, खेंसणें, कातावणें, चिडणें ४ खोकणें [ध्व खें]

खेकर—स्त्री (वायव्दशी) रोगाची साथ

खेंकसणें खेकारणें—अक्रि रागावणें, चिडणें, अंगावर येणें खेकणें अर्थ ३ पहा [ध्व तुल० का केक्स=रागीट भाषा, स कर्कश]

खेंकाटणें—अक्रि १ खेकणें अर्थ १ पहा २ खें! खें! करणें रडणें केंकाटणें (मुल) [ध्व] खेंकाट्या–वि खेंकटणारा

**खेंका धावणें**—अक्रि. ( प. ) खेकणें अर्थ ३ पहा. धाक, भीति दाखविणें.

**खेंका(दा)ळणें**—अक्रि. १ हिसणें; खेंकाळणें; खिंकाळणें पहा. २ ( निंदेनें ) फिदीफिदी हंसणें; खिदमिदणें ( मोठपानें हंसणें ). ३ आनंदानें खें खें करणें, हंसणें. ( मूल ). [ध्व. ]

**खेंसें**—स्त्री. १ वस्कन अंगावर येणें. खेकणें अर्थ ३ पहा. २ आनंदानें शब्द करणें ( लहान मूल ). –क्रिवि. रागानें वस्मकन अंगावर जाऊन; खिंकाळत; फिदिफिदि हंसत ( क्रि० करणें, हांसणें ) [ ध्व. ]

**खेंगट**—न. चोंबील, कोळंबी, शिंगे इ० मासांची केलेली एकत्र रास. ०**खाऊ**–वि. मासेखाऊ ( विशिष्ट जातीची निंदा करावयाची असल्यास योजितात; उलट निंदित जाती निंदा करणाऱ्या मांसाहारी जातीस दाळखाऊ असें उलट म्हणतात )

**खेंगटें, खेंगटेखोर**—खेकटें-खोर पहा.

**खेंगाळा**—पु. एक तांबड्या जातीचा मासा.

**खेंचकट**—न. ( कु. ) गर्दी; घणाई; गचडी. [ खिन ]

**खेंचणी**—स्त्री. १ घट्ट ओढणी. (क्रि० करणें; देणें) जोराची, दांडगाईची ओढ. ( क्रि० देणें, करणें ). २ ( जरतार ) परडी फिरविण्याचा ६ इंच लांबीचा लांकडी दांडा. [ खेंचणें ]

**खेंचणें**—उक्रि. ओढणें; जोरानें ओढणें, ओढून नेणें; फार ताणणें, आवळणें, बांधणें. **खेंचून धरणें**–१ ओढून धरणें; हट्टास पेटून किंवा दुराग्रहपूर्वक अडविणें. २ मार्गांतून एकीकडे सरावयास किंवा जागा द्यावयास लावणें. –अक्रि. खेंचणें. [ सं. कृष्; हिं. खींचना ].

**खेचर**—न. १ ( आकाशांत फिरणारे ) पक्षी; ग्रह; नक्षत्रें. २ योगी. ३ समंध; भूत 'जैसा जनामाजि खेचरु। असतुचि जना नोहे गोचरु।' –ज्ञा ५ ९९. [सं. ख=आकाश+चर=फिरणें]

**खेंचर**—न. गाढवी व घोडा याची मिश्र संतति; अश्वतर –मोआदि ७ [ सं. खरज; हिं. खच्चर ]

**खेचरी( मुद्रा )**—स्त्री. हठयोगांतील एक मुद्रा; गुरूपदिष्ट पद्धतीनें दृष्टि भ्रूमध्यावर नेऊन इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन नाड्यांचा मार्ग जें कपाळाच्या आंतील छिद्र, त्यांत जिभेचें टोंक वळवून राखण्याची क्रिया. ही मुद्रा सर्व मुद्रांत श्रेष्ठ आहे 'जेवीं खेचरीयोगिया।' –एरुस्व ९.३२. 'तेरा दिवसीं खेचरी सिद्धि साधून।' –स्वादि ९.५.२१. [ सं. ]

**खेंचाखेंच**—स्त्री. कचकावून किंवा दांडगाईची ओढाताण, रेटारेट. [ खेंचणें ]

**खेचकणी, खेचणी**—स्त्री. (गो.) हिणविणें. [ खिजविणें ]

**खेट**—स्त्री. १ पाचर; खुंटी (गच्च बसविण्यासाठीं) २ दाटी, जमाव. ३ जमण्याची नियमित जागा किंवा अड्डा, वेळ. 'फुलधागेनी येथ खेट केली।' –पला ४.२२. ( क्रि० पाळणें; गंमाळणें; टरणें; टरवणें ). ४ भेट. 'तो घडवील तेव्हां जगजेठी। तेव्हांच खेटी होतील।' –अफला ५.६. रेट. अर्थ १।२ पहा.

**खेट**—न. गांवठाण; खेडें. ०**खर्वट**–न. बाजार भरणारें खेडेंगांव.' खेट खर्वट ग्रामीं पुरीं।' –एभा २३.४९७. [सं. खेट ]

**खेटक**—न. ढाल.'खेटकाआड असुर दडती।'–रावि ३५. १४९. 'आले गर्जत खड्ग खेटक गदापाणी दणाणी धरा।' भामा ३९. [ सं. खेट; का. खेड=ढाल ]

**खेटण**—स्त्री. दाटी; गर्दी. [ खेटणें ]

**खेटणी**—स्त्री. १ ( विणकाम ) कापड विणतांना धाग्याची सुतें खेटून बसविण्याची क्रिया; ठांसणी त्यावरून. २ वीण; पोत. ३ ओलांडणी. ( -क्रि. ) पहा. [ खेटणें ]

**खेटणें**—सक्रि. १ ओलांडणें; उल्लंघणें; मजल मारणें (जागा). 'खेटितां कुंप कांटी कुंट दरडी न पाहे।' –तुगा ३४९. 'आम्ही चार मुलुख खेटले।'–पला ८८. 'म्यां पांच कोस मजल खेटली.' २ रस्त्यांतून एकीकडे सारणें; बाजूला ढकलणें; जागा द्यावयास लावणें. –अक्रि. १ भिडणें; शिवणें. २ (रा. ) अगदीं जवळ जाऊन बसणें; चिकटणें. ३ जातांना धक्का देऊन जाणें; झगटणें. ४ एके ठिकाणीं दाटी,गर्दी करणें; जवळजवळ; चिकटून बसणें. ५ जवळ येऊन ठेपणें,पोहोंचणें, भिडणें. [का. केट=फार, अतिशय]

**खेटनी**—स्त्री. (व.) तगादा; ढुमणें. 'सरी करण्याची खेटनी मागें लागली.' [ खेटणें ]

**खे(खें)टर**—न. १ जोडा; वहाण; पादत्राण; पायपोस (निंदाव्यंजक). २ पाय; लाथ. ३ (ल.) अत्यंत क्षुद्र वस्तु; तिरस्करणीय पदार्थ. म्ह० १ चांभाराच्या देवास खेटराची पुजा; २ आपल्या खेटरावर माया, ती दुसऱ्याच्या पोरावर नाहीं." ३ वडिलांचीं खेटरें घेऊन पळणारा=अवज्ञा करणारा, कोडगा मुलगा. ४ खेटर तुटो अथवा जळो=काडीइतकी पर्वा नसणें या अर्थी. सामाशब्द– ०**खाऊ**–वि. ( निंदार्थी ). सर्वदा खेटरानें बडविला जाणारा; कोडगा; निर्लज्ज. ०**मार**–पु.जोड्याचा मार. **खेटराखेटरी**–स्त्री. जोडाजोडी, जुतेपैजार-री.

**खेटवणें**—सक्रि. १ दाटी करणें. २ भिडविणें. [ खेटणें प्रयोजक ]

**खेटा**—पु. १ क्षेत्र किंवा देवस्थान यास जाण्याची नियमित खेप, वारी, फेरा. (क्रि० करणें, घालणें). यावरून ( खेटे. अव. योजून ) एकसारख्या येरझारा, खेपा; किंवा निष्फळ येजा. ( क्रि० घालणें; करणें ) २ ( राजा. ) गर्दी; चेप; दाटी; खेंचाखेंच. 'शरीरीं नाडींचा खेटा।' –दा १२.५.११.'गजवज अति खेटा ठायीं ठायीं पताका।' –माधवकृत रामायण बालकांड ३८ ( महाराष्ट्रकवि ). ०**खेट**–स्त्री..१ दाटी; गर्दी. २ अंगाशीं

अंग लागण्याजोगा परस्परांचा संबंध; ढकलाढकली; धक्काबुक्की. खेटो-पु. (गो.) येरझारा; अडथळा. 'प्रत्येक कामांत खेटो हा येतो' खेट्या-खेटे घाल्या-वि. एखाद्या कामाविषयीं फेऱ्या घालणारा; वारकरी; येरझार करणारा; उंबरठा झिजविणारा.

खेटी—स्त्री. १ गर्दी; लगट. 'मागें पुढें रिघे पोटीं । सादे खेटी करी तें ।' -तुगा १६७६. [खेट]

खेड—स्त्री. १ मिसळ; मिश्रण; मिश्रितपणा; मिश्रित किंवा मिसळीचें द्रव्य. (मुख्यत्वें धान्य, दाणे). २ (शेती) चिखल -कृषि २५७. ३ (राजा.) फणसाच्या आठीळांची दाणे घातलेली सुकी भाजी. [खेड]

खेड—पु. चमत्कारिक, विलक्षण, तन्हेवाईक माणूस. ०कर-वि. मिश्रित (धान्य). ०गणती-स्त्री. सरसकट मोजणी.

खेड-खेडें—न. लहान गांव (शके ७२८, च्या वणी ताम्रपटांत हा शब्द आला आहे). [सं. खेट-क] ०कचेरी-स्त्री चावडी. ०वळ-वाळ, खेडाऊ, खेडोळ, खेडाघळ, खेडाळ, खेडाळू, खेडवल-वाल-वि. १ गांवढळ; अशिक्षित; खेड्यांत राहणारा; शेतकरी. २ गांवरानी, गांवठी; घरनती; गांवासंबंधीं (भाषण, धान्य, कारागिरीचा पदार्थ).

खेंड—स्त्री. गोल टोंकाची व जड तरवार; खांड पहा.

खेंड, खेंडगोंडी, कुली-खेंडार, खेंडुकली-लें— खिडगोंडी, खिडकुली, खिंडार पहा.

खेंड—न. (माण.) गोवरीचा किंवा लांकडाचा पेटलेला तुकडा [सं. खंड]

खे(खें)डकुली(ळी)—स्त्री. १ बागेंतील पाण्याचा लहान पाट. 'खेंडकुलिया आराम । त्यामाजीं दोघां समागम ।' -एभा ७.५६३. २ बाकणें घेत जाणारी नदी; खेड्यांतील ओढा. 'साहित्याचिया खेडकुळिया ।' -शिशु २६. 'ब्रह्मरसाची खेडकुळी ।' -शिशु ३९३. [सं. क्ष्वेड=वक्र+कुल्या=पाट, कालवा, ओढा]

खे(खें)डकुली—स्त्री. खेडवळ स्त्री. [खेटक+कुल]

खेडणें—सक्रि. खेटणें पहा.

खेडणें—सक्रि. जमीन कसणें; नांगरणें. [सं. कृष्=खेड]

खेडहक्क-पु. जमीन कसण्याचा हक्क. 'प्रत्यक्ष राजापासून आपली जमीन खेडहक्कानें उपभोगणाऱ्या या कुळानें .......' -पार्ले ५.

खेडम्या—पु. (ना.) म्हातारडा; थेरडा; वृद्धकपि. खेडमी-स्त्री. थेरडी [सं. क्ष्वेड=वक्र]

खेंडा-डें—पुन. १ मरड किंवा विरळ पोताचें व हलक्या किंमतीचें कापड; उगाळ शेला. २ प्रेतावरील वस्त्र. 'खेंडयावर फुलें घालून तिरडी तयार केली.' -पाव्द ११८.

खेंडी—स्त्री. पर्वतांतील खिंड. 'मोठे उंच पर्वत आंतल्याआंत खचून जाऊन त्यांत खेंडी पडल्या.' -मराठी साहावें पुस्तक आ. २ पृ. ४५. (१८७५) [खंड]

खेडु(डू)त, खेडू—पु. १ (गु.) शेतकरी. २ (व.) मक्त्यानें किंवा वटाईनें शेत करणारा; जमीन करणारा. [खेडणें]

खेडें—न. गांवढें; आडगांव (विशेषतः शेतकऱ्यांचें). [सं. खेट-खेटक-खेड; तुल० सौंगन खेख; मैत्र जि. खेख] ०गांव-पु. लहान गांवढें, आडगांवें यांस व्यापक शब्द. ०गांवचा-वि. खेड्या; गांवढळ; भिकार गांवचा; शेतकरी. ०पाडें-न. खेडें. [खेडें द्वि] खेडेंखेडीं-गांवोगांव. ०खेड्या-वि. खेडेगांवचा पहा.

खेडें—न. १ पोलाद. २ ढाल. 'नवे भाला खेडें ।' -भाए ४५०. खिडें, खेंड पहा. [सं खेटन्=ढाल; तुल. का. खेड=ढाल]

खेणी—क्रिवि. (कु.) कशानें?

खेत—न. १ शेत. २ रणक्षेत्र. ३ (ल.) युद्ध. 'घोडें सोडून खेत केलें.' -पया ४५४ ४ मैदान; मोकळी जागा. ५ पुण्यक्षेत्र. [सं. क्षेत्र] खेतास येणें-लढाईंत शत्रुसन्मुख ठार होणें; मरणें. 'कितेक गारदी खेतास आले.' -भाव १५ ०पडणें-खेतास येणें. ०कर-पु. (व.) शेतकरी.

खेती—स्त्री. रणक्षेत्र. 'खेती म्हणजे रण सोडून गोलीची खास्त निघाले तरी नामोहरम झाले.' -भाव १२. [सं. क्षेत्र]

खेती-त्री—स्त्री. शेती; शेतकी; शेतीचा व्यापार. [सं. क्षेत्र] -पु. शेती करणारा; शेतकरी. [सं. क्षेत्रिन्; प्रा. खेत्ति] ०वाडी-स्त्री. शेतवाडी

खेतूर—क्रिवि. (कु.) कशात?

खेतें-तो—नपु. (गो.) माकड.

खेत्री—पु. १ क्षत्रिय. त्यावरून. २ रणशूर; पराक्रमी पुरुष. 'खेत्री हाणा म्हणती रणशूरा ।' -ऐपो १२६. [सं. क्षत्रिय; हिं. खत्री, खेत्री]

खेत्री—पु. (गो.) (क्षेत्रांत राहणारें) पिशाच्च. [क्षेत्र]

खेद—पु. १ इष्ट पदार्थाचा वियोग किंवा अनिष्ट पदार्थाची प्राप्ति झाल्यानें अंतःकरणास होणारी व्यथा, दुःख; मनस्ताप. २ पश्चात्ताप; अनुताप. ३ त्रास, पीडा. 'जीवमात्रास देणें खेद ।' -दा २.६.१९. ४ कंटाळा. 'जया पुरुषाच्या ठायीं । कर्माचा तरी खेदु नाहीं ।' -ज्ञा ४.१०३ [सं. खिद्=त्रास होणें] खेदणें-सक्रि १ दुखविणें, त्रासविणें. 'जिवलगांस खेदूं नये ।' -दा २.२.१०. २ (ना.) (ल.) हांकणें; हांकलून लावणें; घालविणें (पशु इ०). खेद मानणें-दुःख करणें, मनास लाऊन घेणें. खेदविणें -सक्रि. दुःख देणें; खिन्न करणें, त्रासविणें. ०क्षीण-वि. दुःखी. 'बहु आलों खेदक्षीण ।' -तुगा १०२६. खेदित-वि. दुःखित; कष्टी; खिन्न.

खेंद(दा)डा—पु. (अशिष्ट) मूर्ख; गधडा; खेवडा. –वि. १ खेद देणारा; नाठाळ; अडणारा; तापट; त्रासदायक; खटयाळ (घोडा). त्यावरून. २ खाट; द्वाड (माणूस); उनाड; कजारा (मूल, स्त्री); स्वच्छंदी; दुष्ट; द्वाड; नष्ट; कुरूप; नेभळा; अव्यवस्थित (मूल, स्त्री, यांस लागतें) [ सं. खिद् ]

खेदा—पु. (ना.) पिच्छा; पाठलाग.

· खेदारू—पु. एक प्रकारचा मूळ. –शे ७.१४६.

खेप्रकरप—क्रि. (गो.) चकरी इ० घळी घेणें.

खेप—स्त्री. १ जा ये; येरझार; हेलपाटा. (क्रि० करणें). २ देशांतराहून आणलेला मालाचा किंवा धान्याचा (बैल, गलबतें इ० भरून केलेला) एका वेळच्या पुरवठा, भरणा, फेरी; माल तयार करणाराकडून एका वेळीं आलेला माल. 'विडयांची खेप.' ३ एक वेळ किंवा प्रसंग. 'एक खेप गय केली दुसऱ्या खेपेस मारीन.' पाळी; वारी; एखाद्या प्रसंगाचें उदाहरण. 'तिच्या बाळंतपणाची ही पांचवी खेप.' एखाद्या क्रियेची सर्व मुदत; एक कृत्य किंवा त्या कृत्यानें व्यापलेला काळ. 'तूं धोतरें धुतोसच आहेस तर खेपेसरशीं माझीहि धोत्रें धुवून टाक.' 'पैका घेतेखेपेस गोड लागतो मग देतेखेपेस कां कडू लागतो?' ४ निष्फळ येरझार; हेलपाटा. (क्रि० घालणें). ५ रोगाच्या सांथीचा काल. 'तापाची देवीची-जरीमरीची-पडशाची खेप.' (क्रि० येणें). [सं. क्षिप्-क्षेप; हिं. खेप] खेपेसरसा, खेपेनें–क्रिवि. हातासरसां; हातांतील कामाबरोबरच; चालु काम न थांबवितां. खेप्या–वि. १ एकसारख्या खेपा, हेलपाटे, येरझारा घालणारा, करणारा २ रोकड वगैरे वाहण्याच्या खेपा करून त्यावर उपजीविका करणारा. ३ डाके (टपाला)ची ने आण करणारा. 'नववे रोजीं उज्जनीहून खेप्या पुण्यास जातो.' –मराठी रियासत उत्तर विभाग २.४२२.

खेपचें—क्रि. (गो.) शिव्या हांसडणें. [ सं. क्षिप् ]

खेपणें—सक्रि. कोंडणें; खोडा घालणें; बुजविणें; बंद करणें; लोटणें; अडकविणें; त्रास देणें; अडविणें. –अक्रि अडकणें; बंद होणें. [ सं. क्षिप् ]

खेपाटा—पु १ कंटाळवाणी, निष्फळ येरझार; हेलपाटा. (क्रि० घालणें) २ त्रासदायक विनंति, दुराग्रह, मायाकूट. (क्रि० करणें). [ खेप ]

खेव—पु. (गो.) अनर्थ

खे(खैं)वडा, खेंवुडला—वि. १ खेंदडा पहा कुरूप. 'कोठें होती रांड खेवडी.' –राला ७६. २ वांकडातिकडा; अव्यवस्थित (दांत, दांतांची ववळी). 'दाताला जीभ लावल्यानें दांत खेवडे येतात.' [सं. क्ष्वेड=वक्र; फा. खमीदा=कुबडा, वांकडा] ०लेवडा–वि. १ गदळ; घाणेरडा; ओबडधोबड; हिडीस; नापसंत (मनुष्य, प्राणी, चेहरा, नाक, इतर अवयव, इमारत, चित्र, लिखाण, वस्तु इ०) २ अव्यवस्थित (दांत इ०) [ खेवडा+लेवडणें ]

खेयाळणी—स्त्री. (राजा.) निष्काळजीपणानें वापरणें, वापर. [ खेयाळणें ]

खेयाळणें—सक्रि. (राजा.) कचकाऊन, वाटेल तसें वापरणें; हिसकाहिसकी करणें; ओढाताण करणें; जोरानें फेंकणें, हलविणें.

खेम—स्त्री. १ मिठी; विळखा; खेंव; आलिंगन. 'पवनाग्नि देतां खेम। अपान ऐसें पावला नाम।' –सिसं २.२०७. (क्रि० मारणें; देणें; घेणें). २ –न. कल्याण; सुख; खुशाली; क्षेम. [सं. क्षेम] ०धेंगेस येणें–एखाद्याच्या कबजांत येणें. खेमालिंगन–न. मित्रत्वाची मिठी. [ सं. क्षेम+आलिंगन ]

खेमटा—पु. (ताल.) एक ताल; याच्या बारा मात्रा व चार विभाग आहेत.

खेमा—पु. डेरा; तंबू. 'पातशाही खेम्याची वगैरे तयारीची मात्र आज्ञा केली आहे.' –दिमरा १.१९. [ अर. खीमा=तंबू ] खेमेदाखल–क्रिवि. लढाईवर निघतांना गांव सोडून सैन्याचा तळ दिलेल्या ठिकाणीं येऊन; डेरेदाखल. 'तूं बाहेर खेमेदाखल होऊन...' –रा ५.७८. –पया २०१. खेमेठोक–वि. (व.) जबरदस्त (मनुष्य).

खेमा—पु. १ चेंदामेंदा. २ मांसाचा बारीक चुरा, चूर्ण, तुकडे. [ अर. कीमा ]

खेर—स्त्री. १ घाण; गाळ, गदळ; केर; टाकलेला भाग; उरलेला भाग. २ एकत्र मिसळल्यानें झालेली नासाडी. 'एक एक उचलून घे, आंत हात घालून मालाची खेर करूं नको.' ३ (गो.) खड्ड. –वि. गाळसाळीचा; निरुपयोगी; केराचा. [ केर; तुल. का. केडिसु=बिघडविणें ] ०खाना–पु. खेलखाना पहा ०माती–स्त्री. नासाडी (काम, माल, वस्तूंची). (क्रि० करणें). ०मेर–स्त्री. कचरा; घाण; खेर अर्थ १ पहा. [ खेर द्वि. ]

खेर—पु. खैर (झाड).

खेरखैरात—स्त्री. खुशाली. [ फा. खैरखैरियत ]

खे(खा)रीज—वि. १ जादा; अधिक; वेगळा; निराळा; भिन्न. २ वगळलेला; अवांतर, निराळा काढून ठेवलेला. 'जाती खेरीज करून.' –वाडसमा ३ २५१. 'मला खेरीज ठेवून बाकीच्यांस बोलावणी केली.' –शअ. १ शिवाय. 'तुज खेरीज मला कोण्ही आश्रय नाहीं.' २ वांचून; विना. 'मजखेरीज तूं जाऊं नको.' ३ बाहेर; वेगळे. 'इंमजास तंबी करून खुष्कींतुन त्याजला खेरीज करावें.' –रा १०.१८१. (क्रि० करणें; वगळणें). [अर. खारिज्] सामाशब्द– ०कलम–न. निराळें किंवा आस्त सदर, बाब, वस्तु. ०जमा-वसूल-दस्त–स्त्रीपु. शेतसाऱ्याशिवाय घेतलेला कर; जादा सारा, पट्टी; चिल्लर बाबी. ०मक्ता–पु. साक्षात् सरकारनें

मान्यानें दिलेल्या जमिनी, इनाम्याने किंवा मोईनें दिलेल्या जमिनी किंवा जहागी याहून भिन्न; रयतवारी; खेरजी मक्ता मुशारा पहा. ०मिळकत–स्त्री. अवांतर प्राप्ति, मिळकत, फायदे. **०मुशारा–मुशाहिरा, खेरजी मक्ता–मुशारा**–पु (सरकारी नोकरास दिलेल्या पगाराशिवाय) भत्ता; बक्षीस इ०; नैमित्तिक खर्च (मेजवान्या, धर्मादाय इ०चा). याच्या. मुख्य बाबी–वर्षासन, रोजिनदार, धर्मादाय, खैरात, देवस्थान, रावज, कचेरी, दफ्तर, रोशनाई, देहलगी, पोटगी, बक्षीस, शिरपाव, ऐवजास खर्च, सावकारी, हमी, पट्टा, इमारत, भोजन, कापड, तोटा, शिल्की दागिने, घटी इ०.

**खेल**—पु (व.) विभाग; हिस्सा; पक्ष. [फा. खैल=सैन्य–विभाग]

**खेल(र)खाना**—पु. १ सैन्याचें सामान व बाजारबुणगे; फौजेंतील बाजार व सामानखातें. त्यावरून (ल) २ अडगळ; अव्यवस्थितपणें राशी घातलेल्या वस्तू इ०. 'या दिवाण खान्यांत खेलखाना भरला आहे, तो काढून मोकळें कर.' अव्यवस्थित प्रकार; दिपति. ३ अडगळीची खोली. [फा. खेलखाना]

**खेलाडी**—वि. खेळाडू; चतुर; हुशार. [सं. खेल्]

**खे(खें)व**—स्त्री. १ मिठी; आलिंगन; क्षेम. 'स्नेहें मीनल्या खेंवकवळी ।' –मुआदि ४५.११९. 'आपण निवोनि निवरी पुष्कळ त्याही सुखेंव देत्यातें ।' –मोभीष्म ३ ४३. २ खेट; धसडा; चाट, चाटून जाणें. [सं. क्षेम–खेव]

**खेव–वो**—पु. अरिष्ट; दुर्दैवानें आलेलें विघ्न, अपकार; त्रास; खोडी; घात; उतरती कळा; नाश (क्रि० येणें). 'आपासाहेबांच्या राज्याला आला खेव ।' –गापो पृ. ८६. [सं क्षय] ०आणणें–(व.) सतावून सोडणें; त्रास देणें

**खेव**—पु क्षण. खेवीं, खेवो–तत्क्षणीं. त्याच वेळीं. 'हा बोलु आइकत खेवीं ।' –ज्ञा १७ ३२६. जातखेवो; जाता क्षणीं 'नातरी निद जातखेवों ।' –अमृ १.६२. भेटतखेवों, म्हणत खेवों, पावतखेवो. 'ऐसें शृंगारियांहि उदजे । देखत खेवों' –ज्ञा ६.१७०. 'जल्मता खेवीं तेया धरु ।' –शिशु १.१५.१४. [सं. क्षण]

**खेवण–णें**—न. १ कोंदण. 'पदपद्मीं खेवणें । प्रमेय रत्नांचीं ।' –ज्ञा १.५. २ जडित अलंकार, भूषण; जडाव 'जेयाचि वाहाणा चिंतामणी खेवणा' –ऋ ५२. 'भिंती नाहीं अलंकारखेवणां ।' –कमुरा ४६.७६. ३ शोभा. **खेवणें**–क्रि पच्चीकाम करणें; जडणें. 'खेवलें अंतरीं मालटेना ।' –तुगा ३९८६. **खेवणणें**–क्रि. जडित करणें. 'रविचंद्र तारा लोककुसरी । खेवणोनिया तयावरी ।' –एभा २४.१८९. **खेवणी–णी–णु**–स्त्री. जडाव; जडणी; खोंवणी; खोचणी. 'माजी हुमाची खेवनी ।' –दाव २४१. –वि. जडित. [सं. क्षेपणम्]

**खेवदा**—स्त्री. (अशिष्ट) भूक. (क्रि० लागणें, सुटणें). [सं. क्षुधा]

**खेवस्या**—पु. (काव्य) बडबडणारा माणूस; नायकी. [खेवा]

**खेवा**—पु. आलिंगन; मिठी (क्रि० करणें). [सं. क्षेम]

**खेंवा**—पु. धक्का. (क्रि० मारणें).

**खेश**—वि. नातलग, सोयरा. 'मेश सोईरे.' –रा १८. ८७. [फा. खेश]

**खेंस**—नपु एक प्रकारचें कापड (सुती, लोकरी, रेशमी). –स्त्री. १ घसा खाजणारा खोकला, दमा (गुरांचा) २ (ना.) उग्र वास (फोडणी किंवा मिरच्या इ० चा). [हिं. सं. कास;]

**खे(खें)सणें**—अक्रि. १ दांत खाऊन खेंकसणें, फिसकारणें (रागावलेल्या माकडानें); त्यावरून २ (ल.) रागावून, चिडून वसकन अंगावर जाणें. ३ घसा खाजेल असें खोकणें. ४ खिंकाळणें (घोडा). ५ (व.) खाकरणें; खोकलणें [ध्व.]

**खेसर**—स्त्री. (खा. व.) थट्टा; मस्करी; चेष्टा.

**खेळ**—पु १ करमणूक; क्रीडा; मौज, केलि (चित्तविनोदार्थ केलेली) २ खेळणें–णी, खेळण्याची वस्तु (बुद्धिबळें, सोंगट्या, भोंवरा, गोट्या इ०). ३ तमाशा; देखावा; प्रदर्शन. ४ अभ्यास; मेहनत (बुद्धीचा, इंद्रियांचा); व्यापार; क्रिया; चलनवलन (यंत्राचें) ५ खेळण्याची पाळी (एखाद्या खेळांत). ६ चाळा; कृति, खावडाव, वाईट कृत्य. 'म्हणे वानरा घात झाला असारे । तुझे माउलीचेचि हे खेळ सारे ।' –वामन भरतभाव १७. ७ नाटकाचा प्रयोग. ८ लीला; कृपा ९ (ल.) लढाई; युद्ध. 'उलटेल जरी हा खेळ ।' –संग्रामगीतें ४७. १० (गो.) विशेषतः जुगाराचा खेळ; जुगार. [सं. खेल्; हिं. पं. खेल; बं. खेला सीगन, जिप्सी खेल.] (वाप्र.) ०करणें–उडवणें; उधळणें, बेपर्वा खर्च करणें; घोटाळा, अव्यवस्था करणें; नासणें; बिघडविणें. **०करणें–खेळणें–मांडणें**–चांगला खेळ किंवा काम करणें; एखादी हुषारीची किंवा शिताफीची गोष्ट साधणें. **खेळणें**–अक्रि. १ क्रीडा, मौज करणें; स्वतः स रमविणें. म्ह० खेळेल तो पोळेल. २ गमणें; अळंटळं करणें; माशा मारीत बसणें. ३ एखादा खेळ खेळणें. ४ वाद्य वाजविणें. ५ (भूतसंचारामुळें) इकडेतिकडे उड्या मारणें. ६ हळू हळू हालणें, झुळझुळणें (एखादी वस्तु वाऱ्यामध्यें किंवा सूर्यकिरणें पाण्यामध्यें). 'किल्ल्याभोंवतीं; पाणी खेळत असतें.' ७ व्यापार करणें; चालणें; चालत असणें; चलनवलन करणें (यंत्र). **०लावणें–मांडणें**–एखाद्या कटाचा किंवा वाईट मसलतीचा पाया घालणें. **०व(वि)णें**–सक्रि १ क्रियेंत, व्यापारात चालू ठेवणें; चालवणें;

हलविणें. 'स्वमायेचें आडवळ । लावूनि एकला खेळवी पुत्र ।' –ज्ञा १८.१३०१. २ नाचविणें; आपल्या मर्जीप्रमाणें वागावयास लावणें. 'जो ब्रह्मादिकां खेळवी अंगुळीं परी ।' –शिशु १. ३ काम सुरू ठेवणें (यंत्र; वाफेचें यंत्र, इत्यादि इ०चें). ४ रमविणें. सामाशब्द– ०कर–वि. १ इकडे तिकडे खेळण्यास योग्य; खेळण्याच्या वयांत आलेला. 'ते गे भाळणी फुलांचा झेला । माझा नातु खेळकर झाला ।' २ खेळाडू; मौज्या, आनंदी. ३ आगलाव्या; कळलाव्या; खेळ्या; कज्जेदलाल. ०करी–पु. तमासगीर; चित्रें दाखविणारा; मोठ्या लोकांची सोंगें आणणारा; बहुरूपी; दशावतारी. ०कुडी–स्त्री. १ खेळण्याची चेष्टा; माकडचेष्टा. २ चाळा; क्रीडा; युक्ति; मौज; थट्टा (मनापासून केलेल्या कृत्याच्या उलट). 'खेळकुडीनें कोणी चोर म्हटलें तरी त्याचा राग मानूं नये.' ०कुली–ळी–स्त्री उपवनांतील पाण्याचे लहान लहान पाट. खेळकुळि पहा. 'रत्नवद्धा खेळकुळिमां जवळी ।' –दाव १५९. 'चित्रविचित्र खेळकुलिया ।' –मुआदि २९ ५०. खेळकू–गडू–गर–वि. १ खेळाडू; मौज्या २ मौज करणारा; क्रीडा करणारा; विनोदी, विदूषक. ३ खेळण्याचें वय झालेलें (मूल). ०खंडोबा–पु. नाश, सर्वस्वी बिघाड, पूर्ण सत्यानाश; धूळधाण (खंडोबा, झाडाच्या अंगात संचार करून त्यास रानोमाळ नाचावयास व गडबडां लोळावयास लावता यावरून). (क्रि० करणें). ०खाना–पु खेळण्याचा अड्डा; क्लब 'वयोवृद्ध कामगार सकाळसंध्याकाळ ... . दरवाजांत, खेळखान्यांत ...... जसा वीरमंत्र वतील . .. ' –टि १.४१९ ०गडी–पु १ खेळांतील सोबती २ –स्त्री. (कों) खेळांतील सोबत किंवा मैत्री. 'त्याची व याची ल्हानपणापासून खेळगडी आहे.' ०गंड्या–वि. (राजा.) खेळात किंवा गंमतींत व्यर्थ वेळ घालविणारा; खेळ्या, आळशी, छचोर खेळणी–स्त्री १ खेळणें, क्रीडा करणें. २ खेळाचा दिवस. (व.) सुटीचा काल 'शाळा सुरू झाल्यापासून ४।५ दिवस खेळणीच असते'. खेळणें–न. १ खेळण्याची वस्तु २ लहान मुलाच्या पाळण्यावर चेंगड, कागद, कापडाच्या चिंमण्या इ० वस्तु बांधतात त्या. ३ सहज प्राप्त होणारी वस्तु 'आम्हा केलें परब्रह्म खेळणें ।' –एमा १८.३५५. खेळणें(तें), रागणें(तें)–न मकरसंक्रांतीच्या वेळचें एक मत, वसा, एका स्त्रीनें दोन नारळ घेऊन 'खेळतें घ्या रागतें घ्या' असें म्हणून दुसऱ्या स्त्रीस ते नारळ द्यावयाचे व नंतर दुसरीनेंहि असेंच म्हणून दोन नारळ पहिलीस द्यावयाचे. खेळतारांगता–वि. १ खेळण्याच्या व रांगण्याच्या वयात आलेला (मुलगा) २ शरीरास मोकळी हालचाल करतां येईल असा; अघळपघळ (वस्त्र, दागिना) ३ खेळतां येईल असा नेमस्त; हलका; बेताचा (ताप, देवी, गोंवर, कांजिण्या). खेळतें वारें–न. देव किंवा भूत यांचा जोराचा संचार, अवसर (यानें भविष्य किंवा शकुन समजतो अशी समजूत आहे.) ०त्या देवी–अनेकव. देवींचा (फोडपाचा) एक प्रकार. देवी पहा. ०पणा–वि. खेळासाठीं किंवा चेष्टामस्करीसाठीं ठेवलेला; बगलबिल्ली; तुपमहकन्या; विदूषक (माणूस, प्राणी, वस्तु, खेळणें, क्रीडामृग इ०). ०वर्णी–स्त्री. प्रिया; मैना; लाडकी स्त्री (विलासी स्त्री किंवा नानाप्रकारचे खेळ खेळून पुरुषास आपल्या व्यसनांत अडकविणारी स्त्री); स्त्रीस लडिवाळपणें म्हणावयाचा शब्द ०शेपणा–पु (राजा.) आळशीपणा, अळंटळंपणा; रेंगाळण्याची किंवा गमण्याची प्रवृत्ति; खेळगडीपणा. खेळा, खेळि(ळी)या, खेळ्या–वि. (कों. राजा.) १ दिमर्यांत दर्याच्या पालवीबरोबर जाणारे, याचे कापडखेळे व डफखेळे असे दोन प्रकार आहेत. सोंगाड्या, बहुरंग. 'पूर्वी खेळे बहुत आइले सुरीं ।' –ह १३.४६. २ लग्नात खेळ खेळणारा. 'तो वीरराज जयाचा खेळा ।' –शिशु ९९८. ३ नेहमीं भलत्यासलत्या कामांत किंवा अन्यायाच्या कृत्यांत गुंतलेला; आगलाव्या; कळलाव्या; चुगलखोर ४ फंदफितूर करण्याचा स्वभाव असलेला ५ खेळाडू. खेळिघला–खेळला. 'ब्रह्मांडमंडपीं गोंधळ । खेळिघला संतापें ।' –मुआदि १.४१४९. खेळी–स्त्री. १ खेळ; माज. २ खेळण्याचा दिवस, सुटीचा काल. ३ खेळण्याची पाळी (बुद्धिबळें) मोहऱ्यानें एका वेळीं केलेली हालचाल, किंवा गति. ४ खेळा पहा. –वि. खेळणारी; मौजा मारणारी; चवचाल स्त्री. 'माझी सासु माठी खेळी ।' –भज ५५. ०मेळी–स्त्री. १ दाट परिचय; घसट, सलगी. २ मौज, क्रीडा, थट्टामस्करी, रंगेल चेष्टा; गंमत, मौज ०मेळीचा. खेळ्यामेळ्या–वि दाट परिचयाचा, सलगीचा. ०मेळा, खेळीं मेळीं–क्रिवि (काव्य) मौजेंत; हास्यविनोदांत किंवा खेळांत, करमणुकींत (काळ घालविणें). 'आतां जाऊं खेळीमेळीं । गाई चारावया ।' –तुगा२३०. मौजेनें, विनोदानें, परिहासबुद्धीनें (बोलणें, करणें) 'खेळीमेळी आले घरा गोपीनाथ । गोपाळांसहित मातेपासीं ।' खेळेंमेळें–क्रिवि परस्परें थट्टा मस्करी करावयाजोग्या परस्पराच्या मित्रभावानें 'एमें करीं या भोजनें । खेळेंमेळें ।' –दाव १९९. 'आहार निद्रादि खेळेंमेळें ।' –एमा १३ ५६८ खेळुगा–वि. खेळाडू.

खेळणी—स्त्री. (गो) उचकी.

खैं—स्त्री. १ अहंता, अभिमान, ताठा. (क्रि० मोडणें; जिरविणें) २ नाठाळपणा, चढेलपणा, मस्ती (टाणबंदी पशूची). (क्रि० मोडणें, जिरविणें) ३ शिक्षा; ओल, शिस्त 'त्या पोरास खें लाविली पाहिजे.'

खैं—क्रिवि. (गो) कोठें? खैंचा–वि. (गो.) कोणता–चा? खैंच्यों–वि. (गो.) कुठल्या? खैंसर–क्रिवि. कोठें? खैंसून–क्रिवि. कोठून. 'खैंसून आयला?'

मक्त्यानें दिलेल्या जमिनी, इजाऱ्यानें किंवा खोतीनें दिलेल्या जमिनी किंवा जप्ती याहून भिन्न; रयतवारी; खेरजी मक्ता मुशारा पट्टा. ०मिळकत–स्त्री. अवांतर प्राप्ति, मिळकत, फायदे. ०मुशारा-मुशाहिरा, खेरजी मक्ता-मुशारा–पु (सरकारी नोकरांस दिलेल्या पगाराशिवाय) भत्ता; बक्षिसें इ०; नैमित्तिक खर्च (मेजवान्या, धर्मादाय इ०चा). याच्या मुख्य बाबी–वर्षासन, रोजिनदार, धर्मादाव, खैरात, देवस्थान, तैनात, कचेरी, दफ्तर, रोशनाई, देहणगी, पोटगी, बक्षीस, शिरपाव, ऐवजास खर्च, सावकारी, हमी, बट्टा, इमारत, भोजन, कापड, तोटा, शिल्की दागिने, थटी इ०.

**खेल**—पु (व.) विभाग; हिस्सा; पक्ष. [फा. खैल=सैन्य-विभाग]

**खेल(र)खाना**—पु. १ सैन्याचें सामान व बाजारबुणगें; फौजेतील बाजार व सामानखातें. त्यावरून (ल.) २ अडगळ; अव्यवस्थितपणें राशी घातलेल्या वस्तु इ०. 'या दिवाणखान्यात खेलखाना भरला आहे, तो काढून मोकळें कर.' अव्यवस्थित प्रकार; स्थिति. ३ अडगळीची खोली. [फा. खैल-खाना]

**खेलाडी**—वि. खेलाडू, चतुर; हुशार. [सं खेल्]

**खे(खें)व**—स्त्री. १ मिठी; आलिंगन; खेम. 'स्नेहें मीनल्या खेंवकवळी ।' –मुआदि ४५.११९. 'आपण निवोनि निववी पुष्कळ त्याही सुखेंव देत्यातें ।' –मोभीष्म ३ ४३. २ खेट, घसटा, चाट; चाटून जाणें. [सं. क्षेम-खेंव]

**खेव-वो**—पु. अरिष्ट; दुर्दैवानें आलेलें विघ्न; अपकार; त्रास; खोडी; घात, उतरती कळा; नाश. (क्रि० येणें) 'आपासाहेबाच्या राज्याला आला खेव ।' –पापो पृ. ८६. [सं क्षय] ०आणणें–(व.) सतावून सोडणें, त्रास देणें.

**खेव**—पु क्षण. खेवीं, खेवो–तत्क्षणीं. त्याच वेळीं. 'हा बोलु आइकत खेवीं ।' –ज्ञा १७ ३२६. जातखेवो, जाता क्षणीं 'नातरी निद जातखेंवों ।' –अमृ १.६२. भेटतखेवों, म्हणतखेवों, पावतखेवो. 'ऐसें शृंगारियाहि उदजे । देखत खेवों' –ज्ञा ६.१७०. 'जल्मतां खेवीं तेयां धरुनु ।' –ख्रिपु १.१५ १४. [सं. क्षण]

**खेवण-णें**—न. १ कोंदण. 'पदपद्मीं खेवणें । अमेय रत्नाचीं ।' –ज्ञा १.५. २ जडित अलंकार, भूषण, जडाव 'जेयाचि वाहाणा चिंतामणी खेवणा' –ऋ ५२. 'मिती नाही अलंकारखेवणा ।' –कमुरा ४६.७६. ३ शोभा. खेवणें–क्रि पच्चीकाम करणें; जडणें. 'खेवलें अंतरीं मालटेना ।' –तुगा ३९८६. खेवणणें–क्रि. अंकित करणें. 'रविचंद्र तारा लोकफुलरीं । गेंवणोनियां तयावरी ।' –एभा २४.१८९. खेवणी–णी–जु–स्त्री. जडाव; जडणी; खोवणी; खोचणी. 'माजी गुंजाची खेवनी ।' –दाव २४२. –वि. जडित. [सं. क्षेपणम्]

**खेवटा**—स्त्री. (अशिष्ट) भूक. (क्रि० लागणें; सुटणें). [सं. क्षुधा]

**खेवट्या**—पु. (काशी) वल्हविणारा माणूस; नावाडी. [खेवा]

**खेवा**—पु. आलिंगन; मिठी (क्रि० करणें). [सं. क्षेम]

**खेवा**—पु. वल्हें. (क्रि० मारणें)

**खेश**—वि. नातलग; सोयरा. 'खेश सोइरे.' –रा १८. ८७. [फा. खेश]

**खेस**—नपु. एक प्रकारचें कापड (सुती, लोंकरी, रेशमी) –स्त्री. १ घसा बाजणारा खोकला, दमा (गुरांचा). २ (ना.) उग्र वास (फोडणी किंवा मिरच्या इ० चा). [हिं. सं. कास;]

**खे(खें)सणें**—अक्रि. १ दात काढून खेंकसणें, फिसकारणें (रागावलेल्या माकडानें); त्यावरून २ (ल) रागावून, चिडून वसकन अंगावर जाणें. ३ घसा वाजेल असें खोंकणें. ४ खिंकाळणें (घोडा). ५ (व) खांकरणें; खोकलणें. [ध्व.]

**खेसर**—स्त्री. (खा. व.) थट्टा; मस्करी; चेष्टा.

**खेळ**—पु. १ करमणूक; क्रीडा; मौज, केलि (चित्तविनोदार्थ केलेली) २ खेळणें–णीं; खेळण्याची वस्तु (बुद्धिबळें, सोंगट्या, भोंवरा, गोट्या इ०). ३ तमाशा; देखावा; प्रदर्शन. ४ अभ्यास; मेहनत (बुद्धीचा, इंद्रियांचा), व्यापार; क्रिया; चलनवलन (यंत्राचें) ५ खेळण्याची पाळी (एखाद्या खेळांत). ६ चाळा; कृति; खावडाव, वाईट कृत्य 'म्हणे वांमरा घात झाला असारे । तुझे माउलीचेचि हे खेळ सारे ।' –वामन भरतभाव १७. ७ नाटकाचा प्रयोग. ८ लीला; कृपा. ९ (ल.) लढाई; युद्ध. 'उलटेल जरी हा खेळ ।' –संग्रामगीतें ४७. १० (गो.) विशेषत. जुगाराचा खेळ; जुगार. [सं. खेल्, हिं. पं. खेल; बं खेला सीगन, फ्रेंचजिप्सी खेल.] (वाप्र.) ०करणें–उडवणें; उधळणें, बेपर्वा खर्च करणें; घोटाळा, अव्यवस्था करणें; नासणें; बिघडविणें ०करणें-खेळणें-मांडणें–चांगला खेळ किंवा काम करणें; एखादी हुषारीची किंवा शिताफीची गोष्ट साधणें. खेळणें–अक्रि. १ क्रीडा, मौज करणें; स्वत:स रमविणें. म्ह० खेळेल तो पोळेल २ गमणें; अळंटळं करणें; माशा मारीत बसणें. ३ एखादा खेळ खेळणें. ४ वाद्य वाजविणें. ५ (भूतसंचारामुळें) इकडेतिकडे उड्या मारणें. ६ हद्‌द हल्ल् हालणें; झुळझुळणें (एखादी वस्तु वाऱ्यामध्यें किंवा सूर्यकिरणें पाण्यामध्यें) 'किल्ल्याभोंवतीं; पाणी खेळत असतें.' ७ व्यापार करणें; चालणें, चालत असणें; चलनवलन करणें (यंत्र) ०लावणें–मांडणें–एखाद्या कटाचा किंवा वाईट मसलतीचा पाया घालणें. ०व(वि)णें–सक्रि १ क्रियेंत, व्यापारांत चालू ठेवणें; चालवणें;

ळविणें. 'स्वमायेचें आडवळ । लावूनि एकला खेळवी सुत्र ।' -ह्मा १८.१३०३. २ नाचविणें; आपल्या मर्जीप्रमाणें वागावयास लावणें. 'जो ब्रह्मादिकां खेळवी अंगीं परी ।' -शिशु १. ३ काम सुरू ठेवणें (यंत्र; यांतील यंत्र, हत्यार इ०चें). ४ रमविणें. सामासशब्द- ०कर-वि. १ इकडे तिकडे खेळण्यास योग्य; खेळण्याच्या वयांत आलेला. 'दे गे माळणी फुलांचा झेला । माझा नातु खेळकर झाला ।' २ खेळाडु; मौज्या; आनंदी. ३ आगलाव्या; कळलाव्या; खेळ्या; कज्जेदलाल. ०करी-पु. तमासगीर; चित्रें दाखविणारा; मोठ्या लोकांचीं सोंगें आणणारा; बहुरूपी; दशावतारी. ०कुडी-स्त्री. १ खेळण्याची चेष्टा; माकड चेष्टा. २ चाळा; क्रीडा; युक्ति; मौज; थट्टा (मनापासुन केलेल्या कृत्याच्या उलट). 'खेळकुडीनें कोणी चोर म्हटलें तरी त्याचा राग मानूं नये.' ०कुळी-ळां-स्त्री उपवनांतील पाण्याचे लहान लहान पाट. खेडकुळि पहा. 'रत्नबद्धा खेळकुळिया जवळी ।' -दाव १५९. 'चित्रविचित्र खेळकुलिया ।' -मुआदि २९ ५०. खेळकू-गड-गर-वि. १ खेळाडु; मौज्या २ मौज करणारा; क्रीडा करणारा; विनोदी; विदूषक. ३ खेळण्याचें वय झालेलें (मूल). ०खंडोबा-पु. नाश; सर्वस्वी बिघाड; पूर्ण सत्यानाश; धूळधाण (खंडोबा, झाडाच्या अंगांत संचार करून त्यास रानोमाळ नाचावयास व गडबडा लोळावयास लावतो यावरून). (क्रि० करणें). ०खाना-पु. खेळण्याचा अड्डा; क्लब. 'वयोवृद्ध कामगार सकाळसंध्याकाळ ...... दरबारांत, खेळखान्यांत ......, जसा वीरमंत्र देतील ......' -टि १.४१९. ०गडी-पु. १ खेळांतील सोबती. २ -स्त्री. (को.) खेळांतील सोबत किंवा मैत्री. 'त्याची व याची लहानपणापासुन खेळगडी आहे.' ०गड्या-वि. (राजा.) खेळांत किंवा गंमतींत व्यर्थ वेळ घालविणारा; खेळ्या; आळशी; छचोर. खेळणी-स्त्री. १ खेळणें, क्रीडा करणें. २ खेळाचा दिवस, (व.) सुटीचा काल 'शाळा सुरू झाल्यापासुन ४।५ दिवस खेळणीच असते खेळणें-न. १ खेळण्याची वस्तु २ लहान मुलाच्या पाळण्यावर चेंगड, कागद, कापडाच्या चिमण्या इ० वस्तू बांधतात त्या. ३ सहज प्राप्त होणारी वस्तु 'आम्हां केलें परब्रह्म खेळणें ।' -एभा १८.३९५. खेळणें(तें), रांगणें(तें)-न मकरसंक्रांतीच्या वेळचें एक व्रत, वसा, एका स्त्रीनें दोन नारळ घेऊन 'खेळतें घ्या रांगतें घ्या' असें म्हणून दुसऱ्या स्त्रीस ते नारळ द्यावयाचे व नंतर दुसरीनेंहि असेंच म्हणून दोन नारळ पहिलीला द्यावयाचे. खेळतारांगता-वि. १ खेळण्याच्या व रांगण्याच्या वयांत आलेला (मुलगा). २ शरीरास मोकळी हालचाल करतां येईल असा; ढगळपगळ (वस्त्र, दागिना). ३ खेळतां येईल असा नेमस्त; हलका; चेताचा (ताप, देवी, गोंवर, कांजिण्या). खेळतें वारें-न. देव किंवा भूत यांचा जोराचा संचार, अवसर (यानें भविष्य किंवा शकुन समजतो अशी समजूत आहे.) ०त्या देवी-अनेक. देवींचा (फोड्यांचा) एक प्रकार. देवी पहा. ०वणा-वि. खेळासाठीं किंवा चेष्टामस्करीसाठीं ठेवलेला; वगलविझी; उपमस्कऱ्या; विदूषक (माणूस, प्राणी, वस्तु, खेळणें, क्रीडामृग इ०). ०वणी-स्त्री. प्रिया; मैना; लाडकी स्त्री (विलासी स्त्री किंवा नानाप्रकारचे खेळ खेळून पुरुषास आपल्या व्यसनांत अडकविणारी स्त्री); स्त्रीस लडिवाळपणें म्हणावयाचा शब्द. ०शेवणा-पु (राजा.) आळशीपणा; मळंटळंपणा; रेंगाळण्याची किंवा गमण्याची प्रवृत्ति; खेळगडीपणा. खेळा, खेळि(ळी)या, खेळ्या-वि. (को. राजा.) १ शिमग्यांत देवाच्या पालखीबराबर जाणारे, याचे कापडखेळे व डफखेळे असे दोन प्रकार आहेत; सोंगाड्या; बहुरंग. 'पूर्वी खेळे बहुत आहले सृष्टीं ।' -द १३.४६. २ लपात खेळ खेळणारा. 'तो वीरराज जयांचा खेळा ।' -शिशु ९९८. ३ नेहमीं भलत्यासलत्या कामांत किंवा अन्यायाच्या कृत्यात गुंतलेला; आगलाव्या; कळलाव्या; चुगलखोर. ४ फंदफितूर करण्याचा स्वभाव असलेला ५ खेळाडु. खेळिन्नला-खेळला. 'ब्रह्मांडमंडपीं गोंधळ । खेळिन्नला संतापें ।' -मुआदि १.४१४९. खेळी-स्त्री. १ खेळ; मौज. २ खेळण्याचा दिवस, सुटीचा काल. ३ खेळण्याची पाळी (बुद्धिबळें). मोहऱ्यानें एका वेळीं केलेली हालचाल, किंवा गति. ४ खेळा पहा. -वि. खेळणारी; मौजा मारणारी; चवचाल स्त्री. 'माझी सासु माठी खेळी ।' -भज ५५. ०मेळी-स्त्री. १ दाट परिचय; घसट; सलगी. २ मौज; क्रीडा; थट्टामस्करी; रंगेल चेष्टा; गंमत; मौज. ०मेळीचा. खेळ्यामेळ्या-वि. दाट परिचयाचा, सलगीचा. ०मेळीं, खेळीं मेळीं-क्रिवि. (काव्य) मौजेत; हास्यविनोदात किंवा खेळांत, करमणुकींत (काळ घालविणें). 'आतां जाऊं खेळीमेळीं । गाई चारावया ।' -तुगा २३०. मौजेनें; विनोदानें, परिहासबुद्धीनें (बोलणें, करणें) 'खेळीमेळी आले घरा गोपीनाथ । गोपाळांसहित मातेपासीं ।' खेळेंमेळें-क्रिवि. परस्परें थट्टा मस्करी करावयाजोग्या परस्परांच्या मित्रभावानें. 'एथें करीं या भोजनें । खेळेंमेळें ।' -दाव १९९. 'आहार निद्रादि खेळेंमेळें ।' -एभा १३.५६८. खेळुगा-वि. खेळाडु.

खेळणी—स्त्री. (गो.) उचकी.

खै—स्त्री. १ अहंता; अभिमान; ताठा. (क्रि० मोडणें; जिरविणें). २ नाठाळपणा; चढेलपणा; मस्ती (ठाणबंदी पशूची). (क्रि० मोडणें; जिरविणें). ३ शिक्षा; ओळ; शिस्त. 'त्या पोरास खै लाविली पाहिजे.'

खैं—क्रिवि. (गो.) कोठें? खैंचा-वि. (गो.) कोणता—त्या? खैंच्यो-वि. (गो.) कुठल्या? खैंसर-क्रिवि. कोठें? खैंसून-क्रिवि. कोठून. 'खैंसून आयला?'

खैंचणें—खचणें पहा.

खैण—वि. ( गो. ) खारट.

खैणाडॉ—पु. (गो.) शेत, आगर यांत खारें पाणी जाऊं न देण्यासाठीं घातलेला बांध.

खैन—पु. रेंगाळणारा खोकला. [ध्व.] ०करी–करीण–पुस्त्री. रेंगाळणारा खोकला असणारा पुरुष, स्त्री. खैनी–न्या–वि. १ खोकलेकरी. २ तिरसट; खाष्ट; चिडखोर.

खैर—पु. एक काटे असलेलें झाड. याचीं पानें शमीसारखीं असून लांकूड इमारतीच्या उपयोगी पडतें. याच्यापासून कात व गोंद होतो. –वगु २.७५. [ सं. खदिर ] ०सागर–पु. खैरापासून केलेलें एक औषध.

खैर—स्त्री. १ क्षेम, कुशल; कल्याण. २ चांगली स्थिति; आबादी; खुशाली. ३ ईश्वरी कृपा. ' ते खैर होऊन निघाले पुनर्जन्म झाला. ' –मराचिथोरा ६०. [ अर. खैर=भलें ] (वाप्र.) ०असणें–उद्गा. सर्व चांगलें, ठाकठीक असणें. ०होणें–आलेला वाईट प्रसंग टळणें; उपकार होणें. सामाशब्द– ०आफियत–स्त्री. क्षेम; खुशाली. ' आपणाकडील खैर आफियतेचा खबर मालुम होत नाहीं. ' –रा १०.११८. ०खवा–ख्वा–खाह–वि. हितेच्छु. ' ते मानमें बिलकुल राजेसाहेबाचे सरकारचे खैरख्वा नाहींत. ' –रा १०.२५१. ' ईश्वर हे फत्तेची खबर सर्व खैरखवा लोकांस मुबारक करो. ' –पेद १.८४. ०खाही–स्त्री. शुभचिंतन. –रा ८.६. [ फा. खैर+ख्वाही ] ०खुशी–स्त्री. क्षेमकुशल ०खैरात–स्त्री. दानधर्म. ' खर खैरात केली ' –मदरु १.२०१. [फा.] ०शादमानी–स्त्री. खुशाली. 'आपली खैर शादमानी हमेशां कलमी करावी. ' –रा २२.८६. [फा. खैर+शादमानी=आनंद] ०सला(ल्ला)–स्त्री. १ सुखशांति, क्षेम कुशल (मुख्यतः पत्रव्यवहारांत योजना) ' आपली खैरसल्ला दर्वक्त लिहीत जाणें. ' –रा १५. २५०. २ स्नेह; मित्रत्व, सख्य ३ ( उप. ) पूर्ण अभाव किंवा टंचाई, दुष्काळ ( पाणी, अन्न, दाणा, पैसा यांचा ) [फा. सलाह]

खैर, खैरत—स्त्री. १ चांगली गोष्ट. 'एक जरा तस्वीस दिलिया खैरत नाहीं. ' –रा १५ १३७.२ भलाई. 'त्यांतच तुमची आमची सर्वांची खैरत असे. ' –रा ६.६१८. [ अर खैरत ]

खैरभट—पु. १ या नावाचा एक ब्राह्मण हा शक्ति व पराक्रमाबद्दल प्रसिद्ध होता. एकदां त्याला चोरांनीं अकस्मात् गांठून त्यांवर हल्ला केला असतां त्यानें जवळचें एक खैराचें झाड उपटून त्यांना चोपून पिटाळून लाविलें अशी गोष्ट आहे. त्यावरून अचाट ताकदीचा माणूस, भीम. २ अशिक्षित, निरक्षर किंवा निर्बळ दगडधोंडे किंवा झाडें यांना धिकविण्याच्या योग्यतेचा ब्राह्मण.

खैरा—पु. ओंपळा–बाजरीवर पडणारा एक रोग.

खैरा—वि. १ घनसांवळा, कपिश. २ करडा; पांढऱ्यावर तांबडे किंवा तांबड्यावर पांढरे ठिपके असणारा. ' चितार भिंगारें खैरें। ... अवघीं वासरें आपण जाहला। ' –ह १०.१६२. ३ निरनिराळ्या रंगाचा ( डोळा ); किंवा निरनिराळ्या रंगाचे डोळे असलेला (माणूस, पशु) घैरा पहा. ४ मिश्र रंगाचा; चित्रविचित्र; मिश्र. ०कबूतर–न. लालभडक किंवा काळसर तांबट रंगाचें कबुतर. ०थांडा–वि. पांढऱ्यावर काळे किंवा काळ्यावर पांढरे ठिपके असलेला.

खैराड—न. खैराचें झाड. ' कोसंब अंजीर खैराड। ' –कालिकापुराण २२.१५. [ खैर+ड अल्पार्थी प्रत्यय ]

खैरात—स्त्री. १ दानधर्म; भिक्षा; देकार. २ मशिदीच्या खर्चासाठीं किंवा फकिरांना दानधर्म देण्याच्या खर्चासाठीं दिलेली बिन साऱ्याची इनाम जमीन किंवा गांव. ३ (ल.) कुरवंडी. ' सखे खैरात करीन तुजवरून। ' –पला ४.१८. [ अर. खैरात् ]

खैराती—वि. कमी योग्यतेचा; हलकट; सामान्य; क्षुद्र; भिकार; टाकाऊ ( माणूस, वस्तु, पशु–कारण दान यावयाच्या वस्तु बहुधा क्षुद्र, भिकार असतात). ' खैराती सामान मात्र नसावें. ' –ख ४.१६०९.

खैरि(री)यत, खैयत—स्त्री. क्षेम; खुशाली; सुख; हित; मन:स्वास्थ्य, चांगली स्थिति; भरभराट. ' त्याचे लेकीचे खैरीयतीचें वर्तमान पुशिलें आहे. ' –रा १.१८१. [ अर. खैरीयत् ]

खैरी—स्त्री. १ बांधीव नसलेल्या विहिरीवरील रहाटाच्या आधाराचे खांब प्रत्येकीं; बहुधा हे खैराच्या लांकडाचे असतात २ अहंभाव; गर्व; मीपणा. [ खैर ] –वि. खैराच्या लांकडाचा केलेला. ०शौरी–वि. हलक्या किंमतीचा; कवडीमोल; क्षुद्र.

खैलाटी–टी—स्त्री. खांलाटी पहा.

खैवंग—वि. बळकट, मजबूत. ' देहधर्माच्या खेवंगीं। अधिष्ठिलें आंगीं। ' –ज्ञा १३.१०७. [ सं. क्षेमांग ]

खैशा—वि. खैस, खवीस याचा स्वभाव असलेला; कुलक्षणी; अमंगळ, पिशाच्च यासारखा झाड; राक्षस ( निंदार्थी ). [ खवीस ]

खैस—पु (कों.) ( अशिष्ट ) खवीस पहा.

खो—पु. १ (खोखोचा खेळ) पाळी आलेला पकडणारा गडी रांगेंतील गड्याला उठावयास लावून त्याच्या जागीं बसतांना जो शब्द उच्चारतो तो. २ ( ल. ) मोड; तोटा; खीळ; घाट. ३ विपरीतकाल; उत्पात; अडथळा. [ पं. क्षोभ–खोह–खोभ–खो–भाइ १८३२; ध्व. ] ०घालणें–देणें–१ कामावरून घालवून देणें; (मर्जीतून) उखाडणें; उच्चाटणें; युक्तीनें जागा ताब्यांत घेणें; (कामांत) बिब्बा घालणें.

खो, खोखो—स्त्री. १ खदखदां हांसणें; खोकलणें; ढांस. (क्रि० लागणें; करणें; लावणें, चालणें) 'छातीचें मडकें होई। खोखोचें मजरे घेई।'—सन्मित्रसमाज मेळा पद ४. पृ. ९. (१९२९). —क्रिवि. १ सपादन; मोठमोठ्यानें; खोखो असा आवाज काढीत. (क्रि० हांसणें, खोकलणें). २ तडा गेलेल्या मडक्यावर वाजविलें असतां होणाऱ्या आवाजाप्रमाणें आवाज होऊन. (क्रि० वाजणें). खो-कन-कर-दिन-दिशीं-क्रिवि. खो असा शब्द होई असें वाजून; पडून. खोका(खा)वणें—अक्रि. खो असा शब्द होईल असें पडणें; फुटणें, वाजणें पाऊस, (जड वस्तु).

खोईण—स्त्री. (कों.) मासे पकडावयासाठीं पाण्याच्या प्रवाहांत ठेवलेली एक निमुळती वाटोळी बांबूची विणलेली नळी. कोयनी असेंहि रूप आढळतें. खुण पहा. [कोन]

खो(खों)क—स्त्री. १ (दगड इ० च्या) प्रहारामुळें शरीरास झालेली जखम, क्षत. २ क्षणिक खोकला; घशांत कांहीं अडकल्यामुळें उत्पन्न होणारी तात्पुरती ढांस. (क्रि० येणें) [ध्व.]

खोकड—स्त्री. खोखोचा खेळ.

खो(खों)कड—स्त्रीन. १ कोल्ह्याच्या जातीचें एक जनावर; हें मोठें कावेबाज, धूर्त, मोठमोठ्या शिकाऱ्यास व शिकारी कुत्र्यांस पुरेपुरे करून सोडणारें, झुपकेदार व गोंडस शेंपटाचें, ओढ्याच्या दरडींतील बिळांत राहणारें आहे. कांहींच्या मतें कोल्हीण. २ (ल.) म्हातारा, जख्खड, कुरूप, अशक्त, रोगी माणूस किंवा पशु त्यावरून ३ (कों.) नापीक, रुक्ष, खडकाळ जमीन. [प्रा. खोड=शृगाल]

खोकडी—स्त्री तोंडा(चेहऱ्या)ची एक बाजू; खोकाड पहा. [ध्व.] ०गुंगविणें—१ जोरानें, फाड्दिशीं तोंडांत भडकाविणें; यावरून. (ल.) २ नासणें; चालेनासें करणें; घोटाळा माजविणें; घात करणें.

खोक(ख)णें—अक्रि. खासणें, ढांसणें; कास रोगानें कंठांतून खोखो असा शब्द येणें. [ध्व.]

खो(खों)कर-ड, खोंकरें—वि. (काव्य) १ फुटकें, तडकलेलें; नाशवत. 'जें आकारीं इये खोंकरें।'—ज्ञा ८.१५ मोड कळीस आलेलें. 'रिता वाढा खोंकर.'—तुगा २०५५. 'नरदेह खोंकर जैसें फुटकें कावल।'—स्वादि ६.४.७७ २ वयातीत, जख्ख. [सं. क्षयकर]

खोकरणें—अक्रि. क्षय पावणें, फुटणें.

खोकरणें—अक्रि. ओसरणें; कमी होणें. 'आयुष्यजळ खोकरे.'—गीता २.४३१. खोकणें.

खोकरपण—न विनाश्यता; क्षणभंगुरता; क्षणिकत्व. 'तेणें खोकरपणें घडे। क्षर हें नाम।'—ज्ञा १५ ५००. [सं क्षयकर+पण]

खोक(ख)ला, खोक—पु. (राजा.) प्राणवायु उदानवायूशीं मिश्र झाल्यानें दूषित होऊन तोंडांतून बाहेर पडणारा आवाज; कास; ढांस; खालेलें अन्न श्वासमार्गांत गेल्यानेंहि खोकला उद्भवतो. याचे पांच प्रकार आहेत—वातदोषाचा, पित्तदोषाचा, कफदोषाचा, उरःक्षताचा व क्षयरोगाचा. —योर १.६१०. 'खोकलें खरूज अत्यंत।'—गीता १३.२४९७. [सं. कास] म्ह० गळा कापला खोकला मिटला (वारला). (ग्राम्य.) ०विकत घेणें—स्वतःच्या पायावर धोंडा पाडून घेणें; नसतें लचांड आपण होऊन अंगावर ओढून घेणें. —लेकरी—वि. सदोदित खोकला येत असलेला.

खोकली—स्त्री. एक मोठें झाड. याचीं पानें हिरड्याच्या पानासारखीं, साल तेजवळाच्या सारखें जाड व पिवळें व फळें हरभऱ्याएवढीं असून झाडास सांवरीप्रमाणें कांटे असतात. —वगु २ ७६.

खोक(ख)स—न. धान्यांतील पोल व तूस, भुसकट.

खोका-खा—पु १ पैसा देऊन निकालात काढलेली हुंडी. २ दिलेल्या हुंडीच्यासंबंधीं सूचनापत्र. ३ सुटका; हकालपट्टी (अधिकारावरून किंवा जागेवरून) (क्रि० येणें; आणणें) ४ झांकण नसलेली पेटी (विशेषतः देवदारी). ५ (कु.) म्हातारा, जख्ख माणूस. ६ (हिरडा व्यापार) भिजून, फुगून खारकेसारखा सुरकुणारा, पिवळा व हिरवी झाक असणारा उत्तम प्रकारचा हिरडा; दळ जाड, बीं बारीक, वजनदार असून सुपीक जमिनींत फळ पडल्यास तेथील पीक जळतें. ७ राशींतून चांगली सुपारी निवडून राहिलेला खराब माल; पोकळ, हलकी सुपारी.

खोकाड—न तोंड, गाल याची एक बाजू; थोराडपणा, कुरूपता, गदळपणा, सुजेमुळें आलेली विरूपता किंवा तोंडात भडकविणें इ० अर्थानें पण निंदार्थी वापरतात खोकडी पहा.

खोकाळें—न. मस्तकाची टाळू, खाकोळें पहा.

खोखा—पु वानराच्या ओरडण्याचा शब्द, यावरून खोकला, खोकणें हे शब्द बनले आहेत असें म्हणतात. —मसाप २ ३ २४२. [ध्व ]

खोखर—वि. जीर्ण. खोकर पहा. 'खोखर वृक्ष असलियावरी। आणि वसंत बोळला तयावरी।'—महिकथा १.३६.

खोखो—पु मुलांचा एक खेळ. खो पहा.

खोंगळा-ळी—पुस्त्री. १ खोदलेला पाट, कालवा; खंदक. २ पाण्याच्या लोंढ्यानें केलेली घळ, ओघळ, चर. [का. कोंके= वाकडा]

खोंगा—पु तळहाताचा पसा, पोकळी. 'खोंगाभर दाणे भिकाऱ्यास घाल' [का. कोंके=वाकडा]

खोंगी—स्त्री. गुडघे व छाती यांत डोकें घालून बसण्याची क्रिया. (क्रि० घालणें, घालून बसणें) [का. कोंके]

**खोड**—न. १ सोंगिराची चौकट, कमान. २ भोपळ्या शिवाय दांडी, सांगाडा ( सतार, वीणा यांचा ); तबला, मृदंग करण्यासाठी तयार केलेला व पोखरलेला लांकडी ठोकळा, हा एक किंवा दुतोंडी असून शिसु किंवा खैराचा असतो. ३ सुगंधी द्रव्याचा गड्डा, लांकडाचा तुकडा ( चंदनाचा, इतर सुगंधी झाडाचा ). ४ शेंडा व फांद्या छाटून टाकलेलें झाड; ओंडका; खुंट; सोट; धुंपा; फांद्यांच्या खालचा भाग. ' तिन्ही लोकीं तुझें नाम वृक्ष फळ शाखा । वेंघलों धरि खोडा धरुनि भाव टेंका ॥ ' –तुगा ३५४. ५ अंगावरून वारें गेलेला माणूस. ( क्रि० होऊन पडणें; होणें ). ६ म्हातारी व न विणारी किंवा गाभण राहण्यास अयोग्य गाय, म्हैस; फळें, फुलें न येणारें जुनाट झाड. ७ (सामा.) झाड. 'आमराईतील खोडें पांचशें आहेत.' ८ (मावळी) मृदंग. ९ लोखंडी घडकामाची चौरस पहार टेकविण्याचा लाकडी ठोकळा. १० ( गो. ) लांकडी पसरट पाळें; पोहे कांडण्याची उखळी. [ प्रा. दे. खोड= काष्ठ, खुंट. का. कोडु=धुंपा ] खोडका–पु. ( व. ) वाळून शुष्क झालेलें झाड; खोड. ' अळणास रुपाया एक लहान खोडका । ' –राला ११०. खोडघ–न. ( कर. ) १ दौतीचें कलमदान किंवा ठोकळा २ उंसाचा बुडखा. ३ (व.) जुनाट झाड. ४ (व.) गोडें तेल ठेवण्याचें दगडी भांडें. खोडघन–(व.) जमिनीतील पिकाचें नुकसान भरून निघण्याकरितां, दुसऱ्याच्या मालकीच्या त्या जमिनींत असलेल्या झाडांच्या पिकांतून घेतलेला हिस्सा.

**खोड**—स्त्री. १ वाईट प्रवृत्ति, कल; वाईट संवय, चाल; अवगुण; लहर; तबियत; रग. म्ह० १ जित्याची खोड मेल्यावांचून जात नाहीं.' २' जी खोड बाळा ती जन्मकाळा ' २ अवयव; व्यंग; दोष; गोम ( घोडा इ० जनावराची. घोड्याच्या ७२ खोडी सांगितलेल्या आहेत ). म्ह० ' एक गोरी बहात्तर खोडी चोरी ' ३ दोष; विग; चूक; अशुद्धता ( भाषण, बोलणें यांतील ); गोम; तडा; फूट ( जिन्नसांतील ). ४ चोखंदळपणा; लहर; तबियत; मिजाज म्ह० ' दरिद्र्यास खोड असूं नये. ' ५ कलंक; डाग; काळिमा [ सं. कूट; म. खोट, का. कोडी=न्यूनता ] (वाप्र.) ०काढणें–१ खिजविणें; चेतविणें, बाहेर काढणें ( गुप्त वैर, दुष्टपणा ). २ थाटेस जाणें; खोडी करणें. ' वाघाची खोड काढूं नये.' ३ दोष काढून टाकणें ०काढणें–करणें–लहानसहान उपद्रव देणें; खाजविणें; चेतविणें; चिडविणें; राग आणणें. ०ठेवणें–दोष ठेवणें किंवा शोधणें, नांवें ठेवणें; छिद्रें बाहेर काढणें किंवा वदणें. ०मोडणें–ताठा, गर्व कमी करणें; खोडकी जिरविणें; एखाद्याच्या वाईट संवई, प्रवृत्ति, ओढी त्याजकडून टाकविणें, सोडविणें, घालविणें, किंवा त्यासाठीं कडक शिक्षा करणें. सामाशब्द–०कर–वि. १ चेष्टेखोर, टवाळ; खोड्यांनीं परिपूर्ण. २ वाईट संवयी, चाली, व्यंगें, दोष असणारा. ३ मिजाजखोर; लहरी; तबियती. ०खत–स्त्री. दोष व वंश; अवगुण व विस्मट; आचारभ्रष्टि. ( क्रि० पडणें; निवारणें; पुसणें ). –पु. नाजुकम्नार किंवा गुंडोर विकणारा. [खोड+अर. सत ] ०सर–सा, खोडसाळ–वि. खोडकर. खोटसाळ पहा.

**खोंड**—पु. १ तरुण बैल, गोऱ्हा; पाडा; सांड; पोळ. २ (व.) बैलाचें वशिंड. [ सं. षंड=बैल ]

**खोंड**—पु. जोंधळ्याची एक जात.

**खोंड**—पु. ( कों. ) डोंगरावरील जनावरांची पाऊलवाट. गांड खोंडा पहा.

**खोंड, खोडकुल**—पु. ( गो. ) खड्डा. [ सं. कुंड ]

**खोडकी**—स्त्री. खोड; दोष; मिजाज; ताठा. ' त्याची खूप खोडकी जिरविली. ' [ खोड ]

**खोडकी**—स्त्री. ( व. ) बिन आरीचा, गांवठी भोंवरा.

**खोडंग**—( ना. ) थोरवाडा [ खोडा ]

**खोडणें**—उक्रि. १ डागणें, दूषणें; कलंकित करणें. २ नांवें ठेवणें; व्यंगें, विगें बाहेर काढणें. –अक्रि. वाईट संवयी, खोडी लावून घेणें. ' ती गाय आजपर्यंत सुरळीतपणें दूध देत असे परंतु अलीकडे चार दिवस खोडली. ' [ खोड ]

**खोडणें**—सक्रि. १ रद्द करणें ( खरडून, पुसून, मधून एक रेघ ओढून ). २ पेटके देत आंखडणें; अवटारणें ( अवयव ). हातपाय खोडणें–हातपाय पाखडणें; मरणकाळीं हातपाय झाडणें. ' विषातियाची मान रगडी । विंचीं बहुत हातपाय खोडी । ' –महिकथा २.१४८. म्ह० जीव जाईना म्हणून हातपाय खोडावे. =पोट भरण्यासाठीं जोराची धडपड करणें. [ खुडणें ]

**खोडप**—स्त्री. (गो.) १ सुकटांच्या कुडाची खोली. ( क्रि० करणें ).

**खोडपत्र**—न. खोटपत्र पहा.

**खोंडरू**—न. ( तुच्छतादर्शक ) कावळ्याची घुंगी; खोळ.

**खोडवा-वें**—पुन. ( माण. ) मडकें मातीचें मोरव्यापेक्षां मोठें भांडें; ( तंजा. ) बरणीच्या आकाराचें लांकडी किंवा पितळी भांडें.

**खोडवा, खोडावा**—पु १ उंसाचें दुसरें पीक; तोड झाल्यावर राखलेल्या बुडख्यापासून पुन्हां फुटलेला ऊंस; पुन्हां फुटण्याकरितां जमीनींत राखून ठेवलेले बुडखे. २ मागची फूट; पहिल्या काढणीनंतर राहिलेलीं मुळें किंवा बुडखे ( मिरच्या, वांग्या, शाळू, तमाखू यांचे ). ३ ( घाटी ) ( ल ) मुळ्या किंवा बुडखे ठेविलेलें शेत अथवा मळा . ०खोडव्याचा ऊंस–पु. दुसऱ्या पिकाचा ऊंस. ' खोडव्याचा शाळु–तमाखू–वांगी–ताग–अंबाडी इ० ' [ खुडणें ]

**खोडसा**—पु. सापाची एक जात. 'परड, खोडसे, महाडुळे। ग्रुद्र नाग सोनसळे।' –कथा ४.४.३१.

**खोडसें**—न. (जरतार) दोन्ही बाजूंनां खिळे ठोकलेली व मध्यें वेजपट्टी लाविलेली लांकडी घडवंची; पाड, कुंदा.

**खोडा**—पु. अपराध्याचे हातपाय अडकवून शिक्षा करण्याचें एक लांकडी यंत्र, खापळा. 'तेय चंदनाचेही खोडे। न लेची तो।' –ज्ञा १८.८९८. 'घातलोंसे खोडा द्वाडाचिया।' –तुगा १५४३. २ उनाड जनावराच्या गळ्यांतील लोढणें, मानखुंट. ३ (ल.) त्रासदायक, अडविणारें, पेचात आणणारें काम, लचाड, लटांवर. 'लम होतांच संसाराचे खोडयांत सांपडला.' ४ संधिवाताची अवस्था (शरीर, अवयव यांची). ५ कुंठितावस्था; अडकून पडणें. ०चढविणें–स्त्री. १ मल्लविद्या प्रतिपक्ष्याच्या पायांभोंवतीं (किंवा मानभोंवतीं) आपले पाय विशिष्ट तऱ्हेनें अडकविणें. २ (ल.) अडथळा करणें. [सं. खोड=लंगडा] म्ह० चालला तर गाडा नाहींतर खोडा. ०वि(वे)ढी–मोडा–स्त्रीपु. १ वारें गेलेली अर्धांगरोगाची स्थिति. २ खोडा (शिक्षेचा प्रकार). **खोडावणें**–अकि. पक्षघातानें, अर्धांगवायूनें आजारी पडणें, लुळें किंवा खुळें होणें. 'वेठीऐसें वाटे निर्फळ कारण। शीतळ होऊन खोडावलों।' –तुगा ८७६. [सं. खोड=लंगडा]

**खोंडा**—पु. १ एका टोंकाची खोळ केलेला कांबळा. २ दोन डोंगरामधील संधिप्रदेश, याला कोंपरा असतो; घळ; दरी; अंधाराची व आडवळणाची जागा.

**खोंडा**—पु. जोंधळ्याची एक जात; खोंडी–डें.

**खोडाखोड-डी**—स्त्री. १ पुष्कळ ठिकाणीं खरडून टाकणें, लिहिलेल्या मजकुरावर रेघोट्या मारलेल्या असणें; बदलणें; दोन ओळींमध्यें लिहिणें (दुरुस्त्या). २ चितारलेली, खरडून टाकलेली कागदाची स्थिति; काढून टाकलेल्या भागामुळें मूळांत झालेला विघाड. [खोडणें]

**खोडाळ, खोडील-ढेल, खोड्या, खोड्यारा, खोड्याळ**—खोडकर पहा. **खोडाळमावसा**–वि. (ना.) खोडका; चेष्टेखोर.

**खोंडाळ**—वि. (माण.) नुसते खोंड विणारी (गाय).

**खोडाळी**—स्त्री. चेष्टा; खोडी; चाळा; छंद. [खोडी+आळी]

**खोडी**—स्त्री. खोड (–स्त्री.) पहिले चार अर्थ पहा. 'खोडी न ठेवावी चतुरीं। ग्रंथ निर्धारी न पाहतां।' –एरुस्व १८.६६.

**खोंडी**—स्त्री. खोंडा; धान्य, भूस इ० वाहून नेण्यासाठी केलेली कांबळ्याची तात्पुरती खोळ. खुंडी पहा.

**खोंडी**—स्त्री. जोंधळ्याची एक जात.

**खोडीव**—वि. १ पुसलेलें; खोडलेलें; रेघोट्या मारलेलें. २ रद्द केलेलें; टाकाऊ. [खोडणें]

**खोंडें**—न. उष्ण हवेंत बागाइतींत होणारा जोंधळा खोंडा–डी. ०**खोंडेकोंडे**–पु. भुसकट; कोंडा. 'मग कां खावे खोंडेकोंडे।' –अफला २.

**खोंड्या**—वि. (व.) धष्टिपुष्ट असलेला (बैल). खोंड पहा.

**खोंण**—उक्रि. १ खोवणें; जोरानें आंत खुपसणें; खोंचणें; २ हलकेंच आत शिरकविणें, घालणें. [खोवणें]

**खोत**—पु. १ गांव साऱ्यानें घेणारा अधिकारी; गांवाचा सारा भरणारा वतनदार; वसुलाचा इजारदार; जकातीचा इजारदार; (सामा.) मक्तेदार; सरकारांतून नफा–तोटा आपले अंगावर पतकरून जकात किंवा कांहीं एक जिन्नस सर्व आपण घ्यावा, मग आपण विकणें तर विकावा अशा रीतीनें काम करणारा इजारदार. २ (कांहीं ठिकाणीं) सरकारासाठीं गांवचा वसूल जमा करणारा पिढीजाद कामदार; तसेंच या कामासाठीं तात्पुरता नेमलेला कामगार. '(याचे अधिकार, हक्क यासाठीं रत्नागिरी ग्याझेटियर पृ. २०४ पहा). कोंकणात जुन्या वतनी हक्कामुळें किंवा पिढीजाद मुलकी अधिकारामुळें खोत हा जमिनदार बनलेला असतो व कुळाकडून वाटेल तितका वसूल घेत राहातो.' ३ दक्षिण कोंकणातील एक ब्राह्मण जात; जवळ जात. 'गोविंद खोत.' [खेत?] सामाशब्द– ०**करी**–पु. जमिनींचा किंवा जमिनींच्या उत्पन्नांचा मक्तेदार किंवा इजारदार, खोत. **खोतकी–गी**–स्त्री. खोताचें काम, हुद्दा. ०**खराबा**–पु. १ ज्या गांवाची ज्यास खोती सांगितली त्या गावच्या खराब जमीनी कांहीं एक ठराव करून (सरकारनें) खोताच्या माथीं मारणें; खराबा मक्त्यानें देणें. २ अशा खराब जमिनी. ०**धारा**–पु. जमिनीबद्दल कुळाकडून जमीनदाराला मिळावयाचा खंड. ०**पट्टी**–स्त्री. खोताच्या नफ्याकरितां बसविलेला फाळा, कर. ०**बाकी**–स्त्री. खोताच्या येण्याची बाकी. ०**वार**–वि. खोताकडे लावून दिलेला (गाव). ०**वेठ**–स्त्री. खोतानें मजुरी दिल्याशिवाय् कुळापासून घेतलेली चाकरी, वेठ किंवा जिन्नस. यांचे पुढील प्रकार आहेतः–वरंडी-गवत, पान-पेंढा, शाकारणी माणूस, खळी, पाटी, सूप, शिपली, हवसा, वाढवण, हतरी, तट्टया, हातरं, नागरजोत, भाऱ्या–लाकडें, मानासबंधी नारळसुपारी, बाबभाडें, अधेली, तिधेली इ०. या बाबींहून कारसाईची बाब भिन्न आहे. हे प्रकार दक्षिण कोंकणांतील आहेत. ०**सजा(ज्जा)**–पु खोतापासून साऱ्यानें, भाडेपट्ट्यानें घेतलेल्या जमिनी. याच्या उलट रकमी जमीन (सरकाराकडून ठरावीक रकमेनें घेतलेली जमीन) **खोती**–स्त्री. १ खोताचा व्यापार, काम, अधिकार. २ इजाऱ्यानें, खंडानें, मक्त्यानें देणें घेणें; इजारा पहा. ३ उभ्या पिकाचा, जंगलांतील लाकडाचा, बागाइती उत्पन्नाचा मक्ता. ४ वाढीदिढीनें शेतकऱ्यास पेरण्यासाठीं वगैरे आगाऊ धान्य देण्याचा धंदा. ५ गांवची मुखत्यारी. [खोत]

**खोगीर**—पुन पलाण, घोड्यावर घालावयाचें (कापडी चामडी) जीन [फा खोगीर] (वाप्र) ०वर-लादणें-चढविणें, ठेवणें-१ घोड्यावर जीन ठेवणें, कसणें २ (ल) एखाद्यावर दोष लादणें, ठपका देणें ३ पोशाख चढविणें 'पाच सा मिनिटात जेवण उरकायच की लगेच खोगीर चढवून हापीसचा रस्ता!' -फाटक नाटयछटा सामाशब्द- ०भरती-स्त्री १ अवजड व कुचकिंमतीच्या वस्तू, क्षुद्र माणसें व निरुपयोगी पशु निष्कळ जागा भरून काढण्यासाठीं ठेवलेल्या वस्तू प्राणी, बाजारबुणगे २ (घोड्याऐवजीं जीन मोजणें) गफलतीनें किंवा लबाडीनें एकत्र केलेल्या घोड्याचा जमाव (मोठे व लहान, मजबूत व लुकडे किंवा खोगीर चढविलेलें वाटेल तसा घोडा अथवा प्राणी) (पूर्वी स्वाराच्या गणतीच्या वेळीं खरं शिपाई जेव्हा एखाद्या सर जामी सरदाराजवळ नसत, तेव्हा तो घोड्याच्या ऐवजीं खोगीर दाखवून वेळ मारून नेत असे त्यावरून किंवा खोगिराच्या पोटात चिंध्या इ० निरुपयोगी वस्तूच फार असतात त्यावरून)

**खोंच**—वि (नदभाषा) हलक्या किंमतीचा स्वस्त

**खो(खों)च**—स्त्री १ ठोका, घाव, खोंक चोंच २ खड, खाच ३ पुढें आलेलें टोंक, काटा, अणकुची, खोचाटा ४ (ल) व्यापारातील तोटा, नुकसान, धक्का ५ रोष, असतोष 'मज विषयीं त्याचे मनात खोंच आली' ६ गाण्यातील स्वरभेद, खुबी. 'त्या ख्यालामध्यें त्यानें दहा खोंची घेतल्या' ७ खुबी, मर्म, तात्पर्य, रस (गोष्ट, बनाव प्रसग, भाषण यांतील) 'त्याच्या बोलण्याची खोंच माझ्या लक्षात आली.' ८ व्यगोक्ति व्याजोक्ति, लपरोध ९ बाणाचा टप्पा 'पुढें बाणाच्या खोचेचे तफावतीनें उभे राहिले' -इम २८९ [स कुच्] (वाप्र) ०मारणें-मर्मभेदक टोंका करणें 'मोठमोठ्या इमेनी प्रथकाराची कोणास खोंचा मारण्याची रीत किती समावितपणाची व रामबाण असते हें ठाऊक असेलच' -नि ९ सामाशब्द- ०कील-वि सकुचित, अडच णीचें, कोंदट ०खांच-स्त्री. खाचखोंच (वर्णव्यत्यास) पहा

**खो(खों)चट**—स्त्री १ कांच, अणकुची, पुढें आलेलें टोंक खोचाटा (क्रि० लागणें) २ व्यापारातील टोकर, तोटा (क्रि० लागणें, बसणें, येणें)

**खो(खों)चटणें**—अक्रि अडकून फाटणें, खोंच लागणें, धसावर किंवा टोकावर अडकणें, टरकणें

**खोचडें**—न (ना) कातडीचा खरचटलेला भाग

**खोचण**—स्त्री (राजा) बायकांच्या लुगड्याचे ओंचे, कमरेभोंवतीं आवरलेली बाजु किंवा भाग, खोंविलेला भाग

**खोंचणी**—स्त्री १ खोंचणें, खोवणें २ खुपसणी, टोंचणी 'जागवणा करावेमा खोंचणी।'-शिशु १०३५ [खोंचणें]

**खोंचणें, खोंचरणें**—उक्रि १ बळेनें शिरकविणें, जोरानें आंत घालणें, खुपसणें, दडपणें २ (गो व) खासणें, खोवणें ३ लावणें, पुरणें, रोवणें ४ (ल) टोचणें, भग्नोत्साह होणें, मनास लागणें, बरमणें, विरमणें, अतिशय दु ख होणें 'नरपतिरमणी ते खोचलीसे जिव्हारीं।' -सारुह ३ ५७ ५ सकोचित होणें, सकट वाटणें 'तुका म्हणे देवा, का गा खोंचलासी जीवा।' -तुगा ६२९ ६ रुपणें, टोंचणें 'हें असो पर्वताचिये हृदयींचें। जेविं पर्जन्यधारास्तव न खोंचे' -ज्ञा ९ २२६ ७ भोसकणें, जखमी करणें 'तो दर्वे पाचारोनि खोंचिला।' -शिशु १०६७ [स. कुच्, हिं खोंचना, फोंच]

**खो(खों)चर(ल)णें**—क्रि १ (कों) दात कोरणें २ पोंचा पडणें, खोमलण खोंचणें पहा

**खोंचरा, खोंचारा**—पु खोंचण्याचें, भोसकण्याचें एक शस्त्र, भाला, बरची इ० 'सुणी ससाणे चिकाटी खोंचरा। घेऊनि निघती डोंगरा पारधी जैसे।' -ज्ञा १६ ३४५ [खोंचणें]

**खोचरा**—पु (कु) भाताची एक जात खोंचरॉ पहा

**खों(खो)चा**—पु १ धोतराचा ओंचा, सोगा, खोवण्याचा भाग २ पोंचा, खोमा, धस लागून फाटणें ३ (मांसात शिर लेलें) टोंक, शल्य ४ थान पीत असतांना वासरानें गाईस मार लेली ढुसणी, हुदडा ५ (गाईचें दूध पिता येऊ नये म्हणून वास राच्या तोंडाला बांधलेली) माळी, लाकडी चौकट ६ गुराळें -शर [खोंचणें]

**खोंचा**—पु (कों) भातखाचराचा ताल घातलेला भाग, लहान खाचर

**खो(खों)चाटा**—पु अणकुची, टोंक, घस, कांटा (क्रि० लागणें)

**खोचार-ड**—न खिंड, घळ, दरी, अडचणीची, बदिस्त, कोंदट जागा -वि अडचणीची, अरुंद (जागा)

**खोंची**—स्त्री १ (सपाट पृष्ठभागावरील लहानशी) खोंच, खांद (फळी, शेत इ० मधील) २ (व) लहानशी खाडी, खाडीचा फाटा, खाडीच्या वर असलेली खिंड, खिडार, खळी ३ (कु) समुद्राचें किंवा नदीचें पाणी खेळविण्याकरितां खोद लेली जमीन, चर ४ (कु नाविक) जहाज लावण्याची सोइस्कर जागा ०चें कलम-न खुंटीचें कलम, कलमी झाडाची फांदी चागली जोरदार पाहून सुमारें वीत-दीड वीत तोडून आणावी व सुमारें तीन वर्षांएवढें जाड सार्धे झाड पाहून त्याच्या खालच्या बाजूस म्हणजे जेथे साल जाड असेल तेथे जनावराच्या शिंगानें अगर कठिणशा लांकडाच्या खुंटीनें भोंक पाडून तें भोंक जितकें खोल पाडलें असेल तितकीच कलमी झाडाची फांदी चहूकडून तासून त्यांत बसवून देऊन सोपनानें घट्ट बाधावी [खोंचणें]

**खोचून घेवप**—क्रि (गो) दसन्याच वगैरे अगात देवाचा सचार झाल्यावेळीं डोकीवर तरवारीनें घाव करून घेणें

खोंचेरा—पु. विळांतून साप बाहेर ओढून काढण्याचें दुटोंकी हत्यार; निमटा. [ खोंचणें ]

खोज—पु (ना.व.) शोध; तपास; चौकशी. [ हिं. ] ०लाग-खोज; शोध; थांग.

खोजा—पु. मोठी थाळी. [ फा. ख्वान्, ख्वांचा ]

खोजा—पु. मातीची सुरई. खुजा पहा.

खोजा—पु. १ एक मुसलमान जात. २ प्रतिष्ठित मुसलमान. [ फा. ख्वाजा ]

खोजा-ज्या—पु. षंढ; हिजडा; सौवीर; नपुंसक. 'बसवंतराव आपा कासुरडे खोज्या होण्याचें कारण हेंच.' –मदरु १.१२२. [ फा. ख्वाजा ]

खोट—स्त्री १ धातूचा गोळा; लगड; वीट (विन घडलेल्या किंवा रस केलेल्या जुन्या धातूची). 'आसुरी संपत्ति हा खोटु।'–ज्ञा १६.२१६. 'संस्कृत खोटिये गाळून मनें। देश भाषा घडिलें लेणें।' –मुसभा १.२१. २ (ल.) गोळा; लगदा (कफ, रक्त, दही, खवा इ० चा); गुठळी; गोळी. खोटीचा–वि. लगडीचा बनविलेला, केलेला. 'खोटीचें भाडें.'

खोट—स्त्री. १ टांच. २ (गो.) लाथ. ०वाद–पु. टाचबंद (वहाणेचा).

खोट—स्त्री. तोटा; नुकसान (व्यापार–व्यवहारांत). [खूट] ०खाणें–तोटा येणें; बुड लागणें. ०वेरा–पु. सरकारी वसुलांतील तूट भरून काढण्यासाठीं बसविलेला जादा कर, आकारणी.

खोट—स्त्री. १ खोटें; असत्य; खरेपणा, प्रामाणिकपणा, विश्वासूपणा इ० चा अभाव. २ (व.) दोष, वैगुण्य; कमताई [सं. कूट] ०चाल–वि. १ गैरशिस्त; बदफैली; दुर्गुणी चालीचा, संवईचा. २ संप्रदायाविरुद्ध वर्तनाचा. ०पत्र–न. (कायदा, प्रामपंचायत) अपराध्यापासून त्याच्या खोटेपणाची किंवा अपराधाची घेतलेली लेखी कबुलायत; तसेंच वादांत हरलेल्या माणसाकडून घेतलेलें जितपत्र. ०वाद–पु खोटेपणा; लबाडीचा आरोप (क्रि० येणें). 'त्याचे पदरीं खोटवाद आला.' ०साळ–वि १ हीण; हीणकस; खोटी (धातु). २ अप्रामाणिक; खोटा; वाईट चालीचा; दुर्वर्तनी. 'अमुच्या आवांनीं भीतीला खोटसाळ हो म्हटलें।'–केक २. ३ कृत्रिम; बनावट. ४ गैरभरंवशाचा; लुच्चा; खोडकर; दुष्ट. खोडसाळ पहा. [ खोट+साल=शाळा ]

खोटवावली—स्त्री. खुंटवावली पहा.

खोटर—न. १ ज्यांतून पाभरीच्या दिंडाकडे एलें नेतात तो कप्पा. २ (व.) बैल, घासरूं यांच्या गळयांत बांधावयाचा दीड हात लांबीचा वारतीचा तुकडा.

खोटलो—पु. (गो.) १ पानांची टोपली. २ (कु.) धान्य बांधून ठेवलेला गवताचा मुडा.

खोटा—वि. १ असत्य; खरा किंवा वास्तविक नव्हे असा. २ विश्वासघातकी; बेइमानी; लबाड. ३ कृत्रिम; बनावट; नकली; मिश्र. ४ हीणकस; अशुद्ध; मिसळीचा; वाईट (पैसा, नाणें). ५ पापी अधार्मिक. (माणूस). 'मांडया मोडुनि वधिला, तुज दावि वामअंक जो खोटा।' –मोऐषिक ३.२५. 'जेथें धर्मिष्ठाला खोटपण लावितो स्वयें खोटा।'–मोसभा ५.१०४. ६ त्याज्य; टाकाऊ; वाईट. 'बहु खेळ खोटाचि आलस्य खोटा।' –मराठी तिसरें पुस्तक पृ. १६ (१९३३). ७ हलका; कमी प्रतीचा घड च्या उलट. 'सदू, नशिबाचा खोटा आहे.' [ सं. कूट; का. कॅट्ट=वाईट ] म्ह० १ खोट्याच्या कपाळीं गोटा किंवा कुऱ्हाडीचा घाव=खोटें काम करणाऱ्याच्या नशिबीं नुकसान ठेवलेलेंच असतें. २ खोटा तरी गांठचा, वेडा तरी पोटचा=स्वतःच्या सर्व गोष्टी, इत्यें इ० निर्दोष आहेत असें वाटतें. खोटाई–स्त्री. खरेपणाचा, वास्तविकपणाचा अभाव; लबाडी; खोटेपणा. 'कां करिसी खोटाई।'–दावि २४१; खोटानाटा–वि. वाईट; खोटा; हीण (व्यापारी जिन्नस, पैसा, मौल्यवान धातु). [ खोटा द्वि. ]

खोटारा–वि. (कों.) खोटा; खोडसाळ. खोटारेपणा–पु. खोटेपणा; लबाडी. 'काय हा खोटारेपणा! –रोमियो ज्यूलियट ५.

खोटावणें—अक्रि. लाथ मारणें. [ खोट ]

खोटिल—पु. खानदेशांतील सपाटीवर राहणारा भिल. –गुजा २४.

खोटी—स्त्री. खोळंबा; उशीर; विलंब; अडथळा किंवा अडथळयाची स्थिति. –वि. खोळंबा, उशीर. अडथळा केलेला. [सं. कुठ्–कुंठ्; प्रा. दे. खुड] ०करणें–१ खोळंबा, उशीर करणें. २ थांबवून धरणें. 'मोहिबास येइतलग त्यास खोटी करावें.' –पेद ३.५९.

खोटी—स्त्री. लगड; गोळा (धातूंचा). खोट पहा. 'आटलेपण ते खोटी म्हणिपे।'–ज्ञा ८.१७३. 'लोहपरिसाची भटी। घडतां सहज सुवर्णखोटी' –निमा (आत्मचरित्र) १.१०८.

खोटें—न. (राजा.) माणसांना व वास्तूंना (घरांना) पछाडणारें एक पिशाच्च (हें पिशाच्च खरें नांवाच्या देवतेच्या उलट आहे म्हणून खोटें). [सं. कूट, खोट]

खोटें—वि. खोटा पहा. १ असत्य. २ दुष्ट; वाईट. 'नाशुनि विषाप्र भीमा सर्पे डसविलें नृपें, असें खोटें।' –मोकर्ण ४९.६. 'पडे भोगणें पाप तें कर्म खोटें।'–राम ९.३ त्याज्य; वाईट. 'दुसऱ्याच्या आश्रित वागणें हें बहुत खोटें आहे' –बाळ १ ७०–८०. (आवृत्ति १) [सं. कूट, कौट; हिं. खोटा; गु. खोटुं] ०पण–न. १ असत्यता. २ दोष; अपराध. 'त्यजी मदपराध हें मनकडेनि खोटेंपण।' –केका १८.

खोद—न. १ पाठीवरील कुबड; पोंक; खोंड. २ उंचवटा; बांकण; फुगीर भाग (मित, धुंपण, रस्ता यांचा).

खोदकला, खोदकाम—स्त्रीन. खोदीव कामाची कला; नैसर्गिक पदार्थांची कोरून केलेली प्रतिकृति; नक्षीकाम; कोरीव काम. [सं. क्षोद; प्रा. खोद]

खोदगिरी—स्त्री. १ (दगड, लांकूड, धातु यांवर) खोदणें; नक्षी कोरणें. २ मूर्तिशिल्प; नकसकाम; खोदलेलें, कोरलेलें काम; नक्षीकाम. [खोदणें]

खोदणावळ—स्त्री. खोदण्याची, कोरीव कामाची मजुरी किंवा किंमत. [खोदणें]

खोदणी—स्त्री. १ खणणें; कोरणें; खणती; कोरणी. २ फुलें, आकृती इ० खोदण्याचें, कोरण्याचें एक हत्यार; कोरणी. ३ (ल.) खणपटीस बसून पैका काढण्याची क्रिया; उकळणी. (क्रि० लावणें; मांडणें). ४ सोनाराचें खाळणें. [खोदणें]

खोदणें—उक्रि. १ खणणें; उकरणें. २ कोरणें. ३ (कों.) उघडणें; 'दार खोद.' ४ उकरून भांडण उपस्थित करणें. [सं. क्षुद्=पीठ करणें, क्षोदन; प्रा. खोदन] खोदखोदून विचारणें, पुसणें—सक्रि. (गुप्त गोष्ट समजावून घेण्यासाठीं) बारकाईनें, आग्रहानें, डावपेंच घालून, युक्तिप्रयुक्तीनें विचारणें.

खोदरा, खोद्रा—पु. (ना. व.) चर; खोबण; खड्डा. 'घुशीनें घरांत केवढा खोद्रा करून ठेविला आहे.' [सं. क्षोद; प्रा. खोद+दर]

खोंदळणें—उक्रि. खवदळणें पहा.

खोदाई—स्त्री. खणण्याची किंवा कोरण्याची मजुरी, किंमत; खोदणावळ. [खोदणें; हिं. खोदाई]

खोदींव—वि. १ खणलेलें; खोदलेलें; कोरलेलें. २ कोरीव; नक्षीदार. [खोदणें]

खोप—स्त्री. १ वीण; वेत. २ विजवट; खाण; धळा, (सामा.) ३ एखाद्या साथीचा भर, व्याप्ति, वादा. 'देवीची–तापाची–गोंवराची–खोंकल्याची खोप.' (क्रि० येणें, चालणें; चालू होणें) ४ (व.) पिढी. ५ (व.) पशूंचा विण्याचा (जननाचा) मोसम [?]

खों(खो)प—स्त्री. १ झोंपडी, खोपटी; माळ्यावाचून बांधलेलें घर. 'नातरी आकाशाचें खोंपें।' –ज्ञा ९.१०३. २ पद्याचें घरटें ३ (सं.) पोट; उदर. 'असो यावरी सोमवंशी जगद्रूपें। वसुदेव देवकीया खोंपें। विश्वदुरितदहनार्थ कृष्णरूपें। आदिनारायणें।' –स्वानु ९.१.१७. ४ (ल.) दरी; गुहा. 'सिंहखोंप केवि गजप्रवेश।' –कथा ४.१६.१६६. ५ पोकळी, ढोली. [प्रा. दे. खुंपा=गवती झोपडी; का. कोप्प=लहान गांव; तामिळ, तुळु, कोप्प=झोपडी; से. कोप्प; तुल० बोअर लोकांत झोपडीला कोपी म्हणतात]

खोप—स्त्री. केसांचा झुबका; वेणीचा खोंपा. 'खोप बद्धनिया मुरली।' –कथा १.१.२९. [खोपा]

खोप—स्त्री. (कु) आघातानें झालेली खोंचः जखम; खोक; [प्रा. खुप्प]

खोप(पा)ट–टी, खोपडी—नस्त्री. लहान घर; खोप; झोपडी. 'मोडकें खोपट असे जर्जर।' [खोप; दे. खुंपा]

खोप(पा)ड—स्त्रीन. १ ढोली; दरी; कपार; गुहा (झाड, सडक, डोंगर यांतील) २ पद्याचें घरटें. [खोप].

खोपडा—पु. ठाणबंदी गुरापुढें खाण्यासाठीं हिरव्या गवताची (विशेषतः झाडांच्या डहाळ्यांची) टांगून ठेवलेली पेंडी. [खोप].

खोपडें-डी, खोपरी—स्त्री. १ डोकें; कपाळ; टाळकें; बोडकें. २ डोक्याची कवची–टी.

खों(खो)पा—पु. (बायकी) वेणीचा विशिष्ट आकार, थाट; वेणी घातल्यावर त्याचा डोक्यावर बांधलेला बुचडा; तसेंच वेणींत फुलें गुंफून बांधलेला बुचडा. 'तोडूनि गगनाचीं पुष्पें। गुंफूनि भरलीं खोंपें। वंध्यापुत्र वधूचें।' –स्वानु ११.६.५९. फुलांची गुंफलेली वेणी; वेणींत गुंफलेलीं फुलें. [का. कोप्पु; हिं. खोंपा]

खो(खों)पा—पु १ पद्याचें घरटें. 'उफराटा पिंपळ त्यावरी येथ कावळीनें केला खोपा रे।' –मध्वमुनीश्वरांची कविता पृ. ११०. 'चिमणीचा खोपा'. २ झाडांतील ढोली. ३ (बागवान, इ०च्या) रोपांवर छाया राहण्यासाठीं पानांचें नागफडीच्या आकाराचें केलेलें आच्छादन. ४ घोंगता. ५ पागोट्याच्या पुढील भागांतील लहान खळगी. ६ निवांत जागा. [का. कोप्पे=खोळ]

खोंबकर—वि. क्षोभकर; उत्तेजक. 'नागरी देवां खोंबकरू।' –शिशु १५१. [सं. क्षोभ; प्रा. खोभ+कर]

खोबजणें—अवि संभ्रमणें; गोंधळणें. 'खोबजती युवती अति लाजती।' –वामन, कात्यायनीव्रत १६. [सं. क्षोभ; प्रा. खोभ]

खोबडी—स्त्री. (कुंभारी) खापरी कुंडी; ही परळापेक्षां मोठी असते.

खोबण–णी—पुस्त्री. १ कुसूं बसविण्याचें छिद्र, घर. २ पन्हाळी; खाप; खांचणी; भिंतींतील सरा, बद्दाल ठेवण्याची जागा, दर, भोंक. ३ अडसराचें अडकण. ४ लांकूड इ०मध्यें पाडलेली खांच. (क्रि० पाडणें). ५ सांधा बसविण्याचा खोलगट भाग; सांध्याचा प्रकार. ०दांते–पुअव. लांकडी सांध्याचा एक प्रकार. एका लांकडाला खोबण पाडावयाची व दुसऱ्या लाकडाला दांता पाडून तो त्या खोबणींत अडकवायाचा ही पद्धति. [वै. सं. क्षुभ्=तडाखा, ठोका?]

खोबरवेल—पु (ना.) अनंतमुळाचा वेल; अनंतमूळ.

**खोवरी**—स्त्री. (ना.) दूध तापविण्याचें, दहीं ठेविण्याचें मडकें. [ खोपरी ]

**खोवरी, खोवऱ्या**—वि. खोवऱ्याचा. **खोवऱ्या आंबा**–खोवऱ्यासारखा खुसखुशीत आंब्यांतील एक प्रकार. **–चा वाळा**–पु. खोवऱ्याचा कीस. **–ची आई**–स्त्री. नारळाची करवंटी; नरोटी.

**खोवरें**—न. १ नारळांतील मगज, गाभा, दळ. २ (राजा.) सुपारीच्या मधोमध असलेला पांढरा मगज, दळ, अंश. ३ झेंडूच्या फुलाच्या दांड्याच्या बुंध्याच्या आंत असलेला भाग. ४ (गो.) सुकें खोवरें. ५ (ल.) नाश; दुर्भिळता. 'आज माझ्या झोंपेचें खोवरें झालें.' 'मनुष्यास अन्नाचें खोवरें झालें.'—भाव १३०. (क्रि० होणें; करणें). [ का. खोब्बरी ] **०पाक**–पु. साखरेच्या पाकांत किसलेलें खोवरें घालून केलेली मिठाई. **०रोटी**–स्त्री. रोटीचा एक प्रकार. –गृशि २.१८. **खोवऱ्याची वर्फी**–स्त्री. खोबरेंपाकांत वर्फी किंवा खवा घालून केलेला मेवा.

**खोवरेल**—न. सुक्या खोवऱ्याचें तेल. [ खोवरें+तेल ]

**खोवलें, खोवलां**—न. (कु.) १ झाडावरील फळें काढण्याची, जाळें बांधलेली वेळूची लांब काठी; आंबे काढण्याचा झेला, घळ. २ गुराच्या तोंडाला बांधण्याची जाळी.

**खोवळपट्टी–आसरी**—स्त्री. (बैलगाडी) गाडीचा लोखंडी आंस बसविण्याची जाड, लांकडी फळी (ही खोवळा व आंस याच्यामध्यें असते).

**खोवळा**—पु. १ पट्टा या शस्त्राची पोकळ मूठ; ही कोंपरापासून पुढील सर्व हाताचें रक्षण करते. २ अभ्यासासाठीं, शिकण्यासाठीं केलेला लाकडी पट्टा (हत्यार). ३ गाडीच्या आंसाची पेटी. ४ कुमठ्याचें घर. ५ जमीनींतील खोबदघोबड खांच, खळगा; भोंक, खळी, खळगा (भिंत, ताल, दगड, फळी यातील). ६ (चित्रकाम) ज्यामध्यें नक्षीचे दोरे (तार) ओवळेले असतात व ज्यास चाळलें म्हणजे नक्षी उमटते तो; चाळा. ७ (सोनारी) (खोवला–) खोवऱ्याच्या वाटीसारखा, पण लांबट, चांदीच्या जरासारखें सूत ओढण्यासाठीं केलेला व बारीक भोंकें असलेला द्रोण. ८ फरा; सुबा; बाहुटा. ९ (व.) तुकडा; पापुद्रा; छिलपी. १० टोपण; अस्तर; गुजवण. 'घालुनि नखाचे खोवळे। शर्मी अमवळें बुजिलें।'—एभा ८.२३४. [ सं. क्षुभ; प्रा. खुभ! ] **०झाचा**–पु. (बैलगाडी) आंसावरील पाडलेली खोबण.

**खोवळी, खोबी**—स्त्री. १ लहान भोंक; छिद्र, खळी. २ खांच; पोकळी. (क्रि० पाडणें). [ खोवळा ]

**खोबी**—स्त्री. तेलाच्या घाण्याच्या तळातील खळगा, पोकळी. **खोबी पोतेरें**–न. १ खोबींतील तेल पुसून काढावयाचें पोतेरें, फडकें. २ घाण्यांतील या खळग्यांत सांठलेलें व पोतेऱ्यासारख्या कपड्यानें टिपून बाहेर काढलेलें तेल. 'सहा पैसे गाळणावळ मागतोस, त्यापेक्षां खोबीपोतेरें तुला देणार नाहीं.'

**खोमट, खोमटाण**—वि. खवट, खवटाण पहा.

**खोमण**—वि. तोंडाचें बोळकें झाल्यानें नाक व हनुवटी जवळ जवळ आलेला; बोंडका, बक.

**खोमणकाकडी**—खांगकाकडी पहा.

**खामणें**—न. १ नारळ इ० खवण्याची हिमणी; खवणी. २ (काव्य) कळणा; खोंच, दडका. ३ (ल.) बोडकेपणा; कमी पणा; न्यूनता. 'जयाचिये अनुस्यूती। खोमनें नाहीं।'—ज्ञा १३.११६. [ खवणें ]

**खोमणें**—उक्रि. (प्रां.) १ जोरानें आंत घालणें; खोंचणें; खुपसणें. २ रोपणें; रोवणें; गाडणें (खांब इ०). खोवणें पहा. [ खोवणें ]

**खामणें**—अक्रि. कमी होणें; कमीपणा येणें. 'चाळितांही न खामे। गुणातीतता।'—ज्ञा १४.२८५.

**खोमण्या**—वि. (प्रां.) १ कडक; दराऱ्याचा; अधिकारयुक्त; ज्याचा आज्ञाभंग न होईल असा. २ समक्या; समशा; खवेड. [ सं. क्षोभण; प्रा. खोभण ]

**खोमलणें**—उक्रि. १ भांडें वगैरेस खोंचा पाडणें; खोम्यानें युक्त होणें. २ भुमकट पडणें; फार दमणें (अतिशय श्रम, कष्ट केल्यामुळें). [ खोमा ]

**खोमसणें**—उक्रि. भोंकांत माती ठांसणें, घालणें. खुपसणें पहा.

**खोमा**—पु. १ खोंचा; पोंचा; चरा (भारें आदळल्यानें, आपटल्यानें पडणारा). २ जमिनीवरील खळगी; लहान खड्डा; खाच. (क्रि० घेणें; पाडणें)

**खोमेटी**—स्त्री. फेंक (दगडाची).

**खोय**—स्त्री. १ स्वभाव; प्रकृति; रागरंग. २ (व.) खोड; आदत. 'त्याची खोयच मोडली.' [ फा. खो, खु ] **०चोय**–स्त्री. मन; वृत्ति; भाव; प्रकृति; तबियत. (क्रि० घेणें; काढणें; पाहणें). [ फा. खो, खू=स्वभाव+फा. बोय्=वास ]

**खोय**—स्त्री. (खा.) पांटरी पासोडी, तिची खोळ.

**खोर**—नपु. (राजा.) दरी; खोडा. खोरें पहा.

**खोर**—अ. एक फारसी प्रत्यय (खुर्दन्=खाणें या क्रियापदापासून). हा मराठींत रूढ झाला आहे. जसें–चहाडखोर; हेकेखोर; हवाखोरी=हवा खाण्यास जाणें; दिवाळखोरी इ०.

**खोरडण**—न. (कों.) गुरांच्या पायाखालचा, गोठ्यांतला, शिलकी, वाईट चारा, गवत, भुसा, केरकचरा.

**खोरडा**—पु. (व.) कोंवड्याचें खुराडें.

**खोरण**—स्त्री. मोठें खोरें; घळ; दरा (दोन डोंगरांतील); खोंडा.

**खोरण**—न (कों.) निसाऱ्याची रास.

**खोरण-णी-णें**—नस्त्री. १ कचरा काढण्याचें एक प्रकारचें फावडें. २ उचटणें (पोळ्या, तळण्याचे पदार्थ, निसारे इ० वरखालीं करण्याचें) (व.) लांकडी सरळ घाट; उलथनें; कलथा. 'पळी असतां खोरणें। कासयाला पाहिजे।'—अफ्ग १.३ (हेट.) रास ठेवण्याची लहान खोबडी. ४ निसारे चाळविण्याचा दांडा; काठी. [ सं. क्षुर; प्रा. खोर=पात्रविशेष ] **०लावणें**–मागण्या लावणें; तगादा करणें (एखाद्याच्या सधिक स्वभावाचा फायदा घेऊन); खोऱ्यानें पैसा ओढणें.

**खोरणें**—सक्रि १ (धूळ, निसारे) चाळविणें; ढोसणें; (अनीन, माती) पोसरणें; ढकरणें; (फावडें) लावणें. [ खोरें ]

**खोरणें**—न. (कु) भिंतींतील खोबण; गवाक्ष; कोनाडा (वस्तु ठेवण्याचें). [ खोरणें ]

**खोरपणें**—सक्रि. (प्रां.) नागाडी करणें; लुटणें; मागणें; तोडणें. [ खोरें; सं क्षुरप्र; प्रा. खुरप्प ]

**खोरली**—स्त्री. (कु.) माडाच्या भुईचा लहान खोरा.

**खोरसणी**—स्त्री. खोदखोदून विचारणें; बारकाईची चौकशी; करून उलट तपासणी. (क्रि० घेणें). 'त्यानें जेव्हां खोरसणी घेतली तेव्हां ती गोष्ट सांगणें प्राप्त झाली.'

**खोरा-री**—पुस्त्री. कोणत्याहि पानाचा केलेला एकटाकी द्रोण, द्रोणा; डोणी. २ (गो.) पावसाळ्यासाठीं माडाच्या झावळींची झांप विणून त्याची वळून केलेली खोळ; इरलें; इरल्यासारखी सरळ घोंगडीची खोळ; हिच्या उलट कमरभोंडी. ३ खोंड; दरा, खोरें.

**खोरा-री**—पुस्त्री. खोरें; फावडें. [सं. क्षुर; प्रा. खुर; हिं छुरा]

**खोरांड**—न. पशूंचें खुराडें.

**खोरी**—स्त्री. खोरा पहा.

**खोरी**—स्त्री. व्यापारांतील तोटा, नुकसान, बुड. 'नवनीत-शेलकें हेरी। आणिलें खोरी।'—राला ६६. खोरीं, खोरीस येणें-पडणें. खोरी होणें—१ (द्रव्यानें अथवा पैक्यानें) नुकसानींत येणें; भिकेस लागणें 'तो रमाच्या पायीं खोरी झाला.' २ (अंगानें, शरीरानें) अशक्त होणें; रोडावणें. ३ (अब्रूनें) हलक्या पदवीस येणें नामोशी होणें. ४ (प्रयत्नांनीं, उपायांनीं) कुंठित मति होणें, शहाणपण खुंटणें. 'केलें टाणें टोणें सारी। पाहिले करून झाले खोरी।'—पला १०. [सं. क्षुर; प्रा. खुर]

**खोरु**—स्त्री. (गो.) ल्हान मासळी.

**खोरूज**—खरूज पहा.

**खोरें**—न शेण, केरकचरा ओढण्याचें फावडें; खोरा-री. म्ह० १ खोऱ्यानें माती आपल्याकडे ढसपणें=केवळ स्वार्थासाठीं झटणें, आपल्या पोळीवर तूप ओढणें. २ खोऱ्यानें पैसा ओढणें=खूप पैसा मिळविणें. ०लावणें-खोरणें मध्यें खोरणें लावणें पहा. [सं. क्षुर, प्रा. खुर]

**खोरें**—न मरंद, ल्हान दरी, खोंड. 'घाडिले कागद खोऱ्याला।'—ऐपो ३७. [सं. कुदर]

**खोरेंपा**—अक्रि (कु.) थंडीनें अंग कांकडून बसणें.

**खोरेती**—स्त्री. खरवती झाड. त्याच्या पानावर करवतीसारखे खरखरीत कांटे असल्यानें कोंकणांत हें पान लाकडी काम साफसूफ व गुळगुळीत करावयास सुतार लोक वापरतात. [करवती]

**खोऱ्याळ-ळी**—स्त्री. चुका; अपराध; दोष; व्यंग; न्यून (उघडकीस आणलेलें). (क्रि० काढणें).

**खोल**—वि. खोंद; गभीर; उथळ अथवा सखल नसलेलें किंवा त्याच्या उलट. २ (ल.) आंतल्या गांठीचा; मख्ख. 'अती खोल तो बोल बोलेल कैचा।'—दावि १५१. ३ शहाणा; धूर्त; घोरणी; विद्वान. ४ गहन; गूढ; दुर्बोध; उथळ, दिखाऊ नसलेला. 'कारण पाहूं जातां फार खोल आहे असें नाहीं.'—नि ७१. ५ (उतार दाखविणाऱ्या शब्दाबरोबर योजना) उभा, खुल्याचा. ६ कठिण; दुर्लभ. 'वेंचिता फुकाचे बोल। केवढें खोल अभागियां।'—तुगा ७०१. [दे. प्रा. खोल्ल; तुल० का. कोळ्ळ=स्वण, दरा; सं. कुहर] खोलटणें, खोलगटणें—अक्रि. १ खोलगट होणें; खाचखळगे पडणें; दबणें (पावसानें जमीन इ०). २ खोल जाणें, आंत जाणें, ओढलें जाणें (डोळे, गाल, पोट). ३ आकडे मोडणें, शेपखळी पडणें; ढुंगणाच्या बाजूस खळगा पडणें; प्रसूतीचिन्हांनीं युक्त होणें (गाय, म्हैस यांनीं विण्याच्या पूर्वीं). खोलणें—उक्रि. १ जास्त खोल करणें (विहीर, खड्डा). २ स्पष्ट करणें; फोड करणें. ३ पुढें चालणें. 'दिहा खोलणें रात्रीं आगोवा।'—ज्ञा १६.२४०. ०पाण्यांत शिरणें—(ल.) जास्त तपशिलांत जाणें; बारकाईनें शोध घेणें; एखाद्या व्यवहारांत फार मन घालणें; एखाद्या विचाराच्या दुर्बोध भागाचें ज्ञान करून घेण्याचा प्रयत्न करणें; आपल्या आवांक्या पलीकडे जाणें. खोलवणें—उक्रि. (सोनारी) खोलगट आकार देणें. खोलविणें—उक्रि. खोल करणें; एखाद्या धातूच्या गोळ्याचा पाहिजे तसला खोलवा बनविणें; भोंक पाडणें. २ खोल बसेल असें लावणें. 'पंचाग्नीची दडगी। खोलवोजनी शरीरालागीं।'—ज्ञा १७.२५५. खोंदून खोदून विचारणें-खोदखोदून पुसणें; घोळघोळून पहाणें. सामासिक—०कट—गट, खोलट—वि. १ किंचित खोल २ सखल; दबलेली (जमीन). खोलगा—पु. खळगा; खांच; खड्डा; दबलेला, भाग; खळण. खोलणी-ण्या—पु १ (सोनारी) चांदीच्या पत्र्यास खोलवा आणून भांड्याचा आकार आणण्याचा हातोडा. २ (कासारी) पत्रा खोलण्याचें साधन. ०बुद्धि—स्त्री. अतिशय शहाणपण; गूढ मसलत, उपाय युक्ति इ० —वि. खोल बुद्धीचा पहा. ०बुद्धीचा—वि. फार शहाणा; अत्यंत मुत्सद्दी, घोरणी, मसलतीचा. जो विषय घेतला त्यांत तरबेज; त्यांतील एकूण एक मख्खी जाणणारा. ०घट—घाट—वि. १ किंचित् खोल. २ सखल (जमीन); वदखल (जागा; खड्ड, खोल घर, पळ). ०घटा—पु खोलपणा; खोली. ०घणा—पु. खोलणी पहा. ०वत—न. सामता; झारी; गिरमिट. खोलवा—पु. खळगा; दबका; ल्हान भोंक; आंत दबलेली जागा.

**खोलणी**—स्त्री. पुढें जाणें; पुढें चालणें. 'उच्चैःश्रवा खांचे। खोलणिये।'—ज्ञा ९.३२६. 'उच्चैःश्रवा अश्व जाण। पुढें आपण खोलणिये।'—एभा १०.६०६. —वि. पुढें चालणारा; मिरवणुकींत धन्याच्या पुढें चालणारा. 'इयावरी खोलणीयें। अटराजण वंदिये।'—स्वानु ७.५.४६. [सं. खोल्=लंगडणें; लगडत चालणें]

**खोलणें**—उक्रि. उघडणें; खुलें करणें. [खुला; हिं. खोलना]

**खोलता**—पु. १ वाटाड्या; पुढें चालणारा. 'स्वामीपुढें खोलता। होईन मी।'—ज्ञा १३.४१७. २ (ल.) मशालजी; दिवट्या. [खोलणी पहा]

**खोलपा-पी**—पुस्त्री. १ थोडेसे जिन्नस ज्यात घालून देतात ती वाण्यानें केलेली. कागदाची शंकाकृति सुरळी; पुड. २ (कु.) पानाचा एकटाकी द्रोण. [खोल]

**खोलबंदी**—स्त्री. घोड्याचे नाल काढून, खूर तपासून पुन्हां ते बसविणें; नालबंदी, खुरबंदी. [हिं. खोलबंदी]

**खोला-ल्या**—पु १ एकटांकी द्रोण. खोलपा अर्थ २ पहा. २ ओबडधोबड, चांगले टाके नसलेली पत्रावळ (मधुकरी लोक कढी, आमटी किंवा इतर अन्न घेण्याकरितां झोळींत ठेवतात ती). ३ अर्धगोल तळाचें व उघड्या तोंडाचें भांडें हें कोळंब्यापेक्षां ल्हान असतें; फुलाची परडी ४ (कु.) कोणत्याहि झाडाचें पान.

**खोलावणें**—सक्रि. खोल करणें, जाणें. खोलवणें पहा. 'तें चौपासि घेऊनि आगारें। खोलावती।' १५.९२. [खोल]

**खोलावा**—पु. ओंडी; खोली; खोलपणा; दबका. [खोल]

**खोलिजणें**—क्रि. चालणें; चालतां येणें. खोलणें पहा. ' कां गगनामाजीं पाईं । खोलिजतु असे ।'—ज्ञा १५.७१.

**खोली**—स्त्री. १ खोलपणा; ओंडपणा. ' भेटे अन्नतति तया जशि पाहे सागरा शिला खोली ।'—मोविराट१५.९२. २ कोठडी; संतर्गृह; आडोश्याची जागा. ३ अंत; ठाव; परमावधि. ' प्रभुची जाणेल कसा बाहुबळें तोचि एकला खोली ।'—मोवन ३.१६. ०रुंदी—स्त्री. १ खोलपणा व रुंदपणा. २ (ल.) व्याप्ति; लागणारी जागा; एकंदर आकार; गोळाबेरीज. **खोलीव**—स्त्री. खड्डा; खोलावा. ' उभयांचा कटक प्रदेश बुडे । इतुकी खोलीव जाली ।' —कृमुरा ३१.६८. [ प्रा. खोल्ल; म. खोल ]

**खोली**—स्त्री. ( गो. ) पत्रावळीच्या उपयोगाचें फणसाचें पान, खोलपी. खोला पहा.

**खोलेरीखाट**—स्त्री. (क.) खाटेस खिळून बसणें ( आलेला प्रसंग टाळण्यासाठीं आजारीपणाच्या ढोंगानें ); बिछाना धरून बसणें; मुस मारून निजणें. [ खोली+खाट ]

**खोलो**—पु. ( गो. ) केळीचें किंवा तसल्या जातीचें मोठें पान; पानाचा तुकडा.

**खोलपी**—स्त्री. ( गो. ) फणसाच्या पानांचा पेज पिण्याच्या उपयोगी चमचा.

**खोचखोच, खोखोचणें**—खवखव. खवखवणें पहा.

**खोवणी**—स्त्री. (कों.) १ खांप. २ (कों.)जेवणाच्या ताटास खालून दिलेला टेंकू. ३ लोखंडी दंतुर वर्तुळाकार तुकडे एकांत एक बसवून त्याला पितळी मूठ लावून लांकडी बैठकीवर एका खांबावर बसवितात ती. खवणी पहा. [ खोवणें ]

**खोवणें**—उक्रि. १ खोसणें; जोरानें आंत घालणें; खुपसणें; खोंचणें. २ हलकेंच आंत शिरकविणें; खुपसून देणें. ३ (ल) वाईट गोष्ट सुचविणें. ४ पेरणें. ' जें बीज भुईं खोंविलें । तेंचि वरी रूख जाहलें ।'—ज्ञा १३.२९६. ५ रोवणें; ठाम उभें राहणें. ' मृत्युपुढें अभिमानें तोही खोंवील पाय काशाला ।'—मोकर्ण ३६.४९. ६ फुकट दवडणें; घालविणें. ' वृथाच परि खोविलें बाळपण मुलासवें खेळीं ।'—केप ४३. [ सं. क्षिप्-क्षेपण; प्रा. खिवण ? ]

**खोवा**—पु. खवा; आटवून घट्ट केलेलें साधें दूध; तसेंच घट्ट केलेलें नारळाचें दूध. [ खवा ]

**खोंसड-डें**—न. (व.) खरचटून निघालेलें कातडें. **खोंसड**—वि. ( व. ) खोंचून, टोंचून, कुजकें बोलणारा.

**खोंसडखाऊ**—वि. कोडगा; खेटरखाऊ; बेअब्रूचा; निगरगट्ट; अतिशय मूर्ख. [ खोंसडा=जोडा+खाऊ ]

**खोसडा**—पु. भोसका; खोंच, ढुस्सी; गुद्दा ( भाला, मूठ यांचा ) [ खोंसणें ]

**खोंसडा**—पु. जोडा; वहाण. खासडा पहा.

**खोसणें**—सक्रि. खोंचणें. खोवणें पहा. ' विंचू नांगीं विष धरी। खोसडेवरी मृत्यू त्या ।'—निगा २७४.

**खोसर**—वि. जीर्ण; फुटका खोकर पहा.

**खोसा**—पु. ( ना. व. ) खोंचा ( वस्त्रास धग लागून पडलेला ); खोंच.

**खोसी**—स्त्री. ( गो. ) खुशी; मर्जी. [ खुशी ]

**खोळ-ळी**—स्त्रीपु. १ पोकळ पिशवी; अभ्रा ( गादी, उशी, रजई, अंगरखा याची-आंत कापूस भरण्यासाठीं ). ' जें ऐसेंही परि विरुळें । इये विज्ञानाचियें खोळे । हाल्वलेंही न गळे । तें परब्रह्म ।'—ज्ञा ८.१७. २ (ल.) खळगा, खळी. ' अहो आकाशाचिये खोळे । दिसतीं महगणांचीं कुळें ।'—ज्ञा ११.२५८. ३ पावसापासून रक्षण होण्याकरितां केलेली ( खांद्यावरील कपडा किंवा घोंगडें यांची )घुगी; झूल. ' कीं काळपुरुषाची कांबळी । कीं गजावरी खोळ घातली ।'—रावि ३१.१८. ४ मुलांची कुंची; घुगी. ५ ज्यानें गर्भ वेष्टिलेला असतो ती वार; जार; गर्भवेष्टन; गर्भाशय. ' एकी त्वचेची खोळ । काढोनि दिधली स्वहस्तकीं ।' —मुआदि ११.१४८. ' त्वचेविण गर्भ खोळे । '—दा ३.१.३१. ६ तोंडावरून पायापर्यंत घेतलेलें पांघरूण.—तुगा २२३२. ७ बायकांची वस्त्राची ओटी; ओटी. ' वाढविली न्हाणी खोळा भरली सुईणी '—वसा ६२. ८ गवसणी. 'भरौनि आणे खोळ । उन्मेषांचेआ ।'—ऋ २८२. ९ ( व.ना. ) जाजमासारखें पांघरावयाचें एक वस्त्र. १० देवाच्या मूर्तीवर शेंदराचें चढलेलें जाड पुट; कवच. ११ (ल.) अडचण; सांदीकोंदी. ' वरीं खोळे घातला '—गीता १.६७९. १२ आच्छादन, सापाची कात. ' सांडुनि आंगींची खोळी । सर्प रिगालिया पाताळीं ।'—ज्ञा १४.३१२. १३ पिशवी; झोळी. ' तो वागुलाचें मारु । प्रतिबिंब खोळेभर ।' —अमृ ६.५१. १४ गुहा. १५ बाणाचा भाता. [ सं. खोल=शिरस्त्राण, सं. खोलि=बाणाचा भाता. प्रा. खोल=वस्त्रैकदेश ? ] ०कर—वि. सुरकुत्या, चिरण्या असलेली ( ठिगळ दिलेली, शिवलेली जागा, शिवण ). **खोळ(ल)बुंथ**—स्त्री. (महानु ) घुंगट; अंगावर घेण्याचें जाड वस्त्र. ' स्याळे दीस तरी खोळबुंथ घालीति '—पूजावसर.

**खोळंबणें**—अक्रि. १ थांबणें; वाट पाहणें; तिष्ठणें; उभें राहणें; मार्गप्रतीक्षा करीत राहणें. २ थांबणें; अडणें; खोटी होणें ( काम, व्यवहार याची ). ' आतो त्याविण आमुचाहि तरि तो खोळंबतो कायि हो ? ।'—मोकृष्ण १९.६५.

**खोळंबविणें**—उक्रि. १ थांबून धरणें; तिष्टविणें, वाट पहावयास लावणें किंवा वाट पहात ठेवणें. २ खोटी करविणें; मागें पाडणें; उशीर करविणें ( कामांत ). [ खोळंबणें ]

**खोळंबा(य)**—पु खोटी; थांबविलेली किंवा खोटी केलेली स्थिति; विलंब; उशीर. २ मोडता, अडवणूक. —वि. अक्रिय, कांहीं न करणारा. 'देव खोळंबा देव खोळंबा । गज हल्या म्हणु कोंडी ।'—तुगा. ३६७९. [सं. स्खलन; का. कोळंब=आडकाठी]

**खोळबेला**—पु. खुशाली. —शर.

**खोळा-ळी**—पुस्त्री. १ खोळ अर्थ १,२,३ पहा. ' लेवोनि खोळि पंचभूताची ।'—परमा ४.१४. २ कात (सापाची). 'सांडुनि आंगींची खोळी । सर्प रिगालिया पाताळीं ।'—ज्ञा १४.३१२.

**खोळेरें हरलें**—न. पाटीवाली न मोडतां सरळ जाणारें हरलें; याच्या उलट कासरी किंवा कमरमोडी हरलें. [खोळ]

**खोंट**—वि. खवट पहा. ' दधि मंथुन काढिजे लोणी । तें ठेवितां परी खोंट पाणी ।'—भारा बाल १०.९३.

**खोडा, खोंडाळणें, खोंडाळी, खोंद**—खरमध्ये पहा.

खौस—पु. खिजमतगार. 'पोटासाठीं खौसा । धरितां मलिंछाच्या ।' —तुगा ४१४१.

ख्याख्या—उद्गा. १ खोकला आला असतां होणारा शब्द. (क्रि० करणें; खोंकणें ). २ चिडण्याच्या किंवा रडण्याच्या अनुकरणात्मक शब्द करून. (क्रि० बोलणें; करणें ). ३ खां ! खों !; खोंकणें; खोकणें. [ ध्व. ]

ख्यात—स्त्री. पराक्रम; कीर्ति. ख्याति पहा. 'सागेन मर्दाची ख्यात.' —पंपो ६५. —वि. १ प्रसिद्ध; नामांकित; नांवालौकिकास चढलेला; प्रख्यात. 'येक भक्त जाले ख्यात ।' —दा १.१०.६. २ जगजाहीर; ज्याचा डांडोरा किंवा डंका वाजलेला आहे असा; मशहूर. [ सं. ख्या=बोलणें ]

ख्याति-ती—स्त्री. १ प्रसिद्धि; कीर्ति. 'हंसि आले ख्याती नगरीं असि विभु करूनि आले ख्याति ।' —मोकृष्णपू ४३.२०. २ जगजाहीरपणा; मशहूरता; लोकप्रसिद्धि, डंका; डांडोरा. '.निकृष्टाचळीं ख्याति करूं जाली ।'—राक भाग १ श्लोक ४६. ३ पराक्रम; मर्दुमकी. 'तेव्हां ख्याति प्रत्याहारें केली.' —ज्ञा ९. २१५ 'ख्याति केली विष्णुदासीं ।' —तुगा ३५५. ४ गोष्ट; हकीकत. ५ (वेदांत) प्रतीति; कथनरूप व्यवहार. पांच ख्याती आहेत. पहिली असत् ख्याती, ही शून्यवादी यांची. जसें—असत (नि स्वरूप) सर्पाची रज्जूवर प्रतीति व कथन, दुसरी आत्मख्याति. ही क्षणिक विज्ञानवादी यांची. जसें—क्षणिक बुद्धिरूप आत्म्याची सर्परूपानें प्रतीति व कथन, तिसरी अन्यथा ख्याति. ही नैया यिकांची. जसें—दूर देशांत स्थित सर्पाची दोषाच्या बळानें रज्जु-देशावर प्रतीति व कथन, अथवा रज्जुरूप ज्ञेयाचें सर्परूपानें ज्ञान; चौथी अख्यातिख्याति. ही सांख्य प्रभाकर मताची. जसें 'हा सर्प आहे' येथें 'हा' अंश तर रज्जूच्या इदंपणाचें प्रत्यक्ष ज्ञान आहे व 'सर्प' हें पूर्वी पाहिलेल्या सर्पाचें स्मृतिज्ञान आहे, हीं दोन ज्ञानें आहेत, त्यांच्या दोषाच्या बळानें अख्याति म्हणजे अविवेक ( भेदप्रतीतीचा अभाव ) होतो; पांचवी अनिर्वचनीय ख्याति. ही वेदांत्यांची. वेदांत व सिद्धांतांत रज्जूवर तिच्या अविद्येनें अनिर्वचनीय ( सत् असताहून विलक्षण ) सर्प व त्याचें ज्ञान उपजतें त्याची ख्याति म्हणजे प्रतीति व कथन होतें. 'आख्याति अन्यथाख्याती । शून्यख्याती सत्ख्याती । अनिर्वचनीय जे ख्याती । तो वादू निश्चिती मी उद्धवा ।' —एभा १६.२०७. [ सं. ] ०लावणें—पराक्रम करणें, करून दाखविणें. 'वैद्यादिक पक्षपाती। त्यांसी रणीं लावीन ख्याती ।' —एरुस्व ५.४.

ख्यांति—स्त्री. (व.) चिंता; पर्वा. खंती पहा. 'नापास झालों तरी मला त्याचि ख्यांती नाहीं.'

ख्याल—पु. १ ( संगीत ) खियाल, चीजेचा एक प्रकार; यांत शृंगाररस प्रधान असून ऋतुवर्णन; उत्सवप्रसंग इ० विषय या चिजेंत येतात, तिल्वाडा; त्रिताल, झूमरा इ० तालांत ही चीज म्हणतात. २ —अव. चेष्टा; चाळे; चार; विलास; प्रेम; खेळ; गमती; मौजा. 'माडिल विंदान ख्याल सुखाचें संधान ।' —तुगा ११३. ३ विचार; कल्पना. 'तान्हाल हा ख्याल दिलांत न आणिला.' —स ७.३५७५. ४ (व. काशी) नाद; छंद. 'पहुंना दुधन्याच्या ख्यालि ग ।' —प्रला १७४. 'तुझा ख्याल मला सखे निशिदिनीं चित्तीं असे लागला ।' —काशीतील गाणीं 'माझ्या ख्याली पड़ नकोस.' ५ ( व. ) मन. 'आमच्या ख्यालीं तो मेलाच ! ' [ अर. खियाल् ] ०तमाशा—पु गाणें, नाचणें इ० चैन; विलास. 'तन्हे तन्हेचे ख्यालतमाशे बहुत होती दरबारांत.' —ऐपो ११८.

ख्यालिया—वि. १ ख्याल गाण्यासंबंधीं; ख्यालाच्या उपयोगी. २ ख्याल म्हणणारा; ख्याल म्हणण्यांत कसबी. ख्याली असणें, लागणें, पडणें—१ निरंतर विचारांत, छंदात असणें; इच्छेनें अथवा चिंतेनें ग्रासलें जाणें. २ आसक्तिपूर्वक पाठीस लागणें, मागें असणें.

ख्याली—वि. १ चार, चाळे, चोज, विलास यांनीं परिपूर्ण; विलासी; रंगेल; विनोदी; खेळकर. २ ख्याल या गीतासंबंधीं; ख्यालप्रधान (गाणें); ख्यालिया. [ अर. खियाल् ] ०खुशाली—स्त्री. क्रीडा; मौज; मस्त; चैन; निरनिराळ्या पद्धतीं केलेले. गाणें, खेळणें, नाचणें इ० सुखोपभोग. [ अर. खियाल्+फा. खुश्हाल ]

ख्यालोरा—वि. (कु.) खेळकर; नाना प्रकारच्या लीला करणारा; ख्याली. 'आवूस ख्यालोरी । हेचो बापुस जटधारी । भयणनाय ठेका । पोरगो दिवरयाचो ।' —( मालवणी ) गणपतीची आरती. [ ख्याल ]

ख्यांव, ख्यांव ख्यांव—स्त्री. केंकाटणें; खेकमणें. —उद्गा. दुखावलेल्या कुत्र्याचा शब्द; क्यांव; क्याव, रागावलेल्या कुत्र्याचा शब्द. —क्रिवि. (ल.) खेकसून; रागावून; चिडून कुत्र्याप्रमाणें अंगावर तुटून पडून किंवा येऊन. [ ध्व. ]

ख्यास—पु १ न्यायनिवाडा इ० कयास; कयासनामा पहा. २ विचार; तर्क ( निश्चित ठरविण्यासाठीं; गमन करण्यासाठीं केलेला ). ( क्रि० करणें ). [ अर. कियास ]

ख्यास्त—स्त्री. ( गो. ) बेअब्रूची शिक्षा.

ख्यास्ती—स्त्री. ( गो. ) त्रास; सक्त. खास्त पहा.

ख्रिश्चन, ख्रिस्ती—वि. ख्रिस्ती धर्मविषयक. —पु ख्रिस्ताचे अनुयायी; किरिस्ताव माणूस; ख्रिस्तानुयायी. —प्रेकृ ११.२६.

ख्रिस्त—पु. १ येशूचें नांव. २ ख्रिस्ताचें वचन व धर्मसिद्धांत. —मत्त १६.१६. —लूक ४.४१. —प्रेकृ २.३८. —वि. १ अभिषिक्त. २ येशूची एक पदवी. [ ग्री. ख्रिस्टॉस=अभिषिक्त; इं. ख्राइस्ट ]

ख्रिस्मस—पु. किरिस्तावांचा नाताळाचा सण, हा दर वर्षाच्या अखेरीस ( तारीख २५ डिसेंबरला ) असतो.

ख्वांक—स्त्री. (कु.) खोल जखम, खोंक पहा.

ख्वार—पु. हलाखी. 'लोक याचा फार ख्वार जाहला ।' —जोरा ४५. [ फा. ख्वार् ]

ख्वाहीश, ख्वाहिशी—स्त्री. इच्छा; मागणी. 'ख्वाहिशी-दर्खास्तीप्रमाणें' —रा १०.२५१. [ फा. ख्वाहिश् ]